# ॥ श्रीमद्भागवतरहस्य ॥



श्री सच्चिदानंद प्रकाशन संस्था,
मु. पो. आयनी, ता. खेड, जि. रत्नागिरी ४१५ ७०८

ॐ श्री हरिः।

# ॥ श्रीमद्भागवतरहस्य ॥

'श्रीमद्भागवत' या महापुराणावरील
ब्रह्मीभूत रामचंद्र केशव डोंगरेशास्त्री यांनी गुजराथी व हिन्दी भाषांमधून
दिलेल्या प्रवचनांचा मराठी भावानुवाद

संकलक – संपादक – भावानुवादक
**प्रा. डॉ. म. दा. अभ्यंकर**
(इन्दूर, म. प्र.)

**श्री सच्चिदानंद प्रकाशन संस्था,**
मु. पो. आयनी, ता. खेड, जि. रत्नागिरी ४१५ ७०८

• ॥ श्रीमद्भागवतरहस्य ॥

• संकलक-संपादक-भावानुवादक
प्रा. डॉ. म. दा. अभ्यंकर,
७७, पळशीकर कॉलनी
इन्दूर (म.प्र) पिन कोड ४५२ ००५

• प्रथमावृत्ती
श्रीदत्तजयंती,
मार्गशीर्ष शु. १५ शके १९१६
१७ डिसेंबर १९९४

• सुधारीत द्वितीयावृत्ती
श्रीगणेश चतुर्थी
भाद्रपद शु. ४, शके १९१९
६ सप्टेंबर १९९७



• अक्षरजुळणी
टाइपो आर्टस्
सौ. धनश्री ध. पुरोहित,
१४८१ शुक्रवार पेठ, शनिपार-मंडईरस्ता,
पुणे ४११.००२
☎(०२१२) ४५४९९४

• मुद्रक
श्रीनिवास निगुडकर,
प्रकाश मुद्रणालय,
१४१५ सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०





प्रकाशक
धर्मदास नरेन्द्रबुवा हाटे,
श्री सच्चिदानंद प्रकाशन संस्था
द्वारा: तपोधाम प्रकल्प,
मु. पो. आयनी, ता. खेड,
जि. रत्नागिरी, पिन कोड ४१५ ७०८

• मूल्य: रुपये तीनशे पन्नास मात्र

॥ ॐ श्री हरिः ॥

## ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति।



आपली वाणी ज्यांनी श्रीहरिगुणानुवादासाठी व सच्चरित्कथनासाठी झिजवली, अनीति-अनाचार यांचा अंधार पसरला असता दीपस्तंभासारख्या असणाऱ्या श्रीमद्भागवत या महापुराणाचा आमरण प्रचार केला, अध्यात्म-भक्तिशास्त्र सोपे करून सांगितले, स्वतःच्या आदर्श चरित्राने समाजाला सत्प्रवृत्ती व नीतीची कास धरावी असा आग्रह केला, ज्यांना विसाव्या शतकांतील शुकाचार्य म्हणूनच वंदन करावे असे परम आदरणीय प. पू. ब्रह्मीभूत रामचंद्रशास्त्री डोंगरेमहाराज यांच्या पवित्र चरणीं हा ग्रंथ समर्पण करून त्यांच्याच मुखारविंदांतून स्रवलेल्या श्रीमद्भागवत-प्रवचनरूपी ज्ञानगंगौघातून वाहून आणलेली कावड मराठी-भाषी जनता-जनार्दनाला सादर करतो.

— भावानुवादक

ॐ श्री हरिः।

## • भावानुवादकाचे मनोगत...

उपनिषत्कालीन ऋषी शिष्याला त्याचें अध्ययन पूर्ण झाल्यावर स्वगृही पाठविताना, त्याचे पुढील जीवन सुकर व्हावें या हेतूने त्यास काही आदेश देत असत. तैत्तिरीयातील शिक्षा उपनिषदाचा समारोप स्नातकाला आश्रमोत्तर जीवनासाठी मार्गदर्शन करणारा आहे. तो असा –

**सत्यं वद। धर्मं चर। स्वाध्यायान्मा प्रमदः। इ..**

**'स्वाध्यायान्मा प्रमदः'** हा फार महत्त्वाचा आदेश आहे. स्वाध्याय म्हणजे स्व (Self) विषयीचा अध्याय म्हणजे चिंतन; अर्थात् आपण कोण? कसे? कोठून? कशाकरिता? अशा प्रश्नांची विचारणा. ह्या मौलिक प्रश्नांच्या उत्तरांचा शोध घेत राहणे यालाच साधना म्हणतात. या साधनेच्या आधारे आत्मसाक्षात्कार करून घेणे हे मानवी जीवनाचे चरम लक्ष्य असून त्याच्या प्राप्तीसाठी स्वाध्याय विसरू नये हा **'मा प्रमदः'** चा अर्थ आहे.

स्वाध्यायाकडे लक्ष वेधण्यासाठी समर्थ रामदासांनी दासबोधामध्ये **'बहुज्ञान आणि मुख्यज्ञान'** नामक समासात म्हटले आहे– **हें ज्ञान होयसें भासे। परंतु मुख्य ज्ञान तें अनारिसे**
असे म्हणून ते पुढे म्हणतात–

**"याकारणे ह्या ज्ञानासमान। पवित्र उत्तम न दिसे आन।**
**म्हणोनि आधि आत्मज्ञान। साधिले पाहिजे॥**

"KNOW THYSELF" हे प्रसिद्ध वाक्य हाच आशय सांगत नाही काय? आत्मज्ञानाच्या म्हणजेच आत्मसाक्षात्काराच्या वाटचालीचे पहिले पाऊल म्हणजे सत्समागम. अर्थात् सातत्याने संतवाणीचें श्रवण आणि मनन. या दृष्टीने पाहता संतप्रवर सुप्रसिद्ध प्रवचनकार पू.पा. डोंगरेमहाराज यांनी अव्याहत बहुमोल कार्य केलें हे प्रकर्षाने जाणवते. ते ब्रह्मीभूत झाले असल्यामुळे त्यांची प्रवचने प्रत्यक्ष त्यांच्या वाणीद्वारे ऐकण्याचा आनंद आता आपणांस मिळेनासा झाला आहे. ते हयात असताना त्यांचे **'श्रीमद्भागवत ज्ञानयज्ञ'** देशांत कोठे ना कोठे सतत चालत असत. सुरवातीस त्यांची प्रवचनें गुजराथी भाषेत होत. आफ्रिकेत गुजराथी समाज बराच असल्यामुळे तेथील समाजाने तेथेही त्यांची प्रवचने आयोजित केली. पुढे पुढे ते हिंदी भाषेतूनही प्रवचने करू लागले. आबाल-वृद्ध श्रोतृवृंद मंत्रमुग्ध होऊन अत्यंत तन्मयतेने श्रवण करी. यावरून अध्यात्मासारखा क्लिष्ट वाटणारा विषयही साधारण जनांना ते किती सहज सोप्या भाषेत सांगत हे समजू शकते. त्यांच्या प्रवचनांचे गुजराथी व हिंदी भाषेत छापलेले ग्रंथ हजारोंनी खपत आहेत हेही त्यांच्या लोकप्रियतेचे आणखी एक गमक आहे.

मराठी भाषिकांना हिंदी भाषा समजत असली तरी मातृभाषेतून मिळालेले ज्ञान जितके सहज आत्मसात होते तसे अन्य भाषांतून कसे होईल? मातृभाषा ती मातृभाषाच! आईच्या प्रेमाची महती काय वर्णावी? प्रस्तुत भावानुवादाच्या-संपादनाच्या संदर्भात जे घडले ते असे—

बडोद्याचे माझे स्नेही श्री. कृष्णराव जोशी (माजी बडोदा बँक मॅनेजर) यांच्याकडे गेलो असता पू. पा. डोंगरेमहाराजांची प्रवचने हिंदी भाषी 'श्रीमद्भागवतरहस्य' या ग्रंथाद्वारे वाचनात आली. एकदा वाचून समाधान झाले नव्हते. पुनर्वाचन करावे म्हणून त्यांच्याकडून ग्रंथ घेऊन इंदूरास आलो. पुन्हा वाचण्याच्या वेळी विचार आला की या प्रवचनांचे मातृभाषेंत रूपांतर केल्याने सहजच मनन होईल. कारण लिहिताना मनांतील विचार व तदनुषंगिक भावना जास्त काळ टिकतात. म्हणून दुसऱ्या वाचनाचे वेळी डावीकडे वाचीत असताना उजव्या बाजूस वाचलेल्याचा मराठी भावानुवाद लिहीत गेलो. साधारण वर्षाहून अधिक कालावधी यासाठी लागला.

पुढे काही वर्षांनी म्हणजे सन १९८३ तील फेब्रुवारी मासी इंदूर येथील भागवत ज्ञानसत्रांत पू.पा. डोंगरेमहाराजांच्या मुखारविंदाने प्रत्यक्ष प्रवचने ऐकण्याचा सुयोग आला. मी पूर्वी केलेल्या भावानुवादांत अनेक ठिकाणी दुरुस्त्या, सुधारणा करण्याची सुसंधी प्राप्त झाली. आध्यात्मिक शास्त्रांतील गूढतत्त्वे रूपकांच्या व कथांच्या माध्यमाने सरळ सोप्या भाषेत सांगून श्रोत्यांना ती पूर्णपणे पटवून देण्याची त्यांची स्वतःची अशी अत्याकर्षक हातोटी प्रत्यक्ष अनुभवता आली. त्या ज्ञानसत्रांच्या प्रसंगी हिंदी भाषी "श्रीमद्भागवतरहस्याची" होत असलेली अमाप मागणी पाहून मनात विचार आला की आपण तयार केलेला मराठी भावानुवाद महाराजांस दाखवावा व तो ग्रंथरूपाने प्रसिद्ध करण्यासाठी त्यांची अनुमती घ्यावी. भावानुवाद त्यांना प्रस्तुत केला असता तो त्यांनी ठेवून घेतला. दुसरे दिवशी भेट घेतली असता ते म्हणाले, 'थोडासा चाळून पाहिला. तो चांगलाच आहे. हे हिंदी छापणारे कुठे माझी परवानगी घेतात ? ' एवंच छापण्याविषयी त्यांची आडकाठी नाही हेंच निष्पन्न झाले.

हिंदी भाषी जनता हिंदीभाषी ग्रंथाच्या वाचनाने जशी लाभान्वित होत आहे तशी मराठीभाषी जनताही लाभान्वित व्हावी या हेतूने छापण्याचा विचार मनात आला. म्हणून सुस्वच्छ मुद्रण-प्रत तयार केली. पण आवश्यक त्या अर्थाभावामुळे छापण्याचे जमले नाही. त्यानंतर इंदूर येथील लोकमान्य नगरातील राम मंदिरात दोन अधिक मासात अर्थातच दोनदा या संपूर्ण हस्तलिखिताचे वाचन झाले. पहिले वाचन इंदूरचे सुप्रसिद्ध संगीत कीर्तनकार व प्रवचनकार श्री. मनोहर देव यांनी केले, त्यावेळी त्यांनी काही दुरुस्त्या सुचवल्या व त्यानुसार त्या करण्यात आल्या. मी श्री. देव यांचा ऋणी आहे. दुसरे वाचन इंदूर येथे स्वतः भावानुवादकाने म्हणजे मीच केलें. या वाचनाचे वेळी शे-दीडशे स्त्री-पुरुष श्रवणास बसत. त्यांच्यापैकी बऱ्याच जणांकडून हे सर्व लेखन छापून प्रसिद्ध व्हावे असे आग्रही मत व्यक्त केले गेले व काही भाविक व्यक्तींनी छपाईसाठी होणाऱ्या खर्चापोटी आपल्या शक्तीनुसार मदत करण्याचेही आश्वासन दिले. तरीही संपूर्ण ग्रंथाच्या छपाईचा खर्च माझ्या आवाक्याबाहेरचाच होता. म्हणून पहिला अध्याय **'भागवताचा उद्देश व त्याचे माहात्म्य"** एवढाच इ.स. १९९० साली छापून प्रसिद्ध केला. या पुस्तिकेला श्री. प्र.गो. घाटे यांनी अभ्यासपूर्ण प्रस्तावना लिहून मला उपकृत केले. या पुस्तिकेचे वितरण झाल्यावर पुढील भाग प्रसिद्ध झाले असल्यास कृपया पाठवा अशी अनेकांकडून मागणी होऊ लागली. परंतु इच्छा व योजना असूनही द्रव्याभावामुळे काही करता आले नाही. श्रीहरीची इच्छा म्हणून शांत राहिलो.

वर्षे उलटत गेली व होता होता १९९३ साल उजाडले. नागपूर येथून रामकृष्ण आश्रमाद्वारे प्रसिद्ध होणाऱ्या **"जीवन विकास"** या मासिकाचा मी वर्गणीदार आहे. या मासिकाच्या ऑक्टोबर १९९३ च्या अंकात **"कृपामूर्ति नृसिंहसरस्वती"** ह्या पुस्तकाचे परीक्षण वाचले. श्रीगुरुचरित्रांतील संपूर्ण चरित्राचे भावपूर्ण व रसाळ गद्य-कथन असे प्रशंसापूर्ण परीक्षण वाचल्यावर या पुस्तकाचे लेखक

यतिवर्य कृष्णानंद सरस्वती यांजकडून पुस्तकाची प्रत मागवली व त्यांस पू.पा. डोंगरेमहाराजांच्या श्रीमद्भागवतावरील प्रवचनांचा संपूर्ण भावानुवाद मी केला असून तो द्रव्याभावी प्रकाशित न होता पडून आहे हे कळविले व सोबत **"भागवताचा उद्देश व माहात्म्य"** ही पुस्तिकाही पाठवली. उत्तरी २८-१२-९३ च्या पत्रात त्यांनी लिहिले—

**"भागवताचा उद्देश व माहात्म्य"** ही पुस्तिका आज मिळाली. लगेच वाचून काढली. भावानुवाद अत्युत्तम झाला आहे. योगायोगाने मी पण सध्या या ग्रंथाच्या गुजराथी भाषेतील ग्रंथाच्या आधारे मराठीत ग्रंथ तयार करण्याच्या प्रयत्नात असून आतापर्यंत १५० पृष्ठे तयार झाली आहेत. पण मी हे काम आजपासूनच थांबवीत आहे. तुमचा संपूर्ण ग्रंथ प्रकाशित झालेला आपण पाहू व निश्चित तो वर्षभरांत प्रकाशित होईल. आपण कसलीही काळजी करू नका."

दत्तभक्त आणि पुनः यति संन्यासी अशा सत्पुरुषांचे शुभकामनायुक्त उद्‌गार फलीभूत होत असतात याचाच हा प्रत्यय! तेव्हा पू. पा. स्वामी कृष्णानंदांच्या आत्मीयतेच्या प्रोत्साहनाने व त्यांनीच व्यावहारिक कौशल्याने आखलेल्या योजनेनुसार माझे लेखन ग्रंथरूपाने आज साकार होत आहे. या आनंदाचे व समाधानाचे वर्णन शब्दातीत आहे.

हे मनोगत पूर्ण करण्यापूर्वी या ग्रंथाचे प्रकाशक ह. भ. प. धर्मदास श्री. नरेन्द्रबुवा हाटे यांचे मी आभार मानले नाहीत तर ती बाब अत्यंत कृतघ्नपणाची ठरेल.

मूळ धर्म-ग्रंथांचेच तेवढे नव्हे, तर त्यावरील अनेकविध ग्रंथकारांची भाष्ये, त्यांच्या टीका-टिप्पण्या, ग्रंथकारांनी सादर केलेले प्रशंसात्मक अथवा खंडनात्मक लेखन या सर्वांचे सखोल, अभ्यासपूर्ण वाचन-मनन केलेले धर्मदास नरेन्द्रबुवा हाटे यांचा माझ्याशी परिचय करून देणारे स्वामी कृष्णानंद सरस्वतीच होत. त्यांच्या आर्जवी आग्रहामुळेच सुप्रसिद्ध कीर्तनकार श्री. हाटे यांनी या ग्रंथाच्या प्रकाशनाची जबाबदारी स्वीकारली. एवढेच नव्हे, तर हे करण्यासाठी श्री सच्चिदानंद प्रकाशन संस्थेची त्यांनी निर्मिती केली. आयनी, ता. खेड, जि. रत्नागिरी येथील सनातन धर्म सेवा संघाच्या प्रमुख संचालकपदी असलेली श्री. हाटे ही व्यक्ती धर्माबाबतचा व धर्मविषयक ज्ञानाचा एक चालता-बोलता ज्ञानकोशच आहे, असे म्हटले तर ते अतिशयोक्तीचे ठरणार नाही. या संपूर्ण ग्रंथाचे काळजीपूर्वक वाचन त्यांनी केले आहे व आवश्यक तेथे सुधारणाही केल्या आहेत. मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

आता अंती आपणा वाचकांना एक नम्र विनंती करून हे मनोगत संपवतो.

पू. पा. डोंगरेमहाराज हयात होते तोपर्यंत त्यांचे श्रीमद्भागवतावरील प्रवचनांचे ज्ञान-यज्ञ कुठे ना कुठे अव्याहतपणे चालत असत. त्यांनी प्रज्वलित केलेली ही ज्ञानज्योत अखंड तेवत राहावी, ह्यासाठीच हा प्रपंच! परंतु हे साधण्यासाठी हा ग्रंथ केवळ एक शोभा म्हणून दिवाणखान्यात न राहता त्याचे नित्य अथवा नैमित्तिक रीत्या वाचन-श्रवण होत राहिले पाहिजे. ह्यासाठी जे कोणी या ग्रंथाचा संग्रह करतील त्यांनी किमान वर्षातून एकदा किंवा तीन वर्षांनी येणाऱ्या अधिक मासात याचे अवश्य वाचन करावे. एकाने विधिवत वाचावे व आप्तेष्ट मित्रमंडळींनी सभोवार बसून श्रवण करावे. अशा सामूहिक वाचन-श्रवणाने अनेकांना ज्ञानलाभ होईल व या ग्रंथनिर्मितीचा हेतू साध्य होईल. या दुसऱ्या आवृत्तीमध्यें पहिल्या आवृत्तीतील सर्व मुद्रणदोष काढून जास्तीत जास्त निर्दोष असा ग्रंथ वाचकांच्यापुढे यावा असा प्रयत्न केला आहे. सदभिरूचि असलेले अधिकाधिक वाचक या ग्रंथाचे स्वागत करतील अशी आशा व्यक्त करतो.

इत्यलम्।

**म. दा. अभ्यंकर**

ॐ श्री हरिः।

## ● दुसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने...

"**श्रीमद्‌भागवतरहस्य**" हा **प.पू. कै. रामचंद्रशास्त्री डोंगरेमहाराज** यांच्या "**श्रीमद्‌भागवत**" या महापुराणावरील प्रवचनांचा मराठी अनुवाद ग्रंथरूपाने आम्ही १९९४ च्या डिसेंबरात प्रकाशित केला.

या ग्रंथाच्या प्रकाशनाचीच नव्हे तर या प्रकाशनाबरोबरच "**श्रीसच्चिदानंद प्रकाशन संस्थे**"ची स्थापना करण्यासाठी ज्यांनी मला प्रेरणा दिली, प्रोत्साहन दिले, किंबहुना सर्व तऱ्हेचे अमोल मार्गदर्शन आणि सहकार्य दिले ते यतीराज **प.पू. कृष्णानंद सरस्वती** आज आपल्यात राहिले नाहीत. या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनानंतर केवळ सहाच दिवसांनी म्हणजेच दि. २३ डिसेंबर १९९४ रोजीच ते ब्रह्मीलीन झाले. ग्रंथप्रकाशन क्षेत्रातील एक वटवृक्षच उन्मळून पडला आणि त्या वृक्षाच्या आश्रयाला असलेले माझ्यासारखे पाखरू आधारहीन झाले.

"**ना नफा ना तोटा**" या भूमिकेतूनच आम्ही "**श्रीमद्‌भागवतरहस्य**" या ग्रंथाची पहिली आवृत्ती काढली, पण त्यातील "**ना नफा**" एवढेच खरे झाले. "**ना तोटा**" ही अवस्था टिकली नाही. कमीतकमी मूल्य आकारण्याच्या खटाटोपात व अधिकाधिक चांगल्या दर्जाने ग्रंथ वाचकांच्या हाती पडावा या खटापटींत प्रचंड तोटा मात्र पदरी आला. ज्या सज्जनांनी या ग्रंथासाठी कर्जाऊ रक्कम दिली होती, त्यांची रक्कम, परतफेडीची मुदत संपून गेली तरी आम्ही ती परत करू शकलो नाही. परतफेडीसाठी मुदत वाढवून मागितली आहे तसेच झाल्या विलंबाबद्दल क्षमा मागितली आहे. आम्ही या सर्वांचे कर्ज येत्या १९९७ च्या ऑक्टोबर अखेरीपर्यंत निश्चित परत करणार आहोत हे जाहीर आश्वासन या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रसंगी देत आहोत. या प्रकरणी या ग्रंथाचे भावानुवादक डॉ. म. दा. अभ्यंकर यांना तर फारच मनस्ताप सहन करावा लागला आहे. ते मला क्षमा करतील अशी आशा करतो. पहिल्या आवृत्तीच्या वेळी ज्यांनी ज्यांनी कर्जाऊ रक्कम दिली वा अर्थसहाय्य दिले त्या सर्व सज्जनांचा मी ऋणी आहे. त्यांनी हे अमोल साहाय्य केले नसते तर हा ग्रंथच प्रकाशित झाला नसता.

या दुसऱ्या आवृत्तीची निर्मिती ज्यांच्या अथक प्रयत्नांतून व प्रोत्साहनातून झाली त्यांचा ऋणनिर्देश करणे हे माझे कर्तव्य आहे; आणि ते मी येथे पार पाडीत आहे. सर्व प्रथम माझे परमस्नेही, हितचिंतक आणि आध्यात्मिक ग्रंथांचे गाढे अभ्यासक श्री. गजाननराव आपटे यांचा ऋणनिर्देश करणे आवश्यक आहे. त्यांनी मला नैतिकधैर्य व आधार दिला म्हणूनच

मी या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीची निर्मिती करायला धजलो. त्यांचे बरोबर त्यांचे व माझे गाढ स्नेही श्री. चंद्रशेखर व्ही. हिरेमठ यांनी प्रामुख्याने मला या दुसऱ्या आवृत्तीच्या निर्मितीसाठी भरीव आर्थिक साहाय्य मिळवून दिले. अनेक अनामिक चाहत्यांचा आर्थिक आधार मिळवून दिला व मला हा ग्रंथ पुन्हा प्रकाशित करण्यास आग्रहपूर्वक प्रवृत्त केले. या दोघांच्या प्रेमपूर्वक सहकार्याला मी कदापि विसरू शकणार नाही.

"**श्रीमद्भागवतरहस्य**" च्या पहिल्या आवृत्तीचे वेळीं ज्यांनी या ग्रंथाची अक्षरजुळणी केली त्या पुण्यातील टाइपो-आर्टस्‌च्या श्री. धनंजय पुरोहित व सौ. धनश्री पुरोहित या दाम्पत्याने या द्वितीय आवृत्तीसाठीचे पौरोहित्य उत्तम केले आहे, ग्रंथ अधिक चांगला, सुबोध, सुस्पष्ट आणि अचूक व्हावा याकरिता त्यांनी खूप श्रम घेतले आहेत. श्री. ब. रा. कुलकर्णी यांच्या सहाय्याने मुद्रीतशोधनाचे काम झाले आहे. ग्रंथ निर्मितीतीत अत्यंत महत्त्वाचे कार्य म्हणजे मुद्रणाचे काम पहिल्या आवृत्तीच्या वेळी कल्पना मुद्रणालयाचे श्री. आनंद लाटकर यांनी उत्कृष्ट केले, तर या दुसऱ्या आवृत्तीचे मुद्रण पुण्यातीलच प्रकाश मुद्रणालयाच्या श्री. श्रीनिवास निगुडकर यांनी केले आहे. त्यांच्या कौशल्यपूर्ण मुद्रणपद्धतीने हा ग्रंथ सजला आहे. मी या सर्वांचा अत्यंत आभारी आहे.

द्वितीय आवृत्तीच्या प्रकाशनाची जाहिरात करणे आवश्यक होते. द्वितीय आवृत्तीच्या संकल्पाची रूपरेषा, प्रकाशनपूर्व मूल्य सवलतीची योजना ग्रंथप्रेमी व आध्यात्मिक प्रवृत्तीच्या लोकांना समजावी म्हणून सर्वप्रथम एक सुबक मुद्रित पत्रिका तयार केली. त्याच्या मुद्रणाचे काम केवळ एका दिवसात करून देणारे माझे मुंबईतील स्नेही व एम. के. प्रिंटर्सचे मालक श्री. अजित मापुस्कर यांचा ऋणनिर्देश मी केला नाही तर ते उचित ठरणार नाही. मी त्यांचाही अत्यंत आभारी आहे.

श्रीमद्भागवतरहस्य ह्या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रती वर्षभरात संपल्या. अनेक ठिकाणाहून या ग्रंथाला मागणी येऊ लागली. त्यामुळे डोक्यावर पहिल्या आवृत्तीच्या कर्जाचा मोठा बोजा असतानाच जनताजनार्दनाकडून येणार प्रचंड मागणीचा विचार करून ही दुसरी आवृत्ती काढत आहे. आध्यात्मिक प्रवृत्तीचे सज्जन या सुधारीत आवृत्तीचे मनापासून स्वागत करतील अशी खात्री आहे.

ही दुसरी आवृत्ती प्रसिद्ध करताना माझी पत्नी सौ. मेधा, तसेच वृत्तपत्रीय जाहिरातीसाठी सौ. अलका दाते या दोघींचे अमोल सहकार्य लाभले. कार्यालयीन कामकाजात श्री. मोरेश्वर कान्हेरे व चि. सचिन भागवत यांचेही अमोल सहकार्य मिळाले. या सर्वांचा ऋणनिर्देश केलेला त्यांना आवडणार नाही, परंतु त्यांच्या योगदानाचा तरी निर्देश करणे हे माझे कर्तव्य आहे, तेवढेच करीत आहे. परमेश्वरानें या मंडळींना यश, समृद्धि व आनंद द्यावा अशी प्रार्थना करतो.

अखेरीस ज्यांच्या प्रवचनांचा हा प्रासादिक ग्रंथ आहे त्या. प.पू. कै. डोंगरेमहाराजांना अभिवादन करतो. त्यांच्या आशिर्वादाची भिक्षा मागून श्रीमद् भागवत रहस्य या ग्रंथाची दुसरी आवृत्ती जनताजनार्दनापुढे सादर करतो.

तपोधाम प्रकल्प,
आयनी-खेड, रत्नागिरी.

—धर्मदास श्री. नरेन्द्रबुवा हाटे

# श्री सच्चिदानंद प्रकाशन संस्थेची आगामी प्रकाशने आध्यात्मिक साधकांच्या संग्रही हवीच !!

(१) तत्वार्थ रामायण
(प.पू. कै. डोंगरेमहाराज यांची
रामायणावरील रसाळ प्रवचने)
भावानुवादक: डॉ. म. दा. अभ्यंकर, इंदौर.

(२) कीर्तनामृत
पुष्प १ ते १०
लेखक: ह.भ.प. धर्मदास श्री. नरेंद्रबुवा हाटे
(कीर्तनाचार्य)

(३) कीर्तन सुदीप
(आकाशवाणीवरील कीर्तने)
पॉकिटबुक सिरीज
लेखक: ह.भ.प. धर्मदास श्री. नरेंद्रबुवा हाटे
(कीर्तनाचार्य)

# पाऊलवाट

धर्मदास श्री. नरेन्द्रबुवा हाटे

श्री

इदं भागवतं नाम पुराणं ब्रह्मसंमितम्।
भक्तिज्ञानविरागाणां स्थापनाय प्रकाशितम्॥
वेदोपनिषदां साराज्जाता भागवती कथा।
अत्युत्तमा ततो भाति पृथक्भूतः फलाकृतिः॥

मानवी जीवनांत कोण कोणाला महत्त्व देईल, याबद्दल निश्चित तर्क करता येणार नाही. पण माणसाला माणूस म्हणून कांहीं जीवन जगायचें असेल तर त्याने भक्ति व तज्जन्य ज्ञान-वैराग्य यांची जोपासना करायला हवी यांत शंका नाही. भक्तिविरहित जीव जिवंत माणसेंच नव्हेत असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

... तैसें माझिये भक्तिवीण। जळो ते जियालेपण।
अगा पृथ्वीवरी पाषाण। नसती काई॥

इतकेच काय, ईश्वरभक्तिविरहित माणसें पापाचरणाचीच कांस धरणारी असतात, पाप वाढविणारी असतात. "**तैसा भक्तिहीनु वाढीन्नला। दोषांची लागी**"॥ असेंच श्रीज्ञानेशांचें मत आहे. संतांवर विश्वास ठेवून आपले जीवन भक्ति, ज्ञान-वैराग्य यांनी युक्त करून आपले माणूसपण टिकवणे आणि त्यातूनच दिव्यत्वाची अनुभूती घेऊन देवपणाने मिरवणे हें माणसाचें आद्यकर्तव्य आहे. भक्ति-ज्ञान-वैराग्य हे आपल्या अंतःकरणांत निर्माण करण्यासाठी श्रीमद्भागवतपुराणासारखा ग्रंथ नाही.

श्रीमद्भागवताच्या अगोदर श्रीमद्भागवतमाहात्म्यांत एक कथा आहे. देवर्षि नारदांना वृंदावनांत एक अत्यंत दुःखी, कष्टी व म्लान अशी स्त्री दिसली. तिच्या दोन बाजूला दोन वृद्ध पुरुष निश्चेष्ट पडलेले त्यांनी पाहिले. नारदांनी तिची विचारपूस केली. तूं कोण? अशी येथे दुःखीकष्टी होऊन कां बसली आहेस? आणि हे दोघे कोण? असें तिला विचारले. ती स्त्री म्हणाली, मी भक्ति या नावाने प्रसिद्ध असून, हे काळाच्या तावडींत सांपडून जर्जर झालेले ज्ञान व वैराग्य नांवाचे माझे दोन मुलगे आहेत. मी द्रविड देशांत जन्मले, कर्नाटकांत वाढले. महाराष्ट्रात मला पोषक वातावरण प्राप्त झालें, पण गुजराथ प्रांतांत कलियुगाचा चांगलाच जम बसल्यामुळें तेथें माझ्या मुलांसह माझी अगदी पार दैना उडाली. मी पुत्रांसह पुष्कळ काळपर्यंत निर्बळ झालें, आणि तेव्हांपासून माझा प्रभाव कमी झाला आहे. जेव्हां मी वृंदावनांत आलें त्यावेळीं मात्र मला तारुण्य व लावण्य लाभले. परंतु हे माझे ज्ञान व वैराग्य असे दोघे पुत्र मात्र पदोपदीं समाजानें केलेल्या उपेक्षेला कंटाळून-विटून येथे निपचित निजून राहिले आहेत. मला दुःख होते ते याचे कीं मी यांची आई असून, मी तरुण झाले आहे व

हे माझे मुलगे असूनही वृद्ध झाले आहेत. तिची कथा ऐकून देवर्षि नारदांनी तिचे सांत्वन केले आणि भगवान श्रीकृष्ण तुझे कल्याण करील अशी शाश्वती दिली. ते म्हणाले, हा कलिप्रभाव आहे. सज्जन दुःखी व दुर्जन आनंदी असेंच दृश्य सध्या दिसायचे. सद्यःस्थिती अशी आहे कीं लोक याठिकाणी भक्तीला मान्यता देत आहेत, पण ज्ञान व वैराग्य यांचा स्वीकार करणारे कोणी नसल्यामुळेंच यांना वृद्धत्व आले आहे.

युगधर्मानुसार जरी आतां विपत्काळ आलेला असला तरी या कलियुगांत अन्य युगांप्रमाणे ज्ञान-वैराग्यः या साधनांनी मुक्ति प्राप्त होणार नाही, तर केवळ भक्तीनेच मुक्ति प्राप्त व्हायची आहे म्हणून भगवंताने प्रिय, सुंदर व सत्य अशा तुला निर्माण केलें आहे असें नारद म्हणाले.

**सत्यादित्रियुगे बोधवैराग्यौ मुक्तिसाधकौ।**
**कलौ तु केवला भक्तिर्ब्रह्मसायुज्यकारिणी॥**

सत्यादि तीन युगांमध्यें ज्ञान व वैराग्य हीं मुक्तीचीं साधनें होतीं. परंतु कलियुगांत मात्र भक्तिच मोक्ष देणारी आहे. तूं मोक्षदायिनी आहेस. तुझ्यामुळे (भक्तिमुळें) हरिभक्तीचें पोषण होते. त्यामुळे तुझ्यावर प्रसन्न होऊन भगवंताने तुला मुक्ति नांवाची एक दासी आणि ज्ञान व वैराग्य नांवांचे हे दोन पुत्र दिले. कृतयुगापासून द्वापारापर्यंत तूं या पृथ्वीवर तुझ्या ज्ञान-वैराग्य या मुलांसह आणि दासी-मुक्तीला बरोबर घेऊन भक्तजनांना कृतार्थ करीत राहिलीस, पण कलीच्या प्रभावांत पाखंड रोगाने मुक्ति त्रस्त झाली आणि तुझ्या आज्ञेने वैकुंठलोकीं गेली. तरीही तुझ्या आवश्यकतेनुसार ती तुझ्या आज्ञेने तूं सांगशील त्या भक्ताला जवळ करते. कलियुगांत ज्ञान आणि वैराग्य या तुझ्या मुलांची मात्र लोकांनी निर्घृण उपेक्षा केली व त्यामुळें यांची ही अशी दैना झाली आहे. इतके सांगून नारदांनी तिला धीर दिला व म्हणाले, "हे भक्ति! तूं चिंता करू नकोस. मी तुला घराघरामध्यें पोहोंचवीन. '**तास्मिंस्त्वां स्थापयिष्यामि गेहे गेहे जने जने।**' इतर सर्व साधनें बाजूला सारून लोक तुझाच आश्रय करतील असा मी तुझा (भक्तीचा) प्रचार करीन, हे जर करूं शकलो नाही तर मी खरा हरिदासच नाही."

नारदांनी भक्तीला अशाप्रकारें धीर दिला; आणि भक्तीच्या आग्रहासाठीं तिच्या ज्ञान व वैराग्य या दोनही पुत्रांना जागे करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या कानांत वेदघोष केला, अनेक ज्ञानाच्या गोष्टी सांगून पाहिल्या पण सारे व्यर्थ ठरलें. इतक्यांत आकाशवाणी होऊन नारदांना, तूं सत्कर्म कर व हें सत्कर्म तूं साधुजनांकडून समजून घे; तूं सत्कर्म केल्यावर हे दोघे जागे होतील, असा आदेश मिळाला. बराच काळ नारदांनी ज्या सत्कर्मांनी ज्ञान व वैराग्य जागे होतील, पुष्ट होतील व सतेज बनतील अशा सत्कर्माचा बोध देणारे साधू शोधले. पण कोणीही सत्पुरुष त्यांना असे प्रबोधन करीना. अखेर सुदैवाने त्यांची सनत्कुमारांशी भेट झाली व त्यांनी नारदांना कोणते सत्कर्म केल्याने भक्ति, ज्ञान-वैराग्य आणि मुक्ति यांसह आनंदाने या युगांत या जगतांत राहील याविषयीं सर्व माहिती दिली. ते म्हणाले—

**सत्कर्म तव निर्दिष्टं व्योमवाचा तु यत्पुरा।**
**तदुच्यते श्रुणुष्वाद्य स्थिरचित्तः प्रसन्नधीः॥**
**सत्कर्मसूचको नूनं ज्ञानयज्ञः स्मृतो बुधैः।**
**श्रीमद्भागवतालापः स तु गीतः शुकादिभिः॥**
**भक्तिज्ञानविरागाणां तद्घोषेण बलं महत्।**

**व्रजिष्यति द्वयोः कष्टं सुखं भक्तेर्भविष्यति ॥**
**प्रलयं हिं गमिष्यन्ति श्रीमद्भागवतध्वनेः ।**
**कलेर्दोषा इमे सर्वे सिंहशब्दाद्वृका इव ॥**
**ज्ञान वैराग्यसंयुक्ता भक्तिः प्रेमरसावहा ।**
**प्रतिगेहं प्रतिजनं ततः क्रीडां करिष्यति ॥**

सनत्कुमार म्हणाले कीं "आकाशवाणीने सत्कर्म कोणते करायला सांगितलें हें तूं शांतचित्ताने व प्रसन्न बुद्धीने ऐक. नारदा, हें सत्कर्म म्हणजे अन्य कांहीं कर्म नसून किंवा अन्य कोणताही कर्मसूचक यज्ञ नसून हें सत्कर्म म्हणजे एक दिव्य ज्ञानयज्ञ आहे व हा ज्ञानयज्ञ म्हणजे श्रीशुकाचार्यांदिंनी पूर्वीं गायलेल्या श्रीमद्भागवत महापुराणाचें पठण करणें होय. श्रीमद्भागवताच्या पाठघोषाने भक्ति, ज्ञान-वैराग्य यांना बळ प्राप्त होईल, ह्यायोगें ज्ञान व वैराग्य यांचे कष्ट दूर होतील व भक्तीला सुख मिळेल. ज्याप्रमाणे सिंहाची गर्जना ऐकून लांडगे पळून जातात त्याप्रमाणे श्रीमद्भागवताच्या घोषध्वनींच्या श्रवणाने कलि संबंधित सर्व दोष पळून जातील; म्हणजेच नष्ट होतील आणि ज्ञान-वैराग्य यांच्यासह प्रेमरसपरिपूर्ण भक्ति या भागवताच्या पाठानें घरोघरीं प्रत्येकाच्या अंतःकरणांत रममाण होईल."

'नारदा! ज्या तू चार श्लोकांचें भागवत श्री व्यास यांना सांगितलें होतेंस व ज्यामुळें श्री व्यासांचा मोहही नाहीसा झाला होता, तेंच भागवत तूं भक्ति, ज्ञान-वैराग्याला पुष्टी यावी म्हणून सांगावें. याच्या योगें शोक-दुःख निवृत्ति होते. "**श्रीमद्भागवतं श्राव्यं शोकदुःखविनाशनम् ।**

वरील कथा श्रीमद्भागवतमाहात्म्यांतील आहे. अत्यंत सुंदर असें रूपक या कथेंत स्पष्ट केलेलें आहे. भक्ति, ज्ञान, वैराग्य आणि मुक्तिची आज काय दशा आहे? माणसाला माणूस म्हणून जगण्यासाठीं व अंतीं दिव्यत्व प्राप्त व्हावे याकरितां ज्या ज्या गोष्टींची आवश्यकता आहे त्या सर्व अध्यात्मशास्त्राने दिल्या आहेत. आमच्या दिव्य तेजस्वी ऋषीजनांनी, साधुजनांनी अगदीं कंठरवानें या कलीच्या भयंकर आपत्तीतून सुटका करून घेण्यासाठीं केलेला उपदेश आम्ही धिक्कारल्यामुळें भक्ति, ज्ञान-वैराग्य व मुक्ति यांना हीन अवस्था आली आहे असें हें वर्णन वरील कथेंतून स्पष्ट होते. किंबहुना भक्ति-ज्ञान-वैराग्य यांची आम्ही उपेक्षा केल्यामुळें अखिल मानव-समाज हीन बनला आहे. क्रूर बनला आहे, विषयलंपट बनला आहे, असेंच म्हणायला हवें.

मानवी जीवनाला सुख, शांति व समृद्धीचा लाभ व्हावा म्हणून आधुनिक जगाने, विशेषतः गेल्या शतक-दीडशतकांत अनेक वैचारिक प्रमेयें हाताळलीं. अनेक सिद्धान्त प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. विज्ञान-प्रगत युगानें अनेक भौतिक सुखसोयी उपलब्ध करून दिल्या. यामध्यें सर्वांत लोकप्रिय जीवन-पद्धति-राज्यपद्धति ही लोकशाहीची ठरली.

ही लोकशाही ज्या व्यक्तिस्वातंत्र्यवादावर निर्भर राहून स्वातंत्र्य, समता व बंधुता या तत्त्वत्रयीचा जप करीत आहे व जी लोकशाही सर्व तऱ्हेच्या अत्याचाराला नष्ट करून अखिल मानवसमाज सुखी करण्यासाठीं कटिबद्ध आहे, त्या आजच्या लोकशाहीमधून, लोकतंत्रवादातून शोषण व दुःख हाच परिणाम कां अनुभवास येत आहे? लोकशाही असो, साम्यवाद असो, अथवा अन्य कोणतीही विचारप्रणाली असो, माणसाला या नव्या विचारांनी सुख दिले, समृद्धी दिली व शांतीचा लाभ दिला असें जर वाटत असेल तर जगांतील आजच्या सर्व तऱ्हेच्या उद्रेकांचें कारण काय? मनुष्यनिर्मित आपत्ति, दुःखें व विविध समस्यांच्या मुळाशीं नेमकें काय आहे? या समस्या, दुःखें आणि आपत्ति निर्माण होतात याचें

कारण संस्कारहीन मनुष्य ! पाप-पुण्याच्या कल्पना फेकून देऊन, नीतितत्त्वांना पायदळीं तुडवून स्वतःच्याच सुखसोयीचा विचार करणारा फक्त माणूस आहे ! त्यासाठीं भौतिक सुधारणांभोंवती पिंगा घालणारा माणूसच या अनर्थाला कारण आहे. केवळ जडभौतिक प्रगत विश्वांत हा माणूस फक्त प्राणी म्हणून आपल्या शरीराच्या गरजा पूर्ण करील, पण आपले माणूसपण टिकवेल कां ? तर त्याचें उत्तर "नाही" असेंच द्यावें लागेल. आपल्या अवतीभोंवतीचें वातावरण इतकें दूषित झालें आहे कीं त्यामुळें चांगल्या अभिरुचीच्या सुसंस्कृत माणसाचे डोकें बधीर होऊन जातें. आम्ही हें समजून घेतलें पाहिजे कीं इंद्रियोपभोगजन्य सुख टिकत नाही. ते नष्ट होईल. सुखाचें साधन अपुरें पडेल, साधन नाश पावेल. आपल्याला त्याचा वीट येईल, कदाचित आपण मरू किंवा कितीही भोगले तरी वासनेची आग वाढेल. अशी आग वाढते व त्यातूनच अनेक अत्याचार, अनाचार, भ्रष्टाचार जन्माला येतात. यावर योग्य तो उपाय हवा. केवळ शिक्षण, पदव्या, तंत्रज्ञान किंवा विज्ञान यावर उपाय सांगू शकत नाही. या सर्व दुःखांची उपपत्ति लावून मर्यादित मर्त्य व विनाशी भौतिकतेतून अमर्याद चैतन्यमय आणि आनंदमय अशा अवस्थेंत जीवन नेऊन पोहोचविणे आवश्यक आहे.

कोण करणार हें सर्व ? अमर्याद व्यक्तिवाद आणि अनिवार्य तृष्णा याला अटकाव करण्याचें काम आपल्या स्वतःच्या मनाच्या आधीन आहे. मनाला प्रबोधन होऊन ते भक्तिमार्गासारख्या साधनाचा अवलंब करील तर खऱ्या सुखशांतीची पहाट होईल. आजच्या लाजिरवाण्या, घृणास्पद व संपूर्ण जगाला विध्वंसाच्या खाईंत लोटणाऱ्या भोगवादाला तिलांजली देण्याचें कार्य मनाला शक्य होईल. मानवी जीवन हें पशुत्व व देवत्व यांच्यामधील दारवंठा आहे. या जीवनांत भक्तिमार्गाचा अवलंब करून ज्ञान आणि वैराग्य प्राप्त करून घ्यावें व देवजीवनांत हें जीवन परिणत करावें हेंच खरें साध्य आहे. पशुत्वाकडे नेणाऱ्या प्रवृत्ति समूळ नष्ट करणें यासाठींच महाप्रयत्न हवेत. या दोन्ही गोष्टींसाठीं "**श्रीमद्भागवत**" प्रत्येक प्रयत्नशील मनुष्याला साहाय्यभूत ठरणार आहे.

श्रीमद्भागवतासारखे महान ग्रंथ आपल्याला जें सांगतात तें समर्थ रामदासस्वामींच्या शब्दांत सांगायला हरकत नाही. समर्थ म्हणतात, '**देहेबुद्धि ते आत्मबुद्धि करावी। विदेहीपणे मुक्ति भोगीत जावी॥**' समर्थांचा हा उपदेश अत्यंत मननीय आहे. श्रीमद्भागवताचें सार यांत आहे असें म्हटलें तर वावगें ठरणार नाही. देहबुद्धि म्हणजे देहाबद्दलची आसक्ति असणें होय. अशाश्वत अशा देहाबद्दल आसक्ति निर्माण होऊन देह सुखी तर मी सुखी अशी आपली धारणा होऊन ती देहाशी तादात्म्य होते. त्यामुळें आपलें मन व इंद्रियें देहांतून सुख मिळविण्यासाठीं धडपडतात. देह मीच आहे ही देहबुद्धि ! सर्व तऱ्हेच्या दुःखांचें कारण या देहबुद्धिमध्यें सांपडतें. हें देहतादात्म्य म्हणजेच अज्ञान आहे. ही देहबुद्धि सोडून आपल्या ठिकाणीं आत्मबुद्धि निर्माण करणे आवश्यक आहे. आत्मबुद्धि निर्माण होणे हें आत्मज्ञानाचें द्योतक आहे. या आत्मबुद्धिनें युक्त, आत्मज्ञानानें परिपूर्ण जो असतो तो जरी देहाने माणूस म्हणून वावरत असला तरी तो ज्ञानाने परमेश्वरस्वरूपच असतो. मनानें तो उदार आणि विशाल अंतःकरणाचा असतो. त्याचे विचार अत्यंत प्रगल्भ आणि उदात्त असतात. भावना अत्यंत पवित्र तशीच दृष्टी अत्यंत निर्मल असते. प्रेम पराकोटीचे शुद्ध असतें आणि जीवन कमालीचें परोपकारी असते. निःस्वार्थी, निष्कपटी आणि निष्काम असाच आत्मज्ञानी तो असतो. प्रत्येक मनुष्य अशा आदर्शांनी युक्त असावा हीच आपल्याकडील ऋषीजनांची व साधुपुरुषांची अपेक्षा आहे. या अपेक्षेतूनच उच्च दर्जाचें तत्त्वज्ञान— जीवनसिद्धान्त समाजाला समजविण्याचा प्रयत्न आपल्याकडच्या वाङ्मयांतून झाला आहे. हें सर्व आर्ष वाङ्मय म्हणून प्रसिद्ध आहे. श्रीमद्भागवत महापुराण याला अपवाद नाही.

या भागवताबद्दल भारतातील विविध भक्तिसांप्रदायिकांना आंतरिक ओढ असून अखिल मानवजातीचें परमकल्याण साधणारा हा अलौकिक ग्रंथ आहे याबद्दल तिळमात्र संशय नाही. ज्ञान आणि भक्ति यांचा मनोहारी संगम या ग्रंथांत पहायला मिळतो. भगवान श्रीकृष्णांची भक्ति व त्या भक्तिमधून निर्माण होणारे अद्वैत तत्त्वज्ञान त्यांनीच सिद्ध केलेले या ग्रंथातून पहायला मिळते. अशा या पवित्र संगमाने प्रभावित होणारे ज्ञानैकनिष्ठ महात्मेसुद्धां **'कृष्णात्परं किमपि तत्त्वमहं न जाने।'** असें सांगून कृष्णभक्तीमध्यें रंगून जातात. विशालबुद्धि व्यासांनाही भागवतरचनेनेच शांति-समाधान प्राप्त झालें. नित्य आत्मतृप्त व महान वैराग्याचा पुतळाच अशा शुकमुनीसारख्या महायोग्यालाही भागवत गायनांत आनंदाचा झरा प्राप्त होतो. श्रीमद्भागवत हें असें दिव्य कथामृत आहे कीं महाराष्ट्रांतील साधुसंतांनी याच श्रीमद्भागवताला शिरोधार्य मानून आपल्या अनेक अभंग-रचना केल्या. वैकुंठवासी धुंडामहाराज देगलूरकर यांनी श्रीमद्भागवतासंबंधी अभिप्राय व्यक्त करताना म्हटलें आहे कीं, भागवतांतील कथांनी आणि मुख्यतः त्यातील दशमस्कंधातील भगवान श्रीकृष्णांच्या अपूर्व लीलांनी माणसाचें मन शुद्ध होऊन तें भक्तीच्या सुंदर भावनेने भरून जातें व भगवत्प्रेमाचा अपूर्व आनंद त्याला भोगायला मिळतो, असा अनुभव आपल्या साधुसंतांना आला, यामुळेंच या सर्व थोर सत्पुरुषांना भागवताचें प्रेम निर्माण झालें व त्याचें महत्त्व वाटलें.

हे सर्व थोर संतमहात्मे स्वतः आत्मज्ञानी असूनही त्यांच्या हें ध्यानांत आलें कीं ज्ञानाने भक्तीचा जर आश्रय केला नाही तर तें रूक्ष ज्ञान माणसाच्या स्वतःच्या मनाला तर आनंदाची आणि शांतीसमाधानाची प्राप्ती करून देणार नाहीच; पण भावबळाचे ज्याला माधुर्य प्राप्त झालें आहे असें आपले अंतःकरण तो गमावून बसेल आणि त्याचा निर्दय, अलिप्तपणे वागणारा एक अहंमन्य बुद्धिनिष्ठ पुरुष होऊन जाईल. अशी माणसे आपल्या भोवतालच्या लोकांमध्ये कोणते सुख पसरवू शकतील?

श्रीमद्भागवत महापुराण ही श्री व्यासांसारख्या महान द्रष्टयाची रचना आहे. सर्व पुराणांच्या रचनेचें कर्तृत्व श्री व्यासांकडे आहे. वेद हा पाया, उपनिषदें हेच जणूं स्तंभ, सर्व पुराणें या भिंती तर भक्तिभावाच्या गाभाऱ्यामध्यें श्री व्यासांनी श्रीमद्भागवताची अपूर्व रचना करून भगवंताची वाङ्मयी मूर्तीच तुम्हा-आम्हा सर्वांना बहाल केली आहे; असें म्हटलें तर वावगें ठरणार नाही.

भागवताची जी कांहीं ठळक वैशिष्ट्यें आहेत त्यापैकीं सर्वांत श्रेष्ठ वैशिष्ठ्य हें आहे कीं तें श्रवण केलें अथवा वाचलें तर अंतःकरणाला परमशांतीचा लाभ होतो. श्रीमद्भागवताची गोडी अवीट आहे. ज्याने एकदां याचा स्वाद घेतला त्याला पुनःपुन्हा आस्वाद घेण्याची इच्छा झाल्याशिवाय राहणारच नाही. ज्या ग्रंथातून वैचारिक भूक शमविणारे विचार-खाद्य निश्चित मिळतें, ज्यामधून नैराश्याच्या क्षणीं आशेचा किरण दिसतो, ज्या ग्रंथातून शुद्ध प्रेमाची दीक्षा मिळते, भांबावलेल्या व दिशाहीन अशा भरकटलेल्या अवस्थेंत असणाऱ्याला दीपस्तंभासारखा आहे असा हा भागवत ग्रंथ आपण आपल्यापासून दूर करणार नाही अशी खात्री आहे.

श्रीमद्भागवताच्या प्रारंभालाच **"भागवतमाहात्म्य"** नावाचें जें स्वतंत्र प्रकरण आहे, त्यांत श्रीमद्भागवताचें वर्णन करताना एक सुंदर दृष्टान्त दिला आहे. त्या दृष्टान्तांत श्रीमद्भागवताला वेदरूपी कल्पवृक्षाच्या झाडावरील परिपक्व फळ म्हटलें आहे. भक्तिशास्त्राचा पूर्ण विचार, भगवद्भक्तांच्या दिव्य जीवनकथा, भक्तांच्या घरीं सगुण साकार होऊन अगणित लीला करणाऱ्या प्रभूच्या भावकथा इत्यादींमुळेंच ही परिपक्वता या ग्रंथाला प्राप्त झाली आहे. असें दिव्य परिपक्व फळ प्राप्त करण्यासाठीं अनेकानेक शाखा असलेल्या वेदरूपी दुर्धर वृक्षावर चढण्याचे श्रमही नकोत. सहज उपलब्ध असें हें

फळ आहे. शिवाय फळाला स्पर्श कोणाचा ? तर शुकमुखाचा ! त्यामुळें या फळाची गोडी वेगळी सांगायला नको. अमृत यापुढें फिकें ठरावें. पोपटाने चाखलेली फळें गोडच असतात. या कल्पनेचा अत्यंत कुशलतेने उपयोग करून श्रीमद्भागवत हें एक मधुर रसाळ असें वाङ्मयी फळ आहे याची ग्वाही भागवतमाहात्म्यांत करून दिली आहे. विविध झाडांची फळें गोड व रसपूर्ण असतात तशी ती रोगप्रतिकारक औषधें म्हणूनही उपयुक्त आहेत. श्रीमद्भागवत हें महापुराणही काम-क्रोधादिक विकार नष्ट करणारे असे गुणकारी औषध आहे. दिव्यौषधीच आहे.

मरणाच्या दारीं ठेपलेल्या परीक्षिताला महायोगिराज शुकाचार्यांनी श्रीकृष्णलीलामृताचा सागर असें श्रीमद्भागवत सांगितलें. अनेक प्रश्नोत्तरांतून, अनेक दिव्य कथांमधून आपल्या मंत्रमुग्ध वाणीने शुकाचार्यांनी भक्तीचें रहस्य स्पष्ट केलें. विदुर, सुदामा, व्रजांतील गोप गोपिकांच्या भावमधुर कथांतील सार त्यांच्यासाठीं स्पष्ट केलें, आणि मृत्यूलाही जिंकण्याचे सामर्थ्य निर्माण करून राजा परीक्षिताचा उद्धार केला. मृत्यूलाही मारून भक्ताला चिरंजीव करणारे श्रीमद्भागवत म्हणजे परमामृतच आहे.

गोपिकांचें चित्त हरण करणारा म्हणून भगवान श्रीकृष्ण प्रसिद्ध आहे, त्याप्रमाणेंच श्रीमद्भागवत ग्रंथ श्रोता-वक्ता या सर्वांचेंच चित्त वेधून आनंद देणारा आहे. छोट्या श्रीकृष्णाने ज्याप्रमाणे गोकुळांत भल्या-भल्या राक्षस-दुष्टांना ठार मारलें, त्याप्रमाणें भागवतही लहान-लहान कथांच्या रूपाने मनुष्याच्या शरीररूपी गोकुळांत (गो=इंद्रियें, त्यांचें कुळ=शरीर) वास करणाऱ्या कामक्रोधादिक विकारांना नष्ट करते. श्रीकृष्णाने ज्याप्रमाणे नवनीत वाटलें त्याप्रमाणें श्रीमद्भागवत सुद्धां उपनिषदांचें मथित – भक्तिशास्त्ररूपी नवनीत साध्याभोळ्या भाविकांना वाटत आहे. भगवान आणि भागवत यांचा अन्योन्य संबंध आहे. भागवताचे मूळही भगवंतापर्यंत जातें. चतुःश्लोकी भागवत म्हणून जे चार श्लोक सर्वच भागवतप्रियांच्या अंतःकरणांत ठाम ठसलेले आहेत त्या श्लोकांत भक्तहितकारी करुणानिधान भगवंतांनी ब्रह्मदेवाला ब्रह्मज्ञान सांगितलें. हा भागवताचा पहिला आविष्कार ! या चतुःश्लोकी भागवताने ब्रह्मदेवाच्या मनांतील संदेह दूर झाला; यांत शंकाच नको !

या चतुःश्लोकी भागवताला ज्ञानी सज्जनांच्या-भक्तांच्या हृदयांत अत्यंत आदराचें स्थान आहे. विश्वाचें कोडें उलगडून सांगणारी, भक्तिभावाची अमोलिक रत्नें असलेल्या दिव्य भांडाराचीं व मुक्तीची कवाडें सताड उघडीं करणारी अशी गुरुकिल्लीच म्हणजे चतुःश्लोकी भागवत. तें सांगणारा वक्ता **'गुरुः साक्षात् परब्रह्म'** आणि श्रोता प्रत्यक्ष ब्रह्मा. **'कमलोद्भव चतुरानन ब्रह्मदेव !** असा गुरुही विरळा आणि असा शिष्यही विरळा ! भारतीय सांस्कृतिक इतिहासांतील ही दिव्य गुरुशिष्य परंपरा विलोभनीय आहे. या सर्व वैशिष्ट्यांमुळें चतुःश्लोकी भागवताला भागवत संप्रदायांत भागवतधर्मीयांत अपार महत्त्व आहे.

भगवंतांकडून मिळालेलें हें दिव्य ज्ञान ब्रह्मदेवाने आपल्या मानसपुत्र नारदांना दिलें. नारद बुद्धिमान आणि महान भगवद्भक्त होते. वडिलांनी प्रेमभावाने दिलेल्या उपदेशामृताने नारदांच्या अंतःकरणांतील भक्तीच्या मुग्ध कळ्या फुलल्या. शुद्ध प्रेमभावाचें कमळ विकसित झालें. ज्ञानसूर्याचा दिव्य प्रकाश हृदयरूपी आकाशांत सर्वत्र फैलावला आणि ते आनंदाने नाचूं लागले. त्यांचा हा परमानंद गगनांत मावेनासा झाला. या आनंदानें बेहोष होऊन नारद नाचूं लागले. त्यांचें नर्तन-कीर्तनयुक्त असें भ्रमण सुरू झालें. या भ्रमंतीतच त्यांना अस्वस्थचित्त श्री व्यास सरस्वती नदीच्या तीरावर भेटले. नारदांनी त्यांच्या अस्वस्थतेचें कारण ओळखलें व ही अस्वस्थता दूर करण्यासाठीं त्यांना एकातांत अंतर्मुख केलें. ब्रह्मदेवांनी त्यांना दिलेला चतुःश्लोकी भागवतरूपी दिव्य उपदेश व्यासांना दिला. मनाची अस्वस्थता

घालवण्यासाठीं श्रीहरिलीलांचें वर्णन करावें असेंही श्रीनारदांनी त्यांना सांगितले. त्या दिव्य ज्ञानामृताने व मार्गदर्शनानें श्री व्यासही निःसंदेह झाले. सर्व संशय फिटले. शांती व समाधानाने त्यांचें अंतःकरण दाटलें. अपार करुणेचा झरा वाहूं लागला. श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या शब्दांत बोलायचें झालें तर **"लोकस्य उन्मार्गप्रवृत्ति निवारणम्"** या प्रकारें भूतमात्राच्या कल्याणासाठीं, आपल्याला प्राप्त झालेल्या, स्वतःच्या वैशिष्ठ्यपूर्ण शैलींत व्यासांनी श्लोकबद्ध करून श्रीहरिभक्तांच्या विविध कथा, श्रीहरिलीला यांचें रसाळ वर्णन करून, जीवनाला आवश्यक अशा ज्ञानाचें उद्‌बोधन करीत, भक्तिशास्त्राचा सिद्धान्त स्पष्ट करीत श्रीभागवतरूपी पायस त्यांनी आपल्या पुत्राला दिला. पुत्र तरी कसा ? जो परम योगी, महान विरागी-विदेही असा होता. निःस्पृहतेचा, निर्ममतेचा, निष्कामतेचा धगधगता अग्निच! अशा त्या पुत्राला त्यांनी हें भक्तिरसायन दिलें. श्रीमद्‌भागवत म्हणजे भक्तिरसायनसिंधू! दिव्य ज्ञानाची आकाशगंगा! प्रेमामृताचा झराच! असा अमोलिक ठेवा प्राप्त झाला आणि शुक मुनिराज **'कृष्णात् परं किमपि तत्त्वमहं न जाने।'** या भूमिकेला आले. या दिव्य परंपरेतून भागवतरूपी रसाळ ज्ञानगंगा **'पोखित तीरीचे पादप"** या प्रवृत्तीनें भक्तिभावाच्या वृक्षाला फुलवीत राजा परीक्षितीपर्यंत आली. मरणाच्या उंबरठ्यावर येऊन पोहोंचलेल्या राजा परीक्षितीला श्रीमद्‌भागवताच्या माध्यमातून श्रीशुकांनी प्रत्यक्ष भगवंतापासून ब्रह्मदेवांना, ब्रह्मदेवांपासून नारदांना, नारदांपासून श्रीव्यासांना व श्रीव्यासांकडून आपल्याला प्राप्त झालेलें ज्ञानामृत दिलें व त्याला तरून नेलें. या मधुर ज्ञानामृताने राजा परीक्षिती तर तरलाच, पण त्याचें निमित्त होऊन प्रकट शुकवाणीने असंख्य सामान्य जीवांचें आत्मकल्याण झालें यांत शंका नाही.

भक्तिपासून उत्पन्न झालेल्या आत्मज्ञानाला फार महत्त्व आहे. या ज्ञानाला सुद्धा दिव्य परंपरा आहे. जिचा आपण अभिमान धरावा अशीच या ज्ञानाच्या परंपरेचीं वैशिष्ट्यें आहेत. हें ज्ञान साक्षात् भगवंतापासून उगम पावत असल्यामुळें हें भगवत्स्वरूप आहे. हें पहिलें वैशिष्ट्य आहे. या ज्ञानाने जीव पूर्ण समाधानी होऊन त्याला परमानंदाची प्राप्ती होते, हें दुसरें वैशिष्ट्य आणि तिसरें व महत्त्वाचें वैशिष्ट्य म्हणजे या ज्ञानामध्यें प्रेमाचा सुरेख संगम झालेला आहे.

मानवी जीवनांतील अंधार दूर करण्यासाठीं या आत्मज्ञानाची कास धरली पाहिजे. शुद्ध प्रेमभावानें या जगांत वावरलें पाहिजे. दुःखनिवृत्तीसाठीं आत्मज्ञान व प्रेमस्वरूपाभक्तीचीच जवळीक साधली पाहिजे, असाच सर्व ऋषी-मुनींचा व साधुसंतांचा अभिप्राय आहे. किंबहुना भक्तिमय जीवनासाठीं आग्रह आहे. मनुष्याच्या दुःखाला आसक्ति कारण आहे तर सुखाला भक्ति कारण आहे, देहाला सुख म्हणजे मला सुख या चुकीच्या समजुतीमुळें अज्ञ जीव देहाला सुखविण्याचा प्रयत्न करतो. त्याकरितां या जगाला-जगांतील यच्चयावत् वस्तुमात्राला सत्य मानून त्यातूनच सुख मिळविण्याचा प्रयत्न करीत असतो. आणि त्यामुळेंच तो या जगत्पसाऱ्यांत गुंतून पडतो. यातूनच आसक्ति निर्माण होते. ईश्वर सत्य व सुखनिधान आहे हें समजून घेऊन त्याच्या ठिकाणी जीव जडल्यावर त्यापासून अन्य कशावरही अवलंबून राहण्याची इच्छा उरत नाही, जरूरी भासत नाही. याच अवस्थेतून भक्ति निर्माण होते. आसक्ति आणि भक्ति या दोघींचीही धांव आनंदाकडेच असते. भक्ति काय किंवा आसक्ति काय, दोन्ही मूलतः प्रेमस्वरूपच आहेत. मात्र भक्तिमध्यें प्रेमाचें शुद्ध स्वरूप पहायला मिळते, तर आसक्तिमध्यें प्रेमाचें विकृत स्वरूप दिसतें. एखाद्या वस्तूवर, व्यक्तीवर प्रेम जडलें कीं तिच्याच चिंतनात मग्न असलेल्या जीवाला दुसरें कांहीं सुचत नाही. दुसरें कांहीं करण्यासही फुरसत मिळत नाही. प्रेमाचा हा सर्वसामान्य गुण आहे, आणि तो भक्तींत तसा आसक्तींतही दिसून येतो. भक्तीमधून वैराग्य निर्माण होते व त्याची परिणती आत्मज्ञानांत होते. आसक्तीमधून वासनेचा उद्रेक होतो व त्याची परिणती संपूर्ण विध्वंसांत होते. अज्ञानाचा

हा भयंकर आविष्कार ठरतो. भक्तीने विकार जिंकतां येतात व त्यामुळें पराधीनता टळते, तर आसक्तीमुळें विकारांचा दास बनून माणूस कमालीचा पराधीन आणि अगतिक बनतो. भक्तींत आत्मसमर्पणाची भावना दृढमूल होऊन मनुष्य ईश्वराच्या चरणीं निर्भय निश्चिंत होऊन राहतो; तर आसक्तीमुळें देहतादात्म्य पाळून जीव देहरक्षणाच्या व सुखाच्या चिंतेत भ्याड-भित्रा बनतो. भक्तीमुळें मनुष्य अंतर्मुख होऊन त्याला त्याच्या अंतरांतच सुखाचा झरा सापडतो, तर आसक्तीमुळें मनुष्य बहिर्मुख बनून बाह्य जड-भौतिक सुख मिळवण्यासाठीं धडपड करतो व अखेर वासना-विषयांच्या चिखलांत रुतून बसतो. भक्तीमुळें मन कामवासनारहित होतें. स्वार्थरहित होऊन '**ठेविलें अनंते तैसेचि रहावें। चित्तीं असो द्यावें समाधान**" अशी भूमिका मनुष्य स्वीकारतो, तर आसक्तीमुळें कामलोलुप मनुष्य अत्यंत स्वार्थी बनतो. इतकेंच नाही, तर '**आगी इंधन न पुरे**' अशा रीतीने पराकाष्ठेचा बुभुक्षित बनतो. श्रीज्ञानेश सांगतात त्याप्रमाणे '**ते पोसावया पोट। मारुनि प्राणियांचे संघाट। आणिती ऐसें निकृष्ट। तेंही करिती ॥**. या सर्व अवनतीला-भयंकर आपत्तीला व दुःखाला कारण होणारी आसक्ति प्रयत्नाने दूर सारून, देहबुद्धि समूळ उपटून काढली व त्याठिकाणीं आत्मबुद्धिच्या भक्तीचें बीजारोपण केलें तर विश्व विध्वंसाच्या खाईंत लोटलें जाण्याऐवजी शांती-सुखाच्या शिखरावर निश्चिंत राहूं शकेल. श्रीमद्भागवताने हाच संदेश दिला आहे.

भारतांत किंवा भारताबाहेर जेथे जेथे श्रद्धावान हिंदू आहेत तेथे तेथे श्रीमद्भागवतपुराण अत्यंत समारंभपूर्वक श्रद्धेने वाचलें जातें, श्रवण केलें जातें. श्रीमद्भागवताचे सप्ताह-सोहळे झाले नाहीत असे गांव संपूर्ण भारतांत सांपडायचें नाही. लाखोंच्या संख्येने लहान-मोठे, गरीब-श्रीमंत, सुशिक्षित-अशिक्षित असे सर्व थरांतील लोक भागवत श्रवणाला मैदानावर मांडव घालून तन्मयतेने बसलेले आजही आढळतात.

भक्तिभावाने पुराण श्रवण केलें असतां पदरीं पुण्य पडतें असा भोळ्याभाबड्या लोकांचा समज आहे. पुण्यसंचयासंबंधीचा हा समज तसा फारसा चुकीचा नाही. श्रवणानें-वाचनानें पुण्यसंचय होतो असें नसून पवित्र जीवन जगण्याची, शुद्ध सदाचाराचें जीवन जगण्याची, पुण्यमय जीवन जगण्याची प्रेरणा या श्रीमद्भागवत श्रवणाने मिळते. अशी श्रद्धावान सदाचारी माणसें या श्रवणाद्वारें निर्माण झालीं तर धर्मसंस्थापनेचें कार्य सहजच होतें. यामुळें परमेश्वराला संतोष होतो. प्रत्यक्ष भगवान अशी कबुली देत आहेत. प्रभू म्हणतात—

**श्रीमद्भागवतंनाम पुराणं लोकविश्रुतम्।**
**श्रुणुयात् श्रद्धया युक्तो मम संतोषकारणम्॥**

साक्षात् भगवंतांनी अशी कबुली दिल्यावर श्रीमद्भागवतासाठीं अधिक प्रशस्तिपत्र तें कोणाचें हवें ? श्रीमद्भागवत हें महापुराण श्रेष्ठतम आहे यांत शंकाच नको. भागवतधर्मीयांत असें म्हटलें जातें कीं—

**निम्नग्रानां यथा गंगा देवानामच्युतो यथा।**
**वैष्णवानां यथा शंभुः पुराणामिदं तथा॥**

सर्व नद्यांमध्यें ज्याप्रमाणे गंगा श्रेष्ठ, सर्व देवांमध्यें जसे भगवान विष्णु श्रेष्ठ, वैष्णवांत ज्याप्रमाणें श्रीशंकर श्रेष्ठ त्याचप्रमाणे सगळ्या पुराणांत श्रीमद्भागवत हें महापुराण श्रेष्ठ आहे.

दुर्दैवाने आज आपल्याकडे या सर्वच पुराणांकडे पाहण्याची तथाकथित सुशिक्षित-बुद्धिनिष्ठांची

दृष्टि तितकीशी चांगली नाही. भारतीयांचा आपल्या धर्म व संस्कृतीबाबतचा अभिमान नष्ट करण्याचा इंग्रजांनी जबरदस्त प्रयत्न केला व त्यांत त्यांना बऱ्यापैकी यशही आले. त्यांचाही हेतू या देशाचा आत्मामिभान नष्ट करण्याचाच होता. त्या प्रयत्नांमुळें आम्ही आत्मविस्मृत झालों सुद्धा! त्यामुळेंच सर व्हॅलेंटाईन चिरोल हे आपलें स्वत:चें समाधान व्यक्त करताना म्हणतात कीं —

"Out of the ancient world of India we have raised an Indian middle class with one foot perhaps still lingering in Indian Civilization but with the other certainly planted in Western Civilization."

याचा अर्थ असा कीं, "भारतीय समाजांत आपण एक मध्यम वर्ग निर्माण केला असून त्याचा एक पाय जरी भारतीय संस्कृतीत गुंतलेला असला तरी दुसरा खात्रीने पाश्चिमात्य संस्कृतीत स्थिर झाला आहे." या अशा प्रयत्नांमुळें आम्हा भारतीयांत खऱ्या अर्थाने आत्मविस्मृती घडून आली. त्यामुळें आज आपल्यावर जें संकट ओढवलें आहे तें बाह्यसंकट नसून अंतर्गत संकट आहे. हें एक तऱ्हेचें वैचारिक आक्रमण आहे. या इंग्रजाळलेल्या मनोवृत्तीतून आमचे लोक म्हणू लागले कीं, पुराणें म्हणजे जुन्या कथा. इतकेंच नाही, तर फेकून देण्याच्या लायकीच्या भाकडकथा! कांहीं लोक तर या पुराणकथांना दंतकथाच म्हणूं लागले. परंतु पुराणांकडे अशा भूमिकेंतून पाहणें अत्यंत चुकीचें आहे. किंबहुना तें अज्ञानाचें द्योतक ठरेल. अशा दृष्टीनें आपण आपलें नुकसान करून घेत आहोंत. पुराणें हा आपला फार मोठा सांस्कृतिक ठेवा आहे.

पुराणांच्या माध्यमातून ईश्वरविषयक तत्त्वज्ञान, धर्माचें मार्गदर्शन, सृष्टीच्या निर्मितीपासून कलियुगाच्या प्रारंभापर्यंतचा भव्य, उज्ज्वल तसाच रोमांचकारी असा इतिहास उलगडून दाखविण्याचा झालेला प्रयत्न आपल्याला दिसून येईल. अर्थात् त्याला तशी दृष्टी हवी. वरील विवेचनांत 'इतिहास' हा उल्लेख आहे. आमच्याकडील शाळकरी कल्पना पाहिली तर केवळ सनावळ्या, राज्यांची निर्मिती, राजांचे सत्तेवर येणे, काही राजे पदभ्रष्ट होणे, युद्धे, बंडाळी, यादवी, जय-पराजय, तह-समेट इत्यादी घटनांची क्रमवार नोंद केलेला ग्रंथ म्हणजे इतिहास! ही अगदींच स्थूल अशी इतिहासाची कल्पना आहे. पुराण ग्रंथांना इतिहास म्हणताना हे लक्षात घेतले पाहिजे की पुराणग्रंथांनी आपला संपूर्ण सांस्कृतिक इतिहास ग्रथित केलेला आहे.

हे स्पष्ट होण्याकरिता 'पुराण' या शब्दाचा अर्थ पाहिला पाहिजे. "पुर+अन्" अशा दोन शब्दांच्या साहाय्याने पुराण हा शब्द बनला आहे. पुर म्हणजे चौदा भुवनांचे संपूर्ण विश्व. अन् हा धातुशब्द असून श्वसन, प्राणन, जीवन या शब्दांतही हा अन् शब्द आहे. याच्यामधून व्यवहार असा अर्थ ध्वनीत होतो. या आधारे पुराण या शब्दाचा अर्थ आहे संपूर्ण विश्वाचा व्यवहार – विश्वजीवन! पुराणे म्हणजे संपूर्ण विश्वजीवनाचा आलेख आहे. इंग्रजी भाषेत यालाच COSMOLOGY म्हणतात. म्हणजेच पुराण म्हणजे विश्वकोष होय. या अर्थाने ज्यावेळी आपण पुराणांकडे पाहू तेव्हा आपल्या पूर्वजांनी, ऋषी-मुनींनी आपल्यासाठी अपार मेहनत घेऊन आपल्या ज्ञानांत भर घातली आहे, आपल्या प्राचीनतम इतिहासाची, तत्त्वज्ञानाची, धर्मविचारांची फार मोठी पुंजी देऊन ठेवली आहे, याची जाणीव होईल.

या विश्वकोषाची रचना म्हणजे केवळ सनावळ्या नव्हेत. राजांची नोंद नाही, युद्धे-तह, तहांच्या अटी यांची शुष्क यादी नव्हे, तर अध्यात्म, तत्त्वज्ञान, धर्मविषयक दिग्दर्शन, ईशभक्ति व जीवनाच्या विविध पैलूंचा आविष्कार, अनेक कथांच्या माध्यमांतून, सत्कर्म-दुष्कर्मांचे परिणाम इत्यादींचे स्पष्टीकरण

म्हणजेच पुराण असें समजून येईल.

पुराणे म्हणजे सांस्कृतिक इतिहासच याला पुष्टी देणारा अमरकोषांतील 'पुराण' या शब्दाचा अर्थ लक्षणीय आहे. या व्याख्येच्या आधाराने पुराणांचा अभ्यास व्हावा.

**सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशोमन्वंतराणि च।**
**वंशानुचरितं चैव पुराणं पंचलक्षणम्॥**

अर्थात् पुराणांत सर्ग-प्रतिसर्ग (विसर्ग), वंशोत्पत्तिकथा, मन्वंतराचे वृत्त, तसेच सूर्यवंश आणि चंद्रवंश इत्यादी वंशांतील राजांची वर्णने असे पांच विषय येतात.

अमरकोषांतील या स्पष्टीकरणाने आपला गैरसमज दूर होऊन पुराण म्हणजे केवळ जुनाट जुन्या-पुराण्या कपोलकल्पित गोष्टी नसून संपूर्णतया भारतीय पद्धतीने भारताचाच नव्हे तर विश्वाचा इतिहास उलगडण्याचाच महान प्रयत्न आहे याची कल्पना येईल.

वेद हे आपले प्राचीनतम वाङ्मयीन धन आहे. त्यांची भाषा अतिप्राचीन असून आजच्या संस्कृत अभ्यासकाला समजायला कठीण! त्या आपल्या वेदांचे अर्थ समजणे आज कठीणकर्म होऊन बसले आहे. इंग्रजांच्या काळात पाश्चिमात्यांनी जो आपल्या वेदग्रंथांचा अभ्यास केला तो फारच स्थूल म्हणावा लागेल. या अभ्यासांतून जे मथित निघाले ते बव्हंशी बुद्धिभेद करणारे आहे. त्याचा सारांश असा की, वेदांत ज्या देवता मानल्या आहेत त्या निसर्गातील आपत्ति वा विविध घटना अनुभवून भीतीपोटी मानल्या गेल्या आहेत. या सर्व संकल्पना मानवाच्या प्राथमिक अवस्थेंतील आहेत. अग्निदेवता, वायुदेवता, वरुणदेवता, सूर्यदेवता या केवळ नैसर्गिक प्रकोपांपासून आपले संरक्षण व्हावे या भूमिकेतून मानलेल्या आहेत. त्यांच्या त्याच दृष्टीने प्रार्थना केल्या आहेत. जंगलांत वणवा लागला तेव्हां तो भयंकर अग्निप्रलय पाहून अग्निदेवता मानली गेली, जलप्रलय पाहून जलदेवता, वरुणदेवता मानली गेली; सुसाट वादळ-वाऱ्यांमुळे वायुदेवता मानली गेली असा अर्थ पाश्चिमात्यांनी काढला आहे.

पण हा चुकीचा अर्थ आहे. मुळांत वैदिक काळांतच आर्यावर्त म्हणून ख्यात असलेल्या भारतात संपूर्ण प्रगत मानवसमाज होता. रानटी माणसांची वसाहत नव्हती. त्यामुळे प्राथमिक अवस्थेतल्या मानवाने केलेल्या प्रार्थना म्हणून वेदवाङ्मयाची, वेदमंत्रांची बोळवण करणे योग्य ठरणार नाही.

पुराणे-रामायण-महाभारतादि ग्रंथांच्या आधारे अशी वास्तविकता लक्षात येईल की आपला इतिहास हा प्राथमिकेतून वर गेल्याचा क्रम दाखवीत नसून पूर्णतेतून अधःपतनाकडे वळल्याचा स्वाभाविक क्रम दिग्दर्शित करीत आहे. आपली जीवनविषयक धारणाच मुळी **"पूर्णापासून ढळलेले जग जाते पूर्णाकडे"** या तत्त्वज्ञानावर आधारित असून, तोच सिद्धान्त प्रमाणभूत मानून इतिहास उलगडण्याची पद्धती आपल्या प्राचीन ऋषीजनांनी स्वीकारलेली आहे. पुराणांच्या माध्यमांतून वेदांतील प्रार्थना व अन्य अक्षरब्रह्म समजून घेण्याची आपल्याकडील परंपरा आहे. वेद-उपनिषदे यांचा अभ्यास केल्यास असे दिसेल की अत्यंत उच्च दर्जाचे तत्त्वज्ञान त्यात आहे. उच्च जीवनप्रणालीचे विचार त्यात आहेत. पण ते सर्व काही सामान्यांच्या बुद्धीच्या कक्षेतील नाही. परंतु विश्वविषयक, ईश्वरविषयक आणि धर्मविषयक तत्त्वज्ञान सर्वांनाच आकलन होणे मानवसमाजाच्या हिताचे आहे हे ओळखून वेद-उपनिषदे व स्मृती यांच्या पाठोपाठ परिश्रमपूर्वक दूरदृष्टी ठेवून पुराणांची रचना केली गेली आणि या पुराणांच्या माध्यमांतूनच वेदांचा अभ्यास व्हावा असा संकेत पाळला जाऊ लागला.

पुराणांतून आलेल्या विविध कथासुद्धा अध्यात्म व धर्मतत्त्वज्ञान समजून देण्यासाठीच सांगितल्या

गेल्या आहेत. "**आचारः प्रभवो धर्मः।**" या न्यायानेच या कथा आहेत. "**तुका म्हणे सांगे। आले अनुभवा अंगे॥**" या भूमिकेतून पुराणकथा पाहिल्या की कोणत्या कर्माचा काय परिणाम आहे, तसेच आचाराच्या व वागणुकीच्या विविध तऱ्हांचे दिग्दर्शन व त्यांच्या विविध परिणामांचे दिग्दर्शन केलेले आपल्याला दिसून येईल. सारांश असा की, पुराणांना केवळ जुन्या कथा – भाकडकथा म्हणून हेटाळणे हे अडाणीपणाचे लक्षण असून अनेक कारणास्तव पुराणांविषयी आदरभाव ठेवून त्यांचा अभ्यास होणे आवश्यक आहे. पुराण हा विषय वेदांइतकाच प्राचीन आहे असेही आपल्याला काही कथांच्या आधारे समजून येईल. प्राचीन काळापासून चार वेदांसारखा पांचवा विषय म्हणून इतिहास-पुराणांचा अभ्यास व्हावा अशी परंपराच आहे. देवर्षि नारदांच्या जीवनातील एका प्रसंगांत खुद्द नारदांनीच हे सांगितले आहे.

छांदोग्योपनिषदांत (अ.७, खं.१-४) नारदांची ही कथा आहे. ज्ञानाच्या उपासनेसाठी त्यांनी एकदा सनत्कुमारांकडे जाऊन ज्ञान देण्याविषयी प्रार्थना केली असता सनत्कुमारांनी नारदांना काय काय समजले आहे, त्यांनी कशा-कशाचा अभ्यास केला आहे याविषयी विचारणा केली. तेव्हा नारद विनम्रपणे म्हणाले –

**ऋग्वेदभगवोऽध्येमि यजुर्वेदं सामवेदमाथर्वणं।**
**चतुर्थमितिहासपुराणं पंचमं एतद्भगवोऽध्येमि॥**

अर्थात् 'ऋग्वेदादि चार वेद आणि इतिहास-पुराण हा पाचवा असे विषय मी अभ्यासिले आहेत.'

छांदोग्योपनिषदांतील वरील उल्लेख फार महत्त्वाचा आहे. पुराणांकडे पाहण्याचा जो प्राचीन दृष्टिकोन आहे त्यावर प्रकाश पाडणारा आणखीन एक श्लोक पाहण्यासारखा आहे; आणि गमतीदारही आहे. तो असा –

**इतिहास-पुराणाभ्याम् वेदं समुपबृंहयेत्।**
**बिभेति अल्पश्रुतात् वेदो मामेयं प्रहरिष्यति॥**

गहन असे वेद आकलन व्हावे म्हणून इतिहास-पुराणांच्या माध्यमातून त्यांचा अभ्यास व्हावा. अन्यथा फारच थोडे शिकून सुद्धा स्वतःला विद्वान समजणारे लोक वेदांचे चुकीचे अर्थ लावून वेदांवरच प्रहार करतील अशी खुद्द वेदांनाच भीती वाटते.

आज हेच चालले आहे! असो. प्राचीन शास्त्रांचा अभ्यास होण्यासाठी जो अभ्यासाचा आणि अभ्यासग्रंथांचा क्रम आपल्याकडील परंपरेत आहे त्यात पुराणांना फार मोठे स्थान असून त्यांना भाकडकथा मानून केराच्या टोपलीत ढकलावे असे नाही, हे समजण्याकरिताच एवढे विस्तृत विवेचन केले आहे.

शिवाय श्रुतिस्मृतींच्या पायावर उभारलेल्या हिंदूधर्मात कोणत्याही प्रकारचा विधी किंवा संस्कार करताना "**श्रुतिस्मृतिपुराणोक्त फलप्राप्त्यर्थम्**" म्हणजेच श्रुति (वेद), स्मृति व पुराणे यांत जे धर्मविधीचे फळ सांगितले आहे ते मिळावे म्हणून अमुक अमुक कर्म करतो असा संकल्प करण्याची जी वहिवाट आहे ती पाहिली म्हणजे पुराणांना किती महत्त्वाचे स्थान मिळाले आहे हे समजून येते.

पुराणांच्या पारम्परिक अभ्यासांत आपल्या अठरा महापुराणांचे तीन वर्ग पाडले गेले आहेत. प्रत्येक वर्गात सहा-सहा पुराणे असून हे वर्ग ब्रह्मा, विष्णु, शिव या तीन देवतांच्या आधारे आहेत. विश्वाच्या उत्पत्तीची देवता ब्रह्मा असून उत्पत्तीला कारण प्रकृतिमधील रज गुण आहे. ब्रह्म, ब्रह्मांड, ब्रह्मवैवर्तक, मार्कंडेय, भविष्य आणि वामन ही सहा महापुराणें ब्रह्मदेवप्रधान अर्थात् रजोगुणानुसारी

मानली जातात. विश्वाच्या स्थितीला विष्णु ही देवता कारण असून या स्थितिकार्याला सत्त्वगुण कारण आहे. विष्णु, नारद, भागवत, गरुड, पद्म आणि वराह ही सहा महापुराणे विष्णुप्रधान अर्थात् सत्त्वगुणानुसारी आहेत, तर विश्वाच्या लयाला कारण देवता शिव आहे. लय कार्यासाठी तम गुण आहे. शिवप्रधान म्हणजेच तमोगुणानुसारी सहा महापुराणांत मत्स्य, कूर्म, लिंग, शिव, स्कंध आणि अग्नि या पुराणांचा समावेश केला गेला आहे. या सर्व वर्गवारीच्या व प्रकृतीच्या सत्त्व, रज व तम गुणांच्या आधारे विष्णु-प्रधान, ब्रह्मा-प्रधान आणि शिव-प्रधान अशा या पुराणांतील अर्थगर्भ आशयाचा अभ्यास करणे, त्याचे चिंतन, मनन करणे हे अगत्याचे आहे. याउलट शिव-विष्णु देवतांना आपआपल्या उपासनेत प्राधान्य देऊन स्वतःस शैव-वैष्णव म्हणवणाऱ्यांनी '**एकासि वंदिले। सहज दुजिया निंदिले।**' अशा प्रवृत्तीने पुराणकथांच्या माध्यमातून आपआपसांत रण माजविणे अज्ञानमूलक आहे. विश्वाच्या उत्पत्ति-स्थिती आणि लय (संहार) या तीन सातत्याने चालणाऱ्या कार्यांना जसे सत्त्व, रज व तम गुण आवश्यक आहेत तद्वत् मानवी जीवनातील विकासकार्याला **मृत्योऽर्माऽमृतं गमय।** या उद्दिष्टापर्यंत नेण्यासाठी सत्त्व-रज व तमोगुणाचा वापर कसा करावा याचे मार्गदर्शन विविध पुराणकथांमधून मिळणारे आहे. त्या मनोभूमिकेतून पुराणांचा अभ्यास व्हावा. अन्यथा '**तुका म्हणे देती लाचासाठी ग्वाही। ठाऊकी ती नाही वस्तु कोणा।।** असा सावळा गोंधळ चालू राहायचा. याकरितांच श्रीमद्भागवतांत भगवान विष्णू आग्रहपूर्वक सांगतात की –

**अहं ब्रह्मा च शर्वश्च जगतः कारणं परम्।**
**आत्मेश्वर उपद्रष्टा स्वयंदृगविशेषणः।।**
**तस्मिन् ब्रह्मण्यद्वितीये केवले परमात्मनी।**
**ब्रह्मरुद्रौ च भूतानि भेदेनाज्ञोऽनुपश्यति।।**

(भा. स्कं. ४ अ. ७-५१-५२)

अर्थात् ब्रह्मा-विष्णु-महेश हे जगाचे कारण असून त्यांच्यामध्ये भेद नाही. त्यांना भेदबुद्धीने पाहणारा पुरुष अज्ञ होय. श्रीमद्भागवत पुराण समजून घेतानाही आपण अभ्यासकाच्या भूमिकेतून पूर्वग्रहदूषित न बनता वाचल्याने व जाणत्याकडून समजून घेतल्याने सर्व प्रकारच्या शंका दूर होऊन निर्मळ आनंद प्राप्त होईल. भागवताचे प्रयोजनच मनःशांती व आनंद आहे.

सृष्टीच्या उत्पत्तीपासून कलियुगाच्या प्रारंभापर्यंतचा संपूर्ण इतिहास, वैदिक तत्त्वज्ञान आणि वैदिक धर्म-संस्कृतीचे दिग्दर्शन पुराणांच्या माध्यमांतून होते हे आपण पाहिलेच आहे. श्रीमद्भागवतही याला अपवाद नाही. पुराणांची पाच लक्षणे सर्वज्ञात आहेत.

**सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशोमन्वंतराणि च।**
**वंशानुचरितं चैव पुराणं पंचलक्षणम्।।**

(अमरकोश)

म्हणजेच पुराणांत सर्ग-प्रतिसर्ग (विश्वोत्पत्तीची प्रक्रिया), वंशोत्पत्तिकथा, मन्वंतराचे वृत्त तसेच सूर्य-चंद्र इत्यादी वंशातील राजांची वर्णने असे पाच विषय येतात. भागवतात मात्र थोडा फरक करून पाच ऐवजी दहा लक्षणे सांगितली आहेत ती अशी –

**अत्र सर्गो विसर्गश्च स्थानं पोषणमूतयः।**
**मन्वंतरेणानुकथा निरोधा मुक्तिराश्रयः।।**

श्रीमद्भागवत हे भक्तिशास्त्राचे महत्त्व विशद करणारे पुराण असल्याने पुराणांच्या पांच लक्षणांऐवजी वरील दहा लक्षणे आवश्यक दिसतात. **'मनुष्यजन्माचे करावे सार्थक'** हे उद्दिष्ट साधण्यासाठी जे अध्यात्मविवेचन आवश्यक आहे ते समजण्यासाठी ज्या कथा पुराणांच्या वरील लक्षणांना धरून सांगायला हव्यात त्या कथा, सर्ग, विसर्ग, स्थाने, पोषण, ऊति, मन्वंतरे, ईशानुकथा, निरोध, मुक्ति आणि आश्रय या दहा लक्षणांना धरूनच सांगितल्या आहेत. या लक्षणांचा व भागवतांतील निरूपण, तत्त्वविवेचन आणि कथा यांचा ऊहापोह करण्यासाठी एक स्वतंत्र मोठा ग्रंथच तयार होईल. वरील लक्षणांतील आश्रय या लक्षणाचा विचार करून आपण पुढे जाऊ.

सृष्टीची उत्पत्ति आणि प्रलय ही ज्याच्यापासून होतात, ज्याच्यामुळे ती प्रचीत होतात ते परब्रह्मच सर्वांचा आश्रय आहे. सर्वांनी त्याचा आश्रय करणे श्रेयस्कर आहे. त्या परमात्म्याच्या ज्ञानासाठीच सर्गादिक नऊ लक्षणांचे स्वरूप श्रीमद्भागवतांत सांगितले आहे.

भागवतांत या ज्ञानगम्य परमात्म्याची स्तुती करतानाही श्रुतींनींच या आश्रयाचे म्हणजेच परमात्म्याचे वर्णन केलेले आहे. **"स आश्रयः परंब्रह्म परमात्मेति शब्दयते।"** भागवताचे हेच वैशिष्ट्य आहे की भागवतकारांना मोक्ष गौण वाटतो व ईश्वरज्ञान हेच प्रधान वाटते. भक्तिमार्गात **'मोक्ष तुमचा देवा। दुर्लभ तो ठेवा।'** या श्री तुकोबांच्या उक्तिप्रमाणे मोक्षापेक्षा भक्तिची योग्यता अधिक मानली आहे व श्रीमद्भागवत भक्तीलाच प्राधान्य देत आहे. ज्याची भक्ति करायची त्या सर्वाश्रयभूत परमात्म्याची, पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णाची महति काय वर्णावी? या अधिष्ठानसत्तेच्या कल्याणकारी सामर्थ्याचे वर्णन करताना देवर्षि नारदांनी युधिष्ठिराला सांगितले आहे–

**गोप्य कामाद् भयात्कंसः द्वेपाच्चैद्यादयो नृपाः।**
**सम्बन्धाद् वृष्णयः स्नेहाद् यूयं भक्त्या वयं विभो॥**

(भाग. ७ वा स्कंध अ.१)

अर्थात गोपी कामाने, कंस भयाने, शिशुपालादि लोक द्वेषाने, यादव नात्यामुळे, तुम्ही स्नेहामुळे आणि आम्ही भक्तीमुळे श्रीकृष्णांशी संबद्ध झालो व या सर्वांचे कल्याण झाले.

ज्याच्यामुळे कल्याण झाले व होत आहे– होणार आहे; त्या भगवान श्रीकृष्णाच्या लीलांना भागवतांत फार महत्त्व आहे. या लीलानाटकी श्रीकृष्णाच्या जीवनाचा, त्याच्या विभूतिमत्वाचा नीट विचार करायला आजचे तरुण मन तयार नाही. किंबहुना समाजातील अनेक लेखकांनी, कलाकारांनी श्रीकृष्णाच्या व्यक्तिमत्वाचे विडंबन प्रकट केले आहे. कोणी श्रीकृष्ण खोडकर आहे असे म्हटले, तर कोणी श्रीकृष्ण कामी-भोगी होता, सोळाहजार स्त्रियांचा दादला होता अशी विधाने करून त्याच्या असामान्यत्वावर बोळा फिरवण्याचा व्यर्थ खटाटोप केला आहे. नाटक, सिनेमा, तमाशा यातून श्रीकृष्णाचे जे चित्र-चरित्र दाखविले जाते ते श्रीकृष्णभक्तांना उद्विग्न करणारे असेच आहे. याचे कारण एकच की श्रीकृष्णचरित्र अत्यंत गुंतागुंतीचे व गूढ असे असल्यानेच सामान्य माणसाला त्याचा अंत लागत नाही व मग काहीतरी आचरटपणाचे बोलले जाते व दाखविले जाते.

श्रीमद्भागवतांतील श्रीकृष्णाचे चरित्र दहाव्या व अकराव्या स्कंधांतच प्रामुख्याने आले आहे. त्यात त्याचे देवत्वच स्पष्ट केलेले आहे. महाभारत, हरिवंश आणि श्रीमद्भागवत या तीनही ग्रंथांतील श्रीकृष्ण-चरित्र पाहिले की आपल्या विविध तऱ्हेच्या जीवनातील सांदीकोपरे भगवान श्रीकृष्णांनी व्यापलेले दिसतात. पाहण्याची दृष्टी तशी पाहिजे. राष्ट्रजीवनाला पूरक असाच त्याचा जीवनपट राष्ट्रजीवनाला

महत्त्व देणाऱ्याला पाहायला मिळेल. यशस्वी मुत्सद्दी, महापराक्रमी विजयी योद्धा, धर्मसाम्राज्याचा निर्माता (आजच्या निधर्मवादाचा बुरखा घेऊन वावरणाऱ्यांना हे कळणारच नाही!) व गणतंत्र राज्याचा नेता अशी त्याची वैशिष्ट्ये राष्ट्रजीवनाशी संबंधित म्हणून दाखविता येतील. मानवी जीवनाच्या खऱ्या विकासाची पावले कधीही अडखळणार नाहीत. किंबहुना पशुतेचा, पाशवी जीवनाचा धिक्कार करून देवजीवनांत परिणत व्हावी अशा उद्दिष्टाला पूरक, किंबहुना त्रिकालाबाधित अशा शाश्वत-चिरंतन जीवनमूल्यांचा आणि तत्त्वज्ञानाचा महान द्रष्टा, असे त्याच्या बौद्धिकतेच्या अथांग सागराचे विहंगम दर्शन घेऊन आजच्या जगातील असंख्य विद्वान त्याच्यापुढे नतमस्तक होत आहेत. महायोगी बाबू अरविंदांना, लोकमान्य टिळकांना, ब्रह्मीलीन विवेकानंद, चिन्मयानंद तसेच महात्मा गांधी, विनोबा भावे इत्यादींपर्यंत असंख्य श्रेष्ठींना त्याच्या तत्त्वज्ञानाने वेड लावले व आजन्म त्याच चिंतनात राहावे असा त्यांस मोह झाला. भूतकाळातही गीतार्णवापासून भावार्थदीपिकापर्यंत जगन्मान्य ग्रंथ जे निर्माण झाले ते सर्व त्या योगिराज योगेश्वर म्हणून वंद्य असलेल्या श्रीकृष्णांच्या तत्त्वज्ञानाच्या द्रष्टेपणाचेच द्योतक आहे. व्यवहारकुशलता तर त्याचीच वाखाणावी! गोष्टी सांगेन युक्तीच्या चार, एवढीच माफक भूमिका घेऊन व ऐन समरांगणांत शस्त्र न धरण्याचा निश्चय करणाऱ्या द्वारकाधीश श्रीकृष्णाचे जाणतेपण आपण पामरांनी काय वर्णावे? द्रौपदी-स्वयंवरापासून पांडवांच्या जीवनांतून दिसणारा कृष्ण म्हणजे बौद्धिक आणि व्यावहारिक जीवनाच्या आदर्शांचा कळसच आहे.

भावविश्वाचा विचार केला तर गोकुळांतील नंद-यशोदेच्या व असंख्य गोपगोपींच्या जीवनांतील कृष्ण हा अविस्मरणीय असाच आहे. गोकुळांतील बाळकृष्ण व द्वारकेतील प्रौढ श्रीकृष्ण या दोन्ही अवस्था नीट न्याहाळल्या, तेथील सर्व लीला नीट वाचल्या, अभ्यासल्या तर श्रीकृष्णाचे पूर्णावतारत्व आणि भावविश्वाचे सम्राट म्हणून जाणते लोक का वर्णन करतात हे कळून येईल. श्रीज्ञानोबांच्या, नामदेवांच्या, एकनाथांच्या आणि तुकोबांच्या काव्यातील गौळणी हा काव्यप्रकार किती अवीट गोडीचा आहे हे समजून घेणे आवश्यक आहे. पण ज्याच्या भाग्यात या परमानंदाचे दान असेल त्याचेच चित्त येथे रंगून जाईल. दंग होणे आणि रंगून जाणे यात फरक आहे. दंग होण्यात देहभान हरपायला होते. पण रंगून जाण्यात आपण देहाने राहातच नाही. म्हणून मीराबाईने आर्जवून मागणे मागितले की, हे कृष्णा किसन कन्हैया! **मुझे अपने रंग मे रंग लो। हे गिरिधर गोपाल! रंग दिया जो तुम राधाको। वही मुझको दे दो। हे गिरिधर गोपाल॥**

पूर्णावतार, भावविश्वाचे सम्राट इत्यादी विशेषणांनी आध्यात्मिक व आंतरिक जीवनातील मंडळींनी जे भगवान श्रीकृष्णांना गौरविले आहे ते पाहिले म्हणजे विस्मय वाटल्याशिवाय राहणार नाही. तुम्ही यासाठी सर्व संतांचे काव्य पहा. मग '**वृंदावनी वेणू वाजे**' म्हणून गुणगुणणाऱ्या भानुदासांकडे पहा, '**कृष्णा, तुला मी ताकीद करते, कुणाच्या घरी कधी जाऊ नको.**' म्हणून यशोदेच्या भूमिकेत जाणाऱ्या नामदेवांकडे पहा, '**यशोदे, तुझ्या दुर्गुणी मुलाला करू काय?**' असा खोटाच त्रागा करून कृष्णदर्शनासाठी यशोदेकडे जाणाऱ्या गौळणींच्या भावावस्थेत जाणाऱ्या एकनाथांना पहा! तुम्ही काय अनुभवाल? सख्य-आत्मनिवेदन अशा श्रीकृष्णभक्तीच्या दिव्य प्रकारात आरूढ झालेल्या या संतांची भावसमाधीच ती! त्या भावसमाधीत स्रवलेले हे काव्य शब्दामृत आहे. आज जे हे सर्व वाङ्मयवैभव दिसते ते श्रीमद्भागवतरूपी रत्नाकरातूनच निर्माण झालेले आहे.

श्रीमद्भागवतातील श्रीकृष्णचरित्राचा उथळ परिचय करून न घेता सखोल अभ्यास केला पाहिजे. ब्र.भू. डोंगरेमहाराजांनी तुमच्या आमच्यासारख्या सामान्यांसाठी '**सहज बोलणे हित उपदेश। करूनि**

सायास शिकविती ॥' अशाच रीतीने '**श्रीमद्भागवतरहस्य**' या प्रवचनांच्या ग्रंथाच्या रूपाने सहज पचविता येईल असे पक्वान्नच दिले आहे.

अखेरीस सर्वांनाच एक विनंती आहे की श्रीकृष्णचरित्र समजून घेऊन त्याचा प्रचार करावा की जेणेकरून त्या दिव्य अवताराच्या लीलाकथांनी प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणात प्रेमाचा झरा निर्माण होईल व त्या प्रेमझऱ्याने माणसातील क्षुद्रत्व, पशुत्व आणि नीचत्व दूर होऊन भव्यता, देवत्व आणि उच्चत्व निर्माण करील. याचीच आज नितांत गरज आहे.

श्रीकृष्णाच्या जीवनात शुद्ध प्रेमाला, निष्काम प्रेमाला व अकृत्रिम प्रेमाला स्थान होते. विकार, स्वैरजीवन, अनाचारी जीवन याची त्यांना इतकी घृणा होती की स्वतःच्या कुळात, राज्यात किंबहुना समस्त यादवांत हे दुर्गुण दिसल्याबरोबर त्या यादवांना कोणतेही अभय न देता, कोणत्याही प्रकारे वाचविण्याचा विचार न करता मृत्यूच्या खाईत जाऊ दिले व आपणही एका व्याधाच्या बाणाचे निमित्त करून भौतिकतेचे स्वप्न दूर सारून अभौतिकतेच्या नित्य अवस्थेत प्रयाण केले.

त्यांच्या जीवनाचे गूढ कळणे अशक्य. '**तदपि तव गुणानमिश पारं न याति**' हे पुष्पदंताचे विधानच खरे आहे. आपण फक्त एवढेच अंतःकरणांत कोरून ठेवायचे की '**इतनाही करलो स्वामीन्। जब प्राण तनसे निकले।**' काय आहे हे अंतीमत्व ?

**वंशी विभूषित करान्नवनीरदाभात्।**
**पीतांबरादरूणबिम्बफलाधरोष्ठात्॥**
**पूर्णेन्दुसुंदरमुखादरविंदनेत्रात्।**
**कृष्णात्परं किमपि तत्त्वमहं न जाने॥**

अशी भागवतकारांसारखीच मनोभूमिका सर्वांचीच व्हावी.

**॥ शुभं भवतु ॥**

## अनुक्रमणिका :

## चतुर्थ स्कंध



## पंचम स्कंध



## षष्ठ स्कंध



## सप्तम स्कंध

ॐ श्री हरिः।

# गोविन्द दामोदर स्तोत्र

करारविन्देन पदारविन्दं मुखारविन्दे विनिवेशयन्तम्।
वटस्य पत्रस्य पुटे शयानं बालं मुकुन्दं मनसा स्मरामि॥

श्रीकृष्ण गोविन्द हरे मुरारे हे नाथ नारायण वासुदेव।
जिह्वे पिबस्वामृतमेतदेव गोविन्द दामोदर माधवेति॥१॥

विक्रेतुकामा किल गोपकन्या मुरारिपादार्पित चित्तवृत्तिः।
दध्यादिकं मोहवशादवोचद् गोविन्द दामोदर माधवेति॥२॥

गृहे गृहे गोपवधू कदम्बाः सर्वेमिलित्वा समवाप्य योगम्।
पुण्यानि नामानि पठन्ति नित्यं गोविन्द दामोदर माधवेति॥३॥

सुखं शयाना निलये निजेऽपि नामानि विष्णोः प्रवदन्ति मर्त्याः।
ते निश्चितं तन्मयतां व्रजन्ति गोविन्द दामोदर माधवेति॥४॥

जिह्वे सदैवं भज सुन्दराणि नामानि कृष्णस्य मनोहराणि।
समस्तभक्तार्तिविनाशनानि गोविन्द दामोदर माधवेति॥४॥

सुखावसाने इदमेव सारं दुःखावसाने इदमेव ज्ञेयम्।
देहावसाने इदमेव जाप्यं गोविन्द दामोदर माधवेति॥६॥

श्रीकृष्ण राधावर गोकुलेश गोपाल गोवर्धननाथ विष्णो।
जिह्वे पिबस्वामृतमेतदेव गोविन्द दामोदर माधवेति॥७॥

जिह्वे रसज्ञे मधुरप्रियात्वं सत्यं हितं त्वां परमं वदामि।
अवर्णयेथा मधुराक्षराणि गोविन्द दामोदर माधवेति॥८॥

त्वमेव वाचे मम देहि जिह्वे समागते दंडधरे कृतान्ते।
वक्तव्यमेवं मधुरं सुभक्त्या गोविन्द दामोदर माधवेति॥९॥

नमोऽस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे॥
सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटि युगधारिणे नमः॥

मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्।
यत्कृपा त्वमहं वन्दे परमानन्दमाधवम्॥

( प.पू. शास्त्री श्री रामचंद्र डोंगरेमहाराज प्रवचनापूर्वी वरील स्तोत्राचे पठण करीत असत. )

ॐ

श्री गणेशाय नमः।

श्री सरस्वत्यै नमः। श्री गुरवे नमः।

ॐ नमो भगवते वासुदेवाय।

श्रीकृष्णः शरणं मम।

# भागवताचा उद्देश व त्याचे माहात्म्य

सच्चिदानंदरूपाय विश्वोत्पत्यादि हेतवे।
तापत्रयविनाशाय श्रीकृष्णाय वयं नुमः॥

(माहात्म्य अ. १ श्लो. १)

**१. परमेश्वराची तीन रूपें– सत्, चित् आणि आनंदः**

जे जगताची उत्पत्ति, स्थिति आणि विनाश यांचे हेतु आहेत व जे तिन्ही प्रकारच्या तापत्रयाचे नाशकर्ते आहेत, अशा सच्चिदानंदस्वरूप भगवान श्रीकृष्णांना आम्ही वंदन करतो.

परमात्म्याची तीन स्वरूपे शास्त्रांत सांगितली आहेत. ती सत्, चित्, आनंद ही होत. सत् प्रगटरूपाने सर्वत्र विद्यमान आहे, चित् मौन आहे आणि आनंद अप्रगट. जड वस्तूंमध्ये सत् आणि चित् आहेत परंतु आनंद नाही. जीवांत सत् आणि चित् प्रगट होते परंतु आनंद अप्रगट असतो. अर्थात अप्रगटरूपाने राहतो. तसे पाहिले तर आनंद आपल्या अंतर्यामीच असतो, तरी पण मनुष्य आनंदाचा शोध बाह्य जगतामध्ये करीत असतो. मनुष्य स्त्री, धन, संपत्ति इत्यादींमध्ये आनंदाचा शोध घेत असतो. आनंद तर तुमचे स्वतःचे स्वरूपातच आहे. आनंद तुमच्याजवळच (अंतर्यामीच) आहे. ह्या आनंदास आपल्या जीवनात कसे प्रगटवावे हेच भागवतशास्त्र शिकविते. दुधात लोणी असते तरी ते दिसत नाही. पण त्याच दुधाचे दही करून मंथन केल्यावर लोणी दिसू लागते. अगदी याचप्रमाणे मानवास मनोमंथन करून आनंद प्रगट करून घ्यायचा आहे. दुधांत जसा लोण्याचा अनुभव येत नाही, तसाच सर्वत्र असून सुद्धा ईश्वराचा अनुभव मानवास येत नाही. जीव ईश्वरांश असूनही ईश्वरास जाणून घेण्याचा प्रयत्न करीत नाही. त्याचमुळे त्यास आनंद मिळत नाही. कोणताही कसाही जीव असो, शेवटी त्याचे ईश्वराशी मीलन व्हायचेच असते. नास्तिक देखील थकूनभागून हार खाऊन सरतेशेवटी शांतीच्याच शोधात असतो.

आनंदाचे अनेक प्रकार तैत्तिरीय उपनिषदात वर्णिले आहेत. परंतु त्या सर्वात दोन मुख्य आनंद आहेत– (१) साधनजन्य आनंद, (२) स्वयंसिद्ध आनंद. साधनजन्य आनंद अर्थात् विषयजन्य आनंद, साधन किंवा विषयाच्या नाशाबरोबर स्वतःही नाश पावतो. योगीजनांजवळ कोणतेही साधन किंवा विषय नसताही ते नेहमीच आनंदात असतात. हा स्वयंसिद्ध आनंद होय. त्यावरून हेच सिद्ध होते की, खरा आनंद आपल्या अंतर्यामीच असतो; तो कोणत्याही बाह्य साधन किंवा विषयावर अवलंबून नसतो. सत्, चित्, आनंद परमेश्वरांत परिपूर्ण भरलेले आहेत. परमात्मा परिपूर्ण सत्स्वरूप, परिपूर्ण चिद्रूप आणि परिपूर्ण आनंदरूप आहे. श्रीकृष्ण परमात्मा परिपूर्ण आनंदस्वरूप आहे. ईश्वराविना संसार अपूर्ण

आहे. ईश्वराचा अंशमात्र जीवात्मा देखील अपूर्ण आहे. जीवांत चित्-अंश आहे, परंतु तो परिपूर्ण नाही. मनुष्यास ज्ञान होते पण ते स्थायी असत नाही. श्रीकृष्ण परिपूर्ण ज्ञानी आहे, श्रीकृष्णांना सोळा हजार राण्यांशी संभाषण करतानाही जे ज्ञान होते तसेच्या तसेच द्वारका इत्यादींचा नाश होत असताना सुद्धा होते.

श्रीकृष्णाचा आनंद द्वारका किंवा राण्यांमध्ये नव्हताच मुळी. सर्वांचा विनाश होत असताना देखील श्रीकृष्णाचा आनंद (नाश पावत नाही) कायम राहतो. कारण श्रीकृष्ण स्वतः आनंदस्वरूपच आहेत. सत्य नित्य आहे, चित् हे ज्ञान आहे– चित्शक्ति अर्थात् ज्ञानशक्ति. मनुष्य आपल्या स्वरूपांत स्थित होत नाही म्हणून त्यास आनंद मिळत नाही. मनुष्य बाहेर वागताना जसा विवेक ठेवू शकतो तसा घरांत त्याला ठेवता येत नाही. मनुष्य एकांतात स्वस्वरूपात स्थित होत नाही. उत्पत्ति, स्थिति आणि संहार लीलेत परमात्म्याच्या स्वरूपांत काहीच परिवर्तन होत नाही. परमात्मा संहार देखील आपली लीलाच समजतो. उत्पत्ति, स्थिति आणि संहार ह्या तिन्ही परमात्म्याच्या लीलाच होत. परमात्मा तिन्हींतही आनंद मानतो, आणि आपल्या स्वरूपात स्थित असतो.

ज्याचे ज्ञान नित्य टिकते त्यासच आनंद होत असतो; तोच आनंदस्वरूप होतो. जीवास जर आनंदस्वरूप व्हावयाचे असेल तर त्यास सच्चिदानंदाचा आश्रय घेतला पाहिजे. हा जीव जोपर्यंत परिपूर्ण होत नाही तोपर्यंत त्यास शांति मिळत नाही, आनंद मिळत नाही. जगातील पदार्थ विनाशी असल्यामुळे परिपूर्ण होऊ शकत नाहीत. "परिपूर्ण स्वरूप हे तर भगवान नारायण!" ह्या प्रभू नारायणाचा परिचय जो करून घेतो आणि ह्या नारायणाशी जो आपलें मन तदाकार करतो, तोच नारायणाशी एकरूप होतो. केवळ तोच जीवात्मा, जो नारायणरूप होतो, तोच परिपूर्ण होतो आणि या जीवाचे जीवन सफल होते. जीव जोपर्यंत अपूर्ण असतो तोपर्यंत त्यास शांति मिळत नाही. जीवाचे जेव्हा ईश्वराशी संमीलन होते आणि त्यास अप्रत्यक्ष साक्षात्कार होतो तेव्हांच जीव परिपूर्ण होतो. परमात्म्याचें– श्रीकृष्णाचें दर्शन करून घेण्यासाठीच हा मनुष्यजन्म आहे. मानवास प्रभूचे दर्शन घडू शकते. पशूला तर आपल्या स्वरूपाचेंही भान नसते, तर मग तो परमात्म्याचे दर्शन तरी कसे करील? परमात्म्याच्या दर्शनाविना जीवन सफल होत नाही. ज्याला परमात्म्याचे दर्शन घडते त्याचेच जीवन सफल होते. हा जीव अनंत जन्मांपासून भोग भोगीत आला आहे. तरी पण त्याला शांति मिळालेली नाही. जेव्हा जीवास भगवंताचें दर्शन होईल तेव्हाच त्यास शांति मिळेल. श्रीकृष्ण प्रभूच्या दर्शनाविना जीवास परिपूर्ण शांति मिळत नाही.

### २. परमेश्वराच्या दर्शनाचे तीन प्रकार:

प्रभूच्या दर्शनाचे तीन प्रकार शास्त्रांत सांगितले आहेत–

१) स्वप्नात प्रभू भासमान होतात. हे साधारण दर्शन होय.

२) मंदिरात किंवा एखाद्या मूर्तींत भगवंताचे दर्शन झाले तर ते मध्यम दर्शन होय.

३) ईश्वराचे अपरोक्ष दर्शन. हे उत्तम दर्शन होय.

भगवंताचा अपरोक्ष साक्षात्कार जेव्हा होतो तेव्हा जीवन सफल होते. वेदान्तांत साक्षात्काराचे दोन प्रकार सांगितले आहेत: (१) परोक्ष ज्ञान (२) अपरोक्ष ज्ञान. ईश्वर कोणत्या तरी एका विशिष्ट स्थानी आहे, असे जाणणे हा परोक्ष साक्षात्कार. ईश्वराशिवाय दुसरे काहीच नाही, सर्व काही ईश्वरच आहे, मी सुद्धा ईश्वराहून वेगळा नाही असे जाणणे हा झाला अपरोक्ष साक्षात्कार.

ज्याला "मी स्वतःच ब्रह्म आहे" – (अहं ब्रह्माऽस्मि) अशा ज्ञानाचा अनुभव येतो, त्यास अपरोक्ष साक्षात्कार झाला आहे असे म्हटले जाते. द्रष्ट्यास (साधकास) प्रभू-दर्शन झाल्याबरोबर जेव्हा तो प्रभूमय होऊन जातो तेव्हा त्यास अपरोक्ष साक्षात्कार होतो. सर्वत्र (जिकडे तिकडे) ईश्वराचा अनुभव करता करता, जो ईश्वराशी एकरूप होतो तोच केवळ ईश्वराचे संपूर्ण स्वरूप जाणू शकतो, आणि वेदान्तांत त्यालाच अपरोक्ष साक्षात्कार म्हणतात. जगात ईश्वर कोण्या एका विशिष्ट जागीच आहे हेही ज्ञान अपूर्ण होय. ईश्वर सर्वव्यापक आहे. तो फक्त एकाच मूर्तींत किंवा फक्त एकाच मंदिरात राहू शकत नाही. मंदिरात प्रभूचे दर्शन करून घेतल्यावर ज्ञानी जनांस जिकडे दृष्टी जाईल तिकडे प्रभूचाच अनुभव येत असतो. मंदिरात प्रभूदर्शन करून बाहेर आल्यावर प्रत्येक व्यक्तींत देवाचे दर्शन करावे. मन जेथे जाईल तेथेही देवाचे दर्शन व्हावे. हेच परमेश्वराचे असाधारण दर्शन होय. जो परमेश्वर माझ्यांत आहे तोच सर्वांमध्ये वसला आहे, अशा रीतीने ज्यास अखिल जगत् ब्रह्मस्वरूप दिसू लागते तोच ज्ञानी असतो. सर्वांमध्ये ईश्वराचा अनुभव करता करता आपल्या स्वतःच्या स्वरूपांतही त्यास ईश्वराचा अनुभव येऊ लागतो. भगवंताच्या परोक्ष दर्शनाने काही विशेष लाभ होत नसतो; पण जीवास जेव्हा भगवंताचे अपरोक्ष दर्शन घडते तेव्हाच तो कृतार्थ होतो. ज्ञानी पुरुषास तर आपल्या स्वरूपात देखील भगवान दिसतात. हेच अद्वैत होय. श्रीकृष्णांच्या लीलांचा हाच हेतु होता की, त्या लीलांचे चिंतन करणाऱ्या गोपी स्वतःच्या स्वरूपांत सुद्धा भगवंताचा (कृष्णाचा) अनुभव करीत असत. "**लाली देखन मैं गई, मैं भी हो गई लाल.**" गोपींना आपल्या स्वरूपाचें विस्मरण होऊन त्या म्हणतात, "मीच कृष्ण आहे". आपल्या प्रिय कृष्णाचा सर्वांमध्ये अनुभव करणाऱ्या गोपी श्रीकृष्णमय झालेल्या आहेत. ज्यास आपल्या स्वतःतच भगवंताचें दर्शन होत असते तोच जीव भगवत्स्वरूप होत असतो. आपल्यांतच ज्याला परमात्मा दिसतात, तो जीव त्यानंतर ईश्वरापासून वेगळा राहू शकत नाही, तो ईश्वरांत विलीन होऊन जातो. हीच श्रीमद्भागवताची फलश्रुति होय.

ज्ञानी ज्ञानाने ब्रह्माचा अपरोक्ष साक्षात्कार करून घेतात तर वैष्णव (भक्त) प्रेमाने परमेश्वराचा अपरोक्ष साक्षात्कार करून घेतात.

जीवावर कृपा करून ईश्वर जेव्हा त्यास आपल्या स्वरूपाचें ज्ञान करून देतो तेव्हाच जीवास पूर्णत्व येते. ईश्वराविना सर्व जग अपूर्ण आहे. जीवन अपूर्ण आहे म्हणून त्यास शांति नाही. एक नारायणच काय तो पूर्ण आहे. खरी शांति नारायणाचे ठिकाणी आहे. नर नारायणाचा अंश आहे. म्हणूनच तो नारायणांत लीन होऊं पाहतो. श्री नारायणाची ओळख करून देणारे आणि श्रीनारायणांत लीन होण्यासाठीं मार्गदर्शन करणारे श्रीभागवतशास्त्र आहे.

**३. कर्ममार्ग, ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग:**

जीव नारायणाचा अंश आहे. त्याला नारायणांतच मिळून जावयाचे आहे. त्याकरितां शास्त्रांत उपाय सांगितले आहेत – (१) कर्ममार्ग, (२) ज्ञानमार्ग, (३) भक्तिमार्ग.

उपनिषदांतील ज्ञानानें ईश्वराचा अपरोक्ष साक्षात्कार होतो. परंतु श्री व्यासांनी विचार केला की, उपनिषदांची भाषा गूढ आहे. सामान्य मनुष्यास ती समजू शकणार नाही. तसे उपनिषदांचे ज्ञान तर दिव्यच आहे. पण आपल्यासारखे विलासी जीव तसल्या दिव्य ज्ञानाचा अनुभव घेऊ शकणार नाहीत. साधारण मनुष्याचें जीवन अतिविलासी झालेले आहे म्हणून ज्ञानमार्गाने तो ईश्वराच्या जवळ जाणे असंभव आहे. पूर्ण वैराग्याविना ज्ञानमार्गात सफलता मिळत नाही. ज्ञानाचा पायाच मुळी वैराग्यांत

आहे. आणि असें अतिवैराग्य प्राप्त करून घेणें दुष्कर आहे. श्री शुकदेवांना असे कडक वैराग्य प्राप्त झालेले होते. जन्माला येताक्षणीच त्यांनी वनाकडे प्रयाण केले होते आणि आपल्या वडिलांना म्हणाले होते, "तुम्ही माझे पिता नाही, आणि मी तुमचा मुलगा नाही". वेद त्यागाचा उपदेश करतात. शास्त्र सर्व कांही सोडून देण्यास सांगते. शास्त्र सांगते, "काम सोडा, क्रोध सोडा". परंतु मनुष्य काहीच सोडू शकत नाही. जे साधारण पानसुपारीही सोडू शकत नाहीत, ते काम, क्रोध, लोभ कसे सोडतील? ते घराचा त्याग कसा करतील? सर्वसाधारण मनुष्याला तर काहीच करायचे नाही आणि तो काहींही सोडू शकत नाही. पण वेदान्त शास्त्र तर आवर्जून सांगत आहे की, सर्व काही सोडून, सर्वस्वाचा त्याग करून, ईश्वराचा पाठलाग कराल तरच तुम्हांस ईश्वराची ओळख होईल आणि तुमची त्याची भेट होऊ शकेल. सर्वत्याग – सर्वस्वाचा त्याग तर साधारण मनुष्यास सुलभ नाही.

**वेदांचे चार भाग आहेत** – (१) संहिता (२) ब्राह्मण (३) आरण्यक (४) भाष्य. वेदांची परिसमाप्ति उपनिषदांनी होते. म्हणून त्यांची गणना वेदान्तांत होते. आरण्यकांत उपनिषदांचा भाग येतो. ज्या ग्रंथांचे चिंतन ऋषींनी केले आहे त्यास आरण्यक म्हणतात. बंगल्यामध्ये भोगविलासांत रमणाऱ्यांना उपनिषदांच्या अध्ययनाचा अधिकार नाही. आपणासारखे संसारांत अडकलेले जीव उपनिषदांचे ज्ञान पचवू शकत नाहीत. ह्या सर्व गोष्टी विचारात घेऊन भगवान व्यास महर्षींनी श्रीमद्भागवतशास्त्राची रचना केली आहे. उपनिषदांनी दाखविलेला मार्ग आपल्यासारख्यांना सुलभ नाही. उपनिषदांचे सार त्यागांत आहे. जे पानसुपारी, चहा सोडू शकत नाहीत आणि दोनचार तास कथा-कीर्तनांत बसले असता देखील तपकीर सोडू शकत नाहीत ते कामक्रोधादि विकार कसे सोडू शकतील? जे कामसुखाचा उपभोग घेतात ते योगाभ्यास करू शकत नाहीत. भोगी जर योगी झाला तर तो रोगी होईल. ज्ञानमार्गात ज्याचे पतन होते तो नास्तिक होतो. योगमार्गांत ज्याचे पतन होते तो रोगी होतो. भक्तिमार्गांत ज्याचे पतन होते तो आसक्त होतो. कलियुगीं मनुष्य योगाभ्यास करू शकत नाही. ह्या भागवतशास्त्राची रचना कलियुगांतील जीवांचा उद्धार करण्यासाठी केली गेली आहे.

श्रीमद्भागवतांत एक नवीन मार्गदर्शन केले गेले आहे. "आम्ही घरदार आणि कामधंदा सोडू शकत नाही", असे म्हणणाऱ्यांना भागवतशास्त्र म्हणते, "निराश होऊ नका, सर्व कांही सोडून जंगलांत जाण्याची आवश्यकता नाही. फक्त जंगलांत गेल्यानेच आनंद मिळतो असे नाही." जीव जेव्हां सर्व प्रकारच्या प्रवृत्तींचा त्याग करून निवृत्तीमध्ये स्थिर होतो तेव्हां सुद्धा मनांत प्रवृत्तींचे विचार येत असतात.

भागवतशास्त्राचा आदर्श दिव्य आहे. गोपींनी घर सोडले नाही. गोपी घरची कामें करीत असत. त्यांनी आपला स्वधर्म सोडला नाही. त्या वनांत गेल्या नाहीत. तरी पण त्या भगवतप्राप्ती करू शकल्या. भागवतशास्त्र असे मार्गदर्शन करते की, योग्यांना जो आनंद समाधींत मिळतो तोच आनंद आपण घरांत राहूनही मिळवू शकतो. घरांत राहूनही तुम्ही प्रभूला प्रसन्न करून घेऊ शकता – प्रभूला प्राप्त करून घेऊ शकता. परंतु यासाठी तुमचा प्रत्येक व्यवहार भक्तिमय झाला पाहिजे. गोपींचा प्रत्येक व्यवहारच भक्तिमय झाला होता. घरांत राहूनही भगवंताचे दर्शन होऊ शकते. गोपींना घरांतच भगवंताचे दर्शन झालेले आहे. गोपी असेच समजत असत कीं जेथे जेथे त्या जातात तेथे तेथे त्यांचा श्रीकृष्ण त्यांचेबरोबर असतो. व्रजांत अशा गोपींच्या दर्शनानें उद्धवाचा गर्व नष्ट झाला. गोपींच्या सत्संगानंतर उद्धव म्हणू लागले– **"नंदव्रजांत राहणाऱ्या या गोपींच्या चरणरजांना मी पुनःपुन्हा वंदन करतो, आणि हे चरणरज मी आपल्या मस्तकावर धारण करतो. अरे, या गोपींनी भगवान श्रीकृष्णाच्या लीलांचे जे गुणगान केले आहे ते तिन्ही लोकांना पवित्र करीत आहे आणि सदासर्वदा पवित्र करीत**

**राहील." गोपीच्या श्रेष्ठ भक्तीचा उद्धवाला साक्षात्कार झाला.**

गोपी सर्वांमध्ये भगवंतालाच न्याहाळीत असत. त्या म्हणत– "ह्या वृक्ष, लता, फुलें, फळें सगळ्यांतच मला माझा प्रभू दिसतो आहे. माझा कृष्ण तर मला सोडून जातच नाही". गोपींना घरांतच परमात्म्याचा साक्षात्कार झाला होता. श्रीभागवतांत सांगितले आहे, "घरांतच राहून आणि आपापले व्यवहार करून देखील परमात्म्याची प्राप्ती करून घेऊ शकाल. घरांत राहणें पाप नाहीं, परंतु सदैव घरच मनांत ठेवणें पाप आहे. सर्वांनाच साधू होण्याची आवश्यकता नाही. जर आपण सर्वांनीच संन्यास घेतला, तर साधुसंन्याशांचे स्वागत कोण करील? त्यांचा सन्मान कोण करील? गोपींची प्रेमलक्षणा भक्ति इतकी दिव्य होती कीं, त्यांना घरांत राहूनच प्रभूची प्राप्ती झालेली आहे. त्या श्रीकृष्णरूप होऊन गेलेल्या आहेत. याप्रमाणे श्रीकृष्णांतच ज्याचे मन विलीन होऊन जाईल तो स्वतःच श्रीकृष्णस्वरूप होऊन जाईल. भगवान व्यास नारायण या भागवतशास्त्रांत अशा अलौकिक भक्तिमार्गाचें वर्णन करीत आहेत, आणि याच भक्तिद्वारें परमात्म्याचा साक्षात्कार होईल.

श्रीमद्भागवत आपल्या प्रत्येक व्यवहारालाच भक्तिमय करून टाकील, भक्तीचा रंग चढवील. भागवत व्यवहार आणि परमार्थाचा समन्वय करील आणि जो आनंद योगीजन वनांत राहून अनुभवतात तोच आनंद भागवतशास्त्र आपणास घरांतही देईल. योगी समाधीमध्ये जो आनंद अनुभवतात तसाच आनंद गृहस्थांनाही मिळावा म्हणूनच भागवतशास्त्राची रचना केली गेली आहे. सांसारिक विषय-सुखाविषयी वैराग्य निर्माण व्हावे आणि प्रभूविषयीं प्रेम जागृत व्हावे, हाच भागवतांत वर्णिलेल्या कथा व लीलांचा उद्देश आहे.

**भागवत भगवंतांना मिळवून देण्याचे किंवा भगवंतांत मिळून जाण्याचें साधन आहे. संताचा आश्रय घेणारा संतच बनतो. भागवताचा आश्रय घेणारा भगवान होतो.**

भक्ति मंदिरांतच नाही, तर जिथे जिथे तुम्ही असाल तिथे तिथेही होऊ शकते. ह्या भक्तीसाठी कांही विशिष्ट देश, स्थळ किंवा कालाची आवश्यकता नाही. भक्ति तर सतत चोवीस तास करायची असते. भक्तीची वेळ अमुक आणि भोगाची वेळ अमुक असा जो भेद बाळगतो तो भक्ति करू शकत नाही. भक्ति सतत करावयास पाहिजे. निरंतर करीत राहिले पाहिजे. चोवीसही तास ब्रह्मानुसंधान राहू द्या. मायेशी संबंध जडूं नये असे नेहमी ध्यानांत ठेवा, आणि त्याविषयीं अतिसावध असा.

जेव्हां श्री वसुदेवांनी श्रीकृष्णाला मस्तकावर धारण केले तेव्हां त्यांचा परब्रह्माशी संग झाला आणि त्यामुळे त्यांच्या हातापायांतील बेडचा तुटून गेल्या, परंतु योगमायेला जेव्हा ते बरोबर घेऊन परत गेले तेव्हा पुन्हा बंधनात पडले. वसुदेवांना ईशसंग झाला, पण तो ते टिकवून ठेवू शकले नाहीत. झालेला ईशसंग टिकवून ठेवता आला पाहिजे. ईश्वराचें स्मरण केव्हांही सुटता कामा नये. वैष्णव (भक्त) भगवंताशी खेळत असतात. जीव जी जी क्रिया करतो ती सर्व जेव्हा ईश्वरार्पण बुद्धीनें करतो, ईश्वराकरिता करतो तेव्हा त्याची ती प्रत्येक क्रिया भक्तिस्वरूप होऊन जाते. भक्तीचा विशेष संबंध मनाशी असतो आणि ज्याला भक्ति मनाने होत नाही, त्याला तनुने सेवा करण्याची आवश्यकता आहे. मानसिक सेवा श्रेष्ठ असते. साधुसंत तर मानसिक सेवेतच तन्मय होऊन राहतात. जर अशी सेवा-तन्मयता साधली तर जीव कृतार्थ होतो. भक्तिमार्गाच्या आचार्या गोपी होत. त्यांचा आदर्श आणि मन दृष्टीसमोर ठेवणे योग्य. ज्ञानमार्गाने किंवा योगमार्गाने, ईश्वरप्राप्तीच्या ज्या आनंदाचा अनुभव येतो त्याच आनंदाचा अनुभव ह्या भक्तिमार्गाने सहज मिळू शकतो. ज्ञानी आणि योगीजनांना जो ब्रह्मानंद मिळतो तोच ह्या साधारण जीवात्म्यासही मिळावा ह्याच उद्देशाने भागवताची रचना केली गेली आहे. ह्यांत भगवंतांचे

स्वरूप वर्णिलें आहे, ते कसे आहेत हे सांगितले आहे.

**४. तापत्रयाच्या नाशासाठी श्रीकृष्णांना वंदन करण्याचें महत्त्वः**

**तापत्रय विनाशाय श्रीकृष्णाय वयं नुमः।**

परमात्म्याच्या स्वरूपाचें वर्णन करताना म्हटले आहे, **"तापत्रय विनाशाय."** दुःख मनाचा धर्म आहे, आत्म्याचा नव्हे. मनुष्य ईश्वराचें स्मरण करतो आणि त्यामुळे त्याचे भगवंताशी अनुसंधान होऊन त्यास आनंद मिळतो. जीवाचा स्वभाव सुंदर नसतो. असे असू शकते कीं, केव्हा केव्हा भगवंताचे शरीर सुंदर असत नाही. कूर्मावतार, वराह अवतारांची शरीरे सुंदर नव्हती. परंतु परमात्म्याचा स्वभाव मात्र सुंदर– अतिशय सुंदर आहे. दुसऱ्याचें दुःख दूर करण्याचा परमात्म्याचा स्वभाव आहे. ह्याचकरिता तर भगवंत वंदनीय आहेत.

आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक तीनही प्रकारच्या तापांचा नाश करणाऱ्या भगवान श्रीकृष्णांना आम्ही वंदन करतो. पुष्कळ लोक विचारतात कीं, वंदनापासून लाभ काय? वंदन केल्याने पाप जळून जाते. श्रीराधाकृष्णांना वंदन कराल तर आपले सगळे ताप नष्ट होतील. पण वंदन नुसत्या शरीरानें नाही, मनानेही करा. अर्थात श्रीराधाकृष्णांना हृदय-सिंहासनावर बसवा आणि मोठ्या प्रेमाने त्यांना नमन करा. नमन प्रभूंना बंधनांत टाकते. दुःखात जो आपल्याला साथ देतो तो देव, आणि सुखात साथ देतो तो जीव. ईश्वर नेहमी दुःखातच साथ देतो म्हणून ईश्वर वंदनीय आहे. ईश्वराने ज्यांना ज्यांना साहाय्य केले आहे त्यांना त्यांना दुःखातच साहाय्य केले आहे. पांडव जोपर्यंत दुःखांत होते तोपर्यंत श्रीकृष्णांनी त्यांना मदत केली. पण पांडव जेव्हा सिंहासनावर बसले तेव्हा श्रीकृष्णही तेथून निघून गेले. ज्यांना ज्यांना ईश्वराची भेट झाली आहे त्यांना ती नेहमी दुःखात झालेली आहे. "सुखात सोबत जीवाची आणि दुःखात सोबत ईश्वराची असते." याचे सतत मनन करावे. मनुष्य पैसा मिळवण्याकरिता जितका प्रयत्न करतो (आणि दुःख सहन करतो) त्याहीपेक्षा कमी प्रयत्न तो ईश्वरप्राप्त्यर्थ करील, तरीही त्याला ईश्वराची भेट अवश्य होईल. कान्हा तर न बोलावता देखील गोपींच्या घरी जात असे. पण तो माझ्या घरी कां येत नाही याचा कधीतरी कोणी विचार केला आहे का? आपणही असा निश्चय करा कीं, 'मी सुद्धा अशी सत्कर्मे करीन की कान्हा माझ्या देखील घरी येईल. श्रीभगवंताच्या पुढे हात जोडणें, मस्तक नमविणे इत्यादींचा काय अर्थ आहे? हात क्रियाशक्तीचें प्रतीक आहेत. हात जोडण्याचा अर्थ असा आहे कीं, 'मी ह्या हातांनी सत्कर्मे करीन.' मस्तक नमविण्याचा अर्थ असा आहे की, 'हे नाथ, मी आपली बुद्धिशक्त्यादि सर्व तुम्हाला अर्पण करीन.' वंदन करण्याचा उद्देश असा आहे की, आपली क्रियाशक्ति आणि बुद्धिशक्ति परमेश्वराला अर्पण केली पाहिजे. भगवंतांना वंदन केल्याने पापतापांचा नाश होतो. निर्भय व्हायचे असेल तर मोठ्या प्रेमाने श्रीकृष्णांना नमस्कार करीत रहा. "माझे प्रभू दयेचा सागर आहेत." नुसत्या काया आणि वाचेनेच नव्हे, तर मनाने म्हणजे आंतरिक भावाने नमन करीत रहा. अगदी हृदयापासून नमन केल्याने भगवंताशी नाते जोडले जाते.

केव्हांही घरांतून बाहेर जातांना परमेश्वराला नमस्कार करूनच बाहेर जा. देवाला प्रेमच आवडते आणि तो प्रेमच देतो. देव असेच समजत असतो की, हा माझा आहे आणि माझ्याजवळ याचना करीत आहे. नमन केल्याने ईश्वराशी नाते जडते. या जीवाचा स्वभाव असा आहे की तो वंदन करीत नाही. घरांत शिरल्याबरोबर जर बायको दिसली नाही तर मुलांना विचारतो कीं, 'तुझी आई कुठे गेली आहे?' परंतु याची काय आवश्यकता आहे? ती जर बाहेर गेलेली असेल तर तू बसून 'राम

राम ' जप. बाहेरून आल्यावर देखील देवाला नमस्कार करावा. वाटेने चालताना देखील वंदन (नामस्मरण) करा. जर जीव प्रारंभीच प्रभु श्रीकृष्णास मोठ्या प्रेमाने वंदन करील तर त्याच्यावर प्रभू प्रसन्न होतील. हा जीव आणखी इतर काहीही न करो, पण इतके तर त्याने करावेच की पुनःपुन्हा स्मरण करून प्रभूस वंदन करीत असावे. वंदन कराल ते सद्भावयुक्तच असले पाहिजे. प्रभूचे माझ्यावर अनंत उपकार आहेत! भगवंतांनी आमच्यावर किती उपकार केले आहेत! बोलण्यासाठी आणि खाण्यासाठी जीभ दिली आहे. पाहण्यासाठीं डोळे दिले आहेत. ऐकण्यासाठी कान दिले आहेत. मनन करण्यासाठीं मन दिले आहे. बुद्धि आणि विचारशक्ति देखील परमेश्वरानेच दिली आहे. ईश्वराच्या उपकारांचे स्मरण करा आणि म्हणा की, " हे भगवन्! मी आपला ऋणी आहे. " अशा उत्कृष्ट भावनेने नमस्कार करा. म्हणा कीं, " हे देवा! तू माझ्यावर कृपा केली आहेस. तुझ्या कृपेमुळेच मी सुखी आहे. माझी पापे अनंत आहेत. परंतु हे नाथ, आपली कृपाही अनंतच आहे. " परमेश्वराची अनन्यभावाने भक्ति करीत राहिल्यास ती अवश्यमेव सफल होते.

विचार करा की परमेश्वराने जे जे मला दिले आहे त्याला मी पात्र आहे का? नाथ, मी तर पात्र नाही, मी पापी आहे, तरी पण तुम्ही मला संपत्ति आणि प्रतिष्ठा दिली आहे. जीवाची योग्यता नसतानाही जीवास प्रभूने खूप देऊन ठेवले आहे. नाथ, तुमचे उपकार अनंत आहेत. मी याची फेड करू शकणार नाही. प्रभू, मी आपल्याला केवळ वंदनच करू शकेन. वंदन केल्याने अभिमानाचा भार हलका होतो. देवाचा स्वतःचा कांही भारच नसतो. कारण त्याला अभिमान नाही. श्रीकृष्ण तर बोडाण्याच्या बायकोच्या नथीनेच तोलले गेले होते. भागवताचा प्रारंभही वंदनानेच झाला आहे आणि त्याचा शेवटही वंदनानेच केला गेला आहे.

एकट्या श्रीकृष्णास नमस्कार केलेला नाही, तर म्हटले गेले आहे, **" श्रीकृष्णाय राधाकृष्णाय नमः॥ "** ' श्री ' चा अर्थ आहे राधा! श्रीराधेच्या बरोबर विराजमान श्रीठाकुरांना (कृष्णांना) मी वंदन करतो. भगवंताना वंदन केल्यावर भागवताचे वक्ते श्रीशुकदेव यांनाही वंदन केले गेले आहे. वंदन करून तुमची क्रियाशक्ति आणि बुद्धिशक्ति अर्पण केल्यानंतर मग कोणतेही अघटित कार्य किंवा विचार करू नये. वाचण्यापेक्षा आणि विचार करण्यापेक्षा जीवनांत आचरण अधिक श्रेष्ठ आहे.

वेदांना अंत नाही आणि पुराणाला पार नाही. मनुष्यजीवन क्षणभंगुर आहे आणि शास्त्राला कोणताच पार नाही. परंतु त्या एका ईश्वरास जाणून घ्याल तर सर्व काही जाणून घ्याल. कलियुगांतला मनुष्य अल्प कालांतही परमेश्वराची प्राप्ती करून घेऊ शकतो. हे कसे, तेच भागवतात सांगितले आहे.

**सूत म्हणतात** – सातच दिवसांत परीक्षित राजास सद्गति मिळाली हे मी स्वतः आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे. परीक्षिताचा उद्धार झाला मग आमचा का होत नाही? आम्हास परीक्षितासारखे श्रोता व्हावयास पाहिजे आणि वक्ता देखील जर श्रीशुकदेवांसारखा झाला तरच उद्धार होईल. आम्ही परीक्षितच आहोत. हा जीव गर्भात आला आणि ज्याने याचे रक्षण केले ते चतुर्भुज पुरुषोत्तम कोठे आहेत, असे म्हणत म्हणत ईश्वराच्या शोधांत निघेल तो जीव परीक्षितच म्हटला पाहिजे. परीक्षित म्हणजेच प्रभूच्या दर्शनासाठी आतुर झालेला असा जीव. परीक्षिताच्या आतुरतेचे एक कारण असे होते की, त्यांना हे समजले होते की सात दिवसांत (सातव्या दिवशी) त्यांचा मृत्यू होणार आहे. तक्षक नाग डसणार आहे. जीवमात्राला तक्षक नाग डसणार आहे, तक्षक हे काळाचेच स्वरूप आहे असे भागवताच्या एकादशस्कंधांत म्हटलें आहे. कालरूपी तक्षक कोणालाच सोडत नाही. तो सातव्या दिवशी डसतच असतो. आठवड्याचे एकंदर सात दिवस आहेत. ह्या सात दिवसांत (वारांत) कोणत्या तरी एका वारी

(दिवशी) हा काल अवश्य डसेलच. या सात वारांत कोणता तरी एक वार आमच्यासाठी सुद्धा ठरलेला आहेच. आणि म्हणून परीक्षिताप्रमाणे काळाला विसरू नका. कोणी का जीव असेना, त्याला काळाचे भय असतेच. मृत्यूचे भय फक्त मनुष्यासच असते असे नाही, ब्रह्मदेवालासुद्धा असते.

**५. श्रीमद्भागवताच्या श्रवणाने मृत्युभयासह सर्व भयांचा नाश:**

भागवत मनुष्याला निर्भय बनविते. भागवतांत लिहिले आहे की, ध्रुव मृत्यूच्या डोक्यावर पाय देऊन स्वर्गात गेला होता. समाप्तीच्या दिवशी परीक्षित राजा म्हणाला की, 'आता मला काळाचें भय राहिलें नाही. मला काळाची भीती वाटत नाही.' भागवत ऐकून देवावर श्रद्धा वाढल्यानंतर, त्याचेविषयी प्रेम उत्पन्न झाल्यावर त्या जीवास काळाचें भय वाटत नाही. जे भागवताचा आश्रय घेतात ते निर्भय होतात.

लोक मृत्यूला अमंगल समजतात. परंतु मृत्यू अमंगल नाही. मृत्यू अर्थात काळ भगवंताचा सेवक आहे, आणि म्हणून मंगलही आहे. भगवंताला असें वाटू लागते कीं, माझा बालक आता योग्य झालेला आहे आणि म्हणून ते मृत्यूला आज्ञा करतात की, त्या जीवाला पकडून घेऊन या. ज्याच्या मनांत पाप करण्याचा विचारही येत नाही त्याचा मृत्यू मंगलमय होतो. मनुष्य आपल्या जीवनांत मृत्यूचे खरे भय बाळगत नाही आणि यामुळेंच त्याचे आयुष्यही बिघडते आणि मरण देखील. अंतकाळीं मनुष्य जो घाबरतो तो काळाच्या भयाने नसून आपण केलेल्या पापांच्या स्मरणाने होय. पाप करताना मनुष्यास भय वाटत नाही. जेव्हा पापाची शिक्षा भोगण्याची वेळ येते तेव्हा मात्र भीती वाटू लागते. व्यवहारांत माणसे एकमेकांचे भय बाळगतात. मुनीमास शेटजींचे भय असते, कारकुनास अधिकाऱ्यांचे, इत्यादी. परंतु मनुष्य एकही दिवस ईश्वराचे भय बाळगत नाहीं आणि याचमुळे तो दुःखी होत असतो.

भागवत मनुष्याला निर्भय करते. भागवताचा आश्रय घेतल्याने निर्भयता प्राप्त होते. मी आपल्या परमात्म्याचा– श्रीकृष्णाचा अंश आहे, मी ईश्वर आहे. कांही पैसे खिशांत आले म्हणजे माणसास हिम्मत येते. मग तुम्ही परमेश्वरास नेहमी हृदयीं धराल तर तुम्ही निर्भय व्हाल यांत काय आश्चर्य? भयाशिवाय श्रद्धा (प्रीति) बसत नाहीं. काळाचें भय बाळगा. काळाच्या–मृत्यूच्या भयाने प्रभूवर प्रेम जडते. काळाची, पापाची, धर्माची भीती ठेवा. मनुष्य जर नेहमी काळाचें भय बाळगील तर पाप होणार नाहीं. निर्भय व्हायचे असेल तर पाप करणें सोडून द्या. भागवतशास्त्र आपणास निर्भय बनविते. मनुष्यास अन्य कशाची भीती नसो, पण काळाची भीती त्यास असतेच असते. कामाचा नाश करून प्रेम आणि भक्तिमय जीवन जो जगतो, तो काळावर विजय मिळवितो. काळाला जो मारतो तो काळाचा मार खात नाहीं. कामाच्या–काळाच्या मारापासून सुटायचे असेल तर परमेश्वराची खूप भक्ति केली पाहिजे. ईश्वरभक्ति केल्याशिवाय कामक्रोधादि विकार जात नाहीत. परमेश्वरावर प्रेम कराल तर काळाचें भय राहणारच नाही. काळच तक्षक नागाचे स्वरूप आहे. काळ तक्षक कोणालाच सोडत नाहीं. जेव्हा जीवाचा जन्म होतो तेव्हाच मृत्यूची वेळ आणि मृत्यूचें कारण निश्चित केले जाते. काळ कोणावरही दया करीत नाही. म्हणून याच जन्मात काळावर विजय मिळवा.

पाप करताना मनुष्य जितका सावधान राहतो तितका पुण्य करताना राहात नाही. पाप प्रगट झालें तर जगांत अप्रतिष्ठा होईल अशा विचाराने तो एकाग्र चित्त होऊन पाप करतो. आणि याच कारणाने अंतकाळीं पापाचें स्मरण होते. याचमुळे अंतकाळीं जीव घाबरतो. त्याला आपण केलेली पापे प्रत्यक्ष दिसत असतात. त्याला वाटू लागते कीं, मरणाची तर मी कांहीच तयारी केली नाहीं. आता

माझे कसे होणार? मनुष्य इतर सर्व कार्याची तयारी करतो पण मरणाची कांहीच तयारी करीत नाहीं. ज्याप्रकारे लग्नाची तयारी करता त्याच प्रकारे स्वखुशीने हळूहळू मरणाची सुद्धा तयारी करा. मृत्यूबद्दल नेहमी सावध असा. मृत्यू-अर्थात गत जीवनाचा देवाजवळ हिशोब देण्याचा पवित्र दिवस. देव विचारील— 'मी तुला डोळे दिले होते. कान दिले होते. त्यांचा तूं काय उपयोग केलास? शरीर आणि मन दिले होते. त्यांचा तूं काय उपयोग केलास?' ह्या हिशोबांत कांही गडबड असली तर घाबरायला होईलच. अशा वेळी जीव देवाची प्रार्थना करतो की, "हे प्रभू, मी तर वेगवेगळ्या वह्या करून ठेवल्या आहेत परंतु तुम्ही मला सांभाळा." साध्या इन्कमटॅक्सचा हिशोब द्यायचा असला तरी घाबरायला होते. एका वर्षाचा हिशोब देताना एवढी घाबरगुंडी होते, तर मग सगळ्या जीवनाचा हिशोब देतेवेळीं काय दशा होत असेल! देवाने जे आम्हाला दिले आहे त्याचा हिशोब देवाकडे द्यावाच लागेल.

आपले मरण जर उज्ज्वल करायचे असेल तर प्रत्येक क्षणी जागृत रहा. डोळ्याचा सदुपयोग कराल, धनाचा सदुपयोग कराल तर मृत्यू उज्ज्वल होईल. प्रत्येक क्षणीं जो ईश्वराचें स्मरण करतो त्याचा मृत्यू समाधानात होतो. भागवत, काय केल्याने मृत्यू समाधानात होईल ते सांगत असते. दररोज स्मशानांत जाण्याची आवश्यकता नाहीं, परंतु स्मशानाचें स्मरण रोज करण्याची आवश्यकता आहे. श्रीशंकर स्मशानांत विराजमान असतात. ते ज्ञानाचे देव असल्यामुळे स्मशानांत काम करतात, राहतात. स्मशान तर ज्ञानभूमी आहे. स्मशानांत समभाव जागृत होतो म्हणून ज्ञान प्रगट होते. म्हणूनच स्मशानास ज्ञानभूमी म्हणतात. जिथे समभाव जागृत होतो त्याच स्थानास स्मशान म्हणतात. समभाव म्हणजे विषमभावाचा अभाव. समभावच ईश्वरभाव आहे. माणसाने सर्वांशी समभाव ठेवूनच व्यवहार केले तर त्याचे मरण उज्ज्वल होते. सर्वांमध्ये (समभाव) ईश्वरभावाची जागृति झाली तर जीव दीन होईल. परमेश्वराला प्रसन्न करण्याचें साधन देखील दीनभावच आहे. मानवाला अमर व्हायचे आहे. श्रीमद्भागवताची कथा अमर आहे. अमरकथेचा जो आश्रय घेतो तो अमर होतो. राजा परीक्षित आणि शुकदेव अमर आहेत. भागवताची कथा आपणास अमर बनविते आणि भक्तिरसाचे दान करते. भक्तीच्या योगेच मीराबाई द्वारकाधीशांत आणि गौरांग प्रभू जगदीशांत सदेह सामावून गेले आणि अमर झाले. भागवताची कथा ऐकाल तर अनायासेच समाधी लागेल. योग आणि तपाशिवाय परमेश्वराची प्राप्ती करून घेण्याचे साधन जर कोणते असेल तर ते भागवतशास्त्र होय.

### ६. श्रीमद्भागवताच्या महिम्याचे वर्णन:

भागवतांत वर्णिलेले भगवंत इतके सरळ आहेत की ते सर्वांशीच बोलायला तयार असतात. सामान्यतः प्रभू कोणा अधिकाऱ्याशीच बोलतात. भागवत मनुष्यास निःसंदेह करते. या कथेंत सर्वांचाच समावेश होतो. बुद्धीचा परिपाक, ज्ञानाचा परिपाक, जीवनाचा परिपाक इत्यादी झाल्यावर व्यासांनी या ग्रंथाची रचना केली आहे. भगवन्नामस्मरण करीत मोठ्या प्रेमाने या कथेचे श्रवण करावे. तुम्ही निःसंदेह होऊन जाल. भागवत नारायणस्वरूप आहे. परिपूर्ण आहे. याच्या श्रवणाने आस्तिकाला मार्गदर्शन होईल आणि नास्तिक असेल तो आस्तिक होईल. शुकदेवांसारख्या आत्माराम मुनींनी सर्वस्व सोडले परंतु त्यांनाही या कथेचा मोह आवरता आला नाहीं. आत्माराम कोटीचे महात्मा सुद्धा या कृष्णकथेंत रंगून गेलेले आहेत, वेडे झालेले आहेत. सिद्ध, आस्तिक, नास्तिक पामर प्रत्येकासच ही कथा जीवनदान करीत आहे. व्यवहाराचें ज्ञानही भागवतांत आहे. भागवतांत ज्ञानयोग, कर्मयोग, समाजधर्म, स्त्रीधर्म, आपद्धर्म, राजनीति इत्यादींचे ज्ञान भरपूर भरलेले आहे. हे एक असें शास्त्र आहे की, ज्याचे श्रवण

आणि मनन केल्यानंतर जाणावयाचे असे कांही शिल्लकच राहत नाहीं. साधकांस साधनमार्गांत जे जे (जसेकसे) संशय येत असतात त्या सर्वांचा विचार करूनच भगवान व्यासांनी या कथेची रचना केली आहे. श्री व्यास असे समजतात कीं जे कांही त्यांच्या भागवतांत नसेल, ते जगांतल्या इतर कोणत्याही ग्रंथांत नसेल. जे भागवतांत आहे तेच इतर ग्रंथांतही सापडेल. – **'यदिहास्ति तदन्यत्र, यन्नेहास्ति न कुत्रचित्'** भागवतशास्त्र हे परिपूर्ण नारायणाचें स्वरूप आहे. हे अतिशय दिव्य आहे.

व्यासांच्या आश्रमांत गणपति प्रगट झाले. व्यासांनी म्हटले, मला भागवताची रचना करायची आहे, पण ते कोण लिहील? गणपति म्हणाले, 'फार छान! मी लिहायला तयार आहे. पण मी एक क्षणभर सुद्धा स्वस्थ बसणार नाही. श्रीगणपतीचे वाहन तर उंदीर आहे. उंदीर म्हणजे उद्योग. जो उद्योगावर बसतो, त्याच्या सिद्धि आणि बुद्धि दासी बनतात. सतत (निरंतर) उद्योग कराल तर ऋद्धि व सिद्धि तुमच्या दासी होतील. ईश्वरचिंतनाशिवाय एक क्षणही स्वस्थ राहू नका. प्रत्येक कार्याच्या प्रारंभी गणपतीची पूजा केली जात असते. गणपति विघ्नहर्ता आहे. गणपतीची पूजा करण्याचा अर्थ आहे जितेन्द्रिय होणे. गणपति म्हणतात मी रिकामा बसत नाही. जो नेहमी कार्यमग्न असतो त्याचे अमंगल होत नाही. श्रीगणपति झाले आहेत लेखक आणि व्यास झाले आहेत वक्ता. श्रीगणपति म्हणाले, मी एक क्षणभर रिकामा बसणार नाही. तुम्हाला चोवीस तास कथा सांगावी लागेल. तेव्हां व्यास म्हणाले, मी जे सांगीन ते योग्य आहे किंवा अयोग्य आहे याचा प्रथम विचार करून मग विचारपूर्वक लिहावे. शंभर श्लोक झाल्यावर श्री व्यास असा एक कूट श्लोक सांगून टाकीत की ज्यामुळे गणपतीला विचार करायला वेळ लागत असे आणि तेवढ्यांत व्यास आपली दुसरी कामें पूर्ण करून घेत.

देवांना अपरोक्षता फार प्रिय आहे. लिहिलेले आहे कीं चित्रकेतु राजाच्या एक कोटी राण्या होत्या. संसाराचे चित्र जो मनांत ठेवतो तोच चित्रकेतु होय. संसाराची सर्व चित्रे ज्याच्या मनांत बसलेली असतात तोच चित्रकेतू आहे. अशा रीतीने मन जेव्हां सांसारिक विषयांशी तन्मय झालेले असते तेव्हाच ते मन एक कोटी राण्यांशी रममाण होऊ शकते. चित्रकेतूच्या एक कोटी राण्या होत्या ह्याचा अर्थ हा आहे. भागवतांत असे अनेक प्रसंग (स्थळें) येतात कीं त्या त्या ठिकाणच्या लिखाणाचा लक्ष्यार्थ काय आहे यावर श्रोता आणि वक्त्यांनी गंभीरपणे विचार करायला पाहिजे. या बाबतींत आम्हीही विचार करावा म्हणून श्री व्यासांनी अतिशयोक्ति करूनही लिहिलेले आहे. उदाहरणार्थ, हिरण्याक्षाच्या मुकुटाचा अग्रभाग स्वर्गाला स्पर्श करीत होता, आणि त्याच्या शरीरानें सर्व दिशा आच्छादित होऊन जात. ह्यांत लोभ दिवसेंदिवस वाढतच जात असतो हे तत्त्व सांगण्याचा त्यांचा उद्देश होता.

**७. आनंदधाम श्रीशंकरांचा शुकदेवांच्या रूपांत अवतार :**

सत्कर्मांत विघ्ने येतात म्हणून भागवत कथेचा सासाहिक क्रम सांगितलेला आहे. मुळात सूत आणि शौनकांची कथा एकहजार दिवस चालली होती. विघ्न येऊ नये म्हणून श्री व्यास सर्वप्रथम 'श्रीगणेशाय नमः' म्हणून गणपतीला वंदन करतात, त्यानंतर सरस्वतीला वंदन करतात. सरस्वतीच्या कृपेने मनुष्यास समज येते. नंतर सद्‌गुरूचे वंदन करतात आणि त्यानंतर भागवताचे प्रधान देव श्रीकृष्णांना वंदन करतात. व्यासांनी वृद्धावस्थेंत या ग्रंथाची रचना केली आहे म्हणून ते स्वतः या ग्रंथाचा प्रचार करू शकणार नव्हते. वृद्धावस्थेंत या ग्रंथाची रचना केल्यानंतर त्यांना काळजी लागली – 'मी भागवत ग्रंथाची रचना तर केली, पण याचा प्रचार कोण करील? हे शास्त्र मी आता कोणाला देऊ? भागवतशास्त्र मी मानवसमाजाच्या कल्याणार्थ रचले आहे. भागवताची रचना झाल्यानंतर मी लेखणी ठेवून दिली

आहे. आतापावेतो मी खूप बोललो, खूप लिहिले. आता मात्र मी ईश्वरचरणीं आपलें अनुसंधान करीन. माझा जीव जो प्रभूंपासून विलग होऊन गेला होता तो श्रीकृष्णांच्या चरणी विलीन व्हावा याकरितां मी भागवतशास्त्र बनविले आहे. भागवत हे प्रेमाचे शास्त्र आहे. या प्रेमशास्त्राचा प्रचार तर तोच करू शकतो की जो अतिशय विरक्त आहे. श्रीकृष्णास सोडून इतरांबरोबर प्रेम करणारे या कथासंवादाचे अधिकारी नाहीत. असे कोण मिळेल? संसारसुखाचा उपभोग घेतल्यानंतर तर अनेकांना वैराग्य येत असते. परंतु जन्मापासूनच ज्याने वैराग्य धारण केले आहे असे कोण मिळू शकेल?' कोणा तरी योग्य पुत्रास हे ज्ञान द्यावे, जेणेकरून तो जगताचे कल्याण करील." असा विचार आल्यावर श्री व्यासांना वृद्धावस्थेंतच पुत्रप्राप्तीची इच्छा झाली. भगवान शंकर मूर्तिमंत वैराग्य स्वरूपच आहेत. स्वतः शंकरच जर पुत्ररूपाने माझ्या घरीं आले तरच हे कार्य होऊ शकेल. रुद्राचे जन्म झाले आहेत पण महारुद्रास जन्म नाही. भगवान शिव परब्रह्म आहेत. त्यांना जन्मच नाही. आता स्वतः शंकरच जर जन्म धारण करतील तरच भागवताचा प्रचार होईल. भागवताचा प्रचार स्वतः शंकरच करू शकतील, कारण त्यांचे ठायींच संपूर्ण वैराग्य आहे. जन्मतःच ज्याचे अंगीं वैराग्य असेल तोच भागवताचा प्रचार करू शकतो.

व्यासांनी शंकरांची आराधना केली. शंकर प्रसन्न झाले. त्यांचेपाशी व्यासांनी मागितले की, "समाधींत ज्या आनंदात आपण स्थित असता तोच आनंद समस्त जगाला देण्यासाठी आपण माझ्या घरी पुत्ररूपाने अवतीर्ण व्हावे." भगवान शंकरांना तर या संसारांत येणे आवडत नाही. संसारांत आल्यावर माया गळ्यांत पडत असते. कोळशाच्या खाणींत गेल्यावर हात-पाय काळे होतातच. ते काळे झाल्याशिवाय राहात नाहीत. व्यास म्हणाले, "भगवन्, आपल्याला तर संसारांत येण्याची तशी कांही आवश्यकता नाहीं, परंतु अनंत जीवांचे कल्याण व्हावे म्हणून आपण कृपा करा आणि या. आपणाला माया कशी प्रभावित करू शकेल?" शिवांनी विचार केला. समाधीमध्ये मी ज्या आनंदाचा अनुभव मिळवतो तसा आनंद मी जगाला दिला नाही, तर जग मला स्वार्थी म्हणेल. समाधीच्या आनंदाचें दान मला जगाला केलेच पाहिजे. असा विचार करून श्रीशंकर अवतार घेण्यासाठी तयार झाले. श्री शुकदेव श्री भगवान शिवाचे अवतार होते आणि म्हणून ते जन्मतःच पूर्ण निर्विकारी होते. जो जन्मापासूनच विरक्त होतो तोच शंभर टक्के विरागी म्हटला जातो.

ज्ञानी पुरुष मायेशी संबंध (संग) ठेवीत नाहीत. ज्ञानी पुरुष सदैव मायेपासून दूर राहण्याचा प्रयत्न करतात. वैष्णव भक्तास मायेत देखील ईश्वराचा अनुभव होतो. श्री शुकदेवांच्या जन्माच्या कथा इतरही पुराणांत आहेत.

श्री शुकदेव सोळा वर्षेपर्यंत आईच्या पोटांत राहिले होते. मातेच्या पोटांत सोळा वर्षेपर्यंत त्यांनी प्रभूचें ध्यान केले आहे. श्री व्यासांनी विचारले, "तुम्ही बाहेर का येत नाही?" श्री शुकदेवांनी उत्तर दिले, "संसाराच्या भयामुळे मी बाहेर येत नाही. मला मायेचे फार भय वाटते." यावर श्री द्वारकानाथांनी आश्वासन दिले कीं, "माझी माया तुला ग्रस्त करूं शकणार नाही." तेव्हां कुठे श्री शुकदेव मातेच्या गर्भांतून बाहेर आले. श्री शुकदेवांची ब्रह्मनिष्ठा, वैराग्य, अलौकिक प्रेमलक्षणा भक्ति इत्यादी पाहून श्री व्यास देखील श्री शुकदेवांना मान देतात. जन्म होताच शुकदेव वनांत जायला निघाले. माता अरणीदेवींनी प्रार्थना केली कीं, "माझा मुलगा निर्विकार ब्रह्मस्वरूप आहे. हा माझ्यापासून दूर न जावो, त्याला थांबवा, त्याला थांबवा." व्यास तिला समजावतात, "जो आपणास अत्यंत प्रिय असेल, तोच भगवंताला अर्पण करायला पाहिजे. तो तर जगताचें कल्याण करायला जात आहे." त्यानंतर व्यास स्वतःच

विव्हल झाले. विचार करू लागले, आता हा चालला आहे आणि परतून तर येणार नाही. व्यास महाज्ञानी असले तरी पुत्राच्या मागे धावले. व्यास नारायण श्री शुकदेवांना म्हणाले, 'बाळा, परत ये रे! मला सोडून जाऊ नकोस. मी तुला विवाह करण्यासाठी आग्रह करणार नाही.'' श्री शुकदेव तर श्रीकृष्णाचे ध्यान करता करता इतर सर्व भान विसरले आहेत. त्या उन्मत्त अवस्थेंत – भान विसरल्या अवस्थेंत, कोण कोणाचा पिता? कोण माता? लौकिक संबंधाचे विस्मरण होते तेव्हांच ईशसंबंध होत असतो. जोपर्यंत लौकिक संबंधाचे स्मरण असते तोपर्यंत ईश्वराविषयीं आसक्ति (भक्ति) उपजत नाही.

सर्वव्यापक होऊन गेलेले शुकदेव वृक्षांकडून उत्तर देत आहेत, 'हे मुनिराज, आपणांस तर पुत्रवियोगाने दुःख होत आहे, पण आम्हांला जो दगड मारतो त्याला आम्ही फळे देतो.' वृक्षाची मुले म्हणजे त्यांची फळें. दगड मारणाऱ्यालाही जो फळ देईल तोच वैष्णव. 'तर मग आपण पुत्रवियोगाने कशाला रडत आहात? आपला मुलगा तर जगत् कल्याणासाठी चालला आहे.' व्यास तरीही व्यग्रावस्थेत आहेत हे पाहून शुकदेव म्हणाले, 'हा जीव तर अनेक वेळा पुत्र झाला आहे व अनेक वेळा पिता.' वासनांमध्ये बांधला गेलेला जीव अनेक वेळा पिता, पुत्र, स्त्री बनत असतो, पुष्कळ वेळा पूर्वजन्मांतील शत्रू देखील घरांत येत असतात. आपल्या वासनांमुळे आजोबाच नातू होऊन येतात. वासनाच नेहमी पुनर्जन्माचे कारण होत असते. 'तात, माझे आणि तुमचे अनेक जन्म झालेले आहेत. पूर्वजन्म लक्षात राहात नाहीत हेच चांगले आहे. तात, ना तुम्ही माझे पिता, ना मी तुमचा पुत्र. तुमचा आणि माझा खरा तर नारायणच पिता आहे. वस्तुतः जीवाचा खरा संबंध तर ईश्वराशीच आहे. तात, माझा नाद सोडा. भगवंताचा नाद धरा. तुम्ही आपले जीवन भगवंताचे कारणी लावा. मला जो आनंद मिळाला आहे तो मी जगताला द्यायला जात आहे.' नंतर श्री शुकदेव नर्मदेच्या तटावर आले. पाठोपाठ श्री व्यासही आले. शुकदेव श्री व्यासांना म्हणाले, 'नर्मदेच्या या तटाला मी बसतो आणि समोरच्या तटाला तुम्ही विराजमान व्हा. पिताजी, आता माझा नाद सोडून द्या. माझे ध्यान करू नका. पाहिजे तर तुम्ही मला दुरून पाहत रहा, पण ध्यान तर त्या परमात्म्याचेच करा.'

जे परमात्म्याच्या मागे लागतात ते ज्ञानी असतात. पैशाच्या मागे लागू नका, परमेश्वराच्या मागे लागा. भागवताची कथा ऐकल्यानंतर तुम्हीही भगवंताचे पाठी लागाल; तेव्हांच कथा श्रवणाचें सार्थक होईल. हा नर जर नारायणाच्या मागे लागेल तर कृतार्थ होईल. व्यासमुनी आपल्या पत्नीला समजावीत आहेत कीं, 'जर शुकदेव तुला अतिप्रिय आहेत तर त्याला अंतर्यामीला अर्पण कर. जो आपल्याला अत्यंत प्रिय वाटतो तो जर प्रभूला अर्पण केला तर प्रभूला आपण सुद्धा प्रिय होऊ.

अशा सर्वभूत हृदयस्वरूप श्री शुकदेवांचे चरणी मी पुनःपुन्हा नमस्कार करतो, असें म्हणून सूतजींनी श्री शुकदेवांस नमस्कार करून या कथेचा आरंभ केला आहे.

एके वेळी नैमिषारण्याच्या क्षेत्रांत शौनकांनी सूतांना म्हटले कीं, 'आजपर्यंत कथा तर पुष्कळ ऐकल्या आहेत. आता कथेचे सारतत्त्व ऐकण्याची इच्छा आहे, आम्हाला आता कथा ऐकायची नाही. सर्व कथांचे सारभूत जे असेल तेच ऐकायचे आहे. अशी कथा सांगा, जेणेंकरून आमची भगवान श्रीकृष्णांचे चरणी भक्ति दृढ होईल. आम्हाला श्रीकृष्णांची प्राप्ती होईल. जसे लोणी हे सगळ्याचे सार (तत्त्व) आहे तसे सगळ्याचे सार (तत्त्व) श्रीकृष्ण भगवान आहेत.

कृष्णाला लोणी फार प्रिय आहे. नंदलालाला लोणी प्रिय आहे. लोणी सगळ्याचे सार आणि परमात्मा सारभोगी आहे. आतापर्यंत पुष्कळ ग्रंथ वाचले आहेत. ज्याला भगवंत प्राप्त करून घ्यायचे आहेत अशा साधकाला आज्ञा आहे कीं, त्याने फार ग्रंथ वाचू नयेत. अनेक ग्रंथ वाचून बुद्धीमध्यें

विक्षेप निर्माण होतो. आमचे भगवान श्रीबालकृष्ण सारभोगी आहेत, म्हणून वैष्णवभक्त सारभोगी असतात आणि म्हणूनच सर्व कथांचे सारतत्त्व ऐकण्याची इच्छा झालेली आहे. जीव प्रकृतीचे उपभोग सोडून जर श्रीकृष्णाकडे आपलें मन लावील तर जीव देखील शिव होईल.

भागवत नवनीत आहे. दुसरी शास्त्रें दह्या-दुधासारखी आहेत. सगळ्याच शास्त्रांत साररूप ही श्रीकृष्णकथा आहे. शौनक म्हणतात, 'ज्ञान आणि वैराग्याबरोबरच भक्ति वाढेल अशी सारभूत कथा ऐकवा. ज्ञान वाढेल, भक्ति वाढेल असें सारतत्त्व सांगा, जेणेंकरून आम्हास भगवंताचें प्रत्यक्ष दर्शन होईल. ज्ञानवैराग्याबरोबरच भक्तीची वाढ होण्यास्तव ही कथा आहे. कथा रडण्यासाठी असते. महान् भक्त, महान् पुरुष यांची चरित्रें वाचून आपणांला जाणीव होते, 'अरे, मी आपल्या आत्म्याच्या उद्धारार्थ तर कांहीच केलेले नाही.'

कथा ऐकल्यानंतर जर आपल्या पापाविषयी आपणास पश्चात्ताप झाला आणि प्रभूविषयी आपल्या हृदयांत प्रेम जागृत झाले तरच कथा श्रवणाचे सार्थक होते. सांसारिक विषयांविषयी जर वैराग्य न आले आणि प्रभुप्रेमाची जागृति न झाली तर अशी कथा ही कथाच नव्हे. ब्रह्मदेवांनी नारदांना आज्ञापिले, "कथा अशी कर जेणेंकरून श्रवण करणाऱ्यांच्या हृदयांत माझ्या प्रभुविषयीं भक्ति जागृत होईल. कथा मनुष्याचें जीवन सुधारते. जीवनांत परिवर्तन घडवून आणते. कथा मनुष्याच्या जीवनांत क्रांति घडवून आणते. कथा ऐकूनही जर जीवनांत कांहीं परिवर्तन झाले नाही तर समजा की तुम्ही कथा ऐकलीच नाही. त्याचकरिता शौनक मुनींनी विनंति केली कीं, "माझें ज्ञान वाढेल, माझी भक्ति वाढेल अशी कथा करा". नुसतीच भक्ति वाढो असें म्हटले नाही. भक्ति, ज्ञान आणि वैराग्यासह वाढो असें म्हटले आहे.

शिऱ्यांत लौकिक दृष्टीने गव्हाची किंमत कांही विशेष नाही, परंतु गव्हाच्या रव्याशिवाय शिरा बनू शकत नाही. तात्त्विकदृष्ट्या विचार केला तर गव्हाच्या रव्याची किंमत तुपाइतकीच आहे. शिरा करण्यासाठी तूप, गूळ व गव्हाचा रवा यांची आवश्यकता एकसारखीच आहे. याच दृष्टीनें ज्ञान, वैराग्य आणि भक्ति या तिघांचीही गरज एकसारखीच आहे. आणि जीवनांत तिघांचीही आवश्यकता आहे. सोळा आणे ज्ञान झाले तरच जीवाचा जीवभाव जातो. ज्याच्या ठायीं ज्ञान, वैराग्य आणि भक्ति परिपूर्ण असते तोच उत्तम वक्ता असतो.

अनेक ऋषिमुनि तिथे गंगेच्या काठी बसलेले होते. पण कथा सांगायला कोणीच तयार झाले नाही. तेव्हां भगवंतांनी शुकदेवांना तेथे जाण्याची प्रेरणा दिली. शुकदेवांचे ठायीं ज्ञान, वैराग्य आणि भक्ति परिपूर्ण आहे.

भागवतशास्त्र हे प्रेमाचे शास्त्र आहे. प्रेम हा पांचवा पुरुषार्थ आहे. श्रीकृष्णाच्या प्रेमाने जर देहभान हरपले तर समजा की प्रेम सिद्ध झाले. परमात्मा प्रेमालाच आपले स्वरूप म्हणतात.

ज्ञानमार्गांत प्राप्ताचीच प्राप्ति आहे. ज्ञानमार्गांत तर जे प्राप्त आहे त्याचाच अनुभव घ्यायचा असतो. भक्तिमार्गांत भक्तीच्या साहाय्याने भेदाचा नाश करायचा आहे. भक्तिमार्गांत भेदाचा विनाश आहे. ज्ञानमार्गांत भेदाचा निषेध आहे. ज्ञान आणि भक्ति दोन्ही मार्गांचे लक्ष्य एकच आहे.

सूत म्हणतात– 'तुम्ही सर्व ज्ञानीच आहात. पण लोकांवर उपकार करण्यासाठी तुम्ही प्रश्न विचारीत आहात. तेव्हां कृपा करून सावध चित्ताने कथा श्रवण करा. पूर्वजन्मीच्या पुण्याचा उदय होतो, तेव्हांच या पवित्र कथा श्रवणाचा योग प्राप्त होतो."



कलियुगांतील जीवांना काळरूपी सर्पाच्या तोंडातून सोडविण्यासाठी श्री शुकदेवांनी भागवताची

कथा सांगितली आहे. ज्या वेळी श्री शुकदेव परीक्षित राजाला ही कथा सांगत होते, त्यावेळी अमृत घेऊन स्वर्गातले देवगण तेथे आले. त्यांनी म्हटले, ' स्वर्गांतील हें अमृत आम्ही राजाला देतो आणि त्या मोबदल्यात हे कथामृत आम्हाला द्या. ' शुकदेवांनी परीक्षिताला विचारले, " हे कथामृत प्यायचे आहे कीं ते स्वर्गांतील अमृत ? " तेव्हां परीक्षिताने श्री शुकदेवांना विचारले, " स्वर्गांतील अमृत पिण्यापासून काय लाभ होतो ?" श्री शुक म्हणाले, " स्वर्गांतील अमृत पिण्यानें स्वर्गांतील सुखे मिळतात. परंतु स्वर्गाचे अमृत दुःखमिश्रित आहे. स्वर्गांतील अमृत पिण्यानें पुण्याचा क्षय होतो, परंतु पापाचा क्षय होत नाही. कथामृतपानाने पापांचा नाश होतो. कथामृताने भोगवासनेचा नाश होतो. म्हणून स्वर्गातील अमृतापेक्षा हे कथामृत श्रेष्ठ आहे. "

सनत्कुमार ब्रह्मलोकांत राहत होते. एकदा या कथेचा आनंद घेण्याकरिता तेही भारतांत आले. यावरून असें वाटतें कीं, ब्रह्मलोकीं देखील कथा श्रवणाच्या तोडीचा कांहींच आनंद नाहीं. तेव्हां परीक्षित राजा म्हणाला, " भगवान्, मला हे स्वर्गातील अमृत प्यायचे नाही. मी तर या कथामृताचेंच पान करीन. "

सातच दिवसांत ज्ञान आणि वैराग्य जागृत करण्यासाठी ही कथा आहे. ज्ञान आणि वैराग्य आपणांतच आहेत परंतु ते झोपलेले आहेत. त्यांना जागृत करायचे आहे. पुढे कथेंत सांगितले जाईल कीं, ज्ञान-वैराग्यांना मूर्च्छा आलेली आहे. सात दिवसांतच या ज्ञान आणि वैराग्यांना जागृत करून भक्तिरस उत्पन्न करायचा आहे. याचसाठी ही कथा आहे. असा आणखी कोणताच ग्रंथ नाही कीं जो सात दिवसांत मुक्ति देऊ शकेल.

सूत म्हणतात कीं, सातच दिवसांत परीक्षितास ज्या कथेनें मुक्ति मिळाली होती, तीच कथा मी तुम्हाला सांगत आहे. सातच दिवसांत परीक्षितांना मुक्ति मिळाली. त्यांच्यासाठी हे पूर्वीच निश्चित होते कीं बरोबर सातव्या दिवशीं त्यांचा काळ येणार आहे. परंतु आम्ही तर काळाला विसरून जातो !

**८. श्रोता आणि वक्ता अधिकारी असले पाहिजेत :**

वक्ता श्री. शुकदेवांसारखा अवधूत असेल आणि श्रोता परीक्षितासारखा अधिकारी असेल तर सातच दिवसांत मुक्ति मिळेल. वक्ता आणि श्रोता दोघेही अधिकारी असावयास पाहिजेत. विजेचा प्रवाह आणि बल्ब दोन्हीही ठीक असले पाहिजेत. वक्ता आणि श्रोता दोन्हीही अधिकारी असले तरच ही कथा मुक्तिदायक होते. कथा श्रवण केल्यावर परीक्षिताला न्यायला विमान आले, आणि त्यांना सद्गति मिळाली. परीक्षित महाराज विमानांत बसून श्री परमात्म्याच्या धामीं गेले. आजकाल लोक कथा तर पुष्कळ ऐकतात पण त्यांना न्यायला विमान कां येत नाही ? याचे कारण असें की, वक्ता आणि श्रोता दोघेही अधिकारी नसतात. मनुष्य जर वासनेंत अडकलेला असेल तर विमान कसे येईल ? आणि जर विमान आले तर त्यात कोणी बसणार नाही. कदाचित घेऊन जाण्यासाठी स्वर्गांतून विमान आले तरी माणसाची जाण्याची तयारी तरी कोठे असते ? आपण सर्व विकार आणि वासनांनी बांधले गेलेलो आहोत. मनुष्य पत्नी, पुत्र, धन, घर इत्यादींत अडकलेला आहे. जोपर्यंत ही आसक्ति सुटायची नाही तोपर्यंत मुक्ति नाही. ज्याचे मन परमात्मरंगी रंगून गेले आहे, त्याचेसाठी तर तो जेथे बसला असेल तेथेच त्याला मुक्ति आहे. अशांसाठी विमान आले काय आणि न आले काय, सारखेच ! ईश्वराशी तन्मयता झाली तर त्यानेच आनंद मिळतो. त्यापेक्षा अधिक आनंद तर वैकुंठातही नाही.



भक्त तुकारामांना न्यायला विमान आले तेव्हां तुकाराम आपल्या पत्नीला म्हणाले, ' या आयुष्यांत

मी तुला कांही सुख दिले नाही, परंतु देवाने आपल्याकरिता विमान पाठविले आहे; तर चल, तुला विमानांत बसवून वैकुंठधामांत घेऊन जातो. ये, माझ्याबरोबर चल.'' परंतु पत्नीने ऐकलें नाही. ती म्हणाली, ''महाराज, तुम्हाला जायचे असेल तर जा, मला हे जग सोडून जायचे नाही.'' अर्थात ती गेली नाही.

संसाराचा मोह सुटणें फार कठीण आहे. जोपर्यंत वासनेवर अंकुश लागत नाही, तोपर्यंत शांति मिळू शकत नाही. कथेंतील एखादेच तत्त्व जर मनांत बसेल तर जीवन मधुर होईल. वासना वाढतात, भोग वाढतात म्हणूनच संसार कटु विषाप्रमाणे होतो. जोपर्यंत वासना क्षीण होणार नाहीत तोपर्यंत मुक्ति मिळू शकत नाही. पूर्वजन्मीचे शरीर तर निघून गेले आहे, पण पूर्वजन्मीचें मन गेलेले नाही. लोक आपल्या शरीराची, कपड्यांची खूपच काळजी घेतात, परंतु मेल्यानंतरही जे बरोबर जाते त्या मनाची कांहीच काळजी घेत नाहीत. मेल्यानंतरही जे बरोबर जायचे आहे त्याची विशेष काळजी वाहा. पैसा, शरीर इत्यादींची काळजी करू नका. मेल्यानंतर जी अंगठी तुमच्या बोटांत असेल ती देखील लोक काढून घेतील.

आचारविचाराशिवाय मनाची शुद्धि होत नाही. जोपर्यंत मनाची शुद्धि होणार नाही तोपर्यंत भक्ति वाढीस लागणार नाही. ज्ञान आणि वैराग्य दृढ करण्यासाठी ही भागवताची कथा आहे.

विवेकाने जोपर्यंत संसाराचा व्याप आटोपणार नाही, तोपर्यंत संसार संपणार नाही, त्याचा अंत होणार नाही. जीवनांत (वागणुकीने) जोपर्यंत संयम आणि सदाचार येणार नाही तोपर्यंत पुस्तकांपासून मिळविलेले ज्ञान कोणलाही उपयोगी पडणार नाही. केवळ ज्ञान काय कामाचे?

एका गृहस्थाच्या पुत्राचा मृत्यू झाला, गृहस्थ रडू लागला. त्याच्या घरी कोणी ज्ञानी साधू आला आणि उपदेश करू लागला, ''आत्मा अमर आहे, मरण तर शरीराचे होते. म्हणून तुझ्या पुत्राच्या मृत्यूचा शोक करणें उचित नाहीं.'' कांही दिवसांनी त्या साधूची बकरी मेली. तेव्हां तो रडू लागला. साधूला रडताना पाहून त्या गृहस्थाने साधूला विचारले, ''महाराज, आपण तर मला उपदेश करीत होता कीं कोणाच्या मृत्यूचा शोक करू नये. मग तुम्ही स्वतःच कशाकरिता रडत आहांत?'' साधू म्हणाला, 'बालक तुमचे होते, पण बकरी माझी आहे, म्हणून मी रडतो आहे.'' असे 'परोपदेशे पांडित्यम्' काय कामाचे?

ज्ञानाचा अनुभव घ्या. मुक्त होण्यासाठी ज्ञानाचा उपयोग आहे. कथा चारित्र्याला वळण लावीत असते, जीवनांत बदल करून टाकते. कथा ऐकल्यावर जर जीवन बदलले नाही, तर समजावे कीं कथा नीट ऐकली नाहीं. कथा ऐकल्याने मुक्ति मिळते ही गोष्ट अगदी सत्य आहे.

दिवसांतून एकदोन वेळा तरी मृत्यूची आठवण करा. कदाचित आजच मला यमदूत नेण्यासाठी आले तर माझी काय दशा होईल? जर असा रोज विचार कराल तर पाप होणार नाही. मनुष्य मरणाचा विचार रोज करीत नाही पण जेवणाचा मात्र रोज विचार करतो.

या भागवतशास्त्राच्या महिम्याचें वर्णन दुसऱ्या अनेक पुराणांत केले आहे. परंतु नियम असा आहे कीं पद्मपुराणाच्या अंतर्गत असलेल्या माहात्म्याचे वर्णन करतात. भागवताच्या महिम्याचे आता वर्णन करीत आहोत. ह्या भागवत कथेच्या माहात्म्याचें वर्णन एकदा श्रीसनत्कुमारांनी नारदांना सांगितले होते. माहात्म्यांत असे लिहिले आहे कीं या कथेंत जो आनंद मिळतो तो ब्रह्मानंदापेक्षाही श्रेष्ठ आहे. योगी फक्त आपलाच उद्धार करतो. पण संत आपल्या सहवासांत आलेल्या सगळ्यांचाच उद्धार करतात. बद्रिकाश्रमांत सनत्कुमार आलेले आहेत. ज्यास लोक बद्रिकाश्रम म्हणतात तेच हे विशाला क्षेत्र आहे.

मोठमोठे ऋषि आणि देव ब्रह्मलोक सोडून विशाला क्षेत्रात ही कथा ऐकायला आले होते.

स्कंदपुराणांत गोष्ट आली आहे कीं, विशाल राजासाठी बद्रिनारायणाचे आगमन झालेले आहे. पुंडलिकासाठी विठ्ठलनाथ आले होते. ज्या ज्या भक्तांसाठी देवांनी इहलोकीं येणे केले ते ते धन्य होत. बद्रीनारायण तप-ध्यानाचा आदर्श जगापुढे ठेवतात. ते म्हणतात, 'मी ईश्वर आहे तरी तप करतो, ध्यान धरतो. तपश्चर्येशिवाय शांति मिळत नाही. जीव कठीण तपश्चर्या करू शकत नाही म्हणून भगवंत दृष्टान्त देतात. लहान मूल जेव्हां औषध घेत नाहीं, तेव्हां आई स्वतः औषध घेऊन दाखविते; जेणेकरून मुलाला समजावे कीं, औषध सुद्धा एक खाण्याची वस्तू आहे. तसें तर आईला औषध घेण्याची जरूर नसते पण मुलाला समजवण्यासाठी ती सुद्धा औषध घेऊन दाखविते.

श्री बद्रीनारायणाच्या मंदिरांत लक्ष्मीची मूर्ति मंदिराच्या बाहेर आहे. स्त्री आणि मूल यांचा सहवास तपश्चर्येत विघ्नरूप असतो. यांत स्त्रीची कांही निंदा नाही, परंतु कामाची निंदा आहे. कोणाकोणास बायको-मुलांचा त्याग करायचा नसतो. याकरिता म्हणावे लागते कीं, बायको-मुलांसह घरांतच राहून भगवंताचे भजन करा. ह्याचप्रमाणे तपस्विनी स्त्रीसाठी देखील पुरुषांचा सहवास त्याज्य आहे.

**९. बद्रिकाश्रमांत नारद आदि सनकादि ऋषींचे मिलन :**

विशालापुरींत जेथे सनत्कुमार राहात असत तेथे एक दिवस फिरता फिरता नारदमुनी येऊन पोहोचले. तेथे सनकादि ऋषींची नारदांशी भेट झाली. नारदांचे मुख उदास पाहून सनकादींनी त्यांना त्या उदासीनतेचे कारण विचारून पृच्छा केली कीं, 'आपण चिंतेत कां आहात? कुतश्चिंतातुरो?' आपण तर हरिदास आहांत! श्रीकृष्णाचा दास कधी उदास होत नाही. वैष्णव तर नेहमी प्रसन्न राहतो. जो चिंता करीत नाही तोच तर वैष्णव असतो. वैष्णव तर प्रभूंचें चिंतन करतो. तरी पण आपण प्रसन्न कां नाहीत?" नारद म्हणाले, "माझा देश दुःखी आहे. सत्य, तप, दया, दान राहिले नाही. मनुष्य बोलतो एक, त्याच्या मनांत निराळेच असते, आणि तो करतो ते आणखीच निराळे असते. आणखी एक सांगू? **उदरंभरिणो जीवाः।** जीव फक्त आपले पोट भरणारे आणि स्वार्थी झालेले आहेत. समाजांत कोणालाच सुख-शांति राहिली नाही. मी अनेक ठिकाणी भ्रमण केले आहे. तरीही मला शांति मिळाली नाही. आज सगळा देश दुःखी कां होत आहे? नारदांनी याची अनेक कारणें सांगितली आहेत. धर्म आणि ईश्वराबद्दल जोवर श्रद्धा वाटत नाही, तोवर देश सुखी होऊ शकत नाही. ज्याच्या जीवनांत धर्मास प्रमुख स्थान नाही, त्यास जीवनांत कधीच शांति मिळणार नाही. धर्म आणि ईश्वराला विसरणारा मानव कधीच सुखी होत नाही. जगांत आता धर्म राहिलाच आहे कोठे?

दुःखाने नारदांनी हे सांगितले कीं, आता जगांत सत्य राहिलेले नाही. **सत्यं नास्ति।** जगांत असत्य फार वाढले आहे. असत्यासारखे दुसरे पाप नाही. उपनिषदांत सांगितले आहे कीं, असत्य बोलणाऱ्यास केवळ पापच लागते असे नाही, तर त्याच्या पुण्याचाही क्षय होतो. जर खरा आनंद मिळवायची इच्छा असेल तर सत्यावर निष्ठा असू द्या. असत्य बोलणारी व्यक्ति कधीच सुखी झालेली नाही आणि कधी होणारही नाही. मितभाषी व्हाल तर सत्यभाषी होऊ शकाल. जगांत कोठेच पवित्रता आढळून येत नाही. शरीर आणि कपडे ज्याप्रमाणे स्वच्छ, नीटनेटके ठेवता त्याप्रमाणे मनासही पवित्र ठेवले पाहिजे. मनुष्य कपड्यांना स्वच्छ ठेवतो, पण मन स्वच्छ ठेवीत नाही. मनाला अगदी स्वच्छ ठेवा. कारण मन आपल्याबरोबरच जाणार आहे. जगांत कोठेही नीति निदर्शनास येत नाही. पुष्कळसे नीति-अनीतीने संपत्ति जमवीत असतात आणि कुमार्गाने खर्चही करतात. कुटुंबसुखाच्या पलीकडेही

कांही सुख आहे कीं नाही याचा विचारही मनुष्य करीत नाही. तो तर याच विचारांत असतो कीं, या धनसंपत्तीच्या योगे मी आपल्या कुटुंबास सुखी करीन. आपल्या इंद्रियांचा तो इतका दास होतो कीं त्याला कोणता पवित्र विचारच सुचत नाही. शरीर आणि इंद्रियांच्या सुखामध्यें तो इतका अडकलेला असतो कीं, तो शांत चित्ताने विचार देखील करू शकत नाही कीं खरा आणि श्रेष्ठ आनंद कोणता आहे आणि तो कशा रीतीने मिळविता येईल. जीवनांत जोपर्यंत एखादे पवित्र लक्ष्य निश्चित होणार नाही, तोपर्यंत पाप थांबणार नाहीं. जो लक्ष्य लक्षांत ठेवतो तोच पापापासून वाचू शकतो.

मनुष्याला आपल्या जीवनाचें लक्ष्य ठाऊक नसते. तो मन्दबुद्धि मानव करण्यायोग्य असे कर्मच करीत नाही. जगांत अन्नविक्रय होऊ लागला आहे. जगांत पाप फार वाढले आहे. याचमुळे धरणीमातेने अन्न आपल्यांतच सामावून घेतले आहे. अन्नविक्रय पाप आहे. ज्ञानाचा देखील विक्रय होऊ लागला आहे. ज्ञानाचा विक्रय करू नका. ब्राह्मणाचे कर्तव्य आहे कीं त्याने निष्काम भावनेने जगाला ज्ञानदान करावे. अन्नदानाहूनही ज्ञानदान श्रेष्ठ आहे. ज्ञानाने नेहमी शांति मिळत असते. जेव्हांपासून अन्न आणि ज्ञानाचा विक्रय होऊ लागला आहे तेव्हांपासून पवित्रता नष्ट झाली आणि पाप वाढले आहे. मनुष्याची भावना जेव्हांपासून कलुषित झाली तेव्हांपासून त्याचे जीवनही विकृत झाले आहे.

**१०. देवर्षि नारदांची वृंदावनात भक्तीशी भेट:**

नारद म्हणतात– संसारांत मला कोठेही शांति आढळली नाही. या प्रकारे कलियुगांत दोष पहात पहात, फिरत फिरत मी वृन्दावनांत आलो. तिथे एक कौतुक पाहिले. एका युवतीस पाहिले. तिच्याजवळ दोन पुरुष मूर्च्छा येऊन पडलेले होते. ती स्त्री चोहोंबाजूस पाहात होती. तिने मला बोलावले म्हणून मी तिच्यापाशी गेलो. साधुपुरुष कोणत्याही स्त्रीजवळ जात नाहीत, म्हणून मी न बोलावता तिच्याजवळ गेलो नाही. ती युवती मला म्हणाली, 'थांबा, एक क्षण थांबा.'

दुसऱ्यांची कामे सिद्ध करून द्याल तर तुम्ही साधू व्हाल. सोन्यापेक्षाही 'क्षण' अधिक मूल्यवान समजेल तो साधू. ज्याला वेळेची कांहींच किंमत नसते त्यास अंतकाळी खूप पश्चात्ताप होतो. कोणाचा एक क्षणही वाया घालवू नये. म्हणून जेव्हां एक क्षण थांबायला सांगितले तेव्हां नारदांनी युवतीस विचारले, 'देवी, तू कोण आहेस?' ती युवती म्हणाली, 'माझे नाव भक्ति आहे. हे ज्ञान आणि वैराग्य माझे पुत्र आहेत. हे आता वृद्ध झालेले आहेत. माझा जन्म द्रविड देशांत झाला आहे. (महान् आचार्य दक्षिण देशांत प्रगट झाले होते. श्री शंकराचार्य आणि श्री रामानुजाचार्य दक्षिणेंत जन्मास आले होते. दक्षिण देश भक्तीचा देश आहे.) कर्नाटकांत माझे पालनपोषण झाले आहे आणि तियेच (मी पुष्टही झाले) माझी वृद्धिही झाली.' आचार आणि विचार जिथे शुद्ध असतात तिथे भक्ति पुष्ट होते. आचारविचार शुद्ध असतील तरच भक्ति होऊ शकते. विचारांबरोबर आचारही शुद्ध असले पाहिजेत. कर्नाटकांत आजही आचारांची शुद्धि पाहण्यांत येते. भगवान व्यासांना कर्नाटकाविषयी पक्षपात करण्याचे कांहीं कारण नव्हते, पण जे खरे होते त्याचेच त्यांनी वर्णन केले आहे. आज देखील कर्नाटकांत लोक निर्जला एकादशी करतात. एकादशी म्हणजे दिवाळी नव्हे. एक एक करून माझी सर्व इंद्रिये भगवंताला अर्पण करायची आहेत या भावनेने एकादशी व्रत केले पाहिजे.

महाराष्ट्रांत कोठे कोठे भक्तीला सन्मान मिळाला आहे. पंढरपुरसारख्या ठिकाणीं भक्तीचें दर्शन होते. 'गुजराथेंत तर मी जीर्ण होऊन गेले. 'गुजरि जीर्णतां गता'. गुजराथेत मी माझ्या दोन्ही पुत्रांसह वृद्ध झाले.' धनाचा दास प्रभूचा दास होऊ शकत नाही. गुजराथ कांचनाचा दास झाला आहे म्हणून

तेथे भक्ति छिन्न-भिन्न झाली आहे.

भक्तीची मुख्य नऊ अंगें आहेत. त्यांत प्रथम आहे श्रवण. नुसती कथा ऐकून भक्ति पूर्ण होत नाही. जे ऐकले आहे त्याचें मनन करा. मनन करून जितके आचरणांत आणाल तितकेच भागवतश्रवणाचें सार्थक झाले असे म्हटले जाईल. कथा ऐकून पाप जळते, पण मनन केल्याने– आचरणांत आणल्याने तर मुक्ति मिळते. श्रवणभक्ति छिन्नभिन्न होत आहे, कारण मनन राहिले नाही. मनन न केल्याने श्रवण सफल होत नाही. मननाच्या अभावी श्रवणभक्ति क्षीण होत चालली आहे. कीर्तनभक्ति देखील राहिलेली नाही. कारण कीर्तनांत देखील (धन) कांचनाचा लोभ येऊ लागला आहे, आणि तेव्हांपासूनच कीर्तनभक्ति भ्रष्ट झालेली आहे.

ज्ञानी पुरुषांना अपमानापेक्षा सन्मान अधिक दुःसह होतो. पैशाच्या लोभापेक्षा कीर्तीचा मोह सुटणें फार कठीण आहे. कीर्तीचा मोह तर ज्ञात्यांना देखील त्रास देतो. मी आपल्या मनालाच समजावीत असतो. जोपर्यंत तुम्ही स्वतःच आपल्या मनाला समजवणार नाही तोपर्यंत ते समजणार नाही. कथा-कीर्तनांत अनायासेच जगताचे विस्मरण होत असते. कथा ऐकत असताना सांसारिक व्यवहाराचे विचार मनातून काढून टाका. मी आपल्या श्रीकृष्णांच्या चरणांजवळ बसलो आहे अशी भावना ठेवा. कीर्तन-भक्ति निष्काम झाली पाहिजे. संत तुलसीदासांनी 'स्वांतः सुखाय' असे म्हटलेले आहे. मी स्वतःच्या सुखासाठी कीर्तन करतो. दुसऱ्यांना त्यापासून काय सुख मिळते त्याची मला कांहीच माहिती नाही. माझ्या मनाला आनंद मिळावा म्हणून मी कीर्तन करतो. वंदनभक्ति अभिमानामुळे नाहीशी झाली. अभिमान वाढताच वंदनभक्तीचा नाश झाला. सर्वांमध्ये श्रीकृष्णाची भावना ठेवून वंदन करा. वंदन केल्याने विरोध नष्ट होतो.

भक्त नरसी मेहताने भक्ताचे लक्षण सांगताना म्हटले आहे, **'सकल लोकने सबको वन्दे'** तोच खरा वैष्णव होय. जो वंदन करतो तोच वैष्णव व जो वंदन करवून घेऊ इच्छितो तो वैष्णव नाही. अंतर्मनांत जोपर्यंत अहंभाव राहील तोपर्यंत भक्तीची वृद्धी होणार नाही. आजकाल लोक देहाची खूपच पूजा करीत असतात. देवाच्या पूजेसाठी, सेवेसाठी त्यांना आता वेळच मिळत नाही. देहपूजा वाढली कीं देवपूजा गेलीच. अनेक प्रकारचे साबण प्रचारांत आलेले आहेत. वाटेल तितका साबण घासा पण देहाचा जो रंग आहे तोच राहील. देवाने जो रंग दिलेला आहे तोच खरा रंग आहे आणि तोच ठीक आहे. मनुष्य अत्यंत विलासी झाला आहे म्हणूनच अर्चनाभक्तीचा ऱ्हास झाला आहे. लोक देहाला खूपच नटवू-सजवू लागले तेव्हांपासून अर्चनाभक्तीचा लोप झाला आहे. म्हणूनच जीवन साधे ठेवा.

याच प्रकारे भक्तीच्या एका अंशाचा नाश झाला आहे. अर्थात जीव ईश्वरापासून विभक्त झाला आहे, देवापासून विन्मुख झाला आहे. बुद्धीचा जेव्हां अतिरेक होतो, तेव्हांच भक्तीचा नाश होतो. भक्ति छिन्नभिन्न झाली तर जीवनही विभक्त झालेले आढळेल. भक्तीची दोन मुले आहेत. ज्ञान आणि वैराग्य. ज्ञान आणि वैराग्यासह भक्तीचा आदर करा. ज्ञान आणि वैराग्य मूर्च्छित झाले तर भक्ति पण रडत असते. कलियुगांत ज्ञान आणि वैराग्य क्षीण होतात, वाढत नाहीत. ज्ञान जेव्हांपासून पुस्तकांत सामावले तेव्हांपासून ते वस्तुतः निघून गेले. नारद सांगतात– ज्ञान आणि वैराग्याला मूर्च्छा कां आली हे मी जाणतो. या कलियुगांत अधर्म फार वाढल्यामुळे यांना मूर्च्छा आली आहे. या वृंदावनाच्या प्रेमभूमीमध्ये यांना पुष्टी मिळाली आहे. कलियुगांत ज्ञान आणि वैराग्याची उपेक्षा होते म्हणून ते उत्साहरहित होऊन वृद्ध आणि जीर्ण झाले आहेत.

ज्ञान आणि वैराग्याबरोबर मी भक्तीलाही जागृत करीन. ज्ञान आणि वैराग्यासह मी भक्तीचा प्रचार करीन. ज्ञान आणि वैराग्यांना जागृत करायचे नारदांनी अनेक प्रयत्न केले; परंतु कांही जमले नाही. वेदांची अनेक पारायणें केली तरीही ज्ञान व वैराग्याची मूर्च्छा गेली नाही. थोडासा विचार केला तर लक्षांत येईल कीं, अशी कथा तर प्रत्येक घरांतच होत असते. आपले हृदयच जणू वृन्दावन आहे. ह्या हृदयरूपी वृन्दावनांत केव्हां केव्हां वैराग्य जागृत होते. परंतु ती जागृति स्थायी राहात नाही. उपनिषद् आणि वेद पठणानें आपल्या हृदयांत क्वचित ज्ञान आणि वैराग्य जागृत होते, परंतु पुन्हा ते मूर्च्छित होते. वेदांच्या पारायणाने वैराग्य तर होते, पण ते स्थायी राहात नाही. स्मशानांत जेव्हा चिता जळत असते तेव्हां ती जळताना पाहून पुष्कळांना वैराग्य येते, परंतु ते वैराग्य टिकाऊ नसते.

कामसुख भोगल्यानंतर पुष्कळांना वैराग्य येते. सांसारिक विषयांचा उपभोग घेतल्यानंतरही पुष्कळांना वैराग्य येते. परंतु ते देखील स्थायी नसते. विषयभोगानंतर अरुचि उत्पन्न होते. परंतु ती अरुचि विवेक आणि वैराग्यरहित असल्यामुळे टिकत नाही. ज्ञान, वैराग्य आणि भक्ति सर्व कांही वेदांपासूनच उत्पन्न झालेले आहे. परंतु वेदांची भाषा गूढ असल्यामुळे सामान्य माणसाला ती समजत नाही. कलियुगांत तर श्रीकृष्णकथा व श्रीकृष्णकीर्तनानेंच ज्ञान आणि वैराग्य जागृत होते.

### ११. भक्तीचे दुःख दूर करण्यासाठी नारदांचा उद्योग :

नारद काळजीत पडले आहेत. कारण ज्ञान आणि वैराग्यांची मूर्च्छा उतरत नाही. त्याच वेळी आकाशवाणी झाली की, 'तुमचा प्रयत्न उत्तम आहे.' ज्ञान आणि वैराग्याबरोबरच भक्तीचाही प्रचार करण्यासाठी आपण कांही सत्कर्म करावे. नारदांनी विचारले, 'मी कोणते सत्कर्म करू ?' तेव्हां आकाशवाणी झाली की, 'संत-महात्मे तुम्हांला सत्कर्म काय असते ते सांगतील.'

नारदांनी अनेक साधुसंतांना विचारले कीं, ज्ञान-वैराग्यासह भक्ति पुष्ट होईल असा एखादा उपाय सांगा. परंतु निश्चित उपाय कोणीच सांगू शकले नाही. तेव्हा नारद पुन्हा चिंतित झाले व विचार करू लागले कीं, 'निश्चित उपाय सांगणारे संत मला कोठे भेटतील आणि ते काय साधन सांगतील ?' असा विचार करीत फिरत फिरत ते बदरिकाश्रमांत आले. तेथे सनकादि मुनींशी त्यांची भेट झाली व नारदांनी सनत्कुमारांना ही सर्व हकीगत सांगितली.

नारद म्हणतात, "मी ज्या देशांत जन्म घेतला त्या देशाला जर माझा कांहीं उपयोग झाला नाही तर माझे जीवन व्यर्थ आहे. मी काय सत्कर्म करावे ते आपण मला सांगा."

सनकादि मुनि म्हणतात की, 'देशाच्या दुःखाने तुम्ही दुःखी होत आहांत ही तुमची भावना दिव्य आहे. भक्तीचा प्रसार करण्याची तुमची इच्छा आहे, तर तुम्ही भागवत ज्ञानमार्गाचे पारायण करा, तुमची इच्छा पूर्ण होईल. तुम्ही भागवत ज्ञानयज्ञ करा आणि भागवताचा प्रचार करा. यामुळेच लोकांचे कल्याण होईल. या कथेमुळे ज्ञान आणि वैराग्यास जागृति येईल. भागवताची कथा ज्ञान, भक्ति आणि वैराग्य यांना वाढविणारी आहे. वेदांचे पारायण करणे चांगले आहे. त्यानेच तुमची इच्छा पूर्ण होईल. परंतु वेदांचे अर्थ सहज समजू शकत नाहीत. याकरिता सर्व वेदांचे साररूप अशा भागवताचा ज्ञानयज्ञ करा.'

भागवतकथेचे अमृतपान करण्यासाठी तेथून ते गंगाकाठी आले. शुद्ध भूमींत सात्त्विक भाव जागृत होतात. भूमीचा प्रभाव सूक्ष्म रीतीने मनावर अवश्य पडतो. भोगभूमी भक्तींत बाधक असते. गंगेचा तट ज्ञानभूमी आहे; म्हणून आज्ञा केली की गंगाकिनाऱ्यावर चला.

नारद सत्कुमारांबरोबर आनंदवनांत आलेले आहेत. सनत्कुमार श्री व्यासाश्रमांत आले आहेत. नारद हात जोडून बसले आहेत. तेथे ऋषिमुनि देखील भागवंतकथेचे पान करण्याकरिता आलेले आहेत. जे आले नव्हते त्या सर्वांच्या घरी भृगु ऋषि जातात आणि विनीत भावाने वंदन करून त्यांना कथेसाठी घेऊन येतात. सत्कर्मात दुसऱ्यांना जो प्रेरणा देईल त्यालाही पुण्य मिळते.

कथेच्या आरंभी भगवंताचा जयजयकार करतात आणि '**हरये नमः**' चा शुद्ध उच्चार करतात. '**हरये नमः**' हा महामंत्र आहे.

सगळ्या प्रवृत्तींचा त्याग करून मनुष्य ध्यानाला बसतो. तेथे देखील माया विघ्न करते. अनादि कालापासून मनुष्याचे मायेशी युद्ध होत आले आहे. जीव ईश्वरापाशी जातो तर मायेला हे अप्रिय वाटते. जीव सर्व प्रकारचे मोह सोडून प्रभूपाशी जातो हे मायेस प्रिय वाटत नाही. मायेचे कांही एकच रूप नाही. ईश्वर ज्याप्रमाणे व्यापक आहे त्याप्रमाणेच माया देखील व्यापक आहे.

**१२. भक्तांच्या कष्टाची निवृत्ती :**

जीव आणि ईश्वर (शिव) यांच्या भेटीत माया विघ्न करते. माया मनाला चंचल करते. माया माणसाला समजावीत असते की, बायको, मुले, धनसंपत्ति इत्यादींतच सुख आहे. माणसाला माया पराभूत करून टाकते. माणूस हरतो व माया जिंकते याचे कारण असें की माणूस ईश्वराचा जयजयकार करीत नाही. कथेच्या-भजनाच्या वेळी प्रेमाने ईश्वराचा जयजयकार केला पाहिजे, ज्यामुळे मायेचा पराभव होऊन तुमचा जय होईल. प्रभूचा जयजयकार कराल तर तुमचा पण जय होईल व तुमचा सुद्धा जयजयकार होईल.

भूक आणि तहानेला विसरला नाहीत तर पापे होत राहतील. भूक आणि तहान सहन करण्याची सवय असली पाहिजे. पुढे कथेंत येईल की राजा परीक्षिताची बुद्धि भूक आणि तहानेनेच बिघडली होती.

सूत सावध करतात,' हे राजन्, नारद आज श्रोता होऊन बसले आहेत, आणि सनकादि देखील आसनावर विराजमान आहेत. म्हणून जयजयकार शुद्ध होऊ लागला आहे.'

ही भागवताची कथा अतिशय दिव्य आहे. ही कथा जो प्रेमाने ऐकेल त्याच्या कानांतून परमात्मा हृदयांत उतरतील. नेत्र आणि श्रोत्र यांना जो पवित्र ठेवतो त्याच्या हृदयांत परमेश्वर येतात. श्रीकृष्ण भगवान कानांतून, डोळ्यांतून मनांत येतात. वारंवार जो श्रीकृष्णकथा ऐकतो त्याच्या कानांतून श्रीकृष्ण हृदयात येऊन बसतात. पाप देखील कानांतूनच मनांत येते. कानांना कथा-श्रवण करवाल, तुम्ही श्रीभगवंताच्या कथा ऐकाल तर मन भगवंताचे ठिकाणीं स्थिर होईल. कानांतून भगवान हृदयांत उतरतील. श्रीभगवंताचा आपल्या हृदयात प्रवेश व्हावा यासाठी आपल्या देहाला कान व डोळे ही द्वारें आहेत. —साधने आहेत. काही लोक डोळ्यांतूनच प्रभूच्या स्वरूपाला मनांत उतरवितात, तर इतर काही कानांच्या द्वारें श्रवण करून भगवंतांना हृदयांत उतरवितात. म्हणून डोळे आणि कान या दोहोंनाही पवित्र ठेवा. तेथे श्रीकृष्णांना बोलवा.

प्रत्येक सत्कर्माच्या प्रारंभी शांतिपाठ केला जातो. त्याचा मंत्र आहे '**ॐ भद्रं कर्णेभिः श्रुणुयाम देवाः**' हे देवा, कानांनी आम्ही कल्याणकारी वचन ऐकावे. कान आणि डोळे पवित्र व्हावे. मग सत्कर्माचा आरंभ व्हावा याचसाठी पुरोहित कान आणि डोळ्यांना पाणी लावायला सांगतात. शुद्ध इंद्रियांमधेच परमात्म्याचा प्रकाश येत असतो. याकरितां इंद्रियांना शुद्ध करा आणि शुद्ध ठेवा. मनाला देखील शुद्ध

करा व शुद्ध ठेवा. काळ वाईट झालेला नाही, मनच वाईट झालेले आहे. नेत्र आणि श्रोत्र पवित्र केल्यानंतर कथेचा आरंभ होतो.

सनकादि मुनि म्हणतात, 'या भागवतशास्त्रांत अठरा हजार श्लोक आहेत. अठरा ही संख्या परिपूर्ण आहे. श्रीराम परिपूर्ण आहेत म्हणून नवमीच्या दिवशी प्रगट झाले आहेत. श्रीकृष्ण नवमीच्या दिवशीच गोकुळांत आले आहेत. तेव्हाच नंदमहोत्सव करण्यांत आला आहे. श्रीरामांच्या बारा कला आहेत आणि श्रीकृष्णांच्या सोळा कला आहेत, असा भेद करू नये.

भागवतांत मुख्य कथा नंदमहोत्सवाची आहे. या कथेचेदेखील अठरा श्लोक आहेत. भागवतावर प्राचीन आणि उत्तम अशी टीका श्रीधरस्वामींची आहे. त्यांनी कोणत्याही संप्रदायी सिद्धान्ताचा आधार न घेता स्वतंत्र रीतीने भागवततत्त्वाचा विचार केला आहे. या श्रीधर टीकेवर बंसीधर महाराजांची टीका आहे. त्यांचे म्हणणे आहे कीं आमच्या ऋषिमुनींनी केवळ निःस्वार्थ भावानेच या ग्रंथाची रचना केली आहे.

श्रीमद्भागवताच्या महिम्याचे वर्णन कोण करू शकेल? भागवत तर साक्षात नारायणाचेच स्वरूप आहे. श्रीभगवंतांनी जेव्हा गोलोकी प्रयाण केले तेव्हा त्यांनी आपले तेजस्वरूप या ग्रंथात ठेवले, असे एकादश-स्कंधात लिहिले आहे. म्हणून भागवत हे श्रीभगवंताची साक्षात शब्दमयी मूर्ति आहे – श्रीकृष्णांची वाङ्मयमूर्ति आहे.

उद्धवांनी विचारले की, आपण स्वर्गधामीं गमन केल्यावर या पृथ्वीवर अधर्म वाढेल; मग धर्म कोणाला शरण जाईल? तेव्हा भगवंत म्हणाले, 'माझ्या भागवताचा जो आश्रय करील, त्याच्या घरात कली जाऊ शकणार नाही.'

भागवत भगवंताचे नामस्वरूप आहे. नामस्वरूपानेच इतर रूपेही सिद्ध होतात. मनाचा मळ दूर करण्यासाठीच भागवतशास्त्र आहे. मनाला शुद्ध करण्याचे साधन भागवतकथा आहे. तर ही कथा ऐकल्यावरसुद्धा जर पाप करणे चालू ठेवले गेले तर यमदूतांकडून आणखी दोन थपडा खाव्या लागतील. ईश्वरावर प्रेम करण्याचें साधन हे भागवतशास्त्र आहे. माणूस, बायको, पैसा-अडका, भोजन इत्यादींवर प्रेम करतो, पण परमेश्वरावर प्रेम करीत नाही. यासाठीच तो दुःखी आहे.

श्रीरामानुजाचार्यांच्या जीवनांत एक प्रसंग आला होता. रंगदास नावाचा एक शेठ होता. तो एका वेश्येवर अत्यंत आसक्त होता. एक दिवस रंगदास आणि ती वेश्या प्रभु रंगनाथांच्या मंदिराजवळून जात होते. श्रीमंत शेठ रंगदास वेश्येच्या डोक्यावर छत्र धरून जात होते. बरोबर त्याच वेळी रामानुजाचार्य मंदिराबाहेर आले. त्यांनी हे दृश्य पाहिले. हे सुद्धा ईश्वराचेच जीव आहेत. आणि ते देखील जर ईश्वरांत मिळून जातील तर त्यांचा देखील उद्धार होईल, असा विचार करून ते त्यांना भेटायला गेले. रस्त्यावर जाऊन ते त्या रंगदासाला भेटले आणि म्हणाले, "तुम्ही या वेश्येवर जे प्रेम करीत आहांत ते पाहून मला फार आनंद झाला आहे. अस्थि आणि विष्ठेने भरलेल्या या स्त्रीवर तुम्ही प्रेम करीत आहांत! या स्त्रीच्या तुलनेत तर माझे प्रभू रंगनाथ अतिसुंदर आहेत. या स्त्रीवर जसे तुम्ही प्रेम करता तसे माझ्या प्रभूवर करा. प्रेम करण्यालायक तर एक परमात्माच आहे." असे म्हणून त्यांनी रंगदास शेठला एक थप्पड मारली. रंगदासाला तेथेच समाधी लागली. त्याला श्रीप्रभू रंगनाथांचे दर्शन झाले. त्या दिवसानंतर रंगदास शेठने कोणत्याही स्त्रीवर प्रेम केले नाही.

मनुष्य आपले प्रेमपात्र प्रत्येक क्षणाला बदलत असतो, परंतु त्याला कोठेच संतोष आणि शांति लाभत नाही. बाल्यावस्थेत आईवर प्रेम असते. थोडे मोठे झाल्यावर मित्रांवर प्रेम जडते. विवाह झाल्यावर

बायकोवर प्रेम करू लागतो. काही कालानंतर तो आपल्या प्रिय पत्नीचा तिरस्कार करू लागतो आणि तिला म्हणतो, 'तुझ्याशी लग्न करून मी मोठी चूक केली आहे. त्यानंतर तो मुलांवर प्रेम करतो. नंतर पैशावर लोभ जडतो. म्हणून परमेश्वरालाच प्रीतिपात्र करा, जेणेंकरून प्रीतिपात्रच बदलण्याचा प्रसंग येणार नाही.

भागवतशास्त्र जर पुन्हा पुन्हा ऐकाल तर परमेश्वरावरील प्रेम वाढीस लागेल. आजकाल लोक भक्ति तर पुष्कळ करतात, पण परमेश्वराला साधन आणि सांसारिक सुखांना साध्य समजूनच करीत असतात. म्हणून भक्तीचें सार्थक होत नाही आणि लोक दुःखी होतात. परमेश्वरालाच साध्य माना, सांसारिक सुखांना नव्हे.

कथेत हास्यरस गौण आहे. कथा ही कोणाला हसविण्यासाठी असत नाही. कथा ही तर ईश्वराला प्रसन्न करण्याकरिता असते. श्रोत्यांच्या हृदयांत जो शोक जागृत करील तो शुक. कथा शुद्ध हृदयाने रडण्याकरिता आहे. माझे आजपर्यंतचे जीवन निरर्थकच निघून गेले, असा भाव जर अंतःकरणात जागृत होईल तर अशा कथेचें श्रवण सार्थक झाले म्हणायचे. कथा ऐकल्यानंतर जर पाप सुटले नाही आणि वैराग्य उत्पन्न झाले नाही तर अशा कथेचे श्रवण काय कामाचे ?

भागवताच्या दर्शनाने, श्रवणाने, पूजनाने पापाचा नाश होतो, श्रीमद्भागवताच्या फक्त श्रवणानेच सद्गति मिळते. कथाश्रवणाचा लाभ आत्मदेव ब्राह्मणाच्या चरित्राने सांगितला गेला आहे. दृष्टान्ताविना सिद्धान्त मनाला स्पर्श करीत नाही. म्हणून आत्मदेव ब्राह्मणाचे चरित्र सांगितले गेले आहे. कथा म्हणजे केवळ रूपक नव्हे. कथेंतील लीला खरी आहे आणि त्यात प्रतिपादिलेला अध्यात्म सिद्धान्त देखील सत्य आहे.

**१३. गोकर्णोपाख्यानाचा प्रारंभ– आत्मदेव ब्राह्मण आणि धुंधलीची कथाः**

तुंगभद्रा नदीच्या काठी एक गाव होते. तेथे आत्मदेव ब्राह्मण आपली पत्नी 'धुंधली' हिच्याबरोबर राहात होता. आत्मदेव पवित्र होता. पण धुंधली स्वभावाने क्रूर, भांडखोर आणि दुसऱ्यांवर टीकाटिप्पणी करणारी होती. आत्मदेव निःसंतान होते. संततीच्या अभावामुळे आत्मदेव दुःखी होते. संतान व्हावे म्हणून आत्मदेवाने पुष्कळ प्रयत्न केले, परंतु ते सफल झाले नाहीत. म्हणून त्याने आत्महत्या करण्याचा निश्चय केला. आत्मदेवाने वनाकडे प्रयाण केले. फिरता फिरता वाटेत त्याला एका नदीच्या काठी एक महात्मा भेटले. आत्मदेव त्या महात्म्यापाशी गेला आणि रडू लागला. महात्म्याने त्याला त्याच्या दुःखाचे कारण विचारले.

आत्मदेव म्हणाला, 'माझ्याजवळ खाण्यापिण्यासाठी पुष्कळ आहे. परंतु माझ्यानंतर खाणारा कोणी नाही म्हणून मी दुःखी आहे. आणि म्हणूनच मरणाच्या इच्छेने आत्महत्या करण्यासाठी मी येथे आलो आहे.' महात्मा म्हणाले, 'तुला कोणी मूलबाळ नाही ही तर परमेश्वराची कृपाच आहे. मूलबाळ, परिवार नसला तर असे समज की देवाने सर्व काही तुझ्याच हाताने करविण्याचे तुझ्या भाग्यात लिहिले आहे. आणि याचसाठी तुला मूलबाळ दिले नाही. पुत्र तर दुःखरूप असतो.'

देव ज्या स्थितींत तुला ठेवील त्याच स्थितींत संतोष मानून ईश्वराचें स्मरण केले पाहिजे. तुकाराम महाराजांनी म्हटले आहे– "**ठेविले अनंतें तैसेचि रहावे। चित्तीं असो द्यावे समाधान.**" म्हणून देव ज्या स्थितींत ठेवील त्यांत आनंद मानला पाहिजे.

एकदा एकनाथ महाराज श्रीविठ्ठलाच्या मंदिरात दर्शनासाठी गेले. एकनाथांना सुयोग्य बायको

मिळाली होती म्हणून ते देवाचे उपकार मानीत होते. ते म्हणत, 'मला पत्नीचा संग नाही, सत्संग दिला आहे.' त्याच मंदिरांत भक्त तुकाराम दर्शनासाठी आले. तुकारामाची बायको कर्कशा होती. कर्कशा पत्नीसाठीदेखील तुकाराम देवाचे उपकार मानीत होते. ते म्हणत, 'हे भगवन्, तुम्ही जर मला चांगली आणि सुंदर पत्नी दिली असती तर मी सर्व दिवसभर तिच्याच मागे लागलो असतो आणि तुम्हाला विसरलो असतो. म्हणून कर्कशा पत्नी मिळूनही माझे भलेच झाले आहे.'

एकनाथांना अनुकूल पत्नी मिळाली तर त्यांना त्यातच आनंद आहे, आणि तुकारामांना प्रतिकूल पत्नी मिळाली तरी त्यांनाही त्यातच आनंद आहे. दोघांनाही आपापल्या परिस्थितींत समाधान आहे आणि ते देवाचे उपकार मानीत आहेत.

आपल्या बायकोचा मृत्यू झाला तर नरसिंह मेहताने देखील आनंदच मानला आणि म्हटले– 'चांगलेच झाले की कुटुंबाची अडचण सुटली. आता तर मी मोठ्या सुखाने आणि निश्चिंत मनाने श्रीगोपालाचे भजन करू शकेन.'

एका संताची पत्नी अनुकूल होती, दुसऱ्याची प्रतिकूल होती, आणि तिसऱ्याची तर जग सोडून निघून गेली. तरी पण "**ठेविलें अनंतें तैसेचि रहावें। चित्तीं असो द्यावें समाधान**" या संतांच्या उक्तिनुसार हे तीनही महात्मे आपापल्या परिस्थितीत संतुष्ट होते. खरा वैष्णव तोच की जो कोणत्याही परिस्थितींत परमात्म्याच्या कृपेचाच अनुभव घेतो आणि मनाला शांत व संतुष्ट ठेवतो. मनाला शांत ठेवणे हे देखील फार मोठे पुण्य आहे.

आई आणि बाप आपल्या मुलाविषयी पुष्कळ चिंता वाहतात. पण पुत्रेषणेबरोबरच अनेक वासनाही येतात. पुत्रेषणेच्या मागोमाग वित्तेषणा, आणि वित्तेषणेच्या मागोमाग लोकेषणा जागृत होतात.

आत्मदेवाने त्या महात्म्याला म्हटले, कीं 'मला पुत्र द्या. कारण पुत्र पित्याला सद्‌गति देतो.' ते महात्मा आत्मदेवाला समजावतात कीं श्रुति भगवती एके ठिकाणी असेही म्हणते कीं पुत्रामुळे मुक्ति मिळत नाही. वंशाच्या रक्षणार्थ सत्कर्म करा. जर पुत्रच सद्‌गति देऊ शकला असता तर संसारांत सर्वांनाच पुत्र होतात, तेव्हा त्या सर्वांनाच सद्‌गति मिळाली पाहिजे. बापाने अशी आशा कधी ठेवू नये की माझ्या मुलाने श्राद्ध केल्यास मला सद्‌गति मिळेल. श्राद्ध केल्याने तो जीव चांगल्या योनींत जातो, पण असे समजू नका की तो जन्म-मृत्यूच्या फेऱ्यांतून सुटतो.

श्राद्ध आणि पिंडदान मुक्ति देऊ शकत नाहीत. श्राद्ध करणे धर्म आहे. श्राद्ध करण्याने नरकापासून सुटका मिळते पण नुसते श्राद्ध करून मुक्ति मिळत नाही. श्राद्ध करू नये असे सांगितले नाही. श्राद्ध केल्याने पितर प्रसन्न होतात आणि आशीर्वाद देतात. पिंडदानाचा खरा अर्थ कोणाला समजत नाही. या शरीरालाच पिंड म्हणतात. त्याला परमेश्वराला अर्पण करणे म्हणजेच पिंडदान होय. मला माझे जीवन ईश्वरार्पण करायचे आहे हाच निश्चय करायचा आहे आणि या रीतीने जो आपले जीवन ईश्वरार्पण करतो त्याचेच जीवन सार्थक असते आणि त्यानेच खऱ्या अर्थाने पिंडदान केलेले असते. अन्यथा जर माता-पिठाच्या पिंडदानाने मुक्ति मिळत असती तर ऋषि-मुनी ध्यान, योग, तप इत्यादी साधनांचा निर्देशच का देते?

जन्ममृत्यूच्या त्रासांतून केवळ सत्कर्मच सुटका करू शकते आणि ते सुद्धा आपण स्वतःच केलेले. आपल्याला स्वतःलाच आपल्या आत्म्याचा उद्धार करायचा आहे. जीव स्वतःच आपला उद्धार करू शकतो – 'उद्धरेदात्मनात्मानम्' – स्वतः आपल्याच प्रयत्नाने आपल्या आत्म्याचा संसारसागरांतून उद्धार करावा आणि आपल्या आत्म्याला अधोगतिपत जाऊ देऊ नये. जीवाचा उद्धार तो स्वतःच न करील

तर आणखी कोण करील? स्वतःशिवाय मनुष्याचा दुसरा कोण आणखी मोठा हितचिंतक असू शकतो? जर तो स्वतःच आपले श्रेयस न साधेल तर पुत्रादि काय करतील?

ईश्वराकरिता जो जगतो त्याला मुक्ति अवश्य मिळते. श्रुति माऊली तर म्हणते, 'जोपर्यंत परमेश्वराचा अपरोक्षानुभव होत नाही– ज्ञान होत नाही तोपर्यंत मुक्ति मिळतच नाही. मृत्यूच्या आधीच ज्याला भगवंताचा अनुभव येतो त्यालाच मुक्ति मिळते. परमात्म्याच्या अपरोक्ष साक्षात्काराशिवाय मुक्ति मिळत नाही. त्याला जाणून घेतल्यावरच मनुष्य मृत्यूचें उल्लंघन करून जातो. परमपदाच्या प्राप्तीसाठी याशिवाय दुसरा कोणता उपायच नाही. नुसते श्राद्ध करून काही मुक्ति मिळत नाही.

**१४. आत्मदान हेंच पिंडदान:**

तुमच्या पिंडाचे दान कराल अर्थात तुम्ही आपल्या शरीरालाच जर परमात्म्याला अर्पण कराल तर तुमचे कल्याण होईल. आपले पिंडदान तुम्ही आपल्या हातानेच करा, हे उत्तम. जे पिंडी आहे तेच ब्रह्मांडांतही आहे. या शरीररूपी पिंडाला परमात्म्याला अर्पण करण्याचा निश्चय करा. तुम्ही स्वतःच आपले पिंडदान कां करीत नाही? घरांत जे काही आहे ते कारणी लावून द्या आणि 'नारायण नारायण' म्हणा.

आत्मदेवाला महात्म्याची ही गोष्ट रुचली नाही. तो म्हणाला, 'पुत्रसुखाचा तुम्हा संन्याशांना अनुभव नाही म्हणून तुम्ही असे म्हणत आहांत.'

आईबापाची मांडी लहान मुलाने कशीही मळवली तरी ते प्रसन्नच होतात. मृगजळाप्रमाणें नसलेल्या सुखाचा अनुभव घेण्यासाठीं सांसारीक धडपडत असतात.

महात्म्याने सुंदर उपदेश केला तरी आत्मदेव दुराग्रहाने म्हणाला, 'मला पुत्र हवा आहे, नाहीं तर मी प्राणत्याग करीन.' महात्म्याला दया येऊन त्याने एक फळ देऊन म्हटले, 'हें फळ तू आपल्या बायकोला खाऊ घाल. तुझ्या घरी योग्य मुलगा जन्माला येईल.'

आत्मदेव ते फळ घेऊन आपल्या घरी परत आला. बायकोला फळ दिले. धुंधली तें फळ खाण्याऐवजी अनेक तर्क-कुतर्क करू लागली. ती विचार करू लागली, फळ खाल्ल्यावर मी गर्भवती होईन आणि परिणामतः दुःखी होईन. आणि पुन्हा मुलाचें लालनपालन करण्यांतही किती तरी दुःख आहे! तिने आपल्या लहान बहिणीला हे सांगितले. तिने युक्ति सांगितली की, 'मला मुलगा होणारच आहे, तो मी तुला देईन. तू गर्भवती झाल्याचे नाटक कर.'

धुंधलीला पुत्राची (फळ) इच्छा तर आहे, पण कोणत्याही प्रकारचे दुःख सहन करण्याची इच्छा नाही. हा माणसाचा स्वभाव आहे की, त्याला सुखाची तर इच्छा असते पण त्याकरिता कोणत्याही प्रकारचा प्रयत्न किंवा कष्ट करायला तयार नसतात. माणूस पुण्य करू इच्छित नाही, पण पुण्याच्या फळाची मात्र त्याला इच्छा असते. तसेच तो पाप करतो, पण पापाचे फळ मात्र त्याला नको असते.

लहान बहिणीच्या सांगण्याप्रमाणे धुंधलीने तें फळ गाईला खाऊ घातले अन् स्वतः गर्भवती झाल्याचे नाटक करू लागली. तिने बहिणीचा मुलगा आणला अन् जाहीर केले कीं हा माझाच मुलगा आहे. धुंधलीने आपल्या मुलाचे नाव धुंधुकारी ठेवले. तिकडे ज्या गाईला फळ खाऊ घातले होते तिने गाईसारखे कान असलेल्या मनुष्याकार बालकाला जन्म दिला. त्याचे नाव गोकर्ण ठेवले गेले. दोन्हीही बालके मोठी झाली. गोकर्ण पंडित व ज्ञानी झाला आणि धुंधुकारी दुष्ट निघाला.

भागवताची कथा तीन प्रकारची आहे. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक. जरा विचार

कराल तर या कथेचें रहस्य उलगडू शकेल.

मानवकाया म्हणजेच तुंगभद्रा. भद्राचा अर्थ आहे कल्याण करणारी, आणि तुंग म्हणजे अधिक. अत्याधिक कल्याण करणारी नदीच तुंगभद्रा नदी आहे –तीच मानवशरीर आहे. मानव आपल्या कायेच्या माध्यमानेच आत्मदेव होऊ शकतो.

आपल्या आत्म्याला स्वतःच देव बनवील तोच आत्मदेव. आत्मदेवच जीवात्मा आहे. आपण सर्वच आत्मदेव आहोत. नरच नारायण होत असतो. मानवी देहांत राहणारा जीव देव बनू शकतो आणि दुसऱ्यालाही देव बनवू शकतो. पशू आपल्या शरीराने आपले कल्याण करू शकत नाहीत. मनुष्य बुद्धिशाली प्राणी असल्यामुळे आपल्या शरीराच्या योगे आपले आणि दुसऱ्यांचे कल्याण करू शकतो.

संताप करणारी आणि कुतर्क करणारी धुंधली म्हणजेच बुद्धि, प्रत्येक घरात ही धुंधली असते. धुंधली कथेतही धुमाकूळ घालते. द्विधा बुद्धि, द्विधा वृत्तीच धुंधली आहेत. अशी द्विधा बुद्धि जोपर्यंत असते तोपर्यंत आत्मशक्ति जागृत होत नाही. बुद्धि दुसऱ्यांच्या कारभारांत विनाकारण अडथळे आणते. हे फारच मोठे पाप आहे. मी कोण आहे, माझे स्वामी कोण आहेत याचा विचार बुद्धि करीत नाही. बुद्धीशी आत्म्याचा विवाह (संबंध) झाला, तरीही जोपर्यंत त्यास सत्संग होत नाही तोपर्यंत विवेक होत नाही आणि विवेकरूपी पुत्राचा जन्म होत नाही. विवेकच आत्म्याचा मुलगा आहे. सत्संगाविना विवेक होत नाही. आत्मा आणि बुद्धीच्या संबंधापासून जर विवेकरूपी पुत्राचा जन्म झाला नाही तर संसाररूपी नदींत जीव बुडून मरतो. ज्याच्या घरांत विवेकरूपी पुत्र नसतो तो संसाररूपी नदींत आत्मदेवाला हाच विवेक नव्हता म्हणून तो गंगापात्रांत बुडून मरण्यासाठीं जात आहे.

विवेक सत्संगाने जागृत होतो आणि विवेक आत्म्याला आनंदित करतो. स्वतः देव बनण्याची आणि दुसऱ्याला देव बनविण्याची शक्ति आत्म्यांत आहे. परंतु ह्या आत्मशक्तीला जागृत करावयाचे आहे. हनुमान समर्थ होते, परंतु जांबुवानाने त्यांना आपल्या स्वरूपाचें ज्ञान करून दिले तेव्हाच त्यांना स्वतःच्या स्वरूपाचे ज्ञान झाले. आत्मशक्ति सत्संगाने जागृत होते. सत्संगाशिवाय जीवनांत दिव्यता येत नाही.

संतमहात्म्यांनी दिलेले विवेकरूपी फळ बुद्धीला आवडत नाही. बुद्धि ही धुंधलीची लहान बहीण आहे. मनाने बुद्धीच्या विचाराने निर्णय घेतला तर मन दुःखी होते. मन पुष्कळ वेळा आत्म्याला फसविते. मन स्वार्थी आहे. मन जे म्हणेल ते करू नका. निर्णय फक्त ईश्वराचाच घ्यावा. काही विचार करा. आत्मदेवाचा आत्मा भोळा आहे. त्याला मन, बुद्धि वारंवार धोका देत असतात. मनाचे मत घ्या. आत्मदेव मन-बुद्धीचा छळ समजू शकला नाही.

फळ गाईला खाऊ घातले. गो म्हणजे गाय, इंद्रिय, भक्ति इत्यादी अर्थ होतात. फळ गाईला म्हणजे इंद्रियांना खाऊ घातले.

सूत समजावून सांगतात की, सत्संगाने ताबडतोब इंद्रियांची शुद्धि होत नाही. मन आणि बुद्धि जेव्हा भागवत आणि भगवंताचा आसरा घेतील तेव्हाच ते शुद्ध होतील.

### १५. सदैव द्रव्य आणि कामसुखाचे चिंतन करणाराच धुंधुकारीः

धुंधुकारी कोण? सर्वकाळ द्रव्यसुख आणि कामसुख यांचेच चिंतन करतो तोच धुंधुकारी होय. ज्याच्या जीवनात धर्म नाही पण कामसुख आणि द्रव्यसुख प्रधान आहे तोच धुंधुकारी होय.

सूत सावध करून सांगतात की, मोठा झाल्यावर धुंधुकारी पाच वेश्यांमध्ये फसतो. शब्द, स्पर्श,

रूप, रस आणि गंध हे पांच विषयच वेश्या आहेत. हे पांच विषयच धुंधुकारीस अर्थात जीवास बांधून टाकतात.

तो शवाच्या (प्रेताच्या) हाताने खात असे, असे स्वच्छ लिहिले आहे. जे हात परोपकार करीत नाहीत ते हात शवाचेच हात होत. ज्या हातांनी श्रीकृष्णाची सेवा होत नसेल, ज्यांनी परोपकार केला जाणार नाही, ते शवाचेच हात म्हटले पाहिजेत.

धुंधुकारी स्नान आणि शौचक्रियाविहीन होता. कामी होता. तो स्नान तर करीत होताच; परंतु स्नानानंतर संध्यावंदन, पूजा-अर्चा न करील तर ते स्नान व्यर्थच होय. म्हणून म्हटले आहे की तो स्नान करीत नसे.

स्नानानंतर सेवा, संध्या, गायत्री जप करणार नाही ते स्नानही पाप होते. शास्त्रांत तीन प्रकारची स्नाने सांगितली आहेत. त्यांत ऋषिस्नान श्रेष्ठ आहे. उषःकाली ४ ते ५ वाजेपर्यंतच्या काळात केलेले स्नान ऋषिस्नान असते. ह्यानंतर ५ पासून ६॥ पर्यंतच्या काळांतील स्नान मनुष्यस्नान म्हटले जाते. ६॥ नंतर केलेले स्नान राक्षसी स्नान होय.

भगवान सूर्यनारायणांच्या उदयानंतर दंतधावन, शौच्य इत्यादी करणे योग्य नाही. सूर्य बुद्धीचे स्वामी आहेत. त्यांच्याप्रीत्यर्थ संध्या केल्याने बुद्धि सतेज होते. स्नान आणि संध्या नियमाने करा. सम्यक् ध्यान म्हणजेच संध्या होय. नित्य सत्कर्म केल्याविना केलेले भोजन हे भोजन म्हणता येणार नाही. असा माणूस भोजन करीत नाही तर पाप प्राशन करीत असतो. जे पापी लोक केवळ आपल्या शरीराच्या पोषणाकरितां अन्न शिजवितात ते पापाचे भोजन करतात. म्हणून नेहमी सत्कर्म करा. आयुष्याचा सदुपयोग करा. तन आणि मनाला दंड द्याल तर पापाचा क्षय होईल आणि पुण्याची वृद्धि होईल. आपल्या मनाला तुम्ही स्वतः दंड दिला नाही तर दुसरे कोण देईल ?

पुत्राचे दुराचरण पाहून आत्मदेव अत्यंत कष्टी झाला. त्याला वाटू लागले, 'आपण निपुत्रिक असतो तर चांगले झाले असते.' धुंधुकारीने सर्व संपत्ति उडवून टाकली, आता तर तो आई-बापांनाही मारू लागला. वडिलांचे दुःख पाहून गोकर्ण वडिलांजवळ आला. गोकर्ण वडिलांना वैराग्याचा उपदेश देत आहे. हा संसार असार आहे आणि दुःखाने व मोहाने बांधून टाकणारा आहे. कोणाचा पुत्र ? आणि कोणाचे धन ? संसारास वंध्यासुताची उपमा दिली गेली आहे. संसार मायेचा मुलगा आहे आणि जेव्हां माया मिथ्या आहे तेव्हां संसार खरा कसा असू शकेल ? गोकर्ण आत्मदेवाला म्हणतो की, तुम्ही आतां घरदार सोडून वनगमन करा, घराच्या मोहाचा त्याग करा. सर्व कांही समजून उमजून स्वतःच सोडून द्या. नाही तर काळ बळेच सोडवील.

"हा देह हाडे, मांस आणि रुधिराचा पिंड आहे. ह्याला आपला मानणे सोडून द्या. स्त्री-पुत्रादींची ममता सोडा. हा संसार क्षणभंगुर आहे. त्यांत कोणत्याच वस्तूला स्थायी समजून तिच्याबद्दल राग, मोह धरू नका. केवळ वैराग्याचे रसिक व्हा आणि भगवंताच्या भक्तीत बुडून जा."

संसारमोहाच्या त्यागाशिवाय भक्ति होत नाही. कशाही प्रकारे मनाला सांसारिक विषयांतून विरागी करून प्रभुप्रेमांत लावा, जोपर्यंत संसारासक्ति नष्ट होणार नाही तोपर्यंत भगवदासक्ति सिद्ध होणार नाही. सांसारिक विषयांत फसून राहू नका. भगवत्‌चरणरत रहा. हा देह आपला नाही. कारण आपण ह्याला नेहमी करीता ठेवू शकत नाही. तर मग आणखी कोण आपले होऊ शकेल ?

"तात ! आतां पुष्कळसे आयुष्य तर निघून गेले आहे आणि थोडेसे शिल्लक राहिले आहे. गंगाकाठी जाऊन भगवंताची सेवा करा. मनाला विशेष शोक लागला तर मग कृष्णलीलांच्या कथांमध्ये

लावा. भाव ठेवाल तर हृदयपरिवर्तन होईल. सेवा आणि सत्कर्मांत परदोषदर्शन विघ्न करते. म्हणून परदोषदर्शनाचा त्याग करा. तात, तुम्ही आता ईशसेवेंत राहून जीवन प्रभुमय करा. प्रभुमय जीवन करण्यासाठी ध्यान, जप आणि पाठ अतिआवश्यक आहेत.''

**१६. उत्तम पाठाची सहा अंगे :**

उत्तम पाठाची सहा अंगे आहेत– मधुरता, स्पष्ट शब्दोच्चार, पदच्छेदाचें ज्ञान, धैर्य, लय सामर्थ्य आणि मधुर कंठ. पाठ शांत चित्ताने करा. समजल्याशिवाय आणि अतिजलद पाठ करू नये. चंचल मनाला विवेकरूपी बोधाने सांभाळा आणि ध्यानमग्न ठेवा. संकल्प-विकल्पापासून मनाला दूर ठेवा. मानसिक सेवेमध्ये मनाची धारणा अखंड राहिली पाहिजे. अशी सेवा दिव्य होते. उच्चस्वराने जपपाठ केल्याने मन एकाग्र होते, निश्चल होते.

आत्मदेव गंगाकाठी आले. मानसी सेवा करू लागले. एकांतांत बसून मनाला एकाग्र करूं लागले. आत्मदेव सतत भगवंत-ध्यानांत तन्मय झाले आहेत.

निवृत्तींत सतत सत्कर्मे झाली पाहिजेत, नाहीतर निवृत्तींतही पाप प्रगट होईल.

आत्मदेव दशमस्कंधाचा पाठ करीत आहेत. याचा नित्य पाठ केल्याने तो खरोखरच देव झाला. आत्मा जेव्हां परमात्म्यांत मिळून जातो तेव्हां तो देव बनतो. आज जीव आणि शिव एक झाले आहेत. जीव आणि शिवाचे मिलन झाले. भागवताचा जो आश्रय घेईल तो भगवान होईल.

**१७. स्वरूपसेवा आणि नामसेवा :**

परमात्म्याची दोन स्वरूपे आहेत. एक अर्चनस्वरूप आणि दुसरे नामस्वरूप. श्रीमद्भागवत भगवंताचे नामस्वरूप आहे. सामुग्रीने, साहित्याने ज्याची पूजा-अर्चना होते ते अर्चनस्वरूप आहे. नामस्वरूपाशिवाय अर्चनस्वरूप म्हणजेच स्वरूपसेवा फलद्रूप होत नाही. स्वरूपसेवा जशी झाली पाहिजे तशी होत नाही. त्याचे कारण असे कीं मनाची शुद्धि झालेली नसते. मनाच्या शुद्धीविना स्वरूपसेवेचा आनंद मिळत नाही. साधक जोपर्यंत संसाराशी संबंध ठेवतो, माया-ममत्व राखतो तोपर्यंत त्याला स्वरूपसेवेचा आनंद मिळत नाही. जर सेवाच करायची आहे तर संसाराचा मोह, स्नेह सोडला पाहिजे. सांसारिक विषयांशी संबंध ठेवायचा असलाच तर विवेकपूर्वक ठेवा. तसें पाहिले तर अग्नी सर्व कांही भस्म करून टाकतो. पण विवेकाने त्याचा वापर केला तर तो उपयोगी होतो. अग्नी नसेल तर माणसाचे पोषणच होणार नाही. ह्या संसारामध्ये मनुष्यास जोपर्यंत आपल्या शरीराचें भान आहे तोपर्यंत तो संसार सोडू शकत नाही. मन तर पुनःपुन्हा मायेचा विचार करीत असते; म्हणून ते मलीन होते. नामसेवा मनाच्या शुद्धीकरिताच आहे. जोपर्यंत स्वरूपसेवेमध्ये मन एकाग्र होणार नाही, तोपर्यंत नामसेवा करा.

स्वरूपसेवेंत आनंद येत नाही. कारण मन व्यग्र आहे, चंचल आहे. आपले मन ईश्वराला सोडून पुन्हा पुन्हा विषयांकडेच जात असते. मनुष्याचें मन संसाराच्या व्यवहारांत इतके तद्रूप होऊन जाते की त्यामुळे ते पाप करते आणि त्यास आपण करीत असलेल्या पापाचें भान राहात नाही. स्वरूपसेवा करता करता हृदय पाझरले, डोळे ओले झाले, आनंद झाला आणि अंतःकरणांत सात्त्विक भाव जागृत झाला तर मानावे कीं सेवा सफल झाली आहे. हृदयाच्या भावनेशिवाय केली गेलेली सेवा सफल होत नाही. जीव शुद्ध होऊन भगवंताची सेवा करील तर भगवंत प्रेमाने प्रसन्न होतात.

मनांत अनेक जन्मांची मळ भरलेली असते आणि स्वरूपसेवेमध्यें तर मनाची शुद्धि अतिआवश्यक

आहे. मन शुद्ध नसते म्हणून स्वरूपसेवा सफल होत नाही. मनाला शुद्ध करण्यासाठी नामसेवेची आवश्यकता आहे. श्रीमद्‌भागवत मनांतील मळ नष्ट करते. कलियुगांत नामसेवा प्रधान आहे. भागवत भगवंताचे नामस्वरूप आहे. नामच ब्रह्म आहे. नामांतच परमात्मा आहे, आणखी अधिक काय सांगावे ? नाम हे परमात्म्याहूनही श्रेष्ठ आहे. ईश्वर दिसत नाही. त्याच्याशी स्नेह करणे कठीण आहे. नामस्वरूप तर स्पष्ट दिसते.

ज्याचे प्रत्यक्ष दर्शन झालेले नसेल, त्याच्या नावाला धरून ठेवाल तर तो अवश्य दृष्टिगोचर होईल. ईश्वराचे स्वरूप सगळ्यांसाठीच अनुकूल आणि सुलभ नाही, परंतु नामस्वरूप सुलभ आहे. ज्ञानी पुरुष नामावर निष्ठा ठेवतात. नामच ईश्वराचे स्वरूप आहे. श्रीरामांनी तर कांही जीवांचाच उद्धार केला होता. परंतु त्यांच्या नामाने अनेकांचा उद्धार झालेला आहे. श्रीकृष्ण स्वतः जेव्हां भूतलावर विराजमान होते तेव्हां जितक्या जीवांचा उद्धार झाला होता त्याच्या तुलनेत त्यांच्या नामसंकीर्तनाने अगणित लोक संसार-सागर पार करून गेले.

मोठ्यात मोठे पाप कोणते आहे ? प्रभुनामावरील निष्ठेचा अभाव. नामसाधन सरळ सोपे आहे. भागवत भगवंताचे नामस्वरूप आहे. श्रीमद्‌भागवताचा आश्रयच नामाचा आश्रय आहे. जो भागवताचा आश्रय घेतो तो भगवान होत असतो. जर संस्कृतचे ज्ञान असेल तर दररोज दशमस्कंध, विष्णुसहस्रनाम आणि शिवमहिम्नस्तोत्राचा पाठ करा. पाठ अर्थज्ञानासहित करा. अर्थज्ञानविहीन केलेला पाठ अधम पाठ असतो.

आत्मदेव भागवताचा आश्रय घेऊन दशमस्कंधाचा पाठ करीत होते. निव्वळ दशमस्कंधाच्या पाठानेच त्यास मुक्ति मिळाली होती.

भगवंताची प्राप्ति लवकर होत नाही. त्याची कृपाही लवकर होत नाही. याचे कारण आपण त्यासाठी कष्ट सहन करत नाहीं. जीव कष्ट सहन करायला कचरतो. भगवंताच्या कृपेसाठी दुःख सहन करा. जो स्वेच्छया कष्ट सहन करतो त्याला यम दुःखी करीत नाही.

आत्मदेव आसन घालून दहाबारा तास बसत असे.

आसनांत शांत चित्ताने बसा. ज्ञानी लोकांना जो आनंद समाधींत मिळतो तोच आनंद तुम्हासही कथेत मिळेल. ज्या लीलेची ही कथा आहे ती प्रत्यक्ष होतच आहे, अशी भावना कराल तर आनंद मिळेल. कल्पना करा की तुमचें मन ईश्वराशी तदाकार झाले आहे. दृश्यामधून दृष्टी निघून जर ती द्रष्टयांत स्थिर होईल तर मनाचा निरोध होऊन आनंद प्रकट होईल.

गोकर्णाला वाटले की धुंधुकारीचा व्यवहार त्याला देखील विक्षेपरूप होईल म्हणून तोही वनांत जाऊन बसला. इकडे धुंधुकारी त्या वेश्यांना प्रसन्न करण्याकरता चोऱ्या करू लागला.

सूत सावध करतात –

जीव प्रत्येक इंद्रियाचा स्वामी आहे. परंतु इंद्रियांनी जीवावर प्रभुत्व स्थापल्याकारणाने मनुष्य जर इंद्रियाधीन झाला तर जीवन कलुषित होते. मन ईश्वराशी मैत्री करील तरच सुखी होईल. ईश्वरापासून विभक्त झाले की दुःखी होते. जीव मात्र मनसुखा असतो.

धुंधुकारी अनिष्ट मार्गांनी अर्थार्जन करीत होता. तो राजाच्या महालांत चोरी करण्यासाठी गेला. अलंकार इत्यादी चोरून आणले आणि वेश्यांना दिले. वेश्यांनी विचार केला की हा जर जिवंत राहिला तर कोणत्याही दिवशी आपण पकडले जाऊ. असे झाले तर राजा आमचे सर्व धन हिसकावून घेईल आणि कदाचित आम्हाला आपली शिक्षाही भोगावी लागेल. तेव्हां या धुंधुकारीला मारूनच टाकले

तर चांगले होईल. असा विचार करून त्यांनी धुंधुकारीला दोरीने बांधले आणि त्याच्या गळ्याला गळफांस लावला. तरी पण धुंधुकारी मरत नाही. अतिपाप्यांचा मृत्यू देखील लवकर होत नाही. वेश्यांनी जळते निखारे धुंधुकारीच्या तोंडांत कोंबले आणि त्याला मारून टाकले.

पांच इंद्रियेंच शेवटी जीवाला मारतात, कष्ट देतात आणि त्यावेळी जीव तडफडतो, तळमळतो.

—आणि त्यानंतर वेश्यांनी धुंधुकारीचे शरीर मातींत गाडून टाकले. त्याच्या शरीराला अग्निसंस्कार देखील वेश्यांनी केला नाही.

ज्याचे चरित्र पाहिल्याबरोबरच किळस उत्पन्न होईल तोच धुंधुकारी. धुंधुकारी आपल्या कुकर्मामुळेच एक भयंकर प्रेत बनला. पापीच प्रेत होत असतो. पापी यमपुरींत देखील जाऊ शकत नाही. तो तर प्रेतच होतो.

गोकर्णाला धुंधुकारीच्या मरणाचें वृत्त कळलें. तो गयेस गेला आणि तेथें धुंधुकारीची श्राद्धक्रिया केली.

**१८. गया-श्राद्धाची कथा:**

गया-श्राद्ध श्रेष्ठ असते. तेथे विष्णुपाद आहेत. त्याची कथा अशी— गयासुर नावांचा एक राक्षस होता. त्याने तप करून ब्रह्मदेवास प्रसन्न करून घेतले. ब्रह्मदेवाने वर मागण्याविषयी म्हटले तर तो ब्रह्मदेवाला म्हणाला, 'तुम्ही मला काय वरदान देणार? उलट तुम्हालाच कांही मागायचे असेल तर माझ्याजवळ मागा. त्याच्या तपश्चर्येमुळे देव देखील भयभीत झाले. त्यांना हा असुर कसा मरेल याचीच चिंता वाटूं लागली. ब्रह्मदेवांनी विचार केला कीं ह्याच्या शरीरावर दीर्घकालपर्यंत यज्ञ करीत राहिल्यानेच हा मरेल. म्हणून ब्रह्मदेवांनी यज्ञासाठी त्याचे शरीरच मागून घेतले. यज्ञकुंड गयासुराचे छातीवर बनविले गेले. शंभर वर्षेपर्यंत यज्ञ चालू राहिला तरी पण गयासुर मेला नाही. यज्ञाची पूर्णाहुती झाल्यावर तो उठू लागला. ब्रह्मदेवाला काळजी पडली. ब्रह्मदेव भयभीत झाले. त्यांनी भगवंताचे स्मरण केले— श्री नारायणाचे ध्यान केले. नारायण भगवान प्रगट झाले आणि त्यांनी गयासुराच्या छातीवर आपले दोन्ही पाय ठेवले. मरतेवेळी गयासुराने भगवंताकडून वर मागून घेतला कीं, या गयातीर्थांत जो कोणी श्राद्ध करील त्याचे पितर सद्गति पावतील— त्याचे पितर मुक्त होतील. भगवंतानीं गयासुराला सुद्धा मुक्ति दिली. भगवंताच्या वरदानामुळे गयेंत पितृश्राद्ध करण्याने पितरास मुक्ति मिळते.

गोकर्ण त्यानंतर आपल्या घरी परतला. रात्रीचे वेळी त्याने कोणाच्या रडण्याचा आवाज ऐकला. माणूस पाप करताना हसत असतो पण पापाची शिक्षा भोगताना तो रडतो.

**१९. धुंधुकारीला प्रेतयोनीची प्राप्ति:**

एकाच आईबापांची मुले असून सुद्धा गोकर्ण देव अन् धुंधुकारी प्रेत! देव होणे किंवा प्रेत होणे हे ज्याच्या त्याच्या हातांत आहे.

गोकर्णानें विचारले, 'तू कोण आहेस? तुझी अशी दशा कशाने झाली? तू भूत आहेस की पिशाच्च की राक्षस?

प्रेत म्हाणाले, 'मी तुझा भाऊ धुंधुकारी आहे. फार पाप केल्याकारणाने माझी ही अशी दशा झालेली आहे. मला प्रेतयोनि मिळाली आहे.

गोकर्णानें म्हटले, 'तुझ्यासाठी मी गयेला पिंडदान केले तरी तू प्रेतयोनीपासून मुक्त कां झाला

नाहीस ? गया श्राद्ध केल्याने मुक्ति मिळते. ''

प्रेत म्हणाले, '' गया श्राद्धशतेनाऽपि मुक्तिर्मे न भविष्यति '.. वाटेल तितके गया-श्राद्ध करा पण मला मुक्ति मिळायची नाही. ''

केवळ श्राद्ध केल्यानेच उद्धार होऊ शकत नाही.

गोकर्णनि विचारले, ' तुला सद्‌गति कशी मिळेल ? काय करू ? ' मग विचार करून म्हणाला, ' मी उद्या सूर्यनारायणाला विचारीन. ' दुसऱ्या दिवशी गोकर्ण सूर्यनारायणाला अर्घ्य देऊन म्हणाला, ' महाराज, थोडे थांबा. ' सूर्यनारायण थांबले. हे त्रिकाल संध्येचे सामर्थ्य आहे.

ब्राह्मणाचे कर्तव्य आहे कीं त्याने त्रिकाल संध्या केव्हांही चुकवू नये. त्रिकाल संध्या करणारा कधी मूर्ख होत नाही व कधी दरिद्री होत नाही.

सूर्यनारायणाने विचारले, '' काय काम आहे माझे ? ''

गोकर्णनि सांगितले, ' माझ्या भावाच्या उद्धाराचा कांही उपाय सांगा. '

**२०. भागवतश्रवणाने प्रेतयोनीपासून उद्धार :**

सूर्यनारायणांनी सांगितले की, '' तुझ्या भावाला सद्‌गति द्यायची इच्छा असेल तर भागवताची विधिपूर्वक कथा कर. '' श्राद्धाने ज्या आत्म्याची मुक्ति होत नाही त्याची मुक्ति भागवत करते. भागवतशास्त्र हे मुक्ति-शास्त्र आहे. भागवताने मुक्ति मिळते.

धुंधुकारीला पापापासून मुक्त करण्यासाठी गोकर्णनें भागवत-सप्ताहाचे आयोजन केले. धुंधुकारी तेथे आला पण त्याला बसायला जागा मिळाली नाही; म्हणून तो सात गांठी (पेरे) असलेल्या एका बांबूत बसला. दररोज एकानंतर एक गाठ (पेर) तुटू लागली. सातव्या दिवशी परीक्षिताच्या मोक्षाची कथा झाली. बांबूतून दिव्य पुरुष बाहेर निघाला. गोकर्णाला नमस्कार करून तो म्हणाला, '' भाऊं, प्रेतयोनींतून तू मला मुक्त केले आहेस. ''

'' धन्य आहे भागवताची कथा ! ''

जड बांबूच्या गाठी तुटतात तर मग चेतनाच्या कां न तुटाव्या ? विवाहाचे वेळी दोन व्यक्तींना धाग्याने बांधले जाते; पतिपत्नीचा स्नेह ही ग्रंथी आहे. ही ग्रंथी सुटणे फार कठीण आहे. परमात्म्याची सेवा करण्यासाठी एकमेकांची जोडी झालेली असते असा विचार केला तर पतिपत्नी सुखी होऊ शकतात.

बांबूमध्ये अर्थात वासनांमध्ये धुंधुकारी राहिला होता. बांबूच्या सात गाठी म्हणजे वासनेच्या सात गाठी. वासनाच पुनर्जन्मास कारण असते म्हणून वासनेचा नाश करा. वासनेवर विजय मिळविणे हाच सुखी होण्याचा उपाय आहे– मार्ग आहे. मनुष्य मोह सोडू शकत नाही. वासना म्हणजेच आसक्ति. ती सात प्रकारची असते– १) बायकोविषयी आसक्ति (पतिपत्नीची आसक्ति), २) पुत्रांची आसक्ति (पिता-पुत्रांची), ३) व्यावसायिक आसक्ति, ४) द्रव्याची आसक्ति, ५) कुटुंबाची आसक्ति, ६) घरादाराची आसक्ति, आणि ७) गावाची आसक्ति. या सर्व आसक्तींचा त्याग करा.

शास्त्रांत काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर व अविद्या यांना सात गाठी म्हटले आहे. यांत जीव बांधलेला आहे. त्याला मुक्त करायचा प्रयत्न करायचा आहे.

बांबू वासनेचें रूप आहे. जीव वासनेंत अडकलेला आहे. वासनेमुळेच जीवांत जीवभाव आलेला आहे. वासनेच्या ग्रंथी जोपर्यंत तुटणार नाहीत तोपर्यंत जीवभावाचें निर्मूलन होत नाही.

भागवतकथेच्या श्रवणाने वासनेची प्रत्येक ग्रंथी तुटते. भागवतकथेमुळे या ग्रंथी तुटतात. प्रभुप्रेम

वाढले तर आसक्तीच्या गाठी तुटू लागतील. श्रीभगवंताच्या नावाचा जप कराल, आणि तेच एक सत्य आहे असे मानून त्याचे नित्य स्मरण कराल तर वासनेच्या गाठी तुटतील.

एका शेटजीचा नियम होता, तो बारा वर्षांपासून कथा ऐकत आला होता. एक ब्राह्मण रोज कथा सांगायला येत असे. एके दिवशी शेटजींना बाहेर जाण्याचा प्रसंग आला. कथाश्रवणाचा नियम भंग कसा करावा? त्याने ब्राह्मणाला सांगितले की, "मी उद्या कथा ऐकू शकणार नाही, माझ्या नियमाचे काय होईल?" ब्राह्मण म्हणाला, "तुझ्या मुलाने कथा ऐकली तरी चालू शकेल". गृहस्थाने विचारले, "कथा ऐकून तो वीतरागी झाला तर?" ब्राह्मण म्हणाला, "तू बारा वर्षांपासून कथा ऐकत आहेस तरी पण तुला वैराग्य आलेले नाही, तर मग एकच दिवस कथा ऐकून तुझा मुलगा विरागी कसा होईल?" यजमान म्हणला, "आम्ही तर रोज कथा ऐकतो पण मनाची गाठ सोडत नाही". असे करू नका. कथा ऐकून मनाची गाठ सुटली पाहिजे.

जोपर्यंत जीव संसारसुखाचा त्याग मनापासून करणार नाही, तोपर्यंत त्याची भक्ति सिद्ध होत नाही. भोगाचा त्यागही करायचा नाही आणि भक्ति पण करायची आहे. हे कसे होऊ शकेल? हळूहळू मनाला, स्वभावाला सुधरविले पाहिजे. स्वभाव सुधारल्यावरच भक्ति दृढ होते.

ज्ञान आणि वैराग्य दोहोंनाही पुष्ट करण्यासाठीच ही भागवतकथा आहे.

भगवंताच्या चरणी आश्रय घेऊनच महापापी धुंधुकारी देवासारखा झाला. धुंधुकारी म्हणतो कीं, 'या कथेमुळेच माझ्यासारख्या पाप्यालाही परमगति मिळाली".

धुंधुकारीला नेण्यासाठी पार्षद विमान घेऊन आले. गोकर्णाने पार्षदांना विचारले, "केवळ धुंधुकारीलाच न्यायला कां आले? आणखी कोणाला नेण्यासाठी कां आले नाही?"

पार्षद म्हणाला, "तो धुंधुकारी भागवतकथा श्रवण करताना एकाच आसनावर बसत होता, निराहार राहात होता आणि रोज कथेचे श्रवण करीत होता.

प्रभुचरणी मनाचा वास असणें म्हणजेच उपवास होय. उपवासाच्या वेळी केवळ न खाण्याने उपवास होत नाही.

कथा ऐकून फक्त धुंधुकारीलाच मुक्ति कां मिळाली? धुंधुकारीप्रमाणेच कथा श्रवण केली पाहिजे. त्याने कथेचे मनन-निदिध्यासन केले म्हणूनच त्याला मुक्ति मिळाली.

श्रवण, मनन आणि निदिध्यासाने ज्ञान दृढ होते. "दृढतेविना ज्ञान व्यर्थ आहे. त्याचप्रमाणे बेपर्वाईने केलेले श्रवण व्यर्थ जाते. संदेहभावाने मंत्र व्यर्थ होतो. व्यग्र चित्ताने केलेल्या जपाचेही कांही फळ मिळत नाही." संदेह केल्याने मंत्र, आणि चित्ताच्या इतस्ततः भटकण्यानें जप फलद्रूप होत नाही. मनापासून कथा ऐकली नाही तर त्या कथा-श्रवणाचा काय लाभ? त्याचे फळ मिळत नाही. कथा ऐकतेवेळी तन, मन आणि घरचे भान विसरून गेले पाहिजे. घरदार विसरून तन्मयतेने कथा ऐकली पाहिजे. मी ईश्वराशी तन्मय होऊ इच्छितो अशी भावना ठेवा. कथा ऐकून आणि मनन करून जीवनांत (वागणुकीत) उतरवाल तर कथाश्रवणाचे सार्थक होईल. कथा ऐकून जीवनांत एक ध्येय (लक्ष्य) निश्चित करा. भगवत्स्वरूप भागवताची कथा ऐकून कांही ग्रहण करा. कथेचा एक शब्दही मनांत वागवाल तर जीवनाचा उद्धार होईल.

सगळ्यांना जाणवू लागले की, धुंधुकारीप्रमाणें आम्ही कथा ऐकली नाही म्हणून आम्हाला त्याच्यासारखी गति मिळाली नाही. कथेचे मनन कराल तर ते उत्तमच आहे. आणि मनन न करताही केवळ श्रवण कराल तरीही लाभ आहेच. यानंतर गोकर्णाने श्रावण महिन्यांत दुसऱ्यांदा कथा आयोजित

केली आणि सगळ्यांचा उद्धार झाला.

त्यावेळी महाराज्ञी भक्ति तेथे प्रगट झाली, ज्ञान आणि वैराग्य यांसह आली. या कथेने भक्ति महाराज्ञी प्रगट होत असते. ज्ञान आणि वैराग्याबरोबर भक्ति वाढेल तर मुक्ति मिळेल. ज्ञान आणि वैराग्याविना भक्ति करून मुक्ति मिळत नाही. भक्ति महाराणी आनंदित झाली आणि ज्ञान, वैराग्यांसह नृत्य करू लागली.

मूर्च्छित आणि क्षीण ज्ञानाला पुनः जागृत करून पुष्ट करण्यासाठी ही भागवताची कथा आहे.

गोकर्णाच्या सभामंडपांत भगवान प्रकट झाले. त्यांनी गोकर्णाला सांगितले कीं, "मी तुझ्या कथाकीर्तनाने प्रसन्न झालो आहे. तू कांही तरी वर माग." त्यावेळी सनत्कुमार म्हणाले की, जो मनुष्य श्रीकृष्णाचे कथाकीर्तन करतो, अशा वैष्णवभक्ताच्या हृदयांत आपण विराजमान असता सर्वांना सद्गति मिळाली आहे.

वैकुंठांत जो आनंद मिळतो तो आनंद भागवताच्या कथेत मिळतो. परंतु अट अशी आहे कीं, मोठ्या प्रेमाने या कथेचे श्रवण केले पाहिजे. कथाश्रवणाच्या वेळी या जगताची विस्मृति झाली पाहिजे. भागवत असा ग्रंथ नाही कीं जो मरणोत्तर मुक्ति देईल. हा ग्रंथ तर मृत्यूच्या आधीच मुक्ति देतो. भागवत हे मुक्ति मिळवून घेण्याचे शास्त्र आहे.

वेदान्ताचे दिव्य सिद्धान्त श्री व्यासांनी या माहात्म्यांतच गोवून दिले आहेत. सहावा अध्याय विधीच्या निरूपणासाठी आहे.

सत्कर्म विधिपूर्वक केले असता ते दिव्य होते. सत्कर्मासाठीं काळाचें बंधन नाही. सत्यनारायणाचे कथेंतही सांगितले आहे– 'सत्कार्य करण्यांत उशीर लावू नका.'

धर्मराजाजवळ येऊन एका याचकाने दान मागितले. धर्मराजाने त्यास दुसऱ्या दिवशी येण्यास सांगितले. भीमसेनाने हा वार्तालाप ऐकून विजयदुंदुभी वाजवायला सुरुवात केली. सगळे म्हणू लागले, 'भीम वेडा तर नाही झाला!' कारण विजयदुंदुभी विजयाच्या वेळीच वाजविली जाते. भीमाने याचे कारण सांगितले की, 'आज आमच्या मोठ्या बंधूंनी काळावरही नियंत्रण करून घेतले आहे. ते दुसऱ्या दिवशीही जिवंत राहणार आहेत हे त्यांना कळले आहे. धर्मराजाच्या या कालविजयाच्या निमित्ताने मी दुंदुभी वाजवीत आहे.' धर्मराजास आपली चूक लागलीच कळली.

म्हटलेच आहे– 'न जाण्यूं जानकीनाथे सवारे सुं थवानु छे' म्हणजे भगवान जानकीनाथ श्रीरामही जाणू शकले नाहीत की उद्या सकाळी काय होणार आहे.

धर्मराजाने त्या याचकास ताबडतोब बोलावून यथायोग्य दान दिले. सत्कर्म तात्काळच केले पाहिजे.

**२१. श्रीमद्भागवत-सप्ताह कथाविधि:**

भवरोगाचे औषध म्हणजेच भागवतकथा. जीवमात्र रोगी आहे. सर्वात दुःखदायी रोग आहे– ईश्वरापासून वियोग. या रोगाच्या निवारणार्थ भागवताचा आश्रय घ्या. श्रीकृष्णापासून विरहरूपी रोग दूर करण्याचे औषध हे भागवतशास्त्र आहे. रोगनिवारणार्थ औषध घेत असतानाच्या कालांत आहार-विहाराची कांही पथ्ये आम्हाला पाळावी लागतात. तसेच कांही कथाश्रवणाचे वेळीही आवश्यक आहे. शुभमुहूर्तावर कथेचा प्रारंभ झाला पाहिजे. कथा सांगणाऱ्या वक्त्यासाठीही काही लक्षणे सांगितली आहेत. पहिले लक्षण आहे विरक्त भाव. श्री शुकदेव जगतापासून दूर नव्हते तरी पण ते निर्विकारी होते. आपण देखील जगतात राहतो-पाहतो पण आपली दृष्टी निर्विकार (विकाररहित) नाही. श्री शुकदेवांना

ब्रह्मदृष्टी होती. प्रत्येक स्त्री-पुरुषाकडे ते भगवत्भावाने पाहात असत.

प्रत्येक नरनारीकडे भगवत्भावाने पहा.

सूत सांगतात–

वैराग्याचा अर्थ काय आहे? उपभोगासाठी अनेक पदार्थ सुलभ असताना देखील मन त्याकडे आकर्षित न होणे हेच वैराग्य होय. जगाचा त्याग करण्याची कांही आवश्यकता नाही. परंतु भोगदृष्टीने जगताकडे पाहण्याच्या वृत्तीचा त्याग करायचा आहे. आपली विकारी दृष्टी बदलायची आहे. जगताकडे कामदृष्टीने– भोगदृष्टीने पाहू नका. जोपर्यंत दृष्टीचा दोष जात नाही तोपर्यंत आमची देवदृष्टी होणार नाही.

उपदेशकर्ता ब्राह्मण अर्थात ब्रह्मज्ञ असला पाहिजे. तो धीरगंभीर आणि दृष्टान्तकुशल असला पाहिजे. वक्ता अत्यंत निःस्पृह देखील असला पाहिजे. द्रव्याचा मोह तर सुटतो, पण कीर्तीचा मोह सोडणे कठीण कर्म आहे. जीव कीर्तीचा मोह राखूनच असतो. जो मनुष्य कीर्तीच्या मोहात फसलेला आहे तो भक्ति करू शकत नाही.

जेव्हां जेव्हां कथा श्रवण कराल तेव्हां तेव्हां संसारांतून अलिप्त होऊन कथा श्रवण करा. श्रवणास बसले असता, घरदार, धंद्याविषयी विचार करीत राहण्याने मन विकृत होते. कथेच्या मंडपांत फक्त कथेविषयीच विचार करा. इतर सर्व चिंता सोडून कथा श्रवण करा.

वक्ता आणि श्रोता दोघांनीही डोळे, मन, वाणी, कर्म आणि प्रत्येक इंद्रियांद्वारे ब्रह्मचर्याचे पालन करावे.

मन स्थिर करण्यासाठी उर्ध्वरिता होणे आवश्यक आहे. ब्रह्मचर्य पालनाने ऊर्ध्वरिता होता येते. क्रोधित होण्याने पुण्याचा क्षय होतो. वक्ता आणि श्रोता दोघांनीही क्रोध करू नये. विधिपूर्वक कथा श्रवण केल्याने त्याचे फळ प्राप्त होते. कथा श्रवण करणारे वैष्णव यमपुरींत जात नाहीत, ते वैकुंठांत जातात.

भागवतकथेचे जो प्रेमाने श्रवण करतो त्याचा भगवंताशी संबंध जुळतो. भागवत भगवंताचे साक्षात स्वरूप आहे. ते भगवंताचे वाङ्मयरूप आहे.

वेदान्तांत अधिकार आणि अधिकारी दोहोंचीही चांगली चर्चा केलेली आहे–

सगळ्यांना वेदान्ताचा अधिकार नाही. नित्यानित्य वस्तुविवेक, शमदमादि षट्संपत्ति, इहामुत्र फलभोग विरागाविना वेदान्ताचा अधिकार प्राप्त होऊ शकत नाही. वेदांचे तीन विभाग केले गेले आहेत: कर्मकांड, ज्ञानकांड आणि उपासनाकांड. त्याचप्रमाणे त्यांचे त्यांचे अधिकारीही निश्चित केले गेले आहेत.

भागवत जो कोणी वाचेल, ऐकेल त्या प्रत्येकासाठी आहे. भागवताचा आश्रय घ्याल तर भागवत तुम्हाला अगदी भगवंताच्या मांडीवर बसवील– भगवंताच्या अगदी समीप घेऊन जाईल. ते तुम्हाला निर्भय आणि निःशंक बनवील.

भागवताचे श्लोक १८००० कां आहेत? आठ प्रकृतीचे आठ आणि नववा ईश्वर मिळून पूर्णता झाली. नऊ अंक पूर्णता दाखवितो. खान, पान, व्यवहार, पत्रलेखन इत्यादी सर्वच कार्यांचे विधि भागवतांत सांगितले आहेत. या एकाच ग्रंथाचे अवलंबन केल्याने सगळ्याच प्रकारचे ज्ञान प्राप्त होईल. हा ग्रंथ पूर्ण आहे. भागवत भगवान नारायणाचेच स्वरूप आहे. जगत् आणि ईश्वर, जीव आणि जगत्, जीव आणि ईश्वर इत्यादी संबंधित ज्ञान भागवतापासून प्राप्त होईल.

भागवत किती ऐकले, तर म्हणू की जितके आचरणांत उतरविले गेले तितके. श्रवण केलेल्या

गोष्टीचे मनन करा आणि त्यांना व्यवहारांत आणा. केवळ ज्ञान व्यर्थ आहे. जीवन-व्यवहाराच्या कामीं आणलेले ज्ञानच सार्थ होईल.

गांधीजी देखील म्हणत असत कीं, अडीच मण ज्ञानापेक्षा तोळाभर आचरण श्रेष्ठ आहे.

प्रभूच्या दिव्य सद्‌गुणांना आपल्या आचरणांत आणा. पूर्वजन्माचा विचार करू नका.

जनक राजाने याज्ञवल्क्य ऋषींना पूर्वजन्माची जीवन-लीला पाहण्याविषयी इच्छा व्यक्त केली. याज्ञवल्क्य ऋषींनी निषेध करून म्हटले कीं, ती पाहण्याने दुःखी होशील. तरीपण जनकराजाने दुराग्रह धरला. ऋषींनी त्यास पूर्वजन्माचे जीवन दाखविले. त्यास दिसले कीं आपली पत्नीच पूर्व-जन्मींची आपली आई होती. त्यांना फार दुःख झाले. म्हणून हेच उचित आहे कीं पूर्वजन्माचा विचार करू नये. ह्याच जन्माचें सार्थक करायचा प्रयत्न करावा.

भगवंताशीच विवाह करा आणि इतरांचेही विवाह करवा. तुळस राधाराणीचे स्वरूप आहे. तुळशीच्या 'लग्नाचा' हा अर्थ आहे कीं, आपले स्वतःचे भगवंतांशी लग्न (संबंध) लावा. चातुर्मासांत संयम आणि तप केल्यानंतरच तुळशीचे लग्न होऊ शकते.

संयमाचे पालन कराल, तप कराल तरच ईश्वर भेटेल.

प्रभूसमोर-ईश्वरासमोर जाणे हा तर आत्म्याचा धर्मच आहे.

॥ हरये नमः हरये नमः हरये नमः ॥

॥ जगद्‌गुरू श्रीकृष्ण भगवंतांचा जय असो। ॐ तत् सत् इति ॥

॥ श्रीमद्भागवतमाहात्म्य समाप्त ॥

●●●

॥ श्रीहरिः ॥

# ॥ प्रथम स्कंध ॥

## मंगलाचरण

जन्माद्यस्य यतोऽन्वयादितरतश्चार्थेष्वभिज्ञः स्वराट्
तेने ब्रह्म हृदा य आदिकवये मुह्यन्ति यत्सूरयः।
तेजोवारिमृदां यथा विनिमयो यत्र त्रिसर्गोऽमृषा
धाम्ना स्वेन सदा निरस्तकुहकं सत्यं परं धीमहि॥

**श्रीकृष्णाय नमः॥**

### १. मंगलाचरणाची आवश्यकता :

सत्कर्मात अनेक विघ्ने येत असतात. त्या सर्वांच्या निवारणार्थ मंगलाचरणाची आवश्यकता आहे. कथेस बसण्यापूर्वीही मंगलाचरण म्हणा. शास्त्र सांगते की देव देखील सत्कर्मांत व्यत्यय आणीत असतात. देवांना ईर्षा वाटू लागते कीं कोठे नारायणाचें ध्यान करून हाही आपल्यासमान झाला तर! म्हणून देवांची सुद्धा प्रार्थना करणे आवश्यक आहे. "हे देवहो! कृपा करून आमच्या सत्कर्मात विक्षेप करू नका. सूर्य आमचे कल्याण करो! वरुणदेवानेही आमच्यावर कृपा करावी."

ज्याचें मंगलमय आचरण असते त्याचें ध्यान केल्याने, त्याला वंदन केल्याने, त्याचें स्मरण केल्याने मंगलाचरण होत असते. असा एक परमात्माच आहे. श्रीकृष्णाचें नाम आणि धाम दोन्ही मंगल आहेत. सांसारिक कोणत्याही जीवाचें किंवा वस्तूचे चिंतन करू नका. ईश्वराचें चिंतन-ध्यान जर मनुष्य करील तर त्याची शक्ति मनुष्यास मिळेल.

कर्मामध्ये अमंगलता कामामुळे येत असते. ज्यास काम स्पर्श करतो, प्रभावित करतो त्याचे सर्व कांही अमंगळ होते. श्रीकृष्णास काम स्पर्श करू शकत नाही म्हणून त्यांचे सर्व कांही मंगल आहे. ज्याच्या मनांत काम आहे त्याचें स्मरण केल्याने त्याचा काम तुमच्याही मनांत येईल. सकामाच्या चिंतनाने आपल्यांत देखील सकामता येते आणि निष्कामाच्या चिंतनाने मन निष्काम बनते. शंकरांचे सर्व कांही अमंगल आहे तरी पण त्यांचे स्मरण मंगलमय आहे. कारण त्यांनी कामाला जाळून, भस्मीभूत करून टाकले आहे. मनुष्य जोपर्यंत सकाम आहे तोपर्यंत त्याचें मंगल होणार नाही.

परमेश्वर पूर्णतः निष्काम आहे. म्हणून त्यांचे ध्यान करा - स्मरण करा. परमात्मा बुद्धीच्या

पलीकडे आहे. श्रीकृष्णाचें ध्यान करणारा निष्काम होतो. श्रीकृष्णाचें सतत ध्यान होऊ न शकले तरी कांही हरकत नाही, पण जगांतील स्त्री-पुरुषांचे ध्यान कधीही करू नका. थोडासा विचार केल्याने मन कां बिघडले आहे हे लक्षांत येईल. संसाराचें चिंतन केल्याने मन विकृत होते. प्रभूचे स्मरण-चिंतन केल्याने मन सुधारते.

जीव अमंगल आहे; प्रभु मंगलमय आहे. मनुष्याची कामवृत्ति नष्ट झाली तर सर्व कांही मंगल होईल. जो कामाच्या आधीन नसतो त्याचें सदैव मंगलच होत असते. काम ज्याला हरवील-मारू शकेल तो जीव, आणि कामाला जो पराजित करू शकेल तो ईश्वर.

मनुष्याची स्वतःची अमंगल कर्मेच विघ्ने निर्माण करतात, अन्य कोणाचीही नाही.

प्रत्येक कार्याचा आरंभ मंगलाचरणाने करा. भागवतांत तीन मंगलाचरणें आहेत. प्रथमस्कंधांत वेद व्यासांचे, द्वितीय स्कंधांत श्री शुकदेवांचे आणि समाप्तींत श्री सूतांचे.

शय्येवर निजलेला मनुष्य जास्त पाप करतो.

प्रभातकालीं, माध्यान्हकाली आणि रात्रीं झोपी जाण्यापूर्वीही मंगलाचरण करा.

**२. ध्यान कसे व कोणाचे करावे :**

धीमहि – श्री व्यासांनी ध्यान करून सांगितलें कीं एकाच स्वरूपाचें वारंवार चिंतन करा. मनाला प्रभूच्या स्वरूपांत स्थिर करा. एकाच स्वरूपाचें वारंवार चिंतन केल्याने मन शुद्ध होत असते. परमात्म्याच्या कोणत्याही स्वरूपास इष्ट मानून त्याचें ध्यान करा. ध्यान म्हणजे मानसदर्शन. राम, कृष्ण, शिव किंवा कोणत्याही स्वरूपाचें ध्यान करा. सर्वश्रेष्ठ सत्यरूप प्रभूचें ध्यान करतो असेही व्यासांनी मंगलाचरणांत म्हटलें आहे. व्यास असा आग्रह करीत नाहीत कीं एकमात्र श्रीकृष्णाचेंच ध्यान करा. ते कोणत्याही विशिष्ट स्वरूपाचा आग्रह धरीत नाहीत. ज्या कोणत्या स्वरूपाविषयीं आस्था असेल त्याचेच ध्यान करा. परमेश्वराच्या ज्या रूपाने आम्हाला आनंद होतो तेच उत्तम आहे. एकाच स्वरूपाची अगणित नांवें आहेत. सनातन धर्माप्रमाणे देव अनेक असूनही ईश्वर तर एकच आहे. मंगलाचरणामध्यें कोणत्या एका विशिष्ट देवाचा नामोल्लेख केलेला नाही.

ईश्वर एकच आहे पण त्याची नामें आणि रूपें अनेक आहेत.

कोणाही पुरुषाने राधेच्या महालांत प्रवेश करतां कामा नये, अशी वृषभानूची आज्ञा होती म्हणून साडी नेसून आणि चंद्रावलीचा शृंगार करून श्रीकृष्ण राधेला भेटायला जातात. कृष्ण साडी नेसतात म्हणजे आई होतात.

**'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति।'**

ईश्वराची अनेक रूपें आहेत, परंतु तत्त्व एकच आहे. दिव्याच्या समोर ज्या कोणत्या रंगाची काच धराल त्याच रंगाचा प्रकाश दिसेल.

कोणत्याही देवाचे पूजन करा, पण ध्यान मात्र एका ईश्वराचेंच करा.

रुक्मिणीची भक्ति अनन्य होती. पूजा तर देवीचीच करीत असे. पण ध्यान मात्र कृष्णाचेच करी.

नमस्कार प्रत्येकच देवाला करावा, पण ध्यान मात्र कोणा एका इष्ट देवाचे धरावें. ज्या कोणाच्या रूपांत आस्था असेल आणि रुचि असेल त्याचेंच ध्यान करा. ध्यान, ध्याता आणि ध्येय यामध्यें एकत्व असणे आवश्यक आहे आणि असे एकत्व साधल्यानेच परमानंद मिळत असतो. ध्यानाच्या

वेळीं आणखी कोणाचें चिंतन करू नका. कोणाही चैतन्यमयाचें ध्यान करा, जडाचें नाही.

ध्यान करायचेच असेल तर श्रीकृष्णाचें करा. अनेक जन्मांपासून या मनाला भटकत राहण्याची सवय झालेली आहे. ध्यानांत पहिले तर संसाराचेच विषय येतात. ते मनांत येऊ नयेत म्हणून ध्यान करतेवेळीं परमात्म्याच्या नावाचें वारंवार स्मरण करा ज्यायोगे मन स्थिर होऊ शकेल. उच्च स्वराने नामघोष करा. कृष्णकीर्तनाने जगाचें विस्मरण होते.

परमात्म्याच्या मंगलमय स्वरूपाचें दर्शन करीत करीत कीर्तन करा. वाणी कीर्तन करीत राहील आणि डोळे दर्शन करीत राहतील, तर मन शुद्ध आणि पवित्र होईल. परमात्म्याचें ध्यान केल्याने मन शुद्ध होते. केवळ दान आणि स्नानादींनींच मनाची शुद्धि होत नाही. संसाराचें सतत चिंतन करीत राहिल्याने विकृत झालेले मन ईश्वराचें सतत चिंतन केल्यावाचून शुद्ध होणार नाही. या शरीराइतकी मलीन दुसरी कोणतीच वस्तू नाही. ह्या मलीन अशा शरीरानें परमात्म्याची भेट होऊ शकत नाही. ह्या शरीराचें बीज अपवित्र आहे. परमेश्वराला मनाने भेटायचे आहे. ध्यानाशिवाय मनोमीलन होऊ शकत नाही.

डोळ्याने भगवंताचें दर्शन आणि मनाने स्मरण कराल तर परमात्म्याची शक्ति तुम्हाला मिळेल. ईश्वराचें ध्यान केल्याने ईश्वराचे आणि जीवाचें मिलन होते. ध्यानाविना ब्रह्मसंबंध होऊ शकत नाही. ध्यानाची परिपक्व दशा म्हणजेच समाधी होय. वेदान्तांत ह्यालाच जीवन्मुक्ति मानले गेले आहे. समाधि दीर्घकाल राहिल्याने ज्ञान्यांना जिवंत असतानाच मुक्तीचा आनंद मिळतो. ध्यान करा आणि जप करा असे भागवतांत वारंवार सांगितले गेले आहे. प्रत्येक चरित्रांत या सिद्धान्ताचें वर्णन केले आहे. पुनरुक्ति दोष नाही. कोणताही सिद्धान्त बुद्धींत दृढ होण्यासाठी त्यास वारंवार सांगावे लागते. भागवताच्या प्रत्येक स्कंधांत ह्या जप आणि ध्यानाची कथा आहे. ध्यानाविना ईश्वराचा साक्षात्कार होऊ शकत नाही. वसुदेव-देवकींनी अकरा वर्षेपर्यंत ध्यान केले तेव्हां त्यांना परमात्मा भेटले. भागवताचा आरंभ ध्यानयोगानेच केला गेला आहे. जो मनुष्य ईश्वराचें ध्यान करील तोच ईश्वराला प्रिय होईल.

### ३. दोन साधनमार्ग– ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग :

साधनमार्गाचा आश्रय घेऊन ज्ञानी मुक्त होतात. ज्ञानाच्या योगे ज्ञानी भेदाचा निषेध करतात. ज्ञानाने भेद दूर करणें हे ज्ञानमार्गाचें लक्ष्य आहे. भक्तीच्या योगें भेद दूर करणे हे भक्तिमार्गाचे लक्ष्य आहे. ध्येय एकच आहे. म्हणून भागवताचा अर्थ **ज्ञानयुक्त** आणि **भक्तियुक्त** असा दुहेरी होऊ शकतो. मार्ग आणि साधने वेगवेगळी आहेत परंतु ध्येय तर एकच आहे.

याच कारणाने सगुण आणि निर्गुण दोहोंचीही आवश्यकता आहे. तसें पाहिले तर ईश्वर अरूपच आहे. परंतु वैष्णव जन ज्या रूपाच्या भावनेंत तन्मय होत असतात तसें स्वरूप देखील ईश्वर धारण करीत असतो. सगुण निर्गुण दोन्ही स्वरूपांचें भागवतांत निरूपण आहे. निर्गुण रूपाने प्रभु सर्वत्र आहे आणि सगुण रूपांत श्रीकृष्ण गोलोकांत विराजमान आहेत. इष्ट देवावर पूर्ण विश्वास ठेवून असा. विश्वास ठेवा कीं जगांतील सर्वच जड आणि चेतन पदार्थांमध्ये देवाचा वास आहे. मंगलाचरणाचा सगुण-निर्गुणयुक्त अर्थ होऊ शकतो.

कर्म (क्रिया) आणि लीला यांत फरक आहे. प्रभु जे करील ती असते "लीला" आणि जीव जे करील ती असते "क्रिया" (कर्म).

कर्म बंधनरूप असते, कारण त्यांत कर्ता आसक्त असतो. स्वार्थ आणि अहंकार यांचा संबंध

घडत असतो. ईश्वराची लीला बंधनापासून मुक्त करते. कारण असे कीं ईश्वराला स्वार्थ आणि अभिमान शिवू शकत नाहीत. ज्या कर्मात कर्तृत्वाचा अभिमान नसतो ती असते "लीला". जीवाला परमानंदाचें दान देण्यासाठीच केवळ प्रभु लीला करतात. याच कारणाने लोण्याची चोरी; रास इत्यादी सर्वांनाच व्यास लीला म्हणतात. श्रीकृष्ण लोण्याची चोरी करतात खरी; पण स्वतःकरता नाही, मित्रांकरता.

श्री व्यासांनी ब्रह्मसूत्रांत लिहिले आहे, "लोकवत्तु लीला कैवल्यम्". दैवी जीवांचें कल्याण करण्यासाठीच भगवंत लौकिक जीवांसारखी लीला करतात. जगताची उत्पत्ति लीला आहे, स्थिति ही सुद्धा लीला आहे आणि विनाश देखील लीलाच आहे. विनाशांत देखील आनंद आहे. सर्वांचा द्रष्टा मी आहे. 'मी'चा नाश होत नाही. अहम्-'मी'चा विनाश होत नाही. याला सुद्धा ज्ञानी पुरुष लीलाच म्हणतात. 'मी'सुद्धा ईश्वराचा अंश आहे. परंतु हा 'मी' अहंकार नष्ट झाला पाहिजे.

कृष्ण गांधारीला भेटायला गेले तर गांधारीने त्यांना शाप दिला कीं, तुझ्या वंशांत कोणी सुद्धा राहणार नाही. कारण तू माझ्या वंशांतील कोणाला राहू दिले नाहीस. परंतु कृष्ण यांत देखील आनंदांत आहेत. ते म्हणाले, 'माते, मीसुद्धा याच विचारांत होतो की या सर्वांचा नाश कसा करू? बरेच झाले, तू मला हा शाप दिला.'

"शांताकारम् भुजगशयनम्"! जरी सर्पावर शयन करावे लागले तरी परमात्म्याला शांतीच मिळते. लोकांना शय्या आणि पलंग मिळाला तरी शांति मिळत नाही. श्रीकृष्णाची शांति अशी आहे!

लयसुद्धा भगवंताची लीलाच आहे. जीवाला उत्पत्ति आणि स्थिति चांगल्या वाटतात, पण लय चांगला वाटत नाही.

ब्रह्मदेवाला वेदतत्त्वाचें ज्ञान देणाऱ्या आणि जगाची उत्पत्ति, स्थिती आणि संहाराला कारणीभूत असणाऱ्या परमेश्वराचें आम्ही ध्यान करतो. आदि कवि ब्रह्मदेवास ज्या दिव्य ज्ञानाचें दान केले त्याचें वर्णन आम्ही करीत आहोत. भगवंताच्या ध्यानात तन्मयता नसेल तर संसाराचें ध्यान होत राहील. ते विसरायचा प्रयत्न करा. ध्यानाच्या आरंभी संसार दिसेल. प्रत्येक साधकाचा हाच अनुभव आहे. ईश्वराचें ध्यान होऊ न शकले तर हरकत नाही, परंतु स्त्री-पुरुषांचे (नर-नारींचे), धनसंपत्तीचें (पैशा-अडक्याचे) ध्यान करू नये.

दर्शन केल्यानंतरही ध्यानाची आवश्यकता आहे. मंदिराच्या ओटयावर बसण्याच्या प्रथेचे प्रयोजन ध्यान होय, सांसारिक बडबड नव्हे. मंदिरांत ज्या स्वरूपाचें दर्शन केले असेल त्याचेंच ध्यान आणि चिंतन देवाच्या दारी बसून करावे. सुरवातीस श्री व्यास ध्यान करण्याची आज्ञा देत आहेत. सत्कर्म करतेवेळी अनेकानेक विघ्ने उपस्थित होतात. त्यांचा नाश परमात्म्याच्या ध्यानाने होतो.

मंगलाचरणांत व्यास लिहितांत, "सत्यम् परम् धीमहि।" सत्यस्वरूप परमात्म्याचें आम्ही ध्यान करतो. सत्यस्वरूप परमात्म्याचें ध्यान करतो असे व्यासांनी लिहिले. कारण त्यांनी जर केवळ श्रीकृष्णाचेंच ध्यान करण्याविषयीं लिहिले असते तर शिवभक्त, दत्तात्रेयभक्त, देवीभक्त इत्यादींनी असे मानले असते की भागवत तर फक्त श्रीकृष्णभक्तांचाच ग्रंथ आहे. व्यासांनी कोणत्याही विशिष्ट स्वरूपाच्या ध्यानाचा निर्देश केला नाही. फक्त सत्यस्वरून प्रभूचें ध्यान करायला सांगितले आहे. ज्याला ज्या कोणत्या स्वरूपाविषयीं आस्था असेल त्याचेच त्याने ध्यान करावे.

संसारात निरनिराळ्या लोकांची रुचि एकसारखी नसते. शिवमहिम्नस्तोत्रांत म्हटल्याप्रमाणेः-

**"सांगोपांग वेद, सांख्यशास्त्र, योगशास्त्र, पाशुपतशास्त्र, वैष्णवशास्त्र इत्यादी भिन्न शास्त्रांत आस्था ठेवणारे लोक आपापल्या शास्त्राला सर्वोत्तम समजतात आणि आपापल्या मनोवृत्तीनुसार सरळ**

**किंवा कठीण मार्ग आहे असे मानतात. परंतु खरे तर असे आहे की, वाकड्यातिकड्या निरनिराळ्या मार्गांनि जाऊनही सर्वच नद्या ज्याप्रमाणे एकाच सागराला जाऊन मिळतात त्याचप्रमाणे शास्त्रानुसार सर्वच मतांचा अंतिम हेतू म्हणजे लक्ष्य तर एकच आहे."**

प्रत्येकाच्या रुचि आणि आस्था भिन्न भिन्न असल्याकारणाने शिव, गणेश, रामचन्द्र इत्यादी विविध रूपे परमेश्वर धारण करीत असतो.

'सत्य' अविनाशी, अबाधित, अपरिवर्तनशील आहे. सुख-दुःख, लाभ-हानि इत्यादींमुळे परमेश्वराच्या स्वरूपांत कांही परिवर्तन होत नाही. गीतेत भगवंतांनी सांगितले आहे कीं, **"दुःख प्राप्त झाले असता ज्याचे मन उद्वेगरहित राहते आणि सुख प्राप्त झाले असता जो उन्मत्त होत नाही, गर्वाने मातत नाही तोच स्थितप्रज्ञ होय."** श्रीकृष्ण आपल्या वचनाप्रमाणे आपले जीवन जगले. श्रीरामचंद्रांची देखील राज्याभिषेक आणि वनवास या दोहोंच्याही वेळी एकसारखीच आनंदी वृत्ती होती. श्रीकृष्णांना सोळा हजार राण्यांची सेवा घेत असता, सुवर्णाच्या द्वारकानगरीत, आणि सर्वनाशाचेही वेळी एकसारखाच आनंदानुभव झाला होता.

**४. केवळ परमात्माच एक सत्य, जगत् असत्यः**

श्रीकृष्ण उद्धवाला सांगतात, "उद्धवा, हे सर्व जग मिथ्या आहे. केवळ मीच एक सत्य आहे.

जगत् असत्य आहे. परमात्मा सत्य आहे. भूत, वर्तमान आणि भविष्यांत जो एकच स्वरूप धारण करील तोच सत्य आहे. त्याचमुळे व्यास म्हणतात की, 'आम्ही सत्याचेच ध्यान करतो, अन्य कोणा देवाचे नाही.' म्हणून सत्याशीच स्नेह करा. जर सुखी व्हायचे असेल तर सत्यस्वरूप परमात्म्यावरच प्रेम करा. जगत् असत्य आहे. जगातील पदार्थ दुःखदायक आहेत. व्यवहार करीत असतां जग सत्यच भासते. परंतु पारमार्थिक दृष्टीने, तात्त्विक दृष्टीने पाहिले तर जग सत्य नाही. ह्याच कारणाने ज्ञानी पुरुष जगताचे चिंतन करीत नाहीत आणि जग अनित्य आहे असे वारंवार चिंतीत असतात.

ज्यांना परमात्म्याचे अपरोक्ष ज्ञान होते, ते जगताला महत्त्व देत नाहीत. स्वप्नावस्था संपल्यानंतर ज्याप्रमाणे स्वप्न मिथ्या वाटू लागते, त्याचप्रमाणे भगवंताच्या साक्षात्कारानंतर हे जग मिथ्या वाटू लागते. मनुष्य नेहमी एकाच स्वप्नात राहात नाही. ईश्वराचे एकच स्वरूप आहे. त्याच्यावर काम, क्रोध, लोभ यांचा परिणाम होऊ शकत नाही. तो स्वतः आनंदस्वरूप आहे. ईश्वराशिवाय जे काही दिसते ती सर्व माया आहे, असत्य आहे आणि भासमात्र आहे.

नकली रुपयांविषयी कोणास मोह होत नाही, त्याचप्रमाणे या असत्य नकली संसाराचा मोह करू नका. स्त्री-पुरुषाचे मिलन सुखद असते, परंतु वियोग दुःखद असतो. वियोग अवश्य होणारच आहे हे जाणून या जगाच्या जीवांशी प्रेम करू नका. परमात्मा अविनाशी आहे, यासाठी त्याच्यावरच प्रेम करा.

अंधारांत दोरी सापासारखी दिसते, पण प्रकाश पडल्यावर तिच्या यथार्थ स्वरूपाचे ज्ञान होत असते. ह्या सर्प-रज्जुन्यायाच्या दृष्टीनेंच अज्ञानी मनुष्य असत्य संसाराला सत्य मानतो. जगताचा भास ईश्वरविषयक अज्ञानानेंच होतो. ईश्वराचे ज्ञान न नसल्याकारणानेंच तुम्हांस हे जग सत्य भासत असते. वस्तुतः हे दृश्य जगत् भ्रामक आहे, मिथ्या आहे, परंतु परमात्म्याचा आधार लाभल्यामुळे हे सत्यासारखे वाटते.

परमात्मा सत्य आहे, म्हणूनच जगत् असत्य असताही सत्यासारखे वाटते. जगताचे

अधिष्ठान-आधार ईश्वर आहे आणि ईश्वर सत्य आहे. म्हणून जगत् सत्य वाटते. जरी कदाचित राजानें खोट्या मोत्यांची माळ घातली तरी त्याच्या प्रतिष्ठेमुळें जनता त्या माळेस खऱ्या मोत्यांचीच समजेल. याउलट गरीब माणसाची खरी मोत्याची माळही त्याच्या गरिबीमुळे खोटीच समजली जाईल. याप्रमाणेंच जग म्हणजे खोट्या मोत्यांची माळ आहे आणि ती परमेश्वरानें आपल्या गळ्यांत घालून ठेवली आहे. जगतात राहात असतांही त्यास मिथ्या समजा. दृश्यमान वस्तू नाशवंतच असते. ' यद् दृष्टम् तद् नष्टम्! ' ह्याकरिता बाह्य दृश्यमान जगतास आभासमात्र समजा.

भागवताच्या प्रथमस्कंधाच्या पहिल्या अध्यायाचा दुसरा श्लोक भागवताच्या प्रस्तावनास्वरूप आहे. भागवताचा मुख्य विषय काय आहे, भागवताचा अधिकारी कोण इत्यादी वर्णन दुसऱ्या श्लोकांत केले आहे.

नारदांनी वाल्मीकींना राममंत्राचा जप करायला सांगितले. वाल्मीकींनी चुकून ' राम ' च्या ऐवजी ' मरा ' करून टाकले आणि ' मरा मरा ' जपायला लागले तरी पण त्यांना फळ मात्र राममंत्राच्या जपाचेच मिळाले.

अतिशय पापी माणसाच्या मुखांतून सहजरीतीने ' राम ' म्हटले जात नाही. भगवंताचा हृदयांत प्रवेश झाल्यावर पापाला तेथून बाहेर निघावे लागते. म्हणून पाप देवाचे नाव घेऊ देत नाही. सेवेचे फळ सेवाच आहे. मुक्तीची देखील आशा करू नका.

**५. भागवताचा मुख्य विषय ' निष्काम भक्ति ' :**

भागवताचा मुख्य विषय आहे निष्काम भक्ति. जिथे भोगेच्छा असते तिथे भक्ति नसते. भोगासाठी केलेल्या भक्तीनें भगवंत प्रसन्न होत नाहीत. भोगासाठी भक्ति करणाऱ्याला संसार प्रिय आहे, भगवंत नाही. भगवंतासाठीच भक्ति करा. भक्तीचे फळ भगवत्प्राप्ति असले पाहिजे, संसारसुख नव्हे. भगवंतांनी माझ्या कामीं यावे किंवा भगवंतांनी माझे काम करावे असा विचार जो करील तो वैष्णव म्हटला जात नाही. देवाजवळ कोणी संतती मागतात तर कोणी संपत्ती. मग देव विचार करतो की माझ्यासाठी तर कोणी मंदिरात येतच नाही. सगळेजण आपले आपले मनोरथ माझ्याकडून पूर्ण करवून घेण्यासाठीच येत असतात.

खरा वैष्णव देवाला म्हणेल कीं, ' मी तर आपली ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, मन इत्यादी सर्व काही तुझ्या चरणावर अर्पण करण्यासाठी आलो आहे. ' खरा वैष्णव देवापासून दर्शनही मागत नाही की मुक्तीही मागत नाही. तो काही मागेल तर येवढेच की, ' मी भगवंताच्या सेवेतच तन्मय होऊन राहावे. '

मागण्याने प्रेमाचा प्रवाह आटून जातो, प्रेमाचें प्रमाण कमी होत जाते. ह्याकरितां प्रभूशीं कांहीच मागू नका. प्रभूला आपले ऋणी करा. श्री रामचंद्रांनी राज्याभिषेकाचे प्रसंगी सगळ्याच वानरांना विविध भेटवस्तू दिल्या. परंतु मारुतीला कांहीच दिले नाही. ह्या घटनेमुळे सीतेला दुःख झाले. तिने रामांना सांगितले की, मारुतीलाही काही द्या. राम म्हणाले, ' मी त्याला काय देऊ ? त्याने तर माझ्यावर किती तरी उपकार केले आहेत आणि मला ऋणी करून ठेवले आहे. ' श्रीराम हनुमानाला म्हणतात– " तुझा प्रत्युपकार काय व कसा करावा ? तुझ्या उपकाराची फेड होऊ शकत नाही. "

शुद्ध प्रेमांत घेण्याची भावना असत नाही; देण्याची मात्र असते. मोहाने भोग घेण्याची इच्छा उत्पन्न होते, तर प्रेमाने भोग देण्याची. प्रेमांत मागणे नसते. प्रेमांत अपेक्षेचा भाव जागृत झाला की खरे प्रेम पळून गेले समजावे. भक्तीच्या योगे मागितलेली वस्तू मिळेल जरूर, परंतु भगवंत हातातून

निसटून जातील. नेहमी देणारा निघून जाईल.

गीतेंत सांगितले आहे:

**" सकामी भक्त ज्या ज्या कोणत्या देवाची पूजा करतो त्या त्या सर्व देवांच्या द्वारे मी त्यांच्या इच्छित भोगांची पूर्ति करतो. परंतु माझी निष्काम भक्ति करणारा भक्त मलाच मिळवून घेत असतो. "** देवाजवळ संपत्ति मागाल तर संपत्ति मिळेल, पण तो स्वतः मिळणार नाही. देवाजवळ जितके मागाल तितकेच तो देईल, परंतु प्रेम कमी होईल. व्यवहारांतही आम्हास हाच अनुभव येतो कीं, जोपर्यंत कांही मागितले जाणार नाही तोपर्यंतच दोन मित्रांच्या मैत्रींत प्रेम राहते.

गोपी नयन (दृष्टी) ही कृष्णाला देतात आणि मनसुद्धा! कृष्णाकडून कांही मागण्यापेक्षा सर्वस्वच अर्पण करतात. देवाजवळ कांही मागाल तर प्रेम खंडित होईल. नेहमी असेंच समजा कीं प्रभूने मला सर्व काही दिले आहे.

पुष्कळ लोक दरवर्षी डाकोरजीची यात्रा करीत असतात. ते रणछोडजींना म्हणतात, ' मी सतत सहा वर्षे तुमच्या दर्शनासाठी येत आहे, पण मला अजूनपर्यंत पुत्रलाभ झाला नाही. ' देव त्यांना मुलगा देतो, पण त्याबरोबर असेंही म्हणतो की, ' आता तुझा अन् माझा संबंध संपला आहे. ' अपेक्षेपेक्षा डाकोरजींकडून कांही कमी मिळाले तर समजावे कीं ते परिपूर्ण आहे, परंतु माझी पात्रता कमी असल्यामुळेच मला कमी मिळाले.

निष्काम भक्ति उत्तम असते. वैष्णव मुक्तिची देखील अपेक्षा करीत नाहीत. हरीचे जन तर मुक्ति देखील मागत नाहीत. मुक्तीच्या तुलनेंत भक्तीतच अलौकिक आनंद असतो. भक्तीत ज्याला आनंद मिळतो त्याला मुक्तीचा आनंद तुच्छ-नगण्य वाटतो. वेदान्ती तर मानतात की या आत्म्याला बंधनच नाही, तर मग मुक्तीचा प्रश्नच कसा उद्‌भवतो. वैष्णव मानतात कीं मुक्ति तर माझ्या प्रभूची दासी आहे. दासीपेक्षा माझे प्रभूच केव्हाही श्रेष्ठ आहेत. देव आपले काम करील अशी केव्हाही अपेक्षा करू नका.

रामकृष्ण परमहंसांना कॅन्सरचा रोग झाला. शिष्य म्हणाले की आपण माताजींना सांगा. त्या आपल्या रोगावर उपचार करतील. रामकृष्ण म्हणाले, माझ्या मातेला मी माझ्याकरिता काही कष्ट देणार नाही. भक्तीचा अर्थ हा मुळीच नाही की आपल्या सुखासाठी डाकोरजींना आम्ही कष्ट द्यावे.

मागितल्यामुळे खऱ्या मैत्रीच्या गौरवाची हानि होत असते. खरा समजदार मित्र केव्हांही कांहीही मागत नाही. सुदाम्याची भगवंतावर खरी भक्ति होती. तो दरिद्री होता. त्याच्या पत्नीने श्रीकृष्णाजवळ कांही मागण्यासाठी त्यास पाठविले. सुदामा कृष्णाकडे गेले परंतु कांही मागण्यासाठी नाही, भेटण्यासाठी गेले. त्यांनी द्वारकाधीशाचें वैभव पाहिलें परंतु तोंड देखील उघडले नाही. सुदामजीने विचार केला, आपल्या प्रेमभेटीनेच श्रीकृष्णांचे डोळे इतके पाणावले आहेत मग आपल्या दारिद्र्याविषयीं कळल्याने तर त्यांना कितीतरी दुःख होईल! माझ्या दुःखाचें कारण माझें कर्मच आहे. माझ्या दुःखाची गाथा ऐकवून त्यांना दुःखी करणे योग्य नाही, असा विचार करून सुदामजीने भगवंताजवळ काही मागितले नाही. सुदाम्याची तर एवढीच इच्छा होती कीं, आपण बरोबर आणलेले मूठभर पोहे भगवंतांनी खावे. भगवंतांनी जाणले कीं हा कांही घेण्याकरता आला नाही तर देण्याकरताच आला आहे.

ईश्वर प्रथम आपले सर्वस्व घेतो आणि नंतर मग आपले सर्वस्व आपणांस देतो. जीव निष्काम झाल्यानंतरच भगवंत त्याची पूजा करतात. भक्त जेव्हा निष्काम होतो, तेव्हा देव आपले स्वरूप त्या भक्ताला दान करतो. जीव आपले जीवन टाकून जेव्हा देवाच्या दारी जातो तेव्हा देव पण आपले

देवत्व विसरून भक्ताला भेटतो.

सुदामा दहा दिवसांचा भुकेला होता. तरी पण त्याने आपले सर्वस्व (मूठभर पोहे) प्रभूला दिले. सुदाम्याचे पोहे मूठभरच का असू दे ना, पण त्यावेळचे त्याचे ते सर्वस्वच होते. तशी मूठभर पोह्यांची एवढी किंमत नाही, पण खरे मूल्य तर सुदामाच्या प्रभुप्रेमाचें आहे.

जर का आपल्याकरिता भगवंताला थोडे देखील श्रम पडतील, तर आपली भक्ति व्यर्थ आहे, निष्फल आहे असे समजा. भगवंताजवळ काही मागू नका. न मागण्यामुळे भगवंत तुमचे ऋणी होतील.

गोपींनी भगवंताजवळ काहीच मागितले नव्हते. त्यांची भक्ति निष्काम होती. म्हणून भगवंत गोपींचे ऋणी होते. गोपीगीतांत देखील गोपी भगवंतांना म्हणतात, 'आम्ही तर तुमच्या निःशुल्क, क्षुद्र दासी आहोत. अर्थात निष्कामभावानें सेवा करणाऱ्या दासी आहोत.' त्याचप्रमाणे कुरुक्षेत्रांतही जेव्हा त्या भगवान श्रीकृष्णांना भेटतात तेव्हाही त्या काही मागत नाहीत. त्या फक्त एवढीच इच्छा व्यक्त करतात की, संसाररूपी विहिरीत अडकून पडलेल्यांना अलगद बाहेर काढणारे तुमचे चरणकमल आमच्या घरांत जे आहेत ते आमच्या मनांतही सदा राहोत.

एक सखी उद्धवांना विचारते, "तुम्ही कोणाचा संदेश आणला आहे? कृष्णाचा का? कृष्ण तर येथेच उपस्थित आहेत. लोक म्हणतात, कृष्ण मथुरेला गेले. हे कथन बरोबर नाही. माझे प्रभु श्रीकृष्ण नेहमी मजजवळच असतात. चोवीसही तास सतत आमचा त्यांचेशी संयोग असतो.

गोपींचे प्रेम शुद्ध आहे. त्या जेव्हा केव्हा भगवंताचे स्मरण करतात तेव्हा श्रीकृष्णांना प्रगट व्हावेच लागते. गोपींची निष्काम भक्ति इतकी सत्त्वशील आहे की ती भगवान श्रीकृष्णांना आकर्षित करते.

भगवंताना जर नेहमी बरोबर ठेवाल तर जेथे कोठे जाल तेथे भक्ति करू शकाल. म्हणूनच भक्त तुकाराम म्हणतात, 'एक वेळ मला भोजन न मिळो, परंतु हे विठ्ठला, एक क्षणभरसुद्धा तू मला तुझ्यापासून दूर ठेवू नकोस.'

कृष्ण उद्धवाला म्हणतात, 'उद्धवा, माझ्या गोपी माझ्यामध्ये तन्मयचित्त असणाऱ्या असून **'मदर्थे त्यक्तदेहिका'** आहेत. गोपींचा आदर्श डोळ्यासमोर ठेवा आणि भगवंताची भक्ति करा. सुदाम्याच्या निष्काम भक्तीचे स्मरण ठेवून भगवंताची भक्ति करा. सुदामा आणि गोपींच्या सारखी भक्ति शिका. सुदाम्याची भक्ति निष्काम होती. तुम्ही आपले सर्वस्व भगवंताला अर्पण करा. असे केल्याने भगवंतही आपले सर्वस्व तुम्हांला देतील.

'निष्कामभक्ति' हाच भागवताचा मुख्य विषय आहे. निष्कामभक्तीच श्रेष्ठ भक्ति आहे. निष्कामभक्तीचा उत्तम दृष्टान्त म्हणजे गोपींचे श्रीकृष्णाविषयी निष्काम ममत्व, निष्काम प्रेम, गोपींना तर मुक्तीची देखील इच्छा नव्हती. श्रीकृष्णाचें सुखच आपले सुख आहे असे गोपी समजत असत.

एका सखीने उद्धवांना म्हटले, 'श्रीकृष्णांच्या वियोगानें आमची कशी दशा झालेली आहे हे तर तुम्ही पाहिलेच. मथुरेला गेल्यावर श्रीकृष्णांना सांगा की, मथुरेंत जर तुम्ही सुखाने राहात असलात तर आमच्यासाठी (गोकुळांत) व्रजांत येण्याचे कष्ट घेऊं नका. आमचे प्रेम स्वतःच्या सुखासाठी नसून श्रीकृष्णांना सुखी करण्यासाठी आहे. श्रीकृष्णाच्या वियोगामुळे आम्ही दुःखी आहोत आणि विलापही करीत आहोत. परंतु आम्ही विरही असतां ते जर मथुरेंत सुखी असतील तर ते सुखातच राहोत. आमच्या सुखासाठी त्यांनी येथे येऊ नये. जर त्यांच्या स्वतःच्या सुखासाठी त्यांना येथे यायचे असेल तर त्यांनी अवश्य यावे.'

दुसऱ्याच्या सुखांत सुखाचा अनुभव करणें हेच खऱ्या प्रेमाचे लक्षण आहे.

शांडिल्य मुनींनी आपल्या भक्तिसूत्रांत लिहिले आहे– **'तत् सुखे सुखित्वम् प्रेमलक्षणम्।'**

धन्य आहेत ते व्रजवासी भक्तजन जे श्रीकृष्णास भेटण्यासाठी मथुरेत गेले नाहीत. प्रेमवेडचा अवस्थेंत गोपींना भगवंताच्या निकटतेचा अनुभव येत असतो. सखीला वाटते की, ती जर तिथे कृष्णाला भेटायला गेली; आणि त्यामुळें ठाकुरांना जर कष्ट झाले तर! गांवातील गवळणींशी प्रभू खेळत होते असे सर्वांना समजल्यामुळे त्यांना काही संकोच वाटला तर! नको. मला मथुरेस जायचे नाही. माझ्या प्रेमांत काही ना काही न्यूनता राहिली आहे, म्हणूनच ते मला सोडून निघून गेले आहेत. माझे प्रेम जर खरे असेल तर ते अवश्य गोकुळांत परत येतील. त्यावेळेपर्यंत मी विरहदुःख सहन करीत राहीन.

याचकरिता कृष्ण म्हणतात, 'मला गोकुळात जो आनंद गोपींपासून मिळाला, तो द्वारकेत मिळाला नाही. गोपींचे प्रेम निष्काम होते. भगवंताचा जो आश्रय घेतो तो निष्काम होतो. गोपींच्या अशा निष्काम भक्तीमुळे भगवान् गोपींच्या ऋणांत राहिले आहेत. गोपी-प्रेमाचा महिमा पाहण्याजोगा आहे.

श्रीकृष्ण एकदा आजारी झाले (आजारी होण्याचे नाटक केले). कोणतेच औषध उपयुक्त झाले नाही. तेव्हा प्रभूंनी वैष्णवभक्ताच्या चरणाची धूळ औषध म्हणून मागितली. कोणाही वैष्णवभक्तानें जर आपली चरणरज दिली तर प्रभूचा रोग बरा होऊ शकेल. भगवंतांच्या राण्यांजवळ चरणरज मागितली. सर्वच राण्यांना आश्चर्य वाटले. प्राणनाथांना जर का चरणरज दिली तर मोठे पाप होईल आणि नरकांत जावे लागेल. नरकांत कोणी जावे! आम्ही चरणरज देणार नाही. दुसऱ्यांकडे देखील मागितली. पण कोणी ती देण्यास तयार झाले नाही.

शेवटी ही हकीकत गोपींपर्यंतही पोहोचली. गोपींनी ऐकले की त्यांचे श्रीकृष्ण आजारी आहेत. आम्ही आमच्या चरणांची धूली देण्यास तयार आहोत. त्यासाठी आम्ही कोणतेही दुःख सहन करण्यास तयार आहोत. जर आमचा कान्होबा सुखी होणार असला तर आम्ही नरकयातना देखील भोगू. त्यांनी आपल्या चरणांची धूळ दिली. श्रीकृष्णांचा रोग गेला. प्रकृति उत्तम झाली. खऱ्या निष्काम प्रेमाचीही परीक्षा झाली.

निष्काम भक्तीची प्राप्ती हीच भागवताची फलश्रुति होय. निष्कामभक्ति भगवंतांना प्रसन्न करीत असते. गोपींसारखी निष्कामभक्ति करण्याची सवय लावून घ्या. भक्तीने मुक्ति मिळते. भक्तीशिवाय ज्ञान आणि वैराग्य प्राप्त होऊ शकत नाही. ज्ञानाविना भक्ति आंधळी आहे आणि भक्तीविना ज्ञान पंगु आहे. सवय आणि गरजांवर जर नियंत्रण ठेवले गेले तर मानव प्रभूमध्ये लीन होऊ शकतो.

भागवताचा मुख्य विषय निष्कामभक्ति आहे. भागवत सर्वांकरता आहे. वेदान्त सर्वांकरता नाही. वेदान्ताचा अधिकार सर्वांना दिला गेला नाही. ब्रह्म समजून घेण्याची जिज्ञासा ज्यांना आहे त्यांच्याकरताच वेदान्त आहे. वेदान्ताचा अधिकारी कोण? ज्याने षट्संपत्ति इत्यादींची प्राप्ती करून घेतली आहे तोच वेदान्ताचा अधिकारी असतो. परंतु भागवत तर सर्वांकरताच आहे. तसा तर भागवताचा अधिकार सर्वांनाच सांगितला आहे. तरी पण **'निर्मत्सराणां सतां'** – शुद्ध अंतःकरणाच्या पुरुषांना जाणण्यायोग्य परमात्म्याचें निरूपण यांत केले आहे. ज्ञानी आणि योगी दोघांनाही मत्सर सतावीत असतो.

स्वतः प्राप्त केलेल्या योगसिद्धीच्या बळावर चांगदेव १४०० वर्षे जिवंत राहिले होते. त्यांनी मृत्यूला १४ वेळा परतून लावले होते. ते सिद्धीमध्ये फसलेले होते. त्यांना प्रतिष्ठेचा मोह होता. त्यांनी संत ज्ञानेश्वरांची कीर्ति ऐकली. चांगदेव ज्ञानेश्वरांचा मत्सर करू लागले. काय, हा पोर माझ्याही पुढे निघून गेला? ज्ञानेश्वरांचे वय १६ वर्षांचे होते. चांगदेवांना इच्छा झाली की ज्ञानेश्वरांना पत्र लिहावे.

परंतु पत्रांत संबोधन काय करावें. ज्ञानेश्वर आपणापेक्षा छोटे, फक्त सोळा वर्षांचे आहेत! तेव्हा 'पूज्य' इत्यादी कसे लिहावे? आणि अशा महाज्ञान्याला चिरंजीव तरी कसे लिहावे? आणि ह्या अडचणीचा त्यांना उलगडा होईना. तेव्हा त्यांनी काहीच न लिहिता कोरेच पत्र पाठवून दिले.

संतांची भाषा संतच जाणतात. ते कोरेही वाचून घेतात.

मुक्ताबाईंनी उत्तर लिहिले, '१४०० वर्षांचे तुझे वय झाले तरी पण तू कोराचा कोराच राहिला आहेस!'

चांगदेवांना वाटले अशा ज्ञानी पुरुषाची भेट घेतलीच पाहिजे. आपल्या सिद्धींच्या प्रदर्शनासाठी ते वाघावर स्वार झाले आणि सर्पाचा लगाम बनवून ते ज्ञानेश्वरांना भेटायला येत होते. इकडे ज्ञानेश्वरांना कोणी सांगितले की, चांगदेव वाघावर स्वार होऊन तुम्हाला भेटायला येत आहेत. ज्ञानेश्वरांना समजले की या म्हाताऱ्यास आपल्या सिद्धींचा गर्व झालेला आहे.

चांगदेवांनी आपल्या सिद्धींच्या अभिमानामुळे ज्ञानेश्वरांना 'पूज्य' शब्दाने संबोधित केले नव्हते. ज्ञानेश्वरांनी विचार केला की, चांगदेवाला काही धडा शिकविला पाहिजे. संत भेटायला आले तर त्यांचे आदरातिथ्य केलेच पाहिजे. त्यावेळी ज्ञानेश्वर भिंतीवर बसलेले होते. त्यांनी त्या भिंतीला चालण्याची आज्ञा दिली. दगडी भिंत चालू लागली. भिंत चालताना पाहून चांगदेवांचा अभिमान नष्ट झाला. चांगदेवांच्या लक्षांत आले कीं, आपण तर फक्त हिंस्र पशूंना वश केले होते, पण ज्ञानेश्वरांकडे तर अशी शक्ति आहे की तिच्यायोगे जड पदार्थ देखील चेतन होतात. दोघांची भेट झाली. चांगदेव ज्ञानेश्वरांचे शिष्य झाले.

हा दृष्टान्त शिकवितो की हठयोगाने मनाला नियंत्रित करण्यापेक्षा प्रेमाने मनाला वश करणे अधिक उत्तम आहे. चांगदेव हठयोगी होते. हटात्-बलात्काराने त्यांनी मनाला वश केले होते.

योग मनाला एकाग्र करू शकतो, परंतु तो हृदय विशाल करू शकत नाही. याच कारणामुळे चांगदेव ज्ञानेश्वरांविषयीं ईर्षा बाळगीत होते.

हृदयाला विशाल करते भक्ति. भक्तीने हृदय विरघळते आणि विशालही होते.

मत्सर करणाऱ्याला तर इहलोक आणि परलोक दोन्हीही साधत नाहीत. मनांत मत्सर ठेवू नका. मनांतून मत्सर काढून टाकाल तर मनमोहनाचें स्वरूप मनांत सुदृढ होईल.

कथा ऐकून ती आचरणांत आणणारे लोक फारच कमी असतात. कथा ऐका आणि कथेंतील सिद्धान्त आचरणांत आणा. नुसते 'शुश्रूभिः' नाही पण 'कृतिभिः' व्हा. ह्याकरिता म्हटले गेले आहे की जेव्हा सत्कृत्य करू पाहणारा पुरुष प्रभूविषयी ऐकण्याची इच्छा करतो त्याच वेळी प्रभु तत्काळ त्याच्या हृदयांत येऊन बंदी होऊन जातात. भागवतकथेचा श्रोता निष्काम आणि निर्मत्सरी होऊन जातो.

कोणाही जीवाविषयी बाळगलेला कुभाव ईश्वराविषयींचा कुभाव होतो. मनुष्य जोपर्यंत निर्मत्सरी होणार नाही तोपर्यंत त्याचा उद्धार होणार नाही. जसा भाव तुम्ही दुसऱ्यांविषयी ठेवाल तसाच भाव ते तुमच्याविषयी ठेवतील. दुसऱ्यांशी वैरभाव बाळगणारी व्यक्ति स्वतःशीच वैर करीत असते. कारण प्रत्येकाच्या हृदयात ईश्वराचा वास आहे.

**६. जीवनाचा कल्याणकारी सरळ सोपा मार्ग :**

नैमिषारण्यांत ८८००० ऋषींचे ब्रह्मसत्र झाले. त्या ब्रह्मसत्रांत एकदा सूत उपस्थित झाले. शौनकांनी सूतांना विचारले, "जीवनाचे कल्याण कशाने होऊ शकेल? कल्याणाच्या सरळ आणि सोप्या मार्गाचे

कथन करा. मनुष्यमात्राच्या कल्याणाचा उपाय सांगा. कलियुगांतील शक्तिहीन माणसेही जे करू शकतील असे एखादे साधन सांगा.'' या कलियुगांतील मानव मंदबुद्धि आणि मंदशक्ति आहेत. म्हणून कठीण मार्गाचा अवलंब करू शकत नाहीत. कलियुगांतील माणसे अशी भोगी आहेत की एकाच आसनावर (बैठकींत) एकसारखे आठ तास बसून ध्यान करू शकत नाहीत. ते आपल्याला चतुर समजतात, पण व्यास असे मानण्यास तयार नाहीत.

सांसारिक विषयांच्या मागेच जो लागून राहील त्याला प्रवीण कसे म्हणावे? शास्त्र सांगते, शंभर कामे सोडून भोजन करा, हजार कामे टाकून स्नान करा, लक्ष कामे सोडून दान करा आणि कोटी कामेंही सोडून प्रभूचें स्मरण करा-ध्यान करा-सेवा करा–

**शतं विहाय भोक्तव्यं, सहस्रं स्नानमाचरेत्।**
**लक्षं विहाय दातव्यं, कोटिं त्यक्त्वा हरिं भजेत्॥**

घरांतील कामे आटोपल्यावर माळा फिरवू नका, परंतु जप केल्यानंतरच सर्व कामें करा. कोट्यवधि कामेही सोडून भगवंताचें स्मरण करा. कलियुगांतील मनुष्य जे काम करायचे असते ते करीत नाही, आणि जे करायचे नसते तेच पहिले करतो. याचमुळे व्यासांनी त्यास मंदबुद्धि म्हटले आहे.

''सविस्तर अशी आपण कृष्णकथा ऐकवा. कृष्णाच्या कथेने तृप्ति होत नाही. त्याचप्रमाणे दर्शनानेही तृप्ति होत नाही. द्वारकेच्या कृष्णाचें स्वरूप दिव्य आहे. श्रीनाथजींचे स्वरूप मनोहर आहे. दर्शनाने तृप्ति होत नाही. भगवंताच्या मंगलमय अवतार-कथांचें वर्णन करा. भगवंताच्या लीला ऐकून आमची कधी तृप्तीच होत नाही.''

कलियुगांत जेव्हा अधर्म वाढतो तेव्हा धर्म कोणाच्या आश्रयाने राहतो? पहिल्या स्कंधाचा पहिला अध्याय 'प्रश्नाध्याय' म्हटला जातो.

समुद्र पार करणाऱ्याला जसा कर्णधाराचा आसरा असतो तसेच आपण आम्हाला भेटले आहात. भगवन्, आपण आमचे नावाडी आहात. अशा काही रीतीने कथा सांगा की ज्यामुळे आमची हृदयें द्रवतील. प्रभूच्या कृपेमुळेच आपण आम्हाला लाभले आहात. परमात्म्याच्या भेटीच्या आतुरतेमुळेच संतांची भेट होते. जीव जेव्हा देवाला भेटण्यासाठी व्याकुळ (आतुर) होतो तेव्हा देवाच्याच कृपेने संतांची भेट होत असते.

स्वाद भोजनांत नाही तर भुकेमुळेच स्वाद उत्पन्न होतो. मनुष्याला परमात्म्याच्या भेटीची जोपर्यंत भूक लागणार नाही तोपर्यंत संत भेटूनही त्यांचेविषयीं सद्भाव जागृत होत नाही. याचे एकच कारण म्हणजे जीवाला भगवत्-दर्शनाची इच्छाच झालेली नसते. वक्त्याचा अधिकार सिद्ध झाला पाहिजे आणि श्रोत्याचाही अधिकार सिद्ध झाला पाहिजे.

श्रवणाची तीन मुख्य अंगे आहेत–

**१. श्रद्धा :** मन एकाग्र करून आणि श्रद्धायुक्त अंतःकरणाने सर्व श्रोत्यांनी कथा ऐकावी.

**२. जिज्ञासा :** श्रोत्यांनी जिज्ञासू असावयास पाहिजे. जिज्ञासेच्या अभावी मन एकाग्र होणार नाही. पुष्कळसे जाणून घेण्याची जिज्ञासा नसेल तर कथाश्रवणाने काही लाभ होणार नाही.

**३. निर्मत्सरता :** श्रोत्यांच्या मनांत जगांतील कोणत्याही जीवाविषयी मत्सर असू नये. कथेंत दीन आणि विनम्र व्हायला पाहिजे. पाप करणे सोडून भगवंतांना भेटण्याच्या तीव्र आतुरतेच्या भावनेने कथा श्रवण कराल तर भगवंताचे दर्शन होईल.

प्रथमस्कंधांत शिष्याच्या अधिकाराचें वर्णन आहे.

एक महात्मा रामायणाची कथा सांगत होते. कथा समाप्त झाल्यावर कोणा एका श्रोत्याने महात्म्यांना विचारले की, कथा तर ऐकली, पण हे नाही समजले की राम राक्षस होते की रावण? महात्म्यांनी उत्तर दिले की 'ना राम राक्षस हो ना रावण! राक्षस तर मीच आहे की मी तुला काहीच समजवू शकलो नाही.'

परमात्म्याची कथा वारंवार ऐकाल तर प्रभुविषयी प्रेम जागृत होईल.

शौनकांनी सूताला म्हटले, 'भागवताच्या कथेविषयी आम्हाला श्रद्धा आहे. आपल्याविषयी पण आम्हाला आदर आहे. अनेक जन्मांच्या पुण्याचा उदय झाल्यावरच अधिकारी वक्त्याच्या मुखाने कथा ऐकण्याचे भाग्य प्राप्त होते.'

श्रवणभक्ति प्रथम आहे. रुक्मिणीने आपल्या पत्रांत लिहिले होते की तुमच्याविषयींची आख्यायिका ऐकूनच मला तुमच्याशी लग्न करायची इच्छा झाली. तेथे 'श्रुत्वा' शब्द आहे.

भगवंताचे गुण ऐकून त्याचेविषयी प्रेमभाव उत्पन्न होतो.

श्रोता आणि वक्ता दोघेही विनयसंपन्न असले पाहिजेत. सूत श्रोत्यांना उपदेश करतात. ते म्हणतात, 'कथा ऐकल्यानंतर तुम्हाला जे करण्यायोग्य वाटेल ते तुम्ही करू शकता. तुम्ही शांत चित्ताने ऐकत आहात म्हणून माझें मन भगवंताचे ठिकाणी स्थिर होते. तुम्ही ज्ञानी आहात. प्रभुप्रेमाने वेडे झालेले आहात. माझे कल्याण करण्यासाठी प्रश्न विचारीत आहात. कथा सांगण्याने तर माझी वाणी पवित्र होईल.

शिवमहिम्नस्तोत्रांत पुष्पदंताने देखील म्हटले आहे की शिवतत्त्वाचे वर्णन तसे तर कोण करू शकतो? तरी पण माझ्या वाणीला पवित्र करण्यासाठी वर्णन करीत आहे.

आरंभी सूत शुकदेवांना वंदन करतात. नंतर भगवान नारायणाला वंदन करतात. "नारायणं नमस्कृत्य".

भारताचे मुख्य देव नारायण आहेत. श्रीकृष्ण गोलोकांत निघून गेले. सगळ्याच अवतारांची समाप्ति झाली. परंतु नारायणाची तर समाप्ति झाली नाही व होणारही नाही. भारताचे कल्याण करण्यासाठी ते आजही तपश्चर्या करीत आहेत.

श्री शंकराचार्यांना नर-नारायणाचें दर्शन झाले तेव्हा ते म्हणाले, 'मी महान् योगी आहे म्हणून तुमचे दर्शन होऊ शकले. परंतु कलियुगांतील भोगी जनांना देखील आपले दर्शन होऊं शकेल अशी कृपा करा.' भगवंतांनी तेव्हा बद्रीनारायणाच्या नारदकुंडांत स्नान करण्याची त्यांना आज्ञा दिली आणि त्यांना म्हणाले कीं, 'तिथे तुम्हाला माझी मूर्ति मिळेल, तिची स्थापना करा'. भगवान बद्रीनारायणाची स्थापना आचार्यांनी केली आहे. शंकराचार्यांचा पहिला ग्रंथ 'विष्णुसहस्रनामाची टीका' हा होय.

मनोमार्गे मानसदर्शनाचें पुण्य पुष्कळ सांगितले आहे. नारायणाला मनानेच नमस्कार करा. 'जो जाय बद्री उसकी काया सुधरी' अशी म्हण आहे.

बद्रीनारायण तीर्थक्षेत्रांत लक्ष्मीची मूर्ति मंदिराच्या बाहेर आहे. तपश्चर्येमध्ये स्त्री, द्रव्य आणि बालक यांची संगति बाधक आहे. नारायणाने लक्ष्मीला सांगितलें कीं तू बाहेर बसून ध्यान कर, मी आत बसून ध्यान करतो.

एका भक्ताने विचारले की, एवढ्या कडक थंडीत चंदनाने भगवंताची पूजा का करता? पुजारी उत्तरले, आमचे प्रभु कठोर तपश्चर्या करतात आणि त्यामुळे त्यांची शक्ति वाढते. आणि पर्यायाने फार

उष्णता वाढते म्हणून चंदनाने पूजा केली जाते. ते असो.

सूतांनी, सरस्वती आणि व्यासांना नमस्कार करून कथेस आरंभ केला.

ज्या धर्मामुळे मनुष्याच्या हृदयात श्रीकृष्णभक्ति जागृत होईल तोच धर्म श्रेष्ठ आहे. भक्ति पण अशी असली पाहिजे की ज्यात कशाही प्रकारची इच्छा नसावी. निष्काम आणि अखंड भक्तीनें आनंदरूप परमात्म्याची प्राप्ती करून घेऊन हृदय कृतकृत्य होते.

सूत म्हणतात, जीवात्मा अंश आहे आणि परमात्मा अंशी. अंशीहून अंश वेगळा झाला आहे आणि ह्याकरिता तो दुःखी आहे. अर्थात अंशी परमात्म्यांत विलीन झाल्यानंतरच जीव कृतार्थ होतो. भगवंतांनी म्हटले आहे, **'ममैवांशो जीवलोके'**– तू माझा अंश आहेस. तू माझ्यात मिळून गेल्यावर कृतार्थ होशील. नर नारायणाचा अंश आहे. अंश (नर) अंशी (नारायणां)त जोपर्यंत विलीन होणार नाही तोपर्यंत त्याला शांति मिळणार नाही. परमात्म्याचा आश्रय घेऊन त्यांचेशी मला एक व्हायचे आहे, हे उद्दिष्ट मी निश्चित केले आहे. कशाही रीतीने ईश्वराशी ऐक्य साधावयाचे आहे. ज्ञानी ज्ञानाच्या योगे अभेद सिद्ध करतो, तर वैष्णव महात्मे प्रेमाच्या साहाय्याने अद्वैत सिद्ध करीत असतात. प्रेमाची परिपूर्णता अद्वैतातच आहे. भक्त आणि भगवंत सरतेशेवटी एकच होत असतात. गोपी आणि कृष्ण एकच होऊन गेले होते.

जीव आणि ईश्वर कशामुळे वेगवेगळे झाले याची चर्चा करण्याची आवश्यकता नाही. ईश्वरापासून जीवाचा वियोग झाला आहे हे सत्य आहे. हा वियोग केव्हा आणि कसा झाला या विवादांत वेळ घालविण्याची आवश्यकता नाही आणि त्यापासून कांही लाभही नाही. धोतरावर डाग केव्हा व कसा पडला यावरच विचार करण्याने तो डाग जाणार नाही. त्या डागाला काढून टाकल्यानंतरच ते धोतर स्वच्छ होईल. ह्याप्रमाणे ईश्वराची भेट घेण्याचा प्रयत्नच करणे इष्ट आहे.

जीव जेव्हा निर्भय होतो तेव्हाच तो भाग्यशाली होतो. ज्याच्या डोक्यावर काळाचे भय आहे तो निर्भय कसा होऊ शकतो? भाग्यशाली तर वास्तविक तो आहे की ज्याला मृत्यूचे भय नाही. ध्रुव, पांडव, व्रजभक्त धन्य आहेत. कारण त्यांच्या आधीन काळ होता.

ईश्वरालाही जाणून घेण्याची इच्छा असते की मनुष्याला दिलेली बुद्धि आणि मन यांचे त्याने काय केले? जीवाला मृत्यूच्या दिवशी अर्थात जीवनाचा हिशोब देण्याच्या दिवशी भय वाटते. ज्याचे चारित्र्य स्वच्छ असते त्याचा हिशेबही साफ असतो. ज्या दिवशी इन्कमटॅक्सचा अधिकारी कोणा गृहस्थापाशी लाख दोन लाख रुपयांचा हिशोब मागतो त्या दिवशी त्याला भीती वाटू लागते. तर मग ईश्वर जेव्हा संपूर्ण जीवनाचाच हिशोब मागेल तेव्हा काय दशा होईल, ह्याचा कधी विचार केला आहे का? केलेल्या पापांची आठवण जेव्हा अंतकाळी येऊ लागते तेव्हा जीव भयभीत होतो. जोपर्यंत मृत्यूचे भय आहे तोपर्यंत जीवाला शांति मिळत नाही.

भगवंत जेव्हा जीवाला आपले म्हणतो तेव्हा भगवंताचा सेवक-'काळ' जीवाचे काही देखील बिघडवू शकत नाही.

उपनिषदांत म्हटले आहे, 'जीव आणि ईश्वर जवळजवळ बसलेले आहेत. तरी पण जीव ईश्वराला ओळखत नाही. जीव बहिर्मुखी होण्यापेक्षा जर तो अंतर्मुखी बनेल तर तो अंतर्यामीला ओळखू शकेल.

एका माणसाला समजले की गंगाकिनारी राहणाऱ्या एका संतापाशी एक परिस आहे. तो परिस प्राप्त करण्याच्या इच्छेने तो माणूस त्या संताची सेवा करू लागला. संत म्हणाले, 'मी गंगास्नानाला जातो आहे. परत आल्यावर मी तुला परिस देईन. संत असे सांगून निघून गेले. आता त्या माणसाच्या

मनात परिसाकरिता व्याकुळता वाढू लागली. संताच्या गैरहजेरीत त्याने सर्व झोपडी झाडून पाहिली. परंतु परिस त्याचे हाती लागला नाही. संत परत आले आणि त्यांना समजल्यावर त्यांनी विचारले, 'काय, तुला एवढाही धीर राहिला नाही? परिस तर मी त्या डबीतच ठेवला आहे.' असे म्हणून त्यांनी एक डबी खाली काढली. ती डबी तर लोखंडाची होती. त्या माणसाला विचार पडला की हा कसला परिस! ज्या डबीत परिस ठेवला होता ती तर लोखंडाचीच होती, मग त्या परिसानें ती डबी सोन्याची का नाही केली? काय हा परिस खरोखरीचाच आहे की संत आपली थट्टा करीत आहेत? त्याने संतांना विचारले, 'परिसाचा स्पर्श झाला तरी ही डबी लोखंडाचीच का राहिली? सोन्याची का नाही झाली?' संताने त्याला सांगितले की, 'तो परिस डबीत जरी ठेवला असला तरी एका गोधडीत ठेवला होता. अर्थात एका आवरणात होता म्हणून ती डबी सोन्याची होऊ शकली नाही.' त्याचप्रकारे ईश्वर आणि जीव हृदयांत एकाच जागी राहतात, परंतु दोघांमधे वासनेचा पडदा आहे आणि परिणामी दोघांचे मिलन होऊ शकत नाही. जीवात्मा म्हणजे डबी आणि परमात्मा म्हणजे परिस. दोहोंच्या मधे जो पडदा आहे त्यास दूर करणे आवश्यक आहे. अहं आणि ममतारूपी चिंध्यांची गोधडी दूर करायची आहे.

साधना केल्यावरही सिद्धी मिळाली नाही तर साधकाच्या मनांत साधनेविषयी उपेक्षाभाव जागृत होतो. जीव साधक आहे. सेवा-स्मरण साधने आहेत. श्रीकृष्ण साध्य आहे. विष्णूभगवंताची भक्ति करणे पुरुषमात्राचा परमधर्म आहे. लोक समजतात भक्तिमार्ग फार सोपा आहे. सकाळी देवाची पूजा केली की बस्, झाली सुट्टी. मग दिवसभर ते देवाला विसरलेले असतात. ही भक्ति नव्हे. दिवसरात्र अखंड ईश्वराचें स्मरण राहील तीच भक्ति. भक्तींत आनंद असतो. पण मनुष्य फक्त शरीराने भक्ति करतो, मनाने नाही. तोंडाने देवाचा नामोच्चार करीत राहिला, परंतु मन जर उच्चार न करील तर ते सर्व व्यर्थ होय.

मन सांसारिक विषयांमध्ये रमलेले राहील आणि केवळ शरीरच जर देवाची सेवा करीत राहील तर तशा सेवेंत काही आनंद राहणार नाही. सेवेमध्ये क्रिया मुख्य नाही. भावच प्रधान आहे. सगळ्या विषयांतून मनाला काढून घ्याल तेव्हाच प्रभुसेवेंत आनंद येईल. सेवा करायला बसाल तर पहिले भावाविष्ट व्हा. सेवा केल्यावरही भगवंताचें दर्शन न झाले तर तो दोष आपला आहे. सेवकाला सेवा केल्यानंतर 'माझें पाप गेले, माझे दुःख गेले, माझे दारिद्र्य मिटले, मी कृतार्थ झालो.' असे भाव जागृत झाले पाहिजेत. सेवेनंतर असा भाव जागृत न झाला तर सेवा-पूजेपासून काही आनंद होणार नाही.

सांसारिक विषयांना मनांतून घालवून द्या. जोपर्यंत त्यांना घालवीत नाही तोपर्यंत आनंद होणार नाही. सेवा म्हणजे भावना आहे. परमात्म्याची सेवा खऱ्या अर्थाने तेव्हाच होईल जेव्हा सांसारिक विषयांची ओढ कमी होईल. प्रभूवर प्रेम करावयाचे असेल तर विषयांवरील प्रेम सोडावेच लागेल. प्रेमाचा बोळ अतिअरुंद आहे, त्यांत दोघे कसे वावरणार? जगाचे बंधन सोडल्याविना ब्रह्माशी संबंध व्हायचा नाही.

सांसारिक विषयांचा मोह हळू हळू सोडा. संसार सोडून दुसरीकडे कुठे जाल? संसाराचा त्याग करण्याची आवश्यकता नाही. विषयांचा मोह सोडण्याची आवश्यकता आहे.

व्रतासाठी त्याग करण्याची आज्ञा आहे. ती नेहमीच्या त्यागासाठी नाही. नेहमी त्याग होऊ शकत नाही, म्हणूनच व्रताचे विधि सांगितले आहेत. हळूहळू संयम वाढवाल, वैराग्य वाढवाल, तर ईश्वरसेवेमध्ये-ध्यानांत अनुपम आनंद येईल.

एकदा एक चौबेजी मथुरेहून गोकुळांत जायला निघाले. नावेंत बसून यमुना पार करायची होती. चौबे भांगेच्या नशेत होते. नावेंत बसले आणि वल्ही मारायला लागले. आपल्या बाहुबलावर पूर्ण विश्वास असल्यामुळे म्हणू लागले की नाव आता गोकुळात पोहोचेल. चौबेजींनी सबंध रात्रभर नाव चालविली. सकाळ झाली. चौबेजी म्हणू लागले, हे मथुरेसारखे दुसरे कोणते गाव आले? त्यांनी एकाला विचारले, 'हे कोणते गाव आहे?' उत्तर मिळाले, 'मथुरा आहे.' तोच विश्रामघाट आणि तीच मथुरा. नशा उतरल्यावर चौबेजींना आपल्या मूर्खपणाची कल्पना आली. चौबेजींनी सबंध रात्रभर नाव चालविली. पण नाव तर दोरखंडाच्या साहाय्याने घाटालाच बांधलेली होती. नशेच्या प्रभावामुळे ते घाटापासून नाव सोडायचीच विसरले होते आणि सर्व रात्रभर वल्ही वल्हवूनही जिथल्या तिथेच होते.

ही गोष्ट हसण्याकरिता सांगितलेली नाही. हसू नका. ही स्थिती कोणा चौबेजीची नाही. आपणा सर्वांचीच आहे. सर्वच इंद्रियांच्या नशेत चूर आहेत. जीवाला एका इंद्रियसुखाच्या भोगाची नशा (कैफ) चढलेली आहे. धनाच्या मदात मनुष्य मंदिरांत जातो. तो नशेत असल्याने भगवंताचे खऱ्या मनानें चिंतन करीत नाही, म्हणून त्याला भगवंताच्या दर्शनाचा आनंद मिळत नाही. जगांतील विषय सुंदर नाहीत. फक्त परमेश्वरच सुंदर आहे. वासनारूपी दोराने विषयांशी बांधल्या गेलेल्या इंद्रियांना सोडवायचे आहे.

वासना कोणालाच पुढे सरकू देत नाही. वासनेच्या दोराला जोपर्यंत तोडणार नाही तोपर्यंत प्रगति करू शकणार नाही. वासनारूपी दोराने या जीवाची गाठ संसाराशी बांधलेली आहे. ती सोडवायची आहे. हृदयांत कोणतीही वासना राहणार नसेल तरच भक्तीच्या योगें आनंद मिळेल.

सर्वोत्तम वस्तु भगवंताला अर्पण करणे म्हणजेच भक्ति आहे. आणि वासनारहित हृदय ही सर्वोत्तम वस्तू आहे.

वैराग्याविना भक्ति रडत असते. भोग भक्तीमध्ये बाधक आहे. संयम आणि सदाचार वाढवाल तर भक्तीने आनंद मिळेल. सुखी व्हायचे असेल तर सांसारिक विषयांवरील प्रीति सोडा. घरांतच वैराग्याची साधना करा. वैराग्याविना ज्ञान आणि भक्तीस शोभा येत नाही. ज्ञान आणि वैराग्यासह भक्ती वाढली तर ईश्वराचा साक्षात्कार होतो.

ज्ञानमार्गात इंद्रियांचा निरोध करावा लागतो. भक्तिमार्गांत इंद्रियांना प्रभुमार्गाकडे न्यावे लागते.

सुवास घ्यायचा असेल तर देवाला फुलें अर्पण केल्यानंतर त्यांचा सुवास घ्या.

ब्रह्माचें अनुसंधान सतत करीत राहिल्यानेच जीवाचे कल्याण होते. वेद देखील त्याच वासुदेवाचे वर्णन करतात. उत्तमोत्तम तत्त्व अद्वैत तत्त्व आहे; तेच कृष्ण सांगत असतात. लौकिक व्यवहाराच्या ज्ञानांत द्वैत आहे. ईश्वरस्वरूपासंबंधीच्या ज्ञानांत अद्वैत आहे. व्यवहाराच्या स्वरूपाचें ज्ञान द्वैतभावाने भरलेले आहे. व्यावहारिक ज्ञानांत ज्ञाता आणि ज्ञेय भिन्न भिन्न आहेत. परमात्म्याचे ज्ञान झाल्यावर ज्ञाता आणि ज्ञेय एक होऊन जातात. प्रभुसेवा व स्मरणाने तन्मयता येते. ईश्वराचा अपरोक्ष साक्षात्कार जेव्हा होतो तेव्हा तो जीव ईश्वरांत विलीन होतो. ह्यानंतर तो "मी ईश्वराला जाणतो" अशी भाषा बोलू शकत नाही. "मी ईश्वराला जाणत नाही." असेही म्हणू शकत नाही. गोपी, सर्वत्र श्रीकृष्णांचे दर्शन करूनच जीवभाव विसरल्या होत्या.

श्रुति वर्णन करते की ब्रह्म-साक्षात्कार झाल्यावर 'मी' किंवा 'तू' कांहीच राहात नाही. वृत्ति ब्रह्माकार होऊन जाते.

श्रीकृष्णाच्या स्वरूपाचे ज्याला उत्तम रीतीने ज्ञान झालेले असते. तो ईश्वराहून वेगळा राहू

शकत नाही. सर्वांमध्ये ईश्वराचे दर्शन घेणारा स्वतःच ईश्वर होऊन जातो.

जीवाचा जीवभाव जाणार नाही तोपर्यंत अपरोक्षानुभव होणार नाही. ह्याप्रमाणे अद्वैत ज्ञान सांगितले आहे. जीव आणि ब्रह्म यांची अद्वैतसिद्धि मागाहून होईल. आधी जीव आणि गुरूचे अद्वैत साधले पाहिजे. मनाने एक व्हावयाचे, शरीराने नव्हे. शुद्ध ब्रह्म मायेच्या संसर्गाशिवाय अवतार घेऊ शकत नाही. शंभर नंबरी सोने नरम असते. त्याने दागिने घडविता येत नाहीत. दागिने घडविण्यासाठी त्यात थोडासा दुसरा धातू घालावा लागतो. अशाच कारणाने परमात्मा मायेचा आश्रय घेऊनच प्रगट होत असतात. परंतु ईश्वराला स्वतःला ही माया बाधक होत नाही. जीवाला माया बाधक होते. योगी ज्याला परमात्मा म्हणतात, त्याच परमात्म्याशी ज्याचें मिलन होते तो जीव कृतार्थ होतो.

**७. भगवंताचे विविध अवतार, त्यांच्या कथा ऐकून आचरण सुधारते :**

भगवंताविषयीं प्रीति वाढवायची असेल तर भगवंताच्या अवतारांच्या कथा ऐकल्या पाहिजेत. परमात्म्याच्या अवतारांच्या चोवीस कथा आहेत. धर्माची स्थापना करण्यासाठी आणि जीवाचा उद्धार करण्यासाठी परमात्मा अवतार घेत असतात. भगवंताचा अवतार तुमच्या घरात झाला पाहिजे. मंदिरात नव्हे. मानवशरीर हे घर आहे.

भागवतांत मुख्यतः कृष्णकथा सांगायची आहे. पण ही कथा शेवटी येते. भगवंताच्या अवतारांच्या कथा ऐकून आचरण (जीवन) सुधारते. भगवंताचे सर्व गुणधर्म जीवांत उतरले तर तो झाला अवतार. तिसऱ्या अध्यायांत २४ अवतारांच्या कथा संक्षेपाने सांगितल्या आहेत. पहिला अवतार सनत्कुमारांचा. ते ब्रह्मचर्याचें प्रतीक आहेत. सर्व धर्मांत ब्रह्मचर्य प्रथम येते. ब्रह्मचर्याशिवाय मन स्थिर राहणार नाही. ब्रह्मचर्याने मन, बुद्धि, चित्त, अहंकार पवित्र होतात. ब्रह्मचर्यपालनाने अंतःकरण शुद्ध होते. पहिले पाऊल आहे ब्रह्मचर्याचे. दुसरा वराह अवतार आहे. वराह (वर + अह) श्रेष्ठ दिवस. कोणता? ज्या दिवशी सत्कर्म होईल तो दिवस श्रेष्ठ. सत्कर्मात लोभ विघ्न करायला येतो. लोभाला संतोषाने मारा. वराह अवतार संतोषाचा अवतार आहे. प्राप्त परिस्थितींत संतोष ठेवा. लोभाला मारून प्रभु ज्या स्थितींत ठेवील त्यांतच संतोष माना. हेच वराह अवताराचें रहस्य आहे. तिसरा अवतार नारदांचा आहे. हा भक्तीचा अवतार आहे. ब्रह्मचर्याचें पालन करून प्राप्त स्थितींत संतोष मानील तर त्यास नारद अर्थात भक्ति मिळेल. नारद भक्तीचे आचार्य आहेत.

चौथा अवतार नरनारायणाचा. भक्ति प्राप्त झाली तर त्याने भगवंताचा साक्षात्कार होतो. भक्तीच्या द्वारें भगवान भेटतात. परंतु भक्ति जर ज्ञान आणि वैराग्यविरहित असली तर ती दृढ होणार नाही. भक्ति ज्ञान आणि वैराग्यासहित असावयास पाहिजे. भक्तींत ज्ञान आणि वैराग्याची आवश्यकता आहे. म्हणून पाचवा अवतार कपिलदेवांचा आहे– ज्ञान-वैराग्याचा. वैराग्य आचरणांत आणा. ज्ञान आणि वैराग्यासह भक्ति आली तर भक्ति नेहमीकरता स्थिर होईल. सहावा अवतार दत्तात्रेयांचा आहे. वर सांगितलेले पाच गुण: ब्रह्मचर्य, संतोष, ज्ञान, भक्ति आणि वैराग्य जर तुमच्यांत वास करू लागले तर तुम्ही गुणातीत व्हाल; आणि तुम्ही अत्रि व्हाल, भगवंत तुमच्या येथे येतील. वरील सहा अवतार ब्राह्मणांसाठी आहेत. सातवा अवतार यज्ञाचा, आठवा अवतार ऋषभदेवाचा, नववा अवतार पृथु राजाचा. दहावा मत्स्य नारायणाचा. हे चार अवतार क्षत्रियांकरिता आहेत. धर्माचा आदर्श दाखविण्यासाठी आहेत. अकरावा अवतार कूर्माचा आहे. बारावा धन्वंतरीचा. तेरावा मोहिनी नारायणाचा. हे तीन अवतार वैश्यांसाठी आहेत. यांत प्रभूने वैश्यांसारखी लीला केली आहे. चौदावा अवतार नरसिंहाचा आहे. नरसिंहअवतार

पुष्टीचा अवतार आहे. भक्त प्रल्हादावर कृपा करण्यासाठी हा अवतार झाला आहे. भगवंतांनी नरसिंह अवतारांत प्रल्हादावर कृपा केली आहे, प्रल्हादाच्या दृष्टीने पाहाल तर स्तंभांत देखील भगवंताचें दर्शन होईल. ईश्वर सर्वव्यापक आहे असे नुसते म्हणू नका. त्याचा अनुभव घ्या. मग तुमच्याकडून पाप होणार नाही. संत देखील व्यवहार करतात. जोपर्यंत शरीर असते तोपर्यंत व्यवहार करावेच लागतात. परंतु ईश्वराच्या अस्तित्वाच्या जाणिवेतून संत वागतात. मनुष्य ईश्वराला मनाच्या किंवा बुद्धीच्या शक्तीनें जिंकू शकत नाही. केवळ प्रेमानेच जिंकणे शक्य आहे. यशोदेच्या प्रेमापुढे श्रीकृष्ण दुर्बल होतात आणि बांधले जातात. बालकाच्या प्रेमबळापुढे मातेचे बळ लंगडे पडते. प्रेमापुढे शक्ति दुर्बळ ठरते. तुम्हीसुद्धा परमेश्वराविषयीं खूप प्रेम वाढवा, तो प्रभु दुर्बळ होऊन तुमच्या जवळ येईल. पंधरावा अवतार वामनावतार आहे. तो पूर्ण निष्काम आहे. ज्याच्यावर भक्तीचे-नीतीचें छत्र आहे, ज्याने धर्माचें कवच घातलेले आहे, त्याला भगवंतसुद्धा मारू शकले नाहीत – बलिराजाप्रमाणे. हे आहे वामनचरित्राचें रहस्य ! भगवान महान आहेत, परंतु बलिराजापुढे लहान होतात.

सोळावा अवतार परशुरामाचा. हा अवतार आवेशाचा अवतार आहे. सतरावा व्यासनारायणांचा– ज्ञानाचा अवतार आहे. अठरावा श्रीरामांचा अवतार आहे. हा मर्यादापुरुषोत्तमाचा अवतार आहे. रामाच्या मर्यादेचे पालन करा. त्यामुळे तुमचा काम मिटेल. अर्थात कन्हैया भेटतील. एकोणिसावा अवतार श्रीकृष्णाचा – **"कृष्णस्तु भगवान् स्वयम्!"** श्रीकृष्ण तर स्वतःच भगवान आहेत. राम आणि कृष्ण एकच आहेत. मनुष्य दिवसांतून दोन वेळा भान विसरतो. दिवसा बारा वाजता भुकेने भान विसरतो आणि निवृत्तीचे वेळी कामसुखाची आठवण होते म्हणून भान विसरतो. या दोन्ही वेळा सांभाळायच्या आहेत. सकाळी श्रीरामाचें स्मरण करा आणि रात्रीं श्रीकृष्णाचें. ते दोन्ही वेळा वाचवतील. श्रीरामाच्या मर्यादेचें पालन कराल तर पुष्टिपुरुषोत्तम–श्रीकृष्ण पुष्टि अर्थात कृपा करतील. संत एकनाथ महाराजांनी या दोन्ही अवतारांची सुंदर तुलना केली आहे. राम राजमहालांत प्रगट झाले, तर श्रीकृष्ण कारागृहांत. एकाच्या नावाची अक्षरे सरळ सोपी आहेत, तर दुसऱ्याच्या नावाची जोडाक्षरे आहेत. शिकविताना सोपी अक्षरे पहिली शिकवितात आणि जोडाक्षरे नंतर. 'राम' ही अक्षरे अगदी सरळ आहेत. 'श्रीकृष्ण' ही सर्व जोडाक्षरे आहेत. रामाच्या मर्यादेचें पालन केल्यानंतर श्रीकृष्णाचा अवतार होईल. ज्याच्या घरी राम येत नाहीत त्याच्या येथे कृष्णही येत नाहीत. रामांचा अवतार अर्थात रामाच्या मर्यादेचे पालन. हे दोनही साक्षात पूर्ण पुरुषोत्तमाचे अवतार आहेत. बाकीचे सर्व अवतार अंशावतार आहेत. पूर्ण अवतार आणि अंशावतार यांतील हे रहस्य आहेः अल्प काळासाठी अल्प जीवांच्या उद्धारासाठी जो अवतार होतो तो अंशावतार होय आणि अनंत कालासाठी आणि अनंत जीवांच्या उद्धारासाठी जो अवतार होतो तो पूर्ण अवतार असतो, असे संत मानतात. भागवतांत कथा तर कन्हैयाचीच सांगायची आहे, परंतु क्रमाक्रमाने अन्य अवतारांच्या कथा सांगितल्यानंतर. अधिकार प्राप्त असेल तर कन्हैया येईल. त्यानंतर हरि, कल्कि, बुद्ध इत्यादी अवतार झाले आहेत. एकंदर २४ अवतार झाले आहेत.

परमात्म्याचे २४ अवतार, परमात्मा या शब्दांतूनच निघतात (प=५; र=२; मा=४॥; त्=८; मा=४॥). ब्रह्मांड देखील ईश्वराचाच अवतार आहे. कोणी कोणी ब्रह्मांडांत ईश्वर पाहतात, तर कोणी कोणी जगांतील सर्वच पदार्थांत भगवत्स्वरूपाचे दर्शन करतात. सगळे ब्रह्मांडच भगवत्स्वरूप मानतात. सगळ्यांचा द्रष्टा परमात्मा मायेमुळे दृश्यासारखा दिसतो. स्थूल आणि सूक्ष्म शरीराचा अविद्येमुळे आत्म्यावर आरोप केला गेला आहे. जेव्हा आत्म्यावरचा हा आरोप आत्मस्वरूपाच्या ज्ञानाने नष्ट होतो, आणि तसे जेव्हा होते, तेव्हाच ब्रह्मसाक्षात्कार होत असतो. **'इति तद् ब्रह्मदर्शनम्'** हा सिद्धान्त आकलन

होईल.

सूत सांगतात– भगवान वेदव्यासांनी भागवत-चरित्रांनी परिपूर्ण असे भागवत नावाचे पुराण लिहिलें आहे. भगवान श्रीकृष्ण धर्म, ज्ञान इत्यादींसह स्वधामी निघून गेले आणि मग पुढे या कलियुगांत अज्ञानरूपी अंधकाराने लोक आंधळे झाले. अशा वेळी भागवतपुराण प्रकट झाले. हे पुराण सूर्य-रूप आहे. शुकदेवांनी परीक्षित राजाला ही कथा सांगितली आहे. त्यावेळी मी तेथे उपस्थित होतो. यथामति ही पुराणकथा मी तुम्हाला सांगत आहे.

**८. व्यासकृत भागवतरचनेचे प्रयोजनः**

शौनकांनी विचारलेः व्यासांनी भागवताची रचना कोणत्या उद्देशाने केली आणि रचना केल्यानंतर त्याचा प्रचार कसा केला, इत्यादी हकीकत आम्हाला सांगा. शौनक म्हणाले की, अतिशय लोभी प्रतिक्षणी पैशाचें ध्यान करीत असतो, तसा ज्ञानी प्रतिक्षणी ईश्वराचें ध्यान करीत असतो– स्मरण करीत असतो. ज्ञानी एक क्षणभरसुद्धा ईश्वरापासून वेगळा राहू शकत नाही. शुकदेवांची जन्मापासूनच ब्रह्माकार वृत्ति आहे. ते भागवत शिकायला गेले हेच आम्हाला आश्चर्य वाटते. शुकदेवांची पुष्कळच प्रशंसा केली गेली आहे.

शौनक पुढें म्हणतात– शुकदेवांची देवदृष्टी होती, देहदृष्टि नव्हती. जोपर्यंत देहदृष्टि आहे तोपर्यंत दुःख आहे. शुक स्नान करीत असलेल्या अप्सरांसमोरून निघून गेले तेव्हा सुद्धा निर्विकार होते. एकदा असे झाले की एका सरोवरात अप्सरा स्नान करीत होत्या. त्यांच्यासमोरून दिगंबर अवस्थेंत शुकदेव निघून गेले. अप्सरांनी पूर्ववत स्नान चालू ठेवले आणि कोणत्याच प्रकारच्या लज्जेचा त्यांना अनुभव आला नाही; वस्त्रें देखील घातली नाहीत. आणखी काही वेळाने तेथूनच व्यासही निघून गेले. व्यासांनी वस्त्रेही घातलेली होती. परंतु व्यासांना पाहून अप्सरांनी ताबडतोब आपली वस्त्रे जवळ केली. व्यासांनी हे पाहिले तेव्हा त्यांना मोठे आश्चर्य वाटले! हे असे का झाले? त्यांनी अप्सरांना त्याचे कारण विचारले. अप्सरांनी सांगितले, आपण वृद्ध आहात, पूज्य आहात, पितृतुल्य आहात; परंतु हा पुरुष आहे, ही स्त्री आहे, असा भेद आपल्या मनांत आहे. परंतु शुकदेवांच्या मनांत असल्या प्रकारचा कोणताच भेद नाही. शुकदेव केवळ ब्रह्मज्ञानीच नाहीत, तर ब्रह्मदृष्टि राखून फिरत असतात. शुकदेवांची अभेद-दृष्टि सिद्ध झालेली आहे. त्या दृष्टीला ही स्त्री, हा पुरुष अशी जाणीवच नसते.

संतांचे दर्शन घेणारा देखील निर्विकारी होत असतो. शुकदेवांचें दर्शन करून अप्सरादेखील निर्विकार झालेल्या आहेत– निष्काम झाल्या आहेत. अप्सरांना वाटले, ' धिक्कार असो आमचा! ह्या महापुरुषाला तर पहा, हा प्रभुप्रेमांत कसा वेडा झालेला आहे!

एकदा जनक राजाच्या दरबारांत शुकदेव आणि नारद दोघेही आले. शुक ब्रह्मचारी आणि ज्ञानी आहेत. नारदही ब्रह्मचारी आहेत आणि भक्तिमार्गाचे आचार्य आहेत. दोघेही महापुरुष आहेत. परंतु ह्या दोघांत श्रेष्ठ कोण? जनकराजाला समजेना. परीक्षेशिवाय कसे ठरवायचे? जनकराजाची राणी सुनयना हिने ठरविले की त्या दोघांची स्वतः परीक्षा करायची. सुनयना राणीने दोघांनाही आपल्या महाली बोलाविले आणि झोपाळ्यावर बसविले. यानंतर अलंकार घालून स्वतः सजून आली आणि झुल्यावर त्या दोघांच्या मधे बसली. यामुळे नारदांना थोडासा संकोच वाटला, ' मी बालब्रह्मचारी आहे. माझ्यासारख्या तपस्व्याला या स्त्रीचा स्पर्श झाला आणि माझ्या मनांत विकार आला तर? ' या विचाराने ते थोडे दूर होऊन बसले. परंतु शुकदेवांना तेथे कोणी येऊन बसले आहे याचे भानच नव्हते. त्यांना तर स्त्री-पुरुषांचेंही

भान नव्हते. ते मात्र दूर झाले नाहीत. सुनयना राणीने निर्णय सांगितला कीं या दोघांमधे शुकदेव श्रेष्ठ आहेत. यांना तर स्त्रीत्व किंवा पुरुषत्व याचेही भान राहिलेले नाही. स्त्रीत्व किंवा पुरुषत्वाचें जोपर्यंत भान जाणार नाही तोपर्यंत ईश्वर भेटत नाही. स्त्रीत्व आणि पुरुषत्व यांचे भान विसरलात म्हणजे समजावे की भक्ति सिद्ध झाली. शुकदेवांना स्त्रीमध्ये स्त्रीत्व दिसत नाही. त्यांचा सर्वाभूतीं ब्रह्मभाव होऊन गेलेला आहे. सर्वत्र ब्रह्मच दिसते आहे. जोपर्यंत पुरुषत्व आणि स्त्रीत्व यांचे स्मरण राहील तोपर्यंत काम आहे. जेव्हा हे स्मरण जाते तेव्हा कामही जातो. ब्रह्मचर्चा करणारे पुष्कळ आहेत, पण ब्रह्मज्ञानी मात्र विरळाच. शुकदेवांसारखी दृष्टी ठेवणारे (असणारे) दुर्लभच!

शौनकादि श्रोते म्हणाले कीं ब्रह्मदृष्टि ठेवणे कठीण आहे. अशा पुरुषाला तर भागवत वाचायचीच आवश्यकता नाही. मग ते भागवत ऐकायला का गेले? शुकदेव भिक्षेसाठी बाहेर जातात तेव्हा देखील गोदोहनकालापेक्षा अर्थात ६ मिनिटांपेक्षा जास्त कोठेच थांबत नाहीत. तरी सात दिवसपर्यंत बसून त्यांनी ही कथा परीक्षित राजाला कशी ऐकविली? आम्ही ऐकले आहे की परीक्षित राजा भगवंताचा मोठा प्रेमी भक्त होता. त्याला शाप मिळाला होता. कोणत्या कारणाने तो शाप मिळाला ती गोष्ट आम्हांस सांगा. या प्रश्नावर सूत म्हणाले,

'ऐका, द्वापारयुगाच्या समाप्तीचा काळ होता. बद्रीनारायणाला जाताना वाटेत केशवप्रयाग लागते. तेथे व्यासांचा आश्रम आहे. व्यासनारायण स्वतः सरस्वतीच्या किनाऱ्यावर व्यासाश्रमामध्ये राहात होते. एकदा त्यांना कलियुगाचें दर्शन झाले. बाराव्या स्कंधांत याचे वर्णन केले आहे. व्यासांनी जसे पाहिले तसेच लिहून ठेवले आहे. व्यासांनी विचार केला कीं कलियुगांतील लोक विलासी होतील, माणसे बुद्धिहीन होतील. वेदशास्त्रांचें अध्ययन करू शकणार नाहीत. ह्यासाठी त्यांनी वेदाचे चार विभाग केले. कधी काळी वेदाध्ययन करतीलही, परंतु वेदतत्त्वाचें ज्ञान (त्याचे तात्पर्य) त्यांना होणार नाही. याकरता सतरा पुराणे रचली. वेदांना समजण्यासाठी पुराणांची रचना केली. पुराणें तर वेदांवरील भाष्यें होत.

स्त्री, शूद्र, पतित, द्विजाति हे वेदश्रवणाचे अधिकारी नाहीत. या सर्वांचेच कल्याण व्हावें असा विचार करून महाभारताची रचना केली गेली आहे. महाभारत हे समाजशास्त्र आहे. महाभारत पाचवा वेद आहे. 'भा'चा अर्थ आहे ज्ञान, रत अर्थात रचना. ज्ञान आणि भक्तिमध्ये रमून जाण्याची कला ज्या ग्रंथांत सांगितली आहे तो ग्रंथ भारत होय. ज्ञानात जेव्हा जीवाचे रमण होऊ लागते तेव्हा कौरव विघ्न करू लागतात. धर्मक्षेत्र-कुरुक्षेत्र म्हणजे हे शरीरक्षेत्रच. धर्म आणि अधर्म यांचे यांत युद्ध होत असते. महाभारत प्रत्येकाच्या मनांत आणि घरांत चालू आहे. सद्‌वृत्ति आणि असद्‌वृत्ति यांतील युद्ध हेच महाभारत होय. जीव म्हणजे धृतराष्ट्र. ज्याचे डोळे गेले तो धृतराष्ट्र नसून ज्याच्या डोळ्यांत कामाने घर केले आहे तो आंधळा धृतराष्ट्र आहे. **'को अंधः? यो विषयानुरागी!'** अर्थात आंधळा कोण तर जो विषयानुरागी तो. दुःखरूपी कौरव अनेक वेळा धर्माला मारायला जातात. युधिष्ठिर आणि दुर्योधन रोज लढत असतात. दुर्योधन दररोज येतो. प्रभुभजनासाठी श्रीकृष्ण आपल्याला पहाटे चार वाजता जागवतात. धर्मराज सांगत असतात, की उठा आणि सत्कर्म सुरू करा. परंतु दुर्योधन येऊन सांगतो, 'शेवटच्या प्रहराची गोड झोप येते आहे— सकाळी सकाळी उठण्याची काय जरूर आहे? धर्म आणि अधर्म अशाच प्रकारे अनादिकालापासून झगडत आलेले आहेत. दुष्ट विचाररूपी दुर्योधन मनुष्याला उठू देत नाही. निद्रा आणि निंदा यांच्यावर जे विजय प्राप्त करू शकले ते भक्ति करू शकले आहेत. दुर्योधन हा अधर्म असून युधिष्ठिर धर्माचे स्वरूप आहे. धर्म धर्मराजाप्रमाणे प्रभुपाशी घेऊन जातो आणि अधर्मरूपी दुर्योधन मनुष्याला संसाराकडे घेऊन जातो आणि त्याचा विनाश करतो. धर्म जर ईश्वराला

शरण जाईल तर धर्माचा विजय होईल आणि अधर्माचा विनाश. इतकी ग्रंथरचना करून देखील व्यासांच्या मनाला शांति मिळाली नाही.

ज्ञानी पुरुष आपल्या अशांतीच्या कारणाचा शोध आपल्यातच घेतात. उद्वेगाच्या कारणांचा शोध आपल्यांतच घेतात, आपल्या अंतःकरणांतच घेतात. आपल्या दुःखाचें कारण बाहेर नाही. आपल्या दुःखाचें कारण आपल्यातच असते. अज्ञान आणि अभिमान ही दुःखाची कारणे होत. व्यास अशांतीचें कारण आंतच शोधतात. मी कांही पाप तर नाही केले? याउलट अज्ञानी मनुष्य अशांतीच्या कारणाचा शोध बाहेर घेत असतो. त्यास बाह्यकारणांमध्येच अशांतीचें मूळ आहे असे वाटते.

लोक केलेल्या पुण्याचे पुनःपुन्हा स्मरण करतात, पण केलेले पाप कोणीच आठवत नाही. पापाचा कोणीच विचार करीत नाही. व्यास काळजींत पडले आहेत - 'माझ्या हातून कांही पाप तर नाही झाले? नाही, नाही, मी निष्पाप आहे. पण माझ्या मनाला खटकते आहे कीं कांही काम माझ्या हातून अर्धवट तर नाही राहिले?' माणसाला आपली चूक लवकर लक्षांत येत नाही. याचकरितां म्हटले आहे, **"कृपा भई तब जानिये, जब दिखे अपना दोष."** जेव्हा आपला दोष लक्षात येईल तेव्हा समजा की कृपा झाली आहे. जगांतल्या कोणत्याच जीवाचा दोष पाहू नका. आपल्या मनाला सुधारा. जो कोणी तुमची चूक दाखवील त्याचे उपकार विसरू नका. व्यास स्वतः ज्ञानी आहेत. तरी पण आपल्याला निर्दोष समजत नाहीत. मनुष्याचा सर्वांत मोठा दोष हाच आहे कीं तो आपल्याला निर्दोष समजतो. निर्दोष असा केवळ परमात्माच आहे. ब्रह्मदेवाची सृष्टी गुण-दोषरहित नाही. दैवि सृष्टी आणि आसुरी सृष्टी अनादि कालापासून चालत आलेल्या आहेत. व्यास म्हणतात की, 'मला असा कोणी संत भेटो की जो माझी चूक दाखवील. सत्संगाशिवाय मनुष्याला आपल्या दोषांचे ज्ञान होत नाही. सत्संगाने मनुष्यास आपली चूक लक्षांत येते. व्यासांच्या संकल्पामुळे परमेश्वराने नारदमुनीस त्यांचेकडे जाण्याची प्रेरणा दिली. कीर्तन करीत करीत नारदमुनी तेथे पोहोचले. गंगेला आनंद झाला. महापुरुषांच्या दर्शनाने कथारूपी गंगा प्रगटेल. अनेक जीवांचा उद्धार होईल. आज गंगामाई अगदी शांत आहे, आणि त्यामुळे या दोन महापुरुषांच्या सत्संगांत विघ्न येणार नाही. हे महावैष्णव कृष्णाची कथा करतील आणि यांच्या कथा व उपकथांनी अनेक जीवांचे कल्याण होईल. नारदांनी व्यासांना कुशल प्रश्न केले आणि म्हणाले, 'मी तर तुमचे अभिनंदन करायला आलो होतो. परंतु तुम्हाला चिंतातुर पाहून मला आश्चर्य वाटत आहे. मला वाटते आहे की आपण फार गंभीर चिंतेत गढलेले आहांत. आनंदांत नाही.' व्यास म्हणाले, 'आपला तर्क बरोबर आहे. मजकडून कांही तरी चूक झालेली आहे, परंतु ती माझ्या लक्षांत येत नाही. कृपा करून आपण माझी चूक माझ्या ध्यानांत आणून द्यावी. **स्नातस्य न्यूनमलं विचक्ष्व.** माझ्यामध्ये जी अपूर्णता आहे ती आपण विचार करून मला सांगा, आपले फार उपकार होतील.'

व्यासांची विवेकबुद्धि पाहून नारदांना आनंद झाला. नारद म्हणाले, 'महाराज! आपण नारायणाचे अवतार आहांत. आपल्या हातून काय चूक होऊ शकते? आपण ज्ञानी आहांत. आपली कांही चूक झालेली नाही. तरी पण आपण आग्रह करीत आहांत म्हणून एक गोष्ट सांगतो. आपण ब्रह्मसूत्राच्या भाष्यांत वेदान्ताची खूप चर्चा केली आहे. आत्मा अनात्मा यांचा फारच विचार केला आहे. तशीच योगसूत्रांच्या भाष्यांत योगाचीही खूप चर्चा केली आहे. समाधीच्या भेदांचे खूप वर्णन केले आहे. परंतु धर्म, ज्ञान आणि योगाचे आधार श्रीकृष्ण आहेत. या सर्वांचा आत्मा श्रीकृष्णच आहेत. त्यांच्या कथेचे वर्णन आपण प्रेमपूर्वक केलेले नाही. आपण भगवंताचें निर्मल यश पूर्ण रीतीने आणि प्रेमाने वर्णन केलेले नाही. मी असे समजतो कीं, ज्या शास्त्र किंवा ज्ञानाने भगवंत प्रसन्न होत नाहीत ते अपूर्णच

होय. कलियुगाच्या उद्धारार्थ आपला जन्म झालेला आहे. आपल्या या अवताराचें कार्य अजून आपल्या हातून पूर्ण झालेले नाही. याच कारणाकरिता आपल्या मनांत अशांतता आहे.

ज्ञानी पुरुष देखील भगवंताच्या प्रेमाने जोपर्यंत वेडा होत नाही तोपर्यंत त्याला आनंद मिळत नाही. प्रभूच्या भेटीसाठी जो आतुर होत नाही त्याचें ज्ञान काय कामाचे? कलियुगांतील भोगी जीव आपलें ब्रह्मसूत्र इत्यादी समजू शकणार नाहीत. कलियुगांतील विलासी माणसे आपले गहन सिद्धान्त कसे समजू शकतील? आपण योग, ज्ञान इत्यादींची तर पुष्कळच चर्चा केली आहे, परंतु भगवंताच्या लीलांचे आणि कथांचे आपण प्रेमाने विस्तारपूर्वक वर्णन केलेले नाही.

प्रेमभक्ति-विरहित ज्ञानाला शोभा नसते. प्रभु ज्याला आपले समजतो त्याला तो आपले खरें स्वरूप दाखवितो. साधारण माणूस देखील जेथे प्रेम असेल तेथेच आपले स्वरूप प्रगट करतो. बाहेरील माणूस पाहून कोणी आपले हृदय उघडे करीत नाही. ज्याच्यावर प्रेम असते त्याला तर तो न विचारता देखील सर्व उघड करून सांगतो. मनुष्य परमेश्वरावर प्रेम करीत नाही म्हणून त्याला परमेश्वराचा अनुभव होत नाही. मोठा ज्ञानी झाल्यावर देखील जोपर्यंत भगवंतावर प्रेमभक्ति जडत नाही तोपर्यंत त्याला भगवंताचा अनुभव येत नाही. जोडद्यावर, कपडद्यांवर, पैशावर जो प्रेम ठेवतो त्याला कोणी ज्ञानी म्हणेल काय? आजकाल लोक पुस्तके वाचून ज्ञानी होत असतात, त्यांना गुरूची सेवा करावी लागत नाही. त्यांना ब्रह्मचर्यपालनाची आवश्यकता नसते. श्रीकृष्णांच्या लीलांचे आणि कथांचे आपण प्रेमाने गायन केले नाही म्हणूनच आपणाला दुःख होत आहे. हेच आपल्या अशांतीचें कारण आहे. ज्ञानाची शोभा प्रेमांत आहे. भक्तींत जर सर्वभूतीं भगवत्भाव जागृत न झाला तर ते ज्ञान काय कामाचे? श्रीकृष्णप्रेमाने वेडे व्हाल तर शांति मिळेल. आपण प्रेमाने वेडे होऊन कृष्णकथेचे परिपूर्ण वर्णन केले नाही. ईश्वर जीवापासून इतर कांही न मागता केवळ प्रेमच मागतो. कलियुगांतील माणसाला स्नानाकरता गरम पाणी मिळाले नाही तर तो रागाने बेफाम होऊन जातो. असा माणूस योग कसा सिद्ध करील? ज्याची भोगांत आसक्ति असते तो निरोगी राहात नाही. द्रव्यामध्ये ज्याची आसक्ति आहे त्याचें मन ठीक राहात नाही. अशा माणसाकडून योग सिद्ध होत नाही. चित्तवृत्तीच्या निरोधास योग म्हणतात. हा सिद्ध करणे कठीण आहे. गोष्टी ब्रह्मज्ञानाच्या करायच्या आणि पैशाचा लोभ ठेवायचा; अशाने देवाची प्राप्ती होत नाही. त्याला आनंद मिळत नाही. तर आता आपण अशी कथा करा की, ज्यायोगे सर्वांमधे प्रभु-प्रेम जागृत होईल. अशी दिव्य रचना करा, अशा प्रेमशास्त्राची रचना करा कीं ज्यायोगे सर्वच कृष्णप्रेमाने वेडे होतील– कथा ऐकणाऱ्याला कन्हैया प्रिय वाटू लागेल. ज्यांत संसाराची उपेक्षा केली गेली आहे अशी कथा-रचना कराल तर आपल्याला शांति मिळेल.

महाभारतात श्रीकृष्णचरित्र आहे. त्यांत धर्म आणि सदाचाराला महत्त्व दिले गेले आहे. त्यांत प्रेम गौण आहे. अशी कथा रचा कीं जेणेंकरून आपल्यालाही शांति मिळेल आणि सर्वच जीवांना शांति मिळेल. व्यासांनासुद्धा जोपर्यंत भागवताची रचना त्यांनी केली नाही तोपर्यंत शांति मिळाली नाही. कलियुगांत कृष्णकीर्तन आणि कृष्णकथा याशिवाय दुसरा कोणताच उद्धाराचा उपाय नाही. कलियुगांत मनुष्याचा उद्धार दुसऱ्या साधनांनी होऊ शकत नाही. फक्त कृष्णकीर्तन आणि कृष्णस्मरणानेच मनुष्याचा उद्धार होईल. भगवंताच्या लीलाकथांचे वर्णन तुम्ही मोठ्या प्रेमानें करा. सगळ्या साधनांचे फळ म्हणजे प्रभु-प्रेम होय. आपण तर ज्ञानी आहात. महाराज, मी आपल्याला स्वतःची कहाणी सांगतो: मी कसा होतो आणि कसा झालो?

**९. नारदचरित्रकथनः**

व्यासांचा विश्वास बसावा म्हणून नारदांनी आपलाच दृष्टान्त दिला. आपल्या पूर्वजन्माची कहाणी सांगितली. कथा ऐकल्याने, संतांची सेवा केल्याने जीवन सुधारते. नारद म्हणाले, 'मी दासीपुत्र होतो, परंतु चार महिनेपर्यंत मी कृष्णकथा ऐकली. मला सत्संग मिळाला तेव्हा माझे जीवन दिव्य होऊन गेले. कृष्णकथेने माझे जीवन सुधारले. माझें जीवनच पालटले. माझ्या सद्गुरूची माझ्यावर कृपा होती.' व्यास नारदांना म्हणाले, 'सांगा, तुम्ही तुमच्या पूर्वजन्माची कहाणी सांगा.' नारद म्हणाले, ऐका – 'मी सातआठ वर्षांचा असेन तेव्हाच बाळपणी माझ्या वडिलांचा मृत्यू झाला. माझी आई दासीचें काम करीत असे. मी भिल्लांच्या मुलांबरोबर खेळत असे. माझ्या पुण्याचा उदय झाला. आम्ही ज्या गावांत राहात होतो तेथे सतत भ्रमण करणारे एक साधू आले. गावांतील लोकांनी त्यांना त्याच गावांत चातुर्मास संपन्न करण्याची विनंति केली आणि म्हणाले, 'या मुलाला आम्ही आपल्या सेवेसाठी ठेवतो. हा आपल्याला पूजेची फुले आणून देण्यास मदत करील, दुसरीही कामें करील. विधवेचा मुलगा आहे, प्रसादही आपल्याजवळूनच घेईल. मला नुसतें संतांचे दर्शनच नाहीं तर त्यांच्या सेवेचाही लाभ मिळाला. जोपर्यंत एखाद्या महापुरुषाची प्रत्यक्ष सेवा करणार नाही तोपर्यंत मनांतून वासना जात नाही. आंतले विकार जात नाहीत. माझे गुरुदेव खरे संत होते. प्रभु-भक्तींत रंगलेले होते. मला खऱ्या संतांची सेवा करण्याचा लाभ मिळाला. आधी तर खऱ्या संतांचें दर्शनच होत नाही आणि यदाकदाचित झालेच तर त्यांच्याविषयीं सद्भाव जागृत होत नाही. गुरुदेव विनम्र होते. ते दुसऱ्यांना मान देत असत. त्यांच्या संगतीमुळे मला भक्तीचा रंग लागला. गुरूंनी माझें नांव हरिदास ठेवले.'

गुरुदेव प्रेमाची मूर्ति होते. गुरुजी उठायच्या पूर्वी मी उठत असे. गुरुजींच्या पूजेच्या वेळी मी तुळशी, फुलें आणीत असे. माझे गुरुजी दिवसांतून दोनदा कीर्तन करीत असत. सकाळी ब्रह्मसूत्रावर चर्चा करायचे. परंतु रात्री रोज कृष्णकथा-कृष्णकीर्तन करायचे. कन्हैया त्यांना फार प्रिय होता. माझ्या गुरुदेवांचे इष्टदेव बाळकृष्ण होते. ऋषि बालस्वरूपाची आराधना करीत. बालक लवकर प्रसन्न होते. बालकृष्ण लवकर प्रेम करतो आणि लवकर प्रसन्न होतो. कन्हैयाच्या एखाद्या भक्ताने त्यास हाक मारली की कन्हैया धावत येतो. मी कीर्तनाला जाऊन कथा ऐकत असे. मी फारच कमी बोलायचा. फार बोलणे संतांना आवडत नाही. वाणीने शक्ति खर्चू नका. अर्थात कमी बोला, मौन पाळा. सेवा करणाऱ्यावर संत कृपा करतात. हे तीनही गुण माझ्यांत होते असे नारदांनी सांगितले.

मी तर कोळी आणि भिल्ल मुलांबरोबर खेळत असे. एक दिवस मी कथेला गेलो होतो. माझे गुरु कृष्णकथेचे वर्णन करीत होते. कथेंत मी बाललीला ऐकली. लहान लहान मुले कृष्णास फार आवडतात. कथा ऐकल्यावर माझ्यांत प्रभूविषयीं सद्भाव जागृत झाला. कृष्णकथा ही प्रेमकथा आहे. कृष्णकथेंत योग्यांना, स्त्रियांना, बालांना सगळ्यांना आनंद मिळतो. श्रीकृष्णाची कथाच इतकी दिव्य आहे की ती सर्वांनाच आनंद देते. श्रीकृष्णकथेंत इतका आनंद वाटू लागला की माझे खेळणेच सुटले.

श्रीकृष्णकथेंत गुरुदेव वेडे झाले. माणसे संसाराच्यापाठी वेडी होत असतात आणि अशा स्थितींत ती मुक्त होऊ शकत नाहीत. भगवंतासाठी जीव वेडा होईल तर जीव शिव एक होतील. संतांचे डोळे शुद्ध असतात-पवित्र असतात. संत डोळ्यांनी पाप करीत नाहीत. संतांच्या डोळ्यांत श्रीकृष्ण विराजत असतात. संत तीन प्रकारे कृपा करतात. संत ज्यांच्याकडे वारंवार दृष्टिक्षेप करतात त्यांचे जीवन सुधारते. माळ ओढीत असता ज्या शिष्याची आठवण होईल त्याचें जीवन मंगल होते. माझे गुरु माझ्याकडे पुनःपुन्हा कृपादृष्टीने पाहत. गुरुजी म्हणत, हा फार समजदार मुलगा आहे. गुरुजींना आनंद होत असे.

ते फार प्रसन्न होते.

हा जीव जातिहीन आहे. परंतु कर्महीन नाही. संत ज्याचेकडे प्रेमदृष्टीने पाहतात त्याचें कल्याण होते. एक दिवस त्यांचा प्रसाद घेणे झाल्यावर मी त्यांच्या उष्ट्या पत्रावळी उचलत होतो. मी दासीपुत्र होतो. सांगितल्यावाचून मला कोण जेवण वाढतो? गुरुजींनी मला अशा प्रकारे सेवा करताना पाहिले. संतांचे हृदय विरघळले. गुरुजींनी विचारले, 'हरिदास, तुझे जेवण झाले आहे का?' मी 'नाही' म्हटले. गुरुदेवांना माझी दया आली. हा मुलगा किती समजदार आहे! गुरुदेवांनी मला आज्ञा केली की पत्रावळींत मी तुझ्यासाठी महाप्रसाद ठेवला आहे, तो तू खा. मी तो प्रसाद खाल्ला. शास्त्राची आज्ञा आहे की गुरुजींच्या आज्ञेशिवाय त्यांचे उच्छिष्ट खाऊ नये. संत जेव्हा कल्याण करण्याच्या भावनेने प्रसाद देतात तेव्हा कल्याण होते. हृदय पाझरल्यावर संत जेव्हा बोलावून देतात, तेव्हा ते प्रसन्न झाले आहेत असे समजावे. मी प्रसाद ग्रहण केला. माझे सगळे पाप नष्ट झाले. मला भक्तीचा रंग चढला. मला कृष्णप्रेमाचा रंग चढला. त्यादिवशी मी कीर्तनास गेलो. मला नवा अनुभव मिळाला. कीर्तनांत मला एक निराळाच आनंद गवसला. मी आनंदाने थयथय नाचू लागलो. अतिआनंदांत देहभान हरपून जाते. कीर्तन-भक्ति श्रीकृष्णांना अतिशय प्रिय आहे. भक्तीच्या रंगाचा आस्वाद मला त्याच दिवशी मिळाला. मला राधाकृष्णाचा अनुभव आला. शुकदेव म्हणतात, नारद व्यासांना आपले आत्मचरित्र सांगत होते. 'मी कमी बोलत असे, यामुळे माझ्यावर संतांची कृपा झाली. मी सेवेंत दक्ष राहात असे. संत सेवेत सद्भाव बाळगतात. परंतु गुरुदेवांची माझ्यावर विशेष कृपा झाली. मला वासुदेव गायत्रीचा मंत्र दिला. पहिल्या स्कंधांतील पांचव्या अध्यायांतला ३७ वा श्लोक हा वासुदेव गायत्रीचा मंत्र आहे. या वासुदेव गायत्रीचा नेहमी जप करा.

**नमो भगवते तुभ्यं वासुदेवाय धीमहि।**
**प्रद्युम्नायानिरुद्धाय नमः संकर्षणाय च॥**

चार महिने याच प्रकारे गुरुदेवांची सेवा केली. गुरुजींचा ते गाव सोडण्याचा दिवस आला. गुरुजी आता निघून जातील अशा विचाराने मला दुःख झाले. मी गुरुजींना म्हटले, 'आपण मला बरोबर घेऊन चला. मला सोडू नका. मी आपल्याला शरण आलो आहे. मी तुमच्या देवडीवर झोपत जाईन. मी आपले हलक्यांतले हलकेही काम करीन, मला आपल्या सेवेंत घेऊन चला. माझी उपेक्षा करू नका. गुरुदेवांनी ब्रह्मलेख वाचून मला सांगितले की, 'तू तुझ्या आईचा ऋणानुबंधी मुलगा आहेस, म्हणून तू आईचा त्याग करू नकोस. तू जर आईला सोडून येशील तर तुला दुसरा जन्म घ्यावा लागेल. तुझ्या आईचे विलाप आमच्या भजनांत विक्षेप करतील. तू घरीच रहा. घरांत राहून देखील प्रभूचे भजन होऊ शकते.

नारद म्हणतात, "आपण तर कथेंत सांगितले होते की प्रभुभजनामध्ये जो विघ्न करील त्याचा त्याग करा. प्रभुभजनांत जो साथ देईल त्याचाच संग करा. ईश्वराच्या मार्गाकडे घेऊन जाईल तोच खरा स्नेही आहे. माझी आई जर माझ्या भजनांत विक्षेप करणारी असेल तर मी तिचा त्याग करू नये काय? सांसारिक आईबापांची अशीच इच्छा असते कीं आपल्या मुलाने विवाह करावा आणि वंशवृद्धि करावी. त्यांना अशी इच्छा होतच नाही की आपल्या मुलाने परमात्मस्वरूपीं तन्मय व्हावे. माझी आई माझ्या भजनांत विक्षेप करणारी आहे. आपण तर एक दिवस कथेंत सांगितले होते कीं आपले जे स्नेही कथेंत विक्षेप करणारे असतील त्या स्नेह्यांचा देखील त्याग करावा.

मीराबाईला लोकांनी खूप त्रास दिला. तेव्हा यावरून संत तुलसीदासांना तिने पत्र लिहून कळविले

की, ती जेव्हा तीन वर्षांची होती तेव्हापासूनच तिने गिरिधर गोपालाशी लग्न लावले आहे. तिचे नातेवाईक तिला त्रास देत आहेत. अशा परिस्थितींत तिने आता काय करावे? तुलसीदासांनी चित्रकूटाहूनच पत्र पाठविले की, कसोटी सोन्याचीच होत असते, पितळेची नाही. तुझी ही कसोटी चालली आहे. ज्याला सीताराम प्रिय नसतील, ज्याला राधाकृष्ण प्रिय वाटत नसतील, असा सख्खा भाऊ जरी असेल तरी त्याचा संग सोडून दिला पाहिजे. दुःसंग सर्वथा त्यागायोग्यच असतो. '**दुःसंग सर्वथा त्याज्यः**' हे पत्र वाचून मीराबाईने मेवाडचा त्याग केला आणि ती वृंदावनांत येऊन राहिली. भक्ति वाढवायची असेल तर मीराबाईचे चरित्र पुनःपुन्हा वाचा.

संसारी माता-पिता पुत्राला देखील संसाराचेच ज्ञान देतात. आईच्या संगतींत राहिलो तर भजनांत विक्षेप होईल. गुरुजी म्हणाले, 'तू आईचा त्याग करावा हे मला पटत नाही. देव सगळे जाणतो. तुझ्या आईने तुझ्या भजनांत विघ्न आणले तर देव कांहीतरी लीला करील. कदाचित तो तुझ्या आईला घेऊन जाईल, किंवा तुझ्या आईची बुद्धि तो पालटेल. घरांतच राहून या महामंत्राचा जप कर. आईचा अनादर करू नकोस. जप केल्याने प्रारब्ध बदलते. जपाचे सातत्य तुटू नये याकडे लक्ष असू दे.' मी गुरुजींना म्हटले, 'आपण जप करायला सांगत आहात पण मी तर निरक्षर दासीपुत्र आहे. मी जप कसा करू? जपाची मोजणी कशी करू शकेन? गुरुजींनी सांगितले की, आपण जप करीत राहावे. संख्यामोजणी श्रीकृष्ण करतील. जप तू कर, मोजील कन्हैया. जे प्रेमाने देवाचे स्मरण करतात त्यांच्यामागे भगवंत फिरतात. माझ्या प्रभूला आणखी कोणते काम नाही. जगाची उत्पत्ती आणि संहाराचे सर्व काम मायेच्या सुपूर्द केले आहे. देवाच्या नावाचा जप जो करतो त्याच्या मागे मागे देव फिरत असतो. जपाची मोजणी करायचीच नाही. जर मोजणी केली तर ती कोणाला सांगायची इच्छा होईल. कोणाला जपाची संख्या सांगितली तर थोडे पुण्य कमी होईल. पुण्याचा क्षय होईल. गुरुजींनी मला वासुदेव गायत्रीचा बत्तीस लाख जप करायला सांगितले. बत्तीस लाख जप होईल तर ब्रह्मदेवाने लिहिलेले देखील पुसले जाईल. पापाचा नाश होईल. बाळा, ह्या मंत्राचा नेहमी जप कर. मंत्राचा जप केला म्हणजे जीवाचा ईश्वराशी संबंध होतो. पहिला रुद्राशी संबंध होतो, रुद्राशी संबंध झाल्याशिवाय ब्रह्माशी संबंध जडत नाही. नंतर ब्रह्मसाक्षात्कार होतो. रोज अशीच भावना ठेवीत जा कीं श्रीकृष्ण आपल्याबरोबर आहेतच. श्रीकृष्ण साक्षात प्रेमाचेच स्वरूप आहेत. तुझें कल्याण करतील. बाळा, तू बालकृष्णाचें ध्यान कर. श्रीकृष्णाचें बालस्वरूप अतिमनोहर आहे. बालकाला थोडेसे दिले तरी तो राजी होतो. याकरता गुरुदेवांनी बालउपासना केली. बालस्वरूपाचे ध्यान करायची आज्ञा दिली. भाव ठेवून बालस्वरूपाचें ध्यान कर असे म्हणाले, आणि माझे गुरुजी मला सोडून निघून गेले. मला फार दुःख झालें. पूर्वजन्माच्या गुरूचे नाव घेतल्याबरोबर नारद रडू लागले.

खऱ्या सद्गुरूला कांहीही स्वार्थ असत नाही. मी निश्चय केला आणि जप सुरू केला. मी सतत जप करी. जपाशिवाय मला चैन पडत नसे. चालता-फिरता आणि स्वप्नांतदेखील मी जप करीत असे. झोपी जाण्यापूर्वी नेहमी जप करा. जपाचे सातत्य तुटता कामा नये. एक वर्षपर्यंत वाणीने जप करा. तीन वर्षे कंठाने जप करा. तीन वर्षांनंतर मनाने जप होऊ लागतो. यानंतर अजपाजप होत असतो.

आईला हे रुचत नसे. तरी पण मी बारा वर्षेपर्यंत सोळा अक्षरी महामंत्राचा जप केला. माणसे जप करीत असताना देखील पुष्कळ छल-कपट करतात. याचमुळे त्यांच्या पुण्याचा नाश होतो. आईची बुद्धि भगवंत बदलतील या विचाराने मी आईला केव्हाही काही सांगितले नाही. मी माझ्या आईचा केव्हाही अनादर केला नाही. त्यानंतर एक दिवस आई गोशाळेत गेली. तिथे तिला साप चावला. सूत

सावध करून सांगतात की साप अपराध्याला चावत असतो. आईने शरीराचा त्याग केला. देवाने कृपा केली. **'अनुग्रहं मन्यमानः'** देवाचा माझ्यावर अनुग्रह झाला आहे असे मी मानले. आईवर अग्निसंस्कार केला. मला आनंद झाला. मी मातृऋणांतून मुक्त झालो. घरांत जे कांही ठेवले होते ते मी आईच्या कामी लावले. माझी देवावर श्रद्धा होती, म्हणून मी कशाचाही संग्रह केला नाही. जन्माच्या आधीपासून माझ्यासाठी आईच्या स्तनांत दूध निर्माण करणारा देव माझ्या पोषणाची व्यवस्था करीलच. तो कां नाही करणार? परमेश्वर तर विश्वंभर आहे. मी जर आपल्या भगवंताचा आहे तर तो माझे पोषण करणार नाही काय? मी बरोबर काहीच घेतले नाही. केवळ अंगावरच्या कपड्यांसह मी गृहत्याग केला. ज्याचे जीवन केवळ ईश्वराकरताच आहे तो केव्हाही संग्रह करणार नाही. परमेश्वर नास्तिकाचेही पोषण करतो. नास्तिक म्हणतो, मी देवाला मानत नाही. परंतु माझा परमात्मा त्याला म्हणतो, 'बेटा, तू मला मानत नसशील पण मी तुला मानतो त्याचे काय?' जीव भलेही अज्ञानांत कांहीही बोलो, पण देव म्हणतो तू ईश्वराचा अंश आहेस. जो देवाचे नियम मानत नाही, धर्म मानत नाही अशा नास्तिकाचेंसुद्धा देव पोषण करतो. मग कन्हैया काय माझें पोषण करणार नाही?

मी कधीही भीक मागितली नाही, पण देवाच्या कृपेने मी कधी उपाशी राहिलो नाही. मी कोणत्याही वस्तूचा संग्रह केला नाही, पण भगवंतांनी मला कोणत्याही दिवशी उपाशी ठेवले नाही. भगवत्स्मरण करीत मी फिरत होतो. बारा वर्षेपर्यंत मी अनेक तीर्थांचे भ्रमण केले. त्यानंतर मी फिरत फिरत गंगातीरी पोचलो. गंगास्नान केले. तेथेच एका पिंपळाच्या झाडाखाली बसून मी जप करीत होतो. ध्यान लावून जप करीत असे. गुरुदेवांनी आज्ञा केली होती कीं खूप जप करीत जा. मी जप सोडला नाही. गुरुजींनी सांगितले होते प्रभुदर्शन झाले तरी जप सोडू नको. गंगाकिनारी मी बारा वर्षे राहिलो.

चोवीस वर्षांपासून कल्पना करीत होतो की कन्हैया माझ्याबरोबर आहे. माझ्या पूर्वजन्मीचे पाप पुष्कळ असेल म्हणून मला प्रभुदर्शन होत नाही. परंतु खूप श्रद्धा होती की एक दिवस प्रभु मला अवश्य दर्शन देतीलच. भावाविष्ट होऊन भावातच श्रीकृष्ण मला दिसायचे. पण मला प्रत्यक्ष बाळकृष्णाचे दर्शन होत नव्हते. आपल्या कृष्णाचे मला प्रत्यक्ष दर्शन मिळवायचे होते, माझ्या मनाला असे झालें कीं, श्रीकृष्ण मला केव्हा आपलेसे करतील? केव्हा मला भेटतील? मला श्रीकृष्णाच्या दर्शनाची तीव्र इच्छा जागृत झाली. श्रीकृष्णाची मूर्ति जर प्रत्यक्ष दिसेल तर कितीतरी चांगले होईल!

माझ्या नंदलालाने माझ्यावर कृपा केली. एक दिवस ध्यानांत मला सुंदर निळा प्रकाश दिसला. प्रकाश पाहून मी जप करू लागलो. तेथे प्रकाशांतून बाळकृष्णाचें स्वरूप प्रगट झाले. मला बाळकृष्णाच्या मनोहर स्वरूपाचें दृश्य दिसले. माझ्या कृष्णाने कस्तुरीचा तिलक लावला होता. वक्षःस्थलावर कौस्तुभमण्याची माळ धारण केली होती. नाकांत मोती होता. डोळे प्रेमाश्रूंनी भरले होते. मला जो आनंद झाला त्याचें वर्णन करायची शक्ति सरस्वतीलाही नसेल. धावतच जावे आणि श्रीकृष्णचरणी वंदन करावे-डोके टेकवावे, असे मला वाटू लागले. जसा मी वंदन करायला निघालो तसे श्रीकृष्ण अंतर्धान पावले. माझे श्रीकृष्ण मला सोडून का बरे निघून गेले, असा मला प्रश्न पडला. इतक्यांत आकाशवाणीच्या द्वारे मला आज्ञा झाली की तुझ्या मनांत अजून सूक्ष्म वासना राहिली आहे. ज्याच्या मनात सूक्ष्म देखील वासना शिल्लक राहील अशा योग्यांना मी दर्शन देत नाही. या जन्मांत आता तुला माझें दर्शन होणार नाही. तसा तर तुझ्या भक्तीने मी प्रसन्न झालो आहे. तुझ्या प्रेमाला आणि भक्तीला पुष्ट करण्यासाठीच तुला दर्शन दिलें आहे. पण तुला एक जन्म आणखी घ्यावा लागेल. अजून तुझा पुष्कळ जप बाकी आहे. पुढच्या जन्मांत तुला माझे दर्शन होईल. दृष्टि आणि मन दोघांनाही

सुधार. सतत विचार ठेव कीं मी तुझ्या जवळच आहे. जीवनाच्या शेवटच्या श्वासापर्यंत जप करीत रहा. भजनाशिवायचे भोजन पाप आहे. सत्कर्माची समाप्ति होत नसते. ज्या दिवशी जीवन संपेल त्याच दिवशी सत्कर्माची समाप्ती. त्यानंतर मी गंगाकिनारी राहिलो. मरणाच्या पूर्वी मला हा अनुभव होऊ लागला की या शरीरापासून मी निराळा आहे. जड-चेतनाची ग्रंथि सुटली. जड आणि चेतनाची, शरीर आणि आत्म्याची अशी जी गांठ बांधलेली आहे ती भक्तीशिवाय सुटत नाही. शरीरापासून आत्मा निराळा आहे हे सगळेच जाणत असतात. पण त्याचा अनुभव कोणाला होतो ?

ज्ञानाचा अनुभव भक्तीने होतो. संत तुकाराममहाराज म्हणतात की, 'माझें मरण मी माझ्या डोळ्यांनी पाहिले आहे, आपल्या आत्मस्वरूपाला पाहिले आहे.' मन ईश्वराकडे लागलेले असले आणि ईश्वर-स्मरण करता करता जर शरीर सुटले तर मुक्ति मिळते. मनाला ईश्वराचें स्मरण व्हावे म्हणून जपाशिवाय दुसरे कोणतेच साधन नाही. जेव्हा जिभेने जप कराल तेव्हा मनाने स्मरण केलेच पाहिजे. सगळे जीवन ज्याच्या कारणी लागले असेल तोच अंतकाळी आठवेल. अंतकाळपर्यंत माझा जप चालूच राहिला पाहिजे. जपाची पूर्णाहुती होत नाही. भजनाची समाप्ति करीत नाहीत. शरीराच्या समाप्तीबरोबरच भजनाची समाप्ती होते. जीवनाच्या अंतापर्यंत भजन करावे. अंतकाळी राधाकृष्णाचें चिंतन करीत करीत मी शरीरत्याग केला. माझा मृत्यू मी प्रत्यक्ष पाहिला. मला मरणाचे कष्ट झाले नाहीत. ह्यानंतर मी ब्रह्मदेवाचे घरी जन्मलो. पूर्वजन्मीच्या कर्माचें फळ मला ह्या जन्मांत मिळाले. माझें नाव नारद ठेवले गेले. पूर्वजन्मी केलेल्या भजनामुळे माझें मन स्थिर झाले आहे. माझें मन संसाराकडे जातच नाही. आता माझें मन चंचल होत नाही. आता तर मी सतत परमात्म्याचें दर्शन करतो.

एक दिवस मी गोलोकधामीं गेलो. तिथे सतत रासलीला होत असते. तिथे मला राधाकृष्णाचें दर्शन झाले. मी कीर्तनांत तन्मय झालो. श्रीकृष्ण-कीर्तनांत मला फार आनंद वाटू लागला. प्रसन्न होऊन श्रीराधामाईंनी प्रभूजवळ मला प्रसाद देण्याविषयी शिफारस केली. श्रीकृष्णांनी मला प्रसाद दिला. व्यासांनी विचारले, 'प्रसादांत तुला प्रभूंनी काय दिले ?' नारद म्हणाले, 'प्रसादांत त्यांनी मला ही वीणा दिली. प्रभूंनी सांगितले की कृष्णकीर्तन करीत करीत जगतात भ्रमण कर आणि माझ्याशी एकरूप झालेल्या अधिकारी जीवांना माझ्याजवळ घेऊन ये. संसार-प्रवाहांत वाहात असलेल्या जीवांना माझ्याकडे घेऊन ये.'

'भगवंताला कीर्तनभक्ति अतिशय प्रिय आहे. ही वीणा घेऊन मी जगांत भ्रमण करतो. वीणा-नादासह कीर्तन करतो. अधिकारी जीवांना किंवा जो कोणी योग्य भक्त मिळेल त्याला प्रभूच्या धामीं घेऊन जातो. मला वाटेंत ध्रुव भेटला. त्याला प्रभूपाशी घेऊन गेलो. असे जे भक्त भेटले त्यांना मी प्रभूपाशी नेले. जो कोणी सात्त्विक वृत्तीचा निष्ठावान भक्त मिळेल त्याला प्रभूपाशी नेणे हे माझे कर्तव्य.

सत्समागमांत मी भगवत्कथा ऐकली. श्रीकृष्णकथा ऐकली. नंतर मी कृष्णकीर्तन केले आणि प्रेमलता पुष्ट केली. आता तर जेव्हा जेव्हा इच्छा करतो तेव्हा तेव्हा श्रीकृष्ण मला दर्शन देतात. मजबरोबर कृष्ण नाचतात.'

संत नामदेव जेव्हा कीर्तन करीत तेव्हा त्यांचेबरोबर श्री विठ्ठलनाथ नाचत असत.

'मी आपल्या स्वामीचें काम करतो म्हणून त्यांना अतिप्रिय वाटतो. संसाराचें भान विसरून कीर्तन केल्यास आनंद मिळतो. कीर्तनांत तन्मय झालेला मनुष्य संसार विसरून जातो. कीर्तनाने संसाराचा संबंध सुटतो. आणि प्रभूचा संबंध जडतो. संसाराचें ध्यान सोडण्याचा प्रयत्न करा. कीर्तनांत आनंद केव्हा होतो ? जेव्हा जिभेने प्रभूचें कीर्तन, मनाने प्रभूचें चिंतन आणि दृष्टीने प्रभूचें स्वरूप पाहाल तेव्हाच

आनंद होईल. कलियुगांत नामसंकीर्तनाने पाप जळते. हृदय शुद्ध होते. परमात्मा हृदयांत भरून राहतो. परमात्म्याची प्राप्ती होते. म्हणून कथेंत कीर्तन झालेच पाहिजे. कीर्तनाशिवाय कथा परिपूर्ण होत नाही. कलियुगांत स्वरूपसेवा लवकर फलित होत नाही. स्मरणसेवा अर्थात नामसेवा त्वरित फलित होते. अहो व्यासमहाराज! या सर्वांचे मूळ सत्संगात आहे. सत्संगाचा असा मोठा महिमा आहे की जो सत्संग करतो तोच संत बनतो.

श्रीकृष्णकथेने माझे जीवन सुधारले आहे. कृष्णकथा ऐकल्यामुळे मला खरे जीवन मिळाले आहे. कथा ऐकून विरागी व्हा आणि स्वभाव सुधारा. संयम वाढवून अधिक भजन कराल तर सफलता अवश्य मिळेल. नारद व्यासांना सांगतात, 'आपण मला जो मान देता तो सत्संगाचा मान आहे. सत्संगामुळेच मी सन्मानयोग्य झालो आहे. भिल्ल मुलांबरोबर व्यर्थ भटकणारा मी सत्संगामुळेच देवर्षि झालो आहे.'

नारद दासीपुत्र होते. खऱ्या साधुसंतांच्या सेवेने त्यांचे जीवन सुधारले, संत स्वतःच तीर्थरूप असतात. संत म्हणजे एक जंगमतीर्थच असते, परिस लोखंडाचे सोने करतो पण लोखंडाला आपल्यासारखेच करीत नाही. परंतु संत, त्यांच्या संसर्गात आलेल्यांना आपल्यासारखेच करतात. **"संत करे आपुसमाना"**. मनुष्याचा जन्म देव होण्यासाठी आहे. मनुष्याला देव होण्यासाठी चार गुणांची आवश्यकता आहे: (१) संयम (२) सदाचार (३) स्नेह आणि (४) सेवा. हे चार गुण सत्संगाशिवाय येत नाहीत. सत्संगाचे फळ भागवतांत सांगितले आहे. सत्संगामुळे नारद दासीपुत्राचे देवर्षि झाले आहेत. मनुष्य मायेचा दास झाला आहे. सत्संगामुळे त्याची मायेपासून सुटका होऊ शकते, खऱ्या भक्तीच्या रंगांत तो दंग होतो. मग त्याला प्रभुशिवाय चैन पडत नाही. नारदाचे चरित्र हे भागवताचें बीजारोपण होय. सत्संग आणि सेवेचे फळ दाखविणें हा या चरित्राचा उद्देश आहे. म्हणून विस्तार केला. आम्ही हे पाहिले आहे कीं जपाशिवाय जीवन सुधारत नाही. दानाने धनाची शुध्दि होते. ध्यानाने मनाची शुध्दि होते आणि शरीराची शुध्दि स्नानाने होत असते. परोपकाराने देखील मनाची मलीनता पूर्णपणे जात नाही. म्हणूनच ध्यान आणि जपाची आवश्यकता आहे.

जप करणाऱ्याची स्थिति कशी असावी? श्री ब्रह्मचैतन्यस्वामींनी म्हटले आहे की, **"सहज सुमिरन होत है, रोम रोम से राम"** जपाची प्रशंसा करताना गीतेत भगवंतांनी म्हटले आहे, **"यज्ञानां जपयज्ञोऽस्मि."** रामदासस्वामींनी दासबोधांत लिहिलें आहे कीं जप केल्याने जन्मकुंडलीचे ग्रह देखील सुधारतात. एक कोटी जपाने तन सुधारते अर्थात आरोग्यलाभ होतो. दोन कोटी जप केल्याने द्रव्यसुख मिळते अर्थात धन प्राप्त होते. तीन कोटी जपाने पराक्रम सिध्द होतो. यशकीर्ती मिळते. चार कोटी जपाने सुख प्राप्त होते. पाच कोटी जपाने ज्ञानप्राप्ति होते. सहा कोटी जपाने अंतस्थ शत्रूंचा विनाश होतो. सात कोटी जपाने स्त्रियांना सौभाग्यसुख मिळते– स्त्रीला पतिसुख आणि पुरुषाला पत्नीसुख मिळते. आठ कोटी जपाने मरण सुधारते. नऊकोटी जपाने इष्ट देवाचे दर्शन लाभते-अपरोक्ष अनुभूति होते. ज्या देवाचा जप कराल त्याचा सगुण साक्षात्कार होतो. दहा, अकरा आणि बारा कोटी जप केल्याने अनुक्रमे संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण कर्म जळून जाते, या कर्मांचा नाश होतो आणि तेरा कोटी जपाने परमेश्वराचे साक्षात दर्शन होते.

नारद व्यासांना म्हणाले, आता आपण अशी कथा करा कीं ज्यायोगे ऐकणाऱ्यांची पापे जळून जातील, त्यांचे हृदय द्रवेल. आपण आतापावेतो ज्ञानप्रधान कथा पुष्कळ सांगितल्या आहेत. परंतु आता प्रेमप्रधान कथा सांगा. आपण अशी कथा करा कीं ज्यायोगे सगळ्यांच्या हृदयांत कृष्णप्रेम प्रगट होईल. कथेचा उद्देश नारदांनी सांगितला आहे: कथा ऐकल्याने प्रभुप्रेम जागृत होईल आणि सांसारिक विषयांविषयी

विराग उत्पन्न होईल तरच कथा ऐकली असे म्हणता येईल. नारदांनी व्यासांना अशी आज्ञा केली की जर कृष्णप्रेमात लीन होऊन कथा कराल तर आपले आणि सर्वांचे कल्याण होईल. व्यास म्हणाले कीं आपण मला अशी कथा ऐकवा. नारद म्हणाले, 'आपण ज्ञानी आहात. आपण आपले स्वरूप तर विसरला नाहीत ना ? आपण समाधी लावा आणि समाधींत जे दिसेल तेच लिहा. बहिर्मुख इंद्रियांना अंतर्मुख केले म्हणजे समाधी ईश्वराजवळ घेऊन जाते. जोपर्यंत नारद भेटत नाहीत तोपर्यंत नारायणाचे दर्शन होत नाही. संसारात आल्यावर हा जीव आपल्या स्वरूपाला विसरून जातो, एखाद्या संताने कृपा केली म्हणजे ह्या जीवाला ते आपल्या स्वरूपाचे भान करवितात. व्यास नारायणांना सुध्दा नारदांची आवश्यकता पडली.

यानंतर नारद ब्रह्मलोकीं निघून गेले. व्यासांनी प्राणायामाने दृष्टी अंतर्मुख केली तेव्हां हृदयगुंफेत बालकृष्णाचें दर्शन झाले. व्यासांना समस्त लीलांचे दर्शन झाले. व्यासांना नारदांनी स्व-स्वरूपाची जाणीव करून दिली. परिणामी व्यासांनी श्रीमद्भागवताची रचना केली. भागवतांत तत्त्वज्ञानसुध्दा खूप आहे, परन्तु त्याचा मुख्य हेतु प्रेम आहे. इतर पुराणांत ज्ञान, कर्म, आचार, धर्म इत्यादी मुख्य आहेत. परन्तु भागवतपुराणांत प्रेम प्रधान आहे, भक्ति प्रधान आहे. वाल्मीकि-रामायण आचारधर्मप्रधान ग्रंथ आहे, तर तुलसी-रामायण भक्तिप्रधान ग्रंथ आहे. वाल्मीकींना स्वतःच्या जन्मात लिहिलेल्या कथेने तृप्ति झाली नाही. भगवंताच्या मंगलमय लीला-कथांचे भक्तीनें आणि प्रेमपूर्वक वर्णन करायचे बाकी राहिले. याकरिता त्यांनी कलियुगांत तुलसीदासाच्या रूपांत जन्म घेतला.

वेदस्वीकृत भागवताचे हे फळ आहे. हे तर सर्वांना माहीतच आहे कीं वृक्षाची साल आणि पानांपेक्षा त्याच्या फळांमध्ये विशेष रस असतो. रसपूर्ण अशा या श्रीमद्भागवतस्वरूप फळाच्या रसाचे मोक्ष मिळेपर्यंत आपण पान करा. **'पिबत भागवतं रसमालयं'** (भाग. १. १. ३). जोपर्यंत जीव आणि ईश्वराचे मिलन होत नाही तोपर्यंत या प्रेमरसाचे पान करीत भागवताचा आस्वाद घेत रहा, भागवतरसाचे पान करा. वेदान्त अधिकारी जनांसाठी आहे. तो सर्वांना सोपा नाही. वेदान्त त्याग करायला सांगतो. वेदान्त म्हणतो, सर्वांचा त्याग करून भगवंताचे मागे लागा. पण संसारी जीवांकडून तर काहीच सुटू शकत नाही. अशांच्या उध्दारासाठी कोणता उपाय आहे? हो! आहे उपाय. त्याग करता आला नाही तरी काही हरकत नाही, परंतु आपले सर्वस्व ईश्वराला अर्पण करा आणि अनासक्त राहूनच त्याचा भोग घ्या. व्यासांनी ब्रह्मसूत्रे रचली. योगदर्शनावर भाष्य केले. परंतु त्यांना वाटले कलियुगांतील मानव भोगपरायण होतील आणि म्हणूनच त्यांना या योगादिकांत प्रवृत्ति होऊ शकणार नाही. त्यांच्यासाठी करुणेमुळे हे भागवतशास्त्र रचले. परीक्षिताला निमित्त करून संसारांत फसलेल्या लोकांसाठी व्यासांनी ही भागवताची कथा सांगितली आहे. भागवत विशेषेकरून संसारी लोकांसाठीच आहे.

संसारी लोकांविषयी करुणा असल्यामुळे शुकदेवांनी या भागवतपुराणाचें वर्णन केले आहे. प्रभुप्रेमाशिवाय कोरड्या ज्ञानाला शोभा नसते हे दाखविण्याचा भागवताचा उद्देश आहे. भक्तीशिवाय ज्ञानाला शोभा नाही. जर ज्ञान वैराग्याच्या योगे दृढ झालेले नसेल तर अशा ज्ञानाने मरण सुधारण्याऐवजी बिघडेलही. शक्य आहे कीं असे ज्ञान अंतकाळी धोका देईल. मरणाला भक्ति सुधारते. भक्तीशिवाय ज्ञान शुष्क आहे. ते मरण बिघडवते. विधिनिषेधांच्या सर्व मर्यादांचा त्याग केलेले मोठे मोठे ऋषिदेखील भगवंताच्या अनंत कल्याणमय गुणांच्या वर्णनांत सदा रत राहतात. असा आहे भक्तीचा महिमा!

ज्ञान्याला अभिमान सतावतो. भक्ताला नाही. भक्ति अनेक सद्गुण आणत असते. भक्ति सर्व

गुणांची जननी आहे. भक्त नम्र असतो, भक्त विनम्र होतो. भागवतकथा! जी कथा पाप दूर करील आणि प्रभूच्या चरणी प्रेम जागृत करील तीच खरी भागवतकथा होय! भगवंताच्या कथेने आणि भागवतस्मरणाने आपल्या हृदयाला आर्द्र करा. त्याच्या मंगलमय नामाचा जप करा. हाच कलियुगांत मुक्ति मिळविण्याचा मार्ग आहे. विषयांचे बंधन जर मनुष्य सोडील तरच मनाला खरे आनंदसुख मिळेल. संयम आणि सदाचार हळू हळू वाढवीत जा म्हणजे भक्तींत आनंद येईल. वैराग्याशिवाय भक्ति सफल होत नाही. आचार-विचार शुध्द असतील तर भक्ति पुष्ट होईल. जीवन विलासी झाले तर समजा कीं भक्तीचा विनाश झाला आहे. भागवतशास्त्र मनुष्यास काळाच्या मुखातून सोडविते. ते मनुष्यास सावध करते की काळाच्या मुखातून सुटायचे असेल तर काळाचाही काळ अशा श्रीकृष्णांना शरण जा. जे सर्वस्व भगवंतावर सोडतात त्यांची चिंता भगवान स्वतः करतात. महाभारत युध्दांत दुर्योधन भीष्मांना ताणून बोलला असता भीष्मपितामहांनी प्रतिज्ञा केली होती कीं, "उद्या मी अर्जुनास तरी मारीन, किंवा स्वतः तरी मरीन". या प्रतिज्ञेने सर्व घाबरले. कारण ती भीष्मांची प्रतिज्ञा होती! हे ऐकून भगवान कृष्णांना चैन पडले नाही. रात्रीं झोप आली नाही. भीष्मांची प्रतिज्ञा ऐकून अर्जुनाची अवस्था काय झाली असेल हे पाहण्याकरिता भगवंत अर्जुनाकडे आले. जाऊन पाहिले तर अर्जुन गाढ झोपी गेलेला होता. भगवंताचे मनांत आले की भीष्माने जी प्रतिज्ञा केली ती अत्यंत भीषण आहे! तरी पण हा शांत झोपला आहे! त्यांनी अर्जुनाला जागविले आणि विचारले, "तू सुध्दा भीष्मांची प्रतिज्ञा ऐकली आहेस ना? अर्जुन म्हणाला, "हो, ऐकली आहे. श्रीकृष्णांनी विचारले, 'तर मग तुला मृत्यूचे भय नाही का? चिंता नाही का?' अर्जुन म्हणाला, "माझी चिंता करणारे माझे स्वामी आहेत, ते जागृत आहेत म्हणून मी झोपलो आहे. ते माझी चिंता करतील. मी कशाकरता चिंता करू?" याप्रमाणे सर्व ईश्वरावर सोडा. मनुष्याची चिंता जोपर्यंत ईश्वर करू लागत नाही तोपर्यंत तो निश्चिंत होत नाही.

**१०. श्रीमद्भागवताचें ज्ञान देण्या-घेण्याचे अधिकारी कोण?:**

प्रथम स्कंध हा अधिकारलीलेचा आहे. अधिकाराशिवाय संत भेटले तर त्यांचेप्रति सद्भाव जागृत होत नाही. संतांना शोधण्याची आवश्यकता नाही. शोध केल्याने संतांची भेट होत नाही. केवळ प्रभुकृपेनेच संत भेटतात. शेवटी जोपर्यंत मन शुध्द होत नाही तोपर्यंत प्रभूची कृपा होणार नाही. जोपर्यंत मन दुर्जन राहील तोपर्यंत संत भेटणार नाहीत. संत व्हाल तर संत भेटतील. संत, अशी पाहण्याची शक्ति देतात कीं ज्यायोगे संसारांतील पदार्थांना पाहून आनंद होईल; त्यांच्या उपभोगांत आनंद नाही. हा संसार ईश्वराचे रूप आहे. ह्या कारणाने जगाला ईश्वरमय स्वरूपात पाहा.

शुकदेव आणि अप्सरांचा प्रसंग पूर्वी सांगून झाला आहे. महाप्रभूंनी वैष्णवाची लक्षणे सांगितली आहेत कीं ज्याच्या दर्शनाने कन्हैयाचे स्मरण होईल तो वैष्णव, ज्याच्या संगतींत आल्यावर प्रभुस्मरण होईल तो वैष्णव. शुकदेवांच्या दर्शनाने अप्सरांना वैराग्य उत्पन्न झाले. कृष्णकथेसाठी त्या वेड्या झाल्या आहेत. जगात संतांचा अभाव नाही, परंतु सत्शिष्यांचा अभाव आहे. जो अधिकारी झाला आहे त्याला संतपुरुष भेटणारच. मनुष्य स्वतः जेव्हां संत होतो तेव्हांच त्याला संत भेटतात. संत होण्यापूर्वी संतांची भेट झाली तर त्यांच्यांत सद्भाव जागृत होत नाही. ज्याच्या डोळ्यांत ईश्वर असतो तो सर्वांमध्ये ईश्वराचा अनुभव घेतो. या जगात निर्दोष असा केवळ एक परमात्माच आहे. ईश्वराशिवाय कोणी निर्दोष नाही. संतांमध्ये सुध्दा काही एखादा दोष असेलच. कारण पूर्ण सत्त्वगुण प्रगट झाल्यावर हा जीव ह्या शरीरांत

राहू शकत नाही. ईश्वरापासून तो वेगळा राहू शकत नाही. ही ब्रह्मदेवाची सृष्टि गुणदोषांनी भरलेली आहे. जगांत सर्व प्रकारे सुखी कोणी असूच शकत नाही. जर सर्वप्रकारे सुखी कोणी झालाच तर तो सुखाचे भानही विसरून बसेल.

संसाराच्या प्रत्येक पदार्थात दोष आहेत आणि गुणही आहेत. दृष्टीला अशी गुणमयी बनवा कीं कोणाचा दोष दिसणार नाही. जोपर्यंत तुमची दृष्टी गुणदोषाने भरलेली आहे तोपर्यंत तुम्हाला संतामध्येही दोष दिसतील. याकरिता ज्याची दृष्टी गुणमयी आहे तोच संत आहे. अभिमान आला की पतन होते. सतत दीनता असण्याची आवश्यकता आहे. शक्य आहे की ईश्वरच संतांमध्ये एखादा दोष काही हेतुपूर्वक ठेवीत असेल. असेही शक्य आहे कीं ईश्वर आपल्या भक्तांमधे एखादा दोष राहूच देत असेल की ज्यामुळे त्याच्या भक्ताला दृष्ट लागणार नाही. आई मुलाचा सर्व शृंगार पोशाख करून कोणाची दृष्ट न लागावी म्हणून गालावर काजळाचा एक ठिपका लावत असते. माणसात जर काहीच दोष नसेल तर त्याच्या मनात अभिमान येतो. आपल्या दृष्टीला गुणमयी बनवा. कोणाचे दोष काढू नका. कोणाच्याही पापाचा विचार करू नका किंवा वाणीने त्या पापांचा उच्चार करू नका. संत होणे म्हणजे काय घर सोडणे होय? घर सोडण्याची आवश्यकता नाही. घर सोडण्यानेच कोणी संत होतो असे नाही. घरांत राहून संत होऊ शकाल. घरात राहूनच ईश्वराला प्राप्त करता येते. संत तुकाराममहाराज, संत एकनाथ, गोपी इत्यादींनी घरात राहून प्रभूला प्राप्त करून घेतले होते. केवळ भगवी वस्त्रे धारण करूनच कोणी संत होत नाही. कपडे बदलण्याची आवश्यकता नाही. हृदय बदलण्याची आवश्यकता आहे. त्याच्यासाठी मन बदलण्याची गरज आहे. मनाचे गुलाम होऊ नका, मनाला गुलाम बनवा.

परीक्षित राजाने मनाला ताब्यांत घेतले, म्हणून त्याला शुकदेव भेटले. सर्व काही सोडायची-टाकायची गरजच नाही. सर्वच सोडून दिल्याने निवृत्तीच्या वेळी इंद्रिये फार त्रास देतात. संसारात जो लक्ष्याचे ध्यान ठेवतो तोच संत आहे. मनुष्यजन्माचे लक्ष्य परमात्म्याशी मिलन हे आहे. जो या लक्ष्यासाठी क्षणोक्षणी सावध असतो तो संत होय. आत्मा हा मनाचा साक्षी आहे, द्रष्टा आहे. ज्याने आपले मन ताब्यांत घेतले तोच संत. मनाला ताब्यात घ्याल तर तुम्हीही संत व्हाल. मनालाच ताळ्यावर आणायची गरज आहे. जग बिघडलेले नाही. आपले मनच बिघडलेले आहे. मनावर विश्वास ठेवू नका. मनावर अंकुश ठेवा. ज्या दिवशी तुमचा आत्मा आपले मन शुध्द आहे, चारित्र्य शुध्द आहे, अशी साक्ष देईल त्या दिवशी समजा की तुम्ही संत झाला आहात. मनाला सुधारायचे अनेक उपाय शास्त्रांत सांगितले आहेत. मनाला मृत्यूचे भय दाखवा म्हणजे मन सुधारेल. मृत्यूच्या स्मरणाने मन सुधारते. मृत्यूला विसरण्याने मन बिघडते. परीक्षित राजाने ऐकले कीं तो सात दिवसांत मरणार आहे. हे ऐकल्याबरोबर त्याच्या विलासी जीवनाचा अंत झाला. आता विलासी जीवन विरक्त जीवन झाले आहे. परीक्षिताला मृत्यूची भीती वाटली आणि त्याचे जीवन सुधारले. मृत्यूचे दुःख भयंकर असते. जीव ज्यावेळी शरीर सोडतो त्यावेळी हजारो विंचू एकदम डंख मारीत आहेत अशा वेदना होतात.

जन्म दुःख आहे, वृद्धावस्था दुःखमय आहे, आणि स्त्रीपुत्रादि कुटुंबजन दुःखमय आहेत. शेवटी अंतकाळही फार दुःखद आहे. याकरता "जागे व्हा! या अंतकाळाचे रोज स्मरण करा. रोज विचार करा की, "आज मला यमदूत पकडायला आले तर मी कुठे जाईन? नरकांत, स्वर्गांत की वैकुंठात? मृत्यूचे निवारण शक्य नाही तर मग पाप कशाला करतोस?" कोणी कोणी तर फारच समजूतदार बनत असतात. दोन शेर भाजी घ्यायची असेल तर सगळा बाजार फिरतात, डोके पिकवतात की कारली घेऊ की वांगी की भोपळा? ज्याचा विचार करायची गरज होती त्याचा विचार केला नाही

आणि भाजीपाल्याचा विचार करतो आहे. मृत्यूचे रोज स्मरण करा. मृत्यूचें भय राहील तर तुमचें पाप दूर होईल आणि ज्या दिवशी तुमचें पाप दूर होईल त्या दिवशी समजा कीं तुम्ही संत झाले आहांत.

पापपुण्याचे अनेक साक्षी आहेत. सूर्य, चंद्र, पृथ्वी, वासुदेव सर्व साक्षी आहेत. माझ्या भगवंताचे अनेक सेवक आहेत. जिथे तुम्ही जाल तिथे ते बरोबर येतात. मनुष्य असे समजत असतो कीं तो जे पाप करतो ते कोणी पाहत नाही. अहो, एकांत कसाही असो, तेथे वायु तर आहेच, आणि तेथे तुमच्या स्वतःच्या अंतर्यामीं परमेश्वर वसलेला आहेच. सरतेशेवटी तर या लोकीं मनुष्य मरणाला शरण जातच असतो. तरीपण तो पापाचरण सोडत नाही. श्रीशंकराचार्य म्हणतात कीं मनुष्याला एक दिवस मरायचे आहे, हे सर्व सोडून जायचे आहे असे माहीत असूनसुद्धा तो पाप कां करतो याचे मला आश्चर्य वाटते. म्हणून आपले चारित्र्य सांभाळा.

परीक्षित अधिकारी झाल्याबरोबर त्याच्याजवळ शुकदेव आले. शुकदेवांना आमंत्रण द्यावे लागले नाही. शुकदेवांचे असे नव्हते कीं कोणाच्या आमंत्रणानेच ते येतील. राजाची जीवनचर्या बदलून गेली आहे. शुकदेवांना समजले कीं परीक्षित आता राजा राहिला नाही, महर्षि झाला आहे. म्हणून ते आले. राजर्षि आणि ऋषि एकच. राजा जोपर्यंत महालांत जीवन व्यतीत करीत होता तोपर्यंत शुकदेव आले नाहीत. परंतु तक्षकाच्या भीतीने जेव्हा संसार सुटला तेव्हा ताबडतोब शुकदेव आले. परीक्षित राजा असताना जर शुकदेव तेथे कथेसाठी आले असते तर राजा म्हणाला असता, "आपण आला आहांत, चांगलं केलंत. एक तास कथा करा अन् आपली बिदागी घेऊन जा. मला फार काम आहे!" परीक्षित राजाची खात्री झाली होती की आता सात दिवसांत त्याला मरायचे आहे! आम्हाला तर हेही माहीत नाही. आयुष्य हे पाण्याच्या बुडबुड्यासारखे आहे. पाण्याच्या बुडबुड्याला फुटायला कांही वेळ लागत नाही. त्याचप्रमाणे आयुष्याचा अंत यायलाही वेळ लागत नाही.

प्रथमस्कंध अधिकारलीलेचा आहे. श्रीमद्भागवताच्या ज्ञानसंपादनाचा अधिकारी कोण, हे ज्ञान देण्याचा अधिकारी कोण, इत्यादी सांगितले आहे. पहिल्या स्कंधांत तीन प्रकरणें आहेत. उत्तमाधिकार, मध्यमाधिकार आणि तिसरा कनिष्ठिकाधिकार. शुकदेव आणि परीक्षित उत्तम वक्ता-श्रोता, नारद आणि व्यास मध्यम श्रोता-वक्ता आणि सूत आणि शौनक कनिष्ठ वक्ता आणि श्रोता आहेत. व्यास समाज सुधारण्याच्या भावनेने कथा करतात. याकरिता त्यांना मध्यम वक्ता म्हटलें आहे. समाज सुधारण्याची इच्छा अनेक वेळा प्रभुभजन आणि प्रभुमिलनामधे बाधक होत असते. दुसऱ्याला सुधारण्याची इच्छा प्रभूच्या भजनांत विघ्न आणते. दुसऱ्यांना सुधारावयाच्या भानगडींत पडू नका; तुम्ही आपलेच जीवन सुधारा. कथा सांगत असताना शुकदेवांना हे भान नव्हते कीं त्यांची कथा ऐकायला समोर कोण कोण बसले आहे. शुकदेवांच्या कथेने अनेकांचे जीवन सुधारते, पण शुक त्याचा विचार करीत नाही. श्रीशंकराचार्यांनी म्हटलें आहे कीं ब्रह्मज्ञानी महात्मा एक क्षण देखील ब्रह्मचिंतन सोडू शकत नाही. अशी दशा शुकदेवांची आहे. शंभर टक्के वैराग्य नसेल तर दृष्टी ब्रह्माकार होत नाही. जगतांत ब्रह्मज्ञानी पुष्कळ भेटू शकतात, पण ब्रह्मदृष्टी ठेवून वावरणारे शुकदेवांसारखे भेटत नाहीत.

बोलणे आणि करणे एक नसेल, वर्तन बोलण्याप्रमाणे नसेल तोपर्यंत शब्दांत शक्ति येत नाही. रामदासस्वामींनी म्हटले आहे– 'आधी केले मग सांगितले,' मी अनुभव घेतला आहे आणि मग तुम्हाला सांगितले आहे. शुकदेवांनी जे कांही सांगितले ते आधी आचरणांत आणल्यानंतर सांगितले आहे. शुकदेव उत्तम वक्ता आहेत, कारण त्यांची वाणी आणि वर्तन एकसारखे आहे. याचकरता तुकारामांनी

म्हटले आहे, "**बोले तैसा चाले, त्याची वंदावी पाऊले.**" अशी व्यक्ति वंदनीय असते. एकदा एका मातेने आपल्या मुलाला संत एकनाथांपाशी आणले आणि म्हटले, "महाराज, माझ्या मुलाला गूळ खायची फार सवय झालेली आहे. तो ही सवय सोडत नाही. तो गूळ खाणे सोडून देईल असा आशीर्वाद द्या." महाराजांनी त्यावेळी आशीर्वाद दिला नाही. कारण ते स्वतः गूळ खात असत. त्यांनी त्या मातेला सांगितले, 'माते, आणखी कांही दिवसांनी तू आपल्या पुत्राला घेऊन ये. त्यावेळी मी आशीर्वाद देईन, आज नाही.' नंतर त्यांनी स्वतः गूळ खाणे सोडून दिले. देवाला म्हणाले, 'विठ्ठलनाथ, कृपा करा. माझ्या शब्दांत शक्ति यावी म्हणून मी आजपासून गूळ खाणे सोडले आहे.' नंतर कांही दिवसांनी ती आई मुलाला घेऊन आली. यावेळी महाराजांनी आशीर्वाद दिला.

प्रसाद सेवन करताना, अजीर्ण होईल इतका प्रसाद खाऊ नये. भगवंत योगी आहेत आणि भोगीही आहेत; आणि हा जीव भोगी आहे, योगी नाही. याकरता भगवंत छप्पन भोगांचा भोग करतील तरी कांही हरकत नाही. आपल्याकडून असे होऊ शकत नाही. त्यागाने अलौकिक शक्ति येते. विषयभोग आमच्या हातून सुटले— निघून गेले कीं दुःख होते आणि विषय प्राप्त होऊनही आम्हीच त्यांना सोडले तर आनंद होतो. शुकदेवांमधे शंभर टक्के वैराग्य आहे, म्हणून ते उत्तम वक्ता आहेत.

महाप्रभूंनी म्हटलें आहे कीं भागवतांत समाधिभाषा मुख्य आहे. ईश्वराच्या ध्यानांत ज्याला थोडा देखील आनंद आहे त्याला भागवताचा अर्थ लवकर समजतो. व्यासांनी एका एका लीलेचें प्रत्यक्ष दर्शन घेतले आहे. व्यासांनी अंतर्दृष्टीने हे सर्व पाहिले आहे. भगवंताचे स्वरूप अलौकिक आहे. आपले डोळे लौकिक आहेत. म्हणून लौकिक डोळे अलौकिक ईश्वराला पाहू शकत नाहीत. बाहेरचे डोळे बंद केले की आतले डोळे उघडतात आणि तेव्हाच परमात्म्याचे दर्शन होते.

सूत म्हणाले— व्यासांनी अठरा हजार श्लोकांचा हा भागवत ग्रंथ लिहिला. व्यासांना वाटले, "आता माझे अवतारकार्य पूर्ण झाले. जो माझ्या भागवताचा आश्रय घेईल त्याला कलीचे भय राहणार नाही." परंतु व्यासांना एक काळजी पडली की, मी ग्रंथ तर तयार केला, पण ह्याचा प्रचार कोण करील? या ग्रंथांत मी सर्व काही भरून दिले आहे. हे भागवत प्रेम-शास्त्र आहे. मायेवर-संसारावर प्रेम असणाऱ्याला भागवताचा प्रचार नाही करता येणार. जन्मापासूनच ज्याला मायेचा संसर्ग झाला नाही तोच या ग्रंथाचा प्रचार करू शकेल. भागवत ही परमहंसाची संहिता आहे. श्रीकृष्ण तर महापरमहंस आहेत. प्रल्हाद, भरत, ऋषभदेव इत्यादी सर्व परमहंस आहेत. करिता निर्विकारी असेल तोच या ग्रंथाचा प्रचार करू शकेल. पुष्कळ विचार केल्यावर व्यासांच्या लक्षांत आले की असा योग्य तर माझा मुलगाच आहे. शुकाला तर रंभा देखील विचलित करू शकली नाही.

स्त्रियांमध्ये श्रेष्ठ तर रंभाच आहे. अशी रंभा शुकदेवांना विचलित करायला आली. तेव्हां तिला शुकदेव म्हणाले '**वृथा गतं तस्य नरस्य जीवनम्.**'— शुकदेव म्हणतात, हे देवी, विषयभोगाला विन्मुख होणाऱ्याचें जीवन व्यर्थ नाही, तर नीलकमलासारखे सुंदर ज्याचे नेत्र आहेत, ज्याच्या आकर्षक अंगावर केयूर-हार इत्यादी अलंकार शोभत आहेत, अशा सर्वांतर्यामी वसलेल्या नारायण प्रभूच्या चरणकमली ज्यांनी स्वतःला भक्तिपूर्वक अर्पण करून या जन्ममरणाचे फेरे चुकवले नाहीत अशा लोकांचे जीवन व्यर्थ आहे. त्यांनी मनुष्यदेहाला येऊन आपला जन्म फुकट घालवला आहे.— **वृथा गतं तस्य नरस्य जीवनम्.**

ज्यांच्या वक्षःस्थलावर लक्ष्मी शोभायमान आहे, ज्यांच्या ध्वजेवर गरुड स्थित आहे, जे सुदर्शनचक्रधारी आहेत अशा परमात्मा मुकुंदांचे ज्याने क्षणभरही स्मरण केले नाही अशा मनुष्याचें

जीवन वृथा आहे असेच समजावे.

रंभेने जेव्हा नारीदेहाची अत्यंत प्रशंसा केली तेव्हा शुकदेव म्हणाले, 'स्त्रीचा देह इतका सुंदर आणि सुगंधी असतो हे तर मला आजच समजले. स्त्रीचे शरीर इतके सुंदर असते हे मला पूर्वी ठाऊकच नव्हते. परमात्म्याच्या प्रेरणेने जर मला पुन्हा जन्म घ्यायचा असेल तर मी तुझ्यासारखी माताच पसंत करीन.'

शुकदेव जन्मापासूनच निर्विकारी आहेत. ज्या पुत्राने जन्मल्याबरोबरच बापाला सांगितले कीं तुम्ही माझे पिता नाही आणि मी तुमचा पुत्र नाही; असे शुकदेव घरी येतात तरी कसे? शुकदेव जन्मसिद्ध योगी आहेत. जन्म झाला आणि तात्काळच त्यांनी तपश्चर्येसाठी वनाकडे प्रयाण केले. शुकदेव नेहमी ब्रह्मचिंतनांत लीन राहात असत. त्यांना वनांतून बोलवायचे कसे? ते वनांतून घरी आले तरच मी त्यांना भागवतशास्त्र शिकविणार! आणि मग ते त्याचा प्रचार करतील असा विचार व्यासांच्या मनांत आला. श्रीकृष्णांच्या स्वरूपाचे वर्णन होऊ शकत नाही. भगवंताच्या स्वरूपाचा कोणाला पार लागेल? योगी लोकांचे मन त्या प्रभूचा कांही अनुभव करू शकते. कारण असे आहे कीं – त्याचा पार गाठण्यासाठी जाणारे मन वाणीसहित परत येते. श्रीकृष्णाचें स्वरूप अद्‌भुत आहे. योग्यांच्या चित्ताला देखील आकर्षित करते, असे ते स्वरूप आहे. तर मग तो कन्हैया शुकदेवांसारख्या योग्याला कां नाही आकर्षित करणार? शुकदेव निर्गुण ब्रह्माच्या चिंतनांत लीन होते. त्यांतून त्यांच्या चित्ताला काढून सगुण ब्रह्माकडे आकर्षित करण्यासाठी श्रीकृष्णलीलेचे श्लोक त्यांना ऐकविले पाहिजेत असें ठरवून त्या श्लोकांचा कांही विशेष जादूसारखा प्रभाव व्यासांनी निश्चित केला. व्यासांच्या शिष्यांना जंगलांत दर्भ-समिधा आणायला जाताना हिंस्र पशूंचे भय वाटे. त्यांनी हे व्यासांना सांगितले. व्यास म्हणाले, 'ज्यावेळी तुम्हाला भीती वाटेल त्यावेळी तुम्ही भागवताच्या श्लोकाचा पाठ करीत जा. श्रीकृष्ण आपल्याबरोबर आहेत असा विचार करा. ईश्वर नेहमी आपल्याबरोबर आहे असा विचार कराल आणि अनुभवाल तर तुम्ही निर्भय व्हाल. राधारमण श्रीकृष्णांचे स्मरण करा. यानंतर जेव्हा जेव्हा ऋषिकुमार वनांत जात तेव्हा तेव्हा '**बर्हापीडम्**' इत्यादी श्लोक म्हणत आणि वनांत वाघ इत्यादी हिंस्र पशू वैर विसरून शांत होऊन जात. पशूंच्या मनावर देखील या श्लोकांचा प्रभाव पडतो. ज्या मंत्रांनी पशूंनासुद्धा आकर्षून घेतले त्या मंत्रांनी शुकदेव कां आकर्षित होणार नाहीत? देहाचे भान विसरलें जात नाही तोपर्यंत प्रभूचें दर्शन होत नाही. शुकदेव ज्योतिर्मय ब्रह्माचें चिंतन करताना त्यांना देहाभिमान नाही.

शुकदेव परमहंसांचे आचार्य आहेत, याकरता ब्रह्मचिंतन करीत असतात. त्यांच्या मनाला आकर्षित करण्यासाठी व्यासांनी युक्ति योजली: व्यासांनी शिष्यांना सांगितले की शुकदेव ज्या वनांत समाधींत बसले असतील तेथे तुम्ही जा आणि त्यांना ऐकू येईल अशा आवाजांत या दोन श्लोकांचे गायन करा. हे दोन श्लोक त्यांना ऐकवा. शुकदेवांचे हृदय गंगाजलासारखे शुद्ध आहे. पाणी शुद्ध आणि स्थिर असेल तर त्यांत शुद्ध प्रतिबिंब पडेल. आपल्या हृदयरूपी भिंतीवर फार मळ साठलेला आहे. तो खरडून टाकण्याची आवश्यकता आहे. हृदय अगदी स्वच्छ-निर्मळ करा म्हणजे त्यांत परमात्म्याचें प्रतिबिंब पडेल. आपल्या हृदयांत हजारो जन्मांचा मळ साचलेला आहे. यासाठी हृदयाच्या भिंतीला खूप रगडा-घासा आणि हा मळ धुवून टाका. मळ काढून टाकला म्हणजे त्यांत परमात्म्याचे प्रतिबिंब पडेल. म्हणून शुद्ध व्हा. शब्दांतून रूपाचें दर्शन होते. नामसृष्टि पहिली आणि रूपसृष्टि त्यानंतर. शिष्यांना आज्ञा झाल्यावर ते त्या वनांत गेले. शुकदेवांचे चित्त आकर्षित करण्याकरता श्लोकांचे गायन करू लागले. शुकदेव स्नान करून समाधीसाठी बसायच्या तयारीत होते. जर का ते समाधीसाठी बसून

त्यांना समाधि लागली असती तर हे श्लोक ऐकू शकले नसते; म्हणून शिष्यांनी ताबडतोब गायन सुरू केले–

**बर्हापीडं नटवरवपुः कर्णयोः कर्णिकारं।**
**बिभ्रद्वासः कनककपिशं वैजयन्तीच मालाम्॥**
**रन्ध्रान्वेणोरधसुधया पूरयन्गोपवृन्दैः।**
**वृंदारण्यं स्वपदरमणं प्राविंशद्गीतकीर्तिः॥**

भाग. १०-२१-५ (वेणुगीत)

श्रीकृष्ण गोपबालकांबरोबर वृंदावनांत प्रवेश करीत आहेत. त्यांनी डोक्यावर मोरमुकुट धारण केला आहे आणि कानांत कण्हेरीची पिवळी फुलें, शरीरावर पिवळा पीतांबर आणि गळ्यांत पाच प्रकारच्या सुगंधित पुष्पांनी बनलेली वैजयन्तीमाला घातलेली आहे. नाट्यभूमीवर अभिनय करणाऱ्या श्रेष्ठ नटासारखा अतिसुंदर वेष आहे! बासरीच्या छिद्रांमध्ये ते आपल्या अधरामृतांनी सूर भरत आहेत. त्यांच्या मागोमाग गोपबालके त्यांच्या लोकपावनकीर्तीचे गान करीत आहेत. या प्रकारे वैकुंठापेक्षाही श्रेष्ठ असे हे वृंदावन धाम त्यांच्या पदचिन्हांनी अधिकच रमणीय बनले आहे. मोर कृष्णाला फार आवडतो. मोर कामसुख इन्द्रियांनी भोगत नाही. संसारातील कामसुख विसरणाराच ईश्वराचे दर्शन करू शकला आहे. प्रभूशी मैत्री करायची असेल तर 'कामा'ची मैत्री सोडली पाहिजे. ज्ञानी ललाटांत (भ्रूमध्यांत) दृष्टि स्थिर करून तिथे ब्रह्माचें दर्शन करतात. आणि वैष्णव हृदयांत श्रीकृष्णाचें दर्शन करतात. शुकदेवांनी श्लोक ऐकले. श्रीकृष्णाचें रूप मनोहर वाटले. शुकदेवांना ध्यानात अतिशय आनंद झाला. वा! माझे प्रभू! त्यांनी तत्काल निश्चय केला की निराकार ब्रह्माचें चिंतन करणार नाही, आता सगुण साकाराचें चिंतन करीन. परंतु विचार आला की सगुण ब्रह्माच्या उपासनेत सगळ्या वस्तूंची अपेक्षा असते. बाळकृष्ण तर लोणीसाखर मागेल. मी ते कोठून आणू? माझ्याजवळ तर कांहीच नाही. मी निर्गुण ब्रह्माचा उपासक आहे. मी तर लंगोटीचा देखील त्याग केला आहे. हा कन्हैया तर पुष्कळ कांहीं मागेल. ते सर्व मी कोठून आणू? यशोदेच्या घरांत काय लोणी कमी होते? तरी पण कन्हैया म्हणायचा, मला घरचे लोणी चांगले नाही लागत. मला तर बाहेरचेच लोणी आवडते. गोपींच्या लोण्यांत नाही, त्यांच्या प्रेमांत गोडी होती. गोपींच्या प्रेमांत स्वाद होता, हा कन्हैया तर मागमागून मोठ्या प्रेमाने खात असतो. तो मला म्हणेल, 'तुम्ही लोणी आणा, खडीसाखर आणा.' तर मी इतके सगळे कोठून आणू? याकरता साकार ब्रह्माचें चिंतन नाही करणार. निराकार ब्रह्माला कांही द्यावे लागत नाही, म्हणून मला हेच उत्तम आहे. कोणत्याच वस्तूची आवश्यकता नाही. याप्रमाणे शुकदेवांचा विचार चालू होता, इतक्यांत व्यासांच्या शिष्यांनी दुसऱ्या श्लोकाचें गायन सुरू केले, त्याचा आशय असा– "अहो! आश्चर्य आहे कीं ज्या दुष्ट पूतनेने मारण्याच्या इच्छेने आपल्या स्तनांना विष लावून दूध पाजले होते, अशा पूतनेलासुद्धा कृष्णाने ती गति दिली की जी एखाद्या मातेला दिली असती." अर्थात तिला सद्‍गति दिली. भगवान श्रीकृष्णाशिवाय असा दुसरा कोण दयाळू आहे कीं ज्याला शरण जावे? अर्थात त्यांच्यासारखा दयाळू दुसरा कोणी नाही की त्याला शरण जावे. पूतना स्तनांना विष लावून आली होती. ईश्वराच्या धामीं आली होती. वासनेचे विष मनांत ठेवून-हृदयांत राखून मनुष्य परमात्म्याच्या समोर जातो त्याला परमात्म्याचे दर्शन होत नाही. पूतना विष तर लावून आली होती पण ती मातृभावना घेऊन आली होती, मातेचे कार्य केले होते. म्हणून तिला यशोदेसारखी गति दिली. माझ्या प्रभूला लोणीसाखर तर काय, कशाचीच गरज नाही. त्यांना फक्त प्रेम पाहिजे. प्रेमाने वश करून अर्जुनाने भारतीय युद्धांत

रथ हाकून घेतला. तिथे प्रभू आपले स्वामित्व विसरून गेले. पदार्थांनी प्रसन्न होईल तो जीव आणि प्रेमाने प्रसन्न होईल तो ईश्वर. प्रेम करण्यायोग्य फक्त एक परमात्माच काय तो आहे. अशा परमकृपाळूला सोडून मी कोणाला शरण जाऊ ?

शुकदेवांच्या मनांत शंका होती कीं कन्हैया सर्व कांही मागेल तर ते काय देऊ शकतील ? त्या शंकेचे निवारण झाले. शुकदेव इकडे तिकडे पाहू लागले की हे श्लोक कोण म्हणत आहे ? तेथे त्यांना व्यासांच्या शिष्यांचें दर्शन झाले. शुकदेवांनी त्यांना विचारले, ' तुम्ही कोण आहात ? तुम्ही जे श्लोक म्हणत होता ते कोणी रचलेले आहेत ? ' शिष्यांनी सांगितले, ' आम्ही व्यासांचे शिष्य आहोत. व्यासांनी आम्हाला मंत्र सांगितले आहेत. हे दोन श्लोक तर वानगीसाठी आहेत. बाकीचे श्लोक तर गोदामांत (कोठारांत) भरून ठेवले आहेत. भगवान व्यासांनी अशा भरपूर श्लोकांनी भागवतपुराणाची रचना केली आहे. ' शुकदेवांनी विचारले, ' असे किती श्लोक त्यांनी बनविले आहेत ? ' शिष्यांनी सांगितले, ' असे अठरा हजार श्लोक त्यांनी केले आहेत. डोळे उघडे असतानासुद्धा त्या श्लोकांनी समाधि लागते. डोळे मिटून समाधि लागणे ही सोपी गोष्ट आहे. परंतु इथे तर डोळे उघडे राहतात अशी समाधि लागते. ' शुकदेवांनी विचार केला, व्यास तर माझे पिता आहेत; मी त्यांचा उत्तराधिकारी आहे. मी वडिलांकडे जाऊन हे पुराण ऐकीन.

आज शुकदेवांना भागवतशास्त्र ऐकायची इच्छा झालेली आहे. कन्हैयाच्या लीला ऐकून त्यांचे चित्त आकर्षित झाले आहे. योग्यांचे मन देखील या कृष्णलीलांमुळे खेचले जाते. निर्ग्रंथ अशा शुकदेवांना भागवतशास्त्र ऐकण्याची इच्छा झाली. भागवताचे श्लोक ऐकून शुकदेवांचे चित्त आकर्षित झाले. निर्गुण ब्रह्माचे उपासक सगुण ब्रह्माकडे आकर्षित होत आहेत. बारा वर्षांनंतर आज शुकदेव व्यासांच्या आश्रमांत धावतच आले. शुकदेवांनी व्यासांना साष्टांग दंडवत घातले. व्यासांनी शुकदेवाला छातीशी धरले आणि त्याचे मस्तक हुंगले. शुकदेव म्हणाले, ' पिताजी, हे श्लोक मला शिकवा. ' शुकदेव कथा ऐकतात आणि कृतार्थ होतात. व्यासांनी शुकदेवाला भागवताचें अध्ययन करविले. याप्रकारे व्यासांची , भागवताचा प्रचार कसा होईल ? ही काळजी दूर झाली. या कथेचा खरा अधिकारी तर आत्माराम आहे. कारण श्रीकृष्ण सर्वांचे आत्मस्वरूप आहे. विषयारामाला हा ग्रंथ ऐकायची इच्छाच होत नाही.

सूत म्हणतात, शौनकहो ! आश्चर्य करू नका. भगवंताचे गुण असे मधुर आहेत की सगळ्यांना आपल्याकडे ओढून घेतात. मग त्यामुळे शुकदेवांचें मन आकर्षित झाले यांत नवल काय ?

जो ज्ञानी आहे, ज्याची अविद्येची गाठ सुटली आहे आणि जो सदा आत्म्यांतच रममाण असतो तो देखील भगवंताची हेतुरहित भक्ति करतो. कारण भगवंताचे गुण असे मधुर आहेत की ते सगळ्यांना आपल्याकडे खेचून घेतात. भगवंताचें कथामृत पान करताना भूक आणि तहानही हरपून जातात. याचसाठी सहाव्या स्कंधाच्या पहिल्या अध्यायांत परीक्षित राजा म्हणतो कीं, सुरवातीला मला भूक आणि तहान लागत असे, पण भगवंताचे कथामृतपान करता करता माझी तहान भूक नष्ट झाली आहे.

माझे पाणी पिणें देखील बंद झाले आहे. मी आपल्या हरिकथारूपी अमृताचें पान करीत आहे. म्हणून दुःसह भूकसुद्धा मला पीडा देत नाही. भोजन, भजनाचें साधनमात्र आहे. यासाठी भुकेपासून त्रास होणार नाही इतकेच भोजन केले पाहिजे. सूत वर्णन करतात कीं यानंतर ही कथा शुकदेवांनी परीक्षित राजाला ऐकविली. माझे गुरुदेवदेखील तेथे होते. त्यांनी ही कथा मला ऐकविली. आता मी ही कथा तुम्हाला सांगत आहे.

**११. परीक्षिताच्या जन्म, कर्म आणि मोक्षाची कहाणी :**

ऐका, आता मी तुम्हाला परीक्षित राजाचा जन्म, कर्म आणि मोक्ष यांची कहाणी आणि पांडवांच्या स्वर्गारोहणाची कहाणी सांगतो. सूत पांच प्रकारची शुद्धि सांगण्यासाठी पंचाध्यायी कथेस सुरुवात करतात. पितृशुद्धि, मातृशुद्धि, वंशशुद्धि, अन्नशुद्धि आणि आत्मशुद्धि; ज्यांचे हे पाच शुद्ध असतात त्यांच्यातच प्रभुदर्शनाची आतुरता जागृत होत असते. आतुरतेशिवाय ईश्वरदर्शन होत नाही. परीक्षित राजामध्यें ह्या पाचही शुद्धि वसत होत्या; हे दाखविण्यासाठी पुढची गोष्ट सांगितली जात आहे. ७ व्या अध्यायापासून ११ व्या अध्यायापर्यंत "बीज" शुद्धीची कथा आहे. बाराव्या अध्यायांत परीक्षिताच्या जन्माची कथा आहे.

परीक्षित म्हणेल कीं ही कथा ऐकता ऐकता मला तृप्ति होत नाही. उत्तम श्रोता तोच कीं जो भजन करताना भूक आणि तहान विसरून जातो. प्रभूच्या भजनांत आनंद आला तर भूक-तहान यांचा विसर पडतो, आत्माकार वृत्ति झाल्यावर देहधर्माचे भान राहात नाही.

कौरव आणि पांडवांचें युद्ध समाप्त झाले आहे. अश्वत्थाम्याने विचार केला की मी कपटाने पांडवांना मारीन. पांडव जेव्हा झोपलेले असतील तेव्हा त्यांना मारीन. अरे, ज्याचे भगवंत रक्षण करतात त्याला कोण मारू शकेल ? प्रभूंनी निजलेल्या पांडवांना जागे केले आणि म्हणाले की, 'माझ्याबरोबर गंगाकिनारी चला.' पांडवांचा श्रीकृष्णावर केवढा दृढ विश्वास! द्वारकानाथ जे सांगतील ते, ते करीत असत. ते कांही प्रश्नही विचारीत नसत. पांडवांचा प्रभूवर पूर्ण विश्वास होता. पांडव स्वतंत्र नव्हते, तर प्रभूच्या आधीन होते. आजकाल स्वतंत्रतेचा वेगळाच अर्थ करीत असतात. तसे पाहिले तर ज्यांच्या आचरणांत संयम आहे, जे परमात्म्याच्या आधीन आहेत तेच स्वतंत्र होत. अशा पांडवांच्या कुलांत परीक्षिताचा जन्म झाला आहे. पांडवांना घेऊन कृष्ण गंगाकिनारी येतात. प्रभूंनी सांगूनसुद्धा द्रौपदीची मुले आली नाहीत. बालबुद्धी असते ना! ते म्हणाले, "तुम्हाला झोप येत नाही, आम्हाला तर झोप येते आहे. तुम्हाला जायचे असेल तर जा." परिणाम हा झाला कीं अश्वत्थाम्याने द्रौपदीच्या पाची मुलांना मारून टाकले. दुःखांत समज येत असते.

प्रभूपाशी एखादे दुःख मागावे, त्याने अक्कल ठिकाणावर राहते. जो सर्वप्रकारे सुखी होतो तो दीन होऊन प्रभूला नमस्कार करीत नाही. आज कृष्ण निष्ठुर झाले आहेत. द्रौपदीच्या अश्रूंकडे लक्षही देत नाहीत. आज द्रौपदी रडते आहे, परंतु द्वारकानाथांना दया येत नाही. नाहीतर द्रौपदीचे रडणे कृष्णाला सहन होत नसे. पूर्वी तर जेव्हा जेव्हा गरज पडली तेव्हा तेव्हा द्रौपदीचे अश्रू पुसण्यासाठी धावत येत असत. हा जीव सर्वप्रकारे सुखी असणे इष्ट नाही. एखादे दुःख मनुष्याच्या अंतःकरणांत असलेच पाहिजे. अशा दुःखामुळे असा विश्वास दृढ होतो की देवाशिवाय आपले आणखी कोणी नाही. प्रत्येक महापुरुषावर दुःखाचे प्रसंग आले आहेत.

परमात्म्याने विचार केला की पांडवांना पृथ्वीचे राज्य मिळालें आहे; संतति आहे आणि संपत्ति देखील भरपूर आहे. सर्व प्रकारे पांडव सुखी असावे हे चांगले नाही. या अतिसुखाच्या अवस्थेंत पांडवांना कदाचित गर्व झाला तर त्यांचे पतन होईल, अशा शुभ हेतूने परमेश्वर केव्हा केव्हा निष्ठुर होतो. सुखामुळे पांडव ईश्वराला विसरू नये म्हणून त्याने पांडवांना हे दुःख दिले. भगवंत दुःखांत जीवाला गुप्त रीतीने साहाय्य करतात. अश्वत्थामा आणि अर्जुनाचे युद्ध चालू आहे. अर्जुनानें अश्वत्थाम्याला मारण्याची प्रतिज्ञा केली आहे. परंतु मारण्याची हिम्मत होत नव्हती. गुरुपुत्र गुरूचेंच स्वरूप असते. अर्जुनाने अश्वत्थाम्याला बांधून ओढत ओढत द्रौपदीजवळ आणले. द्रौपदी अंगणांत बसली आहे! पुत्रशोकांत बुडून गेली आहे!

अश्वत्थाम्याची ही दशा पाहून द्रौपदी धावतच आली. अश्वत्थाम्याला नमस्कार करून म्हणते आहे की, 'माझ्या अंगणात ब्राह्मणाचा अपमान करू नका.'' आपल्या पाच मुलांची हत्या करणाऱ्याला द्रौपदी नमस्कार करीत आहे. तो कांही कोणी साधा वैरी नाही. पांच बाळांना मारणारा अंगणांत आलेला आहे आणि तरी तो ब्राह्मण आहे म्हणून त्याला नमस्कार करीत आहे. तुमचा वैरी तुमच्या अंगणांत आला असता तुम्ही काय त्याला नमन कराल ? जय श्रीकृष्ण म्हणाल ?

भागवताची कथा पुनःपुन्हा ऐकून आपले जीवन सुधारा. वैराची शांति निर्वैराने होते-प्रेमाने होते-नमस्काराने होते. जो वैराचा बदला प्रेमाने देतो तोच वैष्णव. 'जय श्रीकृष्ण' याचा अर्थ असा आहे की, जे काय मला दिसते आहे ते सर्व कृष्णमय आहे. अश्वत्थामा म्हणतो, 'मी वंदनीय नाही. द्रौपदी, लोक जी तुझी प्रशंसा करतात ती थोडीच आहे. तू वैराचा बदला प्रेमाने देत आहेस !' द्रौपदीच्या गुणांनी आज व्यासदेखील तन्मय झालेले आहेत. द्रौपदीला उद्देशून ते म्हणत आहेत, ही कोमल स्वभावाची, सुंदर स्वभावाची आहे. ज्याचा स्वभाव अतिसुंदर असतो तोच भगवंताला आवडतो. ज्याचे शरीर सुंदर असते तो भगवंताला आवडतोच असे नाही. परंतु ज्याचा स्वभाव सुंदर आहे तो भगवंताला नेहमीच प्रिय असतो. स्वभाव सुंदर केव्हा होत असतो ? अपकाराचा बदला उपकाराने द्याल तेव्हा. द्रौपदी म्हणाली, 'त्याला सोडून द्या, त्याला मारू नका. तो गुरुपुत्र आहे. जी विद्या गुरु द्रोणाचार्यांनी आपल्या मुलाला दिली नाही ती त्यांनी तुम्हाला दिली आहे. तुम्ही हे सगळे विसरलात काय ? ब्राह्मण परमेश्वरस्वरूप असतात. गाय लुळी, लंगडी किंवा वांझ असली तरी पण गाईचा शुभ शकुन मानतात. म्हशीचा शुभशकुन कधी मानत नाहीत. गाय आणि ब्राह्मण वंदनीय आहेत.'

द्रौपदी तर दयेचे स्वरूपच आहे. 'दयारूप' द्रौपदीशी जोपर्यंत हृदय विवाह करीत नाही तोपर्यंत श्रीकृष्ण त्याचे सारथी होत नाहीत. अर्जुन जीवात्मा-गुडाकेश आणि श्रीकृष्ण हृषीकेश आहेत. ही जोडी तर या शरीररूपी रथांत बसलेली आहे. इंद्रियरूपी घोड्यांचा रथ प्रभूच्या स्वाधीन कराल तर कल्याण होईल. इंद्रियांचे स्वामी श्रीकृष्ण आहेत – 'हृषीकेश'. युधिष्ठिर म्हणजेच धर्म, भीम म्हणजे बल आणि सहदेव-नकुल हे बुद्धि आणि ज्ञान होत. ह्या चार गुणांचा जीव म्हणजे अर्जुन. हे गुण केव्हा शोभायमान होतात ? जेव्हा दयारूपी द्रौपदी त्यांची पत्नी होते – जीव दयारूपी द्रौपदीशी विवाह करतो तेव्हा. द्रौपदी केव्हा कशी मिळेल ? जेव्हा धर्माला मोठा मानाल तेव्हा. परमात्मा सारथी होतो आणि तुमचाच होऊन जातो. आजकाल तर लोक धर्माला मोठा समजतच नाहीत. पैशाला मोठा समजतात. याच कारणाने संयम आणि सदाचार आचरणांतून निघून गेले आहेत. मानवजीवनांत धन मुख्य नसून धर्म मुख्य आहे. धनसुद्धा धर्माच्या मर्यादेंतच राहून प्राप्त केले पाहिजे. तुम्हाला कोणतेही कार्य करायचे असेल तर प्रथम धर्माला विचारा, 'हे कर्म केल्याने मला पाप तर लागणार नाही ?' तुम्ही अर्जुनासारखे आचरण कराल तर भगवंत तुमचे सारथी होतील.

द्रौपदीने अश्वत्थाम्याला वाचविले आणि अर्जुनाला म्हटले, त्यांना (अश्वत्थाम्यांना) मारले तरी माझ्या पांच पुत्रांपैकी एकही परत यायचा नाही ! मात्र अश्वत्थाम्याला मारल्याने त्याच्या आईला-गौतमीला अत्यंत दुःख होईल. मी तर अजून सधवा आहे पण अश्वत्थाम्याची आई तर विधवा आहे. ती पतीच्या मृत्यूनंतर पुत्राच्या भरवशावर जगत आहे. ती जर रडली तर मला ते पाहवणार नाही. कोणाचा आशीर्वाद मिळाला नाही तरी हरकत नाही, पण कोणाचा शाप घेऊ नये. कोणी शाप देईल, वाईट इच्छील असे कोणतेच कर्म करू नये.

जगांत दुसऱ्याला रडवू नये. स्वतः रडून घ्यावे. रडण्याने पाप जळते. रडण्यामुळे परमेश्वर एक

दिवस आपले ऐकतो आणि कृपा करतो. रडण्याने सुखी होता येऊ शकते. भीम म्हणतो, 'अशा बालहत्याऱ्यावरही दया करावी का? तुझी प्रतिज्ञा कुठे गेली?' द्रौपदी पुनःपुन्हा म्हणते, 'मारू नका.' आता अर्जुन विचारांत पडला. श्रीकृष्णांनी आज्ञा दिली की द्रौपदी जे म्हणते आहे ते बरोबर आहे. द्रौपदीच्या अंतःकरणांत दया आहे. भीमसेन म्हणतो, "मनुस्मृतींत लिहिलें आहे कीं, आततायीला मारण्यांत पाप नसते." श्रीकृष्ण देखील मनुस्मृतीचा मान राखून उत्तर देतात, 'ब्राह्मणाला अपमान हा त्याच्या मृत्यूच्या तोलाचाच आहे, म्हणून अश्वत्थाम्याला मारण्याची गरज नाही. त्याचा अपमान करून घालवून द्या. अश्वत्थाम्याचे मस्तक कापलें नाही पण त्याच्या मस्तकांत जन्मसिद्ध मणि होता तो काढून घेतला. अश्वत्थामा तेजोहीन झाला. भीमसेनाला वाटले, आता त्याला मारण्याचे काय बाकी उरले? अपमान तर मरणापेक्षाही विशेष आहे. अपमान प्रतिक्षण मारण्याच्याच तोलाचा आहे. अश्वत्थाम्याला वाटले यापेक्षा मला मारून टाकले असते तरच बरे झाले असते.

शुकदेव सावध करून म्हणतात, 'हे राजन्, अश्वत्थाम्याने विचार केला की, पांडवांनी माझा अपमान केला आहे. मी याचा बदला घेईनच घेईन. आपला पराक्रम दाखवीन. उत्तरेच्या पोटांत गर्भ आहे आणि तो पांडवांचा उत्तराधिकारी आहे. त्याचा नाश झाल्यावर पांडवांच्या वंशाचा नाश होईल.' असा विचार करून त्याने त्या गर्भावर ब्रह्मास्त्र सोडले. उत्तरा व्याकुळ झाली. हरिस्मरण, हरि आश्रय केला म्हणजे भगवंत मार्ग दाखवितात. ईश्वरस्मरण पुनःपुन्हा केले कीं भाव शुद्ध होतात. ब्रह्मास्त्र उत्तरेच्या शरीराला जाळू लागले. उत्तरा धावत धावत श्रीकृष्णांच्या जवळ आली. श्रीकृष्ण सूक्ष्मरूपाने उत्तरेच्या गर्भांत जाऊन परीक्षिताचें रक्षण करते झाले. जीवमात्र परीक्षित आहे. सर्वांचे, गर्भात रक्षण कोण करतो? जीवमात्र गर्भांत असता त्याचें रक्षण ईश्वरच करीत असतो. बाहेर आल्यावर देखील जीवमात्राचें रक्षण भगवंतच करीत असतात. जीवमात्र परीक्षितासारखेच आहेत. भगवंत उत्तरेच्या गर्भांतील परीक्षिताचेंच रक्षण करतात. येवढेच नाही, तर ते समस्त जीवमात्राचें रक्षण करीत असतात. जीवात्मा गर्भांत असताना हात जोडून एकसारखा भगवंतांना नमस्कार करीत असतो. पण बाहेर आल्यावर त्याचे दोन्ही हात सुटून गेल्याकारणाने त्याचे नमनही बंद होते. प्रभूला मग तो विसरून जातो. गर्भावस्थेत जीवाचें रक्षण भगवंतच करतो. बाल्यावस्थेंत सुध्दा जीवनरक्षण परमेश्वरच करतो. पण युवावस्थेंत मनुष्य हें सर्व विसरून जातो आणि अखडून चालतो आणि म्हणू लागतो, "मी धर्मबिर्म मानत नाही, ईश्वर मानत नाही!"

द्रौपदीने उत्तरेला शिकवण दिली होती कीं जीवनांत दुःखाचा प्रसंग आल्यावर भगवंताच्या चरणांचा आश्रय घ्यावा. दुःखाच्या प्रसंगीं श्रीकृष्णाला शरण जावे. कन्हैया दयामय आहे. तो तुला अवश्य साहाय्य करील. आपल्या दुःखाची गाथा द्वारकानाथाशिवाय आणखी कोणाला सांगू नको. आपली सासू रोज द्वारकानाथांना रिझवीत असते हे उत्तरेने पाहिले होते. लहान मुलें लवकर अनुकरण करतात. त्यांच्यासमोर केव्हांही पाप करू नये. आत्मरक्षणासाठी उत्तरा पांडवांकडे नाही, तर परमात्म्याकडे गेली. आईच्या पोटांतच परीक्षिताला परमात्म्याचे दर्शन झाले होते. म्हणूनही ते उत्तम श्रोता आहेत. भगवंत कोणाच्या गर्भात जात नाहीत. त्यांची लीला अप्राकृत आहे.

देवकीच्या पोटांत प्रभू गेलेच नाहीत. देवकीला केवळ भास (भ्रांति) करविला होता कीं ते पोटांत गेले आहेत. पण आज आवश्यकता होती. आज भक्ताचें रक्षण करायचे होते, म्हणून भगवंतांनी गर्भात जाऊन रक्षण केले. परम आश्चर्य झाले आहे! श्रीकृष्णांनी सुदर्शनचक्राने ब्रह्मास्त्राचे निवारण केले. परीक्षिताचें रक्षण केल्यानंतर ते द्वारकेला जायला निघाले.

कुंती मर्यादा-भक्ति आहे, साधनभक्ति आहे. यशोदा पुष्टिभक्ति आहे. यशोदेचा सर्व व्यवहार भक्तिरूप होता. प्रेमलक्षणा भक्तिमध्ये व्यवहार आणि भक्ति यांत भेद राहात नाही. वैष्णवांच्या सर्वच क्रिया भक्तिस्वरूप होऊन जातात. प्रथम मर्यादा-भक्ति येते. त्यानंतर पुष्टिभक्ति. मर्यादाभक्ति साधन आहे म्हणून ती आरंभी येते. पुष्टिभक्ति साध्य आहे म्हणून ती शेवटी येते. भागवतांत नवव्या स्कंधापर्यंत साधनभक्तीचें वर्णन आहे. दशम स्कंधांत साध्य भक्तीचें वर्णन आहे. साध्यभक्ति प्रभूला बांधते. पुष्टिभक्ति प्रभूला बांधून टाकील. त्याविषयी कथा भागवताच्या शेवटी येते. प्रत्येक व्यवहार भक्तिरूप झाला कीं ती पुष्टिभक्ति झाली. भक्तिमार्गांत भगवद्वियोग सहन होत नाही. भक्तींत भगवंताचा विरह सहन होत नाही. प्रभूच्या विरहांत जो जळत असतो तोच वैष्णव होय.

द्वारकानाथ द्वारकेला जायला निघाले. कुंतीचे हृदय भरून आलें. तिची अभिलाषा होती कीं चोवीसही तास मी कृष्णांना पाहात राहीन. माझे कृष्ण मजपासून कोठे दूर न जावो. ज्या मार्गाने भगवंताचा रथ जाणार होता तेथेच कुंती आली आणि हात जोडून रस्त्यांत उभी राहिली. प्रभूंनी दारुक सारथ्याकडून रथ थांबवला आणि म्हणाले, "आत्याबाई, तुम्ही इथे रस्त्यावर कां उभ्या आहात?" ते रथातून उतरले. कुंतीने त्यांना नमस्कार केला.

नमस्काराने प्रभु बंधनांत पडतात. नमस्कार करताना आपल्या सगळ्या पापांचें स्मरण करा. हृदय दीन आणि नम्र होईल.

सूत वर्णन करतात—

नियम तर असा होता कीं रोज भगवंत कुंतीला नमस्कार करीत. परंतु आज कुंती भगवंतांना नमस्कार करीत होती. भगवंत म्हणाले, 'हे तुम्ही काय करीत आहांत? मी तर तुमचा भाचा आहे. तुम्ही मला नमस्कार करावा हे बरे दिसत नाही.'

कुंती म्हणाली, "मी आजपर्यंत तुम्हाला आपला भाचा समजत होते, पण आज माझ्या लक्षांत आले कीं तुम्ही ईश्वर आहात. योगी लोक तुमचेच ध्यान करीत असतात. आपण तर सर्वांचे पिता आहात."

कुंतीची भक्ति दास्यमिश्रित वात्सल्यभक्ति आहे. हनुमंताची दास्यभक्ति आहे. दास्यभक्तीचे आचार्य हनुमंत आहेत. दास्यभावाने हृदय दीन होते. आपल्या स्वामींकडे पाहण्याची हिम्मत माझ्यात नाही. मी तर त्यांचा दास आहे. दास्यभक्ति अधिकारी महात्म्यालाच प्राप्त होत असते. दास्यभक्तींत दृष्टी चरणावर स्थिर करायची असते. भावाविना भक्ति सिद्ध होत नाही. ईश्वराशी कांही तरी संबंध जोडला गेला पाहिजे. मर्यादाभक्तीपेक्षा दास्यभाव मुख्य आहे.

कुंती वात्सल्यभावाने कृष्णाच्या मुखाकडे पाहते. माझ्या भावाचा मुलगा हाच वात्सल्यभाव झाला. माझा भगवंत आहे हाही दास्यभावच होय. चरणांच्या दर्शनाने तृप्ति झाली नाही म्हणून तोंड न्याहाळीत आहे. कुंती भगवंताची स्तुती करते— "ज्याच्या नाभींतून ब्रह्मदेवाचे जन्मस्थान असें कमळ प्रगट झाले, ज्याने कमळाची माळ धारण केली आहे, ज्याचे नेत्र कमळाप्रमाणे विशाल आणि कोमल आहेत आणि ज्याच्या चरणांवर कमळाचें चिन्ह आहे अशा हे श्रीकृष्णा, तुला पुनःपुन्हा वंदन असो."

भगवंताची स्तुति दररोज तीन वेळा करावी— सकाळी, दुपारी आणि रात्रीं निजण्यापूर्वी. याशिवाय सुख-दुःख आणि अंतकाळीही स्तुति करा. अर्जुन दुःखांत स्तुति करतो, कुंती सुखांत स्तुति करते आहे आणि भीष्म अंतकाळी स्तुति करतात. सुखावसाने, दुःखावसाने, देहावसाने— स्तुति करा.

कुंती म्हणते आहे— 'प्रभूंनी आम्हाला सुखी केलें आहे. आम्हाला कशा कशा संकटांतून वाचविलें

आहे.' भगवंताच्या उपकारांचे ती स्मरण करते आहे. ती भगवंताच्या उपकारांना विसरली नाही. मी विधवा होते तेव्हां माझी मुलें लहान होती. त्यावेळीही प्रभु आपणच माझे रक्षण केले होते.'

सामान्य मनुष्य अतिसुखांत देवाला विसरून जातो. जीवमात्रावर भगवंत अनंक उपकार करतात. परंतु तो सर्व कांही विसरून जातो. परमेश्वराचे उपकार विसरू नयेत. आम्ही सर्व, आजारांतून बरे झालो तर अमुक औषधाने आजार गेला असे मानतो, अमक्या डॉक्टरांनी मला बरे केले असे मानतो. परंतु परमेश्वरानेच वाचविले असे म्हणत नाही. भगवंताचे उपकार मानत नाही. विचार करा कीं, डॉक्टरांच्या इंजेक्शन आणि औषधांत वाचविण्याची कांही शक्ति तरी आहे का? नाही! नाही! वाचविणारा तर आणिकच कोणी आहे. डॉक्टरच्या जवळ जर वाचविण्याची शक्ति असती तर त्याच्या घरून अंत्ययात्रा कधी निघालीच नसती.

पाण्याविना नदीला शोभा नाही, प्राणाशिवाय शरीराला शोभा नाही, कपाळी कुंकू नसेल तर सौभाग्यवती स्त्री शोभत नाही. याचप्रकारे आपल्याशिवाय पांडवांना शोभा नाही. नाथ, तुमच्यामुळेच आम्ही सुखी आहोत.

गोपगीतांत गोपी देखील भगवंताच्या उपकारांचे स्मरण करतात. गोपी म्हणतात, "यमुनेच्या विषमय जलाने होणाऱ्या मृत्यूपासून, अजगररूपाने खाऊन टाकणाऱ्या अंधासुरापासून, इंद्राच्या वर्षा, वादळ, वीज, दावानल, इत्यादींपासून आपण आमचें रक्षण केले आहे."

कुंतीला स्मरण झालें कीं जेव्हां भीमाला दुर्योधनाने विषमिश्रित लाडू खाऊ घातले होते त्यावेळी सुद्धा प्रभूंनीच त्याचे रक्षण केले होते. लाक्षागृहांतून सुध्दा आम्हाला वाचविले. तुमचे उपकार अनंत आहेत. त्यांची फेड आम्ही कधीही करू शकणार नाही.

माझ्या द्रौपदीला दुःशासनाने सभेंत ओढून आणले. त्यावेळी दुर्योधन म्हणाला, 'द्रौपदी आता आपली दासी आहे. हिला निर्वस्त्र करा.' दुःशासन वस्त्रें ओढू लागला. परंतु परमेश्वर ज्याला झाकतो त्याला कोण उघडे करू शकेल? दुःशासन थकून गेला. लोक देखील आश्चर्याने स्तिमित झाले.

जीव ईश्वराला कांहीच देऊ शकत नाही. जगतांतील सर्व कांही ईश्वराचेच आहे. भगवंत म्हणतात, जे माझेच आहे तेच मला देण्यांत कोणती मोठी गोष्ट आहे? दररोज तीन वेळ प्रार्थना करून म्हणा कीं, हे भगवन्, मी तुमचा आहे. माझ्यावर तुमचे अनंत उपकार आहेत. तुमच्या उपकाराची फेड मी कशा प्रकारे करू शकेन?

'नाथ, आमचा त्याग करू नका. तुम्ही तर द्वारकेला जात आहांत! पण एक वरदान मागण्याची इच्छा आहे. वरदान दिल्यावर वाटल्यास आपण जाऊ शकता.' कुंतीसारखा वर आजपर्यंत कोणीच मागितला नाही. तिने सांगितले—

"हे जगद्गुरु, आमच्या आयुष्यांत प्रतिक्षणी कांही तरी विपदा येवो, कारण कीं विपदावस्थेतच निश्चितपणे तुमचे दर्शन होत असते; आणि तुम्ही असल्यावर जन्ममरणाचे फेरे चुकतात."

दुःखातच मनुष्याला शहाणपण येते. दुःखातच प्रभूजवळ जाण्याची इच्छा होते. विपत्तीतच त्याचें स्मरण होते. म्हणून प्रभूस्मरण ही संपत्ति आहे व प्रभूविस्मरण ही विपत्ति आहे. मनुष्याला प्रभूशिवाय चैन पडते, कारण त्याने भक्तिरस चाखलेला नसतो. कुंती मागत आहे कीं, पुष्कळ मोठ्या विपत्ति येत राहतील असें वरदान द्या.

श्रीकृष्ण म्हणतात, "हे काय मागत आहेस तू? तुझी बुद्धि भ्रमिष्ट तर नाही ना झाली? आजपर्यंत दुःखाचे अनेक प्रसंग येऊन गेले आहेत. आता तर सुखाची पाळी आहे. अन् या वेळी दुःखी होण्याची

इच्छा का?''

सर्व प्रकारचा अभिमान टाकून जो दीन बनतो तो भगवंताला फार आवडतो. कुंती दीन होऊन म्हणते, ''नाथ, मी जे मागत आहे ते बरोबरच आहे. दुःखच माझा गुरू आहे. दुःखातच मनुष्य शहाणा होतो. दुःखामुळे जीवाला परमात्म्याच्या चरणापाशी जीवन जगण्याची इच्छा होते. ज्या दुःखांत नारायणाचें स्मरण होते ते सुखच होय! त्याला दुःख कसे म्हणावे? विपत्तींत आपले स्मरण होते, म्हणून तिला मी संपत्ति मानते. हनुमंताने रामाला सांगितले होते की, ''तुमच्याच ध्यानांत सीता तन्मय आहे म्हणूनच मी म्हणतो कीं सीता आनंदांत आहे. नाथ, जेव्हां तुमचे स्मरण-भजन होऊ शकणार नाही तीच खरी विपत्ति आहे असे समजावे. माझ्या डोक्यावर विपत्ति येवो. कारण त्यामुळे तुमच्या चरणांचा आश्रय घेण्याची बुद्धि जागृत होईल. जगांतील महापुरुषाच्या आयुष्यांत प्रथमः दुःखाचेच प्रसंग येतात.''

चार प्रकारच्या मदाने मनुष्याची शुद्धी हरपलेली असते– (१) विद्या मद, (२) यौवन मद, (३) द्रव्य मद, (४) अधिकार मद. या चार प्रकारच्या मदांमुळे जीव परमेश्वराला विसरतो.

आपल्या रडत असलेल्या मुलाला टाळी वाजवून शांत करणारा प्रोफेसर त्यावेळी हे विसरलेला असतो की तो एक विद्वान प्रोफेसर आहे. परन्तु त्याच प्रोफेसराला प्रभुकीर्तनाच्या वेळी टाळ्या वाजवायची लाज वाटते. शिकल्या-सवरलेल्या लोकांना भजन-कीर्तनाची लाज वाटली तर ह्यापेक्षा मोठे पाप कोणते असू शकेल? भगवंत म्हणतात कीं त्या चार प्रकारच्या मदाने जीव उन्मत्त होतो आणि माझा अपमान करतो. अशा मदवाल्यांच्या जिभेला कीर्तनाच्या वेळीं त्यांचे पाप पकडून ठेवीत असते. पाप म्हणते, तू बोलशील तर मला बाहेर निघावे लागेल. महाभारतांत सांगून ठेवले आहे कीं प्रत्येक प्रकारचा रोग मदामुळेच होतो. म्हणून नम्र होऊन प्रार्थना करा.

''आपल्याला जन्म घेण्याची अनेक कारणें सांगितली आहेत; पण मला असें वाटतें कीं दुष्टांचा नाश करणे येवढेच प्रधान कार्य नाही, तर आपल्या भक्तांना प्रेमाचें दान करण्यासाठी आपण आला आहात.

कुंती भगवंताची स्तुती करीत आहे. आपणही कुंती होऊन स्तुति करावी.

''मला वसुदेवांनी सांगितले होते कीं कंसाच्या त्रासामुळे तो गोकुळांत जाऊ शकत नाही. तू गोकुळांत जाऊन कन्हैयाचे दर्शन कर. जेव्हां तुम्ही गोकुळांत बाल-लीला करीत होता तेव्हां मी तुमच्या दर्शनासाठी आले होते. तुमचें बालस्वरूप विसरण्याचा प्रयत्न करूनही विसरता येत नाही. त्यावेळी यशोदेने तुम्हाला बांधून ठेवले होते, ते दर्शन मी अजून विसरले नाही. काळ देखील ज्याला कापतो ते श्रीकृष्ण थरथर कापत असलेले मला दिसले.''

मर्यादाभक्ति याप्रमाणे पुष्टिभक्तीची स्तुति करते. कुंती यशोदेची प्रशंसा करीत आहे. प्रेमाचें बंधन परमेश्वर देखील विसरत नाही.

सगुण ब्रह्माचा साक्षात्कार झाल्यानंतर संसारांत आसक्ति राहून जाते. सगुण स्वरूप आणि निर्गुण स्वरूप दोहोंचीही जो आराधना करील त्याचीच भक्ति सिद्ध होते. **''स्नेहपाशं इमं छिन्दि.''** स्वजनांशी जोडलेला हा स्नेहाचा दोर तोडून टाका.

''आपण अशी दया करा कीं ज्यामुळे मला अनन्यभक्ति प्राप्त होईल.''

स्तुतीच्या आरंभी आणि शेवटी दोन्ही वेळी नमस्कार आहे. सांख्यशास्त्राच्या २६ तत्त्वांचे प्रतिपादन २६ श्लोकांच्या स्तुतींत केले गेले आहे.

भगवंत सर्व कांही करतील पण वैष्णवाला नाराज नाही करणार. कुंतीचा भाव पाहून भगवंत

परत फिरले. कुंतीच्या महालांत आले. तिला अतिशय आनंद झाला. अर्जुन तेथे आला. अर्जुन आपल्या आईला म्हणतो कीं भगवंत माझे मित्र आहेत म्हणून माझ्यासाठी ते परत आले आहेत.

कुंती म्हणते: रस्ता आडवून मीच विनंति केल्यामुळे ते परतले आहेत.

द्रौपदी म्हणते: कृष्णाचें बोट कापले असता मी आपली साडी फाडून पट्टी बांधली म्हणूनच ते परत आले आहेत.

सुभद्रा म्हणते: मी तुमच्यासारखी मानलेली बहीण नाही, सख्खी बहीण आहे म्हणून ते परतले आहेत. मला भेटायला आले असता मी कांही बोलू शकले नव्हते म्हणून ते परत आले आहेत.

परमेश्वरावर प्रेम कराल तर तो तुमचा होईल.

सगळ्यांचा आवडता पण कोणाचाही न होणारा तो सगळ्यांपासून निराळाच आहे. तो तर, **"सबसे ऊंची प्रेम सगाई"** हा सिद्धान्त मानणारा आहे.

**१२. दिलेल्या वचनानुनार भीष्माच्या प्रयाणसमयी श्रीकृष्णाचे आगमन:**

भीष्माचार्यांचें प्रेम अतिदिव्य होते. कृष्ण म्हणतात, मी विवाह इत्यादी कोणताच संबंध मानत नाही. मी तर प्रेमसंबंधच मानतो. मी तर आपल्या भीष्मांसाठी परत आलो आहे. माझे भीष्म माझें स्मरण करीत आहेत, मला हाक मारीत आहेत.

भीष्मपिता त्या वेळी बाणशय्येवर निजले होते. त्यांचें मरण उज्ज्वल व्हावे म्हणून भगवंत परत आले आहेत.

महात्म्यांचा मृत्यू मंगलमय असतो. संतांचा जन्म आपल्यासारखाच सामान्य असतो. म्हणून संतांच्या जन्मतिथीला उत्सव करीत नाहीत. परंतु संतांचा मृत्यू मंगलमय असतो. पुण्यमय असतो म्हणून त्यांची मृत्युतिथि ही पुण्यतिथि म्हणून साजरी केली जाते.

भीष्मपितामहांचें मरण कसें होईल हे पाहण्याकरता मोठमोठे संत आणि ऋषिमुनी तेथे आलेले आहेत.

प्रभूंनी धर्मराजाला उपदेश केला. त्याचे समाधान झाले नाही म्हणून धर्मराजास भीष्मपितामहांकडे जाण्यास भगवंतांनी सांगितले.

बाणगंगेच्या किनाऱ्यावर, जेथे भीष्म निजले होते तेथे, सर्व आले.

भीष्मांनी विचार केला, उत्तरावस्थेंत उत्तरायणांत मला मरायचे आहे. भीष्मांनी काळालाही सांगितले, मी तुझा नोकर नाही. मी तर श्रीकृष्णाचा सेवक आहे. भीष्मांनी द्वारकानाथांचें ध्यान धरले. मला भगवंतांनी वचन दिले आहे कीं अंतिम समयाला मी अवश्य येईन आणि भगवंताचें दर्शन करता करता मी प्राणत्याग करीन. असे ते म्हणत आहेत त्याच वेळीं धर्मराज तेथे आलेले आहेत.

भीष्म धर्मराजाला म्हणाला, "श्रीकृष्ण तर साक्षात् परमात्मा आहेत. तुझे निमित्त करून ते माझ्यासाठी आले आहेत. माझे मरण उज्ज्वल करण्यासाठी आले आहेत.

भगवंताला भीष्मांनी वचनबद्ध केले होते. कौरव-पांडवांच्या युद्धाच्या वेळी दुर्योधनाने भीष्मांना म्हटले, "पितामह, आठ दिवस तर होऊन गेले तरी अजून आपण एकाही पांडवाला मारू शकला नाहीत. तुम्ही नीट रीतीने लढतच नाही." भीष्मांना आवेश चढला आणि आवेशांतच ते दुर्योधनाला म्हणाले, "रात्रीं जेव्हां मी ध्यानांत बसेन तेव्हां तुझ्या राणीला आशीर्वादासाठी पाठव. मी अखंड सौभाग्याचें वरदान देईन."

हे समजल्यावर श्रीकृष्ण काळजींत पडले. दुर्योधनाची बायको भानुमती हिला भेटून ते म्हणाले, "भीष्मपितामह तर घरचेच आहेत. त्यांना भेटायला जायची आजच घाई काय? उद्या जा त्यांच्या दर्शनाला." भानुमतीने ते ऐकले आणि ती गेली नाही.

महात्मा सांगतात, त्याच वेळीं कृष्णांनी द्रौपदीला (जागविले) उठविले. एका रूपाने ते द्रौपदीला घेऊन भीष्मपितामहांपाशी गेले आणि दुसऱ्या रूपाने ते द्रौपदी होऊन अर्जुनापाशी निजले. श्रीकृष्ण अरूप असूनही अनेक रूपे धारण करणारे आहेत.

भीष्मपितामहांचें ध्यान चालू आहे. आज द्वारकाधीशांचें रूप दिसत नाही, परंतु काळी कांबळी, हातांत दिवा वगैरे घेतलेले भगवान दिसत आहेत. आज द्रौपदीचें रक्षक होऊन भगवंत आले आहेत. द्वारपालांनी त्यांना रोखले. कोणीही पुरुष आंत येऊ देऊ नये अशी आज्ञा होती. द्रौपदीने आंत जाऊन नमस्कार केला. दुर्योधनाची बायको भानुमतीच आली आहे असें समजून भीष्मांनी 'अखंड सौभाग्यवती हो' असा आशीर्वाद दिला.

द्रौपदीने विचारले, "दादा, तुमचा आशीर्वाद फलद्रूप होईल कां?" भीष्मांनी विचारले, "देवी कोण आहेस तू?" द्रौपदीने उत्तर दिले, "मी पांडवांची पत्नी द्रौपदी आहे"

भीष्म म्हणाले, मी तुला आशीर्वाद दिला आहे तर तो खराच होईल. पांडवांना मारण्याची प्रतिज्ञा मी आवेशांत येऊन केली. ती अंतःकरणापासून नाही केली. तुला मात्र अगदी हृदयापासून आशीर्वाद दिला आहे, तर तो खराच होईल. पण मला तू हे सांग कीं, तू येथे एकटी कशी आलीस? तुला द्वारकानाथाशिवाय येथे कोण आणील?"

भीष्मपितामह धावतच बाहेर आले. श्रीकृष्णाला त्यांनी सांगितले, 'आज तर मी तुमचें ध्यान करीत आहे, पण अंतकाळीं तुमचे ध्यान राहील कीं नाही कोण जाणे! प्राणप्रयाणाच्या वेळीं जेव्हां वातपित्तादि प्रकोपांनी गळा दाटलेला असेल, तर अशा वेळी तुमचें स्मरण कसें होईल? करिता अंतसमयी माझी लाज ठेवण्यासाठी तुम्ही अवश्य या. अंतकाळीं माझी भयंकर स्थिति होईल त्यावेळी मला न्यायला या. त्यावेळी कृष्णांनी भीष्माला वचन दिले होते, 'मी अवश्य येईन.' त्यांना दिलेले वचन पाळण्यासाठी द्वारकानाथ आले होते.

प्रभूला नेहमी प्रार्थना करा कीं माझ्या मृत्यूच्या वेळी अवश्य या. शरीर चांगलें असलें तर ध्यान-जप होईल. अंतकाळी, दुःखाचे वेळीं देहानुसंधान होत असते आणि त्यामुळे देवाचें ध्यान करणें कठीण जाते.

भीष्मपितामह श्रीकृष्णाची स्तुति करतातः "नाथ, कृपा करा, जसे उभे आहांत तसेच रहा."

कृष्ण विचार करतातः मला बसायलाही नाही सांगितले. पुंडलिकाच्या सेवेचे मला स्मरण होत आहे. तुकारामाने एकदा प्रेमाने पुंडलिकाची कानउघाडणी केली होती. "माझे विठ्ठलनाथ तुझ्या द्वारीं आले असता तू त्यांची कदर केली नाहीस? माझ्या प्रभूंना बसायला तू आसनही नाही दिलेस?"

दररोज प्रभूला प्रार्थना करीत जा कीं माझें मरण उज्ज्वल करण्यासाठी या. शरीरांत जोपर्यंत शक्ति आहे तोपर्यंत खूप भक्ति करा. देवाला खूप आळवा.

श्रीकृष्ण म्हणतातः "भीष्म पितामह! या धर्मराजाला असें वाटतें की सगळ्यांना मीच मारले आहे. माझ्यामुळेच सगळ्यांचा सर्वनाश झाला आहे. त्याला शांति मिळेल असा उपदेश तुम्ही करा."

भीष्म म्हणतातः "थांबा! धर्मराजाच्या शंकेचे निवारण मी मागाहून करीन. माझ्या एका शंकेचे समाधान पहिले आपण करा. माझ्या एका प्रश्नाचें उत्तर पहिले द्या. माझें जीवन अगदी निष्पाप आहे.

माझें मन पवित्र आहे, माझें शरीरही पवित्र आहे. माझी इंद्रियें देखील शुद्ध आहेत. मी पाप केलेच नाही तर मग मला हा दंड कशाबद्दल दिला जात आहे? मला बाणाच्या शय्येवर कां निजावे लागले? मला अतिशय वेदना कां होत आहेत? मी निष्पाप असताना मला शिक्षा कां देत आहांत?

भगवान म्हणतात, 'पितामह, तुम्ही काही पाप केले नाही हे खरे आहे. आणि म्हणूनच मी तुम्हाला भेटायला आलो आहे. तुम्ही स्वतः काही पाप केले नाही पण तुम्ही आपल्या स्वतःच्या डोळ्यांनी पाप होत असताना पाहिले आहे. तुम्ही जे पाप पाहिलेत त्याची ही शिक्षा आहे. कोणी पाप करीत असताना पाहणे हेही पापच होय. कोणाच्या पापाचा विचार करणे हे देखील पापच. कोणाचे पाप पाहू नका, ऐकू नका आणि कोणाला सांगूही नका.

भीष्म म्हणतात, 'ते पाप मला आठवत नाही. मी कोणते पाप पाहिले?'

कृष्ण म्हणतात: "भीष्मपितामह, तुम्ही विसरून गेला असाल, पण मी नाही विसरलो. मी ईश्वर आहे. मला तर सर्व घटनांची आठवण ठेवावीच लागते. आठवा. पितामह, एकदा जेव्हा तुम्ही सभेंत बसला होतात तेव्हा दुःशासन द्रौपदीला घेऊन तेथे आला होता. त्यावेळी तुम्ही तेथेच होता. त्यावेळी द्रौपदीने म्हटले होते कीं, द्यूतांत सर्व काही हारलेला पति आपल्या बायकोचा पण लावू शकत नाही. दुर्योधन म्हणत होता की 'द्रौपदी आता आपली दासी झाली आहे. तिला विवस्त्र करा.'

त्यावेळी द्रौपदी म्हणाली होती कीं हारलेला पति आपल्या स्त्रीला पणाला लावू शकत नाही, तेव्हां पितामह तुम्ही न्याय द्या की मी जित आहे कीं अजित? त्यावेळी तुम्ही म्हणाला होता की दुर्योधनाचे अन्न खाऊन माझी बुद्धि कुंठित झाली आहे आणि तुम्ही चूप बसलात. असे घोर पाप सभेंत चालू असताना तुम्ही ते बघत राहावे हे तुमच्यासारख्या ज्ञात्याला शोभले नाही. द्रौपदीचा अपमान तुम्ही सभागृहात पाहात राहिलात! द्रौपदीला तर आशा होती कीं तुमच्यासारखे ज्ञानी सभेंत आहेत तर ते न्याय करतीलच. त्यावेळी तुम्ही द्विधावश होऊन अन्यायाचा प्रतिकार केला नाही. म्हणून निराश होऊन द्रौपदीने मला हाक मारली.

द्रौपदीची हाक ऐकून गुप्तरूपाने मी तेथे आलो होतो. मी सर्व काही पाहिले. दुःशासन द्रौपदीचे वस्त्र ओढीत होता आणि तुम्ही नुसते पाहात बसला होता. सभेंत होणारा अन्याय तुम्ही चुपचाप पाहात होता. ह्याच पापाचा तुम्हाला हा दंड मिळत आहे.

भीष्मपितामहांनी श्रीकृष्णांना नमस्कार केला. नंतर त्यांनी धर्मराजाला आपल्या जवळ बोलावून उपदेश दिला. स्त्रीधर्म, आपद्धर्म, राजधर्म, मोक्षधर्म इत्यादी सर्व (समस्यांचा) धर्मांचा बोध महाभारताच्या शांतिपर्वात आहे. शिवाय परधर्मही सांगितला आहे.

युधिष्ठिराने विचारले– "सर्व धर्मांत आपण कोणता धर्म श्रेष्ठ मानता? कशाचा जप केल्याने जीव जन्ममरणरूपी सांसारिक बंधनांतून मुक्त होतो?"

भीष्म म्हणाले– "स्थावरजंगमरूप समस्त जगताचे स्वामी, ब्रह्मादि देवांचे देव, देशकाल आणि वस्तूंनी अपरिच्छिन्न, अक्षराहून श्रेष्ठ अशा पुरुषोत्तमाच्या सहस्रनामांचा निरंतर जप आणि गुणसंकीर्तन तत्परतेने केल्याने मनुष्य सर्वच दुःखांपासून मुक्त होतो."

विष्णुसहस्रनामांचा पाठ करणेच परमधर्म आहे. शिवमहिम्न आणि विष्णुसहस्रनामाचा दररोज पाठ करा. शंकराची स्तुति केल्याने ज्ञान मिळते. ज्ञानाने भक्ति दृढ होते. विष्णूची स्तुति केल्याने पाप जळून जाते. विष्णुसहस्रनामाच्या पाठाने ब्रह्मदेवाने कपाळावर लिहिलेला लेखही बदलून जातो. जन्ममरणाच्या बंधनातूनही जीव मुक्त होतो.

भगवान शंकराचार्यांना विष्णुसहस्रनामाचे पठण फार आवडत असे. त्यांनी सर्वांत पहिले विष्णुसहस्रनामावरच भाष्य लिहिले आहे. त्यांचा अंतिम ग्रंथ म्हणजे ब्रह्मसूत्राचे भाष्य-शांकरभाष्य आणि त्यानंतर त्यांनी लेखणीचा त्याग केला.

विष्णुसहस्रनामाचा पाठ रोज दोनदा करा. बारा वर्षेपर्यंत असे करीत राहिलात तर अवश्य फळ मिळेल. एक वेळ रात्री निजताना पाठ करा. यांत दिव्य शक्ति आहे. ललाटी लिहिलेल्या लेखांना पुसून टाकून बदलण्याचे सामर्थ्य यांत आहे. गरीब मनुष्य विष्णुयाग कसा करू शकेल? पण जर त्याने विष्णुसहस्रनामाचे पंधरा हजार पाठ केले तर त्याला एक विष्णुयाग केल्याचे पुण्य मिळते.

जेवणासारखा भजनाचाही नेम असला पाहिजे. बारा वर्षेपर्यंत नियमपूर्वक सत्कर्म करा. मग अनुभव येईल. कसलेही काम असो, भगवंताचे भजन नियमपूर्वक करा. ज्या परमेश्वराच्या कृपेने सुख मिळाले, पुत्र मिळाले त्या परमेश्वराची सेवा-स्मरण जर जीवाने केले नाही तर यापेक्षा मोठे पाप आणखी कोणते?

नंतर भीष्मपितामहांनी भगवंताची स्तुति केली आणि म्हणाले, 'हे नाथ! आपले दर्शन मी रिकाम्या हाताने कसे करू? मी आपल्याला काय अर्पण करू?'

देव जीवाकडून धनसंपत्ति मागत नाही. तो तर मन आणि बुद्धीच मागतो.

भीष्म म्हणाले, मी आपले मन आणि बुद्धि तुमच्याजवळ ठेवतो.

हा जीव फारच कपटी आहे. आणखी काय सांगू? कांही संकट आले तरच श्रीकृष्णाचे दर्शन करायला जातो. तेथे अकरा रुपये मूर्तीसमोर ठेवतो आणि म्हणतो, 'हे नाथ! मी कोर्टात आपल्या भावावर दावा लावला आहे, माझेकडे लक्ष असू द्या.' लक्ष असू देण्याचा उद्देश कीं कोर्टांत त्याचेबरोबर यावे. तो वकिलाला तर ३०० रु. देणार आणि भगवंताची ११ रुपयातच समजूत करू पाहणार!

भगवंत म्हणतात कीं मी तर सर्व कांही पाहतो, जाणतो आणि समजतो आहे. मी तुझ्या बापाचाही बाप आहे. लक्ष्मी जेव्हा विचारते कीं तुम्ही तुमच्या भक्तांना दर्शन कां देत नाही? तेव्हां भगवंत म्हणतात कीं तो दाता बदल्यामध्ये काय घेऊ इच्छितो हे तर पहा.

भगवंताला तुम्ही आपलें मन, आपली बुद्धि, आपले हृदय अर्पण करा.

भीष्मपितामह स्तुति करून म्हणतात कीं, 'हे भगवन्! एकच वेळ मला म्हणा की मी तुझा आहे.'

भक्तीच मृत्यू चांगला करील, मृत्यूचे सार्थक करील. ज्ञानावर भरवसा ठेवू नका. आत्मा शरीराहून निराळा आहे हे सर्व जाणतात. परंतु याचा अनुभव सगळ्यांना होत नाही. दुःख होते तेव्हां मनास देहाध्यास होतो. देहावसानाच्या वेळी वीस कोटी विंचूंच्या डंखासारखी वेदना होते. भक्ति मृत्यूला सुखद करते. पुष्कळ वेळा ज्ञान मृत्यूला बिघडवत असते.

भीष्मपितामह ज्ञानावर भरवसा ठेवीत नव्हते. ते भगवंताला शरण गेले. ते भगवंताला म्हणतात कीं मी आपल्याला शरण आलो आहे. ते असे म्हणत नाहीत कीं ते स्वतः ब्रह्मरूप आहेत. ते तर म्हणतात कीं 'मी तुमचा आहे. आपल्याला शरण आलो आहे.' भगवंत त्यांना रागावून म्हणतात, "मी तुम्हाला आपले कसे समजू? तुम्ही तर अर्जुनावर देखील बाण सोडले आहेत. आपल्या भक्तावर सोडलेल्या बाणांना मी कसा विसरू?"

भीष्म म्हणतात– "माझे पांडवांवर किती प्रेम आहे. ते तर समस्त जगाला माहीत आहे, आणि आपणासही हे माहीत आहे. युद्धांत माझें शरीर कौरवांकडे परंतु माझे मन तर पांडवांच्याच पक्षाकडे

होते. पांडवांवर मी बाण सोडीत होतो खरा, पण मनाने मी हेच चिंतीत होतो की पांडवांचा विजय व्हावा. **'जयोऽस्तु पांडुपुत्राणाम्'** असे बोलूनच मी बाण सोडीत होतो.''

कृष्ण म्हणतात, 'तरी पण शरीराने तर तुम्ही पांडवांच्या पक्षांत नव्हता. तुम्ही कौरवांच्या पक्षांत राहून पांडवांशी युद्ध केले आहे. जर मनाने तुम्ही पांडवांच्या बाजूने होता तर तनाने सुद्धा तुम्ही पांडवांकडे कां नाही राहिलात?'

भीष्म म्हणतात, 'हे प्रभो, त्यावेळी मी तुमचे दर्शन करू इच्छित होतो. तुम्ही अर्जुनाच्या रथावर होता. मी विचार केला की मी जर पांडवांच्या पक्षांत राहिलो तर तुमचे समोरून दर्शन कसे होईल? मला तुमचे सतत दर्शन होत राहावे याच हेतूने मी पांडवांच्या विरुद्ध कौरवांच्या पक्षांत जाऊन मिळालो. पांडवांच्या पक्षांत असतो तर तुमचे दर्शन मला चांगल्या प्रकारे घडले नसते.'

भीष्म स्तुति करतात–

"ज्याचे शरीर त्रिभुवनसुंदर आणि नीलकमालासारखे आहे, नीलवर्ण आहे, ज्याच्या शरीरावर सूर्यकिरणासारखा झळाळणारा श्रेष्ठ पीतांबर शोभत आहे, आणि मुखावर उमललेल्या कमळासारख्या लटा विखुरलेल्या आहेत, अशा अर्जुनसखा-श्रीकृष्णावर माझी निष्कपट प्रीति असो.''

**'पार्थसखे रतिर्ममास्तु'** अशा स्वरूपवान पार्थसारथ्याला रोज आपल्या दृष्टीसमोर ठेवा. इंद्रियांच्या घोड्यांना भगवंताकडे सोपवून द्या. शरीर रथ आहे, इंद्रिये घोडे आहेत.

"माझी निष्काम बुद्धि आणि मन तुम्हाला अर्पण करतो.'' **मतिरूपकल्पिता वितृष्णा.** मन तर फक्त भगवंतालाच देण्याची वस्तु आहे. तरी पण जगांत मन कोणी स्त्रीला देतात तर कोणी पुरुषाला. भगवंत म्हणतात, तुम्ही आपले धन इत्यादी नाही, तर केवळ आपले मनच मला द्या.

भगवान कृष्ण विचार करू लागले कीं वयोवृद्ध भीष्मपितामह फारच चतुर आहेत. किती गोड बोलत आहेत. हा जीव जेव्हां परमेश्वराला काही अर्पण करतो तेव्हा त्याला संकोच वाटतो. भगवंत आणखी विचार करतात– युद्धाच्या वेळची भीष्मपितामहांची विलक्षण मूर्ति मला आठवते. त्यांच्या चेहऱ्यावर विखुरलेले केस घोड्यांच्या पायांनी उडणाऱ्या धुळीने माखले जात होते, आणि चेहऱ्यावर घामाचे बारीक बारीक थेंब चमकत होते.

माझें शरीर, अंतःकरण आणि आत्मा, सुंदर कवचधारी कृष्णाच्या सेवेंत समर्पित होवो! प्रभूंना प्रार्थना करा की माझ्या शरीर-रथावर आपण विराजमान व्हा. माझ्या शरीर-रथावर द्वारकाधीश विराजत आहेत असा भाव मनांत आणा. माझ्या इंद्रियरूपी घोड्यांना अंकुश लागला नाही तर हे प्रभो, तुम्ही स्वतः त्यांना अंकुश लावा. मी धुरा आपल्या हातात देऊन टाकली आहे. माझ्या इंद्रियांना वश करून ठेवा. माझा रथ सकुशल पार न्या.

प्रभूला शरण जाणाऱ्याचेंच मरण शुभ होत असते.

"हे नाथ, जगांत आपण माझी प्रतिष्ठा केवढी वाढविली? मला केवढा सन्मान दिलात? माझी प्रतिज्ञा पालन व्हावी म्हणून आपण आपली स्वतःची प्रतिज्ञाही मोडली!''

श्रीकृष्णांनी महाभारताच्या युद्धात कोणतेही अस्त्रशस्त्र धारण न करण्याची प्रतिज्ञा केली होती. भीष्मांनी म्हटले, मी तर गंगापुत्र आहे. मी तर असे युद्ध करीन कीं कृष्णाला अस्त्रशस्त्र धारण करावेच लागेल. मी त्यांच्याकडून शस्त्र चालवूनच घेईन. भीष्मांच्या बाणांनी अर्जुन मूर्च्छित होऊन पडला तरी ते बाणवर्षाव करीतच होते. कृष्णांनी विचार केला कीं जर भीष्म बाण सोडीतच राहिले तर माझ्या अर्जुनाचा मृत्यू होऊन मोठा अनर्थ होईल. यावेळी माझी प्रतिज्ञा मोडली तरी चालेल. भगवंतांनी रथावरून

उडी टाकली. सिंहासारखे ओरडतच रथचक्र घेऊन भीष्माच्या अंगावर धावून गेले. भीष्मांनी त्याच वेळेस कृष्णाला नमस्कार केला आणि भगवंतांचा जयजयकार केला.

भक्ताची प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी भगवंत स्वतःची प्रतिज्ञा मोडतात. प्रभूची ही पण एक लीलाच आहे. भगवंत भक्तांचा पूर्ण सन्मान करतात. ते म्हणतात कीं एक वेळ माझा पराजय झाला तरी हरकत नाही, पण भक्ताचा विजयच झाला पाहिजे.

भीष्म म्हणतात, माझी आणि कृष्णांची अशा दोघांच्याही प्रतिज्ञा पूर्ण झाल्या. त्यावेळी दोन रूपे मी एकाच वेळी पाहात होतो. एक रूप रथावर विराजमान होते आणि दुसरे रूप रथावरून उडी घेऊन चक्र फिरवीत धावत होते. अर्जुन मूर्च्छित झाल्यामुळे घोडयांनी रथ कोठे खड्ड्यांत घालू नये म्हणून भगवंताचे एक रूप रथ सांभाळीत होते. अन् त्या रूपाने तर कोणतेच शस्त्र धारण केले नव्हते.

भीष्म म्हणजे भयंकर. भयंकर कोण आहे? मनच भयंकर आहे. म्हणून भीष्माचा अर्थ झाला मन. अर्जुन जीवात्मा आहे. मन आवेशयुक्त झाले म्हणजे संकल्पविकल्प फार करीत असते. मनच संकल्पविकल्पांच्या बाणाचा वर्षाव करीत असते. म्हणून जीवरूपी अर्जुन घायाळ होत असतो आणि मूर्च्छित होतो. ईश्वर जेव्हा मनाला मारायचा प्रयत्न करतो तेव्हांच ते अंकुशित होते. भगवंत जेव्हां मनाला सुदर्शनचक्राने मारायला जातात तेव्हांच मन शांत होते.

जीवात्मा जेव्हा परमात्म्याला शरण जातो तेव्हा तो मनाला शांत करतो. मनाने जर संकल्पविकल्प करणे सोडून दिले तर ते आत्मस्वरूपांत तदाकार होऊन जाते, आणि तेव्हांच जीवनांत शांति लाभते.

जी स्तुति भीष्मांनी केली होती ती अनुपम आहे. ती स्तुति कंठस्थ करण्यायोग्य आहे. त्याला **भीष्मस्तवराजस्तोत्र** असेंही म्हणतात.

यानंतर उत्तरायणांत भीष्मांनी देह सोडला. भीष्माचार्य भगवत्स्वरूपांत तदाकार होऊन गेले. ते कृतार्थ झाले.

उत्तरायणांत मृत्यु याचा अर्थ ज्ञानाच्या किंवा भक्तीच्या उत्तरावस्थेंत म्हणजेच परिपक्व दशेंत मृत्यू. पुष्कळसे पापी लोक उत्तरायणाच्या काळांत मरतात तरी पण त्यांना सद्गति मिळत नाही; आणि पुष्कळसे योगीलोक दक्षिणायनांत मेले तरी पण त्यांची दुर्गति होत नाही.

दक्षिण दिशेस यमपुरी आहे. नरकलोक आहे. नरकलोकाचा अर्थ आहे, अंधकार. ज्यांना परमेश्वराच्या स्वरूपाचे ज्ञान नाही, ज्यांनी परमेश्वराचा अनुभव घेतला नाही आणि तसेच मरून जातात त्यांच्या मृत्यूला दक्षिणायन म्हणतात.

संतांचा जन्म तर आपल्याचसारखा साधारण होतो. पण त्यांचे मरण मंगलमय असते.

भीष्म महाज्ञानी होते, तरी पण प्रभुप्रेमांत तन्मय होऊन गेले. यावरून भक्तीच श्रेष्ठ असते असे दिसून येते. किंबहुना भक्तीच ज्ञानाची माऊली आहे.

साधन-भक्ति करता करताच साध्य-भक्ति सिद्ध होते.

ज्याच्या मरणाच्या वेळी देव वाद्यें वाजवितात त्याचेच मरण कृतार्थ झाले असे समजावे. भीष्माच्या मरणाच्या वेळी देवांनी हेच केले होते. जगांत राहून अशी कामें करा कीं,

**जब तुम आये जगमें तो वह हँसा, तुम रोए।**
**ऐसी करनी कर चलो, तुम हँसो, जग रोए॥**

मानवी जीवाची अंतिम परीक्षा त्याचा मृत्यु होय. ज्याचे जीवन सुंदर असेल त्याचा मृत्यूही

मंगलमय होईल. ज्याचे मरण वाईट झाले त्याचें आयुष्यही व्यर्थच गेले. मरण त्याचेच चांगले होते जो प्रत्येक क्षणी सुधारत जातो आणि ज्याला वेळेच्या किंमतीची शुद्ध असते. गेलेली संपत्ति पुनः मिळू शकते, परंतु गेलेला वेळ पुनः केव्हांही मिळत नाही. प्रत्येक क्षणाचा जो सदुपयोग करील त्याचाच मृत्यु मांगलिक होईल. कणाकणाचा सदुपयोग करा, त्याचप्रमाणे क्षणाक्षणाचाही. एका कणाचा सुद्धा किंवा एकाही क्षणाचा दुरुपयोग करू नका. कणाचा जो दुरुपयोग करतो तो दरिद्री होतो आणि क्षण व्यर्थ घालवणारा आपले आयुष्य बिघडवून घेत असतो. दररोज संयम वाढवा. प्रत्येक क्षणाला जो ईश्वराचे स्मरण करतो त्याचा मृत्यु चांगला होतो. भीष्म आजीवन संयमी राहिले होते. संयम वाढवून प्रभूच्या सतत स्मरणाच्या सवयीने येणारे मरण चांगले.

आयुष्याचा अंतकाळ फार कठीण असतो. त्यावेळी देवाचे स्मरण करणे सोपे नाही. सगळे आयुष्य ज्याच्या नादांत गेले असेल तोच अंतकाळी आठवेल.

जोपर्यंत मनुष्य स्वतः कांही प्रयत्न करणार नाही तोपर्यंत ईश्वर कृपा करीत नाही. सगळे आयुष्य भगवत्चिंतनांत जाऊनही कदाचित एखादी व्यक्ति अंतकाळी भगवंताला विसरली तरी पण भगवंत तिचे स्मरण ठेवतील. सत्कर्म केव्हांही व्यर्थ जात नाही. भक्त मला विसरले तरी मी त्यांना विसरत नाही असे भगवंतांनी म्हटले आहे. भीष्मपितामहांचा मृत्यु उज्ज्वल करण्यासाठी द्वारकाधीश आले होते. भीष्मपितामहांनी महाज्ञानावर भरवसा ठेवला नाही आणि ते प्रभूला शरण गेले.

भीष्मपितामहांच्या मृत्यूमुळे युधिष्ठिराला दुःख झाले, परंतु त्याच्या सद्गतीमुळे त्याला आनंदही झाला.

धर्मराज राजसिंहासनावर बसले. हस्तिनापुराचें शासन करू लागले. त्यांच्या राज्यांत दुष्काळ झाला नाही. अतिवृष्टि झाली नाही की अनावृष्टीही झाली नाही. धर्मराजाच्या राज्यात कोणी उपाशी नव्हता कीं कोणी आजारी देखील नव्हता. धर्माच्या मर्यादेचे पालन करणारा कधी दुःखी होत नाही की कधी आजारी पडत नाही.

अनेक जन्मांची भोगेच्छा अजून मनांत आहे. तिचा पूर्णपणे नाश होऊ शकत नाही. परंतु विवेकाने उपभोग केला तर अंतकाळपर्यंत इंद्रिये स्वस्थ राहतील. धर्माच्या मर्यादेंत राहून मनुष्य अर्थ आणि कामाचा उपभोग करील तर तो दुःखी होणार नाही. संयम आणि सदाचार वाढला नाही तर धनसंपत्तीपासून सुद्धा आनंद होणार नाही.

सूत सावध करतात आणि म्हणतात, धर्मराजाच्या राज्यांत धर्माचे सुद्धा शिक्षण दिले जात होते.

सूर्यनारायण प्रत्यक्ष भगवान आहेत आणि इतर सर्व देव भावामुळे सिद्धि देत असतात. सूर्यनारायणाचे प्रत्यक्ष दर्शन होते. त्यांच्या दर्शनासाठी तशी भावाची आवश्यकता नाही. ह्याच प्रत्यक्ष देवाची आराधना करा.

धर्मराज सुद्धा सूर्याची उपासना करीत होंते. सूर्याची आराधना केल्याशिवाय बुद्धि शुद्ध होत नाही. अधिक नाही तर दररोज कमीत कमी बारा सूर्यनमस्कार घाला. सूर्याची आराधना करणाऱ्याला आरोग्य लाभते.

माझे सूर्यनारायण आणि कृष्ण एकच आहेत. कृष्णच सूर्यनारायण आहेत. श्रीकृष्ण भगवानांनी स्वतः गीतेत म्हटले आहे, **"आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान्!"**.

या सूर्यनारायणाच्या उपासनेचा क्रम सांगितला गेला आहे. त्यांची उपासना करणारा कधी दरिद्री

होत नाही.

महाभारताच्या वनपर्वात एक कथा येते. युधिष्ठिर सूर्यनारायणाची उपासना करीत असे. वनांत सूर्यनारायणांनी त्यांना एक अक्षयपात्र दिले.

रामाला देखील सूर्यानेच शक्ति दिली होती आणि त्याच शक्तीने त्याने रावणास मारले. रामानेसुद्धा हाच आदर्श आपल्यासमोर ठेवला होता– "मी स्वतः ईश्वर असलो तरी सूर्यनारायणाची उपासना करीत राहीन."

धर्माचा आणि नीतीचा जोपर्यंत विवाह अर्थात संबंध होणार नाही तोपर्यंत नीति ही विधवेसारखीच असते आणि नीतीविना धर्म विधुर असेल.

अर्थोत्पादन तसे धर्म्य आहे, परंतु ते धर्मानुकूल असले पाहिजे.

धर्मराजाच्या पवित्र राज्यांत कोणाच्याच घरांत कशाही प्रकारचा क्लेश नव्हता. पुत्र मातापित्यांच्या आज्ञेचे पालन करीत असत. त्यावेळी राजा धर्मनिष्ठ असल्याने प्रजासुद्धा धर्मनिष्ठ होती.

युधिष्ठिराला राज्याभिषेक करून श्रीकृष्ण द्वारकेला गेले. तेथील जनतेने रथयात्रेचे दर्शन केले.

रथांत बसलेल्या द्वारकाधीशांचे दररोज दर्शन करा. त्यांच्या हातांत शंख, चक्र, गदा आणि पद्म आहेत, रथ सोन्याचा आहे, असे सुंदर दृश्य डोळ्यासमोर आणा म्हणजे आपलें हृदय भरून येईल. या शरीररूपी रथावर श्रीकृष्ण आरूढ आहेत असें दृश्य पहा. परमेश्वराला हृदयसिंहासनावर बसवून भक्तजन प्रभूचें दर्शन करीत असतात. ज्ञानी लोक समाधीच्या अवस्थेंत ललाटाच्या ठिकाणीं ब्रह्मदर्शन करीत असतात.

**१३. श्रीकृष्णांचा द्वारकेत प्रवेश, त्यांच्या कामविजयाची कथा :**

द्वारकाधीशांनी द्वारकेंत प्रवेश केला. नागरिक म्हणतात, 'आपल्या कृपेने तसे तर सर्व कांही ठीकच होते. एक येवढेच दुःख होते कीं आपले दर्शन करू शकत नव्हतो. सगळेच कृष्णदर्शनासाठी आतुर आहेत.

भगवंतांनी अनेक रूपे धारण केली आणि सोळा हजार राण्यांच्या बरोबर राजप्रासादांत प्रवेश केला. भगवान वाणीचतुर आहेत. सगळ्याच राण्यांना म्हणत आहेत कीं मी तुझ्याच मंदिरांत प्रथम आलो आहे.

दुसऱ्या दिवशी राण्यांमध्ये प्रेमकलह झाला. भगवंतांची ही दिव्य लीला आहे. त्यावेळी कामदेव भांडायला आला. रासलीलेत कामदेव पराजित झाला होता. तरी पण त्याच्या मनांत असंतोष राहिला होता कीं त्यावेळी कृष्ण तर बालकच होते. त्यावेळी आपण हरलो ही कांही आश्चर्याची गोष्ट नाही. कामदेव श्रीकृष्णास म्हणाला, 'जेव्हां सुंदर युवति तुमची सेवा करीत असतील तेव्हा मला तुमच्याशी लढायचे आहे.' सुंदर प्रेमळ हावभावांनी राण्यांनी श्रीकृष्णाला प्रसन्न करण्याचा प्रयत्न केला. पण श्रीकृष्ण तर अजयच राहिले. वनांमध्ये वृक्षाच्या तळाशी बसून कामाचे दमन करणे तर ठीक आहे, परंतु अनेक राण्यांच्या सहवासांत राहून कामाला जिंकील तो परमात्मा आहे.

श्रीकृष्णांचे चिंतन-मनन करणाऱ्याला काम सतावू शकत नाही. तर मग प्रत्यक्ष श्रीकृष्णाला तो कसा सतावू शकेल? ईश्वर तोच की ज्याला काम कधीच आधीन करू शकणार नाही. कामाच्या आधीन होईल तो जीव. श्रीकृष्णाला कामदेव पराजित करू शकला नाही. त्याला आपल्या धनुष्यबाणाचा त्याग करावा लागला. श्रीकृष्ण योगेश्वर आहेत. शंकर देखील योगेश्वर आहेत. प्रवृत्तींत पूर्णपणें राहूनही

त्यात आसक्त न होईल तोच योगेश्वर होय. संपूर्ण निवृत्त राहून स्वरूपांत स्थिर राहील तो योगेश्वर.

बाराव्या अध्यायांत परीक्षिताच्या जन्माची कथा आहे. उत्तरेने ज्या बाळाला जन्म दिला ते बाळ चारी बाजूला पाहू लागले. विचार करू लागले, आईच्या उदरात मला चतुर्भुज स्वरूप असलेला जो पुरुष दिसला होता तो कोठे आहे ? परीक्षित भाग्यशाली होता म्हणून त्याला आईच्या गर्भाशयातच भगवंताचे दर्शन झाले. ह्याच कारणामुळे तो उत्तम श्रोता आहे.

युधिष्ठिराने ब्राह्मणांना विचारले, 'मुलगा कसा होईल ?' ब्राह्मण म्हणाले, 'तसे तर सर्वच ग्रह दिव्य आहेत, पण मृत्युस्थानांत काही गडबड आहे. त्याचा मृत्यु सर्पदंशाने होईल. हे ऐकून धर्मराजाला दुःख झाले. माझ्या वंशांतला मुलगा सर्पदंशाने मरावा, हे चांगले नाही. ब्राह्मणांनी आश्वासन दिलें कीं 'भलेही त्याचा मृत्यु सर्पदंशाने होवो, पण त्याला सद्गति मिळेल. त्याचे इतर ग्रह शुभ आहेत. या ग्रहांवरून असे वाटते की हा याचा अंतिम जन्म आहे.'

नवव्या स्थानात स्वगृही उच्चीचा गुरु ज्याचा असतो तो धर्मात्मा होतो.

परीक्षित दिवसेंदिवस मोठा होत आहे.

चौदाव्या आणि पंधराव्या अध्यायांत धृतराष्ट्र-पांडवांच्या मोक्षाची कथा आहे. सोळाव्या अध्यायापासून परीक्षिताच्या चरित्राला आरंभ होतो.

**१४. विदुरांचे आगमन आणि धृतराष्ट्र व गांधारी यांचे सप्तस्रोत तीर्थात जाणे :**

विदुर तीर्थयात्रा करीत करीत प्रभासक्षेत्रात आले आहेत. त्यांना बातमी कळली कीं सर्वत्रच कौरवांचा विनाश होऊन धर्मराज गादीवर बसले आहेत. फक्त माझा भाऊ धृतराष्ट्रच मूठभर अन्न खाऊन धर्मराजाचे येथे राहिला आहे.

विदुर आले. धर्मराजांनी त्यांचे स्वागत केले. विदुर सन्मान घेण्यासाठी आले नव्हते. आपल्या भावाला बंधनमुक्त करायला आले होते. त्यांनी छत्तीस वर्षेंपर्यंत तीर्थयात्रा केली.

संत तीर्थांना पवित्र करीत असतात. तसे तर यात्रेंत इतर चिंतांमुळे देवाचे नियमित ध्यान होऊ शकत नाही. सत्कर्म नियमाने होत नाही म्हणून तीर्थयात्रेपेक्षा भगवंताचे ध्यान श्रेष्ठ आहे.

देवीभागवतात लिहिले आहे कीं तीर्थयात्रेमध्ये जर घरच्यापेक्षा अधिक सत्कर्म होणे शक्य नसेल तर ती तीर्थयात्रा व्यर्थ होय.

विदुरांनी छत्तीस वर्षें तीर्थयात्रा केली, पण वर्णन तर फार संक्षेपातच केले.

आत्मप्रशंसा मृत्यूच होय. आपल्या सत्कर्माचे आपल्याच तोंडाने वर्णन करू नका.

विदुरांनी छत्तीस वर्षांच्या यात्रेचे वर्णन छत्तीस शब्दांतच केले. आजकाल तर लोक आम्ही इतकी यात्रा केली असे वारंवार सांगत फिरतात. आपल्या हाताने जे कांही पुण्यकर्म होईल ते विसरून जावे, आणि जे पाप होईल त्याची आठवण असावी. सुखी होण्याचा हाच मार्ग आहे. परंतु मनुष्य पुण्य लक्षांत ठेवतो आणि पाप विसरून जातो.

तारुण्यांत ज्याने खूप पाप केलेले असते त्याला म्हातारपणी झोप येत नाही.

मध्यरात्रीच्या वेळी विदुर धृतराष्ट्रापाशी आले. ते जागेच पडले होते. विदुरांनी विचारले, झोप येत नाही का ? ज्या भीमाला तुम्ही विष भरलेले लाडू खाऊ घातले त्याच्याच घरांत तुम्ही आता गोड लाडू खात आहात ! धिक्कार आहे तुम्हाला ! भर राजसभेंत द्रौपदीला आणण्याची तुम्ही संमति दिली होती ! पांडवांना सोडून आता यात्रेला जा.

धृतराष्ट्र म्हणतो – "माझे पुतणे फार चांगले आहेत. माझी खूप सेवा करतात. त्यांना टाकून निघून जाण्याचे मनांत येतच नाही."

विदुर म्हणतात – "आता तुम्हाला पुतणे प्रिय वाटत आहे! आठवा तर, तुम्ही पांडवांना मारण्यासाठी किती किती प्रयत्न केले होते ते! भीमसेनाला लाडूंत विष दिले, लाक्षागृहाला आग लावली इत्यादी. हा धर्मराज तर धर्माची प्रत्यक्ष मूर्तीच आहे. म्हणून तुमच्या अपकारांचा बदला उपकारांनी देत आहे. मला असे वाटत आहे की थोडयाच दिवसांनी पांडव प्रयाण करतील आणि तुम्हाला सिंहासनावर बसवतील. तुम्ही आता मोह सोडा. तुमच्या डोक्यावर काळ घिरटया घालीत आहे. तुमच्या तोंडावर मला मृत्यूचे दर्शन होत आहे. समजून उमजून गृहत्याग केलात तर कल्याण होईल. नाही तर कालाच्या धक्क्यामुळे घर सोडावे लागेल. सोडण्याशिवाय आता दुसरा मार्ग नाही. स्वतः समजून उमजून जो घर सोडील तो बुद्धिमान आहे. थोडयाच कालानंतर तुमचा मृत्यु होणार आहे."

हा जीव इतका अडाणी आहे की समजून उमजून स्वतः काहीच सोडू इच्छित नाही. पण जेव्हा डॉक्टर सांगतात की, ब्लडप्रेशर आहे, कामधंदा बंद करा. आराम करणार नाही तर धोका आहे, तेव्हा मात्र भीतीमुळे घरी बसून राहतो. याप्रमाणे डॉक्टरांनी सांगितल्यावर कामधंदा सोडतो.

धृतराष्ट्र म्हणतो, 'विदुरा तुझे म्हणणे ठीक आहे. पण मी तर आंधळा आहे! एकटा कोठे जाऊ?'

विदुर म्हणाले, 'दिवसा तर तुला धर्मराज जाऊ देणार नाही म्हणून मी तुला मध्यरात्रीच घेऊन जाईन.'

धृतराष्ट्र आणि गांधारी यांना घेऊन विदूर सप्तस्रोत तीर्थाला गेले.

सकाळ झाली तेव्हा युधिष्ठिर धृतराष्ट्राच्या महालांत आला. काका दिसत नाहीत. युधिष्ठिराला वाटले, आम्ही त्यांच्या शंभर पुत्रांना मृत्यूची वाट दाखविली म्हणून त्यांनी आत्महत्या केली असेल. जोपर्यंत काका-काकूंचा समाचार मिळणार नाही तोपर्यंत मी पाणी देखील पिणार नाही असें धर्मराजाने ठरविले.

धर्मात्मा व्यथित झाला म्हणजे त्याला भेटायला संत येत असतात. धर्मराजाकडे त्यावेळी नारद आले. धर्मराज त्यांना म्हणाले, 'माझ्या पापामुळेच काका निघून गेले आहेत.'

### १५. नारद धर्मराजाला सावध करायला येतात :

जे स्वतःच्या दोषांविषयी कटाक्षाने विचार करतात त्यांनाच वैष्णव म्हणता येईल, दुसऱ्याचे दोष पाहणाऱ्याला नाही. नारद समजूत घालतात की, धृतराष्ट्राला तर सद्‌गति मिळणार आहे, चिंता करू नकोस. प्रत्येक जीव मृत्यूचे आधीन आहे. जिथे काका गेले आहेत तिथे तुलाही जायचे आहे. आजपासून पाचव्या दिवशी काकांना सद्‌गति मिळेल आणि मग तुझी पाळी येईल. काकांकरता आता रडू नको. आता तू आपलाच विचार कर.

मृत्यूने ग्रासलेली व्यक्ति केव्हांही परत येत नाही. जीवित व्यक्ति आपल्या स्वतःसाठीच रडेल तर ते ठीक होईल. एकाच्या मृत्यूकरता दुसरा रडतो. परंतु रडण्याऱ्याला हे समजत नाही की तो जिथे गेला आहे त्याच्यानंतर त्याला स्वतःलाही तिथेच जायचे आहे. दररोज विचार करा की मला आपले मरण उज्ज्वल करायचे आहे. तुझ्यासाठी आता सहाच महिने शिल्लक आहेत. तू आपल्या मृत्यूचा विचार कर.

सूत सावध करतात :

शय्येवर निजल्यानंतर अर्थात अंतकाली आलेले शहाणपण काय कामाचे ? ते निरर्थक असणार.

नारद म्हणतात, ' भगवत्प्रेरणेने मी तुला सावध करायला आलो आहे. विदुर धृतराष्ट्राला सावध करायला आले होते. मी तुला सावध करायला आलो आहे. सहा महिन्यानंतर कलियुगाचा प्रारंभ होईल. आता तू कोणाचीच चिंता करू नकोस. तू आपलीच चिंता कर. '

युधिष्ठिराने कितीतरी यज्ञ केले. भगवंत द्वारकेला जाताना बरोबर अर्जुनाला घेऊन गेले. यदुकुलाचा नाश होईल तर चांगले, अशी प्रभूची इच्छा होती. त्याप्रमाणे यदुकुलाचा सर्वनाश झाला. युधिष्ठिराने भीमाला म्हटले कीं नारदांनी सांगितलेली वेळ आता येत आहे, असे वाटते. मला कलियुगाची पडछाया दिसू लागली आहे. माझ्या राज्यात अधर्म वाढीस लागला आहे. मंदिरांतील प्रभूचे स्वरूप आनंदी दिसत नाही. कुत्रे आणि कोल्हे माझ्या समक्ष रडत आहेत. तुला मी आणखी काय सांगू. मी काल फिरायला गेलो होतो. एका लोहाराजवळ एक वस्तू पाहिली. मी विचारले, हे काय आहे ? तर तो म्हणाला, हे कुलूप आहे. लोकांच्या घरांत चोऱ्या होऊ लागल्या आहेत म्हणून कुलपे लावावी लागत आहेत.

आजपासून सहा महिन्यांपूर्वीची गोष्ट आहे. एका वैश्याने एका ब्राह्मणाला एक घर विकले होते. त्या घराच्या पायांतून काही सोने निघाले. ब्राह्मण ते सोने घेऊन शेठजीकडे गेला. शेठ धर्मनिष्ठ होता. तो म्हणाला, 'मी तर तुला घर विकले आहे. त्यांत जे काही निघाले ते सर्व तुझेच आहे. ब्राह्मणानें सांगितले, 'त्या संपत्तीवर माझा स्वतःचा काही अधिकार नाही'.

माझ्या राज्यांतील लोक किती धर्मनिष्ठ होते ? त्याच वेळी मी म्हटले होते कीं सहा महिन्यांत या दोघांची मने कलुषित होतील. तसेच झाले. काल ते दोघे माझ्याकडे आले होते आणि त्या धनावर आपापला अधिकार सांगत होते, आणि आपल्याबरोबर एक एक वकीलही घेऊन आले होते. असे वाटते की माझ्या राज्यात आता कलीचा प्रवेश नक्कीच झाला आहे.

कलि अर्थात कलहाचे रूप. ज्या घरांत कृष्णकीर्तन–कृष्णाची कथा होत असेल त्यांत कलि शिरू शकत नाही. भक्तीच्या-प्रेमाच्या घरांत कलह होऊ शकत नाही.

**१६. विरहाकुल अर्जुनाचें द्वारकेहून आगमन :**

अर्जुन अजूनपर्यंत आलेला नव्हता. भीमसेन आणि धर्मराज कलि प्रवेशाच्या गोष्टी बोलत होते. इतक्यांत अर्जुनही आला. त्याच्या तोंडावर तेजाचा आभास सुध्दा दिसत नव्हता. युधिष्ठिराने विचारले, 'तुझे तेज कोठे गेले ? अर्जुना ! दारी आलेल्या अतिथीचा सत्कार केल्याशिवाय तर तू भोजन केले नाहीस ना ? '

अतिथि भगवंताचे रूप आहे. दारी आलेला अतिथि जर उपाशी राहिला तर यजमानाच्या पुण्याचा क्षय होतो. यमाचे घरी नचिकेता तीन दिवसपर्यंत भुकेला आणि तहानेला राहिला होता. यमराजांनी विचारले, 'तुम्ही या तीन दिवस काय खाल्ले ? ' तर तो म्हणाला, 'तुमचे पुण्य'.

मनुष्य शरीरापेक्षा डोळ्यांनी आणि मनाने अधिक पापे करतो.

अर्जुन निष्पाप आहे असे त्याला भगवंतानी गीतेत प्रमाणपत्र दिले आहे. यासाठीच तर भगवंतांनी त्याला गुह्यतम ज्ञान दिले.

एकदा रात्रीच्या वेळी ऊर्वशी अर्जुनाला भेटायला आली. अर्जुनाने तिचे तोंड देखील पाहिले नाही. तो म्हणाला, 'माते, मी तर या भरतखंडातील रहिवासी आहे. माझ्याकरता परस्त्री मातेसमान

आहे.'

एकांतात जो कामाचा पराजय करील तोच वीर होय. मला पूर्ण विश्वास आहे कीं परस्त्रीगमनाचे पाप अर्जुन करू शकत नाही. तरी पण आज तो निस्तेज कां आहे? मला तर ही लक्षणे कलियुगाचीच दिसत आहेत.

धर्मराज अर्जुनाला विचारतात, 'तुझे आत्मस्वरूप श्रीकृष्ण परमात्मा तर कुशल आहेत ना? ते द्वारकेतच आहेत का?'

अर्जुन म्हणाला, 'काय सांगू दादा! माझ्या प्रभूंनी माझा त्याग केला आहे. ज्यांनी लाक्षागृहांतून आपल्याला वाचविले होते, ते आता स्वधामी गेले आहेत. प्रभू अंतकाळी मला बरोबर घेऊन नाही गेले. ते मला म्हणाले, 'तू माझ्याबरोबर आलाच नव्हतास तर आता मी तुला आपल्याबरोबर कसा घेऊन जाऊ शकेन? मी तुला गीताशास्त्राचे जे ज्ञान दिले आहे तेच तुझे रक्षण करील. दादा, आजपर्यंत मी कधी हारलो नव्हतो. परंतु कृष्णविरहाने व्याकुळ असा मी आज द्वारकेहून परत येताना रस्त्यांत काबा लोकांकडून लुटला गेलो. मला असे वाटत आहे की माझ्यात जी शक्ति होती ती माझी नव्हती, द्वारकाधीशांची होती. त्यांच्या जाण्याबरोबर ती शक्तीही निघून गेली. मला प्रभूंच्या त्या अनंत उपकारांची आठवण होत आहे. लाक्षागृहदहन इत्यादी अनेक संकटांतून त्यांनी आमचे रक्षण केले होते. कृष्णकृपेची आठवण काढीत काढीत कृष्णविरहाने अर्जुन रडूं लागला.

धर्मराजाला अर्जुन म्हणत आहे, 'द्रुपद राजाच्या राज्यसभेत जो मत्स्यवेध मी केला होता तो भगवंताच्या शक्तीच्या आधारेच होय.'

कित्येक महाराजांना मत्स्यवेध करता आला नव्हता. कर्णाने विचार केला की आपण मस्यवेध करावा. कृष्णाला वाटले की कर्णाने जर मस्यवेध केला तर माझा अर्जुन राहून जाईल आणि द्रौपदी कर्णाची होईल. असा विचार करूनच श्रीकृष्णांनी कर्णाचा सभेत अपमान करविला. कृष्णांनी एका दासीला द्रौपदीकडे पाठविले. द्रौपदीने हीन जातीच्या कर्णाशी विवाह करण्याचे नाकारले.

माझ्यात तर हिंमतच नव्हती. परंतु माझ्यावर भगवंतांची कृपा होती. तिच्यामुळे माझ्यात शक्तिसंचार झाला आणि त्या दिवशी मी मत्स्यवेध करू शकलो.

लाक्षागृहाच्या आगीत पांडव जळून मरून गेले आहेत असे समजून दुर्योधनाने तर त्यांचे श्राध्दही करून टाकले होते.

संसारात मनरूपी मत्स्य फिरत असतो. त्याला विवेकरूपी बाणाने मारा. ज्याला द्रौपदी मिळते त्याचा सारथी भगवंताला व्हावे लागते. द्रौपदी कृष्णभक्तीचेच नाव आहे. मनाला जोपर्यंत मारणार नाही तोपर्यंत कृष्णभक्ति प्राप्त होणार नाही. मनाला जे प्रिय असेल ते करू नका. मनाच्या इच्छेला वश न झाल्यास हळू हळू ते ताब्यात येत जाईल.

आत्तापर्यंत हौस-मौज, भोग, पाप इत्यादींत किती खर्च केला त्याचा हिशोब जीव ठेवीत नाही. ब्राह्मणाला काही दिले असेल तर ते लक्षात ठेवील. आम्ही आणखी काय करू शकतो? हजार रुपयांचे दान दिले आहे. अंतकाळी जीव काळजी करतो की माझ्या मुलीचे काय होईल? माझ्या भाच्याचे काय होईल? पण असा विचार कर की तुझे स्वतःचे काय होईल?

ज्याच्यावर भगवंताची कृपा होते तोच ह्या मनरूपी मत्स्याला मारू शकतो. भगवंताची जोपर्यंत कृपा होत नाही तोपर्यंत मन मरत नाही. प्रभूची कृपा होईल तर मनरूपी मत्स्य मरेल. मन मेले म्हणजे भक्तिरूपी द्रौपदी मिळेल. परमात्म्याची कृपा झाल्यावरच जीव मनाला वश करू शकतो. प्रभूपाशी

प्रार्थना केली नाही तर मन मनुष्याला अधोगतीच्या गर्तेत लोटून देते.

अर्जुनाला कृष्णाचे कैक उपकार आठवत आहेत. 'त्यांनी मला गीतेचा उपदेश दिला होता. दादा, एकदा भगवंत मला म्हणाले होते, 'अर्जुना काही माग.' मोठ-मोठे ऋषि आणि महात्मा जन्ममरणाच्या चक्रातून मुक्ति मिळविण्याच्या इच्छेने ज्याचे ध्यान करतात त्यांच्याजवळ मी युध्दात जिंकावे हे मागणे मागितले. मला नीट मागताच आले नाही, याचा मला पश्चात्ताप होत आहे.

किरातवधाच्या वेळी मी शंकराशी युध्द करू शकलो तेही श्रीकृष्णाच्याच प्रतापामुळे!

दादा, द्रौपदीविषयीही कृष्णाला किती स्नेह होता? द्रौपदीचे केस धरून दुष्ट जनांनी तिला सभेत आणले. अश्रुपूरित नयनांनी द्रौपदी कृष्णाच्या चरणांवर जाऊन पडली. त्यांनी सभेतच प्रतिज्ञा केली की या अपमानाचा मी बदला घेईन आणि त्या दुष्टांची अशी दशा करून टाकली की त्यांच्या बायका विधवा झाल्या आणि त्यांना आपले केस स्वतःच सोडावे लागले.

दादा, तो प्रसंग आठवा की जेव्हां आमचा नाश करण्याकरिता कपट करून दुर्योधनाने दुर्वास ऋषींना आमच्याकडे पाठविले होते. भाजीच्या एकाच पानाने अक्षयपात्र भरून कृष्णाने आम्हाला त्या संकटांतून वाचविलें होते.

**१७. दुर्योधनाने दुर्वासांना वनवासी पांडवांकडे आतिथ्यासाठी पाठविले:**

दुर्योधनाने चार महिनेपर्यंत दुर्वासांना आपल्या येथे भोजनादि देऊन सेवा केली. ते प्रसन्न झाले. त्यांनी दुर्योधनाला वर मागण्यास सांगितले. दुर्योधनाने विचार केला, दुर्वासांच्या शापाने पांडवांचा नाश करण्याची ही संधि चांगली आहे. काल या ऋषीचे एकादशीचे उपोषण होते. तसे तर सूर्याने दिलेले अक्षयपात्र पांडवांजवळ आहे, पण द्रौपदीचें जेवण झाल्यानंतर त्यांत कांही प्राप्त होत नाही. दुर्वास द्रौपदीच्या जेवणानंतर तेथे पोचतील आणि द्रौपदीकडून जेवण न मिळाल्यावर क्रोधित होतील आणि पांडवांना शाप देतील. त्यामुळे त्यांची दुर्गति होईल.

दुर्योधनाने याप्रमाणे कुविचार करून दुर्वासांना विनंती केली की, 'तुम्ही तुमच्या दहा हजार शिष्यांसमवेत जाऊन युधिष्ठिराचे आतिथ्य स्वीकारा. कारण आपल्या कुटुबांत तेच गुरुजन आहेत. आणि हे पहा, द्रौपदी बिचारी उपाशी न राहावी म्हणून पांडवांचे जेवण झाल्यावरच आपण तेथे जावे.

संतांची सेवा सद्भावाने केली तर ती सफळ होते, परंतु दुर्भावनेने केली तर सफल होणार नाही.

चार महिनेपर्यंत दुर्वासांना आपल्या येथे जेवण घातल्यावर दुर्योधनाने पांडवांच्या सर्वनाशाची इच्छा केली. या दुर्भावनेमुळे त्यांची स्वतःचीच हानि झाली. अन्यथा संतांना भोजन दिल्यामुळे पुण्य मिळत असते. दुर्योधनाने संतांची सेवा केली, पण कोणाच्या तरी सर्वनाशासाठी केली म्हणून त्याला पुण्य मिळाले नाही.

दुर्योधनाच्या विनंतीनुसार दुर्वास ऋषि दहा हजार शिष्यांसह पांडवांच्या अंगणांत आले. दुर्वास म्हणाले, 'हे राजन्, काल एकादशीचें उपोषण होते म्हणून आम्हाला अतिभूक लागली आहे. तुमच्या घरी आम्ही भोजन करण्याच्या इच्छेने आलो आहोत.'

सूर्यनारायणाने दिलेल्या अक्षयपात्राच्या साहाय्याने, मध्यान्ही आलेल्या ब्राह्मणांना पांडव जेवायला घालीत असत. संकल्पाप्रमाणे अक्षयपात्र भोजन देत असे.

पांडव तर असे भक्त होते कीं विपदावस्थेंत देखील ईश्वराची कृपा आणि दर्शनाचा अनुभव

करीत असत.

आज द्रौपदीचें जेवण झालेले आहे. त्यामुळे अक्षयपात्रापासून कांहीही मिळण्याची शक्यता नव्हती. तरी पण युधिष्ठिराने दुर्वासांना म्हटले, " आपण आमचे अंगण पावन केलें ही आमच्यावर मोठीच कृपा केलीत ! आपण सर्व गंगास्नान करून या, तोपर्यंत भोजन तयार करून ठेवू. "

धर्मराजाचें धैर्य तर पहा कीं, घरांत अन्नाचा एक कणही नसता त्यांनी दहा हजार ब्राह्मणांना भोजनाचे आमंत्रण दिले.

युधिष्ठिराला विश्वास होता की आजपर्यंत केव्हांही मी आपल्या धर्माची उपेक्षा केलेली नाही. यामुळे धर्मस्वरूप प्रभु माझें रक्षण अवश्य करतील. भीम, द्रौपदी, अर्जुन इत्यादी काळजींत आहेत की या सर्वांना जेवायला कसे घालावे ? द्रौपदी विचार करते आहे कीं, आता अक्षयपात्रही काम देणार नाही. कारण मी जेवून घेतले आहे. जेवण न मिळाल्यामुळे क्रोधित होऊन दुर्वासांनी शाप दिला तर पांडवांचा सत्यानाश होईल म्हणून द्रौपदी दुःखाने घाबरून गेली होती.

द्रौपदी द्वारकाधीशांची प्रार्थना करू लागली, ' नाथ, माझी लाज राखा, नाही तर जग तुमची सुध्दा टर उडवील. द्रौपदीने आर्तस्वराने प्रार्थना केली कीं, ज्या प्रकारे आजपर्यंत साहाय्य करून तुम्ही आमची लाज राखली त्याच प्रकारे आजही आमची लाज राखा. आज जर आम्ही या दहा हजार संतांना भोजन देऊ शकलो नाही तर दुर्वास शाप देतील आणि आमचा सर्वनाश होईल. '

जीव जोपर्यंत कळवळून प्रेमाने प्रभूचा धावा करीत नाही तोपर्यंत कांही होत नाही. संकटावस्थेंतच जीव प्रभूला हाक मारतो. द्रौपदीने दुःखाने विव्हळ होऊन आणि घाबरून प्रभूला हाक मारली. परमात्म्याने द्रौपदीची आर्तवाणी ऐकली अन् तिला साहाय्य करण्यासाठी येण्यास तयार झाले. भक्त जेव्हां अंतःकरणापासून कीर्तन करतो तेव्हां भगवंताचे सिंहासन देखील डोलू लागते.

भगवंत जेव्हां जाण्याची तयारी करीत होते तेव्हां उत्थानाची वेळ होत होती. रुक्मिणी ताटांत मेवा घेऊन आली होती. एकीकडे रुक्मिणी कृष्णाला भोजन अर्पण करण्याची इच्छा मनी धरून त्याचा स्वीकार केल्यानंतर जा, असें म्हणत होती; तर दुसरीकडे द्रौपदी आर्तस्वर करून बोलावीत होती. कृष्णांनी तिकडे जायचा विचार केला, तर रुक्मिणी, भोजन करून जा, असा आग्रह करू लागली. कृष्ण म्हणाले, दहा हजार ब्राह्मणांना वनांत द्रौपदी जेवायला कशी घालील ? मी तर चाललो, भोजन मी तेथेच करीन.

द्वारकानाथ धावतच त्या कुटीमध्ये आले जिथे द्रौपदी मोठ्या तन्मयतेने प्रार्थना करीत होती. भगवंत तेथेच प्रगट झाले.

अशा तन्मयतेने कीर्तन करा कीं भगवंत तुम्हाला बाहूंत घेऊन म्हणतील कीं, ' डोळे उघड, मी आलो आहे. '

भगवंत म्हणाले, द्रौपदी ! पहा मी आलो आहे. मला फार भूक लागली आहे, कांही खायला तर दे. द्रौपदी म्हणाली, आम्ही तर लुटले गेलो आहोत. आमच्या घरी तर कांहीच नाही. तुम्ही थट्टा करू नका. दहा हजार संतांना भोजन द्यायचे आहे. याकरिताच मी तुम्हाला हाक मारली आहे. आपण त्याची व्यवस्था करून आमची लाज राखाल तर मोठी कृपा होईल.

भगवंत म्हणतात, त्या संतांच्या जेवणाचा प्रबंध नंतर होईल, परंतु प्रथम माझ्या खाण्याची कांही व्यवस्था कर. तू आपल्या जेवणाच्या पूर्वी माझ्याकरिता नेहमी कांही ना कांही ठेवीत असतेस, तर आज जे कांही तू ठेवले असशील तेच मला दे.

द्रौपदी म्हणाली, ‘ आज तर मी विसरूनच गेले, त्यामुळे तुमच्यासाठीसुद्धा कांहीच राहिले नाही. ’

भगवंत म्हणाले, तुमचे ते अक्षयपात्र मला दाखव, कदाचित माझ्याकरता त्यांत कांही तरी असेल. प्रभूच्या हातांत द्रौपदीने अक्षयपात्र दिले. त्यांनी पाहिलें तर त्यांत भाजीचे एक पान राहिले होते.

तसें तर अक्षयपात्रांत ते पान कुठून येऊ शकत होते? परंतु भगवंतांनी प्रेमयोगाने पान उत्पन्न केले. त्यांनी तें पान खाल्ले.

परमात्म्याला जीव जेव्हां प्रेमाने कांहीही देतो तेव्हां त्याने तो तृप्त होत असतो. अंतर्यामी रूपाने तो सगळ्याच जीवांमधे व्याप्त आहे. म्हणून त्याची जेव्हां तृप्ति होते तेव्हां सर्व जीवही तृप्त होतात. परमात्म्याला हजारोवेळा आळवावे तेव्हां कोठे तो एखादे वेळी नैवेद्य स्वीकारतो. कन्हैयाला रोज नैवेद्य दाखवा. एखादे दिवशी त्यांनी कांही थोडेसें ग्रहण केले, तरी तुमचा बेडा पार होऊन जाईल. परमात्म्याला थोडे देखील जेवूं घालाल तर सगळ्या जगाला भोजन घातल्याचे पुण्य लाभेल.

भगवंत द्रौपदीला म्हणतात, आज जगांतील सर्वच जीव तृप्त झाले आहेत. भगवान दुर्वास आणि इतर दहा हजार संत सगळेच तृप्त होऊन गेले आहेत.

युधिष्ठिराने जाणाऱ्या ब्राह्मणांना थांबविण्याची आज्ञा केली. भीम संतांना बोलवायला गेला तर तेथे ते तृप्तीची ढेकर देत होते. ते भोजनासाठी यायचे नावही काढीत नव्हते.

दुर्वासांनी विचार केला कीं हे काम कृष्णाचेच असले पाहिजे. त्यांनी भीमाला विचारले कीं, इथें द्वारकेहून कृष्ण तर आले नाहीत ना? भीम म्हणाला ते तर केव्हांचेच आले आहेत आणि द्रौपदीशी गप्पागोष्टी करीत आहेत. ते म्हणताहेत कीं, दुर्वास माझे गुरु आहेत म्हणून मी आज प्रेमाने त्यांना भोजन वाढूं इच्छितो.

दुर्वास म्हणाले, कृष्ण माझ्या गुरूचेही गुरु आहेत. मी त्यांचा गुरु नाही. आता मला भोजनाची कांही आवश्यकता नाही. तुमचा संयम, सदाचार, धर्मपालन, कृष्णभक्ति, कृष्णप्रेम पाहून माझी भोजनाशिवायच तृप्ति झालेली आहे. मी संतुष्ट झालो आहे. दुर्वासांनी आशीर्वाद दिला कीं ‘ तुमचा (पांडवांचा) विजय होईल आणि कौरवांचा नाश होईल. ’

दादा, सेवा दुर्योधनाने केली अन् आशीर्वाद तुम्हाला मिळाला!

श्री शंकराचार्य म्हणतात कीं, जीव आणि ब्रह्म एक नसते तर श्रीकृष्ण भाजीचें पान ग्रहण करतील आणि दुर्वास तृप्त होतील असे होऊ शकेल काय? जीव आणि ईश्वराचा भेद आभासमात्र आहे आणि तत्त्व तर एकच आहे.

### १८. युधिष्ठिराचे सदेह स्वर्गारोहण :

भगवंताचें स्वधामगमन आणि यदुवंशाच्या विनाशाची बातमी ऐकून युधिष्ठिराने स्वर्गारोहणाचा निश्चय केला. परीक्षिताला राजसिंहासन दिले. द्रौपदीला बरोबर घेऊन पांडवांनी स्वर्गारोहणासाठी हिमालयाकडे प्रयाण केले. केदारनाथाला त्यांनी भगवान शंकरांची पूजा केली. जीव आणि शिवाचें मिलन झालें.

त्याच्यापुढे असलेल्या निर्वाण पंथाची वाट पांडवांनी धरली. चालता चालता प्रथम द्रौपदीचें पतन झाले, कारण तशी तर ती पतिव्रता होती, पण अर्जुनाविषयी तिला अधिक प्रेम होते आणि म्हणून त्याच्यासाठी पक्षपाताचा भाव ठेवीत असे.

दुसरे पतन सहदेवाचें झाले, कारण त्याला आपल्या ज्ञानाचा अभिमान होता. तिसरे पतन नकुलाचें

झाले. कारण त्याला आपल्या रूपाचा अभिमान होता. नंतर झाले अर्जुनाचे. त्याला आपल्या बळाचा अभिमान होता.

नंतर झाले भीमाचे. त्याने धर्मराजाला विचारले, माझे पतन कां झाले? मी तर कधी कोणतेच पाप केलेले नाही!

युधिष्ठिर म्हणाले, तू खूप खात असायचास म्हणून तुझें पतन झालें.

स्वतः खात असता डोळे उघडे ठेवा, परंतु संतांना आणि देवांना भोजन देतेवेळी डोळे बंद ठेवा.

धर्मराज एकटे पुढे जाऊ लागले. धर्मराजाची परीक्षा पाहण्यासाठी यमराज कुत्र्याच्या रूपांत त्यांच्याबरोबर चालत आले होते. त्यांनी दुसरेही रूप घेतले आणि म्हणाले, मी तुम्हाला स्वर्गांत घेऊन जाईन पण तुमच्या मागोमाग जो कुत्रा येत आहे त्याला स्वर्गांत प्रवेश मिळायचा नाही. तर युधिष्ठिर म्हणाले, माझ्या बरोबर जो चालत आला आहे त्याला मी एकटा कसा सोडू? त्याला सोडून मी स्वर्गांत येऊ शकत नाही.

सात पावले बरोबर चाललेला मित्र होऊन जातो.

धर्मराज सदेह स्वर्गांत गेले. तुकाराम देखील सगळ्यांना राम राम करीत स्वर्गांत गेले होते–

'आम्ही जातो आमुच्या गावा, आमुचा राम राम घ्यावा', असे म्हणत ते स्वर्गात गेले.

मीराबाई सुद्धा सदेह स्वर्गांत गेली होती. ती द्वारकाधीशांत सदेह सामावून गेली होती– लीन झाली होती. मेवाडांत तिला फार त्रास झाला म्हणून मेवाड सोडून दिले. तिच्या जाण्यानंतर मेवाड फार दुःखी झाले. तेथे यवनांचे आक्रमण झाले. राणाजींना वाटले, मीरा जर पुन्हा मेवाडांत आली तर देश सुखी होईल. राणाजींनी ब्राह्मणांना आणि भक्तांना मीराबाईला बोलावून आणण्यासाठी पाठविले. मीराबाईंनी सांगितले कीं उद्या जर माझ्या द्वारकानाथांची अनुज्ञा मिळाली तर मी तुमच्या बरोबर येईन.

दुसऱ्या दिवशी मीराने दिव्य शृंगार केला. आज आपल्या गिरिधर गोपालाला आपल्या प्राणप्रियतमाला– श्रीकृष्णाला भेटण्यासाठी ती आतुर झाली होती. 'मी आता या संसारांत राहू इच्छित नाही. 'हे नाथ, कृपा करा' असें म्हणून तिनें गिरिधराची आळवणी केली. कीर्तनाबरोबर ती नाचूही लागली. आज तिचे शेवटचें कीर्तन होते. द्वारकानाथांनी तिला आपल्या ह्रदयाशी लावले आणि मीरा सदेह द्वारकाधीशांत विलीन होऊन गेली. कृष्णभक्तीने तिचे शरीर इतके दिव्य झालेले होते कीं ती शरीरासह कृष्णांत विलीन झाली.

आत्मा आणि परमात्म्याचें मिलन कांही आश्चर्याची गोष्ट नाही. परंतु कृष्णप्रेमाने जड शरीर देखील चैतन्यमय होऊन चैतन्यांत विलीन होऊन जाते. दिव्य पुरुष सशरीर परमेश्वरांत विलीन होत असतात. प्रयाण आणि मरण यांत भेद आहे. शेवटच्या श्वासापर्यंत नित्यकर्म करीत राहील त्याचे प्रयाण म्हटले जाईल आणि मलीन अवस्थेत हाय हाय करीत देहत्याग करील त्याचें मरण म्हटले जाईल.

पांडव प्रभूच्या धामी गेले. त्यांचें मरण उज्ज्वल झाले. कारण त्यांचे चारित्र्य श्रेष्ठ आणि शुद्ध होते. त्यांनी आपल्या सबंध आयुष्यांत धर्म केव्हांही सोडला नव्हता. धनापेक्षा धर्म श्रेष्ठ आहे. पैसा या लोकीं सुख देतो आणि कधी कधी दुःखही देतो. परंतु धर्म तर इहलोकींचें जीवन आणि परलोकसाधन दोन्ही उज्ज्वल करतो. धर्म मृत्यूनंतर देखील बरोबर येतो.

**१९. परीक्षिताचे राज्य, धर्माची चार अंगें आणि कलिप्रवेशाचें वर्णन:**

आता परीक्षित राज्य करू लागले. त्यांनी धर्माने प्रजेचे पालन केले. तीन अश्वमेध यज्ञही केले. अश्वमेध यज्ञाचे वेळीं घोड्याला मुक्ततेने भ्रमण करू देतात. वासनाच घोडा आहे. वासना कधी कोठे बांधली जात नाही. आत्मस्वरूपांत विलीन झाल्यावरच ती अंकुशित होत असते. कोणत्याही विषयांत वासना अडकली जाऊ नये याकडे लक्ष ठेवणें आवश्यक आहे.

इन्द्रिये, शरीर आणि मनांतील वासना यांचा नाश हाच त्रिविध यज्ञ आहे. हेच तीन यज्ञ आहेत. परीक्षितांनी हेच तीन यज्ञ केले. चौथा यज्ञ शिल्लक होता. बुद्धिगत वासनेचा नाश तर शुकदेवांसारख्या ब्रह्मनिष्ठ गुरूंच्या कृपेनेच होतो. म्हणून चौथा यज्ञ आतापर्यंत झाला नव्हता.

शुद्ध आचार असेल तर विचार शुद्ध होतील. जलशुद्धि आणि अन्नशुद्धि यांच्या मर्यादांचे पालन केल्याने सिद्धि मिळते. आचार शुद्ध ठेवा. स्वेच्छाचाऱ्याचें पतन होते.

परीक्षिताचा आचार अगदी शुद्ध होता अर्थात धर्मशास्त्रांत सांगितलेल्या मर्यादेत होता. म्हणून त्यांच्यात कलिपुरुषाचा प्रवेश होऊ शकला नाही. कलीनें विचार केला कीं परीक्षित कांही पाप करील तर मी त्याच्यांत प्रवेश करू शकेन. राजाच्या मनांत प्रथम प्रवेश मिळाला तर प्रजेंतही प्रवेश करू शकेन.

समाजाला सुधारणें आता अशक्य झालें आहे. पण व्यक्तिशः तर जीवन सुधारू शकते. आचार आणि विचाराने जो शुध्द असतो त्याच्या घरांत कलि येऊ शकत नाही.. ज्याच्या घरांत कृष्णकीर्तन, कृष्णसेवा नित्य होत असते त्याच्या घरांत कलि प्रवेश करू शकत नाही. आजही कांही वैष्णव-घरे अशी आहेत की त्यात कलीला प्रवेश मिळू शकलेला नाही.

मनुष्याच्या कल्याणासाठीच शास्त्रे रचली गेली आहेत. जो आचारधर्म सोडून देतो त्याचे विचार सुध्दा अशुध्द होऊन जातात. धर्म माता-पिता आहे. पत्नीची पसंती नापसंती होऊ शकते, माता-पित्यांची नाही. धर्माचे परिवर्तन होऊ शकत नाही. वर्णाश्रमधर्माच्या पालनाने आचार शुध्द होऊ शकतात.

गाईची सेवा करा. गाय खाते गवत, पण देते मात्र दूध. जर भगवंतांनी संपत्ति दिली असेल तर गाईचें पालन करा. आजकाल धनसंपत्ति मिळाल्यावर लोक कुत्रे पाळीत असतात. कुत्र्यांचा अनादर करण्याचा हेतु नाही, परंतु मर्यादेपलीकडे त्यांच्यावर अधिक प्रेम करू नका. अंगणांत आलेल्या कुत्र्याला पोळी घालणे धर्म आहे, परंतु कांही लोक त्यांना आपल्या मोटारीत घेऊन हिंडतात. अशा लोकांना आम्ही आणखी काय म्हणू शकतो? परंतु पुढल्या जन्मी स्वतः कुत्रे होण्याचीच ही तयारी आहे! जीवमात्रांत परमात्मा आहे. परंतु प्रत्येकाचें शरीर निरनिराळे आहे. म्हणून प्रत्येकाबरोबर खाणेपिणे इष्ट नाही.

एकादशीच्या दिवशी अन्न खाऊ नये. एकादशीच्या दिवशी उपवास करणें धर्म आहे. परंतु आम्ही आमच्याच शास्त्रातील वचनें मानत नाही. पण जेव्हां डॉक्टर सांगतो की विषमज्वर (टायफॉइड) आहे, एकवीस दिवस जेवूं नका, तर त्याचे ऐकतात आणि मग २१ दिवस उपवास करतात.

ज्याप्रमाणे पाप्याच्या मनांत कलि प्रवेश करतो त्याचप्रमाणे शास्त्राच्या मर्यादेचे उल्लंघन करणाऱ्याच्या घरांतही कलि शिरत असतो. जर आचारविचार शुध्द असतील तर कलि तुमच्यांत प्रवेश करू शकणार नाही. व्यवहार सुध्दा शुध्द झाला पाहिजे. सत्यपूर्ण शुध्द व्यवहार करणार नाही आणि नुसत्या पौर्णिमेच्या दिवशी सत्यनारायणाची पूजा करील तर त्यापासून काय लाभ होईल? असत्य बोलणाऱ्याची पूजा सत्यनारायण स्वीकारीत नाही.

एक दिवस एक आश्चर्यकारक घटना घडली. परीक्षित दिग्विजय करायला निघाले. फिरत फिरत ते सरस्वतीच्या किनाऱ्यावर आले. तेथे एक काळा पुरुष गाई-बैलांना झोडपत होता. बैल धर्माचे स्वरूप आहे आणि गाय पृथ्वीचें.

गाईच्या डोळ्यांतून आसवे गळत होती. धर्मस्वरूप बैल तिला तिच्या दुःखाचे कारण विचारतो. पृथ्वी सांगत आहे कीं श्रीकृष्णांनी या पृथ्वीलोकांतून आपला मुक्काम हालविला आहे. म्हणून हे जग पापमय कलियुगाच्या कुटिल दृष्टीचे शिकार झाले आहे.

धर्माच्या मर्यादेचे चांगल्या रीतीने पालन कराल तर ज्ञान आपोआपच प्रगट होईल. धर्मारूढ राहाल तर ज्ञानगंगेचे अवतरण होईल. सांबसदाशिव नंदीवर अर्थात धर्मावर आरूढ आहेत. म्हणून त्यांच्या डोक्यावर ज्ञानगंगा आहे.

धर्माची चार अंगे मुख्य आहेतः (१) सत्य (२) तप (३) पवित्रता आणि (४) दया. या चारींचे सामूहिक एकीकरण म्हणजेच धर्म. या अंगांवर जेव्हां धर्म आधारलेला होता तेव्हां सत्ययुग होते. तीन अंगांवर आधारित झाला तेव्हां त्रेतायुग आले. दोनच अंगांवर राहिला तेव्हा द्वापारयुग आले आणि आता एकावरच आधारित राहिला तेव्हांपासून कलियुग आले.

**सत्य:** सत्य म्हणजेच परमात्मा! सत्य आणि परमात्मा भिन्न नाहीत. जेथे सत्य असते तेथेच परमात्मा असतो. जो असत्य बोलतो त्याच्या पुण्याचा क्षय होतो. सत्याच्या साहाय्याने नर नारायणापाशी जाऊ शकतो. जो हितभाषी आणि मितभाषी असतो तो सत्यवादी होऊ शकतो.

**तप:** तप करा. प्रत्येक प्रकारच्या सुखाचा उपभोग घेऊ नका. थोडी तपश्चर्या रोज करा. जो प्रत्येक प्रकारच्या लौकिक सुखाचा उपभोग घेतो त्याच्यावर परमात्मा कृपादृष्टि करीत नाही. दुःख सहन करून परमेश्वराची आराधना करणे म्हणजेच तप होय. दुःख सहन करीत करीत प्रभूचे भजन करील तोच श्रेष्ठ होय. जीभ जे काही मागेल ते सर्व तिला देत राहू नका. काही सहन करायलाही शिका. इंद्रियांचा मालक आत्मा आहे. इंद्रिय जे काही मागेल ते त्याला दिल्याने आत्मा त्याचा गुलाम होईल. विधिपूर्वक उपवास केल्याने पाप भस्मीभूत होत असते. देवासाठी कष्ट सहन करणे, दुःख सहन करणे ह्यालाच तप म्हणतात. वाणी आणि वर्तन यांत संयम आणि तप झालेच पाहिजे.

**पवित्रता:** कलियुगात पवित्रता राहिलीच कोठे? बाहेरून सगळे पवित्र दिसतात. पण अंतर्यामीं सगळे मलीन झालेले आहेत. कपड्यांचा डाग काढला जाऊ शकतो, पण हृदयांतील डाग केव्हांच काढता येत नाही. तसे पाहिले तर जीवात्मा सर्व काही येथेच सोडून जातो, पण मन मात्र आपल्याबरोबरच घेऊन जातो. पूर्वजन्मीचे शरीर राहात नाही, मात्र मनच राहात असते.

लोक कपडे, अन्न, आचार इत्यादींची फार काळजी घेतात, पण मृत्यूनंतर देखील जे आपल्याबरोबर येणार आहे त्या मनाची काहीच काळजी घेत नाहीत. मृत्यूनंतर जे आपल्याबरोबर येणार आहे त्याची काळजी करा, त्याची देखरेख ठेवा. ज्याप्रमाणे कपडे स्वच्छ ठेवता त्याचप्रमाणे मनालाही स्वच्छ ठेवा. ज्याप्रमाणे संसार-व्यवहार करणारी आई आपल्या मुलांकडे लक्ष ठेवते त्याचप्रमाणे व्यावहारिक कर्म करताना सुद्धा ईश्वराशी अनुसंधान राहू द्या. नेहमी विचार करून मनाला सांभाळत रहा आणि पहा की ते बिघडत तर नाही ना.

**दया:** दया धर्माचे चौथे अंग आहे. श्रुति म्हणते की जो केवळ आपल्यासाठीच अन्न शिजवितो तो अन्न खात नसून पाप खात असतो.

धर्माच्या या चार चरणांमध्ये सत्य सर्वश्रेष्ठ आहे- सर्वोपरि आहे.

महाभारतात सत्यदेवाची कथा आहे.

लक्ष्मी चंचल आहे. कोणत्या ना कोणत्या पिढीच्या हातून ती निघून जाईल.

एक दिवस सत्यदेव प्रातःकाळी उठले तेव्हा त्यांनी एका सुंदरीला बाहेर जाताना पाहिले. राजाला आश्चर्य वाटले. त्याने त्या स्त्रीला विचारले, तू कोण आहेस? तिने उत्तर दिले की माझे नाव लक्ष्मी आहे आणि मी आता या घरातून जात आहे. राजाने तिला अनुज्ञा दिली.

काही वेळाने एक सुंदर पुरुष घराच्या बाहेर पडला. राजाने जेव्हां विचारले की तू कोण आहेस, तर त्याने सांगितले की मी दान आहे. जर लक्ष्मी येथून निघून गेली तर आता तुम्ही दान कसे करू शकाल? म्हणून मीही लक्ष्मीबरोबर जात आहे. राजाने त्यालाही जाऊ दिले. पुनः एक तिसरा पुरुष बाहेर जाऊ लागला. तो म्हणाला कीं मी सदाचार आहे. जर लक्ष्मी आणि दान राहिले नाही तर मी राहून काय करू? राजाने त्यालाही जाण्याची अनुमति दिली. पुनः आणखी एक सुंदर पुरुष बाहेर जाताना दिसला. त्याला विचारल्यावर त्याने आपण यश असल्याचे सांगितले. तो म्हणाला, जिथे लक्ष्मी, दान आणि सदाचार नाहीत तिथे मी राहू शकत नाही. राजाने त्यालाही जाऊ दिले.

काही वेळाने एक आणखी सुंदर तरुण घरातून निघून जाऊ लागला. त्याला विचारल्यावर त्याने आपण 'सत्य' असल्याचा परिचय दिला. "जर तुमच्या येथे लक्ष्मी, दान ,सदाचार आणि यश राहिले नाही तर मी एकटाच इथे कसा राहू? मी पण त्यांचेबरोबर जाईन."

तेंव्हा सत्यदेव राजा म्हणाला, "मी तर तुला कधीच सोडले नाही, तेव्हा तू मला का सोडून जात आहेस? तुला माझ्याजवळ ठेवण्यासाठीच तर मी लक्ष्मी, यश इत्यादींचा त्याग केला आहे. मी तुला जाऊ देणार नाही. तू निघून जाशील तर माझे सर्वस्व लुटले जाईल. राजाच्या या प्रकारच्या प्रार्थनेमुळे सत्य गेले नाही. आणि म्हणून लक्ष्मी, दान, सदाचार आणि यश हे चौघेही राजाच्या घरी परत आले.

जेथे सत्य असेल तेथे लक्ष्मी, दान, सदाचार आणि यश यांना यावेच लागते. सत्यविना हे सर्व व्यर्थ आहेत. अशा रीतीने हे स्पष्टच झाले की सत्य हेच सर्वस्व आहे. बाकीचे चार निघून गेले तरी काळजीचे काही कारण नाही, परंतु सत्य जाऊ नये. सत्य राहील तर सर्व काही राहील.

सूत वर्णन करून सांगतात– या अध्यायांत धर्माची व्याख्या केली गेली आहे. सत्य, तप, पवित्रता आणि दान ही चारच धर्माची प्रधान अंगे होत. या चारींचा समन्वयच धर्म आहे. या चारी तत्त्वांनी जो परिपूर्ण असतो तोच धार्मिक होय.

सत्ययुगात ही चार तत्त्वे विद्यमान होती. नंतर त्रेतायुगांत सत्य निघून गेले. द्वापारांत सत्य आणि तप राहिले नाही. आणि कलियुगांत सत्य आणि तपाबरोबर पवित्रता देखील निघून गेली. कलियुगात फक्त दानच शिल्लक राहिले आहे. कलियुगांत दानच प्रधान आहे– "**दानं एकं कलियुगे**" कलियुगात फक्त दान आणि दया यांच्याच आधारे धर्म टिकला आहे.

परीक्षित राजाने पाहिले की, एक बैल केवळ एकाच पायावर उभा आहे आणि एक व्यक्ति त्याला काठीने मारीत आहे. राजाने बैलाला विचारले, "तुझे तीन पाय कोणी कापले?" धर्मरूपी बैल म्हणाला, 'राजन्, माझे पाय कोणी कापले आणि मला कोण दुःख देत आहे, हे मी अजून निश्चित करू शकलो नाही. कोणी म्हणतात की काळ दुःख देत आहे, तर कोणी म्हणतात कर्मच मनुष्याला दुःख देत असते. कोणी दुःखाचे कारण स्वभाव सांगतात.

आपला स्वभाव शांत ठेवा. काळ, कर्म आणि स्वभावच जीवाला दुःख देत असतात.

"राजन्, माझ्या दुःखाच्या कारणाचा आपणच विचार करा." राजा समजला की, कठोर पुरुष जो गाई-बैलाला त्रास देत आहे तो 'कलि'च आहे. हा 'कलि'च धर्मनिष्ठांना सतावीत असतो. राजा कलीला दंड द्यायला तयार झाला तर कलि राजाला शरण आला. कलीने परीक्षिताच्या चरणांना स्पर्श केला आणि याच कारणाने परीक्षित राजाची मति भ्रष्ट झाली.

ज्या माणसाचा स्वभाव आणि चारित्र्य आपल्याला माहीत नाही त्याचा आपल्याला कधी स्पर्श होऊ देऊ नये. ज्या व्यक्तीला तुम्हीं स्पर्श कराल तिचे काही ना काही परमाणू तुमच्या शरीरांत प्रविष्ट होतीलच. पुण्यशील माणसाचे परमाणू पवित्र असतात आणि पापी माणसाचे परमाणू अपवित्र असतात. जशा व्यक्तीला स्पर्श कराल तशाच व्यक्तीचे परमाणू तुमच्या शरीरांत शिरतील.

परीक्षिताने कलीला स्पर्श करू दिला तर त्याच्या बुध्दीत विकार आला. राजाला माहीत होते की हा कलि आहे– अपवित्र आहे म्हणून त्याला दंड दिला पाहिजे. दुष्टांना दंड देणे राजाचा धर्म आहे. तरी पण त्याने कलीवर दया केली. त्याने कलीला सांगितले की तुला मारणार नाही, पण तू माझ्या राज्याच्या सीमेच्या बाहेर चालता हो. माझ्या राज्यांत तुझ्याकरता कुठेच स्थान नाही.

कलीने राजाला प्रार्थना करून विचारले, "मी आता कोठे जाऊ शकतो?" परीक्षिताने त्याला चार स्थानी राहण्याची अनुमति दिली. ती स्थाने द्यूत, मदिरा, नारीसंग आणि हिंसा ही होत. या स्थानांत अनुक्रमे असत्य, मद, आसक्ति आणि निर्दयता हे चार अधर्म राहतात.

जुगार आणि सट्टा यांचा पैसा ज्या घरात येतो त्याबरोबर तेथे कलि देखील येतो. जेथे सट्टा तेथे बट्टा [ डाग ] आणि हा बट्टा आयुष्याला सदाचाच लागतो.

काही लोक असेही आहेत की जे जुगार आणि सट्टयात कमवितात आणि मग त्या पैशाचे दान करतात. ते समजतात की चला, आपण दान केले आहे आणि आता आपली शुध्दि झालेली आहे. परंतु हे सगळे व्यर्थच असते. हे सगळे अनीतीचे धन आहे. अशा धनाच्या दानाने केव्हाही जीवन शुध्द होत नाही. अधर्माचा पैसा प्रभूला स्वीकार्यच नाही.

शास्त्रनिषिध्द भोज्य वस्तू जिथे खाल्ल्या जातात, जेथे जाणूनबुजून हिंसा केली जाते तेथे कलि अवश्य असतो.

ही चार स्थाने मिळाल्यावरही कलीला संतोष झाला नाही. तो राजाला म्हणाला, ही चार स्थाने तर घाणेरडी आहेत. एखादे चांगलेसे स्थान मला राहायला मिळाले तर बरे होईल. परीक्षिताने त्याला सोन्यांत राहायची परवानगी दिली.

अशुध्द साधनांनी जेव्हां घरांत सोने येते तेव्हां त्याबरोबर कली देखील येऊन थडकतो. अनीति आणि अन्यायाने प्राप्त झालेल्या धनांत कलि असतो. अनीतीने धन प्राप्त करणाऱ्याला तर कलि दुःखी करतोच, पण जो हे धन आपल्या वारसासाठी ठेवतो तो वारस देखील दुःखी होतो.

असत्य, मद, काळ (हिंसा), वैर आणि रजोगुण हे पाच जिथे नसतात तिथे आज देखील सत्ययुगच आहे. ज्याच्या घरी नित्य प्रभूची सेवा आणि स्मरण होत असते, ज्याच्या घरांत आचारविचारांचे पालन होत असते त्याच्या घरांत केव्हांही कलि प्रवेश करीत नाही.

बैलाचे तीन पाय परीक्षिताने पुन्हा लावून दिले अर्थात धर्माची पुन्हा स्थापना केली.

कलीने विचार केला, राजाने पाच स्थाने राहायला दिली आहेत. आता काही अडचण नाही. आता परीक्षित राजाच्या घरांतही केव्हांतरी शिरेन.

एक दिवस परीक्षिताला जिज्ञासा झाली की बघू तर खरं, माझ्यासाठी माझ्या आजोबांनी घरांत

काय काय ठेवले आहे ते. एका पेटीत सोन्याचा मुकुट मिळाला. काही विचार न करता राजाने तो डोक्यावर ठेवला. तो मुकुट तर जरासंधाचा होता. जरासंधाच्या मुलाने सहदेवाकडे तो मागितला होता – 'माझ्या पित्याचा मुकुट मला देऊन टाक.' मुकुट परत करण्याची सहदेवाची इच्छा नव्हती. शिवाय भीमाने हा मुकुट बळेबळेच (जबरदस्तीनेच) आणला होता. म्हणून ते धन अनीतीचे होते. अनीतीचे धन, कमवणाऱ्याला आणि त्याच्या वारसांना दोघांनाही दुःखी करीत असते. यासाठीच त्या मुकुटाला पेटीत बंद करून ठेवले होते. आज तो परीक्षिताने पाहिला आणि डोक्यावर घातला. तो मुकुट अधर्माने आणला गेला होता म्हणून त्याच्या माध्यमाने कलीने परीक्षिताच्या बुध्दींत प्रवेश केला.

एकदा हा मुकुट घालून परीक्षित राजा वनात शिकार करायला गेला. येथे 'एकदा' शब्दाचा प्रयोग केला गेला आहे. तसे तर राजा शिकारीला जातच नसे, परंतु आज गेला. अनेक जीवांची हत्या केली. माध्यान्हीच्या वेळी भुकेने आणि तहानेने त्याचा जीव कासावीत झाला.

त्याने एका ऋषीच्या आश्रमांत प्रवेश केला. शमीक ऋषि समाधीत मग्न होते.

कोणी संत जप-ध्यानांस बसले असतील तेथे जाऊ नये. जर जावेच लागले तर नमस्कार करून परतावे. त्यावेळी कोणतीही लौकिक गोष्ट काढू नका. प्रभूशी एकरूप होण्याची संतांची इच्छा असते. लौकिक गोष्टी त्यांच्या तप-ध्यान-भजनांत बाधा करतात.

परीक्षिताला वाटले मी या देशाचा राजा असून सुध्दा ऋषि माझे स्वागत कां करीत नाहीत? कदाचित स्वागत न करण्याचे ते नाटकच करीत असतील. राजाच्या बुध्दीत कलीने प्रवेश केला होता, म्हणून शमीक ऋषींची सेवा करण्याऐवजी राजा ऋषीकडूनच सेवेची अपेक्षा करीत होता. त्याला दुर्बुध्दीने घेरले. त्याने एक मेलेला साप शमीक ऋषींच्या गळ्यांत घातला. अशा रीतीने त्याने तपस्व्याचा अपमान केला.

दुसऱ्याचा अपमान करणारा स्वतःचाच अपमान करून घेत असतो. दुसऱ्यांचा छळ करणारा वस्तुतः स्वतःचाच छळ करून घेत असतो. कारण सगळ्यांमधे आत्मा तर एकच आहे.

राजाने शमीक ऋषीच्या गळ्यांत तर मेलेला साप घातला. पण असे करण्याने जणू त्याने आपल्याच गळ्यांत जिवंत साप घालून घेतला होता.

साप साक्षात काळाचे रूप आहे. सगळ्या इंद्रियवृत्तींना अंतर्मुख करून प्रभूचे ठिकाणी स्थिर झालेला जीव म्हणजे शमीक ऋषि. अशा ज्ञानी जीवाच्या गळ्यात साप घालण्याचा अर्थ होतो काळाला मारणे. जितेंद्रिय योग्याचा काळ स्वतःच मरून जातो. अर्थात काळ त्याला प्रभावित करू शकत नाही. राजा म्हणजे रजोगुणांत फसलेला भोगप्रधान जीव. अशांच्या गळ्यांत साप लटकत असतो अर्थात जिवंत सर्प त्याच्या गळ्यांत असतो.

शमीक ऋषींचा मुलगा शृंगी याला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां तो क्रोधाने भडकून जाऊन म्हणाला, 'ऋषीचा अपमान करणारा हा राजा आपल्या मनांत काय समजून आहे?' त्याने विचार केला की, ब्रह्मतेज अजूनही जगांत विद्यमान आहे. मी राजाला शाप देईन. शृंगीने राजाला शाप दिला की, 'तू माझ्या बापाच्या गळ्यांत मेलेला साप टाकलास, परंतु आजपासून सातव्या दिवशी तुला तक्षक नाग डसेल'.

**२०. परीक्षिताचा पश्चात्ताप, त्याचा गृहत्याग आणि गंगाकाठी शुकदेवांकडून भागवतश्रवण :**

परीक्षिताने आपल्या डोक्यावरून मुकुट काढला अन् त्याला आपली फार मोठी चूक लक्षांत

आली. मी आज पाप केले. मी मतिभ्रष्ट होऊन ऋषीचा अपमान केला आहे.

जेव्हां मति भ्रष्ट होईल तेव्हां समजा की काहीतरी अशुभ अवश्य होणार आहे. पाप झाले तर त्याचा विचार करून आपल्या शरीराला शिक्षा द्या. जेवायच्या पूर्वी विचार करा कीं आपल्या हातून काही पाप तर झाले नाही ना? ज्या दिवशी पाप झाले असेल त्या दिवशी उपवास करा. मग पुन्हा कधी पाप होणार नाही.

धन्य आहे परीक्षित राजा! त्याने आयुष्यांत एकच वेळ पाप केले होते. पण पाप घडल्यानंतर तो पाणी देखील प्यायला नाही. ऋषिकुमाराने दिलेला शाप ऐकून त्याने विचार केला की, बरेच झाले, मला माझ्या पापाची शिक्षा मिळाली.

परीक्षिताने विचार केला की बरेच झाले, 'मी सांसारिक विषयांमधे फसून गेलो होतो म्हणून मला सावध करण्यासाठीच प्रभूंनी माझ्यावर ही कृपा केली आहे. मला जर शाप मिळाला नसता तर काय मी वैराग्य धारण केले असते? माझ्यासाठी प्रभूंनी शापावतार धारण केला आहे.

मरण डोक्यावर घिरट्या घालीत आहे असे वाटत राहील तर पाप होणार नाही.

परीक्षितांनी गृहत्याग केला आणि ते गंगातटाकी आले. त्यानी गंगास्नान केले आणि अन्न-जलाचा त्याग करून प्रायश्चित्त घेईन असा निश्चय केला. मोठ-मोठ्या ऋषींना हे समजले तर ते न बोलावताच राजाला भेटायला आले. त्यांनी विचार केला की, आता परीक्षित 'राजा' नसून 'राजऋषि' झालेले आहेत. राजाच्या विलासी जीवनाचा आता अंत झाला आहे. राजाचे जीवन आता बदलून गेले आहे. आणि यासाठी ते परीक्षिताला भेटायला आले. परीक्षितांनी उभे राहून सर्वांना नमस्कार करून त्यांची पूजा केली.

राजांनी आपल्या पापाविषयींची घटना त्यांना सांगितली. तसे तर सर्व लोक पाप लपवीत असतात आणि आपल्या पुण्याच्या गोष्टी सगळ्यांसमोर प्रगट करीत असतात. पाप लपवू नका आणि पुण्य प्रगट करू नका. समाजासमोर पाप प्रगट केल्याने पाप करण्याची सवय सुटून जाते.

परीक्षित म्हणाले,' मी पवित्र संतांच्या गळ्यांत मेलेला साप घातला. मी अधम आहे. मी ऐकले आहे की पाप्याला यमदूत मारण्यासाठी घेऊन जातात. जेणेकरून माझे मरण सुधारेल असा काही उपाय सांगा. मला भीती वाटते. मरण्याच्या दृष्टीने मी अजून काही तयारी केलेली नाही.

परीक्षितांनी मृत्यूच्या वेदनांचा विचार केला. जन्ममरणाच्या दुःखाच्या विचारांनी पाप सुटेल. ते ऋषींना म्हणाले," आपण असे काही करा की जेणेकरून मला सात दिवसांत मुक्ति मिळेल." आसन्नमृत्यूची कर्तव्ये इत्यादी मला सांगा. वेळ फार राहिलेला नाही. ज्ञानाच्या लांबलचक गोष्टी सांगत राहाल तर वेळ निघून जाईल. मला अशा गोष्टी सांगा आणि असा मार्ग दाखवा की ज्यायोगे मी परमात्म्याचे चरणी लीन होईन. मला अशी कथा सांगा की जी ऐकून मी मुक्त होईन.

ऋषिगण विचार करू लागले, आम्ही कित्येक वर्षांपासून तपश्चर्या करीत आहोत. तरी पण मुक्ति मिळेल की नाही याची चिंता लागलेली असते. आम्ही सुध्दा मृत्यूला भितो. अंतकाळी देवाचे नाव ओठावर येणे कठीण आहे. मात्र सातच दिवसांत राजाला मुक्ति कशी मिळेल? हे तर अशक्यच आहे! यामुळे सगळे ऋषि गप्प राहिले.

सात दिवसांत मुक्ति मिळणे असंभवच आहे. मृत्यूच्या जवळचा वेळ फारच नाजुक असतो. महाज्ञान्यांना देखील मरणाचे भय असते. रामाचे नाव ओठावर लवकर येत नाही.

एकही ऋषि राजाला उपदेश द्यायला तयार झाला नाही. कोणातही बोलण्याची हिम्मत नव्हती.

परीक्षिताला विचार पडला, समर्थ असूनही हे ऋषि मला उपदेश कां देत नाहीत ?

त्याने विचार केला, जगातले जीव भलेही माझा त्याग करोत, मी भगवंताचा आसरा घेईन. भगवान नारायण कृपा करतील. आता वेळ फार नाही. मी कोणाला शरण जाऊ ? मी आपला परमात्म्यालाच शरण जातो. तो तर माझी उपेक्षा करणार नाही. मी पापी तर आहे, पण पांडववंशी आहे. आता ईश्वराशिवाय माझा कोणी नाही.

परीक्षितांनी ईश्वराचा आसरा घेतला. भगवंताची स्तुति केली. द्वारकानाथांचे स्मरण केले. मी काही सत्कर्म केलेले नाही. हे ब्राह्मण मला उपदेश देत नाहीत, कारण मी अधम आहे. ज्या परमात्म्याने आईच्या गर्भात असताना माझे ब्रह्मास्त्रापासून रक्षण केले, तो आजदेखील माझे रक्षण अवश्य करील. मी पापी तर आहे, पण भगवंताचा आहे. नाथ! मी आपला आहे.

"हे द्वारकानाथ! मी आपल्याला शरण आलो आहे. तुम्ही तर माझा जन्म उज्ज्वल केला आहे! आता माझे मरणही उज्ज्वल करा."

परमात्म्याने शुकदेवांना प्रेरणा दिली की तेथे जा, शिष्य योग्य आहे. परीक्षिताचा जन्म सुखरूप व्हावा म्हणून द्वारकानाथ स्वतः आले होते. परंतु मुक्ति देण्याचा अधिकार फक्त शंकरांचाच आहे. याकरता भगवंतांनी महादेवांना सांगितले म्हणून भगवान शिवाचे अवतार शुकदेव तेथे आले. संहाराचे कार्य शिवाचे आहे म्हणून परीक्षिताचे मरण उज्ज्वल करण्यासाठी शुकदेव आले.

शुकदेव दिगंबर आहेत. वासनेचे वस्त्र सुटून गेले होते. सोळा वर्षांची अवस्था आहे. कमरेवर न तर मेखला आहे न लंगोटी. आजानुबाहू आहेत. वक्षःस्थल विशाल आहे. दृष्टी नाकाच्या अग्रभागावर स्थिर आहे. चेहऱ्यावर केस विखुरलेले आहेत. कृष्णासारखा श्याम रंग आहे आणि तेजस्वी देखील.

शुकदेवांवर मुले धूळ उडवीत आहेत. नागाबाबा चला, नागाबाबा चला, असें म्हणत आहेत. पण शुकदेवांना याची जाणीवच नाही. वृत्ति ब्रह्माकार झालेली आहे. ब्रह्मचिंतन करता करता देहाचे भान राहिलेले नाही.

परमेश्वराच्या ध्यानांत जो देहभान विसरून जातो त्याच्या देहाची काळजी परमेश्वर स्वतःच करतो. देव विचार करतात, याला देहाची आवश्यकता नाही, पण मला तर आहे.

चारी बाजूला प्रकाश पडला. कुठे सूर्यनारायण तर पृथ्वीवर उतरले नाहीत ना ? असे तेथे जमलेल्या सर्वांना वाटलें. मुनि समजले की हे तर शंकराचे अवतार शुकदेव आले आहेत. सभेत शुकदेव आले. व्यास सुध्दा त्याच सभेत होते. त्यांनी उठून शुकदेवांना नमस्कार केला.

शुकदेवांचे नाव ऐकूनच व्यास भावविभोर झाले.

शुकदेवांसाठी प्रयुक्त विशेषणे तर पहा: "**अनपेक्षः, निजलाभतुष्टी, अवधूतवेषः**'

व्यासांच्या मनात आले– 'भागवताचे रहस्य शुकदेव जाणतो, ते मी जाणत नाही' कसा निर्विकार आहे! माझा मुलगा भागवत सांगेल आणि मी ऐकेन.

राजाच्या कल्याणासाठी आलेले शुकदेव सुवर्णसिंहासनावर बसले. परीक्षिताने डोळे उघडले. माझा उध्दार करण्यासाठी प्रभूंनी यांना पाठविले आहे. नाही तर माझ्यासारख्या पापी आणि विलासी माणसासाठी हे येथे आले नसते.

परीक्षिताने शुकदेवांचे चरणी साष्टांग नमस्कार घातला. परीक्षिताने आपले पाप त्यांना प्रगट करून सांगितले. मी अधम आहे. माझा उध्दार करा. आसन्नमरणाला काय केले पाहिजे, मनुष्यमात्राचे कर्तव्य काय आहे ? त्याने कोणते श्रवण, जप, स्मरण आणि भजन केले पाहिजे ?

गुरुदेव-शुकदेवांचे ह्रदय विरघळले. शिष्य सुयोग्य आहे.

अधिकारी शिष्य मिळाल्यावर गुरूचे ह्रदय म्हणू लागते कीं त्याला आपले सर्वस्व देऊन टाकावे. गुरु ब्रह्मनिष्ठ असेल, निष्कामही असेल आणि शिष्य प्रभुदर्शनासाठी आतुर असेल तर सात दिवसांत काय, सात मिनिटांत प्रभुदर्शन होऊ शकेल. पण गुरु लोभी असेल आणि शिष्य लौकिक सुखाची इच्छा करील तर दोघेही नरकवासी होतील.

शुकदेव म्हणतात, 'राजन् तू घाबरतोस कशाला? अजून सात दिवस शिल्लक आहेत. मी तुझ्यापासून काही घ्यायला आलो नाही, तर तुला द्यायला आलो आहे. मी निरपेक्ष आहे. मला जो आनंद मिळाला आहे आणि परमात्म्याचे दर्शन झाले आहे तेच दर्शन तुला व्हावे म्हणून आलो आहे. माझे वडील भूक लागल्यावर एकच वेळ बोरे खात असत. परंतु या कृष्णकथेत इतका भजनानंद मिळतो की मला बोरांची सुध्दा आठवण होत नाही. माझे वडील कपडे घालीत असत. प्रभु-चिंतन करता करता माझे वस्त्र केव्हां आणि कुठे गळून पडले हेही मला ठाऊक नाही, सात दिवसांत तुला कृष्णदर्शन घडवीन. मी बादरायण आहे. कृष्णानंदात मस्त झाल्यावर बोरं खाणे कुठे राहील?

भगवान बादरायणि शुकदेवांचे संपूर्ण वर्णन 'वैराग्य' या एकाच शब्दाने होऊ शकते. बादरायणीच्या जागी शुक शब्दाचा प्रयोग चालला असता का? भागवतांत एकाही शब्दाचा प्रयोग निरर्थक नाही. शुकदेवांचे वैराग्य दाखविण्यासाठीच याचा प्रयोग केला आहे. शुकदेव बादरायण व्यासांचे पुत्र आहेत. व्यासांचे तप आणि वैराग्य कसे होते? व्यास सबंध दिवसभर जपतप करीत असत आणि भूक लागल्यावर सगळ्या दिवसभरांत फक्त एकवेळ बोरे खात असत. अशा बादरायणाचे शुकदेव पुत्र आहेत. ज्याचेपाशी खूप ज्ञान आणि वैराग्य असेल तो दुसऱ्याला सुधारू शकतो. शुकदेवांपाशी ही दोन्हीही – ज्ञान आणि वैराग्य पूर्णपणे होती.

आमच्या सुधारकांमधे त्याग आणि संयम दिसूनच येत नाही ते दुसऱ्यांना कसे सुधारतील? मनुष्याने प्रथम आपल्या स्वतःलाच सुधारण्याचा प्रयत्न करावा.

राजन्, जो वेळ निघून गेला आहे त्याचे स्मरण करू नकोस. भविष्याचाही विचार करू नकोस. फक्त वर्तमानाला सुधार. सात दिवस बाकी राहिले आहेत. माझ्या नारायणाचे स्मरण कर, तुझे जीवन अवश्य उज्ज्वल होऊन जाईल.

लौकिक रस भोगणाऱ्याला प्रेमरस मिळत नाही, भक्तिरसही मिळत नाही. ज्याने कामाचा त्याग केला आहे तोच रसिक आहे. जगतांतील रस कटु आहेत. प्रेमरसच मधुर आहे. जो इन्द्रियांच्या आधीन होतो त्याला काळ धरतो.

भागवताचा वक्ता शुकदेवांसारखाच असावयास पाहिजे.

**हरे राम हरे राम, राम राम हरे हरे।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥**

**॥ प्रथम स्कंध समाप्त॥**



॥ श्रीहरिः ॥

# ॥ द्वितीय स्कंध ॥

श्रीकृष्णाय नमः॥

**१. अधिकारी शिष्याला सद्गुरू अवश्य भेटतातः**

'सत्' हे परमेश्वराचे नाव आहे. सर्वांमध्ये जो ईश्वराचे दर्शन करील तो सद्गुरु होय. अधिकारी शिष्याला सद्गुरु अवश्य भेटतात.

प्रथमस्कंधांत अधिकारलीलेचे वर्णन केले होते. परीक्षित अधिकारी होते. त्यांना शुकदेवांसारखे सद्गुरु भेटले. परीक्षितांमध्ये पाच प्रकारच्या शुद्धि होत्याः मातृशुद्धि, पितृशुद्धि, द्रव्यशुद्धि, अन्नशुद्धि आणि आत्मशुद्धि.

सत्‌शिष्यालाच गुरुकृपेचा लाभ होतो आणि ईश्वरदर्शन होते. सद्गुरुतत्त्व आणि ईश्वरतत्त्व एकच आहेत. ईश्वर ज्याप्रमाणे व्यापक आहे त्याचप्रमाणे सद्गुरुदेखील व्यापक आहेत. ज्याचा कोठेच अभाव नसेल तोच व्यापक असतो. परमात्मारूपी सनातन सद्गुरु देखील व्यापक आहे. व्यापकाला शोधण्याची गरज नाही, परंतु ओळखायची गरज आहे. परमात्म्याप्रमाणे सद्गुरु पण व्यापक आहे. परंतु तो अधिकारी व्यक्तीलाच मिळत असतो.

स्वतः संत झाल्याशिवाय संतांना ओळखता येत नाही. तुम्हांला संत दिसत नाहीत. कारण तुम्ही संत नाही. जो संत होईल त्याला संत भेटेल. संत होण्यासाठी आचरण व व्यवहार अत्यंत शुद्ध करावे लागतात. जोपर्यंत मूठभर फुटाण्यांचीही गरज आहे तोपर्यंत व्यवहार सुटत नाही. जो प्रत्येक व्यवहार भक्तिमय करील तोच खरा वैष्णव होय.

संत होण्यासाठी मनाला पवित्र, स्वच्छ करण्याची आवश्यकता आहे. मनाला बदलण्याची आवश्यकता आहे. जो आपल्या हृदयाचे परिवर्तन करू शकतो तो संत होतो. मन शुद्ध झाले म्हणजे संतांची भेट होते. संताला भेटण्यासाठी संतच येतो. भोग्याला संत भेटत नाहीत.

गुरुदेव प्रत्यक्ष ब्रह्मदेव असतात. गुरुदेव नवा जन्म देत असतात. नवा जन्म देण्याचा अर्थ हा की, ते मनाला आणि स्वभावाला सुधारतात (शुद्ध करतात). गुरुदेव विष्णू आहेत, कारण ते शिष्याचे रक्षण करतात. गुरुदेव शिष्याला मोक्ष सुद्धा देतात. यामुळेच ते शंकारांचेही स्वरूप आहेत. गुरु केल्यावाचून राहू नका. तुम्ही लायक असाल तर भगवंताच्या कृपेने सद्गुरु भेटतीलच.

तुकारामांनी आपल्या अनुभवाचे वर्णन केले आहे. ते म्हणतात — कथाकीर्तन ऐकता ऐकता प्रभुनामाशी माझे प्रेम जडले. मी देखील 'विठ्ठल विठ्ठल' असा सतत जप करू लागलो. प्रभूंना माझी दया आली. मला स्वप्नांत माझे सद्गुरु भेटले, माझे सद्गुरु मला मार्गांत भेटले, मी गंगास्नान करून येत होतो तर ते वाटेत भेटले. त्यांनी मला सांगितले की विठ्ठलनाथांच्या प्रेरणेने मी तुला उपदेश द्यायला आलो

आहे. मी गुरुदेवांना सांगितले की मी तर भगवंताची काहीच सेवा केलेली नाही. तरी पण गुरुदेवांनी माझ्यावर कृपा केली आणि 'रामकृष्ण हरि'चा मंत्र दिला.

गुरुदक्षिणेत त्यांनी पावशेर तूप मागितले. तुकारामाच्या गुरूंना पावशेर तूपही मिळत नव्हते काय? परंतु तुकारामाची वाणी गूढार्थाने भरलेली आहे. तुपाचा अर्थ आहे 'तू पण आणि मी पण.' अर्थात अहम् तू मला देऊन टाक. आजपासून तू 'तू' पुरुष आहेस हे विसरून जा. तू आपले पुरुषत्व विसरून जा. माझ्या गुरुदेवांनी 'तू पण' आणि 'मी पण' माझ्यापासून मागून घेतले. मला आज्ञा दिली की तू आपला अभिमान मला देऊन टाक. आजपासून 'अहम्' सोडून दे. तू पुरुषही नाहीस आणि स्त्रीही नाहीस. तू कोणाचा पुत्र पण नाहीस. देहाविषयी सगळे भाव तू मला अर्पण कर. तू शुद्ध आहेस, ब्रह्म आहेस, ईश्वराचा अंश आहेस.

जीवाचा ईश्वराशी संबंध जोडून दिला, सिद्ध करून दिला.

ज्याची प्रत्येक क्रिया ज्ञानमय असेल तो उत्तम गुरु होय. ज्ञानी भक्तांची प्रत्येक क्रिया ज्ञान आणि बोधरूप होत असते. संतांचे सर्व कांही अलौकिक असते.

शुकदेव केवळ ब्रह्मज्ञानीच नव्हते, तर त्यांची पाहण्याची दृष्टी देखील ब्रह्मदृष्टी होती. शुकदेव प्रत्येकाला समभावाने— ब्रह्मभावाने पाहात असत. जशी दृष्टि तशी सृष्टि. ज्याची दृष्टी ब्रह्ममय असेल त्याला जगताचा भास होत नाही. शुकदेव गुरुच नव्हे, तर सद्‌गुरु सुद्धा आहेत. शुकदेवांसारखे ब्रह्मदृष्टि संत सुलभ नसतात. जसे ब्रह्मज्ञानी—ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी करणारे सुलभ आहेत.

शुकदेवांसारखे गुरु मिळाले तर सात दिवसांतच काय, पण सात मिनिटांतही मुक्ति देऊ शकतात. परंतु शिष्य (मात्र) परीक्षितांसारखा अधिकारी असला पहिजे. गुरु आणि शिष्य दोन्हीही अधिकारी पाहिजेत.

मंत्रदीक्षेपेक्षा स्पर्शदीक्षा उत्तम आहे.

ब्रह्मभावात तल्लीन होऊन शुकदेवांनी परीक्षिताच्या डोक्यावर वरदहस्त ठेवला, आणि तात्काळ त्याला ब्रह्माचे दर्शन झाले.

प्रथमस्कंधांत अधिकाराची कथा सांगितली आहे. भागवताचा श्रोता कसा असला पाहिजे हे सांगितले आहे. वक्ता कसा असावयास पाहिजे हेही सांगितले आहे.

पुढे कथा येईल की ध्रुवांना मार्गात नारद भेटले आणि प्रचेतांना शंकर भेटले. अधिकारी शिष्याला सद्‌गुरु भेटतात. परीक्षितासाठी देखील शुकदेव आले. नाहीतर लाख आमंत्रणे दिली तरी शुकदेवांना डोळे वर करून पाहायला फुरसत नाही. कारण खरा ज्ञानी एक क्षणभर देखील भगवंताच्या दर्शनाविना राहू शकत नाही.

तीन प्रकारच्या श्रोता-वक्त्यांमध्ये व्यासांचा क्रम दुसरा आहे. कारण ते समाज सुधारण्याच्या दृष्टीने कथा करीत असत. शुकदेव दुसऱ्यांना सुधारण्याकरिता नाही, तर आपल्या अंतःकरणाला सुखी करण्याच्या वृत्तीने कथा सांगत असत.

शुकदेवांनी कथेचा आरंभ केला, पण मंगलाचरण केले नाही. कारण देहभान मुळीच नव्हते. तीन अध्याय झाल्यानंतर शुकदेवांनी मंगलाचरण केले.

भागवतांत तीन मंगलाचरणे आहेत. प्रथम व्यासांचे, दुसरे शुकदेवांचे आणि शेवटचे, किंवा तिसरे सूतांचे. यौवनांत मंगलाचरण — मंगल आचरणाची फार गरज असते. याकरताच शुकदेवांचे मंगलाचरण बारा श्लोकांचे आहे आणि इतर सर्वांची एका एका श्लोकाची आहेत.

उत्तम वक्ता कोण असतो ? जो संपूर्णतः वैराग्ययुक्त असेल तो वक्ता उत्तम असतो.

सांसारिक कोणत्याही विषयात मन जाईनासे होईल ते वैराग्य आहे. सांसारिक विषय पाहात असता देखील ज्याचे मन त्यात रमत नाही त्यानेच खरे वैराग्य सिद्ध केले आहे. वैराग्याशिवाय दृढता येत नाही. वैराग्याने ज्ञानास शोभा येते. ज्ञान, भक्ति आणि वैराग्य परिपूर्ण झाल्यावर मनुष्य ब्रह्ममय होत असतो. शुकदेवांमध्ये ज्ञान, भक्ति आणि वैराग्य परिपूर्ण होते. ज्ञात्याचे अंतःकरण कृष्णप्रेमाने द्रवले नाही तर ते ज्ञान काय कामाचे ?

**२. मृत्यू जवळ आला असता माणसाचे कर्तव्य :**

परीक्षित राजा शुकदेवांना विचारीत आहे. ज्याचा मृत्यू जवळ आला असेल त्याचे कर्तव्य काय आहे ? त्याने काय केले पाहिजे आणि काय करू नये ? मनुष्यमात्राचे कर्तव्य काय आहे ?

शुकदेव म्हणाले, 'राजन्, तू चांगला प्रश्न केला आहेस. ऐक ! अंतकाळी वात, पित्त आणि कफामुळे त्रिदोष होतो. मृत्यूची वेदना भयंकर असते. जन्म-मरणांच्या दुःखांचा विचार केला तर पाप होणार नाही म्हणून मृत्यूचे भय असावे. त्याचे स्मरण ठेवावे. विचार करावा की आपण मृत्यूच्या स्वागताची तयारी केली आहे की नाही. असे चिंतन केले म्हणजे वैराग्य येते.

जन्म, मृत्यू, जरा, व्याधींच्या दुःखांचा पुनःपुन्हा विचार केल्याने वैराग्य उत्पन्न होईल आणि पाप सुटेल. नाहीतर पापाचे संस्कार लवकर सुटत नाहीत. चिंतन, मनन केल्याशिवाय वैराग्य उत्पन्न होऊ शकत नाही. काळ डोक्यावर आहे असे समजून नेहमी ईश्वरचिंतन करावे. काळाची आठवण ठेवली तर पापवृत्तीचा उद्भव होणार नाही.

भजनासाठी अनुकूल वेळेची प्रतीक्षा करीत बसू नका. कोणताही क्षण भजनासाठी अनुकूलच असतो. काहीही अडचण (त्रास) नसल्यावर मी भजन करीन असे मानणे अज्ञान होय.

एक मनुष्य स्नानाकरिता समुद्रकिनारी गेला. परंतु स्नान करण्याऐवजी तो तिथे बसूनच राहिला. लोकांनी त्याला विचारले, असा बसून का राहिला आहेस ? स्नान केव्हा करशील ?

तो मनुष्य म्हणाला, समुद्रात एकामागोमाग एक अशा लाटा येत आहेत. या लाटा येणे बंद झाले म्हणजे मी स्नान करीन. समुद्राच्या लाटा का कधी बंद होत असतात ? लाटा केव्हा थांबतील आणि स्नान केव्हा होईल ?

संसार देखील एक समुद्रच आहे. त्यात अडचणीरूपी लाटा येतच राहतील. याकरता जर कोणी म्हणेल की अनुकूलता झाल्यावर भगवंताचे भजन करीन तर तशी सर्वप्रकारे अनुकूल अशी वेळ कधीच येणार नाही. ज्याप्रमाणे तो मनुष्य स्नान करू शकला नाही, त्याचप्रमाणे अशी माणसे ईश्वरभजन केल्याशिवायच राहतात.

आयुष्यांत कितीही अडचणी आल्या तरी परमात्म्याला भेटण्याचे, प्रभूशी एकरूप होण्याचे तुमचे लक्ष्य विसरू नका. लोभी ज्याप्रमाणे पैशावर लक्ष ठेवीत असतो त्याचप्रमाणे महापुरुष परमेश्वरावर लक्ष ठेवीत असतात.

भगवंतांनी देखील गीतेंत म्हटले आहे—

" अंतकाळी जो माझे स्मरण करीत देहत्याग करतो तो मलाच येऊन मिळतो. " अंतकाळाचा अर्थ आयुष्याचा अंतकाळ नाही, तर प्रत्येक क्षणाचा अंतकाळ. म्हणून प्रतिक्षणी ईश्वराचे चिंतन, ध्यान, स्मरण केले पाहिजे.

प्रत्येक क्षण कारणी लावाल तर मृत्यूही कारणी लागेल. प्रत्येक क्षण कारणी लावण्याचा अर्थ आहे, प्रतिक्षणी देवाला दृष्टीसमोर ठेवणे.

लोकांना वाटते की आयुष्यभर कामधंदा करू, उलट-सुलट करून पैसे मिळवू, आणि शेवटी देवाचे नाव घेऊन संसार पार करून जाऊ, असा विचार चूक आहे. याचकरिता स्पष्ट सांगितले आहे कीं, नेहमी ज्या भावाचे चिंतन कराल, त्याचेच अंतकाळी स्मरण होईल.

भगवंतांनी देखील म्हटले आहे की, "याचकरिता सगळा वेळ तू माझे निरंतर स्मरण कर."

हे तर सर्वविदीतच आहे कीं ज्या वस्तूचे सर्वदा चिंतन केले गेले असेल, त्याच वस्तूचे स्मरण मृत्यूच्या वेळी होईल.

एका सोनाराचा दृष्टान्त आहे. एक सोनार आजारी असल्यामुळे बिछान्यांत पडला होता. कित्येक दिवस तो बाजारांत जाऊ शकला नव्हता. म्हणून त्याला सोने आणि सोन्याच्या बाजारभावाचेच विचार एकसारखे येत असत. अंतकाळ आला, ज्वर वाढत चालला होता. डॉक्टरांनी येऊन ताप पाहून म्हटले की एकशेपाच डिग्री (१०५ डिग्री) ताप आहे. सोनाराला वाटले की कोणी सोन्याचा भाव सांगत आहे. तो आपल्या मुलाला म्हणाला, "विकून टाक, विकून टाक, आपण ऐंशीच्या भावाने घेतले होते. आता एकशेपाच झाला आहे तर विकून टाक" असे बोलता बोलताच तो मेला. सोनाराने सगळे आयुष्य, सोन्याच्या खरेदी-विक्रीत आणि सोन्याच्याच विचारांत घालविले होते. म्हणून अंतकाळीही त्याला सोन्याचाच विचार येत राहिला.

धनसंपत्तीची काळजी करणाऱ्याला, रुपया-पैसा मिळविणाऱ्याला, अंतकाळीही त्याचाच विचार येत असतो. धन मिळविणे काही पाप नाही, परंतु ते मिळवताना परमेश्वराला विसरणे पाप आहे.

शुकदेव म्हणाले, 'राजन्, मनुष्याचे आयुष्य अशाच रीतीने संपून जाते. झोप आणि विलासात रात्री संपून जातात आणि धनप्राप्तीच्या प्रयत्नांत आणि कुटुंबाच्या प्रतिपालनांत दिवस निघून जातात. खर्ची पडतात.

मनुष्याचा अधिकतर वेळ झोप आणि अर्थोपार्जनांत निघून जातो, त्याचा पुष्कळसा वेळ गोष्टी बोलण्यांत निघून जातो. पुष्कळांचा वेळ वाचण्यात, शिकण्यात निघून जातो. अतिवाचणे, शिकणेही चांगले नाही. अतिवाचण्याने शब्दज्ञान वाढते परंतु त्याचबरोबर अभिमानही वाढतो.

"राजन्, जो काळ निघून गेला आहे, त्याच्यासाठी आता रडत बसू नको. त्याचा विचार देखील करू नकोस, भूतकाळातील गोष्टींचाच विचार करीत बसण्यांत काहीं लाभ नाही. तू आपले वर्तमान चांगले कर. सात दिवसांचा हा जो वेळ मिळाला आहे याचाच सदुपयोग करून घे."

'मनुष्य इंद्रियांच्या सुखांत असा फसलेला आहे की त्याला आपल्या लक्ष्याचे भानच राहात नाहीं. शरीर, स्त्री, संतति इत्यादी सर्व काही असत्य आहे. तरी पण त्या सर्वांच्या मोहांत तो इतका मोहून गेलेला आहे, वेडा झालेला आहे कीं त्याला वेळ आणि लक्ष्य यांचे भानच राहिलेले नाही. तुम्हांला काय करायचे आहे, कोठे जायचे आहे, काय व्हायचे आहे, त्या सगळ्यांचा विचार आजच करा. इच्छाशुद्धीशिवाय कर्मशुद्धि होत नाहीं. तुम्ही निश्चय करा की मला भगवंताला भेटायचे आहे. मला प्रभूच्या धामी जायचे आहे. मला पुनर्जन्म घ्यायचा नाही.

जगतात विकार आणि वासनांची वाढ झाल्यामुळे त्याग आणि संयम कमी झाला आहे. काळाने येऊन मनुष्याला धक्का द्यावा आणि त्याने रडून घर सोडावे. ह्यापेक्षां विवेकाने स्वेच्छापूर्वक घर सोडून जाणे चांगले.

हे राजन्, मानव-जीवनाची अंतिम परीक्षा मृत्यू आहे. मनुष्याचा प्रत्येक क्षणी मृत्यू होत असतो. जो प्रत्येक क्षणाचा सदुपयोग करतो त्याचा मृत्यूही चांगला होतो आणि ज्याचा मृत्यू चांगला होतो, त्याचे जीवन उज्ज्वल होते.

प्रभूचे स्मरण प्रत्येक क्षणाच्या अंतकाळांत केले पाहिजे, केवळ आयुष्याच्या अंतकाळांतच तेवढे नाही. क्षणोक्षणी जो सत्कर्म करील, त्याचेच आयुष्य उत्तम होईल. हे शरीर प्रत्येक क्षणी बदलत राहते. अर्थात प्रत्येक क्षणी शरीराचा नाश होत राहतो. अंतकाळात म्हणजे प्रत्येक पळाच्या अंती मनुष्याचे मरण होत असते. म्हणून प्रतिक्षण प्रभूचे स्मरण करावे. श्रीशंकराचार्यांनी शांकरभाष्यात हेच सांगितले आहे.

नाहीतर ज्याचे आयुष्य झोप, धनोपार्जन आणि कुटुंबाच्या प्रतिपालनातच गेलेले असेल त्याला तर अंतकाळी तेच सर्व आठवत राहील.

एक म्हातारा आजारी पडला, त्याचे सगळे आयुष्य द्रव्य इत्यादी मध्येच गेले होते. अंतकाळ जवळ आला. त्याची मुलेबाळे म्हणतात, "बाबा, आता तुम्ही, 'श्रीकृष्ण गोविंद हरे मुरारे, हे नाथ नारायण वासुदेव' चा जप करा." परंतु त्या म्हाताऱ्याच्या तोंडातून हे शब्द निघतच नव्हते. आयुष्यांत कधी भगवंताचे नांव घेतले असेल तरच ते नांव आठवेल ना!

तो म्हातारा मनाने पैशाचेच चिंतन करीत होता. त्याची दृष्टी अंगणाकडे गेली. त्याने पाहिले की, वासरू केरसुणी खात आहे. एवढे लहानसे नुकसान देखील तो म्हातारा कसे सहन करील! मी कशा रीतीने पैसा मिळविला हे या लोकांना काय माहित? त्याला वाटले रुपये पैशांची आणि इतर चीज वस्तूंची या लोकांना काही किंमतच नाही. मी गेल्यानंतर हे लोक घर कसे चालवणार?

तो म्हातारा स्पष्ट तर काही बोलू शकत नव्हता, यामुळे काहीतरी बडबडू लागला. त्याच्या एका मुलाला वाटले की, बाबा देवाचे नाव घेऊ इच्छित आहेत, पण काही बोलू शकत नाहीत. दुसऱ्या मुलाने विचार केला की, बाबा देवाचे नाव तर कधी घेतच नसत, तेव्हा ते काही तरी मिळकतीबद्दल सांगू इच्छित आहेत. काही धन लपवून ठेवले असेल त्याच्याविषयी काही तरी सांगायचे असेल. त्या मुलांनी डॉक्टरला बोलावून आणले आणि विनंती केली की, 'असे काही करा की जेणेकरून बाबा दोनचार शब्द बोलू शकतील.' डॉक्टरांनी इंजेक्शन देण्यासाठी हजार रुपये फी मागितली. मुलांना वाटले, कोठे पुरून ठेवलेले धन सांगतील म्हणून हजार रुपये खर्च केले.

वडिलांचे म्हणणे ऐकायला सगळेच आतुर झाले होते. औषधाने आपले काम केले. थोडी शक्ति मिळाली तेव्हां तो म्हातारा बोलला, 'सगळे माझ्याकडे काय पाहात आहात? तिकडे पहा, ते वासरू केव्हांपासून केरसुणी खात आहे.' आणि वासरू, केरसुणी, केरसुणी, वासरू, असे म्हणत म्हणत म्हाताऱ्याने देह ठेवला.

तुम्ही ध्यानात ठेवा की, कधी तुमचीही स्थिती अशी न होवो.

ही गोष्ट हसण्याकरिता नाहीं, सावध करण्याकरिता सांगितली गेली आहे.

लक्ष्मी एकटीच आली तर रडवीत असते, पण बरोबर जर भगवंतही येतील तर मात्र सुखी करते.

लोक म्हणतात, येणाऱ्या काळाची कल्पना कशी होऊ शकते? परंतु तो तर सावध करीतच येत असतो. काळ सगळ्यांनाच सावध करीत असतो. परंतु लोक ऐकतच नाहीत. काळ येण्याच्या आधी पत्र लिहितो, परंतु काळाचे पत्र कोणाला वाचता येत नाही. केस पांढरे झाले कीं समजावे,

काळाची नोटीस आली आहे. दांत पडू लागले कीं समजावे काळाने नोटीस पाठविली आहे आणि सावध व्हावे. दांत पडले तर लोक नकली दांत लावतात. दांत पडू लागले म्हणजे समजावे कीं आता दूधभात खाऊन प्रभूभजन करण्याची वेळ आली आहे. पण लोक नकली दांत बनवून याकरिता लावतात की त्याने पापड खाण्याचा आनंद मिळावा. असे कोठपर्यंत चालेल? खाण्याने शांति तर मिळतच नाही, उलट वासना मात्र आणखीच भडकते. मृत्यूचे अनेक संकेत सांगितले आहेत. डोळ्याला अरुंधतीचा तारा दिसेनासा झाला तर समजावे कीं एका वर्षात मरण येणार आहे. स्वप्नांत चिखलामध्यें शरीर रुतलेले दिसले तर समजावे कीं नऊ महिन्यांत मरण येईल. स्वप्नामध्ये कुंभाराच्या गाढवावर स्वारी केल्याचे दृष्य दिसले तर समजावे कीं सहा महिन्यांत मृत्यू होणार आहे. कानांत बोटे घातल्यानंतर अंतर्ध्वनि ऐकू येईनासा झाला तर समजावे कीं आठ दिवसांत मरण येणार आहे. मृत्यूची ही लक्षणे ऐकून भयभीत होऊ नका. सावध करण्यासाठीच ही लक्षणे सांगितली आहेत. सावध करण्यासाठीच ही भागवताची कथा आहे.

भागवताची कथा ऐकून परीक्षित कृतार्थ झाले. मरण उज्ज्वल होण्यासाठी भागवतशास्त्र आहे. आयुष्याला जो सुधारील त्याचे मरण पण उज्ज्वल ठरेल.

राजन्, मरण उज्ज्वल करायचे असेल तर प्रत्येक क्षण उज्ज्वल कर. दररोज विचार कर. मनाला पुनःपुन्हा समजव कीं ईश्वराशिवाय माझे कोणी नाही. हे शरीर देखील मला एक दिवस सोडावे लागणार आहे, म्हणून हे पण माझे नाहीं. जर शरीरच माझे नाही तर माझे आहेच कोण? कारण सगळेच नातेसंबंध शरीरामुळेच उत्पन्न झालेले आहेत.

विचारांत घ्या कीं, ना मी कोणाचा आहे आणि ना कोणी माझे आहेत. याप्रमाणे ममतेला दूर करा. संग्रहाने ममता वाढते. याकरिता अपरिग्रही बना. तृप्ति भोगांत नसून त्यागात आहे.

समता सिद्ध करण्यासाठी सगळ्यांविषयी ममता ठेवा. व्यक्तिगत ममतेला दूर सारा.

प्रत्येक मनुष्याने प्रतिक्षण, सर्वात्मा, सर्वशक्तिमान अशा भगवान श्रीकृष्णांच्या लीलांचें श्रवण, कीर्तन आणि मनन करायला पाहिजे.

इन्द्रियांना भोगाने नाही, तर प्रभूस्मरणाने, प्रभूसेवेनेच शांति मिळत असते. दुःखाचे कारण देहच आहे. दुःख भोगण्यासाठींच तर देह मिळाला आहे ना? पापच केले नसते तर हा देह आणि हा जन्मच कां मिळता? रामदासस्वामींनी दासबोधांत लिहिले आहे कीं देह धारण करणेच पाप आहे. मनुष्य सर्वप्रकारे सुखी होऊ शकत नाही.

हे राजन्, मानवशरीर सुखाच्या उपभोगासाठी मिळालेले नाही. मानव शरीर तर भजन करून भगवंताला प्राप्त करून घेण्यासाठीच मिळालेले आहे.

इन्द्रियसुख सगळ्या प्राण्यांना एकसारखेच मिळते. शरीरसंगाने जे सुख स्त्री-पुरुषांना मिळते, तेच सुख कुत्र्याला कुत्रीच्या संगतीने मिळते. म्हणून मनुष्यजीवन मिळवून प्रभूस्मरणांत लीन रहा. तू आयुष्य अशा कार्यांत गुंतवून टाक कीं मृत्यूच्या क्षणीं देवाचे स्मरण होईल.

जीव, शिव बनण्याचा प्रयत्नच करीत नाही. वस्तुतः तो शिव बनण्यासाठीच जन्माला आला आहे. जीव जेव्हां ईश्वराला म्हणतो कीं मी तुझा आहे, तेव्हां तो संबंध अपूर्णच असतो. परंतु ईश्वर जेव्हां जीवाला म्हणतो की तू माझा आहेस; तेव्हां तो संबंध परिपूर्ण होतो.

पाप टाळा. पुण्यकार्य त्वरित करा. मन एकान्तात लवकर एकाग्र होते. एका ईश्वरांतच सर्वांचा अंत करणे म्हणजे एकान्त! ईश्वर एक आणि अद्वितीय आहे. मनाला एकाग्र करण्यासाठी एकान्तात

राहण्याची आवश्यकता आहे. गृहस्थ, घरांत समभाव ठेवू शकत नाहीं. मग वाटल्यास तो गीतेचा पाठ कां करे ना! गृहस्थाश्रमांतील व्यवहार विषमतेने भरलेले असतात. तेथे समना ठेवली जाऊ शकत नाही. गृहस्थाच्या घरांत भोगाचे परमाणु भरलेले असल्यामुळे, घरांत राहून परमेश्वराचें सतत ध्यान करणे कठीण आहे. भागवतांत शुकदेवांनी स्पष्ट सांगितले आहे कीं, ज्याचा मृत्यू जवळ आला असेल त्याने घर सोडून द्यावे.

**"गृहात् प्रव्रजितो धीरः"** धैर्यासह घर सोडा. पवित्र तीर्थाच्या जलांत स्नान करा आणि पवित्र एकान्त स्थळीं आसन स्थापून बसा. मनाने प्रणवाचा जप करा. प्राणायामानें प्राणवायूला वश करा. मनाला इतर विचारांपासून निग्रहाने दूर करून, त्याला परमेश्वराच्या मंगलमय रूपाचे ठिकाणी जोडा. मीराबाईनें एकान्तात गिरिधराच्या समोर नाचण्याचे ठरविले होते. तिचे पद देखील, 'मैं गिरिधरके आगे नाचूँगी' असे होते. तेव्हांच तिची भक्ति सिद्ध झाली.

**३. एकाग्र ध्यानासाठी प्राणायामाची सहायता कशी घ्यावी :**

एकान्तांत बसून प्रथम प्राणायाम करा. मनाचा प्राणाशी संबंध आहे. प्राणानें मन देखील स्थिर होते. प्राणायामाचे तीन भाग आहेत. प्रथम पूरक प्राणायाम करायचा असतो. उजव्या नाकपुडीने बाहेरची हवा आंत ओढा. ही सगळी योगाची प्रक्रिया आहे. महाप्रभूंनी 'सुबोधिनीमध्यें' सांगितले आहे कीं, योगाला देखील भक्तीचा सहकार पाहिजे. योगाला जर भक्तीचा आधार मिळाला नाहीं तर योगी रोगी होतो. भक्तिविना योग रोग उत्पन्न करतो. भक्ति केल्याविना योग साधक होत नाहीं. इतकेच नव्हे, तर कधी कधी तो बांधकही होतो. भक्तिसह योग केला तर प्रभूशी संयोग होतो. योगाद्वारे योगी मन स्थिर करू शकतो, परंतु हृदय विशाल होत नाहीं. हृदयाची विशालता तर भक्ति आणि ज्ञानानेंच होईल. याकरिता पूरक प्राणायामानें अशी धारणा करा कीं, प्रभूचे तेजोमय रूप तुमच्या आंत शिरत आहे. भगवंताचे व्यापक तेज तुमच्या हृदयांत येत आहे.

मग जेव्हां कुंभक कराल तेव्हां कल्पना करा कीं, मी ईश्वराला आलिंगन देत आहे. प्राणाला शरीरांत रोखून धरणे म्हणजेच कुंभक होय. त्यावेळी ब्रह्माशीच संबंध झाल्याची भावना करा. त्यावेळी विचार करा कीं, माझ्या प्रभूंशी माझे मिलन झाले आहे. माझ्या प्रभूंनी मला आलिंगन दिलें आहे. हे ईशमिलन सतत टिकून राहिले तर मुक्ति मिळते. मनुष्य या ईशमिलनाला सदा टिकवून ठेवू शकत नाहीं. सांसारिक विषयांत मन गेल्याने हा अनुभव नष्ट होऊन जातो.

नंतर रेचक प्राणायाम करायचा असतो. डाव्या नाकपुडीने श्वास बाहेर सोडून देण्याला रेचक म्हणतात. त्यावेळीं असा विचार करा की, मी प्रभूशी एकरूप झालो आहे. भगवंताचा होऊन गेलो आहे. म्हणून माझे पाप बाहेर निघत आहे, वासना बाहेर जात आहेत. माझ्या मनाचे सारे विकार निघून जात आहेत आणि आतां मी शुद्ध होत आहे.

जोपर्यंत कांहीं ना कांही लौकिक व्यवहार करायचा असतो तोपर्यंत मन स्थिर होऊ शकत नाही. बाहेरचा संसार भजन-कीर्तनांत विक्षेप करीत नाही पण मनाचा संसार अवश्य विक्षेप करतो.

ब्राह्मण संध्येच्या वेळी अघमर्षण करतात. त्यावेळीं असा विचार करतात कीं आपले पाप बाहेर जात आहे.

मनाची मलीनता दोन प्रकारची असते :-

**१) स्थूल मलीनता** — साधारण साधन-तप, व्रत, उपवास इत्यादींनीही दूर होते.

२) सूक्ष्म मलीनता– तीव्र भक्तीच तिला दूर करू शकते.

शुकदेवांनी म्हणूनच आरंभी विराट पुरुषाचे ध्यान करण्याची प्रक्रिया सांगितली आहे. विराट पुरुषाचे ध्यान केल्याशिवाय मन शुद्ध होत नाही.

शुकदेव म्हणतात, तशी तर माझी निष्ठा निर्गुणांत आहे. तथापि नंदनंदन यशोदानंदन माझ्या मनाला पुनःपुन्हा आपणाकडे आकर्षित करून घेत असतात. श्रीकृष्ण भगवंताच्या मधुर लीला माझ्या मनाला, माझ्या हृदयाला बळेबळेच आपणाकडे आकर्षित करतात. याच कारणानें मी भागवतपुराणाचे अध्ययन केले आहे आणि ते मी तुम्हांला ऐकवणार आहे.

भगवंताच्या नामाचे प्रेमानें संकीर्तन करणेच सगळ्या शास्त्रांचे सार आहे. सगळी शास्त्रे वाचा, त्यावर विचार करा, परंतु लक्षांत ठेवा कीं एक नारायण – हरीच सत्य.

मी सगळीं शास्त्रें पाहिली, पुष्कळ वेळा विचार केला, तरी सार एकच निघाले कीं, त्या सर्वांचे ध्येय केवळ नारायण–हरीच आहे. सगळ्या शास्त्रांच्या वाचन-मननाने मी ठरविले कीं, भगवंताचेच ध्यान केले पाहिजे.

निर्गुणावर जोपर्यंत निष्ठा होणार नाही तोपर्यंत मनांतील राग-द्वेष जाणार नाहींत. ज्यांची सगुणावरच निष्ठा असेल परंतु निर्गुणाला मानणार नाहींत त्यांची भक्ति अपूर्णच राहते.

ध्यानाच्या आरंभी मानसपूजा करा. ध्यानाच्या वेळीं मन शुद्ध नसेल तर आनंद मिळत नाहीं. मनाला बाह्य विषयांमध्ये भटकत राहण्याची सवय झालेली आहे. हल्ली जीवन भोगप्रधान झालेले आहे. म्हणून मनाला अंतर्मुख करणे फार कठीण आहे. ज्ञानी पुरुष मनाची मलीनता धुवून टाकण्यासाठी विराट पुरुषाची धारणा करतात. विराट पुरुषाची धारणा करणे म्हणजे सगळ्याच जगाला ब्रह्मरूप मानणे होय. ब्राह्मण त्या विराट पुरुषाचे मुख आहे, क्षत्रिय हात आहेत, वैश्य जंघा आहेत, शूद्र पाय आहेत, नद्या नाड्या आहेत. याप्रमाणे जगांतील प्रत्येक पदार्थाला ब्रह्मरूप कल्पून मन शुद्ध करायचे आहे. साधारण साधकासाठी या विराट पुरुषाची कल्पना आणि धारणा कठीण आहे. म्हणून कांही लोक अतिसुंदर अशा भगवान् नारायणाचे ध्यान करतात.

जगताला जोपर्यंत ब्रह्मरूप मानणार नाही तोपर्यंत राग-द्वेष मिटणार नाहींत. काहीं लोक जगाला ब्रह्ममय मानतात, तर काहीं लोक प्रत्येक पदार्थांत ब्रह्मस्वरूपाचा अनुभव करतात. रागद्वेषाच्या नाशासाठी विराट पुरुषाचे ध्यान करा. सगळे विश्व त्याच विराट पुरुषाचे स्वरूप आहे, अशी भावना मनांत दृढ झाली तर जगांतील कोणत्याही वस्तूविषयी हीनभाव किंवा कुभाव होणार नाही.

हरिच जगत् आहे. ब्रह्मदृष्टीने जगत् सत्य आहे. ब्राह्मण भगवंताच्या मुखापासून निघाला आहे. वैश्य जंघेपासून झाला आहे. शूद्र चरणांपासून निघाला आहे. म्हणून कोणाचाही अपमान म्हणजे भगवंताचा अपमान होय. याकरिता कोणाचाच अपमान किंवा तिरस्कार करू नका. जगामध्ये जड आणि चेतनाचा जोपर्यंत भेद राखाल, तोपर्यंत ध्यानांत एकाग्रता येणार नाही.

यानंतर भागवतांत वैराग्याचा उपदेश दिला गेला आहे. वैराग्याविना ध्यान होऊ शकत नाही. ध्यानांत एकाग्रता येऊ शकत नाहीं.

**४. ज्ञानमार्ग व भक्तिमार्गाचा परिचयः**

ज्ञानमार्गांत तीव्र वैराग्य असले पाहिजे. भक्तिप्रेममार्गांत समर्पणाला प्राधान्य आहे. भक्ति करायची असेल तर ती वैराग्याशिवाय होऊ शकते. परंतु सर्वांवर प्रेम करावेच लागेल. वैराग्यापेक्षा हे काम

जास्त कठीण आहे. सगळ्यांवर प्रेम ठेवा किंवा एका ईश्वरावर प्रेम करा. जगतांतील प्रत्येक पदार्थावर निरपेक्ष प्रेम करणे भक्तिमार्ग आहे.

ज्ञानमार्ग त्यागप्रधान आहे. भक्तिमार्गांत समर्पणाचें प्राधान्य आहे. ज्ञानी सर्वांचा त्याग करीत करीत अशा त्यागांतीत जे शेष राहते, त्यांतच मन दृढ करतो. साधारण माणसासाठी ज्ञानमार्ग सोपा नाहीं. कारण मनुष्य सर्वस्वाचा त्याग करूं शकत नाही.

शरीराहून आत्मा भिन्न आहे असे सगळे समजतात तर खरे, परंतु त्याचा अनुभव येणे सोपे नाहीं. भक्त मानतो कीं गाईंत बसलेल्या श्रीकृष्णाची सेवा गवतात असलेल्या श्रीकृष्णाने करीन. भक्तिमार्गांत सद्भाव आवश्यक आहे. सगळ्यांशीच सद्भाव ठेवणें कठीण कर्म आहे. भगवान् श्रीकृष्ण तर स्वतः, लाथ मारीत असणाऱ्याला देखील सद्भावाच्या दृष्टीने पाहतात.

मनाची मलीनता धुवून टाकण्यासाठी विराट पुरुषाचे ध्यान धरायचे आहे. विराट पुरुषाचे ध्यान करणे म्हणजे या जगांत जे कांही दिसत असते, त्यांत परमेश्वराचा वास आहे असे समजून व्यवहार करणें. सगळे विश्वच त्या विराट पुरुषाचे रूप आहे. विराट पुरुषाच्या ध्यानासाठी तीव्र वैराग्य आवश्यक आहे.

सगळे विश्व ब्रह्मरूप आहे असे मानून, ज्ञानी पुरुष ललाटांत ब्रह्माचे दर्शन घेत असतात. वैष्णवजन हृदयांत चतुर्भुज द्वारकानाथाचे दर्शन घेत असतात.

प्रभूच्या एका अंगाचें चिंतन करणें ध्यान होय. आणि प्रभूच्या सर्वांगांचे चिंतन करणे ही धारणा होय.

दास्यभक्तिमुळें हृदय लवकर दीन होईल. प्रथम भगवंताच्या चरणारविंदाचे ध्यान करा, मग मुखारविंदाचे आणि अंती सर्वांगाचे ध्यान करा. ध्यानयोगाविषयीचे निरूपण कपिलगीतेंत विस्तारानें केले गेले आहे. त्याचाच येथे संक्षेप केला आहे.

साधक सावध राहून ध्यान करील तर त्याच्या हे लक्षांत येईल कीं मायेची शक्ति भ्रांतिमयच आहे. ईश्वराचे चिंतन झाले नाहीं तरी कांहीं बिघडत नाहीं, पण संसाराचे चिंतन तर कधीच करू नये. ईश्वराचे ध्यान होऊ न शकले तरीही संसाराचे ध्यान सोडून देण्याची संवय लावून घेतली पाहिजे. ध्यानाशिवाय ईश्वराचा साक्षात्कार होऊ शकत नाहीं. ज्याप्रमाणें पैशाअडक्याचे ध्यान करता, त्याचप्रमाणें परमात्म्याचे ध्यान करा.

आरंभी डोळ्यासमोर अंधार झाल्यासारखा वाटेल, परंतु धैर्याने योगधारणा करून मनाला वश करा. बुद्धीच्या साहाय्याने प्रभूच्या सर्वांगाची धारणा करा. जशी जशी बुद्धि स्थिर होत जाईल, तसतसे मनही स्थिर होऊ लागेल. धारणा स्थिर झाल्यावर ध्यानांत प्रभूचें मंगलमय स्वरूप दिसू लागते आणि भक्तियोगाची प्राप्ति होते. ध्यानांत मन स्थिर न झाले तर त्या मनाला मरणाचे भय दाखवा. तेव्हांच ते स्थिर होईल. मनाला कशाही प्रकारे समजावून स्थिर करा.

एकनाथ महाराजांजवळ एक वैष्णव आला. त्याने महाराजांना विचारलें, तुमचे मन ईश्वरांत-सदासर्वदा श्रीकृष्णांत कसे स्थिर राहते? माझे मन तर अर्धा तास देखील प्रभूमध्यें स्थिर राहू शकत नाही. मनाला स्थिर करण्याचा कांही उपाय सांगा.

एकनाथांनी विचार केला कीं उपदेश क्रियात्मक असला पाहिजे. ते म्हणाले, सध्या ही गोष्ट सोडून दे. मला असे वाटते आहे कीं तुझे मरण जवळ येत चालले आहे. मरण्यापूर्वी वैर आणि वासना यांचा त्याग केला पाहिजे. वैर आणि वासनेमुळें मृत्यु चांगला होत नाहीं. सात दिवसांनंतर तू पुन्हा

माझ्यापाशी ये.

मरणाचे नांव ऐकल्याबरोबरच त्या वैष्णवाची शुद्धच हरपली. बेशुद्धीतच जणू तो घरी परत आला. धनसंपत्ति वगैरे सर्व कांहीं मुलांना सोपवून दिले, सर्वांची क्षमा मागितली आणि तो ईश्वराचे ध्यान करू लागला. सात दिवसांनंतर तो एकनाथ महाराजांपाशी आला.

महाराजांनी विचारले, 'या सात दिवसांत तू काय काय केलेस? तू कांही पाप तर केले नाहींस ना?' वैष्णवाने उत्तर दिले की, 'मी मृत्यूला इतका भ्यालो कीं सर्व कांही सोडून मी प्रभूच्या ध्यानांत रममाण झालो.

यावर एकनाथ महाराज म्हणाले, 'माझ्या एकाग्रतेचे हेच रहस्य आहे. मी मृत्यूची रोज आठवण करीत असतो, मृत्यूचे भय मनांत ठेवून सतत ईश्वरभजन करीत असतो. म्हणून सगळ्याच विषयांपासून माझे मन दूर होते, आणि ते सदासर्वदा श्रीकृष्णांत एकाग्र राहते.

परमात्म्यांत मन तन्मय झाले नाही तरी कांही हरकत नाही, परंतु संसाराशी केव्हांही तन्मय होऊ नका. परमात्म्याच्या ध्यानामुळें जीव ईश्वराशी ऐक्य पावतों. ध्यान करणारा ध्येयाशी एकरूप होतो. ध्याता, ध्यान आणि ध्येय; तीनही एक होऊन जातात. हीच मुक्ति होय, हेच अद्वैत होय.

दृष्टि, द्रष्टा आणि दर्शन एक झाले पाहिजे. साधन, साध्य आणि साधक एक झाले पाहिजे.

ध्याता, ध्यान आणि ध्येय त्याचप्रमाणें द्रष्टा, दृष्टी आणि दर्शन एक झाले तर समजा कीं ध्यान आणि दर्शनांत एकतानता उत्पन्न झाली आहे. एकतानता झाली म्हणजे तो इतर सगळे विसरून जातो आणि त्याला ईश्वराशिवाय इतर कांहीच दिसत नाही.

लोक देवाला धन देत असतात, पण तो तर मन मागत असतो. व्यवहार करा पण ईश्वरांत, कृष्णांत मन ठेवून करा. पाणी आणणाऱ्या बाया, पाण्यानें भरलेल्या घागरी डोक्यावर ठेवून बोलत बोलत चालत असतात. तरीपण त्यांचे लक्ष डोक्यावर ठेवलेल्या घागरींकडे असते. कारण घागरींकडे लक्ष न राहिल्यास त्या खाली पडतील. याचप्रमाणें संसारांतील व्यवहार करीत असतांना देखील नेहमी ईश्वराचे स्मरण करीत राहावे. जगांतील पदार्थांमध्यें आसक्ति ठेवू नका.

विषयासक्त व्यक्तीला ब्रह्मानंद समजू शकत नाहीं. ब्रह्मानंदाचे वर्णन कोणीही करू शकत नाहीं. उपनिषदांत दृष्टान्त दिला आहे कीं, खडीसाखरेच्या बाहुलीनें सागराची खोली मापायचा प्रयत्न केला, परंतु ती जी समुद्रांत गेली ती गेलीच. त्यांतच विलीन झाली. जीव जसजसे ध्यान करू जातो तसतसा जीवाचा परमात्म्यांत लय होतो आणि मग जीवाला जीवत्व राहातच नाही.

भागवतांत ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग दोन्हीही सांगितले आहेत. ज्ञानमार्गांत जीव ईश्वराबरोबर एक होतो आणि ईश्वरांत विलीन होऊन जातो. उलट काहीं वैष्णवाचार्य थोडे द्वैत कायम ठेवून अद्वैत मानतात. भक्तीचा आरंभ द्वैताने होतो परंतु त्याची समाप्ति मात्र अद्वैतातच होत असते. भक्त आणि भगवंत वेगळे राहू शकत नाहींत. जो जीव ईश्वरांत विलीन झाला त्याला भगवंत आपल्या स्वरूपापासून वेगळे करू शकत नाहीं. उपनिषदांत ईश्वराचे वर्णन करतांना म्हटले आहे– "रसो वै सः।" अर्थात ईश्वर रसरूप आहे.

वैष्णव आचार्य अभेदभावांत श्रद्धा ठेवतात. पाण्यांत राहणारी मासोळी पाणी पिऊ शकत नाहीं त्याचप्रमाणें जो ब्रह्मरसांत बुडून गेला आहे, जो ब्रह्मरूप झालेला आहे तो पुनः परमात्म्याच्या रसात्मक स्वरूपाचा आनंद घेऊ शकत नाही. ब्रह्मरूप झाल्यानें जीवाची दुःखनिवृत्ति तर होते, पण तो आनंदाचा अनुभव घेऊ शकत नाहीं, रसात्मक आणि आनंदात्मक ब्रह्माचा अनुभव घेण्यासाठी जीवाला थोडे निराळे

राहावे लागेल. थोडेसे द्वैत ठेवावेच लागेल. मग भक्त म्हणतो की मी आपल्या प्रभूचा अंश आहे. मी आपल्या श्रीकृष्णाची गोपी आहे. मला परमात्म्याशी एकरूप व्हावयाचे नाहीं. मला तर भगवंताची सेवा करायची आहे. मला गोलोक-धामीं जायचे आहे.

लौकिक देह टाकून भक्त जेव्हां अप्राकृत शरीर घेऊन गोलोक-धामांत प्रवेश करतो, तेव्हां भगवंताला आनंद होतो. देव म्हणतात, 'माझा अंश माझ्यात विलीन होण्यासाठीं आला आहे' याकरिता भगवंत उत्सव साजरा करतात.

परंतु तुकाराममहाराज म्हणतात कीं, 'कीर्तन करताना मला जो आनंद मिळत असतो, तसा विठ्ठल बनण्यांत मिळत नाही.'

जीवाला ईश्वराचा अनुभव केव्हां येऊ शकेल? जेव्हां तो ईश्वराहून भिन्न राहील तेव्हांच त्या रसाचा अनुभव करू शकेल. वैष्णवाचार्यांना वाटते कीं, जीवाने ईश्वराहून थोडे निराळे राहिले पाहिजे.

किडा भ्रमराचे चिंतन करता करता स्वतःच भ्रमर बनतो. तद्वतच ब्रह्माचे चिंतन करणारा जीव स्वतःच ब्रह्मरूप होतो. ही झाली कैवल्यमुक्ति. परंतु वैष्णवजन अशा कैवल्यमुक्तीची इच्छा ठेवीत नसतात. ते तर ईश्वराची पूजा, सेवा आणि त्याचे रसास्वादन करण्यासाठी थोडा द्वैतभाव ठेवतातच.

जो व्यापक ब्रह्मामध्ये लीन झाला आहे, तो त्याच्यापासून वेगळा कसा होऊ शकेल? पाणी जड किंवा घट्ट झाले तर त्यामुळें मासा वेगळा होऊ शकतो, पण जो सर्वप्रकारे पाण्यांत बुडून गेलेला असेल, तो पाण्याचा आस्वाद कसा घेऊ शकेल? त्याचप्रमाणें ईश्वरांत पूर्णपणे बुडून गेलेला जीव ईश्वराच्या स्वरूपाचा रसानुभव करूं शकणार नाहीं. याकरिता वैष्णव महापुरुष थोडेसे द्वैत ठेवून, भगवंताच्या सेवा-स्मरणांत कृतार्थतेचा अनुभव करीत असतात. हे दोन्ही सिद्धान्त खरे आहेत. खंडनमंडनाच्या भानगडींत पडू नका. गौरांग प्रभू देखील या भेदाभेद-भावाला मानतात. लीलाभेदालाही मानतात. परंतु तत्त्वदृष्टीनें अभेद आहे. अभिन्न असून देखील त्या दोघांमध्यें सूक्ष्म भेद आहे.

एकनाथ महाराजांनी हा सिद्धान्त समजाविण्यासाठी एक दृष्टान्त सांगितला आहे.

अशोकवनांत रामाच्या विरहामध्ये सीतादेवी रामाचे अखंड ध्यानस्मरण करीत असते. सगळीकडे रामच दिसतात. माता हे विसरूनच जाते कीं स्वतः सीता आहे.

सगळ्यांतच रामाचा अनुभव घेणारा रामरूप होत असतो. हीच कैवल्यमुक्ति आहे.

सीतेला कित्येक वेळीं वाटत असे कीं, ती रामरूप आहे. ती आपले स्त्रीत्व विसरून जाते.

एक वेळ सीतेनें त्रिजटेला विचारले कीं, 'किडा भ्रमराचे चिंतन करता करता भ्रमर होतो, असे मी ऐकले आहे. याचप्रमाणें रामाचे चिंतन करता करता मीच जर राम झाले तर कसे होईल?'

सीता रामाच्या ध्यानांत इतकी तल्लीन होते की जणू कांहीं ती स्वतः रामच झाली आहे.

त्रिजटा म्हणाली, 'माते, तू रामरूप होशील तर चांगलेच होईल. जीव आणि शिव एक होतील तर जीव कृतार्थ होईल.'

तर सीता म्हणते कीं रामचिंतन करता करता मी राम झाले तर मग श्रीरामांची सेवा कोण करील? सीता राहून रामाची सेवा करण्यांत जो आनंद आहे तो स्वतः रामरूप होण्यांत नाही. मला राम होण्याने आनंद वाटणार नाही. मला तर रामाची सेवा करायची आहे.

सीतेला दुःख वाटते कीं ती, रामचिंतनानें रामरूप झाल्यास त्यांच्या युगुलभावात खंड पडेल. त्या स्थितींत सीता-रामांचा युगुलभाव राहू शकणार नाही.

तेव्हां त्रिजटा म्हणाली:- अन्योन्य प्रेमामुळें राम तुझे चिंतन करता करता सीतारूप होतील

आणि या रीतीनें तुमचा युगुलभाव जगांत अखंडितच राहील.

हेच भागवती मुक्तीचे रहस्य आहे.

वैष्णव आचार्य प्रथम द्वैताचा नाश करतात. आणि मग अद्वैत प्राप्त करतात. नंतर काल्पनिक द्वैत ठेवून राहतात. तेणेकरून गोपीभावानें त्यांना श्रीकृष्णांची सेवा-पूजा करता येऊ शकते.

ज्ञानी लोक ज्ञानानें अद्वैत सिद्ध करतात. ही अद्वैतमुक्ति कैवल्यमुक्ति आहे. भक्त भक्तीच्या योगे अद्वैत सिद्ध करतात, ही भागवती मुक्ति आहे.

या प्रकारे दोन भक्तींचे वर्णन झालें आहे. सतरा तत्त्वांचे सूक्ष्म शरीर आहे. स्थूल आणि सूक्ष्म शरीराचा नाश झाल्यावर मुक्ति मिळत असते.

विचारप्रधान मनुष्याला ज्ञानमार्ग आवडतो व तो त्याचीच निवड करतो. भावनाप्रधान मनुष्य कोमल ह्रदयी असल्यामुळें त्याला भक्तिमार्ग आवडतो व तो त्याचीच निवड करतो.

ईश्वरापासून विन्मुख न होणे म्हणजेच भक्ति होय. सगळ्या साधनांत भक्तीच श्रेष्ठ आहे. भक्तिशून्य पुरुषाची सगळीच साधने निष्फळ राहतात. जीव आणि ईश्वराचें मिलन होण्याचे साधन आहे भक्ति. भागवतांत जेथे कोठे भक्ति शब्दाचा प्रयोग केला आहे, तेथे तीव्र शब्द देखील प्रयुक्त झाला आहे. भक्ति तीव्र असली पाहिजे. तीव्रतेविना नुसत्या साधारण भक्तीने कांही होत नाही.

वैराग्याची इच्छा असणारा मुमुक्षू भक्त असेल तर त्याने तीव्र भक्तिद्वारें परमपुरुष पूर्ण परमात्म्याचें पूजन केले पाहिजे.

शुकदेव म्हणतात, –

‘ हे राजन्, भक्ति मिळवायची असेल तर आधी भोगांचा त्याग करावाच लागेल. भोगी, ज्ञान किंवा भक्तिमार्गांत पुढे जाऊ शकत नाहीं. भोग भक्तींतही बाधक आहे आणि ज्ञानांतही. भोगापेक्षा त्यागांत अनंतपटीने सुख आहे.

इन्द्रियजन्य सुख सगळ्या प्राण्यांमध्यें एकसारखेच असते. पशूंचे, मनुष्यांचे आणि देवगंधर्वांचे त्वचेन्द्रियांचें स्पर्शसुख आणि जिव्हेंन्द्रियाचे रससुख समानच असते. इन्द्रियसुखाच्या उपभोगाच्या वेळी जो आनंद मनुष्याला मिळतो तोच आनंद पशूंनाही मिळतो. कापसाच्या गादीच्या पलंगावर झोपणाऱ्या शेटजींना जो आनंद मिळतो, तोच आनंद, केर-कचऱ्याच्या ढिगावर निजलेल्या गाढवाला देखील मिळतो. याकरिता मनुष्याला हे आवश्यक आहे कीं त्यानें बुद्धिपूर्वक भोग सोडावा.

भोगांत क्षणिक सुख मिळते. पण त्यागानें नेहमीकरिता अनंत सुखाची प्राप्ति होते.

भोगाने शांति मिळत नाही, त्यागाने शांति मिळते. पशु, पक्षी, मनुष्य सगळ्यांचे इन्द्रियसुख तर एकसारखेच असते.

राजन्, तू आजपर्यंत अनेक भोगांचा उपभोग घेतलास. आतां तू आपल्या एकेका इन्द्रियाला भक्तिरसाचे पेय दे. इन्द्रियरूपी पुष्प तू भगवंताला अर्पण कर.

राजन्, ज्याचा मृत्यू जवळ आला असेल, त्याने संसार विसरायचा आणि परमात्म्याकडे मन लावायचा प्रयत्न केला पाहिजे. राजन्, हळूहळू संयम वाढव. श्रीकृष्णाचें सतत ध्यान करणेच मनुष्यमात्राचें कर्तव्य आहे. जो ईश्वरांत तन्मय होतो त्याला मुक्ति मिळते.

राजन्, त्याचाच जन्म सफल झाला असे समजावे कीं ज्याला पुनः मातेच्या गर्भात येण्याचा प्रसंगच येणार नाही. गर्भवास नरकवास असतो. कर्म आणि वासना बरोबर घेऊन जो जन्म घेतो, त्याचेसाठी गर्भवास म्हणजे नरकवासच असतो.

शुकदेव जनकराजाच्या राजगृहांत विद्या शिकायला गेले. विद्याभ्यास संपला. शुकदेवांनी गुरुदक्षिणा देण्याची इच्छा प्रदर्शित केली. जनकराजानें सांगितले, 'मला कांहीं गुरुदक्षिणेची इच्छा नाहीं; तरी तू आग्रह करीत आहेस म्हणून सांगतो की जगतात जी वस्तू अगदी निरुपयोगी असेल ती मला दे.'

जनकराजानें निरुपयोगी वस्तू मागितली तर तिच्या शोधांत शुकदेव निघाले. प्रथम त्यांनी माती घेतली तर ती म्हणाली, 'माझे तर कित्येक उपयोग आहेत.' दगडानेही तसेच सांगितले.' जी जी वस्तू उचलली ती ती उपयोगी निघाली. सरतेशेवटी शुकदेवांनी विष्ठा उचलली तर ती देखील म्हणाली, 'मी पण उपयोगी आहे. मनुष्याच्या पोटांत जाण्यामुळेंच माझी अशी स्थिती झाली; मी निरुपयोगी नाहीं.' विचार करता करता शुकदेवांना कळले कीं हा देहाभिमानच निरुपयोगी आहे.

परमात्म्याची सेवा करता करता पुरुषत्व आणि स्त्रीत्व यांचे भान गेले तर गोपीभाव सिद्ध होतो आणि परमात्म्याच्या नित्य लीलेंत प्रवेश मिळतो.

शुकदेव म्हणाले, 'मी आपला देहाभिमान गुरुदक्षिणेंत अर्पण करतो.' हे ऐकून जनकराजा शुकदेवांना म्हणाले, 'आतां तू कृतार्थ झाला आहेस.'

शुकदेवांनी देहाभिमान सोडला. देहभान न होण्यामुळेच त्यांचेकडून मंगलाचरण केले गेले नाही. चौथ्या अध्यायांत मंगलाचरण केले आहे बाराव्या श्लोकापासून.

साधकाला कथा मार्गदर्शन करते. इतकेच नव्हे, तर सिद्ध पुरुषांना देखील कथा ऐकण्याची आवश्यकता असते. शुकदेवांच्या कथेंत देखील पराशर, व्यास इत्यादी बसले होते.

दुसऱ्या स्कंधाच्या पहिल्या, दुसऱ्या आणि तिसऱ्या अध्यायांमधे भागवताचें संपूर्ण सार आणि बोध येऊन गेला आहे. राजाला जो उपदेश द्यायचा होता तो या तीन अध्यायांत विदीत केला आहे. त्यानंतर परीक्षित राजाचें मन विषयांकडे जाऊ नये याकरिता सगळीच चरित्रें सांगितली आहेत.

**५. प्रभूच्या मायेने सृष्टीची उत्पत्ति, सुदाम्यास मायेचे मजेदार दर्शन :**

परीक्षित राजाने विचारले कीं, आपल्या मायेनें भगवंत या सृष्टीची रचना कशी करतात? या सृष्टीच्या उत्पत्तीची गोष्ट सांगा.

शुकदेव म्हणाले, 'राजन्, तू मला जो प्रश्न विचारला आहेस, तोच प्रश्न नारदानें ब्रह्मदेवाला विचारला होता. तू त्याची कथा ऐक. ब्रह्मदेवानें नारदाला सृष्टीच्या आरंभाची कथा सांगितली होती.'

भगवंताला इच्छा झाली कीं त्यानें एकाचे अनेक व्हावे – **एकोऽहम् बहु स्याम्.** त्यानें २४ तत्त्वे उत्पन्न केली. ती सर्वच तत्त्वे कांहींच करूं शकली नाहीत. तेव्हां प्रभूनें त्या सर्व तत्त्वांत प्रवेश केला तेव्हांच त्या तत्त्वांमध्ये चेतनाशक्ति प्रगट झाली.

सातव्या अध्यायांत भगवंताच्या लीलाअवतारांचे संक्षिप्त वर्णन आहे.

ब्रह्मदेवाच्या निष्कपट तपश्चर्येनें प्रसन्न होऊन भगवंतांनीं त्याला आपल्या स्वरूपाचे दर्शन करविले. आत्मतत्त्वाच्या ज्ञानासाठी परमसत्य परमार्थ वस्तूचा जो उपदेश केला त्याची कथा सांगतो.'

आदिदेव ब्रह्मदेव आपले जन्मस्थान जे कमल त्यावर बसून सृष्टिरचनेची इच्छा करून विचारांत निमग्न झाले. तरी ज्या ज्ञानदृष्टीनें सृष्टीची रचना केली जाऊ शकते ती प्राप्त होऊ शकली नाहीं. इतक्यांत ब्रह्मदेवांनी आकाशवाणी ऐकली : 'तप तप'. ब्रह्मदेव समजलें कीं त्यांना तप करायचा आदेश झाला आहे. ब्रह्मदेवानें शंभर वर्षेपर्यंत तप केले आणि त्यांना चतुर्भुज नारायणाचे दर्शन झाले.

तप केल्याशिवाय कोणाचेच काम होऊ शकत नाही, जो तप करीत नाही त्याचे पतन होते.

( तप शब्दाच्या अक्षरांना उलट केले तर पत होते. तप नाही म्हणून पत नाही, 'पत न' त्याचे पतन होते. )

नारायण भगवानांनी ब्रह्मदेवाला चतुःश्लोकी भागवताचा उपदेश केला. दुसऱ्या स्कंधाच्या नवव्या अध्यायाचे ३२ ते ३५ श्लोक हेंच चतुःश्लोकी भागवत आहे.

**अहमेवासमेवाग्रे नान्यद्यत्सदसत्परम्।**
**पश्चादहं यदेतच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम्॥३२॥**
**ऋतेऽर्थं यत्प्रतीयेत न प्रतीयेत चात्मनि।**
**तद्विद्यादात्मनो मायां यथा भासो यथा तमः॥३३॥**
**यथा महान्ति भूतानि भूतेषूच्चावचेष्वनु।**
**प्रविष्टान्यप्रविष्टानि तथा तेषु न तेष्वहम्॥३४॥**
**एतावदेव जिज्ञास्यं तत्त्वजिज्ञासुनात्मनः।**
**अन्वयव्यतिरेकाभ्यां यत्स्यात्सर्वत्र सर्वदा॥३५॥**

भगवंत लपंडावाचा खेळ खेळतात. आरंभी सगळेच जीव भगवंतात विलीन झालेले होते. भगवंत प्रत्येक जीवाचा शोध करून त्याच्या कर्माप्रमाणें त्याला शरीर देतात. मग म्हणतात कीं, आतां मी लपून बसतो, तुम्ही मला शोधून काढा.

जेव्हां जगत् अस्तित्वांत नव्हते तेव्हां देखील मी होतोच. जेव्हां जगत् राहणार नाहीं, तेव्हां देखील मी राहीनच. ज्याप्रमाणें स्वप्नांत एकच अनेक रूपांना पाहतो, त्याचप्रमाणें जागृत अवस्थेमधे देखील, अनेकांत एकच तत्त्व आहे, असा ज्ञानी पुरुषांचा अनुभव आहे. दागिन्यांचे आकार भिन्न भिन्न असूनही सर्व एकाच प्रकारच्या सोन्याचे झालेले असतात. किंमत देखील त्या सोन्याचीच आहे, आकाराची नाहीं.

ईश्वराशिवाय जे कांहीं दिसते ते सर्व असत्य आहे. ईश्वराशिवाय दुसरे जे कांहीं दिसेल ती सर्व ईश्वराची माया आहे. ही मायाच कार्य आहे. तिलाच महापुरुष आवरण आणि विक्षेप म्हणतात.

सगळ्याचे मूळ उपादान कारण प्रभूच आहे. प्रभूंत भासमान होणारा संसार खरा नाहीं, परंतु मायेमुळेच आभासित होतो.

मायेच्या दोन शक्ति आहेत :—

**१) आवरणशक्ति :** मायेची आवरणशक्ति परमेश्वराला लपवून ठेवीत असते.

**२) विक्षेपशक्ति :** मायेची विक्षेपशक्ति ईश्वराच्या अधिष्ठानांतच जगताचा भास करविते, ईश्वरांतच जगताचा भास करविते.

अंधाराच्या दृष्टान्तानें हे समजाविले गेले आहे. अंधारांत वस्तुतः जे नाहीं ते भ्रमामुळें दिसते आणि जें आहे ते दिसत नाहीं.

आत्मस्वरूपाचें विस्मरण हीच माया. आपल्या स्वरूपाचें विस्मरण स्वप्नच आहे. जो स्वप्न पाहात असतो तो पाहणारा खरा आहे. स्वप्नांत एकच पुरुष दोन होऊन दिसतो. तात्त्विक दृष्टीनें पाहिले तर स्वप्नांतील साक्षी आणि प्रमाता एकच आहेत. त्याला जेव्हां जाग येते तेव्हां त्याला भान येते कीं मी तर घरांत शय्येवरच निजलेला आहे. स्वप्नांतील पुरुष निराळा आहे. जगताचें ब्रह्मतत्त्व एकच आहे. परंतु मायाकारणें अनेकत्वाचा भास होत असतो. माया जीवनाला चिकटलेली आहे. ही माया

जीवनाशी केव्हां निगडित झाली हें सांगता येत नाही. कारण माया अनादि आहे. तिचें मूळ शोधून काढण्याची गरज नाही.

मायेचा अर्थ आहे अज्ञान. अज्ञान केव्हांपासून सुरू झाले हे जाणण्याची काय आवश्यकता आहे? माया जीवाला केव्हांपासून जडली आहे, याचा विचार करू नका. तिचा पार कोणालाच लागू शकणार नाहीं. केव्हां विस्मरण झाले हे कांहीं सांगता येत नाहीं. त्याचप्रमाणें अज्ञानाचा केव्हां आरंभ झाला हेही सांगता येणार नाहीं. परंतु अज्ञानाचा तात्कालिक विनाश करणे मात्र आवश्यक आहे.

कपड्यावर डाग पडला असला तर तो कसा पडला, कोणत्या जागी पडला, कोणत्या शाईचा असेल, इत्यादीचा विचार करण्यापेक्षा, त्या डागाला ताबडतोब काढून टाकणें हिताचे आहे.

मायेच्या संबंधांत विचार करीत राहण्यापेक्षा मायेला दूर करण्यासाठी परमात्म्याला शरण जाणे चांगले.

मायेचें दर्शन व्हावें अशी सुदामाला इच्छा झाल्यावर, त्यानें श्रीकृष्णाला सांगितले कीं, 'तुमच्या मायेचे मी दर्शन घेऊं इच्छितो. ती कशी असते?' श्रीकृष्ण म्हणाले, 'वेळ आली म्हणजे तिचे दर्शन घडवीन. चला, प्रथम आपण गोमतीत स्नान करून घेऊ.'

ते दोघे गोमतीच्या तीरावर आले. स्नान करू लागले. भगवंत तर स्नान करून पीतांबर नेसू लागले. सुदाम्यानें गोमतींत बुडी मारली. त्याच वेळी भगवंतांनी सुदाम्याला आपल्या मायेचे दर्शन करविले.

सुदाम्याला वाटले, गोमतीला पूर आलेला आहे. ते त्यांत वाहून चालले आहेत. त्यांनी एका घाटाचा आश्रय घेतला. फिरत फिरत ते एका गांवापाशी आले. तिथे एका हत्तीणीनें त्यांना हार घातला. लोकांनी सांगितले, 'आमच्या राजाचा मृत्यू झालेला आहे. ह्या गांवाचा असा नियम आहे कीं पहिल्या राजाच्या मृत्यूनंतर, हत्तीण ज्याला हार घालील तो राजा होईल. यामुळें तुम्ही आमच्या देशाचे राजे झाला आहात.'

सुदामा राजा झाले. एका राजकन्येशी त्यांचे लग्नही झाले. बारा वर्षांच्या दांपत्यजीवनांत त्यांना दोन मुलगेही झाले. मग एके दिवशीं आजारपणामुळें राणीला मरण आले. सुदामा दुःखाने रडू लागले. कारण ती राणी सुंदर आणि सुशील होती. लोकांनी सांगितले, 'रडू नका'. आमच्या गावचा नियम आहे कीं जिथे तुमची बायको गेली असेल तिथे तुम्हांलाही पाठविले जावे. पत्नीच्या चितेंत तुम्हांला देखील प्रवेश करावा लागेल.

आतां सुदाम्यांनी पत्नीविषयीं रडणे बंद केले, स्वतःसाठीच रडणे सुरू केले. 'हाय! आतां माझे कसे होईल? त्यांनी लोकांना सांगितलें कीं, 'मी तर परदेशी मनुष्य आहे. तुमच्या गांवाचा नियम मला लागू होऊ शकत नाहीं. मला एकदा स्नान, संध्या करून घेऊ द्या. मग वाटल्यास तुम्ही मला जाळून टाका. ते स्नान करू लागले. चार पुरुष पहारा करू लागले. हेतू हा कीं सुदामा कोठे पळून न जावो. सुदामा खूप भ्याले आणि घाबरल्यामुळें परमेश्वराचे स्मरण करू लागले.

ते रडत रडत नदीच्या बाहेर आले. त्यावेळी नदीतीरावर उभे राहून भगवंत पीतांबर नेसत होते. भगवंतांनी विचारले कीं 'तू कां रडत आहेस?' सुदामा म्हणाले, 'ते सर्व कोठे गेले? हे सर्व काय आहे? मला तर कांहींच समजत नाहीं.' भगवंत म्हणाले, 'हीच माझी माया आहे. माझ्याविना जो आभास होतो तीच माया आहे.'

मायेचा अर्थ आहे विस्मरण. 'मा' निषेधात्मक आहे. 'या' प्रकारात्मक आहे. याप्रकारे जे नाहीं

ते दाखवील ती माया!

मायेचे तीन प्रकार आहेत: १) स्वमोहिका २) स्वजनमोहिका ३) विमुखजनमोहिका,

जो सतत ब्रह्मदृष्टी ठेवतो त्याला माया बांधू शकत नाहीं. माया जीवाशी निगडित आहे हा सिद्धान्त तत्त्वदृष्टीनें खरा नाहीं.

माया नर्तकी आहे. ती सर्वांना नाचवीत असते. नर्तकी-मायेच्या मोहांतून सुटायचे असेल तर नर्तकी शद्वाला उलटा करा म्हणजे होईल कीर्तन. कीर्तन कराल तर माया सुटेल. कीर्तनभक्तींत प्रत्येक इन्द्रियाला काम मिळते. याकरताच महापुरुषांनी कीर्तनभक्तीला श्रेष्ठ मानले आहे.

मायेचा पार गांठण्यासाठी, माया ज्या मायापति परमात्म्याची दासी आहे त्याला प्राप्त करण्याचा प्रयत्न करा. मायेच्या पीडेतून सुटका करून घेऊ इच्छित असाल तर माधवरायाला शरण जा.

राजन्, याकरिता मनुष्यानें प्रत्येक स्थानी आणि प्रत्येक क्षणी आपल्या संपूर्ण शक्तीनिशी भगवान श्रीहरीचें श्रवण, कीर्तन आणि स्मरण करीत असावे.

मायेची जास्त चर्चा करू नका. ब्रह्मदेवांनी नारदांना अशी आज्ञा केली होती कीं माया ज्यांची दासी आहे अशा मायापति परमात्म्याच्या चरणांचा आसरा घेऊन प्रभुभक्ति वाढेल, अशा रीतीने या सिद्धान्ताचा प्रचार करा. नारदांनी हा उपदेश व्यासांना दिला. व्यासांनी त्या चार श्लोकांच्या आधारे हजारो श्लोकांच्या भागवतशास्त्राची रचना केली.

**हरे राम हरे राम, राम राम हरे हरे।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥**

**॥ द्वितीय स्कंध समाप्त ॥**

●●●

॥ श्रीहरिः ॥

# ॥ तृतीय स्कंध ॥

**श्रीकृष्णाय नमः॥**

आत्म्याला शरीर बंधनांत ठेवते. शरीर जड आहे. आत्मा चेतन आहे. परंतु जड-चेतनाची ही ग्रंथि असत्य आहे. कारण चेतनाला जड कसे बांधू शकेल? ज्याप्रमाणे स्वप्नांत आपल्याला रडविले जाते त्याचप्रमाणे ही ग्रंथि असत्य असूनही, आम्हाला रडविते. तत्त्वतः पाहिले तर जड शरीर चेतन आत्म्याला बांधून ठेवू शकते असे आम्हाला म्हणता येणार नाही. चेतन आत्म्याला जड शरीर बंधनांत ठेवू शकत नाही. आत्मा शरीराहून भिन्न आहे, हे सगळ्यांनाच माहीत असते; परंतु याचा अनुभव फार कमी लोक घेऊ शकतात.

शुकदेव म्हणतातः हे राजन्, तू जसे प्रश्न करीत आहेस तसेच प्रश्न विदुरांनी मैत्रेयाला विचारले होते. हे विदुर असे आहेत कीं आमंत्रणाशिवायच भगवंत त्यांचे घरीं गेले होते.

परीक्षित म्हणतोः विदुर आणि मैत्रेय यांची भेट केव्हा झाली ते मला सांगा.

**१. आमंत्रणाविना भगवंतांचें विदुराघरीं आगमनः**

शुकदेव म्हणतातः आमंत्रणाशिवाय भगवंत विदुरांच्या घरी गेले होते, त्या प्रसंगाची हकीकत प्रथम सांगतोः

धृतराष्ट्रानें पांडवांना लाक्षागृहांत जाळण्याचा प्रयत्न केला होता. विदुरांनी धृतराष्ट्राला उपदेश दिला होता, परंतु त्याचा धृतराष्ट्रावर कांहीच परिणाम झाला नाही. विदुरांनी विचार केला कीं हा धृतराष्ट्र दुष्ट आहे. ह्याच्या कुसंगतींत माझी बुद्धी देखील नष्ट होऊन जाईल. तरी पण त्यांनी धृतराष्ट्राला कैक वेळा उपदेश केला, परंतु धृतराष्ट्राने एकदाही ऐकले नाही. म्हणून विदुरानें धृतराष्ट्राचें घरच सोडून दिले.

आपली पत्नी सुलभा हिच्याबरोबर समृद्ध घर सोडून विदुर वनांत निघून गेले. वनवासाशिवाय जीवनांत सुवास येत नाही. याचकरिता रामचंद्रांनी आणि पांडवांनी वनवास पत्करला. विदुर तर पहिल्यापासूनच तपस्व्यासारखे आयुष्य घालवीत होते आणि भगवंताचें कीर्तन करीत होते. यासाठीच दुर्योधनाच्या येथील मिष्टान्नाला सोडून श्रीकृष्णांनी विदुराच्या घरी भाजी भक्षण केली होती.

विदुर आणि सुलभा वनांत नदीच्या काठी कुटी बांधून राहू लागले आणि तपश्चर्या करू लागले. ते दररोज तीन तास कृष्णकथा, तीन तास कृष्णसेवा, तीन तास प्रभूचें ध्यान, तीन तास प्रभूचें कीर्तन आणि तीन तास प्रभुसेवा करू लागले. बारा वर्षेपर्यंत याप्रमाणे भगवंताची उपासना करीत राहिले.

मनाला सतत सत्कर्मांत लावून ठेवा. नाहीतर मन निगरघट्ट होऊन पाप करीत राहील. भगवंताचे ते कीर्तन करीत असत आणि भूक लागल्यावर केवळ भाजी खात असत.

भोजन करणें पाप नाही. जेवणांतच मग्न होणे आणि जेवायच्या वेळी भगवंताला विसरून जाणे पाप आहे. पुष्कळसे लोक कढी पिता पिता त्यांतच भान हरपून जातात आणि दुसऱ्या दिवशी माळ फिरवीत असतांनासुद्धा कढीची आठवण काढतात. मनांत विचार करतात कीं कालची कढी किती स्वादिष्ट झाली होती !

विदुरांनी ऐकलें की द्वारकानाथ शिष्टाई करण्यासाठी हस्तिनापुरांत येत आहेत. धृतराष्ट्रांनी सेवकांना आज्ञा केली कीं कृष्णाच्या स्वागताची तयारी करा. त्याच्यासाठीं उत्तम प्रकारचीं पक्वान्नें तयार करा.

धृतराष्ट्र ही सेवा कुभावानें करीत आहे. सेवा नेहमी सद्भावाने करायला पाहिजे. कुभावाने सेवा करणाऱ्यावर भगवंत प्रसन्न होत नाहीत; जो सद्भावाने सेवा करतो त्याच्या सेवेने ते प्रसन्न होतात.

विदुर गंगास्नान करायला गेले होते. तिथे त्यांनी ऐकले की उद्या तर रथयात्रा निघणार आहे. चौकशी केल्यावर लोकांनी सांगितलें की उद्या द्वारकेहून भगवान श्रीकृष्ण येत आहेत. विदुर घरी परत आले. ते खूपच आनंदांत दिसत होते. त्यांच्या बायकोने विचारले, 'कोणत्या कारणाने आज आपण फार खूष दिसत आहांत ?'

विदुर म्हणाले: सत्संगाच्या वेळी सगळी गोष्ट सांगीन. मी कथेमध्ये ऐकले होते की जो बारा वर्षेपर्यंत सतत सत्कर्म करील त्याच्यावर भगवंत कृपा करतात. बारा वर्षें एकाच जागीं राहून ध्यान करणाऱ्याला प्रभु दर्शन देतात. मला असे वाटते आहे की द्वारकानाथ दुर्योधनासाठी येत नसून माझ्याचसाठी येत आहेत.

सुलभा म्हणाली: मला स्वप्नांत रथयात्रेचें दर्शन झाले होते. ते स्वप्न खरे होईल. गेल्या बारा वर्षांत मी कधीच अन्न खाल्ले नाही.

विदुर म्हणतात: देवी, तुझ्या तपश्चर्येचें फळ उद्या मिळेल. उद्या परमात्म्याचें दर्शन होईल.

सुलभाने विचारले: तुमची प्रभूशी कांही ओळख तरी आहे का ?

विदुर म्हणाले, "मी जेव्हा कृष्णाला वंदन करतो तेव्हा ते मला "काका" म्हणून हाक मारतात. मी तर त्यांना म्हणतो, मी अधम आहे, तुमचा दासानुदास आहे. मला काका म्हणू नका."

जीव जेव्हा नम्र होऊन प्रभूला शरण जातो तेव्हा ईश्वर त्याचा सन्मान करतो. सुलभेच्या मनांत एकच भाव आहे कीं भगवंतांनी तिच्या येथे भोजन करावे म्हणजे ती त्यांना प्रत्यक्ष न्याहाळून पाहू शकेल.

सुलभा म्हणाली, "ते जर तुमच्या ओळखीचे आहेत तर त्यांना आपल्या घरी येण्याचे निमंत्रण द्या. मी तर मनोभावे त्यांना दररोज नैवेद्य अर्पण करीत असते. आता माझी ही इच्छा आहे कीं माझ्या दृष्टीसमोर प्रत्यक्ष रूपाने त्यांनी भोजन करावे."

विदुर म्हणाले, "माझ्या आमंत्रणाचा अव्हेर तर ते करणारच नाहीत, पण या लहानशा झोपडींत आपण त्यांचा आदरसत्कार कसा करू शकू ? त्यांच्या येण्याने आम्हांला आनंदच होईल, पण त्यांना मात्र कष्टच होतील. माझे भगवंत पक्वान्नांचे भोजन करीत असतात. धृतराष्ट्राच्या घरीं त्यांचे चांगले स्वागत होईल. माझ्याजवळ तर भाजीशिवाय कांहीच नाही. मी त्यांना काय अर्पण करू ? आपल्या येथे येण्याने द्वारकाधीशाला परिश्रम होतील. आपल्या स्वतःच्या सुखासाठी भगवंताला मी थोडेसुद्धा कष्ट देऊ इच्छित नाही." हीच पुष्टिभक्ति आहे.

सुलभा म्हणाली, "माझ्या घरांत आणखी दुसरी वस्तू भलेही नसो, परंतु माझ्या हृदयांत प्रभूकरता अपार प्रेम तर आहे. तेच मी भगवंतांचे चरणीं समर्पित करीन. आम्ही जी भाजी खातो तीच मी

प्रभूंना प्रेमाने खाऊ घालीन.''

जीभ शुद्ध राहिल्याने चारित्र्यही शुद्ध राहते आणि जीभ चवचाल झाल्याने आचरणांतही बिघाड होतो. साध्या सात्त्विक जेवणाने आचरणही शुद्ध राहते. जर आहार साधा आणि पौष्टिक असेल तर शरीरांत सात्त्विक गुणांची वृद्धि होईल. सत्त्वगुणाच्या वाढीने सहनशक्तीसुद्धा वाढते आणि अंती बुद्धि स्थिर होते.

म्हणून विदुरांसारखी साधी राहणी ठेवा. ज्याचें जीवन सरळ साधे आहे तो अवश्य साधू होईल.

सुलभा म्हणाली, 'मी गरीब आहे म्हणून काय झाले. गरीब असणें काय अपराध आहे का? तुम्ही कथेंत कित्येक वेळा सांगितले आहे की प्रभु प्रेमाचे भुकेले आहेत. भगवंताचें गरिबांवर जास्त प्रेम असते.'

विदुर म्हणाले, 'भगवंत राजप्रासादांत जातील तर तेथेच सुखाने राहू शकतील. माझ्या घरांत त्यांना कष्ट होतील. म्हणून मी भगवंतांना येथे आणू इच्छित नाही. देवी, आपल्यामधे अजून कांही पाप शिल्लक आहे. मी तुला उद्या कृष्णाच्या दर्शनाला घेऊन जाईन. परंतु प्रभु आपल्या येथे येतील अशी आशा आता करू नको. ते नंतर केव्हांतरी आपल्या घरी अवश्य येतील.'

प्रभु, आज नाही तर पांचदहा वर्षांनंतर केव्हातरी येतील या आशेवरच वैष्णव जीवन जगत असतो. नाहीतर कमीतकमी आयुष्याच्या अंतकाळपर्यंत तर येतीलच येतील अशी त्याची भावना असते.

सुलभाला वाटले की, संकोचामुळे पति आमंत्रण देत नाहीत. पण मी तर मनांतच त्यांना आमंत्रण देईन.

दुसऱ्या दिवशी विदुर आणि सुलभा बाळकृष्णाची सेवा करीत असता बाळकृष्ण स्मित करीत होते. विदुर आणि सुलभा बाळकृष्णाची प्रार्थना करू लागले— 'रथयात्रेच्यावेळी मार्गात एकत्र झालेल्या ब्राह्मणवृंदांनी केलेली स्तुति ऐकून प्रत्येक पावली द्रवणारे दयेचे सागर, अखिल ब्रह्मांडाचे बंधू आणि समुद्रावर कृपा करण्याच्या हेतूने त्याच्या तटावर निवास करणारे जगन्नाथस्वामी सदैव माझ्या नेत्रांच्या सन्मुख राहो.'

नेहमी रथारूढ द्वारकानाथांचें दर्शन करा.

भगवान रथांत बसून जात आहेत.

जोपर्यंत जीव शुद्ध होत नाही तोपर्यंत भगवंत त्याच्याशी डोळा मिळवीत नाहीत; आणि जोपर्यंत चार डोळे एकत्र होत नाहीत तोपर्यंत दर्शनाचा आनंद मिळत नाही.

विदुर आणि सुलभा देखील रथ पाहात आहेत. विदुर मनांत म्हणूं लागले, 'माझी तर अशी पात्रता नाही की भगवंत माझ्या घरी येतील. पण एकदां तरी नजरेने माझ्याकडे पाहणारसुद्धा नाहीत का? मी पापी आहे, पण माझे प्रभु तर पाप्याचे उद्धारक आहेत-पतितपावन आहेत! त्यांच्यासाठी मी सर्वच विषयांचा त्याग केलेला आहे. नाथ, तुमच्यासाठी मी काय काय सहन केले? बारा वर्षांपासून मी अन्न ग्रहण केले नाही. प्रभु! माझ्याकडे एक क्षणभर देखील पाहणार नाही का? कृपा करा. हजारो जन्मांपासून आपणापासून वेगळा राहिलेलो आहे, पण आज तुम्हाला शरण आलो आहे.'

लोकांच्या गर्दीतून रथ पुढे पुढे जात होता. प्रभूचे डोळे तर खाली पाहात होते. विदुर-सुलभांनी दर्शन घेतले. श्रीकृष्णांनी देखील विदुरकाकांना पाहिले. विदुर कृतार्थ झाले. म्हणाले: चला, भगवंतांनी माझ्याकडे पाहिले तर! श्रीकृष्णांचे हृदय देखील भरून आले. दृष्टि प्रेमानें आर्द्र झाली. भगवंतांना वाटले माझे विदुर न जाणे केव्हापासून माझी वाट पाहात आहेत.

सुलभाला वाटले की, प्रभु तिच्याकडेच पाहून हसत होते. मनात म्हणाली, "भगवंतांनी माझ्याकडे पाहिले, भगवंतांना माहीत आहे कीं मी विदुराची पत्नी आहे, म्हणूनच त्यांनी माझ्याकडे दृष्टिक्षेप टाकला."

प्रभूंनी डोळ्यांनीच विदुरांना सांगितले की, 'मी तुमच्या घरी येईन; परंतु अतिआनंदांत असलेल्या विदुर-सुलभांना भगवंताचा संकेत समजला नाही.

कृष्ण हस्तिनापुरांत गेले. तेथे धृतराष्ट्र आणि दुर्योधन प्रभूंच्या स्वागताची तयारी एक महिन्यापासून करीत होते. प्रभूंचे आगमन झाले. प्रभूंनी धृतराष्ट्र, दुर्योधनाला सांगितले की मी द्वारकेच्या राजाच्या नात्याने नाही, तर पांडवांचा दूत बनून आलो आहे.

पांडवांचे नाव ऐकताक्षणींच दुर्योधनाने प्रभूंचा अपमान केला. दुष्ट दुर्योधनाने भगवंतांचा अपमान करीत सांगितलें कीं, 'भीक मागून राज्य मिळत नसते. सुईच्या अग्रावर ठेवली जाईल येवढी देखील भूमि मी पांडवांना देणार नाही. मी युद्धाला तयार आहे.' त्यांनी श्रीकृष्णांचे कांहीच ऐकले नाही. शिष्टाई करण्याच्या प्रयत्नांत श्रीकृष्ण सफल होऊ शकले नाही.

धृतराष्ट्राने भगवंतांना सांगितले की, या भावाभावांच्या भांडणापासून तुम्ही दूरच रहा. तुमच्यासाठी पक्वान्नांचे भोजन तयार आहे. स्वस्थतेनें भोजन करा.

श्रीकृष्ण म्हणालेल तुमच्या इथले अन्न खाल्ले तर माझी बुद्धी देखील भ्रष्ट होईल.

पाप्याच्या इथले अन्न खाल्लें कीं कोणाही व्यक्तीची बुद्धि भ्रष्ट होऊ शकते.

अनेक प्रकारचे खाद्यपदार्थ भगवंतांसाठी तयार केले गेले होते, तरी त्यांनी खाण्याचे नाकारले. इतर राजांना आशा होती कीं श्रीकृष्ण आपल्या येथे जेवण करतील, पण कृष्णांनी तर त्यांना आणि इतर सर्व ब्राह्मणांना निराश केले.

द्रोणाचार्यांनी विचारले, तुम्ही तर सर्वांचीच निमंत्रणें नाकारीत आहात, मग जेवायला कोठे जाल? भोजनाची वेळ झालेली आहे. कुठे न कुठे तरी भोजन करावेच लागेल. जर दुर्योधनाच्या येथे जेवायला कांही अडचण असली तर आपण माझ्या घरीं चलावे.

भगवंतांनी त्यांनाही नकार दिला आणि सांगितले कीं, मी तर माझा एक भक्त गंगाकिनारी राहात आहे त्याचे येथे जाईन.

द्रोणाचार्यांना समजून आले की, आपल्यासारखे शास्त्रसंपन्न ब्राह्मण आज हरले आहेत.

धन्य आहे विदुरांची!

भगवंतांनी विचार केला कीं येवढ्या दीर्घ काळापासून विदुर माझी प्रतीक्षा करीत आहेत तर मी आज त्यांच्याचकडे जातो.

इकडे विदुर विचार करीत आहेत कीं मी आजपावेतो अपात्रच राहिलो आहे म्हणून भगवंत माझ्याकडे येत नाहीत.

आज सुलभाचें ह्रदयदेखील मोठ्या आर्ततेने आणि आर्द्रतेने सेवा करीत आहे. तीं भगवंताची प्रार्थना करीत आहे की मी आपल्यासाठी सर्वस्वाचा त्याग केलेला आहे, तरी पण आपण येत नाही! गोपी खरंच म्हणतात कीं कन्हैयाचे मागे जे लागतात त्यांनाच तो रडवीत असतो. तुमच्यासाठी मी संसारसुखाचा त्याग केला, सर्वस्व तुमच्या चरणावर ठेवले, आणि तरी तुमचें आगमन माझ्या घरीं कां बरे होत नाही?

कीर्तनभक्ति श्रीकृष्णाला अतिप्रिय आहे. सूरदास भजन करू लागतात तर श्रीकृष्ण येऊन त्यांचे हातांत वीणा देतात. सूरदास कीर्तन करतात आणि कन्हैया ऐकतात.

भगवान नारदांना म्हणतात, ना माझा वैकुंठांत वास आहे ना योग्यांच्या हृदयांत. मी तर त्याच ठिकाणीं असतो कीं जिथे माझे भक्त प्रेमाने आर्द्र होऊन माझें कीर्तन करीत असतात.

झोपडीत विदुर-सुलभा भगवंताच्या नामाचें संकीर्तन करीत होते.. परंतु त्यांना हे माहित नाही कीं ज्याचे ते कीर्तन करीत आहेत तो आज साक्षात त्यांच्या दारीं येऊन उभा राहणार आहे.

मनुष्याचें जीवन पवित्र असेल तर भगवंत आमंत्रणाविना देखील त्याचे घरी येतील. जो परमात्म्याकरता जगत असतो त्याच्या घरीं परमात्मा स्वतः येत असतात.

न बोलावताच भगवंत आज विदुराच्या दारावर येऊन उभे राहिले. बाहेर प्रतीक्षा करता करता दोन तास होऊन गेले होते. सपाटून भूक लागलेली होती. भगवंत विचार करीत होते की यांचे कीर्तन केव्हा संपेल? विदुर-सुलभाचें आयुष्य तर प्रभूसाठीच होते.

शेवटी व्याकुळ होऊन भगवंतांनी झोपडीचें दार खटखटविले आणि म्हणाले, 'काका, मी आलो आहे.'

कीर्तन करावे तर असे करावे कीं भगवंत स्वतः येऊन तुमचें दार खटखटवितील.

विदुर म्हणाले: देवी, द्वारकानाथ आले आहेत असे वाटते.

दार उघडल्याबरोबर चतुर्भुज नारायणांचें दर्शन झाले. अत्यंत हर्षामुळे विदुर-सुलभा प्रभूला आसन देऊ शकले नाहीत, तर प्रभूंनी आपल्या हातानेच दर्भासन घालून घेतले आणि विदुरांना सुद्धा हात धरून आपल्याजवळ बसवून घेतले.

ईश्वर ज्याचा सन्मान करतो त्याचा मान चिरंजीव होतो.

भगवंत म्हणाले, 'मी उपाशी आहे, मला कांही खायला द्या.'

भक्ति इतकी सशक्त आहे की ती निष्काम भगवंताला सुद्धा सकाम करते. तशी तर भगवंताला भूकच लागत नाही, पण भक्तामुळे त्यांना खाण्याची इच्छा होते.

विदुरांनी विचारले: 'आपण दुर्योधनाचे येथे भोजन केले नाही का?'

कृष्ण म्हणाले, 'काका, ज्याच्या घरीं तुम्ही जेवू शकत नाही त्याच्या घरी मीही जेवू शकत नाही.'

ईश्वर उपाशी नसतो असा उपनिषदांचा सिद्धान्त आहे. जीवरूपी पक्षी विषयरूपी फळ खातो म्हणून दुःखी होतो. उपनिषदांचा हा सिद्धान्त चूक नाही. ईश्वर नित्य आनंदस्वरूप आहे. भागवताचा सिद्धान्तही खराच आहे. ईश्वर तृप्त आहे. परंतु जेव्हा एखाद्या भक्ताचें हृदय प्रेमाने भरून येते तेव्हा ते निष्काम असूनदेखील सकाम होतात. सगुण आणि निर्गुण एकच आहे. निराकार साकार होतो. ईश्वर प्रेमाचा भुकेला आहे. म्हणून ज्ञानापेक्षा प्रेम श्रेष्ठ आहे. प्रेमांत अशी शक्ति आहे की ते जडाला देखील चेतन करते. निष्कामाला सकाम करते, निराकाराला साकार करते. वस्तूचें परिवर्तन करण्याची शक्ति ज्ञानांत नाही, प्रेमांतच आहे.

पति-पत्नी विचार करू लागले की, भगवंताचें स्वागत कसे करावे? ती दोघे तर तपस्वी होती आणि केवळ भाजीच खात असत. त्यांना संकोच वाटत होता कीं कृष्णाला केवळ भाजीच कशी खाऊ घालायची? दोघांनाही कांही सुचत नव्हते.

इतक्यांत द्वारकानाथांनी चुलीवरून भाजीचे भांडे काढून घेतले आणि त्यांतील भाजी खाऊही लागले. स्वादिष्टता आणि गोडी वस्तूंत नाही, परंतु प्रेमांत आहे. शत्रूकडची शिरा-पुरीसुद्धा विषासारखीच वाटते.

भगवंताला दुर्योधनाच्या इथली मिष्टान्ने चांगली वाटली नाहीत, पण विदुराच्या इथली भाजी खाल्ली.

शुकदेव म्हणू लागले; राजन्, संगतीचा रंग मनालासुद्धा लागतो. मनुष्य जन्मापासून भ्रष्ट असत नाही. जन्माच्या वेळी तर तो शुद्धच असतो. मोठा झाल्यावर ज्याच्या संगतींत तो राहतो त्याचाच रंग त्याला लागत असतो. जशी संगति असेल तसेच व्हाल. सत्संगाने जीवन उज्ज्वल होते आणि कुसंगतीने भ्रष्ट होते.

विचार करा कीं मूल जेव्हा जन्माला येते तेव्हा तर ते निर्व्यसनी असते. त्यावेळी त्याला वाईट सवय नसते कीं कांही अभिमानही नसतो. मोठा झाल्यावर त्याला जशी संगत मिळेल तसेच त्याचें जीवन बनते-बिघडत असते.

आंब्याच्या झाडाच्या चारी बाजूला बाभळी लावल्या तर आंबे मिळायचे नाहीत. विलासी माणसाची संगत असेल तर मनुष्य विलासी होईल आणि विरक्ताचा संग मिळाला तर विरक्त होईल. इतर कांहीही बिघडो, पण मन आणि बुद्धि बिघडू (भ्रष्ट होऊ) देऊ नका. हृदयाला लागलेला डाग कदाचित तीन जन्मांतही निघणार नाही.

संगतीचा रंग तर मनाला लागतच असतो. ज्ञान, सदाचरण, भक्ति, वैराग्य इत्यादींमधे जो महापुरुष तुमच्यापेक्षा पुढे (मोठा) असेल त्याचाच आदर्श आपल्या दृष्टीसमोर ठेवा. रोज अशी इच्छा करा की शंकराचार्यांसारखे ज्ञान, महाप्रभूंसारखी भक्ति आणि शुकदेवांसारखे वैराग्य मला मिळावे. प्रातःकाळी ऋषींचें स्मरण केल्याने त्यांचे सद्‌गुण आपल्या जीवनांत उतरतात. आपापल्या गोत्रांच्या ऋषींचे देखील स्मरण केले पाहिजे. आजकाल तर लोकांना आपले गोत्रही ठाऊक नसते.

रामदेखील वसिष्ठांना नमस्कार करीत. त्यांचा सन्मान ठेवीत.

सांसारिक व्यवहार करीत असता ब्रह्मज्ञानी होणे आणि भक्ति करणें कठीण आहे. संगतीचा परिणाम खूप होत असतो. चोरी आणि व्यभिचार महापाप मानले गेले आहे. असे पाप करणारा जरी आपला भाऊ असला तरी त्यालाही सोडून द्या, त्याचा त्याग करा.

कोणत्याही जीवाचा तिरस्कार करू नका. पण त्याच्या पापाचा मात्र अवश्य तिरस्कार करा.

धृतराष्ट्रासारख्या दुष्ट व्यक्तीच्या संगतीने जीवन भ्रष्ट होईल, हा विचार करूनच विदुरांनी गृहत्याग केला होता आणि गंगाकिनारी राहून ते भक्ति करीत होते. भाजी खाऊनच ते संतुष्ट होते. इंद्रियसुखांत अडकलेला मनुष्य भक्ति करू शकत नाही. आहार असा करा कीं जो इंद्रियें आणि जीवन या दोघांनाही स्वस्थ ठेवील.

तसे तर धृतराष्ट्राने विदुरांसाठी पुष्कळ कांही पाठविले होते, पण विदुरांनी कांहीच घेतले नाही.

पाप्याच्या इथले कांहीसुद्धा खाऊ नये. अन्नदोष प्रभूच्या कीर्तन-भजनांत बाधक आहे.

भगवंत जेव्हा कृपा करतात तेव्हा धनसंपत्ति देत नाहीत, पण खऱ्या साधुसंतांचा सत्संग मिळवून देतात. सत्संग ईश्वरकृपेनेच मिळत असतो. परंतु कुसंगतींत न राहणे तर आपल्या हातची गोष्ट आहे, आपल्याच आटोक्यातील आहे. कुसंगाचा अर्थ आहे नास्तिकाचा संग – कामी व्यक्तीचा संग. पाप्याची संगत करू नका.

पुढे कथा-भाग येणार आहे कीं विदुरांनी धृतराष्ट्र-दुर्योधनाचा त्याग केला आणि तीर्थयात्रेला निघून गेले. कारण ते कुसंगतींत राहू इच्छित नव्हते.

जीव (मनुष्य) जोपर्यंत लौकिक सुखाचा त्याग करीत नाही तोपर्यंत प्रभूला त्याच्याविषयीं दया येत नाही. सर्वस्वाचा त्याग करून विदुर-सुलभा परमेश्वराची आराधना करीत होते.

तपश्चर्या केल्याने पाप जळत असते, जीव शुद्ध होतो. गृहस्थाचा हाच धर्म आहे की त्याने वर्षांतील अकरा महिने कुटुंबात घालवावे आणि एक महिना एखाद्या पवित्र तीर्थस्थानांत एकांतांत राहून परमेश्वराची आराधना करावी, तप करावे. त्यावेळी त्याने भक्ति आणि तपांतच राहावे; इतर प्रवृत्तींचा त्याग करावा. जे कांही करायचे असेल ते प्रभूकरताच करावे. तप केल्याने परमेश्वर प्रसन्न होतो.

तपाचें पहिले पाऊल म्हणजे जिभेवर ताबा. ज्या व्यक्तीच्या खूप गरजा असतात ती व्यक्ती कधी तप करू शकतच नाही. आजकाल लोक आपल्या गरजा वाढवीत चालले आहेत. याचा परिणाम असा होतो कीं संपत्ति आणि वेळेचा व्यय इंद्रियांना संतोषविण्यात निघून जातो. मनुष्य साधना तर करीत नाही आणि गाऱ्हाणे मात्र करतो की परमेश्वर दर्शन देत नाही. भगवंत इतके सुलभ नाहीत; दुर्लभ आहेत.

विदुरांनी परमात्म्याला प्रसन्न करायला फार मोठी तपश्चर्या केली होती आणि तेव्हाच भगवंतांना दया आली, 'माझ्या भक्ताने माझ्यासाठी किती कठोर कष्ट केले आहेत! म्हणून ते न बोलावताच विदुराच्या घरीं येऊन पोचले. विदुरांचे प्रेमच इतके खरे होते की त्यांच्याकडून कांहीतरी मागण्याची स्वतः प्रभूंनाच इच्छा झाली.

जेव्हा भगवंतांच्या हृदयांत तुमच्याकडून कांही मागण्याची इच्छा होईल तेव्हाच समजा कीं तुमची भक्ति खरी आहे. ज्याच्यावर प्रेम असते त्याच्याकडून मागूनही खाल्ले जाते. प्रेम असेल तर कन्हैया लोणी देखील मागेल. ज्या ठिकाणी प्रेम नसेल तेथून न मागताही कांही मिळाले तर ते खायची इच्छा होणार नाही. परमेश्वर प्रेमाचे आधीन होत असतो. जो ईश्वरावर प्रेम करण्याची इच्छा ठेवतो त्याने जगतावर अधिक प्रेम ठेवू नये. जगताचा तिरस्कारही करू नका आणि जास्त आसक्तीही ठेवू नका. प्रेम करण्याला पात्र केवळ ईश्वरच आहे. त्याच्यावर तुम्ही अधिकाधिक प्रेम करा.

विदुराच्या येथे परमेश्वराचें आगमन झाले. विदुराची आणि सुलभाची भावना आणि भक्ति सफल झाली. प्रभूंनी त्यांच्या येथील भाजी ग्रहण केली.

सत्कार्य असे करा कीं न बोलावताच परमेश्वर येण्याची इच्छा करतील. मैत्री समसमान व्यक्तींमधे होते. जीव जर ईश्वरासारखा झाला तर त्याला भेटायला भगवंत स्वतः येतील.

प्रभू धृतराष्ट्राच्या घरचें पाणी देखील प्यायले नाहीत, म्हणून कौरवांचा नाश झाला.

शुकदेव राजाला कथा सांगत आहेत.

**२. दुर्योधन विदुरांचा सदुपदेश न मानतां त्यांचा अपमान करतो :**

दुर्योधनाने पांडवांचे राज्य हडप करून घेतले. पांडवांना वनवास मिळाला. वनवासाहून परत आल्यावर युधिष्ठिराने राज्याचा आपला हिस्सा मागितला. परंतु धृतराष्ट्र आणि कौरवांनी हिस्सा देण्याचे नाकारले. भगवान श्रीकृष्ण पांडवांच्या बाजूने संधि करण्यासाठी आले, परंतु कुरुराजाने त्यांचे म्हणणें ऐकले नाही. नंतर विदुरांनीसुद्धा धृतराष्ट्राला समजाविले. विदुरांनी धृतराष्ट्राला ज्या न्याय आणि धर्माच्या गोष्टी सांगितल्या त्या 'विदुरनीति' या नावाने प्रसिद्ध आहेत.

जो दुसऱ्याचें धन हरण करतो तोच धृतराष्ट्र होय. ज्याचे डोळे नुसते पैशाअडक्याकडे लागलेले असतात तो डोळे असून आंधळाच असतो. पापी पुत्रावर प्रेम ठेवणारा बाप धृतराष्ट्र असतो. त्या युगांत तर संभवतः एकच धृतराष्ट्र होता; आज तर हजारो, लाखो असतील.

विदुर धृतराष्ट्राला म्हणाला, दुर्योधन पापी आहे. तो तुझा मुलगा नाही, तर तुझे पापच पुत्राचें

रूप घेऊन आले आहे.'

पुष्कळ वेळा आपले पापच पुत्ररूप घेऊन येते आणि सतावीत असते. शास्त्रांत म्हटले आहे कीं दुराचारी पुत्र मातापित्यांची दुर्गति करतो. सदाचारी पुत्र मातापित्यांना सद्‌गति देतो. दुराचारी पुत्राची संगत सोडून द्या. माना कीं आपले पापच पुत्ररूपानें आलें आहे. लहान मुलांना पापाची भीती दाखवीत राहिल्याने ते ऐकून घेतील. आजकालचा तरुण पापाचे भय बाळगत नाही. म्हणून तो मारही खातो.

विदुर म्हणतात, 'हे धृतराष्ट्रा! दुर्योधन दुराचारी आहे, तो तुझ्या वंशाचा नाश करण्यासाठीच आला आहे.'

चोरी आणि व्यभिचार महापापे आहेत. इतर पापे क्षम्य होऊ शकतात, पण ही दोन पापें क्षम्य होऊ शकत नाहीत. कांही चोर जेलची हवा खातात तर कांही महालाची. चोर कोण असतो? जो स्वतः परिश्रम करीत नाही आणि दुसऱ्याचे धन लुटतो तोच चोर होय. ज्याचें आहे त्याला दिल्याशिवाय जो खात असतो तोही चोरच होय. ऐपत असतानासुद्धा जो अतिथींचा यथास्थित सत्कार करीत नाही तोसुद्धा चोरच. जो केवळ आपल्याकरताच अन्न शिजवतो आणि खातो तोही चोरच असतो. अग्नीला आहुती दिल्याशिवाय जो खातो तोही चोरच. अमर्यादपणे नफा कमविणारा सुद्धा चोर. विचार करून पहा, यापैकी तुम्ही एखाद्या प्रकारचा चोर तर नाही ना! आणि विचारांतीं आपणही चुकत आहोंत असें वाटल्यास या अपप्रवृत्तींतून कसे व केव्हां सुटणार याचाही विचार करा.

धृतराष्ट्रा! दुर्योधन चोर आहे. प्रभू तर पांडवांनाच सिंहासनावर बसवतील. कारण प्रभूंनी त्यांना आपले म्हटले आहे. धर्मराज तुझ्या अपराधाची क्षमा करायला तयार आहे.

धर्मराज अजातशत्रु आहे. भागवताने दोन अजातशत्रू सांगितले आहेत: एक धर्मराज युधिष्ठिर आणि दुसरा प्रल्हाद.

धृतराष्ट्रा! तू दुर्योधनाचा मोह सोड, नाहीतर सगळ्या कौरवकुलाचा विनाश होऊन जाईल.

दुर्योधन इतका दुष्ट होता कीं तो द्रौपदीचें सौंदर्य पाहून अंतरीं जळत होता.

धृतराष्ट्र म्हणतो: 'विदुरा! विदुरा! तू म्हणतोस ते सर्व खरे आहे. पण दुर्योधन माझ्याजवळ आला कीं माझें ज्ञान लुप्त होऊन जाते.'

पापाचा बाप म्हणजे लोभ आणि त्याची आई ममता. लोभ आणि ममताच पापाची प्रेरणा देत असतात.

सेवकांनी दुर्योधनाला खबर दिली की विदुरकाका त्याच्या विरुद्ध बोलत होते. दुर्योधनाच्या अंगाची लाही लाही झाली आणि तत्काळच त्याने विदुरांना राजसभेंत बोलावून त्यांचा अपमान केला.

यक्षाने युधिष्ठिराला विचारले कीं नेहमी नरकांत कोणाला राहावे लागते? युधिष्ठिराने सांगितले होते कीं, 'आमंत्रित करून, इच्छापूर्वक आणि दुर्बुद्धीने कोणाचाही अपमान करणाऱ्याला नेहमी नरकांत राहावे लागते.'

दुर्योधन विदुरकाकांना म्हणतो; 'तुम्ही दासीपुत्र आहांत! माझें अन्न खाऊन माझीच निंदा करीत आहात! माझ्या घरांत राहून माझ्याच विरुद्ध कार्य करीत आहात!'

विदुर तसे धीरगंभीर होते. म्हणून निंदा सहन करीत.

सभेमध्ये झालेल्या निंदेने विचलित न होता जो तिला सहन करतो तो संत असतो. समर्थ असून देखील जो सहन करतो तो संत असतो. तो भगवंताचा अवतार होय.

तशी विदुरांमध्ये इतकी शक्ति होती की, एकाच दृष्टिपाताने ते दुर्योधनाला भस्मीभूत करू शकत

होते. परंतु विदुरांनी आपल्या ह्या शक्तीचा उपयोग केला नाही.

शक्तीचा दुरुपयोग करणारा दैत्य असतो. शक्ति, संपत्ति आणि वेळ यांचा विवेकपूर्वक सदुपयोग करणारा देव होऊ शकतो.

कष्ट सहन करीत राहाल तर संत बनाल. काही सासवा आपल्या सुनांवर जुलूम करीत असतात. त्यांचे म्हणणे असते कीं सुनांपेक्षा आम्ही मोठ्या आहोत म्हणून आम्हाला त्यांच्यावर हुकूमत चालवायचा अधिकार आहे. नेहमी असां विचार करा कीं, सून आणि सासू एकसारख्याच आहेत. सासू सुनेपेक्षा मोठी नाही. कोणत्याही जीवाला छोटा किंवा हलका समजू नका. जीव ईश्वराचेंच स्वरूप आहे.

विदुरांसारखे बारा वर्षे तप कराल तर सहनशक्ति येईल. सात्त्विक आहार करणाराच सहनशक्ति मिळवू शकतो. विदुरांनी बारा वर्षें भाजीच खाल्ली होती. तुम्ही कमीत कमी बारा महिने भाजीवरच राहाल तर सहनशक्ति येईल. तेल-मिरची पुष्कळ खाणाऱ्याचा स्वभावही मिरचीसारखा तिखटच होतो. अत्यधिक सहन कराल तर सुखी व्हाल. आहारविहार चांगले सात्त्विक असले म्हणजेच सहनशक्ति येते. या जीवाचा स्वभावच असा आहे की त्याला जे मिळालेले असते त्यांत तो संतुष्ट होत नाही. बुद्धि जर ईश्वरांत स्थिर ठेवाल तर तुम्ही सर्व काही सहन करू शकाल आणि संतुष्टही व्हाल. विदुरांनी फक्त भाजीतच संतोष मानला आणि ईश्वराची आराधना करीत राहिले.

अपमानामुळे विदुरांना काही दुःखही झाले नाही आणि ग्लानीही आली नाही. दुर्योधनाने राजसभेत त्यांचा अपमान केला तरी ते चिडले नाही. विदुरांनी नुसती भाजीच सेवन केली होती ना, म्हणून.

दुःख आणि राग यांना गिळून टाकण्याची शक्ति सात्त्विक आहारानेच येत असते. सुखी व्हायचे असेल तर कमी खा आणि राग गिळून टाका. मनुष्य सगळे काही खाऊन घेत असतो पण राग काही गिळू शकत नाही, राग पचविता येत नाही.

तुमची कोणी निंदा केली तर ती शांततेने सहन करा. त्यावेळी असे समजा की तो निंदक मला माझ्या दोषांचे भान करून देत आहे. माझे पाप धूत आहे. काही लोकांचा स्वभावच असा असतो की निंदारसांत डुंबल्याशिवाय त्यांना जेवणच पचत नाही. या जगाने कोणालाच सोडलेले नाही, सगळ्यांचीच निंदा केली आहे. निंदा करणाऱ्यावर रागवू नका. असे समजा की यांतही प्रभूचा काही संकेत आहे.

भगवंत मोठ्या दुःखाने म्हणतात की मानवकल्याणासाठी मनुष्य अवतार घेऊन मी पृथ्वीवर आलो होतो, तरीही लोकांनी माझी निंदा करायचे सोडले नाही. विदुरसुद्धा आपल्या अपमानांत प्रभुकृपेचाच अनुभव घेतात.

विदुर म्हणतात, ' दुर्योधन माझी निंदा करीत नाही तर त्याचे अंतर्यामी वसत असलेले नारायण मला कौरवांचा कुसंग सोडण्याचा आदेश देत आहेत. कौरवांचा कुसंग सोडून देण्याविषयीं ही प्रभूंचीच प्रेरणा आहे.

महापुरुष निंदेंतूनसुद्धा सारतत्त्व शोधून घेत असतात. जो चांगल्या वस्तूंत चांगलेपणा पाहील तो साधारण वैष्णव, परंतु जो वाईट वस्तूंतील चांगलेपणा पाहील तो उत्तम वैष्णव होय. प्रतिकूल परिस्थितींत देखील, वैष्णव प्रभूच्या अनुग्रहाचा अनुभव करीत असतो. भगवंतांनी विचार केला की, जर कौरवांकडेच विदुर राहिले तर कौरवांचा विनाश होऊ शकणार नाही. यासाठीच विदुरांना ते स्थान सोडण्याची प्रेरणा प्रभूंनी दिली.

रामायणांत रावणाने बिभीषणाचा आणि भागवतात दुर्योधनाने विदुरांचा अपमान केला होता. या प्रकारे संतांचा अपमान केल्यामुळेच रावण आणि दुर्योधन यांचा विनाश झाला.

कुटुंबांत कमीतकमी एक जरी माणूस पुण्यशील असेल तरी त्या कुटुंबाचा नाश होऊ शकत नाही; त्याचे कोणी अहित करू शकत नाही.

विदुरांच्या जाण्यामुळे कौरवांचा सर्वनाश झाला. बिभीषणाच्या जाण्यामुळे लंकेत रावण आणि इतर सर्वच राक्षसांचा संहार झाला.

दुर्योधनानें सेवकांना आज्ञापिले की, या विदुरांना धक्के मारून बाहेर घालवून द्या. परंतु विदुर तर समजून उमजून पहिलेच घराच्या बाहेर निघून गेले. धनुष्यबाण देखील तिथेच सोडून गेले. कौरवांना असा उपदेश दिला गेला होता कीं पांडवांशी धनुष्यबाणाने लढू नका. जर लढायचेच असेल तर वाणीने लढा.

विदुर तीर्थयात्रेला निघून गेले. धृतराष्ट्राने पाठविलेले धन त्यांनी परत पाठवून दिले.

आवश्यकता कमी करीत जाल तर पापसुद्धा कमी होत जाईल. आणि गरजा वाढवाल तर पापही वाढत राहील. प्राप्त परिस्थितीतील असंतोषच मनुष्याला पाप करण्याची प्रेरणा देतो. याचसाठी म्हटले आहे की पापाचा बाप असंतोष आणि लोभ होय.

जो पाप करीत नाही तो पुण्यच करीत असतो.

विदुर छत्तीस वर्षांची यात्रा करायला निघाले पण त्यांनी आपल्याबरोबर काहीच घेतले नाही. आणि आजकालचे लोक यात्रेला जाताना अनेक वस्तू बरोबर घेऊन निघतात. आपल्या गरजांची लांबलचक यादी करतात आणि त्यातून एकही वस्तू विसरणार नाही याची पूर्ण काळजी घेतात.

**३. तीर्थयात्रेचा उद्देश. तीर्थयात्रेत कसे रहावे, कसे वागावे ? :**

'यात्रा' चा अर्थ आहे याति त्राति. इंद्रियांना प्रतिकूल विषयांपासून सोडवून अनुकूल विषयांकडे लावणे म्हणजेच यात्रा. तीर्थयात्रा त्याचीच सफल म्हटली जाईल कीं जो तीर्थासारखा पवित्र होऊन परतेल.

नुसती यात्रा केल्यानेच पुण्य पदरी पडत नाही. कित्येक वेळा मनुष्य यात्रा करता करता पापाचेच गाठोडे बांधून परत येतो. यात्रा विधिपूर्वक केली पाहिजे. विधिपूर्वक यात्रा केल्यानेच पुण्य मिळत असते. यात्रेला निघायच्या आधी प्रतिज्ञा केली पाहिजे की, 'मी आता ब्रह्मचर्याचें पालन करीन, केव्हांही रागावणार नाही, खोटे बोलणार नाही, व्यर्थ भाषण करणार नाही.' अशी प्रतिज्ञा केल्यानंतरच यात्रेला आरंभ करावा.

आजकाल जवळ पैसा वाढल्यामुळे धनिक लोक यात्रेच्या नावावर हिंडायला फिरायला निघतात. अशा रीतीने तर कावळा देखील काशी-मथुरेचा फेरा करून येतो.

तीर्थांच्या ठिकाणच्या खऱ्या-खुऱ्या साधुसंतांची आणि ब्राह्मणांची निंदा करणाऱ्याला तीर्थयात्रेचे पुण्य मिळू शकत नाही. साधुसंतांविषयी सद्भाव नसेल तर तीर्थयात्रा विफल होते. गुरु शब्दाचा अपभ्रंश आहे गोर (यात्रा स्थानावरील पुजारी). काही असेही लोक असतात की ते गोराला (पुजाऱ्याला) पत्र पाठवून सूचना देतात की आम्ही इतकी इतकी माणसे यात्रेसाठी येत आहोत, यासाठी भोजन इत्यादींची व्यवस्था करावी. तीर्थांच्या ठिकाणचे गोर (पुजारी) काही आपले नोकर नाहीत ! तीर्थस्थानीं विधिपूर्वक स्नान केले पाहिजे. तेथे चुळा भरून, साबू इत्यादी लावून स्नान करू नये.

महाप्रभू दुःखाने म्हणत असत की अतिशय विलासी आणि पापी लोक तीर्थस्थानी जाऊ आणि राहू लागले आहेत. याच कारणाने तीर्थस्थानाचा महिमा लुप्त होऊ लागला आहे.

जेव्हा विदुर यात्रेला गेले तेव्हा त्यांनी बरोबर काय नेले? काहीच नाही. फक्त कौरवांचे पुण्यच बरोबर नेले होते. कारण त्यांनी विदुरांचा अपमान केला होता, निंदा केली होती.

तुमची कोणी निंदा केली, अपमान केला आणि तुम्ही तो सहन केला तर तुमचे पाप निंदकाला जाईल आणि त्याचे पुण्य तुम्हाला मिळेल.

तीर्थाचे ठिकाणीं जाल त्या दिवशी तेथे उपवास करा. ब्राह्मणांचा अपमान करू नका. खऱ्या साधुसंत ब्राह्मणांचा अपमान केल्याने तीर्थयात्रा विफल होत असते. उपवास केल्याने शरीर शुद्ध होते, पाप जळून जाते आणि सात्त्विक भाव जागृत होतो.

विदूर प्रत्येक तीर्थाचे ठिकाणीं उपवास करीत असत, आणि विधिपूर्वक स्नान करीत. पृथ्वीवर ते अवधूतवेषांत परिभ्रमण करीत असत. कारण त्यामुळे त्यांचे स्नेहीसंबंधी त्यांना ओळखत नसत. शरीराचा शृंगारदेखील करीत नसत. ते अल्प आणि पवित्र भोजन करीत. शुद्ध वृत्तीने जीवननिर्वाह करीत. प्रत्येक तीर्थात स्नान करीत. भूमीवरच शयन करीत आणि जेणेकरून भगवंत प्रसन्न होतील असे व्रत करीत.

संत तीर्थाला पावन करतात. भारद्वाज मुनि जेव्हा स्नानाला जात तेव्हा गंगा पंचवीस पायऱ्या वर येत असे. गंगा हे जाणत होती की इतर लोक मला पाप देण्यासाठी येतात, पण भारद्वाज मुनि तर मला पावन करायला येत असतात.

अतिसंपत्ति अनर्थाचें मूळ असते. यासाठीच भगवंतांनी सुवर्णाची द्वारका समुद्रांत बुडवून टाकली.

द्वारकेमधली भगवंताची मूर्ति मनोहर आहे. तिचे रूप अद्भुत आहे. खूप पाहत राहूनही मन तृप्त होत नाही. द्वारकाधीशांचे दर्शन लोकांनी अवश्य केले पाहिजे.

काशीचे माहात्म्यही पुष्कळ आहे. काशीचे प्रमुख देव आहेत भैरवनाथ.

काशीत नऊ महिने राहिलेल्याला पुनर्जन्म येत नाही, अशा अर्थाचा श्लोक काशीच्या मणिकर्णिका घाटावर लिहिलेला आहे.

शंकर ज्ञानाचे मुख्य देव आहेत. काशींत ज्ञान फार लवकर सिद्ध होते. ज्ञान मिळवायचे असेल तर तुम्हाला स्मशानांत राहावे लागेल. स्मशान ज्ञान-भूमि आहे. स्मशानांत राहण्याची जरुरी नाही, तरी स्मशानाची नेहमी आठवण ठेवण्याची गरज आहे. दिवसांतून दोन-तीनदा स्मशानाची आठवण कराल तर बुद्धीत परिवर्तन होईल.

कल्पना करा की तुम्ही काशीतच राहत आहात. इथे बसल्या बसल्याच गंगेचे स्नान करा. कलियुगात तर मनाने सत्कर्म करणाऱ्यालासुद्धा पुण्य मिळते.

तीर्थक्षेत्रांत गया (पितृगया) प्रसिद्ध तीर्थस्नान आहे. तिथे अनेक प्रकारची श्राद्धे करावी लागतात. प्रथम श्राद्ध फल्गु किनारी केले जाते आणि शेवटचे श्राद्ध अक्षयवटाच्या तळाशी करायचे असते. त्या ठिकाणीं करारविंद आणि पदारविंदवाले बाळकृष्ण निवास करतात. श्राद्धक्रिया करणारा पुरोहित कोणत्याही एखाद्या वस्तूचा त्याग करायला लावतो आणि भगवंताजवळ काही मागायला सांगतो.

प्रथम कशाचा तरी त्याग करावा आणि नंतर काही मागावे. जो भगवंताकरता त्याग करू शकतो त्यालाच भगवंताकडून काही तरी मागायचा अधिकार मिळतो.

बहुतेक लोक आपली जिच्याविषयी रुचि नसेल तीच वस्तू त्यागण्याची प्रतिज्ञा करतात; खाण्या-पिण्याविषयी सामान्य गोष्टी सोडून द्यायचा संकल्प करतात. परंतु या रीतीने भाजी-फळे इत्यादींचा त्याग करून काही लाभ होणार नाही.

जर पाप आणि विकाराचा त्याग कराल तर लाभ होईल. असे म्हणा की काशीविश्वेश्वराचे दर्शन करून 'काम' सोडून दिला आणि गोकुळ-वृंदावनाच्या यात्रेत क्रोधाचा त्याग केला. एका एका तीर्थस्थानांत एक एक पाप सोडून द्या. एक एक करून त्याग करा. प्रभूसाठी अतिप्रिय वस्तू त्यागाल तर ते प्रसन्न होतील.

काशी ज्ञानभूमि आहे. अयोध्या वैराग्यभूमि आहे. व्रज प्रेमभूमि आहे. व्रजरजांत कृष्णप्रेम भरलेले आहे. नर्मदेचा किनारा तपोभूमि आहे. नर्मदेच्या किनाऱ्यावर ज्ञान, वैराग्य आणि भक्ति तिन्ही सिद्ध होऊ शकतात. तीर्थस्थानांत क्रोध करू नका.

तीर्थस्थानी ब्रह्मचर्य इत्यादी व्रतांचे पालन कराल तरच तीर्थयात्रेचे फळ मिळेल.

**४. यात्रेंत विदुरांचे वृंदावनांत आगमनः**

यात्रा करीत करीत विदुर यमुनाकिनारी वृंदावनांत आले. प्रभुकृपेने तुम्हाला वेळ मिळू शकला तर चार महिने वृंदावनात राहून प्रभुभजन करा.

कृष्ण व्रजामध्ये अनवाणीच फिरत होते. यशोदा म्हणाली की, 'अनवाणी वनांत फिरण्याने खडे-काटे पायाला बोचतील म्हणून खडावा घालून जा.' कृष्ण म्हणाले, "गाईची सेवा करण्याकरताच तर मी तुमच्या इथे आलो आहे. गेल्या जन्मात मी दशरथ राजाच्या घरी राम झालो होतो तर मला गाईच्या सेवेची संधि कोणी दिलीच नाही. म्हणून मी विचार केला की, पुढे भविष्यांत मी एखाद्या गोपाळाच्या येथे जन्म घेईन आणि गो-सेवा करीन." जेव्हा ते पाच वर्षांचे होते तेव्हापासूनच गाईला खाऊ घातल्यानंतरच स्वतः जेवण्याचा त्यांचा नियम होता. कृष्ण म्हणाले, "माझ्या गाईंच्या पायांतही तर कांही नाही, मग मी तरी कसे खडावा घालू?"

कृष्णाची तशी कितीतरी नावे आहेत, परंतु एका वैष्णवाने म्हटले आहे की मला तर गोपाळकृष्ण हेच नाव फार आवडते. कृष्ण, व्रजांत उघड्या पायांनीच फिरत असत, म्हणून व्रज-रज अतिपावन आहे. द्वारकेत तर ते राजे होते म्हणून उघड्या पायाने फिरू शकत नव्हते.

विदुर व्रजांतील कृष्णरमणाच्या पवित्र रजांत लोळतात. रमण-रेतींत गोपींची देखील चरण-रज आहे. विदुर कृष्णाच्या मंगलमय लीलांचे चिंतन करतात. यमुनेच्या किनारी लौकिक गोष्टी करणे पाप आहे. ही भूमि अतिशय पवित्र आहे. श्रीकृष्ण येथे गाई चारायला येत असत. व्रजातील लीला नित्य आहे. भागवताचे प्रमुख टीकाकार श्रीधरस्वामींनी म्हटले आहे की, "भगवंताचे नाम, लीला, स्वरूप, धाम, परिकर नित्य आहेत. आजसुद्धा भगवान श्रीकृष्ण व्रजांत दररोज लीला करीत असतात."

भगवंत म्हणतात की जगताच्या कोणत्याही स्त्री, पुरुष, जड किंवा चेतन वस्तूंमध्ये आनंद नाही. तुम्ही माझ्याकडे या. मीच आनंदस्वरूप आहे.

श्रीकृष्ण आनंदरूप आहेत.

विदुरांना अनुभव आला की, श्रीकृष्ण गाईंना घेऊन यमुनाकिनारी आले आहेत. हा कदम्ब वृक्ष आहे. वैष्णव याला टेर कदम्ब म्हणतात. कदम्बावर झुलत असलेले श्रीकृष्ण बासरी वाजवीत आहेत आणि आपल्या आवडत्या गाईंना हाका मारीत आहेत. "हे गंगी, हे गोदावरी, या." विदुरांची भावना इतकी तीव्र होती की त्यांना कृष्णलीला प्रत्यक्ष दिसू लागली.

गाईंच्यामध्ये उभे असलेल्या श्रीकृष्णाचे ध्यान करा. अशा कृष्णाचे ध्यान करताना तन्मयता लवकर येत असते.

इंद्रियांचा विवाह परमेश्वराशी लावा, विषयांशी नाही.

भगवंताचें एक नाव आहे– हृषीकेश. त्याचा अर्थः हृषिक म्हणजे इंद्रिय, ईश म्हणजे स्वामी– इंद्रियांचे स्वामी– श्रीकृष्ण आहेत. हे पांच विषय इंद्रियांचे खरे पति नाहीत. ते पति होऊं इच्छितात. संसारातील कोणतेही रूप जोपर्यंत डोळे पाहात राहतील तोपर्यंत झोप येणार नाही. याचा अर्थच हा की रूप डोळ्यांचा पति नाही.

विदुर म्हणतात, "माझ्यापेक्षा हे पशु श्रेष्ठ आहेत. ते परमात्म्याला भेटण्यासाठी आतुर होऊन दौडत येताहेत. गाईसुद्धा कृष्णभेटीसाठी व्याकुळ आहेत! धिक्कार असो माझा की ज्या माझ्यात अजूनपर्यंत कृष्णभेटीची तीव्र इच्छाच उत्पन्न झाली नाही! गाई धावत आहेत आणि मी दगडासारखा बसलो आहे. त्यांचे डोळे प्रेमाश्रूंनी ओले झाले आहेत. असा प्रसंग केव्हा येईल की मी गाईंसारखा कृष्णाला भेटायला धावतच येईन." अशा रीतीने कृष्णलीलेचें चिंतन करता करता ते कृष्णप्रेमांत वेडे झाले आहेत, अत्यंत तन्मय झाले आहेत.

कशाही रीतीनें जगाला विसरून जा आणि प्रभुप्रेमांत तन्मय होऊन जा. सगळ्या साधनांचे हेच रहस्य आहे. विरह जेव्हा अतिशय तीव्र होतो तेव्हाच परमात्म्याची भेट होते.

प्रभु त्यावेळी प्रभासक्षेत्रीं होते. उद्धवाला ज्ञानाचा उपदेश दिला, भागवतधर्माचा उपदेश दिला. नंतर उद्धवाला बद्रिकाश्रमी जायला सांगितले, तर उद्धव म्हणाला, 'मला एकट्याला जायला भय वाटते. माझ्या बरोबर तुम्हीही चला.'

जीव जर ईश्वराला नेहमी आपल्यापाशी ठेवील तर तो केव्हांही भयभीत होणार नाही.

उद्धवाला भागवतधर्माचा उपदेश मिळाला तरी त्याचे मन शांत होऊ शकले नाही. तो भगवंताला म्हणतो, "मी एकटा कसा जाऊ शकेन? आपण दोघे बरोबरच चलू."

केवळ निर्गुण ब्रह्माचे ज्ञान काही जास्त उपयोगी होऊ शकत नाही. सगुण ब्रह्माचा आधार घेऊनच निर्गुण ब्रह्माला ओळखायचे आहे.

श्रीकृष्णांनी उद्धवाला सांगितले की, "मी क्षेत्रज्ञरूपाने तुझ्या बरोबरच आहे. मी तुझ्यांतच सामावलेला आहे. माझे स्मरण करताक्षणीच मी प्रगट होईन. तर उद्धव म्हणतो, "काही तरी आधाराशिवाय भाव स्थिर होत नाही. मला एखादा आधार द्या." तेव्हा श्रीकृष्णांनी त्यांना आपल्या चरणपादुका दिल्या. मग उद्धवांनी ओळखले की आता द्वारकानाथ आपल्याबरोबर आहेत, आता मी अनाथ नाही, सनाथ आहे. उद्धवांचे प्रभूविषयीं प्रेम इतके प्रगाढ होते की भगवंतांच्या पादुकांमधे ते भगवंतांचेच दर्शन करीत. त्यांनी आपल्या डोक्यावर पादुका धारण केल्या.

मस्तक बुद्धिप्रधान आहे. त्यावर प्रभूंना बसविल्याने तुमच्या मनात काही विकार शिरायचा नाही.

शुकदेव म्हणतात, 'राजन्, उद्धव बद्रीकाश्रमी जात होते. त्यांना वाटेत यमुना आणि व्रजभूमीचे दर्शन झाले. माझ्या स्वामींची ही तर लीलाभूमि आहे.'

तीर्थस्थानांत नुसते स्नान करूनच मन पूर्णपणे शुद्ध होत नाही. तिथे वसलेल्या एखाद्या ब्रह्मानंदी संताचा सत्संग केल्याने मन अधिक शुद्ध होत असते.

उद्धवांच्या मनांत आले की आपण तेथे काही दिवस राहावे आणि एखाद्या हरिभक्ताचा सत्संग करावा. त्यांनी मनांत ठरवले की कोणी भगवंताचा लाडका भक्त भेटला तरच आपण बोलू, नाहीतर मौनच पाळू.

**५. वृंदावनांत विदुर-उद्धवांची भेट व त्यांचा सत्संग :**

वृंदावनांत आजदेखील अनेक साधू श्रीकृष्णाच्या गुप्त लीलांचे दर्शन करीत फिरत असतात. यमुनाकिनारी रमण रेतींत विदुर बसले होते. त्यांना दुरूनच पाहून उद्धवांना वाटले की, हे तर कोणी वैष्णव बसलेले आहेत आणि त्यांचे हृदय कृष्णप्रेमानें भरलेले आहे. जवळ गेल्याबरोबर उद्धवांनी ओळखले की हे महान भगवत्भक्त विदुर आहेत आणि त्यांनी विदुरांना वंदन केले. त्याचवेळी विदुरांनी डोळे उघडले आणि उद्धवाला म्हणाले, 'तुम्ही मला वंदन करावे हे बरोबर.नाही आणि विदुरांनी उद्धवाला नमस्कार केला. संतच संतांना बरोबर ओळखत असतो.

विदुर आणि उद्धव यांचा दिव्य सत्संग झाला.

मनुष्य सत्संगामध्ये जितका वेळ घालवतो तितकाच तो खऱ्या अर्थाने जीवन जगतो. संतांच्या भेटीत फक्त परमात्म्याचीच चर्चा होते. संतांना भेटल्यावर तुम्ही आपल्या लौकिक गोष्टी बोलू नका.

यमुनेला आनंद झालेला आहे की हे भक्त आज माझ्या प्रभूच्या लीलांचे वर्णन करतील. माझ्या श्रीकृष्णाच्या गोष्टी करतील. माझ्या श्यामसुंदराचे गुणानुवाद गातील, लीलागान करतील, मी आपल्या कृष्णाच्या लीलांचे वर्णन ऐकेन. यमुना शांत गंभीर झाली. त्या दोन भक्तांनी प्रथम बाललीला, मग पौगंडलीला, नंतर प्रौढलीला इत्यादी सगळ्या लीलांचे वर्णन केले.

उद्धव म्हणतात: मला प्रभूंनी प्रभासक्षेत्रीं भागवतधर्माचा उपदेश देऊन बद्रिकाश्रमाला जायची आज्ञा दिली आहे. तुमच्या दर्शनाने मला फार आनंद झाला आहे.

विदुर म्हणतात: ज्या भागवतधर्माचा उपदेश तुम्हाला प्रभूंनी केला तो मी ऐकू इच्छितो. मी जातिहीन आणि कर्महीन आहे. पण तुमच्यासारखे वैष्णव तर दयेचे सागर असतात. भगवंतांनी थोडीशी कृपा माझ्यावरही केली होती. तुम्ही माझी इच्छा पूर्ण करा. मी अधम आहे; तरीपण जो उपदेश प्रभूंनी आपणांस दिला होता तो मी श्रवण करण्याची इच्छा करीत आहे. तुम्ही कृपा करून मला सांगा.

उद्धव म्हणतात: आपण महान आहात!

मनुष्य जोपर्यंत दीन आणि नम्र होत नाही तोपर्यंत तो भगवंताला चांगला वाटत नाही. जिथे जिथे दृष्टी जाईल तिथे तिथे श्रीकृष्णदर्शनाचा भाव जागृत कराल तरच दीनभाव येईल.

विदुर, तुम्हाला अधिक काय सांगू? जेव्हा मला उपदेश दिला तेव्हा तेथे मैत्रेय बसले होते. भगवंतांनी जेव्हा स्वधामगमन केले तेव्हा वसुदेव, देवकी, रुक्मिणी, सत्यभामा इत्यादी कोणाचीच आठवण केली नाही. पण तुमची तीन वेळा आठवण केली होती. ते मला म्हणत होते की मला आपल्या विदुरांची आठवण येत आहे. ते मला भेटले नाही. एकदा त्यांच्या घरीं मी जी भाजी खाल्ली होती तिचा स्वाद मी अजूनपर्यंत विसरलो नाही. ती भाजी मला आजही आठवते.

भगवंत ज्याला आपला म्हणतील आणि आपला मानतील त्याचा बेडा पारच झाला असें समजा.

नेहमीच्या व्यवहारांत कोणी कोणाला म्हणत नाही की तू माझा आहेस. जीव मंदिरांत जाऊन म्हणतो की, देवा! मी तुमचा आहे आणि घरी परत आल्यावर पत्नीला म्हणतो, 'मी तुझा आहे!' मंदिरांत जो भगवंताचा होता तो घरी आल्यावर आणखीन कोणाचा झाला आहे. याच कारणास्तव भगवंत प्रसन्नही होत नाहीत आणि 'तू माझा आहेस' असेही म्हणत नाहीत. मंदिरांत जो भगवंताचा होता तो घरी परत आल्यावर तो कोणाचा होता ते विसरून गेला!

भगवंताला, तसे तर कित्येक म्हणतात की, आम्ही आपले आहोत' परंतु असे कोणीच म्हणत नाही की मी फक्त तुमचाच आहे, आणखी कोणाचा नाही.

जगात मनुष्य जोपर्यंत आणखी कोणाचा आहे तोपर्यंत तो भगवंताचा होऊ शकत नाही. भगवंत ज्याला आपला समजतात तो मायेच्या बंधनांतून मुक्त होऊन जातो. भगवंताला रोज प्रार्थना करा व एकदाच तुम्ही म्हणा की 'तू माझा आहेस.' भगवंत जेव्हा म्हणतील की 'तू माझा आहेस' तेव्हाच ब्रह्मसंबंध होईल.

तुलसीदास म्हणतात: माझ्यासारख्या कामी पुरुषाला आपला म्हणायला रामचंद्रांना लाज वाटते. तुमच्यासारख्या राजाधिराजांच्या अंगणात पडलेला कुत्रा आहे मी. मला आपल्या अंगणांत पडलेला राहू द्या. मला आपला म्हणा.

मी तुमची पट्टी गळ्यांत बांधली आहे. मी पापी आहे. तरी पण तुमचाच आहे. मी कुत्रा आहे पण रामाचा. परमात्म्यांनी मला आपला म्हटले आहे.

परमात्म्यांनी तुम्हाला एकदा आपले म्हटले म्हणजे मग जे कार्य त्याला आवडेल तेच करावे.

अल्पशा भोजनात संतोष मानून घ्या. पण भगवंताच्या अल्पशा भजनामध्ये केव्हाही संतुष्ट होऊ नका. भक्तीच्या अल्प साधनेने जो संतुष्ट होतो तो प्रभूप्राप्तीच्या मार्गावर पुढे जाऊ शकत नाही. भक्ति अशी करा की भगवंत तुमचे स्मरण करतील. तुमच्या स्मरणामुळे त्यांना चैन पडणार नाही.

भगवंतांनी विदुरांची तीन वेळ आठवण केली होती!

विदुर उद्धवाला विचारतात, "काय, खरोखरच भगवंतांनी माझी आठवण केली होती का?"

उद्धव म्हणतात: तुम्ही फार भाग्यवान आहात! भगवंतांनी तुमची एकच वेळ नाही, तीन वेळ आठवण केली होती. आणखी त्यांनी हेही म्हटले होते की सगळ्यांनाच मी कांही ना काही दिले आहे, परंतु विदुरांना मी काहीच देऊ शकलो नाही. याकरता मैत्रेयांना त्यांनी आज्ञा केली की, जेव्हा तुम्हाला विदुर भेटतील तेव्हा त्यांना ह्या भागवतधर्माचे ज्ञान द्या.

हे ऐकून विदुरांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. प्रेमाने विव्हळ होऊन त्यांना रडू कोसळले.

परमभक्त उद्धवाच्या मुखांतून भगवंतांच्या प्रशंसनीय कार्याची हकीगत आणि प्रभूचा अंतर्धान होण्याचा समाचार ऐकून आणि परमधामाला जाताना प्रभूंनी आपली आठवण केली होती हे जाणून तसेंच उद्धवाच्या निघून जाण्यामुळे विदुर प्रेमविव्हल होऊन रडू लागले.

उद्धव बद्रिकाश्रमांत गेले आणि विदुर मैत्रेयऋषींच्या आश्रमाकडे जायला निघाले. यमुनेने कृपा करून विदुरांना भक्तीचे ज्ञान दिले. यमुनेने नवविधा भक्ति दिली. ज्ञान आणि वैराग्याविना भक्ति दृढ होत नाही आणि सफलही होत नाही. ब्रह्मज्ञान आणि वैराग्य यांचे ज्ञान गंगा करीत असते.

विदुर गंगाकिनारी मैत्रेय ऋषींच्या आश्रमीं आले. गंगेचा मोठाच महिमा आहे. विदुरांनी गंगेत स्नान केले. गंगाकिनारीचे ते दगड भाग्यवान आहेत. कारण मैत्रेय ऋषींसारख्यांचा चरणस्पर्श त्यांना होत राहिलेला आहे. या दगडांवर वैष्णवांची चरण-धूळ पडत आलेली आहे.

विदुरांना विचार पडला आहे की जातिहीन असल्यामुळे मला मैत्रेय ऋषि उपदेश देतील की नाही. मी जातिहीन अवश्य आहे, पण कर्महीन नाही. मी पापी आहे, अधम आहे पण परमेश्वराने मला आपले म्हटले आहे, म्हणून मैत्रेय ऋषि मला उपदेश अवश्य करतील.

भक्तिमार्गाच्या श्रेष्ठतेचे हेच कारण आहे कीं, जोपर्यंत परमात्म्याची प्रत्यक्ष भेट होत नाही तोपर्यंत भक्त हेच समजत असतो की माझ्याच कोणत्या तरी दोषामुळे भेट होत नाही. भक्तीमुळे लीनता उत्पन्न होते. ज्ञानमार्गांत योगी ब्रह्मरूप होऊ लागतो, परंतु अभिमान येण्यामुळे पुष्कळांचे पतनही होते.

**६. मैत्रेय ऋषींच्या आश्रमांत विदुरांचे आगमन:**

आश्रमांत येऊन विदुरांनी मैत्रेय ऋषींना साष्टांग नमस्कार केला. त्यांच्या विनय-विवेकाने सर्वांनाच आनंद झाला.

मैत्रेय ऋषि म्हणतात: विदुर, मी तुम्हाला ओळखतो. तुम्ही साधारण व्यक्ति नाही आहात. तुम्ही तर साक्षात् यमाचे अवतार आहात. मांडव्य ऋषींच्या शापामुळे दासीपुत्राच्या रूपात शूद्राचे घरीं आपला जन्म झाला आहे.

एकदा काही चोरांनी राजकोषांतून चोरी केली. चोरी करून ते पळून जाऊ लागले. राजाच्या सेवकांना ही बातमी कळली. तेव्हा त्यांनी चोराचा पाठलाग केला. राजाच्या सैनिकांना मागोमाग येताना पाहून चोर घाबरून गेले. चोरीच्या मालासह पळणे अवघड होते. इतक्यांत वाटेत मांडव्यऋषींचा आश्रम लागला. तर चोरांनी चोरलेली सगळी धनसंपत्ति त्या आश्रमांत टाकून ते पळून गेले. राजाचे सैनिक पाठलाग करीत त्या आश्रमांत आले. तेथे राजकोषांतून चोरलेली सर्व धनसंपत्ति पाहून त्यांनी मांडव्य ऋषींनाच चोर ठरविले. त्यांनी ऋषींना पकडले आणि धनसंपत्तीसह त्यांना राजासमोर उभे केले. राजाने देहान्त दंडाची शिक्षा सुनावली.

आता त्यांना वधस्तंभापाशी उभे केले. त्यांनी तेथेच गायत्रीमंत्राचा जप सुरू केला. मांडव्य मरेनात. ऋषींचे दिव्य तेज पाहून राजाला वाटले की, हे तर कोणी तपस्वी महात्मा दिसतात. राजा भयभीत झाला. ऋषींना वधस्तंभावरून खाली उतरविले गेले. सगळी हकीगत समजल्यावर राजाला दुःख झाले आणि पश्चात्ताप होऊ लागला की मी निरपराध ऋषींना वधस्तंभावर चढविण्याची आज्ञा केली.

त्याने मांडव्यऋषींना, स्वतःला क्षमा करण्याविषयीं प्रार्थना केली.

मांडव्यऋषि म्हणाले, 'राजन्! तुला तर मी क्षमा करीन, पण यमराजाला विचारीन कीं मला अशी शिक्षा कां दिली गेली? मी काहीच पाप केले नाही तरी पण मला असा दंड कां दिला गेला? मी यमराजाला क्षमा नाही करू शकणार.'

ज्याने पाप केले असेल त्याला भीती वाटेल. पाप्याला यमराज क्रूर वाटतात.

मांडव्य म्हणतात, "माझ्यासारख्या निष्पाप्याला दंड कां? मी न्यायाधीश यमराजाला दंड देईन."

आपल्या चारित्र्यावर कसा अटळ विश्वास! भरतखंडातील एक पवित्र संत आज न्यायाधीशाला जाब विचारीत आहे.

यमराजाच्या सभेंत येऊन ऋषींनी यमराजाला विचारले, 'जर मी कोणतेच पाप केले नव्हते तर मला सुळावर का चढविले गेले? सुळावर चढविण्याची शिक्षा मला माझ्या कोणत्या पापासाठी दिली गेली?

यमराज घाबरून गेले. जर चूक झाली असे म्हटले तर मुनि मला शाप देतील. म्हणून ते ऋषींना म्हणाले की, तुम्ही जेव्हा तीन वर्षांचे होता तेव्हा तुम्ही एका फुलपाखराला काटा टोचला होता; त्याच पापाची ही शिक्षा दिली गेली आहे.

कळत किंवा नकळत जे कांही पाप केले जाते त्याचा दंड भोगावाच लागतो. भगवंत पाप स्वीकारीत नाही. पुण्याच्या उपभोगाची इच्छा केली नाही तरी कांही हरकत नाही, पण पाप तर भोगावेच लागते.

पुण्य कृष्णार्पण होऊ शकते, पाप नाही. पाप तर भोगावेच लागेल, त्याशिवाय पापाचा नाश होऊ शकत नाही.

लोक संध्याकाळी दुकानांतून घरी परत जाताना मंदिरात जातात आणि हात जोडून प्रार्थना करतात,

'सगळ्या दिवसभर जे काही खोटे बोललो असेन, कोणाला ठकवले असेल, जे कांही मी कुकर्म केले असेल ते सर्व तुला अर्पण करीत आहे.

काया, वाचा आणि मनाने जे केले जाईल, अर्थात जे कांही पुण्य केले जाईल, ते प्रभूला अर्पण करायचे आहे. पुण्य समर्पित होऊ शकते, पाप नाही. भगवंत पाप घेत नाहीत. सामान्य सरकार पुरस्कार परत घेते, परंतु कोणाला दिलेली शिक्षा परत घेत नाही.

भगवंत म्हणतात, हा कसा मूर्ख प्राणी आहे कीं मला आपलें पाप अर्पण करायला निघाला आहे. परमेश्वराला नेहमी पुण्य समर्पित करा. नेहमी हाच विचार करा कीं पापाची शिक्षा मी भोगीन आणि प्रभूंना पुण्य अर्पण करीन.

भगवंताला सर्वोत्तम वस्तु अर्पण केली पाहिजे. याचेच नाव भक्ति आहे. भगवंताला पुण्यच समर्पित केले पाहिजे.

मांडव्यऋषि यमराजाला म्हणाले, 'शास्त्राची आज्ञा आहे की जर अज्ञानावस्थेत कोणी मनुष्य पाप करील तर त्याला स्वप्नामध्यें त्याचा दंड द्यावा. मी बालक होतो अर्थात अबोध होतो. याकरिता त्यावेळी केलेल्या पापाची शिक्षा तुम्ही मला स्वप्नांतच द्यावयास पाहिजे होती. तू मला अयोग्य रीतीने दंड दिला आहेस! म्हणून मी तुला शाप देतो की तुझा जन्म शूद्रयोनीत होईल.

याप्रमाणे मांडव्यऋषींच्या शापामुळे यमराजाला विदुराच्या रूपांत दासीच्या घरी जन्म घ्यावा लागला.

देवाकडून चूक झाल्यामुळे त्याला मनुष्य व्हावे लागते आणि मनुष्य चूक करील तर त्याला चार पायांचा पशू व्हावे लागते. पापी मनुष्य पशू बनत असतो.

विदुर म्हणतात, एक वेळ चूक झाली तर मला देवापासून मनुष्य व्हावे लागले आणि आता देखील मी असावध राहिलो तर मला पशू व्हावे लागेल.

यानंतर विदुरांनी मैत्रेयाला अनेक प्रश्न विचारले. भगवान अकर्ता आहेत, तरी पण कल्पारंभी ह्या सृष्टीची रचना त्यांनी कशी केली? संसारांत सगळेच लोक सुखासाठी प्रयत्न करतात तरी देखील त्यांचे दुःखही दूर होत नाही अन् त्यांना सुखही मिळत नाही! असे कां? या प्रश्नांची उत्तरें मिळतील असे निरूपण करा.

**७. मैत्रेयांचें निरूपण—सृष्टीच्या उत्पत्तीची आणि कश्यप-अदितीची कथा:**

मैत्रेय म्हणाले, 'सृष्टीच्या उत्पत्तीची कथा भागवतात पुनःपुन्हा दिली आहे. तात्त्विक दृष्टीने जगत् मिथ्या आहे. म्हणून साधुपुरुषांनी त्याविषयी अधिक विचार केला नाही. परंतु सृष्टीच्या कार्याविषयी मात्र पुनःपुन्हा विचार केला आहे.

परमात्म्याला मायेचा स्पर्श झाला आणि त्याने संकल्प केला कीं मी एकाचा अनेक व्हावे. '**एकोऽहम् बहुस्याम्।**' पुरुषांतून प्रकृति, प्रकृतींतून महत्तत्त्व, महत्तत्त्वांतून अहंकार उत्पन्न झाला. अहंकाराचे चार प्रकार आहेत. नंतर पंचतन्मात्रांपासून पाच महाभूतांची उत्पत्ति झाली. परंतु ही तत्त्वें स्वतः कांहीच क्रिया करू शकत नव्हती. म्हणून ईश्वराने प्रत्येक वस्तूत प्रवेश केला.

उपनिषदांत सांगितले आहे कीं प्रत्येक वस्तूंत ईश्वराने प्रवेश केला आहे म्हणून संपूर्ण जगत् परमात्म्याचे मंगलस्वरूप आहे.

भगवंताच्या नाभीपासून कमळ उत्पन्न झाले, त्यातून ब्रह्मदेव प्रगट झाले. ब्रह्मदेवाने कमळाचे

मुखाचा शोध घेण्याचा प्रयत्न केला तर चतुर्भुज नारायणाचे दर्शन झाले. ब्रह्मदेवांनी त्याचे स्तवन केले.

संतति आणि संपत्ति भगवत्कृपेचें फळ नसून प्रारब्धाचे फळ आहे. भगवंत ज्याच्यावर कृपा करतात त्याचे मन शुद्ध होत असते. मनःशुद्धीविना ईश्वराचें दर्शन होत नाही. ईश्वरदर्शनावाचून जीवन सफल होत नाही.

ज्याने मला जन्म दिला त्यालाच जाणून घेण्याचा मी प्रयत्नसुद्धा केला नाही! माझ्यासारखा मूर्ख आणखी कोण असेल?

ब्रह्मदेवाला वाटले संसारांत आल्यावर इंद्रिये कोठे भलत्याच (चुकीच्या) मार्गावर न जावोत.

ब्रह्मदेवाने सृष्टी निर्माण केली. कामाला जन्म दिला. कामाने प्रथम पित्यालाच मोहित केले.

प्रथम झाले स्वयंभू मनु आणि शतरूपा राणी. त्यावेळी पृथ्वी तर रसातळाला गेलेली होती. ब्रह्मदेवांनी विचार केला की, प्रजा तर निर्माण करीन, पण तिला वसवावे कोठे? म्हणून नाकांतून वराह भगवान प्रगट झाले. त्यांनी पृथ्वीला पाण्यांतून बाहेर काढले. रस्त्यांत भेटलेल्या हिरण्याक्षाला मारले आणि पृथ्वीचे शासन मनूकडे सोपवून भगवंत स्वधामीं परत गेले.

विदुर म्हणाले, 'आपण तर फार संक्षिप्त कथा सांगितली. या कथेचे रहस्य काय आहे? तो हिरण्याक्ष कोण होता? पृथ्वी रसातळांत कां बुडली होती? वराह नारायणाचे चरित्र मला सांगा.

ही कथा मैत्रेयांनी विदुराला आणि शुकाने परीक्षिताला सांगितली.

दिति कश्यप ऋषींची पत्नी होती. एक दिवस संध्याकाळच्या वेळी दिति शृंगार करून पतीच्या जवळ आली आणि तिने कामसुखाची इच्छा प्रदर्शित केली, कारण ती कामातुर झालेली होती.

कश्यप म्हणाले– देवी, ही संध्याकाळची वेळ आहे; ही वेळ कामसुखासाठी उपयुक्त नाही. यावेळी कामाधीन होणे चांगले नाही. जा आणि सांजवात लाव.

शास्त्रात सांगितले आहे कीं सौभाग्यवती स्त्रींत लक्ष्मीचा अंश असतो. संध्याकाळी लक्ष्मीनारायण घरी येत असतात. त्यावेळी घर बंद असेल तर लक्ष्मी 'जय श्रीकृष्ण' म्हणत परतून जाईल. आजकाल तथाकथित सुधारलेले लोक संध्याकाळच्या वेळीच कुलूप लावून बाहेर निघून जातात. हिंडायला जायचेच असेल तर सूर्यास्ताच्या आधी घरी परतायला पाहिजे. स्त्रियांनी संध्याकाळचे वेळी घराबाहेर भटकत फिरू नयेच. संध्याकाळचे वेळी तुळशीची पूजा करा आणि तेथे दिवा लावा. भगवंतापुढे धूप-दीप लावा.

मनुष्याच्या हृदयांत अंधार आहे तिथे दिवा लावायचा आहे.

दहाव्या स्कंधांत कथाभाग आला आहे. गोपी यशोदेजवळ गाऱ्हाणे करतात की कन्हैया आमचे लोणी चोरून खाऊन जातो. तर यशोदा म्हणते, लोणी अंधारांत ठेवीत जा म्हणजे कृष्णाला ते दिसायचे नाही. गोपी सांगतात, लोणी तर अंधारांतच ठेवलेले होते, पण कृष्ण तिथे गेल्याबरोबर उजेड झाला.

ईश्वर परप्रकाशी नाही. तो स्वयंप्रकाशी आहे. परमात्म्याला दिव्याची आवश्यकता नाही. दिव्याची आवश्यकता मनुष्याला आहे.

संध्याकाळी सूर्य आणि चंद्राचे प्रकाश क्षीण होत असतात, दुर्बल होतात. सूर्य बुद्धीचा स्वामी आहे आणि चंद्र मनाचा. मन आणि बुद्धीचे स्वामी चंद्र-सूर्य संध्याकाळी दुर्बल झाल्यामुळे मन आणि बुद्धीत त्यावेळी कामाचा प्रवेश होतो. काम मनांत संध्याकाळच्या वेळी प्रवेशतो आणि रात्री प्रगट होतो. संध्याकाळच्या वेळी प्रभुनामाचा जप कराल तर मनांत काम प्रवेशणार नाही.

कश्यप ऋषी दितीस समजावीत आहेत कीं, 'हे मानिनी, मी जे सांगत आहे ते ऐक. भगवान

शंकर यावेळी जीवमात्रांचे निरीक्षणासाठी भ्रमण करीत असतात. म्हणून ह्यावेळी स्त्रीसंग केल्याने शंकरांचा अपमान होईल आणि अपमानामुळे अनर्थ ओढवेल. भगवान शंकरांनी पाहिले तर ते दंड करतील.

**"भस्मांतम् शरीरम्".** ह्या शरीराचे शेवटी तर भस्मच होणार आहे, म्हणून शिव भस्म लावतात आणि जगाला वैराग्याचा बोध करीत असतात. शरीराचे अत्यधिक लालन करू नये. नेहमी लक्षांत असू द्यावे की ह्या शरीराला एक ना एक दिवस स्मशानातच जायचे आहे. गृहस्थाश्रम विलासासाठी नाही, तर मर्यादित राहून, विवेकयुक्त राहून कामसुखाचा उपभोग करून कामाचा विनाश करण्यासाठी-वैराग्यासाठी आहे. नियमपूर्वक कामाच्या विनाशासाठी हा गृहस्थाश्रम आहे. काम इतका दुष्ट आहे की एकदा हृदयांत प्रवेश केल्यानंतर तो बाहेर निघतच नाही. एकदा काम आत शिरला म्हणजे तुमचे सगळे शहाणपण उडून जाईल. म्हणून आचरण इतके साधे आणि पवित्र ठेवा की कामाला मन-बुद्धीच्या आत प्रवेश करण्याची संधीच मिळू नये.

घुबडांच्या सभेत एकदा असा ठराव पास केला गेला की सूर्यनारायणाचे अस्तित्वच नाही, कारण ते आम्हाला दिसत नाहीत. घुबडे जर सूर्याला पाहू शकत नसतील तर याचा अर्थ असा होतो काय की सूर्यच अस्तित्वात नाही? धर्मावर आस्था न ठेवणारे, ईश्वराला न मानणारे याच घुबडांचे मोठे भाऊच आहेत.

दितीच्या भेदबुद्धीतूनच (दुर्बुद्धीतूनच) या हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपूचा जन्म झाला आहे. सगळ्यांतच माझ्या नारायणाचा वास आहे असा अभेदभाव ठेवाल तर पाप होणार नाही.

दितीने कश्यपांचे ऐकले नाही आणि कश्यपही दितीच्या दुराग्रहास वश झाले. सरतेशेवटी दितीला आपल्या प्रमादाचे भान झाले. तिला पश्चात्ताप झाला. तिने कश्यपांची पूजा केली आणि भगवान शंकरांची क्षमा मागितली.

कश्यप म्हणाले, तुझ्या गर्भापासून दोन राक्षस उत्पन्न होतील.

पतिपत्नींनी उचित संयमाचे पालन केले नाही तर त्यांचेपासून पापी प्रजेची उत्पत्ति होते. महिन्याच्या दोन्ही द्वितीया, पंचमी, अष्टमी, एकादशी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावास्या आणि पर्व दिवस ब्रह्मचर्याचे पालन अवश्य करावे. लोक म्हणतात काल बिघडला आहे म्हणून पापी प्रजा उत्पन्न होत आहे. तसा काल थोडाफार बिघडला आहेच, परंतु लोकांची मने जास्त बिघडली आहेत. एकादशी, पौर्णिमा किंवा पवित्र दिवसांत विचार न करताच कामांध होतात, म्हणूनच पापी प्रजा उत्पन्न होत आहे.

कामाला आपल्या हृदयांत प्रवेश करण्याची संधीच देऊ नका. एकदा कामाचा हृदयांत प्रवेश झाल्यावर सगळे शहाणपण निरर्थक होऊन जाते.

दितीने सुद्धा कामांध झाल्यामुळेच शहाणपण गमावले होते.

मनुष्याने नुसत्या या शरीराचाच विचार केला तरीसुद्धा त्याच्या अंतःकरणांत शरीरसुखाविषयी तिरस्कार उत्पन्न होईल आणि वैराग्याचा भाव जागृत होईल. हे शरीर कसे आहे? ह्यांत हाडेच हाडे वाकडीतिकडी बसवून दिली आहेत. त्याभोवती मांसाचा लेप करून वरून त्वचेने मढवून टाकले आहे. म्हणून आतील वस्तू दिसत नाहीत. सडकेवर पडलेल्या हाडांना तर कोणी शिवतही नाही. हाडाला शिवल्याने शरीर अपवित्र होईल असा विचार येतो. परंतु तोच मनुष्य देहांत असलेल्या हाडांवर प्रेम करीत असतो. ह्यापेक्षा दुसरी मूर्खपणाची गोष्ट कोणती असू शकेल?

भागवतात एके ठिकाणी म्हटले आहे की हे शरीर तर कोल्ह्या-कुत्र्यांचे जेवण आहे. अग्निसंस्कार न झाला तर याला कुत्रीच खातील. अशा शरीराचा मोह सोडा.

जेव्हा दितीला समजले कीं तिच्या गर्भापासून राक्षस होणार आहेत तेव्हा ती घाबरून गेली. तर कश्यप म्हणाले, त्यांचा संहार करण्यासाठी भगवान नारायण येतील. तर दिती म्हणाली मग तर माझे पुत्र मोठे भाग्यशाली होतील.

कश्यपाने दितीला असेही आश्वासन दिले की, तुझा नातू महान भगवद्भक्त आणि महान वैष्णव होईल आणि प्रल्हाद या नावाने जगांत विख्यात होईल.

जो परमेश्वराची सेवा-स्मरण एकटाच करील तो साधारण वैष्णव होय. परंतु ज्याच्या संगतीने इतरांना देखील ईश्वराची सेवा आणि स्मरण करण्याची प्रेरणा मिळते आणि इच्छा होते तो महान् वैष्णव होय. इतरांना प्रयत्नपूर्वक अशी प्रेरणा देणें हीसुद्धां ईश्वराची सेवाच आहे.

भक्तांनी एकदा महाप्रभु वल्लभाचार्यांना म्हटले की आम्हांला वैष्णवाची लक्षणे सांगा. महाप्रभु म्हणाले, जो परमेश्वराची सेवा करील तोच वैष्णव. भक्त म्हणाले, येवढे तर आम्हालाही माहीत आहे. आम्हाला काही विशिष्ट लक्षणे सांगा. तेव्हा महाप्रभूंनी सांगितले, ज्याचे संगतीत येणाऱ्याला परमेश्वराच्या सेवेविषयी प्रीति उत्पन्न होईल आणि त्याला कृष्ण-भक्तीचा रंग चढेल तोच महान् वैष्णव होय.

प्रल्हाद महान् वैष्णव आहेत.

प्रल्हादाच्या संगतींत येणाऱ्याला सुद्धा भक्तीचा रंग चढत असे. तुमची संगत करणाऱ्याला जर भक्तीचा रंग लागला नाही तर समजा की तुमची भक्ति अजून कच्ची आहे. परंतु दुसऱ्याला सुधारण्याच्या भानगडीत पडण्याची साधारण माणसाला काही आवश्यकता नाही. तुम्ही आपलेच मन शुद्ध करा, येवढेच पुष्कळ आहे.

व्यसनासारखे कोणते पाप नाही. जो व्यसनाचा पराभव करू शकेल तोच भक्ति करू शकतो. आजकाल तर फॅशन आणि व्यसन ह्यांतच वेळ आणि संपत्तीचा व्यय केला जात असतो. व्यसनामागे वेडी झालेली व्यक्ति भगवंताची सेवा करू शकत नाही. वैष्णव तर त्यालाच म्हणावे कीं जो निर्व्यसनी असेल. ज्याला भगवंताची आराधना करायची आहे त्याने फॅशन आणि व्यसन यांत अडकण्याचे कटाक्षाने टाळावे. व्यसन असले तर ते एकच असावे आणि ते कृष्णभक्तीचे.

तुकाराममहाराजांना भक्तीचे असेच व्यसन होते. त्यांच्या डोळ्यांना अशी सवय झाली होती की जिथे कुठे त्यांची दृष्टी जाई तिथे त्यांना मुरलीमनोहराचे रूप दिसत असे.

भक्ति व्यसनरूप झाली तर ती तुम्हाला मुक्ति मिळवून देईल. भक्ति व्यसनासारखी झाली कीं तत्काळ मुक्ती मिळते.

राज्यशासनाने समाज सुधारत नाही. संतच सद्भावाने त्यास सुधारू शकतात. प्रल्हादाच्या संगतीत जे कोणी आले त्या सर्वांचेच त्याने कल्याण केले.

दिति गर्भवती झाली. तिने विचार केला की माझी मुले देवांना त्रास देतील म्हणून यांचा जन्म लवकर न व्हावा. या विचाराने दितीने शंभर वर्षेंपर्यंत गर्भ धारण करून ठेवला. सूर्य-चंद्राचे तेज क्षीण होऊ लागले. देव घाबरले. ते ब्रह्मदेवापाशी आले आणि त्यांना विचारलें की दितीच्या पोटांत कोण आहे ? त्यांना दितीच्या पोटात कोण आहे याची गोष्ट सांगितली.

### ८. वैकुंठलोकीचे द्वारपाल जय–विजय; सनकादि द्वारा शापग्रस्त होतातः

ब्रह्मदेव म्हणाले— कोणे एके वेळी माझे मानसपुत्र सनकादि ऋषि फिरत फिरत वैकुंठलोकी गेले. अंतःकरण चतुष्टय शुद्ध असले तरच ईश्वराचे दर्शन होते. ईश्वरदर्शनाला जाताना या चारींना

शुद्ध करून जावे. अंतःकरणाचे चार विभाग (प्रकार) आहेत. अंतःकरण जेव्हा संकल्प-विकल्प करीत असते तेव्हां त्याला मन म्हणतात; ते जेव्हां एखाद्या गोष्टीचा निर्णय करते तेव्हा त्याला बुद्धि म्हणतात. श्रीकृष्णाचे चिंतन करताना त्याला चित्त म्हणतात, आणि त्यांत जेव्हा कर्म करण्याचा अभिमान जागृत होतो तेव्हां त्याला अहंकार म्हणतात. मन, बुद्धि चित्त, अहंकार या चारींना शुद्ध करा. या चारींना शुद्ध केल्याशिवाय परमात्म्याचे दर्शन होऊ शकणार नाही. ब्रह्मचर्याशिवाय या चारींची शुद्धि होत नाही. जेव्हा ब्रह्मनिष्ठा सिद्ध होते तेव्हांच ब्रह्मचर्य सिद्ध होत असते.

सनत्कुमार ब्रह्मचर्याचे अवतार आहेत. ते महाज्ञानी आहेत. तरीसुद्धा बालकांप्रमाणे सरल भावाने राहतात. सरल भाव आणि नैष्ठिक ब्रह्मचर्य यामुळें ते विकाररहित होते.

सनत्कुमारादि नारायणाचे दर्शन करण्यासाठी वैकुंठात जातात.

काम आणि काळाला वैकुंठांत प्रवेश मिळू शकत नाही. जेथे बुद्धि कुंठित होते ते वैकुंठ आहे. वैकुंठांतील फुले आणि वृक्ष दिव्य आहेत. सहाही ऋतु मैत्रिणी बनून तेथील सेवा करीत असतात. तेथे सात मोठमोठे किल्ले आहेत. त्यातून पार होऊन जावे लागते.

दक्षिणेत रंगनाथाचे मंदिर याच वर्णनाच्या आधारे बांधले गेलेले आहे.

सनत्कुमारांना अलौकिक वैकुंठधामाचे दर्शन होत आहे. येथे भ्रमरसुद्धा मोठ्या प्रेमाने ईश्वरगुणगान करीत असतात असे वाटते. भ्रमर गुँ गुँ करीत आहेत. जणू कांही कृष्णाचे दर्शन आणि कीर्तनच करीत आहेत. वैकुंठांत विषमता नाही. येथील पार्षद भगवंतासारखेच आहेत आणि दासी लक्ष्मीसारख्या! पार्षदसुद्धा शंखचक्रगदाधारी चतुर्भुज आहेत.

ईश्वर जेव्हा देऊ लागतो तेव्हा तो देण्यांत काहीच संकोच ठेवीत नाही. ईश्वर जेव्हां देत असतो तेव्हां घेणाराच घेता घेता थकून जातो. मनुष्य शेवटी घेऊन घेऊन किती घेऊ शकेल?

ईश्वराच्या राजसभेंत विषमता नाही. तुम्ही सुद्धा भोजन इत्यादींमध्ये विषमता करू नका. पुष्कळ शेठ घरांत तीन तीन प्रकारचे तांदूळ ठेवतात– मोलकरणीला निराळे, साधूबाबांना द्यायला निराळे आणि स्वतःला खाण्यासाठी दिल्लीचे बासमती तांदूळ! असा भेद केव्हांही करू नये. सगळ्यांसाठी समान भावाने एकाच प्रकारचे जेवण तयार करा. आपल्या माता वाढण्यांत फार चतुर आहेत. आपल्या स्वतःच्या किंवा विशेषांच्या पोळ्यांना थोडे जास्त तूप लावतात.

जेवणांत विषमता करू नका. विषमता करणाऱ्याला संग्रहणीचा रोग होतो. विषमताच वैर उत्पन्न करीत असते. विषमता करायचीच असेल तर सद्भावाने करा. व्यवहारांत संपूर्ण समानता होत नाही. लक्ष्मी देखील वैकुंठात प्रमाद करीत नाही. तेथे लक्ष्मी स्वतः सेवा करते. केर काढते.

शुकदेव कथा करीत नसून लक्ष्मीनारायणाचे दर्शन घेत आहेत. प्रतिबिंबाला पाहून बिंबाविषयी मोह होत असतो. तर मग प्रत्यक्ष बिंब पाहिल्यावर किती आनंद होत असेल? वैष्णव भाग्यशाली आहेत. कारण ते प्रतिबिंब पाहू शकतात. भगवंत आपले बिंब पाहू शकत नाहीत. बाळकृष्ण आपले प्रतिबिंब दर्पणांत पाहतो. कृष्ण यशोदेला म्हणतात, 'हे बाळ फार सुंदर आहे, मी त्याचेबरोबर खेळू इच्छितो'. आई समजावते कीं, ते कांही आणखी दुसरे बाळ नाही; ते तर तुझेच प्रतिबिंब आहे. आपल्या स्वतःच्या प्रतिबिंबाला पाहून भगवंत स्वतःच जर मुग्ध होतात तर प्रत्यक्ष बिंबाचे दर्शन केल्याने गोपींचे भान हरपेल यात काय आश्चर्य?

सनत्कुमार वैकुंठाची सहा द्वारे पार करून सातव्या द्वारावर आले. तेथे जय-विजय उभे होते. सनत्कुमार भगवंताच्या प्रासादांत प्रवेश करीतच होते. इतक्यांत जयविजय द्वारपालांनी त्यांना अडवले.

सनत्कुमार म्हणाले, आम्ही तर माता-पिता लक्ष्मी-नारायणांना भेटायला जात आहोत.

सनत्कुमार कौपीन धारण केलेले होते. कौपीनाचा अर्थ नुसती ' लंगोटी ' इतकाच नाही. जितेन्द्रियच कौपीनधारी असतो.

भगवंताचे दर्शन घ्यायला जितेन्द्रिय होऊनच जावे लागते.

द्वारपालांनी सनत्कुमारांना सांगितले की आतून आज्ञा मिळाल्यावर आम्ही आपल्याला आत प्रवेश देऊ. तोपर्यंत आपण येथेच थांबा. हे ऐकून सनत्कुमारांना क्रोध आला.

क्रोध हा कामानुज म्हणजे कामाचा छोटा भाऊच आहे. अतिसावध राहून कामावर जय मिळवता येतो पण त्याचा धाकटा भाऊ क्रोध यावर जय मिळविणे कठीण कर्म आहे. कामाचे मूळ संकल्प आहे. ज्ञानी इतर कोणाच्या शरीराचे चिंतन करीत नाहीत म्हणून त्यांना कामापासून पीडा होत नाही. ज्ञानी पुरुषाचे पतन कामाने नाही, क्रोधाने होत असते.

सहा दारे पार करून ज्ञानी पुरुष पुढे सरकतो, परंतु सातव्या दारावर जय-विजय त्याला अडवतात.

योगाची सात प्रकारची अंगेच वैकुंठाची सात दारे आहेत. ती यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान आणि धारणा होत. या सातही दारांना पार केल्यानंतर ब्रह्मसाक्षात्कार होत असतो. योगांच्या या सातही अंगांना सिद्ध केल्यानंतर वैकुंठात प्रवेश मिळतो.

ध्यानाचा अर्थ आहे, ' एका अंगाचे चिंतन. ' शरीर आणि डोळ्यांना स्थिर ठेवण्यास आसन म्हणतात. ' धारणा 'चा अर्थ आहे सर्वांगांचे चिंतन. धारणेमध्ये अनेक सिद्धि विघ्ने करीत असतात. सर्वांगाचे दर्शन म्हणजेच धारणा. साधकाला आयुष्याच्या शेवटच्या श्वासापर्यंत सावध राहण्याची जरूर आहे. जय-विजय प्रतिष्ठेची दोन रूपे होत. सर्वांगाच्या चिंतनांत सिद्धि-प्रसिद्धि बाधा उत्पन्न करतात. सिद्धि मिळाल्यावर प्रसिद्धि होत असते. सेवेत प्रमाद करणाऱ्याचे पतन होत असते.

जय म्हणजे स्वदेशांत प्रतिष्ठा आणि विजय म्हणजे परदेशांत विजय.

जग मला काय म्हणेल याची चिंता करू नका, परंतु जगदीश्वर काय म्हणेल याकडे लक्ष असू द्या. जो लौकिक प्रतिष्ठेंत अडकून राहतो तो परमेश्वरापासून दूर जातो.

भगवंताच्या राजमहालाच्या सातव्या दारावर जय-विजय अडवतात.

जय-विजय म्हणजे कीर्ति आणि प्रतिष्ठा. कीर्ति आणि प्रतिष्ठेचा मोह मनुष्य सोडू शकत नाही. तो घराचे नाव ठेवतो अशोक-निवास, परंतु तो अशोक भाऊ कुठपर्यंत त्यात राहील ? '' घराला देवाचे नाव द्या. घरावर देखील नाव आहे आणि कथेत बसण्यासाठी मांडलेल्या आसनावरही नाव आहे. घरावर आणि आसनावर लिहिलेली नावे किती दिवस राहतील ? घराचा मोह सुटतो पण प्रतिष्ठेचा मोह सुटत नाही.

शिष्य थोडीशी स्तुति करतात, तर गुरु मानू लागतो की तो ब्रह्मरूप झाला आहे. म्हणून भगवत्सेवा-स्मरणाची तो उपेक्षा करू लागतो आणि पतित होतो.

मनुष्याचे मन नामरूपांत अडकलेले आहे. नाम आणि रूपाचा मोह जोपर्यंत सुटणार नाही तोपर्यंत भक्ति होऊच शकत नाही. मन श्रीकृष्णरूपांत अडकेल तेव्हांच मुक्ति मिळू शकते. प्रतिष्ठेचा मोह आला रे आला की भगवंताला दारातूनच परत जावे लागेल.

क्रोध केल्यामुळे सनत्कुमारांना प्रभूच्या सातव्या द्वारावरून परत फिरावे लागले. परंतु त्यांचा क्रोध सात्त्विक होता. ते द्वारपाल भगवंताच्या दर्शनांत बाधा उत्पन्न करीत होते म्हणून त्यांना क्रोध आला. म्हणून भगवंत् स्वतः अनुग्रह करून द्वारावर आले आणि सनत्कुमारांना दर्शन दिले. पण त्यांना

भगवंताच्या राजमहालांत प्रवेश मिळूच शकला नाही.

महाप्रभूंनी ह्या चरित्राची समाप्ति करताना म्हटले आहे की, ज्ञात्याला ज्ञानमार्गांत अभिमान विघ्नकर्ता आहे. अभिमानाच्या मुळात हा क्रोधच आहे. काही अज्ञानावस्थेत मरतात, तर काही लोक ज्ञानी होऊन अभिमानवश होऊन मरतात. ब्राह्मणाला शिक्षण न मिळाले तर तो अज्ञानी राहतो आणि थोडे जास्त शिक्षण मिळाले तर केव्हा केव्हा अभिमानी होऊन मरतो.

कर्ममार्गात विघ्नकर्ता काम आहे. कश्यप आणि दितीच्या मार्गांत कामानेच विघ्न आणले होते. कामाने कर्माचा नाश होतो.

भक्तिमार्गात लोभ बाधक होतो. लोभ शक्तीचा नाश करतो.

ज्ञानमार्गात क्रोध विघ्न करतो. क्रोधाने ज्ञानाचा नाश होतो. सनत्कुमारांच्या मार्गांत क्रोधानेच बाधा आणली.

देहदृष्टीमुळे काम उत्पन्न होतो. ज्ञात्याच्या मार्गांत काम अवरोध उत्पन्न करीत नाही, परंतु क्रोध बाधक होतो. या तिघांमुळे पुण्याचा क्षय होतो. विवेकाने काम नष्ट होतो, परंतु क्रोधाला नष्ट करणे कठीण आहे.

एकनाथ महाराजांनी भावार्थ रामायणांत लिहिले आहे की कामी आणि लोभी यांना काही तात्कालिक लाभ होऊ शकतो, पण क्रोध करणाऱ्याला मात्र कधीही काहीही लाभ होऊ शकत नाही. इतकेच नव्हे, तर त्याच्या पुण्याचा क्षय देखील होतो.

भक्तिमार्गांत लोभ विघ्नरूप आहे. मनुष्य भगवंतासाठी किंवा दान देण्यासाठी स्वस्तांत स्वस्त वस्तूंचा उपयोग करतो. मुलांसाठी कपडे करायचे असले तर सात किंवा सतरा रुपये मीटरचे कापड शोधतो. एक गृहस्थ बाजारांत देवासाठी फुले विकत घ्यायला जातो. माळी म्हणतो, गुलाबाच्या फुलाची किंमत चार आणे आहे. तर गिऱ्हाईक म्हणतो, कण्हेरीचीच फुले बांधून दे. कारण माझे भगवंत तर भावनेचेच भुकेले आहेत. परंतु जेव्हा बायको सांगते की माझ्यासाठी एक चांगलीशी वेणी घेऊन या, तर पुष्कळ खर्च करून तो मनपसंत वेणी घेऊन येतो.

सत्यनारायणाची कथा करायची असेल तर तो दोनशे रुपयांचा पीतांबर नेसून बसेल; पण जेव्हा देवाला वस्त्र द्यायचा प्रसंग येईल, तर तो म्हणेल की तो हातमागाचा पंचा कुठे आहे, तोच नेसवू. भगवंत म्हणतात, बेट्या, मी सगळं समजतो. मी देखील एक दिवस तुला लंगोटीच नेसवीन. तुझ्या लंगोटीसाठीच हा पंचा मी अमानत ठेवला आहे.

असे करू नये. भगवंताला उत्तमोत्तम वस्त्र अर्पण करा.

"२५२ वैष्णवोंकी वार्ता" मध्ये जमनादास भक्ताचा एक दृष्टान्त आहे. एकदा ते देवासाठी फुले विकत घ्यायला बाजारात निघाले. माळ्याच्या दुकानांत त्यांनी एक सुंदरसे कमळ पाहिले. त्यांना वाटले, प्रभूंसाठी आज हेच सुंदर कमळ न्यावे. त्याचवेळी तेथे एक यवनराज आला. त्याला एका वेश्येसाठी ते कमळ न्यायचे होते. जमनादास भक्तांनी त्या कमळाची किंमत विचारली. माळी म्हणाला, पाच रुपये आहे याची किंमत. मध्येच यवनराज म्हणाला, 'मी दहा रुपये देईन, तू हे फूल मलाच दे.' तर जमनादास म्हणाले, मी पंचवीस रुपये द्यायला तयार आहे, फूल मलाच दे. याप्रमाणे फूल घेण्यासाठी दोघांमध्ये चढाओढ लागली.

यवनराजाने दहा हजार बोली लावली तर भक्त जमनादास म्हणाले एक लाख. वेश्येवर यवनराजाचे तसे काही खरे प्रेम नव्हते, फक्त मोह होता. त्याने विचार केला की आपल्याला लाख रुपयांत दुसरी

एखादी स्त्री मिळू शकते, पण जमनादास भक्तासाठी तर एकमात्र प्रभूच सर्वस्व होते. त्यांचे प्रभूप्रेम खरे होते. शुद्ध होते. त्यांनी आपली सगळी संपत्ति विकून टाकली आणि लाख रुपयांत ते कमळ विकत घेऊन श्रीनाथांच्या सेवेत अर्पण केले. फूल अर्पण केल्याबरोबर श्रीनाथांच्या डोक्यावरून मुकुट खाली पडला. याप्रकारे भगवंतांनी दाखविले की भक्ताच्या त्या फुलाचे वजन मला अत्यधिक आहे.

सनत्कुमारांना क्रोध झाला म्हणून त्यांचे पतन झाले. प्रभूच्या द्वारापर्यंत जाऊन त्यांना परत फिरावे लागले.

मन आणि बुद्धीवर केव्हांही विश्वास ठेवू नका. ते पुनःपुन्हा दगा देत असतात. आपल्याला सर्वथाही निर्दोष मानण्याइतका दुसरा आणखी दोष नाही.

काम, क्रोध आंतरिक विकार आहेत. ते बाहेरून येत नाहीत. सनत्कुमारांचा क्रोध बाहेरून आला नाही. संधि मिळाल्याबरोबर हे विकार बाहेर येत असतात. म्हणून मनावर सत्संगाचा, भक्तीचा अंकुश ठेवा. सतत ईश्वरचिंतन केल्याने आतील विकार शांत होतात.

सनत्कुमारांनी क्रोधित होऊन जय-विजयांना शाप दिला की, राक्षसांमध्येच विषमता असते. तुमच्या दोघांच्या मनांत विषमता आहे म्हणून तुम्ही राक्षस व्हाल.

मंदिरांत थोडेसेही केलेले पाप महापाप होत असते. सनत्कुमारांनी तर वैकुंठांतच क्रोध केला!

शुकदेव सावध करतात: राजन्, असे पाप केव्हांही करू नको.

सनकादिक ऋषींनी शाप दिला कीं दैत्यकुळांत तुम्हाला तीन वेळा जन्म घ्यावा लागेल. भगवंतांनी विचार केला की यांनी माझ्याच अंगणात पाप केले आहे, तेव्हा हे घरात येण्यास पात्र नाहीत. यांनी अजून क्रोधावर विजय मिळविला नाही. म्हणून माझ्या धामांत प्रवेश करण्याची पात्रता यांनी गमविली आहे. मी बाहेरच जाऊन यांना दर्शन देऊन येतो.

सनकादिकांना आत प्रवेश मिळाला नाही. ते जर आत जाऊ शकले असते तर बाहेर यायचा प्रश्नच उपस्थित झाला नसता. कारण भगवंताचे तर 'परमधाम' आहे– "**यद्गत्वा न निवर्तन्ते**".

भगवंत लक्ष्मीला म्हणाले, बाहेर काही भांडण होत आहे असे वाटते. ते दोघे बाहेर आले. भगवंतांनी सनत्कुमारांकडे पाहिले नाही. आज नजर जमिनीकडे आहे.

आपल्या हातून घडलेल्या पापाबद्दल जोपर्यंत ह्रदयापासून पश्चात्ताप होत नाही तोपर्यंत भगवंत दर्शन देत नाहीत.

लोक स्वतःला वैष्णव म्हणवतात, पण पाप करायचे सोडत नाहीत. स्वदोषदर्शन हे ईश्वरदर्शनाचे फळ आहे. सनत्कुमार नमस्कार करीत आहेत, पण भगवंत त्यांच्याकडे पाहत नाहीत. दोन्ही ऋषींनी भगवंताची क्षमा मागितली. प्रभु म्हणाले, चूक तुम्ही केली नाही. तुमचा अपमान म्हणजे माझाच अपमान आहे.

भगवंतांना ब्राह्मण प्रिय आहेत. कारण ते भगवंताची ओळख करून देत असतात. भगवंत म्हणतात, तुम्ही तर माझ्या भक्ति आणि ज्ञानाचा प्रचार केला आहे. ब्रह्मदेव किंवा लक्ष्मीपेक्षाही मला माझे भक्त अधिक प्रिय आहेत. भगवंत वाणी-चतुर आहेत. लक्ष्मीला वाईट वाटू नये म्हणून पुनः म्हणतात, 'पण भक्ति जर अनन्य नसेल तर ते (भक्त) मला प्रिय नाहीत. लक्ष्मीची भक्ति अनन्य आहे. ती निष्काम भावाने प्रेम करते. म्हणून ती भगवंताला विशेष प्रिय आहे. जर लक्ष्मीची भक्ति निष्काम नसती तर तीसुद्धा मला प्रिय वाटली नसती.'

चंचल लक्ष्मी प्रभूचे चरणीं स्थिर होत असते. तुळस राधेचे स्वरूप आहे. तुळशीच्या लग्नाचा

आशय जीवात्मा आणि परमात्म्याचा विवाह होय.

सनकादि विचार करीत आहेत कीं आमची प्रशंसा तर खूप केली जात आहे; परंतु आम्हाला धामाच्या आंत तर बोलावीतच नाहीत. आम्हाला अजून तपश्चर्या करण्याची आवश्यकता आहे. अजूनपर्यंत आमचा क्रोध नष्ट होऊ शकला नाही. ते ब्रह्मलोकीं निघून जातात.

जय-विजयांचे समाधान करीत नारायण भगवान म्हणाले, 'तुमचे तीन अवतार होतील.'

सनकादींच्या शापामुळे जय आणि विजय अनुक्रमें हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपुच्या रूपांत अवतीर्ण झाले. शुकदेव वर्णन करीत आहेत—

### ९. हिरण्याक्ष–हिरण्यकशिपुचा जन्म आणि वराह द्वारा हिरण्याक्षाचा संहार:

दितीच्या गर्भांत जय-विजय आले. दोन बालकांचा जन्म झाला. त्यांची नावे हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपु ठेवली गेली.

अवेळी केलेल्या कामोपभोगामुळे दिति-कश्यपांचे घरी राक्षसांचा जन्म झाला. म्हणून कामाच्या आधीन होऊ नका. एकादशी, द्वादशी, पौर्णिमा, अमावास्या, जन्मतिथि इत्यादी दिवशी ब्रह्मचर्याचे पालन करा.

महाप्रभूंनी या चरित्राच्या शेवटी कश्यपाचे माथी तीन दोष आरोपित केले आहेत: कर्मत्याग, मौनत्याग आणि स्थानत्याग.

हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपु दररोज चार हात लांब वाढत असत. खरोखरच असे होऊ लागले तर आईबापांची काय दुरवस्था होईल याची कल्पनाच करावी. इतर अडचणींकडे दुर्लक्ष केले तरी रोज रोज कपडे तर छोटे पडतच जातील!

परंतु ही तर भागवतांतील समाधिभाषा आहे. भागवतांत समाधिभाषाच मुख्य आहे आणि लौकिक भाषा गौण आहे.

या वर्णनाने लोभाचें स्वरूप दाखविले आहे. चार चार हात वाढत होते म्हणजे लोभ दिवसेंदिवस वाढतच असतो. लाभाने लोभ वाढतो. प्रभुकृपेशिवाय लोभाचा अंत होत नाही. वृद्धावस्थेंत शरीर जीर्ण झाल्याने काम मरून जातो (क्षीण होतो) परंतु लोभाचा नाश होत नाही.

लाभाने लोभ आणि लोभाने पाप वाढते. पाप वाढल्यामुळे पृथ्वी रसातळाला जाते. पृथ्वी म्हणजे मानवसमाज दुःखरूपी रसातळामध्ये बुडून जातो.

हिरण्याक्ष म्हणजे संग्रहवृत्ति आणि हिरण्यकशिपु म्हणजे भोगवृत्ति.

हिरण्याक्षाने पुष्कळ संग्रह केला आणि हितरण्यकशिपुनें खूप उपभोग घेतला.

लोभ वाढला कीं भोगही वाढतो आणि भोग वाढल्याने पाप वाढीस लागते. जेव्हापासून द्रव्यसंग्रहानेच सुख मिळते असे लोक मानू लागले तेव्हापासून जगांत पापही फार वाढलें आहे. फक्त धनानेच सुख मिळते असे नाही.

हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपु यांच्या संहारासाठी भगवंताने अनुक्रमे वराह आणि नरसिंह अवतार धारण केले होते. हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपु लोभाचेच अवतार आहेत.

भगवंतांनी कामाला मारण्यासाठी एकच अवतार घेतला; अर्थात रावण–कुंभकर्णाचा संहार करण्यासाठी रामचंद्रांचा अवतार घेतला. क्रोधाला मारण्यासाठी-शिशुपालाला मारण्यासाठी एक कृष्णावतारच घेतला. परंतु लोभाला मारण्यासाठी दोन अवतार घ्यावे लागले – वराह आणि नृसिंह.

काम, क्रोधांना मारण्यासाठी एकेकच अवतार घ्यावा लागला. परंतु लोभाला मारण्यासाठी दोन अवतार घ्यावे लागले, हे हेच दर्शविते की लोभावर मात करणे फार दुष्कर आहे.

वृद्धावस्थेंत तर कित्येक लोकांना शहाणपण येते, परंतु जो तरुणपणीच शहाणा होतो तोच खरा शहाणा होय. शक्ति क्षीण झाल्यावर कामाला जिंकणे काय मोठी गोष्ट आहे? कोणी आपले सांगणे ऐकतच नाही असे झाल्यावर क्रोध मिटला तर त्यांत काय आश्चर्याची गोष्ट झाली? परंतु हा लोभ तर वृद्धावस्थेंत देखील शेवटपर्यंत सुटू शकत नाही. लोभाला मारणे कठीण आहे. सत्कर्मामध्ये विघ्नकर्ता लोभ आहे. म्हणून संतोषाच्या मदतीने त्याला मारावे. लोभ संतोषानेच मारला जातो. यासाठी संतोषाची सवय लावून घ्या.

लोभ इत्यादींच्या प्रसारामुळे पृथ्वी दुःखरूपी सागरांत बुडून गेली होती. म्हणून भगवंतांनी वराह अवतार घेऊन तिचा उद्धार केला. भगवान वराह संतोषाचे (प्रतीक) अवतार आहेत.

वराह अवतार यज्ञावतार आहे. वर+अह. वर अर्थात श्रेष्ठ आणि अह म्हणजे दिवस. कोणता दिवस श्रेष्ठ असतो? ज्या दिवशी तुमच्या हातून कांही सत्कर्म होईल तोच दिवस श्रेष्ठ आहे. श्रेष्ठ कर्म केल्याने तो दिवससुद्धा श्रेष्ठ होईल. ज्या कार्याने प्रभु प्रसन्न होतील तेच सत्कर्म असते. सत्कर्मालाच यज्ञ म्हणतात.

हिरण्याक्ष सत्कर्मांत विघ्नकर्ता आहे. मनुष्याच्या हातून सत्कर्म होत नाही याचें कारण असे कीं त्याला वाटत असते कीं प्रभूंनी त्याला पुष्कळ दिले आहे. हिरण्याक्ष लोभाचें स्वरूप आहे.

समुद्रांत बुडालेल्या पृथ्वीला वराहभगवंतांनी बाहेर तर काढले, पण तिला आपल्याजवळ ठेवले नाही. त्यांनी पृथ्वी मनूला अर्थात मनुष्याला सोपवून दिली. जे कांही आपल्या हातांत आले ते दुसऱ्यांना देऊन टाकले. हाच संतोष होय.

वराहभगवान यज्ञाचे प्रतीक आहेत. यज्ञ केल्याने चित्तशुद्धि होते. लोभ इत्यादींचा नाश करून चित्तशुद्धि केली पाहिजे. चित्तशुद्धि झाल्याने कपिल मुनींची अर्थात ब्रह्मविद्येची प्राप्ति होत असते.

यज्ञपूर्वक जीवन जगाल तर ज्ञान मिळेल. यज्ञावताराशिवाय मनाची शुद्धि होत नाही आणि मनःशुद्धि किंवा चित्तशुद्धीशिवाय ज्ञान मिळत नाही. आणि मग ज्ञानावतारही होत नाही आणि कपिलदेव देखील येत नाहीत. अज्ञान दूर करण्याचे कार्य वराह अवतार दर्शवितात. अज्ञानाला दूर करण्यासाठी यज्ञ करा. सत्यभाषणसुद्धा यज्ञच आहे. यज्ञ कराल तर कपिल भगवानांची ब्रह्मविद्या बुद्धींत स्थिर होईल.

कर्म चित्तशुद्धीसाठी असते. भक्ति मनाच्या एकाग्रतेसाठी असते. कर्म, उपासना आणि ज्ञान ह्या तिघांचीही जीवनांत आवश्यकता असते. कर्माने चित्तशुद्धि झाल्यावर ब्रह्मजिज्ञासा जागृत होते.

श्रीशंकराचार्य म्हणतात, 'लोक त्वचेची मीमांसा तर खूप करतात, परंतु आत्म्याची मीमांसा कोणी करीत नाहीत.'

हिरण्याक्षाला वाटू लागले की स्वर्गांतून संपत्ति आणावी. दिवसेंदिवस त्याचा लोभ वाढतच होता. एकदा तो पाताळांत गेला. तेथे वरुणाशी लढण्याची त्याला इच्छा झाली.

वरुण म्हणाला कीं तू वराहनारायणांशी युद्ध कर.

हिरण्याक्ष वराहनारायणाकडे येऊन म्हणाला की, 'तू डुकरासारखा आहेस.' तर वराह त्याला म्हणाले, 'तू कुत्र्यासारखा आहेस.' आणि भांडण वाढले.

सर्व पापांचे मूळ वाणी आहे. वाणी दूषित झाल्याने वीर्य दूषित होते. उच्चाराशिवाय पाप होत नाही. प्रथम मनांतल्या मनांत उच्चार केल्यानंतरच पाप होत असते.

मुष्टिप्रहार करून वराहांनी हिरण्याक्षाचा संहार केला, आणि पृथ्वीचें राज्य मनुमहाराजांना सोपवून दिले. मनूला त्यांनी सांगितले कीं धर्मानें पृथ्वीचें पालन कर आणि ते बद्रीनारायणाचे स्वरूपांत लीन होऊन गेले.

मनुष्यमात्राचा धर्म समाजाला सुखी करणें हा आहे. हा आदर्श वराहभगवंतांनी आपल्याच आचरणाने मनुष्याला शिकविला. लोभावर जय मिळविण्यासाठी वराहनारायणांच्या चरणांचा आश्रय घ्या. वराहाचें चरण संतोषाचे स्वरूप आहेत. मनुष्याच्या स्वभावांत जोपर्यंत लोभ असतो तोपर्यंत पाप राहते. आणि जोपर्यंत पाप असते तोपर्यंत शांति मिळू शकत नाही. ज्याचे आचरण निष्पाप असेल त्यालाच शांति मिळते. फक्त अर्थोपार्जनेसाठीच बुद्धीचा उपयोग करू नका. तिचा उपयोग ईश्वरोपासनेसाठीही करा. नाहीतर त्या जव्हेऱ्यासारखीच तुमची स्थिती होईल.

एकदा एका राजाच्या दरबारांत एक जव्हेरी आला. त्याच्याजवळ एक हिरा होता. त्या हिऱ्याची किंमत ठरविण्यासाठी पुष्कळशा जव्हेऱ्यांना बोलाविले. सगळ्यांनीच वेगवेगळी किंमत सांगितली. राजा निराश झाला. इतक्यांत एक वृद्ध जव्हेरी आला. त्याने हिऱ्याची किंमत नव्याण्णव लाख रुपये सांगितली. राजाने विचारले, पूर्ण एक कोटी का नाही सांगितली? तर त्या वृद्ध जव्हेऱ्याने आणखी शंभर हिरे मागवून त्या हिऱ्याजवळ ठेवले. त्या हिऱ्याचें तेज नव्याण्णव हिऱ्यांवर पडले पण एका हिऱ्यावर पडले नाही. या कारणाने मी एक लाख कमी सांगितले, असें तो वृद्ध जव्हेरी म्हणाला.

राजाला वाटले की हा जव्हेरी किती बुद्धिवान आहे. तो म्हणाला, 'प्रधानजी, याला कांही तरी बक्षीस द्या.' त्याचवेळी तिथे बसलेल्या एका महात्म्याने म्हटले की या जव्हेऱ्याच्या डोक्यावर राख (धूळ) टाका. महात्म्याला अशा विचित्र प्रस्तावाचें कारण विचारले गेले.

महात्मा म्हणाले, या जव्हेऱ्याने आपल्या बुद्धीचा उपयोग फक्त दगडांचा विचार करण्याकडेच केला आहे; ईश्वराचे भजन करण्यासाठी नाही! बुद्धीचा उपयोग जर त्याने देवाला ओळखण्यासाठी केला असता तर त्याचा उद्धार झाला असता. तुम्ही या जव्हेऱ्याला चतुर समजत असाल, पण मी तर याला मूर्ख समजत आहे.

हिरण्याक्षाचा मृत्यू होईल तेव्हांच पाप मरेल आणि तेव्हांच ब्रह्मविद्येचे ज्ञान बुद्धीमध्ये स्थिर होईल. बुद्धि निष्काम झाल्यानंतरच ब्रह्मज्ञान स्थिर होऊ शकते.

मनुष्याच्या शरीरांत जी नऊ छिद्रें आहेत त्यांच्या द्वारें ज्ञान बाहेर निघून जात असते. इंद्रियांच्या द्वारे ज्ञान बाहेर निघून जाणार नाही अशासाठी इंद्रियनिग्रह करा आणि त्यांना प्रभूच्या मार्गाकडे वळवा.

तृतीय स्कंधांत दोन प्रकरणें आहेतः पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा.

पूर्वमीमांसेत वराहनारायणाच्या अवताराचें निरूपण केले आहे आणि उत्तरमीमांसेंत कपिल नारायणाच्या चरित्राचें वर्णन आहे.

यज्ञ केल्याशिवाय कपिल नारायणाची विद्या बुद्धीत स्थिर होत नाही.

मनाने, वाचेने आणि कायेने कोणाला त्रास देऊ नका. हाच यज्ञ आहे. जो कारणावाचूनच हृदय जाळत असतो तो आत्मघात करीत असतो. सदासर्वदा प्रसन्न राहणे हाही एक यज्ञच आहे.

यज्ञ केल्याशिवाय, सत्कर्म केल्याशिवाय चित्तशुद्धि होत नाही, आणि चित्तशुद्धीशिवाय ज्ञान टिकत नाही. सत्कर्मांनी सगळीच इंद्रियें शुद्ध होतील. ज्याचे मन कलुषित आहे त्याला परमात्म्याचा अनुभव होऊ शकत नाही.

मानवशरीर एक घागर आहे. यांत नऊ छिद्रें आहेत. जर घागरीला छिद्रे असतील तर ती कधीच

भरली जाणार नाही. प्रत्येक छिद्रांतून ज्ञान वाहून जात असते. ज्ञान प्राप्त करणे कठीण नाही. ज्ञान होते तर खरें, पण ते राहात नाही. विकार-वासनेच्या वेगांत ते पुष्कळ वेळा वाहून जाते. तसें तर सगळ्यांचाच आत्मा ज्ञानमय आहे. म्हणून अज्ञानी कोणीच नाही. परंतु ज्ञानाला सतत जपून ठेवण्यासाठी इंद्रियांद्वारें वाहून जाणाऱ्या बुद्धि-शक्तीला आवरायचें आहे. ज्ञानी इंद्रियांना विषयांकडे जाऊ देत नाही. दुसऱ्या पक्षी वैष्णव इंद्रियांना प्रभूच्या मार्गाकडे वळवितो. ज्ञान टिकून राहू शकत नाही. कारण मनुष्याचें जीवन विलासी झालेले आहे. सगळेच्या सगळे ज्ञान पुस्तकातच ठेवलेले राहते. डोक्यांत शिरतच नाही.

जो पुस्तकांच्या मागे धाव घेतो तो विद्वान, आणि जो भक्तिपूर्वक परमात्म्याच्या मागे धावतो तो संत. विद्वान शास्त्रांच्या मागे धावत असतो, तर शास्त्र संतांच्या मागे धावते. शास्त्र वाचून जो बोलेल तो विद्वान आणि प्रभूला प्रसन्न करून त्यांतच वेडा होऊन जो बोलेल तो संत होय.

गीतेंत भगवंतांनी अर्जुनाला सांगितले आहे– "अर्जुना, ज्ञान तर तुझ्यांतच आहे."

हृदयांत सात्त्विक भाव उदित होतील आणि मन शुद्ध होईल तर हृदयांतून ज्ञान आपोआप प्रगट होईल.

मीराबाईंनी आपल्या भजनांत कोठेच असें लिहिलेलें नाही कीं त्यांचा कोणी गुरु होता आणि त्या कोठे शास्त्र शिकायला गेल्या होत्या. तुकाराममहाराज देखील कोणाच्या घरीं शास्त्र शिकायला गेले नव्हते.

हृदयांत असणाऱ्या लोभाला मारण्यासाठी कपिल भगवान आपोआप आले.

ज्ञानाचा शत्रू आहे हिरण्याक्ष. भागवतांत सांगितलेल्या अवतारांच्या क्रमामध्ये सुध्दा रहस्य आहे. ज्ञानाला बुद्धीत स्थिर करायचे असेल तर हिरण्याक्षाला मारावे लागेल. प्रथम हिरण्याक्षाला मारल्यानंतर कपिल भगवान येत असतात.

आपल्या मनाला विचारा कीं प्रभूकडून मला जी सुखसंपत्ति मिळाली आहे ती मला पुरेशी आहे कीं नाही ? उत्तर नकारात्मकच असेल. लोभाला संतोषाने मारा. जास्त मिळविण्याची इच्छा करू नका. मनुष्य असे समजतो कीं प्रभूंनी मला जे दिले आहे ते फार कमी आहे आणि म्हणूनच पाप होत असते. पाप न घडले तर इंद्रियें शुद्ध होतील आणि तेव्हांच इंद्रियांमध्ये ज्ञान-भक्ति टिकून राहतील. यज्ञादि सत्कर्मांनी चित्तशुद्धि होते. त्यानंतर ज्ञान बुद्धीत टिकून राहू शकते.

पूर्वमीमांसेनंतर ह्या उत्तरमीमांसेचा आरंभ केला गेला आहे. उत्तरमीमांसेत ज्ञान प्रकरण आहे. कपिल मुनि ज्ञानाचे अवतार आहेत.

स्वयंभू मनूच्या राणीचे नांव शतरूपा होते. मनूला दोन मुलगे होते– प्रियव्रत आणि उत्तानपाद. तीन मुली देखील होत्या– आकृति, देवहूति आणि प्रसूति. आकृतीचें देवरुचीशी, देवहुतीचें कर्दमाशी आणि प्रसूतीचें दक्षाशी लग्न झाले होते.

कर्दम ऋषि आणि देवहुति यांचे घरीं कपिल भगवान आले होते.

विदुरांनी प्रश्न केला, 'अहो मैत्रेयमुनि, आपण कर्दम आणि देवहुति यांच्या वंशाची कथा सांगा. कपिल भगवंताचीही कथा सांगा. मला ऐकण्याची इच्छा आहे.

मैत्रेय सांगतात: कपिल ब्रह्मज्ञानाचें स्वरूप आहेत. कर्दम व्हाल तर तुमच्या येथे कपिल येतील. कर्दम अर्थात इंद्रियांचे दमन करणारा. कर्दम म्हणजे जितेन्द्रिय. जोपर्यंत मनुष्य कर्दम होऊ शकत नाही तोपर्यंत त्याला कपिल मिळत नाहीत. शरीरांत सत्त्वगुणाची वृद्धि झाली म्हणजे आपोआप ज्ञानाचा झरा फुटतो– ज्ञान प्रगट होते.

शरीरांत सत्त्वगुणाची वृद्धि झाल्याने ज्ञानाची प्राप्ति होते. शुद्ध आहार, शुद्ध आचार आणि शुद्ध विचार यांनी सत्त्वगुणाची वृद्धि होते. सत्त्वगुण वाढला कीं ज्ञान मिळेल. सत्त्वगुण वाढत असतो संयमाने आणि सदाचाराने. सत्त्वगुण वाढल्याने आंतून ज्ञानाचें स्फुरण होते. जीभ सुधारल्याने जीवनही सुधारते. जीभ जे कांही मागेल ते सर्व तिला देऊ नका. पडल्यानंतर दोनचार मिनिटांतच झोप येईल असे वाटेल तेव्हांच निजता आले पाहिजे. पडल्याबरोबर झोप न लागली तर जीव कामसुखाचें चिंतन करील. पुढे कथाभाग येणार आहे कीं घरकाम संपूर्ण झाल्यानंतर गोपी कृष्णकीर्तन करीत असत.

आचरण सात्त्विक ठेवा.

जितेन्द्रिय होण्यासाठी सरस्वतीच्या काठीं राहावे लागेल. सरस्वतीचा किनारा सत्कर्मांचा किनारा आहे. यमुना भक्तीचें स्वरूप आहे. गंगा ज्ञानाचें आणि सरस्वती सत्कर्माचे स्वरूप आहे.

शुकदेव राजर्षींना सांगतात– राजन्, कर्दमऋषि सबंध दिवसभर तप करीत. त्यांच्या तपाने भगवंत प्रसन्न झाले. भगवंत ऋषींच्या घरीं आले. विदुरांच्या घरीं सुध्दा द्वारकानाथ गेले होते.

भगवान श्रीकृष्ण हरतऱ्हेने उदार आहेत. परंतु वेळ देण्यांत उदार नाहीत. वेळेला सोन्यापेक्षा जास्त मूल्यवान समजा. लक्ष्य नेहमी लक्षांत ठेवलें तर जीवन सफल होईल. लक्ष्याविना मनुष्य बिनसुकाणूच्या नावेसारखा आहे.

**१०. कर्दमांची तपश्चर्या आणि त्यांचा मनु-शतरूपांची कन्या देवहुतीशी विवाह:**

कर्दम जितेन्द्रिय महात्मा होते. त्यांची तपश्चर्या सफल झाली. त्यांच्यासमोर भगवंत प्रगट झाले. सिद्धपूरजवळ कर्दम ऋषींचा आश्रम होता. त्यांनी मोठी तपश्चर्या केली. शरीरांत फक्त हाडेच राहिली. अशा कठोर तपश्चर्येने भगवंत प्रसन्न झाले. डोळ्यांतून आनंदाश्रु आले. त्याच अश्रूंचे बिंदुसरोवर झाले. सिद्धपूरची यात्रा करताना या बिंदुसरोवरांत स्नान करावे लागते.

तुम्ही देखील अधिक ध्यान केले तर भगवंत तुमच्यावरही प्रसन्न होतील आणि तुम्हाला दर्शन देतील. भगवंताचें ध्यान होऊ शकले नाही तरी हरकत नाही, पण याविषयी सावध रहा कीं तुमचे मन कोठे सांसारिक विषयांत स्थिर न होवो. डोळेरूपी रत्नाचें जतन करा. डोळ्यांच्या शक्तीचा अपव्यय करू नका. संसारांतील सौंदर्य क्षणिक आहे.

धनसंपत्ति वाढल्यावर लोकांमध्ये विवेकाचा अभाव होऊ लागतो. एक गृहस्थ भेटले. ते म्हणाले कीं, काश्मीर फार सुंदर प्रदेश आहे. पाहायचा असेल तर चला आमच्याबरोबर.

जगांतील कोणतीच वस्तु सुंदर नाही की कोणतीही कुरूप नाही. डोळ्यांत विकार असल्याकारणे वस्तु सुंदर वा कुरूप वाटते. मनुष्य सौंदर्याच्या मागे वेडा होत असतो. परंतु ज्या व्यक्तीच्या सौंदर्याने तो वेडा होत असतो त्या व्यक्तीचा चेहरा जर देवीच्या डागांनी डागाळला गेला तर तिच्याकडे पाहायलाही मन धजावणार नाही.

शरीराचें सौंदर्य न पाहतां अंतरंगाचें, हृदयाचें सौंदर्य पहा. जगापेक्षा जगनिर्माता अधिक सुंदर आहे. लोक काश्मीरचें सौंदर्य पाहायला जातात; पण तें काश्मीर बनविणारा माझा श्यामसुंदर कितीतरी अधिक सुंदर आहे! श्रीकृष्ण सुंदर आहेत असा वारंवार विचार केल्याने भक्तीचा उदय होतो. एक ईश्वरच नित्य सुंदर आहे.

प्रभूचें दर्शन केल्याने डोळे सफल होतात. कर्दम म्हणतात: भगवन्, तुमच्या दर्शनाने माझे डोळे सफल झाले आहेत. आपण स्वतः प्राप्त झाल्यावर सांसारिक मागणी मागणारा मूर्ख आहे. सांसारिक

अशा ज्या सुखाचा भोग नरकांतील किडे देखील करतात तशा सुखाची इच्छा परमेश्वरापासून करणारा मूर्ख कोण असेल?

लौकिक कामसुखाच्या इच्छापूर्तीसाठी श्रीकृष्णाची आराधना करणारा तुच्छ आहे.

कर्दमांनी भगवंताला म्हटले, मी तुमच्यापासून स्त्रीसुखाची नाही, सत्संगाची इच्छा करतो. मला अशी स्त्री द्या कीं जी मला प्रभूकडे घेऊन जाईल. अशी स्त्री मला मिळावी कीं जेव्हा केव्हां माझ्या मनांत पापाचा विचार येईल तेव्हां ती मला पापकर्मापासून परावृत्त करील आणि प्रभूच्या मार्गांत घेऊन जाईल. माझा विवाह संसारसागरांत बुडण्यासाठी नाही तर तो तरून जाण्यासाठी व्हावा. कृष्णसेवा महान् धर्म आहे. मी कामसुख मागत नाही. शास्त्रांत पत्नीला कामपत्नी नाही तर धर्मपत्नी म्हटले आहे. ब्रह्मदेवांनी मला विवाह करण्याची आज्ञा केली आहे. मला पत्नी नको, घरांत सत्संग हवा. स्त्रीसंग म्हणजे कामसंग नाही, तो सत्संग आहे. धर्माच्या आचरणासाठी पत्नी आहे.

एकटा पुरुष किंवा एकटी स्त्री धर्ममार्गांत पुढे जाऊ शकत नाही. नावाड्याशिवाय नुसती नावच संसारसागर पार करू शकणार नाही. नावाडीसुद्धा एकटा नावेविना संसारसागर तरून जाऊ शकणार नाही. स्त्री नाव आहे आणि पुरुष नावाडी. दोघांनाही एकमेकांच्या मदतीची आवश्यकता आहे. पुरुषांमध्ये विवेक असतो आणि स्त्रियांमध्ये स्नेह. विवेक आणि स्नेह एकत्र येण्याने भक्ति प्रगट होते. पुरुष धन मिळवू शकतो. पुरुष ज्ञानस्वरूप असतो. स्त्रीचे हृदय कोमल असल्याकारणाने ती समर्पण करते. स्त्री ही क्रियाशक्ति आहे.

पुष्कळांना आश्चर्य वाटेल कीं इतकी वर्षे तपश्चर्या करूनही कर्दमाने भगवंतापासून मुक्ति कां मागितली नाही? कर्दमाने विचार केला कीं हजारो जन्मांच्या कामवासना सुप्त स्थितींत मनांत एकत्र झालेल्या आहेत; त्या संतुष्ट करून मनुष्यावर जी तीन ऋणें असतात त्यांतून प्रथम मुक्त होऊन मगच कायमच्या मुक्तीची इच्छा केली पाहिजे.

भगवंत म्हणाले– दोन दिवसांनी मनुमहाराज तुझ्याकडे येतील आणि आपली कन्या देवहुति तुला देतील. मनुमहाराज कन्या घेऊन येतील तेव्हां नखरे करू नकोस. आजकाल लोक रुबाबांत सांगत असतात, 'मला लग्न करायचे नाही.'

पति-पत्नींचे जीवन पवित्र असले तर त्यांच्या येथे भगवंताला जन्म घेण्याची इच्छा होत असते.

भगवंत म्हणाले– 'मी पुत्ररूपाने तुमच्या येथे येईन. जगाला मला सांख्यशास्त्राचा उपदेश करायचा आहे. असें सांगून श्रीहरि तेथून निघून गेले.

नारद मनुमहाराजांकडे गेले आणि म्हणाले, 'तुम्ही कर्दमाला कन्यादान करा.'

मनुमहाराज शतरूपा आणि देवहुतीसह कर्दम ऋषींच्या आश्रमांत आले.

कर्दमांनी देवहुतीच्या विवेकाची परीक्षा पाहिली. त्यांनी तीन आसनें मांडली. सगळ्यांना बसायला सांगितलें तेव्हां मनु-शतरूपा बसले, परंतु देवहुति बसली नाही. तेंव्हा कर्दम तिला म्हणाले, हे तिसरे आसन तुझ्यासाठीच आहे.

देवहुतीने विचार केला कीं भविष्यात हे तर माझे पति होणार आहेत. पतीने मांडून दिलेल्या आसनावर बसेन तर पाप होईल. या आसनावर बसणें माझा धर्म नाही आणि आसनावर न बसण्याने तर आसन देणाऱ्याचा अपमान होईल. म्हणून आपला उजवा हात आसनावर ठेवून जवळच ती बसली.

ती बिचारी जुन्या वळणाची होती. आजकालची असती तर आसनावर आधीच बसली असती. आजकाल तर बायको नवऱ्याला मुलाला झोका देण्याचा हुकूम देत असते. मुलाला नवऱ्याजवळ ठेवून

एकटी हिंडायफिरायला निघून जाते. असे करू नये.

आर्य स्त्रीला वास्तविक संस्कारांचा आजकाल विसर पडत चालला आहे. आजकाल वधूपरीक्षेच्या रीतीही बदलल्या आहेत.

कर्दमानें विचार केला कीं ही कन्या योग्य आहे. तेव्हां तिच्याशी विवाह करण्यास हरकत नाही.

मनुमहाराज म्हणाले, ही कन्या मी तुम्हाला अर्पण करू इच्छितो.

कर्दम ऋषि म्हणाले– विवाह करण्याची माझी पण इच्छा आहे. परंतु पहिली एक प्रतिज्ञा करायची आहे. माझा विवाह विलासासाठी नाही, तर कामाचा नाश करण्यासाठी होईल.

कर्दम ऋषि म्हणतात, माझा विवाह कामाच्या विनाशासाठी असेल. काम कृष्णमीलनांत विघ्नकर्ता आहे. त्यालाच मला मारायचे आहे. एक मुलगा होईपर्यंत लौकिक संबंध ठेवीन. एक पुत्र झाल्यावर लौकिक संबंधाचा त्याग करून संन्यास घेईन.

कन्यादानाच्या मंत्रांत लिहिलें आहे– **संतत्या इति एक वचनम्. संततिभिः** असे म्हटले नाही. वंशरक्षणासाठी एकाच पुत्राच्या हेतूने कन्या अर्पण करीत आहे. शास्त्राने पहिल्या मुलालाच धर्मपुत्र म्हटले आहे. इतर सर्व पुत्र कामपुत्र असतात. कामाचरणासाठी नाही तर धर्माचरणासाठी विवाह आहे. वडील मुलाला म्हणतात, 'तू माझा आत्मा आहेस. एक मुलगा झाल्यावर पत्नी मातेसमान होत असते.'

काम ईश्वरासारखाच व्यापक होऊ इच्छितो. जिथे सौंदर्य दिसेल तिथेच काम उत्पन्न व्हायला लागतो. त्याला एकाच स्त्रीमध्यें सुरक्षित ठेवून त्याचा नाश करण्यालाच विवाह ही संज्ञा आहे.

लग्नाच्या वेळी 'सावधान' म्हटले जाते. कारण सगळेच जाणत असतात कीं लग्न झाल्यानंतर तो सावध राहणार नाही. लग्नानंतर सुद्धा जो सावध राहील तोच जिंकतो किंवा जो आधीपासूनच सावध असतो तोही जिंकतो.

रामदासस्वामी लग्नाच्या आधीच सावध झाले होते. विवाहमंडपांत उपाध्यायांनी 'सावधान, सावधान' म्हटले आणि ते मंडपांतून निघून गेले.

भोगावाचून रोग होत नाही. पूर्वजन्मीच्या पापामुळेही कांही रोग होतात, तर कांही या जन्मींच्या भोगविलासामुळे होतात. **'भोगे रोगभयम्'** भोगोपभोगांत रोगांचे भय असते. भोग वाढल्याने आयुष्याचा क्षय होतो. आम्ही भोगांचा उपभोग घेऊ शकत नाही, तर भोगच आमचा उपभोग घेत असतात.

जेव्हांपासून वरराज मोटारींत बसून विवाह करू लागले आहेत तेव्हांपासून घरसंसार बिघडला आहे. आजच्या वरराजांना घोड्यावरून पडण्याची भीती वाटते. त्यांना विचारा कीं जर तो एकच घोडा तुम्हाला पाडील तर मग ते अकरा घोडे तुमची काय दशा करतील? एकाच घोड्याला कह्यांत ठेवता येत नाही तर मग त्या अकरा घोड्यांना कसे आवरता येईल? अकरा इंद्रियेच अकरा घोडे आहेत. जितेन्द्रिय होण्यासाठीच विवाह करायचा आहे. आज तर विवाहाचा हेतूच आम्ही विसरलो आहोत.

कर्दम ऋषींनी दर्शविलें कीं, 'माझा विवाह एका सत्पुत्रासाठी आहे. त्यानंतर मी संन्यास घेईन. माझी ही प्रतिज्ञा तुमच्या मुलीला मान्य असेल तर मी विवाहास तयार आहे.'

मनुमहाराज मुलीला म्हणाले– हे तर लग्नाच्या वेळीच संन्यासाच्या गोष्टी करीत आहेत.

परंतु देवहुतीही असामान्यच होती!

शुकदेव वर्णन करीत आहेत.

देवहुति म्हणाली– मला असाच पति पाहिजे होता. कामांध होऊन संसारांत बुडून जाण्यासाठी गृहस्थाश्रम नाही. माझी अशीच इच्छा होती कीं मला कोणी जितेंद्रिय पति मिळावा.

देवाला बोलावणारी शक्तीच देवहुती होय. निष्काम बुद्धीच देवाला बोलावू शकते.

मनुमहाराजांनी विधिपूर्वक कन्यादान करून दिले. देवहुति-कर्दमांचा विवाह झाला.

देवहुति कर्दमाच्या आश्रमांत राहू लागली. तिनें विचार केला कीं माझे पति तपस्वी आहेत; तेव्हां मलाही तपस्विनी झाले पाहिजे. ती दोघे बारा वर्षें एकाच घरांत राहूनही संयमी आणि निर्विकारी राहिली.

दक्षिण भारतांत आजपासून अकराशे वर्षांपूर्वी वाचस्पति मिश्र नावाचे एक ऋषि होऊन गेले. षट्शास्त्रांवर त्यांनी टीका लिहिल्या आहेत आणि त्या आजदेखील प्रख्यात आहेत.

ते सबंध दिवस तपश्चर्या आणि ग्रंथलेखन यांत वेळ घालवीत असत. विवाह झाल्यानंतर छत्तीस वर्षें होऊन गेली, परंतु त्यांना ही जाणीव झाली नाही कीं त्यांची पत्नी कोण आहे. छत्तीस वर्षें बरोबर राहूनही ते आपल्या बायकोला ओळखत नव्हते.

एक दिवस ते ब्रह्मसूत्राच्या शांकरभाष्यावर टीका लिहीत होते– भाष्य लिहीत होते, पण एक ओळ कांही नीट व्यवस्थित लिहिली जात नव्हती. दिव्याची ज्योतही कांहीशी अंधुक होऊ लागली होती. त्यांची बायको दिव्याची ज्योत वाढवीत होती. इतक्यात वाचस्पतींची दृष्टी तिच्यावर गेली आणि त्यांनी विचारले, 'देवी, तू कोण आहेस ?'

विवाह होऊन छत्तीस वर्षें निघून गेली होती तरी पण ते पत्नीला ओळखत नव्हते. किती संयमी आणि जितेंद्रिय असतील ते !

बायको म्हणाली– तुमचे केव्हां लग्न झाले होते ते आठवते का ?

वाचस्पती म्हणाले : हं ! कांही कांही आठवते खरे !

बायको म्हणाली : माझ्याशीच तुमचे लग्न झाले होते. मी तुमची दासी आहे. आजपासून छत्तीस वर्षांपूर्वी आपले लग्न झाले होते.

बायकोने लग्नाची आठवण दिली तेव्हां वाचस्पतींच्या मनांत प्रकाश पडला आणि ते बायकोला म्हणाले : तुझ्याबरोबर माझा विवाह झाला आहे. छत्तीस वर्षे तू मौन धरूनच माझी सेवा केलीस. तुझे उपकार अनंत आहेत. तुझी काय इच्छा आहे ?

त्यांच्या पत्नीने–भामतीने म्हटले : नाथ, माझी तर कांहीच इच्छा नाही. तुम्ही जगताच्या कल्याणासाठी शास्त्रांच्या टीका रचत आहात. मी तुमची सेवा करून कृतार्थ झाले आहे. तुमची सेवा करता करताच मला मृत्यू यावा.

वाचस्पतींचे हृदय भरून आले. आणखी एक वेळ कांहीं मागण्यासाठी त्यांनी पत्नीला म्हटले, पण तिने कांहीच मागितले नाही.

वाचस्पति : देवी, तुझे नांव काय आहे ?

भामति : या दासीला सर्वजण भामति म्हणतात.

वाचस्पति : मी शांकरभाष्यावर जी टीका लिहीत आहे तिचे नांव मी 'भामति–टीका' ठेवीन.

आजदेखील वाचस्पतींची ती टीका 'भामति–टीका' याच नावाने प्रसिद्ध आहे.

असा होता आमचा देश भारतवर्ष ! एकाच घरांत छत्तीस वर्षेपर्यंत राहून संयमाचें पालन केले होते त्यांनी. अशा संयमी व्यक्तीला ज्ञान मिळत असते. ज्ञान बाजारांत नाही मिळत. आजकाल पुस्तकांच्या द्वारे ज्ञानाचा प्रचार आणि प्रसार तर पुष्कळ होत आहे; परंतु कोणाही व्यक्तीच्या डोक्यांत ज्ञान दिसून येत नाही. आहे ती फक्त माहिती, ज्ञान नाही.

पूर्ण संयमाशिवाय ज्ञान मिळविले जाऊ शकत नाही. पूर्ण संयमावाचून परमेश्वरही प्रगट होत नाही.

एकाच घरांत राहून कर्दम-देवहुतीनें बारा वर्षेपर्यंत आणि वाचस्पति-भामतीने छत्तीस वर्षेपर्यंत संयमाचें पालन केले. आजकालचा मनुष्य तर छत्तीस मिनिटही संयम पाळू शकत नाही.

कर्दम जीवात्मा आहे आणि देवहुति बुद्धि. देवहुति देवाला बोलावणारी निष्काम बुद्धि आहे. एक दिवस कर्दमाला दिसले कीं देवहुतीचें शरीर फार दुर्बल झाले आहे. ते पाहून त्याचें हृदय भरून आलें. त्याने देवहुतीला म्हटले, 'देवी, कांही वरदान माग. तू जे मागशील ते मी देईन'.

देवहुति म्हणाली, तुमच्यासारखे ज्ञानी पति मला मिळाले आहेत हेच वरदान आहे. मी तर पूजा करून एवढेच वरदान मागते कीं माझें सौभाग्य अखंड राहावे.

स्त्रीचा धर्म आहे कीं, तिने दररोज तुळशीची आणि पार्वतीची पूजा करावी. आजची स्त्री तुळशीची पूजा करीत असेल पण चहा-फराळानंतरच! पोट पहिले कीं ते देणारा पहिला?

देवहुतीचें हे वचन ऐकून कर्दम म्हणाले, कांही ना कांही तरी तू मागितलेच पाहिजे.

**११. कपिल मुनींचा पुत्ररूपाने जन्मः**

पतीने आग्रह केल्यावर देवहुति म्हणाली कीं, तुम्ही प्रतिज्ञा केली होती कीं एक संतान झाल्यावर तुम्ही संन्यास घ्याल म्हणून. आता इच्छा असली तर एका बालकाचें दान तुम्ही मला द्यावे.

मनुष्याच्या शरीराची रचनाच अशी आहे कीं तो भोगाचा उपयोग मर्यादित प्रमाणावरच करू शकतो. मर्यादेचे उल्लंघन केले तर तो रोगिष्ट होऊन जाईल. कर्दम म्हणाले, "मी तुला दिव्य शरीर अर्पण करीन."

देवहुति सरस्वतीच्या काठी स्नानाला गेली. सरस्वतीतून अनेक दासी निघाल्या. देवहुतीने स्नान केले आणि तिचें शरीर पालटले. कर्दम ऋषींनी संकल्पाच्या बळाने एक विमान बनविले आणि त्यांत दोघेही बसले.

कथेत ज्ञान आणि करुणरस प्रधान आहे. शृंगार आणि हास्य गौण आहे. कथेंत शृंगाररसाचें वर्णन करण्याची परवानगी महात्मा लोकांनी दिलेली नाही. श्रोत्यांना सांसारिक विषयांविषयी जेणेकरून अरुचि होईल आणि ईश्वरविषयक प्रेम उत्पन्न होईल असे लक्ष्य ठेवून वक्त्याने कथा सांगितली पाहिजे. कथाश्रवणानंतर विषयांविषयी अरुचि आणि ईश्वराविषयीं प्रीति उत्पन्न झाली नाही तर समजावें कीं कथाच ऐकलेली नाही. कथा ऐकून वैराग्य येत असते. भागवताच्या दुसऱ्या स्कंधांत ब्रह्मदेवांनी, कथा कशा प्रकारे करावी ते नारदांना सांगितले आहे.

या शंभर वर्षांत देवहुतीला नऊ कन्या झाल्या, परंतु मुलगा एकही झाला नाही. जो नऊ मुलींचा बाप होतो त्याचे येथे कपिल येतात. ज्याला नऊ मुली होतात त्याला ज्ञान प्राप्त होते. नऊ कन्यांचा अर्थ आहे नवविधाभक्ति. नवविधाभक्तीशिवाय ज्ञान होत नाही. सामान्य अर्थाने घ्यायचे झाले तर असे म्हणता येईल कीं नऊ मुलींची लग्नें करता करता बापाची अक्कल ठिकाणीं येते आणि विचार करतो कीं मी हे काय करून बसलो?

नवविधाभक्ति परिपक्व होईपर्यंत ज्ञान होत नाही. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन ही नऊ अंगे नवविधाभक्तींत येतात. नवविधाभक्ति सिद्ध झाल्यावरच कपिल भगवान येतात. भक्तीच ज्ञानरूप धारण करते. भक्तीची उत्तरअवस्था ज्ञान आहे.

अपरोक्ष ज्ञानाची पूर्वावस्था भक्ति आहे. भक्तीनंतर ज्ञान होते. ज्ञानाची माता भक्ति आहे. ज्याची नवविधाभक्ति सिद्ध होत नाही, त्याला ज्ञान मिळत नाही. भक्तिद्वारेच ज्ञान मिळते. **'भक्तिर्ज्ञानाय कल्पते.'** तात्त्विकदृष्ट्या सरतेशेवटी ज्ञान आणि भक्तींत कांही अंतर नाही. भक्तीमध्यें पहिले **'दासोऽहम्'** आहे आणि नंतर **'सोऽहम्'.**

नऊ मुलींनंतर कर्दम संन्यास घ्यायला तयार झाले. एक दिवस कर्दमाला वाटले आता या विलासी जीवनाचा अंत झाला तर चांगले.

**"सत्त्वप्रधानाः ब्राम्हणाः"** वैश्याने विलासांत जीवन घालविलें तर कांही हरकत नाही, परंतु ब्राह्मणाला हे शोभत नाही. म्हणून कर्दमाने विचार केला कीं एकांतांत बसून तप करावे. देवहुति म्हणाली, मी पण त्याग करू इच्छिते. विवाहाचा अर्थ हा कीं तनुने तर दोन, पण मनाने एकच व्हावे.

देवहुति म्हणाली– नाथ, तुम्ही तर वचन दिले होते कीं एक पुत्र झाल्यावर संन्यास घेईन. पुत्राचा जन्म तर अजूनपर्यंत झालाच नाही! मग या मुलींची आणि माझी काळजी कोण घेईल? या मुलींची व्यवस्था केल्यानंतरच तुम्ही संन्यास घ्या.

शुकदेव वर्णन करीत आहेत.

कर्दम-देवहुतींनी विकाराचा त्याग केला. त्यांनी कित्येक वर्षें परमेश्वराची आराधना केली. त्यानंतर देवहुतीच्या गर्भांत साक्षात नारायणाने वास केला. नऊ महिन्याचा काल प्राप्त झाला. आचार्यांचे, योग्यांचे आणि साधूंचे आचार्य प्रगट होणार होते. ब्रह्मादि देव कर्दम ऋषींच्या आश्रमांत आले. ब्रह्मदेव कर्दम ऋषींना म्हणाले, 'तुमचा गृहस्थाश्रम सफल झाला आहे. तुम्ही आता जगताचे बाप झालेले आहात. तो बालक जगाला दिव्य ज्ञानाचा उपदेश देईल.'

जीव जेव्हां भगवंतासाठी आतुर होतो तेव्हां भगवंताचा अवतार होतो. आतुरतेमुळेच परमेश्वराचें दर्शन होते.

कर्दम आणि देवहुति यांची तपश्चर्या आणि आतुरता यामुळे भगवंत त्यांच्या येथे पुत्ररूपाने आले.

योगीजन योगाने परमेश्वराचें दर्शन करू शकतात, परंतु संसारी लोक शुद्ध भक्तीच्या योगे भगवंताला पुत्ररूपाने प्राप्त करू शकतात आणि त्याचें लालन-पालन करू शकतात.

कपिल भगवंतांनी जन्म घेतल्यानंतर देवहुति कर्दमाला म्हणाली– "आता गृहस्थाश्रमाचा त्याग करू शकता."

कर्दम म्हणतात, "आता मला या नऊ कन्यांची काळजी जाळत आहे."

एक युगुल होते. प्रभूवर पतीची दृढ श्रद्धा नव्हती. पत्नीने श्यामवस्त्रें परिधान केली. पतीने कारण विचारले तर तिने सांगितलें कीं तुमच्या लेखीं परमेश्वर नाहीच, म्हणून मी काळी वस्त्रें नेसली आहे.

महाभारतांत एक कथा आहे. भीष्मांनी प्रतिज्ञा केली कीं उद्या मी अर्जुनाचा वध करीन. भीष्माचार्यांची प्रतिज्ञा व्यर्थ होऊ शकत नाही. पांडवसेनेत हाहाःकार माजून गेला. अर्जुन तर नित्यनियमानुसार भगवत्‌चिंतन करीत झोपी गेला. श्रीकृष्णाला काळजी पडली कीं उद्या माझ्या अर्जुनाचे कसे होईल? ते अर्जुनाला भेटायला आले. अर्जुन झोपलेला होता. श्रीकृष्णांनी त्याला जागे करून विचारले कीं, 'तू झोपलेला कसा आहेस? तुला आज झोप कशी येत आहे?' अर्जुन म्हणाला, 'माझ्याकरता तुम्ही स्वतःच जेव्हां जागरण करीत आहांत तर मला आता चिंता कशी असू शकेल? मी आपले कर्तव्य केले आहे. आता तुम्हाला तुमचे कार्य करायचे आहे.'

मनुष्याचे कर्तव्य आहे अनन्य शरणागति. अर्जुन नेहमी असाच विचार करी कीं माझ्या मरणाने श्रीकृष्णाचीच अपकीर्ति होईल.

कर्दम म्हणतात, 'मला नऊ कन्यांची चिंता आहे'. ब्रह्मदेव म्हणाले, 'तू कां चिंता करतोस? तुझ्या घरी तर स्वतः भगवंत आलेले आहेत. तू चिंता करण्याऐवजी प्रभुचिंतन कर.'

वल्लभाचार्यांनी म्हटले आहे, **'चिंता कदापि न कार्या'** सेवास्मरण करीत जे वैष्णव तन्मय होतात त्यांची चिंता परमेश्वर वाहतो.

ब्रह्मदेव नऊ ऋषींना आपल्याबरोबर घेऊन आले. सगळ्या ऋषींना एक एक कन्या देऊन टाकली – अत्रीला अनसूया, वसिष्ठाला अरुंधती, इत्यादी. कर्दमाला वाटले आपल्या शिरावरचा भार उतरला. कपिलाच्या जवळ आले आणि म्हणाले, 'मला संन्यास घ्यायचा आहे.'

संन्यासाचा अर्थ आहे परमेश्वराच्या दर्शनासाठी सर्व सुखाचा त्याग. **'काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः'**

केवळ ईश्वरासाठीच जो जगतो तोच संन्यासी होय.

कपिल म्हणाले तुमची इच्छा योग्यच आहे. संन्यास घेतल्यानंतर आपण कोणत्याही गोष्टीची चिंता करू नका. आपण आपले जीवन ईश्वरार्पण करा.

मुक्ति दोन प्रकारची आहे –

१) **कैवल्य मुक्ती** – यांत जीव ईश्वरांत लीन होतो आणि दोघेही एकरूप होऊन जातात.

२) **भागवती मुक्ती** – ह्यांत सुध्दा जीव प्रेमामुळे ईश्वराशी एकरूप होतो, परंतु थोडे द्वैत शिल्लक ठेवून, नित्य सेवेत मग्न राहतो.

कर्दम ऋषींनी संन्यास ग्रहण केला.

परमात्म्यासाठी सर्व संसारसुखाच्या त्यागालाच संन्यास म्हणतात. त्यागाशिवाय संन्यास कार्यशील होत नाही. कित्येक लोक निवृत्त झाल्यावर सुद्धा (पेन्शन घेतल्यावर) दुसऱ्या नोकरीचा शोध करतात. सरकारने जेव्हां सांगितलें कीं तुम्ही आता नोकरी करण्यालायक राहिला नाही तर मग दुसरी नोकरी कां शोधता? आता तर भगवंताचें भजन करण्याचे दिवस आले आहेत.

संन्यासाचा विधि पाहून देखील वैराग्य येते. संन्यासाच्या प्रक्रियेत विरजा होम करावा लागतो. देव, ब्राह्मण, सूर्य, अग्नि इत्यादींच्या साक्षीत विरजा होम केला जातो. नंतर नदींत स्नान करून, लंगोटी फेकून नग्न अवस्थेंतच बाहेर निघावे लागते.

**१२. कपिलगीतेचा आरंभः**

आदिनारायणाचे चिंतन करता करता कर्दम ऋषींना भाग्यवती मुक्ती मिळाली.

कपिलगीतेचा आरंभ झाला. प्रसंग दिव्य आहे. पुत्र मातेला उपदेश देत आहे. भागवताच्या या महत्त्वाच्या प्रकरणाचे नऊ अध्याय आहेत. कपिलगीतेचा आरंभ २५ व्या अध्यायापासून होतो. यांत सांख्यशास्त्राचा उपदेश आहे. पहिल्या तीन अध्यायांत वेदान्ताचें ज्ञान येते आणि शेवटी भक्तीचें वर्णन केले गेलें आहे. त्यानंतर मग संसारचक्राचें वर्णन येते.

देवहुतीनें विचार केला कीं, ऋषींनी मला सांगितले होते कीं हा बाळ तुझा उद्धार करायला आला आहे. तर मग मी कपिल भगवानांना प्रश्न विचारीन त्याचे ते अवश्य उत्तर देतील. कपिल भगवंताजवळ येऊन देवहुति म्हणाली, 'जर तुमची संमति असेल तर मी तुम्हाला प्रश्न विचारू इच्छिते.'

कपिल म्हणाले, माते! संकोच करू नकोस. जे कांही तुला विचारायचे आहे ते विचार.

देवहुति मातेने आधीच शरणागतीचा स्वीकार केला.

ईश्वराचा आधार घेतल्यावाचून जीवाचा उद्धार होऊ शकत नाही. गीतेत अर्जुनानेसुद्धा प्रथम शरणागतीचा स्वीकार केला होता.

देवहुतीने विचारले: जगात खरे सुख कोठे आहे? जगात खरा आनंद कुठे आहे? नित्य आनंद कुठे आहे? ज्याचा नाश होऊ शकणार नाही अशा आनंदाविषयीं मला सांगा.

अनेक वेळा इंद्रियांचें लालनपालन करून देखील मला शांति मिळालेली नाही. जसजसा वेळ निघून जातो तसतशी जाणीव होऊ लागते कीं विषयांच्या आनंदांत कांहीच सार नाही. इन्द्रियांनी जे जे कांही मागितले ते ते सर्व मी त्यांना दिले. तरी पण तृप्ति झालेली नाही.

इन्द्रियें दररोज नवे नवे विषय मागत असतात. जीवाला रससुखाकडे ओढतात. डोळे रूपसुखाकडे आणि त्वचा स्पर्शसुखाकडे ओढतात. पुष्कळ लोकांना आठवण होत राहते कीं कित्येक दिवसांत अमुक वस्तू खाल्ली नाही. दोन महिन्यांत तीच वस्तू आजपर्यंत किती वेळा खाल्ली आहे याची आठवण ते ठेवीत नाहीत. खाऊनपिऊन जिभेला तृप्त करीत नाही तोच डोळे म्हणू लागतात कीं, दोन महिन्यांत फिल्म पाहिली नाही. असा विचार करीत आहे तेवढ्यांत बायको म्हणते, 'शेजारपाजारचे लोक तर महिन्यांतून चार चार वेळा सिनेमाला जात असतात. नवी फिल्म सुध्दा त्यांनी पाहून घेतली, आपण केव्हां जायचे?'

पैसे खर्च करून सिनेमाला अंधारांत जाऊन बसतात! त्यांना सुधारलेले म्हणावे कीं बिघडलेले? कांहीजण म्हणतात आम्ही तर धार्मिक फिल्मच पाहतो. धार्मिक सिनेमे सुध्दा पाहू नये. कारण रामाचा अभिनय करणारा साक्षात राम तर नसतो. रामाचा अभिनय करणारा जर परस्त्रीकडे कामभावनेने पाहणारा असला तर त्याची फिल्म पाहायला कां जावे? रामासारखाच कोणी पुरुष जर रामाचा अभिनय करील तरच प्रभाव चांगला पडेल. तुम्ही म्हणाल कीं मी कटु बोलत आहे. पण मी तर जे पाहतो आहे तेच सांगतो आहे. विलासी चित्रें पाहून जीवन बिघडत असते.

एका ठिकाणी श्रीशंकराचार्यांनी म्हटलें आहे की, 'इंद्रिये चोर आहेत.' इंद्रिये तर चोरापेक्षा सुद्धा वाईट आहेत. चोर तर ज्याच्या घरांत ज्याच्या आश्रयाने राहतो तेथे चोरी करीत नाही, परंतु इंद्रियें तर आपला स्वामी जो आत्मा त्यालाच धोका देतात. देवहुति म्हणते, ह्या चोरासारख्या इंद्रियांमुळेच तर मी अगदी वैतागून गेले आहे. मला सांगा कीं जगांत खरें सुख, खरा आनंद कोठे आहे आणि तो मिळविण्याचें साधन कोणते?

कपिलांना आनंद झाला. ते म्हणाले, 'माते, कोणत्याही जड वस्तूंत आनंद असू शकत नाही, आनंद तर आत्म्याचें स्वरूप आहे. अज्ञानामुळे जीव जड वस्तूंमधे आनंद शोधतो. जड वस्तूंत आनंद राहू शकत नाही. सांसारिक विषय सुख तर देतात, पण आनंद देत नाहीत. जो तुम्हाला सुख देईल तोच तुम्हाला दुःखही देईल. परंतु भगवंत नेहमी आनंदच देतील. आनंद परमात्म्याचे स्वरूप आहे.'

संसाराचे सुख खरजेसारखे आहे. जोपर्यंत तुम्ही खाजवत असता तोपर्यंत चांगले वाटते. परंतु खाजवल्याने नखांतून शिरलेल्या विषामुळे खरजेचा रोग वाढत जातो. सर्वोत्तम मिठाईचा स्वादसुद्धा गळ्यापर्यंत असतो.

जगांतील पदार्थांत आनंद नाही -तो केवळ भासमान आहे. भगवान म्हणतात – हे अर्जुना! क्षणभंगुर आणि सुखरहित असे हे जग आणि शरीर प्राप्त करून तू माझेच भजन कर.

आरंभी आरंभी जड वस्तूंमध्ये सुखासारखा अनुभव होतो; परंतु ते सुख विषमयच असते.

विषय आणि इंद्रियांच्या संयोगाने जे सुख उत्पन्न होते ते आरंभी (भोगकालांत) अमृतासारखे वाटते; परंतु परिणामाच्या दृष्टीने तर ते विषासारखेच असते. याच कारणाने अशा सुखाला राजस म्हटले गेले आहे.

इंद्रियांच्या सुखाने तृप्ति होत नाही. विवेकरूपी धनाचे हरण करून इंद्रियें जीवाला संसाररूपी गर्तेंत फेकून देतात. बाह्यविषयांत कांही आनंदही नसतो आणि सुखही नसते. आनंद बाहेर नाही, आंत आहे; आत्म्यांत आहे. आनंद अविनाशी अंतर्यामीचें स्वरूप आहे. कपिल पुढे म्हणतात, हे माते, जर शरीरांत आनंद असता तर त्यांतून प्राण निघून गेल्यावरसुद्धा लोकांनी त्याला जपून ठेवले असते.

विषय जड आहेत. जड पदार्थांमध्ये आनंद राहू शकत नाही. चैतन्याच्या स्पर्शामुळेच जड पदार्थांमध्ये आनंदाचा भास प्रतीत होतो.

दोन शरीरांच्या स्पर्शानि सुख मिळत नाही, परंतु दोन प्राण एकत्र आल्याने आनंदाचा अनुभव येतो. जर दोन प्राणांच्या एकत्र होण्याने सुख मिळते तर ज्यामधे अनेक प्राण समाहित झाले आहेत अशा परमात्म्याच्या मिलनाने किती अधिक आनंद होत असेल!

बाह्यविषयांत आनंद नाही. परंतु चित्तांत, मनांत आत्म्याचे प्रतिबिंब पडल्याने आनंदाचा अनुभव होत असतो. इंद्रियांना हवा तसा पदार्थ मिळाल्यावर विषयांत ती तद्रूप होऊन जातात, व कांही काळाकरिता एकाग्र व एकाकार होत असतात. त्या वेळीं चित्तांत आत्म्याचे प्रतिबिंब पडते आणि त्यामुळे आनंदाचा भास होतो. जगांतील विषयांमधे जोपर्यंत मन अडकलेले असेल तोपर्यंत खरा आनंद मिळू शकणार नाही. ज्याप्रमाणे शीतलता हे जलाचें सहजस्वरूप आहे त्याचप्रमाणें आनंद हें आत्म्याचें सहजस्वरूप आहे. आनन्द आत्म्यातच आहे.

आत्मा आणि परमात्म्याचें मिलनच परमानंद आहे. भगवंतांत मन गोवले गेले आणि बुडी मारून राहिले म्हणजेच आनंद मिळत असतो.

पुनःपुन्हा आपल्या मनाला समजवा कीं सांसारिक जड पदार्थांत सुख नाही. झोप लागल्यावर सगळे विसरून गेल्यावर आनंद मिळतो. सगळ्या संसाराला विसरल्यावरच गाढ झोप येते.

आत्मा तर नित्य, शुद्ध आणि आनन्दस्वरूप आहे. सुखदुःख तर मनाचे धर्म आहेत. मन निर्विषय झाल्यावर आनन्द मिळतो. दृश्यांतून दृष्टी काढून द्रष्ट्यांत स्थिर केली तर आनंद मिळेल. आनंद परमात्म्याचें स्वरूप आहे.

सवयी-व्यसने कमी कराल तर सुखी व्हाल.

कपिल म्हणतातः माते, जर विषयांतच आनंद सामावला असता तर सगळ्यांना सदा समानच आनंद मिळायला पाहिजे. तृप्त व्यक्तीच्या समोर जरी श्रीखंड ठेवले तरी त्याला ते आवडणार नाही. आजारी माणसासमोर जरी मालपुवे ठेवले तरी तो खाणार नाही. म्हणून श्रीखंडांत, मालपुव्यात अर्थात विषयांत-जड पदार्थांत आनंद असत नाही. जर श्रीखंडातच आनंद असता तर आजारी माणसालासुद्धा ते खाण्यापासून आनंद मिळाला पाहिजे होता. परंतु त्याला तो मिळत नाही. म्हणून आनंद श्रीखंडांत नाही. याचप्रमाणे सगळ्याच विषयांसंबंधी समजले पाहिजे.

संसारांतील पदार्थांमधे आनंद नाही, पण इन्द्रियांना पाहिजे ते विषय ( पदार्थ ) मिळाल्यावर ती अंतर्मुख होतात. अंतर्मुख झालेल्या मनांत ईश्वराचें प्रतिबिंब पडते आणि म्हणून आनंद होतो. मन आंत आल्याने सुख मिळते आणि बाहेर गेल्यामुळे सुख उडून जाते. कल्पना करा कीं एक शेठजी

श्रीखंड-पुरीचें जेवण करीत आहेत; इतक्यांत कुठून तरी एक तार येते कीं त्यांचा सर्व कारभार बुडाला आहे, तर तेच श्रीखंड त्यांना विषासारखे वाटेल आणि खाण्याची इच्छाच होणार नाही.

संसारांतील जड पदार्थांत आनंद नाही. जेव्हां जेव्हां आनंद मिळतो तेव्हां तेव्हां तो चेतन परमात्म्याच्या संबंधामुळेच मिळतो. परमात्म्याशी संबंध झाल्यानंतरच आनंद मिळेल. जीव कपटी आहे. परमात्मा भोळे आहेत. जीवाने उपेक्षा केली तरी त्या अपराधाबद्दल परमेश्वर त्याला क्षमाच करील. आनन्द नारायणाचेच स्वरूप आहे.

आनन्दाच्या विरुद्ध शब्द सापडणार नाही. आनन्द हा ब्रह्मस्वरूप आहे. जीवात्मा देखील आनंदस्वरूप आहे. अज्ञानामुळे जीव आनन्द शोधायला बाहेर जातो. बाहेरचा आनंद फार वेळ टिकू शकत नाही. आत्म्याला वस्तुतः कांही सुख किंवा दुःख नसते. सुखदुःख मनालाच होत असते. सुखदुःख मनाचा धर्म आहे. जन्ममरण शरीराचा धर्म आहे. भूक आणि तहान हा आत्म्याचा धर्म आहे. मनाला सुखदुःख झालें तर आत्मा आक्रोश करतो कीं मला दुःख होत आहे. मनावर झालेल्या सुखदुःखाचा आरोप आत्मा अज्ञानाने आपणावर करीत असतो. आत्मस्वरूपांत उपाधीमुळे सुखदुःखाचा भास होतो. आत्मा स्फटिकमण्यासारखा शुद्ध स्वच्छ आहे. स्फटिकमण्याच्या मागे ज्या रंगाचें फूल ठेवाल त्याच रंगाचा तो दिसेल. तो रंग स्फटिकाचा नसतो, फुलाचाच असतो. स्फटिकमणी श्वेत आहे. त्याच्या मागे लाल गुलाबाचे फूल ठेवाल तर तो लाल दिसेल. गुलाबाच्या संसर्गाने तो लाल होतो.

पाण्यांत चंद्राचें प्रतिबिंब पडते. पाण्याच्या हालण्या-चालण्याने ते प्रतिबिंब सुद्धा हलू-चालू लागते, कापते. परंतु प्रत्यक्ष चंद्रावर त्याचा कांहीच परिणाम घडत नसतो. याप्रमाणेच देहादिकांचे धर्म, स्वतःमधे होत नसून सुद्धा जीवात्मा त्यांना आपल्यांत कल्पित करून घेतो. नाही तर जीवात्मा तर निर्लेप आहे. जीवात्म्यांत भासमान होणारे देहादिक धर्म या प्रकारे दूर होतील. निष्काम भागवतधर्माच्या अनुसरणाने, भगवंताच्या कृपेने, आणि त्याच्याकडूनच मिळालेल्या भगवंतावरच्या भक्तियोगाने हळू हळू ती प्रतीति दूर होत असते. जो भक्तिनिष्ठ आहे तो समस्त लोकांमध्ये व्याप्त परमात्म्याला पाहू शकेल.

सांसारिक विषयांमधून सर्वच प्रकाराने दूर झालेले मन ईश्वरांत लीन होते. जेव्हां मन निर्विषय होते तेव्हांच ते आनन्दस्वरूप होत असते.

जीवासारखा कपटी आणि ईश्वरासारखा भोळा आणखी कोणी नाही.

दुसऱ्यांकरता कांही करावे लागले तर कष्ट वाटतात, पण आपल्याच माणसांकरता करायचे असेल तर आनंद होतो. रात्री अकरा वाजता कोणी साधू आला तर त्याला विचारले जाईल की, 'महाराज, चहा आणू कीं दूध आणू? मन म्हणेल येवढ्या रात्रीं ही पीडा कोठून आली? विवेक तर करावाच लागतो. महाराज भाबडे असतील तर म्हणतील कीं सकाळपासून उपाशी आहे, पुऱ्या बनवून द्या. कोणाचे तरी पत्र सोबत आणलेले असते तेव्हां तर करावे लागतेच, परंतु जेवण तयार करताना भांड्याची आदळआपटही ऐकू येईल.

पण जर माहेराहून आपला भाऊ आला असेल आणि म्हणेल की मी फराळ केलेला आहे म्हणून आता भूक नाही; तरी पण यजमानीण म्हणेल, 'नाही, तू उपाशीच असशील; मी आत्ता शिरापुरी करून देते; कांही वेळ लागणार नाही.' आपल्या भावाला तर शिरापुरी खाऊ घालील आणि महात्म्यांना चहावरच भागवील.

हा सर्व मनाचा खेळ आहे. मन अत्यंत कपटी (खोटे) आहे. 'माझे' आणि 'तुझे' हा खेळ मनानेच रचलेला आहे. वस्तुतः मनच बंधन आणि मोक्षाचे कारण आहे.

कपिल म्हणतात-- हे माते, मनालाच या जीवाच्या बंधमोक्षाचे कारण मानले गेले आहे. मन जर विषयांत आसक्त होईल तर ते बंधनाला कारण होऊन बसते, आणि हेच मन जर परमेश्वराकडे आसक्त होईल तर मोक्षाचे कारण होईल.

भगवंत मनुष्याचें शरीर किंवा घर पाहात नाहीत, तर हृदय पाहात असतात. मन विशाल असेल तर भगवंत येतात. मनांत लपलेली अहंता-ममता आणि आप-परभावच मनाला दुःखी करीत असतात. मनाचे हे धर्म आत्मस्वरूपांत भासमान झाल्याकारणाने आत्मा स्वतःलाच सुखीदुःखी समजतो. परंतु वास्तविक तो आनंदस्वरूप आहे.

मनाच्या सुधारण्याने ( शुद्ध झाल्याने ) सर्व कांही सुधारते आणि मनाच्या बिघडण्याने सर्व कांही बिघडते. सुखदुःखाचे दाते आहेत अहंमन्यता आणि ममता. यांना सोडून दिल्यानंतरच आनंदरूप लाभते.

पाप करण्यासाठी कोणाला प्रेरणा देण्याची आवश्यकता नसते, परंतु पुण्य करण्यासाठी प्रेरणा द्यावी लागते. मन अधोगामी आहे.

मनुष्याचे मन पाण्यासारखे खड्ड्याकडेच (निम्नस्तराकडे) वाहात असते. पाण्यासारखे मनदेखील अधोगामी आहे. पाण्याप्रमाणेच मनाचा स्वभाव उच्चस्तराकडे नाही, तर निम्नस्तराकडे जाण्याचा आहे. या मनास वर चढवायचे आहे. त्याला परमात्म्याच्या चरणापर्यंत न्यायचे आहे. यंत्राच्या सान्निध्यांत आल्यावर पाणी वर चढत असते. मनाला मंत्राची साथ द्या. मंत्राची संगति झाली की अधोगामी मन ऊर्ध्वगामी होईल. ज्याने आपले मन सन्मार्गाला लावले आहे (सुधार मार्गावर) तो दुसऱ्यालादेखील वळण लावू शकतो (सुधारू शकतो). मनाला सुधारण्याचे आणखी दुसरे साधन नाही. 'मन' शब्दाच्या अक्षरांना उलटले म्हणजे 'नम' होते. नम आणि नाम हेच मनाला सुधारतील.

मनाला स्थिर करण्याकरता नामजपाची आवश्यकता आहे. जपाने मनाची चंचलता आणि मलीनता दूर होते. म्हणून कोणत्या तरी एका मंत्राचा जप करा. सांसारिक विषयांच्या संगतीने वाईट झालेले मन ईश्वराचें ध्यान केल्याने चांगले (शुद्ध) होते. सगळ्यांच्याच अंतर्यामी परमेश्वर आहे तरी पण तो सर्वांचे दुःख दूर करीत नाही. अंतर्यामी विराजणारा चैतन्यरूप परमात्मा मन-बुद्धीला प्रकाश देत असतो. भगवंताचे स्वरूप असे तेजस्वी आहे की आपल्यासारखे साधारण जीव त्यांना पाहू शकत नाही.

भगवंताचे निर्गुण स्वरूप सूक्ष्म असल्यामुळे (डोळ्याला) दिसत नाही; आणि त्याचें सगुणरूप तेजोमय असल्यामुळे तेही दिसत नाही. या कारणाने आपल्यासारख्यांना तर भगवंताचें नामस्वरूप मंत्रस्वरूपच इष्ट आहे. भगवंत वाटल्यास आपल्याला लपवून घेवो, परंतु आपल्या नावाला लपवू शकत नाही. नामस्वरूप प्रगट आहे, म्हणून परमात्म्याच्या कोणत्याही नामस्वरूपाचा दृढ मनाने आश्रय घ्या.

मंत्रावाचून मनशुद्धि होऊ शकत नाही. वाईट मन ध्यानाबरोबरच तप केल्याने सुधारेल. लौकिक वासनेने मन मलीन होत असते आणि अलौकिक वासना जागृत झाल्यावर ते चांगले (निर्मल) होईल. वासनेचा नाश वासनेनेच करावा लागतो. असद्वासनेचा विनाश सद्वासनेनेच होईल.

जेव्हा मनुष्य विचार करील की मला जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त व्हायचे आहे, मला गो-लोकांत जायचे आहे, मला कोणाही मातेच्या गर्भात जायचे नाही; मला याच जन्मात परमात्म्याचें दर्शन करायचे आहे, अशी भावना ठेवील तर मन सुधारेल (मार्गावर लागेल). काटा काट्यानेच काढला जातो त्याचप्रमाणे वासनाच दुसऱ्या वासनेला बाहेर काढून टाकू शकते. सिनेमा पाहण्याची वासना दूर करायची असेल तर परीक्षेत पहिला नंबर आणण्याची वासना ठेवा. अशा वासनेने अभ्यासांत रुचि उत्पन्न होईल आणि अध्ययनाच्या रुचीने सिनेमा पाहण्याची वासना सुटून जाईल.

कोणा एका राजापाशीं एक बकरा होता. राजाने एकदा जाहीर केले की ह्या बकऱ्याला जंगलामध्ये चरवून तृप्त करून जो आणील त्याला मी आपले अर्धे राज्य देईन. परंतु बकऱ्याचे पोट पूर्ण भरले आहे की नाही याची परीक्षा मी स्वतः करीन.

ही सूचना ऐकून एका माणसाने राजाजवळ येऊन म्हटलें, 'बकरा चरवणे काही मोठी गोष्ट नाही' आणि तो बकरा घेऊन जंगलात गेला. तिथे सगळ्या दिवसभर कोवळे हिरवे गवत त्याला खाऊ घातले. संध्याकाळ झाल्यावर त्याला वाटलें, आता तर बकऱ्याचे पोट भरलेच असेल, कारण की मी संपूर्ण दिवसभर त्याला चरवीत फिरत आहे. बकरा घेऊन तो राजापाशी आला. राजाने थोडेसे हिरवे गवत बकऱ्यासमोर ठेवले, तर बकरा ते खाऊ लागला. त्यावर तो राजा त्या मनुष्यास म्हणाला की तू या बकऱ्याला पोटभर खाऊ घातले नाहीस! नाहीतर तो पुन्हा गवत कां खाऊ लागला?

पुष्कळांनी बकऱ्याचे पोट भरण्याचा प्रयत्न केला, परंतु दरबारात त्याच्या समोर गवत ठेवल्याबरोबर तो गवत खाऊ लागायचा.

एका सत्संग्याने विचार केला की राजाच्या ह्या कृतीत काही तरी रहस्य असले पाहिजे. मी युक्तीने काम करीन. तो बकऱ्याला चरायला घेऊन गेला. जेव्हा जेव्हा बकरा गवत खाऊ लागला तेव्हा तेव्हा तो त्याला काठीने मारू लागला. सबंध दिवसभर अनेक वेळा असेच झाले. सरतेशेवटी बकऱ्याने विचार केला की जर का मी गवत खाण्याचा प्रयत्न केला तर मार खावा लागतो. तेव्हा ते खाणेच नको.

संध्याकाळी बकऱ्यासह तो सत्संगी राजदरबारात परत आला. बकऱ्याला त्याने गवत मुळीच खायला दिले नव्हते. तरी पण त्याने राजाला सांगितले की त्याला पोटभर खाऊ घातले आहे म्हणून तो आता मुळीच गवत खाणार नाही. परीक्षा घ्या.

राजाने बकऱ्यासमोर गवत टाकले, परंतु त्या बकऱ्याने खाल्ले तर नाहीच, पण त्याकडे पाहिलेही नाही किंवा त्याचा वासही घेतला नाही. बकऱ्याच्या मनात हे पक्के ठसून गेले होते की गवत खाल्ले तर मार बसेल म्हणून त्याने गवत खाल्ले नाही.

हा बकरा म्हणजे आमचे मनच आहे. बकऱ्याला गवत चारायला घेऊन जाणारा जीवात्मा आहे. राजा परमात्मा आहे. मनाला मारा, मनावर अंकुश ठेवा. मन सुधारेल तर जीवन सुधारेल. मनाला विवेकरूपी काठीने रोज झोडपा. भोगाने जीव तृप्त होऊ शकत नाही. त्यागातच तृप्ति सामावलेली आहे.

मन अहं आणि ममतेने भरलेले आहे. मन जेव्हा काही मागेल तेव्हा त्याला विवेकरूपी काठीने माराल तर ते वश होईल.

रामदासस्वामींनी मनाला बोध केला आहे. दृढ वैराग्य, तीव्र भक्ति आणि यमनियमादींच्या अभ्यासाने चित्त वश होते आणि स्थिरही होते. सरतेशेवटी हळू हळू प्रकृति सुध्दा अदृश्य होऊन जाते.

संसाराविषयी वैराग्य आणण्याचा एकच उपाय आहे– 'जन्ममृत्युजराव्याधि दुःखदोषानुदर्शनम्'

या जगात सुखी होण्याचे दोनच मार्ग आहेतः एक ज्ञानमार्ग आणि दुसरा भक्तिमार्ग.

ज्ञानमार्ग सांगतो की सर्व काही सोडून परमेश्वराच्या मागे लागा. वैराग्याविना ज्ञान मिळत नाही. ज्ञानमार्गात वैराग्य मुख्य आहे. यात सर्व काही सोडून द्यावे लागते. ज्ञानी सर्व काही सोडून एका भगवंतालाच धरून राहतो. या मार्गात त्याग मुख्य आहे. या मार्गाचे आचार्य शंकर आहेत. सर्वस्वाचा त्याग करणे मोठे कठीण कर्म आहे.

भक्तिमार्ग म्हणतो की सर्वस्वाचा त्याग कठीण आहे, यापेक्षा तर हेच उत्तम की सगळ्या गोष्टींमध्ये

ईश्वर आहे असे मानून सर्वांवरच विवेकपूर्वक प्रेम करावे. या मार्गात भगवत्भाव ठेवून समर्पण करायचे आहे. भक्तिमार्गात काहीही सोडायची भाषा नाही. वैष्णव म्हणेल कीं केळ्याच्या सालींतही ईश्वर आहे. मी हे गाईला खाऊ घालीन.

भक्तिमार्गात समर्पण मुख्य आहे. या मार्गाचे आचार्य श्रीकृष्ण आहेत. भगवान श्रीकृष्ण प्रत्येकावरच प्रेम करतात. या मार्गात प्रेम बाळगावे लागते. भगवंतासारखा प्रेमळ कोणी आजपर्यंत झाला नाही आणि पुढे होणारही नाही.

एकदा भृगु ऋषि वैकुंठांत गेले. भगवंत झोपलेले होते. लक्ष्मी त्यांच्या पायाची सेवा करीत होती. भृगूला वाटले, हा तर कोणी विलासी दिसतो. याला मोठा देव कोणी म्हणावे? ऋषि तर परीक्षाच घ्यायला आले होते. त्यांनी निजलेल्या भगवंताचे छातीत एक लाथ मारली.

भृगु ऋषींनी लाथ मारली पण त्या लाथ मारणाऱ्यावर माझा कन्हैया प्रेमच करतो. भगवंत ऋषींना म्हणाले, माझी छाती तर फार कठीण आहे आणि तुमचे चरण तर फारच कोमल आहेत. कदाचित तुमच्या चरणांना ठेच लागली असेल. आणि एवढे म्हणून भगवान ऋषीचे पाय आवळू लागले. आहे कोणी जगात असे प्रेम करणारा?

विष देणाऱ्यावर सुध्दा श्रीकृष्ण प्रेमच करतात. लक्ष्मीला वाईट वाटले. लक्ष्मी म्हणाली, अशी का कुठे परीक्षा करतात? परीक्षा घ्यायची ही रीत चांगली नाही. मी ब्राह्मणांच्या घरी जाणार नाही. म्हणूनच सामान्यतः ब्राह्मण गरीबच राहिले आहेत.

ज्ञानी असे समजतात की जेव्हापासून या शरीराशी संबंध आला आहे तेव्हापासून दुःखही आले आहे. म्हणून ते शरीरावर प्रेम ठेवीत नाहीत.

प्रेम करायचेच असेल तर सगळ्यांवरच प्रेम करा. कोणावरही प्रेम करायचे नसेल तर काही हरकत नाही; परंतु आपल्या शरीरावर तर प्रेम करू नकाच. एका भगवंतावरच प्रेम असू द्या. सगळ्यांशीच प्रेमाने वागा, नाही तर सगळ्यांचाच त्याग करा. आणि जर तुम्ही सगळ्यांचाच त्याग करू शकत नसलात तर सगळ्यांमध्ये ईश्वरभाव ठेवून सगळ्यांशीच प्रेमाने वागा. सगळ्यांविषयीच्या ममतेचा त्याग करा किंवा सगळे काही ईश्वराला समर्पित करून सर्वच कर्मफलांचा त्याग करा.

सगळ्यांविषयींच ममता-आपलेपणा होणे हाच समर्पणमार्ग आहे. अमक्याविषयीच ममता असणे हा स्वार्थमार्ग आहे. आज तर सगळेच स्वार्थमार्गी आहेत. स्वार्थी माणूस म्हणतो की, धनसंपत्ति माझा परमेश्वर आहे, माझी बायको माझी गुरू आहे आणि माझी मुले माझे शाळिग्राम आहेत. आता मी पूजा करू तर कोणाची करू?

जो संसारातून जागृत होत नाही त्याला कृष्ण कधी भेटू शकत नाहीत. काम आणि अभिमान हे कंस आहेत. तेच सर्वांना कारागृहांत ठेवतात.

जागृत कोण असतो? जो मनाने विषयसुखाचा त्याग करून भगवंताच्या नामाचा जप करील तोच जागृत. जगात कोण जागृत झाले आहे? जीवास जेव्हा सर्वच विषय-विलासांविषयी वैराग्य उत्पन्न होईल तेव्हाच समजा की तो जीव जागृत झाला आहे. कपिल म्हणतात – माते, हे मन अनादि कालापासून संसारात भटकत आले आहे. सत्संगाने मन सुधारते. विवेकी पुरुष संग किंवा आसक्तीला आत्म्याचे बंधन समजतात. परंतु संतमहात्म्यांचा संग किंवा त्यांचेविषयी आसक्ति होते तेव्हा मोक्षाचे दार उघडले जाते. म्हणून सत्संग करा.



देवहुति म्हणाली- तुम्ही सत्संग करण्याची आज्ञा करीत आहात, पण मला तर या संसारात

कोणी संत दिसून येत नाही.

कपिल भगवान म्हणाले- माते, मग असेच समज की तूच पापी आहेस. पाप्याला संतांची भेट झाली तरीसुध्दा सद्भावना जागृत होत नाही. संतांना पाहायला तू कुठे जाशील ? तू स्वतः संत होशील तेव्हा तुला संत भेटतील.

एकनाथ, तुकाराम, नरसि मेहता इत्यादी गृहस्थाश्रमी होते. ते घरात राहून देखील संत झाले होते. संतांची लक्षणे आचरणांत आणाल तर संत होऊ शकाल.

सत्संगाविना सुख मिळत नाही. स्वतः संत झाल्याशिवाय खरा संत भेटायचा नाही. जशी दृष्टि तशी सृष्टी. क्रोधामुळे हनुमंतांना पांढरी फुले सुध्दा लाल दिसली होती.

एकनाथ महाराज रामायणांतील सुंदरकांडाची कथा सांगत होते.

या सुंदरकांडांत सर्वच काही सुंदर आहे. सुंदरकांडाला हे नाव याकरिता दिले गेले आहे की यात हनुमंतांना सीतामातेच्या पराभक्तीचे दर्शन झाले आहे.

ब्रह्मचर्य आणि रामनाम असेल तर हा संसारसागर पार केला जाऊ शकतो. हनुमंतांसारखेच ह्या सागराला पार करू शकतात. सागर पार करून हनुमंत अशोकवनात आले. एकनाथ महाराज कथेत सांगत आहेत की जेव्हा हनुमान अशोकवनात आले तेव्हा वाटिकेत पांढरी फुले उमलली होती. जिथे सीता तिथेच अशोकवन. जेथे भक्ति तेथेच अशोक ( शोकाचा अभाव ). एकनाथांच्या घरीं हनुमंत कथा ऐकायला आले होते. त्यांनी प्रगट होऊन विरोध करीत म्हटले, ‘महाराज, तुम्ही चुकीचे सांगत आहात. अशोकवनात त्यावेळी लाल फुले उमललेली होती, पांढरी नव्हे. मी प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिली होती. एकनाथ महाराज म्हणतात, मी तर आपल्या सीतारामांची प्रार्थना करून कथा सांगत आहे व ते जे दृश्य समोर दाखवत आहेत त्याचे वर्णन करीत आहे. सरतेशेवटी हे भांडण घेऊन ते दोघे रामाजवळ आले. रामचंद्र म्हणाले, तुमचे दोघांचेही म्हणणे बरोबर आहे. क्रोधावेशाने लाल झालेल्या हनुमंताने फुले लाल पाहिली होती. प्रत्यक्षात ती पांढरीच होती.

ज्याची दृष्टी जशी असेल तशीच सृष्टी त्याला दिसेल. दुर्योधनाला जगात कोणीच सज्जन भेटला नाही. त्याला सर्वच दुर्जन वाटले. युधिष्ठिराला कोणी दुर्जन भेटला नाही. त्याला सर्वच सज्जन वाटले.

संतांच्या लक्षणांत तितिक्षेला प्राधान्य दिले गेले आहे. सहन कराल तर सुखी व्हाल.

संतांची चरित्रे वाचा. संतांना कित्येक दुःखे सहन करावी लागली आहेत. पण त्या दुःखांचा संतांवर काही परिणाम झाला नव्हता. अतिशय सहन करील तोच संत होय.

एकनाथ महाराज पैठणला राहात होते. गोदावरी नदीकडे जाणाऱ्या मार्गावर एक पठाण राहात होता. एकनाथ महाराज त्याच रस्त्याने स्नानास जात असत. तो पठाण महाराजांना फार त्रास देई. परंतु महाराज सर्व काही सहन करीत राहात.

एक दिवस त्या पठाणाने विचार केला की ह्या ब्राह्मणाला क्रोध येत नाही तर आज मी याला क्रोध कसा येत नाही ते पाहीनच. महाराज स्नान करून परत येत होते, तर तो पठाण महाराजांच्या अंगावर थुंकला. महाराज दुसऱ्यांदा स्नान करायला गेले. पुनः तो पठाण महाराजांवर थुंकला. कित्येक वेळा असे होत राहिले. परंतु महाराज क्रोधित झाले नाही. गोदावरीला ते म्हणाले, ‘तुझी कृपा की तू मला स्नानाला वारंवार बोलावीत आहेस. तो पठाण वाटल्यास दुष्टपणा करीत राहो, पण मी माझे सौजन्य सोडणार नाही. पठाण १०८ वेळा महाराजांवर थुंकला. तितक्याच वेळा महाराजांनी गोदावरीचे स्नान केले. सरतेशेवटी त्या पठाणाला लाज वाटली. त्याने महाराजांचे पाय धरले आणि क्षमा मागितली.

तो म्हणाला, महाराज, तुम्ही संत आहात, ईश्वर आहात. मी आपल्याला ओळखू शकलो नाही. महाराज म्हणाले, क्षमेचा काही प्रश्नच नाही. तुझ्यामुळेच तर आज मला १०८ वेळा गोदावरी स्नानाचे पुण्य मिळाले.

शांति त्याचीच टिकून राहते की जो अंतरांतून ईश्वराशी अनुसंधान करून राहतो. जो ईश्वरापासून दूर आहे. त्याला शांति कोठून मिळेल?

कपिल म्हणतात, माते, जो पुष्कळ सहन करू शकतो तोच संत बनू शकतो. अतिशय विपत्तीत सुध्दा जो ईश्वराचा अनुग्रह समजतो तोच महान वैष्णव आहे.

दुष्ट लोकांना कोणीही चांगला दिसत नाही. दुष्टांनी तुकारामाला गाढवावर बसवले, तर तुकारामाच्या बायकोला दुःख झाले. परंतु तुकाराम तिला म्हणाले, 'माझ्या विठ्ठलनाथांनी माझ्यासाठी जो गरुड पाठविला आहे त्याच्यावरच तर मी बसलो आहे! सगळ्यांना गाढव दिसला पण तुकारामांच्या बायकोने गरुड पाहिला.

जगात सगळे काही सहज करीत रहा. जगांत अंधाराचे अस्तित्व आहे म्हणून प्रकाशाला किंमत आहे.

संताचे पहिले लक्षण तितिक्षा आहे, तर दुसरे लक्षण करुणा. तिसरे लक्षण सगळ्या देहधाऱ्यांविषयी सुहृदभाव हे होय. अजातशत्रु, शांत निष्कपट स्वभाव इत्यादीं देखील संतांची लक्षणे आहेत. शांतीची परीक्षा प्रतिकूलतेत होत असते. अर्थधनसंपत्तीशी तर दररोज संबंध ठेवता पण त्याचबरोबर परमेश्वराशीही संबंध ठेवाल तर संपत्तीही मिळेल आणि शांति देखील मिळेल. भागवतकार म्हणतात की या आयुष्याच्या गाडीचे फक्त रूळच बदलायचे आहेत. ईश्वरासाठी काही ना काही त्याग करा.

संत पुरुष प्रभूच्या हितार्थ सर्वस्वाचा त्याग करतात. संत माझ्याकरिता अर्थात परमेश्वराकरिता संपूर्ण कर्म आणि आपल्या सख्ख्या नातेवाइकांचा त्याग करतात. संत परमात्म्यासाठी सांसारिक विषयांचा बलपूर्वक त्याग करतात.

भगवंत परीक्षा करूनच नंतर आपला म्हणतात.

भगवंतांनी नरसिंह मेहताची कित्येक वेळा परीक्षा पाहिली होती.

पण, हे भगवन्, या कलियुगांत अशी परीक्षा कराल तर कोणी देखील आपल्याला भजणार नाही (आपली सेवा करणार नाही).

भगवत्परायण होऊन भगवंताच्या कथांचे श्रवणकीर्तन करा. भगवंतातच जर चित्त रमून राहील तर भक्तीचा विकास होतो. भगवंताच्या कथा ऐकून श्रध्दा दृढ होते. त्यानंतर भगवंतासाठी आसक्ति वाढते. आसक्ति वाढल्याने व्यसनात्मक भक्ति प्राप्त होते आणि ज्याची भक्ति व्यसनात्मक होते त्याला मुक्ति सुलभ होते. भक्ति जेव्हा व्यसनासारखी उत्कट होते तेव्हा ती ईश्वराजवळ घेऊन जाते.

हे माते, तीव्र भक्तीशिवाय मुक्ति मिळू शकत नाही. तीव्र भक्तीचा अर्थ आहे व्यसनात्मका भक्ति.

तुकारामांनी भक्तीची फार सुंदर व्याख्या केली आहे. एक क्षण सुध्दा जो भगवंतापासून विभक्त होऊ शकत नाही तो भक्त होय. व्यवहाराची कामे करताना देखील जो भगवंतापासून विभक्त होणार नाही तोच भक्त होय. "तीव्रेण भक्तियोगेन."

देवहुति मातेला तीव्र भक्ति करण्याची आज्ञा दिली आहे. तीव्र भक्तीचा अर्थ आहे एक क्षणभरही देवापासून विभक्त न होणे, एक क्षणभरही देवाला न विसरणे.

याप्रमाणे प्रकृतीच्या गुणांपासून प्राप्त शब्दादि विषयांचा त्याग करून, वैराग्ययुक्त ज्ञानाने, योगाने आणि माझ्या सुदृढ भक्तीने, मनुष्य आपल्या याच देहात आपल्या अंतरात्म्यासारखाच मला प्राप्त करून घेतो.

भगवंताची अहैतुकी निष्काम भावना भक्तीपेक्षाही श्रेष्ठ आहे.

कपिलमुनि देवहुति मातेला सांगतात– हे जे सर्व दृश्यमान आहे ते सत्य नाही. स्वप्न असत्य असून देखील सुखदुःख देत असते. ज्याप्रमाणे स्वप्न पाहणाऱ्याला आपले डोके कापले नसताना सुध्दा ते कापले गेल्याची भ्रांति होते आणि तो रडू लागतो त्याचप्रमाणे अविद्येच्या कारणाने जीवात्म्याला सर्व भ्रांति होते. ह्यालाच माया म्हणतात. वस्तु नसताना देखील ती स्वप्नांत दिसते त्याचप्रमाणे तत्त्विकदृष्ट्या काहीही नसताना माया आणि अज्ञानामुळे सर्व घटनांचा आभास मात्र होतो.

कपिल पुढे म्हणतात : माते, जगत् स्वप्नासारखे आहे. हा सिद्धान्त भागवतांत पुनःपुन्हा याकरिताच सांगितला आहे की जगातील पदार्थांचा मोह उत्पन्न होऊ नये. सांसारिक विषयांविषयी पूर्ण वैराग्य बाणावे.

सांसारिक सुखांच्या उपभोगांची लालसा जोपर्यंत राहील तोपर्यंत समजा की तुम्ही झोपी गेलेले आहात. जागृत असणाऱ्यालाच कृष्ण भेटत असतात. सुख भोगण्याची इच्छा फार दुःखद आहे. भगवत्ध्यानांत जगत् विस्मृत होऊन जाईल तेव्हांच ब्रह्मसंबंध जुळून येऊ शकेल. ध्यानांत प्रथम शरीराला स्थिर करा, मग दृष्टि स्थिर करा आणि शेवटी मन स्थिर करा.

जोपर्यंत शरीर आणि दृष्टी स्थिर होत नाही तोपर्यंत मन स्थिर होत नाही. डोळ्यांत श्रीकृष्ण स्थिर झाल्यावर मन शुध्द होते. भागवत गोवर्धननाथांचे स्वरूप आहे. श्रीकृष्णाच्या स्वरूपावर ध्यान ठेवून कथा ऐका. डोळे श्रीकृष्णांत आणि प्राण कानांत साठवून कथा ऐका.

ज्याला ध्यान करायचे आहे त्याने एका आसनावर बसावे आणि मन स्थिर करावे. ध्यान करताना संसाराला मनांतून काढून टाका.

ध्यान केल्याने मन स्थिर होते. ध्यानाशिवाय दर्शन परिपूर्ण होत नाही.

भोगभूमीमध्ये राहून भगवंताचे ध्यान करणे हे मोठे कठीण कर्म आहे. संसारांत राहून ज्ञानभक्तीत निष्ठा ठेवणे सोपे नाही. भूमीचा मनावर प्रभाव पडतो. ध्यान करणाऱ्याने पवित्र आणि एकांत स्थानी बसून ध्यान करावे.

कपिल म्हणतात– माते, ज्याला ध्यान करायचे आहे त्याने पवित्र भोजन परिमित मात्रेत घ्यावे. आहार सात्त्विक आणि अल्प असला पाहिजे. ज्याला अजीर्ण होते तो ब्रह्मचर्याचे पालन करू शकत नाही.

ज्याला ध्यान करायचे आहे त्याने चोरी करू नये. अस्तेयम्. मनुष्य पुष्कळ वेळा डोळ्यांनी आणि मनाने चोरी करीत असतो. दुसऱ्याच्या वस्तूचे मानसिक चिंतन ही चोरीच होय.

जो ध्यान करू इच्छितो त्याने ब्रह्मचर्याचे देखील पालन केले पाहिजे. सर्वच इन्द्रियांनी ब्रह्मचर्याचे पालन करावे. पुष्कळ लोक शारीरिक ब्रह्मचर्याचे पालन करतात पण मानसिक ब्रह्मचर्याचे पालन करीत नाहीत. ब्रह्मचर्याचा मानसिक भंग शारीरिक ब्रह्मचर्याच्या भंगासारखाच दुष्ट आहे. मनाने करा की डोळ्यांनी, चोरी ती चोरीच. म्हणून प्रत्येक इन्द्रियाने ब्रह्मचर्य पालन करा. केवळ शरीराने नाही तर मनानेही ब्रह्मचर्याचे पालन करा. एका दिवसाच्या ब्रह्मचर्य-भंगाने चाळीस दिवसपर्यंत मन स्थिर होऊ शकत नाही. जोपर्यंत देहाचे भान आहे तोपर्यंत धर्म सोडू नका.

यानंतर ध्यानाचा विधि सांगितला आहे. त्याचे वर्णन पूर्वीच येऊन गेले आहे.

कपिलांनी देवहुति मातेला ध्यान करायची आज्ञा दिली. ध्यानाशिवाय ईश्वराचा अनुभव होत नाही. रात्री निजण्यापूर्वी प्रभूचे ध्यान करा.

ते म्हणतात– माते, परमात्म्याची अनेक रूपे आहेत. त्यातील कोणासही इष्टदेव समजून त्याचे ध्यान कर. हे माते, तू चतुर्भुज नारायणाचे ध्यान कर.

ध्यान करण्यापूर्वी प्रभूशी अनुसंधान प्रस्थापित करणे आवश्यक आहे. दास्यभक्तीत प्रथम चरणावर दृष्टी स्थिर करावी लागते.

पुनःपुन्हा मनाला कोणत्यातरी एका रूपावर स्थिर करा. ध्यानांत तन्मयता झाल्यावर संसाराचे विस्मरण होत असते. ध्यानांत देहभान आणि जगताचे भान विस्मृत होते. जो जो संसाराचे विस्मरण होत जाते तो तो प्रभुस्मरणांत आनंद येऊ लागतो.

साखरेची एक बाहुली सागराची खोली मापायला जी गेली ती गेलीच! परमात्मा समुद्रासारखा व्यापक आहे– विशाल आहे. ज्ञानी मनुष्य परमात्मस्वरूपाशी असा एकजीव होऊन जातो की मग तो असे म्हणू शकत नाही की, ‘मी अमुक एक जाणतो किंवा जाणत नाही. ध्यान करणारा ध्यान करता करता ध्येयांत मिळून जातो. हेच अद्वैत होय. ध्यान करणाऱ्याचा "अहम्–मीपणा" ईश्वरांत मिळून जात असतो. देहभान विस्मृत झाल्यावर जीव आणि शिव एक होऊन जातात.

काही ज्ञानी भेदभावाने ध्यान करतात, तर काही ज्ञानी प्रथम भेदभावाने ध्यान करतात आणि मग अभेदभावाने. नंतर जीवांचे जीवत्व ईश्वरांत विलीन होऊन जाते, जीवत्व स्वतंत्र राहू शकत नाही. ज्याप्रमाणे किडा भ्रमरीचे स्मरण करता करता भ्रमरी होऊन जातो त्याचप्रमाणे जीव ईश्वराचे चिंतन करता करता प्रभुमय होऊन जातो. दोघांचे मिलन झाल्यावर जीवभाव शिल्लक राहात नाही.

परंतु त्याला कोण जाणू शकतो? ज्याच्यावर तो प्रभु स्वतः कृपा करतो, तोच त्या प्रभूला जाणू शकतो आणि मग त्याला जाणल्यावर तो ईश्वरमय होऊन जातो.

ध्याता ज्या स्वरूपाचे ध्यान करतो त्याच ध्येयाची शक्ति ध्यात्यामध्ये (ध्यानकर्त्यामध्ये) येते.

शंकराचार्यांच्या जीवनांतील एक प्रसंग आहे. एक यवन भेटला आणि म्हणाला की मला भैरव-यज्ञ करायची इच्छा आहे. भैरव-यज्ञांत पृथ्वीच्या सम्राटाच्या मस्तकाची आहुति द्यावी लागते. ते तर अप्राप्य आहे म्हणून तुम्हीच आपलें डोके मला द्या. तुम्हीच म्हणाला आहांत कीं आत्मा देहाहून निराळा आहे, परमात्म्याहून निराळा आहे. देहदानाने तुम्ही मरणार नाही म्हणून तुम्ही आपले डोके मला द्या.

शंकराचार्य म्हणाले, माझ्या शारीरिक मस्तकाने तुझे काम होत असेल तर घेऊन जा.

शंकराचार्यांचा देहाध्यास दूर झाला होता, म्हणून ते मस्तक द्यायला तयार झाले. ते म्हणाले कीं जेव्हा शिष्य नसतील आणि मी ध्यानमग्न असेन त्याचवेळी येऊन मस्तक घेऊन जा.

एक दिवस तो यवन मठांत जेव्हां कोणी नव्हते तेव्हां मस्तक घेण्यासाठी आला.

भगवान शंकराचार्यांचे शिष्य पद्मपाद– जे नृसिंहस्वामींचे शिष्य होते– यांना गंगाकिनारी पुष्कळ वेळा अपशकुन झाले. म्हणून ते धावतच आश्रमांत परत आले. त्यांनी तेथे पाहिले, तो एक यवन तलवारीने गुरुजींचे डोके कापण्याची तयारी करीत आहे; तेव्हां पद्मपादाने क्रोधावेशाने सिंह बनून त्या यवनाला चिरून-फाडून मारून टाकले.

या प्रसंगाने आपणास हा बोध होतो कीं उपासकामध्ये उपास्याची शक्ति आरोपित होत असते.

नृसिंहस्वामींचे ध्यान करता करता पद्मपादांमध्ये नृसिंहाचा आवेश उत्स्फूर्त झाला.

शुकदेव वर्णन करीत आहेत.

मदिरेने मदांध झालेल्या व्यक्तीला देहभान राहात नाही. त्याचप्रकारे ध्यान करीत असता जो देहभान विसरतो तो भगवंताच्या मागे लागत असतो. प्रभुप्रेमांत जे वेडे झालेले आहेत ते सुखी आहेत आणि इतर सर्व दुःखी.

भगवंताशिवाय आणखीन कोणी नाहीच. त्यावेळी द्रष्टादेखील भगवतस्वरूप होऊन जातो. हा अपरोक्ष साक्षात्कार आहे. अशी तन्मयता झाल्यावर भक्ति सुलभ होते.

कपिल उपदेश देतात— माते, ह्या सगळ्यांपेक्षा श्रीकृष्णाचें ध्यान करीत असता ज्या व्यक्तीचें देहभान हरपते ती सर्वश्रेष्ठ होय. भगवद्भक्त प्रारब्धकर्मांना देखील मिथ्या ठरवू शकतात म्हणून ते श्रेष्ठ होत.

प्रेम अन्योन्य होत असते. तुम्ही भगवंतांचें स्मरण कराल तर तेही तुम्हाला विसरणार नाहीत.

एकदा नारद वैकुंठलोकांत आले. लक्ष्मी तिथे होती, पण भगवंत दृष्टीस पडले नाहीत. इकडे तिकडे शोधून त्यांना दिसले कीं भगवंत ध्यान लावून बसले आहेत. नारदांनी त्यांना विचारले, 'तुम्ही कोणाचें ध्यान करीत आहात?'

भगवंत म्हणाले— मी माझ्या भक्तांचें ध्यान करीत आहे. भगवंत आपल्या प्रिय भक्तांचे ध्यान करीत असतात. यावर नारदांनी विचारलें कीं हे वैष्णव आपल्यापेक्षांही श्रेष्ठ आहेत का कीं ज्यांचें ध्यान तुम्ही करावें?

भगवंत म्हणाले: हो, ते माझ्यापेक्षाही श्रेष्ठ आहेत.

तर नारद म्हणाले, आपले हे म्हणणे सिद्ध करून दाखवा.

भगवंतांनी विचारले: जगांत सर्वश्रेष्ठ कोण आहे?

नारद म्हणाले: पृथ्वी.

प्रभु म्हणाले: पृथ्वी तर शेषनागाच्या डोक्याचा आधार घेते. मग ती श्रेष्ठ कशी?

नारद म्हणाले: मग शेषनाग श्रेष्ठ आहे.

भगवान: तो कसा मोठा होईल? तो तर शंकराच्या हातचे कंकण आहे. म्हणून शेषापेक्षा शंकर महान झाले. त्यांच्यापेक्षा मोठा रावण आहे, कारण रावणाने कैलासपर्वत उचलून धरला होता. रावणाला सुद्धा मोठा कसे म्हणावे? कारण वाली तर त्याला आपल्या बगलेत धरून संध्या करीत असे. वाली तरी मोठा कसा म्हणावा? कारण त्याला रामाने मारले.

नारद: मग तर आपणच श्रेष्ठ आहात.

भगवान: नाही, मी श्रेष्ठ नाही. माझ्यापेक्षा माझे भक्तजन अधिक श्रेष्ठ आहेत. कारण सगळे विश्व माझ्यांत सामावलेले आहे, परंतु मी स्वतःच भक्तांच्या हृदयांत सामावलेलो आहे. मला आपल्या हृदयांत ठेवून हे भक्तजन सारा व्यवहार करीत असतात. म्हणून हे ज्ञानी भक्तच माझ्यापेक्षा आणि सर्वांपेक्षा श्रेष्ठ आहेत.

भगवंताचे भक्त भगवंताच्याही पुढे आहेत, श्रेष्ठतर आहेत.

माझे निष्काम भक्त कोणत्याही प्रकारच्या मुक्तीची इच्छा ठेवीत नाहीत. माझ्या सेवेशिवाय इतर कोणतीच इच्छा ते ठेवीत नाहीत.

माझे निष्काम भक्त माझी सेवा सोडून सालोक्य, सार्ष्टि, सामीप्य, सारूप्य आणि सायुज्य

मुक्ति देखील स्वीकारीत नाहीत.

अर्थात हरिभक्त, मुक्ति नाही तर जन्मामागून जन्म इच्छितात कीं जेणेंकरून वारंवार होणाऱ्या जन्मांत प्रभूची नित्य सेवा, कीर्तन, उत्सव करून नंदकुमाराचें दर्शन होऊ शकेल. वृंदावन धन्य आहे, लीला धन्य आहे आणि ते व्रजवासी देखील धन्य आहेत कीं ज्यांच्या अंगणांत अष्ट महासिद्धि उभ्या आहेत, आणि मुक्ति ज्यांची दासी आहे. ब्रह्मलोकीं सुद्धा प्राप्त होत नाही असा श्रेष्ठ पदार्थ 'भक्ति' केवळ पृथ्वीवरच प्राप्त आहे.

माझे भक्त माझे प्रेमरूपी अप्राकृत स्वरूप प्राप्त करून घेतात. उलटपक्षीं देहसुखांतच आसक्त असलेले पुरुष अधोगतीला जातात.

कपिल म्हणतात– माते, मी आणखी काय सांगू? ईश्वराहून विभक्त झालेला जीव कधीच सुखी होऊ शकत नाही.

वृध्दावस्थेंत तर हें शरीर जर्जर होऊन जाते, परंतु मन आणि बुद्धि मात्र तरुणच राहून जातात. तारुण्यांत जी जी सुखें उपभोगली असतील त्यांचे वारंवार मन चिंतन करीत राहते. भगवंताचें चिंतन होऊ शकले नाही तरी कांही हरकत नाही पण सांसारिक विषयांचे मात्र चिंतन कधी करू नका. वृद्धावस्थेत दुःख सहन करावे लागते, सेवा कोणी करीत नाही.

जर तुम्ही आपल्या आईबापांची सेवा कराल तर तुमची मुले तुमच्या वृद्धावस्थेंत तुमची सेवा करतील. माता-पिता, गुरु, अतिथि आणि सूर्य हे चार ह्या जगांत प्रत्यक्ष देव आहेत. त्यांची सेवा करा.

मनुष्यापाशीं वृद्धावस्थेंत धन नसले तर त्याची दशा कुत्र्यासारखी होईल– वृद्धावस्थेंत दुःखी झाल्यावर देखील ममता सुटत नाही. दुसऱ्यांना सुखी कराल तर सुखी व्हाल.

वृद्धावस्थेंत शरीर दुर्बल झाल्यानंतरही सत्संग आणि भजन न केल्याने मन आणि जीभ तरुण होतील. वृद्धावस्थेत ही जीभ फार त्रास देते. पचनशक्ति ठीक नसताही पुनःपुन्हा खायची इच्छा होते. शरीर ठीक आहे तोपर्यंत बाजी हातांत आहे. एवढ्यातच प्रभूंना प्रसन्न करून घेतले तर बेडा पार होईल.

म्हातारा खाटेवर पडला आहे. मलशुद्धि देखील बिछान्यांत करावी लागत आहे. कांही पापी लोकांना याच लोकांत नरकयातना भोगाव्या लागतात. मृत्यूच्या सहा महिने आधी यमदूतांचें स्वप्नांत दर्शन होते. अतिपाप्याला वृद्धावस्थेंत यमदूत दिसतात. ज्यांच्याकरता पाण्यासारखा पैसा ओतला तेच लोक त्या मरणासन्न म्हाताऱ्याच्या मरणाची आतुरतेने वाट पाहतात. मरता मरता आपल्याला कांही देऊन जाईल अशा आशेनेच आप्तवर्ग त्याची सेवा करतात. सगळेच स्वार्थी नातेवाईक येऊन पोचतात. नातेवाईकांना भागवतांत कोल्ह्याकुत्र्यांसारखे म्हटले आहे. मुली सुद्धा फार लोभी असतात. बापाच्या आजाराची खबर मिळताच धावत येतात. बाबा, मी तुमची ज्योती, मला नाही ओळखलं? परंतु ज्योती कांहीच प्रकाश पाडू शकली नाही. तो म्हातारा रडत आहे. त्याला जाणीव आहे कीं बायको, मुले कोणी बरोबर येणार नाहीत. मला एकट्यालाच जावे लागेल. तरी पण विवेक होत नाही.

यमदूत ह्या जीवात्म्याला बाहेर ओढून काढतात. अंतकाळीं दोन यमदूत येतात– पुण्यपुरुष आणि पापपुरुष. दोन्ही यमदूत जीवात्म्याला मारतात. पुण्यपुरुष म्हणतो, तुला पुण्य करायची संधी दिली होती तरी पण तू पुण्य कमविले नाहीस! मरतेवेळीं जीव फारच तडफडतो. यमदूतांची दृष्टी पायापासून डोळ्यांपर्यंत असते.

ब्रह्मरंध्रांत जो आपला प्राण स्थिर करू शकतो त्याचे यमदूत कांही करू शकत नाहीत.

मृत्यूनंतर पूर्वजन्म आठवत नाही.

स्थूलशरीराच्या आंत सूक्ष्मशरीर असते आणि सूक्ष्मशरीराच्या आंत कारणशरीर. सूक्ष्मशरीराच्या आंत राहणारी वासनाच कारणशरीर आहे.

यमदूत जीवात्म्याला त्याचे बरोबरच यमपुरींत घेऊन जातात. अतिशय पाप्यासाठी यमपुरीचा मार्ग भयंकर असतो. पाप्याला तापवलेल्या वाळूवरून चालावे लागते.

जीवात्म्याला, त्याने केलेल्या पापांची यादी यमाच्या राजसभेंत चित्रगुप्त वाचून दाखवितो. चौदा साक्षी सुद्धा हजर ठेवले जातात. ते साक्षी म्हणजे – पृथ्वी, चंद्र, सूर्य इत्यादी होत. जीवात्म्याला त्याच्या पापाप्रमाणें नरकदंड दिला जातो. ज्याचे पापपुण्य बरोबर असेल त्याला चंद्रलोकी पाठविले जाते. पुण्य समाप्त झाल्यावर जीवाला पुनः मनुष्यलोकी जन्म घ्यावा लागतो. कित्येक जन्ममरणाचे दुःख त्याला भोगावे लागते.

वृंदावनांत एक महात्मा राहात होते. ते एकदा ध्यानाला बसले होते. एवढ्यांत एक उंदीर येऊन त्यांच्या मांडींत लपून बसला. कारण त्याच्या मागे मांजर धावत होते. दया येऊन महात्मा त्या उंदराला म्हणाला, ' तूं म्हणशील तसा तुला बनवून देतो. उंदराची बुद्धि तरी केवढी असणार! त्याने विचार केला कीं मी जर मांजरच झालो तर मग कोणापासून कांही भय राहणार नाही. उंदराच्या सांगण्याप्रमाणे महात्म्याने त्याला मांजर बनविले. एका कुत्र्याने त्या मांजराचा पाठलाग केला तर त्याला कुत्रा व्हावेसे वाटले. तर तो कुत्रा झाला. जंगलांत एका वाघाने त्याचा पाठलाग केला तर त्याला वाघ व्हावेसे वाटले. मग महात्म्याने त्याला वाघही बनविले. त्याची बुद्धि भ्रष्ट झाली आणि हिंसक वृत्ति जागृत झाली. त्याला विचार आला कीं या महात्म्यालाच खाऊन टाकावे, नाहीतर तो आपल्याला पुनः उंदीर बनवील. तो महात्म्याला खायला आला तर महात्मा म्हणाले, तू तर मलाच खाऊ इच्छितोस! त्यांनी त्याला पुनः पूर्ववत उंदीर करून टाकले.

ही गोष्ट केवळ उंदरामांजरांचीच नाही तर आपणा सर्वांचीच आहे. हा जीव केव्हां उंदीर होता, केव्हां मांजर होता आणि आता मानव झाला आहे तर म्हणू लागला कीं मी ईश्वर मानत नाही. धर्म मला स्वीकार्य नाही. तर देवही विचार करतात कीं तू आता कुठे जाशील? मी तुला पुनः उंदीर-मांजर करून टाकीन. या मनुष्यजन्मांत जीव जर ईश्वराला ओळखण्याचा आणि प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करणार नाही तर मग त्याला पुनः पशूच बनावे लागेल.

पशु-पक्ष्यांच्या योनीमध्यें अनेक प्रकारचे कष्ट सहन केल्यानंतर जीवाला मनुष्ययोनी मिळते. गर्भाधानाच्या दिवशीं जीव पाण्याच्या बुडबुड्यासारखा सूक्ष्म असतो. दहा दिवसांनंतर तो फळाएवढा मोठा होतो. एक महिन्यानंतर गर्भाला डोके येते. दोन महिन्यानंतर हात-पाय, तीन महिन्यानंतर नखे-केस, चार महिन्यानंतर सप्तधातू, पाच महिन्यानंतर भूक-तहानेचें ज्ञान, आणि सहा महिन्यानंतर आईच्या पोटांत भ्रमण असा क्रम आहे. अनंत जंतु उत्पन्न होऊ शकतील अशा विष्ठा–मूत्राने भरलेल्या भागांत जीवाला राहावे लागते. जंतू चावले तर तो मूर्च्छितही होतो. आईने खाल्लेले तिखट, कडू, आंबट, गरम इत्यादी आहाराने सुद्धा त्याच्या अंगाला वेदना होत असतात. याप्रमाणे गर्भात तो अनेक प्रकारचे कष्ट झेलत असतो. पिंजऱ्यांत बंद असलेल्या पक्षाप्रमाणे तो काहीही करायला असमर्थ असतो. सातव्या महिन्यात जीवाला पूर्वजन्माचें ज्ञान होते. तो गर्भांत प्रभूची स्तुती करीत असतो. देवा! मला बाहेर काढा. गर्भवास आणि नरकवास सारखाच असतो. मला बाहेर काढाल तर मी आपली सेवा करीन,

भक्ति करीन. गर्भांत जीव ज्ञानी असतो. भगवंतापुढे तो अनेक प्रतिज्ञा करतो. मला बाहेर काढा. मी फार दुःखी आहे. प्रसवाच्या वेळेच्या त्रासदायक पीडेमुळे तो पूर्वजन्माचे ज्ञान विसरून जातो. जीव अनादि कालापासून बाल्यावस्थेत, तारुण्यांत आणि वृद्धावस्थेंत दुःख सोसत आलेला आहे.

जन्म आणि मरणाची दुःखें एकसारखीच भयंकर आहेत. त्यांचा कधी शेवटच होत नाही.

जन्म झाल्याबरोबर मायेचा स्पर्श होतो. संसारात माया कोणालाच सोडत नाही.

जीव एकाच वस्तूवर प्रेम करील तर ईश्वर खूष होतो. जीव बाल्यावस्थेंत आईवर आणि नंतर मग खेळण्यांवर प्रेम करतो. मग थोडा मोठा झाल्यावर पुस्तके आवडू लागतात. पुस्तकांचा मोह कमी होऊ लागला की मग पैशाअडक्यावर प्रेम करू लागतो. नंतर बायकोवर प्रेम करू लागतो. तो तिला म्हणतो कीं मी तुझ्यावर हजारो रुपये खर्च करू शकतो. तो बायकोच्या इशाऱ्यावर नाचू लागतो. परंतु पत्नीप्रेम नेहमीच राहात नाही. दोनचार मुले झाल्यावर व्याकुळ होतो. मुले झाल्यावर बायकोचा मोह कमी होत जातो. प्रभूची माया फारच विचित्र आहे. विवाहित झाल्यावर सुद्धा पस्तावतो आणि अविवाहित राहिला तरी पस्तावतो.

अनेक जन्मांपासून हा जीव असाच भटकत आला आहे. म्हणून कपिल म्हणतात, "माते, तुला अजून कुठपर्यंत भटकायचे आहे? आपल्या मनाला सांसारिक विषयांतून काढून प्रभूमध्यें स्थिर कर.

परमेश्वराच्या चरणाचा आश्रय घेऊन जन्ममरणाच्या चक्रांतून जो मुक्त झाला, त्याचेच जीवन सफल झाले असे समज.

आईला उपदेश करून कपिल तेथून आईजवळून जाण्यासाठी आज्ञा मागून निघून गेले.

कपिल भगवान कलकत्त्याजवळ संगमतीर्थावर आले. आजसुद्धा त्यांचे तेथे दर्शन होते. समुद्राने कपिल नारायणांचें स्वागत केले.

देवहुति माता सरस्वतीच्या किनाऱ्यावर जाऊन बसली. नित्य स्थान, ध्यानादि करीत करीत तिने मनःशुद्धी साधली. मनोमन नारायणाचे चिंतन करता करता तिला मुक्ति मिळाली. तिला सिद्धि मिळाल्याकारणाने त्या गावाचें नाव सिद्धपूर पडले. देवहुतीच्या उद्धारामुळे त्याचे दुसरे नांव मातृगया पडले.

ही कपिल-गीता ऐकल्याने श्रोत्या-वक्त्यांची अनेक पापे नष्ट होतात.

अनेक प्रकारची कर्मे, यज्ञ, दान, तप, वेदाध्ययन, वेदविचार, मन-इन्द्रियांचा संयम, कर्मत्याग, अनेक प्रकारचा योगाभ्यास, भक्तियोग, प्रवृत्तिमार्ग, निवृत्तिमार्ग, सकाम आणि निष्काम धर्म, आत्मतत्त्वाचें ज्ञान, आणि दृढ वैराग्य या सर्व साधनांनी सगुण-निर्गुणरूप परमात्म्याची प्राप्ति केली जाते. या सर्वच मार्गांनी प्राप्त करण्याचे तत्त्व तर एकच आहे– **परमात्मा!**

**हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम, राम राम हरे हरे॥**

**॥ तृतीय स्कंध समाप्त ॥**

• • •

॥ श्रीहरिः ॥

# ॥ चतुर्थ स्कंध ॥

**श्रीकृष्णाय नमः॥**

प्रथम स्कंधांत अधिकाराचे वर्णन केले आहे. भागवताचा श्रोता कसा असायला पाहिजे इत्यादी गोष्टी सांगितल्या गेल्या आहेत. दुसऱ्या स्कंधांत ज्ञानलीला सांगितली आहे. मरण जवळ आले असता जीवाने कसा व्यवहार करावा, त्यावेळी मनुष्यामात्राचे काय कर्तव्य आहे, इत्यादींचे ज्ञान गुरूंनी द्वितीय स्कंधांत दिले आहे.

पात्रतेच्या अभावी ज्ञान टिकत नाही. पात्रतेच्या अभावी ज्ञानास शोभा येत नाही. किंबहुना ही संपत्ति आणि ज्ञान अपात्राच्या हातीं शोभत नाहीत.

ज्ञान जोपर्यंत क्रियेत उतरत नाही तोपर्यंत ते अज्ञानासारखेच असते. पुष्कळ जाणण्यापेक्षा जे काही जाणून घेतले, ते आचरणांत आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ज्ञान जोपर्यंत क्रियात्मक होत नाही तोपर्यंत त्याला काही किंमत असत नाही. जेव्हा ज्ञान क्रियेत परिणत होते तेव्हांच ते शांती देत असते. ज्ञानाला शब्दरूपांतच राहू देऊ नका, त्याला क्रियात्मक करा. विचार केल्यावर समजते कीं ज्ञानाचा अंत झाला नाही आणि केव्हांही होणार नाहीं. परंतु ज्ञान जेव्हा क्रियाशील होते तेव्हांच शांती मिळते.

गुरूने दिलेले ज्ञान जीवनांत कशा प्रकारें आचरणांत आणावे हे तिसऱ्या स्कंधात सांगितले आहे. ज्ञान आणि क्रिया यांचे मधुर मिलन कसे केले पाहिजे ही बाब तिसऱ्या स्कंधात सांगितली आहे.

कपिल अर्थात जो जितेंद्रिय आहे तोच ज्ञान पचवू शकतो. विलासी जन ज्ञानाचा अनुभव घेऊ शकत नाहीत. वेदान्तज्ञानाचा अधिकार सर्वांना नाही. वेदान्तज्ञानाचा अधिकार विरक्तालाच आहे.

वेदाचा संहिता भाग मंत्ररूप आहे. ब्राह्मणसंहितेचे भाष्य आहे. आरण्यकांत उपनिषदें येतात. अत्यंत सात्त्विक जीवन जगणारे ऋषि जे चिंतन करतात ते उपनिषद आहे, तोच वेदान्त आहे. जो वेदांच्या अन्ती येतो तो वेदान्त होय. अंताचा अर्थ आहे समाप्ति. वेदाची समाप्ति उपनिषदें होत.

वैराग्य आणि संयमाच्या अभावी ज्ञान पचत नाही. त्या ज्ञानाला आचरणात आणून भक्तिमय जीवन जगणारे जन फारच थोडे असतात. ज्ञान प्राप्त करायचे असेल तर सरस्वतीच्या काठी राहावे लागेल. कर्दम व्हावे लागेल. तुम्ही कर्दम झालात तर तुमची बुद्धि देवहुति होईल. अर्थात् तुम्ही जितेंद्रिय व्हाल, तरच तुमची बुद्धि निष्काम होईल. ज्ञान सिद्ध होईल. ज्ञान सिद्ध झाल्यावर पुरुषार्थ सिद्ध होईल, म्हणून चौथ्या स्कंधात अशा चार पुरुषार्थांची कथा सांगितली आहे.

**१. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थांची संक्षिप्त प्रस्तावना:**

तृतीय स्कंधात सर्गलीला होती आणि या चौथ्या स्कंधात विसर्गलीला आहे. पुरुषार्थ चार आहेत — धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष. याप्रमाणे चौथ्या स्कंधांत चार प्रकरणें आहेत. धर्म, अर्थ काम आणि मोक्ष.

धर्मप्रकरणात सात अध्याय आहेत. सात प्रकारची शुद्धि झाल्यानंतर धर्माची सिद्धि होते. ज्याची सात प्रकारे शुद्धि होते त्यासच धर्माची सिद्धि लाभते. सात शुद्धि या प्रकारे आहेत: (१) देशशुद्धि, (२) कालशुद्धि, (३) मंत्रशुद्धि, (४) देहशुद्धि, (५) विचारशुद्धि, (६) इंद्रियशुद्धि, आणि (७) द्रव्यशुद्धि.

अर्थप्रकरणांत पांच अध्याय आहेत. यांत सांगितले आहे की अर्थाची प्राप्ति पाच साधनांनी होत असते. अर्थप्राप्तीची पांच साधनें ही होत:

(१) मातापित्यांचे आशीर्वाद, (२) गुरूकृपा, (३) उद्यम, (४) प्रारब्ध, आणि (५) प्रभूकृपा. या प्रकारच्या साधनांनी ध्रुवाला अर्थप्राप्ति झाली होती.

कामप्रकरणात अकरा अध्याय आहेत. हे अध्याय दर्शवितात की काम अकरा इंद्रियांमध्ये वसलेला आहे. अर्थात पांच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये आणि अकरावे मन. या अकरा ठिकाणी कामाची वसती आहे. रावणाला दहा तोंडे होती. म्हणजे रावणरूपी काम दहा इंद्रियांत वसलेला आहे. जो सगळ्यांना आनंद देतो तो राम, आणि जो सगळ्यांना रडवितो तो रावण. काम हा जीवमात्राला रडवीत असतो.

काम मनातून जात नाही, हाच विघ्नरूप आहे. डोळ्यांमधून काम मनांत प्रवेश करीत असतो. म्हणून डोळ्यांत कामरूपी रावणाला शिरू देऊ नका.

रामासारखे निर्विकारी व्हाल तर रावणरूपी काम मरेल. काम मेल्यावर राम भेटतील.

मोक्षप्रकरणांत आठ अध्याय आहेत. महाप्रभूंनी म्हटले आहे:

प्रकृतीचे आठ प्रकार आहेत, पृथ्वी, पाणी, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार. या अष्टधाप्रकृतीला जो ताब्यात ठेवतो, त्याला मोक्ष मिळतो. जो अष्टधाप्रकृतीच्या बंधनांतून मुक्त होतो तो कृतार्थ होतो.

प्रकृतीवर विजय मिळविणाऱ्यास मुक्ति मिळते. पृथ्वी, पाणी, आकाश, वायु, तेज, मन, बुद्धि आणि अहंकार यांना ताब्यात ठेवा. प्रकृति म्हणजे स्वभाव. अनेक जन्मांचे संस्कार मनांत संचित असतात. मोठमोठे ऋषिसुद्धा प्रकृतीला म्हणजे स्वभावाला वश करू शकले नाहीत, यामुळे ते बंधनांत पडले आहेत. अष्टधाप्रकृतीवर विजय मिळविणाऱ्याला मुक्ति मिळते. प्रकृतीच्या वश (आधीन) होतो तो जीव, आणि प्रकृतीला वश करतो तो ईश्वर. श्रवण, कीर्तन आदी नऊ प्रकारची भक्ति ज्याची सिद्ध होते तो ईश्वर होतो. तुम्ही स्वतः ईश्वर झाला नाहीत तरी काही हरकत नाही, पण ईश्वराचे होऊन रहा.

या प्रकारे एकतीस अध्यायांचा चौथा स्कंध आहे.

**२. धर्म प्रकरणाचे विवेचन:**

चार पुरुषार्थांमध्ये प्रथम धर्म आहे आणि अंती मोक्ष आहे. मध्ये अर्थ आणि काम आहेत. हा क्रम ठरविण्यात देखील रहस्य आहे. हा क्रम हे दर्शवितो की, धर्म आणि मोक्ष यांना अनुसरूनच अर्थ आणि काम प्राप्त करायचे. धर्म आणि मोक्ष हे दोन पुरुषार्थ मुख्य आहेत. बाकीचे दोन — अर्थ आणि काम गौण आहेत. धर्माच्या विरुद्ध कोणताही पुरुषार्थ सफल होत नाही. धर्माचे नेहमी स्मरण

ठेवा. सर्वात प्रथम पुरुषार्थ धर्म आहे. धर्मानुरूपच अर्थ आणि कामाची प्राप्ति करायची आहे.

पैसा मुख्य नाही. धर्मच मुख्य आहे. मानवजीवनात धर्मच प्रधान आहे. धनानें सुख मिळत नाही. सुख मिळत असते चांगल्या संस्कारांनी, संयमाने आणि सदाचारांनी. प्रभुभक्तीने आणि त्यागाने सुख मिळते. धर्मापेक्षा धन केव्हाही श्रेष्ठ होऊ शकत नाही. धर्म इहलोकी आणि परलोकी सुख देतो. मरणानंतर पैसा आपल्याबरोबर जात नाही. धर्मच बरोबर जात असतो. म्हणून धनापेक्षा धर्म श्रेष्ठ होय. जेव्हापासून लोक अर्थाला महत्त्व देऊ लागले आहेत तेव्हापासून जीवन बिघडले आहे. श्रीशंकराचार्यांनी एके ठिकाणी अर्थाला अनर्थ म्हटले आहे. जेव्हा मनुष्य धनापेक्षा धर्माचा आदर करू लागतो तेव्हाच जीवन आनंददायी होत असते.

अर्थाला धर्मानुकूल ठेवा. जो अर्थ धर्मानुकूल नसेल तो अनर्थच होय. देशाला संपत्तीची जितकी आवश्यकता आहे, त्यापेक्षाही जास्त आवश्यकता चांगल्या संस्कारांची आहे. तुम्ही आपल्या जीवनांत धर्माला सर्वप्रथम स्थान द्या. जीवनात जेव्हा कामसुख आणि अर्थ यांना गौणत्व येते तेव्हाच जीवनात दिव्यता येते. दिव्यता म्हणजे देवत्व.

धर्माची गति सूक्ष्म आहे. धर्मदेखील अनेक वेळा अधर्म होतो. सद्भावनेच्या अभावांत केला गेलेला धर्म सफल होत नाही. सत्‌चा अर्थ आहे ईश्वर. ईश्वराचा भाव जो सर्वामध्ये प्रत्यक्ष सिद्ध करील, त्याचाच धर्म पूर्णतः सफल होत असतो.

मनुष्याचे शत्रू बाहेर नाहीत, ते तर मनातच आहेत. आतल्या शत्रूंना माराल तर जगात तुम्हांला कोणी शत्रू राहणार नाहीत.

धार्मिक कर्म सद्भावनेशिवाय सफल होत नाही. जगातील कोणत्याही जीवाविषयीं दुराभाव ठेवाल तर तो जीव देखील तुमच्याविषयी दुराभावच ठेवील.

सर्वच क्षेत्रांत (शरीरांत) क्षेत्रज्ञ रूपाने परमेश्वर वसलेला आहे. म्हणून कोणत्याही जीवाविषयी दुराभाव बाळगणें ईश्वराविषयीच विपरीत भाव ठेवण्यासारखे आहे. शास्त्रात तर इथपर्यंत सांगितले आहे की कोणत्याही चेतन जीवाविषयीच काय, पण कोणत्याही जड पदार्थाविषयी देखील विपरीत भाव ठेवू नये. म्हटले आहे: "**सुहृदः सर्वभूतानाम्**" असे म्हटले नाही कीं, "**सुहृदः सर्वजीवानाम्.**" जड पदार्थावरही प्रेम करायचे आहे. सर्वांविषयी सद्भाव ठेवा. अर्थात् जड पदार्थाविषयीही प्रेम ठेवा.

मनुष्यात जेव्हा स्वार्थबुद्धि जागृत होते तेव्हा तो दुसऱ्याचा विनाश करायला उद्युक्त होतो. तुम्ही जर दुसऱ्याविषयी विपरीत भाव ठेवाल तर त्याच्या मनातही तुमच्याविषयी कुभाव जागृत होईल.

यावर विचार करण्यायोग्य एक दृष्टान्त आहे. एका देशात तिथला राजा आणि नगरशेठ हे परममित्र होते. यांची गाढ मैत्री होती. दोघेही सत्संग करीत असत. दोघांचेही एकमेकांवर खूप प्रेम होते. त्या वाण्याचा चंदनाची लाकडे विकण्याचा व्यापार होता. शेठजीचा धंदा चांगला चालत नव्हता. चार-पाच वर्षे त्याला सतत तोटाच होत राहिला. शेवटी मुनीमाने सांगितले की, लाकूड खराब होत चालले आहे. वाईट झालेला माल कोणी घेत नाही. जर या वर्षी सर्व चंदन विकले गेले नाही तर व्यापार बसेल, ठप्प होईल. आता चंदनासारखे किंमती लाकूड राजाशिवाय कोण घेणार?

स्वार्थ मनुष्याला वेड लावीत असतो. मनुष्याच्या मनात स्वार्थ जागृत झाला की तो दुसऱ्याचा विनाश करायला देखील तयार होतो. दुसऱ्याचे नुकसान करणाऱ्याला केव्हाच फायदा होत नसतो. मनुष्याच्या मनांत स्वार्थ जागृत झाला की विवेक राहात नाही. प्रत्येक मनुष्यांत स्वार्थ तर असतोच, पण त्याने विवेकही ठेवायलाच पाहिजे. जे बोलायला देखील लाज वाटते, तसा विचार देखील करू

नये. नगरशेठजीला वाटले की, या राजाला जर काही झाले तर चांगले होईल. तो जर मेला तर त्याला जाळण्याकरिता चंदनाच्या लाकडांची गरज लागेल आणि अशा प्रकारे माझे सगळे चंदन विकले जाईल आणि व्यापार चांगला चालेल. याप्रकारे शेठजींच्या मनांत राजाविषयी वाईट विचार उत्पन्न झाला.

दुसरीकडे राजाच्या मनांतही शेठजींविषयी विपरीत भाव उत्पन्न झाला. त्या दिवशी जेव्हा तो शेठ राजाला भेटायला आला तेव्हा राजाच्या मनांत विचार आला की, हा शेठ निःसंतान आहे. हा जर मेला तर याचे सगळे धन राज्याच्या भांडारात जमा होईल. रोजच्याप्रमाणे सत्संग तर झाला पण दोघांनाही आनंद मिळाला नाही.

दोन-तीन दिवसांनी राजाच्या मनात विचार आला की जो पूर्वी कधीही आला नाही असा दुष्ट विचार नगरशेठविषयी माझ्या मनात कसा उत्पन्न झाला ?

मनुष्य पाप मनात लपवून ठेवतो. त्यामुळे त्याचे जीवन बिघडते. राजाने सर्व हकीगत शेठजींना सांगितली व म्हटले, "तुझ्याविषयी वाईट विचार माझ्या मनात पूर्वी कधीच आले नव्हते, आताच का यावे याचे कारण माझ्या काही लक्षात येत नाही. तू तर माझ्याविषयी काही वाईट विचार केला नाहीस ना ?"

शेठजी म्हणाले, "माझा चंदनाचा व्यापार चालत नाही. सगळ्यांचे पोषण करायचे आहे. कोणी माल घेत नाही म्हणून मी विचार केला की, तुम्ही जर मेलात तर किती चांगले होईल ! आपण मेलात म्हणजे आपल्याला जाळण्यासाठी चंदनाची गरज लागेल आणि माझे सर्व चंदन विकले जाईल. राजाने शेठजीची कानउघाडणी केली आणि म्हटले, "असा वाईट विचार तू कां केलास ? वैष्णव असून असा विचार करतोस हे वैष्णवाला शोभत नाही. तुझ्या मनांत असा विचार का आला नाही कीं, राजाने आपल्या महालाचे दरवाजे चंदनाचे करावेत आणि त्यासाठी माझ्याकडचे सर्व चंदन त्याने विकत घ्यावे ? राजाने भगवंतासाठी चंदनाचा झुला बनवावा आणि माझे सर्व चंदन विकले जावे." याप्रकारे राजाचे बोलणे झाल्यावर दोघांमध्ये एकमेकांविषयी शुभभावना जागृत झाली आणि ते दोघेही सुखी झाले.

भावशुद्धि सर्वात मोठे तप आहे. मानवजीवन तपासाठी आहे. जगांतील कोणत्याही जीवाविषयी वैर बाळगू नका. शुद्धभावाच्या अभावी केले गेलेले सत्कर्म काही कामाचे असत नाही. त्यामुळे पुष्कळ वेळा धर्म देखील अधर्म होतो. सत्कर्म करण्याचा हेतू शुद्ध नसेल तर ते सत्कर्मसुद्धा पाप होते.

दक्षप्रजापतीनें शंकराविषयी दुराभाव ठेवला म्हणून त्याचा धर्म अधर्मात बदलला गेला. त्याचा यज्ञ त्यालाच मारक झाला.

प्रत्येक मनुष्याविषयी सद्भाव ठेवल्याने कार्य सफल होते. सर्वांचे कल्याण व्हावे हेच सत्य आणि सत्कार्य आहे.

अनेकांमध्ये एकाचेच दर्शन करणे सर्वात उत्तम आहे. एखादा ब्राह्मण रस्त्यांतील एखाद्या स्त्रीविषयी लक्ष्मीचा भाव धरील तर त्यामुळे त्या स्त्रीच्या अंतर्यामी वसत असलेला ईश्वर त्याला आशीर्वाद देईल. याउलट एखादा कामी पुरुष त्या स्त्रीला कामभावनेने पाहील तर त्या स्त्रीमध्ये वसलेला परमात्मा त्याला शाप देईल. सर्वात ईश्वरभाव ठेवा. जर तुम्ही सर्वांमध्ये ईश्वरभाव ठेवाल तर दुसरेदेखील तुमच्याविषयी ईश्वरभाव ठेवतील. पुष्कळ वेळा धर्मदेखील अधर्म होत असतो. याचे कारण असे की धर्म करणारा सर्वांमध्ये समभाव ठेवीत नाही. सगळ्यांविषयी समभाव ठेवणे हाच उत्तम धर्म आहे. सगळ्यांमध्ये समभाव ठेवाल तर सुखी व्हाल. सद्भावाचा अर्थ आहे ईश्वराचा भाव. सर्वांमध्ये जो ईश्वरभाव ठेवतो तो सुखी होतो. त्याचा धर्म देखील सफल होतो. कोणाही जीवाविषयी विपरीत भाव ठेवणाऱ्याचा धर्म

सफल होत नाही. महाभारतात आम्हांला दिसते की कृष्ण कित्येक वेळा अधर्म करतात. परंतु त्यांच्या मनांत सर्वांविषयी सद्भावच वसत असतो, यामुळे त्यांचा अधर्म देखील धर्मच होतो.

महाभारतांतील कर्णपर्व आणि द्रोणपर्व यात याविषयी दृष्टान्त सापडतात.

कर्णपर्वात सांगितले आहे की, कर्ण ज्यावेळी आपल्या रथाचे चाक जमिनीतून काढीत होता आणि ज्यावेळी तो निःशस्त्र होता, त्यावेळी भगवंतांनी अर्जुनाला सांगितले की तू या कर्णाला मार.

कर्ण म्हणतो, "युद्धशास्त्राचा नियम आहे की, ज्यावेळी शत्रु निःशस्त्र असेल, त्यावेळी त्याच्यावर प्रहार करू नये. म्हणून अर्जुनाने माझ्यावर प्रहार करू नये."

तेव्हा श्रीकृष्ण कर्णाला म्हणतात, "कर्णा, आजपर्यंत तू धर्माचे किती पालन केले आहेस? तू स्वतः तर धर्माचे पालन केले नाहीस, आणि दुसऱ्याला मात्र धर्मपालन करण्याचा उपदेश देत आहेस. भर सभेत द्रौपदीचा अपमान केलास तेव्हा तुझा धर्म कोठे गेला होता?"

द्रोणपर्वात असा एक कथाभाग येतो, द्रोणाचार्य पांडवसेनेचा नाश करीत होते. श्रीकृष्णाने विचार केला की हा म्हातारा मेला नाही तर अनर्थ होईल. इतक्यांत अश्वत्थामा नावाचा हत्ती मारला गेला. श्रीकृष्णानें विचार केला की, जर द्रोणाचार्यांना सांगितले की तुमचा मुलगा मारला गेला आहे तर पुत्रशोकामुळे ते युद्ध बंद करतील. हा विचार करून त्यांनी घोषणा केली की, अश्वत्थामा मारला गेला आहे. द्रोणाचार्यांनी विचार केला की, मुलगा मारला गेला आहे. आता युद्ध कशाला करू? परंतु धर्मराज युधिष्ठिर जर म्हणेल कीं अश्वत्थामा मारला गेला आहे, तर मी ते खरे मानीन. युधिष्ठिराला कृष्णाने, 'अश्वत्थामा मारला गेला,' असे म्हणायला सांगितले. युधिष्ठिर म्हणतो, 'राज्यासाठी मी असत्य कसे बोलू?'

भगवान् म्हणतात कीं दुर्योधन पापी आहे. तो मरेल तर जग सुखी होईल. आणि जिवंत राहील तर अधिक पाप करील आणि जग दुःखी होईल. ज्याने सर्वांचे कल्याण होईल तेच सत्य. द्रोणाचार्य ब्राह्मण असून देखील अधर्मी दुर्योधनाला साहाय्य करीत आहेत. ते पाप करीत आहेत. द्रोणाचार्यांनी युद्ध करणे सोडले तर त्यांच्या हातून आणखी अधर्म होणार नाहीं. याकरिता म्हण की, "**अश्वत्थामा हतः**" भगवंताने फार आग्रह केला म्हणून युधिष्ठिराला म्हणावे लागले, "**अश्वत्थामा हतः**" असत्य बोलल्याचे पाप लागू नये म्हणून नंतर लगोलग म्हणाले, "**नरो वा कुंजरो वा**". परंतु हे शेवटचे शब्द उच्चारण्यापूर्वींच प्रभूंनी जोराने शंखनाद केला म्हणून हे शब्द कोणाला ऐकू आले नाहीत.

दक्षप्रजापतीने यज्ञरूप धर्म, शंकरांविषयी कुभाव ठेवून केल्यामुळे त्यालाच मारक झाला. उलटपक्षी श्रीकृष्णाचा असत्य भाषणरूपी अधर्म देखील सर्वांच्या कल्याणासाठी केलेला असल्यामुळे धर्मरूप बनला.

सत्कर्म करताना भाव शुद्ध ठेवा. हृदय शुद्ध ठेवा. शुद्ध भाव ठेवणेच सर्वात मोठे तप आहे. याकरिताच '**सर्वेषाम् अविरोधेन ब्रह्मकर्म समारभे**' हा मंत्र म्हणून प्रत्येक सत्कर्माचा आरंभ केला जात असतो. सर्वांविषयी सद्भाव ठेवा. सगळ्यांना सद्भावाने पहा. सद्भावाविना केलेले कर्म सफल होत नाही.

मैत्रेय म्हणतातः मनु भगवानांच्या येथे तीन कन्या झाल्या. एक आकृति, दुसरी देवहुति, आणि तिसरी प्रसूति. देवहुतीचे लग्न कर्दमाशी झाले होते. त्यांना नऊ मुली झाल्या. त्या नऊ मुलींची लग्ने नऊ ब्रह्मऋषींशी झालेली होती. प्रसूतीचें लग्न दक्ष प्रजापतीशी झाले होते. ही सर्व कथा सांगून झाली आहे. आता कर्दमाच्या मुलींच्या वंशाचे वर्णन करतो. मरीचि आणि कलेच्या ठिकाणी कश्यप आणि

पूर्णिमा नावाचे दोन पुत्र झाले. अत्रीपत्नी अनसूयेच्या येथे दत्तात्रेय, दुर्वास आणि चंद्रमा नावाचे तीन पुत्र झाले. ते अनुक्रमे विष्णू, शंकर आणि ब्रह्मदेवाचे अंशाने उत्पन्न झाले होते.

**३. दत्तजन्माचे आख्यान :**

विदुर विचारतात की, या सर्वश्रेष्ठ देवांनी काय करण्याच्या हेतूने अत्रि मुनींच्या येथे अवतार घेतला होता, ती कथा सांगा.

मैत्रेय सांगतात: दत्तात्रेय अत्रि ऋषींच्या घरी आलेले आहेत. पुरुष जर अत्रिसारखा तपस्वी होईल आणि स्त्री अनसूयेसारखी तपस्विनी होईल, तर आजदेखील त्यांचे घरी दत्तात्रेय यायला तयार आहेत.

न-त्रि तो अत्रि. सत्त्व, रज, आणि तम या तीनही गुणांचा जो नाश करील आणि निर्गुणी होईल तोच अत्रि आहे. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांमध्ये जीव अडकला आहे. या तीन गुणांपासून जीवाला वेगळे व्हावयाचे आहे.

तर्जनी जीवभावदर्शक आहे. अभिमान दर्शविते. जीवात अभिमान प्रधान आहे. पाचवे बोट (कनिष्ठिका) सत्त्वगुण आहे. अंगठा ब्रह्म आहे. याकरिताच पुष्टिसंप्रदायांत प्रभूला अंगठ्याने टिळा लावला जातो. वेदांत ब्रह्माचे 'नेति' 'नेति' म्हणून वर्णन केले गेले आहे. या जीव ब्रह्माचा सतत संबंध झाला पाहिजे.

या तीन गुणांत जीव अडकतो आणि या तीन गुणांना सोडून ब्रह्मसंबंध करतो. जो त्रिगुणातीत ब्रह्मस्वरूपाला प्राप्त झाला आहे तो अत्रि आहे.

शरीरांत जो तमोगुण आहे, त्याला रजोगुणाने मारा, दूर करा. रजोगुणाला सत्त्वगुणाने मारा. रजोगुण, काम आणि क्रोधाचा जनक आहे. सत्कर्मानि सत्त्वगुण वाढतो. सत्त्वगुणदेखील बंधनकारक आहे. यात देखील थोडा अहंभाव राहतोच. म्हणून सरतेशेवटी सत्त्वगुणाला सत्त्वगुणानेच मारावयाचे आहे. सत्त्वगुणाचाही त्याग करून निर्गुणी व्हावयाचे आहे. जर जीव अत्रि होईल तर त्याची बुद्धि अनसूया होईल. असूयारहित बुद्धि अनसूया असते. बुद्धीमध्ये सर्वात मोठा दोष असूया-मत्सर आहे. दुसऱ्याचे बरे पाहून ईर्षा करणे, जळणे ही असूया किंवा मत्सर होय.

दुसऱ्यांच्या दोषांचा विचार श्रीकृष्णदर्शनात विघ्नकर्ता आहे. बुद्धीत जोपर्यंत असूया, मत्सर असेल तोपर्यंत ईश्वराचे चिंतन करू शकणार नाही. भगवंताचे दर्शन सर्वांमध्ये घ्यायचे आहे. जर जीव सर्वांमध्ये ब्रह्माचे दर्शन घेईल तर तो कृतार्थ होईल.

ज्याची बुद्धि असूयारहित होते तोच अत्रि बनतो. त्यानंतर दत्तात्रेय येतात. जीव तीन गुणांचा त्याग करून निर्गुणी बनेल आणि बुद्धि असूयारहित होईल, तेव्हा ईश्वर प्रगट होतो.

प्रभुस्मरणाने बुद्धि जागृत होते. असूया ईश्वराच्या मार्गात अवरोध उत्पन्न करणारी आहे. असूया ज्ञानशक्तीच्या मार्गात अवरोध करते. याकरिता कोणाविषयीही असूया ठेवू नका. जेव्हा बुद्धि अनसूया होते तेव्हाच ती ईश्वरचिंतन करू शकते.

अनसूया महान पतिव्रता आहे. एकदा देवर्षि नारद कैलासात आले. शंकर समाधीत होते. पार्वती पूजा करीत होती. पार्वतीने नारदांना प्रसाद दिला. नारद म्हणाले, 'लाडू फार स्वादिष्ट आहे, आज आपल्या हातचा प्रसाद मिळाला आहे. परंतु त्या अनसूयेच्या इथले लाडू, तुमच्या लाडवापेक्षाही उत्कृष्ट आहेत.'' पार्वती विचारते की, ''ही अनसूया कोण आहे?'' नारद म्हणतात, '' आपण पतिव्रता आहांत,

पण अनसूया महान पतिव्रता आहे." पार्वतीच्या मनात ईर्षा उत्पन्न झाली. अनसूया माझ्यापेक्षादेखील श्रेष्ठ आहे. शंकर जेव्हा समाधींतून जागृत झाले तेव्हा पार्वतीने त्यांना नमस्कार केला.

घरचे लोक खूप नमस्कार वगैरे करू लागले की समजावे की खड्ड्यांत उतरविण्याची तयारी चालू आहे. शंकरांनी विचारले, "देवी, काय गोष्ट आहे?" पार्वती म्हणाली, "कशाही प्रकारे अनसूयेचे पातिव्रत्य भंग होईल असे करा."

शिवशंकर म्हणतात, "जो दुसऱ्याचे वाईट करण्याची इच्छा करतो, त्याचेच वाईट होत असते. ह्यात कल्याण नाही देवी; पण तुझी इच्छाच आहे तर प्रयत्न करतो."

इकडे नारद वैकुंठांत आले. लक्ष्मीला भेटले. तिने विचारले, "आज इतक्या आनंदात का आहात?" नारद म्हणतात, "वैकुंठाचे महत्त्व तर पूर्वी होते, परंतु आता तर अनसूयेच्या आश्रमाशिवाय अन्यत्र कोठे जाण्याची इच्छाच होत नाही. मी तिच्या आश्रमातून येत आहे, म्हणून अत्यंत आनंदात आहे." लक्ष्मी विचारते की, ही अनसूया कोण आहे? नारद म्हणतात, "ती महान पतिव्रता आहे." लक्ष्मीने विष्णूंना म्हटले की, आपण असे काही करा की, जेणेकरून अनसूयेचे पातिव्रत्य भंग होईल.

पार्वतीचा अर्थ बुद्धि. बुद्धि-विद्येत मत्सर आहे. लक्ष्मीचा अर्थ द्रव्य. द्रव्यात ईर्षा अर्थात असूया असते. ब्रह्माणी रजोगुण आहे.

सावित्रीने देखील याचप्रमाणे ब्रह्मदेवाला विनंती केली.

शंकर, विष्णू, ब्रह्मदेव तीनही देव चित्रकूटावर एकत्र भेटले. तिघेही अनसूयेच्या आश्रमात आले. भिक्षा मागताना ते म्हणाले, "आम्ही भिक्षा मागत आहोत, पण तू जर नग्न होऊन भिक्षा देशील तरच आम्ही भिक्षा घेऊ." अनसूयेला विचार पडला की आपण नग्न होऊन भिक्षा वाढली तर आपले पातिव्रत्य भंग होईल आणि भिक्षा घातली नाही तर घरच्या अंगणात आलेले अतिथी विन्मुख होऊन परत जातील तर तेही महापाप होईल. मला पाप लागेल.

प्रभू म्हणतात, "आम्हांला नग्न होऊन भिक्षा द्या." अर्थात ते म्हणत आहेत, आम्हाला वासनारहित होऊन भिक्षा घाला. ईश्वराला वासनारहित होऊन, निष्काम होऊन, सर्व काही अर्पण करायचें आहे.

अनसूयेच्या मनात कोणतीच वासना नव्हती. सूक्ष्म वासना देखील जर मनात असेल तर हे तीन देव तिचे दारी येते ना.

अनसूयेने ध्यान केले आणि तिनही देवांवर पाणी शिंपडले. तिन्ही देव बालके झाली, पतिव्रतेत इतकी महान् शक्ती असते.

पार्वती विचारात पडली आहे की शंकर सकाळीच गेलेले आहेत, तरी अजूनपर्यंत परतलेले नाहीत. लक्ष्मी आणि सावित्रीदेखील आपापल्या पतींना शोधायला निघाल्या आहेत. तिन्ही देवी चित्रकूटात आल्या. इतक्यात नारदही तेथे येऊन पोहोचले आणि अनुष्ठानासाठी बसले. देवींनी नारदांना विचारले, "आमच्या पतीविषयी काही समाचार माहीत आहे का?" नारद विचारतात, "प्रथम हे तर सांगा की मोठे कोण आहे? तुम्ही की अनसूया?" देवी म्हणतात की, "अनसूया मोठी आहे, पण आमचे पति कोठे आहेत?" नारद म्हणाले की, "तुमचे पति बालके झाली आहेत. ते अनसूयेच्या घरी भेटतील."

दुसऱ्याविषयी असूया ठेवणाऱ्याला शांति मिळत नाही. देवींना भीती वाटत आहे. त्यांना वाटले आम्ही तेथे गेलो अन् अनसूयेने शाप दिला तर? नारद म्हणतात, तुम्ही खुशाल मत्सर करा, पण अनसूया मत्सर करणार नाही. अनसूया तर तुमच्याकडे सद्भावनेनेंच पाहील. तुमच्याविषयीं सद्भावच ठेवील. तिन्ही देवी आश्रमात येतात. अनसूयेने देवांकडून अनेक प्रतिज्ञा घेवविल्या, आजपासून प्रतिज्ञा

करा की, "कोणत्याही पतिव्रतेला केव्हाही त्रास देणार नाही. जगातील कोणत्याही स्त्रीला काहीही त्रास देणार नाही. इतक्यात अत्रि ऋषी येतात. ते विचारतात, "ही तीन बालके कोण आहेत ?' अनसूया म्हणते, "ही तीन माझी बालके आहेत, आणि या तीन त्यांच्या स्त्रिया आहेत." अत्रि ऋषि म्हणतात, "अनसूये, देवी, असे म्हणू नकोस. हे तीन मोठे देव आहेत." यानंतर त्यांनी त्या बालकांवर पाणी शिंपडले, आणि तिन्ही देव मूळ स्वरूपात प्रगट झाले. तिन्ही देव म्हणतात, "तुमच्या अंगणांत आम्ही बालके होऊन खेळत होतो. ते सुख नेहमीकरता आम्ही तुम्हांला देऊ. या तीनही देवांचे तेज एकत्र होऊन दत्तात्रेयांच्या रूपांत प्रकट झाले आहे.

जेव्हा हा जीव काहीच मागत नाही तेव्हा परमात्मा त्याला आपल्या स्वरूपाचे दान करीत असतात.

मार्गदर्शन गुरुकृपेशिवाय मिळत नाही. गुरु दत्तात्रेय मार्गदर्शन करणारे आहेत. म्हणून त्यांचा जन्म मार्गशीर्षात झालेला आहे.

पहिल्या अध्यायात कर्दम ऋषींच्या कन्यांच्या वंशाचे वर्णन केले गेले आहे.

दक्षप्रजापति आणि प्रसूतीच्या येथे सोळा कन्या झाल्या. त्यांतील तेरा त्यांनी धर्माला, एक अग्नीला, एक पितृगणांना आणि सोळावी शंकरांना दिली.

धर्माच्या तेरा पत्न्या म्हटल्या गेल्या आहेत, त्यांची नावे आहेत: श्रद्धा, दया, मैत्री, शांति, पुष्टि, क्रिया, उन्नती, बुद्धि, मेधा, स्मृति, तितिक्षा, धृती आणि मूर्ती. धर्माचे तेरा विवाह झाले आहेत. या तेरा गुणांना जीवनांत, आचरणांत उतरविले असता धर्म अवश्य फळत असतो. या तेरा गुणांशी लग्न लावाल तर भगवंत प्राप्त होतील.

धर्माची पहिली पत्नी आहे श्रद्धा. ईश्वरावर श्रद्धा ठेवा. धर्माची प्रत्येक क्रिया श्रद्धेने करा. श्रद्धा दृढ असली पाहिजे.

एक दिवस नामदेवांच्या वडिलांना कोठे बाहेर जाण्याचा प्रसंग आला. नामदेव त्यावेळी लहान होते. घरांत देवपूजा होत असे. जाताना त्या पूजेचे काम नामदेवाला सोपवून दिले. वडिलांनी नामदेवाला पूजेचा विधि समजावून सांगितला. त्याप्रमाणे नामदेवाने भगवंतांना दुधाचा नैवेद्य दाखविला. भगवंत दूध पीत नाहीत. नामदेवाने खूप आळविले, मनधरणी केली, रोज तर बाबांच्या हातून आपण नैवेद्य स्वीकारीत असता, आज काही माझ्या हातून चूक झाली आहे का ? आपण दूध का पीत नाही ? त्याने विचारले.

वडिलांनी नामदेवांना सांगितले होते की, विठ्ठलनाथ संकोच करीत असतात. त्यांची मनधरणी करावी लागते. याकरिता नामदेव देवाची एकसारखी मनधरणी करू लागले. "विठ्ठला, तुम्ही दूध प्यायला नाहीत तर माझे वडील मला मारतील. विठ्ठला, दूध प्या ना! परंतु जेव्हा सर्व प्रकारची विनंती व्यर्थ गेली तेव्हा नामदेव मूर्तीपुढे आपले डोके फोडायला तयार झाले. ते म्हणाले, "विठ्ठला, सांगा, दूध प्यायचे आहे की नाही ? नाही तर मी आपले डोके फोडून घेईन."

नामदेवाची दृढ श्रद्धा आणि भक्ति पाहून भगवंत प्रसन्न झाले. नामदेव डोके फोडून घेणार एवढ्यात भगवंत प्रगट झाले. भगवंतांनी दुधाची वाटी घेतली आणि ते दूध पिऊ लागले. पाच वर्षांचे नामदेव देवाला दूध पाजीत आहेत. जेव्हा नामदेवांना वाटले की, विठ्ठलनाथ तर सगळे दूध पिऊन टाकीत आहेत, तेव्हा त्यांनी प्रभूला जोराने हाक मारून म्हटले, "विठ्ठला, तुम्ही तर सगळेच दूध पिऊन संपवीत आहात, मला प्रसाद नाही का देणार ?" बाबा तर मला रोज प्रसाद देतात. नामदेवांचे प्रेम पाहून विठ्ठलनाथ प्रसन्न झाले. प्रभूंनी नामदेवाला मांडीवर घेतले आणि दूध पाजले.

दृढ श्रद्धाभक्तीने, दृढ प्रेमाने जड देखील चेतन होते. जीवमात्राशी मैत्री ठेवा.

श्रीधरस्वामींनी म्हटले आहे, सगळ्यांशीच मैत्री ठेवणे तर शक्य नाही. पण सगळ्यांशी मैत्री ठेवणे शक्य नसले तरी काही हरकत नाही, पण कोणाशी वैर तरी ठेवू नका. कोणाशी वैर न ठेवणेदेखील मैत्री करण्यासारखेच आहे.

धर्माची तेरावी पत्नी मूर्ति आहे. आणि तिच्या घरी नर-नारायण प्रगट झाले. नारायणाचे माता, पिता, मूर्ति आणि धर्म आहेत. मूर्तीविषयी प्रेम असू द्या. जो धर्माला पिता आणि मूर्तीला माता मानील, त्याच्या येथे नारायणाचा जन्म होईल. बद्रिनारायण भगवान वर्षातून एकदा मूर्तिदेवीला भेटायला येतात. धर्म पिता आहे आणि मूर्ति माता, जर धर्माचे बरोबर पालन कराल, तर तुमच्या येथे नारायण प्रगट होतील.

**४. श्रीशंकरांची पूर्वपत्नी आणि दक्षप्रजापतीची कन्या 'सती' हिचे आख्यानः**

दक्षप्रजापतींची छोटी कन्या सती हिचा विवाह शंकराबरोबर झाला. दक्षप्रजापतीने शंकरांचा अपमान केला. याकरिता सतीने आपले शरीर यज्ञात भस्मसात करून घेतले. भगवान शंकर महान आहेत. चराचर जगताचे गुरु आहेत. संत ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीत म्हटले आहे: जगतांत जेवढे म्हणून धर्मसंप्रदाय आहेत त्यांचे आदिगुरु श्रीशंकर आहेत. गुरु केल्याशिवाय राहू नका. सगळ्याच मंत्रांचे आचार्य शंकर आहेत. याकरिता त्यांना गुरू मानून मंत्रदीक्षा घेतली पाहिजे.

विदुर विचारतात, "देवांमध्ये सर्वश्रेष्ठ अशा शंकरांशी दक्षप्रजापतीने वैर केले हे ऐकून फारच आश्चर्य वाटते. तेव्हा ही कथा मला विस्ताराने सांगा."

मैत्रेय सांगतात, "प्राचीन काळी प्रयागक्षेत्री एक मोठे ब्रह्मसत्र झाले होते. त्रिग्रहीचा जेव्हा योग येतो, तेव्हा कुंभ होतो. गरुड जेव्हा अमृत घेऊन जात होता तेव्हा चंद्र, सूर्य आणि गुरु या तिघांनी अमृतकुंभाचे रक्षण केले होते.

ज्ञान आणि भक्ति जेव्हा एकवटतात, तेव्हा मानवसमाजात सुख आणि शांति नांदत असते.

प्रयागराज क्षेत्रांत मोठे ब्रह्मसत्र झाले. सभेत शंकर अध्यक्षस्थानी होते. त्यावेळी दक्षप्रजापति तेथे आले. जेथे कोठे मनुष्य बसलेला असेल तेथेच तो भान हरपून भक्ति करील तर तो उत्तम भक्त होय. शिवशंकर नारायणाचे ध्यान करीत होते. सभेत कोण आला, कोण गेला याचे त्यांना भान नव्हते. दक्ष तेथे आले तेव्हा इतर देवांनी उभे राहून त्यांचा सन्मान केला; परंतु शंकर उभे राहिले नाहीत. त्यावेळी क्रोध येऊन दक्षाने शंकरांची निंदा केली. श्रीधरस्वामींनी या निंदेच्या शब्दातून देखील स्तुतिरूप अर्थ काढला आहे. श्रीमद्भागवतावर सर्वात उत्तम टीका श्रीधरस्वामींची मानली गेली आहे. ते नरसिंहदेवांचे भक्त होते.

दशमस्कंधांत शिशुपालाने श्रीकृष्णांची निंदा केली आहे. तिचाही श्रीधरस्वामींनी स्तुतिपर अर्थ केला आहे. कारण निंदा ऐकल्याने देखील पाप लागते, निंदा नरकासमान आहे. व्यक्ति हजर नसताना तिच्या दोषांचे वर्णन करण्यास निंदा म्हणतात. भागवतासारख्या ग्रंथात शंकरांची निंदा शोभत नाही.

दक्षप्रजापती निंदा करीत म्हणाले, "शंकर स्मशानात राहणारे आहेत." परंतु हे तर स्तुतिरूपच आहे. सगळे जगच स्मशानासारखे आहे. देह सुद्धा स्मशान आहे. घरदेखील स्मशान आहे. याप्रमाणे स्मशानाचा अर्थ आहे, सगळे जगत्. शंकर तर सांसारिक प्रत्येक वस्तूमध्ये विराजत आहेत आणि सारे जगत् स्मशानरूप आहे. आणि शंकर जगांतील प्रत्येक पदार्थात व्याप्त आहेत, म्हणून ते व्यापक

ब्रह्मस्वरूप आहेत. जगांतील प्रत्येक वस्तूंत शिवतत्त्व आहे. ब्रह्मतत्त्व व्यापक आहे.

भगवान शंकर आशुतोष आहेत. शंकराच्या दरबारात प्रत्येकालाच प्रवेश मिळतो. ऋषि, देव, दानव आणि पिशाच्च देखील येतात. शंकरांचा दरबार सर्वांनाच खुला राहतो. शंकरांचा दरबार जर सगळ्यांना खुला नसता तर मग बिचारे भूत-पिशाच्च कोठे गेले असते!

रामाच्या दरबारात दरवाजावर हनुमंत गदा घेऊन उभे राहतात. ज्यांनी माझ्या रामचंद्रासारखे भावावर प्रेम ठेवले असेल, रामासारखे मर्यादेचे पालन केले असेल, परस्त्रीस मातेसमान मानले असेल अशालाच आत जाण्याचा अधिकार आहे. रामाच्या प्रत्येक मर्यादेचे पालन कराल तरच रामाच्या दरबारात प्रवेश मिळेल. या प्रकारचे आचरण नसेल तर हनुमान गदा मारून बाहेर काढून लावतात. रामचंद्र राजाधिराज आहेत. त्यांचे दर्शन रात्री बारानंतर होत नाही. शंकराचे दर्शन जेव्हा इच्छा होईल तेव्हा केव्हांही होऊ शकते. शंकर म्हणतात, "तुला जेव्हा केव्हा वेळ मिळेल तेव्हा ये. मी ध्यान धरून बसलो आहे." कृष्णाचे दरबाराविषयीचे वर्णन दशमस्कंधात येते. कृष्ण म्हणतात, "माझ्या दरबारात यायचे असेल तर साडी नेसावी लागेल, नाकात नथ घालावी लागेल." तो म्हणतो, "माझ्या दरबारांत यायचे असेल तर गोपी बना. गोपी होऊन याल तरच माझ्या दरबारात प्रवेश मिळेल."

ज्याची आकांक्षा थोडी असेल तो उदार होऊ शकतो.

एकदा कुबेर भंडारींनी शंकराला विचारले, "महाराज, मी तुमची काय सेवा करू?" शंकर म्हणतात, "जो दुसऱ्याकडून सेवा मागतो आणि घेतो तो वैष्णव नाही. दुसऱ्यांची जो सेवा करतो तोच वैष्णव होय." माझ्यासारखे "नारायण... नारायण..." कर. माता पार्वतीने कुबेराला म्हटले, "माझ्यासाठी सुवर्णाचा महाल बनवून दे." कुबेराने सुवर्णाचा महाल बांधून दिला. वास्तुपूजा केल्याशिवाय तर महालात प्रवेश करता येत नाही. वास्तुपूजेसाठी रावणाला बोलाविले गेले. रावणाने वास्तुपूजा करविली.

शंकर रावणाला म्हणाले, "जे मागायचे असेल ते मागून घे." रावण म्हणाला, "हा तुमचा महालच मला देऊन टाका."

पार्वती म्हणाली, 'मला ठाऊक होते की हे लोक कांहीही राहू देणार नाहीत.'

मागणाऱ्याला 'न देणे' हे मरणासारखे असते. शंकरांनी सुवर्णमहाल रावणाला दिला. रावणासारखा मूर्ख कोणी झाला नाही. रावण म्हणाला, 'महाराज, महाल तर सुंदर दिलात! आता ही पार्वतीही मला द्या.' शंकर म्हणाले, तुला आवश्यकता असल्यास घेऊन जा.

जगात असा दानशूर कोणी झालेला नाही. रावण पार्वतीमातेला खांद्यावर बसवून घेऊन जात आहे. पार्वतीने श्रीकृष्णाचे स्मरण केले, श्रीकृष्ण गवळी बनून वाटेत आले. त्यांनी रावणाला विचारले, 'तू कोणाला घेऊन जात आहेस?' रावण म्हणाला, 'भगवान शंकरांनी मला पार्वती देऊन टाकली आहे.'

श्रीकृष्ण म्हणाले, 'तू किती भोळा आहेस! शंकर काय तुला पार्वती देतील? खऱ्या पार्वतीला तर ते पाताळांत लपवून ठेवतात. ही तर तुला पार्वतीची दासी दिली आहे. दासी देऊन तुझी समजूत घातली आहे. खऱ्या पार्वतीच्या देहांतून तर कमळाचा सुगंध येत असतो. हिच्या शरीरातून काय असा सुगंध येतोय?

रावण द्विधा मनःस्थितीत पडला. पार्वतीला रावणाबरोबर जायची इच्छा नव्हती. तिने आपल्या शरीरांतून दुर्गंध काढला. रावणाने त्याच जागी पार्वतीला टाकून दिले; आणि रावण निघून गेला. नंतर प्रभूंनी त्याच जागी मातेश्वरीची स्थापना केली. तीच द्वैपायनी देवी आहे.

दक्ष म्हणाला, "शिव स्वैराचारी आहे. आणि गुणहीन आहे."

प्रकृतीचे कोणतेच गुण शंकरामध्ये नाहीत म्हणून ते निर्गुण ब्रह्म विधिनिषेधातीत परमात्मा आहेत. शास्त्राची प्रवृत्ति – विधिनिषेधाची प्रवृत्ति – अज्ञानी जीवासाठी आहे. शंकरासाठी नाही.

दक्षप्रजापति म्हणाला – 'आजपासून कोणत्याही यज्ञात दुसऱ्या देवांच्या बरोबर शंकरांना आहुति दिली जाणार नाही." श्रीधरस्वामींनी अर्थ लावला आहे. सगळ्या देवांबरोबर नाही. शंकर सर्वच देवांहून श्रेष्ठ आहेत म्हणजे महादेव आहेत. इतर देवांच्या आधी शंकरांना आहुति दिली जाईल आणि यज्ञानंतर जे शेष राहील ते देखील समाप्तीचे वेळी शंकरांना दिले जाईल.

शिवपुराणांत कथा येते: शंकर आणि पार्वतीचे लग्न होत होते. लग्नाच्या वेळी तीन पिढ्यांचे वर्णन करावे लागते. शंकरांना सांगितले गेले कीं आपल्या वडिलांचे नाव सांगा. शंकर विचारांत पडले, 'माझा पिता कोण?' महारुद्र शंकरांचा जन्म नाही! नारद म्हणतात – सांगा, "माझे पिता ब्रह्मदेव आहेत." मग विचारले गेले तुमचे आजोबा कोण आहेत? शंकर म्हणाले, विष्णु आजोबा आहेत. मग विचारले गेले, "तुमचे पणजोबा कोण आहेत?" हे ऐकून शंकर म्हणाले मीच सगळ्यांचा पणजोबा आहे.

शंकर महादेव आहेत: सूत वर्णन करतात; राजन्! शंकरांच्या मस्तकांत ज्ञानरूपी गंगा आहे, म्हणून निंदा ऐकून देखील सहन करून घेतली. शंकरांच्या मस्तकांत ज्ञानगंगा आहे.

श्रीकृष्णाच्या चरणांत ज्ञानगंगा आहे. म्हणून ते शिशुपालाने केलेली निंदा सहन करतात.

प्रतिकार करण्याची शक्ति असून देखील जो सहन करतो तोच महापुरुष होय. तो धन्य असतो. ज्याच्या डोक्यावर ज्ञानगंगा असेल तोच निंदा सहन करू शकतो. निंदा सहन करणे फार कठीण आहे. निंदा सहन कराल तर प्रगति करू शकाल.

जो कलह वाढवितो तो वैष्णव नाही. म्हणून शंकर सभेमध्ये एकही शब्द बोलले नाहीत.

सभेत नंदिकेश्वर हजर होते. त्यांच्याने हे सर्व सहन झाले नाही. त्यांनी दक्षाला तीन शाप दिले. ज्या तोंडाने तू निंदा केली आहेस ते तुझे शिर तुटून जाईल. तुझ्या डोक्याच्या बदल्यात बकऱ्याचे डोके लावले जाईल आणि तुला ब्रह्मविद्या कधीच प्राप्त होणार नाही.

शंकराची निंदा करणाऱ्याला कधीच मुक्ति मिळत नाही. शिवतत्त्वाला सोडणाऱ्या बुद्धीला संसारात भटकावे लागते. त्याला दुःख होते आणि केव्हांही शांति मिळत नाही. शिवनिंदा करणारा कामाचा नाश करू शकत नाही.

शंकर म्हणतात – "तू का शाप देत आहेस?" शंकरांनी विचार केला की मी जर बोललो नाही तर नंदिकेश्वर दुसऱ्या देवांनाही शाप देईल. तात्काळच ते कैलासांत आले. शंकरांनी मनांत कांही ठेवले नाही. सतीला सुद्धा काही म्हटले नाही. भूतकालाचाच जो विचार करीत राहतो त्याला भुतानेच घेरून ठेवले आहे असेच समजले पाहिजे.

यानंतर दक्षाने कनखल क्षेत्रांत यज्ञ आरंभ केला. त्याने असा दुराग्रह धरला की यज्ञांत विष्णूची पूजा करीन पण शंकराची पूजा करणार नाही. देवांनी त्याला सांगितले की तुझा हा यज्ञ सफल होणार नाही. तरी पण दुराग्रहाने त्याने यज्ञ केलाच. ज्या यज्ञांत शिवपूजन होत नाही त्या यज्ञांत विष्णूही येत नाही. ब्रह्म दधीचि देखील यज्ञांत आले नाहीत. कांही देव भांडण पाहण्यांत आनंद मिळेल असा विचार करून तिकडे जायला निघाले. विमानांत बसून देव जात होते. सतीने ही विमाने पाहिली. सतीला विचार आला कीं या देवकन्या किती भाग्यशाली आहेत! हे लोक कुठे चालले असतील? एक देवकन्या

म्हणाली– तुमच्या पित्याच्या येथे यज्ञ आहे. तिथे आम्ही जात आहोत. तुम्हाला काय हे माहित नाही? दक्षाने द्वेषबुद्धीने शंकराला आमंत्रण दिले नव्हते. सतीला ठाऊक नव्हते की आपल्या बापांत आणि शंकरांत वैर निर्माण झालेले आहे. तिचे मन पित्याच्या घरी जायला अधीर झाले. शंकर समाधीतून जागे झाले. शंकर म्हणाले, सती, आज फार आनंदांत आहेस?

सती म्हणाली– तुमचे श्वशुर महायज्ञ करीत आहेत.

शंकर म्हणाले– देवी, या संसारांत कोणाच्या येथे लग्न, तर कोणाच्या येथे मरण! संसार दुःखाने भरलेला आहे. सुखरूप तर एक परमात्मा आहे. तुझे आणि माझे पिता तर नारायणच आहेत.

सती म्हणाली– तुम्ही किती निष्ठुर आहांत! तुम्हाला आपल्या कोणत्याही नातेवाईकांना भेटण्याची इच्छाच होत नाही!

शंकर– देवी, मी सगळ्यांची मनाने भेट घेत असतो. कोणालाही शरीराने भेटत नाही. प्रत्यक्ष शरीराने कोणाला भेटायची इच्छा होत नाही.

सती– नाथ, तुम्ही तत्त्वनिष्ठ आहांत, ब्रह्मस्वरूप आहांत. परंतु नाथ, माझी तिथे जाण्याची फार इच्छा आहे. आपणही चलावे. आपला सन्मान होईल.

शंकर– मला सन्मानाची इच्छा नाही.

सती– तुम्ही सर्वज्ञ आहांत, पण व्यवहाराचे ज्ञान नाही. आपण जर कोणाच्या घरी गेलो नाही तर आपल्या येथेही कोणी येणार नाही.

शंकर– फार उत्तम! कोणी नाही आले तर बसल्या जागीं रामनाम जपत राहू.

सती– वाईट वाटून घेणार नसाल तर सांगते. कन्येला माहेरी जाण्याने किती सुख मिळते याची आपल्याला कल्पना नाही. तुम्ही जर मुलगी झालात आणि तुमचे लग्न झाले तरच तुम्हाला समजू शकेल की मुलीला माहेरी जाण्यात किती आनंद असतो ते. तुम्हाला यावेच लागेल.

शंकर– देवी, जगतात भटकत राहून शांति मिळत नाही. एका जागी बसून प्रभूला प्रसन्न कर. मनांत जोपर्यंत जड पदार्थ किंवा दुसरा जीव राहतो तोपर्यंत भगवंत तेथे येत नाहीत. फार भटकणाऱ्यांचे मन आणि बुद्धि देखील खूप भटकत असते.

सती अर्थात बुद्धि जेव्हा भगवान शंकरांना सोडून जाते तेव्हां खूप भटकते.

शंकर म्हणतात– तुझ्या पित्याने माझा अपमान केला आहे. तेथे जाण्यांत काही कल्याण नाही, भले होणार नाही.

सती– नाथ आपलं काही तरी चुकलं असेल. माझे पिता तसे अविचारी नाहीत की विनाकारण तुम्हाला अपशब्द बोलले असतील.

शिव– मी त्यांचा कांहीच अपमान केला नाही. शिवांनी यज्ञप्रसंगाचे वर्णन करून सांगितले.

सतीचरित्रांत पितृस्नेह आणि पतिनिष्ठा यांची ओढाताण आहे.

सती– तुम्ही माझ्या वडिलांना मान कां दिला नाही?

शिव– मी तुझ्या पित्याला मनाने मान दिला होता. मी कधी कोणाचा अपमान करीत नाही.

सती– ही तर वेदान्ताची भाषा दिसते. माझ्या पित्याच्या अंतरांत वसलेल्या वासुदेवांना आपण वंदन केले होते हे माझ्या पित्याला कसे कळू शकेल? आता आपण ही गोष्ट विसरून जा.

शिव– देवी, मी तर विसरून गेलो आहे, पण तुझे पिता अजूनपर्यंत विसरलेले नाहीत.

शिवांनी सतीला अनेक प्रकारे समजावले की जेथे मला (शिवांना) मान मिळत नाही तेथे जाण्याने

तुझा अपमान होईल. तू मानिनी आहेस. अपमान सहन करू शकणार नाहीस. तेथे जाऊ नकोस. अनर्थ ओढवेल.

सतीने ऐकले नाही. तिला वाटले यज्ञात न गेले तर पति आणि पिता यांचे वैर वाढीस लागेल. सगळ्यांना या वैराची गोष्ट माहीत असेल. तिने विचार केला की तेथे जाऊन मी पित्याला सांगेन की, 'मी तर आमंत्रणाविना आले आहे, परंतु माझे पति येणार नाहीत. म्हणून भावाला त्यांना बोलवायला पाठवा. सतीनें विचार केला कीं, आज पतीच्या आज्ञेविरुद्ध मी पित्याच्या घरी जाईन आणि पिता-पति यांच्यामध्ये जे वैर उत्पन्न झाले आहे ते मी शांत करीन. सती घरून निघाली. ज्या दिवशी भांडण झाले असेल त्यादिवशी घर सोडू नये. जो घर सोडून जातो तो बाहेर सुखी होऊ शकत नाही. शंकरांनी विचार केला की सती जात आहे, आता ती परत येणार नाही. जाऊ द्या. परंतु ती एकटीच जात आहे, हे ठीक नाही. शिवांनी आपल्या गणांना आज्ञा केली की तुम्हीही तिच्याबरोबर जा.

शुकदेव वर्णन करतातः राजन्, शिवगण आले. त्यांनी म्हटले, माते, तू चालत जावे हे बरे नाही. सती नंदीवर स्वार झाली. शंकरांनी वस्त्रादी जरूरीच्या वस्तू गाठोड्यात बांधून दिल्या. ही शंकर आणि सतीची शेवटची भेट होती. शंकरांना वाटले, सतीची एखादी वस्तू येथे राहिली तर माझ्या कृष्णभजनांत विक्षेप करील.

मनांत विकार उत्पन्न होईल असे कोणतेही चित्र घरांत ठेवू नये. ते चित्र मनात आले तर कृष्णभजनांत विघ्न करील. सती म्हणाली, या सगळ्या वस्तूंची काय जरूर आहे?

शिव म्हणाले– देवी, तुला गरज पडेल. सर्व बरोबर घेऊन जा.

सतीला फार लवकर जायचे होते, म्हणून व्यासांनी रस्त्यांचे वर्णन केले नाही. सती यज्ञमंडपांत आलेली आहे. ती शंकरांची अर्धांगिनी आहे. सगळे जग तिचा सन्मान करते. ऋषिमुनी सुद्धा सन्मान करतात. पण सतीला येवढ्याने समाधान झाले नाही.

आदिशक्ति (सतीने)– जगदंबेने दक्षाला नमस्कार केला. सतीला पाहून दक्षाला क्रोध आला. ही (गरबा) जगदंबा इकडे कशाकरता आली आहे, असे म्हणून त्याने तोंड फिरवून घेतले. दक्ष, दक्ष नसून अ-दक्ष आहे. श्रीधरस्वामींनी म्हटले आहे– **'क्रिया दक्षः अपि अदक्षः मूर्खः।'** दक्ष क्रियादक्ष तर नाही, क्रिया-अदक्ष होता अर्थात कर्तव्यांत तत्पर नव्हता.

सतीला विचार आलाः माझे वडील समोर देखील पाहात नाहीत. माझी आता इथे राहायची इच्छा नाही. मी घरी जाईन. शंकर उदार आहेत ते माझा स्वीकार करतील. सतीमाता मंडपांत भ्रमण करते. सगळ्या देवतांची स्थापना केली गेली आहे. फक्त शंकरांची स्थापना नव्हती. सतीने पाहिले की यज्ञांत सर्व देवांना यज्ञभाग दिला गेला आहे, परंतु शंकरांना दिला गेला नाही. त्यांच्यासाठी आसनसुद्धा मांडले गेले नाही. आज ईशान्य दिशा रिकामी होती. दक्ष प्रजापतीने सतीचा अपमान केला तो तिने सहन केला, पण आपल्या पतीचा अपमान तिला सहन झाला नाही. सतीला फार दुःख झाले. जगदंबा क्रोधित झाली. डोक्यावर बांधलेली फुलाची वेणी देखील सुटून गेली. हे पाहून देव मातेश्वरीला नमस्कार करू लागले आणि म्हणाले, माते, रागावू नको. सती म्हणाली, 'तुम्ही घाबरू नका, मी आता शरीरावर राग काढीन. या शरीराने मी पाप केले आहे. पतीच्या आज्ञेचा भंग मी केला आहे. या शरीराला आता मी जाळून टाकीन. सभेमध्ये जगदंबेने तेरा श्लोकांत भाषण दिले. अरे, तुझ्यासारखा विषयी शिवतत्त्व काय जाणू शकेल? जो शरीराला आत्मा समजतो तो शिवतत्त्व काय जाणील? मोठेमोठे देव शिवचरणांचा आश्रय घेतात. शिवकृपेशिवाय कृष्णभक्ति सफल होत नाही. प्रवृत्ति-निवृत्तीला पार

करून स्वरूपांत राहणारे शिव परब्रह्म परमात्मा आहेत. शिवनिंदा करणाऱ्या दक्षाची मी मुलगी आहे याचे मला दुःख होत आहे.

सती उत्तरेकडे तोंड करून बसली आहे. देह टाकण्यासाठी योगमार्गांत स्थित होऊन बसली आहे. शंकरांचे ध्यान करता करता तिने शरीरांत अग्नितत्त्वाचा भाव धारण केला आहे. आंतून क्रोधाग्नि बाहेर आला. शरीर जळू लागले. आदिशक्ति जगदंबेचा अपमान झाला. आता दक्षाचे कल्याण नाही.

नारद कैलासात शंकरांजवळ आलेले आहेत. भगवान शंकर सनकादि ऋषींना ब्रह्मविद्येचा उपदेश करीत आहेत. नारद कथेंत बसलेले आहेत. ते विचार करीत आहेत– शंकर कसे भोळे आहेत. सतीने शरीर जाळून टाकले, त्यांना दुःख झाले नाही. नारद रडत आहेत. ते शंकरांना म्हणत आहेत, तुम्ही विधुर झाले आहात. तुमचा अपमान झाला हे सतीला सहन झाले नाही. सतीने आपला देह जाळून टाकला आहे. आदिशक्तीचा नाश होत नसतो. सती अदृश्य रूपाने शंकरांत मिळून गेली आहे.

नारद म्हणतात: आपण या लोकांना दंड द्या. शंकर म्हणतात, मला कोणालाच शिक्षा करायची नाही. जो गंगेला डोक्यावर ठेवीत असतो त्याला क्रोध कसा येईल? शंकर परमात्मा आहेत. त्यांना क्रोध येऊ शकत नाही. काम त्रास देऊ शकत नाही.

फार सरळ माणसाला जगात लोक दुर्बळ समजतात. नारदांनी सर्व सांगितले– आपल्या गणांना पण मार पडला. तेव्हां ते कांहीसे क्रोधित झाले. त्यांनी जटेंतून वीरभद्राला प्रकट केले. शंकरांनी त्याला सांगितले की दक्ष प्रजापतीच्या यज्ञाचा तू यजमानासहित नाश कर. वीरभद्र तेथे गेला. त्याने खूप संहार केला. यज्ञभूमि स्मशानभूमि होऊन गेली. यज्ञाचा विध्वंस झाला. दक्षाला पकडून त्याचे डोके धडापासून वेगळे केले. देव घाबरले. ते ब्रह्मदेवाला शरण गेले. ब्रह्मदेवांनी सगळ्यांना दटावले की ज्या यज्ञांत शंकरांची पूजा होत नाही अशा यज्ञात तुम्ही कां गेलात? जा आणि शंकरांजवळ क्षमायाचना करा. देव म्हणाले, आमची जाण्याची हिम्मत नाही. आपण आमच्याबरोबर चला.

भगवान शंकरांच्या कृपेशिवाय सिद्धी मिळत नाही.

कैलासाच्या पायथ्याशी सिद्धमहात्म्यांचे आश्रम आहेत.

सगळे देव कैलासांत येतात. महादेव ब्रह्मदेवांना साष्टांग प्रणिपात करतात. सर्व देव सदाशिवांना नमस्कार करतात. ब्रह्मदेव हसत हसत म्हणतात, 'यज्ञाला उत्पन्न करणारे आपण आहांत आणि विध्वंस करणारेही आपणच. तेव्हा आता यज्ञ परिपूर्ण होईल असे करा. आपणही तेथे यावे. शंकर भोळे आहेत. ते यायला तयार झाले. यज्ञमंडपांत रक्ताच्या नद्या वाहात होत्या. ते वीरभद्राला म्हणाले, 'मी तर तुला शांतीने काम करायला सांगितले होते.' वीरभद्र क्षमायाचना करतो. दक्षाच्या धडाला बकऱ्याचे डोके लावले गेले. बकरा अत्यंत कामी असतो. शंकराची निंदा करणारा पुढल्या जन्मी बकरा बनतो.

'अज' चा दुसरा अर्थ आहे परब्रह्म. दक्षाच्या धडावर अजाचे मस्तक ठेवले. अर्थात दक्षाला परब्रह्मदृष्टि प्राप्त झाली. अज-मस्तकाचा अर्थ आहे परब्रह्म-दृष्टि.

दक्ष शुद्धीवर आला आणि शंकराची स्तुति करू लागला. दक्ष प्रजापतीने शिवपूजन केले. तो म्हणाला, 'मी, माझी कन्या सतीचे दर्शन करू इच्छितो.'

शिवांनी सतीला विचारले– तू बाहेर येऊ इच्छितेस का? जगदंबा 'नाही' म्हणाली. शिवपूजन केले गेले तर कृष्ण भगवान प्रकट झाले. कृष्णाचे मत आहे कीं शंकरांत आणि माझ्यांत जो भेद ठेवतो तो नरकगामी होत असतो. या सिद्धान्ताचे भागवतात अनेक वेळा वर्णन केले गेले आहे.

**५. सर्वदेव समभाव ठेवणें हितकारक कां ? :**

हरिहरांमध्ये दक्षाने जो भेद केला होता तो आता दूर झाला. एकनाथ महाराजांनी भावार्थ रामायणांत हरिहरांचा अभेद दाखविला आहे. सत्त्वगुणाचा रंग श्वेत असतो, तमोगुणाचा काळा. भगवान विष्णु सत्त्वगुणाचे स्वामी आहेत आणि शंकर तमोगुणाचे स्वामी आहेत. म्हणून त्यांचा रंग काळा असायला पाहिजे तरी पण ते गोरे आहेत. असें कां झाले? विष्णु काळे आणि शंकर गोरे! एकनाथ महाराज लिहितात की, शंकर संपूर्ण दिवसभर नारायणाचे ध्यान करतात. यामुळे शंकरांना श्वेत रंग मिळाला आणि नारायण सतत शंकराचे ध्यान करतात यामुळे त्यांना शंकराचा काळा रंग मिळाला. याप्रकारे ध्यानांत असा गुण आहे की जो ज्याचे ध्यान करतो, त्याला त्याचाच रंग चढतो. म्हणून दोघांमध्ये अभेद आहे. हरि-हर एक आहेत. शिवकृपेशिवाय सिद्धी मिळत नाही. ब्रह्मविद्यासुद्धा शिवकृपेशिवाय मिळत नाही. शिवतत्त्व एकच आहे हे जीवमात्राला दाखविण्याचा भगवंताचा उद्देश आहे. जीवमात्राला शिवाला भेटण्याची– त्यात मिळून जाण्याची इच्छा होत असते.

निवृत्तिधर्माचे आचार्य शंकर भगवान आणि प्रवृत्तिधर्माचे आचार्य श्रीकृष्ण आहेत. सर्व प्रकारच्या प्रवृत्तीत राहूनही प्रवृत्तीचा थोडा देखील रंग न लागेल असा आदर्श श्रीकृष्णाने जगाला दाखविला आहे.

दक्ष प्रजापतीच्या प्रसंगात हे पाहिले की अनन्यभक्तीचा अर्थ हा नाही की, एकाच देवाची भक्ति करा आणि दुसऱ्याची नाही. अनेकांत एकाच देवाला पहा. भक्तीचा अर्थ हाच आहे. प्रभु सर्वव्यापक आहे. जो सर्वांमध्ये प्रभूचें दर्शन घेईल तोच उत्तम वैष्णव होय.

आपल्या एका इष्ट देवांत परिपूर्ण भाव ठेवावा आणि दुसऱ्या देवांना आपल्या इष्ट देवाचे अंश मानून नमस्कार करावा. पत्नी पतीमध्यें अनन्यभाव ठेवीत असते आणि इतर नातेवाईकांवर सामान्य प्रेम करते. पुष्कळ वैष्णव म्हणतात की आम्ही शंकराची पूजा केली तर आम्हाला अन्याश्रयाचा दोष लागेल. हे चूक आहे.

पाचही देव एकच आहेत. त्यांच्यांत भेदबुद्धि ठेवू नका. शिव आणि पार्वतीच्या लग्नाच्या वेळी देखील श्रीगणेशाचे पूजन केले गेले होते. गणपति देखील ब्रह्मस्वरूप आहेत. ते तर नित्य आहेत, पार्वतीच्या घरी त्यांचा अवतार झाला होता. या सर्वांची खुशाल भक्ति करा, पण जर बाळकृष्णाची सेवा न कराल तर सर्वच पूजा निष्फळ होईल. बाळकृष्ण प्रेमाचे दान करत असतात. या प्रेमाशिवाय ज्ञान शुष्क आहे. प्रेमाशिवाय ज्ञानाला शोभा नाही. दक्ष प्रजापतीने यज्ञ केला, पण त्याने भेदबुद्धि ठेवल्याकारणाने शिवाची पूजा केली नाही. म्हणून त्याच्या यज्ञांत विघ्न आले.

हे शरीरपंचायतन आहे. पंचतत्त्वांचे बनलेले हे शरीर आहे. एकेका तत्त्वाचा एक एक देव आहे.

या पंचायतनाचे पांच प्रधान देव याप्रमाणे आहेत :

**पृथ्वीतत्त्व-गणेश :** गणेशाच्या उपासनेने विघ्नाचा नाश होतो. गणेश विघ्नहर्ता आहे. गणेशपूजनाने तुमच्या सत्कर्मांत विघ्न येणार नाही.

**जलतत्त्व-शिव :** शिवाची उपासना केल्याने ज्ञान मिळते.

**तेजतत्त्व-सूर्य :** सूर्याची उपासना आम्हाला निरोगी बनविते. **"आरोग्यं भास्करात् इच्छेत।"** पृथ्वीवर सूर्य प्रत्यक्ष साक्षात् देव आहे. एका नास्तिकाने मला देवाचे दर्शन करविण्याविषयीं म्हटले. मी सूर्याकडे संकेत करून सांगितले की हा सूर्यच साक्षात परमात्मा आहे. दररोज कमीत कमी बारा सूर्यनमस्कार करा.

**वायुतत्त्व-माता :** पार्वतीमातेची उपासना धन देते.

**आकाशतत्त्व-विष्णु :** विष्णूची उपासना प्रेम देते, आणि प्रेम वाढविते देखील.

सूर्याच्या पूजेने तुम्हाला चांगले आरोग्य मिळेल. शिवाच्या पूजेने तुम्हाला ज्ञानलाभ होईल. पार्वतीच्या पूजेने संपत्ति असली तरी आणखी मिळेल. बुद्धि, शरीर, संपत्ति असूनही श्रीकृष्ण सेवा न कराल तर कार्य पुरे व्हायचे नाही. श्रीकृण प्रेमदाता आहे.

द्वारकाधीशांच्या सेवास्मरणांत तन्मय झाल्यामुळे जर प्रजापति दक्षाने शंकराची पूजा केली नसती तरी काही हरकत नव्हती, परंतु त्याच्या हृदयांत वैरभाव होता. त्याने कुभाव ठेवून यज्ञ केला होता म्हणून तो यज्ञ पापरूप झाला.

जीवच दक्ष आहे आणि सद्‌गुरू शिव आहेत. शरीराला साधे ठेवा. शरीर एक मूठभर राख मात्र आहे. त्याचा अनावश्यक शृंगार आणि लाड सोडून द्या, हाच शंकराचा उपदेश आहे. यासाठीच तर ते आपल्या शरीरावर भस्म लावीत असतात. शरीराचा शृंगार सोडून द्या. मानवजीवन तपश्चर्येकरिता आहे. जो तप करीत नाही त्याचे पतन होतच असते.

मानवी जीवनाचे लक्ष्य भोग नसून भजन आहे, ईश्वरभजन आहे. समभाव आणि सद्भाव सिद्ध करण्यासाठी सत्संगाची आवश्यकता आहे. प्रत्येक जड चेतनाविषयी जेव्हा परमेश्वराचा भाव जागृत होतो, तेव्हाच समभाव सिद्ध होत असतो.

मानवयोनी परमात्म्याची आराधना आणि तप करण्यासाठी आहे. पशूदेखील भोगांचा उपभोग करतात. मनुष्य जर केवळ विषयभोगांतच दंग होईल तर मग त्याच्यात आणि पशूत वेगळेपण ते कोणते राहील? प्रभूने मनुष्याला बुद्धि दिली आहे, ज्ञान दिले आहे. पशूला यापैकी काहीच दिले नाही. उद्याची चिंता मनुष्यच करू शकतो, पशू नाही.

ना देव तप करू शकतात ना पशू! देव पुण्याचा उपभोग घेऊ शकतात. तपश्चर्येचा अधिकार केवळ मनुष्यालाच आहे. मनुष्य विवेकपूर्वक भोगाचा उपभोग घेऊ शकतो.

मनुष्यजीवन विविध प्रकारे तप करण्यासाठी आहे. तपाचे अनेक प्रकार आहेत.

कष्ट सहन करीत सत्कर्म करणे तप आहे. उपासना देखील तप आहे. पौर्णिमा अमावास्येचे दिवस पवित्र मानले गेले आहेत. त्या दिवशी उपवास केला पाहिजे. परोपकारांत शरीराला लीन करणे देखील तप आहे. भावशुद्धि मोठे तप आहे. सगळ्यांमध्ये ईश्वराचा भाव ठेवणे देखील तप आहे. सगळ्यांमध्ये ईश्वर भरलेला आहे असा अनुभव घेणे महातप आहे. अर्थात अंतःकरणाच्या पावित्र्याने हृदयांत सदासर्वदा शांति आणि प्रसन्नता राहील. प्रिय आणि सत्य बोलणे वाणीचे तप आहे. पावित्र्य, सरलता, ब्रह्मचर्य, शरीरसंबंधित तप आहे.

सगळ्यांसंबंधी समभाव आणि सद्भाव ठेवणाऱ्याच्या मनांत केव्हांही काम प्रवेश करू शकत नाही. विकार आणि वासनेला नष्ट करण्याचा हाच श्रेष्ठ उपाय आहे. जो सगळ्यांविषयीच सद्भाव ठेवील आणि सगळ्यांमध्येच ईश्वराचा अंश अनुभवील तो सफल होत असतो.

प्रजापति दक्षाने यज्ञात शुद्धभाव-समभाव ठेवला नाही म्हणून त्याला दुःख सहन करावे लागले. त्याचे यज्ञाने कल्याण होऊ शकले नाही. कारण त्याने शंकराविषयी कुभाव ठेवून यज्ञ केला होता. दक्षाने यज्ञ करताना देखील अंतःकरणांत शंकराची पूजा करणार नाही ही दुर्भावना बाळगली होती. यामुळेच यज्ञकार्यांत विघ्न उत्पन्न झाले. म्हणून कोणाहीविषयी दुजाभाव ठेवू नका. तरच धर्म सफल होईल. दक्षाचे धर्मकार्य सद्भावविरहित असल्याकारणाने अधर्म कार्य झाले. प्रजापति दक्षाच्या यज्ञाच्या

कथेचा उद्देश हरि-हरांचा अभेद दाखविणे हा आहे.

शिवचरित्राची ही कथा वक्ता आणि श्रोत्यांच्या पापांना भस्मीभूत करणारी आहे.

अधर्माच्या वंशजांपासून सावध रहा. चौथ्या स्कंधांतील आठव्या अध्यायाच्या पहिल्या पाच श्लोकांत अधर्माच्या वंशजांचा उल्लेख आहे. हे श्लोक महत्त्वाचे आहेत. पुण्य करता आले नाही तरी काही हरकत नाही, परंतु पाप तर केव्हांच करू नका.

अधर्माच्या पत्नीचे नाव मृषादेवी आहे; मिथ्या भाषण करण्याचा वाईट स्वभाव. त्यातूनच दंभाचा जन्म झाला. लोक वैष्णव तर म्हणवून घेऊ इच्छितात, पण खरे वैष्णव होण्याची कोणाची इच्छा नसते.

दंभाचा पुत्र लोभ आणि लोभाचा पुत्र क्रोध आहे.

क्रोधाची मुलगी दुरुक्ति अर्थात कर्कश वाणी आहे. महाभारताच्या युद्धाचे आणि रामायणांतील करुण प्रसंगाचे मूळ या कर्कश वाणींतच आहे.

पाय घसरून जेव्हा दुर्योधन खाली पडला तेव्हा भीम म्हणाला, **"अंधस्य पुत्रः अंधः।"**. या शद्बांमुळे दुर्योधनाला लाज आणि अपमानाची अनुभूति झाली. परिणामी महाभारताचे दारुण युद्ध छेडले गेले.

सीतेने वनांत असताना लक्ष्मणाची कर्कश वाणीने निर्भर्त्सना केली, तर त्याला इच्छा नसताही मारीच राक्षसाच्या मायावी शद्बाचा पाठलाग करावा लागला. लक्ष्मणाच्या अनुपस्थितींत रावणाने सीतेला उचलून नेले आणि रामायणाचा आरंभ झाला.

म्हणून कर्कश वाणीचा उच्चार केव्हांही करू नका. या एवढ्याच दुर्गुणापासून दूर राहाल तरी पुष्कळ काही होऊ शकेल. कर्कश वाणीने कलि उत्पन्न होत असतो. कलि भांडणाचेच रूप आहे.

भागवताचा उद्देश इन्द्रियांना हरि-रसांत बुडवून ठेवणे आहे.

नामदेव-शिंप्याचें, गोरा-कुंभाराचे आणि सेना-न्हाव्याचे काम करीत होते. त्यांनी आपापल्या धंद्यांतून ज्ञान प्राप्त केले आणि व्यवहारशुद्धीमुळे त्याची जीवन यात्रा सफल झाली.

### ६. अर्थ प्रकरणाचा प्रारंभः ध्रुवाख्यानः

आता अर्थ प्रकरणाचा आरंभ होत आहे. शांति संपत्तीने नाही, तर संयम, सदाचार आणि चांगल्या संस्कारांनी प्राप्त होत असते. संपत्तीने विकार–वासना वाढते. म्हणून धर्माचे प्रकरण पहिले येते आणि अर्थाचे नंतर.

आता ध्रुवाचे आख्यान येत आहे. उत्तानपादाची कथा जीवमात्राची कथा आहे.

मैत्रेयांनी मनुमहाराजांच्या तीन कन्यांच्या वंशाचे वर्णन केले. मनुमहाराजांचे दोन पुत्र होते– प्रियव्रत आणि उत्तानपाद. प्रियव्रताच्या वंशाचे वर्णन पांचव्या स्कंधांत येईल. या चौथ्या स्कंधांत उत्तानपादाच्या कथेचे वर्णन आहे.

उत्तानपादाच्या दोन बायका होत्या– सुरुचि आणि सुनीति. सुरुचीच्या मुलाचे नाव होते उत्तम आणि सुनीतीच्या मुलाचे नाव होते ध्रुव.

जीवमात्र उत्तानपाद आहे. आईच्या गर्भांत राहणारे सर्वच जीव उत्तानपाद आहेत. जन्माच्या वेळी पहिले डोके आणि मग पाय बाहेर येत असतात. ज्याचे पाय पहिले वर असून मागाहून खाली झाले असतील तोच उत्तानपाद आहे. जन्माच्या वेळेला सगळ्यांची अशीच दशा असते.

जीवमात्राच्या दोन बायका असतात — सुरुचि आणि सुनीति. मनुष्यमात्राला सुरुचीच प्रिय वाटते. इंद्रिये जे मागतील ते विषय उपभोगण्याची इच्छाच सुरुचि आहे. सुरुचीचा अर्थ आहे वासना. आजकाल तर सगळ्यांना रुचीच आवडत असते. मनाला, इंद्रियांना जे चांगले वाटते तेच मनुष्य करतो. तो ना शास्त्राला विचारीत ना धर्माला, ना संतांना! 'रुचि' चा अर्थ आहे मनपसंत इच्छा. मन जे मागेल त्याच्या भोगामध्ये लीन होण्यासाठी जो आतुर होतो तो रुचीचा दास आहे. ज्याला रुचि प्रिय असेल त्याला नीति कशी प्रिय वाटेल? नीति खुशाल विरोध करो, तरी इंद्रियें तर स्वभावतःच विषयांकडे धाव घेत असतात. जीभ जे जे काही मागेल ते सर्व तिला देऊ नका. काही लोक सुपारी खाल्ल्यावाचून राहू शकत नाहीत. सुपारी तशी तर ठीक आहे, परंतु प्रमाणाबाहेर खाण्याने तो मनुष्य संयमी राहू शकत नाही.

मनुष्यमात्राला सुनीति अर्थात नीतीवर जास्त प्रेम नाही, ती आवडती राणी नाही.

मनुष्याचे सुनीतीवर नाही, सुरुचीवरच प्रेम आहे. जीवमात्राविषयी हीच गोष्ट खरी आहे. त्याला सदाचारी, संयमी जीवन चांगले वाटत नाही. जीव वासनेच्या आधीन होऊन भोगासक्त आयुष्य जगू पाहतो. जीवमात्र नीतीच्या आधीन राहू इच्छित नाही. त्याला वाटते सुरुचीच्या आधीन होऊन उत्तम फळ प्राप्त होईल. सुरुचीचे फळ उत्तम आहे. याचमुळे सुरुचीच्या मुलाचे नांव उत्तम आहे. उद् = ईश्वर, तम = अंधकार. अंधकार अज्ञान आहे. ईश्वराच्या स्वरूपाचे अज्ञानच उत्तमाचे स्वरूप आहे. इन्द्रियांचे दास झाल्यावर ईश्वरस्वरूपाचे ज्ञान होऊ शकणार नाही. ईश्वराला ओळखू शकत नाही. ईश्वराचे ज्ञान भोग्याला होऊ शकत नाही, विरक्तालाच होऊ शकते.

गीतेला विचारा कीं कशा व्यक्तीला ईश्वराचे ज्ञान होऊ शकते? ज्याच्यांत सात्त्विक गुणाची वृद्धि होते त्यालाच ज्ञान प्राप्त होते. सात्त्विक गुणाची वृद्धि संयमपूर्ण जीवन जगण्यानेच होत असते. उत्तम विषय क्षणिक सुख देतात आणि ते उत्तम सुख क्षणिक विषयानंद आहे.

इन्द्रियें आणि विषयांच्या संयोगाने जे क्षणिक सुख मिळते ते सुख नसून सुखाचा केवळ आभास असतो. खरजेला खाजवल्याने सुख होत नाही, सुखाचा आभासच होत असतो. मनुष्याच्या प्रत्येक इन्द्रियाला विषयोपभोगाची इच्छा असते. इंद्रिये आणि विषय यांच्या संयोगाने क्षणिक सुख मिळते. जेवण स्वादिष्ट असेल तर आवश्यकतेपेक्षा जास्त खाल्ले जाईल आणि त्यामुळे अजीर्ण होईल. मग वरून अन्नपचनासाठी गोळ्या घ्याव्या लागतील. अशा वेळी रुचि आणखी खा म्हणेल, पण नीति नाही म्हणेल.

श्रीशंकराचार्य म्हणूनच आज्ञा देतात की, स्वादिष्ट अन्नाची याचना करू नका. दैववशात जे काही मिळेल त्यातच संतुष्ट होऊन रहा. स्वादिष्ट भोजन करणारा भजन करू शकणार नाही. नीतीचे फळ आरंभी कष्टदायी असून देखील अंती सुखदायी असते. उलटपक्षी विषयानन्दाचा आरंभी परिणाम सुखकारक असून परिणामी दुःख होत असते.

ज्याचे जीवन शुद्ध आहे, पवित्र आहे त्यालाच भजनानंद मिळतो; आणि तोंच आनंद टिकाऊ असतो.

नीतीच्या आधीन राहून जो पवित्र जीवन जगतो त्यालाच ईश्वराचे ज्ञान मिळते.

सुनीतीने ध्रुव मिळतो. सुनीतीचे फळ ध्रुव आहे, सुनीतीचा मुलगा ध्रुव आहे. ध्रुवाचा अर्थ आहे अविनाशी. अनंत सुखाचा, ब्रह्मानंदाचा कधी नाश होत नाही. जो नीतीच्या आधीन राहील त्याला ध्रुवासारखा ब्रह्मानंद मिळेल.

मनुष्य जर सुनीतीच्या आधीन असेल तर तो सदाचारी होईल. पण जर तो केवळ रुचीच्या आधीन राहील तर दुराचारी होईल.

तुमच्यासमोर हे दोन आनंद आहेत– विषयानंद आणि परमानंद. तुम्ही कोणता आनंद पसंत कराल? परमानंद पसंत करण्यायोग्य आहे. पहिला आनंद क्षणिक सुख देतो आणि त्याचा परिणाम दुःखद होतो. दुसरा आनंद सुरवातीला तर कष्टकर आहे, पण अंती सुखदायी आहे.

दोन मित्र यात्रा करायला निघाले. एकाची सवयच अशी होती की त्याला पलंग-उशीशिवाय झोपच येत नसे. त्याने बाडबिस्तरा बांधून तर घेतला पण त्याला उचलण्याकरिता कोणी मजूर मिळेना. म्हणून ते सर्व सामान त्याला स्वतःलाच उचलावे लागे. रस्त्यांत त्यांना एक सज्जन भेटले. या महाशयांची दशा पाहून ते म्हणाले की, हे वजन किती कष्टकारक आहे? त्याशिवायच यात्रा का करीत नाही? त्याने उत्तर दिले की जरी हे वजन मलाच उचलावे लागले तरी पण रात्री झोपेच्या वेळी फारच मजा येते. रात्रीच्या आनंदासाठी सर्व दिवसभर तो भार उचलून फिरत होता. मग रात्री कसा काय आनंद येत असेल!

ही गोष्ट आणखी कोणाची नसून आपली स्वतःचीच आहे. जीवात्मा यात्रा करायला निघाला आहे. क्षणिक सुखासाठी मनुष्य सर्व दिवसभर गाढवासारखी मेहनत करीत फिरतो. सर्व दिवसभर दुःखाचा पर्वत उचलून चालत राहतो. क्षणिक सुखासाठी किती चिंता आणि किती कष्ट करीत असतो? विषयसुख नुसते क्षणिकच नाही तर तुच्छही आहे.

ध्रुव अविनाशी ब्रह्मानंदाचे– भजनानंदाचे स्वरूप आहे. जीव जेव्हा ब्रह्मानंदाकडे जातो तेव्हा सुरुचि विघ्न उपस्थित करीत असते. जीव आणि ब्रह्माचे मिलन सुरुचि होऊ देत नाही. जो मनुष्य सुरुचीच्या आधीन आहे तो कामाधीनही आहे असे समजा.

उत्तानपाद राजाला दोन राण्या आणि दोन मुलगे होते. राजाची सुनीती नाही, सुरुचीच आवडती होती. आम्हा सर्वांची तीच गत आहे. आमचे नीतीवर प्रेम नाही व इंद्रिये आणि वासनांना भडकावणारी सुरुचीच आम्हाला प्रिय आहे.

एकदा उत्तानपाद सिंहासनावर बसलेले होते. सुरुचि देखील तेथेच बसलेली होती. उत्तम राजाच्या मांडीवर खेळत होता. ध्रुवाने हे पाहिले, तर त्याला वाटले की मीसुद्धा वडिलांजवळ गेलो तर ते मलाही उचलून मांडीवर घेतील. त्याने धावतच जाऊन पित्याला आपल्याला मांडीवर बसवून घेण्यास सांगितले.

बालक बाळकृष्णाचेंच स्वरूप आहे. त्याचा कधीही अपमान करू नका. मोठमोठे महात्मा देखील लहान मुलांशी खेळत असतात. रामदासस्वामी जेव्हां लहान मुलांशी खेळत होते तेव्हां शिष्यांनी विचारले की, हे आपण काय करीत आहात? तर स्वामी म्हणाले–

**" वये पोर ते थोर होऊनि गेले,**
**वये थोर ते चोर होऊनि मेले। "**

या मुलांबरोबर मला आनंद मिळतो. मुले आपल्या मनांत असते तेच बोलत असतात, आणि जसे बोलतात तसे करीतही असतात. मन, वाणी आणि कृति एकसारखी झाल्यावरच तुम्ही भगवंताची भक्ति चांगल्याप्रकारे करू शकाल. तशा प्रकारची भक्तीच तुम्हाला आनंदित करील. लहान मूल निर्दोष असते. त्याला कपट शिकवू नका. लहानपणी त्याच्यावर चांगले संस्कार करा. त्याचे अनुचित लाड करू नका.

उत्तानपाद मोठ्या आनंदाने ध्रुवाला आपल्या मांडीवर बसविण्यासाठी वाकला परंतु सुरुचीला हे आवडले नाही. ध्रुवाला राजानें जवळ करू नये अशीच तिची इच्छा होती.

जीवाच्या जवळ जेव्हां भजनानंद येतो तेव्हा सुरुचि बंधन उपस्थित करते. पूजा करताना मन जर स्वयंपाकघराकडे गेले किंवा विषयांकडे वाहून गेले तर समजा की सुरुचि आली आहे.

ध्रुवाला राजाने मांडीवर घ्यावे हे सुरुचीला पसंत नव्हते. तिने विचार केला की राजा (जीवात्मा) ला जर ध्रुव (भजनानन्द) मिळाला तर तो वासनाधीन होणार नाही आणि माझे कांहीच काम होणार नाही. सुरुचीने ध्रुवाला मांडीवर घेताना राजाला अडविले. राजा सुरुचीच्या आधीन होता. तो कामांध होता. त्याला वाटले कीं मी जर ध्रुवाला मांडीवर घेतले तर सुरुचि रागावेल. काही का होईना, माझी राणी – सुरुचि नाराज न झाली पाहिजे. वाजवीपेक्षा जास्त बायकोच्या आधीन होऊन राहणे पाप आहे. शास्त्र तर इथपर्यंत म्हणते की अशा स्त्रीआधीन पुरुषाकडे पाहणेही पाप आहे. तो होता राजा, पण राणीचा दासच होता ना! बहुधा सगळ्यांची अशीच अवस्था असते. साहेब बाहेर तर अखडून फिरत राहतात आणि घरांत पत्नीसमोर ताटाखालचे मांजर बनून जातात.

राजाने ध्रुवाची अवहेलना करून तोंड फिरवून घेतले. ध्रुवाला तर भारी आशा होती. त्याने हात पसरून म्हटलें, मला उचलून मांडीवर घ्या. सुरुचीने ध्रुवाला सांगितले, 'निघून जा इथून, राजाच्या मांडीवर बसण्याची तुझी पात्रता नाही. तू राजाची नावडती राणी सुनीतीचा मुलगा आहेस, म्हणून तू राजाच्या मांडीवर बसू शकत नाहीस.'

ध्रुवाने विचारले– आई, मी काय उत्तानपाद राजाचा मुलगा नाही?

शुकदेव वर्णन करीत आहेत.

सुरुचीने त्या वेळी टोमणा मारला की तुझी आई राणी नाही, राणी मी आहे. तुझी आई दासी आहे. राजाच्या मांडीवर बसायचे असेल तर तुला माझ्या पोटी जन्माला यायला हवे. तू वनांत जाऊन तप कर आणि ईश्वराची आराधना करून माझ्या पोटी जन्म व्हावा अशी मागणी कर.

भगवंत जर प्रसन्नच झाले तर तुझ्याच घरीं जन्म मिळावा असें कां मागावे? पण सुरुचि मूर्खच होती, म्हणून असे म्हणाली.

ध्रुवाला आशा वाटत होती कीं एक क्षणभर तरी पिताजी मला मांडीवर घेतील. परंतु सुरुचीने केलेल्या कठोर अपमानामुळे तो रडत रडत आपल्या आईकडे-सुनीतीकडे आला. सुनीतीने विचारले, 'बाळ, तू कां रडत आहेस? काय झालें तुला?'

बाळावर चांगले संस्कार असल्यामुळे तो कांही बोलला नाही. पुनःपुन्हा रडतो आहे. सुनीतीला वाटले माझा शहाणा बाळ माझी परिस्थिती चांगल्या रीतीनें जाणत आहे. ज्याची आई सुनीति असते तो सुशीलच असतो. वंशामध्यें जेव्हां अनेक लोकांचे पुण्य एकत्रित होते तेव्हाच सुपुत्र निपजतो.

ध्रुवाने विचार केला कीं, मी सगळी हकीगत सांगेन तर परंपरेने मातापित्यांची निंदा केल्याचें पाप लागेल. एवढ्यांत एका दासीने येऊन झालेली सगळी हकीगत सांगितली.

सगळे ऐकून घेऊन सुनीति मनांत म्हणाली, मी सुरुचीचें कांहीच वाईट केलें नाही. माझ्या तोंडून जर सुरुचीविषयीं कांही कटु शब्द निघून गेला तर ध्रुवाच्या मनांत नेहमीकरता वैरभावाचे संस्कार रुजतील आणि भविष्यांत अनर्थ ओढवेल. या प्रसंगामुळे सुनीतीला अतोनात दुःख झाले; परंतु ती आपल्या मुलावर चांगले संस्कार करू इच्छित होती. तिला वाटत होते, आपल्या मुलाला भलेही राज्य आणि संपत्ति न मिळो, पण संस्कार तर चांगलेच झाले पाहिजेत.

जर आई सुनीति असेल तर आपल्या मुलाला हजार शिक्षकांपेक्षा देखील अधिक चांगले शिक्षण देऊ शकेल.

सुनीतीने दुःखाचा आवेग दाबून धैर्याने म्हटले, तुझ्या सावत्र आईने तसे वाईट तर कांहीच म्हटलें नाही. तिने जो तुला उपदेश दिला आहे तो चांगलाच आहे; आणि मीही तुला तोच उपदेश करते. बाळ, भिक्षाच मागायची असेल तर मग ती भगवंताकडूनच कां मागू नये? मनुष्याकडून पुष्कळसे मागूनही थोडेसेच मिळेल आणि अनेक वेळा अपमान आणि उपेक्षाच होईल. म्हणून देवाजवळच मागणे मागावें. देव जेव्हां देतो तेव्हां इतके देतो कीं जीव ते सर्व कांही घेऊ शकत नाही. बाळ, देव तुझ्यावर कृपा करील. प्रभू तुला प्रेमाने बोलावतील, मांडीवरही बसवतील. तुझेच नव्हे, तर जीवमात्राचे पिता परमेश्वर आहेत.

मी तुला नारायणाकडे सोपवून दिले आहे. जो बाप तुझें तोंड सुद्धा पाहू इच्छित नाही त्याच्या घरांत पडून राहणें निरर्थकच आहे. या घरांत तू राहशील तर तुझी सावत्र आई तुला सारखाच त्रास देत राहील. पण रडू नकोस. नाहीतर मला पण दुःख होईल. तुझ्या सावत्र आईने तुला जे वनांत जायला सांगितले आहे ते योग्यच आहे. त्यांतच तुझे कल्याण आहे.

तू उत्तमाप्रमाणे राजसिंहासनावर बसण्याची इच्छा ठेवीत असलास तर श्रीभगवंतांच्या चरणकमलांची आराधना कर.

स्वधर्मपालनाने पवित्र झालेल्या तुझ्या चित्तांत भगवान पुरुषोत्तमाची स्थापना कर आणि अन्य सर्व चिंतन सोडून केवळ प्रभूचेंच भजन कर.

आता या घरांत राहू नकोस. वनांत जाऊन भगवान नारायणाचें भजन कर.

ध्रुव आईला म्हणाला, सुरुचि मातेनें आपणा दोघांचाही अपमान केलेला आहे. या घरांत ना माझा मान ना तुझा! मग आपण दोघेही वनांत जाऊन प्रभूचें भजन कां करूं नये?

यावर सुनीति म्हणाली: बाळ, मी तर स्त्री आहे. माझ्या वडिलांनी तुझ्या वडिलांना माझें दान केलेले आहे. मला त्यांच्या आज्ञेंत राहिले पाहिजे. वाटल्यास पतीने माझा अपमान केला तरी मी पतीचा त्याग करूं शकणार नाही. तू स्वतंत्र आहेस, मी परतंत्र. मला माझ्या सवतीची-माझ्या पतीच्या पत्नीची सुद्धा सेवा करायची आहे. मी तुला एकटे तर पाठवीत नाही. तुझ्याबरोबर माझे आशीर्वादसुध्दा आहेतच. परमात्मा तुला आपल्या मांडीवर बसवतील. जेव्हां तू माझ्या गर्भांत होतास तेव्हां ज्यांनी तुझें रक्षण केले, ते तुझे वनांत देखील रक्षण करतील. म्हणून तू वनांत जा आणि तेथे परमात्म्याची आराधना कर. माझे नारायण तुला आपल्या बाहूंमध्ये सामावून घेतील– सांभाळून घेतील.

परंतु ध्रुवाला अजूनही भीती वाटत आहे.

सुनीति पुत्राला सांगते– तू एकटा नाहीस. माझे नारायण देखील तुझ्याबरोबर आहेत.

भगवंत आपल्याबरोबर (जवळच) असतो हा अनुभव जीवाला नसतो. परंतु जीवमात्राचे खरे मित्र तर नारायणच आहेत. देव हे पाहात नाही कीं अमुक व्यक्ति गरीब आहे कीं धनिक, शिक्षित आहे कीं अशिक्षित, छोटा आहे कीं मोठा. भगवंत तर हेच पाहतात कीं याच्या हृदयांत मजविषयी प्रेम आहे कीं नाही. प्रभूला प्रेमाने हाक माराल तर तो धावतच येईल.

आपल्या दुःखाची कहाणी तुम्ही प्रभूपाशी एकांतांत सांगा. प्रभूला आळवा. त्यांना सांगा कीं, माझा पाप करण्याचा स्वभाव जात नाही, कृपा करा. तो तुमची प्रार्थना अवश्य ऐकेल. ध्रुवाने विचारले, आई, माझ्यासारख्या अबोध बालकाला देखील भगवंत भेटतील का?

ध्रुवाला समजावीत सुनीति म्हणाली— हो बेटा, भगवंत तुला अवश्य भेटतील. मन लावून देवाचें भजन कर. भगवंत भावाचे भुकेले आहेत. ईश्वराला जो प्रेमानें हाक मारतो त्याच्यासमोर ते अवश्य प्रकट होतात.

आतुरतेशिवाय देव भेटत नाही. आर्त होऊन आरती करा.

उपनिषदांत ईश्वरानें म्हटलें आहे— हा जीव माझा मुलगा आहे, **"अमृतस्य पुत्राः।"** मी तर जीवाला मांडीवर बसवायला तयार आहे, पण तोच माझ्यापाशी येत नाही.

श्रीनाथजींनी एक हात वर उचलून धरला होता, तो पाहून एका वैष्णवाने त्यांना विचारले— तुम्ही एकच हात अशा तऱ्हेने वर कां उचलून धरला आहे?

श्रीनाथजी म्हणाले, माझी सगळी बाळे मला विसरून गेली आहेत. मी एक हात उंच करून रोज त्यांना बोलवीत असतो, पण ती माझ्याजवळ येतच नाहीत.

सुनीतीला वाटले कीं बाळ मला तर नमस्कार करीत आहे, पण जर सावत्र आईलाही त्याने सद्भावाने नमस्कार केला तर त्याचें कल्याण होईल.

कोणाविषयींही द्वेष ठेवून ईश्वराची आराधना केली जाऊ शकत नाही आणि अशी आराधना सफलही होत नाही.

सुरुचीविषयीं मनांत अरुचि आणि कुभाव ठेवून जर हा गेला तर तो नारायणाचें ध्यान करू शकणार नाही. तो पुनःपुन्हा सुरुचीविषयीं विचार करीत राहील.

सुनीतीने ध्रुवाला समजावले— तू माझा शहाणा मुलगा आहेस. आपल्या पूर्वजन्मामुळेच तुला अपमान सहन करावा लागला आहे. मागल्या एखाद्या जन्मी तू सुरुचि मातेचा अपमान केला असशील म्हणून तिने या जन्मी बदला घेतला.

लाभ-हानि, सुख-दुःख, मान-अपमान इत्यादी सर्व पूर्वजन्माच्या कर्मांचेच फळ आहे. ज्ञानी ते हसत हसत सहन करीत असतात, आणि अज्ञानी रडत रडत. जसे बी पेरले असेल तसे फळ मिळेल.

बेटा, तू आपल्या मनांत कांहीही ठेवू नकोस. तुझी सावत्रमाता तुझ्या वडिलांची आवडती आहे. तू काय तिला नमस्कार करणार नाहीस? तू ज्याप्रमाणे मला नमस्कार केलास त्याचप्रमाणे आपल्या सावत्र आईसही नमस्कार कर. कारण ती तुझ्या पित्याला प्रिय आहे. तू मला नमस्कार केला नाहीस तरीही मी तुला आशीर्वाद देईनच. परंतु तुझी सावत्र आई मात्र तू तिला नमस्कार केल्यावरच आशीर्वाद देईल. तिला नमस्कार करून गेलास तर देव लवकर प्रसन्न होतील. सगळ्यांचेच आशीर्वाद घेऊन वनांत जाशील तर परमेश्वर लवकर प्रसन्न होईल.

ज्या सुरुचीने ध्रुवबाळाचा अपमान केला होता त्याच सुरुचीला नमस्कार करण्यासाठी सुनीति मुलाला पाठवीत आहे. धन्य आहे सुनीति! अशी सुनीति ज्या कुणाच्या घरांत असेल तेथे कलि येऊ शकत नाही.

पांच वर्षाचा बाळ ध्रुव सावत्र आई सुरुचीला नमस्कार करायला गेला. ती तर आसनावर आरूढ होऊन बसली होती. ध्रुवाने तिला साष्टांग नमस्कार घातला. सुरुचीने विचारले, मला नमस्कार कशाला करीत आहेस?

ध्रुव म्हणाला, आई, मी वनांत जात आहे म्हणून तुझ्याकडून आशीर्वाद घ्यायला आलो आहे.

एक क्षणभर सुरुचीचें हृदय विरघळलें— कसा शहाणा आहे हा! अपमानित झाला असताना देखील मला नमस्कार करीत आहे. परंतु ती स्वभावाने दुष्ट होती. स्वभाव लवकर सुधारत नाही.

तिला वाटले जर ध्रुव येथे राहील तर उत्तमाच्या राज्यांतील वाटा मागेल. म्हणून तिने ध्रुवाला म्हटले, 'ठीक आहे, वनात जातच असलास तर जा, माझा तुला आशीर्वाद आहे.'

ध्रुवाने नमस्कार केल्यावर देखील सुरुचीच्या मनांत कांही विशेष भाव जागृत झाला नाही. स्वभाव सुधारणे फार कठीण कार्य आहे.

सत्कर्माचे रोपटे जोपर्यंत पाहिजे तसे वाढत नाही तोपर्यंत स्वभाव सुधरू शकत नाही.

शुकदेव वर्णन करतात.

पांच वर्षाचा बाळ आईचे आशीर्वाद घेऊन वनांत गेला.

भागवतांतली आई मुलाला तपश्चर्या करण्यासाठी वनांत पाठवीत आहे, जसे की सुनीतीने ध्रुवाला पाठविले. आजकालच्या आया मुलांना सिनेमा पाहायला पाठवितात – पैसे देऊन! की जा, तुझें कल्याण होईल! अरे, सिनेमा पाहून का कल्याण व्हायचे आहे? अशाने तर डोळे, शरीर आणि सरतेशेवटी जीवनच बिघडून जाईल. पैसे खर्च करून अंधारांत बसणें हें अज्ञान नाही तर आणखी काय आहे? ही हसण्याची किंवा थट्टेची गोष्ट नाही; रडायची गोष्ट आहे. सिनेमा पाहायला आपल्या मुलांना पाठविणारी आई ही आई नसून शत्रू आहे.

धन्य आहे सुनीतीसारखी आई कीं जी आपल्या मुलाला चांगले संस्कार देत असते!

मुलगा आईच्या दोषामुळे चारित्र्यहीन, बापाच्या दोषामुळे मूर्ख, वंशाच्या दोषामुळे भीरू आणि स्वतःच्या दोषामुळे दरिद्री होत असतो.

आपल्या दोन्ही मातांकडून आशीर्वाद घेऊन ध्रुव वनांत चालला आहे. पहा, केवळ पांच वर्षांचा बाळ वनांत चालला आहे.

ध्रुवाला वाटले, जंगलांत हिंस्र पशू असतील. ते मला खाऊन तर टाकणार नाहीत ना? तर दुसऱ्या क्षणीं त्याला वाटले, नाही! नाही! मी एकटा नाही! माझी आई तर म्हणाली होती कीं मी जिथे जिथे जाईन तिथे तिथे नारायण देखील माझ्याबरोबर असतील.

सगळ्यांनाच नमस्कार करून, सगळ्यांचे आशीर्वाद घेऊन जो वनांत जातो त्याला वाटेत संत भेटतात. घरांतून भांडण करून जो जातो त्याला संत भेटत नाहीत. भांडण करून गृहत्याग करणाऱ्याला ना राम भेटत ना माया.

वाटेत ध्रुवाला विचार येतो, घरांत तर आई बाळ म्हणून हाका मारीत असे, पण वनांत मला बाळ, बेटा म्हणून कोण हाक मारील? येथे मला मांडीवर कोण बसवील? कोण माझ्यावर प्रेम करील?

तो पुढे पुढे जातच होता. इतक्यात वाटेत त्याला नारद येऊन भेटले. ध्रुवाला वाटले हे कोणी संत दिसतात. चांगल्या संस्कारामुळे ध्रुवाने त्यांना साष्टांग नमस्कार घातला.

नमस्कार साष्टांगच केला पाहिजे. प्रकृति अष्टधा आहे. अष्टधा प्रकृतिस्वरूप परमात्म्यामधे मिळून जाण्याची इच्छा व्यक्त करण्यासाठी साष्टांग नमस्कार करायचा असतो. नमस्कार केल्याने आत्मनिवेदन होत असते.

अधिकारी शिष्याला मार्गांतच गुरू भेटतात. सद्गुरुत्व आणि ईश्वरत्व एकच आहे. परमात्मा आणि सद्गुरु दोन्हीही व्यापक आहेत. सर्वव्यापीला शोधायची नाही तर ओळखण्याची आवश्यकता आहे.

बालकाच्या विनम्र भावामुळे नारद प्रसन्न झाले. त्यांचें संतहृदय द्रवले. त्या बाळाला त्यांनी आपल्या कडेवर उचलून घेतले. डोक्यावर हात फिरवू लागले. महापुरुषाचा हात जेव्हां डोक्यावर फिरतो तेव्हां

मनांतले सर्व विकार शांत होऊन जातात. ध्रुवाला वाटले कीं, आपल्या आईच्या आशीर्वादामुळे इथे मार्गांतच मला एक आणखी आई मिळाली.

जन्मदात्री आई मुलाला स्तनपान करून पुष्ट करीत असते, तर गुरुरूपी माता नेहमीकरताच स्तनपान सोडवीत असते. अर्थात जन्म-मृत्यूच्या चक्रांतून मुक्त करीत असते, मोक्ष देते. म्हणजे पुनः केव्हांही जन्म घेऊन स्तनपान करण्याची आवश्यकताच पडू नये. स्तनपान करविणारी आई श्रेष्ठ आहे कीं स्तनपान सोडविणारी? स्तनपान सोडविणारी आई-गुरूच श्रेष्ठ आहे. गुरू तर म्हणतात, बेटा, तुला मी असा उपदेश करीन कीं पुनः केव्हांही स्तनपान करावे लागू नये.

नारदांनी विचारले: बाळा, तू कुठे जात आहेस?

ध्रुव म्हणाला: भगवंताचें दर्शनासाठी मी वनांत जात आहे. माझ्या आईने सांगितले आहे कीं माझे खरे पिता भगवान नारायणच आहेत. मी त्यांच्याच मांडीवर बसायला जात आहे.

ध्रुवाचे म्हणणे ऐकल्यावर नारदांना त्याची परीक्षा घेण्याची इच्छा झाली. सद्गुरू परीक्षा घेतल्यानंतरच शिष्याला उपदेश करीत असतात. नारद त्याला म्हणाले – अरे, आत्ताशी तर तू लहानसा बच्चा आहेस! हे तुझे खेळण्या-बागडण्याचे दिवस आहेत; देवाचा जप करीत बसण्याचे नाहीत. मला असे वाटते कीं ईश्वराला प्रसन्न करून घेणें हें सामान्य माणसाला महाकठीण कार्य आहे. तू ज्यांच्या कृपेची इच्छा करीत आहेस ते तर दुराराध्य आहेत. मोठमोठे ऋषि कित्येक जन्म ईश्वराचें आराधन करीत आहेत तरी पण त्यांना ईश्वराची भेट होत नाही. ते भगवंताकडे जाण्याच्या मार्गाचा शोध करीत असतात पण जाणू शकत नाहीत.

तू मोठा होऊन प्रथम प्रत्येक प्रकारच्या सुखाचा उपभोग घे आणि वृद्धावस्थेंत निवृत्त होऊन वनांत निघून जा. तेव्हां मग शांतीने भजन कर, रामनाम जप आणि भगवंताचें दर्शन घे.

तुझी इच्छा तर आहे कीं देवाने तुला मांडीवर बसवून घ्यावे. परंतु हजारो वर्षें तपश्चर्या करूनही मोठमोठ्या ऋषिमुनींनासुद्धा ज्यांची भेट होऊ शकत नाही ते तुझ्यासारख्या मुलाला कसे भेटतील? तेव्हां तू आपल्या घरी परत जावेस हेच योग्य आहे.

ध्रुव म्हणाला: नाही महाराज, ज्या घरांत माझा अपमान होतो तेथे मी राहू शकत नाही. माझ्या वडिलांच्या सिंहासनावर न बसण्याचा मी निश्चय केला आहे, याच जन्मांत प्रभूचें दर्शन व्हावें असा माझा निश्चय आहे. गुरुमहाराज, आपण मला मार्गदर्शन करावे.

ध्रुवाचा अटळ निश्चय पाहून नारद म्हणाले: जी व्यक्ति आपले कल्याण इच्छिते आणि धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष प्राप्त करू पाहते तिच्यासाठी एकमेव साधन आहे हरिचरणांची सेवा.

तू मधुवनांत जा. वृन्दावनांत हे मधुवन आहे.

यमुना कृपाळू आहे. यमुना महाराणी कृपादेवीचाच अवतार आहे.

भागवतांत अशा कांही स्थानांचा निर्देश केला आहे कीं जिथे भगवंत अखंड रूपाने विराजत असतात. मधुवनांत, श्रीरंगमांत इत्यादी. श्रीरंगममधे "अनंतशयनम् पद्मनाभम्" आहे. द्वारकेंतही भगवंत वास करतात. त्यांनी द्वारकेचा त्याग केला नाही. बोडाण्याची भक्ति अनन्य होती, म्हणून भगवंतांचें एक स्वरूप डाकोरला आले. गंडक नदीच्या काठी पुलक ऋषीच्या आश्रमांत सुद्धा त्यांचा अखंड वास आहे असे भागवताच्या पांचव्या स्कंधांत सांगितले आहे.

वृंदावनांत भगवंताचा अखंड वास आहे. यमुना तुला ईश्वरसाक्षात्कार घडवून आणील. यमुना तुझ्यासाठी शिफारस करील. अपात्र असलास तरी माता (यमुना) समजेल कीं तू तिचा झालेला

आहेस. म्हणून ती कृपा करील.

नारदांनी ध्रुवाला आज्ञा केली कीं, वत्सा, यमुनानदीच्या तीरावर असलेल्या पवित्र मधुवनांत तू जा. तेथे श्रीहरीचा नित्य निवास आहे. तुझें कल्याण होवो!

वृंदावन प्रेमभूमि आहे. तिथे राहून भजन केल्याने मन लवकर शुद्ध होते. वृंदावन दिव्यभूमि आहे. तेथे जीव आणि ईश्वराचें मिलन लवकर होते.

ध्रुवाने विचारले— वृंदावनात जाऊन तेथे परमात्म्याची आराधना कशा प्रकारे करायची आहे?

नारद म्हणाले: ध्यान करण्यापूर्वी मानस सेवा करावी. चतुर्भुज नारायणाची मानससेवा करावी. त्यावेळी मनाच्या ध्यानांत कुठे खंड पडू नये याची काळजी घ्यावी. ईश्वरचरणी मन सतत संलग्न राहिले पाहिजे. मानसपूजा श्रेष्ठ मानली गेली आहे. श्रीमत् शंकराचार्य देखील कृष्णाची मानसपूजा करीत असत.

जे आपल्या संग्रहीं कांहीच ठेवीत नाहींत अशा विरक्त संन्याशांनी मानसपूजा करावी हे उत्तमच आहे. परंतु गृहस्थाने केवळ मानसपूजा करून भागायचे नाही. गृहस्थाने तर मानस आणि प्रत्यक्ष अशा दोन्ही पूजा केल्या पाहिजेत.

मानसपूजेसाठी पहाटे चारपासून साडेपांचपर्यंतचा वेळ उत्तम आहे. कोणत्याही इतर व्यक्तींचें तोंड पाहायच्या आधी मानसपूजा झाली पाहिजे. पहाटे उठून कल्पना करा कीं तुम्ही गंगेच्या काठी बसले आहांत. मनानेच गंगेंत स्नान करा. अभिषेकासाठीं चांदीच्या कलशांत गंगाजल घेऊन या. देव उठल्यानंतर त्यांना आचमनासाठी गंगाजल द्या. मंगल केल्यानंतर लोणीसाखरेची गरज लागेल. भोलेनाथ शंकरांना कांहीच नको; पण कृष्ण कन्हैया तर सर्वकांही मागेल. मग कृष्णाला स्नान घाला. शंकर तर गार पाण्यानेच स्नान करतात, परंतु बाळकृष्णाला गरम पाण्याने स्नान घाला. मग त्यांचा शृंगार करा. शृंगार न करता सुद्धा कृष्ण सुंदरच दिसतात. परंतु त्यांना शृंगारल्यावर तुमचें मन देखील सुंदर होईल. आपल्या विकृत मनाला सुधारण्यासाठीच देवाला शृंगार करायचा आहे. शृंगाराने समाधीसारखा आनंद मिळतो. शृंगारानंतर भगवंताला सुंदर टिळा लावा, आरती करा आणि स्वादिष्ट नैवेद्य दाखवा. त्यावेळी तुमचे हृदय आर्द्र झाले पाहिजे. पद्मपुराणांत आरतीचा क्रम सांगितला आहे. चरण, जंघा, वक्षःस्थल, मुख आणि त्यानंतर सर्वांगावरून आरती ओवाळली पाहिजे. आरती करताना प्रभुदर्शनासाठी आर्त झाले पाहिजे.

भगवंताचें दर्शन करताना ध्यान करायचे आहे. श्रीहरीचें सावकाश स्वस्थ चित्तानें ध्यान करा. जप ध्यानासह झाला पाहिजे. कांही लोक असे असतात कीं ते जप करताना देखील संसाराचें चिंतन करीत असतात. असे केल्यामुळे, जप निष्फळ तर नाही मानता येत, पण जसे फळ मिळायला पाहिजे तसें मिळत नाही.

स्नान केल्याने शरीराची शुद्धि होते. दान केल्याने धनाची शुद्धि होते. ध्यान केल्याने मनाची शुद्धि होते.

जप आणि ध्यान बरोबरच झाले पाहिजे. जप करताना ज्या देवाचें तुम्ही ध्यान करीत आहांत त्याची मूर्ति तुमच्या मनांत स्थिर करा. जिभेने भगवंताचें नांव घ्यावे आणि मनाने भगवंताचें स्मरण करावे. डोळ्यांनी त्यांचें दर्शन घ्या आणि कानांनी त्यांचें श्रवण.

मी तुला एक मंत्रही देतो.

"ॐ नमो भगवते वासुदेवाय।"

या महामंत्राचा तू सतत जप करीत रहा. भगवंत अवश्य प्रसन्न होतील. माझा आशीर्वाद आहे. तुला सहा महिन्यांत भगवंतांची भेट होईल.

संचित प्रारब्धकर्म जाळण्यासाठी तीन जन्म घ्यावे लागतात.

गीतेंत भगवंताने सांगितलें आहे कीं अनेक जन्मांनंतर जीव मला प्राप्त करून घेतो. **'बहूनां जन्मनामन्ते'**. विद्वानांनी **बहूनाम्** म्हणजे तीन जन्म असा अर्थ केला आहे. आपल्या कर्मांच्या क्षयासाठी योग्यांना, ज्ञान्यांना तीन जन्म तर घ्यावेच लागतात, परंतु भागवतांत वर्णन केलेल्या ध्रुवचरित्रांत सांगितले आहे कीं जप केल्याने सहा महिन्यांत भगवंत भेटतात.

ध्रुवाने म्हटले आहे कीं भगवंतचरणांची छाया मी सहा महिन्यांत प्राप्त केली.

ही गोष्ट खरी आहे. तुम्ही देखील अनुभव घेऊन पहा. परंतु ज्याप्रकारे ध्रुवानें तपश्चर्या केली होती त्याच प्रकारे तपश्चर्या करा. साधना केल्याने सिद्धि मिळत असते.

ध्रुवाने अनेक जन्मांपर्यंत तपश्चर्या केली होती. पूर्वजन्मांत त्याला सहा महिन्यांतच दर्शन होणार होते. त्या योगासाठी अजून सहा महिने शिल्लक होते. पूर्वजन्मांत ते ध्यान करीतच होते. एवढ्यांत तेथे राजा-राणी आले. ध्रुवाच्या मनांत विचार आला कीं या राजाराणींनी जे सुखोपभोग घेतले आहेत तसे तर मी कधीच घेतले नाहीत. याच कारणाने त्याला राजाच्या घरीं जन्म आला.

नारद आता उत्तानपाद राजापाशी गेले. वियोगांत सर्वांनाच वियोग झालेल्या व्यक्तीच्या गुणांची आठवण येत असते. पश्चात्ताप करीत बसलेले उत्तानपाद ध्रुवाच्या गुणांची आठवण करीत बसलेले आहेत.

नारद म्हणाले: कांहीही असो, परंतु हे तर माझ्या शिष्याचे वडील आहेत. मला यांचा देखील उद्धार करायलाच हवा. हा सुरुचीच्या आधीन झालेला आहे. हा जर आपल्या जिभेला वश करील तर याची साधना सफल होईल. जिभेला काबूंत केल्यावर सुरुचीचा मोह कमी होईल.

उत्तानपादाला नारद म्हणाले: तू सहा महिने केवळ दूधच पीत जा आणि अनुष्ठान कर.

ध्रुव मधुवनांत आला. पहिल्या दिवशी त्याने उपवास केला आणि मग तीन दिवस एका आसनावर बसून ध्यान केलें. केवळ फलाहारच केला.

अन्न ग्रहण केल्याने रजोगुणाची आणि फलाहाराने सत्त्वगुणाची वृद्धि होत असते.

दुसऱ्या महिन्यांत आणखी संयम केला. एकसारखे सहा दिवसपर्यंत ध्यानांत बसू लागला. तिसऱ्या महिन्यांत एकसारखे नऊ दिवसपर्यंत ध्यान करू लागला. फलाहारही सोडून दिला. फक्त वृक्षांची पानेच खाऊन राहू लागला. हळूहळू संयम वाढीस लागून भक्तीसुद्धा वाढत जाते. ज्या विषयाचा एकदा त्याग केला असेल त्यांत पुनः मन, इन्द्रियांना रमू देऊ नका.

चौथ्या महिन्यांत फक्त यमुनाजल पिऊन बारा दिवस एकाच आसनावर बसून जप केला. पाचव्या महिन्यांत पाणीही सोडून दिले आणि वायु भक्षण करून पंधरा दिवसपर्यंत एकाच आसनावर जप करीत बसला.

आता सहावा महिना आला तर त्याने निश्चय केला कीं आता जोपर्यंत परमात्म्याची भेट होत नाही तोपर्यंत आसनावरच बसून राहीन आणि तो ध्यानजपांत मग्न झाला.

निश्चय अटळ असेल तर परमेश्वर अवश्य भेटेल.

वृत्ति ब्रह्माकार तर होते, पण तिला तशीच राहू देणें फार कठीण कर्म आहे.

ध्रुवाने सहा महिने सतत परमात्म्याचें ध्यान केले. आपल्या हृदयांत भगवान नारायणांचें दर्शन

घेतलें. आता जिभेने जप न करता मनानेच जप करू लागला.

ध्रुवाच्या तपश्चर्येने प्रभावित होऊन देवगणांनी नारायणाची प्रार्थना केली कीं ध्रुवाला लवकर दर्शन द्यावे.

भगवंत म्हणाले, मी ध्रुवाला दर्शन द्यायला नाही, त्याचे दर्शन घ्यायला जात आहे.

स्वतः भगवंताला ध्रुवाच्या दर्शनाची इच्छा झालेली आहे.

एकदा पंढरपूरचे विठ्ठलनाथ आणि रुक्मिणी यांच्यांत संवाद झाला.

रुक्मिणी म्हणते: रोज रोज इतके भक्तजन तुमच्या दर्शनाला येत असतात तरी पण तुम्ही आपली दृष्टी खालीच लावून ठेवीत असता; कोणाशीच दृष्टभेट होऊ देत नाही! असें कां?

हे ऐकून भगवान म्हणाले: जे फक्त मलाच भेटायला येतात त्यांच्यावरच मी कृपादृष्टि ठेवतो. लोक मंदिरांत काय काय भाव ठेवून दर्शनाला येत असतात हे मला ठाऊक आहे. मंदिरांत सगळे लोक आपल्याचसाठी कांही कांही मागत असतात. मला भेटायला म्हणून क्वचितच कोणी येत असतील. मलाच भेटायला जो येतो त्याच्याशीच मी दृष्टी मिळवतो.

भगवंताच्या दर्शनासाठी पंढरपूरच्या मंदिरांत इतकी कांही गर्दी होत असते कीं सकाळी तेथे पोचलेला माणूस संध्याकाळीच दर्शन करू शकतो.

एकदा लक्ष्मीने भगवंताला विचारले– इतके भक्त आपल्या दर्शनासाठी आतुर आहेत तरी पण तुम्ही उदास कां दिसत आहांत?

भगवंत म्हणाले, हे जे आलेले आहेत ते सगळेच स्वार्थी आहेत. परंतु ज्याचे दर्शन घेण्याची माझी इच्छा आहे तो तुकाराम अजून आलेला नाही.

आता इकडे तुकाराम आजारी होते. ते बिछान्यावर पडल्या पडल्या विचार करीत आहेत कीं विठ्ठलाच्या दर्शनाला तर मला जाता नाही यायचे. असे कां होऊं नये कीं तेच दर्शनासाठी माझ्या घरीं यावे?

भगवंत लक्ष्मीला म्हणाले– तुकाराम आजारी असल्यामुळे इकडे येऊ शकत नाही. तर चला, आपणच त्याच्या घरीं जाऊ.

लाखो वैष्णव पंढरपूरच्या मंदिरांत पांडुरंगाच्या दर्शनासाठी उसळत आहेत आणि पांडुरंग तर जाऊन पोचले तुकारामाच्या घरीं!

ज्या प्रकारे खरा वैष्णव परमेश्वराच्या दर्शनासाठी आतुर झालेला असतो त्याचप्रकारे भक्ताच्या दर्शनासाठी परमेश्वरही आतुर झालेला असतो.

ध्रुवाच्या पुढे नारायण भगवान प्रकट झाले. परंतु ध्रुवाने डोळे उघडले नाही. भगवंत म्हणाले, असा मी किती वेळ उभा राहू? ध्रुवाच्या हृदयांत जे तेजोमय स्वरूप प्रकट होते त्याला प्रभूने अंतर्धान करून टाकले. आता ध्रुव व्यथित झाला. विचार करू लागला, तें दिव्य रूप कुठे अदृश्य झाले? ध्रुवाने डोळे उघडले तर त्याला समोर चतुर्भुज नारायण दिसले. आता ध्रुव भगवंताचें दर्शन घेत नाही, तर त्यांची रूपज्योती जणू पीत आहे. पुष्कळ कांही बोलायचे आहे पण कसे बोलावे? अज्ञानामुळें तो बोलूं कसा शकणार?

आपल्या शंखाने भगवंतांनी ध्रुव बाळाच्या गालाला स्पर्श केला आणि त्याच्या मनांत सरस्वती जागृत केली. ध्रुवाने स्तुती केली–

प्रभू! आपण सर्वशक्तिसंपन्न. तुम्हीच माझ्या अंतःकरणांत प्रवेश करून माझ्या या सुप्त वाणीला

आपल्या तेजाने चेतनयुक्त करीत आहांत आणि माझ्या हात, पाय, कान, त्वचा इत्यादी सर्व इन्द्रियांना आणि प्राणांना चैतन्य देत आहांत. अशा अंतर्यामी साक्षात् तुम्हाला – भगवंतांना मी नमस्कार करतो.

माझ्या बुद्धीत प्रविष्ट होऊन तिला सत्कर्माची प्रेरणा देणाऱ्या प्रभूला मी पुनःपुन्हा वंदन करतो.

मी कृतज्ञ आपणाला कसा विसरू शकेल? जो आपली स्तुती करीत नाही तो खरोखरच कृतघ्न आहे. आपण तर मनुष्याला जन्ममरणाच्या चक्रांतून मुक्त करीत असता. कामादि विषयांच्या इच्छेने आपल्याला भजणारा मूर्खच आहे. तुम्ही तर कल्पवृक्ष आहात. तरी पण ते मूर्ख लोक देहोपभोगाच्या हेतूने अशा सुखांची इच्छा करतात कीं ज्या सुखामुळेच प्राण्याला नरकांत जावे लागत असते.

जेव्हां आपली कृपा होईल तेव्हांच हा जीव तुम्हाला ओळखू शकेल. आपली कृपा झाल्यावरच हा जीव आपले दर्शन घेऊं शकेल, आपणाला प्राप्त करून घेऊ शकेल.

निव्वळ साधना करूनच ईश्वराचें दर्शन होत नाही. कृष्ण कृपासाध्य आहेत. साधनासाध्य नाही. परंतु याचा हा अर्थ नाही कीं तुम्ही साधनाच करू नका. साधना तर अवश्य करा पण त्या साधनेचा भरवसा करूं नका, अभिमान तर करूच नका. साधना तर करायचीच आहे. साधना करता करता थकलेला जीव दीन होऊन जेव्हां त्याला रडू कोसळते तेव्हांच देव कृपा करतो.

"हा आत्मा वेदाभ्यासाने मिळत नाही, बुद्धिचातुर्याने नाही, अनेक शास्त्रांच्या श्रवणाने नाही, परंतु जो सर्वस्वी आत्म्याला शरण जातो त्यालाच या आत्म्याची प्राप्ति होत असते, त्यालाच आत्मा आपलें स्वरूप दाखवितो."

साध्याची प्राप्ति झाल्यानंतर पुष्कळ लोक साधनेची उपेक्षा करतात. साधनेची उपेक्षा केल्याने मग माया पुनः प्रविष्ट होते. अद्वैतभावाची सिद्धि झाल्यानंतर सुद्धा वैष्णव भगवंताची भक्ति करीतच राहतो. ईश्वरप्राप्ति झाल्यानंतर देखील साधनेचा त्याग करू नये. साधनेची अशीच सवय असू द्या कीं ती सुटणारच नाही.

सत्संगाने तुकाराम पांडुरंगासारखेच झाले आहेत. आता त्यांना भजन करण्याची आवश्यकता नाही. परंतु तुकारामांना भजन करण्याची अशी सवय जडून गेली आहे कीं भजन करणें आता सुटूच शकत नाही.

तुकारामांनी आधी सत्संग केला तेव्हा त्यांना जप करण्याची आज्ञा झाली. जपाने भगवंतांनी दर्शन दिले आणि कृपा केली. आता तुकाराम आणि पांडुरंगात द्वैतभाव नाही. तरी पण ते भजन करण्याचे सोडू शकत नाहीत. कारण ते सवयीने बद्ध आहेत. अशा उन्नत स्थितीला पोचून देखील ज्ञानी भक्त भक्तीचा त्याग करीत नाही.

ज्ञानी भक्ताला भक्ति एक व्यसनासारखीच होऊन जाते. भक्ति व्यसनासारखी झाली कीं बेडा पारच होतो. जन्म सफल झालाच समजा.

प्रभो! तुमचें दर्शन झाल्यानंतर देखील खरे ज्ञानी भक्तजन तुमची भक्ति सोडू शकत नाहीत. तुमचें दर्शन झाल्यानंतर जो तुमचे स्मरण करीत नाही, तो कृतघ्न होय. शुकदेवांना राधाकृष्णाचें ध्यान, एक क्षणभर देखील जर कोणी सोडायला सांगेल तर ते तसे करू शकणार नाहीत. अपरोक्ष साक्षात्कार झाल्यानंतरसुद्धा भजन सोडले जाऊ शकत नाही.

ध्रुवकुमाराने सुंदर स्तुति केली कीं, "नाथ, तुमचे लाडके भक्त दर्शन करीत असता, स्मरण करीत असता, तुमची कथा करीत असतील तेव्हां ती ऐकायचा सुयोग येईल अशी कृपा करा. तो आनंद तर योग्यांच्या ब्रह्मानंदापेक्षाही श्रेष्ठ आहे.

ध्रुवकुमाराने विद्वानांची कथा ऐकायची इच्छा व्यक्त केली नाही. त्याची अशी इच्छा होती कीं ज्यांचे हृदय कृष्णप्रेमाच्या रसांत लीन झालेले आहे अशांकडून कथा ऐकावी. ज्ञान्याच्या कथेंत आणि भक्तहृदयाच्या कथेत अंतर असते. आपल्या कथेचा आनंद ब्रह्मानंदापेक्षासुद्धा श्रेष्ठ आहे.

श्रीधरस्वामींना या विधानाचा अर्थ लावण्यांत कांही अडचण वाटली. उपनिषदाच्या सिद्धान्ताचा येथे कांहीसा विरोध केला गेला आहे. उपनिषदांत सांगितलें आहे कीं, ब्रह्मानंदच सर्वश्रेष्ठ आहे. इतर कोणताही आनंद ब्रह्मानंदापेक्षा श्रेष्ठ असू शकत नाही. तैत्तिरीय उपनिषदांत आनन्दाचें वर्णन केले आहे. मनुष्याच्या आनंदापेक्षा गंधर्वाचा आनंद श्रेष्ठ आहे. देवापेक्षा इंद्राचा आनंद श्रेष्ठ आहे. इन्द्रापेक्षा बृहस्पतीचा आनंद शंभरपटीने श्रेष्ठ आहे. परंतु ब्रह्मानंद तर सर्वश्रेष्ठ आनंद आहे.

जो निष्काम आहे, निर्विकार आहे आणि ज्याच्या मनाचा निरोध झालेला आहे अशाला जो आनंद मिळतो तोच ब्रह्मानंद होय. हा सर्वश्रेष्ठ आनंद आहे. ब्रह्माकार वृत्तीच्या योग्यांना जो ब्रह्मानंद प्राप्त होत असतो तो श्रेष्ठ आनंद आहे. जेथे द्वैत-प्रपंच– 'मी' आणि 'तू' नाही तो आनन्द श्रेष्ठ आहे. जोपर्यंत 'मी' आणि 'तू' चें अस्तित्व आहे तोपर्यंत श्रेष्ठ आनंद मिळत नाही. ब्रह्मानंद प्राप्त झाल्यावर सांसारिकतेचे-जगताचें अस्तित्व राहात नाही.

भागवतांत ध्रुव म्हणतो कीं, भगवंताच्या कथाश्रवणाचा आनंद ब्रह्मानंदाहूनही श्रेष्ठ आहे.

हा विरोधाभास कां आहे? यांत खरे काय आहे? महापुरुषांनी आपल्या आपल्या दृष्टीने समाधान केलें आहे कीं, ब्रह्मानंद सर्वश्रेष्ठ आहे. परंतु यात एक दोष असा आहे कीं हा आनंद एका व्यक्तीपुरताच मर्यादित राहतो. ज्याची वृत्ति ब्रह्माकार झाली असेल त्यालाच तो आनंद मिळू शकतो. म्हणून हा आनंद गौण आहे. कथाकीर्तनाचा आनंद एकाच वेळीं अनेकांना प्राप्त होतो. भजनानंद असाच असल्याकारणाने सर्वांना एकाच वेळी आनंदित करीत असतो. याच कारणाने कथानंदाला ब्रह्मानंदापेक्षा श्रेष्ठ म्हटले आहे.

ब्रह्मानंद एका व्यक्तीला आनंदित करू शकतो. जो आनंद समाधीमध्ये असलेला योगी मिळवू शकतो, तो आनंद योग्याच्या सेवकाला मिळू शकत नाही. समाधिलीन योगी एकटाच संसार पार करू शकतो, तर सत्संगी स्वतःही पार होतो आणि इतरांनाही पार नेतो.

कथाश्रवण सगळ्यांनाच एकाच वेळीं आनंद देते. हे अनेक-भोग्य आहे. म्हणून कथा-श्रवणाचा आनंद-कथानंद देखील श्रेष्ठ म्हटला गेला आहे.

कांही टीकाकारांनी म्हटलें आहे कीं ब्रह्मानंदापेक्षा इतर कोणताही आनंद श्रेष्ठ नाही. परंतु सत्संगाचा महिमा वाढवून सांगण्याकरिता भागवतांत असे म्हटले आहे.

प्रभु ध्रुवाला म्हणाले– मी तुझ्या भक्तीने प्रसन्न झालो आहे. तू माझ्याकडून पाहिजे ते मागून घे.

ध्रुव म्हणाला– काय मागू अन् काय नको, हे मला समजत नाही. तुम्हाला जे आवडेल तेच मला द्या.

भगवान शंकर जेव्हां प्रसन्न झाले तेव्हां नरसी मेहताला वर मागायला सांगितले. नरसी मेहताने सुद्धा ध्रुवासारखेच उत्तर दिले होते. शंकर म्हणाले, मला तर रासलीला प्रिय आहे म्हणून मी तुला तिचेच दर्शन घडवीन आणि शंकरांनी मेहताला रासलीलेचें दर्शन घडविले.

भगवंतांनी ध्रुवाला सांगितलेः कांही कल्पपर्यंत तू आपल्या राज्याचें शासन कर. त्यानंतर मी तुला आपल्या धामीं घेऊन जाईन.

ध्रुवाने शंका व्यक्त करीत म्हटलेः मला माझा पूर्वजन्म आठवू लागला आहे. राजाराणीच्या दर्शनाने माझें मन विचलित झालें होते, म्हणून मला हा जन्म घ्यावा लागला. आता जर पुनः राजा झालो तर राण्यांच्या मायेंत अडकून जाईन आणि बेसावध होईन. मी राजा बनू इच्छित नाही.

प्रभु म्हणालेः तू चिंता करू नको. असे कधी व्हायचे नाही. तुझी राजा व्हायची इच्छा नसली तरी मी तुला राजा बनलेला पाहू इच्छितो. ही माया तुला प्रभावित करू शकणार नाही. माझा नियम आहे कीं जो माझा पाठलाग करतो त्याचाच मीही पाठलाग करीत असतो. मी तुझें रक्षण करीन.

लहान मुलांना स्वतःचा शृंगार करण्यांत कदाचित आनंद होत नसेल, पण त्याच्या आईला तर त्याचा शृंगार करण्यात आनंद असतोच. मी जगाला हे दाखवू इच्छितो कीं जो माझा होतो त्याला मी लौकिक आणि अलौकिक असे दोन्ही प्रकारचे आनंद प्रदान करीत असतो. मी आपल्या भक्तांना अलौकिक सुखाबरोबरच लौकिक सुखानेही लाभान्वित करतो.

शबरी आणि मीरा यांच्यासारखा अतूट भक्तिभाव असल्यावर भगवंत म्हणतात, मी रक्षण करीत राहीन.

जीवाचें रक्षण जोपर्यंत भगवंत स्वतः करीत नाही, तोपर्यंत कामाचा नाश होत नाही.

श्रीरामाने ज्यांचे रक्षण केले आहे ते कधी कामांध झालेले नाहीत.

फुलें तोडायला आलेल्या एका राजसेवकाने ध्रुवाला पाहिले, तर त्याने ध्रुवाच्या आगमनाचा समाचार राजाला कळविला. अनुष्ठानाला बसलेले उत्तानपादराजा एकदम धावतच उठले.

जरा गंमत तर पहा. सहा महिन्यांपूर्वी ज्या उत्तानपाद राजाने ध्रुवाला क्षणभर देखील मांडीवर बसू दिले नव्हते; तोच राजा आता भगवंताचे दर्शन करून आलेल्या ध्रुवाचे स्वागत करायला धावतच जात आहे.

जो ईश्वराशी संबंध जोडतो; त्याच्याच मागे जग धावू लागते. परमात्मा ज्याला आपले करून घेतो त्याला शत्रू देखील नमस्कार करतात. जर तुम्ही परमेश्वराच्या मागे लागाल तर जग तुमच्या मागे लागेल.

ज्याने ध्रुवाचा केव्हांतरी अपमान केला होता तोच उत्तानपाद आज त्याचे स्वागत करायला धावला आहे. त्याला वाटते की, माझ्या पाच वर्षांच्या बाळाने देवाचे दर्शन घेतले आणि मी अर्धे आयुष्य घालविले तरी सुरुचीच्या मायेंतच फसून बसलो आहे! धिक्कार असो माझा!

राजाच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहात आहेत. तो विचारतो आहे, कुठे आहे माझा ध्रुव? कुठे आहे माझा बाळ?

सेवक म्हणाला, हा पहा महाराज, राजकुमार आपल्याला नमस्कार करीत आहे. त्याला पाहून राजाने त्याला छातीशी धरले आणि म्हटले, मी नमस्कार करून घेण्यास अपात्र आहे.

शुकदेव म्हणतात: त्या वेळी परमानंदाचा वर्षाव होत होता.

आता ध्रुव मातांना नमस्कार करायला जात आहे. त्याला विचार येतो कीं माझ्या आईने म्हटले होते की, मी तिला नमस्कार केला नाही तरी काही हरकत नाही, परंतु विमाता सुरुचीला तर मी नमस्कार करायलाच हवा. म्हणून ध्रुवाने जेव्हा सुरुचीला नमस्कार केला, तेव्हा तिचे हृदय भरून आले. किती शहाणा आहे हा!

सुनीतीचे हृदय तर हर्षाने इतके भरून आले कीं, ती काही बोलूच शकली नाही. तिला वाटले कीं आजच नव्याने तिला मुलगा झाला आहे. कारण तिचा मुलगा आज भगवंताची भेट घेऊन आला

आहे.

जो सर्वांचेच आशीर्वाद मिळवितो तो सर्वेश्वराला प्रिय होतो.

लोकांनी म्हटले की ध्रुवाने नारायणाचे दर्शन केले आहे म्हणून आम्ही त्याचे दर्शन घेऊन कृतार्थ होऊ. म्हणून ध्रुवाच्या नगरयात्रेची योजना केली गेली.

ध्रुवाला हत्तीवर बसायला सांगितले तेव्हा तो म्हणाला, "मी एकटा हत्तीवर बसणार नाही, माझा भाऊ उत्तम त्याला माझ्याजवळ बसवा." उत्तमाला प्रथम हत्तीवर बसवून मागाहून ध्रुव हत्तीवर स्वार झाला.

जो आपल्या भावा-बहिणींमध्ये, नात्या-गोत्यांच्या मंडळींत परमात्म्याचे दर्शन करू शकणार नाही त्याला मूर्ति इत्यादीमध्ये सुद्धा भगवंताचे दर्शन होणार नाही.

शब्दात्मक उपदेशाचा प्रभाव लवकर पडत नाही. क्रियात्मक उपदेशाचा ताबडतोब परिणाम होतो.

सुरुचीला आता पश्चात्ताप होत आहे. ती सुनीतीच्या चरणी मस्तक ठेवून रडत आहे. तिच्या अश्रूंबरोबर तिच्या मनाचाही मळ धुतला गेला.

ध्रुवाला राज्याभिषेक करण्यात आला आणि भ्रमीबरोबर त्याचा विवाहही करून दिला.

एकदा उत्तम शिकार करण्यासाठी वनात गेला. तेथे यक्षाशी युद्ध करता करता त्याचा मृत्यू झाला. ही दुःखद बातमी ऐकून ध्रुव तेथे पोहोचला आणि भयंकर युद्ध करून यक्षांचा संहार करू लागला.

त्यावेळी ध्रुवाचे आजोबा महाराज मनु तेथे आले. ते म्हणाले, बेटा, वैष्णव वैर ठेवीत नाहीत. विष्णु भगवान प्रेमस्वरूप आहेत. आपल्या छातीवर लाथ मारणाऱ्या भृगुऋषींना देखील विष्णूंनी प्रेमच दिले होते.

शंकर वैराग्याचे स्वरूप आहेत.

अतिप्रेम करणे कठीण आणि अतिवैराग्य राखणे पण कठीण आहे. ज्ञात्याने अतिशय वैराग्याने राहिले पाहिजे आणि वैष्णवाने अतिशय प्रेम केले पाहिजे. अतिशय प्रेमाने राहिले पाहिजे.

आपल्यापेक्षा मोठे असतील त्यांच्याविषयी सहनशीलता, छोट्याविषयीं दया, समान वयस्कांशी मैत्री आणि सगळ्या जीवांशी एकसारखे वर्तन करण्याने सर्वात्मा श्रीहरि प्रसन्न होतात.

तितिक्षा-सहनशीलता, सर्व जनांविषयीं करुणा आणि जगतांतल्या प्रत्येक जीवाशी मैत्री, या तीन गुणांनी संपन्न व्यक्ति सुखी होते आणि तिच्यावर भगवंतही प्रसन्न होतात. प्रत्येक प्राण्याविषयीं आपलेपणा ठेवल्याने प्रभु प्रसन्न होतात आणि प्रभु प्रसन्न झाल्यावर प्राकृतिक गुण आणि लिंगशरीरापासून मुक्त होऊन पुरुष सुखस्वरूप ब्रह्माची प्राप्ति करून घेतो.

मनुमहाराजांचा उपदेश ऐकून ध्रुवाने संहार करणे थांबविले.

ध्रुव विशाला क्षेत्रांत आले. लहानपणीं तेव्हा यमुनेच्या काठी गेले होते. आता वृद्धावस्थेत गंगेच्या काठी आले आहेत. गंगा मृत्यू उज्ज्वल करते. भगवंताची कथा प्रेमाने ऐकल्याने सर्व यात्रांचे फळ मिळते.

गंगेच्या किनाऱ्यावर बसून ध्रुव भजन-कीर्तन करू लागले. गंगेच्या प्रवाहाच्या निनादामुळे ध्रुवांच्या ध्यानांत विक्षेप येऊ लागला. ते गंगेचा किनारा सोडण्याची तयारी करू लागले, तर गंगा स्वतः तेथे प्रकट झाली. ध्रुव म्हणाले, माते, तुझा हा कलकल नाद माझ्या भजन-ध्यानांत विक्षेप करतो.

गंगा म्हणाली, तू शांतीने ध्यान करीत आहेस, तर मीही आता शांतीने ध्यान करीन. आता मी केव्हांही शब्द करीत राहणार नाही, तू येथून जाऊ नकोस.

गंगा शांत झाली. ह्षीकेशाजवळ ध्रुवाश्रम आहे. तेथे आज देखील गंगा शांत आहे. फक्त ध्रुवाश्रमाजवळच गंगा शांत आहे, आणखी इतर ठिकाणी नाही.

एकदा भगवंताच्या आज्ञेने ध्रुवकुमाराला आपल्याबरोबर घेऊन जाण्यासाठी विमान घेऊन पार्षद आले. गंगातट सोडून वैकुंठांत जाण्याची ध्रुवाची इच्छा होत नव्हती. त्यांना वाटत आहे की गंगातटावर राहून सत्संग, भजन, ध्यान इत्यादींमधे जो आनंद मला मिळाला आहे तो वैकुंठात कसा मिळेल? गंगेला साष्टांग नमस्कार करून ते शेवटचे स्नान करू लागले. गंगा सोडताना त्यांना दुःख होत होते. त्यांचे ह्रदय भरून आले.

त्यावेळी गंगा प्रकट झाली. ध्रुव म्हणाला–

भगवंताच्या आज्ञेमुळे मी तुला सोडून वैकुंठात जात आहे. तुझ्या तटावर जो आनंद मिळाला आहे तो वैकुंठांत कसा मिळेल? हे ऐकून गंगेने प्रेमाने सांगितले कीं हे तर माझे भौतिक स्वरूप आहे. वैकुंठांत तर मी आधिभौतिक स्वरूपात राहते. ध्रुवाने गंगेला नमस्कार केला.

सगळ्यांना नमस्कार करून ध्रुव वैकुंठाला गेला. तो विनयाची मूर्ति आहे.

ध्रुवाच्या जवळ येऊन मृत्युदेवाने शिर नमविले तर ध्रुवाने त्याच्या डोक्यावर एक पाय ठेवून दुसरा पाय विमानांत ठेवला. विमानांत बसून भगवंताच्या धामीं गेले. ध्रुवाच्या वैकुंठगमनाने सर्वांनाच आनंद झाला.

नारद काहीसे अप्रसन्न आहेत. त्यांना वाटले, मृत्यूच्या डोक्यावर पाय देऊन विमानांत बसून माझा शिष्य वैकुंठाला पोहोचला! माझा शिष्य माझ्याही पुढे निघून गेला. त्याला नेण्यासाठी वैकुंठातून विमान आले आणि मला तर अजूनही या संसारात भटकावे लागत आहे.

या गोष्टीवरून हेच सिद्ध होत आहे कीं, पुष्कळ कथा करून देखील परमात्म्याची प्राप्ति होत नाही. ध्यानाविना, प्रभुदर्शनाविना शांति मिळत नाही. एकांतात बसून ध्यान करण्याची आवश्यकता आहे.

प्रभूचे लाडके भक्त मृत्यू अर्थात् काळाच्या डोक्यावर पाय ठेवून वैकुंठात जातात. भागवताच्या चौथ्या स्कंधाच्या बाराव्या अध्यायाच्या तिसाव्या श्लोकांत स्पष्ट सांगितले आहे की मृत्यूच्या डोक्यावर पाय ठेवून ध्रुव विमानांत बसला होता.

भगवंताचे भक्त मृत्यूला भीत नाहीत. मनुष्य निर्भय होत नाही, कारण तो ईश्वराचा होत नाही. जो ईश्वराला शरण जातो तो निश्चिंत होतो. निर्भय होतो.

सुतीक्ष्ण ऋषी म्हणतात– माझा अभिमान दररोज वाढत जावो. कोणता अभिमान? मी परमेश्वराचा आहे आणि परमेश्वर माझे आहेत, हा अभिमान.

जो भगवंताचा आश्रय घेतो तो निर्भय होतो. त्याला कालाचे भय सतावू शकत नाही. काळ तर परमात्म्याचा दूत आहे. काळाचा काळ अशा परमात्म्याला शरण गेल्यावर काळही काय बिघडवू शकेल?

ध्रुव अर्थार्थी भक्त आहे. ध्रुवाने भगवंताची शरणागती स्वीकारली तर भगवंतांनी त्याला दर्शन दिले, राज्य दिले आणि अंती वैकुंठवासही दिला. हे आहे भगवंताच्या अनन्य शरणागतीचे फल!

ध्रुवाचा दृष्टान्त सांगतो की अटळ निश्चयाने कठिणतम कार्य देखील सिद्ध होते. परंतु तो निश्चय कसा असला पाहिजे? "**देहं वा पातयामि कार्यं वा साधयामि।**" कार्य तरी सिद्ध करीन, अथवा देहत्याग तरी करीन.

हा दृष्टान्त हेही दर्शवितो कीं, बाल्यावस्थेपासूनच जो भगवंताची भक्ति करतो त्यालाच तो भेटू शकतो. वृद्धावस्थेत भजन-ध्यान करणाऱ्याचा पुढचा जन्म दिव्य असतो. परंतु ह्याच जन्मांत जर देवाला प्राप्त करून घ्यायचे असेल, तर बाल्यावस्थेपासूनच भक्ति केली पाहिजे. बाल्यावस्थेतले चांगले संस्कार नाश होत नाहीत. सुनीतीप्रमाणे तुम्ही देखील आपल्या मुलांमधे लहानपणापासूनच धार्मिक संस्कारांचे सिंचन करा.

ध्रुवचरित्राची समाप्ति करीत मैत्रेय म्हणाले कीं नारायण सरोवराच्या काठी नारद तप करीत बसले होते. तेथे प्रचेतांची भेट झाली.

**७. प्रचेतांची कथा :**

विदुरांनी विचारले— हे प्रचेता कोण होते? कोणाचे पुत्र होते? विस्ताराने सर्व काही सांगा.

मैत्रेय विदुराला आणि शुकदेव परीक्षित राजाला कथा सांगत आहेत.

प्रचेता ध्रुवाचे वंशज होते.

ध्रुवाच्या वंशांत एक अंग राजा होऊन गेला. अंगाच्या येथे वेन झाला. अंग सदाचारी होता, तर वेन दुराचारी. वेनाच्या राज्यांत प्रजा फार त्रस्त झाली.

वेन राजाच्या कारकीर्दीत अधर्म वाढला तेव्हा ब्राह्मणांनी शाप देऊन त्याचा नाश केला. राजावाचून प्रजा दुःखी होऊ लागली. वेन राजाच्या शरीराचें मंथन केले गेले. प्रथम एक काळा पुरुष उत्पन्न झाला. खालच्या भागात पाप होते म्हणून त्याचे मंथन करून प्रथम पाप काढून टाकण्यांत आले. नाभीच्या खालचा भाग उत्तम नसतो. तिच्या वरचा भाग उत्तम म्हटला गेला आहे.

नाभीच्या खालच्या भागाचे सुख घेण्यासारखे नाही. मनुष्याचा वरचा भाग पवित्र आहे.

नंतर वरच्या पवित्र भागाचे— बाहूंचे मंथन केले म्हणून अर्चनभक्तिरूप पृथु महाराज प्रकट झाले. जर हृदयाचे मंथन केले असते तर साक्षात् नारायण प्रकट झाले असते.

पृथुमहाराज अर्चनभक्तीचे स्वरूप आहेत. म्हणून त्यांच्या राणीचें नाव अर्चि आहे. अर्चन-भक्तींत पृथु श्रेष्ठ आहेत. ते नित्य महाअभिषेक करीत असत. म्हणून त्यांच्या कारकीर्दीत प्रजा सुखी झाली. त्यांनी अश्वमेध यज्ञ देखील केला. या यज्ञांत अश्वाला बंधनमुक्त करून त्याच्या इच्छेनुसार फिरविले जाते. जर अश्व कुठेच बांधला गेला नाही तर यज्ञांत त्याचे बलिदान केले जाते.

अश्व हे वासनेचे रूप आहे. जर ती कोणत्याच विषयाच्या बंधनांत अडकली नाही तर आत्मस्वरूपांत लीन होऊन जाते (वासनाश्व). जर वासना एखाद्या विषयाच्या बंधनांत अडकून पडली तर विवेकाच्या सामर्थ्याने युद्ध करून तिला शुद्ध करावे लागते.

पृथुच्या या यज्ञांत इंद्राने विघ्न आणले. तो त्या अश्वाला घेऊन पसार झाला. त्या यज्ञात अत्रिमुनि बसले होते. पृथुच्या मुलाने घोडा परत आणला. त्यावेळी भगवंत प्रकट झाले.

पृथुने भगवंताला प्रार्थना केली कीं, मी मोक्षाची इच्छा ठेवीत नाही. कारण त्याने तुमच्या कीर्तीची कथा ऐकण्याचे सुख मिळत नाही. माझी तर एवढीच एक प्रार्थना आहे की तुमची कथा ऐकण्याकरता मला दहा हजार कान द्या जेणेकरून तुमच्या लीलाकथा ऐकत राहीन. तुमच्या एका चरणाची सेवा वाटल्यास लक्ष्मीने करावी, पण दुसऱ्या चरणाची मी करू इच्छितो.

पृथुराजाने धर्मानुसार प्रजेचें पालन केले आणि पृथ्वीच्या अंतर्भूत असलेल्या अनेक रसांचे युक्तिपूर्वक दोहन केले. त्यांनी वारंवार आपल्या प्रजेला धार्मिक शिक्षण दिले. त्यांची इच्छा होती की आपल्या

प्रजेने धर्माच्या मर्यादांचे पालन करावे.

पृथुमहाराज गाई आणि ब्राह्मणांचे पालन करीत असत.

गाय गवत खाऊन दूध देते. ब्राह्मण साधारण भिक्षेने जीवननिर्वाह करून सगळ्यांनाच ज्ञानदान करतात. गाय आणि ब्राह्मण संतुष्ट झाल्यावर प्रजेला शक्ति आणि ज्ञान मिळते आणि प्रजा सुखी होते. आजकालचे राज्यकर्ते असाच विचार करतील तर प्रजा सुखी होऊ शकेल.

जेव्हा संपत्तीपेक्षा चांगले संस्कार आणि धर्माची आवश्यकता अधिक वाटू लागेल आणि ते वृद्धिंगतही होतील तेव्हांच देश सुखी होईल.

पृथुमहाराज एकदा अर्चि राणीबरोबर बसले होते. इतक्यात तेथे सनत्कुमार आले. त्यांच्या सत्संगामुळे राजाला वैराग्य उत्पन्न झाले. ते अर्चिबरोबर वनांत गेले. पृथुमहाराज स्वर्गात गेले.

सनत्कुमारांच्या उपदेशामुळे त्यांनी वनवास स्वीकारला.

प्राचीन काळात तर राजे देखील राज्यत्याग करून वनात वसति करून प्रभुभजन करीत असत. परंतु या अर्थ आणि भोगप्रधान काळात वनवास करण्याची कोणाला इच्छाच होत नाही. मग सुखशांती मिळावी कशी ?

पृथुनंतर त्याचा मुलगा विजिताश्व राजा झाला. त्याला तीन भाऊ होते– हर्यक्ष, धूम्रकेश आणि वृक. यानंतर अंतर्धानाच्या येथे हविर्धान आणि हविर्धानाच्या येथे प्राचीन बर्हिराज झाला. प्राचीन बर्हिराजाच्या येथे प्रचेता झाले.

प्रचेता नारायण सरोवराच्या किनाऱ्यावर आले. नारदांनी त्यांना रुद्रगीतेचा उपदेश दिला. त्यामुळे भगवान शंकर प्रसन्न झाले आणि त्यांनी राजांना सांगितले कीं तुम्ही तप करा. तप केल्याविना सिद्धि मिळत नाही. तप न करणाऱ्याचे पतन होत असते. शंकर भगवानांनी अशी आज्ञा केली आणि ते अंतर्धान पावले. शंकरांनी सांगितलेल्या स्तोत्रांचा जप करीत प्रचेता तपश्चर्या करू लागले.

नारदांनी त्यावेळी बर्हिराजास प्रश्न केला– तू यज्ञ तर अनेक केले आहेस. तुला शांति मिळाली का ?

राजा म्हणाला – नाही.

नारद – तर मग तू हे यज्ञ कशाकरिता करीत आहेस ?

राजा– मला प्रभूंनी भरपूर दिले आहे म्हणून मी यज्ञ करीत आहे. यज्ञांच्या द्वारे मी ब्राह्मणांची सेवा करीत आहे. यज्ञाच्या द्वारे मी संपत्तीचा समाजसेवेसाठी सदुपयोग करीत आहे. यज्ञाने देखील तसे पाहिले तर शांति मिळत नाही.

नारद प्राचीन बर्हिराजाला समजावीत आहेत: जन्ममृत्यूच्या चक्रापासून जीव मुक्त होईल तेव्हाच पूर्ण शांति मिळू शकते. यज्ञाने तुझें कल्याण होणार नाही. कल्याणासाठी चित्तशुद्धि आवश्यक आहे. चित्तशुद्धि झाल्यानंतर एकांतात बसून ध्यान करण्याची आवश्यकता आहे. नुसता यज्ञ करून ईश्वराचा साक्षात्कार होऊ शकत नाही. तू स्वर्गात जाशील पण तुझ्या पुण्याचा क्षय होईल. मग स्वर्गातून तुला हाकलले जाईल. याकरिता शांत बसून तू आत्मस्वरूपाचे चिंतन कर. तुला तुझ्या स्वतःच्याच आत्मस्वरूपाचे ज्ञान नाही. यज्ञ करण्याची आवश्यकता नाही. शांतिपूर्वक तू ईश्वराची आराधना कर.

राजा म्हणाला: तुम्ही फार चांगला उपदेश करीत आहात.

नारद म्हणतात: तुला आपल्याच स्वरूपाचें ज्ञान नाही! जो स्वतःच्या स्वरूपाला ओळखू शकत नाही तो ईश्वराला कसे ओळखू शकेल ? मी एक कथानक सांगतो ते ध्यान देऊन ऐक.

प्राचीन काळात एक पुरंजन नावांचा राजा होऊन गेला. त्याचा एक अविज्ञात नावाचा मित्र होता. पुरंजनाला सुखी करण्यासाठी अविज्ञात नेहमी प्रयत्नशील असे. तरीही आपल्या प्रयत्नांचा राजाला सुगावा देखील लागू नये याविषयी तो जागरूक असे.

ईश्वर अज्ञातरूपाने जीवाला साहाय्य करतो. जीवाला—पुरंजनाला सुखी करण्यासाठी ईश्वर-अविज्ञात सृष्टि करतात. धान्य पिकवतात. परंतु पुरंजनाला याची जाणही होऊ देत नाहीत. आपण कोणाच्या तरी साहाय्यामुळे सुखी आहोत असे पुरंजनालाही वाटत नाही.

परमात्म्याची लीला 'अविज्ञात' आहे. तेथे बुद्धि काहीच काम करू शकत नाही. भगवंत म्हणतात, खाण्याचे काम तुझे आहे, पचविण्याचे काम माझे आहे. "**पचामि अन्नं चतुर्विधम्।**" जीव भोजन करतो आणि देव पचवितो. पोटांत देव अग्नीच्या रूपांत वास्तव्य करतात. जेवण झाल्यावर भगवंत म्हणतात, आता तुझे काम आहे निजण्याचे आणि माझे काम आहे जागण्याचे.

समजा आपण गाडी आहो, जीवात्मा यात्री आहे आणि परमात्मा चालक. जर भगवंत झोपून गेले तर 'अच्युतम् केशवम्' होऊन जाईल. रेल्वेइंजिनचा ड्रायव्हर झोपला तर गाडी थांबेल. यात्री झोपू शकतो, चालक सूत्रधार मात्र नाही. तरी पण जीव कधी विचार देखील करीत नाही कीं आपल्याला सुख देणारा आहे कोण ?

सत्कर्माचा संकल्प करणाऱ्याला तर भगवंतही बळ देतात. प्रभूचे भजन प्रातःकाळी करतात. सूर्योदयानंतर तर इतरांचे रजोगुण-तमोगुणांचें रजःकण तुमच्यावर परिणाम करतील आणि म्हणून तुम्ही चांगले भजन करू शकणार नाही.

जीव वाटल्यास झोपेल, पण भगवंत कधीच झोपत नाहीत.

पुरंजन जीवात्मा आहे. तो विचार करतो— मी कोणामुळे सुखी आहे ? सदा सर्वदा उपकार करणाऱ्या ईश्वराला विसरून फिरत फिरत तो नऊ द्वारे असलेल्या एका नगरीत प्रविष्ट झाला. ही नगरी म्हणजेच मानवशरीर !

तिथे पोचल्यावर एका सुंदरीशी भेट झाली. पुरंजनाने तिला तिची ओळख विचारली. ती स्त्री म्हणाली, मला माहीत नाही की मी कोण आहे, पण मी तुला सुखी मात्र अवश्य करीन.

पशु जातिभेद मानतात. म्हशीला पाहून बैलाला विकार होत नाही.

लोक गीता वाचतात तर खरी, पण तिला व्यवहारात आणत नाहीत. भगवंत म्हणतात, 'ह्या जाति आणि हे वर्ण मी केले आहेत.' तरी पण आजकालचे सुधारलेले लोक म्हणतात की, आम्ही वर्णाश्रम-व्यवस्थेला मानत नाही. ज्याच्या आचरणांत संयम नाही, सदाचार नाही, धर्मनिष्ठा नाही, प्रभुप्रेम नाही तो सुधारलेला समजावा की बिघडलेला ? त्यांचे आचरण सुधारलेले नसून बिघडलेलेच आहे. सुधारलेले लोक म्हणतात ही स्त्री फार सुंदर आहे. सुंदर असल्यावर मग जात कोणती का असेना.

कुळगोत्राचा विचार केल्याशिवायच पुरंजनाने त्या स्त्रीशी विवाह केला. त्या सुंदरीमधे तो इतका आसक्त झाला की त्याच्या घरी अकराशे मुलांचा जन्म झाला. त्या स्त्रीचे नाव होते पुरंजनी. ती मुले आपसात एकसारखी भांडत राहत.

बुद्धीच पुरंजनी आहे. अकरा इंद्रियांच्या सुखोपभोगाची इच्छा हेच अकराशे पुत्र. एकेकाची शंभर शंभर मुले. या मुलांचे आपसांत युद्ध, याचा अर्थ आहे संकल्प-विकल्पांचा संघर्ष. एक विचार आला नाही तोच दुसरा विचार त्याला दाबून टाकण्याचा प्रयत्न करतो. अकरा इंद्रियांमध्ये हा जीव फसून

गेला आहे. पंचप्राण शरीराचें रक्षण करतात. इंद्रिय सुखोपभोगाचे संकल्प-विकल्प हीच अकराशे अपत्यें. संकल्प-विकल्पाने जीव बंधनांत पडत असतो. बुद्धिगत संकल्प-विकल्प जीवात्म्याला रडवीत असतात.

कित्येक वर्षे पुरंजनाने अशा प्रकारे सुखोपभोग घेतला.

साक्षात काळरूपी मृत्युदेवाची मुलगी जरा हिच्याशी विवाह करण्याची कोणाची इच्छा नसते. पुरंजनाची इच्छा नसतानासुद्धा जरेने त्याच्याशी लग्न लावून घेतले.

जो भोगोपभोगांचे सुख लुटतो त्याला जरेशी अर्थात वृद्धावस्थेशी लग्न करावेच लागते. नेहमी लक्षात ठेवा कीं, म्हातारपण तर केव्हा ना केव्हा येणारच. योग्याला कधीच वृद्धावस्था येत नाही.

नंतर एक दिवस मृत्यूचा सेवक प्रज्वर आला. प्रज्वर म्हणजे अंतकाळचा ज्वर. स्त्रीमधे अत्यंत आसक्त राहणाऱ्या पुरंजनाने अंतकाळी देखील स्त्रीचे चिंतनं करीत करीत देहत्याग केला. परिणामी त्याला विदर्भ नगरांत कन्यारूपाने जन्म घ्यावा लागला.

स्त्रीचे चिंतन केल्यामुळे पुरंजनाला स्त्री व्हावे लागले. ही गोष्ट पुरुषांना सूचित करीत आहे कीं पुरुषांनी स्त्रियांचे अधिक चिंतन करू नये. नाही तर पुढल्या जन्मी लुगडे नेसावे लागेल, कुणाची तरी बायको व्हावे लागेल, संतती होईल. अशा अनेक अडचणी सोसाव्या लागतील की ज्यांच्या कल्पनेनेच अंगावर शहारे येतात.

पुरंजन पुरुष होता. परंतु वारंवार स्त्रियांचे चिंतन करीत राहण्याने त्याला पुढल्या जन्मी स्त्री व्हावे लागले. कोणीही सर्वच जन्मांत स्त्री किंवा पुरुष राहू शकत नाही. वासनेप्रमाणे शरीर बदलत राहते.

पुरंजनाने फक्त तारुण्यांतच पाप केले होतें. बाल्यावस्थेत आणि वृद्धावस्थेंत तर त्याने सत्कर्मेच केली होती. ह्या पुण्यामुळेच त्याचा जन्म एका ब्राह्मण घरांत कन्या रूपाने झाला. विदर्भ देशांत राहणाऱ्या त्या कर्मकांडी ब्राह्मणाच्या घरांत दर्भांचा विशेष उपयोग होत असे. मर्यादाधर्माचे पालन केल्यानंतर तिचा विवाह द्रविड देशांत पांड्य राजाशीं झाला. कर्म करून चित्तशुद्धि झाल्यावर लग्न झाले. द्रविड देश तर महाराणी भक्तीचे माहेरघर. पांड्य राजा अर्थात भक्तपतीशी लग्न झाले.

कर्म करून चित्तशुद्धि झाली तर भक्ति करता येते. लोक समजतात की भक्तिमार्ग सोपा आहे. परंतु हा तर अतिशय कठीण मार्ग आहे. मर्यादाधर्माचे पालन केल्याशिवाय भक्तीचा उदय होत नाही. शेवटी परमेश्वराचा अनुभव करण्यासाठी ज्ञान आवश्यक आहे.

भक्तपतीशी लग्न झाल्यानंतर एक मुलगी आणि सात मुलगे जन्माला आले. कन्या म्हणजे कथाश्रवणांतील, सत्संगांतील रुचि. याप्रकारे भक्तीचा जन्म झाला. सात पुत्र हे भक्तीचे सात प्रकार आहेत– श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य– अर्थात सात प्रकारच्या भक्तीची सिद्धी झाली.

भगवंताच्या नाम, रूप, गुण, प्रभाव लीलांचे कानाने श्रवण, मुखाने कीर्तन आणि मनाने स्मरण केल्यावर अनुक्रमे श्रवण, कीर्तन आणि स्मरणभक्ति सिद्ध होतात. प्रभूची सेवा (पूजा) केल्याने अर्चनभक्ति सिद्ध होते. प्रभूच्या मूर्तीला नमस्कार करीत राहिल्याने वंदनभक्ति सिद्ध होते. या सात प्रकारच्या भक्ति मनुष्य आपल्या प्रयत्नाने प्राप्त आणि सिद्ध करू शकतो. परंतु आठवी सख्य आणि नववी आत्मनिवेदन प्रभुकृपेनेच मिळत असते आणि सिद्ध होऊ शकते.

श्रवणादि सात प्रकारची भक्ति सिद्ध झाल्यानंतर एकदा पतीच्या मरणाने दुःखी झालेल्या त्या कन्येला परमात्म्याने सद्गुरुरूपाने येऊन बोध केला. भक्तीचे सात प्रकार सिद्ध झाल्यावर परमात्मा

सख्याचे दान करीत असतात, आत्मनिवेदनाचे दान करतात.

अर्थात ज्या मित्राला, ज्या अविज्ञाताला हा जीव मायेमुळे विसरून गेला होता, तोच सद्‌गुरुरूपाने आला. याचा अर्थ असा कीं अविज्ञाताच्या रूपाने परमेश्वराने तेथे येऊन ब्रह्मविद्येचा उपदेश दिला कीं, 'तू मला सोडून माझ्यापासून दूर झालास आणि नऊ द्वारे असलेल्या नगरीत राहू लागलास तेव्हांपासून तू दुःखी होत आहेस, तू आपल्या स्वरूपाला ओळख.

लौकिक सुखांत मनुष्य इतका कांही फसलेला असतो की तो आपल्या आत्मस्वरूपाचा विचारच करीत नाही. वास्तविक पाहतां **"तत् त्वमसि।"** तूं तोच आहेस. प्रभू म्हणतात तूं माझाच अंश आहेस, माझेच स्वरूप आहेस. तू स्त्रीपुरुषरूप नाहीस. तू माझ्याकडे पहा.

पुरंजनाने प्रभूला पाहिले. जीव आणि ब्रह्माचे मिलन झाले. जीव कृतार्थ झाला. तू पुरंजन राजा आहेस. तू कित्येक वेळा पुरुष झालास आणि कित्येक वेळा स्त्री. तरी पण तुझी तृप्ति झाली नाही. अजून देखील जगतात कोठपर्यंत आणि किती भटकशील? परमात्म्याचा आश्रय घेऊन त्याचे चिंतन करीत करीत त्याच्या स्वरूपी लीन होशील तरच तू कृतार्थ होशील.

भक्तमालांत अमरवासाची एक कथा आहे. एकदा अमरदासाने आपल्या आईला विचारले. आई, मी तुझ्या लग्नाच्या वेळी कुठे होतो? तर आई म्हणाली, माझ्या लग्नानंतर तुझा जन्म झाला आहे. तर मुलगा म्हणाला, 'आई, तू चुकीचे सांगत आहेस. त्या वेळी मी कुठे तरी होतोच. तो माझा मूळ निवास कोठे आहे?

आमच्या बुद्धीला हे समजत नाही कीं आमचे मूळ निवासस्थान कोठे आहे. म्हणून जीव जगतांत भटकत राहतो.

नारदाने प्राचीन बर्हिराजास पुरंजनाचे आख्यान सांगितले.

विषयांमध्ये जीव इतका फसलेला आहे कीं तो विचारही करीत नाही कीं तो कोण आहे. मग तो परमात्म्याला कसा ओळखू शकेल? आपल्यालाच जो ओळखू शकत नाही तो भगवंताला कसा ओळखील?

याप्रमाणे जीवात्म्याची कथा ऐकून प्राचीन बर्हिराजाला आनंद झाला, आणि म्हणाला की मी आता कृतार्थ झालो आहे. आता मी नुसता यज्ञ करीत राहणार नाही. तो नंतर भगवत्‌चिंतन करीत करीत भगवंतांत लीन होऊन गेला. कथा मनुष्याला आपल्या दोषांचा परिचय करवीत असते आणि त्याला मुक्तही करते.

पूर्वजन्मीचे प्रारब्ध तर भोगायचेच आणि असा प्रयत्न करायचा कीं नवे प्रारब्ध उत्पन्नच न व्हावे. असे पवित्र आणि साधे जीवन जगावे की जन्ममृत्यूच्या चक्रापासून मुक्ति प्राप्त होईल.

आत्मा परमात्म्याचा अंश आहे. जीवात्मा देहाहून भिन्न आहे. जीवात्मा ब्राह्मणही नाही आणि वैश्यादिही नाही. पुरुषही नाही आणि स्त्रीही नाही. आत्मस्वरूपाचे ज्ञान झाले आणि देहाचे विस्मरण झालें तर मनुष्याला जिवंत असताच मुक्ति मिळते.

जगत् नाही असा बोध (अनुभव) मनुष्याला होतो. परंतु आपल्या स्वतःच्या अस्तित्वाचा बोध त्याला होत नाही. अहम्‌चे विस्मरण होत नाही.

दहा हजार वर्षेंपर्यंत प्रचेतांनी नारायण सरोवराच्या काठी जप केला तेव्हांच नारायण त्यांच्यासमोर प्रकट झाले होते.

जपाने मनुष्याची शुद्धि होते. जपाशिवाय जीवन दिव्य होत नाही. रामदासस्वामींनी अनुभवाच्या

आधारे दासबोधांत लिहिलें आहे कीं तेरा कोटी जप केल्याने ईश्वराचे साक्षात् दर्शन होते.

जप पूर्वजन्मींच्या पापाला देखील जाळतो. जपाचे फळ तात्काळ न मिळाले तर असे समजा की पूर्वजन्मीचे पाप अजून शिल्लक आहे आणि त्याचा नाश अजून व्हायचा राहिला आहे. या संबंधांत विद्यारण्यस्वामींचे उदाहरण लक्षात घेण्यासारखे आहे.

विद्यारण्यस्वामी फारच गरीब होते. अर्थप्राप्तीसाठी त्यांनी गायत्रीची चोवीस पुरश्चरणें केली, परंतु अर्थप्राप्ति झाली नाही. म्हणून त्यांनी थकून जाऊन हार मानून संन्यास घेतला. त्यावेळी त्यांना गायत्रीमातेचे दर्शन झाले. माता म्हणाली– मी तुझ्यावर प्रसन्न झाले आहे. काय पाहिजे ते मागून घे.

विद्यारण्यस्वामी म्हणाले– माते, जेव्हा आवश्यकता होती तेव्हां तर तू आली नाहीस! आता तुझी आवश्यकता काय आहे? हं, एवढें मात्र सांग कीं त्यावेळी तू प्रसन्न कां झाली नव्हतीस?

माता म्हणाली– जरा मागे वळून तर पहा.

स्वामींनी मागे पाहिले तर चोवीस पर्वत जळताना दिसले. त्यांनी मातेला विचारले, हे काय कौतुक आहे?

गायत्रीमाता म्हणाली– ही तुझी कित्येक पूर्वजन्मींची पापे आहेत आणि ती तुझ्या तपश्चर्येने जळत आहेत. चोवीस पर्वतांएवढ्या तुझ्या महापापांचा क्षय झाल्यानंतर लगेचच मी आले. जोपर्यंत पापाचा क्षय होत नाही आणि जीवाची शुद्धि होत नाही, तोपर्यंत माझे दर्शन होत नाही.

विद्यारण्यस्वामी म्हणाले– माते, मी आता शुद्ध झालो आहे. मला आता कांहीच मागायचे नाही आणि पुढे त्यांनी पंचदशी नावाचा वेदान्ताचा उत्तम ग्रंथ लिहिला.

भगवान नारायणांनी प्रचेतांना दर्शन देऊन आज्ञा केली की तुम्ही विवाह करा.

विवाह करणे पाप नाही. गृहस्थाश्रम भक्तीत बाधक नाही, साधक आहे. एक-दोन मुले झाल्यावर संयमाचे पालन करा.

हा जीवात्मा कित्येक जन्मांपासून कामवासनेचा भोग घेत राहिला आहे. विवाह केल्याने कामसुखाची सूक्ष्म वासना दूर होते. ईश्वराची माया जीवाला दोन प्रकारे मारीत असते. विवाहितालाही पश्चात्ताप होत असतो आणि अविवाहिताला देखील.

गृहस्थाश्रमाचे वातावरण असें असतें की विषमता करावीच लागते. भगवंतांनी म्हटले आहे कीं रोज तीन तास नियमपूर्वक माझी सेवा-पूजा कराल तर मी तुम्हाला पाप करण्यापासून परावृत्त करीन आणि तुमचे रक्षण सुद्धा करीन.

एकसारखे तीन तास भगवत्-स्मरण केल्याने भगवंत पाप करण्यापासून परावृत्त करतात. पाप करताना मनाला थोडासा खटका लागला तर समजा कीं प्रभूची साधारण कृपा झाली आहे. पाप करण्याची सवयच सुटली तर समजा कीं प्रभूची पूर्ण कृपा झाली आहे. पाप न करणें हेही मोठे पुण्यच आहे. पापाची आई आहे ममता आणि बाप आहे लोभ. त्यांचा अवश्य त्याग करावा.

प्रभुसेवा ही जगाचीच सेवा आहे. प्रभुसेवेवाचून देशसेवा सफल होत नाही. म्हणून रघुनाथाची कृपा संपादन करण्याचा नेहमी प्रयत्न करा.

कोणतेही कार्य बुद्धि आणि शक्तिशिवाय होऊ शकत नाही, आणि बुद्धि आणि शक्ति ईश्वराची आराधना केल्याशिवाय प्राप्त होत नाही.

केवळ परोपकाराने ईश्वराची प्राप्ति होत नाही. परोपकार पुष्कळ वेळा तर ईश्वरप्राप्तीमध्ये बाधकही होतो. भरतमुनींना याचा चांगला अनुभव आला होता. कलाकचा अर्थ आहे तास. प्रहर म्हणजे तीन

तास. कमीत कमी तीन तास प्रत्येक माणसाने जप-स्मरण करावे. भगवंत तुमच्याकडून संपत्ति नाही तर वेळ मागतात. त्यांना वेळ दिलाच पाहिजे.

दुःखाचे कारण आपला स्वभावच आहे. स्वभाव सुधारणें मोठे कठीण कर्म आहे. तीर्थस्नान करून किंवा विष्णुयाग करून स्वभाव सुधारत नाही. परमात्म्याचा ध्यानयुक्त जप करून स्वभाव सुधारतो. अनेक जन्मांपासून हा जीव पाप करीत आला आहे. भगवंताच्या जपामुळे भगवंताची कृपा झाल्यानेच पाप करण्याचा स्वभाव सुटतो.

गृहस्थाश्रमीयांना प्रचेताच्या कथेद्वारें बोध केला आहे.

भगवंत म्हणतात– तुम्ही माझ्यासाठी तीन तास खर्च करा, मी एकवीस तास तुमची काळजी वाहीन. हे जीवा, मी तुला पापापासून वाचवीन.

जो मनुष्य भगवदार्पण बुद्धीनें कर्म करतो आणि ज्याचा वेळ माझ्या कथावार्तांमध्ये जातो त्याच्यासाठी गृहस्थाश्रमी असल्यावर सुद्धा घर बंधनाचे कारण होत नाही. तो या संसारांत फसत नाही आणि हा संसारही त्याला फसवू शकत नाही. नाहीतर गृहस्थाश्रमांत कामासक्ति आणि अर्थासक्ति वाढत असते.

सगळ्यांनाच पूर्वकर्मानुसारच संतति आणि संपत्ति मिळत असते. म्हणून त्याचा हर्ष किंवा शोक करू नये. त्याची चिंता टाकून भगवंताच्या भजनात दंग होऊन जा.

मन शुद्ध झाले म्हणजे समजा कीं प्रभूची कृपा झाली आहे. नाहीतर मनुष्याची वृत्ति तर ऐरणाची चोरी आणि सुईचे दान करण्याची असते. अशी वृत्ति सोडली पाहिजे. आणि **समलोष्ठाश्मकांचन** अर्थात माती, दगड आणि सोने एकसारखे मानण्याची दृष्टि प्राप्त केली पाहिजे. रांका-बांकासारखे वैराग्य असले पाहिजे.

रांका आणि बांका नावाचे पति-पत्नी रस्त्याने जात होते. रांका पुढे होता आणि बांका मागे. रस्त्यांत रांकाने एक सुवर्णहार पाहिला. त्याला वाटले, हार पाहून बांकाची दृष्टि-मति भ्रष्ट होईल, तर तो त्या हाराला मातीने झाकू लागला. असे करताना पाहून बांकाने विचारले, तुम्ही ही माती कशाकरता एकत्र करीत आहात? रांका म्हणाला, तसं तर कांही कारण नाही. पण बांकाला जेव्हां खरी गोष्ट कळली तेव्हां ती म्हणाली, धुळीने धुळीलाच का झाकत आहांत? काय तुमच्या दृष्टीत सोने आणि माती अजूनही दोन भिन्न वस्तू आहेत? असा विचार तुमच्या मनांत कसा राहिला आहे?

तर रांका म्हणाला, तू तर माझ्याही पुढे निघून गेली आहेस! तुझे वैराग्य बांके आहे आणि पत्नीचे नावच बांका पडून गेले.

संताच्या मनांत माती आणि सोने सारखेच असतात. असाच अनासक्तिभाव असायला पाहिजे.

केलेल्या सत्कर्मांना-पुण्यांना विसरून जा, पण केलेली पापे मात्र नेहमी आठवा.

महाभारतांत वर्णन केलेल्या ययाति राजाचे उदाहरण लक्षांत घेण्यासारखे आहे.

आपल्या केलेल्या पुण्याच्या बळावर ययाति राजा सदेह (शरीरासह) स्वर्गांत गेला. त्याला इन्द्रासनावर बसण्याची इच्छा झाली. इंद्र भयभीत होऊन बृहस्पतीकडे गेला आणि सगळी परिस्थिति सांगून मार्गदर्शन विचारले. तर बृहस्पती इंद्रास म्हणाला– तू ययाति राजाला विचार की तू पृथ्वीवर कोणकोणती पुण्ये केली आहेस? आपल्या पुण्याचे वर्णन केल्याने त्या पुण्याचा क्षय होईल.

इंद्राने बृहस्पतीच्या सल्ल्यानुसार ययातीला विचारले. ययातीने आपल्या पुण्याचे वर्णन स्वतःच केले. म्हणून त्या पुण्याचा क्षय झाला आणि परिणामी त्याचे स्वर्गांतून पतन झाले.

नेहमी लक्षात ठेवा कीं आपण केलेल्या सत्कर्मांचे-पुण्यांचे वर्णन स्वतःच केव्हांही करू नका.

षडंगादि वेदांचे ज्ञान असेल, शास्त्रवर्णित विद्या मुखपाठ असेल, कवित्वमय वाणीने सुंदर गद्यपद्य रचण्याची शक्ति असेल, परंतु चित्त हरिचरणांत लागलेले नसेल तर त्या सर्वांना काय अर्थ आहे? कांहीच नाही.

भगवंतांनी प्रचेतांना लग्न करण्याची आज्ञा केली. ते आपल्या घरी गेले. सर्वांची लग्ने झाली आणि सर्वांना एक एक पुत्रही झाला.

सगळेच प्रचेता पुनः नारायण सरोवराच्या काठी आले. त्यांनी नारदांना म्हटले, गृहस्थाश्रमाच्या विलासी वातावरणांत आपलें सर्वज्ञान, आपले लक्ष्य आम्ही विसरून गेलो आहोत. गृहस्थाश्रमांत विषमता ठेवावी लागते आणि त्यामुळे ज्ञानाचे विस्मरण होते. शंकरांनी आणि नारायणांनी आम्हाला उपदेश दिले होते, तेही आम्ही विसरून गेलो आहोत. आपण आम्हाला पुनः उपदेश द्या.

सगळ्या जगाला कोणी कधी खूष करू शकत नाही. जगताला प्रसन्न करणें फार कठीण आहे.

एकदा एक पिता-पुत्र एका घोड्याला घेऊन जात होते. मुलगा बापाला म्हणाला, तुम्ही घोड्यावर बसा, मी पायी चालतो. बाप घोड्यावर बसला. रस्त्यांत कांही लोक म्हणाले, हा बाप काय निर्दय आहे हो! स्वतः घोड्यावर बसला आहे, अन् छोट्या मुलाला उन्हांतून चालवत आहे. हे ऐकून बाप पायी चालू लागला आणि मुलाला घोड्यावर बसविले. पुढे रस्त्यांत आणखी काही लोक भेटले. ते म्हणाले, हा मुलगा काय हो निर्लज्ज! तरुण असून स्वतः घोड्यावर बसला अन् म्हाताऱ्याला पायी चालवत आहे! त्यांचे बोलणे ऐकून दोघेही पिता-पुत्र घोड्यावर बसले. रस्त्यांत पुन्हा कांही लोकांनी म्हटले, किती निर्दय आहेत हे लोक, दोघेही म्हसोबासारखे आहेत आणि छोटयाशा घोड्यावर स्वार झाले आहेत. यांच्या भाराने छोटासा घोडा बिचारा दबून जाईल. त्यांचे बोलणे ऐकले अन् दोघेही पायी चालू लागले, रस्त्यात पुन्हा आणखी कांही लोक म्हणाले, किती मूर्ख आहेत हे लोक! बरोबर घोडा आहे तरीही आपले पायीच चालले आहेत. एक बसला तरी टीका, दोघे बसले तरी टीका, आणि दोघेही पायी चालले तरी वाकडेतिकडे बोलणे ऐकावेच लागते.

जगतांत कसा व्यवहार ठेवावा, कसे वागावे हे कांहीच समजत नाही. परंतु भगवंताला प्रसन्न करणे इतके कठीण नाही. जो परमेश्वराला प्रसन्न करू शकतो तो जगतालाही प्रसन्न करू शकतो. कारण भगवंतच जगाचे उपादान कारण आहे.

रामचंद्र कुटिल लोकांशीसुद्धा सरळ वागत असत. परंतु कृष्ण सरळांशी सरळ आणि कुटिलांशी कुटिल व्यवहार ठेवीत असत.

हा आहे दोघांच्या अवतारांतील भिन्नपणा!

जगताला तर रामचंद्र देखील प्रसन्न करू शकले नव्हते. तर मग सामान्य मनुष्य तो काय करू शकणार? समाजाला राजा नाही, संतच सुधारू शकतील... रामदासस्वामींनी मनाला उपदेश केला आहे, "**बहू हिंडता सौख्य होणार नाही.**" याकरिता जगाला खूष करण्याची वृत्ति आणि इच्छा सोडून ईश्वरालाच प्रसन्न करण्याचा प्रयत्न करा.

प्रभूला प्रसन्न करण्याचे तीन मार्ग नारदांनी चौथ्या स्कंधांत सांगितले आहेत.

जीवमात्राविषयी दया, जे कांही मिळेल त्यांत संतुष्ट, आणि सर्वच इन्द्रियांचा संयम या तीन उपायांनी परमेश्वर लवकर प्रसन्न होतो. या गोष्टी कार्यान्वित करणाऱ्यावर भगवंत कृपा करतात.

सर्वच इन्द्रियांना संयमित करा आणि विषयांमध्ये त्यांना रमू देऊ नका. संयमाशिवाय जीवन

सरळ होऊ शकत नाही.

विष खाऊनच मनुष्य मरतो, त्याच्या चिंतनाने नाही. परंतु उपभोग न करता देखील नुसत्या विषयचिंतनानेच मनुष्य मरू शकतो. अर्थात विषय विषापेक्षा सुद्धा वाईट आहेत. त्यांचा विषासारखाच त्याग करा.

विदुर म्हणाले. मी ऐकले कीं त्याचे मला चिंतन करणे प्राप्त आहे. मीच ईश्वरापासून भिन्न होऊन गेलो आहे, मीच पुरंजन आहे असा विचार करून कथेचे पुनःपुन्हा चिंतन करा. मैत्रेयांनी ही पवित्र कथा विदुराला सांगितली. विदुरांना मुक्ति मिळाली.

प्रचेतांची कथा वक्ता आणि श्रोत्यांच्या पापांना जाळते.

**हरे राम हरे राम, राम राम हरे हरे।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥**

**॥ चतुर्थ स्कंध समाप्त ॥**

• • •

## ॥ श्रीहरिः ॥

# ॥ पंचम स्कंध ॥

**श्रीकृष्णाय नमः॥**

श्री शुकदेव म्हणाले– श्रीमद्भागवताचे कथाश्रवण सात दिवसांत मुक्ति देते.

वक्ता अधिकारी असेल आणि श्रोता सावध राहून कथा ऐकेल तर सांसारिक विषयाविषयी हळू हळू अरुचि होऊन परमात्म्याविषयी रुचि जागृत होते. प्रभूविषयी प्रेमभाव जागृत झाल्यास ही कथा सात दिवसांत मुक्ति देईल. भागवताची कथा श्रवण केल्यानंतरही मुक्ति न मिळाली तर समजावे की पूर्वचित्ति अप्सरा मनांत अजून बसून राहिली आहे.

आता पूर्वचित्ति अप्सरेची कथा ऐका.

पूर्वजन्मांत ज्यांचा उपभोग घेतला होता त्या विषयांची वासना अजून देखील चित्तांत वसत आहे. हेच या पूर्वचित्ति अप्सरेचे स्वरूप होय. जीव आणि ईश्वराच्या मिलनात वासना बाधारूप आहे. माणसाने सुखदुःख भोगून प्रारब्धाचा नाश करावा, परंतु नवे प्रारब्ध उत्पन्न होऊ देऊ नये. मनुष्य याच जन्मात पुढच्या जन्माची तयारी करीत असतो. म्हणून ज्ञानी जन संसर्गदोषापासून दूर राहात असतात.

**१. ज्ञानी परमहंस आणि भागवत परमहंस यांचे जगताकडे पाहण्याचे भिन्न दृष्टिकोण:**

परमहंस ऋषभदेव ज्ञानी आहेत. परमहंस भरतमुनि भगवद्भक्त आहेत.

ज्ञानी पुरुषांना वाटते कीं सांसारिक प्रवृत्ति, ज्ञाननिष्ठा आणि भक्ति यात बाधक आहेत.

सांसारिक प्रवृत्तींना एकदम सोडून देऊ नका, परंतु विवेकाने कमी करीत जा.

परमहंसांची अशी निष्ठा असते की जगात जे कांही दिसते आहे ते सर्व मिथ्या आहे. जगताला मिथ्या मानल्याने वैराग्य उत्पन्न होते. संसाराला सत्य मानल्याने मोह उत्पन्न होतो. जगात जे काही दिसत आहे ते सर्व मिथ्या आहे, परंतु या सर्वांना पाहणारा आत्मा सुखरूप आहे.

दृश्य नाशवंत आणि फळरूप असल्याकारणाने ज्ञानी आपली दृष्टी दृश्यांमध्यें ठेवत नाही. ज्ञानी-जन आपल्या मनाला दृश्य वस्तूंत रमू न देतां या सर्वांचा साक्षी जो परमात्मा त्याच्यामध्ये दृष्टी स्थिर करीत असतात.

मनाला आत्मस्वरूपापासून सत्ता मिळते. मनाची स्वतंत्र अशी सत्ता नाही. आत्मा मनाचा द्रष्टा आहे आणि साक्षी पण आहे. मनाला पाप करण्याची अनुमति केव्हांही देऊ नका.

ऋषभदेव मनाला दृश्यांकडे कधीही जाऊ देत नसत आणि मनाला ईश्वरात असे स्थिर करून ठेवीत असत कीं जेणेकरून मन प्रभूत मिळून जाऊन सुख-दुःखाचा स्पर्शही होऊ नये.

झोपेत मन निर्विषय झालेले असते. निद्रावस्थेंत मन ज्या स्थितींत असते तसे जर जागृत अवस्थेंतही राहील तर समजा की मुक्ती मिळालीच. सगळ्याच विषयांतून मनाला काढावे लागेल.

दृश्यांतून निघून मन द्रष्टयांत मिळून गेले, मनाचा ईश्वरांत लय झाला कीं मुक्ति मिळते.

ज्ञानी पुरुषांना संसार बाधक नसतो. ज्ञानी पुरुष स्वेच्छेने नाही, तर अनिच्छेने व प्रारब्धामुळे जगत असतात.

भगवंताचे भक्त आणि ज्ञानी ईश्वरेच्छा व प्रारब्धामुळेच जगत असतात. या दोन्ही निष्ठा मूलतः एकच आहेत, तरी पण निरनिराळ्या वाटतात. कारण मार्ग निरनिराळे आहेत. ज्ञानी जगताला असत्य समजतात, तर भगवद्भक्त जगाला सत्य मानतात.

ज्ञानी आणि भगवद्भक्त परमहंसांचे लक्ष्य तर एकच असते. परंतु साधने निरनिराळी असतात. ज्ञानी परमहंस जगाला मिथ्यारूपाने पाहतात. भागवत परमहंस जगताला वासुदेवस्वरूपांत पाहतात. भागवत परमहंस म्हणतात की जग मिथ्या नाही तर सत्य आहे; इतकेच नव्हे, तर वासुदेवमय आहे.

श्री शंकराचार्यांनी जगताला मिथ्या मानले आहे. या दोन्ही निष्ठांमध्ये शाब्दिक भेद आहे, तात्त्विक नाही. जगत् असत्य, आणि सगळ्यांचा द्रष्टा ईश्वर सत्य आहे असें ज्ञानी मानतात. वैष्णव भागवत, जगत् हे ब्रह्माचेंच स्वरूप आहे असे मानतात. वेदान्ताचा विवर्तवाद आहे आणि वैष्णवांचा परिणामवाद. ज्ञान्यांचा विवर्तवाद आहे. दुधाने दही बनते पण दही काहीं दूध असत नाही.

भागवत म्हणतात– ईश्वराचा जगत्रूपी जो परिणाम (जन्म) झाला आहे तो दह्याप्रमाणे नसून सुवर्णापासून झालेल्या अलंकारासारखा आहे. सोन्याचा तुकडा सोनेच होता आणि अलंकार झाल्यावरही सोनेच राहिला. सोन्याच्या तुकड्याच्या सोन्यांत आणि अलंकाराच्या सोन्यांत काही फरक होत नाही. जगत् हा ब्रह्माचाच परिणाम आहे आणि सत्य आहे.

श्रीशंकराचार्य यांच्या मतें नामरूप मिथ्या आहे आणि बाकी सर्व सत्य आहे. माती सत्य आहे, घट नाही. याप्रमाणेच जग सत्य नाही. वैष्णव म्हणतात, ब्रह्मरूप जग सत्य आहे. हे लोक जगाला ब्रह्मरूप मानून जगांतील प्रत्येक पदार्थाला ब्रह्मरूप पाहतात आणि जगातील सर्वच पदार्थांवर प्रेम करतात.

ज्ञानी पुरुष जगताला मिथ्या मानून, जगाच्या पदार्थांवर प्रेम ठेवीत नाहीत. ते फक्त ईश्वरावर प्रेम करतात आणि विकार-वासनांना नष्ट करतात. ते म्हणतात, शरीर मलमूत्राने भरलेले आहे आणि या आधारे देहाचा मोह टाकून परमात्म्यांत लीन होतात.

परंतु वैष्णवांना तर सगळे जग ब्रह्मरूप असते.

ज्ञान्याची दृष्टि स्त्रीकडे गेली तर तो समजून घेईल की ही तर हाडामांसाची पुतळी आहे, मलमूत्राने भरलेली आहे. हिच्याशी आपल्याला काय कर्तव्य? अशा विचाराने तो आपली दृष्टि त्या स्त्रीवरून काढून घेईल. जर एखादा वैष्णव एखाद्या स्त्रीकडे पाहील तर तो तिला, ती साक्षात लक्ष्मी आहे असे मानील.

ज्ञानी परमहंसांचा मार्ग साधारण गृहस्थांसाठी थोडा कठीणच म्हटला पाहिजे. वैष्णवांचा मार्ग आपल्यासारख्यांना सोपा आहे. जगताला ब्रह्मरूप समजणे सोपे आहे. जे दृष्टिगोचर होत आहे त्याला मिथ्या समजणे कठीण कार्य आहे. कोणत्याही वस्तूकडे तिरस्काराने पाहण्यापेक्षा, प्रत्येक वस्तूला भगवतभावाने निर्विकार होऊन वंदन करणे जास्त चांगले आहे.

महाप्रभू म्हणतात, प्रत्येक पदार्थ श्रीकृष्णाचा अंश आहे. म्हणून जगत् सत्य आहे.

परंतु खंडनमंडनाच्या अशा संघर्षापासून दूरच राहणे चांगले. नाहीतर रागद्वेष वाढण्याची शक्यता

असते. ज्ञानी परमहंस ज्ञानाने उपदेश देत असतो तर भागवत परमहंस क्रियेने उपदेश देतो. जड भरताप्रमाणे त्याचें प्रत्येक कर्म उपदेशरूप असते.

सूत " इकडे लक्ष द्या " असें सांगून म्हणाले की,

ऋषभदेव आदर्श ज्ञानी परमहंस आहेत, तर भरत आदर्श भागवत परमहंस. सर्वकांही त्यागून ऋषभदेव पागल झाल्यासारखे होऊन जगांत भ्रमण करीत. सर्वांमधे ईश्वराचा भाव ठेवून भरत सर्वांचीच सेवा करीत होते. भरत म्हणतात, **' मैं सेवक सचराचर, रूप स्वामी भगवंत. "**

ऋषभदेवांना देहाध्यासच नाही. ते आदर्श ज्ञानी परमहंस आहेत. पहिली यांचीच कथा येईल. ऋषभावतार ज्ञानाचा आदर्श स्थापन करण्यासाठी आहे.

पंचम स्कंध भागवताचे ब्राह्मण अर्थात भाष्य किंवा व्याख्यारूप आहे.

द्वितीय स्कंधांत गुरूंनी साधन दिले आणि त्यानंतर ज्ञान दिले. ज्ञान आचरणांत कसे आणावे हे तृतीय आणि चतुर्थ स्कंधांत सर्ग-विसर्ग लीलेद्वारें दाखविले.

**२. ज्ञान कशारीतीने स्थायी करावे? प्रियव्रत व ऋषभदेवांची उदाहरणे:**

आता प्रश्न हा आहे कीं ज्ञान कशा रीतीने स्थायी करावें? ज्ञान स्थिर करण्याची-स्थायी करण्याची रीत पंचम स्कंधाच्या स्थितिलीलेंत दाखविली आहे. स्थिति अर्थात प्रभूचा विजय. सर्व चराचर प्रभूच्या मर्यादेंत आहे.

परीक्षित राजे आरंभीं प्रश्न करतात: मनूचा पुत्र प्रियव्रत राजाची विवाह करण्याची इच्छा नव्हती, तरी पण त्याने विवाह कां केला? गृहस्थाश्रमांत असतानाच त्याने सिद्धि कशी मिळविली? कशा प्रकारें कृष्णाच्या चरणीं त्याची भक्ति दृढ झाली?

शुकदेव वर्णन करीत आहेत.

घर भक्तींत बाधारूप आहे. घरांत गृहस्थाला पक्षपात करावा लागतो. गृहस्थ सगळ्यांशी समभाव ठेवू शकत नाही. तो शत्रू, मित्र, चोर, शेठ इत्यादी सर्वांशीच एकसारखे वर्तन ठेवू शकत नाही.

श्रीकृष्णाचा गृहस्थाश्रम असा होता कीं ते सर्वांशीच समभावाने वागत. एकदा दुर्योधन त्यांच्याकडे मदत मागायला आला. तसा तर त्याने कांही दिवसांपूर्वी त्यांचा अपमान केलेला होता. आणि तरीही निर्लज्ज होऊन तो साहाय्य मागायला आला होता. सामान्य गृहस्थ आपला अपमान विसरत नाही, परंतु श्रीकृष्ण दुर्योधनाला मदत करायला तयार झाले. अर्जुन देखील साहाय्य मागायला आला होता. दुर्योधन म्हणाला, मी अर्जुनाच्या आधी आलो आहे, म्हणून मागण्याचा पहिला अधिकार माझाच आहे.

श्रीकृष्ण म्हणाले: मी तर तुम्हा दोघांनाही साहाय्य करीन. एकाच्या पक्षाला माझी नारायणी सेना असेल आणि दुसऱ्याच्या पक्षाला निःशस्त्र असा मी.

दुर्योधनाने विचार केला कीं कृष्ण तर गोष्टीच करत राहतील आणि मला तर युद्ध करणाऱ्यांची आवश्यकता आहे, गोष्टीवेल्हाळांची नाही. त्याने नारायणी सेना मागून घेतली. अर्जुनाने कृष्णाला मागून घेतले.

अशा रीतीने श्रीकृष्णाने अर्जुन आणि दुर्योधन दोघांवरही समभाव ठेवला. श्रीकृष्ण गृहस्थाश्रमी नाहीत. आदर्श संन्यासी आहेत.

गृहस्थाश्रमी झाल्यावर भक्तीच्या कार्यांत कांही ना कांही बाधा उपस्थित होतच असते. म्हणून प्रियव्रताने विचार केला कीं या व्यवहाराचा मला त्यागच केला पाहिजे.

परमार्थांत अभेदबुद्धि आणि व्यवहारांत भेदबुद्धीचा वापर करावा लागतो. व्यवहार भेदभाव जागृत करतो. भेदभाव असल्यावर काम, क्रोध इत्यादी विकार उत्पन्न होतात. ज्ञानी पुरुष सर्वांनाच अभेदभावाने पाहतात. व्यवहार आणि परमार्थ एक करणें कठोर कसरत आहे. भेदभावामुळे व्यवहारांत वैर आणि असमानता उत्पन्न होतच असते. म्हणून ज्ञानी जन सगळ्याच प्रवृत्तींचा त्याग करून एकांतांत भक्ति करतात.

घरांत भक्ति होत नाही, कारण अनेक विक्षेप येत राहतात. तुम्ही गृहत्याग करून गंगाकिनारी जाऊ शकत नाही, म्हणून म्हणावे लागते की घरांतच राहून भजन करा. जीव जेव्हां प्रभूशी एकरूप होतो तेव्हांच साक्षात्कार होऊ शकतो. एकांतांत आराधना केल्याने हें शक्य होते.

प्रियव्रत राजाला इच्छा झाली कीं एकांतांत ईश्वराची आराधना करावी. तिथे ब्रह्मदेवाने येऊन राजाला सांगितले– ' प्रारब्ध भोगावेच लागते. मी देखील परमात्म्याच्या आज्ञेने प्रारब्ध भोगत आहे. मला सुध्दा प्रवृत्तीची इच्छा नाही, तुला इतक्यांत वनगमन करण्याची आवश्यकता नाही. सावध राहून व्यवहार कर. जितेन्द्रिय तर घरांत राहूनच ईश्वराची आराधना करू शकतो आणि जो जितेन्द्रिय नाही तो वनांत देखील प्रमादच करील.

स्त्री-पुत्रांचा त्याग करून वनांत जाऊन देखील भरताने तेथे संसार वसविला होता. भरत वनांत भटकत राहिला. प्रल्हादाने दैत्यांबरोबर राहून, अनेक प्रकारचे कष्ट सहन करून घरांतच भक्ति केली.

भागवत सगळ्यांसाठीच आहे– गृहस्थासाठी आणि वनवासीयांसाठी देखील भागवताची कथा मार्गदर्शक आहे. असें नाही कीं फक्त गृहत्याग करणाऱ्यालाच भगवान भेटतात. पवित्र आणि सदाचारपूर्ण जीवन जगणाऱ्याला घरांत राहूनही भगवंत भेटतात. घरांतील वातावरण प्रतिकूल असून देखील प्रल्हादाने घरांत राहून भक्ति केली आणि भगवंताचें दर्शन केलें.

आपल्या जीवनाचे लक्ष्य निश्चित करणें फार आवश्यक आहे. लक्ष्य ध्यानांत ठेवूनच जीवनाचे व्यवहार केले पाहिजेत. मानवजीवनाचें लक्ष्य आहे प्रभूप्राप्ति.

प्रल्हादाने प्रतिकूल परिस्थिती असूनही भक्ति केली. उलटपक्षीं घराला बाधारूप समजून गृहत्याग केल्यावर भरत वनवासांत भक्ति करू शकले नाहीत. मनुष्य कोठेही जावो, पंचविषय तर बरोबर येतीलच. घरांत राहूनच भक्ति करायची असेल तर प्रल्हादाचा आदर्श दृष्टीसमोर ठेवा आणि वनवासी होऊन भक्ति करायची असेल तर भरताचे चरित्र डोळ्यांसमोर ठेवा.

जीवाच्या मागे सहा चोर लागलेले आहेत. ते सहा चोर आहेत– काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर. या विकारांना जो वश होत नाही त्याच्यासाठी घर बाधारूप नाही.

गृहस्थाश्रम एक किल्ला आहे. प्रथम त्यांत राहूनच लढणें उत्तम आहे. हे सहा शत्रू तर वनांत देखील बरोबर येऊन त्रास देत असतात म्हणून त्या शत्रूरूपी विकारांना हरवायचे आहे. या सहा शत्रूंचा विजेता गृहस्थ असून देखील वनवासीसारखाच असतो. गृहस्थाश्रमीं राहून या सहा विकारांना ठेचणे सोपे आहे.

सुखी व्हायचे असेल तर आपल्या चाळीसाव्या वर्षापासून संसारातील व्यवहारांचा हळूहळू त्याग करू लागा आणि एकावन्नाव्या वर्षीं वनगमन करा.

ब्रह्मदेव राजा प्रियव्रताला सांगतात: तू विवाह कर. विवाह केल्याशिवाय विकारवासना नष्ट होऊ शकणार नाहीत. कांही काळ संसारसुखाचा उपभोग घेतल्यानंतर परमात्म्याची आराधना कर. व्यवहार कर, पण असा कर कीं पुनर्जन्माचे बीजारोपण होणार नाही. रागद्वेषरहित केलेला व्यवहार मनुष्याला

मुक्ति देत असतो. जीवनमुक्त पुरुष शारीरिक अभिमानरहित होतो. तो वासना ठेवीत नाही. म्हणून त्याला दुसरा देह मिळत नाही.

आज्ञा झाल्यावर प्रियव्रताने विवाह केला. त्याच्या घरी अनेक अपत्यें जन्माला आली. प्रियव्रतानंतर आग्निघ्राने शासन सांभाळलें.

तो तपश्चर्या करण्यासाठी वनांत गेला. त्याच्या तपांत पूर्वीची वासना-पूर्वचित्ति विघ्ने उत्पन्न करू लागली.

चित्तांत राहिलेली पूर्वजन्मीची वासनाच पूर्वचित्ति आहे. भोगलेल्या विषयसुखाचें स्मरण आणि त्याच्यामुळें मनांत वसत असलेली सूक्ष्म वासना हीच पूर्वचित्ति आहे. पूर्वीची वासना लवकर सुटू शकत नाही. इंद्रियांना मिळालेले सुख ती पुनःपुन्हा मागत राहील. अशी वासना जागृत झाल्यावर मनाला समजवावे लागेल कीं तू आजपर्यंत किती तरी सुखोपभोग घेतलास, तरी पण तृप्ति झाली नाही का? जोपर्यंत विषयांचें आकर्षण आहे तोपर्यंत विषयेच्छा नष्ट होत नाही. विषयांचे आकर्षण नष्ट झाल्यावर विषयेच्छा नष्ट होते. सांसारिक विषयांमधे जोपर्यंत रुचि राहील, तोपर्यंत तो जीव ज्ञान-भक्तीच्या मार्गांत पुढे जाऊ शकत नाही. पूर्वचित्ति सर्वांनाच सतावीत असते. पूर्वचित्तीचा अर्थ आहे पूर्वीचे संस्कार. निवृत्ति झाल्यावरही पूर्वीच्या वासनेचे स्मरण होत राहणे म्हणजेच पूर्वचित्ति होय.

आग्निघ्र राजा पूर्वचित्तिमधे अडकलेला आहे.

आग्निघ्राच्या येथे नाभि झाला. नाभीच्या येथे पुत्ररूपाने ऋषभदेव झाला. ऋषभदेव ज्ञानाचे अवतार होते. ज्ञानी परमहंसांचा व्यवहार-वर्तन कशाप्रकारचे असते हे दाखविण्यासाठी भगवंतांनी ऋषभदेवाच्या रूपाने जन्म धारण केला. ते जगाला ज्ञानी परमहंसाचा आदर्श दाखवू इच्छित होते. ऋषभाचा अर्थ आहे सर्वश्रेष्ठ.

ऋषभदेव पुनःपुन्हा उपदेश करतात कीं मानवजीवन भोगण्यासाठी नसून तपश्चर्येसाठी आहे. तप करा आणि सर्वांमधे ईश्वराला पहा. विषयसुखांतच मानवशरीराचा दुर्व्यय करू नका.

जगांत ज्ञानी परमहंसांनी कसे राहिले पाहिजे हे दाखविण्यासाठी ऋषभदेवांनी सर्वसंगपरित्याग आणि सर्वस्वाचा त्याग केला. अनेक सिद्धि त्यांच्या जवळ आल्या तरी पण ते त्यांत फसले नाही.

गृहस्थासाठीं धनत्याग आणि कामसुखाचा त्याग जितका कठीण आहे त्याच्यापेक्षा महात्म्यांसाठी सिद्धींचा त्याग जास्त कठीण असतो.

ऋषभदेव नग्न अवस्थेंतच फिरतात, उभ्याउभ्याच जेवतात, बैलासारखा भाजीचा आहार करतात. कोणी त्यांना मारले-बडवले तर शरीरच मार खात आहे असें समजतात. मी शरीराहून निराळा आहे, ब्रह्मनिष्ठ आहे. सगळेच जाणत असतात कीं शरीराहून आत्मा निराळा आहे, परंतु याचा अनुभव तर फार थोडेच करू शकतात.

श्रीफळांत-नारळांत आंतील खोबऱ्याचा गोळा आणि वरील कवटी एकच नसून जोपर्यंत आंत पाणी असते तोपर्यंत ते एक दुसऱ्यापासून वेळवेगळे होत नाहीत. त्याचप्रमाणे जोपर्यंत मनुष्याला विषयांमध्ये रस आहे, विषयांची आसक्ति आहे तोपर्यंत शरीर आणि आत्म्याच्या भिन्नतेचा अनुभव होऊ शकत नाही. शरीर आवरण आहे, आत्मा गोळा आहे, विषय-रस पाणी आहे. संसारांतील कोणत्याही वस्तूमध्यें जोपर्यंत रस आहे तोपर्यंत शरीर आणि आत्म्याच्या भिन्नतेचा अनुभव होत नाही.

शारीरिक उपभोगांमध्यें आनंद नाही. आत्माच आनंदरूप आहे.

नामरूपाचा मोह जोपर्यंत सुटत नाही तोपर्यंत आत्मा आणि देहाची भिन्नता समजत नाही; याउलट

देहाध्यास वाढतच जातो. सांसारिक जड पदार्थांशी अतिस्नेह केल्याने जडाध्यास देखील वाढतोच.

वैराग्याशिवाय ब्रह्मज्ञान स्थायी होत नाही. ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी करणारा पण पैसा आणि प्रतिष्ठेविषयीं आवड असणारा खरा ज्ञानी नसतो. खरा ज्ञानी तर तोच कीं जो ईश्वरावर प्रेम करतो. ईश्वराविना सांसारिक जड पदार्थांशी स्नेह जडला कीं, तो शरीराहून भिन्न अशा आत्म्याला पाहू शकत नाही. ब्रह्मज्ञान झाल्यावर देखील जर सांसारिक विषयांविषयीं मोह राहील तर त्याला ब्रह्मानंद मिळणार नाही. ब्रह्मानंद मिळाल्यानंतर ईश्वराविषयीं भक्तिप्रेम उत्पन्न झाले तरच ब्रह्मानंद मिळतो.

ज्ञानी पुरुषाला अत्यंत आवश्यक आहे कीं त्याने कोणत्याही वस्तूविषयी आसक्ति ठेवू नये, कोणत्याही वस्तूचा संग्रह करू नये. हा मनुष्यजन्म तप करण्यासाठी आहे. मनुष्य-देहाने तप केल्यामुळे अंतःकरण शुद्ध होते. अंतःकरण शुद्ध झाले म्हणजे अनंत ब्रह्मसुखाची प्राप्ति होते.

महापुरुषांची सेवा मुक्तीचें द्वार आहे. कामासक्तांचा संग नरकद्वार आहे.

या मृत्यूरूप संसारांत फसलेल्या इतर लोकांचा उद्धार करण्यास जो असमर्थ आहे असा गुरु, गुरु नाही; असा स्वजन, स्वजन नाही; असे मातापिता, मातापिता नाहीत. अर्थात असा मनुष्य गुरु, स्वजन, माता, पिता होण्यास अपात्र आहे.

### ३. ज्ञानाच्या सात भूमिका :

योगवासिष्ठ रामायणांत ज्ञानाच्या सात भूमिका या प्रकारे सांगितल्या आहेत :– १) शुभेच्छा २) सुविचारणा ३) तनुमानसा ४) सत्त्वापत्ति ५) असंसक्ति ६) पदार्थभाविनी आणि ७) तुर्यगा.

**१) शुभेच्छा**— आत्मकल्याणाच्या हेतूने श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ गुरूंना शरण जाऊन त्यांच्या उपदेशानुसार शास्त्रांचे अवलोकन-अध्ययन करून आत्मविचार आणि आत्म्याच्या साक्षात्काराची उत्कट इच्छा करणें ही शुभेच्छा आहे.

**२) सुविचारणा**— सद्गुरुकथित उपदेश, वचनें आणि मोक्षशास्त्राचें वारंवार चिंतन आणि विचार करणें हीच सुविचारणा होय.

**३) तनुमानसा**— श्रवण, मनन आणि निदिध्यासाने शब्दादि विषयांविषयीं जी अनासक्ति होते आणि सविकल्प समाधीच्या अभ्यासाने बुद्धीला जी तनुता-सूक्ष्मता प्राप्त होते ती तनुमानता होय.

**४) सत्त्वापत्ति**— उपर्युक्त तिन्हींद्वारा साक्षात्कारापर्यंतची स्थिति अर्थात निर्विकल्प समाधिरूप स्थिति म्हणजे सत्त्वापत्ति. ज्ञानाच्या या चौथ्या भूमिकेवरचा पुरुष ब्रह्मविद् म्हटला जातो.

**५) असंसक्ति**— चित्तविषयक परमानंद आणि नित्य अपरोक्ष अशा ब्रह्मात्मक भावनेचा साक्षात्काररूपी चमत्कार म्हणजे असंसक्ति. यात अविद्या आणि कार्यांचा संबंध येत नाही म्हणून हीस असंसक्ति म्हटलें आहे.

**६) पदार्थभाविनी**— पदार्थांची जी दृढ अप्रतीति होते तीच पदार्थभाविनी.

**७) तुर्यगा**— उपर्युक्त क्र. ४, ५ व ६ या तीनही अवस्थांपासून मुक्त होणें म्हणजे तुर्यगा होय. ब्रह्माला ज्या अवस्थेंत आत्मरूप आणि अखंड जाणले जाते तीच तुर्यगा.

या सात भूमिकांपैकीं पहिल्या तीन साधनकोटींतल्या आहेत, आणि बाकीच्या चार ज्ञानकोटींतल्या आहेत. तीन भूमिकांपर्यंत सगुण ब्रह्माचें चिंतन करावे. ज्ञानाच्या पाचव्या भूमिकेवर पोचल्यावर जड आणि चेतनाची ग्रंथि सुटून जाते. आत्म्याचा अनुभव होऊ लागतो, आत्मा शरीराहून भिन्न आहे, या भूमिकांमधे उत्तरोत्तर देहभान विसरले जाते आणि शेवटी उन्मत्त स्थिती प्राप्त होते. ऋषभदेवांनी अशी

स्थिती प्राप्त केली होती. देहांत असूनही विदेही अवस्था त्यांना प्राप्त झाली.

ज्ञानी लोक देखील इंद्रियांना भीत असतात. ते इंद्रियांवर विश्वास ठेवीत नाहीत. मनाचा केव्हांही विश्वास करू नका. बोलण्याची इच्छाच होऊ नये म्हणून ऋषभदेव आपल्या तोंडांत दगड ठेवीत.

तारुण्यांतच वैराग्य प्राप्त झालें नाही, सांसारिक विषयांविषयी अरुचि होऊ शकली नाही तर प्रभु-भक्ति प्राप्त होत नाही. विषयांविषयीं जोपर्यंत वैराग्य जागृत होणार नाही तोपर्यंत भक्तीचा आरंभ होत नाही.

डोळ्याला मन शक्ति देते. मनाला बुद्धि शक्ति देते आणि बुद्धीला परमात्मा शक्ति देतो. डोळ्याला मनाची साथ नसली तर वस्तु दिसायची नाही.

ऋषभदेव कर्नाटकांत आले. दावाग्नींत बुद्धिपूर्वक प्रवेश केला. "देह जळतो पण आत्म्याला कांहीच होत नाही" अशी आत्मनिष्ठा परमहंसांचीच असते. ऋषभदेवांचे चरित्र सामान्य माणसास अनुकरणीय नाही.

**४. भरत राजाची कथा :**

ऋषभदेवांचा सर्वात मोठा मुलगा होता भरत. याच भरताच्या नावावरून आपल्या देशाचें नांव भरतखंड पडले. ऋषभदेवांनंतर भरताने शासन सांभाळले. त्यांची कथा वर्तमानकाळासाठी विशेष उपयोगी आहे. भरत महाभागवत आहेत. त्यांच्या संगतीने सर्वांमध्येच भागवतभाव जागृत होत असे. त्यांच्या संगतींत येणारे भक्तिरंगांत रंगून जात.

भरतांनी व्यवहारमर्यादांचे कधीच उल्लंघन केले नाही. ते महावैष्णव असूनही यज्ञ करीत असत. अग्नि हे देवाचें मुख आहे. प्रत्येक देवाला इष्ट देवाचेच स्वरूप मानून, इतर देवांना कृष्णाचाच अंश मानून पूजा करीत. अनेक यज्ञ करून त्याचे सारे पुण्य 'श्रीकृष्णचरणीं' अर्पण करीत.

कर्मफळ परमात्म्याला अर्पण कराल तर आनन्द येईल. कर्मफळ प्रभूला अर्पण केल्याने कर्माचा अभिमान नष्ट होतो. ईश्वरावर अत्यधिक प्रेम करा. तरच केलेल्या कर्माचें पुण्य परमात्म्याला अर्पण करू शकाल. पत्नी श्रम करते आणि त्याचें फल देते आपल्या पतीला.

कर्म करा पण कर्माच्या फळाची इच्छा धरू नका. कर्मफळ उपभोगाची इच्छा ठेवाल तर कर्माचे अल्पसेच फळ मिळेल. पण जर ते कर्मफळ देवाला अर्पण कराल तर त्याची अनंत फळे मिळतील. सकाम कर्माची भागवतांत अनेक जागी निंदा केलेली आहे. सकाम कर्मांत कांहीं चूक झाल्यास क्षमा मिळत नाही. भरत निष्काम भावाने कर्म करीत आणि त्याचें पुण्य श्रीकृष्णाला अर्पण करीत.

भरतांना तरुणपणीच एक दिवस वैराग्य प्राप्त झाले. ज्याला यौवनांतच वैराग्य प्राप्त होते आणि जो संयम करून भजनवृत्ति वाढवतो त्याला वृद्धावस्थेंत परमेश्वरप्राप्ति होते. वृद्धावस्थेंत शारीरिक अशक्तीमुळे तुम्हाला भक्ति करता येणार नाही. तपश्चर्या यौवनातच केली जाते. वृद्धावस्थेत तपश्चर्या केल्याने पुढचा जन्म सुधारेल. शरीर दुर्बल झाल्यावर ब्रह्मचर्यपालनाला अर्थ राहात नाही. प्रभू रामचंद्र युवावस्थेंतच वनांत गेले होते. वनवासाच्या वेळीं त्यांचे वय सत्तावीस वर्षांचे होते आणि सीता अठरा वर्षांची. रामचंद्रांनी यौवनातच रावणाला मारले होते. तुम्ही सुद्धा आपल्या युवावस्थेंतच कामरूपी रावणाचा नाश करा.

वृद्धावस्थेंत येणारे वैराग्य खरें वैराग्य नसते. यौवनातच वैराग्याची परीक्षा होते. ज्याच्याजवळ काहीच नाही तो त्याग करील तर त्याला कांही अर्थ नाही. यौवनांत सुखसंपत्ती असूनही विषयसुखांत मन न रमेल तर तेच खरें वैराग्य म्हणता येऊ शकते.

भरताचें मन घरांत रमले नाही. राजवैभव, सुख-संपत्ति, स्त्री, संपत्ति, पुत्र इत्यादी सर्वच आहे, परंतु डोळे मिटल्यावर यापैकीं कांहीच राहात नाही. जन्माच्या पूर्वी जीवाचा कोणीच नातेवाईक नव्हता. मेल्यानंतर देखील कोणी नातेवाईक राहणार नाही. प्रारंभी आणि अंतीं कोणी नव्हते. मायाच मधे भ्रमवीत असते.

भरत विचार करीत आहेत कीं सांसारिक सुखांचा उपभोग तर मी अनेक वर्षें घेतला. आता विवेकपूर्वक त्यांचा त्याग करीन. त्यांनी तरुणपणी बुद्धिपूर्वक त्याग केला. विषयांना अनिच्छेने बळे बळे सोडावे लागले तर दुःख होते. परंतु विषयांचा समजून उमजून स्वेच्छेने त्याग केल्याने शांति प्राप्त होते. जर विषय आम्हाला सोडून जातील तर अशांति होते. परंतु जर आम्ही त्यांना स्वतः सोडू तर शांति मिळते.

परमात्म्याने ज्या सहा वस्तूंमधे माया ठेवल्यामुळे मन फसते त्या ह्या होत :– १) भोजन २) द्रव्य ३) वस्त्र ४) स्त्री ५) घर आणि ६) पुस्तक. यांत पहिल्या चार प्रधान आहेत आणि अन्य दोन गौण. यांत स्त्रीची निंदा नाही. कामसुखाची निंदा आहे.

ईश्वराची माया विचित्र आहे.

भरतमुनींनी राज्याचा त्याग केला, राण्यांचा त्याग केला. सर्वस्वाचा त्याग करून वनांत आले. वनांत एका मृगशावकाशी स्नेह जडला आणि आपल्या मनांत त्याला जागा देऊन बसले. ह्या आसक्तीमुळे त्यांचे भजन-ध्यान इत्यादी खंडित झालें आणि त्यांना मृगयोनींत जन्म घ्यावा लागला.

म्हणून आपल्या घरांत इच्छा होईल त्याला ठेवा, पण मनांत मात्र कोणालाही स्थान देऊ नका. मनांत कोणाला स्थान द्याल तर तो प्रभुभजनांत बाधारूप होऊन राहील. जगतांतील कोणत्याही पदार्थाशी इतका स्नेह ठेवू नका कीं तो स्नेह तुमच्या प्रभुभक्तींत बाधा आणील.

भरतमुनींच्या मनांत मृगशावकासाठी ज्या आसक्तीनें जन्म घेतला तीच त्यांच्यासाठी पुनर्जन्मालाही कारण झाली. संकल्प ( वासना ) पुनर्जन्माला कारण होत असतो. मनांत इतर कोणत्याही वस्तूचा प्रवेश झाल्याबरोबर मनमोहन तिथून निघून जातात.

श्रीरामकृष्ण परमहंस म्हणत असत कीं, संसारांत नावेसारखे राहिले पाहिजे. पाण्यावर राहिल्याने नाव तरंगत राहील, परंतु जर नावेत पाणी आले तर ती बुडून जाईल. ह्याचप्रकारे तुम्ही संसारांत रहा, पण संसाराला तुमच्यांत राहू देऊ नका. अर्थात निर्लेपभावाने संसारांत रहा. शरीर नाव आहे, संसार समुद्र आहे आणि विषय पाणी आहे.

विषयांचे चिंतन करीत राहिल्याने आत्मशक्ती नष्ट होते. ममता बंधनकारक आहे. मन मेल्यावरच मुक्ति मिळते. बंधन मनाचें असते; आत्म्याचें नाही. आत्मा तर मुक्तच आहे.

घर सोडण्याची आवश्यकता नाही. घरांत सावध होऊन राहायचे आहे. प्रतिकूल परिस्थितींत देखील प्रल्हाद घरांतच राहिले आणि त्यांच्या भक्तींत कोणी बाधा उत्पन्न करू शकले नाही आणि वनातील एकांतांतही भरतमुनि मृगशावकावर आसक्त झाले आणि भजन करू शकले नाहीत.

प्रतिकूल संयोगांत, प्रतिकूल वातावरणांत भजन कसे करावे हे प्रल्हादानें जगाला दाखविले आणि अनुकूल वातावरण असूनही मनुष्य सावध राहिला नाही तर तो भजन करू शकत नाही, असे आपण भरताच्या उदाहरणावरून समजू शकतो.

घरांत सामावलेल्या वस्तू भजनांत बाधारूप नाहीत, परंतु मनांत घर करून राहिलेल्या वस्तू बाधारूप आहेत.

गृहत्यागी महात्म्यांना माया कशी सतावते हे ही कथा स्पष्ट करते. भरतमुनींनी विचार केला की एकांतात बसून मी ईश्वराची आराधना करीन. ते नेपाळात गंडकी नदीच्या किनारी आले. तेथे ते आदिनारायण भगवंतांची आराधना करू लागले.

ईश्वराशिवाय इतर कोणाचाही संग भजनांत विक्षेप आणील. ज्याला तप करायचे आहे त्याने एकट्यानेच तप करावे. नेहमी अशी कल्पना करा कीं मी एकटाच नसून माझे भगवंत माझ्याबरोबर आहेत. ईश्वराशिवाय इतर कोणाचा संग ठेवाल तर दुःखी व्हाल.

भरत एकटेच तप करायला गेले होते. गंडकीचे दुसरे नांव आहे शालिग्रामी. भरताचा नित्य नियम होता. ते चार वाजता ब्राह्ममुहूर्ती स्नान करीत. कटिभर पाण्यांत उभे राहून सूर्यनारायणाचे ध्यान आणि गायत्रीचा जप करीत.

सूर्यनारायणाच्या कृपेने बुद्धि उज्ज्वल होते. म्हणून आम्हाला त्यांची उपासना केली पाहिजे. सूर्यनारायणांच्या उपकारांसाठी आम्ही त्यांचे ऋणी आहोत. ते जगाला सतत प्रकाश देत असतात. त्यांचा उदय न झाला तर जगांत प्रलय होईल. सगळ्या स्थावरजंगमाचा आत्मा सूर्य आहे. सूर्यनारायण सगळ्यांनाच प्रकाश देतात. परंतु ते विजेच्या कंपनीप्रमाणे बिल पाठवीत नाहीत. ते रविवारची सुटीही घेत नाहीत. ज्या दिवशी ते सुटी घेतील त्या दिवशी प्रलय होईल. सूर्य परमात्म्याचे साकार स्वरूप आहे.

मनुष्य आणि कावळ्यांत एकदा भांडण झाले. त्यावेळी कावळा माणसाला म्हणाला, 'तसा तर तू माझ्यापेक्षा बुद्धिशाली आहेस, परंतु तुझ्यापेक्षा आमच्यांत एक गुण जास्त आहे. आम्ही सूर्योदयापूर्वीच झोपेचा त्याग करीत असतो.' सूर्योदयापूर्वीच स्नानादि करून सूर्याला अर्घ्यदान करा. रात्री अकरा वाजल्यानंतरचा काळ राक्षसकाळ म्हटला गेला आहे. ह्या निषिद्ध काळी भोजन करू नका. आजकाल तर लोक सिनेमा पाहिल्यानंतर रात्री अकरा वाजता जेवतात. असे करणे ठीक नाही.

सूर्य, चंद्र, समुद्र ईश्वराच्या मर्यादेचे उल्लंघन करीत नाहीत. हे मानवा, परमात्म्याच्या मर्यादेचे पालन करण्यासाठी तुला सुखसमृद्धि दिली गेली आहे.

भरत प्रार्थना करतात– माझी बुद्धि, माझे मन, कोठे दुर्मार्गी न होवो. भगवंताच्या तेजोमय रूपाचे मी चिंतन करतो.

अर्थ आणि ज्ञान लक्षात घेऊन जप करा.

शुकदेव वर्णन करतात–

राजन्, भरत द्वारकाधीशांची मानसपूजा करू लागले. प्रत्यक्ष सेवा तर खूप केली होती, म्हणून आता मानससेवा करू लागले.

मानसपूजा सोपी नाही.

जास्त करून पाप शरीराने नाही, तर मनानेच होते. म्हणून मनाने ध्यान करणे आणि मानसपूजा करणे श्रेष्ठ आहे. ईश्वराशी मनाने तन्मय होणे म्हणजेच मानससेवा होय.

एकदा एक वाणी गोस्वामीजवळ जाऊन म्हणाला, 'महाराज, मी प्रभुसेवा तर करू इच्छितो, परंतु एकही पैसा खर्च न करता सेवा (पूजा) करता येईल असा मार्ग सांगा.

गोस्वामींनी मानसपूजेचा मार्ग सांगून म्हटले की, तू मानसपूजा खर्चाशिवाय करू शकशील. फक्त मनानेच संकल्प करीत रहा कीं मी भगवंताला स्नान घालीत आहे, वस्त्र नेसवीत आहे, पूजा करीत आहे, नैवेद्य दाखवीत आहे, भगवंत जेवण करीत आहेत, इत्यादी.

मग गोस्वामींनी त्याला विचारले, तुला भगवंताचे कोणते रूप अधिक प्रिय आहे?

वाण्याने उत्तर दिले— मला तर बाळकृष्णाचे स्वरूप जास्त प्रिय आहे.

गोस्वामी म्हणाले, 'प्रातःकाळी अशी कल्पना कर की भगवंतासाठी यमुनेचे पाणी आणले आहे. घरी आल्यावर असा भाव जागृत करावा की कृष्ण स्नान करीत आहेत. यशोदेचा भाव आणून बालस्वरूपाची सेवा करावी. बालसेवेत वात्सल्यभाव मुख्य आहे. नैवेद्यासाठी दूध आणि लोणी आणावे. नंतर बाळकृष्णाला मंगलगीत गाऊन जागवावे.

यशोदा बाळकृष्णाची समजूत घालीत असे की एवढे लोणी खाशील तर तुझे केस दाऊजीपेक्षा लवकर वाढतील!

उष्णोदकाने बाळकृष्णाला मांगलिक स्नान घालावे. त्याचा शृंगार करावा. कृष्णाला विचारावे, आज तू कोणता पीतांबर नेसशील? तो म्हणेल तो पीतांबर नेसवावा. शृंगार करण्यात तन्मयता झाल्यावर ब्रह्मानंदासारखा आनंद होतो.

कन्हैयाला नैवेद्य दाखवून कल्पना करावी की तो नैवेद्य खात आहे. नंतर आरती करून क्षमा प्रार्थना करावी.

गोस्वामींनी सांगितल्याप्रमाणे वाणी श्रीकृष्णाच्या बालस्वरूपाची मानसपूजा करू लागला. दररोज नियमितपणे मानसपूजा करीत होता. तो इतका तन्मय होऊ लागला की सर्व वस्तू प्रत्यक्ष दिसू लागल्या. अशा पूजेत मनाचा प्रवाह खंडित होता कामा नये. कोणताही लौकिक विचार आला तर समजावे की पूजा खंडित झाली आहे. बारा वर्षेपर्यंत त्याने मानसपूजा केली.

एके दिवशी त्याने दूध आणले आणि त्यांत साखर घातली. परंतु त्याला वाटले की कृष्णाच्या दुधांत आज जास्त साखर पडली आहे. वाण्याला हे कसे सहन होऊ शकेल? स्वाभाविक कृपणता कशी नाहीशी होईल? प्राण आणि प्रकृति तर बरोबरच जातात. त्याने विचार केला की आवश्यकतेपक्षा जास्त साखर दुधात पडली आहे ती काढून घ्यावी, दुसऱ्या कामी उपयोगात येईल. आता तेथे तर ना दूध होते ना भांडे ना साखर! कारण ती तर मानसपूजाच होती ना! तरी पण तन्मयतेमुळे त्याला ह्या सर्व वस्तू प्रत्यक्ष दिसत होत्या. म्हणून मनांतल्या मनांत कल्पनेने तो साखर काढू लागला.

कृष्णाने विचार केला, कसे का असेना, याने माझी बारा वर्षेपर्यंत मानससेवा केली आहे म्हणून त्यांना प्रकट व्हायची इच्छा झाली. बाळकृष्ण प्रसन्न झाले होते. त्यांनी प्रकट होऊन वाण्याचा हात धरला आणि म्हणाले, जास्त साखर पडली तर काय झाले?. तू एकही पैसा तर खर्च केला नाहीस!

भगवत्स्पर्शामुळे तो वाणी खरोखरीचा वैष्णव होऊन गेला. तो भगवंताचा अनन्यसेवक झाला.

बारा वर्षेपर्यंत जे काही सत्कार्य नियमपूर्वक केले जाईल त्याचे फळ अवश्य मिळते. श्रीशंकराचार्य सुद्धा श्रीकृष्णाची मानसपूजा करीत असत.

भरतमुनी देखील मानसपूजा करता करता तल्लीन झालेले आहेत. पूजा करता करता थकले कीं ध्यान आणि कीर्तन करू लागत.

प्रभूच्या मागे जो लागतो त्यालाच माया त्रास देते. सांसारिक विषयांमध्ये जो फसलेला आहे त्याला माया त्रास देत नाही. कारण मायेला माहीत असते की हा तर मेलेलाच आहे, मग मेलेल्याला आणखी का मारावे? माया समजत असते की तो तर माझा बंदी आहेच. मायेची चाल फार विचित्र आहे.

कमरेपर्यंतच्या पाण्यांत भरत उभे होते. ग्रीष्मऋतू होता. एक गर्भवति हरिणी सकाळी पाणी

पिण्यासाठी आली. इतक्यांत कोठून तरी सिंहाने गर्जना केली आणि त्यामुळे ती हरिणी भयभीत झाली. तिने विचार केला की गंडकी नदी पार करून जावे. जोराने एक उडी मारली. प्रसवकाळ जवळच आलेला होता. म्हणून हरिणी प्रसूत होऊन बालक नदीच्या पाण्यांत पडले. पलीकडच्या किनाऱ्यावर हरिणी मरून पडली.

भरताने त्या मृगशावकाला नदीच्या पाण्यात पडलेले पाहिले. त्यांनी त्या बालकांतही श्रीहरीचे दर्शन केले. त्यांनी विचार केला की याच्या आईचा तर मृत्यू झालेलाच आहे तेव्हा या जगात आता याचे कोणी राहिलेले नाही. आता याचे लालनपालन, रक्षण कोण करील? दयार्द्र बुद्धीने त्यांनी त्या बच्च्याला आपल्या आश्रमांत नेले.

त्यांना वाटू लागले की हा बच्चा माझ्याशिवाय तर आणखी कोणाला ओळखतच नाही. याचे पालनपोषण करणे आता माझाच धर्म आहे. मी याची उपेक्षा केली तर हा मरून जाईल. मीच याचा बाप आहे आणि मीच याची आई. याचे पालनपोषण, रक्षण करणे माझेच कर्तव्य आहे. त्यांनी विचार केला, 'मीच या मृगशावकाचा रक्षक बाप आहे. म्हणून हरप्रकारे मला याचे रक्षण करणे प्राप्त आहे.'

जीव समजत असतो की मी इतरांचे रक्षण करतो. अरे, तू काय रक्षण करशील? तू देखील काळाचा घास आहेस. रक्षण करणारा तर तो प्रभूच आहे. कर्ताहर्ता तर श्रीहरीच आहे. पालक आणि संहार करणाराही श्रीहरीच आहे. तुम्ही घरात रहा नाही तर वनांत, तुमचे रक्षण करणारा श्रीहरीच आहे.

भागवताच्या सातव्या स्कंधाच्या दुसऱ्या अध्यायांतील चाळीसाव्या श्लोकांत यमराजाने सुयज्ञ राजाच्या नातेवाईकांना हा उपदेश केला होता.

जर परमेश्वराची कृपा असेल तर जो अनाथ असेल किंवा वनवासीही असेल तरी जिवंत राहतो आणि परमेश्वराकडून मारला गेलेला जीव घरात सुरक्षित असल्यावरही जिवंत राहात नाही, मरतोच.

मृगशावकाला पाण्याच्या बाहेर काढण्याचा भरताचा धर्म होता. परंतु त्यांनी रक्षक बाप बनण्याचे जे नाते जोडून घेतले ते चांगले केले नाही. जीवमात्राचा रक्षक बाप तर परमेश्वरच आहे. सगळेच दोष अभिमानामुळेच उत्पन्न होत असतात.

भरत त्या मृगशावकाचे लालनपालन करू लागले. हळू हळू तो मोठा झाला. भरत त्याला आपल्या मांडीवर बसवीत आणि त्याच्याबरोबर खेळत राहात.

भरतांनी आपल्या पूर्वावस्थेंत लहान मुलांचे लालनपालन केलेलें होतें. ही पूर्वचित्ति अप्सरा तेथे आली. जुन्या संस्कारांना विसरणे फार कठीण काम आहे. सूक्ष्म संस्कार मनांत अजूनपर्यंत वसलेले होते. म्हणून त्यांचे मन त्या हरीणीच्या बछड्यांत अडकून गेले. आता त्यांचे मन प्रभुभजनांत स्थिर होत नव्हते. ध्यानांत प्रत्येक पांचसहा क्षणानंतर ते मृगशावकच दिसू लागले. वासनेचा विषय तर बदलला, पण वासना मात्र मनांत राहूनच गेली. अशा परिस्थितीपेक्षा घरच्या आयुष्यांत काय वाईट होते? ज्ञात्याला मनाला देखील मारावे लागते.

भरतांनी त्या हरीणीच्या बछड्याला घरांत ठेवले हे ठीकच केले, पण त्याला जे मनात ठेवले ते ठीक केले नाही.

संसार सोडून कुठे जाल? जिथे कुठे जाल तिथेच संसार उत्पन्न होईल. यासाठीच महापुरुषांनी म्हटले आहे की संसाराला आपल्या मनातून हळू हळू हटवा. संसाराला मनांत केव्हाच ठेवू नका. कोणाला वाटल्यास घरात ठेवा, परंतु मनात ठेवू नका. मनांत एक काम तरी ठेवा नाहीतर मग फक्त

ईश्वरालाच. दोन्हीही बरोबर राहू शकणार नाहीत. भजन आणि भक्तींत बाह्य संसार नाही, तर आंतील संसारच बाधारूप आहे.

तो मृगशावक भरताच्या कुटीतच केवळ नाही, तर मनातही राहू लागला. त्यांनी घर, राज्य, पत्नी, संतान इत्यादी सर्वांचा त्याग केला खरा, पण शेवटी ते त्या बछड्याच्या मायेत फसले.

परोपकाराच्या भावनेचा अतिरेक साधकाला त्याच्या साधनेत बाधक होतो. परोपकाराच्या भानगडीत फार फसून जाऊ नये. तसे तर परोपकार करण्याचा सगळ्यांचाच धर्म आहे, परंतु परोपकार असा करू नये की ज्यामुळे प्रभूचे विस्मरण होईल. संसारांत मनुष्याने कपटी होऊ नये, परंतु अगदी सरळही राहू नये. परमात्म्याचे कदाचित ध्यान होऊ शकले नाही तरी काही हरकत नाही, परंतु जगातील स्त्री, पुरुष, जड वस्तूंचे ध्यान केव्हाही करू नये. शत्रू मित्र होत नसतो, पण मित्र केव्हाही शत्रू बनू शकतो.

भरताचे प्रारब्धच मृगशावकाच्या रूपाने समोर आले. प्रारब्ध तर भोगावेच लागते. ज्ञान झाल्यानंतर वासना नष्ट झाली नाही तर ज्ञान दृढ होत नाही. ज्ञानाला दृढ करण्याकरता प्रथम वासनेला नष्ट करणे आवश्यक आहे. वासनेत मन फसलेले आहे. भरत तसे तर महाज्ञानी आहेत. परंतु ज्ञान झाल्यावरही जर मन वश झाले नाही तर ज्ञान स्थिर होऊ शकत नाही. जोपर्यंत ज्ञानी, मन आणि वासना यांचा नाश करू शकत नाही तोपर्यंत त्याच्या भक्ति आणि ज्ञानांत स्थिरता येत नाही. वासनेच्या आवेगांत पुष्कळ वेळा ज्ञान वाहून जाते. जो वैराग्यावाचून गृहत्याग करतो तो वनात जाऊनही नवा संसार उभारतो. भरत ज्ञानी तर आहेत पण वासनेला ताब्यात नाही ठेवू शकले. घरात राहूनच वैराग्याची पूर्ण प्राप्ति झाल्यावर मग गृहत्याग करावा.

ज्ञानी पुरुषाचे दोन प्रकार आहेत. ज्याने खूपच उपासना केली आहे तो कृतोपास्ति ज्ञानी आहे. त्याला माया त्रास देत नाही. परंतु जो अकृतोपास्ति ज्ञानी आहे त्याला माया विघ्नकर्ती आहे. वासनेच्या नाशाशिवाय तत्त्वानुभव होत नाही. वासनेचा नाश केल्याशिवाय तत्त्वज्ञान प्राप्त झाले तरी ब्रह्मनिष्ठा होत नाही. भरतचरित्र याचे उदाहरण आहे.

भरतांना अजूनपर्यंत अपरोक्ष साक्षात्कार झाला नव्हता. जर हा साक्षात्कार झाला असता तर त्यांचे मन हरणाच्या बालकांत अडकले नसते.

भरत आता दिवसेंदिवस त्या बछड्याच्या लालनपालनांत व्यग्र राहू लागले. परिणामी संध्यापूजा इत्यादी नित्यकर्मे सुटू लागली. भरत त्याला हिरवे कोवळे गवत खाऊ घालीत. तो चतुरंग उडे, नाही तर भरतमुनींचे पाय चाटी तेव्हा भरतांना वाटे कसा सुंदर आणि शहाणा आहे हा!

दिवसेंदिवस ही आसक्ति वाढूच लागली. एक दिवस तो बछडा खेळत बागडत दाट जंगलात निघून गेला तो रात्र झाली तरी परत आला नाही. मुनींना काळजी लागली की माझ्या बछड्याचें काय झाले असेल? केव्हा परत येईल?

काळाला कोणाचीच दया येत नाही. काळ नेहमी सज्ज असतो.

मृत्यु केव्हाही हा विचार करीत नाही की याने आपले कार्य पूर्ण केले आहे किंवा नाही. म्हणून प्रत्येक क्षणी सावध राहा. मृत्यूसाठी नेहमी तयार रहा. जीवन अशा प्रकारे जगले पाहिजे की तुम्ही सावध असताच मृत्यु यावा. कुठे असे न व्हावे, तुमची तयारी नाही अन् मृत्यूने तुम्हाला उचलून न्यावे.

भरतांना नेण्यासाठी काळ आला. भरतांना मृगशावकाचे स्मरण झाले. त्यांनी श्रीहरीच्या स्मरणाऐवजी मृगशावकाचे चिंतन करीत देहत्याग केला. या मृगशावकाच्या लालनपोषणाने भरतांना

आत्मस्वरूपाचे विस्मरण झाले. मृत्यूच्या वेळी मृगशावकाचेच चिंतन करीत राहिल्याने त्यांना पुढल्या जन्मी मृगाचेच शरीर मिळाले. अंत्यसमयीचें पशूचिंतन त्यांना पशूयोनींत घेऊन गेले.

मनुष्य पुढल्या जन्माची तयारी अर्थात पुनर्जन्माची तयारी आपल्या ह्याच जन्मात करीत असतो. या जन्मांत बी पेरलें जातें, पण फळ मिळत नाही. पूर्वजन्मात केलेले तप नष्ट होत नाही. पूर्वजन्मात केलेले भजन व्यर्थ जात नाही. याच कारणानें भरतांना मृगशरीराच्या जन्मातसुध्दा पूर्वजन्मीचे ज्ञान होते.

पशुपक्ष्यांचा अनादर कधी करू नका. पूर्वजन्मीचा एखादा साधुमहात्मा पशु-पक्षी बनून तुमच्या दारीं आला असला तर? अहिल्येसारखी एखादी महासती दगड होऊन आली असेल तर! मृगराजा सरडा होऊन आले होते. आणि नलकुबेर वृक्ष बनून आला होता. कोणी सिध्द पुरुष वृक्ष होऊन आला असला तर! एखाद्या आत्म्याच्या हातून एखादा अपराध झाला असेल तर तो पशु-पक्ष्यांच्या योनीत भ्रमण करतो.

भरत मृगाच्या स्वरूपात भटकत आहेत. त्यांना पूर्वजन्मीचे ज्ञान आहे. त्यांना जाणवते आहे की मी याच गंडकी नदीच्या किनारी तपश्चर्या करीत होतो. याच जागी मी हरीणबाळाला उचलून घेतले होते आणि त्याला मी आपल्या आश्रमांत नेले होते. त्याच्याविषयी मला अत्यंत आसक्ति झाल्यामुळेच मला मृगयोनीत जन्म घ्यावा लागला. मी मागे केव्हा महाज्ञानी होतो, योगी होतो, पण आज चतुष्पाद बनलो आहे. आता मला नवे प्रारब्ध कमवायचे नाही. जे मी बरोबर आणले तेवढेच सहन करून भोगायचे आहे.

हे मृगबाळ (भरत) नदीत स्नान करीत आहे. झाडाची वाळलेली पाने खात आहे. ते गवत खात नाही; कारण त्यावर जंतू असतात. हिंसा झाली तर नवे प्रारब्ध निर्माण होईल. या मृगशरीरांत देखील ते एकादशीचे व्रत करीत होते. प्राचीन काळी भारतात पशू देखील एकादशीचे व्रत करीत असत. आजकाल तर पुष्कळशी माणसे देखील एकादशीचे व्रत करीत नाहीत.

**५. भरत राजाचा ब्राह्मणाच्या येथे पुनर्जन्म व नवे जड-भरत चरित्र:**

मग भरतांनी मृगदेहाचाही त्याग करून एका ब्राह्मणाच्या येथे जन्म घेतला.

मानवी जीवन अत्यंत विलासी होऊन गेले आहे. पूजा, संयम, सदाचार, भगवद्भक्ति वाढल्यावरच संतांचा जन्म होतो. विलासी मातापित्यांच्या येथे संतांचा जन्म होत नाही. संत, जन्म घेण्यासाठी सुपात्र शोधत असतात.

पवित्र ब्राह्मणाच्या घरी भरतांचा जन्म झाला. भरतांचा हा शेवटचा जन्म होता. त्यांना पूर्वजन्मीचे ज्ञान आहे की हरणाच्या मायेत फसल्यामुळेच त्यांना पशूचा देह धारण करावा लागला होता. पूर्वजन्मी हरणाबरोबर गोष्टी बोलत असे, म्हणून पशू व्हावे लागले. आता तर ह्या जन्मांत कोणाशीच भाषण करणार नाही. एकदा चूक झाली. आता मात्र मी सावध राहीन.

बाळपणापासूनच भरत भक्तीच्या रंगांत रंगलेले आहेत.

शास्त्राने शेवटच्या जन्माची काही लक्षणे दाखविली आहेत. बालपणापासूनच जर त्याला भक्तीचा रंग लागला असेल तर समजा की त्याचा हा शेवटचा जन्म आहे. ज्याच्या बुध्दीने कामाचा त्याग केला असेल त्याचा देखील तो शेवटचा जन्म समजावा. जोपर्यंत बुध्दीत काम आहे तोपर्यंत समजावे की त्याला अजून जन्म घेणे शिल्लक आहे.

प्रत्येक वस्तूंत जो भगवंताला पाहील, त्याचा तो जन्म शेवटचा आहे. जिथे कुठे दृष्टी जाईल तिथे एखाद्याला भगवंतच दिसत असतील तर त्याचाही तो जन्म अंतिम आहे. हृदयाने दीन आणि अभिमानरहित व्यक्तीचा देखील तो जन्म अंतिम समजावा.

जडभरताचा हा शेवटचा जन्म होता. एक हसत हसत कैदी होतो तर दुसरा रडत रडत. साधारण व्यक्ति (जीव) वासनेच्या आधीन होऊन संसारांत येतो, तर संत भगवद् इच्छेने भगवद्कार्यासाठी जगात येतात.

पर-मन आणि पर-धन आकर्षित करणारी व्यक्ति जगाच्या दृष्टीने चतुर असते, परंतु ही कला तर एका सामान्य स्त्रीलाही सहजसाध्य आहे. सांसारिक दृष्टीने संत जड असतात. परंतु आनंदमय चेतन अशा प्रभूला विसरून सांसारिक सुखात अडकलेला मनुष्य तर खरोखरीच जड आहे. प्रभुप्रेमांत मस्त, देहभानाने अज्ञात अशा महापुरुषाला जड कसे म्हणावे? परंतु जगाच्या विपरीत मान्यतेमुळे संसारी लोकांनी भरताचे नाव जडभरत ठेवून दिले.

लोक भरताला मूर्ख समजतात, तर भरत म्हणतात, लोक मला मूर्ख म्हणतात यात वाईट काय आहे? पूर्वजन्मात ज्ञानाचे प्रदर्शन करू लागलो तर दुःखी झालो. ज्ञान दुसऱ्यांना उपदेश देण्यासाठी नसून ईश्वराची आराधना करण्यासाठी आहे.

ज्ञान भोगण्यासाठी नाही, परमेश्वरासाठी आहे.

श्रीशंकराचार्यांनी म्हटले आहे: ज्ञान, धन किंवा प्रतिष्ठा कमविण्यासाठी नाही. परमात्म्याच्या प्राप्तीसाठी आहे. ज्ञानाचे फळ धन आणि प्रतिष्ठा नाही, परमेश्वर आहे. ज्ञान परमेश्वराशी एकरूप होण्यासाठी आहे.

जडभरताने विचार केला की पूर्वजन्मी पशूंबरोबर वाग्व्यवहार केला होता म्हणून त्या जन्मांत पशूचा जन्म मिळाला. तेव्हा आता या जन्मांत कोणाशीच मी बोलणार नाही. जर आता बोलेन तर फक्त प्रभूशीच.

वाणी आणि पाण्याचा दुरुपयोग करणारा मनुष्य ईश्वराचा अपराधी आहे. अंतकाळी वाणी त्याचा विश्वासघात करीत असते.

मीराबाईने देखील निश्चय केला होता की गोष्टी करीन तर फक्त आपल्या गिरिधर गोपाळाशी – श्रीकृष्णाशीच. मी तर आपल्या गिरिधर गोपाळालाच आपलासा करीन. सांसारिक लोक किंवा नातेवाईकांना आपलेसे करून काय लाभ होणार?

जडभरत कोणाशीच बोलत नसत.

अति बोलण्याने स्नेह उत्पन्न होतो. तसे तर या सृष्टींत ईश्वराने एकेका कार्यासाठी दोन दोन इंद्रिये दिली आहेत. एकाच डोळ्याने पाहता येऊ शकते तरी दोन डोळे दिले आहेत. परंतु एका जिभेला दोन कामे करावी लागतात- बोलण्याचे आणि खाण्याचे. म्हणून जिभेवर जास्त अंकुश ठेवण्याची आवश्यकता आहे.

दुसऱ्यांशी गोष्टी करण्याने, प्रेम करण्याने वासना उत्पन्न होते. वैर आणि वासनेने नवे प्रारब्ध उत्पन्न होते म्हणून पुन्हा जन्म घ्यावा लागतो.

जडभरत सर्व तऱ्हेने मनावर अंकुश ठेवीत असत. तुम्हाला स्वतःलाच आपल्या मनावर अंकुश ठेवावा लागेल. तुमच्या मनावर दुसरा कोण अंकुश ठेवू शकेल?

रामदासस्वामींनी म्हटले आहे की अतिशय भटकंती करून शांति मिळू शकत नाही.

जडभरताचे वडील त्याला शिकवू लागले आणि त्यांच्या मनात विचार आला की शिकून-वाचून माझा मुलगा पंडित होईल. परंतु त्यांचे पांडित्य निराळेच होते. त्यांचे पांडित्य खरे होते.

भरतांना तसे सर्व प्रकारचे ज्ञान तर आहे, पण मंत्रोच्चार चांगल्या प्रकारे करता येत नाहीत. ते आपले ज्ञान प्रसिध्द करू इच्छित नव्हते.

जडभरत भगवंताच्या स्मरणांतच लीन राहात असत. जीव संसारवृक्षापासून वेगळा होऊ शकतो.

मातापित्यांनी शरीराचा त्याग केला आणि जडभरत वेड्यासारखे फिरू-भटकू लागले. वेड्यासारखे दिसायचे खरे, पण ते एक क्षणभर सुध्दा श्रीकृष्णाला विसरत नसत.

जेवण कसे करावे हेही जडभरताने दाखवून ठेवले आहे.

स्वादाची अपेक्षा न ठेवता, केवळ शरीराच्या पोषणासाठीच काय ते जेवण घेतले पाहिजे. जडभरताचे भाऊ त्यांना कुटलेले तीळ, धान्याचा कूट, सडलेले उडीद इत्यादी खायला देत असत ; तर त्या वस्तू देखील अमृततुल्य मानून ते खात असत.

कशा प्रकारे चालावे हेही जडभरताने दाखविले आहे. कोणाही जीवाची हिंसा होणार नाही अशा सावधानतेने रस्ता पाहून ते चालत. जमिनीवर दृष्टी ठेवून चालले पाहिजे. नेहमी लक्षांत असू द्या की कोणत्याही जीवाची हिंसा न होवो.

भरत दुसऱ्यांची कामे देखील करीत. भावाने त्यांना शेताच्या चारी बाजूला पाळ बनवायला सांगितले. भरतांनी विचार केला की आज मी हे काम केले तर उद्या दुसरे काम करायला लावतील. म्हणून त्यांनी पाळ बांधायच्या जागी खड्डाच करून ठेवला.

एक दिवस भावाने शेताची देखरेख करायला सांगितले तर भरतांनी शेतात गाईंना चरायला सोडून दिले. भरत गाईंना अडवत नसत.

जगाच्या समोर जणू काही ते पागल आहेत असे नाटक करीत होते. ज्ञानी पुरुषांच्या ध्यानांत लोकसंग्रह बाधारूप आहे. सांसारिक व्यवहाराची कोठे माया लागू नये या हेतूने ते नारायण परमात्म्याची आराधना करीत एक दिवस ते शेतात बसलेले होते.

एक भिल्ल राजा निपुत्रिक होता. त्याने नवस केलेला होता की जर संतान झाले तर मी भद्रकालीला नरबलीची भेट चढवीन. पुत्राचा जन्म झाला. राजाने आज्ञा दिली की एखाद्या नराला घेऊन या. राजसेवकांनी जडभरताला त्या शेतात बसलेला पाहिले. त्यांनी विचार केला, हा चांगला धष्ट-पुष्ट आहे. ह्यालाच आपण पकडून न्यावे.

सांसारिकांच्या दृष्टीने संत वेडे असतात आणि संतांच्या दृष्टीने संसारसुखांत फसलेले लोक वेडे असतात.

त्या भिल्ल राजसेवकांनीसुध्दा वेड्या भरताला वेडेच मानले होते. त्यांनी त्याला वेडा समजून भद्रकालीच्या मंदिरांत आणले.

मातेश्वरीला बळी द्या पण कोणत्याही जीवाचा नाही. काम, क्रोध, लोभ इत्यादी दुर्गुणच पशू आहेत. त्यांचेच बलिदान करा. देवी भागवतांत बलिदानाचा हाच अर्थ सांगितला आहे.

भरताला स्नान घातले गेले, फुलाची माळ घातली, आणि जेवायला उत्तम पक्वान्ने दिली.

जेवण करणे पाप नाही पण स्वाद घेऊन जेवणे पाप आहे. जेवण साधन आहे आणि भजन साध्य. भरत जेवण करीत असत पण त्यांचे जेवण भजनासाठी होते.

भिल्लांना वाटले होते की दोन मासांनंतर तर यालाच मरायचे आहे, तरी पण हा मोठ्या आरामाने

भोजन करीत आहे.

यानंतर भरताला मंदिरांत नेण्यात आले.

संतांची परीक्षा त्यांच्या मनोवृत्तीच्या आधारे होऊ शकते, जटादाढीने नाही. जडभरताने मनातल्या मनात मातेश्वरीला नमस्कार केला आणि डोके नमवून शांतचित्ताने बसून राहिले. भिल्ल राजाने भद्रकालीची प्रार्थना केली आणि तलवार घेऊन बलिदान द्यायला तयार झाला.

सर्वांविषयी समभाव असलेल्या भरतांना पाहून मातेश्वरीचे हृदय भरून आले. तिच्याकडून ही हिंसा पाहवली नाही. भद्रकाली मूर्ति फोडून तांतून प्रकट झाली आणि तिने भिल्ल राजाची तलवार घेऊन त्याचेच डोके कापून काढले आणि त्याचा चेंडू करून खेळू लागली.

ज्ञानी भक्ताला विश्वास असतो की सहस्रबाहू भगवंत त्याचे रक्षण करण्यासाठी उभेच आहेत. दोन हातांचा मनुष्य काय रक्षण करू शकेल? ज्ञानी भक्त देवीला फार प्रिय असतात. ज्ञानी पुरुष एक क्षणभर सुध्दा आपल्या मनाला ईश्वरापासून वेगळे होऊ देत नाही. त्यांची दृष्टी ब्रह्ममय असते.

**६. रहुगण राजा जडभरताला आपल्या पालखीला जुंपतात, अंती त्यांचे शिष्य होतात:**

कोण्या एके काळी सिंधुदेशाचा राजा रहुगण कपिल मुनींपाशी ब्रह्मज्ञान मिळविण्यासाठी निघाला. तत्त्वज्ञानाची विद्या मिळविण्यासाठी तो कपिल ऋषींच्या आश्रमाकडे पालखीत बसून जात होता. पालखी उचलणाऱ्या चार सेवकांपैकी एक कुठेतरी पळून गेला. तर राजाने सांगितले की, जो कोणी दिसेल त्याला पकडून घेऊन या.

वैष्णवजन तर भगवंताच्या इच्छेनेच जगत असतात. ज्ञानी जन अनिच्छेने प्रारब्धाकडे पाहतात, तर वैष्णवजन ह्यांत भगवद् इच्छेचे दर्शन करतात.

साधकासाठी स्पष्ट आज्ञा आहे की त्याने दृष्टी चार हाताच्यापुढे जाऊ देऊ नये. दृष्टी चंचल झाली तर मनही चंचल होत असते.

पालखी उचलण्यासाठी राजसेवकांनी जडभरताला धरून आणले. म्हणाले, हा चांगला तगडा आहे म्हणून ठीक काम करील. त्यांनी पालखी उचलली. आजपर्यंत कित्येक वेळा स्वतःच जे पालखींत बसलेले होते, तेच भरत आज पालखी उचलत आहेत. तेच त्यांचे प्रारब्ध होते. प्रारब्ध भोगावेच लागते. शेवटचा जन्म असून देखील पालखी उचलावी लागली आहे. भरत खाली पाहून चालत आहेत. "कुठे माझ्या हातून एखाद्या जीवाची हिंसा न होवो". त्यांना तर प्रत्येकच जीवांत भगवंताचे दर्शन होत आहे.

भरताचा विचार चालू आहे की आता तर माझे थोडेसेच प्रारब्ध आहे. मरेल तर माझे शरीरच. मी तर नारायणाला जाऊन मिळेन. मला सावध राहिले पाहिजे.

बेसावध राहूनच काम, क्रोध, लोभ इत्यादी डोक्यावर चढून बसतात. निर्भय व्हा. जीव जेव्हा सतत परमात्म्याच्या सान्निध्याचा अनुभव घेतो तेव्हाच खरी निर्भयता येत असते.

भरत रस्त्यांत देखील प्रभूला विनवीत चालत असत.

मनाला शुध्द करण्याची भरताची आतुरता वाढवून भगवंत अदृश्य होऊन गेले. भगवंताचे दर्शन न झाल्यामुळे भरत व्याकुळ होतात आणि रडू लागतात. मला जगात भटकत राहायचे नाही. नाथ! मला आता केव्हा आपल्या पायाशी घ्याल? माझे प्रारब्ध केव्हा संपेल? अजून देखील मला परमेश्वराचे दर्शन का होत नाही? त्या विचारांनी ते रडू लागतात.

रस्त्यांत मुंगी दिसली तर भरत उडी मारतात. असे केल्याने पालखीच्या वरच्या भागास राजाचे डोके आपटते. राजाने सेवकांना सांगितले— नीट चला, मला त्रास होत आहे. त्या जुन्या सेवकांनी सांगितले, आम्ही तर ठीकच चालत आहोत, परंतु हा नवा सेवक ठीक रीतीने चालत नाही. केव्हा थांबतो, केव्हा धावतो, केव्हा उडीच मारतो, तर केव्हा हसतो, रडतो सुध्दा. हा वेडाच आहे. हाच त्रास देत आहे.

राजाने जडभरतास वक्रोक्तिने म्हटले— तू तर अगदी अशक्त आहेस! तुझे हात-पायही किती दुबळे आहेत! तेव्हा तू चांगल्या रीतीने कसा चालू शकशील?

रहुगणाने विचार केला की 'आता मी भरतावर लक्ष ठेवीन' भरत विचार करतो की वाटेत एखादा जीव चिरडला गेला तर मला पाप लागेल. भरत मुंगीत सुध्दा श्रीकृष्णच पाहतात. कृष्ण काही एका विशिष्ट घेऱ्यांतच राहात नाहीत. सर्वत्र दूरवर-सगळ्या जीवांमधे जो श्रीकृष्ण पाहील तोच वैष्णव आहे.

जडभरताने राजाच्या सांगण्याकडे लक्ष दिले नाही. पुन्हा एकदां मुंगीला पाहून भरताने लांब उडी घेतली. तर राजाचे डोके वरच्या दांड्याला पुनः आपटलें. राजाला हे सहन झाले नाही. तो अतिशय संतापला. रागावून जडभरताचा अपमान करू लागला— "अरे, तू तर जिवंत असतानाच मेलेला आहेस. तुला काही भानच नाही. चांगल्या रीतीने चाल."

राखेत दडलेला विस्तव ज्याप्रमाणे दिसून येत नाही, त्याचप्रमाणे ब्रह्मचिंतनांत लीन असलेला ज्ञानी ओळखला जाऊ शकत नाही.

पुनः एकदा राजाचे डोके आपटलें तेव्हां तो चांगलाच रागावला आणि म्हणाला, 'मी रहुगण राजा आहे, तुला दंड करीन'.

राजाकडून एकही पैसा घेतलेला नाही की काही त्याचेकडून खाल्लेले नाही. तरी भरताला मारायला राजा तयार झाला. त्याला मारायचा राजाला काय अधिकार? राजा अहंकारी होता. तो मदांध झाला होता.

भरताची काहीदेखील बोलण्याची इच्छा नव्हती. त्याने विचार केला— शरीर पुष्ट आहे. दुबळेपण हाही शरीराचाच धर्म आहे. आत्म्याला काहीच होत नाही. हा राजा माझ्या शरीराशी बोलत आहे, तेव्हा त्याच्याशी बोलणे आवश्यक नाही. मी मौनच धरीन.

भरत पुनः विचार करू लागला की माझ्या अपमानाला काहीच महत्त्व नाही. परंतु मी ज्या रहुगण राजाला उचलले आहे तो जर नरकवासी झाला तर पृथ्वीवरचा सत्संगाचा महिमा नष्ट होऊन जाईल. लोक म्हणतील महाज्ञानी जडभरताने ज्या रहुगण राजाला आपल्या खांद्यावर उचलले, तो देखील नरकवासी झाला. जगांत सत्संगाचा महिमा फार आहे. काही का होईना, मी जर राजाला आपल्या खांद्यावर बसविले आहे तर मी त्याचा उध्दार देखील करीन. त्याने राजाला उपदेश देण्याचा निश्चय केला. सत्संगाचा महिमा कायम ठेवण्यासाठी जडभरताने बोलण्याची इच्छा केली. आजपर्यंत तो मौनीच राहिला होता. राजाची त्याला दया आली आणि त्याने बोलायचें ठरविलें!

राजाचें कल्याण होवो! कपिल मुनींच्या आश्रमांत राजा तत्त्वज्ञानाचा उपदेश घेण्यासाठी जात आहे. उपदेश घेण्यासाठी तर नम्र (दीन) होऊन गेले पाहिजे, आणि हा राजा तर आपला अहंभाव सोबत घेऊन जात आहे. तो जर अहंकार सोबत घेऊन जाईल तर ऋषि त्याला विद्या देणार नाहीत. आज मी त्याला अधिकारी बनवीन.

रहुगण राजा भाग्यवान आहे.

भागवतांतले संत मितभाषी आहेत. सुदामा देखील फार कमी बोलत. मौन ठेवल्याने मायेचे बंधन कमी होत असते.

माझा अपमान मी सहन करीन पण परमात्मा सहन करणार नाहीत. ते याला दंड देतील. अशा विचारामुळे भरताला आज बोलण्याची इच्छा झाली. राजाचें कल्याण करण्याची त्यांची इच्छा आहे.

बोलाल तर असें बोला कीं ऐकणाऱ्याचें कल्याण होईल.

भरत म्हणू लागले: हे राजन्, हें खरेच आहे कीं मी पुष्ट नाही. पण तुझ्या म्हणण्याने ना माझी निंदा झाली ना उपहास. लठ्ठपण किंवा दुबळेपण हे तर शरीराचे धर्म आहेत. यांत आत्म्याचा कांहीच संबंध नाही.

हे राजन्! मी जिवंत असताना मेलेलाच आहे असे जे तू म्हणालास तेही खरेच आहे. कारण सगळे जगच जिवंत असता मेल्यासारखेच असते. ही पालखीसुद्धा मेलेलीच आहे आणि त्यांत बसलेला तू सुद्धा जिवंत असून मेलेलाच आहेस.

सर्वच विकारी वस्तूंना आदि आणि अंत असतोच. जे जन्माला आले आहेत त्यांना मरायचे आहेच. राजन्! तूं देखील मेल्यासारखाच आहेस. हें शरीर तर शवासारखेच आहे.

आत्मा आणि शरीर यांचें धर्म भिन्न आहेत. आत्मा निर्लेप आहे. आत्मा मनाचा द्रष्टा आहे, साक्षी आहे. ज्ञानी पुरुष ईश्वराशिवाय अन्य कोणत्याच वस्तूला सत्य मानीत नाहीत. सगळ्याच जीवांत परमात्मा विद्यमान आहे. मग याच्यांत कोण राजा अन् कोण सेवक?

व्यावहारिक दृष्टीने हे भेद आहेत; नाहीतर तात्त्विक दृष्टीनें तर 'मी' आणि 'तू' एकच आहोत.

राजन्, केवळ ईश्वरच सत्य आहे. तू जे हें म्हणालास कीं तू मला मारशील, तर सांग पाहू, शरीराला मारल्याने तर कांही चाल बदलायची नाही! शरीराची मारझोड झाल्यावर देखील मी कांही सुखी किंवा दुःखी होत नाही. ते सर्व तर शरीराचे धर्म आहेत. शरीराला शक्ति देत असते मन आणि मनाला शक्ति देत असते बुद्धि. बुद्धीला चेतना देणारा आहे आत्मा. अर्थात् "मी"! शरीराचे धर्म मला प्रभावित करू शकत नाहीत.

राजन्, मी असा याकरता चालत आहे कीं मुंगी इत्यादी माझ्या पायादळी येऊन कोठे चिरडली न जावो. चालत असता माझ्याकडून कुठे पाप न होवो. अशा विचारानेच मी लांब उडी मारतो. माझे श्रीकृष्ण सर्वत्र विराजमान आहेत. या मुंग्यांमध्यें सुद्धा परमात्मा आहे. मी, मुंग्या आणि इतर जीवजंतूंची काळजी घेऊन चालतो जेणेकरून हे जीव चिरडले न जावोत. मुंगींत देखील ईश्वर आहे, असें समजून मी आपल्या कृष्णाचें चिंतन करीत चालतो. तेव्हां माझी चाल अशीच राहील.

जडभरताची अशी विद्वत्तापूर्ण वाणी ऐकून राजाला वाटले, "नाही! नाही! हा वेडा नाही; हा तर कोणी परमहंस आहे. हा ज्ञानी महात्मा आहे. वाटते कीं हा कोणी अवधूत संत आहे. वेदान्ताचे कठीण सिद्धान्त सांगत आहे. यांची ब्रह्मनिष्ठा अलौकिक आहे. मी त्यांचा अपमान करून मोठे नुकसान करून घेतले आहे." असा विचार करून चालत्या पालखींतूनच राजा उडी मारून खाली आला. जो राजा मारायला तयार झाला होता तोच आता नमस्कार करीत आहे.

भरत तर निर्विकारी आहेत. रहुगणाकडून अपमान झाल्यावर आणि पुनः सन्मान झाल्यावर अर्थात दोन्ही अवस्थांमधे ते समस्थितींतच होते. ना क्रोध, ना दुःख, ना सुख! संतांची परीक्षा त्यांच्या मनोवृत्तीने होत असते; पोशाखाने नाही. सन्मान किंवा अपमान झाला तरी तीच समता. मानापमानांत

संतांची वृत्ति समच राहते.

वेशाने संत होणे सोपे आहे, हृदयाने संत होणे फार कठीण आहे.

रहुगणाने क्षमा मागितली. तो म्हणाला, तुमचा अपमान करणाऱ्याचें कधीही कल्याण होणार नाही.

त्याने विचारलेः हा संसारांतील व्यवहार तर सत्य आहे, याला आम्ही मिथ्या कसें म्हणू? जर वस्तू असत्य असेल तर तिच्याकडून कोणतीही क्रिया होऊ शकणार नाही, जसे खोट्या घड्याने पाणी आणणे शक्य नाही.

रहुगण पुढे म्हणालाः तुम्ही जे म्हणालात कीं शरीराला जें दुःख होते ते आत्म्याला होत नाही. परंतु मी तर असेच समजतो कीं शरीराला कष्ट झाले म्हणजे आत्म्याला देखील कष्ट होतात. याचे कारण असे कीं या शरीराचा संबंध इंद्रियांशी आहे. इंद्रियांचा संबंध मनाशी आहे; मनाचा संबंध बुद्धीशी आणि बुद्धीचा संबंध आत्म्याशी आहे. म्हणून जे दुःख शरीराला होत असते ते आत्म्याला सुद्धा होईलच. चुलीवर भांडे असेल, भांड्यांत दूध असेल आणि दुधांत तांदूळ असतील तर चुलीतील विस्तवाने पारस्परिक संबंधामुळे दुधांतील तांदूळ शिजून जातात. तेव्हा शरीराला झालेले दुःख आत्म्याला झालेच पाहिजे.

जडभरत म्हणालाः– राजन्! हे मिथ्या आहे. आत्मा निर्लेप आहे. अग्नीवर ठेवलेल्या भांड्यांतील दुधांतील तांदूळ तर शिजतात, पण दुधांत जर दगड टाकलेले असतील तर ते शिजणार नाहीत, कारण कीं ते निर्लेप आहेत. आत्मा तर सर्वश्रेष्ठ आणि निर्लेप आहे.

संसार तर केवळ मनाचीच कल्पना आहे.

राजन्, मन विकृत झालें कीं जीवनही विकृत होते. म्हणून जर मन सुधारेल तर आत्म्याला मुक्ति मिळेल.

एकदा माझें मन मृगबालकांत अडकून पडलें तर मला देखील मृगयोनींत जन्म घ्यावा लागला. म्हणून आता मी सावध झालो आहे.

राजन्, हा उपदेश व्यावहारिक मनाचा आहे. आईला आपल्या मुलाचें ओझे जड होत नाही, कारण तेथे मनाचे ममत्व काम करीत असते. आईला आपलें मूल फुलासारखेच वाटते आणि दुसऱ्याचें मूल जड. आपलें मूल जड असून सुद्धा फुलासारखेच वाटते आणि दुसऱ्याचे मूल भारी वजनदार वाटत असते. ह्या सर्वांचे कारण मन आहे. मन म्हणते हें आपलें आहे, ते दुसऱ्याचे.

राजन्! हें तर सर्व मनाचे धर्म आहेत. हे सगळे मनाचेच खेळ होत. मनाच्या खेळामुळेच मला पूर्वी मृग व्हावे लागले होते. मन सुधारल्यावरच जग सुधारत असते. मन हरीणबाळामध्यें अडकले होते म्हणून मला पशु व्हावे लागले होते.

राजा! तू तर फक्त कच्छप देशाचाच राजा आहेस. मी तर भरतखंडाचा राजा होतो. तरी पण माझी अवदशा झाली होती.

विषयासक्त मन जीवाला सांसारिक संकटांत फसविते आणि तेच मन विषयरहित झाल्यावर जीवाला शांतिमय मोक्षाची प्राप्ति करवून देते.

जीवाच्या सांसारिक बंधनाचे कारणरूप मनच आहे आणि तेच जीवाच्या मोक्षालाही कारणरूप आहे.

मनुष्याचे मन जर विषयासक्त झालेले असेल तर तेच सांसारिक दुःखदाते होत असते. तेच मन विषयासक्त होण्याऐवजी जर ईश्वरभजनांत लीन होईल तर मोक्षदाते होईल.

विषयांचें चिंतन करणारे मन त्यांतच अडकून पडते अन् त्याचें ते बंधन आत्मा स्वतःलाच आहे असें समजू लागतो, स्वतःला आरोपित करून घेतो. ही सर्व मनाचीच दुष्टता आहे. म्हणून मनाला परमात्म्यामधें स्थिर करा.

तुम्ही आपल्या मनाला दंड द्याल तर यमराज तुम्हाला दंड देणार नाहीत. ज्या दिवशी जीभ खोटे बोलेल त्या दिवशी उपवास करा. ज्या दिवशीं कांही पाप घडेल त्या दिवशी जास्त माळा जपा.

भरत म्हणतात– राजा! तू मला विचारतोस कीं मी कोण आहे?, पण तू स्वतःलाच विचार कीं तू कोण आहेस?

तू शुद्ध आत्मा आहेस. जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तिन्ही अवस्थांचा साक्षी आत्मा आहे.

राजा! ज्ञानी, जगाला सत्य समजत नाहीत. संसाराला ते मनोकल्पित समजतात.

जग स्वप्नासारखे आहे. ज्याप्रमाणे स्वप्न मिथ्या असून देखील मनुष्याला रडविते त्याचप्रमाणे हे मिथ्या जगत्ही मनुष्याला रडवीत असते.

समजा कीं, एक मनुष्य निजलेला आहे. तो स्वप्नांत पाहतो कीं एक भयंकर वाघ झडप घालणार आहे. तर तो मनुष्य, वाघ त्याला खाईल असें वाटून घाबरतो, ओरडू लागतो, रडू लागतो. त्याची झोप उडून जाते; आणि जाग आल्यावर त्याला दिसते कीं ते तर स्वप्न होते आणि स्वप्नांतील वाघामुळे तो घाबरला होता.

परंतु स्वप्न असत्य आहे ही गोष्ट केव्हां लक्षांत येते? त्या माणसाला जेव्हां जाग येते तेव्हां. कोण जागा झाला आहे? विषयांमधून ज्याचें मन निघून गेले आहे तो.

राजा! म्हणून तर मी म्हणतो कीं हे सर्व मनाचे खेळ आहेत. मनाला शुद्ध करण्यासाठी संतांची संगत धरा. महापुरुषांच्या सेवेने ब्रह्माची प्राप्ति होते.

राजा, सत्संगाशिवाय ज्ञान प्राप्त होत नाही. आपल्या स्वरूपाचें परिपूर्ण ज्ञानच तेवढी एक सत्य वस्तू आहे. एक ब्रह्मच सत्य आहे. ब्रह्म सत्यस्वरूप, भेदरहित, परिपूर्ण, आत्मस्वरूप आहे. पंडित त्याचे वासुदेव, कृष्ण इत्यादी नामांनी वर्णन करतात. नाहीतर जग तर मिथ्या आहे.

**७. भवाटवीचें वर्णन आणि भारतवर्षांत जन्मलेल्या मनुष्याचें महत्त्व :**

भरतांनी प्रथम राजर्षीला दिव्य तत्त्वज्ञानाचा उपदेश दिला आणि मग प्रारब्धाच्या फेऱ्याचें (भवाटवीचे) दैवगतीचे वर्णन केले.

आत्म्याचें विवेकरूपी धन एक एक इन्द्रिय लुटून घेते. एखादा संत भेटल्यावर संसाररूपी वनांतून बाहेर काढतो. संसारांत एकटे केव्हांच फिरू नका. एखाद्या संताचा, सद्गुरूचा आश्रय घ्याल तर संसारवनांतून बाहेर निघू शकाल.

मायेमुळे जीव सुखाच्या आशेने या संसाररूपी वनांत भटकत असतात, परंतु खरे सुख मिळत नाही.

ज्या जीवाची नेतारूप बुद्धि असावध आणि अपात्र असते, त्याला सहा लुटारू (इन्द्रियें) लुटून नेतात. त्याचें धर्मरूपी धन लुटले जाते.

मोठ्या कळपामधून देखील चुकलेल्या (प्रमादी) मेंढराला ज्याप्रमाणें लांडगा ओढून घेऊन जातो, त्याचप्रमाणे जीवसंघांतील प्रमादी मनुष्याला शृगालादि (स्त्री-संतान) ओढून घेऊन जातात.

हे वन (संसार) वेली आणि जाळ्यांनी (गृहस्थाश्रम) व्याप्त आहे. मच्छरांनी (काम्य कर्मांनी)

ह्या जनसमुदायाला पीडा होत राहते.

या संसाररूपी वनांत जीवसमुदाय शरीररूपी गंधर्वनगरी पाहतो. सुवर्णादि धनरूपी पिशाच्च पाहतो. कित्येक वेळां रजोगुण ह्राच जणूं धुराळा, डोळ्यांत गेल्यानें कामना-वासनेच्या वावटळीमुळें भुरळ टाकणाऱ्या स्त्रीरूपी उडालेल्या धुळीमुळें गंतव्य ठिकाण (देव) तो ओळखूं शकत नाही.

जनसमुदाय भुकेने व्याकुळ झाल्यावर तो अपवित्र वृक्षांचा ( अधार्मिक मनुष्यांचा ) आसरा घेतो. त्याला जेव्हां तहान लागते तेव्हां मृगजळाकडे ( निष्फळ विषयांकडे ) धावत जातो. कित्येक वेळा निर्जल नदीकडे ( दुःखदायी मार्ग ) धाव घेतो. कधी पाणी मिळालेच तर तो वनांतील यक्ष ( राजा ) त्याचे प्राण ( धन ) हरण करून घेतात.

चालता चालता त्याचे पाय काट्याकुट्यांनी ( कित्येक प्रकारच्या संकटांनी ) घायाळ होऊन जातात.

या संघाच्या माणसांना केव्हां केव्हां साप ( निद्रा ) चावतो, म्हणून ते शववत होतात. केव्हां त्यांना हिंस्र पशू ( दुर्जन ) चावतात. केव्हां केव्हां ते आंधळे ( विवेकभ्रष्ट ) होऊन अंधाऱ्या विहिरीत ( मोहांत ) पडून दुःखी होतात.

याशिवाय हा जनसंघ या जंगलांत लतांच्या फांद्यांचा ( स्त्रीच्या कोमल भुजांचा ) आसरा घेऊन तेथेच अस्पष्ट पण मधुर मधुर शब्द करणाऱ्या पक्ष्यांची ( स्त्रीच्या मांडीवर खेळणाऱ्या तान्ह्या मुलांची ) इच्छा करतात. सिंहाच्या टोळ्यांपासून ( कालचक्रांनी उत्पन्न होणारे जन्म-मृत्यु ) त्यांना त्रास होतो.

वृक्षांच्या खाली ( घरदारांत ) तो खेळू इच्छितो. केव्हां केव्हां पर्वतांच्या गुहांमध्यें ( रोगादि दुःखांत ) जाऊन तेथे असणाऱ्या हत्तींनी ( मृत्यू ) भयभीत होतो.

जीवात्मा केव्हां सुखी होतो तर केव्हां दुःखी. जीव जेव्हां भगवत्‌चरणांचा आश्रय घेतो तेव्हांच तो कृतार्थ होतो.

संक्षिप्त शब्दांत सांगायचे तर हा संसारमार्ग दारुण, दुर्गम आणि भयंकर आहे. मनाला विषयासक्त न करता, श्रीहरीच्या सेवेने तीक्ष्ण झालेले ज्ञानकृपाण घेऊन या संसारवनाच्या हद्दीबाहेर पोहोचा.

भरतांनी पहिले शिक्षण दिलें आणि मग दीक्षा. भगवद्भक्तीचा आश्रय घेणारा कृतार्थ होत असतो. भरतांनी प्रभूचें ध्यान करीत करीत शरीराचा त्याग केला.

ह्यानंतर भरतवंशी राजांचें वर्णन आहे. त्यानंतर येते भारतवर्षांतील उपास्य देव आणि उपासक भक्तांचें वर्णन.

मी ॐ कार स्वरूप भगवान श्रीनरसिंह देवाला नमस्कार करतो. हे देव! तुम्ही आप, अग्नि इत्यादी तेजांचेही तेज आहात. आपणाला नमस्कार असो. हे वज्रनख, हे वज्रासारख्या दाढा असलेले, आपण आमच्या समक्ष प्रकट व्हा. आमच्या कर्मवासनांना जाळून टाका. आमच्या अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करा. आमच्या अंतकरणांत अभयदान देत प्रकाशित व्हा.

हा अर्थ आहे नरसिंहदेवांच्या मंत्राचा. या मंत्राचा जप करता करता श्रीधरस्वामींना वैराग्य प्राप्त झाले.

भागवतांत मानवदेहाची कित्येक ठिकाणी निंदा केली गेली आहे. मानवशरीराची स्तुति फक्त पांचव्या स्कंधांत आहे. आणि ती देखील देवांकडून केली गेली आहे.

मानवशरीर मुकुंदाची सेवा-उपासना करण्यासाठी आहे. जर मनुष्य शुभसंकल्प करील तर तो नराचा नारायण होऊ शकतो.

'मनुष्यजन्म सर्वच पुरुषार्थाचें साधन आहे', असे म्हणून या भारतवर्षांत जन्मलेल्या मनुष्यांचें

महत्त्व देवगण याप्रकारे गातात– 'अहो! या भारतवर्षांतील मनुष्यांनी किती पुण्य केले असेल, किंवा श्रीहरि त्यांच्यावर स्वतःहून इतके प्रसन्न झाले असतील कीं त्यांना भगवंताच्या सेवेलायक मनुष्यजन्म या भारतवर्षांत मिळाला! हा मनुष्यजन्म श्रीहरीची सेवा करण्यासाठी उपयोगी असल्यामुळे आम्ही देखील याची इच्छा करतो. या सौभाग्यासाठी आम्ही देखील सदा इच्छुक आहोत.'

यानंतर येते भौगोलिक वर्णन. या खंडांत पृथ्वीच्या सात खंडांचे वर्णन केले गेले आहे. सात द्वीप आणि सात समुद्रांचे वर्णन आहे.

भरतखंडाचे स्वामी आहेत देव नारायण. भरतखंड कर्मभूमि आहे. भरतखंडांत जन्म घेण्याची इच्छा तर देवांना सुद्धा होत असते. शरीराची भागवतांत स्तुतीही केली आहे आणि निंदा देखील. या मानवशरीराने भगवत्सेवा, मुकुंदसेवा होऊ शकते.

या स्कंधांत ग्रहांच्या स्थितीचें देखील वर्णन केले आहे.

याच स्कंधांत सप्तपाताळांचें प्रतिपादन केले गेले आहे. या पाताळांच्या अगदी खाली आहेत शेष नारायण.

राजाने विचारले– नरकलोक कोठे आहे?

शुकदेव सांगतात– राजा, हा नरकलोक दक्षिण दिशेला आहे. नरक अनेक प्रकारचे आहेत. चोर, तामिस्र नावाच्या नरकांत जातो आणि व्यभिचारी अंधतामिस्र नावाच्या नरकांत जातो. जितकी पापे आहेत तितके नरक आहेत.

कोणत्या पापामुळें कोणत्या नरकांत जावे लागते त्याचें विस्तृत वर्णन या स्कंधांत केले आहे. अशा प्रकारे हजारो नरक आणि यमलोक आहेत; असे सांगून स्कंध समाप्त केला आहे.

**श्रीमन्नारायण नारायण नारायण।**
**लक्ष्मीनारायण नारायण नारायण।**
**बद्रीनारायण नारायण नारायण।**
**श्रीमन्नारायण नारायण नारायण।**

**॥ पंचम स्कंध समाप्त ॥**

●●●

॥ श्रीहरि: ॥

# ॥ षष्ठ स्कंध ॥

**श्रीकृष्णाय नमः॥**

नरकाचे वर्णन ऐकून परीक्षित राजा म्हणाला: महाराज, मला असा मार्ग सांगा की ज्याच्यावरून चालल्याने मला या नरकांत जावेच लागणार नाही. आपण प्रवृत्तिधर्म, निवृत्तिधर्म इत्यादींच्या कथा सांगितल्या, परंतु या नरकलोकांचे वर्णन ऐकून मला भीती वाटत आहे. नरकांत जाण्याचा प्रसंग केव्हांच येऊ नये असा एखादा उपाय सांगा.

शुकदेव वर्णन करतात: शास्त्रांत प्रत्येक पापाचे प्रायश्चित्त सांगितले आहे. पापाचें विधिपूर्वक प्रायश्चित्त घेतले तर पाप नष्ट होते. प्रायश्चित्त घेतल्यानंतर मग पुनः कधी पाप करू नये. नाहीतर प्रायश्चित्ताला काहीच अर्थ राहणार नाही. दुःख सहन करून ईश्वराचें भजन केल्याने पाप जळून जाते.

**१. पापवासना नष्ट करण्यासाठी ध्यान, अर्चन आणि नामजप उपयुक्त:**

राजाने विचारले: विधिपूर्वक प्रायश्चित्त घेतल्यानंतरही पाप करण्याची इच्छा कायम राहते, त्याला काय उपाय आहे? प्रायश्चित्त घेतल्याने पापाचा नाश होतो, परंतु पाप करण्याच्या वासनेचा-इच्छेचा नाश होऊ शकत नाही. प्रायश्चित्त घेऊनही पापवासना नष्ट न झाली तर काय करावे? काही असा उपाय सांगा की जेणेकरून पाप करण्याची वासनाच राहणार नाही.

शुकदेव म्हणाले, 'लक्षपूर्वक ऐका':

राजा, मनावर लवलेशमात्र विश्वास ठेवू नकोस. मन फार विश्वासघातकी आहे. त्याला अंकुश लावा. मनाला एखादेवेळी सवलत (मुभा) दिलीस तर ते पुनः पाप करायला तयार होईल. पाप-वासना अज्ञानामुळे जागृत होते आणि अज्ञानाचें मूळ अहंकार आहे.

जी व्यक्ति भगवान श्रीकृष्णांना प्राणार्पण करते तिला पाप करण्याची इच्छाच होत नाही. तिचा अहंकार नष्ट होऊन जातो.

तप (मन आणि इंद्रियांची एकाग्रता), ब्रह्मचर्य, शम (मनाचें नियमन), दम (बाह्य इंद्रियांचे नियमन), मनाची स्थिरता, दान, सत्य, शौच, यम, नियम इत्यादींनी पापाची वासना नष्ट होते.

भगवंताला आत्मसमर्पण केल्याने आणि भगवत्‌भक्तांची सेवा केल्याने जशी पापी जनांची शुद्धि होते तशी तपश्चर्या इत्यादी द्वारे होऊ शकत नाही. पापी मनुष्य भक्तीने जसा पवित्र होऊ शकतो तसा शम, दम, तप इत्यादींनी होऊ शकत नाही.

राजा, तू आपला प्राण भगवंताला अर्पण कर. पापाची वासना निघून जाईल. भगवान नारायणाला

जो आपला प्राण अर्पण करतो आणि जो प्रत्येक श्वासात नारायणमंत्राचा जप करतो त्याला पाप केव्हाही शिवू शकत नाही. जो आपला प्राण श्रीकृष्णाला अर्पण करतो त्याला पाप करण्याची इच्छा कधीच होत नाही. प्राणार्पणाचा अर्थ असा की क्षणोक्षणीं, श्वासोच्छ्वासीं ईश्वराच्या नामाचा जप करणें. प्रत्येक कार्यात ईश्वराशी संबंध करून राहावे. सतत श्वास-प्रतिश्वास भगवत्-स्मरण करीत राहाल तर पाप होणार नाही, पापाकडे प्रवृत्ति होणार नाही. गीतेत म्हटले आहे, **'मामऽनुस्मर युध्यच।'** प्रथम भगवंताचे स्मरण करा आणि मग इतर सांसारिक कार्ये.

जोपर्यंत परमात्म्याचे ज्ञान होत नाही तोपर्यंत वासना नष्ट होऊ शकत नाही. अज्ञानांतून वासनेचा जन्म होतो. ईश्वर आणि जगताच्या स्वरूपाचे ज्ञान झाल्यावरच वासना नष्ट होते. ईश्वर आनंदस्वरूप आहे आणि संसार दुःखरूप, असा अनुभव झाल्यावर वासना नष्ट होते.

वासनेचे मूळ अज्ञान आहे. अज्ञानाचा नाश झाल्यावर ज्ञान होते. ज्ञानाने अज्ञानाचा नाश होतो. ज्ञान सतत असू देण्यासाठी प्राण कृष्णाला अर्पण करा. जोपर्यंत अज्ञानाचा नाश होत नाही तोपर्यंत पाप घडणेही थांबत नाही.

ज्ञानी फक्त इंद्रियांनाच विषयांकडे जाण्यापासून अडवतात. परंतु अशाने वासनेचा नाश होत नाही. इंद्रियांना अडवून नव्हे, तर त्यांना प्रभूकडे वळविल्याने वासनेचा नाश होतो. प्रत्येक इंद्रियाला परमात्म्याकडे वळविल्याने वासनेचा नाश होईल. मनाला पवित्र करायचे असेल तर डोळ्यांना भगवत्स्वरूपांत स्थिर करा.

प्रस्तुत स्कंधात तीन प्रकरणे आहेतः

**(१) ध्यान प्रकरणः** चौदा अध्यायांत या प्रकरणाचे वर्णन केले आहे. चौदा अध्यायांचा अर्थ आहे पांच कर्मेंद्रिये, पांच ज्ञानेंद्रियें, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार. ह्या सर्वांनाच परमात्म्याच्या ध्यानांत रत ठेवल्याने ध्यान सिद्ध होते.

**(२) अर्चन प्रकरणः** दोन अध्यायांत सूक्ष्म अर्चन आणि स्थूल अर्चनाचे वर्णन केले आहे.

**(३) नाम प्रकरणः** गुण-संकीर्तन आणि नाम-संकीर्तनाचें तीन अध्यायांमधे वर्णन आहे.

परमात्म्याच्या मंगलमय नामाचा जप करा. ज्ञानमार्गी असो की भक्तिमार्गी, परंतु ईश्वराची साधना आणि ध्यान केल्याशिवाय काम होत नाही. कोणत्या तरी एकात मन स्थिर झाल्यावर मनाची शक्ति वाढते. या प्रकारे तीन साधने सांगितली आहेत– ध्यान, अर्चन, नाम. या तीन साधनांच्या साहाय्याने पापाचा नाश होतो, आणि नरकांत जाण्यापासून वाचता येते. प्रभूच्या मंगलमय स्वरूपाचे ध्यान-जप करण्याची सवय लावा आणि नियमित सेवा करा. नरकात जाऊ लागू नये म्हणून या साधनांचा उपयोग करा.

दररोज परमेश्वराचें पूजन (सेवा) करा. त्याच्या नामाचा जप करा, त्याचे ध्यान करा. ही तिन्ही साधने तुम्हाला शक्य नसली तर कोणत्याही एका साधनावर अढळ श्रद्धा ठेवा.

इंद्रियांना भक्तिरसांत बुडवून ठेवल्याशिवाय वासना नष्ट होत नाही. भक्तीच्या आधारे जीव भगवंतापाशीं जातो. महाराणी यमुना भक्तीचे स्वरूप आहे. ती जीवाचा ईश्वराशी संबंध जोडते. भक्तिद्वारे जीवाचा ब्रह्माशी संबंध होऊ शकतो.

ध्यान, अर्चन आणि नामस्मरण या तीन साधनांनी भक्ति दृढ होते. परमात्म्याचें ध्यान करीत नाही तोपर्यंत मन शुद्ध होत नाही. व्रताने द्रव्यशुद्धी होते परंतु मनाची शुद्धी होत नाही. दान केल्याने भगवंताची प्राप्ति होत नाही. दानाचे फळ आहे लक्ष्मी. गीतेतही म्हटले आहे

की, 'नुसत्या वेद, तप, दान आणि यज्ञाने माझी (प्रभूची) प्राप्ति होऊ शकत नाही.'

परमात्म्याचे ध्यान केल्याने मनाची शुद्धि होते, म्हणून दररोज ध्यान करण्याची आवश्यकता आहे. ध्यानात एकाग्रता होऊ शकली नाही तर नामस्मरणाची आवश्यकता आहे.

ही तिन्ही साधने एकाच वेळी होऊ शकली नाहीत तरी काही हरकत नाही, परंतु यापैकी एक तर करावेच लागेल. साधनेशिवाय सिद्धीची प्राप्ति होऊ शकत नाही.

मनुष्यानें आपल्या जीवनाचें लक्ष्य निश्चित करणे अत्यावश्यक आहे. एकाच ध्येयाशिवाय जीवन म्हणजे नावाड्याशिवाय नाव होय. ध्येय निश्चित करून ते मिळविण्यासाठी साधना करा. या कलिकालांत आणखी इतर काही होऊ शकत नाही, म्हणून नामस्मरणाचाच आसरा घेतला पाहिजे. कलिकालांत नामसेवा (स्मरण) प्रधान मानली गेली आहे.

कलियुगांत स्वरूपसेवा लवकर फलदायक होत नाही. स्वरूपसेवा आहे उत्तम, परंतु त्यांत पवित्रतेची फार आवश्यकता आहे. कलियुगांत मनुष्य इतका पवित्र राहू शकत नाही. म्हणून कलियुगांत नामसेवाच मुख्य मानली गेली आहे.

अदृश्य वस्तूंचे नाम धरून ठेवल्याने त्या नामापासून स्वरूप प्रकट होईल. प्रत्यक्ष साक्षात्कार होईपर्यंत प्रभूचा नामाश्रय घेणाऱ्याला एक ना एक दिवस प्रभूचा साक्षात्कार अवश्य होईल.

सीतामाई ध्यान लावून अशा प्रकारें नामस्मरण करीत होती की वृक्षांच्या पानापानांतून रामध्वनि होत होता.

परमात्म्याच्या नामांत निष्ठा असणें फार कठीण आहे. नामस्मरणाच्या वेळी जीभ अडकते. पाप जिभेला धरून ठेवीत असते. घरात पावलोपावली भगवंताचें नाम घ्याल तर पावलोपावली यज्ञाचें पुण्य मिळेल. तसे तर हे फारच सुलभ वाटते पण आहे फार कठीण.

नामांत अढळ विश्वास ठेवा. परमात्म्याच्या नामाचा सतत जप करण्याची सवय असेल तर मृत्यू देखील उज्ज्वल होईल. अंतकाळपर्यंत ब्रह्मनिष्ठा राखून असणे सोपे नाही. नामनिष्ठेशिवाय कलिकालांत आपल्या उद्धाराचा इतर कोणताच उपाय नाही.

रामनामाने तर दगडसुद्धा तरून गेले होते. पण स्वतः रामांनी टाकलेले दगड तरू शकले नव्हते.

एकदा रामचंद्रांच्या मनांत कुतूहल उत्पन्न झाले. त्यांनी विचार केला की माझ्या नावानें दगड तरले होते आणि वानरांनी समुद्रावर सेतु बनविला होता. मी देखील पाहतो की माझ्या स्पर्शानें दगड तरतात की नाही. असा विचार करून कोणाला कळू नये अशा रीतीने ते समुद्रकिनाऱ्यावर आले आणि त्यांनी समुद्रांत दगड टाकले. परंतु ते तर सर्वच पाण्यात बुडून गेले. रामचंद्रांना आश्चर्य वाटले! हे असे कां झाले! (माझे नाव लिहिल्याबरोबर तर दगड तरंगू शकले होते!)

हनुमान हे कौतुक (ही गंमत) तिथेच कुठे तरी लपून पाहात होते. श्रीरामांना जेव्हा निराश होऊन परत येताना पाहिले तेव्हा हनुमंतांनी त्यांना वाटेत थांबवून त्यांचे दर्शन घेतले. रामचंद्रांनी त्यांना विचारले,– "माझ्या नाममात्राने केव्हा एकदा दगड तरू शकले होते, पण मी स्वतः जेव्हा दगड पाण्यात टाकले तर ते बुडून गेले. हे असे का झाले?"

हनुमंत उत्तरले: "हे तर अगदी स्वाभाविकच आहे! ज्याला प्रभूरामचंद्र स्वतः फेकून देतील (तिरस्कृत करतील) त्याला कोण बरे तारू (वाचवू) शकेल? ज्याला रामचंद्र फेकून देतील, ज्यांचा ते त्याग करतील ते तर बुडायचेच. त्या दगडांना तुम्ही त्याग केला म्हणून ते बुडाले. ज्यांना

तुम्ही आपले म्हणता ते कधीच बुडू शकत नाहीत. ज्या दगडांचा समुद्रावर सेतु बनविला होता त्यांच्यावर 'श्रीराम' (आपले नाव) लिहिले होते म्हणून ते तरू शकले. जी शक्ति तुमच्या नामात आहे ती तुमच्या हातात नाही. प्रभू, हा नाम महिमा आहे."

रामनामात जी शक्ति आहे ती स्वतः रामांतही नाही. आपल्या आयुष्यात श्रीरामांनी काही विवक्षित लोकांचाच उद्धार केला होता. पण त्यांच्या नामाने आजपर्यंत अनेकांचा उद्धार केला आहे.

नाममंत्राचें माहात्म्य अजबच आहे. जप केल्याने जन्मकुंडलीचे ग्रह देखील बदलून जातात. आम्ही आणखी काय सांगावे?

जप तर जनाबाईने केला होता! जनाबाई शेणाच्या गोवऱ्या थापत होती, पण त्या कोणी चोरून घेऊन जात. जनाबाईने याविषयीं नामदेवांजवळ गाऱ्हाणे केले. नामदेव म्हणाले, गोवऱ्या तर सगळ्यांच्या एकसारख्याच असतात; ज्या गोवऱ्या तुझ्या आहेत त्या कशा ओळखायच्या? जनाबाई म्हणाली, ही तर फार सोपी गोष्ट आहे. गोवऱ्या उचलून कानाशी नेल्यावर जर त्यांतून "विठ्ठल... विठ्ठल..." असा आवाज ऐकायला आला तर समजा कीं त्या माझ्याच आहेत. जनाबाई गोवऱ्या थापताना मोठ्या तल्लीनतेने विठ्ठलाच्या नामाचा जप करीत असे. नामदेवानेदेखील त्या गोवऱ्यांमध्ये विठ्ठलनामाचा ध्वनि ऐकला. ते जनाबाईला म्हणाले,– "नामदेव मी नाही, तूच आहेस!"

गोवऱ्या बनविताना जनाबाई विठ्ठलाच्या नामजपात इतकी तल्लीन होऊन जात असे की गोवऱ्यांमधून देखील "विठ्ठल...विठ्ठल.." असा आवाज ऐकू येई.

जपाची संख्या आणि फळाची चर्चा यापुढे केली गेली आहे.

दोन नियमांचे पालन नेहमी करा– (१) ब्रह्मचर्य अन् (२) अस्तेय. पाच कोटि जप करणाऱ्याला ज्ञान प्राप्त होते. नुसते वाचत राहिल्याने ज्ञानाचा अनुभव होऊ शकत नाही. प्राचीन संतांच्या चरित्रांत असे कोठे लिहिलेले आढळत नाही की ते अमक्या ठिकाणी शिकायला गेले होते. भगवद्भक्तीनें चित्त शुद्ध झाल्यावर त्यांना आंतरिक स्वयंस्फुरणानें ज्ञान प्राप्त होत असे. पंडित शास्त्राच्या मागे धावतात; याउलट शास्त्र मीराबाईच्या मागे धावत असे.

तेरा कोटि जप केल्याने जीव आणि ईश्वराचें मिलन हाते. कलिकालांत याशिवाय दुसरा उपाय नाही.

अधिकारी गुरुद्वारें मंत्र ग्रहण केल्यावर मंत्रात दिव्य शक्ति आरोपित होते. अजामीळ देखील नामस्मरणानेच तरून गेला होता.

वेदान्ताच्या सिद्धान्तांना समजणे कठीण आहे आणि समजल्यानंतर त्यांचा अनुभव करणें तर आणखीनच कठीण आहे. "आत्मा केवळ द्रष्टा आहे, आणि दुःख फक्त शरीरालाच होते." अशा गोष्टी करणें आणि समजणें कदाचित सोपे आहे, परंतु या सिद्धान्ताचा अनुभव करणे हे कर्म फार कठीण आहे.

नामस्मरण फार सोपे आहे. भक्ति सोपी आणि सरळ आहे. ती मृत्यूला उज्ज्वल करते. जपाशिवाय जीवन सुधारत नाही.

जीवनांत कथा मार्गदर्शिका आहे. ती मनुष्याला आपल्या सूक्ष्म दोषांची जाणीव करून देते. परंतु त्याचा उद्धार तर नामजप आणि नामस्मरणानेच होतो.

भगवंताचें नामच परमात्म्याचे स्वरूप आहे. नामाच्या आश्रयाने पापाचा देखील विनाश होतो.

**२. नामजपाने पापाचा नाश होतो याविषयीं अजामीळाचा दृष्टान्त :**

सिद्धान्त दृष्टान्ताशिवाय बुद्धिग्राह्य होत नाही. म्हणून या सिद्धान्ताला समजविण्यासाठी अजामीळाचा दृष्टान्त सांगितला गेला आहे. अजामीळ जन्माने तर अधम होता, परंतु प्रभूच्या नामाचा आश्रय ग्रहण करून तो कृतार्थ होऊन गेला.

आपण सगळेच अजामीळ आहोत. हा जीव मायेत फसलेला आहे. जो मायेशी एकरूप होऊन गेला आहे तोच अजामीळ होय. जिथे कुठे जाल तिथे माया बरोबर येईल. कोळशाच्या खाणींत उतरल्यावर हात स्वच्छ राहतील हे शक्य नाही. संसारांत मायेच्या संसर्गात तर यावेच लागते, मायेला स्पर्श तर करावाच लागतो, परंतु तिला स्पर्श अग्निसारखाच केला पाहिजे. तिला विवेकरूपी चिमट्याने धरले पाहिजे. तसे तर अग्नीशिवाय जीवनव्यवहारच चालू शकत नाहीत; तरी पण त्याला कोणी सरळ हातात तर घेत नाही!

माया आमचा पाठलाग करते. पण तिच्यापासून आपल्याला वाचवून ईश्वराच्या मागे लागायचे आहे. आम्ही जर ईश्वराच्या मागे लागू तर माया आमचा पाठलाग करणे सोडून देईल. मायेला स्पर्श करताना मोठे सावध राहिले पाहिजे. संसारात राहून मायेचा त्याग करणे तर अशक्य आहे. कनक आणि कांता ही मायेचीच दोन रूपें आहेत. प्रयत्न असा करावा की दोघांतही मन अडकू नये. पाप शरीराने करा की मनाने, दंड तर भोगावाच लागेल.

कनक आणि कांता या दोहोंत माया निहित आहे. या दोहोंपासून ज्याचे मन हटते त्याचें मन मायेपासूनही हटते.

अजामीळ शब्दाचा अर्थ पहा. अजाचा अर्थ आहे माया आणि मायेत फसलेला जीवच अजामीळ आहे.

अजामीळ अनेक प्रकारची पापे करून जीवन व्यतीत करीत होता. हा अजामीळ सुरवातीला तर मंत्रवेत्ता, सदाचारी आणि पवित्र माणूस होता. एक दिवस तो वनांत गेला होता. रस्त्यांत त्याने पाहिले की एक शूद्र एका वेश्येबरोबर कामक्रीडा करीत आहे. वेश्येचे लुगडे सरकून गेले होते. त्यामुळे तिचे सर्व रूप स्पष्ट दिसत होते. हे दृश्य पाहून अजामीळ कामवश होऊन कामांधही झाला. वेश्येचे असे प्रलोभनीय रूप पाहून अजामीळाचे मन भ्रष्ट झाले.

अजामीळाने एकदाच वेश्येला पाहिले तरी त्याचे मन भ्रष्ट होऊन गेले, तर दर रविवारी फिल्म पाहणाऱ्याच्या मनाचे काय होत असेल? काही जणांनी तर असा नियमच करून टाकला आहे की दर रविवारी सिनेमा पाहायचाच. पुष्कळसे लोक आपल्या लहान लहान मुलांनाही बरोबर घेऊन जातात. आपले मन बिघडलेच आहे, आता तुमचे का न बिघडावे?

पाप प्रथम डोळ्यांतून आत शिरते. डोळे बिघडले की मनही बिघडते आणि मन बिघडले तर चारित्र्यही बिघडेल आणि त्याबरोबर नावही... रावणाचे डोळे दुष्ट होते म्हणून त्याचे नावही सदाचेच बदनाम झाले. जे काही पाप मनात येते ते डोळ्यामधूनच येते. डोळे बिघडल्यावर मन देखील बिघडतेच. कामाला डोळ्यात येऊ देणार नाही तर तो मनांतही येऊ शकणार नाही. मनुष्य शरीराने नाही, परंतु डोळ्याने आणि मनानें जास्त पाप करीत असतो.

वेश्येला पाहिल्यानेच अजामीळाचा केरकचरा होऊन गेला. कारणाशिवाय कोणाकडे पाहू नका. डोळ्यात राम ठेवाल तर तिथे काम शिरू शकणार नाही. डोळ्यांतूनच सर्व पापे आत शिरत असतात, म्हणून डोळे प्रभुदर्शनाकडे वळवावेत.

कामांध अजामीळ वेश्येच्या घरी गेला आणि तिला समजावून, राजी करून आपल्या घरी घेऊन आला. तो पापाचार करू लागला.

एकदा काही साधू लोक फिरत फिरत अजामीळाच्या घरी आले. वेश्येने पाहिले की संतजन आले आहेत, तर तिने त्यांना अन्नदान केले.

तसे तर वेश्येचे अन्न ग्रहण करणे शास्त्रांत निषिद्ध म्हटले आहे. पण साधूंना माहीतच नव्हते की अन्नदान करणारी स्त्री वेश्या आहे. त्यांनी अन्न शिजवून जेवणही केले.

साधुजन तर ज्याचे अन्न खातात त्याचे कल्याणही करीत असतात.

वेश्येच्या सांगण्यावरून अजामीळाने साधूंना नमस्कार केला. साधू म्हणाले, तुझ्या घरी जेवण तर मिळाले, परंतु दक्षिणा अजून शिल्लक आहे.

अजामीळ म्हणाला, "माझी हीच दक्षिणा आहे की मी तुम्हाला लुटले नाही. मी कोणाही साधूला धन देत नसतो. अन्य काही मागाल तर देईन.

वेश्या गर्भवती होती. साधूंची इच्छा होती कीं अजामीळाचे कल्याण व्हावें. म्हणून ते म्हणाले, तुझ्या घरीं मुलगा झाल्यावर त्याचे नाव 'नारायण' ठेव.

अजामीळाने विचारले, "महाराज, मी आपल्या मुलाचे नाव नारायण ठेवले तर त्यापासून तुम्हाला काय लाभ होईल?"

साधू म्हणाले: "आमच्या भगवंताचे नाव नारायण आहे. म्हणून हे नाव ऐकून आम्हाला आनंद होईल आणि तुला देवाचे स्मरण होत राहील.

अजामीळ म्हणाला, "ठीक आहे, मी आपल्या मुलाचे नाव नारायण ठेवीन."

अजामीळाच्या घरी मुलाचा जन्म झाला आणि त्याचे नाव त्याने नारायण ठेवले. धाकट्या अपत्याविषयीं मातापित्यांना विशेष प्रेम असतेच. अजामीळ वारंवार नारायणाला हाका मारीत असे. नारायणाचे नाव घेण्याची त्याला सवयच लागली.

अतिशय पापी, अतिशय कामी मनुष्य आपले पुरते आयुष्य जगू शकत नाही.

अजामीळाची अजून बारा वर्षे शिल्लक राहिली होती. इतक्यात त्याला नेण्यासाठी यमदूत येऊन थडकले. मृत्युकाळ जवळ आला तरी आपल्या लहानग्या नारायणाविषयीं त्याला अतिशय आसक्ति होती. म्हणून त्याचे नाव घेऊन हाका मारू लागला— नारायण! नारायण!

जेवण, द्रव्य, कामसुख, स्थान, संतति आणि पुस्तके यांत जीव अडकलेला राहतो. आईबापांचे मन आपल्या शेवटल्या अपत्यांत विशेष घुटमळत असते. रोजच्या सवयीप्रमाणे अजामीळाने नाव घेऊन नारायणाला अनेक वेळा हाका मारल्या. त्याचा नारायण तर तिथे नाही आला, पण विष्णुदूत येऊन पोचले. त्यांनी यमदूतांना सांगितले की अजामीळाला सोडून द्या.

यमदूत म्हणाले, अजामीळाचे चारित्र्य भ्रष्ट झालेले आहे, म्हणून तो जगण्याच्या लायक राहिला नाही.

विष्णुदूत म्हणाले: अजामीळाने पाप केले आहे हे खरे आहे; पण भगवंताचे नाव घेऊन आपल्या पापाचे प्रायश्चित्त देखील त्याने केले आहे. यामुळे त्याची काही पापे जळून गेली आहेत. म्हणून आता याला जिवंत राहू द्या. त्याच्या आयुष्याची बारा वर्षे अजून शिल्लक आहेत.

यमदूत म्हणाले— अजामीळाने 'नारायण... नारायण' तर म्हटले आहे, परंतु ते वैकुंठवासी नारायणासाठी नाही, आपल्या मुलाला हाक मारली आहे.

विष्णुदूत म्हणाले– त्याच्या तोंडातून भगवंताचे नाव अगदी अजाणताच निघाले आहे. अग्नीवर नकळत जरी पाय पडला तरी चटका लागतो आणि आगही होतेच. याचप्रमाणे नकळतही भगवंताचे नाम घेतले तरी कल्याणच होत असते. भगवंताचे नाव नकळतही घेतले तरी फळ मिळेलच. अजामीळाने 'नारायण' शब्दाने वाटल्यास आपल्या मुलालाही हाक मारली असेना का, परंतु त्या निमित्ताने तरी भगवंताच्या नामाचा उच्चार झाला की नाही ?

मोठमोठे महापुरुषदेखील जाणतात की संकेताने, परिहासाने, तानेच्या आलापाच्या वेळी, किंवा कोणाची अवहेलना करताना देखील जरी भगवद् नामोच्चार झाला तरी त्याने पाप नष्ट होत असते.

जो मनुष्य पडला असता, पाय घसरला असता, अंग भंग झाले असता, भाजण्यामुळे आग होताना, ठेच लागताच किंवा अन्य अशाच प्रसंगीं विवशतेने "हरि हरि" शब्दाचा उच्चार करतो, तो नरकयातनेच्या पात्र राहात नाही.

पडल्यानंतर किती का लागले असे ना, पण "हाय हाय" नका करू, "हरि, हरि"च म्हणा.

चुलीवर ठेवलेले उकळते दूध जेव्हा वर येऊ लागते तेव्हा आमच्या माय-बहिणी हाय-तोबा करू लागतात. पण "हाय! हाय!" करून आता होणार तरी काय? "हरि, हरि" म्हणा. नकळतही "हरि हरि" केल्यावर यज्ञाचें फळ मिळेल! नाही तर स्वतःहून (आजकाल) अग्नीला आहुती कोण देतात? "हाय" नाही, "हरि" म्हणा. असे केल्याने नकळतच भगवंताचे स्मरण होईल आणि जपही होईल.

वाल्मीकि-रामायणांत लिहिले आहे कीं मृतात्म्यापाठी "हाय, हाय" अधिक केल्याने मृतात्म्याला कष्ट होत असतात– त्याला दुःख होत असते. "हरि हरि" म्हटल्याने त्याचे फळ मृतात्म्याला मिळते.

विष्णुदूतांनी अजामीळाला यमदूतांच्या बंधनापासून मुक्त केले आणि त्याचा उद्धार झाला. अजामीळाचा अपमृत्यु टळला.

अपमृत्यु टळू शकतो, पण महामृत्यू नाही. थोडेसे आयुष्य शिल्लक असताना पापामुळे येणारा अपमृत्यु सत्कर्मानें टाळला जाऊ शकतो.

अजामीळ बिछान्यात निजल्या निजल्या सर्व काही ऐकत होता. सगळे ऐकून त्याला अतिशय पश्चात्ताप झाला. हृदयापासून प्रायश्चित्त केल्यामुळे त्याची सर्व पापे जळून गेली. त्यानंतर सर्व सोडून तो केवळ भगवद्स्मरण करू लागला.

पश्चात्ताप केल्याने अतिपाप्याचें जीवन देखील बदलून जाते, तो सुधारतो आणि याच जन्मात मुक्ति मिळवतो. म्हणून कोणत्याही पाप्याचा तिरस्कार करू नका, फक्त पापाचाच तिरस्कार करा.

अंतःकरणापासून पश्चात्ताप केल्याने पाप जळून जात असते. प्रायश्चित्त चित्ताची शुद्धि करते.

त्यानंतर अजामीळ नीरस जेवण घेऊ लागला.

ज्याचे जेवण सरस असेल त्याचे भजन नीरस होईल. आणि ज्याचे भोजन नीरस असेल त्याचे भजन सरस होईल.

जीवन किंवा पैसा कुटुंबासाठी नसून श्रीकृष्णासाठीच आहे.

अजामीळाची बुद्धि आता त्रिगुणात्मक प्रकृतीच्या पलीकडे जाऊन भगवंताच्या स्वरूपांत स्थिर झाली. त्याला नेण्यासाठी विमान घेऊन पार्षद आले. विशिष्ट मान म्हणजेच वि-मान. अजामीळ

विचार करू लागला की, तशी तर त्याने अनेक पापे केली होती तरी पण सद्गति मिळाली, नामामध्ये निष्ठा ठेवण्याचे हे फळ आहे.

अजामीळाने "नारायण, नारायण" जप करून जीभ आणि जीवन पवित्र केले.

जिभेला समज दिल्याने ती सुधारेल. श्रीखंड मागितले तर तिला कडुलिंबाचा रस द्या. ती व्यर्थ जास्त बोलते, निरर्थक बडबड करीत राहते– भगवंताचे नाम तर कधी घेतच नाही. जिभेला जर लिंबाचा कडू रस पाजाल तर जिभेवर रामनाम बसेलच!

भगवंताची भक्ति करणाऱ्याला इहलोक आणि परलोक दोहोंतही मान प्राप्त होतो.

भगवंताचे कीर्तन केल्याने अजामीळ परमधामात पोचला. भगवंताच्या नावाचा आसरा घेऊन तो तरून गेला. अजाचा पहिल्याने अर्थ 'माया' सांगितला होता. पण आता भगवन्नामाचा आश्रय घेतल्यामुळे अजाचा अर्थ झाला ब्रह्म. आज अजामीळ अज-ब्रह्माबरोबर मिळून जाऊन ब्रह्मरूप होऊन गेला आहे. आज जीव आणि शिव एकच झालेले आहेत.

अजामीळ शब्दाचे दोन अर्थ आहेतः (१) मायेत फसलेला जीव, आणि (२) ब्रह्मरूप झालेला जीव. मायेचे वर्णन तर अनेक प्रकारे केले गेले आहे.

**३. साधकांसाठी काही आध्यात्मिक कूट प्रश्नोत्तरेः**

श्रीमद् शंकराचार्यांनी मायेची व्याख्या करताना म्हटले आहे की कांचन आणि कांता यांत अडकलेली व्यक्ति मायेत फसलेली समजा.

या जगात कोणत्या वस्तू त्याज्य आहेत? तर उत्तर देतात की या जीवाला अधोगतीकडे कांचन आणि कांता नेतात. या दोहोंत जो फसला तो समजा की मायेत फसलेला आहे.

मणिरत्नमालेची प्रश्नोत्तरे अतिउत्तम आहेत. त्यांच्या एकेका शब्दात उपदेश भरलेला आहे.

बंधनयुक्त कोण आहे? जो पाच विषयांत आसक्त आहे. स्वतंत्र कोण आहे? जो विषयासंबंधी वैराग्यदृष्टी ठेवतो तो. घोर नरक कोणता आहे? स्वदेह हाच घोर नरक आहे. या देहात सुंदरता कुठे आहे? हा तर मांस, रक्त इत्यादी दुर्गंधियुक्त पदार्थांनी भरलेला आहे. स्वर्गाचा सोपान कोणता? सर्व तृष्णांचा क्षयच स्वर्गसोपान होय.

दरिद्री कोण? ज्याची तृष्णा विशाल तो. श्रीमंत कोण? जो नेहमी पूर्णपणे संतोषी असतो तो.

कोणता रोग अत्यंत कष्टदायी आहे? जन्मधारणेचा रोगच अत्यंत कष्टदायी आहे. या रोगाला नष्ट करण्यासाठी औषध काय? परमात्म्याच्या स्वरूपाचें वारंवार चिंतन आणि स्मरण करणे हेच या भवरूपी रोगाला दूर करण्याचे औषध आहे.

आता अजामीळ शब्दाचा दुसरा अर्थही पाहू.

अजाचा अर्थ आहे ईश्वर. ईश्वरात– ब्रह्मांत लीन झालेला जीवच अजामीळ आहे.

साधु होणे कठीण आहे, परंतु साध्या राहणीने एक दिवस साधु होऊ शकतो. साधु होण्याची नाही तर सरळ होण्याची आवश्यकता आहे.

ज्याने रसांना जिंकले, समजा की त्याने सर्व जग जिंकले.

लौकिक सुखाचा प्रयत्न सफल झाला तर समजा की ईश्वराची कृपा झालेली नाही. लौकिक सुखाची इच्छा आणि प्रयत्न जर असफल राहिले तर समजा की ईश्वराची कृपा झाली आहे.

याचे कारण असे की लौकिक सुखांत फसून राहिलेली व्यक्ति ईश्वरभजन करू शकत नाही.

अजामीळाचे जीवन दिव्य झाले. शेवटी तो विमानांत बसून वैकुंठधामी गेला. अजामीळ गेला पण जगाला उपदेश देऊन गेला की महापाप्याने देखील निराश होऊं नये. पाप्याने असा विचार कधीही मनांत आणू नये की, "नामजपासाठी आवश्यक ती शुद्धता किंवा निर्मलता माझ्यात नाही, तेव्हा रामनाम जपण्यात काय फायदा?" असा विचार जर त्याने केला तर तो हे विसरत असतो की हरप्रकारच्या शुद्धीच्या प्राप्तीसाठी रामनामाचा जप हाच एक मात्र उपाय आहे. अतिपापी असूनसुद्धा प्रभूला शरण गेल्यावर त्याचा उद्धार होईल. पापाचे खरे प्रायश्चित्त घेतल्यानंतर पाप जळून जात असते. भगवंताचा नामजप पापाला भस्मसात करून टाकतो.

**"श्रीकृष्ण गोविंद हरे मुरारे,**
**हे नाथ नारायण वासुदेव।"**

हा महामंत्र आहे. अर्थाच्या ज्ञानासहित याचा जप करा.

**श्रीकृष्ण**— हे प्रभो! तुम्ही सगळ्यांच्याच मनाला आकर्षित करणारे आहात, म्हणून माझे मन देखील आकर्षित करा.

**गोविंद**— इंद्रियांचे रक्षण करणारे भगवंत! आपण माझ्या इंद्रियांना स्वतःत लीन करा.

**हरे**— हे दुःखहर्ता! माझ्या दुःखाचेसुद्धा हरण करा. (ज्याचे मन भगवंतात लीन होते त्याच्या सगळ्या दुःखाचें हरण होत असते.)

**मुरारे**— हे मुर राक्षसाला जिंकणारे! माझ्या मनांत वसलेल्या काम, क्रोधादि राक्षसांचा नाश करा.

**हे नाथ**— आपण स्वामी आहांत आणि मी आपला सेवक.

**नारायण**— मी नर आहे आणि आपण नारायण.

**वासुदेव**— वसूचा अर्थ आहे प्राण. माझ्या प्राणांचे रक्षण करा. मी आपले मन तुमच्या चरणांवर अर्पण केलेले आहे.

प्राचीन बर्हि राजाच्या येथे प्रचेता नावाचे दहा पुत्र झाले होते. त्यांना दक्ष नावाचा एक मुलगा झाला. प्रजापति दक्षाने हंसगुह्यस्तोत्राद्वारे आदिनारायण भगवंताची आराधना केली. त्याच्या येथे हर्यश्व नावाचे दहा हजार पुत्र झाले. दक्षाने त्यांना प्रजा उत्पन्न करण्याची आज्ञा केली. परंतु नारायण सरोवराच्या जलाला स्पर्श केल्याकारणाने त्यांना परमहंसधर्म आचरण करण्याची इच्छा झाली.

तेथे त्यांना नारद भेटले. दक्षाच्या या दहा हजार पुत्रांना नारदांनी कूट प्रश्न विचारले. त्या प्रश्नांची या पुत्रांनी उत्तरे विचार करून दिलीं. त्यांतील काही प्रश्नोत्तरे आपण पाहू या.

### ४. काही कूट प्रश्नोत्तरे :

**प्रश्न :** असा कोणता देश आहे की जिथे केवळ एकच पुरुष आहे?

**उत्तर :** ईश्वररूप पुरुष या देहरूपी देशांत वसत असतो.

**प्रश्न :** अशी कोणती गुंफा आहे की जीमध्ये प्रवेश तर करता येतो, परंतु बाहेर निघता येत नाही?

उत्तरः प्रभूचे चरण. तिथून कोणाला परत येता येत नाही. "यद्गत्वा न निवर्तन्ते".

प्रश्नः अशी कोणती नदी आहे कीं जी परस्पर विरुद्ध दिशांना वाहात असते?

उत्तरः संसार. संसाररूपी नदींत, प्रवृत्ति विषयांकडे ओढून घेऊन जाते आणि निवृत्ति प्रभूकडे वाहून घेऊन जाते.

प्रश्नः डोक्यावर जें चक्र फिरत आहे ते कोणते चक्र आहे?

उत्तरः सगळ्या जीवांच्या डोक्यावर कालचक्र फिरत असते.

नारदांच्या कूट प्रश्नांवर विचार करता करता ते दहा हजार पुत्र मोक्षमार्गाकडे प्रवृत्त होऊन गेले. सगळ्यांनाच नारदांनी संन्यासदीक्षा दिली.

जेव्हा दक्षाची सर्वच मुले प्रवृत्तिमार्गापासून भ्रष्ट होऊन गेली, तेव्हा त्याने आणखी दहा हजार पुत्र निर्माण केले. ते देखील नारदांच्या उपदेशाने निवृत्ति-परायण झाले. असे झाल्यावर दक्षाने क्रोधावेशांत नारदांना शाप दिला की तुम्ही केव्हाही एके ठिकाणी राहू शकणार नाही, तुम्हाला नेहमी भटकत राहावे लागेल.

नारदांनी दक्षाचा शाप स्वीकारला आणि दक्षाला म्हटले, "शापाच्या बदल्यात मी तुला वरदान देतो की तुझ्या घरी खूप मुली उत्पन्न होतील. मग त्यांना संन्यास द्यायचा प्रश्नच उरणार नाही.

नारदाने दक्षाला आशीर्वाद दिला!

जो शापाच्या बदल्यात आशीर्वाद देतो तोच संत होय. सहनशीलतेचा निर्वाहच साधुता आहे. सहन करणे तर संतांचा धर्म आहे.

जड-चेतन सर्वांतच जो ईश्वराचे अस्तित्व अनुभवतो त्याच्या मनांत राग, द्वेष कधीच उत्पन्न होत नाहीत.

ब्रह्मदेवाने सर्वच इंद्रिये बहिर्मुख बनविली आहेत. ही इंद्रियें जेव्हा अंतर्मुख होतात, तेव्हाच आनंदाची प्राप्ति होत असते आणि तेव्हाच जीव आणि शिवाचे मिलनही होत असते. जोपर्यंत बाह्यद्वारे बंद करणार नाही तोपर्यंत आतली दारे उघडू शकणार नाहीत.

शुकदेव वर्णन करतात—

राजा! कालांतराने दक्षाचे येथे साठ हजार कन्या जन्मल्या. त्यापैकीं अदितीच्या घरी बारा अपत्यें झाली. यांतील एकाचे नाव होते त्वष्टा. या प्रजापति त्वष्टाला विश्वरूप नावाचा मुलगा झाला.

**५. इंद्राने गमावलेल्या स्वर्ग-राज्याची नारायण-कवचामुळे पुनर्प्राप्तीः**

एक दिवस इन्द्र सिंहासनावर बसला असता तेथे बृहस्पति आले. आपले आणि सर्व देवांचे गुरू बृहस्पति आले असता इंद्राने आसनावरून उठून त्यांचे स्वागत केले नाही. बृहस्पतींना मानाची अपेक्षा असते, धनाची नाही. अशा अपमानामुळे बृहस्पतींनी देवांचा त्याग केला आणि इंद्राला शाप दिला की तू दरिद्री होशील.

संपत्तीच्या मदांत धुंद झालेला आणि ज्ञान-भान विसरलेला मनुष्य दरिद्री झाल्यावरच शहाणा होतो.

दैत्यांना तर हा शुभ प्रसंग वाटला. त्यांनी देवांशी युद्ध सुरू करून स्वर्ग जिंकून घेतला.

पराजित झालेले देवगण ब्रह्मदेवापाशी गेले. ब्रह्मदेवाने देवांची चांगली कानउघाडणी केली. कारण हा पराजय तर त्या ऋषींच्या अपमानाचेंच फळ होते. त्याने ऋषि आणि ब्राह्मणांची सेवा करण्याचा आदेश देऊन म्हटले की एखाद्या ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणाला गुरू मानून त्याला बृहस्पतीचे आसन द्या.

देवांनी विचारले, असा ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण कोण आहे?

ब्रह्मदेवाने सांगितले. प्रजापति त्वष्टाचा मुलगा विश्वरूप ब्रह्मनिष्ठ आहे.

विश्व म्हणजे जग. विश्व म्हणजे भगवान विष्णु. विश्वांतील प्रत्येक वस्तूमध्ये जो विष्णूचे दर्शन करील तोच विश्वरूप होय.

ज्याप्रमाणे सोनाराच्या दृष्टीला आकाराचें नाही, सोन्याचेच महत्त्व अधिक वाटते, त्याचप्रमाणे ज्ञानी पुरुष बाह्य आकाराला महत्त्व देत नाहीत. आकारांतूनच विकार उत्पन्न होतो.

विश्वरूप सर्वच जड-चेतनांत ईश्वराचा प्रकाश पाहात असे.

शत्रूलासुद्धा शत्रु-भावाने न पाहतां ईश्वरभावानें पहा. सगळ्यांच्याच ठिकाणी ईश्वरभाव ठेवणे कठीण आहे. वाटेत एखाद्या सौभाग्यवतीचे दर्शन झाल्यावर लक्ष्मीचा भाव मनात जागृत होऊ शकेल, पण विधवा दिसली तर अशुभ सूचकतेमुळे नजर वळवून घेतात. त्यांना असा विचार येत नाही की ती गंगेप्रमाणे पवित्र आहे.

विश्वरूप ब्रह्मज्ञानी तर होताच, ब्रह्मनिष्ठही होता. ब्रह्मद्रष्टाच ब्रह्मोपदेश करू शकतो. याच विश्वरूपाच्या साहाय्यानें देवांनी दैत्यांचा पराभव केला.

दैत्य कोण आहेत? काम, क्रोध इत्यादीच दैत्य आहेत.

ब्रह्मदेवाच्या आदेशाने देवगण विश्वरूपाकडे गेले. त्याने देवांना नारायणकवच प्रदान केले. त्याच्या साहाय्याने देवांना आपले राज्य पुनः मिळाले (ते त्यांनी पूर्वी बृहस्पतीचा अपमान केल्याने गमावले होते.) नारायणकवचाने समर्थ होऊन इन्द्राने असुरांच्या सेनेचा पराभव केला.

योद्धे संग्रामांत जाताना लोखंडाचें कवच (चिलखत) धारण करीत असतात. याचप्रमाणे नारायणकवच मंत्रात्मक चिलखत आहे.

स्वप्नांत एकातूनच अनेकांची उत्पत्ति होत असते. स्वप्नांतील साक्षी कल्पित असतो. जागृतावस्थेंत जे कांही दिसत आहे ते सर्व एकातूनच निष्पन्न झालें आहे. जेव्हां तुम्ही असें समजाल कीं हे सर्व जगच ईश्वररूप आहे तेव्हांच तुम्ही निर्भय व्हाल.

नारायणकवचाचा आश्रय घेऊन देवांनी दैत्यांचा नाश केला आणि स्वर्गाचें राज्य पुनः मिळवले.

विश्वरूपाचें मातृगृह दैत्यकुळांत होते. तो सर्वांमधेच ब्रह्मनिष्ठा ठेवीत असे. राक्षसांत सुद्धा त्याला ईश्वराचें दर्शन होत होते. त्याचा अभेदभाव सिद्ध झालेला होता. म्हणून तो यज्ञांत दैत्यांना देखील आहुति देत असे.

सगळ्यांमधेच "मी" आहे. या "मी" ला व्यापक करा. "मी" ला संकुचित केलें तर दुःख होईल.

विश्वरूपाची ब्रह्मनिष्ठा इतक्या सिद्धीला पोचली होती कीं त्याला राक्षसांत देखील परब्रह्माचें दर्शन होत असे.

त्याचे मातृगृह असुरकुलांत असल्यामुळे विश्वरूप चोरून असुरांनाही यज्ञभाग देत असे. इंद्राला हे आवडलें नाही. यामुळे इंद्रादि देवांची ब्रह्मभावना सिद्ध झाली नाही. दैत्यांना यज्ञभाग न देण्याचे सांगूनही, गुरू मानीनात. म्हणून इंद्राने विश्वरूपाचें डोके कापून टाकले. हें ऐकून प्रजापति

त्वष्टाला फार दुःख झालें. त्याने असा संकल्प केला कीं जेणेकरून इंद्राला मारणारा पुत्र प्राप्त व्हावा.

**६. इंद्र-वध करू शकेल अशा पुत्र-प्राप्तीसाठीं त्वष्टा यज्ञ करतो :**

सकाम कर्मांत जर थोडीशीही चूक झाली तर विपरीत फळ मिळते. देवाला प्रसन्न करण्याच्या इच्छेने कर्म करा. कोणतेही कार्य करताना अशी इच्छा नका ठेवू कीं जग माझी प्रशंसा करील. जगाने तर प्रभु रामचंद्रांची देखील निंदा केली होती. लोककल्याणाच्या हेतूनेच प्रभु रामांनी मानवशरीर धारण केले होते. अनेक प्रकारची दुःखे सहन केली होती, तरी पण जनसमुदायाने त्यांची कदर केली नाही.

तुम्ही असाच निश्चय करा कीं जे कांही माझ्या प्रभूला आवडते तेच मला करायचे आहे. सकाम कर्मांतील थोड्या न्यूनानें देखील अनर्थ होतो. निष्काम कर्मांतील चूक (न्यूनता) क्षम्य आहे पण सकाम कर्मांतील थोडीशी चूक सुद्धा अक्षम्य असते.

यज्ञमंत्रांत कांही चूक झाली आणि इंद्राची हत्या करणाऱ्या पुत्राऐवजी इंद्राचे हातून मारला जाणारा पुत्र उत्पन्न झाला. मंत्र होता:—

**'इंद्रशत्रो विवर्धस्व, इंद्रशत्रो विवर्धस्व।'**

हा मंत्र म्हणताना ऋत्विजांनी 'इंद्र' शब्दाला उदात्त आणि 'शत्रो' शब्दाला अनुदात्त करून म्हटलें. असें झाल्यामुळे शद्बार्थ बदलून गेला आणि परिणामी इंद्रघातक पुत्राऐवजी इंद्राद्वारे मरणारा पुत्र उत्पन्न झाला.

याच कारणाने वेदमंत्रांचा अधिकार सगळ्यांना दिला गेला नाही. मंत्रोच्चार किंवा मंत्रपाठांत चूक झाली तर अनर्थ होऊन जातो. फक्त सात्त्विक विद्वान ब्राह्मणच वेदाचा शुद्ध पाठ करू शकतो.

भागवतांत कर्माची निंदा केलेली आहे. भागवतशास्त्रांत केवळ भक्तीचेच महत्त्व आहे आणि कर्म गौण मानले आहे. कर्म करताना एकच हेतु असला पाहिजे अन् तो हा कीं देवाला प्रसन्न करायचे आहे.

यज्ञकुंडांतून वृत्रासुर उत्पन्न झाला. तो देवांना त्रास देऊ लागला. देवांची सर्वच अस्त्रे-शस्त्रे त्याच्यापुढे प्रभावहीन सिद्ध झालीं. घाबरून जाऊन देव परमात्म्याला शरण गेले आणि त्याची प्रार्थना करू लागले.

परमात्म्याने देवांना सांगितले कीं जर दधीचि ऋषींच्या अस्थींनी वज्र बनविता आले तर त्या वज्राने वृत्रासुर मारला जाऊ शकेल. त्याबरोबरच भगवंतांनी देवांना दटावले देखील कीं मला प्रसन्न करण्यासाठी भक्तीसारखे श्रेष्ठ वरदान मागण्याऐवजी तुम्ही एका तुच्छ वस्तूची मागणी केली आहे!

प्रभूंनी आपलें तेज वज्रांत ठेवून दिले.

वृत्रासुराला मारण्यासाठी इंद्र वज्र घेऊन युद्ध करू लागला.

त्रासदायक वृत्ति म्हणजेच वृत्रासुर! वृत्ति अंतर्मुख झाली म्हणजेच जीवाचें ईश्वराशी मिलन होऊ शकते. कोणत्याही स्थितींत ईश्वरापासून विभक्त होऊ नका. वृत्तीची बहिर्मुखता दुःख देणारी आहे. त्रासदायक आहे. ही तर देवांना देखील त्रास देत असते.

मनाला स्थिर ठेवायचे असेल तर डोळ्यांनाही एके ठिकाणींच स्थिर करा. वृत्ति बहिर्मुख झाली असता कथेंत किंवा मंदिरांत दर्शन घेण्यांत आनंद मिळत नाही. बहिर्मुखी वृत्तीला ज्ञानरूपी वज्राने नष्ट करून टाका.

ज्ञान प्रधान बल आहे. याच्या साहाय्याने विषयवृत्तींना, आवरण वृत्तींना (वृत्रासुराला) मारा. तेव्हांच इंद्रियांच्या अधिष्ठात्या देवांना शांति मिळेल.

भागवतांत पहिले चरित्र सांगितले जाते आणि उपसंहारांत सिध्दान्त सांगितला जातो.

ब्रह्मनिष्ठा इतकी अटळ असली पाहिजे कीं इतर विषयांत मन रमू नये. मनुष्य विषयांमध्यें आनंद शोधीत असतो. म्हणूनच तो त्याला मिळत नाही. प्रभुभजनांत वज्रासारखी अटळ निष्ठा ठेवा.

दधीचि ब्रह्मनिष्ठ होते, म्हणून त्यांच्या अस्थींमध्येंही दिव्यता होती.

एक कोटी जप केल्याने माळेंत दिव्यता येते. चैतन्य येते. शास्त्रांत म्हटलें आहे कीं, मंत्र, माळ आणि मूर्ति यांना केव्हांही बदलू नये. प्रत्येक मंत्रांत दिव्य शक्ति आहे. जो कोणता मंत्र मिळाला असेल त्यावर दृढ श्रद्धा ठेवून जप करा. मूर्ति सुद्धा कधीही बदलू नका.

ज्या स्वरूपांत रुचि असेल त्यांत पूर्ण निष्ठा ठेवा. त्यांतूनच प्रभु प्रकट होतील.

वज्र धारण करून इंद्र वृत्रासुराशी युद्ध करायला गेला. दोघांमध्ये भयंकर युद्ध झालें.

वृत्रासुर पुष्टिभक्त अर्थात अनुग्रह आहे. इंद्राच्या हातांत जे वज्र आहे त्यांत स्वतः नारायण आहेत, पण ते इंद्राला दिसत नाहीत. वृत्रासुराला मात्र दिसतात. कारण तो पुष्टिभक्त आहे. तो इंद्राला म्हणतो, 'इंद्रा! तू वज्राने माझ्यावर लवकर प्रहार कर. भलेही तुझा जय होवो, पण तुझ्यापेक्षा भगवंताची कृपा माझ्यावरच जास्त आहे.

लौकिक सुखांच्या प्राप्तीचा प्रयत्न सफल झाला नाही तर समजा कीं परमेश्वराने तुमच्यावर कृपा केली आहे. परमेश्वर ज्या कोणत्या जीवावर अधिक कृपा करतात, त्याला जास्त लौकिक सुख देत नाहीत. लौकिक सुख दिल्यावर जीव ईश्वरापासून विमुख होत असतो.

श्रीकृष्णाचें नामस्मरण लौकिक सुखाच्या प्राप्त्यर्थ कधीही करू नका. लौकिक सुखांत विघ्न उपस्थित झाले तर समजा कीं प्रभु तुम्हाला अलौकिक सुख देणार आहेत. ज्या जीवावर प्रभूची विशेष कृपा होते त्याचे लौकिक सुखप्राप्तीचे प्रयत्न भगवंत यशस्वी होऊ देत नाहीत. ज्या जीवावर साधारण कृपा करतात त्याला लौकिक सुख देतात.

वृत्रासुर इंद्राला म्हणालाः 'इंद्रा! विजय तर तुझाच होणार आहे आणि स्वर्गाचें राज्यही तुलाच मिळणार आहे. परंतु मी मात्र भगवंताच्या त्या धामीं जाईन की जिथून माझें केव्हांही पतन होणार नाही. तुझें स्वर्गांतून पतन होऊ शकेल, परंतु माझे नाही. भलेही मला लौकिक सुख न मिळो, पण मी तर प्रभूच्या धामीं जाईन.

**७. भक्त वृत्रासुराने केलेली श्रीहरीची स्तुति व तिचे स्पष्टीकरणः**

वृत्रासुर श्रीहरीची स्तुति करू लागला. या स्तुतीची वैष्णवग्रंथांनी फार प्रशंसा केली आहे. या स्तुतीचा इत्यर्थ असा–

'प्रभो! आपण माझ्यावर अशी कृपा करा की ज्यामुळे आपल्या चरणकमलांची सेवा करण्याची संधि मला पुढल्या जन्मीही मिळेल. हे प्राणवल्लभ, माझें मन आपल्या मंगलमय गुणांचें स्मरण

करीत राहो.' माझी वाणी आपलें गुणगान करीत राहो. माझें शरीर आपल्या सेवेंत संलग्न राहो.

'हे भगवन्! तुम्हाला सोडून तर मला स्वर्ग, ब्रह्मलोक, भूमंडल, रसातल, योगसिद्धि—फार काय मोक्षाची देखील इच्छा नाही. तुमच्या अनुपस्थितींत या सगळ्यांचे मी काय करू? तुम्हाला सोडून मला कांहीच नको.'

'हे कमलनयना! ज्या प्रकारे पंख नसलेली पक्ष्यांची पिलें आपल्या आईची वाट पाहतात किंवा गाईचें उपाशी वासरू दूध पिण्यासाठी आपल्या गो-मातेची वाट पाहात असते किंवा विरहिणी स्त्री आपल्या परदेशवासी पतीला भेटण्यासाठी उत्कंठित राहते. त्याच प्रकारे आपल्या दर्शनासाठी माझें मन व्याकुळ आहे.' प्रभूला भेटण्याची आतुरता किती उत्कट असली पाहिजे हे या उदाहरणांनी दाखविले गेले आहे.

'प्रभो, मला मुक्तीची इच्छा नाही. माझ्या कर्माचे फळ म्हणून मला जन्ममृत्यूच्या चक्रांत वारंवार फसावे लागले तरी त्याची मला पर्वा नाही. पण मी जिथे कुठे जाईन, ज्या कोणत्या योनीमध्यें जन्म घेईन तिथे भगवंताच्या प्रिय भक्तजनांची मैत्री मिळत राहो. भगवन्! माझी एवढीच इच्छा आहे कीं तुमच्या मायेमुळे शरीर, घर, स्त्री-पुत्रादि माणसांशी माझा कोणत्याही प्रकारचा संबंध येऊ नये.'

गरीब— अगदी दीन होऊन शरण गेल्याने त्या जीवाला प्रभु आपला म्हणतात. वृत्रासुर किती दीन होता? तो म्हणतो कीं मी भगवंताची सेवा करायला अपात्र आहे, म्हणून भगवंताच्या दासांच्या दासांची मी सेवा करीन. मी भगवंताचे सेवक जे वैष्णव त्यांची सेवा करीन. मी सगळ्याच इंद्रियांना भक्तिरसाचें दान केले आहे. माझ्या वाणीने कृष्णकीर्तन करावे. माझ्या कानांनी कृष्णकथा ऐकाव्यात.

वैराग्याशिवाय भक्ति दृढ होत नाही. भोगासाठी भक्ति करू नका. भक्ति तर भगवंतासाठीच करीत असतात. दुसरा श्लोक वैराग्याचा आहे. वृत्रासुराने भक्तीच्या द्वारें इंद्राचे राज्य किंवा मोक्ष मिळण्याची अभिलाषा धरली नाही.

भगवंतांनी वृत्रासुराला विचारलेः वैष्णवांची सेवा करून तुला कांही मागायचे आहे काय? तर त्याने उत्तर दिले कीं, मला स्वर्ग तर काय, ब्रह्मलोकाच्या राज्याची देखील इच्छा नाही.

भक्तींत भोग बाधक होतो.

आजकाल तर शिक्षणच असें दिले जात आहे कीं ज्यायोगे विषयवासना वाढतच जातात. विषयवासना वाढल्याकारणाने जीवनही बिघडत चालले आहे.

वृत्रासुर म्हणतो, माझी कांहीच इच्छा नाही. मी तर आपली सेवा करू इच्छितो. मी तुमच्याच उपयोगी येऊ इच्छितो.

पहिल्या श्लोकांत वृत्रासुराची शरणागति आहे. दुसऱ्या श्लोकांत त्याचे वैराग्य दिसून येते. ज्ञानी शरणागतीचे तीन भेद मानतात. नाथ, मी तुमचा आहे. परमेश्वराने आपले म्हटल्यावर जीव समजू लागतो कीं देव माझा आहे, देव माझा आहे. अशा भावाचा उदय झाला म्हणजे असा अनुभव येऊ लागतो कीं जगांत आता आणखी कांही मागण्यासारखे नाहीच.

ज्ञान आणि वैराग्य वाढल्यावर सर्व कांही प्रभुमयच वाटू लागते. 'माझे' पण निघून जाते. "अहम् ब्रह्मास्मि" ची प्रतीति येऊ लागते. जगतांत त्याच्या लेखी परमेश्वराशिवाय आणखी कांहीच शिल्लक राहात नाही. "मी" उरत नाही. तो "मी" ईश्वरांत विलीन होऊन जातो. वैराग्याशिवाय

शरणागति दृढ होऊ शकत नाही.

तिसऱ्या श्लोकांत प्रार्थना केली आहे कीं "हे, प्रभो! आपण मला आपल्या दर्शनासाठी आतुर करा." परमेश्वर पूर्ण प्रेम मागतो, पण जीव त्याला पूर्ण प्रेम देत नाही म्हणून त्याला जीव आवडत नाही. जीव आपलें प्रेम देत असतो स्त्रीपुत्रादींना. म्हणून वृत्रासुर म्हणतो, 'माझी तर ही एकच इच्छा आहे कीं तुमच्या दर्शनासाठी मी आतुर व्हावें.'

चौथ्या श्लोकांत वृत्रासुराने सत्संगाची अभिलाषा व्यक्त केली आहे. तो म्हणतो, "देवा! पुनर्जन्म द्यायचाच असेल तर मला वैष्णवांच्या घरची गायच बनव. जर माझें दूध प्रभूच्या उपयोगांत येणार असेल तर मी पशु सुद्धा व्हायला तयार आहे. पशुशरीरांत देखील मला सत्संग मिळावा.

वृत्रासुराने अशी स्तुति केली कीं इंद्रासनही डोलू लागले.

भक्ति भगवंताला पराधीन करून टाकते. अर्थात भक्ति भगवंताला भक्ताच्या आधीन करीत असते. भगवंत जेव्हां कृपा करतात तेव्हां ते नाशवंत संपत्ति देत नाहीत, भक्तीच देतात. भगवंत मुक्ति लवकर देतात, पण भक्ति नाही. कारण जर भगवंतांनी भक्ति दिली तर त्यांना भक्ताचें सेवक देखील बनावे लागते. भक्ति स्वतंत्र परमात्म्याला प्रेमाच्या बंधनाने बांधून टाकते.

स्तुति समाप्त झाल्यावर इंद्राने वृत्रासुराचा वध केला. वृत्रासुराच्या शरीरातून निघालेले तेज भगवंताच्या शरीरांत विलीन झाले. भगवंतांनी वृत्रासुराचा उद्धार केला.

सहाव्या स्कंधांत पुष्टिलीलेचे वर्णन आहे. भगवंताने वृत्रासुराला पुष्टिभक्ति प्रदान केली.

परीक्षिताने विचारले– असा महान भक्त असूनही त्याला राक्षसयोनींत जन्म कां घ्यावा लागला? त्याला अशी तीव्र हरिभक्ति कशी प्राप्त झाली? त्याचा पूर्ववृत्तांत काय?

शुकदेव वर्णन करतात–

### ८. वृत्रासुराच्या पूर्वजन्मीचे म्हणजेच चित्रकेतूचे चरित्रः

राजा, ऐक. वृत्रासुर आपल्या पूर्वजन्मांत चित्रकेतु नावाचा राजा होता. त्याच्या राणीचें नाव होते कृतद्युति. त्याला कांही संतति नव्हती.

इथे शब्दार्थाने नव्हे, लक्ष्यार्थाने समजून घेतले पाहिजे. जो चित्रविचित्र कल्पना करीत असतो तोच चित्रकेतु होय. बुद्धि म्हणजेच कृतद्युति! मन अनेक विषयांचें चिंतन करते. त्या विषयाकार स्थितींतच चित्रकेतूचा जन्म होतो.

मनांत ठसलेली बाहेरची चित्रेंच भजनांत विघ्नकर्ता होत असतात.

एकदा चित्रकेतु राजाचे घरी अंगिरा ऋषि आले. राजाने त्यांच्याजवळ पुत्र मागितला. अंगिरा ऋषि म्हणाले, पुत्राच्या माता-पित्यांना देखील शांति कुठे आहे? तुला कांही मूलबाळ नाही हेच चांगले आहे.

राजाच्या मनांत संसाराची अनेक चित्रें ठसलेली होती, म्हणून त्याने दुराग्रह केला. ऋषींच्या कृपेने त्याच्या येथे मुलगा जन्माला आला. राजाच्या आणखी राण्या होत्या. मत्सरामुळे एका सावत्र आईने त्या मुलास विष दिले; म्हणून तो मृत्यू पावला. हे पाहून चित्रकेतु आणि कृतद्युति रडू लागले.

असा शोक करीत असता तेथे अंगिरा ऋषींबरोबर नारद आले. मुलाच्या मृत्यूमुळे राजाराणींना विलाप करताना पाहून नारदांनी त्यांना उपदेश दिला कीं मुलाकरिता रडणें आता व्यर्थ आहे; आता

तुम्ही आपल्या स्वतःकरताच अश्रू ढाळा. तो मुलगा जेथे गेला आहे तेथून कांही आता परत येणार नाही.

पुत्र चार प्रकारचे सांगितले आहेत:

१) **शत्रुपुत्र** – पूर्वजन्मीचा कोणी वैरीच त्रास देण्यासाठी पुत्ररूपाने येतो.

२) **ऋणानुबंधी** – पूर्वजन्मीचा कर्जदाता आपली बाकी वसूल करण्यासाठी पुत्ररूपाने येतो.

३) **उदासीन पुत्र** – जोपर्यंत तो अविवाहित असतो तोपर्यंत तो आईबापांबरोबर राहतो. आईबापांना तो कांही देतही नाही आणि त्यांच्यापासून कांही घेतही नाही. असा मुलगा लग्न झाल्यावर आईबापांपासून वेगळा होतो. आईबापांची इच्छा असते कीं मुलाचें लग्न झाल्यावर त्याचे चार हात होतील आणि तो आपली सेवा करील. पण ह्या विचार करीत असता ते हे विसरून जातात कीं चार हातांबरोबर चार पायही होत असतात. विवाह झाल्यानंतर मनुष्य अधिक करून पशुवत जीवनच जगत असतो.

४) **सेवक पुत्र** – पूर्वजन्मी कोणी एखाद्याने सेवा घेतली असेल तर तो या जन्मांत सेवा करण्यासाठी पुत्ररूपाने येऊन सेवा करतो.

आम्ही कोणाची सेवा करू नये पण दुसऱ्यांनी आमची सेवा करावी अशी आशा करणें निरर्थक आहे.

स्कंदपुराणांत पुंडलिकाचें चरित्र आहे. पुत्राने मातापित्यांची सेवा कशी करावी यासाठी हा दृष्टान्त आहे.

पुंडलिकाचें दर्शन घेण्यासाठी भगवंत स्वतः आले होते. तो भगवंताचें दर्शन घ्यायला नव्हता गेला.

पुंडलीक आईबापांची नेहमी सेवा करीत असे. तो आपल्या आईबापांनाच सर्वस्व समजत होता. आईबापांच्या अशा सेवेमुळे भगवंतांनी प्रसन्न होऊन त्याला दर्शन दिले. जेव्हां भगवंत दाराशी आले, तेव्हां पुंडलीक तर आईबापांच्या सेवेत रत होता. तो तर बिचारा गरीब होता. त्याची एक छोटीशी झोपडी होती. आंत बसायला जागा सुध्दा नव्हती. भगवंत बाहेरच उभे राहून पुंडलिकाची वाट पाहू लागले.

भगवंत साक्षात प्रगट झाले तरी पुंडलिकाने मातापित्यांच्या सेवेचे काम अर्धवट ठेवले नाही. भगवंत विटेवर उभे राहिले म्हणून त्यांचे नाव विठोबा पडले.

उभ्या उभ्या जेव्हां भगवंत थकले तेव्हां त्यांनी आपले हात कंबरेवर ठेवले. आजसुद्धा पंढरपुरांत ते ह्याच ध्यानांत उभे आहेत. पुंडलिकाने त्यांना जसे उभे राहायला सांगितले होते तसेच्या तसेच ते आजही उभे आहेत.

कटीवर हात ठेवून ते सांगत आहेत कीं माझ्या जवळ येणाऱ्याला, माझा आसरा घेणाऱ्याला संसारसमुद्र फक्त इतकाच (कटिपर्यंत) खोल आहे.

नारद चित्रकेतु-राजाला सांगतात: राजा, तुझा शत्रूच पुत्र होऊन जन्माला आला होता. चांगलेच झाले कीं तो मेला. तू तर आनंद मानायला पाहिजे.

घर, धन, पत्नी, विविध ऐश्वर्य, शब्दादि विषय, राज्यसमृद्धि, सेवक, मित्रजन, नातेवाईक इत्यादी सर्वच शोक, मोह, भय आणि दुःख देणारे आहेत. हे सर्वच नाशवंत आहेत.

जीवाचे हजारो जन्म होऊन गेले, होत आहेत आणि होतील. यात कोण कोणाचा भाऊ

अन् कोण कोणाचा नातेवाईक? ज्याप्रमाणें जलप्रवाहांत वाळूचे कण केव्हां एकत्र होतात आणि केव्हां विखरून जातात, त्याचप्रमाणे कालाच्या प्रवाहांत-संसारांत प्राणी एकत्र होतात आणि दूरदूर निघूनही जातात.

जेव्हां त्या मृत राजकुमाराच्या जीवात्म्याला आणले गेले तेव्हां तो कोणालाच ओळखत नव्हता. तो म्हणाला, माझे तर हजारो जन्म होऊन गेले आहेत. मी त्यांपैकी कोणकोणत्या मातापित्यांची आठवण ठेवू? आणि असे सांगून तो जीवात्मा निघून गेला.

नारद म्हणाले: राजा, तू ज्याचेसाठी रडत आहेस तो तर तुझ्याकडे पाहूंसुध्दा इच्छित नाही. तरी पण तू त्याकरता शोक करीत आहेस!

नारदांनी चित्रकेतूला दिव्य ज्ञान दिलें आणि संकर्षणमंत्राचा उपदेश पण दिला.

यानंतर चित्रकेतु राजाने तपश्चर्या केली आणि भगवंताच्या नामाचा जप केला. म्हणून त्याला भगवंताचें दर्शन झाले. त्याच्या सगळ्या पापांचा क्षय झाला. तो महाज्ञानी आणि महासिद्ध झाला आणि भगवंतांनी त्याला पार्षद बनविले.

एक दिवस चित्रकेतु आकाशांत विहार करीत होता. तो फिरत फिरत कैलासधामीं आला. तेथे त्याने पार्वती शंकराच्या मांडीवर बसलेली पाहिली. ते पाहून त्याच्या मनात वाईट विचार आला.

विषयवासनेंतून चित्रकेतूचा जन्म होत असतो. प्रत्येक स्त्री-पुरुषाला नरनारायणाच्या रूपांत पाहिल्यावर वासना उत्पन्न होणार नाही. चित्रकेतूने सांसारिक भावाने शिवपार्वतीला पाहिले.

या चरित्रावरून हें स्पष्ट होत आहे कीं ज्ञानाविना भक्ति व्यर्थ आहे. मात्र सगुण साक्षात्काराने मन शुद्ध होत नाही. साक्षात्काराने मनाची चंचलता नष्ट होत नाही. सगुण आणि निर्गुण दोन्ही भक्ति असल्यावरच जीव शिव होऊ शकतो.

लौकिक दृष्टिवश होऊन चित्रकेतु शिवपार्वतींना कामभावाने पाहू लागला.

शिवपार्वतींच्या अशा बसण्याचे एक कारण होते. एकदा कामदेवाला पुनः शंकराशी युद्ध करण्याची इच्छा झाली. शंकर म्हणाले, एकदा तर मी तुला जाळून टाकले होते. तर कामदेव म्हणाला, समाधीमधे बसून जाळून टाकणें कांही मोठी गोष्ट नाही. समाधीच्या अवस्थेंत तर कोणीही जीव मला जाळू शकतो. माझ्या मनांत एक छोटीशी शंका अजून शिल्लक आहे. तुम्ही पार्वतीला आलिंगनबद्ध करा, मी त्याच वेळीं आपला बाण सोडीन. जर तुम्ही त्याही वेळी निर्विकार राहू शकलात तर मी समजेन कीं आपण महादेव आहात. शंकर तयार झाले. पार्वतीला आलिंगनबद्ध करून ते अर्धनारी नटेश्वर बनले. कामाने त्यांना विचलित करण्याचा पुरेपूर प्रयत्न केला, परंतु त्याला यश मिळाले नाही. शंकर निर्विकारच राहिले. कामदेवाने आपला पराजय स्वीकारला आणि शंकराला शरण आला.

चित्रकेतूला हें कांहीं ठाऊक नव्हतें. म्हणून शंकरांची निंदा करून तो म्हणाला कीं, भरसभेंत पत्नीला आलिंगन देऊन व मांडीवर घेऊन बसताना यांना लाज कशी वाटत नाही?

शिव-पार्वती तर निर्विकार होतेच. परंतु त्यांना पाहणाऱ्यांच्या डोळ्यांत विकार होता. कोणाला लौकिक भावाने पाहाल तर मनांत विकार उत्पन्न होईल आणि विकृत दृष्यें मनांत उमटतील.

अशा रीतीने लौकिक भावाने पाहिल्यामुळे चित्रकेतूचें पतन झालें.

त्याच्या निंदेमुळे शंकराला तर कांही वाईट वाटले नाही. ज्याच्या डोक्यावर गंगा (ज्ञानगंगा)

असेल त्याला निंदारस प्रभावित करू शकत नाही. परंतु पार्वतीला ही गोष्ट असह्य झाली. तिने चित्रकेतूला शाप दिला— उद्धटा! तुझा जन्म आता असुरयोनींत होईल.

चित्रकेतु पार्वतीजवळ क्षमा-याचना करू लागला. देवी म्हणाली— 'दुसऱ्या जन्मांत तुला अनन्य भक्ति प्राप्त होईल आणि तुझा उद्धार होईल.' पार्वतीच्या शापामुळे चित्रकेतू वृत्रासुराच्या रूपांत जन्मला.

मन-चित्रकेतु जर शुभकल्पना करील (ज्याप्रमाणें चित्रकेतूने वृत्रासुराच्या रूपांत केली होती) तर शेवटी सुखी होऊ शकेल आणि दुष्ट कल्पना केल्यावर दुःखी होईल.

नारद आणि अंगिरा अशा संतांच्या समागमाने मन-बुद्धि ऊर्ध्वगामी होतात. मनांत विषयांची दृष्यें न यावीत आणि सात्त्विक भाव जागावेत याकरिता लक्ष्मीनारायणाचें सतत पूजन करा. विष्णु सत्त्वगुणाचे अधिपति देव आहेत. त्यांची सेवा केल्याने मनांत सात्त्विक भाव जागृत होतात. विषयांची दृश्यें आंत असतात. डोळे मिटून बसाल तर ती बाहेर येतात. या दृश्यांना पुसण्यासाठी लक्ष्मीनारायणाची सेवा करणें आवश्यक आहे.

दितीच्या दोन्ही पुत्रांचा मृत्यू झाला. दितीने इंद्राला मारण्यासाठी व्रत केले. इंद्राला मारणारा पुत्र उत्पन्न व्हावा यासाठी कश्यपाने दितीला एक वर्षाचें व्रत सांगितले. त्या व्रताचें नाव होते पुंसवन व्रत.

चंचल मनाला ईश्वरांत स्थिर करण्याचें साधन म्हणजेच व्रत. व्रताने मनाची चंचलता कमी होते आणि ईश्वराच्या ठिकाणीं अधिक स्थिर होते. मनाला ईश्वरचिंतनांत गुंतवून ठेवण्याचें साधन म्हणजेच व्रत होय. दितीने व्रत केले, पण व्रताच्या नियमांचें योग्य पालन केले नाही. परिणामी व्रत-भंग झाला. त्याचा परिणाम म्हणूनच मरुतगणांची अत्पत्ति झाली.

भेदबुद्धीच दिति आहे. चंचल मनोवृत्तीला एकाच ठिकाणी स्थिर करून, एकालाच अनेकांत पाहावे तेव्हां व्रत सफल होते. भेदभावामुळे दितीकडून व्रताचा भंग झाला. आता दिती इंद्राला म्हणाली, 'ही माझी संतति आहे, पण यांची गणना देवांमधे व्हावी. आता दितीच्या मनांत इंद्राबद्दल कुभाव राहिला नाही.

या मरुत्‌गणांच्या उत्पत्तीचें वर्णन करून या स्कंधाची कथा समाप्त केली गेली आहे.

श्रीकृष्ण गोविंद हरे मुरारे।
हे नाथ नारायण वासुदेव॥

॥ षष्ठ स्कंध समाप्त ॥

●●●

## ॥ श्रीहरिः ॥

# ॥ सप्तम स्कंध ॥

**श्रीकृष्णाय नमः॥**

सहाव्या स्कंधांत पुष्टिअनुग्रहाची कथा सांगितली होती. भगवदनुग्रहानंतर विकारवासनेला नष्ट करून, अनुग्रहाचा जर सदुपयोग केला तरच तो पुष्ट होऊ शकतो. पूजन-अर्चन-स्मरणांत तन्मय होऊनच जीव पुष्ट होऊ शकतो. भगवंत अनेक जीवांवर अनुग्रह करीत असतात, परंतु त्या अनुग्रहाचा सदुपयोग करण्याची रीत जीवाला ठाऊक नसते. परिणामतः जीव पुष्ट न होता, दुष्ट मात्र होऊन जातो.

आता आपण हिरण्यकशिपू आणि प्रल्हादाची कथा ऐकू. हिरण्यकशिपु दैत्य झाला आणि प्रल्हाद देव. हिरण्यकशिपूने सगळ्या संपत्तीचा उपयोग भोगविलासासाठी केला म्हणून तो दैत्य झाला. प्रल्हादाने आपल्या वेळेचा आणि शक्तीचा उपयोग भक्ति करण्यांत केला म्हणून तो देव झाला.

सातव्या स्कंधांत वासनेचे तीन प्रकार सांगितले आहेत. १) असद् वासना, २) सद्वासना, ३) मिश्र वासना.

**१. भगवंत वस्तुतः सर्वांनाच समभावाने पाहतोः**

या सातव्या स्कंधाच्या आरंभी परीक्षित राजाने एक महत्त्वपूर्ण प्रश्न विचारला आहे– 'तुम्ही म्हणता कीं ईश्वर सर्वत्र आहे आणि तो समभावाने व्यवहार करीत असतो. जर असेच आहे तर जगांत ही विषमता कां दृष्टिगोचर होत आहे? उंदरातही देव आहे आणि मांजरीतही देव आहे. तर मग मांजर उंदराला का मारून खाते?' भगवंत जर सम आहेत तर ते जगांत विषमता कां उत्पन्न करतात? जर ते समभावी आहेत तर पुनःपुन्हा देवांचा पक्ष घेऊन दैत्यांना ते कां मारीत असतात? ते जर ईश्वर आहेत तर मग ते विषमता कां करतात?

भगवंताच्या दृष्टीने जर सगळेच प्राणी समान आहेत तर त्यांनी इंद्राकरिता वृत्रासुराचा वध का केला?

मी समजत होतो दैत्य तर पापी आहेत, म्हणून हरि त्यांची हत्या करीत असतात. पण वृत्रासुर तर भगवद्-भक्त होता, मग त्यांनी त्याची हत्या का केली?

शुकदेव म्हणतात– 'राजा! क्रियेमध्ये भलेही कदाचित विषमता असली तरी भावात मात्र विषमता असू नये.

समता अद्वैतभावात असते; क्रियेमध्ये ती संभवत नाही. क्रियेत तर विषमताच राहील.

म्हणून भावांत समता ठेवली पाहिजे.

घरात आई, बायको, मुले असतात. पुरुष या सर्वांवर प्रेमभाव तर एकसारखाच ठेवतो, पण सगळ्यांशी एकसारखाच व्यवहार (वर्तन) करू शकत नाही. तो आईला नमस्कार करील, पण मुलीला नाही.

प्रेम आत्म्यावर असते, देहावर नाही.

भावनेच्या क्षेत्रांत तर अद्वैतभाव असायलाच पाहिजे. आपणा सर्वांना समदर्शी व्हावयाचे आहे, समव्यवहारी नाही. समव्यवहारी तर होणेच शक्य नाही.

भागवताला आधिभौतिक साम्यवाद मान्य नाही. फक्त आध्यात्मिक साम्यवादच मान्य आहे.

राजा, तुला वाटते की भगवंतानी देवाचा पक्ष घेऊन असुरांचा नाश केला. परंतु त्यांनी हा संहार असुरांवर कृपा करण्याच्या हेतूनेच केला होता.

एक दृष्टान्त ऐक. एक चोर चोरी करण्याच्या उद्देशाने घरांतून निघाला, परंतु वाटेत ठेच लागून तो खाली पडला आणि त्याचा एक पाय तुटला. त्यामुळे तो चोरी करू शकला नाही. ही भगवंताची कृपा झाली की अवकृपा? ह्याला तर कृपाच समजले पाहिजे. पाय तुटला पण त्यामुळेच तो पाप करू शकला नाही.

राजा, तुम्ही स्वतः जसे असाल तसेच ईश्वरस्वरूपही तुम्हास दिसेल. ईश्वराचे कांही एक निश्चित स्वरूप नाही. जीव त्याला ज्या भावाने पाहतो त्याच्यासाठी तो तसाच होतो.

वल्लभाचारी म्हणतात, ब्रह्म ईश्वरलीला करीत असते, म्हणून ते अनेक रूपे धारण करते.

श्रीशंकराचार्य म्हणतात, ब्रह्म सर्वव्यापक आणि निर्विकार आहे. त्या ब्रह्माचे काही कार्य नाही. कलशांत ठेवलेले पाणी तर बाहेर काढता येते, परंतु आत सामावलेले आकाश बाहेर काढता येणार नाही. ईश्वराला कोणी बाहेर काढू शकत नाही.

ईश्वरावर मायेमुळे कर्त्याचा आरोप केला गेला आहे. हा वेदान्ताचा सिद्धान्त आहे. मायेचे कार्य ईश्वराच्या अधिष्ठानावर आभासित होते. लोक गाडीत बसून अहमदाबादला जातात. अहमदाबादला पोचल्यावर ते म्हणतात 'अहमदाबाद' आले. परंतु हे येण्याचे कार्य त्या नगराचे नसून गाडीचे आहे.

ईश्वर निराकार रूपाने सर्वव्यापक आहे. ईश्वर जर कोण्या एखाद्याच ठिकाणावर ये-जा करील तर मग त्याला सर्वव्यापक कसे म्हणता येईल? कोणत्याही ठिकाणी ज्याचा अभाव असणार नाही त्यालाच सर्वव्यापक म्हणता येऊ शकेल.

आचार्य शंकरांचे मत आहे कीं ईश्वर निष्क्रिय आहे. मायेमुळेच त्याच्याद्वारे कार्य केले जाण्याचा भास होतो. पण वस्तुतः ईश्वर काहीच करीत नाही, म्हणून त्याच्यांत विषमता नाही.

अग्नि निराकार आहे पण जेव्हा लाकूड जळत असते तेव्हा लाकडासारखाच आकार अग्नीचाही भासत असतो. उपाधीमुळे आकाराचा भास होतो.

परमात्म्याचे वास्तविक स्वरूप व्यापक, निराकार आणि आनंदरूप आहे. आचार्य शंकरांचा हा दिव्य सिद्धान्त आहे.

महाप्रभूंचा सिद्धान्तही दिव्य आहे. वैष्णव मानतात कीं ईश्वराच्या अक्रियात्मकतेचे तत्त्व बरोबरच आहे. ईश्वर कर्म तर करीत नाही पण लीला करतो. ईश्वर निष्क्रिय आहे हे खरे आहे, परंतु तो लीला करीत असतो हेही तितकेच खरे आहे. ज्या कर्मात कर्तेपणाचा अभिमान नसतो तीच

लीला होय. ईश्वर स्वेच्छेने लीला करतात.

"मी कर्ता आहे" अशा भावाविना निष्कामभावाने जे कर्म केले जाते तीच लीला होय. केवळ दुसऱ्याला सुखी करण्याच्या हेतूने जे कर्म केले जाईल ती लीला असते. कृष्णाचा अर्थ लीला आहे. ईश्वराला सुखाची इच्छा नाही. कृष्ण चोरी तर करतो पण दुसऱ्यांच्या भल्याकरता. कर्म बंधनकारक असते, लीला मुक्तिदायक.

जीव जे काही करतो ते कर्मच असते. कारण त्याच्या प्रत्येक क्रियेच्या मुळाशी स्वार्थभावना आणि अभिमान असतात.

दोन्ही सिद्धान्त सत्य आहेत. ईश्वर निराकार निर्विकल्प आहे आणि माया क्रिया करीत असते, हा सिद्धान्तही दिव्य आहे. ईश्वर काहीच करीत नाही, परंतु त्याच्यावर कर्म करण्याचा अध्यारोप केला जातो. मायेमुळे ईश्वराच्या व्यवहारांत विषमतेचा भास होतो. ईश्वर परिपूर्ण सम आहे आणि जगत् विषम.

समता ईश्वराची आहे. विषमता (वैषम्य) मायेची आहे. वस्तुतः ईश्वर सम आहे परंतु मायेकारणे त्यात वैषम्य दिसून येते. ईश्वराच्या अधिष्ठानामुळे माया कार्य करीत असते, म्हणून माया जे कांही कार्य करते त्याचा अध्यारोप ईश्वरावर देखील केला जातो. दिवा स्वतः तर कांहीच करीत नसतो, पण दिवा नसेल तर कांहीच करता येणार नाही.

भगवंत दैत्याला मारीत नाहीत, तर तारीत असतात. विषमता कार्यात आहे, भावात नाही. भगवंत दैत्यांना मारतात परंतु त्यांच्या प्रहारांत देखील प्रेम भरलेले असते.

सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुण प्रकृतीचे आहेत, आत्म्याचे नाहीत.

जीवाच्या उपभोगासाठी शरीर निर्माण करण्याची भगवंत जेव्हा इच्छा करतात तेव्हा रजोगुणाच्या बलांत वृद्धि करतात. जीवाचे पालन करण्यासाठी सत्त्वगुणाच्या बलांत आणि संहार करण्यासाठी तमोगुणाच्या बलांत वृद्धि करतात.

राजा! तू जो प्रश्न मला विचारलास तोच प्रश्न तुझ्या पितामहांनी, धर्मराजांनी नारदांना विचारला होता.

राजसूय यज्ञांत प्रथम श्रीकृष्णांची पूजा केली ती शिशुपालाला मान्य झाली नाही म्हणून तो भगवंतांची निंदा करू लागला. श्रीकृष्णांनी खूप वेळपर्यंत शिशुपालाची निंदा सहन केली, परंतु सरतेशेवटी त्यांनी सुदर्शनचक्राने शिशुपालाचे मस्तक उडविले. त्याच्या शरीरांतून बाहेर निघालेले आत्मतेज द्वारकाधीशांत विलीन झाले आणि शिशुपालाला मुक्ति मिळाली.

हा प्रसंग पाहून युधिष्ठिराला आश्चर्य वाटले. त्याने नारदांना विचारले– भगवंताशी शत्रुत्व असूनही शिशुपालाला सद्गति का मिळाली? त्याने भगवंतांना अपशब्दाने अपमानित केले तरी पण तो नरकवासी कां झाला नाही? उलट अशी सायुज्य गति त्याला कां मिळाली? भगवंताशी द्वेष करणारे शिशुपाल आणि दंतवक्र नरकवासी व्हावयास पाहिजे होते, तर असे उलट कसे झाले?

नारद म्हणाले; ऐक राजा! परमात्म्याशी कोणत्या ना कोणत्या रीतीने तन्मय होण्याची आवश्यकता आहे. परमात्म्याने म्हटले आहे, जीव त्याला वाटेल त्या भावाने माझ्याशी तन्मय होवो, मी त्याला आपल्या स्वरूपाचे दान करीत असतो.

राजा, कोणत्या तरी भावाने मन परमात्म्याशीं एकरूप झाले पाहिजे.

ज्याप्रमाणे भक्तीद्वारा ईश्वराकडे मन लावून कित्येक जण परमात्म्याची गति मिळवू शकले

त्याचप्रमाणे काम, द्वेष, भय किंवा स्नेह यांच्याद्वारे भगवंताशी नाते जोडून कित्येक व्यक्ति सद्गति मिळवू शकल्या आहेत.

गोपींनी मिलनाच्या तीव्र इच्छेने, कंसाने भीतीने, शिशुपाल इत्यादी कांही राजांनी द्वेषाने, यादवांनी पारिवारिक संबंधाने, आपण स्नेहाने आणि आम्ही भक्तीने आपल्या मनाला भगवंताशी जोडून घेतले आहे.

काही गोपी कामवासनेने कृष्णाला भजत होत्या. श्रीकृष्णाचे स्वरूप पाहून भलेही त्यांचेविषयी कामभाव जागृत होवो, परंतु ज्याचे ध्यान करीत आहेत तो तर निष्काम आहे. निष्काम कृष्णाचे ध्यान करता करता गोपी देखील निष्काम होऊन गेल्या. परंतु जगतातील स्त्रीपुरुषांचे ध्यान कामभावाने कराल तर नरकांत जाल.

श्रीकृष्णाप्रति कामभाव ठेवून सतत त्याचे चिंतन करणाऱ्या गोपीदेखील निष्काम झाल्या. परमात्मा पूर्ण निष्काम असल्यामुळे त्यांना अर्पण केलेला काम सुद्धा निष्काम होऊन गेला.

कामाचा उदय रजोगुणांतून होत असतो. ईश्वर बुद्धीच्या पलीकडे आहे– बुद्धीला अनाकलनीय आहे. ईश्वराजवळ काम जाऊ शकत नाही. सूर्याजवळ अंधार जाऊ शकत नाही.

ज्याचे चिंतन केले गेले होते ते श्रीकृष्ण निष्काम असल्याकारणाने त्यांचे कामभावाने चिंतन करणाऱ्या गोपी सुद्धा निष्काम झाल्या.

कंस भीतीमुळे तन्मय झाला होता. त्याला नेहमी देवकीचा आठवा मुलगाच समोर दिसायचा. शिशुपाल आपल्या शत्रूच्या रूपात भगवंताचे चिंतन करीत राही.

याप्रकारे कोणत्यातरी भावाने ईश्वराशी तन्मय झाले पाहिजे. प्रत्येक मनुष्यानेच श्रीकृष्णाशी आपले मन जोडून घेतले पाहिजे.

हा शिशुपाल म्हणजे कोणी साधारण व्यक्ति नव्हती. तो विष्णुभगवानांचा पार्षद होता.

नारदांनी जयविजयांच्या तिन्ही जन्मांची कथा संक्षेपाने सांगितली. जय आणि विजय पहिल्या जन्मांत हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपु झाले. दुसऱ्यांत रावण आणि कुंभकर्ण झाले आणि तिसऱ्या जन्मांत शिशुपाल आणि दंतवक्त्र झाले.

**२. भक्त प्रल्हादाच्या आख्यानाचा प्रारंभः**

नारदांनी हिरण्यकशिपु आणि प्रल्हादाच्या कथेला आरंभ केला. ते म्हणाले, दितीला दोन पुत्र होते– हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपु. वराह भगवानांनी हिरण्याक्षाचा वध केला होता.

धर्मराजाने नारदांची प्रार्थना केली की, 'मी प्रल्हादाची कथा सविस्तर ऐकू इच्छितो. तो महान् भगवद्भक्त होता तरी हिरण्यकशिपूने त्याला मारण्याची का इच्छा केली?

नारद म्हणालेः दिति म्हणजे वस्तुतः भेदबुद्धि होय. भेदबुद्धीमुळे हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपु म्हणजे ममता आणि अहंकार उत्पन्न होत असतात. 'मी' आणि 'माझे' ही भेदबुद्धीची अपत्यें होत. सर्वच दुःखाचे मूळ ही भेदबुद्धि आहे आणि सगळ्या सुखांचे मूळ अभेदभाव होय. शरीराने नाही पण बुद्धीने जरी अभेदभाव स्थापित होऊ शकला तरी सगळ्यांविषयीं समबुद्धि होऊ शकते.

अहंकाराला मारणे कठीण आहे. विवेकाने ममतेचा तर नाश होऊ शकतो पण अहंभावाचा नाही. परंतु अर्पण करणारी व्यक्ति जर आपले 'मी–पण' देखील प्रभूला अर्पण करून टाकील तर भगवंत कृपा करतील. माझ्यांत अभिमान नाही असे म्हणणे देखील अभिमानच होय.

हिरण्यकशिपु अहंकाराचेच रूप आहे. त्याचा व्यवहारच असा असतो की ज्यामुळे देवांना, ज्ञानी पुरुषांना आणि इतर सर्वांनाच कष्ट (दुःख) होतात. अभिमान सगळ्यांनाच त्रास देतो आणि रडवीत असतो. ममता तर लवकरच मरून जाते पण अहंकार लवकर मरत नाही. त्याला मारणे फार कठीण आहे. तो रात्री मरत नाही की दिवसाही मरत नाही. तो ना घरांत मरत ना घराच्या बाहेर. तो घराच्या बाहेरही असतो आणि आंतही. तो शस्त्राने मारला जात नाही की अस्त्रानेही नाही. त्याला मध्यस्थानांतच मारावे लागते. मनुष्य जर आपला अहंकार नष्ट करील तर तो ईश्वरापासून दूर राहणार नाही.

अभिमान आंतच सामावलेला असतो. मनुष्याला दुःख देणारा हाच आहे. या अहंकाराला मारायचे आहे. तो दरवाजातल्या उंबऱ्यावरच मरेल. रासकथेत म्हटले गेले आहे कीं प्रत्येक दोन गोपींच्या मध्ये एक श्रीकृष्ण आहे. याच प्रकारे तुम्ही दोन वृत्तींच्या मध्ये श्रीकृष्णाला ठेवाल (स्मराल) तर तुमच्या अहंकाराचा नाश होईल. एक संकल्प पूर्ण झाल्यावर आणि दुसरी वृत्ति सुरू होण्यापूर्वी जर श्रीकृष्णाचे स्मरण कराल तर तुमच्या अहंकाराचा नाश होईल. प्रत्येक इंद्रियाचें मिलन जोपर्यंत परमात्म्याशीं होत नाही तोपर्यंत अहंकार भरलेलाच असतो. जर पुरुष ईश्वरस्मरणांत तन्मय झाला आणि इतर कोणत्याही भेदाचे अस्तित्व ठेवले नाही तर अहंकाराचा मृत्यू अवश्य होईल.

ज्ञान सुलभ आहे, परंतु जोपर्यंत अहं आणि ममता नष्ट होणार नाही तोपर्यंत ज्ञानाला शोभा येत नाही.

हिरण्यकशिपू ज्ञानी होता, परंतु त्याचें ज्ञान अहंभाव आणि ममतेने भरलेले होते. आपल्या भावाच्या मृत्यूच्या वेळी देखील त्याने ब्रह्मोपदेश दिला.

जो दुसऱ्यांना उपदेश देतो आणि स्वतः तो उपदेश आपल्या आचरणांत आणत नाही तो असुर होय.

हिरण्यकशिपु इतरांना तर ज्ञानोपदेश देत असे, पण स्वतः एकच विचार करीत असे कीं माझ्या भावाचे मारेकरी जे विष्णु त्यांचा बदला मी केव्हांतरी घेईनच.

एका गृहस्थाच्या मुलाचा मृत्यू झाला तेव्हां कोणा एका साधूने त्यावेळी उपदेश केला कीं हा संसार मिथ्या आहे. कांही दिवसांनी त्या साधूची म्हैस मेली तेव्हा तो रडू लागला. न जाणो ह्या वेळी त्याचे ज्ञान कोठे उडून गेले होते! त्या गृहस्थाने तेथे येऊन विचारले, 'साधूमहाराज! आता तुम्ही का रडत आहांत?' तर साधू म्हणाला कीं तो पुत्र तुझा होता म्हणून मी तुला उपदेश दिला, पण ही म्हैस माझी आहे म्हणून मी रडत आहे.

जोपर्यंत अहंभाव आणि ममता विद्यमान असतात तोपर्यंत ज्ञान पचू शकत नाही. भक्तिरहित ज्ञान शाब्दिकच राहते. म्हणून त्या ज्ञानाने जीवाला कांहीच लाभ होत नाही. वैराग्य आणि भक्तीच्या अभावी ज्ञानाचा अनुभव येत नाही.

जो कोणी मनुष्य वेदान्ताच्या आणि ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी करीत असेल परंतु सांसारिक विषयांवर प्रीती ठेवीत असेल तर तो दैत्यच आहे– तो दैत्यवंशाचा आहे असे समजा.

हिरण्याक्षाच्या मृत्यूचें वर्तमान ऐकून हिरण्यकशिपूने म्हटले, 'मी माझ्या भावाला मारणाऱ्या विष्णूशी युद्ध करीन. त्याने दिति मातेला अनेक प्रकारची उपदेशवचने ऐकवून संतुष्ट केले. त्याने विचार केला की, मी विष्णूशी आताच युद्ध करणार नाही, परंतु प्रथम वरदान प्राप्त करून अमर

होईन आणि मग युद्ध करीन.

हिरण्यकशिपु तपश्चर्या करायला निघाला तेव्हां त्याची पत्नी कयाधू हिने विचारले की परत केव्हा याल? त्याने उत्तर दिले कीं, कांही निश्चित नाही. मी दहा हजार वर्षेपर्यंत तप करीन, तपाने अनेक सिद्धि मिळवून मी घरी परत येईन.

हिरण्यकशिपु मंदराचल पर्वतावर आला. ही कथा भागवतात नाही. व्यासांनी विष्णुपुराणांत ही कथा लिहिली आहे. हिरण्यकशिपूच्या तपश्चर्येचे वर्तमान कळल्यावर देवांनी बृहस्पतीला प्रार्थना केली की, 'आपण हिरण्यकशिपूच्या तपश्चर्येत विघ्न उत्पन्न करा. हे ऐकून बृहस्पती पोपटाचे रूप घेऊन मंदराचल पर्वतावर आले आणि जेथे हिरण्यकशिपु तपश्चर्या करीत बसला होता तेथेच एका झाडावर बसून "नारायण, नारायण" असा जप करू लागले. हिरण्यकशिपूने मंत्रजपाचा आरंभ केला रे केला कीं पोपट 'नारायण, नारायण' म्हणू लागायचा. हे पाहून हिरण्यकशिपू म्हणाला की विष्णूला मारण्यासाठीच तर मी तपश्चर्या करीत आहे आणि त्याचेच भजन हा पोपट करीत आहे. हा कुठून आला इथे? जातच नाही! आज तपश्चर्या करायला शुभ दिवस नाही, असा विचार करून संध्याकाळी तो घरी परत गेला.

कयाधूला आश्चर्य वाटले कीं माझा पति आजच कां परतला? पण ती हा प्रश्न पतीला कसा विचारील? कारण तो तर रागीट होता. कदाचित संतापून तो म्हणायचा, तुला काय देणं-घेणं आहे त्याच्याशी? म्हणून कयाधूने विचार केला की एखाद्या युक्तीनेच ही गोष्ट मी त्यांना विचारून घेईन. तिने स्वयंपाकघरांतील सेवकांना सांगितले कीं आज मीच स्वयंपाक करीन.

पतीच्या गुप्त गोष्टी जाणून घ्यायच्या असल्या तर कयाधूच्या मार्गाने चला. भोजनाने चांगले वशीकरण होत असते. लोभ्याला द्रव्याने वश करा आणि अभिमान्याला प्रशंसेने.

हिरण्यकशिपू अभिमानी होता. म्हणून त्याची पत्नी सेवा करता करता त्याची प्रशंसा करू लागली.

राजा भोजाने एकदा कालिदासाला विचारले होते कीं, साखरेपेक्षा सुद्धा जास्त गोड वस्तू कोणती आहे? कालिदासाचें उत्तर होते प्रशंसा.

कयाधू म्हणू लागली– इंद्र, चंद्र इत्यादी देव तर तुम्हाला थरथर कापतात. तुम्ही जितेन्द्रिय आहांत– ज्ञानी आहात. तुमच्यासारखा वीर तर कधी झालाच नाही आणि कधी होणारही नाही. मला ठाऊक आहे कीं ठरलेले काम पूर्ण केल्याशिवाय तुम्ही परत येणार नाही. आज वनामध्ये असा काही प्रसंग झाला काय कीं त्यामुळे तुम्हाला परत यावे लागले?

कयाधूने काही गरमागरम भजी इत्यादी खाऊ घातली असतील– राक्षसांना असेच अन्न पसंत असते. ज्याला सात्त्विक जेवण पसंत नाही तो राक्षसच होय.

हिरण्यकशिपु आपली स्तुति ऐकून फुलून गेला आणि म्हणू लागला– "तसा तर मी निश्चय केलेले काम पूर्ण झाल्याशिवाय परत आलो नसतो, परंतु आज एक विघ्न आले आणि अपशकुनही झाला म्हणून मी परत आलो.

कयाधूने विचारले, कोणती अडचण आली होती आणि काय अपशकुन झाला?

हिरण्यकशिपु म्हणाला, मी ज्या झाडाखाली तपश्चर्या करायला बसलो त्याच झाडावर बसून एक पोपट "नारायण, नारायण" करू लागला.

कयाधूला फार आनंद झाला. कारण काही का होईना, आज ह्यांनी नारायणाचे नाव तर

घेतले! कारण माझे पति फारच अभिमानी आणि नास्तिक आहेत. जर मी त्यांना नारायणाचें भजन म्हणायला सांगितले तर ते ऐकणार नाहीत, म्हणून मला काही तरी युक्ति योजावी लागेल.

आपल्या पतीला पापप्रवृत्तीपासून युक्तीने वाचवील आणि त्याला पाप करण्यापासून परावृत्त करील तीच खरी पत्नी आहे. पतीला धर्म-परमात्म्याच्या मार्गाने घेऊन जाईल तीच धर्मपत्नी होय. पतीला पत्नीच धर्म आणि मोक्षमार्गावर घेऊन जाऊ शकते.

कयाधूला वाटले ही फारच चांगली संधी आहे, ह्या निमित्ताने मी आपल्या पतीकडून वारंवार भगवद्नामोच्चार तर करवून घेऊ शकेन! तिची फार इच्छा होती की आपला पती सुधारावा. जेवण इत्यादी आटोपून निजायचे वेळी तिने पतिचरणांची सेवा करीत असताना म्हटले की जेवायच्या वेळी तुमच्या गोष्टींकडे माझे नीट लक्ष नव्हते. हं, तर मग वनांत काय घडले होते?

हिरण्यकशिपुः तेथे एक पोपट येऊन '**नारायण... नारायण...**' बोलू लागला.

कयाधुः पोपट काय म्हणत होता?

हिरण्यकशिपुः **नारायण!... नारायण!!**

कयाधुः हे असे कसे होऊ शकते? काय, खरोखरच पोपट बोलत होता?

हिरण्यकिशपुः हो, तो **नारायण नारायण** म्हणत होता.

बिचारा कामातुर पती! पत्नीने युक्तीने पुनःपुन्हा हीच हकीगत त्याच्याकडून वदविली.

कयाधूने याच संधीचा फायदा घेऊन आपल्या पतीच्या मुखांतून **नारायण** नामोच्चार एकशेआठ वेळा करविला.

साधारणतः पुरुष कामांधतेमुळेच स्त्रीच्या आधीन होतो. म्हणून पत्नीची इच्छा असेल तर ती पतीला सुधारू शकते. पत्नी जर सुपात्र असेल तर आपल्या पतीला भगवत्भजनांत लीन करू शकेल.

माता-पिता (हिरण्यकशिपु-कयाधु) भगवंताचा नामोच्चार करीत असतानाच मातेच्या गर्भात प्रल्हादाची स्थापना झाली, म्हणून पिता राक्षस असता देखील त्याचा मुलगा प्रल्हाद महान् भगवद्भक्त झाला.

कयाधु गर्भवती झाली आणि हिरण्यकशिपु तपश्चर्या करण्यासाठी वनांत निघून गेला. तेथे त्याने छत्तीस हजार वर्षेपर्यंत तपश्चर्या केली. अन्नपाण्याचा देखील त्याग केला. या कलियुगात प्राण आणि अन्न जलमय आहे, परंतु सत्ययुगांत प्राण अस्थिमय होता. म्हणून तशी तपश्चर्या शक्य होती.

नुसते तप करूनच मनुष्याचे कल्याण होऊ शकत नाही, तो शुद्ध होऊ शकत नाही. तपाबरोबरच भावना आणि हेतूसुद्धा शुद्ध असले पाहिजेत.

हिरण्यकशिपूचा हेतू शुद्ध नव्हता. दुर्योधनानेही विष्णुयाग केला होता पण त्यासाठी वापरलेले धन पापमय होते.

जर योगाची साधना करीत असता योग्याचा हेतू शुद्ध नसेल तर त्याचे निश्चितच पतन होईल. नुसत्या योगसाधनेने हृदय विशाल होऊ शकत नाही. ब्रह्मानुभूतीविना हृदय विशाल होऊ शकत नाही.

हिरण्यकशिपूची तपश्चर्या देवांना त्रास देण्यासाठी आणि भोगविलासासाठीच होती. गीतेच्या भाषेंत म्हणायचे झाले तर त्याचे तप तामस-तप होते. म्हणून जे फळ मिळायला पाहिजे होते

ते मिळाले नाही.

हिरण्यंकशिपूच्या तपश्चर्येने प्रसन्न होऊन ब्रह्मदेव तेथे आले. तो तर मातीच्या ढिगाऱ्याने झाकला गेला होता. ब्रह्मदेवाने पाणी शिंपडले तेव्हा तो बाहेर आला. ब्रह्मदेवाने विचारले, 'तुझी काय इच्छा आहे?' तर हिरण्यकशिपु म्हणाला, मला अजर-अमर बनवा. ब्रह्मदेव म्हणाले, मरण प्रत्येकालाच आहे. ज्या कोणाचा जन्म झाला आहे त्याला मरावे लागतेच. तू अन्य काही माग.

हिरण्यकशिपु म्हणाला: मला तर अमरत्वाचेच वरदान हवे आहे. म्हणून मला तुम्ही असा वर द्या की मला दिवसा किंवा रात्री मरण येऊं नये. जडाकडून वा चेतनाकडून मृत्यू येऊं नये. तसेच मी शस्त्रानें वा अस्त्रानें मरूं नये.

ब्रह्मदेवाने विचार केला की याने इतके कठोर तप केले आहे तेव्हा वर तर द्यावाच लागेल. त्याने त्याला त्याच्या इच्छेनुसार वर दिला.

आता हिरण्यकशिपु इतका शक्तिशाली झाला की त्याने सर्व देवांना पराभूत केले.

देवांनी दुःखामुळे प्रभूची प्रार्थना केली. जेव्हा जेव्हां माझे प्रिय वैष्णव व्यथित होत असतात तेव्हा तेव्हा मी अवतार घेत असतो, असे भगवंतांनी सांगितले.

जर एखादा पापी दुःखी होत असेल तर भगवंत त्याची उपेक्षा करतात. त्याच्यासाठी अवतार घेत नाहीत. पण ते आपल्या भक्ताची उपेक्षा कधीच करू शकत नाहीत. भक्तांवर विपत्ति आली असता त्यांना अवतार घ्यावाच लागतो.

देवांना भगवंतांनी आश्वासन दिले की जेव्हा केव्हा हिरण्यकशिपु आपल्या मुलाशी शत्रुत्व करील आणि त्याच्या हत्येसाठी तत्पर होईल तेव्हा मी अवतार घेऊन हिरण्यकशिपूचा वध करीन.

इकडे कयाधूच्या उदरी प्रल्हादाचा जन्म झाला आणि तो दिवसेंदिवस मोठा होऊ लागला. सर्वांनाच त्याच्यापासून आनंद-आल्हाद मिळत होता म्हणून त्याचे नाव प्रल्हाद ठेवण्यात आले.

दैत्यांचे गुरु होते शुक्राचार्य. त्यांना शंड आणि अमर्क नावाचे दोन मुलगे होते. जेव्हा प्रल्हाद पाच वर्षांचा झाला तेव्हा हिरण्यकशिपूने शंडामर्कांना बोलावून सांगितले की या माझ्या मुलाला राजनीतीचे शिक्षण द्या.

शुकदेव वर्णन करतात:

राजा, आज्ञेनुसार शंडामर्क प्रल्हादाला राजनीति शिकवीत असत. परंतु प्रल्हाद गर्भात आल्यापासूनच भक्तीच्या रंगात रंगलेला होता.

प्रल्हादाला भगवान वासुदेवांविषयी स्वाभाविक प्रेम होते. श्रीकृष्णाच्या अनुग्रहरूपी ग्रहाने त्याचे हृदय इतके आकर्षित केले होते की त्यांना जगताविषयीं काहीच आकर्षण राहिले नव्हते.

तसा भक्तीचा रंग इतक्या लवकर लागत नाही. पण जेव्हा तो लागतो तेव्हा सांसारिक प्रवृत्तींविषयी वैराग्य निर्माण होते.

मीराबाईने म्हटले आहे की माझ्या कृष्णाचा रंग श्याम आहे आणि श्याम रंगावर इतर कोणत्याच रंगाचा प्रभाव पडत नाही.

प्रल्हाद तर जन्मल्यापासूनच भक्तीच्या रंगात रंगलेले होते. ते महावैष्णव होते. ते गुरुजींचे शिकवणे ऐकत असत, परंतु राजनीतिविषयक चिंतन ते मुळीच करीत नसत.

खऱ्या ज्ञानी भक्तांचे लक्षणच असे आहे की जोपर्यंत देहमान राहते तोपर्यंत त्यांच्या व्यवहारात कोणतीच चूक होत नाही.

गुरुजींना वाटले कीं हा राजपुत्र तर फार शहाणा आहे, तेव्हा याच्या शिक्षणाने प्रसन्न होऊन याचे वडील मला काही ना काही पुरस्कार अवश्य देतील. ते प्रल्हादांना घेऊन राजसभेत आले. प्रल्हादाने वडिलांना नमस्कार केला, तेव्हां वडिलांनी बाळाला उचलून मांडीवर बसवून प्रेमाने विचारले– बाळा, तू गुरुजींच्या येथे शिकायला गेला होतास तर तुला कालचे शिकविलेले आठवते की नाही? जो कोणता धडा तुला चांगला वाटला असेल तो म्हण.

प्रल्हादाला विचार पडला, वडील तर उत्तम प्रकरणाविषयीं विचारीत आहेत आणि इकडे गुरुजींनी मारणे, कापणेच्या गोष्टी शिकविल्या आहेत, त्या मी कशा सांगू शकेन बरे? म्हणून त्याने वडिलांना चांगलीशी गोष्ट सांगितली.

"अंधाऱ्या विहिरीप्रमाणे हे घरच आपल्या अधःपाताचे मूळ कारण आहे. करिता, गृहत्याग करून वनवासी व्हावे आणि तेथे भगवान श्रीहरीचा आश्रय घ्यावा हेच जीवासाठी श्रेयस्कर आहे."

प्रल्हाद म्हणाले: "बाबा, अनेक जन्मांच्या अनुभवाने हे सांगतो की हा जीव कित्येक वेळा स्त्री, पुरुष, पशु, पक्षी बनलेला आहे. हजारो जन्मांपासून विभूपासून विभक्त झालेला हा जीव लौकिक सुखोपभोगात मग्न आहे. तरीदेखील तो अतृप्त आहे. तृप्ति भोगाने नाही, त्यागानेच मिळत असते. संसार तर दुःखाचा सागर आहे. प्रत्येक जीव व्यथित आहे. पाप आणि पुण्य समान झाले असता मानवदेह मिळत असतो. जसे पाप भोगावे लागते तसे पुण्यही भोगावेच लागते. संसार प्रतिक्षण परिवर्तनशील आहे."

"बाबा, आजपर्यंत माझे अनेक जन्म होऊन गेले आहेत. मी आपल्या अनुभवाने सांगतो की स्वार्थ आणि कपटाशिवाय या जगांत आणखी काहीच नाही. तरी पण जीव अविवेकी आहे. निःस्वार्थ प्रेमी असा एक परमात्माच आहे. इतर सर्वांचे प्रेम स्वार्थ आणि कपटाने भरलेले आहे. संसारात राहून कपट आणि छळ करावेच लागतात. एखादी वासना आली की छल-कपट करावेच लागते."

पति-पत्नींच्या प्रेमांतही स्वार्थ आणि कपट असतेच. जीव किती स्वार्थी आणि कपटी आहे? मला एक सासुरवाशिण भेटली होती. ती सांगत होती की, तिच्या सासूने तिला तंबी दिली आहे की तीन मुली पुरेशा आहेत, जर चौथ्यांदा तिने पुनः मुलीला जन्म दिला तर काहीही करून तिला घरांतून हाकलून दिले जाईल.

तसे पाहिले तर मुलाचा जन्म असो की मुलीचा, ही तर कोणाच्या हातातली बाब नाही. मुलगा एकाच कुलाचा उद्धार करतो परंतु सुयोग्य मुलगी तर पिता आणि पती, दोन्ही कुलांचा उद्धार करते.

दुर्दैवाने जर बायको आजारी पडली तर तो चारपांच हजारांचा खर्च करील, दोन-चार वर्षे वाट देखील पाहील. अन् तरी तिचा आजार जर बरा झाला नाही तर तो देवाला नवस करील की हिचे काही होऊन जाईल तर चांगले. याचाच अर्थ ही मरून जाईल तर बरे, हा असतो. त्याला वाटते माझे वय अजून काही फार नाही! ४८वे वर्षच तर आता सुरू झाले आहे; माझा कारभार (नोकरी इत्यादी) देखील अजून चांगला चालला आहे, तेव्हा दुसरी बायको मिळेलच.

पति-पत्नीच्या प्रेमांतही कपट असते. पति किंवा पत्नी एक दुसऱ्याला जर दुःखदायक असतील तर त्यांना वाटत असते हा (ही) मरून जाईल तर किती चांगले होईल!

पति-पत्नी एकमेकांची सुखसोय पाहात असतात म्हणून ते एकमेकांना प्रिय असतात.

त्यातून कोणा एकापासूनही दुःख होऊ लागले की त्याचेविषयी तिटकारा सुरू होतो. जगांत स्वार्थ आणि कपटाशिवाय आणखी काहीच नाही.

अशा प्रकारचा वार्तालाप याज्ञवल्क्य ऋषि आणि मैत्रेयी यांच्यामधे झाला होता.

याज्ञवल्क्य ऋषींनी संन्यास ग्रहण करण्याचा निश्चय केला. त्यांनी आपल्या पत्नी मैत्रेयी आणि कात्यायनी यांना म्हटले– "मी आता संन्यासी होणार आहे. माझी संपत्ती तुम्हा दोघींमध्ये एकसारखी वाटून देतो म्हणजे तुमच्यांत भांडण-तंटा होणार नाही.

मैत्रेयी तर ब्रह्मवादिनी होती. तिने पतीला विचारले– "या धनसंपत्तीने काय मला मोक्ष मिळेल? मी अमर होईन?"

याज्ञवल्क्य– अग, धनाने कधी मोक्ष मिळत असतो का? हो, याने तुला सुखसोयी, भोगाचे पदार्थ मिळू शकतात आणि म्हणून आनंदाने आयुष्य घालवू शकशील.

मैत्रेयी: ज्या धनाने मला मोक्ष प्राप्त होणार नाही ते धन घेऊन मी काय करू? तुम्ही हे कात्यायनीलाच द्या.

मैत्रेयीच्या जिज्ञासेने प्रभावित होऊन मुनींनी तिला ब्रह्मविद्येचा उपदेश दिला आणि मोक्षाची साधने सांगितली.

याज्ञवल्क्य म्हणाले: हे मैत्रेयी! आपल्या स्वतःच्याच सुखासाठी घर, पुत्र, पत्नी इत्यादी प्रिय वाटत असतात. तसा तर प्रिय फक्त एक आत्माच आहे.

पतीवर पत्नीचे जे प्रेम असते ते पतीच्या कामनापूर्तीसाठी नसून आपल्या स्वतःच्या कामनापूर्तीसाठी असते. याचप्रकारे पतीचे पत्नीप्रेम आणि मातापित्यांचे पुत्रप्रेम देखील आपल्या स्वतःच्याच कामनापूर्तीसाठी असते. पत्नी पतीवर प्रेम करते कारण पति तिला जीवनाधार देत असतो. पति असेल तरच मी जिवंत राहू शकेन याच आशेने पत्नी पतीवर प्रेम करीत असते. याचप्रमाणे पति देखील केवळ तिच्याचसाठी पत्नीवर प्रेम करीत नाही. तो तिच्यावर याचकरिता प्रेम करीत असतो की ती त्याच्या सर्व इच्छा पूर्ण करीत असते. माता, पिता पुत्रावर याकरता प्रेम करतात की त्यांना ही आशा असते की मोठा झाल्यावर तो आपले पालन करील. मनुष्य मनुष्यावर प्रेम करीत नाही तर तो आपल्या स्वार्थावरच प्रेम ठेवीत असतो.

प्रल्हाद म्हणतो: अनेक जन्मांच्या अनुभवाने मी हे सांगतो की जगात कोणालाच खरी शांति मिळालेली नाही.

घरांत चांगल्या रीतीने भजन करता येत नाही, म्हणून भजन घरात नाही, तर वनांत जाऊन करायचे असते. एकांतात जाऊनच नारायणाची आराधना करायला पाहिजे.

समाजसुधाराची कल्पना तशी फार चांगली आहे. पण त्याबरोबरच अहंकारदेखील उत्पन्न होत असतो, आणि अहंकार आपल्याबरोबर सगळ्याच अवगुणांना घेऊन येत असतो. समाजाला कोणी देखील सुधारू शकत नाही. म्हणून तुम्ही हाच भाव धरा कीं मी आपलेच आचरण आणि मन सुधारीन. साधारण मनुष्य जगाला सुधारू शकत नाही. शंकराचार्य किंवा वल्लभाचार्यांचेच हे काम आहे.

प्रल्हादाच्या अशा गोष्टी ऐकून हिरण्यकशिपूला क्रोध आला. त्याने शंडामर्कला दाटले की माझ्या मुलाला त्यांनी असा कसा उपदेश दिला? हे कसले शिक्षण दिले?

शंडामर्कः आम्ही तर असे शिक्षण त्याला कधीच दिले नाही.

हिरण्यकशिपुः हे पहा, देव मला घाबरत असतात. म्हणून ते सूक्ष्म रूप घेऊन विष्णूचा प्रचार करीत असतात. तेव्हा त्यांच्यापासून सावध रहा.

शंडामर्कांनि प्रल्हादाला विचारलेः आम्ही ज्या गोष्टी तुला कधीच शिकविल्या नाहीत त्या तू आपल्या पित्यासमक्ष कशा सांगितल्यास?

प्रल्हादः जीव कोणाच्या सांगण्यावरून भक्ति करीत नाही की ईश्वराकडे त्याचा ओढा निर्माण होत नाही. तसे तर संतकृपा आणि सत्संगावाचून भक्तीला रंग चढत नाही. परंतु प्रभुकृपेनेसुद्धा भक्तीला रंग येतो.

काही दिवसांनंतर हिरण्यकशिपूने पुनः प्रल्हादाला विचारलेः बाळा, गुरुजींकडून हल्ली तू जे शिक्षण घेतले आहेस त्यातली काही चांगली प्रकरणे मला सांगः

प्रल्हाद सांगू लागलाः बाबा! विष्णु भगवंताच्या भक्तीचे नऊ प्रकार आहेत. भगवंताच्या नाम-गुण-लीला इत्यादींचे श्रवण, कीर्तन, त्यांच्या स्वरूप-नाम इत्यादींचे स्मरण, चरणसेवा, पूजा-अर्चा, वंदन, दास्य, सख्य आणि आत्म-निवेदन. समर्पणभावाने भगवंताची या नऊ प्रकारे भक्ति करणे हेच सर्वोत्तम अध्ययन आहे, असे मी मानतो.

नवविधा भक्तीने प्रभु प्रसन्न होतात. प्रभूच्या प्रसन्नतेने जीवन सफल होते. केवळ भोगोपभोगाने शांति मिळत नाही.

पुत्राच्या अशा गोष्टी ऐकून हिरण्यकशिपूला क्रोध आला आणि त्याने त्याला आपल्या मांडीवरून फेकून दिले. त्याने आपल्या नोकरांना आज्ञा केली की या मुलाला मारा. हा मारण्यालायकच आहे. हा माझ्या शत्रूचे भजन करीत असतो. आज्ञा मिळाल्याबरोबर दैत्याचे सेवक प्रल्हादाला मारायला धावले.

प्रल्हादाची दृष्टी तर दिव्यच होती. त्याला तर तलवारींत देखील कृष्णाचे दर्शन झाले आणि ज्याच्या हातात तलवार होती त्या दैत्यांत देखील कृष्णाचे दर्शन झाले.

संसारात पुष्कळसे सुंदर पदार्थ आहेत, परंतु सगळ्यांकडेच भगवत्भावाने पहा. जगातली कामे करीत असतानासुद्धा ईश्वराशी संबंध चालू ठेवा. बालकापेक्षा बाळकृष्णाशी संलग्न राहाल तर कृष्ण भेटतील आणि बरोबर लक्ष्मीदेखील. लौकिक नामारूपात अडकून राहणे आसक्ति आहे, परंतु श्रीकृष्णाच्या नामरूपांत अडकून पडणे भक्ति आहे. लौकिक नामरूपात अडकलेले मन जर श्रीकृष्णाच्या नामरूपात लीन होऊन राहील तरच मुक्ति मिळेल आणि मनुष्याचा उद्धार होईल.

स्वरूपासक्तीशिवाय भक्ति फलदायक होत नाही. सांसारिक विषयांविषयी प्रेम असणे आसक्ति आहे. भगवंताविषयी प्रेम असणे भक्ति आहे. संसारासक्ति बंधनकर्ती आहे. भगवदासक्ति मुक्तिदायी आहे.

शुकदेव सावध करतातः

राजा! डोळ्यांत कामाला थारा देऊ नकोस. जगताला समतेने पहा. जर डोळे खराब असले तर जगही खराबच दिसेल. संसारात प्रेम असेल तर भक्ति होऊ शकत नाही. प्रभूच्या स्वरूपात आसक्ति असणे म्हणजेच भक्ति होय. जर भक्ति असेल तर मुक्ति देखील मिळू शकते. भगवान् श्रीकृष्णाशिवाय इतर कोणतीच वस्तु सुंदर नाही.

दोघेजण फुले विकत घेण्यासाठी बाजारांत गेले. एकाला भगवंताच्या पूजेसाठी फुलें घ्यायची होती, दुसऱ्याला आपल्या नायकेच्या वेणीसाठी. पहिला भक्त आहे आणि दुसरा आसक्त. पहिल्याच्या

मनात परमात्म्याचा शृंगार करण्याचा भाव आहे. भक्ति आहे. दुसरा पत्नीवर शृंगार करू पाहतो, त्याच्या मनांत सांसारिक विलासाची आसक्ति आहे. दोघांचीही क्रिया एकसारखी आहे– फुले विकत घेणे. परंतु एकाच्या क्रियेत भक्ति आहे, तर दुसऱ्याच्या क्रियेत आसक्ति.

दैत्य प्रल्हादाला मारू-झोडू लागले तरीपण त्याला यत्किंचितही दुःख झाले नाही. प्रल्हादाची भक्ति दिव्य होती. तो निर्भय होता. त्याला मारण्याचे अनेक उपाय केले गेले तरी तो मेला नाही. हिरण्यकशिपुला वाटलें कदाचित हा जादूगार असेल. त्याने हुकूम सोडला कीं याला अंधारांत बंद करून ठेवा, तेथे अन्नपाण्याविना हा मरून जाईल.

प्रल्हादाला कैद करण्यांत आले तरी पण त्याला कशाही प्रकारचे भय वाटले नाही. त्याला वाटले, "चला, चांगलेच झाले. आता मी येथे शांतीने भजनकीर्तन करू शकेन."

सुखांत भगवत्कृपेचा अनुभव करणारा सामान्य वैष्णव आहे. परंतु जो दुःखांतही भगवत्कृपेचा अनुभव करील तो तर महान वैष्णव आहे. दुःखांत देखील जो पूजा-स्मरण न सोडील तोच महावैष्णव होय.

देवकी-वसुदेवाला किती कष्ट सहन करावे लागले, तरी पण त्यांनी धैर्य सोडले नाही. आम्ही तर लहानशा दुःखाने देखील घाबरून जातो आणि असें म्हणू लागतो कीं, मी इतकी पूजा-अर्चा-स्मरण केले तरी पण देवाने मला कष्टच दिले.

अतिशय दुःखद अवस्थेंत देखील प्रल्हाद तर हेच समजत असे कीं, 'माझे भगवंत तर माझ्याबरोबरच आहेत, मग भ्यायचे कशाला? भयाक्रांतापासून ईश्वर दूरच राहतो. गीतेंत म्हटलें आहे कीं, 'मी तुझ्या निकट आहे, मी तुला पाहात आहे तरी तू मला पाहू शकत नाहीस!'

अंधारांत देखील प्रल्हाद भयभीत झाला नाही. तो कृष्णाचें कीर्तन करू लागला. आज त्याला आपल्या देहाचें भानही नव्हते.

भगवत्प्रेमांत ज्याला देहभान राहात नाही त्याच्यावर संसारांतील कोणत्याच विकारांचा प्रभाव होऊ शकत नाही.

आज नारायणांनी लक्ष्मीला विचारले कीं, जगांत कोणी जीव उपाशी तर राहिला नाही ना? लक्ष्मी म्हणाली, तुमचा भक्त प्रल्हाद कैदेत उपाशी पडला आहे. तर भगवंत म्हणाले, त्याच्यासाठी लवकरच प्रसाद पाठवा. लक्ष्मीने प्रल्हादाला आपलाच मानला. आपला मुलगाच आहे या भावनेने तिने सेवकांकडून प्रल्हादासाठी स्वादिष्ट प्रसाद पाठवला. पार्षद म्हणाले, तुझ्यासाठी लक्ष्मीने हा प्रसाद पाठविला आहे. प्रल्हादाने नमस्कार केला. त्याला वाटले, प्रभूची माझ्यावर केवढी कृपा आहे, त्यांना माझी किती चिंता आहे की इकडे कारावासांत देखील त्यांनी माझ्यासाठी प्रसाद पाठविला.

हिरण्यकशिपूच्या सेवकांना आश्चर्य वाटले. त्यांना वाटले आम्ही येथे पहारा देत उभे आहोत तरी पण प्रल्हाद भोजन कसें करीत आहे? हा कोणी जादूगार तर नाही ना? त्यांनी हिरण्यकशिपूला जाऊन वृत्तांत सांगितला. त्यानें करावासांत जाऊन पाहिलें तर खरोखरच प्रल्हाद प्रसाद खात होता. त्याने प्रल्हादाला विचारले, 'खरें, खरें सांग, तुला हे भोजन कोणी दिलें?' प्रल्हाद म्हणाला, 'आईच्या गर्भांत ज्याने माझें पोषण केलें तोच येथेही माझें पोषण करीत आहे.

बाबा! ही कारावासाची खोली तरी मोठी आहे, गर्भवास तर कितीतरी लहान असतो! तिथे ज्याने माझें पोषण केलें, माझें रक्षण केलें, तोच येथे देखील माझें पोषण करील, माझें

रक्षण करील.

हिरण्यकशिपूला वाटू लागले कीं हा तर कोणत्याच उपायाने मरत नाही. मला मारायलाच तर हा आला नाही ना ? तो घाबरून जाऊन शंडामर्कापाशी आला.

राजाचा निस्तेज चेहरा पाहून शंडामर्कांने आश्वासन देत म्हटले, 'पांच वर्षांचा एक छोटासा बच्चा कसा बरे तुम्हाला मारू शकेल ? आम्ही त्याला वरुणपाशांत बांधून टाकू, असे म्हणून त्यांनी कारागृहात प्रल्हादाला वरुणपाशांत बांधून घरी परत आणले.

प्रल्हादाची दृष्टी इतकी मंगलमय झालेली होती कीं त्याला सगळ्याच ठिकाणीं श्यामसुंदराचें दर्शन होत होते.

एकदा गुरुजी कुठे बाहेर गेले होते. तेव्हां शिष्यांनी चेंडूने खेळण्याचा विचार केला. प्रल्हाद म्हणाला, आज मी तुम्हाला एक नवा खेळ शिकवीन. त्याने सर्व मुलांना भागवतधर्माचा उपदेश दिला.

प्रल्हाद म्हणाला :

"मित्रांनो, ह्या संसारांत मानवजन्म अतिदुर्लभ आहे. याच्या आश्रयाने परमात्म्याची देखील प्राप्ति होऊ शकते, परंतु कोणाला हे समजत नाही कीं याचा अंत केव्हां होईल. म्हणून बुद्धिवंतानें यौवन आणि वृद्धावस्थेचा विश्वास न करता बाल्यावस्थेंतच प्रभुप्राप्तीसाठी साधन केले पाहिजे."

प्रल्हादचरित्र आम्हाला हेच शिकविते कीं बाल्यावस्थेपासूनच ईश्वरभजनांत लीन होऊन गेले पाहिजे. मातापित्यांचें कर्तव्य आहे कीं त्यांनी आपल्या संततीमधे धार्मिक संस्कार उत्पन्न करावे.

वृद्धावस्थेंत देहाची सेवा होऊ शकेल, परंतु देवाची नाही.

मानवशरीराची प्राप्ति भोगोपभोगासाठी झालेली नाही, तर ह्याची प्राप्ति भगवद्भजनाने प्रभुप्राप्तीसाठीच झालेली आहे.

शरीर नाशवंत असले तरी मनुष्यजन्म दुर्लभ आहे. कारण तो इच्छित वस्तू देऊ शकतो. या अनित्य आणि नाशवंत शरीरानें नित्य वस्तु— भगवंताची प्राप्ति होऊ शकते.

हे मानवशरीर फार किंमती आहे. कितीतरी वेळा जन्ममरणाची पीडा सहन करीत करीत जीव या शरीरांत आलेला आहे.

ईश्वर नित्य आहे आणि शरीर अनित्य. परंतु या अनित्यानेच ( शरीरानेच ) नित्याची ( ईश्वराची ) प्राप्ति होऊ शकते. म्हणून मानवदेहाचा देखील फार मोठा महिमा आहे.

असें म्हणतात कीं, कधी काळी मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षांचें होते. आज ते तसे नाही. आज तर अर्धे आयुष्य झोपेत, चतुर्थांश आयुष्य बाल्य आणि कुमार अवस्थांत निघून जाते. बाल्यावस्था अज्ञानांत आणि कुमार अवस्था खेळण्या-कुदण्यांत निघून जाते. वृद्धावस्थेची वर्षें देखील निरर्थकच असतात. कारण शारीरिक क्षीणतेमुळे वृद्धावस्थेंत कांहीच काम होऊ शकत नाही. यौवनाची वर्षें कामोपभोगांत निघून जातात. तर आता किती कमी वर्षें शिल्लक राहिली ? आणि या शिल्लक राहिलेल्या वर्षांत आत्मकल्याणाची साधना केव्हां आणि कशी व्हावी ?

म्हणून प्रत्येक व्यक्तीला अत्यंत आवश्यक आहे कीं तिने आत्मकल्याणाची प्रवृत्ति ठेवावी.

"जोपर्यंत हे शरीररूपी गृह स्वस्थ आहे, जोपर्यंत इंद्रियांची शक्ति क्षीण झालेली नाही, आयुष्याचाही क्षय झालेला नाही, तोपर्यंतच शहाण्या व्यक्तीने आपल्या आत्मकल्याणाचा प्रयत्न केला पाहिजे. नाहीतर घराला आग लागल्यावर विहीर खणण्याने काय लाभ ?"

आमच्या डोक्याला अनेक प्रकारच्या भयांनी घेरलेले असते म्हणून भगवत्प्राप्तीसाठी पुरेसे असलेले हे शरीर रोगग्रस्त होण्यापूर्वीच आत्मकल्याण करून घेण्याचा प्रयत्न बुद्धिवंतांनी केला पाहिजे.

तसें तर मनुष्य दुःख मागत नाही, तरी पण ते अचानक येऊन ठेपते. कोणी असा नवस करीत नाही कीं मला ताप आला तर मी सत्यनारायणाची पूजा करीन. तरी पण आजार येतोच. त्याचप्रमाणे सुखही येत असते. सुख आणि दुःख दोन्ही प्रारब्धाच्या आधीन आहेत. प्रारब्धानुसारच ती प्राप्त होत असतात. त्याकरिता प्रयत्नांची आवश्यकता नाही. पूर्वजन्मींच्या कर्मांचे फळ म्हणजे प्रारब्ध. दरिद्री संपन्न होऊन जातो आणि संपन्न दरिद्री. प्रारब्धानुसार जे मिळणार आहे त्यासाठी प्रयत्न अनावश्यक आहे. म्हणून सांसारिक सुखोपभोगांसाठी प्रयत्न न करता परमात्म्याला प्रसन्न करण्यासाठीच, परमात्म्याच्या प्राप्तीसाठीच प्रयत्न करा.

प्रारब्धामुळेच जे प्राप्त होणार आहे त्यासाठी तर सर्व प्रयत्न करतात, परंतु ज्याच्याकरता प्रयत्न करायला पाहिजे त्यासाठी कोणीच प्रयत्न करीत नाही. परमात्म्यासाठी कोणी कांहीच करीत नाही. सत्कर्मांत प्रयत्न मुख्य आहे, प्रारब्ध नाही. सत्कर्मांत बाधा आणण्याची शक्ति प्रारब्धांत असत नाही. मनुष्याच्या दुर्बलतेमुळेच प्रभुभजनांत बाधा उपस्थित होत असते.

मुलांनी प्रल्हादाला विचारले कीं, आम्ही वृद्धावस्थेंतच भजन केलें तर?

प्रल्हादाने त्यांना समजावलें कीं भजन यौवनांतच होऊ शकते. वृद्धावस्थेंत शारीरिक दुर्बलतेमुळे ईश्वराची आराधना होत नाही. वृद्धावस्थेंत देहाची भक्ति होऊ शकते पण देवाची नाही.

मुलांनी विचारलेः तर मग आम्ही आत्तापासूनच भक्ति कां करावी? युवावस्थेंतच करू.

प्रल्हाद म्हणतोः यौवनांत मद उत्पन्न होतो. युवावस्थेंत मनुष्य इंद्रियांवर ममता करतो. तो इंद्रियांच्या आधीन होतो. यौवनांत तो अनेक प्रकारच्या मोहांत फसून जातो. अर्थोपार्जन आणि इंद्रियांच्या लालनांतच त्याचें आयुष्य नष्ट होऊन जाते. तसें तर आत्मा इंद्रियांचा स्वामी आहे. तरी पण मनुष्य इंद्रियांचा दास होतो.

ही सर्वसामान्य हकीगत आहे कीं मोठमोठे विद्वान देखील संपूर्ण दिवसभर पैशाच्या-धनाच्या मागे कष्ट करीत फिरत असतात आणि रात्रीं कामांध होत असतात. विद्येचें फळ तर जन्ममृत्यूच्या व्यथेंतून मुक्ति आणि परमात्म्याची प्राप्ति हेच आहे. विद्येचे फळ कांही धन किंवा प्रतिष्ठा नव्हे.

दैत्यांच्या मुलांनी विचारलेः आम्ही परमात्म्याला प्रसन्न कसे करू शकू?

प्रल्हाद म्हणालाः सगळ्यांमधे एका परमेश्वराला पाहा. जगताला प्रसन्न करणें कठीण आहे, पण कृष्णाला प्रसन्न करणें सोपे आहे.

याकरिता तुम्ही आपलें दैत्यत्व, आसुरी संपत्ति आणि आसुरी भाव यांचा त्याग करून सगळ्याच प्राण्यांवर दया करा. प्रेमानें त्यांचे भले करा. यानेच भगवंत प्रसन्न होतील.

भगवंत जेव्हां कृपा करतात तेव्हां मनुष्याची पाशवी बुद्धि नष्ट होऊन जाते.

मुलांनी विचारलेः प्रल्हाद! आम्हाला भगवंत तर दिसतच नाहीत; मग त्यांची आम्ही आराधना कशी करावी?

प्रल्हादः भगवंताचें ध्यान करीत तुम्ही तन्मय व्हा. ज्याला जग दिसत नाही त्याला भगवंत दिसतात.

प्रल्हादाने दैत्यांच्या मुलांना सांगितलें कीं, तुम्हाला जो कांही उपदेश सांगितला तो माझा

स्वतःचा नसून नारदांचा आहे.

मुलांनी विचारलेः प्रल्हाद, तुझें वय तर किती लहान आहे! तरी पण तू नारदांना कसा भेटू शकलास?

प्रल्हाद म्हणालाः जेव्हां माझे वडील मंदराचल पर्वतावर तप करण्यासाठी गेले होते तेव्हां इंद्रादि देवांनी दानवांवर आक्रमण केले. इंद्र माझ्या आईला कैद करून घेऊन जात असतां वाटेंत नारद भेटले. त्यांनी इंद्राला सांगितलें कीं या कयाधूला सोडून द्या. कारण तिच्या गर्भांत प्रभूचा परमभक्त आहे. इंद्राने माझ्या मातेला मुक्त केले.

माझी आई नारदांच्या आश्रमांत गेली. मी जेव्हां गर्भवासांत होतो तेव्हां माझ्या आईने संतांची पुष्कळ सेवा केली. ती कथा-कीर्तनाला जात असे. तिथे तिला केव्हां केव्हां झोप येत असे परंतु मी मात्र मोठ्या तत्परतेने सगळे ऐकत असे.

ही निद्रादेवी कथा-कीर्तनांत बाधा उत्पन्न करीत असते.

कुंभकर्णाची बायको निद्रादेवी हिने विधवा झाल्यावर रामचंद्रांजवळ येऊन विचारलेः आता मी कोठे जाऊ? रामचंद्रांनी तिला म्हटलें, जिथे जायचे असेल तिथे जावे. निद्रादेवी म्हणाली, मी निश्चय केला आहे कीं जेथे तुमचे कीर्तन चालले असेल तेथेच जाऊन मी आपलें आसन जमवीन.

पंचप्राणांना कानांत ठेवून कथा ऐका.

मी तुम्हाला आणखी काय सांगू? माझ्या प्रभूंना प्रसन्न करण्याचें साधन तर कीर्तनच आहे.

एकदा मीराबाई इतर भक्तांबरोबर कीर्तन करीत होती. पुष्कळ लोकांचा ताल ठीक नव्हता. जेथे शरीराचेंच भान राहात नाही तेथे तालाचें काय! एकाने मोठमोठ्या अक्षरांनी लिहून ठेवले, "तालांत गा". दुसऱ्या दिवशी मीराबाईने हें वाचले. तर तिनें ती अक्षरें रद्द करून लिहिले, "प्रेमानें गा." कीर्तनांत तालापेक्षा प्रेम प्रधान आहे.

कीर्तन केल्याने मनाची मलीनता दूर होते आणि हृदय विशुद्ध होते.

प्रल्हाद मुलांना समजवीत होता. नामच ब्रह्म आहे. ईश्वराचें निर्गुण स्वरूप अतिसूक्ष्म आहे. मनबुद्धि जोपर्यंत अतिसूक्ष्म होत नाही तोपर्यंत निर्गुण स्वरूपाचा अनुभव होऊ शकत नाही. ईश्वराचें सगुण स्वरूप अतिशय तेजस्वी (तेजोमय) आहे. प्रभूचा सगुण साक्षात्कार करून घेण्याची शक्ति मनुष्यांत नाही. अर्जुन श्रीकृष्णांना विश्वरूपदर्शनप्रसंगी म्हणाला होता, 'आपले हें रूप पाहून माझें मन भयानें अतिव्याकुळ होत आहे.'

नामब्रह्माचें दर्शन आणि अनुभव तर सर्वच करू शकतात. कीर्तनांत टाळ्या वाजविल्याने नादब्रह्माची निर्मिती होते. नादब्रह्म आणि नामब्रह्म एक झाल्यावर प्रभूंना प्रकट व्हावेच लागते.

टाळ्या वाजवून वाजवून कीर्तन करा. प्रभु सर्वांनाच पाहात असतात. कीर्तनांत जो टाळ्या वाजवीत नाही त्याच्याविषयीं भगवंतांना विचार येतो कीं, 'मी मूर्खच आहे कीं मी याला हात दिले, परंतु पुढल्या जन्मांत झालेली चूक दुरुस्त करून घेईन आणि हाताऐवजीं त्याला दोन पाय आणखीन देईन. प्रभुभजनात टाळ्या वाजवायला लाज कां वाटावी? पापाविषयीं लाज वाटू द्या. पाप करण्यांत भय आहे. जो प्रभुभजनांत टाळ्या वाजवायला संकोच करतो त्याला पुढल्या जन्मांत प्रभु हाताच्या जागीं दोन पाय आणखी देतात. म्हणून मोठ्या प्रेमाने टाळ्या वाजवून संकीर्तन करा.

प्रल्हादाने मुलांना सांगितले: प्रेमाने कीर्तन करा.

भगवंतांना प्रसन्न करण्यासाठी दान, तप, यज्ञ, शौच, व्रत इत्यादीही पुरेसे नाही. ते तर केवळ निष्काम भक्तीनेच प्रसन्न होत असतात. बाकी इतर सर्व विडम्बन मात्र आहे. म्हणून भक्ति करा.

प्रल्हाद सगळ्यांकरवीं कीर्तन-मंत्राचा जप म्हणवून घेऊ लागले–

**हरे राम हरे राम, राम राम हरे हरे।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥**

हा मंत्र कलिसंतरण उपनिषदांतील आहे. हा महामंत्र आहे. याचा जप करण्यासाठी कोणत्याही विधीची आवश्यकता नाही. या मंत्राचा जप वाटेल त्या स्थितींत आणि स्नान केल्याशिवाय सुद्धा होऊ शकतो. रस्त्यांत चालता चालता जोडे घालून सुद्धा याचा जप करायला हरकत नाही.

सगळीच मुले टाळ्या वाजवत वाजवत–

**"हरे राम हरे राम, राम राम हरे हरे।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥"**

चें कीर्तन करू लागली.

कथेंत कीर्तन सुद्धा झालें पाहिजे. कीर्तनाशिवाय कथा परिपूर्ण होत नाही. कीर्तनानें पाप जळते, हृदय विशुद्ध होते, परमात्मा हृदयांत येऊन राहतात म्हणून कीर्तन प्रेमाने करा.

प्रल्हाद तन्मय होऊन गेला आणि राधा-कृष्णाचें कीर्तन करीत थई थई नाचू लागला. इतर सर्व मुलेही प्रभु-भजनांत मग्न होऊन नाचू लागली. इतक्यांत शंडामर्क आले. त्यांना विचार पडला कीं हिरण्यकशिपूला जर कुठे हें समजले तर मोठा अनर्थ होईल. त्यांनी प्रल्हादाला म्हटले, ही काय मस्ती चालविली आहे? बंद करा हे भजन. पण त्यांचें कोण ऐकतो? मन तर श्रीकृष्णाकडे लागले होते; तर प्रल्हादाने देखील ऐकलें नाही. शंडामर्कानि धावत जाऊन प्रल्हादाचा हात धरला. प्रल्हादाचें शरीर तर दिव्य होते. शंडामर्कानि प्रल्हादाला स्पर्श केल्याबरोबर ते स्वतःही नाचू लागले.

त्याच दिवशीं हिरण्यकशिपूला वाटले आपण देखील जरा जाऊन पाहू या कीं गुरुजी कसे शिक्षण देत आहेत! तेथे त्याने एका सेवकाला पाठविले. सेवकाने हे समूहनृत्य पाहिले तर त्याला विचारच पडला. नामसंकीर्तनांत लीन होऊन गुरुजी आणि सगळीच मुले नाचत होती. सेवकाला वाटले, राजाला तर हे आवडणार नाही. तेव्हां त्याला जर हें समजले तर तो गुरुजींची हत्या करील. सेवकाने गुरुजींचा हात धरून त्यांना आसनावर बसवायचा प्रयत्न केला, परंतु गुरुजींच्या स्पर्शानि तोही नाचू लागला. तो हे विसरूनच गेला कीं तो इकडे कशाकरता आला होता. सत्संगाचा महिमाच कांही निराळा आहे.

सेवकाला परतायला उशीर झाला तेव्हा राजाने दुसरा सेवक पाठविला. त्यानेही पाहिले कीं तेथे सर्वचे सर्व संकीर्तनांत वेडे होऊन नाचत आहेत. त्या भजनी मंडळींमधल्या कोणा एकाचा स्पर्श होऊन तो सुद्धा नाचू लागला.

अशा रीतीने राजा सेवकामागे सेवक पाठवीत गेला आणि ते सर्वच तिकडे जाऊन नाचू लागले. राजाला वाटले हे काय प्रकार आहे? तो स्वतः तेथे आला. त्याने पाहिले कीं गुरुजी,

सर्व मुले आणि पाठविलेले सगळे सेवक नामसंकीर्तनांत लीन होऊन नाचत आहेत. हें दृश्य पाहून राजाच्या अंगाचा तिळपापड झाला. त्याने नाचणाऱ्यांपैकी कोणा एकाचा हात धरून त्याला खाली बसविले. राजाला स्पर्शाने कांहीच झाले नाही. कारण तो तर विजेच्या बिघडलेल्या (फ्यूज झालेल्या) बल्बसारखा होता. विजेचा बल्ब चांगल्या स्थितींत असेल तरच त्यांत विजेचा प्रवाह जाऊन तो कार्यशील होईल; नाही तर नाही.

भजनकीर्तन थांबले. गुरुजींनी सगळी हकीगत राजाला सांगितली. तर तो संतापून प्रल्हादाला म्हणाला, 'अजून सुद्धा तू माझे शत्रू जे श्रीविष्णू त्यांचे कीर्तन करीत आहेस. जगतात माझ्याशिवाय कोणी ईश्वरच नाही. दुष्टा, आज मी तुला मारूनच टाकीन.'

माझा हा मुलगा स्वतः तर सुधारत नाहीच आणि दुसऱ्या मुलांनाही बिघडवत आहे, असा विचार करून राजाने झडप घालून प्रल्हादाचा हात धरला. राजावर पुत्राच्या भक्तीचा रंग चढू शकला नाही. जर बल्बच खराब असेल तर विद्युतशक्ति काय काम करील?

राजाने प्रल्हादाला जमिनीवर पाडले, तर भू-मातेने त्याला आपल्या मांडीवर उचलून घेतले.

प्रल्हादाने वडिलांना नमस्कार केला. तर हिरण्यकशिपु म्हणाला, 'तू मला नमस्कार तर करीत आहेस, परंतु माझें सांगणें मात्र ऐकत नाहीस. दाखव कुठे आहेत तुझे रक्षक विष्णु?

प्रल्हाद म्हणाला— 'बाबा, माझे भगवंत तर सर्वत्र आणि सर्वांमधेच आहेत.

पिताजी! कदाचित तुम्ही आपल्याला वीर मानीत असाल. परंतु खरा वीर तोच होय कीं ज्याने आपल्या आंतरिक शत्रूंना पराजित केलें आहे. तुम्ही समजत आहांत कीं तुम्ही जगताला जिंकले आहे. परंतु खरा जगज्जेता तोच कीं ज्याने आपलें मन जिंकले आहे. काम-क्रोधादि सहा चोर आपल्यांत शिरलेले आहेत, आणि ते तुमच्या विवेकधनाला लुटत आहेत. रागाऊ नका, पण आज तुमच्या तोंडावर मृत्यूची छाया दिसत आहे. तेव्हां रागद्वेषाचा त्याग करून नारायणाची आराधना करा. माझ्या नारायणाचें भजन करा.'

हिरण्यकशिपू क्रोधाने ओरडला: माझा मुलगा असून मलाच उपदेश देत आहेस! कुठे आहे तुझा रक्षक विष्णू?

प्रल्हाद: माझें प्रभू तर सर्वव्यापक आहेंत. ते माझ्यांतही आहेत आणि तुमच्यांतही आहेत. म्हणूनच तर तुम्ही बोलू शकता. विष्णू सर्वांत आहेत, सर्वत्र आहेत.

हिरण्यकशिपु: तुझे भगवंत जर सर्वत्र आहेत, तर मग या खांबांत त्यांचे दर्शन कां होत नाही? तुझे भगवंत या स्तंभांत आहेत काय?

प्रल्हाद: होय, महाराज! माझे प्रभु या स्तंभांतही आहेत. तुमच्या डोळ्यांत काम आहे. म्हणून ते दिसत नाहीत.

हिरण्यकशिपु: मी या स्तंभाला तोडून विष्णूची हत्या करीन.

राजा तलवार घ्यायला गेला. तर इकडे प्रल्हादाला विचार पडला कीं मी सांगितले तर खरे कीं भगवान या स्तंभांत आहेत, परंतु खरोखर त्यांचा वास यांत आहे काय? त्याने खांबाला कान लावला तर त्यांतून 'गुरु, गुरु' असा आवाज आला आणि प्रल्हादाचा विश्वास दृढ झाला कीं त्या खांबांतही भगवंत आहेत. त्याने स्तंभाला आलिंगन दिले. आंत नरसिंहप्रभू विराजमान होते. त्यांनी प्रल्हादाला आश्वस्त केले कीं ते त्यांतही आहेत आणि प्रल्हादाचे रक्षण करतील.

इकडे हातांत तलवार घेऊन हिरण्यकशिपु धावत आला आणि ओरडून म्हणाला, "दाखव,

कुठे आहे तो तुझा विष्णु?''

प्रल्हादः ते जसे सर्वत्र आहेत तसेच या स्तंभांतही विराजमान आहेत.

हिरण्यकशिपूने क्रोधावेशांत त्या खांबावर तलवारीचा प्रहार केला. ताबडतोब नरसिंहप्रभू 'गुरु गुरु' शब्द करीत त्या खांबांतून प्रगट झाले. त्यांनी हात लांब करून हिरण्यकशिपूला मांडीवर घेतले आणि म्हटले, 'ही रात्रही नाही आणि दिवसही नाही, ना जमीन आहे ना आकाश, घरांतही नाही आणि बाहेरही नाही अशा उंबऱ्यावर तुला मारीन.''

आणि भगवंतांनी त्या असुराला नखाने फाडून मारून टाकले!

**नृसिंह भगवान की जय!**

मनुष्याच्या दुःखांचे कारण त्याचा देहाभिमान आहे. शरीर घर आहे. शरीररूपी घरांत राहणारी जीभ उंबरा आहे. तिला तर आंतही म्हणता येत नाही आणि बाहेरही म्हणता येत नाही. जर अहंकाराला मारायचे असेल तर जिभेवर भगवंताचें नाव लिहा.

आपल्या भक्त प्रल्हादाच्या वचनांना कृतार्थ करण्यासाठी आणि आपली सर्वव्यापकता सिद्ध करण्यासाठी भगवंत नृसिंहाच्या रूपाने वैशाख शुक्ल चतुर्दशीच्या दिवशी काष्ठस्तंभांतून प्रगट झाले होते.

पंजाबांतील मुलतान शहरी हिरण्यकशिपूची राजधानी होती. तेथे नरसिंहप्रभू प्रकट झाले होते. याचसाठी पंजाबवासी लोक आपल्या नावाबरोबर सिंह शब्दाचा प्रयोग करीत असतात. ते सिंहासारखेच बलवान आहेत. आजही ते शक्तिशाली आहेत. सत्त्वहीन जेवण आणि चहापान करणारा शक्तिशाली कसा होईल? पंजाबवासी दूध आणि लस्सीचा उपयोग अधिक करतात.

बलवान बना, **नायमात्मा बलहीनेन लभ्यः।** शक्तिहीन पुरुष आत्म्याची प्राप्ति करून घेऊ शकत नाही.

**३. गुरुशिवाय-संतकृपेशिवाय खरे ज्ञान नाहीः**

नरसिंह भगवानदेखील 'गुरु, गुरु' चें उच्चारण करीत होते. हे हेच दाखविते कीं गुरुशिवाय भगवंताचें दर्शन होणे शक्य नाही.

सर्वप्रकारची साधना करा, विवेक-वैराग्यही ठेवा, षट्संपत्ति सुद्धां असू द्या; पण जोपर्यंत एखाद्या संताची– गुरूची कृपा होत नाही तोपर्यंत मन शुद्ध होत नाही आणि भगवंताची प्राप्ति पण होत नाही.

मनुष्याची साधना कितीही झालेली असो, मन शुद्ध होण्याकरितां संतकृपा होणे आवश्यक आहे.

मन तर मोठ्यांत मोठ्या साधूंना सुद्धा सतावते (छळते). ते फारच चंचल आहे. याकरता मनःशुद्धीशिवाय ईश्वराचा साक्षात्कार होऊ शकत नाही.

मल, विक्षेप, आवरण इत्यादींनी मन कलुषित आणि मलीन होते.

ज्याप्रमाणें मलीन किंवा चंचल पाण्यांत प्रतिबिंब दिसत नाही, त्याचप्रमाणे मलीन, चंचल आणि आवरणयुक्त मनांत परमात्म्याचें प्रतिबिंब दिसत नाही.

म्हणून एखाद्या संताचा आश्रय घ्या. एखाद्या गुरूला शरण जा.

गुरुकृपेशिवाय हृदय शुद्ध होऊ शकत नाही. साधन करूनही सद्‌गुरुकृपेशिवाय काम होणार नाही. केवळ साधन-साधनेने हृदय शुद्ध होणार नाही. नृसिंहप्रभूंनी गुरु शब्दाचें उच्चारण करून जगाला हे दाखवून दिले आहे कीं सद्‌गुरुकृपेशिवाय त्यांचा साक्षात्कार होऊ शकत नाही.

नामदेवाला सुद्धा गुरुशिवाय ज्ञान होऊ शकले नव्हते.

आजकालचे लोक पुस्तक वाचून ज्ञानी होत असतात. त्यांना गुरूची, ब्रह्मचर्यपालनाची, मौनव्रताची, सदाचाराची किंवा संतसेवेची जणूकांही आवश्यकताच नसते. बिछान्यांत पडल्या पडल्या पुस्तक वाचून ज्ञानी होतात!

एकदा महाराष्ट्रांत संतांचा एक मेळावा झाला.

भक्तमंडळींची-संतांची परीक्षा करण्यासाठी मुक्ताबाईने गोरा कुंभाराला सांगितले.

नामदेवांना ह्या अभिमान होता कीं ते भगवंतांना प्रिय आहेत आणि ते त्यांच्याशी बोलतात देखील.

गोरा कुंभार लाकडाच्या थापटण्याने सगळ्यांच्या डोक्यावर एक एक थापटी मारून परीक्षा करू लागला.

त्याने नामदेवांच्या डोक्यावरही एक थापटी मारली. वरून तर नामदेव कांहीच बोलले नाहीत, पण त्यांचें तोंड फुलून गेले. त्यांनी अभिमानाने विचार केला कीं मातीच्या भांड्यासारखी माझी परीक्षा होऊ शकते का? इतर भक्तांच्या चेहऱ्याचे भाव अपरिवर्तितच राहिले.

गोरा कुंभाराने आपला निर्णय सांगितला— सगळ्यांचीच भांडी (मस्तके) पक्की आहेत, पण या नामदेवाचे कच्चे आहे.

हें ऐकून नामदेव म्हणाले— तुझे डोकेच कच्चे आहे, तुलाच शिक्षण घेण्याची आवश्यकता आहे.

नामदेवांनी विठ्ठलाजवळ येऊन सगळी घटना सांगितली.

विठ्ठलनाथ म्हणाले— नामदेवा! जर मुक्ताबाई आणि गोरोबा म्हणत आहेत कीं तुझे डोके कच्चे आहे, तर खरोखरीच तू कच्चा असशील.

नामदेवा! तुला अजून सर्वव्यापक ब्रह्माच्या स्वरूपाचा अनुभव झालेला नाही. याचें कारण असें कीं तू अजून कोणा सद्‌गुरूचा आश्रयच घेतलेला नाहीस. मंगळवेढ्यांत राहणारा माझा एक भक्त विसोबा खेचर आहे. तू त्याच्याकडे जा, तो तुला ज्ञान देईल.

नामदेव त्यांचा शोध घेत घेत शिवमंदिरांत येऊन पोहोंचले. तिथे पाहिले तर विसोबा खेचर शिवलिंगावर पाय पसरून झोपलेले होते.

विसोबांना आधीच समजले होते कीं नामदेव येत आहेत. म्हणूनच त्यांना ज्ञान देण्यासाठी शिवलिंगावर पाय पसरून पडले होते.

नामदेवांच्या मनांत विचार आला कीं जी व्यक्ति भगवंताचा अपमान करीत आहे ती मला कोणते ज्ञान देऊ शकेल?

नामदेवांनी विसोबांना शिवलिंगावरून आपले पाय बाजूला ठेवण्यास सांगितलें. विसोबा खेचर नामदेवांना म्हणाले, "तू माझे पाय उचलून एखाद्या अशा ठिकाणी किंवा अशा दिशेला ठेव कीं जिथे शंकराचे अस्तित्वच नाही.

नामदेव विसोबांचे पाय इकडे तिकडे ठेवू लागले. पण जिथे कुठे खेचरांचे पाय ठेवीत तिथे

शिवलिंग प्रगट होत होते आणि अशाप्रकारे सगळे मंदिरच शिवलिंगांनी भरून गेले.

हे पाहून नामदेव आश्चर्याने थक्क झाले.

विसोबा त्यांना म्हणाले: खरोखरच अजून तू कच्चाच आहेस! अजून तू सर्व जागीं ईश्वराला पाहू शकत नाहीस! विश्वांत भगवंत सूक्ष्म रूपाने सर्वच जागीं व्याप्त आहेत. तू सर्वच जड चेतनांत ईश्वराला पहा.

याप्रमाणे जेव्हां भक्ति आणि ज्ञान एकत्र भेटले तेव्हां नामदेव सगळ्यांमध्ये आणि प्रत्येक जागी ईश्वराला पाहू लागले.

ज्ञान मिळाल्यावर नामदेव परत आले. परत येताना रस्त्यांत एका झाडाखाली बसून ते जेवणाची तयारी करू लागले. इतक्यांत एक कुत्रा पोळी घेऊन पळाला. पण आज तर नामदेवांनी त्या कुत्र्यांतही भगवंताचें दर्शन केलें. म्हणून तूप घेऊन त्या कुत्र्याच्या पाठीमागे धावले आणि ओरडू लागले कीं, "देवा, थांबा, पोळी कोरडीच आहे; मी त्यावर तूप लावून देतो."

जर गुरूच सांसारिक बंधनांत आणि विषयांत फसलेले असतील, तर निश्चित समजा कीं ते तुम्हालाही सांसारिक बंधनांतून मुक्त करू शकणार नाहीत. जर आम्ही हे चांगले समजून घेतले कीं ईश्वर सर्वत्र आणि सर्वव्यापी आहे तर पाप करण्यासाठी कोणतेच स्थान मिळणार नाही. आणि पाप करण्यासाठीं वेळही मिळणार नाही.

हिरण्यकशिपूचा संहार झाला, पण नृसिंहप्रभूंचा क्रोध अजून कायम होता. त्यांचे कृध्द् रूप पाहून तिन्ही लोक भयभीत झाले. त्यांच्याजवळ जाण्याचें धाडस कोणासही होत नव्हते. ब्रह्मदेवाने देखील त्यांना शांत होण्याविषयीं प्रार्थना केली. परंतु ते ऐकतील तेव्हां ना!

शेवटी ब्रह्मदेवाने लक्ष्मीला सांगितलें कीं, 'माते, तूच यांना आता शांत कर.' देवांनी सुध्दा त्यांची प्रार्थना केली.

लक्ष्मीला वाटले कीं, 'ते माझे स्वामी आहेत, तेव्हां मी त्यांच्याजवळ जाईन तर ते शांत होतील. मनांत असा अभिमान बाळगून ती त्यांच्याजवळ गेली. पण भगवंत नम्र व्यक्तीची गोष्ट ऐकतात, अभिमान्याची नाही. आज त्यांनी लक्ष्मीलाही ओळखणे नाकारले.

तेव्हां ब्रह्मदेवाने प्रल्हादालाच म्हटले, 'बाळा, तुझ्या पित्यावर हे रागावले आहेत, तेव्हां तूच त्यांना विनव. प्रभु आज तुझ्यासाठीच प्रगट झाले आहेत. म्हणून तू जर त्यांच्याजवळ गेलास तरच ते शांत होतील.'

प्रभूजवळ जाऊन प्रल्हादाने त्यांना साष्टांग प्रणाम केला. त्याला पाहून प्रभूंच्या ह्रदयांत आनंदाचा (जणू) सागरच उसळून आला. प्रल्हादाला मांडीवर बसवून वात्सल्यभावाने प्रभूंनी त्याला कुरवाळलें.

प्रल्हादाप्रमाणें भगवंताच्या मांडीवर जो विराजमान होतो त्याचें काल कांहीही बिघडवू शकत नाही.

परमात्म्याला प्रसन्न करण्यासाठी शुद्ध प्रेम आवश्यक आहे. ज्ञानादींचे महत्त्व कमी आहे. शब्दज्ञान आवश्यक नाही. पुष्कळ वेळा शब्दज्ञान प्रभुभजनांत बाधक होत असते.

दुसऱ्याचें न्यून झाकण्यासाठी तुम्हाला ज्ञानी केले जाते, न्यून उघडे करून सांगण्यासाठी नाही. प्रेमभक्तीविना ज्ञान निरर्थक आहे.

हिरण्यकशिपूंसारख्यांसाठी भगवंत भयंकर आणि कठोर आहेत. परंतु प्रल्हादांसारख्यांना तर ते कमळासारखे कोमल आहेत. विष्णुसहस्रनामांत भगवंताला 'भयरूप' आणि 'भयकारक' बरोबरच

भयनाशीसुद्धा म्हटले आहे. भगवंत दुष्टांसाठी भयरूप आणि भयकारक आहेत, पण भक्तांसाठी मात्र भयाचें हरण करणारे आहेत.

नृसिंहप्रभूंनी प्रल्हादाला म्हटले: ‘तुझ्या पित्याने तुला फार त्रास दिला. मला प्रगट व्हायला उशीर झाला. त्याकरता मी तुझी क्षमा मागतो.

प्रल्हादाच्या भक्तीची दिव्यता तर पहा कीं आज भगवंत देखील त्याची क्षमा मागत आहेत.

ज्याप्रमाणे गोमाता आपल्या वासराला वात्सल्याने चाटते त्याचप्रमाणे नृसिंहप्रभू प्रल्हादाला कुरवाळू लागले आणि त्यांचा क्रोध हळू हळू कमी होऊ लागला.

प्रल्हाद सत्त्वगुण आहे; हिरण्यकशिपु तमोगुण. सत्त्वगुण आणि तमोगुणाचें हें युद्ध आहे. यांत भगवंत प्रल्हादाचा-सत्त्वगुणाचा पक्ष घेतात. शुद्ध सत्त्वगुणापुढे तमोगुणाचा नाश अवश्यच होत असतो.

प्रल्हादाचें वचन खरे करण्याकरता आणि आपली सर्वव्यापकता सिद्ध करण्याच्या हेतूने नृसिंहभगवान स्तंभांतून प्रगट झाले.

सगळेच जाणतात कीं ईश्वर सर्वव्यापक आहे, परंतु या गोष्टीचा अनुभव फारच कमी व्यक्तींना होत असतो. जर ईश्वराच्या सर्वव्यापकतेचा अनुभव सगळेच करू लागले तर घरच वैकुंठ होऊन जाईल. घरांत कांही भांडणच होणार नाही. त्या घरांतून पापच नाहीसे होईल.

सर्वव्यापकाचा अर्थ आहे सर्वांतच वसलेले. सर्वांतच सामावलेले. दुधांत लोणी दिसत नाही तरी पण त्याच्या कणाकणांत तें सामावलेले असते. याचप्रमाणे ईश्वरसुद्धा जगांतील सर्वच स्थूल-सूक्ष्म पदार्थांत वसलेला आहे. त्याचा अभाव कोठेच नाही. ईश्वर तर अणूहून अणू आणि महानापेक्षाही महान आहे. त्याचा कुठेच अभाव नाही. म्हणून तो सर्वव्यापी आहे.

जो ईश्वराला सर्वत्र विराजमान समजतो त्याच्या जीवनांत दिव्यता येते. सगळ्यांत ईश्वराला पहा. प्रथम मातृदेवो भव, नंतर पितृदेवो भव, आणि शेवटी परस्परदेवो भव. ईश्वराचें परस्परांत दर्शन घ्या. लोक एकमेकाला भेटल्यावर राम-राम म्हणत असतात. याचा अर्थ हाच कीं माझ्यांत आणि तुझ्यांत राम निहित आहे.

प्रत्येक जड चेतन पदार्थांत ईश्वराला पाहाल तर तुमच्याजवळ पाप फिरकू शकणार नाही. लग्न करून आल्यावर वधूची लक्ष्मीभावाने पूजा केली जाते. वर नारायण आहे आणि वधू लक्ष्मी. जर लोक असा विचार करतील कीं आमच्या घरांत साक्षात लक्ष्मी-नारायण आले आहेत तर वैकुंठच होऊन जाईल.

सगळ्यांमधे ईश्वराचा अनुभव करण्यांत लाभच लाभ आहे. असा अनुभव झाल्याने मन विकार-वासनारहित होत असते.

ईश्वर कांही अशी वस्तू नाही कीं जी एकाच जागेंत राहील. तो तर सर्वव्यापी आहे आणि सर्वत्र आहे.

ईश्वराची सर्वव्यापकता केवळ जाणण्यानेच विशेष लाभ होणार नाही. त्याचा अनुभव सुद्धा घेतला पाहिजे आणि तो व्यवहारांतही आणला पाहिजे.

भगवंताला नुसते गंध, फूल इत्यादी अर्पण करणें म्हणजेच काही भक्ति नाही. सगळ्यांमधे भगवत्भाव ठेवणेंच खरी भक्ति आहे. एखाद्या मूर्तीमधे जो ईश्वर तुम्हाला दिसतो, तोच सर्वत्र व्याप्त आहे. ईश्वराच्या सर्वव्यापकतेचा अनुभव ज्याला होतो किंवा जो करू शकतो, त्याचेच जीवन

धन्य होय. असा अनुभव घेणारा कधी पाप करू शकत नाही. तुम्ही प्रत्येक व्यवहाराला भक्तिमय करण्याचा निश्चय करा.

शुद्ध व्यवहारच भक्ति आहे. ज्याच्या व्यवहारांत दंभ आहे, अभिमान आहे त्याचा व्यवहार अशुद्ध आहे. ज्याचा व्यवहार शुद्ध नाही तो भक्तीचा आनंद घेऊ शकत नाही. ईश्वराच्या सर्वव्यापकतेच्या अनुभवाशिवाय व्यवहारशुद्धि होऊ शकत नाही.

नेहमी असे समजून असा कीं आपला प्रत्येक व्यवहार आणि प्रवृत्ति देव पाहात आहे. कोणताही व्यवहार असा नसावा कीं ज्यांत कांही उपदेश नसेल.

व्यवसाय किंवा कारभार कांही अपराध नाही. भक्त सेना न्हाव्याचा व्यवसाय करीत. एक दिवस त्यांना विचार आला कीं मी लोकांच्या डोक्यावरच्या मळाचा भार तर काढतो परंतु आपल्याच बुद्धीची मलीनता मी अजून काढू शकलो नाही.

कित्येक महापुरुषांनी आपल्या व्यवसायांतूनच ज्ञान मिळविलें आहे. महाभारतांत असे दृष्टान्त आहेत कीं ज्यांत हे दाखविले आहे कीं महाज्ञानी ब्राह्मण देखील वैश्यादींच्या घरी सत्संगासाठी जात असंत.

जेव्हां महाज्ञानी जाजली ऋषींना आपल्या ज्ञानाचा अभिमान झाला तेव्हां त्यांनी आकाशवाणी ऐकली कीं 'तू तुलाधर वैश्याला जाऊन भेट'. ऋषी तेथे गेले. गोष्टीगोष्टींत त्यांना समजून आले कीं तोही ज्ञानी आहे. तर त्यांनी तुलाधराला विचारले कीं असें ज्ञान तू कोठून मिळविले? तुलाधर म्हणाला, "तसे तर माझे माता-पिता ब्राह्मण आहेत, तरी पण पुष्कळसे ज्ञान मला माझ्या व्यवसायांतूनच मिळाले आहे. माझा व्यवसायच माझा गुरु आहे. केलेल्या श्रमाच्या प्रमाणांतच मी लाभ घेत असतो. तुलेच्या दांडीप्रमाणेच मी आपल्या मन-बुद्धीला सरळ आणि समान ठेवले आहे. वैश्याने नफा मिळविला नाही तर तो आपल्या कुटुंबाचें परिपालन कसे करील? नफा कमविणे कांही अपराध नाही. परंतु अयोग्य नफा घेणे गुन्हा आहे."

वाणिज्य ही सुद्धा भक्ति आहे. असें नका समजू कीं भक्ति फक्त मंदिरांतच केली जाऊ शकते. भक्ति प्रत्येक जागी केली जाऊ शकते. ईश्वरापासून अविभक्त राहून केला गेलेला प्रत्येक व्यवहार भक्ति आहे. ईश्वरापासून वेगळे होऊ नका.

शुकदेव सावध करतात.

जर मनुष्य गिऱ्हाइकांमधे ईश्वराचें दर्शन करून व्यापार करील तर त्याचा तो व्यापार देखील भक्तीच आहे. योग्य लाभ मिळविणें वैश्याचा धर्म आहे. पण जेव्हां तो गिऱ्हाइकांशी बोलू लागतो तेव्हा तो हे विसरून जातो की गिऱ्हाइकांत सुद्धा देव आहे आणि अशा प्रकारे केलेला तो अयोग्य व्यापार पापमय होतो. दुकानांत स्थापन केलेल्या देवाच्या समक्षच पुष्कळसे व्यापारी पाप करीत असतात. पाचाचा माल पंचवीस रुपयांत विकत असतानासुद्धा ते म्हणतात की 'मी हा मूळ किंमतीतच विकत आहे.' असे कधी करू नका.

भगवद्-कथा मनाला सावध करण्यासाठीच असते.

अनुभव घ्या की प्रभु सर्वव्यापी आहेत, सर्वत्र आहेत. मी जे काही बोलतो ते देव ऐकत आहे आणि मी जे काही पाहतो ते देवही पाहत आहे.

मनुष्याचे शारीरिक पाप तर समाज देखील पाहू शकतो, परंतु त्याचे मानसिक पाप तर केवळ देवच पाहू शकतो. मानसिक पाप सर्वांत वाईट आहे. कोणतेच पाप न करणे मोठे पुण्य

आहे.

नरसिंह भगवान अवकाशांतून नाही तर स्तंभातून प्रगट झाले होते. नुसत्या चेतनांतच नाही, जडांतही भगवंताचे दर्शन करा. ईश्वर जड आणि चेतन दोहोंतही आहे. लौकिक दृष्टीने पृथ्वी जड आहे परंतु तीतसुद्धा ईश्वराची भावना केली पाहिजे.

एका महात्म्याचे दोन शिष्य होते. ते दोघेही शिकलेले होते, कथाकारही होते. जेव्हा महात्म्याचा मृत्यू जवळ आला तेव्हा त्या दोघांमध्ये गादीकरता भांडण सुरू झाले. महात्म्यालाही विचार पडला की वारस कोणाला करावे? शेवटी त्याने दोन फळे मागवून दोघांना एक-एक देत म्हटले की हे फळ अशा जागी जाऊन खा की जिथे तुम्हाला पाहणारा कोणीच नसेल.

ते दोघेही फळ घेऊन निघून गेले. एका शिष्याने विचार केला की मी खोली बंद करून घेईन. कारण तिथे मला कोण पाहणारा असणार? आणि त्याने खोली बंद करून फळ खाल्ले.

दुसरा शिष्य फळ घेऊन सबंध दिवसभर इकडे-तिकडे भटकत फिरला. परंतु त्याला असे एकही स्थान सापडले नाही की जिथे कोणी नसेल. तो जिथे कुठे गेला तिथे त्याला देवाच्या अस्तित्वाचा अनुभव झाला. वेदांतसुद्धा सांगितले आहे की प्रभु सर्वत्र आहे, विश्वतोमुखी आहे. अशा रीतीने दुसऱ्या शिष्याने ज्ञान नुसते घेतलेच नव्हते, तर आत्मसातही केले होते.

पहिला शिष्य नुसती कथा करीत असे. त्याला ईश्वराचे व्यापक स्वरूप समजू शकले नव्हते.

गुरुजींनी त्या दुसऱ्या शिष्याला आपले वारस केले.

कथा सांगणे सोपे आहे पण ईश्वर सर्वत्र आहे असे समजून व्यवहार करणे कठीण आहे.

प्रल्हाद असा अढळ निष्ठावान होता की तो सर्वांमध्येच ईश्वर पाहात असे.

अनेकांत एकाचे (प्रभूचे) दर्शन करणे भक्ति आहे. जो सगळ्यांतच त्या एकाच तत्त्वाला पाहील तो ज्ञानी. ज्ञानी एकातच अनेकांचा लय करतो. तुम्हीसुद्धा त्याचप्रमाणे एकातच अनेकांचा लय करा. ही वेदान्ताची प्रक्रिया आहे. अनेकांत एकाला पहा.

वैष्णव अनेकांत एकाला पाहतात. शाब्दिक भिन्नता असू शकेल. ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्गांत तसे काही वेगळेपण नाही. हनुमंतांनी सीतेला रामाची अंगठी दिली तर तिने त्यातसुद्धा रामाचे दर्शन घेतले.

एक परमात्माच सत्य आहे आणि तो अनेकांत वसलेला आहे. अनेकांत एकाला पाहणे भक्ति आहे. एकात अनेकांना पाहणे ज्ञान आहे.

शरीर असून देखील त्यांत जर प्राण-आत्म्याचा अभाव असेल तर त्या शरीराची किंमत काय? ज्ञानी बाह्य रूपरंग पाहात नाहीत. परंतु बाह्य रूपरंगाच्या सुंदरतेला कारणभूत अशा ईश्वराचेच चिंतन करतात.

भगवान शंकराचार्यांनी दुःखाने म्हटले होते की लोक मांसाची (देहाची) तर मीमांसा करतात, पण आत्म्याची मीमांसा कोणीच करीत नाहीत.

एका गृहस्थाचा असा स्वभाव होता की साधुसंतांना जेवायला घातल्यावाचून तो स्वतः जेवत नसे. एकदा एक महात्मा स्वतःहूनच फिरत फिरत आले. त्या गृहस्थांनी त्यांची पूजा करून त्यांना जेवायला बसवले. घरात दूध नव्हते. त्याने नोकराला सांगितले की धावत जाऊन दूध घेऊन ये. नोकर गेला पण लगेच परत आला आणि त्याने मालकाला विचारले, 'काळ्या गाईचे आणू की पांढऱ्या गाईचे?' तर त्याने उत्तर दिले की आवश्यकता दुधाची आहे. गाय कशीही असो,

पण महात्म्यांचे जेवण संपायच्या आधी घेऊन ये. नोकर गेला आणि पुनः विचारायला आला की म्हाताऱ्या गाईचे आणू की तरण्या गाईचे? मालकाला राग येऊन तो मारायला धावला. महात्म्याने मालकाला रागाचे कारण विचारले. शेठ म्हणाला, किती मूर्ख आहे हा नोकर? किती वेळा त्याला दूध आणायला पाठविले तरी तो आणू शकला नाही.

महात्मा म्हणाले: जो देव या सेवकांत आहे तोच देव तुमच्यांतही आहे. आम्हाला शरीराची नाही, शरीरांत राहणाऱ्या परमात्म्याची आवश्यकता आहे. तुम्हा दोघांमध्ये एकाच परमात्म्याचा वास आहे. त्याला मारू नका.

सगळ्यांमध्ये एकाच ईश्वराचा वास आहे. प्रत्येक स्त्री-पुरुषांत, प्रत्येक जड-चेतनांत, स्थावर-जंगम वस्तूंमध्ये त्या (एकाच) प्रभूचे दर्शन करा.

जगांत मूर्ख कोणी नाही. ईश्वराचेच सर्व अंश आहेत. जो दुसऱ्याला मूर्ख समजतो तो स्वतःच मूर्ख असतो. सर्वांना पूज्य भावाने पहा.

आमच्या देशात तर पशूंची सुद्धा पूजा केली जाते. भैरवनाथांचे वाहन कुत्रे आहे आणि शीतलामातेचे वाहन आहे गाढव. म्हणून कुत्रा आणि गाढवसुद्धा तिरस्करणीय नाहीत.

चैतन्यरूपाने ईश्वर सगळ्यांतच आहे हें परमसत्य जाणून संसारांत रहा व प्रत्यक्ष ईश्वराशींच बोलतो आहे, व्यवहार करतो आहे या सद्भावनेने सर्वांशीं वागा. स्वभावच असा होऊं द्या कीं आपल्या कोणत्याही कृतीने वा उक्तीने कोणाचेंही अंतःकरण दुखावणार नाही, कोणाचेंही नुकसान होणार नाही, कोणालाही यातना होणार नाहीत. असा स्वभाव असणाऱ्याची प्रत्येक क्रिया भक्ति आणि ज्ञानमय होईल.

नरसिंह भगवंतांनी प्रगट होताना गुरु शब्दाचे उच्चारण केले होते. हे खरे आहे की ईश्वर सर्वत्र आहे, परंतु जोपर्यंत सद्गुरूकडून दिव्य दृष्टी मिळणार नाही तोपर्यंत ईश्वराचे दर्शन होणार नाही. जो जितेंद्रिय असतो तोच स्वतंत्र असतो. स्वातंत्र्य माणसाला स्वेच्छाचारी करते. म्हणून स्वतंत्र आणि स्वच्छंदी बनू नका.

बुद्धीचा कधीच भरवसा ठेवू नका. कोणा संताला गुरु करून त्याच्या आधीन रहा. जो तुम्हाला पाप करण्यापासून परावृत्त करू शकेल अशा संताच्या आधीन रहा. गुरु केलाच पाहिजे.

परंतु गुरु करण्यापूर्वी चांगल्या रीतीने विचार करून परीक्षा केली पाहिजे. ज्या व्यक्तीला तुम्ही गुरु करीत आहात; तो योग्य, सुपात्र आहे की नाही याचा विचार करा. कोणी एकाने म्हटले आहे– **'पानी पीना छानके, गुरु करना जानके.'**

वर्तमानजगांतील कोणत्याही महापुरुषावर तुमची श्रद्धा नसेल तर प्राचीन महात्म्यांनाच गुरु समजून त्यांच्या आधीन रहा. महापुरुष अमर असतात. शंकराचार्य आणि वल्लभाचार्यांसारखे संत अमर आहेत. त्यांना गुरु मानून त्यांची सेवा करा आणि त्यांचा आश्रय देखील घ्या.

गुरुशिवाय कल्याण होऊ शकत नाही. एखाद्या संताच्या चरणाचा आश्रय घेतल्यावर सद्गुरु कृपा करतील. जर ते संत कृपा करतील तर तुमच्या मानसिक वासना आणि विचारांचा नाश होईल. मन-बुद्धीची वासना संतसेवेवाचून दूर होत नाही. मनावर सत्संगसेवेचा अंकुश ठेवा. बुद्धीला एखाद्या संताच्या चरणी लावा. जोपर्यंत बुद्धीचे परमात्म्याशी लग्न लागत नाही तोपर्यंत तिला संताच्या आधीनच ठेवा. सद्गुरुकृपेशिवाय प्रत्येकांतच ईश्वराचे दर्शन होणार नाही.

जगतात तसे तर अनेक संत आहेत. परंतु त्या सर्वांवरच आमच्या कल्याणाची जबाबदारी

नाही. आम्ही ज्या संताला गुरु करू तोच आमच्या कल्याणाला जबाबदार.

घाईने, न समजता, विचार न करता कोणाला गुरु करणे हे सुद्धा चांगले नाही. गुरु केल्यावर शिष्याच्या पापाची जबाबदारी गुरूवर येऊन पडते. शिष्याच्या पापांचा न्याय करताना गुरूला देखील तेथे बोलावले जाते आणि त्यांना विचारले जाते की त्यांनी शिष्याला पाप करण्यापासून अडवले की नाही, त्याला सन्मार्गावर का आणता आले नाही. तेव्हा शिष्याबरोबर गुरूला देखील दंड भोगावा लागतो.

मंत्र, माळ आणि मूर्ति आणि त्याचप्रमाणे गुरु वारंवार बदलणे इष्ट नाही. आपली माळ आणखी कोणाला देऊ नका.

नरसिंहप्रभू स्तंभातून प्रकट झाले होते. तुम्हीच विचार करा की ते स्तंभात कसे राहिले असतील? देव तर त्या खांबात सूक्ष्मरूपाने होते, पण प्रल्हादाच्या भक्तीने आकर्षित होऊन त्यांनी स्थूल रूप धारण केले होते. प्रल्हादाचे प्रेम इतके शक्तिशाली होते की प्रभूला सूक्ष्म रूप सोडून स्थूल रूप धारण करावे लागले.

जेव्हा सगळेच देव विचार करीत होते कीं प्रभु कोठे भेटतील तेव्हा शंकरांनी सांगितले होते–

**४. 'अतिशय प्रेमाशिवाय प्रभु आपल्या स्वरूपाचे दर्शन देत नाहीत. प्रभुवर प्रेम करावे लागेल.':**

उदाहरणे– एकनाथ, तुलसीदास, रुक्मिणी.

प्रल्हादाच्या भक्तीने आकृष्ट होऊन भगवान निराकाराचे साकार झाले.

बुद्धि जोपर्यंत सूक्ष्म नाही तोपर्यंत तिच्याने ईश्वराचें चिंतन होऊ शकत नाही. परमात्मा प्रेमामुळेच साकाररूप धारण करतात. परमात्मा निर्गुण आहे आणि सगुणही. निर्गुण आणि सगुण तत्त्वतः एकच होत. निर्गुणच सगुण होतो. प्रभु स्थूलही आहे आणि सूक्ष्मही. तो कोमलही आहे आणि कठोरही.

वेदान्ती मानतात की हे सर्व धर्म ईश्वरांत मायेमुळेच आभासित होत असतात. वैष्णवाचार्य मानतात की विरुद्ध धर्माश्रयी परमात्मा आहे. जे नरसिंहभगवान हिरण्यकशिपुसाठी कठोर झाले होते तेच प्रल्हादासाठी कोमल झाले.

ज्ञानी पुरुष सर्वांतच भगवत्‌दृष्टी ठेवतात. दृश्य पदार्थांतून दृष्टी काढून द्रष्ट्यामध्ये स्थिर करा. दृश्यांतून दृष्टी काढा आणि सर्वद्रष्टा– सर्वांचा साक्षी अशा परमात्म्याच्या स्वरूपांत दृष्टी स्थिर करा.

एक महात्मा होते. त्यांना जे काही दिसायचे ते सर्व ईश्वरमयच दिसत असे. त्यांच्याजवळ येऊन एक गृहस्थ म्हणाला, 'मी ईश्वराचें दर्शन घेऊ इच्छितो.'

महात्मा– समजून घे की तूच ईश्वर आहेस.

गृहस्थ– मी विश्वासाने सांगतो की मी ईश्वर नाही.

महात्मा– तुला ईश्वराचे दर्शन घ्यायचे आहे ना? म्हणून तू जर ईश्वर नाहीस तर तुझ्याशिवाय जे काही दिसते त्याला ईश्वर समज. जगात जे काही दृष्टिगोचर आहे त्यातच ईश्वराचे दर्शन घे. असेच समजून सगळा व्यवहार कर.

गृहस्थाने तसे केले आणि त्याचे पापकार्य आपोआपच थांबले. त्याचा व्यवहार शुद्ध झाला.

एकदा त्या गृहस्थाने पुनः महात्म्याला विचारले, सगळ्यांत ईश्वर आहे असा अनुभव करून शांति मिळते, परंतु केव्हा केव्हा अशी शंका देखील येते कीं हे जे सर्व दिसत आहे त्यात ईश्वर नाही. तर मी काय करू?

महात्मा समजावू लागलेः जर तुला असे वाटत आहे की जे काही दिसत आहे त्यात ईश्वर नाही आणि तुला ईश्वराचे दर्शन देखील घ्यायचे आहे, तर आता असें कर की, जे काही दृश्यमान आहे त्यांत ईश्वर नाही असे मानून सर्वांचाच मोह सोडून दे. दृश्यमानावर प्रेम नको ठेवू. दृश्य वस्तु ईश्वर नाही. तू द्रष्ट्यावर प्रेम कर. जगांतील दृश्यमान पदार्थांऐवजी दृश्याच्या द्रष्ट्यावर तू प्रेम ठेव. आता जो अदृश्यमान आहे तो ईश्वर आहे आणि ईश्वर द्रष्टा आहे असे मान. ईश्वर दृश्य नाही, द्रष्टा आहे.

वेदान्त म्हणतो की ईश्वर दृश्य नाही, तर सर्वांचा द्रष्टा आहे. ईश्वरांत दृश्यत्वाचा आरोप मायेमुळे होत असतो. जी व्यक्ति सर्व द्रष्ट्यांत दृष्टी स्थिर करील तिला प्रभु भेटतील.

महात्म्याने दोन मार्ग सांगितलेः १) जो दृश्यमान आहे तो ईश्वर आहे, २) जो अदृश्य आहे तो ईश्वर आहे. ईश्वर द्रष्टा आहे. जो सर्वांचाच द्रष्टा आहे आणि सर्वांचाच साक्षी आहे त्याला इतक्या सहज सोप्या रीतीने कोण जाणू शकेल? पूर्ण वैराग्यावाचून ज्ञानानुभव होत नाही. म्हणून आपल्यासारख्या साधारण माणसांसाठी भक्तिमार्गच चांगला. हे जे कांही दृश्यमान आहे ते सर्व ईश्वरमय आहे.

वैष्णव सगळ्याच पदार्थांत ईश्वर आहे असे मानतात. असे मानून व्यवहार करण्याने भक्तिमार्गांत सफलता मिळेल. ईश्वराच्या कोणत्या तरी स्वरूपाची आसक्ति ठेवल्याशिवाय भक्ति होणार नाही.

शंकर भगवान समाधीत बसत असत. समाधीत काय असते? आपल्या स्वरूपाला स्वतःच पाहणे म्हणजेच समाधी होय.

कोणता तरी एक मार्ग निश्चित करा. प्रत्येक दृश्य वस्तू विनाशी आहे असे मानून मोहाचा त्याग करून द्रष्टयावर प्रेम कराल तर वेदान्ताप्रमाणे आत्मसाक्षात्कार होईल. द्रष्टयात दृष्टी स्थिर करा किंवा प्रत्येकच पदार्थांत ईश्वराचा अनुभव करा.

प्रल्हाद स्तुति करतोः हे प्रभु! मोठमोठ्या सिद्ध महात्म्यांना कित्येक वर्षे तपश्चर्या करूनही आपला साक्षात्कार होऊ शकला नाही. परंतु राक्षसकुळांत जन्म मिळूनही आज मला दर्शन देण्याची आपण माझ्यावर कृपा केलेली आहे.

भगवंताला प्रसन्न करण्यासाठी अधिक शिक्षणाचीही गरज नाही किंवा अधिक अर्थोपार्जनाचीही नाही. जर धनामुळे परमेश्वर मिळत असता तर धनिक (श्रीमंत) लोकांनी लाख दोन लाखांत परमेश्वराला विकत घेतले असते. अधिक शिक्षण किंवा अधिक ज्ञानानेही भगवंत मिळत नाही. जो जास्त ज्ञानी असतो तो दुसऱ्यांशी छलकपट करण्यांतही संकोच करीत नाही.

परमात्म्याला प्रसन्न करायला संपत्ति, शिक्षण किंवा उच्च कुळांत जन्म यांची आवश्यकता नाही. केवळ ब्राह्मणांनाच ईश्वर भेटतो असेही नाही. परमात्म्याला प्रसन्न करायला आवश्यक आहे हृदयाचे शुद्ध प्रेम.

जास्त मिळवून त्याचा प्रभुसेवेंत व्यय करणें ठीक आहे, पण एका आसनावर बसून प्रभूचें ध्यान करणे त्याहून चांगले आहे.

संपत्तीने परमात्मा मिळत नसतो. उलट कित्येक वेळा तर धन भगवत्सेवेत— प्रभुभजनांत

बाधारूप होऊन जाते.

ज्ञानाचें आधिक्य तर्कवितर्काला जन्म देते, म्हणून ज्ञानी भगवंताचे स्मरण आणि सेवा चांगल्या तऱ्हेने करू शकत नाही. बहु-ज्ञानी आरंभी आरंभी कुतर्क करतो. वस्तुतः प्रारंभी तर श्रद्धाच आवश्यक आहे. **॥ तस्य श्रध्देव शिरः॥...** (तैत्ति. ब्रह्मानंदवल्ली.)

शिकलेसवरलेले लोक जास्त कुतर्क करतात. ते म्हणतात की आधी पहिला चमत्कार दाखवा, नंतर आम्ही तुमच्या देवाला नमस्कार करू. दुसऱ्यांना खूष करण्यासाठी चमत्काराने आरंभ करण्याचे काम तर वेश्येचे आहे; कारण तिला दुसऱ्यांची आवश्यकता आहे. ईश्वराला तर कोणाचीच आवश्यकता नाही. जर तुम्हाला ईश्वराची गरज असेल तर श्रद्धेने पूजा-स्मरण करा आणि नंतर चमत्कार पहा. जादूगार सुद्धा चमत्कार दाखवतो, कारण त्याला पैशाची आवश्यकता असते. पहिला चमत्कार आणि मग नमस्कार हा नियम या जगांतील व्यवहाराचा असू शकतो, पण भगवंताच्या व्यवहाराचा नाही. परमेश्वराचा व्यवहार आहे प्रथम नमस्कार आणि नंतर चमत्कार. चमत्काराशिवाय नमस्कारही मानवता आहे. चमत्कारानंतरचा नमस्कार हा अभिमान आहे. कांही तरी विचार करा. हे जगत् म्हणजेच एक चमत्कार आहे. पुष्पांत सुगंध आहे तर बीजांत वटवृक्ष. आईच्या स्तनांत दूध कोण निर्माण करतो? सगळे जग ईश्वराचा चमत्कारच तर आहे.

आणि श्रद्धा-अंधश्रद्धा आमच्या व्यावहारिक जीवनांत सुद्धा कुठे नाही? पुष्कळ वेळा डॉक्टरांमुळे काम बिघडून जाते; तरी पण आम्ही त्यांच्या सांगण्यावर श्रद्धा ठेवतो. त्यांना तर असे म्हणता येत नाही कीं पहिला चमत्कार करून दाखवा. डॉक्टरवर श्रद्धा नसेल तर तो औषध देणार नाही आणि औषधाशिवाय रोग दूर कसा होईल?

याचप्रमाणे सेवामार्गांत सुद्धा प्रथम श्रद्धेची आवश्यकता आहे. परमार्थात श्रद्धा आवश्यक आहे.

आजचे शिकलेले लोक असाही कुतर्क करतात कीं भगवंत आहार घेत नाहीत, मग त्यांना नैवेद्य कशाला दाखवला जातो? ताटांतून काहीच तर कमी होत नाही. पण त्यांना हे ठाऊक नसते कीं देव जेवण घेतच नाही. परंतु सारतत्त्वाचा आहार करतात. देव रसभोक्ते आहेत. अन् खरोखरच जर ते जेवू लागले तर या कलियुगांत कोणी त्यांना नैवेद्य तरी दाखवील की नाही याविषयी शंका आहे.

ईश्वराला प्राप्त करण्यासाठी अति-ज्ञानाची आवश्यकता नाही. अंतकाळी ज्ञान पुष्कळ वेळा विश्वासघात करीत असते. ज्ञानाला जर भक्तीची साथ असेल तर ते ठीक असते.

आजारी तर शरीर होत असते; आत्मा नाही. अशा गोष्टी वेदान्ती सुद्धा करू शकत नाही, कारण वेदान्ती आजारी झाला तर औषध आणि फळे यांची आवश्यकता त्यालाही जाणवतेच.

वेदान्ताचे सिद्धान्त निरर्थक नाहीत, परंतु भक्ति आणि प्रेमाच्या अभावामुळे त्यांचा अनुभव होऊ शकत नाही. प्रेमाची – भक्तीची आवश्यकता ज्ञानाला सुद्धा असते.

ज्ञानाचा उपयोग ईश्वराच्या व्यापकतेचा अनुभव करण्यासाठी आहे. ईश्वर सर्वत्र आहे असे मानून केलेला व्यवहार भक्ति होतो.

समर्थ रामदासांनी दासबोधांत म्हटले आहे की जो व्यवहार-कुशल असतो तो परमार्थ कसा करू शकेल? पण ज्याचा व्यवहार अतिशय शुद्ध आहे तो परमार्थ चांगल्या तऱ्हेने करू शकतो. पण ज्याचा व्यवहार शुद्ध नाही तो भक्ति कसा करील?

व्यवसाय किंवा धंदा करणे कांही पाप नाही. परंतु व्यवसाय-धंद्यात ईश्वराला विसरणे पाप आहे.

साधन-भक्तींत सगळेच संत आपापले काम करीतच असत. सेना न्हावी हजामतीचा धंदा करीत होते, तर गोरा कुंभार मातीची भांडी करण्याचा.

गजेन्द्र न शिकलेला पशूच तर होता! त्याने कांही तपश्चर्या केली नव्हती की अष्टांगयोगाची साधनाही केली नव्हती. पण त्याचीही प्रेमाची हाक ऐकून, त्याच्या भक्तीमुळे भगवंत त्याच्यावर प्रसन्न झाले.

भक्तीने भगवंत मिळतात. ईश्वरावर प्रेम ठेवून सेवा-स्मरण करीत रहा. जर भक्ती नसेल तर ज्ञान्याच्या ज्ञान आणि तपश्चर्येचे कांहीच सार्थक नाही. ज्ञान वाटेल तितके असेल पण प्रभुप्रेम नसेल तर त्या ज्ञानाची आणि तपश्चर्येची कांहीच किंमत नाही.

प्रभुभेटीसाठी जो आतुर नाही अशा ब्राह्मणापेक्षा प्रभुभेटीसाठी आतुर असलेली शूद्र व्यक्तीसुद्धा श्रेष्ठ आहे.

प्रभूला प्रसन्न करायची दोन साधने आहेत. सेवा (पूजा) आणि स्मरण. दररोज तीन तास प्रभूची सेवा आणि स्मरण करा. या दोन साधनांनी भगवंत अवश्य मिळत असतात. आणखी कोणत्याही वस्तूची आवश्यकता नाही. दक्षिणा देऊन पुण्य मिळत नाही. तो धनाचा सदुपयोग तर आहे, पण स्वतःसुद्धा सेवा-स्मरण करणे आवश्यक आहे. परमात्म्याला प्रसन्न करण्याचे साधन आहे– प्रेम! सेवेत आणि पूजेत धन नाही तर मन प्रधान आहे. स्नेहच मुख्य वस्तू आहे.

श्री गोसाई महाराजांच्या "दो सौ बावन वैष्णवों की वार्ता" या ग्रंथांत पद्मनाभ दासांची कथा आहे. ते गरीब होते, म्हणून देवाला चण्याच्या टरफलांचा नैवेद्य दाखवीत असत. देव त्यांत सुद्धा मिष्टान्नाचा अनुभव करीत.

भगवंत हे नाही पाहत कीं कोण त्याला काय देत आहे. ते फक्त हेच पाहतात की कोणत्या भावनेने दिले गेले आहे.

सेवा (पूजा) स्मरणाने भगवान सेवकाधीन होतात.

एकनाथ महाराज सगळ्या दिवसभर अविरत प्रभुसेवा आणि भजन करीत. म्हणून थकून जात. त्यांच्या अशा अविराम सेवेने प्रभु दयार्द्र होऊन गेले. ते विचार करू लागले– माझ्यासाठी माझा भक्त किती श्रम करतो. बिचारा थकूनभागून अगदी क्षीण होऊन जातो. चला, मला त्याला कांही मदत करायला पाहिजे.

हा विचार करून भगवंताने ब्राह्मणाचे रूप घेतले व एकनाथाजवळ येऊन म्हणाले– 'पंत, मला आपला सेवक म्हणून ठेवून घ्याल का?'

एकनाथ म्हणाले, मला नोकराची गरजच काय? मी तर आपला सगळा दिवस प्रभूची सेवा आणि स्मरणांतच घालवीत असतो.

भगवंतः मी तुम्हाला देवाच्या सेवेंत मदत करीन.

एकनाथः जशी तुझी इच्छा! हो, पण तुझे नाव काय आहे?

भगवंतः माझे नाव श्रीखंड्या.

आणि या प्रकारे सेवा करता करता बारा वर्षे निघून गेली.

ज्याला चंदनाचा तिलक लावला जात असे तो स्वतःच गंध उगाळू लागला. 'तुलसीदास

चंदन घिसे, तिलक लेत रघुवीर' वाली गोष्ट उलटी झाली. हाच आहे भक्तीचा महिमा!

रुक्मिणीने आपल्या सेवेने प्रभूला प्रसन्न करून आपल्या आधीन करून घेतले होते. तरी पण एकाच तुळशीच्या पानाने ते तोलले गेले होते.

श्रीधरस्वामींनी 'हरिविजया' मध्ये एका प्रसंगाचे वर्णन केले आहे. एकदा सत्यभामेच्या मनांत अभिमान झाला कीं प्रभूला तीच सर्वात जास्त प्रिय आहे. एकदा नारद फिरत फिरत तेथे येऊन पोहोचले. सत्यभामा त्यांना म्हणाली– 'मला प्रत्येक जन्मातच हा पति मिळेल असा एखादा उपाय सांगा.'

नारद– तू ज्या वस्तूचे दान देशील तीच वस्तु तुला पुढल्या जन्मी प्राप्त होईल. म्हणून तू श्रीकृष्णालाच पुढल्या जन्मी पति म्हणून इच्छित असशील तर त्यांचे दान कर.

असे दान द्यायला तर सत्यभामा तयार झाली, पण अशा दानाचा स्वीकार कोण करतो?

कोणीच व्यक्ति ते दान घेण्यास इच्छुक नव्हती.

शेवटी ते दान स्वीकारायला नारदांनाच समजवावे लागले आणि ते राजीही झाले.

सत्यभामेने संकल्प करून श्रीकृष्णाचे नारदांना दान दिले.

दानांत श्रीकृष्ण मिळाल्यामुळे त्यांना आपल्याबरोबर घेऊन नारद जाऊ लागले.

सत्यभामा विचारू लागली– तुम्ही माझ्या पतीला कुठे घेऊन जात आहांत?

नारद– तू इतक्यांतच त्यांचे मला दान केले आहेस! म्हणून आता ते माझे झाले. दानांत दिली गेलेली वस्तू दान घेणाऱ्याची होते. आता कृष्णावर माझा अधिकार आहे.

आता सत्यभामेला आपली चूक लक्षांत आली. ती कृष्णाला मागू लागली आणि नारद नाकारू लागले.

तिकडे ही बातमी जेव्हा इतर राण्यांना समजली तेव्हा त्या सगळ्या धावत धावत तेथे आल्या. पण फक्त रुक्मिणी आली नाही.

सगळ्याच राण्या, त्यांचा पति त्यांना परत द्यावा म्हणून नारदांना विनवू लागल्या.

नारद– सत्याभामेने कृष्णाचे मला दान केले आहे म्हणून ते तर आता माझेच झाले आहेत. हो, तरी पण तुम्हाला जर ह्यांना परत घ्यायचे असेल तर त्यांच्या वजनाइतके सुवर्ण जर मला द्याल तर मी यांना परत करीन.

सत्यभामेला आनंद झाला. तिला वाटले तिच्याजवळ ढीगभर अलंकार आहेत आणि स्यमंतक मणी पण आहे. पतीचे वजन असे कितीसे असेल? ती आपले सर्व अलंकार घेऊन आली.

पण हें काय झाले! सत्यभामेने हिरे, मोती, स्यमंतक मण्यासहित आपले सर्वच सुवर्णालंकार तराजूत ठेवले तरीही कृष्णाचे पारडे खालीच राहिले.

जीव जेव्हा अभिमानी होतो तेव्हां भगवंतसुद्धा भारी होतात. त्यांच्यापुढे हिरे, मोती, सुवर्णाचें मोल काय होय!

राण्यांनी आभूषणांनी कृष्णाचे मोल करण्याचे इच्छिले तर हजारो मण आभूषणें ठेवल्यावर सुद्धा त्यांचे वजन कृष्णाच्या वजनापेक्षा कमीच राहिले!

सत्यभामेचा अभिमान नाहीसा करण्यासाठीच ही सर्व लीला रचली गेली होती.

सगळ्याच राण्या मोठ्या विचारांत पडल्या कीं आता काय करावे? सत्यभामेने श्रीकृष्णाचे दान करून मोठा अनर्थ ओढवून घेतला होता.

रुक्मिणीच्या सगळी गोष्ट लक्षांत आली. भगवंताची तुला कां होत नाही ते तिने ओळखले.

रुक्मिणीनें इतर राण्यांना म्हटले— भगवंताची तुला काय सुर्वणाने होऊ शकते? असें म्हणून तिने पारड्यांत एक तुलसीदल ठेवून दिले. आता भगवंताची तुला पूर्ण झालेली दिसली. रुक्मिणीने पूर्ण प्रेमाने तुलसीदल अर्पण केले होते म्हणून भगवंताचें पारडे वर उचलले गेले.

त्याचप्रमाणे बोडाण्यासाठी भगवंत सव्वा वालाच्या बरोबर झाले होते.

ईश्वराला केव्हांही अशी इच्छा नसते कीं कोणी त्यांची सेवा करावी. ते तर निजलाभानेच परिपूर्ण आहेत. त्यांना कोणत्याच वस्तूची अपेक्षा नाही. ते स्वतः आनंदरूप आहेत. त्यांना अशी अपेक्षा नाही की वैष्णवांनी त्यांना नैवेद्य अर्पण करावा. त्यांना जेवायची इच्छासुद्धा होत नाही. ते तर निष्काम आहेत. भक्तांना प्रसन्न करण्यासाठीच ते जेवण करीत असतात.

भगवद्निवेदन केल्याशिवाय केव्हांही जेवण करू नये. ईश्वराला त्याचेच पदार्थ अर्पण करायचे आहेत. प्रेमाने अर्पण कराल तर ते प्रसन्न होतील. ईश्वराला अर्पण केल्याशिवाय खाणारी व्यक्ति उपाशीच राहात असते. तुम्ही त्याला अर्पण कराल तर तो त्याचे अनेक पट करून परत देईल. ते म्हणतात, 'माझ्याच बनविलेल्या वस्तू मला अर्पण करण्यांत तसे कांही मोठेपण नाही. परंतु मला अर्पण केल्यावाचून खाणे (जेवणे) अनधिकृत जेवण आहे.'

भगवंताच्या घरी कशाची कमतरता तर नाही. तो तर तुमचा नुसता भाव पाहात असतो.

भगवंतांनी जे दिले आहे तेच तर त्यांना अर्पण करायचे आहे. जीव स्वतः तर कोणती वस्तू उत्पन्न करू शकत नाही. सर्व कांही श्रीकृष्णाचेच तर आहे.

दिवा लावल्याने किंवा आरती केल्याने देवाच्या घरांत तर कांही प्रकाश पडत नाही. हे तर तुमच्या स्वतःच्या हृदयांतच प्रकाश करण्यासाठी आहे. ईश्वर तर तसा स्वयंप्रकाशी आहे.

सेवा केल्याने सेवकाला सुख होते. भगवंताला काय सुख मिळेल? ते तर स्वतःच स्वयंप्रकाशी— परमानंदस्वरूप आहेत.

जीवाला देणारा तर ईश्वरच आहे; परंतु मनुष्याने अर्पण केलेल्या नैवेद्याने तो प्रसन्न होतो.

सेवा आणि पूजेमध्ये अंतर आहे. जेथे प्रेमाचे प्राधान्य आहे ती सेवा होय आणि जिथे वेदमंत्रांचे प्राधान्य असते ती पूजा होय.

पूजा कराल तर प्रेमाने करा. नाहीतर स्नेहादींचे समर्पण व्यर्थच होईल. आपले कपडे कुठे मळू नयेत म्हणून कित्येक लोक मंदिरांत साष्टांग नमस्कार करीत नाहीत.

जे काही आहे ते ईश्वराचेच तर आहे, फक्त त्यालाच अर्पण करायचे आहे. अर्पण करण्याच्या कृतीनेच तुमच्या मनाचा भाव ओळखता येतो.

दक्षिणेत एक कथा प्रचलित आहे.

कोणत्याही शुभकार्याच्या आरंभी विघ्नाच्या नाशासाठी सर्वप्रथम गणपतीची पूजा केली जाते.

कोणत्या एका गावात एका गृहस्थाच्या घरी विवाहाची वेळ आली. ब्राह्मणाने पाहिले की गणपतीची मूर्तीच तिथे नाही! आता काय करावे? तो ज्ञानी होता. त्याने विचार केला कीं ईश्वराची प्रतिष्ठा प्रेमाने कोठेही करता येऊ शकते. सुपारीत सुद्धा देव बसतो. उत्तमोत्तम वस्तू देवाला देणे म्हणजेच भक्ति. म्हणून त्या ब्राह्मणाने नैवेद्यासाठी ठेवलेल्या गुळामधूनच गणपति बनविला. यजमानांकडून पूजा करविली गेली. धूप-दीपही झाले. आता नैवेद्याची वेळ आली. नैवेद्यातूनच गणपति बनवून घेतला होता. आता काय करावे? तर त्या पुजाऱ्याने गुळाच्या त्या गणपतीच्या मूर्तीतूनच थोडा

गूळ काढून नैवेद्य दाखविला.

गुळाचाच गणपति, (अन्) गुळाचाच नैवेद्य!

गणपति गुळाचाच आणि नैवेद्यही गुळाचाच. अशा पूजेने सुद्धा गणपति प्रसन्न झाले. त्या यजमानाचे कार्य निर्विघ्नपणे पार पडले. कार्यातील भाव तर शुद्ध होता ना!

महत्त्व वस्तूचे नाही, भावाचे आहे. सद्भावपूर्वक सेवा कराल तर ती सफल होईल. सेवा करताना रोमांच आले, डोळ्यांतून अश्रू आले तर समजा ती खरी सेवा आहे.

सेवा फक्त क्रियात्मक नाही तर भावात्मकही असली पाहिजे. सेवा करताना आनंद होईल तीच खरी सेवा. जे कांही करायचे असेल ते प्रेमाने करा. भगवंताला अर्पण करून मग भोजन करा.

त्याबरोबर प्रार्थना करा कीं, हे नाथ! आपण तर विश्वंभर आहात. सगळ्यांचेच स्वामी आहात. तुम्हाला कोण जेवू घालू शकेल? तरी पण मी हे पदार्थ मनोभावे आपल्याला अर्पण करीत आहे.

जे ईश्वराचे आहे तेच तर त्याला समर्पित करायचे आहे. हा जीव दुसरे कांही आणखीन कुठून आणील? केवळ भावाची किंमत आहे. परमात्मा तर परिपूर्ण आहे. त्याला कांही अपेक्षा नाही. त्याला कोणत्याच वस्तूची भूक नाही. तो तर फक्त भावाचा भुकेला आहे. त्याला तुम्ही भावपूर्वक अर्पण कराल तर तो त्याच्या अनेक पटीने तुम्हाला परत करील.

भक्तिमार्गांत भावाशिवाय सिद्धि प्राप्त होणार नाही. ज्ञानमार्गात त्याग आणि वैराग्य आवश्यक आहे.

बाप मुलाला रुपाया देतो. तो केव्हा परतही मागतो. जर मुलाने रुपाया परत दिला नाही तर बापाला वाईट वाटेल कीं मीच त्याला दिला होता, तरी पण मला परत देत नाही. पण जर मुलगा रुपाया परत देईल तर बापाला आनंद वाटेल. रुपाया त्याचाच असतो तरी पण तो रुपाया मिळून त्याला संतोष होतो.

ईश्वर जीवमात्राचे पिता आहेत. त्यांनी आम्हाला जे कांही दिले आहे तेच आम्हाला त्यांना द्यायचे आहे. प्रतिज्ञा करा कीं देवाला अर्पण केल्याशिवाय कांहीच खाणार नाही.

पुष्कळ वेळा असे पाहण्यांत आले आहे कीं घरचे सगळे लोक जेवायला कोठे बाहेर जायचे असले तर देवाला फक्त दूध देतात आणि म्हणतात, देवा, आज दूधच पिऊन घ्या. आम्ही मोहनथाळ खायला बाहेर जात आहोत. पण ही काही चांगली गोष्ट नाही. घरांत कोणीही जेवणारा नसला तरी पण देवासाठी सगळा स्वयंपाक केलाच पाहिजे.

कथा ऐकून जर कांही शुभसंकल्प न केला तर श्रोत्याचे ऐकणे आणि वक्त्याचे सांगणे दोन्ही निरर्थकच होईल. कथा ऐकून ती अंतःकरणांत ठेवा.

कोणत्याही मूर्तीची स्थापना करून तिची प्रेमपूर्वक सेवा करा. चित्त-स्वरूपापेक्षा मूर्ति-स्वरूप जास्त चांगले आहे. सेवा करताना मनांत असाच भाव राहिला पाहिजे कीं हा साक्षात् परमात्माच आहे. पूजेच्या आरंभी ध्यान करा. संपत्तीप्रमाणे खर्च ही करा. सुंदर सिंहासन बनवा. ध्यानाच्या योगे भावना करा कीं भगवंत वैकुंठांतून येत आहेत आणि माझ्या घरच्या सेव्य स्वरूपांत प्रविष्ट होत आहेत. सेवा करताना कोणाही व्यक्तीशी भाषण करू नका. तिलाही नमस्कारच करा.

परमात्म्याहून कोणी श्रेष्ठही नाही आणि कोणी त्याच्या बरोबरीचाही नाही.

सेव्य अशा ईश्वराला निरंतर मनांत ठेवून असणे म्हणजेच सेवा होय. तुम्ही आपल्या शरीरावर

जसे प्रेम करता तसेच देवाच्या स्वरूपावर पण करा. देवाचे अनंत उपकार आहेत. नेहमी असाच विचार करा कीं प्रभूंनी माझे अनेक वेळा रक्षण केले आहे. मी भगवंताचा सेवक आहे, दासानुदास आहे. मी तुझाच आहे. सेवेंत दास्यभाव मुख्य आहे. दास्यभावाने हृदय लवकर नम्र होते. सेवेंत दैन्य येण्याने हृदय विरघळते. कृष्णसेवेंत जोपर्यंत हृदय विरघळत नाही तोपर्यंत सेवा सफल होत नाही. दास्यभावाशिवाय सेवा सफल होत नाही. सेवा स्नेहयुक्त आणि समर्पणभावाने करा. जोपर्यंत मूर्तीविषयीं सद्भाव जागृत होणार नाही तोपर्यंत प्रत्येक पदार्थाविषयीं सुद्धा ईश्वरभाव जागृत होणार नाही. सेवा करताना लक्षांत हेच असावे कीं हा प्रत्यक्ष ईश्वर आहे.

ज्या दिवशी तुमच्या हातून एखादे पाप झाले असेल त्या दिवशी सेवा करताना तुम्हाला प्रभु खिन्न झाल्यासारखे दिसतील. जीव पाप करतो तेव्हा त्यांना दुःख होते, कष्ट होतात. म्हणून शुद्ध राहूनच सेवा करा. जोपर्यंत मन मलीन असेल तोपर्यंत आनंद मिळणार नाही. मनाची मलीनता दूर करा.

प्रभुसेवेमध्ये भाव आणि निस्सीमता कशी असावी याविषयी नामदेव महाराजांचा एक जीवन-प्रसंग लक्षांत घेण्यासारखा आहे.

**५. 'देव भावाचा भुकेला' — बाल नामदेवांच्या दृढ भावाचा दृष्टान्तः**

नामदेवांच्या घरीं दररोज विठ्ठलनाथांची सेवापूजा केली जात असे. जेव्हां नामदेव तीन वर्षांचे बालक होते तेव्हांची ही गोष्ट आहे. त्यांच्या वडिलांना एकदा जेव्हां बाहेर जावे लागले तेव्हां सेवा-पूजेचे काम ते नामदेवावर सोपवून गेले. वडील म्हणाले, "बाळ-नाम्या! विठ्ठलनाथ आपल्या घरचे स्वामी आहेत. त्यांची सेवा केल्याशिवाय जेवण करणे पाप आहे." हे ऐकून नामदेवांनी सेवा करण्याची रीत विचारली.

वडिल म्हणालेः विठ्ठलनाथ घरांतील प्रत्येक वस्तूचे स्वामी आहेत. म्हणून त्यांच्या प्रसादाच्या रूपांतच वस्तू ग्रहण करण्यांत दोष नाही. प्रभूला अर्पण न करणें हेच पाप आहे.

वेदान्ती ब्रह्माविषयी सांगतात — जीव ब्रह्म आहे. जीव ब्रह्मरूपच कां असेना पण मानवशरीरामुळे आज तो प्रभूचा दासच झाला आहे. न जाणो प्रभू त्याला आपलासा करून कधी ब्रह्मस्वरूप करतील.

दास्यभावाने जीवन आणि मृत्यू मंगल बनतात! भागवतांत वात्सल्यभाव, मधुरभाव इत्यादींचे वर्णन आहे. परंतु ते सर्व दास्यभावमिश्रितच आहेत. दास्यभावाशिवाय ईश्वराला जीवाची दया येत नाही.

वडिल म्हणालेः बाळा, प्रातःकाळीं लवकर उठून स्नानादींनी पवित्र झाल्यावर भगवंताची प्रार्थना कर. प्रार्थना करून त्यांना जागव.

परंतु प्रथम पूजासाहित्य तयार करून घे.

वैष्णावांच्या हृदयात प्रेमभाव जागृत झाल्यावरच देवाला भूक लागते.

भगवंताचे चरण हळू हळू धू, कुठे त्यांना त्रास होऊं नये.

स्नान घातल्यावर हळू हळू त्यांचे दर्शन कर. सद्भावाने सेवा कर. मग त्यांचा शृंगार कर. त्यांना विचार, आज तुम्ही कोणता पीतांबर नेसाल?

शृंगारकर्ता भगवंताशी एकरूप होत असतो. प्रभूंनी जर दिले आहे तर मग आता त्यांच्यासाठी

खर्च करायला संकोच कां ? योग्याला जो आनंद समाधींत मिळतो, तोच आनंद भक्ताला देवाचा शृंगार करताना प्राप्त होतो. उघड्या डोळ्यांनीच समाधीसारखा आनंद मिळतो. योगी प्राणायाम, प्रत्याहार इत्यादी करीत असतात तरी त्यांचे मन पुष्कळ वेळा कांही उलटेच करून बसते.

कृष्णाला पुनःपुन्हा बोलावल्यावरच तो बोलेल. जगाला विसरून परमात्म्यांत तन्मय होण्यानेच आनंद मिळतो. शृंगार केल्यांनतर दूध आणि नैवेद्य अर्पण कर. विठ्ठलनाथ तर फार संकोची आहेत. पुनःपुन्हा विनंती केल्यावरच ते भोजन करतात. त्यांना प्रार्थना कर कीं, भलेही तुम्हाला आवश्यकता नसली तरी हा नैवेद्य अवश्य ग्रहण करा. अशी पुष्कळ वेळा जेव्हां प्रार्थना करशील तेव्हांच विठ्ठलनाथ दूध स्वीकारतील.

सेवाभक्तीत प्रेम मुख्य आहे. सेवा भावयुक्त अंतःकरणाने केली पाहिजे. हे नाथ, तुम्ही अजामीळांसारख्यांचा देखील उद्धार केला, तर मग माझा नाही का करणार ? मी अधम तर आहेच, पण अजामीळाइतका नाही. अजामीळ तर वेश्येबरोबर राहात असे. मी तसे तर काहीच केलेले नाही. तर काय तुम्ही मजवर कृपा करणार नाही ?

स्तुति केल्यानंतर भगवंताला नमस्कार कर. स्तुतीमध्ये कांही न्यूनता झाली असेल तर नमस्कार करण्याने सर्व कांही ठीक होऊन जाईल. सेवा समाप्त करताना बाळकृष्णांना साष्टांग नमस्कार घाल.

नामदेव तर भोळेभाबडे बालक होते, म्हणून तर ते पित्याचे सर्व सांगणें अक्षरशः खरेच समजले.

लहानशा मुलाला जर चांगल्या रीतीने समजावून दिले तर त्याला मूर्तीमध्ये सुध्दा भगवंत दिसतील. मोठा झाल्यावर समजवू लागाल तर तो निमित्ते, कारणे सांगत बसेल. म्हणून बाल्यावस्थेंतच भक्तीचे संस्कार दृढ केले पाहिजेत.

नामदेवांच्या मनांत ही गोष्ट अगदी ठसली कीं विठ्ठलनाथ दूध पितील आणि जेवतीलही.

भक्त बनविता येत नाही. भक्त तर जन्मापासूनच बनत असतात. नामदेव बाल्यावस्थेपासूनच भक्त होते.

ज्या दिवशी वडील बाहेर गेले त्यादिवशी विठ्ठलनाथांच्या सेवेच्या धुंदीत मस्त असलेल्या नामदेवांना झोपच आली नाही. तो बालक पहाटे चार वाजेपासूनच प्रभूच्या सेवेंत लीन झाला. त्याने प्रभूंना प्रेमाने जागविले.

बालक होऊन भगवंताची सेवा करा. लहान मुलें बव्हंशी निर्दोष असतात. निर्दोष होऊन बालभावाने सेवा करा.

नामदेवाने विठ्ठल-चरणांना धुवून त्यांना सुंदर शृंगार केला. विठ्ठलनाथ प्रसन्न दिसू लागले. नामदेव गरीब घरांतले होते. विठ्ठलांना प्रिय असलेली तुळशीची माळ त्यांच्या गळ्यांत घालून दिली.

थोडे दिले असता सुद्धा खूप मानून घेईल तो ईश्वर, आणि खूप दिले तरी सुद्धा थोडेच मानील तो जीव.

नामदेवाने विठ्ठलांना गोपीचंदनाचा टिळा लावला. शृंगार झाल्यावर विठ्ठलांना भूक लागते.

आमच्या हृदयांत जर प्रेम असेल तर भगवंताच्या मूर्तींत चेतना येते. प्रेम जडाला देखील चेतन करते, आणि प्रेमाचा अभाव चेतनेला सुद्धा जड करू शकतो.

नामदेव दूध आणून प्रभूला अर्पण करीत म्हणू लागले, "तुम्ही तर जगाचे पालनकर्ते आहांत, मी तुम्हाला काय खाऊ घालू शकेन? जे तुमचे आहे तेच तुम्हाला देत आहे."

नामदेव पुनःपुन्हा प्रभूला विनवू लागले– विनंति करू लागले. पण नामदेवाचें प्रेम पाहून विठ्ठलनाथ दूध पिण्याऐवजी नामदेवांना न्याहाळू लागले.

विठ्ठलनाथ दूध पीत नाहीत हें पाहून नामदेव म्हणाले– 'मी बाळ आहे. मी आजपर्यंत तुमची सेवा कधी केली नाही, म्हणून तुम्ही माझ्यावर रागावला तर नाही ना? तुम्ही दूध कां पीत नाही? तुम्हाला भूक लागली असेल. दूध घ्या बरं!'

कुठे दुधांत साखर तर कमी नाही ना?

ह्या विचार येऊन घरातून थोडी आणखी साखर आणून दुधांत घातली.

नामदेव म्हणालेः विठ्ठलनाथ, तुम्ही जर दूध पिणार नसाल तर मी पण दूध पिणें सोडून देईन. तुम्ही जर दूध प्यायला नाही तर मी तुमच्या पायावर आपले डोके आपटून फोडीन.

नामदेव बाळ व्याकुळ झाले होते. जर विठ्ठलनाथ दूध प्याले नाहीत तर वडील रागावतील. बाळ डोके फोडायलाच निघाला होता. इतक्यांत देवाने दुधाची वाटी उचलून घेतली. आज जडमूर्तिसुद्धा चेतन झाली. नामदेवाच्या प्रेमाने विठ्ठलनाथ प्रसन्न झाले. विठ्ठलांना दूध पिताना पाहून बालक नामदेवदेखील प्रसन्न झाले.

नामदेवांना ही आशा होती कीं विठ्ठलनाथांचा थोडाफार तरी प्रसाद मिळेलच, परंतु आज तर विठ्ठलनाथ सगळेच्या सगळेच दूध पिऊन टाकण्याची इच्छा करीत होते. हें पाहून नामदेव म्हणाले, आज तुम्हाला काय झाले आहे? तुम्ही सगळेच दूध पिऊन टाकणार का? माझ्यासाठी थोडेसुद्धा शिल्लक ठेवणार नाही का?

हे ऐकून नामदेवांना विठ्ठलांनी उचलून मांडीवर घेतले आणि मग दोघांनीही एकमेकाला दूध पाजले. या प्रकारे सेवेचा क्रम सांगितला.

प्रेम आणि सेवेशिवाय भक्ति सफल होत नाही. या प्रेमामधे इतके बळ आहे कीं निष्कामाला सकाम आणि निराकाराला साकार व्हावे लागते. ईश्वरावर प्रेम करा. ईश्वर जीवाकडून प्रेम मागत असतात. प्रेम करण्यालायक तर ईश्वरच आहे. सेवा करता करता जर ह्रदय आर्द्र होईल आणि डोळ्यांतून प्रेमाश्रुधारा निघतील तर समजा कीं सेवा खरी आहे.

ज्ञानाने वस्तूच्या स्वरूपाचें, पदार्थाचें ज्ञान होते. परंतु ज्ञानाने त्या स्वरूपांत परिवर्तन होऊ शकत नाही.

पण भक्तीमध्यें त्या वस्तूच्या स्वरूपांत देखील बदल करण्याची शक्ति असते. प्रेमांत, भक्तींत जडमूर्तीला सुद्धा चेतन बनविण्याची शक्ति असते.

बिंबाला शृंगार कराल तर प्रतिबिंबसुद्धा शोभून दिसेल. ईश्वराला घाल तर तो सुद्धा तुम्हाला अनेक पट वाढवून देईल.

द्रौपदीची लाज परमेश्वराने राखली. त्या दोघांची कुठे तरी भेट झाली. भेट झाल्यावर द्रौपदीने भगवंताचे आभार मानले. तर भगवंत म्हणाले, आभार? उपकारासारखी कांहीच गोष्ट नाही. मी तर आज तुझ्या ऋणांतून मुक्त झालो. कदाचित तू ती गोष्ट विसरली आहेस, पण माझ्या तर लक्षांत आहे. एकदा माझ्या बोटांतून रक्ताची धार वाहू लागली तर सगळ्या राण्या महालांत चिंधी शोधायला निघाल्या, त्यावेळी तू तर आपले वस्त्रच फाडून मला पट्टी बांधून दिली होतीस!

त्या पट्टींत ९९९ तंतू होते. त्याचवेळी मी विचार केला होता कीं आपल्या या बहिणीला ९९९ साड्या देईन. त्या देऊन आज मी ऋणमुक्त झालो आहे.

मनुष्य ईश्वराला जितके देतो त्याच्या अनंत पटीने ईश्वर त्याला देत असतो. परमात्मा निजलाभ परिपूर्ण आहे. म्हणून परमेश्वर त्याला समर्पित केलेली वस्तू अनेक पटीने परत करीत असतो. तो आपल्यावर कोणाचेच ऋण ठेवीत नाही. इतकेच नव्हे, तर ते ऋण तो सव्याज परत करतो.

**६. प्रल्हादास नरसिंहप्रभु संसारातून उद्धाराचा मार्ग सांगतात:**

प्रल्हाद स्तुति करतातः प्रभु! तुमच्या मांगलिक सद्‌गुणांचें वर्णन मी कसें करू? ब्रह्मादि देवांना सुद्धा तुमच्या लीलेचा पार लागू शकणार नाही. आपण शांत व्हा. जो जगासाठी कंटक होऊन बसला होता अशा माझ्या पित्याचा तुम्ही वध केला हे चांगलेच झाले.

आपल्या या भयंकर रूपाला पाहून देवांना भीती वाटत आहे; परंतु मला कांही भय वाटत नाही. मला तुमच्या उग्र रूपाचें कांही भय नाही. मला तर या संसाराचेच भय आहे.

हे दीनबंधो! मला तर फक्त या असह्य आणि उग्र संसारचक्रांत पिचून जाण्याचेच भय आहे. माझ्या कर्मपाशांनी बांधून मला या भयंकर जगामध्यें सोडून दिले गेले आहे. हे नाथ! आपण मला प्रसन्न होऊन, सर्व जीवांसाठी एकमात्र शरणयोग्य आणि मोक्षस्वरूप अशा आपल्या या चरणीं, केव्हां बोलवाल?

तुम्हीच सर्वांचे आश्रय आहात. तुम्हीच आमचे प्रिय सुहृद आहात. आपणच सर्वांचे परमाराध्य आहात. आपल्या लीलाकथेचे गायन करीत मी मोठ्या सहजतेने या संसाराच्या संकटांना पार करून जाईन.

हे भगवंता, संसारी लोक जें मिळवण्यासाठी धडपडतात तें आयुष्य, धन व वैभव स्वर्गातील लोकपालांनी मिळवल्याचें मी पाहिलें आहे. माझ्या पित्याला कोणत्या वस्तूची वाण होती? त्याच्या डोळ्याचा एक कटाक्ष सर्व कांही आणून द्यायला समर्थ होता. स्वर्गांतील अखिल संपत्ती सुद्धा त्यांना प्राप्त होती. तरी सुद्धा त्यांचा नाशच झाला. भोगोपभोगांचे असे विनाशकारी परिणाम मी पाहिले आहेत. म्हणून मी भोगोपभोग, दीर्घायुष्य, लक्ष्मी, ऐश्वर्य, इंद्रियभोग्य वस्तू किंवा ब्रह्माचें वैभव इत्यादींची इच्छा करीत नाही.

भगवंता! हा संसार तर अंधकाराने भरलेली अशी एक विहीर आहे कीं ज्यांत चावा घेण्यासाठी एक कालसर्प फिरत असतो. या विहिरींत विषयभोगांची इच्छा असलेली मनुष्यें फसलेली आहेत.

हे वैकुंठाधिपते! मी हे सगळे जाणत असता सुद्धा माझें मन आपल्या लीलांच्या कथेंत रमत नाही. माझ्या मनाची दुर्दशा झालेली आहे. ते पापवासनेने दूषित झालेले आहे आणि स्वतःही दुष्ट आहे. ते कामवासनेसाठीच आसुसलेले असते. मन इकडे तिकडे भटकत राहात असते आणि त्याला नियंत्रित करणें फार कठीण झाले आहे. ते कामातुर आहे, भयत्रस्त आहे आणि तऱ्हेतऱ्हेच्या इच्छांनी दूषित आणि दुःखी आहे. म्हणून तुमच्या कथांविषयी माझें मन उदासीन आहे. मनाच्या अशा स्थितीमुळे मी दीन झालो आहे. अशा स्थितींत मी आपल्या तत्त्वाचा विचार कसा करू?

हे नाथ! माझ्या अशा मनाला नियंत्रित करण्याची शक्ति मला द्या आणि माझे रक्षण करा.

भगवान नरसिंह म्हणाले — बेटा, बिघडलेले मन भगवंताच्या नामस्मरणाशिवाय सुधारत नाही.

प्रल्हाद, तुझें मन शुद्ध आहे म्हणून तू माझें दर्शन घेऊ शकलास.

मनाच्या दशेची कहाणी तर झाली. आता इंद्रियांची दशा पाहू.

प्रल्हाद म्हणतातः तसा तर मी पांचच वर्षांचा आहे. तरी पण माझा पांच स्त्रियांशी विवाह झालेला आहे. या पांच पत्न्या मला चैनीने बसू देत नाहीत. त्या मला नाचवतात. त्या नेहमी अतृप्तच राहतात.

भोजनाने तृप्ति होत नाही. भोगानेच जर तृप्ति झाली असती तर अनेक जन्मांपासून भोगोपभोग करीत आलेल्या जीवाचीही तशी तृप्ती झाली असती. तृप्ति भोगाने नाही, त्यागानेच होऊ शकते.

ही लुळी जीभ मला फार नाचवते. जर हिला राजी करतो तर डोळे त्रास देऊ लागतात. म्हणतात, एखादा सिनेमा तरी दाखवा.

सिनेमाने मनोरंजन मिळू शकते काय? मनोरंजन तर तेव्हांच होऊ शकते की जेव्हां मन निर्विषय होते आणि इंद्रिये आत्मरूपांत लीन होतात. खरा आनंद तर तेव्हांच मिळत असतो.

मनुष्याला हे समजतच नाही कीं खरा आंनद आणि खरें सुख कशांत आहे ते!

डोळ्यांची समजूत घालावी तर कान चैन पडू देत नाहीत. त्यांना तर रेडिओ, टी. व्ही मधून सिनेमागीत ऐकायचे असते.

जी व्यक्ति मानवजीवन सफल करण्याची इच्छा ठेवते ती शृंगारगीत केव्हांही ऐकत नाही.

स्पर्शसुख सुद्धा मला सतावते. मला हे ठाऊक असते कीं माझें शरीर हाडा-मांसाशिवाय दुसरे कांही नाही. तरी पण मी लाचार असतो. माझें शहाणपण न जाणो कुठे गायब होत असते.

या इंद्रियांनी अनेक बायका असलेल्या पतीसारखी, मेल्यासारखी दुर्दशा करून टाकली आहे.

हे अच्युता! नेहमी अतृप्त राहणारी ही जीभ मला स्वादिष्ट रसांकडे ओढीत असते, जननेन्द्रिय विषयभोगासाठी सुंदर स्त्रीकडे, त्वचा कोमल स्पर्शसुखाकडे, पोट भोजनाकडे, कान मधुर संगीताकडे, नाक मोहक सुंगधाकडे आणि चपल नेत्र सौंदर्याकडे मला आकर्षित करीत असतात. माझी दशा तर अशी कांही झालेली आहे की, जशी अनेक स्त्रिया असणाऱ्या एखाद्या पुरुषाच्या सगळ्या स्त्रिया त्याला आपापल्या शयनगृहाकडे ओढीत असताना होते तशी.

कोणी एक चोर कोणा एकाच्या घरांत चोरी करण्यासाठी शिरला. कोणा साहेबाचे घर होते ते. त्याला दोन बायका होत्या. एक बायको साहेबाचे केस धरून त्याला वरच्या बाजूस ओढत होती, तर दुसरी साहेबांचे पाय धरून खाली ओढत होती. चोराने जेव्हां हें दृश्य पाहिले तेव्हां त्याला हसू आवरता आले नाही आणि हसल्यामुळे तो पकडला गेला. त्याला राजाकडे नेण्यांत आले. चोर राजाला म्हणाला, 'मला वाटेल तो दंड द्या, पण त्या दोन बायकावाल्या साहेबासारखा दंड देऊ नका.'

ही कथा कोणा दुसऱ्या साहेबाची नसून जीवमात्राची आहे.

पांच इंद्रियांचे पाच विषय खरे पति नाहीत, परंतु पति होऊन पतीच्या तोऱ्यांत वावरतात. तसे तर पाची इंद्रियांचे पति परमात्माच आहेत. इंद्रिये परमात्म्याबरोबरच झोपतात, ती विषयांबरोबर झोपू शकत नाहीत.

तृप्ति भोगांत नाही, त्यागांत आहे. इंद्रियांचा आवेग सहन करून त्यांना नियंत्रित कराल तरच सुखी व्हाल.

भोगाने वासना वाढत असते. भोगोपभोगांनी इंद्रियांचे रक्षण नाही, क्षयच होत असतो.

भक्तिरसानेच इंद्रियें पुष्ट होऊ शकतात. विषयांचे चिंतन केल्याने शक्तीचा क्षय होतो. ईश्वरस्मरणाने शक्ति प्राप्त होते.

प्रल्हाद पुढे म्हणतात—

"प्रभु, तुम्ही म्हणता कीं संसाराचा मोह सोडून माझेच भजन करा. परंतु भजन करावे तर कसे करावे? आपण या संसारांत विषयांचे असे काही आकर्षण ठेवलें आहे कीं मोठमोठे ज्ञानी सुद्धा भरकटून जातात. संसाराचे सुख तसे तर विष आहे, पण तरीही ते अमृतासारखेच वाटत असते. संसारांतील विषय इतके आकर्षक कां करून ठेवले आहेत तुम्ही? जगांत असे सुंदर पदार्थ निर्माणच कां केले? यांनीच तर इंद्रियें आकर्षित होतात आणि म्हणून अडकून पडतात.

प्रभो! मी बालक आहे, माझ्या चुकांना क्षमा करा. परंतु मी म्हणत आहे कीं जग सुंदर केले आहे म्हणूनच तर इंद्रिये मोहग्रस्त होतात. या जगांतील विषय असे सुंदर आहेत की डोळ्यांनी पाहिले रे पाहिले की ते चंचल होऊन जातात. संसार जर असा सुंदर केला नसता तर किती चांगले झाले असते! तुम्ही इंद्रियांना वश करून ठेवायला सांगत आहात, परंतु ह्या सुंदर दृश्याला पाहून सगळे शहाणपण उडून जाते."

परमात्म्याने समजून उमजून हे जग सुंदर केले आहे की जेणेकरून त्याची लेकरे सुखी व्हावीत. परंतु मर्यादेचे उल्लंघन करून आसक्तिपूर्वक भोगोपभोग करून मनुष्य दुःखी झाला तर त्याला ईश्वर काय करील? यात ईश्वराचा काय दोष?

नरसिंह भगवान प्रल्हादाला समजवत आहेत:

जीवांना सुखी करण्यासाठीच मी सर्व पदार्थ निर्माण केले आहेत. मनुष्य जर अमर्यादपणे आसक्तिपूर्वक पदार्थांचा उपभोग घेईल आणि दुःखी होत राहील तर यात माझा काय दोष? मर्यादापूर्वक पदार्थांचा आणि विषयांचा भोग घेणारा मनुष्य सुखी होतो.

विषयांच्या उपभोगसमयी मनुष्याने हे विसरू नये कीं जगनिर्माता तो भगवंत आहे. जगाचा त्याग करून मनुष्य कुठे जाईल? तोही राहील आणि संसारही राहील. जगाला भोगदृष्टीने न पाहता जर भगवद्दृष्टीने मनुष्य पाहील तर तो सुखी होईल. तू स्वतःलाच सुधार. तू सगळ्या जगाला कसा सुधारू शकशील?

एकदा अकबराच्या मुलीच्या पायांत काटा बोचला, तर अकबराने बिरबलाला बोलावून हुकूम दिला कीं माझ्या साम्राज्याची सगळी भूमी चामड्याने आच्छादून टाक. त्यामुळे युवराज्ञीच्या पायाला पुनः कधी काटा बोचणार नाही. बिरबल डोके खाजवू लागला— चामड्याचा एवढा तुकडा कुठून आणावा की जो सर्व साम्राज्याची भूमी आच्छादित करू शकेल? राजे कांहीसे लहरी असतात. बिरबलाने विचार केला कीं सगळ्या जमिनीला चामड्याने झाकून टाकण्याऐवजी राजपुत्रीचे पायच कां न चामड्याने झाकून टाका? आणि बिरबलाने जोडे बनवून राजपुत्रींच्या पायांत घालून दिले.

जगांत काटे आहेत आणि राहतीलही, परंतु ज्याच्या पायांत जोडे आहेत त्याला काटे बोचू शकत नाहीत. विवेकाने मर्यादेंत राहून मनुष्य सुखाचा उपभोग घेईल तर तो सुखी होऊ शकतो. सुखाच्या उपभोगांत मर्यादा आणि विवेकाचा अनादर केल्यावर मनुष्याला दुःखीच व्हावें लागते.

सगळ्यांच्या सुखाकरताच जग निर्माण केले गेले आहे. परंतु मनुष्य विवेकपूर्वक याचा उपभोग घेत नाही, म्हणून दुःखी होतो.



कोणा एका गावांत पिण्याच्या पाण्याची फार टंचाई होती. अन्नदानापेक्षाही जलदान श्रेष्ठ

समजले गेले आहे. म्हणून एका शेठजीने पंधरावीस हजार रुपये खर्चून जनतेच्या हिताकरता विहीर खोदली. पाण्याचा उपयोग होऊन लोक शेठजीला आशीर्वाद देऊ लागले.

एक दिवस अचानक एक मुलगा खेळता खेळता विहिरीत पडून पाण्यांत बुडून मेला. अतिदुःखांत विवेक राहात नाही. त्या मेलेल्या मुलाचा बाप शेठजीशी भांडण करू लागला, आणि त्याला शिव्याशाप देऊ लागला कीं जर त्याने विहीर खोदली नसती तर त्याच्या मुलाचे प्राण वाचले असते. आता तुम्हीच विचार करा, शेठजींनी विहीर त्या व्यक्तीच्या मुलाला मारण्याकरता का खोदली होती? त्याने तर ती सगळ्यांच्याच फायद्याकरता खोदली होती. असे परोपकारी काम केल्यामुळे सगळे गाव त्याची प्रशंसा करीत होते, त्याचे आभारी होते. तो मुलगा मेला हे कांही चांगले झाले नाही. पण यात त्या शेठजीचा काय दोष?

हा संसारसुद्धा एक विहीरच आहे. परंतु कोणाला बुडविण्यासाठी तर ही निर्माण केलेली नाही?

प्रल्हाद म्हणाला: प्रभू! आपल्याला अपराधी कोण म्हणू शकते? परंतु या विषयांना आपण सुंदर केले हे चांगले नाही केले. म्हणून आता आपण आम्हाला हेच समजवा कीं सांसारिक विषयांमधे मन अडकणार नाही अशासाठी आम्ही काय करावे?

नरसिंह भगवान म्हणू लागले: या जगांत सुखी करण्यासाठी मी दोन अमृतें बनविली आहेत. त्यांचे दान केल्याने तुमचे मन विषयांकडे आकर्षित होणार नाही; आणि इंद्रियें तुम्हाला सतावणार सुद्धा नाहीत. ही दोन अमृतें आहेत— १) नामामृत २) कथामृत.

जेव्हां जेव्हां मनांत विषयांचा किंवा पापाचा प्रवेश होईल तेव्हां तेव्हां कथामृत आणि नामामृताचा आश्रय घ्या. जीवाला-मनुष्याला विषयांनी त्रास देऊ नये याच हेतूने मी ही दोन अमृतें बनविली आहेत. त्यांचे नित्यसेवन करा.

स्वर्गांत जें अमृत मिळते त्याच्या पिण्याने सुख तर मिळते, परंतु म्हणतात कीं त्याने पुण्याचा क्षय होतो. परंतु कथामृत त्या स्वर्गांतील अमृतापेक्षाही श्रेष्ठ आहे. ह्याच्या पिण्याने पापाचा क्षय होतो. लीलाकथा आणि भगवन्नाम अमृतें आहेत. कथामृत पापाला भस्मीभूत करून जीवन शुद्ध करीत असते.

मृत्यू सर्वांचेच भक्षण करतो. परंतु श्रीरामचंद्र मृत्युभक्षकाचेही काळ आहेत. रावणाला मारण्यासाठी रामचंद्रांना हे सगळे कां करावे लागले? रावणाची हत्या करण्यासाठी रामाला अशी लीला कां करावी लागली? राम तर काळाचेही काळ आहेत, ईश्वर तर अनंत शक्तिशाली आहे. ते तर केवळ संकल्पानेच रावणाला मारू शकले असते. परंतु रामचंद्रांनी ही सगळी लीला याकरता रचली होती कीं जनतेने रामायणाचा पाठ करावा. रामायण श्रवण करतेवेळी तरी लोक जगाला विसरतीलच. त्यांनी रावणाची हत्या करण्यासाठी जन्म घेतला होता. लीलाकथा मोक्षदायी आहे.

प्रत्येक इंद्रियाला प्रेमाने आपल्याकडे आकर्षित करून गोपींना परमानंदाचें दान देण्याकरता श्रीकृष्णाची लीला होती. ते हे इच्छित होते कीं गोपींनी आपल्या लीला ऐकाव्या, पहाव्या आणि जगाला विसरून जावे. त्यांनी मरण्यापूर्वी गोपींना परमानंदाचें दान दिले. रासलीला कामविजयाची लीला आहे. श्रीकृष्ण भगवंतांचा कामदेवावर हा विजय आहे. जगांतील सगळ्या विषयांना मन विसरेल तर मनाचा निरोध होईल आणि ते ईश्वरांत लीन होऊन जाईल. कृष्णलीलेचें प्रयोजनच याकरता आहे कीं मनुष्याने कोणत्या तरी रीतीने जगाला विसरून जावे आणि कृष्णलीलेंत तन्मय

व्हावे. गोपी याच रीतीने तर सर्व लीलांचें श्रवण-स्मरण करीत करीत प्रभूंत लीन झाल्या होत्या.

जेव्हा नामब्रह्म आणि नादब्रह्म एकत्र होतात, तेव्हां परब्रह्म प्रगट होत असते. नामामृत कांहीही करू शकते. त्याने काय अशक्य आहे?

मीराबाईने म्हटले आहे—

नामजपासाठी— रामभजनासाठी तशी कोणत्याही वस्तूची आवश्यकता सुद्धा नाही. मीराबाईने एका भजनांत म्हटले आहे— माझ्याजवळ कोणतेच साधन नाही. मी बिलकूल साधनरहित आहे. माझ्यासाठी तर तुझे एक नामच सर्वकांही आहे.

ही दोन अमृतें मी निःशुल्कच दिली आहेत. ही दोन अमृतें श्रेष्ठ आहेत. कृष्णाचें नाम स्वर्गाच्या अमृतापेक्षाही श्रेष्ठ आहे. देव स्वर्गाचे अमृत पीत असतात, तरीसुद्धा त्यांना शांति मिळत नाही. कथामृताच्या पानाने विषय शांत होऊन जातात. नामामृत आणि कथामृताचे पान करा, जेव्हां जेव्हां मनात पाप येईल आणि डोळ्यांत विकार येईल तेव्हां तेव्हां या दोन अमृतांचें पान करा. यांच्या पानाने विषय तुम्हाला त्रास देणार नाहीत. भोगी कधीच योगी होऊ शकत नाही. कलिकालांत मनुष्य भोगी आहे, म्हणून जरी तो योगी व्हायचा प्रयत्न करील तरी त्याला लवकर सफलता मिळणार नाही. म्हणून नामामृत आणि कथामृत हेच सोपे उपाय आहेत.

कथामृत आणि नामामृत प्राशनाने संसार सुखदायी आणि ब्रह्मस्वरूप वाटू लागतो.

अज्ञान्याला संसार दुःखरूप वाटतो. कारण त्याच्या दृष्टींत विकार असतो. ज्ञान्याला संसार सुखरूप असतो, कारण त्याची दृष्टी ब्रह्ममय असते.

प्रल्हाद म्हणू लागलेः प्रभु, तुम्ही दोन अमृतें केली आहेत हे तर ठीकच आहे. पण मला तर यापासून कांहीच लाभ नाही. मी हे जाणतो कीं भगवंताची कथा आणि नाम ही दोन्हीही अमृते आहेत. परंतु माझें मन या कथा-कीर्तनांत स्थिरच होत नाही.

कीर्तनाशिवाय कथा परिपूर्ण होऊ शकत नाही. कीर्तनाशिवाय कथा अपूर्ण राहते. अतिशय पाप्याला कृष्णकीर्तनाने आनंद मिळत नाही. पाप आणि अभिमान घालवण्यासाठी कीर्तनांत गेले पाहिजे. अभिमानासारखा दुसरा कोणताही शत्रू नाही.

विवाह, जेवण आणि मृत्यू यांत बदली चालू शकत नाही. तर मग भजनांत कशी चालावी? विवाह, मृत्यू आणि भोजनाप्रमाणेच भजन सुद्धा स्वतःच केले पाहिजे.

केवळ ज्ञान निरर्थक आहे. जीवनांतील आचरणांत ज्ञान जितके उतरवू शकाल तितकेच सार्थक होईल. भागवत व्यक्तीला मेल्यानंतर मुक्ती देण्याचें आश्वासन देत नाही. ते तर मृत्यूच्या आधी या जन्मांतच मुक्ति देते. इंद्रियांच्या समुदायाला शुद्ध करा. गो = इंद्रिये, कुल = समुदाय. इंद्रिये शुद्ध झाल्यावर तुमचें हृदयच गोकुळ होऊन जाईल, आणि त्यांत परमात्मा विराजमान होतील.

प्रल्हाद म्हणतातः नाथ, मी हे जाणतो कीं नामामृत आणि कथामृतपान मन शुद्ध करीत असतात आणि शुद्ध मनाला जग ब्रह्ममय दृष्टिगोचर होते. परंतु माझें मन असे विचित्र आहे की या अमृतांचा लवकर आस्वाद घेत नाही.

विचार करा, प्रल्हादांचे मन का अशुद्ध होते? नाही! ते तर आपल्यासारख्या साधारण व्यक्तींची गोष्ट करीत होते. ते आमच्या मनाविषयी सांगत होते.

सांसारिक विषयांच्या चिंतनाने आमचें मन विकृत झालेले आहे, म्हणून आम्हांला जगही विकृत दिसते. सिद्ध ज्ञान्याला जग विकृत नाही, तर ब्रह्मस्वरूप दिसत असते, कारण तो परमात्म्याचें

सतत चिंतन करीत असतो. साधकाला सुद्धा जग दिसत नाही. कारण तो साधनेंत लीन झालेला असतो.

जो ईश्वरापासून विमुख असतो त्यालाच जग विकृत दिसते (बिघडलेले दिसते). नामाचा आश्रय घेतल्यावर मन सुधारते. आमच्यासारख्या सामान्य माणसांसाठी आणखी दुसरा मार्ग नाही. संसाराचें चिंतन करीत राहिल्याने मन बिघडत असते. श्रीकृष्णाच्या स्वरूपाचें चिंतन आणि स्मरण केल्याने मन सुधारते.

जेव्हां आम्ही कथेला बसलेलो असतो तेव्हां आमची दृष्टी वारंवार घड्याळाकडे जात असते, पण जेव्हां गप्पागोष्टी करीत असतो तेव्हां हातावर घड्याळ असूनही तिकडे दृष्टी जात नाही. आणि रात्रीचा दीड सुद्धा वाजून जातो. वेळेचा नाश, सर्वस्वाचा नाश आहे. मरायच्या वेळी कोणी लक्षाधिपती जरी देवाला म्हणाला कीं, 'मी लाख दोन-लाख रुपये देतो, मला दोन दिवस आणखी द्या, तर काय देव त्याचें आयुष्य वाढवून देईल? नाही, कारण भगवंत वेळेचे दान करण्यांत फारच कृपण आहेत.

हे मन फारच दुष्ट आहे. कामातुर आहे. नेहमी कामसुखाचेंच चिंतन करीत असते. विषयोपभोगापेक्षा कामसुखाचें चिंतन जास्त वाईट आहे. मन इतके बिघडलेले असते कीं ते कथेंत स्थिर राहातच नाही. मन हर्ष, शोक आणि भयाने युक्त आहे. थोडासा लाभ जरी झाला तरी मन हर्षानें उत्फुल्ल होते आणि थोडेसे जरी नुकसान झाले तरी अश्रू ढाळू लागते.

कोठेही असें लिहिलें नाही कीं भगवंताच्या कृपेने धन मिळते. भागवताच्या आठव्या स्कंधांत तर सांगितलें आहे कीं, मी (प्रभु) ज्याच्यावर कृपा करतो त्याच्या सर्व संपत्तीचा नाश करून टाकतो. भगवत्कृपेचें फळ धन नाही. धन तर प्रारब्धाने मिळत असते. भगवंताच्या कृपेने मनाची शुद्धि होते. भगवंत ज्याच्यावर कृपा करतात, त्याला संपत्ति नाही, दारिद्र्य देतात. प्रभुकृपा झाल्यावर तरी सत्कर्म करण्याची इच्छा होईल.

जीव इतका विचित्र आहे कीं सामान्य आनंदानेही तो वेडा होऊन जातो आणि जराशा दुःखाने रडूही लागतो.

संसारांत पाप आहे अशी कल्पना केव्हांही करू नका. तुम्हाला संसाराच्या पापाचे नव्हे, आपल्या मनांत लपून राहिलेल्या पापाचें उत्तर द्यावे लागेल. तुम्ही जगाची पापें दूर करू शकणार नाही.

प्रल्हाद म्हणतात माझें मन साधू नाही. माझें मन कामातुर आहे. तुमच्या कथेंत, तुमच्या नामस्मरणांत ते स्थिर होत नाही. कृपा करून आपणच माझ्या मनाला सुधारा.

अपकाराचा बदला उपकाराने देणे साधुता आहे.

भगवत्सेवाविमुख व्यक्तीला पाहून महादुःख होते. जगांतील बहुतेक सगळे लोक जितके श्रम करून दुःखी होतात, तितके श्रम जर भगवत्सेवेकरता करतील तर ते सुखी होतील.

हे संसाराचें सुख कसे आहे? सांसारिक सुख खरूज खाजवण्यासारखे आहे. मैथुनसुख आणि इतर इंद्रियसुख सुद्धा याच कोटींतील आहे. जोपर्यंत खरूज खाजवीत आहांत तोपर्यंत शांतीचा आभास होतो. परंतु नखाच्या विषाने खरूज वाढत जाईल आणि त्रासही अधिक होईल. ही सर्व सुखे तुच्छ आणि दुःखकारक आहेत.

इंद्रियें आणि विषय यांच्या संयोगाने उत्पन्न होणारे भोग निःसंशय दुःखाला कारण होतात.

ते आदि आणि अंतयुक्त अर्थात अनित्य आहेत. म्हणून हे अर्जुना! ज्ञानी मनुष्य या सुखांत कधीच रमत नाहीत. ते अशा सुखांची इच्छाही ठेवीत नाहीत.

जेव्हां इंद्रिये प्रलोभित होऊ लागतील त्यावेळी मनुष्य जर मनाला शांत ठेवील आणि सावध राहील तर तो सुखी होईल.

प्रल्हाद प्रार्थना करू लागले: हे नाथ! मी या सर्व भानगडींनी थकून गेलो आहे.

प्रभु म्हणाले: चल, मी तुला आपल्या धामीं घेऊन जातो.

प्रल्हाद: मी एकटा तेथे येऊ शकत नाही. मी इतका स्वार्थी नाही कीं आपल्या ह्या बालमित्रांना येथेच सोडून तुमच्याबरोबर एकटाच येईन. मी एकटाच मुक्ति मिळवू इच्छित नाही.

प्रल्हाद आपल्या सहपाठी असुर बालकांचाही विचार करतात. ते सगळ्यांची मुक्ति इच्छितात.

फक्त स्वतःच्याच कल्याणासाठी वनांत साधना करणारी व्यक्ति स्वार्थी आहे. एकांतांत तप, साधना, भजन, जप करणारा फक्त आपलाच उद्धार करू शकतो. फक्त आपलाच उद्धार करणारा स्वार्थी आहे.

आपल्या संसर्गांत, संगतीने जो कोणी येईल त्याचा देखील उद्धार करणारा खरा वैष्णव होय.

आपल्या जन्मभूमीला, जगांतील इतर कोणत्याही जीवाला सन्मार्गाकडे घेऊन न जाणारा आणि एकांतांत बसून तप-ध्यान करीत राहणारा, तो ज्ञानी का असेना पण स्वार्थीच आहे.

म्हणून प्रल्हाद म्हणाले: हे प्रभु! मी स्वार्थी नाही. मी तुमच्या धामीं येईन तर आपल्या या सगळ्या मित्रांना बरोबर घेऊनच येईन.

नाथ, मी काय तुमची स्तुति करू शकेन? वेद सुद्धा आपली स्तुति चांगल्या रीतीने करू शकत नाहीत, मग मी तर बालकच आहे.

**७. अनन्यभक्ती:**

सहा साधने आहेत. १) प्रार्थना २) स्तुति ३) सेवा-पूजा ४) वंदन (पापांची आठवण करीत वंदन), ५) स्मरण (व्यावहारिक काम करीत असताना सुद्धा प्रभूचें स्मरण) आणि ६) कथाश्रवण. या सहा साधनांनी परमहंस गति मिळते. कांहीतरी साधना करा. साधनेशिवाय अनुभव होणार नाही. या साधनांचा आश्रय घेणाऱ्याला प्रभु-चरण मिळतात.

स्तुतीच्या शेवटच्या श्लोकांत प्रल्हादांनी ही सहा साधने सांगितली आहेत. जो या साधनांना कार्यान्वित करील त्याला परमात्म्याच्या चरणी अनन्यभक्ति मिळत असते.

**१) प्रार्थना**– प्रातःकाळीं जाग आल्याबरोबर भगवंताचें स्मरण करा. करदर्शन करा आणि भूमातेलाही नमस्कार करा.

सकाळी कर-दर्शन करा अर्थात हातांना पाहून विचार करा कीं या हातांनी मी आज पवित्र कामच करीन, जेणेंकरून परमात्म्याला माझ्या घरीं यायची इच्छा होईल. हात कर्म-शक्तीचे प्रतीक आहे. या हातांनी मी सत्कर्मच करीन.

कल्याणरूप होऊन त्या कल्याणकारीची पूजा करा.

प्रातःकाळीं या श्लोकाचा पाठ करा–

**कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती।**
**करमूले तु गोविन्दः प्रभाते करदर्शनम्॥**

आजकाल तर सकाळी करदर्शनाच्या ऐवजी कप-दर्शन केले जाऊ लागले आहे. जाग आल्याबरोबर लोक चहाचा कप तोंडाला लावतात आणि चहाबरोबर बिस्किटें खाल्ल्यानंतरच इतर कामाला लागतात.

प्रातःकाळीं एकदम बिछान्यांतून उठण्याऐवजी प्रथम परमेश्वराला नमस्कार करा आणि म्हणा कीं, मी तुझा आहे आणि तू माझा आहेस. माझ्या हृदयावर विराजमान होऊन माझ्या शरीर-रथाचें संचालन कर.

प्रातःकाळीं दीनतेने प्रभूची प्रार्थना करा, हे कृष्ण! तुम्ही ज्या रीतीने अर्जुनाचा रथ चालविला होता त्याचप्रमाणें माझ्या शरीररथाचें स्वामी आपणच व्हा. भरकटणाऱ्या इंद्रियांना आवरा. माझ्या इंद्रियरूपी घोड्यांना सांभाळा, माझें रक्षण करा.

जर श्रीकृष्ण तुमच्या शरीर-रथाचे सारथी होतील तर रथ निश्चित ठिकाणी पोहोचेल आणि जर तुमचे मन सारथी होईल तर रथ खड्ड्यांत पडेल.

भगवंत जीवाला म्हणतातः जर तू आपला रथ माझ्या आधीन करशील तर तुझ्या इंद्रियरूपी घोड्यांना मी नियंत्रित करीन, सांभाळीन आणि दिव्य मार्गाकडे तुला घेऊन जाईन.

ज्याप्रमाणे आपल्या रथाचे लगाम अर्जुनाने प्रभूच्या हातांत दिले होते, त्याचप्रमाणे तुम्ही आपल्या रथाचे लगाम त्यांच्या स्वाधीन कराल तर ते तुमचा रथ पार नेतील.

**२) सेवा-पूजाः** स्नानादींतून निवृत्त होऊन एकांतांत प्रभूची सेवा आणि उपासना करा.

**३) स्तुतिः** नाथ, तुम्ही जर अजामीळासारख्यांचा सुद्धा उद्धार केला तर माझ्याकडे तेवढे कां पाहात नाही?

**४) कीर्तनः** स्तुतीनंतर एकांतांत बसून प्रभूचें नाम-संकीर्तन करा. आपलें कामकाज करीत असताना देखील प्रभूचें स्मरण करीत रहा.

**५) कथाश्रवणः** प्रभूच्या आवडत्या संतांचा समागम करा. त्यांच्या श्रीमुखांतून कथाश्रवण करा. होऊ शकले तर रोज कथा ऐका. जर कथा ऐकता न आली तर रामायण-भागवतांतील कथा-वाचन करा. प्रेमाने त्यांचा पाठ करा.

**६) स्मरणः** समस्त कर्मांचें समर्पणः रात्रीं निजण्यापूर्वी केलेल्या कर्मांचा विचार करा. प्रभूला आवडतील अशी कर्में आज माझ्या हातून झाली आहेत का? जर आंतून नकारात्मक उत्तर मिळाले तर समजा कीं तो दिवस मेल्यासारखाच गेला आहे, जिवंतपणासारखा नाही. जर कांही पाप घडले असेल तर प्रायश्चित्त करा; आणि केलेल्या सर्वच कर्माचे फळ परमात्म्याला अर्पण करा.

या सहा साधनांना विधिपूर्वक केल्याने जीवन सुधारते आणि अनन्यभक्ति प्राप्त होते.

ज्याचे डोळे स्नेहपूर्ण आणि हृदय विशाल आहे तो भगवंताला फार आवडतो.

जीवाला सवयच अशी आहे कीं कोणाचा उपकार तर तो विसरून जातो, परंतु अपकार मात्र आठवणींत ठेवतो.

जीव जे जे इच्छितो ते ते सर्व कधीच होत नसते. भगवंताची जशी इच्छा असेल तसेच होत असते. ईश्वराजवळ कांहीच मागू नका. जर कांही मागाल तर तो एकप्रकारचा व्यापारच होईल.

नरसिंहप्रभूंनी प्रल्हादाला कांही वरदान मागायला सांगितले. प्रल्हाद तर निष्काम भक्त होते म्हणून त्यांनी भोगादि कांहीच मागितले नाही.

जो प्रभूची सेवा करील आणि मोबदल्यांत कांही मागेल तर, व्यापारीच झाला. भगवंताची भक्ति भावासाठी करायची आहे, भोगासाठी नाही. भोगासाठी भक्ति करणारा भक्त नसून व्यापारीच आहे. व्यापारी तो असतो जो कमी देतो आणि जास्त मिळण्याची इच्छा करतो.

आपल्यासाठी देवाला केव्हांही त्रास देऊ नका.

भगवान नरसिंह म्हणाले: भलेही तुझी कांही इच्छा नसो, पण मला राजी करण्यासाठी तर कांही माग.

प्रल्हाद: प्रभु, माझ्यावर अशी कृपा करा कीं सांसारिक कोणतेही सुख मिळविण्याचा विचार माझ्या मनांत येऊ नये. कोणत्याही प्रकारच्या इंद्रियसुखाची भोगेषणा माझ्या मनांत जागृत न होवो, असें करा.

माझ्या ह्रदयांत केव्हांही कोणत्याच कामनेचे बीज अंकुरित न व्हावें; माझ्या ह्रदयांत कोणत्याही कामनेचा अकुंर फुटू नये असें वरदान मला द्या.

प्रल्हादाने भगवंतापासून जे मागितले तेच तुम्ही मागा. प्रल्हाद 'कामस्य' नाही 'कामानाम्' म्हणाले होते. इंद्रियसुखाची इच्छाच मनांत उदित होऊं नये. असे साधे जीवन जगा कीं मनांत कोणत्याही सुखाची वासनाच न जागो. वासना वाईट आहे. वासनेनुसार विषयसुखाचा उपभोग न केल्यास मन व्यग्र तर होते, परंतु वासना तृप्त केल्यानंतर ती आणखीच भडकते.

सांसारिक सुखाचा उपभोग घेण्याची इच्छाच महादुःख आहे. ज्याला कोणत्याच सुखाची इच्छा नाही तोच खरा सुखी आहे. सांसारिक सुखाची इच्छा कधीच न व्हावी, असे समजणेच सुख आहे. सुखाची इच्छा झाल्याबरोबर मनुष्याची बुद्धिशक्ति क्षीण होऊ लागते. मनावर नेहमी भक्तीचा अंकुश ठेवा.

प्रल्हादाने वरदान तरी कसे मागितले! वासनेची जागृति तेजाचा नाश करते, तेव्हां अशी कृपा करा कीं माझ्या मनांत वासनाच जागृत होणार नाही.

गीतेंत म्हटलें आहे– सर्व काम्य कर्मांचा आणि इच्छांचा त्याग म्हणजेच संन्यास, असे महात्मा लोक म्हणतात.

जीव निष्काम झाला कीं त्याचा जीवभाव नष्ट होतो आणि मग तो भगवंताशी एकरूप होऊन जातो. जीव ईश्वररूप होऊन जातो. पुण्य सुद्धा मुक्ति मिळविण्याचें कामीं बाधक असते. विवेकाने पुण्याचा क्षय करा. माझ्या स्वरूपाचें निरंतर ध्यान करा. पाप लोखंडाची साखळी आहे, तर पुण्य सोन्याची साखळी! या दोघांनाही नष्ट करूनच तुला माझ्या धामीं यायचे आहे.

या स्तुतीचा पाठ करून माझी आणि तुझी जो आठवण ठेवील तो कर्मबंधनापासून मुक्त होईल.

प्रल्हाद: नाथ! अशी कृपा करा कीं माझ्या वडिलांनासुद्धा दुर्गति मिळूं नये.

भगवान नरसिंह: तुझ्या पित्याला सद्गति देण्याची शक्ति माझ्यांत नाही. तुझ्या सत्कर्मांच्या प्रतापानेच तुझ्या पित्याला सद्गति मिळेल. तुझ्यासारख्या पुत्रामुळे तर एकवीस पिढ्यांचा उद्धार होत असतो–मातृपक्षाच्या सात, पितृपक्षाच्या सात, आणि श्वशुरपक्षाच्या सात.

प्रल्हादा! आजपर्यंत मी कोणत्याही दैत्याला आपल्या मांडीवर बसविलें नाही. पण तुझ्यासारख्या

भक्तामुळे मी आज तुझ्या पित्याला आपल्या मांडीवर घेतले. तुझ्यासारखा भगवद्भक्त पित्याचासुद्धा उद्धार करीत असतो यांत कांही आश्चर्य नाही.

मातापिता दुराचारी असतील, परंतु जर पुत्र सदाचारी होईल तर त्यांचासुद्धा उद्धार होईल. परंतु जर मातापिता सदाचारी असतील आणि पुत्र दुराचारी होईल तर त्यांचा उद्धार होऊ शकणार नाही, त्यांची दुर्गतीच होईल.

एक हंसयुगुल आनंदाने राहात होते. हंसी फार सुंदर होती. एकदा हिंडता हिंडता संध्याकाळ झाली, तेव्हां ते एका वृक्षावर बसले. तिथे एक कावळ्याचें घरटे होते. हंसाने त्याला रात्र काढू देण्याविषयीं विनंति केली. हंसीचे सौंदर्य पाहून कावळ्याची मति भ्रष्ट झाली.

शास्त्रांत म्हटले आहे की जो आपल्या डोळ्याने पाप करतो त्याला पुढल्या जन्मी कावळा व्हावे लागते.

कावळ्याने हंस-हंसिणीला रात्रभर राहू दिले. दुसऱ्या दिवशी ते जाऊ लागले, तर कावळा हंसिणीला अडवूं लागला. हंस म्हणाला हंसिणी माझी आहे, तर कावळा तिला आपली म्हणू लागला. शेवटी दोघेही न्याय मागण्यासाठी न्यायाधीशाकडे पोचले.

न्यायाधीश म्हणाला– 'मी तर दोघांचे म्हणणे ऐकल्यानंतरच निर्णय देईन. तो कावळा मोठा चलाख होता. कावळा पितृदूत समजला जातो. म्हणून तो न्यायाधीशाच्या घरीं जाऊन म्हणू लागला, 'तुझे मातापिता कोणत्या योनींत आहेत ते मी जाणतो. म्हणून तू जर माझे काम करशील तर तुझेही काम मी करीन. तू हंसीला माझी ठरव, आणि मी तुला तुझे मातापिता कोणत्या योनीत आहेत हे सांगेन.'

न्यायाधीश कावळ्याच्या गोष्टीला भुलला. त्याने दुसऱ्या दिवशी न्याय देताना सांगितले कीं, "जो उडत उडत आधी पुढे निघून जाईल त्याचीच हंसी ठरेल." हंसापेक्षा कावळा जास्त गतीने उडतो. कावळा उडत उडत हंसाच्या पुढे निघून गेला. न्यायाधीशाने हंसी त्याच्याच हवाली करून दिली.

आता न्यायाधीशाने कावळ्याला आपल्या माता-पित्यांविषयीं विचारले. कावळ्याने त्या न्यायाधीशाला एका कचऱ्याच्या ढिगापाशी नेऊन म्हटले, 'ते दोन जंतूच तुझे माता-पिता आहेत.'

अन्यायी पुत्राच्या मातापित्यांची अशीच दुर्गति होत असते.

पित्याच्या डोक्यावर मोठी जबाबदारी असते. जर त्याने आपल्या मुलाला सुसंस्कारी केले नाही तर पुत्रच त्याचा वैरी होत असतो.

प्रल्हाद तू दुःखी होऊ नकोस. तुझ्या पित्याचा उद्धार झाला आहे; आणि त्याबरोबरच तुझ्या एकवीस पिढ्यासुद्धा पवित्र झाल्या आहेत.

शुकदेव वर्णन करतात–

राजा, आता तर तुला विश्वास वाटू लागला असेल कीं भगवंताच्या दंडांत सुद्धा करुणा असते. भगवंत ज्या दैत्यादींना मारतात त्याबरोबर त्यांचा उद्धार देखील करतात.

निष्काम भगवंतांचे कामभावनेने चिंतन करणाऱ्या गोपी कृष्णमय झाल्या, तर शिशुपाल क्रोधभावाने भगवंतांचे चिंतन करीत होता तरीही तो प्रभुमय होऊन गेला. कंससुद्धा भीतीने घाबरून प्रभूचें चिंतन करता करता प्रभुमय होऊन गेला.

भगवंताच्या ध्यानांत, गोपी कामभावानें, शिशुपाल वैर (द्वेष) भावाने, कंस भयाने तन्मय

होऊन गेले होते. अटळ वैरभाव, वैरविहीन भक्तिभाव, भय, स्नेह किंवा इतर कोणत्याही भाव-कामनेने भगवंतांत पूर्णतः मन लागले पाहिजे. भगवंताच्या दृष्टीने या भावांमधे कांही भेद नाही.

गोष्ट लहानशीच आणि ती ही आहे कीं कोणत्याही रीतीने भगवंताशी तन्मय झाले पाहिजे.

भगवंताचे द्वारपाल जय आणि विजय यांचे हे तीन अवतार झाले होते—

१) **हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपु**— हा लोभाचा अवतार होता.

२) **रावण आणि कुंभकर्ण**— हा काम आणि प्रमादाचा अवतार होता.

३) **शिशुपाल आणि दंतवक्त्र**— हा क्रोध आणि अभिमानाचा अवतार होता.

प्रल्हादाने आपल्या पित्याच्या मृतदेहाला अग्निसंस्कार केला. ब्रह्मदेवाने प्रल्हादाला राज्याभिषेक केला. प्रल्हादाने नरसिंहप्रभूंना वंदन केले. नरसिंहप्रभू प्रसन्न झाले.

### ८. धर्मराजांना नारद प्रभुदर्शन घडवितात :

नारदांनी प्रेमाने प्रल्हादाचें चरित्र कथारूपाने धर्मराजाला ऐकविलें. तरी पण नारदांनी पाहिले कीं धर्मराजाच्या मुखावर ग्लानी पसरलेली आहे. नारदांना विचार पडला कीं धर्मराज अजूनही कां उदास आहेत? माझ्या कथानिरूपणांत कांही न्यून तर राहिले नाही ना, कीं ज्यामुळे हे आनंदित झाले नाहीत?

धर्मराजाला नारदांनी विचारले, तुझ्या तोंडावर आनंद का नाही? कोणती चिंता आहे तुला?

धर्मराजः पाच वर्षांच्या प्रल्हादाचे ज्ञान, वैराग्य आणि प्रेम तर पहा! धन्य आहे प्रल्हादाची आणि त्याच्या बाळपणाची आणि त्याच्या प्रेमाची! ज्यामुळे त्याच्याकरिता प्रभु स्तंभांतून प्रगट झाले. मी पंचावन्न वर्षांचा झालो तरी एक वेळ सुद्धा प्रभूचे दर्शन करू शकलो नाही. माझें जीवन पशूप्रमाणेंच निघून गेले. पैशामागे धावलो, भूक लागली तर जेवलो, झोप आली तर निजलो, वासना जागृत झाली तर कामांध होऊन गेलो! जन्म तर मनुष्याचा मिळाला आहे, पण प्रभूच्या संतुष्टतेसाठी एकही सत्कर्म केले नाही. धिक्कार असो माझा! माझे आयुष्य कुत्र्यासारखेच निघून गेले. मी अजून देखील प्रभूमध्यें लीन होऊ शकलो नाही. प्रभुप्रेमांत वेडा झालो नाही, माझी, भगवंताची अजूनपर्यंत भेट झाली नाही, आणि त्या पांच वर्षांच्या प्रल्हादाने भगवंताची भेट घेतली! मला जगांत प्रतिष्ठा-मान मिळाला, परंतु मी भगवंताला भेटू शकलो नाही, म्हणून मी उदास आहे.

भक्तीविना आणि भगवंताच्या दर्शनाविना माझे आयुष्य व्यर्थच निघून गेले. याच कारणाने मला दुःख होत आहे. माझ्या चेहऱ्यावर ग्लानी आलेली आहे. माझे आयुष्य पशूसारखे निघून गेले. एक वेळ सुद्धा मी परमेश्वराचे दर्शन करू शकलो नाही याचे मला फार दुःख आहे. तसे तर पुष्कळ काही केले आहे, पण जे करायला पाहिजे होते तेच केले नाही. मी देवाकरता कांहीच केले नाही!

सुंदर शरीर, नवोढा पत्नी, मेरूपर्वताएवढी संपत्ति आणि विपुल कीर्ति असेल, पण मन प्रभुचरणीं लागलेले नसेल तर त्या सर्वांपासून काय लाभ? याने काय मिळाले? काय झाले? कांहीच तर मिळाले नाही! जगातील प्रतिष्ठा, धन किंवा विद्वत्ता अंतकाळी कांहीही कामाला येत नाही. जी विद्या अंतकाळी निरर्थक आणि निरुपयोगी राहील, तीपासून लाभ तो कोणता?

एकदा एका नावेत कांही विद्वान सुधारक प्रवास करीत होते. गोष्टी गोष्टीत त्यांनी नावाड्याला विचारले, 'तू कुठपर्यंत शिकला आहेस? लिहिलेवाचले आहेस?

नावाडी: कसले शिकणे? कसले लिहिणेवाचणे? बस, मला एवढी नावच काय ती चालविता येते.

विद्वान: तुला इतिहासाविषयी कांही माहिती आहे काय? इंग्लंडमध्ये किती एडवर्ड झाले आहेत?

नावाडी: मला इतिहास माहीत नाही.

पंडित: मग तर तुझे चतुर्थांश आयुष्य वायफळ गेले. तुला भूगोलाचे ज्ञान आहे का? लंडन शहराची वस्ती किती आहे?

नावाडी: मला भूगोलही येत नाही.

पंडित: अरे, आता तर तुझे अर्धे आयुष्य वाया गेले. तुला साहित्याचे ज्ञान आहे का? शेक्सपीअरची कोणती नाटके तू वाचली आहेस?

नावाडी: मी साहित्य देखील वाचलेले नाही.

पंडित: मग तर तुझें तीनचतुर्थांश आयुष्य पाण्यांतच (वाहून) गेले.

इतक्यांत नदींत वावटळ आली आणि नाव खालीवर डोलू लागली.

नावाड्याने त्या विद्वानांना विचारले— महाराज, असे वाटते की आपली नाव पाण्यांत बुडणार आहे. तुम्हा सर्वांना पोहता येते का?

सर्वच विद्वान म्हणाले: नाही. आम्हाला पोहता येत नाही.

नावाडी: हरि हरि! आपल्याला पोहणे येत नाही! मग तर तुमचे सर्वच आयुष्य आता पाण्यात वाहून जाईल.

झालेही असेच. वावटळींत नाव बुडून गेली आणि तिच्याबरोबर सर्व विद्वानही बुडला, पण नावाडी मात्र पोहत पोहत बाहेर निघून आला.

रामकृष्ण हा दृष्टान्त वारंवार सांगत असत.

संसार देखील एक समुद्र आहे. या भवसागराला येनकेन प्रकारेण पार करावेच लागेल. जी विद्या संसार पार करण्याची कला शिकवील तीच खरी विद्या होय. भवसागर तरून जाण्याला भजन हेच एकमात्र साधन आहे. ही भजनरूपी विद्या शिकण्याऐवजी केवळ सांसारिक विद्या शिकून पांडित्याचा अभिमान ठेवणारा मनुष्य या सागरांत बुडूनच जातो.

जी विद्या अंतकाळीं परमात्म्याचें दर्शन घडवून आणत नाही ती विद्याच नव्हे.

संयोगात दोषदर्शन आणि वियोगांत गुणदर्शन हाच जीवाचा स्वभाव आहे.

धर्मराजाच्या राजसभेत स्वतः द्वारकानाथ विराजत असत, तरी धर्मराजाला त्यांचे स्वरूप अज्ञात होते. श्रीकृष्ण आपले स्वरूप गुप्त ठेवीत असत.

कृष्ण भगवान म्हणतात: मी तर नवनीतचोर आहे, ज्याच्या मनाची मी चोरी करतो तोच मला ओळखू शकतो. कृष्ण गुप्तच राहू इच्छितात.

परमात्मा गुप्त राहू इच्छितो तर जीव प्रगट. ईश्वराने फुले, फळे इत्यादी न जाणो किती तरी वस्तू निर्माण केल्या आहेत पण त्या कशावरही आपले नाव लिहिलेले नाही. मनुष्य तर घर इत्यादींपासून तो अंगठीसारख्या लहानशा वस्तूवर आणि आपल्या शरीरावरसुद्धा नाव लिहीत असतो. अरे बाबा, शरीरावर सुद्धा कां नाव लिहितोस तू? ते कोण घेऊन जाईल? घरावर नाव लिहितो, 'मनोहर निवास,' पण हा मनोहर किती दिवस जगणार आहे? घरावर नावच लिहायचे

आहे तर 'रामनिवास', 'कृष्णभवन' लिही. हे सर्व काही देवाचेच आहे, तरी पण मनुष्य स्वतःच्या नामारूपांतच अडकलेला आहे.

आजकाल लोक सेवा देखील नाव कमवायच्या हेतूनेच करीत असतात, पुण्यलाभासाठी नाही. मंदिरांतही एखादी वस्तू दिली तरी त्याच्यावरही पहिले आपले नाव लिहून देतो. लक्षांत ठेवा की अतिशय प्रसिद्धी पुण्याचा क्षय करते.

कृष्ण पांडवांमध्येच राहात असत. तरी त्यांना कोणी ओळखू शकत नव्हते आणि ते ओळखले तरी कसे जाऊ शकत होते! युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञाच्या भोजनसमारंभात उष्ट्या पत्रावळी उचलण्यासारखे काम ते करीत होते.

गीतागायक श्रीकृष्णाचा हाच तर दिव्य कर्मयोग आहे. त्यांनी आपली वचने आपल्या आयुष्यांत आचरणांतही आणली.

प्रभूंनी धर्मराजाला म्हटले होते– महाराज, तुमच्या यज्ञांत थोडी सेवा करण्याची संधि मला पण द्या. मी उष्टी काढत जाईन. तो मामाचा मुलगा आहे म्हणून असे काम करीत आहे, असा समज धर्मानें करून घेतला.

ईश्वराला स्वतःला असे वाटतच नाही की तो ईश्वर आहे. जर ईश्वर असे करू लागेल तर त्याचे ईश्वरत्व नष्ट होईल.

धर्मराज हे विसरून गेले होते की स्वतः भगवानच त्यांच्याशी बोलत आहेत. म्हणून ते म्हणत आहेत की भगवंताचे दर्शनच अजूनपर्यंत झालेले नाही.

नारद धर्मराजाला म्हणतातः हे मोठमोठे मुनि तुमच्या घरीं आलेले आहेत. यांना दक्षिणेचा लोभ नाही. हे दुर्वास आणि जमदग्नि निःस्पृह आहेत.

धर्मराजाच्या घरी विशाल जनसमुदाय एकत्रित झाला होता. त्यामुळे दुर्वासांना शंका होती की कुठे अधर्माचरण न घडो आणि या शंकेमुळे ते जेवणसुद्धा करीत नसत.

द्वारकाधीश दुर्वासांना ब्रह्मविद्येचे गुरू मानतात.

एक दिवस रुक्मिणी म्हणाली– नाथ, दुर्वास आपले गुरू आहेत आणि मोठे तपस्वी पण. आपण अशा पवित्र ब्राह्मणाला जेवण का घालू नये?

कृष्णः हे दूर राहतील तितकेच चांगले. घरी येतील तर गडबड करतील.

रुक्मिणीनें खूप आग्रह केला. म्हणून कृष्ण-रुक्मिणी दुर्वासांना आमंत्रण देण्यासाठी पिंडारक तीर्थी आले. दुर्वास म्हणाले, जेवणाचे राहू द्या. माझे आशीर्वाद आहेत तुम्हाला. मी क्रोधी आहे. कुठे क्रोधाने तुम्हाला शाप देऊन बसलो तर!

परंतु कृष्ण-रुक्मिणीच्या फार आग्रहामुळे दुर्वास यायला तयार झाले. रथांत बसले. दुर्वासांनी त्यांची परीक्षा पाहायचा विचार करून कृष्णाला म्हटले, 'मी आहे ब्राह्मण आणि तुम्ही तर क्षत्रीय आहात. मग आपण एकाच आसनावर बसणे ठीक होईल का? म्हणून या बैलांना काढून तुम्ही स्वतःच जर रथ ओढाल तर मी येतो.

कृष्ण आणि रुक्मिणी रथ ओढू लागले. रुक्मिणी थकली आणि तिला तहान लागली. ती म्हणाली, 'ब्राह्मण फारच विचित्र असतात. मी ब्राह्मणांच्या घरांत राहू इच्छित नाही.' कृष्णाने समजावले, आता फार वेळ राहिला नाही. धीर धर. तर रुक्मिणी म्हणाली, मी धीर नाही धरू शकत. मी या प्रदेशांत राहू शकत नाही.

कृष्ण: नको, नको! हा प्रदेश कधीच सोडू नको. या गुजराथेत नेहमी वास्तव्य कर आणि लक्ष्मी गुजराथेत राहून गेली.

प्रभूची लीला अगाध आहे! दुर्वासांच्या हृदयांतसुद्धा श्रीकृष्ण आहेत. रुक्मिणी पाणी प्यायला जात होती. एवढ्यांत दुर्वास समाधींतून जागे झाले. दुर्वास म्हणाले, ब्राह्मणाला जेवू घालायच्या आधीच तुम्ही पाणी पीत आहांत! म्हणून माझा शाप आहे की तुम्हा दोघांचा वियोग होईल. श्रीकृष्ण म्हणाले, तुमचा शाप शिरसावंद्य आहे, पण तुम्ही माझ्या घरीं तर चला.

दुर्वासांना वाटले कीं शाप देऊन मी काही अनुचित केले आहे. म्हणून ते म्हणाले, मी बारा वर्षांनंतर येऊन तुम्हा दोघांचा विवाह लावीन.

नारद धर्मराजाला सांगू लागले– हे ऋषि तुझ्या येथे काही खाण्याकरता किंवा घेण्याकरता आलेले नाहीत. हे तर परब्रह्म परमात्म्याचे दर्शन करण्यासाठी येथे आले आहेत. चिंतन करूनसुद्धा त्यांच्या ध्यानांत परमात्म्याचे स्वरूप येऊ शकले नाही. म्हणून ते त्यांचे दर्शन घेण्यासाठी तुझ्या यज्ञांत आले आहेत. यांना तर दर्शनाचा लोभ आहे.

राजा, तू तर प्रल्हादापेक्षाही भाग्यवान आहेस. परमात्मा तुझे नातेवाईक होऊन तुझ्या येथे राहात असतात.

आमच्या येथेसुद्धा भगवान आहेत, परंतु नारदांसारख्या संताद्वारे दृष्टी मिळाल्यावरच त्यांचे दर्शन होऊ शकते.

राजा, तू भाग्यशाली आहेस की परमात्मा तुझ्या सभेंतच विराजमान आहेत.

नारदांचे म्हणणे ऐकून धर्मराज राजसभेत चोहोंकडे निरखून पाहू लागले. परंतु कुठेच त्यांना परमात्म्याचें दर्शन झाले नाही. धर्मराज परमात्म्याला ओळखूच शकले नाहीत. द्वारकानाथांना पाहात तर ते होते, पण ते तर त्यांना मामेभाऊ म्हणूनच ओळखत होते.

इकडे कृष्ण विचार करीत आहेत की, नारद आता गप्प बसतील तर चांगले; नाही तर ते मला प्रसिद्धीला आणतील. त्यांनी नारदांना सांगितले, 'नारदा! तुम्ही मला प्रगट करू नका. आपली कथाच पूर्ण करा.

नारद म्हणाले: या सभेत जगाचे जन्मदाते उपस्थित आहेत. ब्रह्मदेवाला वाटले, नारद माझे नाव घोषित करतील आणि मला प्रसिद्धी मिळेल.

ईश्वराने जीवाला आपले म्हटले की जीव ईश्वर होतो.

राजा! जगत्स्रष्टा आणि ब्रह्मदेवाचे देखील जे पिता ते बसलेले आहेत या सभेत.

धर्मराज नारदांना विचारू लागला– कुठे आहेत भगवंत? कोठे आहे परब्रह्म? मला का दिसत नाहीत? कुठे आहेत ते?

आता नारदांच्याने राहवले नाही. आज वाटल्यास भगवान नाराज होवोत, पण मला त्यांना प्रसिद्ध करावेच लागेल.

नारदांनी भगवान श्रीकृष्णांकडे संकेत करून सांगितले– "अयम् ब्रह्म!"

उपनिषदांत "इदम् ब्रह्म" च्या गोष्टी आहेत, इथे "अयम् ब्रह्म" च्या.

यांच्याच दर्शनाकरिता हे सगळे मुनि येथे आलेले आहेत.

प्रभूंनी डोके खाली करून तोंड लपविले. मी ब्रह्म नाही. नारद खोटेच सांगत आहेत.

नारद म्हणाले: 'अयम् ब्रह्म!' यांचा खोटे बोलण्याचा स्वभावच आहे. भगवंत केव्हा केव्हा

लीला करताना असत्य बोलतात. त्यांनी आपल्या बाल्यावस्थेतसुद्धा आपल्या माता यशोदेला म्हटले होते की, 'नाहं भक्षितवानम्ब'' मी माती खाल्लीच नाही. हे सगळे बालगोपाल खोटे बोलत आहेत.

आत्मानुभूति होऊनही कित्येक वेळा दृढता येत नाही. दृढता सद्गुरुकृपेने येते.

नारदांनी धर्मराजाला भगवान नारायणांचे दर्शन घडविले आणि सगळ्या गोष्टी उघड करून सांगितल्या.

**९. मिश्र वासनेचे प्रकरण; मनुष्यधर्माचे विवेचनः**

आता मिश्र वासनेच्या प्रकरणाचा आरंभ होत आहे. सातव्या स्कंधांतील ११ ते १५ अध्यायांत मिश्र वासनेच्या गोष्टी सांगितल्या आहेत.

मनुष्याची वासना मिश्र वासना आहे. प्रथम स्वतः उपभोग घेईन आणि नंतर काही शिल्लक राहिले तर दुसऱ्याला देईन, हीच मिश्रवासना आहे. संतांची वासना सद्वासना असते आणि राक्षसांची असद्वासना. दुर्जन जे म्हणतो ते आम्हाला पसंत नाही आणि वैष्णव म्हणतात तसे आमचे आचरण (जीवन) नाही.

प्रल्हादाचें चरित्र ऐकल्यानंतर धर्मराजाने नारदांना मनुष्यधर्म समजवायला विनविले.

११ ते १५ अध्यायापर्यंत धर्माची कथा आहे. जेव्हा कोणी साथ देत नाही तेव्हा धर्म साथ देत असतो. वाटल्यास धन-संपत्ति नष्ट होऊ द्यावी, पण धर्माचा नाश होऊ देऊ नये. मनुष्य पैशालाच सगळ्या सुखाचे साधन मानतो, परंतु हे चुकीचें आहे, अज्ञान आहे. सर्व सुखांचे साधन धन नसून धर्म आहे. मानवसृष्टीच्या संचालनाकरिता भगवंताने जे विधिनियम केले आहेत तोच धर्म होय.

आजकालच्या कायद्या-नियमांमध्ये पुष्कळ वेळा बदल करावा लागतो. कारण यांना बनविणारे विलासी आहेत. रामराज्यांत तर वसिष्ठांचे वचनच नियम होत असे.

प्रथम साधारण धर्माच्या तीस लक्षणांचे वर्णन आहे. साधारण धर्म अर्थात् सर्वांचा धर्म, मनुष्यमात्राचा धर्म.

नारद म्हणतातः या धर्माची गोष्ट बरीच लांब आहे. मी ही नारायणाच्या मुखातून ऐकली आहे. धर्माची तीस लक्षणे आहेत. प्रथम लक्षण आहे सत्य आणि अंतिम लक्षण आहे आत्मसमर्पण. धर्मकथेचा आरंभ सत्यापासून होतो आणि समाप्ति आत्मसमर्पणाने.

सत्य हेच ईश्वराचे स्वरूप आहे. धर्माची गति सूक्ष्म आहे. असत्यासारखे दुसरे पाप नाही.

सत्य ते साधन आहे की ज्याच्यायोगे मनुष्य सत्यनारायणांत लीन होतो.

हरिश्चंद्राने पत्नीचा विक्रय करून देखील सत्याचे पालन केले.

सत्यावर अढळ श्रद्धा ठेवा. यथार्थाचे नाव सत्य आहे. महाभारताप्रमाणे ज्यामुळे सगळ्यांचेच कल्याण होऊ शकेल असे विवेकपूर्ण वचनच सत्य आहे. सर्वांचे कल्याण होईल असे विवेकाने भरलेले वचन बोला.

श्रीकृष्णाची असत्य वचनेदेखील सत्य आहेत, कारण ती बहुजनहिताय आहेत.

महाभारताच्या युद्धांत द्रोणाचार्यांच्या प्रसंगी श्रीकृष्णाला असत्य बोलावे लागले होते. द्रोणाचार्य भीषण युद्ध करीत होते. त्यांच्या हातात जोपर्यंत शस्त्र होते तोपर्यंत त्यांना मारणे अशक्य होते.

काय करावे? अश्वत्थामा नावाच्या हत्तीला मारून द्रोणाचार्यांना सांगितले गेले की त्यांचा मुलगा अश्वत्थामा मेला. द्रोणाचार्यांनी हे खोटे मानले. त्यांना विचार आला की श्रीकृष्णासारखे सुद्धा खोटे बोलू शकतील पण धर्मराज कधीच खोटे बोलत नाहीत. मी त्यालाच विचारतो. ते युधिष्ठिराजवळ जाऊन म्हणाले– जर माझा मुलगाच मेला असेल तर मला शस्त्रत्याग करावा लागेल. खरोखरच माझा मुलगा मेला आहे काय?

श्रीकृष्णांनी युधिष्ठिराला सांगितले होते की, म्हण 'अश्वत्थामा हतः' 'सत्यं वद' चा नियम मीच सांगितला आहे, तेव्हा त्यांत बदल करायचा अधिकार मला आहे. सत्य तेच की जे विवेकाने बोलले असता सर्वांचेच कल्याण होते. द्रोणाचार्यांच्या शस्त्रत्यागाने कौरवांचा पराजय होईल आणि पांडवांना राज्य मिळेल. दुर्योधनाच्या हत्येने पाप अधिक होणार नाही. उलट त्याने दुर्योधनाचे स्वतःचे कल्याणच होईल.

कोणी विचारतील, सगळ्यांचे कल्याण होईल, पण द्रोणाचार्यांना कोणता लाभ होईल?

द्रोणाचार्य वेदसंपन्न ब्राह्मण आहेत. ब्राह्मणाला युद्ध करण्याचा अधिकार नाही. जर त्याला कधी युद्ध करावेच लागले तर त्याने ते धर्माचे रक्षण करण्याकरताच केले पाहिजे. ब्राह्मण असूनसुद्धा द्रोणाचार्य युद्ध करीत आहेत. तेव्हा त्यांच्या शस्त्रत्यागाने त्यांचेही कल्याणच होणार होते.

मी द्रोणाचार्यांना नरसंहाराच्या पापापासून परावृत्त करू इच्छितो. म्हणून ही माझी आज्ञा आहे.

धर्मराजाने द्रोणाचार्यांना सांगितले– 'अश्वत्थामा हतः' परंतु ओठ दाबून पुढे म्हणाले, 'नरो वा कुंजरो वा!'

धर्मराजाचे शब्द ऐकून द्रोणाचार्यांनी शस्त्रांचा त्याग केला. श्रीकृष्णांनी धृष्टद्युम्नाला आज्ञा केली की द्रोणाचार्यांचे डोके उडवून टाक. त्यांचा मृत्यू झाला आणि सर्वांचे कल्याण झाले.

दयाभाव धर्माचें दुसरे लक्षण आहे. जितके होईल तितके दुसऱ्याचे भले करा. दररोज विचार करा की आज मी कोणाचे काही काम केले आहे काय? आज मी देवाला आवडेल असे काही काम केले आहे का?

ज्या साधकाला ह्याच जन्मी ईश्वराचा साक्षात्कार करून घ्यायचा आहे त्याने समजून उमजून विवेकपूर्वक दया केली पाहिजे. केव्हा केव्हा दयाभाव भजनांत विक्षेप करतो.

तिसरा गुण आहे पावित्र्य. पावित्र्य सगळ्यांचाच धर्म आहे. आजकाल लोक शरीराला खूप शुद्ध करीत असतात, पण मन शुद्ध ठेवीत नाहीत. मनशुद्धि व चित्तशुद्धि आवश्यक आहेत, मन मृत्यूनंतरसुद्धा बरोबर जाईल. मनाखेरीज आणखी काहीच बरोबर जाणार नाही, म्हणून मनाला पवित्र ठेवणे आवश्यक आहे.

शरीरापेक्षा तर मनानेच पाप जास्त होते. जो मनाने पाप करतो त्याचे मन ईश्वराच्या ध्यानात स्थिर होऊ शकत नाही. व्यवहाराशी आत्मा इतका मिळून गेलेला असतो की मनाने केलेल्या पापाचे त्याला ज्ञानसुद्धा नसते.

चौथा धर्म आहे तपश्चर्या. विचार, वाणी आणि वर्तन शुद्ध ठेवणे म्हणजेच तपश्चर्या आहे.

पांचवा धर्म आहे तितिक्षा. भगवत्कृपेने जे काही दुःख होईल ते सहन करावे. शत्रूविषयीसुद्धा सद्भाव ठेवा, तेव्हांच देव तुमच्या पक्षाला राहील आणि तुमच्या शत्रूंना दंड देईल.

एक महात्मा जप करीत जात होते. रस्त्यांत कोणा धोब्याने कपडे वाळवण्यासाठी पसरून

ठेवले होते. त्यांच्यावर महात्म्याचा पाय पडला. धोब्याने हे पाहिले, तर तो त्या महात्म्याला काठीने मारू लागला. भगवंतांनी विचार केला की तो महात्मा तर माझेच नाम जपत होता, म्हणून मी जर त्याचे रक्षण केले नाही तर माझी प्रतिष्ठा कशी राहील? महात्म्याचे रक्षण करण्यासाठी ते वैकुंठातून धरणीवर उतरून आले. इकडे महात्म्याची सहनशीलता कसास लागली. त्याला वाटले की मी धोब्यापेक्षा अधिक सशक्त आहे. त्याने धोब्याला मारण्यासाठी काठी उचलली. प्रभूंनी हे पाहिले आणि ते परतून गेले.

भगवंत ताबडतोब परत आलेले पाहून लक्ष्मीने कारण विचारले. भगवंत म्हणाले, आता तेथे महात्मा नाही, दोन धोबी भांडत आहेत. महात्म्याने सहनशीलता सोडून त्या धोब्यासारखेच आचरण केले आहे. आता मला तेथे करायचेच काय होते?

मनुष्याला अपमानामुळे तेव्हाच दुःख होते जेव्हा तो अभिमानी असतो. जीव दीन होऊन ईश्वराच्या चरणांचा आश्रय घेईल तर त्याच्यावर अपमानाचा काही परिणाम व्हायचा नाही.

सहनशक्ति म्हणजेच तितिक्षा.

सहावा धर्म आहे अहिंसा. मन, वाचा आणि कायेने कोणाला दुःखी न करणे म्हणजेच अहिंसा. तोच संत असतो की ज्याच्या संगतीत येणाऱ्याचा स्वभाव बदलून तो सुधारतो. ऋषींच्या आश्रमांत हिंस्र पशू देखील शांत होऊन जात असत.

सातवा धर्म आहे ब्रह्मचर्य. शारीरिक ब्रह्मचर्यपालन तर अनेक लोक करतात. परंतु डोळे आणि मनाने ब्रह्मचर्याचे पालन करणारे फार कमी असतात. कोणत्याही स्त्री किंवा पुरुषाचे चिंतन करणे देखील ब्रह्मचर्याचा भंगच होय. कामभावाच्या गीतांच्या श्रवणानेसुद्धा ब्रह्मचर्य भंग होते. ब्रह्मचर्य तर मनाला स्थिर करण्याचे साधन आहे.

आठवा आहे त्याग. कशाचाही त्याग करणे धर्म होय.

नववा स्वाध्याय आहे. सद्ग्रंथांचे चिंतन, मनन म्हणजेच स्वाध्याय. हा प्रत्येकाचाच धर्म आहे.

दहावा आर्जवम्. स्वभाव सरळ ठेवणेसुद्धा सगळ्यांचा धर्म आहे.

अकरावा संतोष. ईश्वराने जे आणि जितके दिले आहे त्यांतच संतुष्ट राहणारी व्यक्ति श्रीमंत आहे आणि असंतुष्ट राहणारा दरिद्री!

एका भिकाऱ्याला रस्त्यात एक रत्नखचित अंगठी मिळाली. त्याने विचार केला की माझ्यापेक्षासुद्धा जो गरीब असेल त्याला ही अंगठी देईन. चालता चालता त्याने पाहिले की, एका जागी पाच बंगल्यांचा एक मालक (शेठ) सहावा बंगला बांधत आहे; आणि मजूरीच्या पैशाविषयी झगडा करीत आहे. काम पुरते घेतो आहे पण पैसे पुरते देत नाही. त्या भिकाऱ्याने ती अंगठी त्या शेठजीला दिली. तर शेठ म्हणाला, माझ्याजवळ मुबलक आहे, मी काही भिकारी नाही! ही अंगठी मला कशाला देत आहेस?

तर तो भिकारी म्हणाला— जर तुमच्याजवळ पुष्कळ आहे तर मग या मजुरांशी झगडा का करीत आहात? लोभ का करीत आहांत? तुम्ही संतोषी नाही म्हणून भिकारीच आहात!

तुम्हीच विचार करा, खरा भिकारी कोण होता आणि खरा शेठ कोण होता?

बारावा समदृष्टी. सर्वांमध्ये, सर्वांविषयी समदृष्टि ठेवणे सगळ्यांचाच धर्म आहे. काही कारणामुळे व्यावहारिक विषमता वाटल्यास करावी लागो, परंतु मानसिक विषमता केव्हाच नसावी.

तेरावा धर्म मौन आहे. विनाकारण, व्यर्थ काही न बोलणे हे मौन होय आणि हा देखील सर्वांचाच धर्म आहे. मौन मनानेसुद्धा झाले पाहिजे. मौनाने मनाला शांति मिळते आणि मानसिक पापांचा नाश होतो. वाणीवर बुद्धिपूर्वक अंकुश ठेवा.

चौदावा धर्म आत्मचिंतन. दररोज विचार करीत असा कीं, मी कोण आहे? मी शरीर नाही. मी परमात्म्याचा अंश आहे. जन्मापूर्वी कोणी नातेवाईक नव्हता आणि मृत्यूनंतरही कोणी नातेवाईक राहणार नाही. या दोन्हींच्या मध्यावधींतच नातेवाईक असतात. हे कोण आहेत, कोठून येतात, ही सर्व भगवंताचीच माया आहे. आत्मस्वरूपाला बरोबर जाणणाराच आनंद मिळवू शकतो. हे जगत् नाही असा अनुभव तर मनुष्य करू शकतो, परंतु स्वतःचें अनास्तित्व मानू शकत नाही. तो परमात्म्याचा अंश आहे, त्याला शरीरापासून वेगळे व्हायचे आहे.

दृश्यांतून दृष्टी काढून घेऊन सगळ्यांचाच साक्षीस्वरूप अशा द्रष्ट्यांत मन स्थिर कराल तर खरा आनंद मिळेल.

आत्मा-अनात्म्याचा विवेक देखील सगळ्यांचा धर्म आहे. जगत् अपूर्ण आहे, आत्मा परिपूर्ण आहे. मनुष्य जोपर्यंत आपल्या स्वरूपाला स्वतः पाहात नाही. तोपर्यंत त्याला आनंद मिळत नाही.

वेदांची वाणी अतिगूढ आहे.

एका धनिकाने आपल्या वहींत लिहिलें होते कीं, गंगायमुनेच्या मधोमध मी लाख रुपये पुरून ठेवले आहेत. जेव्हा त्याची मुले दरिद्री झाली तेव्हां त्यांनी जुनी वही वाचता वाचता ही गोष्ट सुद्धा पाहिली. परंतु ते याचा अर्थ समजू शकले नाहीत. एकदा त्यांच्या वडिलांचे जुने मुनीम भेटायला आले तेव्हा त्यांना त्या वहीतील गोष्टीचा अर्थ मुलांनी विचारला. तर त्याने सांगितलें, "तुमच्या दोन गाई आहेत, यमुना आणि गंगा. ह्या ज्या ठिकाणी बांधल्या जातात त्याच ठिकाणीं हे रुपये गाडून ठेवले आहेत.

या दृष्टान्ताचा आध्यात्मिक अर्थ आपल्याला पाहायचा आहे. गंगा आणि यमुना आहेत आमच्या इडा आणि पिंगला नाड्या. या दोहोंच्या मधे असते सुषुम्ना नाडी. जोपर्यंत एखाद्या सद्गुरूंकडून ही सुषुम्ना नाडी जागृत होत नाही तोपर्यंत ब्रह्माचे दर्शन होत नाही.

ज्ञानी लोक ललाटामधे तेजोमय ब्रह्माचे दर्शन करतात, तर वैष्णवजन हृदयसिंहासनावर चतुर्भुज नारायणाचे दर्शन करतात.

साधु होणे कठीण नाही, पण सरळ होणे मात्र कठीण आहे.

पंचमहाभूतांमध्ये ईश्वराला पाहणे, ईश्वराची भावना करणे हाही सर्वांचाच धर्म आहे.

कृष्णकथा ऐकणेही सर्वांचा धर्म आहे. कृष्णकीर्तन, स्मरण, सेवा, पूजा, नमस्कार आणि त्यांच्याप्रति दास्य, सख्य आणि आत्मसमर्पण हे सुद्धा सर्वांकरिता धर्म म्हणून सांगितलेले आहेत.

मी परमात्मा आहे असे सतत चिंतन केल्याने परमात्मा जीवाला आपलेसे करून घेतो. नेहमी हे लक्षात ठेवा की भगवंत एक क्षणसुद्धा आपल्यापासून दूर राहात नाही. जो ईश्वराला आपल्याबरोबर ठेवतो तो निर्भय होतो. परमात्म्याला आत्मसमर्पण करणे, सगळ्यांचाच धर्म आहे.

याच्यापुढे विशिष्ट धर्माचे वर्णन आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चारी वर्ण ईश्वराच्या अंगापासून उत्पन्न झाले आहेत. हे सर्व एका ईश्वराच्या स्वरूपांत आहेत, अशी भावना ठेवा. चार वर्ण आणि चार आश्रमांचें वर्णन आहे.

ब्रह्ममयी दृष्टि आणि अद्वैतनिष्ठा सिद्ध झाल्यावर त्या व्यक्तिने भेदभावाचें पालन केले नाही

तरी काही हरकत नाही. शास्त्रांत कोठेच हरिजनांची निंदा केलेली नाही.

सगळ्यांनीच आपापल्या धर्माचे अर्थात् कर्तव्याचें पूर्णतः पालन केले पाहिजे. अध्ययन, अध्यापन, दान करणे, दान घेणे, यज्ञ करणे आणि करविणे हा ब्राह्मणांचा धर्म आहे. क्षत्रियांनी प्रजेचे रक्षण करायचे आहे. वैश्यांचा धर्म आहे गोपालन, कृषि आणि व्यापार. शूद्रांचे कर्तव्य समाजाच्या सर्वच वर्गाची सेवा करणे हा आहे.

यानंतर स्त्रियांच्या धर्माचे वर्णन केले गेले आहे. स्त्रीने आपल्या पतीविषयीं ईश्वरभाव ठेवावा. तिला तेव्हाच मुक्ति पण लवकर मिळेल. स्त्रीचे हृदय ऊर्मिप्रधान आणि आर्द्र असते. ते कृष्णप्रेमांत लवकर द्रवित होते. सती अनसूयेप्रमाणे स्त्री-पातिव्रत्याचे पालन करून ब्रह्मा, विष्णू आणि महेशांसारख्या देवांना बालकरूपात मिळवू शकते.

यानंतर आश्रमधर्माविषयीं सांगितले आहे. आश्रम चार आहेत. मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षांचे सांगितले गेले आहे. आजकालच्या मानानें पाहिले तर मनुष्याला २३ वर्षेपर्यंत ब्रह्मचर्यपालन करून २४ ते ४० वर्षेपर्यंत गृहस्थाश्रमी आणि ४१ ते ५० पर्यंत वानप्रस्थी राहून ५१ वर्षानंतर संन्यास आश्रमात प्रवेश केला पाहिजे.

ब्रह्मचर्याश्रम वृद्धि आहे तर गृहस्थाश्रम क्षय. वानप्रस्थांत संयम वाढवून पुनः शक्ति वाढवायची आहे. शक्तीचा गुणाकार करायचा आहे. संन्यासाश्रम भागाकार आहे. नैष्ठिक ब्रह्मचारी नेहमीच ब्रह्मचर्याचें पालन करतो.

महाप्रभूंनी गृहस्थाश्रमांत प्रवेश करूनच संन्यास घेतला होता.

वर्णाश्रमाची रचना क्रमशः हळूहळू जीवाला ईश्वराच्या निकट घेऊन जाण्याचा सोपान आहे.

ब्रह्मचाऱ्याने सदा मिताहारी राहावे. जास्त जेवणारा ब्रह्मचर्याचे पालन करू शकत नाही. त्याचा आहार फार सात्त्विक असला पाहिजे. त्याने इंद्रियांवर मुळीच विश्वास ठेवू नये. मोठमोठे ऋषी देखील फसले आहेत; तर मग साधारण माणसांची गोष्टच काय! भागवतातसुद्धा सांगितले आहे की जो ब्रह्मचर्याचे पालन करू इच्छितो त्याला स्त्रीसहवास सोडावा लागेल.

कामांध व्यक्ति अविवेकी होते. म्हणून सावध राहण्याची आवश्यकता आहे. ज्ञानीसुद्धा केव्हा केव्हा मोहित होतो. त्याचे शहाणपण स्थायी राहात नाही. कामाच्या मुळाशी संकल्प आहे. लौकिक इच्छेने काम वाढत असतो आणि अलौकिक कामनेने काम कमी होत असतो. कामापासून क्रोध उत्पन्न होतो. काम एकांतात त्रास देतो. एकांतात भजन करा. जगांतील सर्व अनर्थ कामामुळेच होतात. काम मेला तर समजा की कृष्ण दूर नाहीत. जगाकडे पाहण्याची दृष्टी बदलली तर कामाचा सुद्धा नाश होईल.

संन्यास घेण्याच्या अगोदर गृहस्थाने वानप्रस्थधर्माचें पालन करावे आणि पवित्र ग्रंथांचे अवलोकन करावे. वैराग्य दृढ झाल्यावर मग संन्यास घेतला पाहिजे.

देवासाठी सर्व सुखांचा न्यास– त्याग म्हणजेच संन्यास.

प्रल्हाद आणि दत्तात्रेयांचा एक प्रसंग आहे. दत्तात्रेयांना प्रल्हादाने विचारले– 'तुम्ही काही चैनीत, सुखात तर राहात नाही, तरी पण इतके धष्टपुष्ट कसे झाले आहांत?

दत्तात्रेयांनी उत्तर दिलेः जगाच्या कोणत्याही जड पदार्थात आनंद नाही. सुखाची इच्छा हेच दुःख आहे. माझ्यात समाहित असलेल्या आत्मानंदाचाच मी उपभोग करीत असतो. मी आपला आनंद आपल्या आत्मस्वरूपातूनच प्राप्त करून घेत असतो. प्रारब्धाला भोगून पूर्ण करीत आहे.

माझी आत्मनिष्ठा दृढ आहे. माझे दोन गुरु आहेत.

माझा पहिला गुरु आहे मधुमक्षिका. मधमाशीसारखे लोकसुद्धा खूप कष्ट करून पैसा एकत्रित करतात, पण मधमाशीच्या मधासारखा त्या पैशाचा उपभोग तर दुसरेच कोणी करतात.

माझा दुसरा गुरु आहे अजगर. त्याच्याचसारखा मी निश्चेष्ट पडलेला असतो, आणि प्रारब्धाने जे काही मिळेल त्यातच संतुष्ट राहतो.

या दोन गुरूंपासून मी वैराग्य आणि संतोष हे धर्म मिळविले आहेत. एकाच जागी बसून सतत ब्रह्मचिंतन करतो. ज्या व्यवहारांनी मनाला विक्षेप येईल अशांपासून मी दूर राहतो; आणि ॐ काराचा सतत जप करीत असतो.

**१०. गृहस्थाश्रमींनी कसे राहावे :**

आता येत आहे गृहस्थाश्रमाचे वर्णन. पती-पत्नींनी सावध राहून पवित्र जीवन जगले तर संन्यासाश्रमासारखाच आनंद गृहस्थाश्रमातही मिळू शकतो. पवित्र जीवन जगणारे दाम्पत्य साधुसंतांची सेवा करून परमेश्वराला पुत्ररूपाने मिळवून आपल्या मांडीवर त्याचे लालनपालन करतात, तर संन्यासी केवळ ब्रह्मचिंतनांतच लीन राहतात.

गृहस्थाश्रमांत हे ध्यानांत ठेवले पाहिजे की पत्नी कामभोगाचे नाही, तर धर्माचें साधन आहे. पत्नी तर गृहस्थाश्रमातील साहाय्यक आहे. पत्नीसंग सत्संग झाला तरच गृहस्थाश्रम दिव्य होतो. गृहस्थाला धर्मच धारण करीत असतो. संन्यासीच गृहस्थाश्रमाच्या अंगणात येतो, म्हणून गृहस्थाश्रम श्रेष्ठ आहे.

पति आणि पत्नी दोघेही सुपात्र असतील तर धर्मपालन होऊ शकते. गृहस्थाश्रम सर्वश्रेष्ठ आहे. गृहस्थाने अतिसावध राहिले पाहिजे. कुठे पापाचार न होवो. त्याने आतून अनासक्त राहून बाह्यतः सर्वांवर प्रेम ठेवले पाहिजे.

जे पात्रांत (ताटात) आहे ते सर्वच काही आपले नाही, परंतु जितके पोटांत मावू शकेल तेच आपले आहे आणि पोटांत जितके गेले आहे त्यांतील जे पचू शकेल तेच आपले आहे.

गृहस्थाश्रमीने फार कठोरही राहू नये अन् फार सरळही असू नये. स्त्रीवर अधिक ममता ठेवू नये. स्त्रीच्या आधीन राहणे अयोग्य आहे. जो आवश्यकतेपेक्षा जास्त स्त्रीच्या आधीन राहतो त्याचें दर्शन घेणे देखील पाप आहे.

एक राजा होता. तो पशू-पक्ष्यांची भाषा जाणत होता. एकदा राजा-राणी जेवत होते, तर एका मुंगीने अन्नाचा एक कण राणीच्या ताटांतून उचलून राजाच्या ताटांत नेऊन ठेवला. हे पाहून दुसरी मुंगी त्या मुंगीला म्हणाली– 'हा अधर्म आहे. स्त्रीचे उच्छिष्ट अन्न पुरुषाला खाऊ घालणे अविवेक आहे.

या मुंग्यांचे बोलणे ऐकून राजाला हसू आले. राणीने हसण्याचे कारण विचारले, तर राजा म्हणाला– कारण विचारू नकोस कारण समजले तर अनर्थ ओढवेल.

ज्या महात्म्याने राजाला पशुपक्ष्यांची भाषा समजण्याची विद्या शिकविली होती. त्याने सांगितले होते की मी ही विद्या तुला शिकविली आहे, परंतु तू जर याविषयीं कोणाजवळ बोलशील किंवा कोणाला शिकवशील तर तुझा मृत्यू होईल.

राजाने पत्नीला पुष्कळ समजावले पण स्त्री-हट्ट होता तो! ती म्हणू लागली, भलेही तुमचा

मृत्यू होवो, पण मी ते कारण जाणू इच्छिते. राजा भोळा आणि पत्नीच्या आधीन होता. तो म्हणाला, आपण दोघेही काशीला जाऊ. मी तिथेच तुला सर्व हकीगत सांगेन. राजानें विचार केला की मरायचेच आहे तर काशींत मरून मुक्ति कां न मिळवावी ?

ती दोघेही काशीला जायला निघाली. रस्त्यांत एक बकरा-बकरीचे जोडपे दिसले. बकरी बकऱ्याला म्हणत होती की विहिरीजवळ जाऊन माझ्यासाठी हिरवे हिरवे गवत घेऊन ये, नाही तर मी बुडून मरेन. बकऱ्याने समजावले की माझा पाय घसरला तर मी बुडून मरेन. बकरी म्हणाली, काही का होईना, मला तर हिरवे गवत आणूनच द्या.

तर बकऱ्याने सूर बदलून म्हटले, "मी काही त्या राजासारखा मूर्ख नाही की पत्नीसाठी विनाकारणच आपला जीव देईन."

राजाने बकऱ्याचे हे बोलणे ऐकले अन् विचारांत पडला, 'मी किती मूर्ख आहे की प्रभुभजनासाठी जे शरीर मिळाले आहे त्याचा, मूर्खासारखा ह्या स्त्रीचा हट्ट पुरा करण्यासाठी नाश करायला तयार झालो आहे! धिक्कार असो माझा! माझ्यापेक्षा तर बकराच चांगला!" त्याने राणीला दृढतेने सांगितले, "मी तुला काहीच सांगू इच्छित नाही. तू वाटेल ते कर." राणीला आपला हट्ट सोडावा लागला.

हृदयांतून राम निघून गेला की मनुष्य कामांध होत असतो.

गृहस्थाश्रमीने दान करावे अशी आज्ञा आहे. वर्षांतून एक महिना गंगाकिनाऱ्यावर राहावे अशीही आज्ञा आहे. एकांतवासांत नारायणाची आराधना करावी. वर्षातून एक महिना देवाधर्मासाठी विशेष राखून ठेवावा.

घरात चांगल्या रीतीने भक्ति होत नाही, म्हणून तीर्थस्थानी जाऊन भक्ति करावी. तीर्थस्थानी जाऊन घरातील आणि इतर लौकिक गोष्टी लक्षांत आणू नका. तिथे फक्त भक्तीच केली पाहिजे. भक्ति करण्यासाठी स्थानाची शुद्धीही आवश्यक आहे. स्थानाच्या वातावरणाचा मनावर फार परिणाम होत असतो.

मार्कंडेयपुराणात एक कथा आहे.

राम-लक्ष्मण वनांत प्रवास करीत होते. वाटेत एका ठिकाणी लक्ष्मणाचें मन वाईट विचाराने भरले– मति भ्रष्ट झाली. त्याला विचार येऊ लागले. "कैकेयीने वनवास तर रामाला दिला आहे, मला नाही. मी रामाच्या सेवेचा त्रास का घ्यावा?"

रामाने लक्ष्मणास म्हटले, "या जागेची माती चांगली दिसते आहे. थोडी बरोबर बांधून घे." लक्ष्मणाने एक गाठोडी बांधून घेतली. वाटेत जोपर्यंत ही गाठोडी हातांत घेऊन तो चालत असे तोपर्यंत त्याच्या मनांत तोच विपरीत विचार राहत असे; परंतु ती गाठोडी खाली ठेवल्याबरोबरच तो निघून जात असे आणि त्याचे मन राम-सीतेविषयीं मायेने आणि भक्तीने भरून येत असे. लक्ष्मण या गोष्टीने आश्चर्यचकित झाला. त्याने रामाला कारण विचारले.

श्रीरामाने कारण सांगताना म्हटले, 'लक्ष्मणा, तुझ्या मनाच्या या बदलाकरता तू दोषी नाहीस. त्या मातीचाच तो प्रभाव आहे. ज्या भूमीवर जसे कर्म केले गेले असेल त्याचे चांगले-वाईट परमाणू त्या भूमिभागावर आणि वातावरणात फिरतात. ज्या ठिकाणची ही माती आहे तिथे सुंद आणि उपसुंद नावाचे दोन राक्षस राहात असत. त्यांनी कडक तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला प्रसन्न करून अमरतेचा वर मागितला. ब्रह्मदेवाला त्यांचे ते मागणे देण्याची इच्छा झाली, पण काही

नियंत्रणासहित. त्या दोन भावांत परस्परांत फार प्रेम होते, म्हणून त्यांनी मागितले की आमचा मृत्यू केवळ आमच्या आपसांतील कलहामुळेच व्हावा. ब्रह्मदेवाने त्याप्रमाणें वर दिला.

आपल्या अमरतेच्या घमेंडींत त्यांनी देवांना त्रास द्यायला सुरुवात केली. देवांनी ब्रह्मदेवाचा आश्रय घेतला. तर ब्रह्मदेवाने तिलोत्तमा नावाची अप्सरा निर्माण केली आणि तिला त्या असुरांपाशी जाण्याची आज्ञा केली. सुंद-उपसुंदांनी या सौंदर्यवती अप्सरेला पाहिले आणि दोघेही मोहांध होऊन गेले. सुंद म्हणाला, "ही माझी आहे." तर उपसुंद म्हणाला, "जरा विचार करून बोल, ती तुझी वहिनी अर्थात् माझी बायको आहे." दोघेही भांडू लागले. तिलोत्तमा म्हणाली, मी तर जो विजयी होईल त्याच्याशीच लग्न करीन. तेव्हा त्या दोघाही भावांनी विजयी व्हावे म्हणून घनघोर युद्ध केले आणि दोघेही मेले.

ते दोन असुर ज्या स्थानी मरून पडले होते, तेथलीच ही माती आहे. म्हणून या मातीत सुद्धा द्वेष, तिरस्कार आणि वैराच्या संस्कारांचें सिंचन झालेले आहे.

ज्या भूमीवर जसे कर्म झाले असेल तसेच संस्कार ती भूमी घेत असते.

घराला गृहस्थाने नेहमी पवित्र ठेवावे.

लोक माथेरानला सहल करायला जात असतात, पण हा विचार करीत नाहीत की आपल्या डोक्यावर किती रान (ऋण) वाढलेले आहे.

माथेरानला जाण्यापेक्षा जिथे परमेश्वराने लीला केली असेल अशा भगवत्धामीं राहून सत्कर्म करा.

गृहस्थाने पितृश्राद्धसुद्धा केले पाहिजे. दशरथाचे श्राद्धप्रसंगी सीता जेव्हा वसिष्ठांना जेवायला वाढत होती तेव्हा तिला वसिष्ठांमध्ये दशरथाचे दर्शन झाले होते. पवित्र ब्राह्मणांच्या माध्यमाने पितर घरीं येत असतात. पवित्र ब्राह्मणांकरवी श्राद्ध केले जावे.

कामाचे मूळ आहे संकल्प. म्हणून संकल्पाचा त्याग करून काम जिंकला पाहिजे. मनांत सुखाचा संकल्पच येऊ देऊ नये. संकल्पच दुःखाचें कारण असतो. कामाची इच्छा अपूर्ण राहिली की क्रोध उत्पन्न होतो. कामनेचा त्याग हाच क्रोधाला जिंकण्याचा उपाय आहे. क्रोध दुःख देणारा आहे. क्रोधावरच रागावण्याचा निश्चय करा.

संसारी लोक ज्याला अर्थ समजतात, तोच अनर्थ आहे असे समजा आणि लोभाला जिंका. तात्त्विक विचाराने भयाला जिंकले पाहिजे. अध्यात्मविद्येने शोक आणि मोहावर, संतांच्या उपासनेने दंभावर, मौनाच्या द्वारे योगाच्या विघ्नांवर आणि शरीर, प्राण इत्यादींना निश्चेष्ट करून हिंसेवर विजय मिळविला पाहिजे.

गृहस्थाने सद्‌गुरूचा आश्रय घेऊन त्याच्या आज्ञेचें पालन केले पाहिजे, सात्त्विक भोजन, स्थान आणि सत्संगाने निद्रेला पराजित केले पाहिजे. सत्त्वगुणाच्या वृद्धीने मनुष्याचा देह विलीन होऊन जातो. ज्ञानेश्वरांनी सोळाव्या वर्षांत आणि शंकराचार्यांनी बत्तीसाव्या वर्षांत प्रयाण केले होते.

तमोगुणाच्या वृद्धीने निद्रा वाढते आणि सत्त्वगुणाच्या वृद्धीने निद्रा उडून जाते. झोप तमोगुणाचे लक्षण आहे.

सदाचार, संयम, सात्त्विक आहार-विहार-आचार इत्यादींनी सत्त्वगुण वाढतो. सत्त्वगुणाच्या वृद्धीने प्रभु-मिलनाची आतुरता देखील वाढेल.

दररोज भगवंताचे ध्यान करा. ध्यान केल्याने ध्यान करणाऱ्यांत ईश्वरी शक्ति येते. गृहस्थांनी

इंद्रियरूपी घोड्यांना ताब्यांत ठेवले पाहिजे.

विद्वान सांगतात की हे शरीर म्हणजे एक रथ असून इंद्रियें त्याचे घोडे आहेत. इंद्रियांचे नियंते मनच या घोड्यांची लगाम आहे. शब्दादि विषय निरनिराळे मार्ग आहेत. बुद्धि या रथाला चालविणारा सारथी आहे. या रथाला बांधण्यासाठी ईश्वराने चित्तरूप बंधन केले आहे. दहा प्राण म्हणजे या रथाची धुरा होय. धर्म आणि अधर्म चाके आहेत. या रथांत बसतो आमचा अहंकारी जीव. ॐ धनुष्य आहे आणि शुद्ध जीव म्हणजे बाण. परब्रह्म लक्ष्य आहे– बाणाचें गंतव्य. राग, द्वेष, लोभ, शोक, मोह, भय, मद, मान, अपमान, माया, असूया, हिंसा, मत्सर, रजोगुण, प्रमाद, क्षुधा, निद्रा इत्यादी शत्रू आहेत.

जोपर्यंत मनुष्यदेहरूपी रथ सुस्थितींत आहे आणि इंद्रियें सशक्त आहेत, तोपर्यंत मनुष्याने सद्गुरुचरणांची सेवा करून, तीक्ष्ण ज्ञानरूपी तलवार घेऊन, श्रीभगवंताचें बळ धारण करून रागद्वेषादि शत्रूंना जिंकावे आणि त्यानंतर शांत होऊन स्वानंदरूपी स्वराज्याने संतुष्ट व्हावे. अंती शरीर-रथाला सुद्धा सोडून द्यावे.

जर असे न केले तर रथांत बसलेल्या प्रमादी जीवाला आणि दुष्ट इंद्रियरूपी घोड्यांना बुद्धिरूपी सारथी अयोग्य मार्गावर घेऊन जाईल आणि विषयरूपी चोरांच्या आधीन करील. ते चोर, घोडा आणि सारथ्यासकट जीवरूपी रथाला अंधाराने व्याप्त आणि महामृत्यूच्या भयाने पूर्ण अशा संसाररूपी विहिरीत फेकून देतील.

वेदांत दोन प्रकारची कर्मे सांगितली आहेत. प्रवृत्तिकर्माने मनुष्य पुनःपुन्हा संसारात येतो आणि निवृत्तिकर्माने मोक्ष प्राप्त करतो.

मी कमवितो असा अभिमान गृहस्थाने ठेवू नये. द्रव्य माझे आहे असा अभिमान सुद्धा ठेवू नका. द्रव्य सगळ्यांचेच आहे.

गृहस्थाने भावाद्वैत सिद्ध करावे. पतिपत्नींनी सत्संग करावा.

एकांतात बसून हरिकीर्तन करा. कीर्तनाने कलीच्या दोषांचा विनाश होतो. धर्माने अर्थाचे उपार्जन करा.

मौजमजेत सर्वच बरोबर असतात आणि दंड एकट्या जीवात्म्याला भोगावा लागतो.

अनेक गृहस्थ संसार पार करून गेले आहेत. मोठमोठे ऋषि, जे ईश्वराच्या दर्शनासाठी तळमळतात ते आपल्या घरांतच राहतात.

याप्रमाणे नारदाने धर्मराजाला उपदेश केला. शेवटी या प्रकरणाच्या समाप्तीचे वेळी धर्मराजाने नारदांची पूजा केली.

**हरे राम हरे राम, राम राम हरे हरे।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥**

**॥ सप्तम स्कंध समाप्त ॥**

●●●

॥ श्रीहरिः ॥

# ॥ अष्टम स्कंध ॥

**श्रीकृष्णाय नमः॥**

प्रथम स्कंधांत शिष्यांचा अधिकार सांगितला आहे. अधिकाराशिवाय ज्ञानाला शोभा येत नाही. अनधिकारी मनुष्य ज्ञानाचा दुरुपयोग करतो. दुसऱ्या स्कंधांत ज्ञानाचा उपदेश केला आहे. त्यांत मनुष्यमात्राचें कर्तव्य काय आहे हे सांगितले गेले आहे. मनुष्याला जीवन भोग भोगण्यासाठी दिले गेलेले नाही. ईश्वराची आराधना करून ईश्वराला प्राप्त करून घेण्यासाठी मानवशरीर दिले गेले आहे. तिसऱ्या स्कंधांत ज्ञान जीवनांत कसे उतरवावे हे कथन केले गेले आहे. हे ज्ञान जीवनांत उतरविणाऱ्याचे चारी पुरुषार्थ सिद्ध होत असतात, म्हणून चौथ्या स्कंधांत चारी पुरुषार्थाविषयी कथा सांगितली आहे. पांचव्या स्कंधांत ज्ञानी परमहंस आणि भागवत परमहंस यांची लक्षणें सांगितली. सगळ्यांचे स्वामी परमात्मा आहेत. यानंतर सहाव्या स्कंधांत पुष्टीविषयी कथा आली आहे. जीवावर परमात्मा अनुग्रह करतात. जीवाजवळ ईश्वर कांही मागत नाही. ईश्वर निरपेक्ष आहे. तरीही ईश्वर जीवावर कृपा करतो. मनुष्य जेव्हां आपण केलेली पापें आठवील तेव्हां त्याला कळून येईल कीं त्याला जे कांही मिळालें आहे त्याच्या योग्य तो स्वतः नाही– योग्यतेपेक्षा जास्तच प्राप्त झाले आहे. जेव्हां जन्म झाला तेव्हां जीव शुद्ध होता. पण जेव्हांपासून त्याला समज आली तेव्हांपासून तो असत्य बोलू लागला. ईश्वर जीवाला अनेक जन्म देत असतो आणि आशा करतो कीं जीव आपले जीवन सुधारेल.

केवळ कथा ऐकून लाभ होत नाही. कथा ऐकून मनन करून ती जीवनांत उतरवा.

प्रभूने आम्ही चिंता करावी असे कांहीच ठेवलेले नाही. ईश्वराची जीवावर अनंत कृपा आहे. परंतु जीव तिचा उपयोगच करीत नाही. पवित्र विचार करण्यासाठी प्रभूने मन दिले आहे. जो मनाच्या शक्तीचा दुरुपयोग करतो तोच दैत्य. मनांत शक्ति आहे. जेव्हां जीव ईश्वररूपांत लीन होतो तेव्हां मनाच्या शक्तीचा विकास होतो; पण जेव्हां मन विषयांत भटकते तेव्हां मनाच्या शक्तीचा विनाश होतो.

ईश्वर जीवमात्रावर कृपा करीत असतो. त्याला त्याच्या पात्रतेपेक्षा जास्त देत असतो.

सातव्या स्कंधांत वासनेविषयीं कथा सांगितली आणि दाखविले कीं प्रल्हादाची सद्वासना आहे, मनुष्याची मिश्र वासना आहे आणि हिरण्यकशिपूची असद्वासना आहे.

हिरण्यकशिपूला संपत्ति मिळाली आणि वेळही मिळाला. परंतु या सर्वांचा उपयोग त्याने भोगविलासासाठी केला. शक्तीचा उपयोग दुसऱ्यांना दुःख देण्यासाठी केला.

मर्यादित नसेल तर भोग मनुष्याला रोगी बनवत असतो. भोग मनुष्याला रोगी बनविण्यासाठी नाही. इंद्रियांना निरोगी ठेवण्यासाठी भोग आहे. अग्नीमध्यें लाकडे न घालणें हाच अग्नीला शांत करण्याचा

उपाय आहे. याचप्रमाणे इंद्रियांना भोग न देण्याने इंद्रियें शांत होतील. भोग दिल्यानंतर असे वाटत असते कीं इंद्रियांना शांति मिळाली आहे, परंतु हे खरे नाही. त्याने तर अशांतीच वाढते.

मला जे कांही मिळाले आहे ते फक्त माझ्याचकरता आहे असे समजणें हीच असद्वासना होय. भगवंतानें जे काय दिलें आहे ते सर्वांकरताच आहे असें मानणें ही सद्वासना आहे. प्रल्हादामधे सद्वासना होती, म्हणून त्याला देव मानले गेले. हिरण्यकशिपूला त्याच्या असद्वासनेमुळे राक्षस मानले गेले. हिरण्यकशिपु भोगवृत्ति, अहंकार आणि लोभ आहे. देव होणे किंवा दानव होणे हे मनुष्याच्या हातांत आहे. जगांतील सगळे जीव पुण्याच्या फळाची इच्छा करतात, परंतु ते स्वतः मात्र पुण्य करीत नाहीत.

नेहमीं लक्षांत ठेवा कीं तुमच्या कर्माची फळें तुम्हालाच भोगावी लागतील. यात दोष कोणाचा ? जर दातांत येऊन जीभ चावली गेली तर दोष कोणाचा ? ते तर सहनच करावे लागेल.

**१. ब्रह्मभाव जागृतीसाठी वासनाविनाश आवश्यक; वासनेच्या नाशाचे चार उपाय :**

भक्तिमार्गांत पुढे जाण्याचें पहिलें साधन संयम आहे. संयम हळू हळू वाढवा, आणि भोगमार्गाकडे जाणारी इंद्रियें प्रभूच्या मार्गाकडे वळवा. वासनेचा विनाश झाल्यावरच ब्रह्मभाव जागृत होत असतो. जोपर्यंत मनांत सूक्ष्म वासना आहे तोपर्यंत जीवाशिवाची भेट होत नाही. वासना ज्ञानानुभवांत विघ्नकर्ती आहे.

वासनेच्या विनाशासाठी आठव्या स्कंधांत चार उपाय सांगितले आहेत. भागवताचें फळ आहे रासलीला. जीवाला श्रीकृष्णाला भेटायचें आहे. एकदा कृष्णांशी भेट झाल्यावर जीव त्यांच्यापासून वेगळा होऊ शकत नाही. जो वासनेचा नाश करतो त्यालाच रासक्रीडेंत प्रवेश मिळत असतो. अनेक जन्मांची वासना मनांत भरलेली आहे. वासना अनेक प्रकारचे दुःख देत असते, तरी पण मनुष्य तिला सोडत नाही. ईश्वराचा अनुभव झाल्याशिवाय वासना जात नाही. जोपर्यंत वासनेंत आकर्षण असेल तोपर्यंत वासना जाणार नाही. कुंभक वाढवाल तर वासनेचा विनाश होईल. प्राणाला शरीरांत कोंडून ठेवाल तर वासनेचा विनाश होईल.

मला परमेश्वराला भेटायचे आहे असा वारंवार संकल्प करीत रहा. जर दोन आत्मे भेटल्यानंतर त्या भेटीमुळे परस्परांना आनंद मिळत असतो तर सर्व प्राण सूक्ष्मरूपाने ज्या परमेश्वरांत वसलेले आहेत त्या परमेश्वराला भेटण्याने केवढा आंनद होईल. मला ईश्वराला भेटायचे आहे अशी कामना करा. वासना अलौकिक बनवा.

जे दुष्ट संस्कार मनाला मिळालेले आहेत ते दूर व्हावे आणि मनाला चांगले संस्कार व्हावे यासाठी सत्संग आवश्यक आहे. सत्संगाने वासना उच्चतम होईल. वासना अलौकिक बनवा. मनुष्य वारंवार जसे बोलेल आणि जसा विचार करील तसाच तो स्वतः होत असतो.

आठव्या स्कंधांत वासनेचा विनाश करण्याचे चार उपाय सांगितले आहेत. वासनेचा विनाश या चार उपायांनी होत असतो. जेव्हां जीव ईश्वरापासून दूर असतो तेव्हां वासना जागृत होते.

(१) सतत हरिस्मरणाची सवय कराल तर वासना जागृत होणार नाही. हृदयांत जर नेहमी रामाचा वास असेल तर तेथे कामवासना उद्भवू शकणार नाही. हरिस्मरणाची सवय ठेवल्याने वासनेचा विनाश होईल.



(२) हे सर्व ईश्वराचे आहे आणि सर्वांकरता आहे असें समजाल तर वासनेचा विनाश होईल.

संपत्ति माझी आहे असा विचार केला तर वासना वाढेल. जीव लक्ष्मीचा मालक केव्हांही होऊ शकत नाही. जीव तर लक्ष्मीचा पुत्र आहे. बालक होण्यांत जो आनंद मिळतो तो मालक होण्यांत मिळत नाही.

(३) बालक व्हाल तर सुखी व्हाल. सूत सावध करतात– बळिराजानें सर्वस्वाचें दान केलें. विपत्तींतही स्ववचनाचें पालन करा.

(४) चौथा उपाय 'शरणागति' आहे. जर जीव भगवंताला शरण जाणार नाही आणि भगवंताचे स्मरण करणार नाही तर तो वासनेचा विनाश करू शकणार नाही.

वासनेचा नाश केल्यानंतरच रासलीलेंत जायचे आहे. हळू हळू परीक्षित राजाच्या मनाची शुद्धि करून मग शुकदेव त्यांना रासलीलेंत घेऊन जातील.

आठव्या स्कंधांत मन्वंतरलीलेचें वर्णन आहे. शुकदेव वर्णन करतात– हे राजन्! प्रत्येक मन्वंतरांत प्रभूचा जन्म होत असतो. प्रत्येक मनूच्या राज्यांत प्रभूचा एक विशिष्ट अवतार होतो.

या कल्पांत सहा मनू झाले आहेत. प्रथम स्वायंभुव मनूची कथा मी तुला ऐकविली. स्वायंभुव मनूच्या मुली आकृति आणि देवहुति यांच्या चरित्रांच्या कथा मी तुला ऐकविल्या.

दुसऱ्या मन्वंतरांत स्वायंभुव मनु तपश्चर्या करण्यासाठी वनांत गेले. तेथे यज्ञनारायणाने राक्षसांपासून त्यांचें रक्षण केलें.

त्यांनी म्हटले आहे– हें सर्व जगत् आणि जगांत राहणारे सर्व चर-अचर प्राणी परमात्म्यांत ओतप्रोत आहेत, म्हणून जगांतील कोणत्याही पदार्थाचा मोह न करता त्यांचा त्याग करून जीवननिर्वाहासाठी जितके आवश्यक असेल तेवढ्याचाच उपभोग केला पाहिजे. तृष्णेचा सर्वथा त्याग केला पाहिजे. या जगांतील संपत्ति कोणाची आहे? ती कधी कोणाची झाली आहे काय?

म्हणून, हे मानवा! त्याग करून तू हिचा उपभोग घे. अर्थात सर्व ईश्वराला अर्पण कर आणि अनासक्त राहून तू उपभोग घे. दुसऱ्यांचे धन हडप करण्याची स्पृहा ठेवू नको.

हें सर्व जग ईश्वराने व्याप्त आहे, अर्थात प्रभु सर्वव्यापक आहे, असे जो मनुष्य चिंतील तो कधी कोणाशी द्रोह करणार नाही.

विषयांत मन फसणार नाही याविषयीं दक्ष रहा. या जगांतील पदार्थ आजपर्यंत कोणाचे झालेले नाहीत आणि होणारही नाहीत. तरी पण मनुष्य त्यावर ममत्व ठेवतो आणि त्यांच्यांत आपली आसक्ति वाढवितो.

वर सांगितलेला अद्वैतवाद सुंदर आहे. द्वैतवादाचा त्याग करा. ऋषिसुद्धा मोक्ष मिळविण्यापूर्वी सत्कर्म करीत असतात. सत्कर्म करणारी माणसेच निष्कामभाव प्राप्त करतात.

ईश्वराला सुद्धा कर्म करावे लागते. परंतु ईश्वर कोणत्याही कर्मांत आसक्त होत नाही. तो तर अनासक्त राहून कर्म करीत असतो. राम, कृष्ण इत्यादी अवतारांत मनुष्याला श्रेष्ठ आचरणाचा आदर्श दाखविण्यासाठी भगवंताने कर्में केली आहेत.

कर्म केल्यावाचून कोणी राहू शकत नाही.

म्हणून अनासक्त राहून कर्म करा.

**२. गजेंद्रमोक्षाची कथा:**

तिसरा मनु झाला आहे उत्तम. प्रभूंनी सत्यसेनाच्या रूपांत अवतार धारण केला होता. चौथ्या

मन्वंतरांत प्रभूचा हरि-रूपांत जन्म झाला होता; आणि त्यांनी गजेंद्राचें मगरमिठीपासून रक्षण केले होते. दुसऱ्या अध्यायापासून चौथ्या अध्यायापर्यंत गजेंद्रमोक्षाची कथा सांगितली आहे. परीक्षित राजा म्हणाला, मला गजेन्द्रमोक्षाची कथा सांगा.

शुकदेव राजाला म्हणाले— राजा, त्रिकूट पर्वतावर एक बलवान हत्ती राहात होता. तो अनेक हत्तीणींचा पति होता. उन्हाळ्याचे दिवस होते. कडक उन्हाळा होता. गजेन्द्र हत्तिणींबरोबर सरोवरांत क्रीडा करावयास गेला. हत्तिणींच्या आणि बच्च्यांच्या घेऱ्यांत राहून तो आनंदविहार करू लागला. गजेन्द्र जलक्रीडेंत तन्मय झालेला पाहून एका मगरानें त्याचा पाय पकडला. त्याच्या पकडींतून सुटण्याचा हत्तीने आटोकाट प्रयत्न केला. हत्ती स्थलचर आणि मगर जलचर आहे. म्हणून हत्ती पाण्यांत दुर्बल ठरला. मगर हत्तीला सोडेना. गजेन्द्रमोक्षाची ही कथा प्रत्येक घरांतच होते.

संसार हेंच सरोवर आहे ! जीवच गजेन्द्र आहे ! आणि ' काळ 'च मगर आहे. संसारांतील विषयांमधे आसक्त झालेल्या जीवाला काळाचें देखील भान राहात नाही. जीवमात्र गजेन्द्र आहे. हत्तीची बुद्धी स्थूल आहे. जर ब्रह्मचर्याचा भंग झाला तर बुद्धी जड होईल. हत्ती अतिकामी असतो. सिंह वर्षांतून एकदाच ब्रह्मचर्याचा भंग करतो. त्यामुळे त्याचें बळ कमी असूनही तो हत्तीला मारू शकतो. कामक्रीडा करणाऱ्याची बुद्धी जड असते.

हा जीवात्मा गजेन्द्र त्रिकूटाचल पर्वतावर राहतो. त्रिकूटाचल शरीर आहे. त्रिकूटाचा दुसरा अर्थ आहे काम, क्रोध आणि लोभ. हा संसार, सरोवर आहे. संसारांत जीव कामक्रीडा करतो. संसारसरोवरांत जीवात्मा स्त्री आणि मुलेबाळे यामध्ये क्रीडा करतो. ज्या ज्या संसारांत जीव खेळतो त्यांतच त्याचा काळही ठरविला गेलेला असतो. संसारांत जो कामसुखाचा उपभोग घेतो त्याला काळ पकडत असतो. ज्याला काम मारतो त्याला काळही मारतो. मनुष्याला वाटते कीं मी कामसुखाचा उपभोग घेतो; पण हें खरे नाही. कामच मनुष्याचा उपभोग करून त्याला क्षीण करतो.

इंद्रियांना जेव्हां भक्तिरस मिळतो तेव्हांच ती शांत होत असतात.

अनेक जन्मांपासून काळ जीवाला मारीत आला आहे. मगर आणि साप यांना काळाची उपमा दिली गेली आहे.

ज्या संसारांत मनुष्य कामक्रीडा करीत असतो तेथे काळही राहतो. ज्यावेळी जन्म होतो त्याच वेळीं मरणाची वेळही निश्चित केली जाते. मगराने हत्तीचा पाय धरला होता. काळ जेव्हां येतो तेव्हां पहिले पायच धरतो. पायाची शक्ति क्षीण झाली कीं समजा की काळाने धरले आहे. पायाची शक्ति क्षीण झाली तर सावध होऊन समजले पाहिजे कीं आता काळ जवळ आला आहे. त्यावेळी घाबरू नये. भगवत्स्मरण सुरू केले पाहिजे. जेव्हां काळ येऊन धरील तेव्हां तुम्हाला पत्नी सोडवणार नाही कीं पुत्रही. जेव्हा काळ येऊन धरील तेव्हां कोणताच प्रयत्न कामास येणार नाही. त्या मगराने जेव्हां हत्तीला धरले तेव्हां त्याला हत्तिणी आणि पिलें सोडवू शकली नाहीत कीं इतरही हत्ती सोडवू शकले नाहीत. मनुष्याला जेव्हां काळ धरतो तेव्हां त्याला कोणी वाचवू शकत नाही. पत्नी, पुत्र, नातेवाईक कोणीच वाचवू शकत नाहीत. ज्याला परमात्म्याचें दर्शन होईल तोच काळाच्या तोंडांतून सुटू शकेल. काळाचा सुद्धा काळ अशा श्रीकृष्णाच्या दर्शनाने काळाचा नाश होईल.

काळरूपी मगराच्या तोंडातून श्रीहरीचे सुदर्शनचक्रच सोडवू शकते. मगराच्या तोंडातून सुटण्याचा हत्तीनें खूप प्रयत्न केला, परन्तु सर्व प्रयत्न अपुरे ठरले. हत्तिणींनी आणि बच्चांनीही प्रयत्न केले पण तेही कामास आले नाहीत. जेव्हां काळच धरतो तेव्हां कोणताच प्रयत्न कामी येत नाही.

एक महिना अशाप्रकारे दोघांमधे युद्ध चालू राहिले. मगर हत्तीला खोल पाण्यांत ओढून नेत आहे, तेव्हां आता हत्ती मरणार असा विचार करून हत्तिणी त्याचा त्याग करून निघून गेल्या. माणसाच्या जन्मापूर्वी त्याचे कोणी साथी किंवा नातेवाईक नव्हते आणि मेल्यानंतरही कोणी राहणार नाहीत. तरी पण जन्म आणि मरण या दोहोंमध्यें जो काळ असतो त्यांत त्यांना एक दुसऱ्यावाचून चैन पडत नाही. 'परन्तु अंतकाळी' कोणी कामास येत नाही. मला प्रभूशिवाय चैन पडू नये अशी माणसाने इच्छा ठेवावी.

गजेन्द्र आता मरणारच असा विचार करून सर्व त्याला सोडून गेले. गजेन्द्र एकटाच राहिला. मनुष्य सुद्धा जेव्हां एकटा होतो तेव्हां मग ज्ञान जागृत होते. एकटा— अर्थांत जेव्हां खिशांत पैसा देखील नसेल तेव्हां ज्ञान जागृत होते; आणि तो ईश्वराला शरण जातो. निर्बलाचें बल राम आहे.

द्रौपदीने जोपर्यंत लुगड्याचा पदर धरून ठेवला होता तोपर्यंत श्रीकृष्ण आले नाहीत. ईश्वर संपूर्ण प्रेम, विश्वास चाहतो. पण जीव ईश्वराला थोडेसेच प्रेम देतो म्हणून ईश्वर त्याला मदत करीत नाही.

गजेंद्र निराधार झाला. त्याला आता पक्के वाटू लागले कीं आता माझें कोणी नाही. जीव जेव्हां दुःखाने व्याकुळ होतो तेव्हां तो परमात्म्याला हाक मारतो.

दररोज गजेंद्रमोक्षाचा पाठ करणें जरूर आहे. म्हातारा जेव्हां आजारी पडेल आणि खूप दिवस आजारी राहील तेव्हां सर्वच असे इच्छा करतील कीं आता हा म्हातारा मेला तर चांगले होईल. मुलगा जर सुटी घेऊन आला आणि म्हाताऱ्याचें आजारपण वाढत गेले तर तो म्हणेल, 'मी जातो, माझी सुटी संपली. म्हाताऱ्याचें कांही झाले तर कळवा.'

जीव जेव्हां मृत्युशय्येवर एकटाच असतो तेव्हां त्याची दशा गजेंद्रासारखी होते. अंतकाळीं जीवाला ज्ञान होते, पण मग तें ज्ञान कांही कामाला येत नाही. मनुष्य घाबरतो आणि विचार करतो कीं मी मरायची तर कांहीच तयारी केली नाही. आता माझें काय होईल? जिथे जाऊन परत यायचे असते अशा यात्रेची मनुष्य खूप तयारी करतो, परंतु जिथे जाऊन परत यायचे नसते त्या यात्रेविषयीं तो कांहीच तयारी करत नाही. परमात्म्याला प्रसन्न कराल तर तुमचा बेडा पार होईल, हा गजेंद्र पशू आहे. पशू असून सुद्धा तो देवाला हाक मारतो. परन्तु मनुष्य तर मृत्युशय्येवर पडून सुद्धा हाय हायच करतो. पण हाय हाय करून आता काय मिळेल?

गजेंद्र जेव्हां एकटाच राहिला तेव्हां त्याला पक्के वाटू लागले कीं आता ईश्वराशिवाय माझें कोणी नाही. ईश्वराच्या आधारावाचून जीव निराधार आहे. शेवटी सगळेच टाकून जातात. ज्यांचे सगळ्या आयुष्यभर भोग पुरविले ते देखील सोडून निघून जातात. अंतकाळीं जीवाला विश्वास होतो कीं ईश्वराशिवाय माझें कोणीच नाही. अंतकाळीं जीवाला पश्चात्ताप होतो. हाय हाय करीत जीव जात असतो. अंतकाळीं हाय हाय करून अंतःकरण जळत असलेले पाहणे नको असेल तर आतापासूनच हरीचें नाव घ्यायला सुरुवात करा. आजपासून श्रीहरीचें स्मरण कराल तर शेवटच्या वेळीं सुद्धा श्रीहरीच आठवतील.

पशु संग्रह करीत नाही. मनुष्य संग्रह करतो. मनुष्य उद्याची काळजी वाहतो. काळाने पाय धरलेला आहे हे विसरू नये. पायाची शक्ति क्षीण झाली तर समजा कीं मरणाची वेळ जवळ आली आहे.

### ३. गजेन्द्र स्तुतिपाठाचा भावार्थ व स्तुतिपाठाचें फलः

जेव्हा गजेंद्र खूप व्याकुळ झाला तेव्हां तो स्तुति करू लागला. गजेंद्राने जी स्तुति केली आहे. तिचा फार महिमा आहे. संसारी लोकांनी गजेंद्राप्रमाणें नेहमी श्रीहरीची स्तुति केली पाहिजे. याप्रमाणे

स्तुति केल्याने अज्ञानाचा नाश होतो आणि मरण सुधारते.

काळ जेव्हां जीवाला धरायला येतो तेव्हां तो जीव प्रभूला हाक मारतो :– "हे नाथ, मी तुम्हाला शरण आलो आहे." जीव जेव्हां चोहोबाजूंनी निराधार होतो तेव्हां पूर्वजन्माच्या संस्कारामुळे आणि सत्कर्मांमुळे तो प्रभूला शरण जातो. गजेंद्र स्तुति करीत आहे, "निरनिराळ्या रूपांत नाटक करणाऱ्या नटाचें खरें स्वरूप ज्याप्रमाणे साधारण प्रेक्षक ओळखू शकत नाहीत त्याचप्रमाणें सत्त्वप्रधान देव किंवा ऋषि देखील तुझ्या स्वरूपाला जाणू शकले नाहीत. तर मग इतर साधारण लोक तुला ओळखूच कसे शकतील किंवा त्याचें वर्णनही कसें करतील. अशा दुर्गम चरित्र असणाऱ्या प्रभो! माझें रक्षण करा."

"माझ्यासारख्या शरणागत पशुतुल्य अविद्याग्रस्त जीवाचा अविद्यारूपी फास नेहमीकरता तोडून टाकणाऱ्या, अत्यंत दयाळू आणि दया करण्यांत कधीही वेळ न लावणाऱ्या नित्य मुक्त प्रभूंना मी वंदन करतो. सर्व जीवांच्या मनांत तुमच्या अंशाने तुम्ही अंतर्यामी रूपाने प्रगट होत असता. सर्वांचे नियंते आणि अनंत अंशा तुम्हाला मी वंदन करतो. मी पशू आहे. कालाच्या पाशांत फसलो आहे.

थोडा विचार करा. जीवमात्र पशु आहे. सगळेच काळाच्या मुखांत फसलेले आहेत. मला काळापासून वाचवा. जिथे काळाचे अस्तित्व नसेल तिथे मला घेऊन चला. जिथे काळ आहे तिथे दुःखही आहे. ज्याच्या डोक्यावर काळ आहे तो सुखी नाही.

"जिथे काळ नसेल अशा तुझ्या निजधामीं घेऊन चल. जे लोक शरीर, पुत्र, मित्र, घर, संपत्ति आणि स्वजनांमध्ये आसक्त आहेत त्यांना तुझी प्राप्ति होणें अतिकठीण आहे. कारण तुम्ही स्वतः अनासक्त आहात. जीवन्मुक्त पुरुष आपल्या अंतःकरणांत तुमचें निरंतर चिंतन करीत असतात. सर्वज्ञानस्वरूप, सर्वसमर्थ परमात्म्याला मी नमस्कार करतो."

"नाथ! या मगराच्या पाशांतून सुटून जिवंत राहण्याची माझी इच्छा नाही. हत्तीचें शरीर आंतून आणि बाहेरून दोन्ही बाजूंनी अज्ञानरूप आवरणाने झाकलेले असते. अशा शरीराला ठेवून काय फायदा? मी तर आत्मप्रकाश झाकून टाकणाऱ्या व कालक्रमाने आपोआप नाश न होणाऱ्या अज्ञानरूपी आवरणापासून सुटू इच्छितो; त्या अज्ञान आवरणाचा तर केवळ आपल्या कृपेने किंवा तत्त्वज्ञानानेच नाश होत असतो. हे नाथ! माझ्यावर कृपा करा. शरणागताचें रक्षण करणाऱ्या हे प्रभो! माझें रक्षण करा. मी तुम्हाला शरण आलो आहे."

गजेंद्र याप्रमाणें दुःखाने आर्त होऊन श्रीहरीची स्तुति करीत आहे. मोठमोठे महात्मे गजेंद्रमोक्षाचा पाठ करीत असतात. जेव्हां काळ धरून ठेवतो तेव्हां जीव भयाने कसा व्याकुळ होतो याचा विचार करून, गजेंद्रासारखे आर्त होऊन गजेंद्रमोक्षाचा पाठ कराल तर जीवन सुधारेल. स्तुतीच्या एकेका श्लोकांत दिव्य तेज भरलेले आहे. या स्तुतीचा नित्य पाठ कराल तर अंतकाळीं परमात्मा न्यायला येतील.

प्रातःकाळीं पवित्र होऊन जो कोणी भगवंताच्या गजेंद्रस्तुतीचा पाठ करील त्याची बुद्धि अंतकाळीं देखील निर्मल राहील. त्याला अंतकाळीं सुद्धा हरीचें स्मरण राहील. या स्तुतीचा पाठ मनुष्याला संकटांतून मुक्त करतो. ही स्तुति दुष्ट स्वप्नांच्या फलाचा नाश करते. या स्तुतीचा पाठ करणाऱ्याला वाईट स्वप्नें त्रास देत नाहीत.

हा जीव अंतकाळीं घाबरत असतो. जेव्हां तो चेतनाहीन होऊन जातो तेव्हां यमदूत त्याला बाहेर काढतात. अंतकाळीं जीव अतिशय दुःखी होतो. अशा वेळी ईश्वराचें स्मरण होणे फार कठीण आहे. ईश्वराची कृपा असेल तरच त्याचे स्मरण होऊ शकते. म्हणून शक्य असल्यास दररोज गजेंद्रस्तुतीचा

पाठ करा. शक्य झाले तर मत्स्यावतार चरित्राचा सुद्धा पाठ करा. मध्यरात्रीच्या वेळीं रासपंचाध्यायीचा पाठ करा. असे केल्याने प्रभुकृपेमुळे काम त्याला त्रास देणार नाही.

गजेंद्र प्रार्थना करीत आहे, "आता मला अविनाशी दिव्य शरीर द्या. यमुना महाराणीच्या कृपेने अलौकिक शरीराच्या-नूतनत्वाचें दान मिळत असते. नाथ! कृपा करून मला अव्यय अविनाशी तेजोमय शरीर द्या. नाथ! आपण लवकरच येण्याचें करावे. हे गोविंद! हे नारायण! मी दीन झालो आहे. काळाच्या तोंडांतून मला मुक्त करा."

जेव्हां त्या गजराजाला वाचविण्यासाठी ब्रह्मदेव इत्यादी कोणीही देव आले नाहीत, तेव्हां परमात्म्याला काळजी वाटू लागली. स्वतःच धावत आले. द्वारकानाथ निराधाराचे आधार आहेत. अंतकाळीं स्मरण केल्याबरोबर ते धावतच येत असतात.

गजेंद्राने भगवंताला येताना पाहिले, तेव्हा त्याने सरोवरांतून एक कमळाचें फूल उचलून भगवंताला अर्पण केले. तुळस आणि कमळ भगवंताला प्रिय आहेत. परमात्म्याच्या नाभीपासून कमळ उत्पन्न झालें आहे. कमळ ब्रह्मदेवाचें सर्जन नाही.

भगवंतांनी त्या कमळाच्या फुलाचा स्वीकार केला आणि आपल्या सुदर्शनचक्राने मगराचा वध केला.

ज्ञानचक्रानेच काळाचा नाश होऊ शकतो. असें ज्ञान झालें पाहिजे कीं सर्वांमध्येच भगवंत दिसतील. ज्याला ब्रह्मदृष्टि प्राप्त होते तो सगळ्या जागीं आणि सगळ्याच वस्तूंमधे प्रभूचेंच दर्शन करतो.

ब्रह्मज्ञानी तर जगांत कुठे ना कुठे केव्हांतरी मिळतीलही, पण शुकदेवांसारखी ब्रह्मदृष्टि असणारे फारच थोडे सापडतील. अशा ज्ञान्यासाठी संसार बाधक नसतो. अज्ञान्याला संसार बाधक होतो, ज्ञान्याला नाही. ज्ञान्यासाठी जग, जग राहात नाही.

माणसाला अज्ञानाच्या पकडींतून सुटायचे आहे. भगवंतांनी सुदर्शनचक्राने मगराला मारले, सुदर्शन – अर्थात भगवंताच्या दर्शनाने काळाला मारले जाते. सर्वांमधे भगवत्‌दर्शन हेच सुदर्शन आहे. जेव्हां काळ धरतो तेव्हां त्याच्या पकडींतून काळाचेही काळ असे भगवंतच सोडवू शकतात.

सुदर्शनाने काळरूपी मगराचा नाश झाला. याचा एक अर्थ असा कीं तुमची दृष्टी जेव्हां सुदर्शन – अर्थात सगळ्यांमध्येच प्रभूदर्शन करणारी – होईल तेव्हांच तुम्ही काळाच्या तोंडांतून मुक्त व्हाल. तुम्ही सुद्धा तेव्हां काळाला जिंकाल. अशा ज्ञानी पुरुषाचे काळ काय बिघडवू शकतो? ज्याच्या हृदयांत सर्वांविषयी भगवद्भाव जागृत झाला आहे तो काळाच्या मुखांतून मुक्त होईल.

सर्वांमध्ये श्रीकृष्णाचे दर्शन करता करता त्याला आपल्यांतही श्रीकृष्णाचे दर्शन होऊ लागते. आपल्या स्वरूपांतही श्रीकृष्णाचे दर्शन कराल तर काळ तुम्हाला मारू शकणार नाही.

शरण आलेल्या गजेन्द्राचा ज्याप्रमाणे उद्धार केला, त्याचप्रमाणे शरण येणाऱ्या सर्वच जीवांचा प्रभु उद्धार करीत असतात.

तो गजेन्द्र आपल्या पूर्वजन्मांत इन्द्रद्युम्न नावाचा राजा होता. तो ध्यानांत बसला असताना अगस्ति मुनि आले. राजाने उठून त्यांचे स्वागत केले नाही, हा व्यवहार मुनींना अपमानास्पद वाटला.

भगवंतापेक्षाही जास्त त्यांच्या भक्तांचा सन्मान करावा. दगडाच्या मूर्तीविषयी सद्भाव ठेवल्याने ती चेतनामयी होते, तर चेतनाविषयी सद्भाव ठेवल्याने ईश्वराची प्राप्ति कां न व्हावी?

अगस्त्य मुनींना वाईट वाटले आणि त्यांनी शाप दिला, 'मी आल्यावरही तू जडासारखाच बसून राहिलास म्हणून तुला पुढच्या जन्मांत पशूचा जड अवतार मिळेल.'

पूर्वजन्मांत गजेंद्राने फार भक्ति केली होती म्हणून गजेन्द्रयोनींत सुद्धा त्याला अंतकाळी प्रभूचे स्मरण झाले आणि फलस्वरूप त्याचा उद्धार झाला.

जे जे संस्कार मनावर दृढ होऊन बसतात ते ते अंतकाळी आणि पुढल्या जन्मांत सुद्धा कामाला येतात.

देवाचा प्रथम स्वप्नांत अनुभव येतो. गोपाळ सहस्रनामावलीत भगवंताचे एक नाव आहे ‘भक्तानाम् स्वप्नवर्धनम्’.

भगवंतांनी गजेन्द्राला सारुप्य मुक्ति दिली, आपल्यासारखेच रूप दिले. गजेन्द्रासारखे तुम्ही सुद्धा दीनतेने आणि व्याकुळतेने गजेन्द्रस्तुतीचे पाठ करा. अंतकाळी प्रभू तुम्हाला सुद्धा गजेन्द्रासारखेच न्यायला येतील. सश्रद्ध भक्तीला परमेश्वराचा प्रतिसाद मिळतोच मिळतो.

**४. समुद्रमंथनाची कथा:**

सहाव्या अर्थात चाक्षुष मन्वंतरांत समुद्रातून जे अमृत मिळाले ते भगवंतांनी देवांना पाजले. या मन्वंतरांत भगवंतांनी अजीत नावाने अवतार घेतला होता. समुद्रमंथन करून अमृत काढले. स्वतः विष्णूंनी कच्छरूप धारण करून मंदराचल पर्वताला आपल्या पाठीवर धारण केले.

परीक्षिताने विचारले, भगवंतांनी समुद्रमंथन कसे केले? कच्छरूप घेऊन मंदराचलाला आपल्या पाठीवर कां धारण केलें? त्यांनी देवांना कसे अमृत पाजले? या समुद्रमंथनाची कथा मला कृपा करून सांगा.

शुकदेव वर्णन करतात—

राजा, एकदा इंद्र इकडे-तिकडे भटकत होता, वाटेत दुर्वास ऋषि भेटले. दुर्वासांनी इंद्राला पुष्पमाळ अर्पण केली.

साधु, ऋषि जेव्हा काही देतात, ते सद्भावाने देत असतात. ते न नाकारता आदराने घेतले पाहिजे.

इंद्र संपत्तीच्या मदाने विवेकभ्रष्ट झाला होता. त्याने पुष्पमाळ हत्तीच्या सोंडेवर फेकून दिली आणि हत्ती तिला पायाखाली चिरडू लागला. दुर्वास समजले की इंद्र माझा आणि पुष्पवासी लक्ष्मीचा अपमान करीत आहे. त्यांनी इंद्राला शाप दिला ‘तू दरिद्री होशील!’

संपत्तीच्या मदाने विवेकभ्रष्ट झालेला माणूस दरिद्री झाल्याशिवाय पुनः विवेकी होत नाही.

इंद्र दरिद्री झाला आणि स्वर्गाचे राज्य दैत्यांना मिळाले. देवगणांनी भगवंताचा आश्रय घेऊन त्यांना प्रार्थना केली की असा काही उपाय करा की जेणेंकरून आम्हाला स्वर्गाचे राज्य पुनः मिळेल. भगवंतांनी समुद्रमंथन करण्याची आज्ञा केली आणि सांगितले की याने प्राप्त होणारे अमृत तुम्हाला पाजून तुम्हांला अमर करीन. हे कार्य काही सोपे नाही. या कार्यात शत्रूंची देखील मदत घ्यावी लागेल; नाही तर ते बाधा निर्माण करतील. दैत्यांशीं मैत्री करून त्यांची स्तुति करा. ते अभिमानी आहेत. म्हणून आपली स्तुति ऐकून ते मित्र होऊन जातील.

ज्याला ज्ञानरूपी, भक्तिरूपी अमृत मिळते तो अमर होतो.

देव आणि दैत्य अमृतप्राप्तीसाठी समुद्रमंथन करू लागले. मंदराचल पर्वताला रवी आणि वासुकी नागाला दोरी (रस्सी) बनविले गेले.

संसार हाच समुद्र आहे. आपल्या जीवनाचे मंथन करा. समुद्रमंथन तर जीवनाचेच मंथन आहे.

संसारसमुद्राचे मंथन करून ज्ञान आणि भक्तिरूपी अमृत प्राप्त करायचे आहे. ज्ञान आणि भक्तिरूपी अमृताचे पान करणारा अमर होतो.

मनाला मंदराचल पर्वताप्रमाणे स्थिर करा. मनच मंदराचल पर्वत आहे आणि प्रेमदोरी वासुकीनाग आहे.

सोळाव्या वर्षांत मनोमंथन सुरू होत असते.

शिवपुराणांत एक प्रसंग आहे. शिवांनी कामदेवाला आज्ञा केली की बाल्यावस्था आणि वृद्धावस्था सोडून तू माणसाला त्रास देत जा.

युवावस्थेत पूर्वजन्मीचे संस्कार हळू हळू जागृत होतात. त्यावेळी आपल्या मनाला मंदराचल पर्वतासारखे स्थिर केले पाहिजे. मनाला चंचल होऊ देऊ नये. त्यासाठी कमीत कमी तीन तास दररोज देवाची पूजा-अर्चा करा. तरच संसारसमुद्राचें मंथन होऊन ज्ञान आणि भक्तिरूपी अमृत प्राप्त होईल.

जेव्हा मंदराचल समुद्रांत बुडू लागला तेव्हां भगवंतांनी कूर्मावतार घेऊन आपल्या पाठीवर त्याला धारण केले.

मनाला देखील तुम्ही देवाच्या एखाद्या रूपात स्थिर करा. मनाचा स्वभाव फक्त साकार वस्तूलाच पाहण्याचा असतो. सगुणाचा जोपर्यंत चांगल्या प्रकारे साक्षात्कार होणार नाही तोपर्यंत निर्गुणांत दृष्टी स्थिर होत नाही. भगवंताच्या सगुण रूपांत स्थिर झालेले मन त्यांच्या निर्गुण रूपांतही स्थिर होऊ शकते.

निराधार मन संसारसागरांत बुडून जाते. मन देवस्वरूपी कूर्माच्या आधाराशिवाय स्थिर राहात नाही. त्याला भगवत्स्वरूपाची, भगवन्नामाच्या आधाराची आवश्यकता आहे. त्याला तो आधार मिळाला तर संसारसागरांत कधीच बुडणार नाही.

अनेक औषधींना समुद्रांत विसर्जित करून समुद्राचे मंथन केले गेले आहे.

औषधीचा एक अर्थ आहे औषध आणि दुसरा अर्थ आहे अन्न. पाणी आणि अन्न औषधि आहे. हे दोन्ही आवश्यकतेनुसार शरीराला दिले पाहिजे. भूक आणि तहान यांना रोग समजून त्यांना सहन करण्याची सवय लावून घ्या. ज्याप्रमाणे रोग थांबविण्यासाठी औषध घेतले जाते त्याचप्रमाणे अन्नजल प्रमाणांतच सेवन करा. शरीर हलके असेल तर भजन नीट होऊ शकेल.

समुद्रांतून प्रथम विष निघाले होते आणि मागाहून अमृत.

मनाला स्थिर करून प्रभूचा पाठलाग कराल तर प्रथम ते विषच देतील, परंतु ते सहन केले कीं मग अमृतही देतील. महापुरुषांनी विविध कष्टरूपी विषाचे पान केले होते— दुःख सहन केले होते, म्हणून त्यांना ज्ञानामृत मिळाले.

जीवनमंथनाच्या प्रारंभी विषच मिळेल. मंथन यौवनांतच सुरू होत असते. पहिले विष मिळेल— विषय विषासारखेच असतात.

निंदा आणि कर्कश वाणी विषच होत. निंदा आणि नरक एकच समजा. निंदारूपी विष सहन कराल तर अमृत मिळेल. प्रतिकूल परिस्थिती देखील विषच आहे. दुःख सुद्धा विष आहे.

विषाचा दुर्गंध देवांना सहन झाला नाही तर प्रभूंनी विषपानासाठी शंकरांना बोलावणे पाठविले.

ज्याच्या डोक्यावर ज्ञानगंगा असते तो विष पचवू शकतो. या संसाराचे विष सगळ्यांनाच जाळत असते, परंतु ज्ञानगंगा-धारण करणाऱ्याला जाळत नाही. भगवान शंकरांप्रमाणे ज्ञान-गंगेला डोक्यावर धारण कराल तर विष सहन केले जाईल. शंकराची पूजा विष सहन करण्याची ताकद देते. शंकर

दान देतात म्हणून विष सहन करण्याची शक्ति मिळते.

निंदा शब्दरूप असल्याकारणाने तिचा संबंध आकाशाशी असतो, आत्म्याशी नाही; असे समजून निंदा सहन करून घेतली पाहिजे.

देवांनी शंकरांना विष पिण्याविषयीं प्रार्थना केली. त्यांनी पार्वतीजवळ परवानगी मागितली तेव्हा पार्वती म्हणाली– 'हे सगळे स्वार्थी आहेत! विष पिण्याने तुम्हाला कांही झाले तर!'

शिव– जर सगळ्यांचे कल्याण होऊ शकत असेल तर भलेही मला दुःख सहन करावे लागे ना का!

दुसऱ्यांना सुखी करण्याकरता जो स्वतः दुःख सहन करतो तोच शिव होय. स्वतःला सुखी करण्याकरता दुसऱ्याला दुःखी करतो तो जीव. दुसऱ्याचे हित करण्यासाठी जो आपला स्वार्थही सोडून देतो तो शिव, आणि आपल्या स्वार्थासाठी जो दुसऱ्याचे कार्य बिघडवतो तो जीव.

शंकरांनी भगवत्स्मरण करीत विषपान केले.

विषाला गळ्यांतच ठेवायचे आहे, पोटांत उतरू द्यायचे नाही. कोणाला कटु ऐकवण्याची इच्छा होत असेल तर त्याला गळ्यांतच रोखून ठेवा, तोंडांत येऊ देऊ नका. विष गळ्यांत ठेवले जाते. त्याला बाहेरही काढायचे नाही आणि पोटांतही उतरू द्यायचे नाही. निंदेकडे ध्यानच देऊं नये. कोणाच्याही द्वेषाची आठवण ठेवू नका.

विषाला पोटांत कधीच ठेवू नका. कर्कश वाणी विषच आहे. शंकरांनी विष गळ्यांतच ठेवले आहे.

भागवतात तर नाही सांगितले, पण कोणा एका महात्म्याने म्हटले आहे कीं, जेव्हां शंकर विषपान करीत होते तेव्हा काही थेंब खाली सांडले होते आणि ते विषाचे थेंब कांही जीवांच्या डोळ्यांत आणि पोटांत गेले.

विषाने खूप आग होऊ लागली तर भगवंताच्या नामाचे कीर्तन करा. भगवंताचे नाव विषाला देखील अमृत बनवीत असते. शंकरसुद्धा यामुळेच भगवंताचे नाव घेत घेत विष प्याले होते.

जगात विषही आहे आणि अमृतही. जो विष पचवू शकेल त्याला अमृत मिळेल.

कृष्णकीर्तन अमृत आहे.

सोळाव्या वर्षापासून जीवनांत मंथन सुरू होते. मनांत वासनेचे विष उत्पन्न होते. त्यावेळी मनाला मंदराचलासारखे स्थिर ठेवाल तर त्या मनोमंथनामुळे संसारसमुद्रांतून भक्ति आणि ज्ञानरूप अमृत प्राप्त होईल. मग तर मनुष्य अमरच होईल. अशा रीतीने ज्याला भक्ति आणि ज्ञान मिळतील त्याला मृत्यु येणार नाही.

शंकराचार्य वल्लभाचार्य, मीराबाई, तुकाराम इत्यादी, न जाणो किती संत साधु-भक्तांना कोणी विसरू शकले नाही. ते सर्व अमर झाले आहेत. त्यांची सगळ्यांनाच आठवण येते.

भगवंत प्रथम विष देत असतात आणि मागाहून अमृत. जो त्यांच्यामागे लागतो त्याची ते परीक्षा घेत असतात.

जगाच्या कल्याणासाठी-भल्यासाठी शंकरांनी विषपान केले. साधुपुरुषांचे असेच वर्तन असते. सज्जन पुरुष आपल्या प्राणांचेही बलिदान करून दुसऱ्यांच्या प्राणांचे रक्षण करीत असतात; तर जगांतील सामान्य मानव मोहमायेंत गुरफटून पारस्परिक वैरभावना वाढवीत असतात.

परोपकारी सज्जन प्रजेचे दुःख दूर करण्यासाठी स्वतः दुःख सहन करून घेतात. ते म्हणतात–

सगळ्यांसाठी मी दुःख सहन करून घेईन. परंतु आपल्यासाठी कोणालाच दुःख सहन करू देणार नाही. साधुपुरुष इतर लोकांचे दुःख पाहून स्वतः दुःखी होतात, परंतु हे दुःख नसून ही तर सगळ्यांच्या हृदयांत विराजमान असणाऱ्या परमात्म्याची आराधना आहे.

साधूपुरुष कसे असतात हे तुलसीदासांकडून ऐका– 'संतहृदय लोण्यासारखे कोमल असते पण स्वतःला ताप दिला असता लोणी विरघळते तर दुसऱ्याच्या दुःखाने संतहृदय कळवळते.'

मंथन करता करता प्रथम गोमाता कामधेनु प्राप्त झाली. गोमाता कामधेनूचे दान ऋषिमुनींना दिले गेले.

जी संपत्ति प्रथम मिळेल तिचा परोपकारासाठी उपयोग करा.

कामधेनु संतोषाचे प्रतीक आहे. संतोष कामधेनूचे स्वरूप आहे. ज्याच्या अंगणांत संतोषरूपी गाय आहे असा ब्राह्मणच ब्रह्मनिष्ठ असतो. असंतोषी मनुष्य पाप करतो. ब्राह्मणाचे जीवन अगदी सात्त्विक असले पाहिजे. प्राप्त परिस्थिती संतोषाने स्वीकारणें हें एक व्रतच आहे.

पुढे जाऊन उच्चैश्रवा नावाचा घोडा मिळाला. त्याला पाहून दैत्यांचे मन लालचावले तर तो त्यांना दिला गेला.

श्रव शद्बाचा अर्थ कीर्ति असा आहे. उच्चैश्रवा कीर्तीचे प्रतीक आहे. मनाला जो पर्वतासारखे स्थिर करील त्याला जगतात कीर्ति मिळेल आणि लक्ष्मी देखील. ज्यांचे मन कीर्तीत अडकते त्याला अमृत मिळत नाही.

साधनेच्या आरंभी कीर्ति मिळते. जर मन यातच अडकलेले राहील तर भगवंत मिळणार नाहीत. ज्याला खूप मान मिळतो त्याच्या पुण्याचा क्षय होतो. ज्या जीवाला मानाचा मोह नाही आणि जो दीनतेने प्रभूची प्रार्थना करतो त्या जीवाला ईश्वर आपल्यासारखे करतो.

विष्णुसहस्रनामांत भगवंताला 'अमानी मानदो' म्हटले आहे. भगवंत स्वतः अमानी आहेत. परंतु जीवांना मान देतात.

ज्याचे मन उच्चैश्रवा अर्थात कीर्ति आणि मोहांत अडकून जाते त्याला अमृत मिळत नाही. दैत्यांनी उच्चैश्रवाचा स्वेच्छेने स्वीकार केला होता म्हणून त्यांना अमृत मिळाले नाही.

पुढे जाऊन समुद्रमंथनांतून जेव्हा ऐरावत हत्ती निघाला तेव्हा घोडा घेतल्यामुळे दैत्यांना पश्चात्ताप झाला.

हत्ती सूक्ष्म दृष्टीचे प्रतीक आहे. हत्तीचे डोळे बारीक असतात. हा हत्ती देवांना दिला गेला.

स्थूल दृष्टि देहदृष्टी आहे. सूक्ष्मदृष्टी आत्मदृष्टी आहे. सूक्ष्मदृष्टी असणाऱ्याला अमृत मिळते. सूक्ष्मदृष्टी ठेवणाऱ्याला कामदेव त्रास देत नाही.

पुढे जाऊन समुद्रमंथनांतून अप्सरा प्राप्त झाली. देवांनी दैत्यांना सांगितले की यानंतर जे काही मिळेल ते आम्ही घेऊ. पारिजात आणि अप्सरा देवांना मिळाले.

यानंतर समुद्रांतून लक्ष्मी प्रगट झाली. ही तर साक्षात जगदंबा-महामाया आहे! दैत्यांना वाटले ही आम्हाला मिळाली तर चांगले होईल. परंतु मागण्याची इच्छा ठेवणाऱ्याला लक्ष्मी मिळत नाही.

लक्ष्मीला सिंहासनावर बसविले गेले. या जगांतसुद्धा सर्वजण लक्ष्मीनंदनांनाच मान देतात.

लक्ष्मीला विचार पडला, "कोणाच्या गळ्यांत माळ घालू?" ती सर्वगुणसंपन्न पुरुषाच्या शोधांत निघाली.

तिला ऋषींच्या मंडपांत आणले गेले. हे ऋषी महाज्ञानी आहेत आणि थोर तपस्वीही आहेत.

असे जरी असले तरी ते अत्यंत क्रोधी आहेत. हे ऋषी ज्ञानी पण आहेत आणि तपस्वीही; परंतु अत्यंत क्रोधी आहेत.

फक्त तप करून काही फळ मिळत नाही. तपाला भक्तीची सुद्धा साथ असायला पाहिजे. तप करण्याने शक्ति वाढते आणि त्याने क्रोध देखील वाढतो. तप आणि ज्ञानानें शक्ति वाढते परंतु ती क्षीण होत जाते. म्हणूनच ज्ञानाबरोबर भक्ति पण असली पाहिजे. भक्ति, दीनता नम्रतेच्या सिंहासनावर विराजत असते.

यापैकी लक्ष्मीच्या पसंतीला कोणी उतरू शकेनात. ती पुढे सरकली. पुढे देवगण विराजमान होते. ते क्रोधी नाहीत, परंतु अतिशय कामी आहेत. शास्त्रानें क्रोधाचा लाल, लोभाचा पिवळा आणि कामाचा काळा रंग सांगितला आहे. देव महान् असून सुद्धा कामी आहेत, त्यांनाही टाळून ती पुढे निघाली. पुढे परशुराम बसले होते. ते जितेंद्रिय आहेत. कामी आणि क्रोधी नाहीत परंतु निष्ठुर आहेत. क्षत्रियांच्या लहान लहान अजाण मुलांना देखील मारतात; म्हणून तिला पसंत पडले नाहीत.

पुढे मार्कंडेय मुनि बसले होते. ते सुंदर आहेत आणि दीर्घायुषी सुद्धा. पण भर सभेत डोळे मिटून बसले आहेत. लक्ष्मीकडे त्यांनी पाहिले सुद्धा नाही. लक्ष्मी म्हणाली, हे महात्मा तर अनासक्त आहेत, माझ्याकडे पाहात देखील नाहीत. मी जर यांना वरीन तर कदाचित भविष्यातसुद्धा ते माझ्याकडे लक्ष देणार नाहीत.

मार्कंडेय म्हणाले: तुला सुंदर कसे समजू? तुझ्या-माझ्यापेक्षा तर कृष्णच जास्त सुंदर आहे. जोपर्यंत तो तुला आपली करून घेणार नाही तोपर्यंत मी तुझे दर्शन करणार नाही. मला लक्ष्मीचा मोह नाही.

जेव्हा लक्ष्मीचा मोह सुटतो तेव्हा प्रभुभक्तीचा प्रारंभ होतो.

तुकारामाचे दारिद्र्य पाहून शिवाजीमहाराजांनी त्यांच्यासाठी सोन्याने भरलेले ताट पाठविले. तुकाराम म्हणाले, जेव्हा मी लक्ष्मीच्या मागे धावत होतो तेव्हा ती मला मिळालीच नाही. आता माझें चित्त भगवंताकडे लागलेलें पाहून आता ती बाधा उत्पन्न करण्यासाठी येत आहे. त्यांनी ते सुवर्णानें भरलेले ताट परत पाठवून दिले. सारा दिवसभर भजन करणाऱ्याला आणि काहीच उद्योग न करणाऱ्याला लक्ष्मी मिळत नसते.

पुढे गेली तर तेथे शंकर विराजमान होते. लक्ष्मी आपल्या सखींसह तेथे गेली. शंकर कामीही नाहीत आणि क्रोधीही नाहीत. लक्ष्मीने शंकरांना पाहिले. यांचा स्वभाव तर मंगल आहे, परंतु यांचा वेश अमंगल आहे. आणि वागणे भयानक असून ते फार भोळेही आहेत.

शंकरांजवळच भगवान नारायण विराजमान होते. लक्ष्मीला वाटले, हेच उत्तम आहेत. ज्याचे हृदय कोमल आणि मृदु असतें त्याच्याचजवळ लक्ष्मी येते. तिने नारायणांना वरमाला घातली.

लक्ष्मी-नारायणांचा जय असो!

आतापर्यंत नारायणांची दृष्टी जमिनीवर होती. लक्ष्मीने त्यांना वरमाला घातली तर ते इकडेतिकडे पाहू लागले.

ज्याच्याजवळ लक्ष्मी असेल त्याने आसपास सुद्धा पाहिले पाहिजे. सामान्यतः धन मिळाल्यावर लोक चोहोबाजूंकडे लक्ष देत नाहीत. मी, माझी बायको आणि मुलगा, बस्स, इतकेच. हे चांगले नाही. धनवंतांनी तर चोहीकडे पाहून सर्वच दीन, दुःखी जीवांचे दुःख दूर केले पाहिजे.



समुद्रमंथनाचे काम पुढे चालू झाले. दैत्यांना वाटले, एकदा घोडा मिळाला आणि नंतर सगळे

काही देवांना मिळाले. आता जे काही निघेल ते आम्हीच घेऊ. या वेळेला मदिरा निघाली. दैत्यांना मदिरा मिळाली. '' पीओ, बस्स पीओ! प्या, आणखी पीत रहा. ''

मंथन आणखी पुढे चालू झाले तेंव्हा भगवान् धन्वंतरी अमृताचा कुंभ घेऊन प्रगट झाले. दैत्यांनी तो घडा हिसकावून घेतला तर देवगण दुःखामुळे भगवंतांना शरण गेले. भगवंत म्हणाले, आता शक्ति नाही युक्तीने काम घेतले पाहिजे.

ज्या दैत्याच्या हातांत सर्वप्रथम अमृतकुंभ आला तो म्हणाला की, मीच प्रथम पिणार. त्याचा मोठा भाऊ म्हणाला, मीच प्रथम पिणार आणि मग सगळेच दैत्य त्या अमृतासाठी एक दुसऱ्याशी भांडू लागले. आपसांतल्या भांडणामुळे त्यांना अमृतकुंभ मिळू शकला नाही.

ज्यांच्या घरांत या दैत्यांप्रमाणे गृहकलह होऊ लागले त्यांच्या घरातील कोणालाच ज्ञानामृत आणि भक्ति-अमृत मिळत नाही.

भांडत असलेल्या दैत्यांमध्ये भगवंत मोहिनीचे रूप घेऊन प्रगट झाले. मोहिनीचें सौंदर्य पाहून दैत्य स्तिमित झाले. अहाहा! काय सौंदर्य आहे!

मोहिनी मोहाचेच रूप आहे. जो मोहिनींत आसक्त असतो त्याला अमृत मिळत तर नाहीच व अमृत मिळवण्याचे भानही राहात नाही. संसारातील प्रत्येक वस्तूत माया आहे. सौंदर्य तर कल्पनामात्र आहे. जी एक वस्तू तुम्हाला सुंदर वाटेल ती कदाचित दुसऱ्या कुणाला सुंदर वाटणारही नाही. सौंदर्य डोळ्यांत आहे. वस्तूचे ठिकाणी मनुष्यच सौंदर्याचा आरोप करीत असतो. सुंदर फक्त एक श्रीकृष्णच आहेत. जगात जे काही सुंदर दिसते ते सर्व श्रीकृष्णाच्या सुंदरतेमुळेच सुंदर आहे.

ज्याला मोहिनीचा मोह होतो त्याला अमृत– भक्तिरूप अमृत मिळत नाही. जो संसाराच्या मोहिनींत, सौंदर्य आणि विषयांच्या मोहांत अडकतो, त्याला अमृत मिळत नाही. परंतु ज्याचे मन मनमोहन श्रीकृष्णाकडे लागून राहते त्याला अमृत मिळते.

जोपर्यंत सांसारिक मोहिनीचा मोह असतो तोपर्यंत भगवंत मिळणार नाहीत. सांसारिक पदार्थांमध्ये मन जसे अडकलेले आहे तसे जोपर्यंत श्रीकृष्णाच्या स्वरूपांत अडकत नाही तोपर्यंत भक्ति फलद्रूप होत नाही. आणि भक्तीच्या सिद्धीशिवाय देव भेटत नाही. स्वरूप-आसक्तीशिवाय भक्ति सिद्ध होत नाही.

सांसारिक विषयांचा मोह सोडाल तर भक्ति होऊ शकेल. त्याला विवेकाने सोडायचे आहे.

जसजसे प्रभुप्रेम वाढत जाईल तसतशी विषयांबद्दल अरुचि होत जाईल. समुद्राची भरती आणि ओहोटी परस्पर विरुद्ध असतात. त्याचप्रमाणे प्रभुप्रेम वाढत गेले म्हणजे विषयासक्ति कमी होत जाईल. डोळ्यात काम ठेवून जगताकडे पाहाल तर मोह उत्पन्न होईल आणि डोळ्यात ईश्वराला ठेवाल तर मोहाचा नाश होईल.

सांसारिक स्वरूपांत आसक्ति हीच माया आहे. ईश्वराच्या स्वरूपात जी आसक्ति असते तीच भक्ति असते.

दैत्य कोण असतात? रस्त्यावरून जाणाऱ्या कोणत्याही स्त्रींत ज्याचे मन अडकते तोच दैत्य होय. जो परस्त्रीचे चिंतन करतो तो राक्षस आहे. कामातुर दैत्यांनी मोहिनीला घेरले आणि विचारू लागले: देवी, तू कोठून आली आहेस? तुझे गाव कोणते? तुझे लग्न झालेले आहे की नाही? मोहिनीच्या मायेमध्ये दैत्य आपली शुद्ध हरपून बसले.

भगवंत विचार करीत आहेत की या दैत्यांना अमृत न देण्यांतच कल्याण आहे. जर यांना अमृत

मिळाले तर त्यांना अमरत्व मिळून ते गर्विष्ठ होऊन आणखी पाप करतील.

मोहिनी हसत म्हणाली– 'मी तर तुमच्या कल्याणासाठीच आले आहे. माझें काही एक ठराविक घर नाही. माझी तर पुष्कळ घरे आहेत. जो कोणी पुरुष माझ्यावर प्रेम करतो त्याच्या घरी मी जात असते.

मी तुकारामाच्याही घरी जाते आणि नरसिंह मेहताच्याही घरी जाते. वैष्णवांची जितकी घरे आहेत ती सर्व नारायणाची देखील आहेत.

दैत्य मूर्ख होते म्हणून मोहिनीच्या शब्दांचा गूढार्थ समजू शकले नाहीत. ज्या दैत्याच्या हातांत अमृतकुंभ होता तो लालचावलेल्या डोळ्यांनी मोहिनीकडे पाहात होता. तो म्हणाला, 'मी हा कुंभ तुला भेट म्हणून देतो.' त्याला वाटले की यामुळे मोहिनी प्रसन्न होऊन त्याच्या घरी येईल. मोहिनीने त्याला विचारले, या कुंभात काय आहे? तर तो म्हणाला, 'यांत अमृत आहे.'

सौंदर्य कोणा जड वस्तूंत नाही. ज्याला पाहून विकार जागृत होतील ते सौंदर्यच नव्हे.

दैत्याने तो कुंभ मोहिनीच्या हातात दिला आणि म्हणाला की या अमृताचें वाटप देवी करील व आम्ही सर्व शांतपणे पिऊ. हात जोडून बसू. भांडणार नाही.

मोहिनी देवीने देव आणि दानवांना वेगवेगळ्या दोन पंक्तीत बसविले. प्रथम दैत्यांच्या जवळ जाऊन त्यांना म्हणाली, 'मी तुमचे कल्याण करण्यासाठी आले आहे, परंतु हे वरवरचे अमृत पाण्यासारखे आहे हे देवांना पाजून देते आणि खाली चांगले अमृत आहे ते मागाहून तुम्हाला पाजीन. चालेल ना?'

बिचारे मोहांध झालेले दैत्य म्हणाले, बरं! बरं. आम्ही तळाचे चांगले ते पिऊ. तुझ्या हातून एक थेंब जरी मिळाला तरी पुष्कळ होईल. ते मोहांध होऊन बुद्धि गमावून बसले होते. नाही तर एकाच घड्यांत दोन प्रकारचे अमृत कसे राहू शकते?

दैत्य म्हणाले: तुला जे योग्य वाटेल तेच कर.

मोहिनी देवी देवांना अमृत पाजू लागली. काही वेळाने घाबरून जाऊन दैत्यांना वाटू लागले, यांत काही छल-कपट दिसत आहे. राहू दैत्याला वाटले यांत काहीं ना काही कपट आहे. या स्त्रीवर विश्वास ठेवून आम्ही फार मोठी चूक केली आहे. असा विचार करीत तो देवांच्या बाजूला जाऊन बसला. जेणेकरून आपला हिस्सा आपल्याला मिळावा. राहू देवांच्या पंक्तित सूर्य आणि चंद्र यांच्या मधोमध जाऊन बसला.

मोहिनीला समजले की हा दैत्य आहे, परंतु पंक्तिप्रपंच न व्हावा या हेतूने राहूलाही अमृत दिले.

जेवणांत विषमता कधीच करू नका. जो पंक्तिप्रपंच करतो त्याला संग्रहणी नावाचा रोग होतो. जोपर्यंत पूर्वजन्मीचे पुण्य बलवान आहे तोपर्यंत पापाचें फळ मिळत नाही.

असाही विचार करा की जेव्हा इंद्रादि देवांना अमृत दिले जात होते तेव्हा तेथे राहू आला नाही, पण जेव्हा सूर्य-चंद्रांना ते अमृत दिले जाऊ लागले तेव्हाच राहू तेथे येऊन पोचला. मनाचा स्वामी चंद्र आहे. चंद्र मनाचें स्वरूप आहे. बुद्धीचा स्वामी सूर्य आहे. सूर्य बुद्धीचे स्वरूप आहे. हाताने किंवा जिभेने मनुष्य भक्ति करतो तेव्हा तिथे विषयरूपी राहू येत नाही. परंतु जेव्हा मनुष्य मनाने व बुद्धीने ईश्वराचें ध्यान करू लागतो तेव्हा विषयरूपी राहू बाधा करण्यासाठी तिथे येऊन थडकतो. मन-बुद्धीला ईश्वराच्या ध्यानांत लावले नाही तर तेथे राहू आलाच समजा. मन आणि बुद्धीला भक्तिरूपी अमृत मिळते ते विषयरूपी राहूला पाहवत नाही म्हणून विषयरूपी राहू विघ्न करायला येतो. या विषयरूपी राहूला ज्ञानचक्रानेच नष्ट करून टाका.

राहूने अमृत प्यायला सुरुवात केली होती. तोंच भगवंतांनी सुदर्शन चक्राने त्याचे डोके उडविले.

सुदर्शनचक्र अर्थात् ज्ञानरूपी सुदर्शनचक्राने विषय-राहूचा नाश करावा. परंतु फक्त ज्ञान आणि बुद्धीनेच विषय-राहू मरत नाही. ज्ञान आणि बुद्धीवर फार भरंवसा ठेवू नका. नुसत्या ज्ञानाने काही देखील होऊ शकत नाही. कारण राहू तर तसा अमर आहे. जोपर्यंत एखाद्या खऱ्या संताची कृपा होत नाही तोपर्यंत विषय-राहू मरत नाही.

केवळ ज्ञानाने विषयांचा नाश होत नाही. ईश्वराच्या अनुग्रहानेच मन निर्विषय होते. भगवंताच्या कृपेविना मन निर्विषय होऊ शकत नाही. ईश्वराच्या कृपेनेच निर्विषयता येते.

परमात्म्याची कृपा आणि साक्षात्कारानेच विषयासक्ति आणि विषयानुरागातून मन निवृत्त होऊ शकते.

दैत्य भगवंतापासून विन्मुख होते. म्हणून त्यांना अमृत मिळाले नाही.

संसाराच्या मोहिनींत अडकाल तर भक्तिरूपी अमृत कधीच मिळणार नाही.

मोहिनी देवीने सगळे अमृत देवांना पाजून रिकामा घडा दैत्यांच्या समोर ठेवला. दैत्यांनी ओरडायला सुरुवात केली : "कपट ! कपट ! विष्णुदेवा, तुम्ही साडी नेसून आलात ? तुम्हाला लाजही वाटली नाही ?"

देव आणि दानवांमध्ये भयानक युद्ध झाले. दैत्य पराजित झाले.

जो मोहिनीच्या मागे वेडा होऊन धावत सुटतो तोच दैत्य. संसाराच्या मोहिनींत गुंतणारा दैत्य असतो. दैत्यांचे तप आणि श्रम सांसारिक सुखासाठीच असतात. रावण आणि हिरण्यकशिपूने काय कमी तप केले होते ? परंतु त्याचे सर्व तप भोगविलासासाठी होते; भगवंतासाठी नाही.

नारदांनी कैलासावर जाऊन शंकरांना विचारले, 'तुम्ही नारायणाच्या मोहिनीरूपाचे दर्शन घेतले का ?" तेव्हा शंकर म्हणाले, "नाही." त्यानी नारदांकडून नारायणाच्या मोहिनीरूपाची माहिती घेतली आणि मोहिनीरूपाचें दर्शन घेण्यासाठी सपरिवार वैकुंठधामात गेले.

नारायणांनी शंकरांचे स्वागत करीत आगमनाचें कारण विचारले. शंकर म्हणाले की, ते त्यांच्या दर्शनासाठी आलेले आहेत. भगवंत म्हणाले, मी तर समोरच उपस्थित आहे. शंकर म्हणाले, 'मी तुमच्या मोहिनीरूपाचें दर्शन करू इच्छितो.'

प्रभु आपण तर कामदहन केले आहे. तरीपण असा मोह कां झाला ?

शंकर : मी तुमचे सर्वच अवतार पाहिले आहेत. म्हणून हा मोहिनी अवतारसुद्धा पाहू इच्छितो. (शंकर अनादि अनंत असल्यामुळेच असे म्हणत आहेत.)

प्रभूंनी लीला रचली. एक सुंदर उद्यान आणि त्यात फुलांचे गुच्छ हातात घेऊन, खेळत असलेली सौंदर्यवती युवती. शंकरांनी हे पाहिले आणि पार्वतीची उपस्थिती देखील विसरून गेले. भगवंताच्या मायेने शंकरसुद्धा मोहित झाले.

ज्याच्या डोक्यावर ज्ञानगंगा आहे आणि ज्याचें वाहन ज्ञान आहे त्याला काम काय प्रभावित करू शकेल ? परंतु शंकर हे दाखवू इच्छितात की भगवंताची माया पार करणे फारच कठीण कार्य आहे. भगवंतांनी श्रीमद्भगवद्गीतेंत हेंच सांगितले आहे.

माझ्या या मायेला पार करणे फार कठीण आहे. परंतु जो मला शरण येतो तो अनायासेच ही माया पार करून जातो.

शंकर देहभान विसरून गेले. दर्शन घेणारा देहभान विसरत असतो.

शंकरांना विचार आला की जर केवळ दर्शनानेंच एवढा आनंद मिळत आहे तर प्रत्यक्ष मीलन

किती आनंददायी असेल? आनंद अद्वैतातच आहे.

शंकर भेटीकरता आतुर होऊन धावले. ते मोठ्या प्रेमाने आलिंगन द्यायला गेले तर तेथे चतुर्भुज नारायण प्रगट झाले. हरि आणि हर यांचे मिलन झाले.

हरि आणि हर तसे तर एकच आहेत.

शंकरांनी कैलासावर परत येऊन उपदेश दिला: माझ्या श्रीकृष्णाची माया सर्वांनाच नाचवीत असते. मनाचा केव्हांहि भरंवसा धरू नका. ही माया केव्हा पतनाच्या गर्तेत फेकून देईल याचा कोणालाच पत्ता लागणार नाही. मी जितेंद्रिय आहे असा गर्वही करू नका. मनांत सूक्ष्मतेने लपलेले विषय संधी मिळताच प्रगट होत असतात. मायेच्या पड्द्याला दूर करण्यासाठी मनाला कष्टमय होऊ द्या.

मोठमोठे ऋषि-मुनीसुद्धा संयम पाळू शकले नाहीत. आज तर कलियुगच आहे. कलियुगांतील मनुष्य कामकीटक आहे. त्याला तर अधिकच सावध राहिले पाहिजे.

शंकर समजावतात की हरिस्मरण आणि हरिकीर्तन हेच माणसांना मोहिनीच्या मोहांतून वाचवू शकते.

सातव्या मन्वंतरांत श्राद्धदेव नावाचे मनु होऊन गेले. त्यांच्या काळात कश्यप आणि अदितीच्या घरी भगवान वामनाचा अवतार झाला.

परीक्षित राजा म्हणाला: मी सातव्या मन्वंतरातील वामन भगवंताची कथा ऐकू इच्छितो. मला त्यांचे चरित्र सांगा.

**५. वामन अवताराची कथा:**

शुकदेव वर्णन करतात:

राजा, देवांशी झालेल्या संग्रामात पराजित झाल्यावर दैत्यांनी शुक्राचार्यांचा आश्रय घेतला. शुक्राचार्यांच्या कृपेने दैत्यांचे बळ वाढू लागले. इन्द्रद्वारा पराजित झालेला बलिराजा संतांची सेवा करून पुनः बलवान् होऊ लागला. शुक्राचार्यांनी त्याला विश्वजित यज्ञ करायला सांगितले. विश्वजित यज्ञ केला तेव्हां त्या यज्ञांतून त्याला सर्वजित रथ प्राप्त झाला.

शुक्राची सेवा करणारा बलि होतो. शुक्र शक्तितत्त्वानें हे शरीर बनलेले आहे. ब्रह्मचर्याचे परिपूर्ण पालन करण्याने बलि व्हाल. शुक्राचार्य म्हणजेच संयम. ब्रह्मचर्याचे पालन करून संयमाने राहिल्यामुळे दैत्य बली बलवान झाला.

सगळ्याच विषयांचा यज्ञांत होम केला गेला. संयमरूपी यज्ञांत सर्व विषयांचा होम करून बलि-जितेंद्रिय व्हा. बलवान झालेल्या बलीला शुक्राचार्यांनी आपले ब्रह्मतेज दिले. बलिराजाने देवांचा पराभव केला. स्वर्गाचे राज्य दैत्यांनी हस्तगत केले. बलिराजाला इंद्रासनावर बसविले गेले.

शुक्राचार्यांनी विचार केला की बलि जर शंभर अश्वमेध यज्ञ करील तर स्वर्गाचे राज्य त्याला कायमचे मिळेल. यज्ञ करण्यासाठी बलि भृगुकच्छ (भरूच-भडोच) येथे आले. तेथे अश्वमेध यज्ञ केला.

बलिराजाने स्वर्ग जिंकून घेतला तेव्हा देवगण घाबरून जाऊन धावत-धावत आपले गुरु बृहस्पति यांचेजवळ येऊन पोचले. बृहस्पति म्हणाले, बलि जेव्हा भृगुवंशीय ब्राह्मणाचा अपमान करील तेव्हा तो नष्ट होईल.

इकडे देवांची आई अदिती दुःखसंतप्त झाली. कश्यप ऋषिंनी कारण विचारल्यावर तिने सर्व हकीगत सांगितली. अदितीने कश्यपांची खूप सेवा करून वर मागितला की माझ्या मुलांना स्वर्गाचें

राज्य परत मिळावे. कश्यप म्हणाले, दैत्य ब्रह्मचर्याचे पालन करतात, धर्माचे कवच घालतात, नीतीच ज्यांचे शिरस्त्राण आहे त्यांना कोण मारू शकेल? जीवाचे पापच त्याला मारीत असते, भगवंत नाही. दैत्य आता तर पवित्र जीवन जगत आहेत, तेव्हां त्यांना भगवंतही मारू शकत नाहीत. म्हणून भगवंत शक्तीने नाही, युक्तीने देवांना सुखी करण्याचा प्रयत्न करतील.

याच कारणाने वामन अवतारांत युद्धाची कथा नाही. भगवंतांनी देखील बलीला मारले नाही.

कश्यप म्हणाले– 'देवी, तू पयोव्रत कर. फाल्गुन महिन्यात हे व्रत करायचे आहे. विधिपूर्वक हे व्रत केल्याने स्वतः भगवंत तुझ्या घरी पुत्ररूपाने येतील. पति-पत्नींनी जोडीने ईश्वराची आराधना केली तर प्रभू लवकरच प्रसन्न होतील.'

सर्वच आश्रमात गृहस्थाश्रम श्रेष्ठ आहे. अदिती-कश्यपांचा गृहस्थाश्रम श्रेष्ठ होता.

गृहस्थ योगाभ्यास करीत नाही. तरी पण त्याला योगाचे फळ मिळू शकते.

जे लोक योगसाधना करू शकत नाहीत त्यांना गृहस्थाश्रमाच्या शास्त्रोक्त पालनाने योगाचे फळ मिळते. गृहस्थाश्रमांत धर्मच मुख्य आहे. कामसुख तर गौण आहे.

जेव्हापासून वरराजाची घोड्याच्या ऐवजी मोटारीतून वरात निघू लागली तेव्हापासून गृहस्थाश्रमांत गडबड सुरू झालेली आहे. आजकालच्या वरराजांना भीती वाटत असते की कोठे घोड्यावरून पडलो तर?

जो एका घोड्याला नियंत्रित करू शकत नाही, तो अकरा घोड्यांना– पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेन्द्रिये आणि मन यांना कसे नियंत्रित करू शकेल? गृहस्थाला तर या अकरा इन्द्रियांना नियंत्रणांत ठेवावेच लागते. संयम ठेवावा लागतो. विवाह विलासासाठी नाही. कामविनाशासाठी आहे.

सत्संगाने गृहस्थाश्रम सफल होतो. जो आनंद योग्याला समाधीत मिळतो तोच आनंद गृहस्थ घरीच मिळवू शकतो. परंतु यासाठी पति-पत्नीनी एकांतात कृष्णकीर्तन केले पाहिजे.

शास्त्रांत गृहस्थाश्रमाची तर पुष्कळच प्रशंसा केली आहे आणि जी निंदा केली आहे, ती वासनेची आहे.

कोणीही स्त्री किंवा पुरुष वाईट असत नाही, परंतु त्यांच्या मनांत लपून राहिलेली कामवासना वाईट असते. ही कामवासनाच सर्वनाश करते. महात्म्यांनी तर अनेक वेळा म्हटलेले आहे की गृहस्थांचा आनंद तर योग्यांच्या आनंदापेक्षा सुध्दा श्रेष्ठ आहे.

ईश्वराबरोबर खेळणारा श्रेष्ठ आहे की आपल्या मांडीवर प्रत्यक्ष ईश्वराला खेळवणारा श्रेष्ठ आहे? योगी परमात्म्याबरोबर खेळतो म्हणून श्रेष्ठतर आहे, परंतु गृहस्थही सामान्य नाही.

गृहस्थाश्रम बिघडतो कुसंगाने. गृहस्थाश्रमाचे लक्ष्य नीट न समजल्या कारणानेच तो बिघडत असतो.

कश्यप-अदितीचा गृहस्थाश्रम श्रेष्ठ होता, दिव्य होता. ते पवित्रतेने राहून तपश्चर्या करीत होते. म्हणून प्रभूंनी त्यांच्या घरी जन्म घेण्याचे ठरविले.

आज देखील कोणी स्त्री अदितिसारखे पयोव्रत करील आणि तिचा पति कश्यपासारखा होईल तर भगवंत त्याच्या येथे जन्म घ्यायला तयार आहेत.

अदितीचा अर्थ आहे अभेद बुध्दि– ब्रह्माकार वृत्ति. अशा वृत्तीतूनच ब्रह्माचे प्रकटीकरण होते.

कश्यपचा अर्थ आहे मन. ज्याची मनोवृत्ति ब्रह्माकार झालेली आहे तोच कश्यप असतो. जर पत्नी अदिती होईल आणि पती कश्यप होईल तर परमात्मा त्यांच्या घरी अवतार घेतील, प्रकट होतील.

योगी ब्रह्मचिंतनाद्वारे प्रभुमय होऊ शकतो, तर पवित्र गृहस्थ प्रभूला पुत्ररूपाने प्राप्त करू शकतो.

पवित्र गृहस्थाश्रमी युगुलाला भगवंत पुत्ररूपाने मिळू शकतात परंतु त्यांना कश्यप आणि अदितीसारखे व्हावे लागेल.

जोपर्यंत देहदृष्टि राहील तोपर्यंत काम मागोमाग येईल. कामाचा नाश करायचा असेल तर देहदृष्टीपेक्षा देवदृष्टि ठेवा.

शंकराचार्यांनी शतश्लोकीमधे म्हटले आहे की, लोक त्वचेची मीमांसा करतात पण या देहसौंदर्याला जो कारणीभूत आहे त्या आत्म्याची मीमांसा कोणी करीत नाही.

जग बिघडलेले नाही. मनुष्याचे मन, बुध्दि, दृष्टी या सर्वांत बिघाड झाला आहे. तुम्ही यांना सुधाराल तर जगही सुधारेल. कोणाकडेही भोगदृष्टीने पाहू नका, भगवत्दृष्टीनेच पहा. दृष्टी सुधारली तर सृष्टी देखील सुधारेल. भागवत डोळे आणि दृष्टी देते. कोणाचाही बाह्याकार पाहू नका.

एकदा जनक राजाच्या राजसभेत अष्टावक्र आले. त्यांची आठही अंगे वाकडीतिकडी पाहून लोक हसू लागले. अष्टावक्र लोकांच्या हसण्याला हसू लागले.

जनक राजाने मुनींना विचारले: महाराज, आम्ही तर आपल्या विचित्र देहाला पाहून हसत आहोत, पण आपण कोणत्या गोष्टीला हसत आहात ?

अष्टावक्राने उत्तर दिले— मी तर हे समजत होतो की, तुमच्या या सभेत सगळेच ज्ञानी विराजमान आहेत, परंतु मी आज पाहिले की, सगळेच्या सगळेच मूर्ख आहेत. तुम्ही सर्व माझ्या देहाला पाहात आहात. हा तर मातीचाच आहे. माझ्या आत्म्याला पहा. मी पवित्र ब्राह्मण आहे. तुम्ही सर्व माझ्या आकृतीला पाहून हसत आहात. परंतु मनुष्याच्या कृतीला पाहायचे असते, आकृतीला नाही. आकृति तर पूर्वजन्मीच्या प्रारब्धाने मिळत असते. तेव्हा माझ्या कृतीला पहा.

परमात्मा कृतीला पाहतात आणि मनुष्य आकृतीला.

ज्ञानी पुरुष अनेकांमध्ये एकाला पाहतात.

दिती म्हणजेच भेदबुध्दि, आणि अदिति म्हणजे अभेदबुद्धि, ब्रह्माकार वृत्ति. दिति-भेदबुध्दि राक्षसांना जन्म देते, जसे— हिरण्याक्ष आणि हिरण्यकशिपु. अदिती— अभेदबुद्धि भगवान वामनाला जन्म देते.

जगताला भेदभावाने नाही, अभेदभावाने पहा. ज्याच्या बुद्धीत भेद आहे त्याच्या मनांतही भेद आहे. भेद विकार-वासनेला जन्म देतो. ज्ञानी सगळ्यांनाच अभेदभावाने पाहतात. अनेकांत एकाचाच अनुभव करणे म्हणजेच तर ज्ञान होय.

आकारापेक्षा मूलभूत वस्तूचे मूल्य अधिक असते. किंमत सोन्याची असते. दागिन्यांच्या आकाराइतकी असत नाही.

एका महात्म्याजवळ सोन्याचा बनविलेला एक गणपति होता आणि सोन्याचाच एक उंदीर पण होता. महात्मा म्हातारे झाले तेव्हा विचार करू लागले की माझ्या मागे कदाचित या मूर्तीवरून माझे शिष्य भांडण करतील, म्हणून दोन्ही विकून मी देवाला नैवेद्य करून घेतो. त्यांनी त्या दोन्ही मूर्ति विकायला काढल्या. गणपतीची मूर्ति दोन तोळ्यांची होती आणि उंदराची मूर्ति अकरा तोळ्यांची. सोनार गणपतीच्या मूर्तिपेक्षा उंदराच्या मूर्तीची किंमत अधिक देऊ लागला. महात्म्याने आश्र्चर्याने विचारले, "अरे बाबा, गणपति तर देव आहे, आणि उंदीर तर एक जीवजंतू. तरी पण तू गणपतीच्या मूर्तीचे पैसे कमी का देत आहेस ?" सोनाराने सांगितले की, 'किंमत तर मी सोन्याची देत आहे, देवाची किंवा उंदराची नाही.

ज्ञानी पुरुष आकारावर ध्यान देत नाहीत. ते तर सृष्टीला निर्विकार भावाने पाहतात. आकाराने विकार उत्पन्न होतो. गोरा-काळ्याचा भेद उत्पन्न होतो. जोपर्यंत ही भेदबुध्दि आहे तोपर्यंत विकारवासना सुध्दा राहतील. अदिति ब्रह्मवृत्ति आहे. ब्रह्माकार वृत्ति आणि दृष्टी प्राप्त झाल्यावर परमात्मा मिळतात.

सगळ्यांत एकच वस्तू आहे. एकाचेच अनेक झाले आहेत. स्वप्नावस्थेप्रमाणे जागृतावस्थेत सुध्दा एकाचेच अनेक होतात. सगळ्यांच्या मुळाशी एकच आहे. म्हणून सगळ्यांमधे एकच पहा.

मनात ज्या वस्तूचे पुनःपुन्हा चिंतन होते तिचाच आकार मनांत स्थिर होतो. व्यापाऱ्याचे मन द्रव्याकारांत स्थिर झालेले असते, म्हणून तो स्वप्नातही रुपयेच पाहत असतो. याचप्रकारे भक्ताची वृत्ति भगवदाकार होत असते. एकाच स्वरूपाचे वारंवार ध्यान करा, स्मरण करा, चिंतन करा. पूजा सगळ्याच देवांची करा, पण ध्यान एका प्रभूचेच करा.

ज्याच्या डोळ्यांत अर्थात ध्यानांत पैसाच आहे तो प्रत्येक ठिकाणी पैसाच पाहात राहतो. एक शेठजी काश्मीरला गेले. तेथे त्यांनी गुलाबाच्या फुलांचा ढीग पाहिला. त्यांच्या मनांत हा भाव सुद्धां आला नाही की यात श्रीकृष्ण विराजमान आहेत, परंतु त्यांच्या मनात द्रव्यभाव होता. म्हणून त्यांनी विचार केला की, येथे गुलकंदाचे उत्पादन सुरू केले तर पुष्कळ फायदा होईल.

प्रभु अव्यक्त रूपाने फुलांत विराजमान आहेत. म्हणून सुगंध आहे. ते तर जळी, स्थळी, आकाशी, पाताळी सर्वत्रच अव्यक्त रूपाने विराजमान आहेत. म्हणून सर्वच वस्तूंमधे भगवद्भाव ठेवा.

दृष्टी भगवन्मय असेल तर प्रत्येक ठिकाणी भगवंत दिसतील. गोपींची दृष्टी परमात्म्यांत होती. त्या जेथे जेथे जात तेथे तेथे त्यांना कृष्णाचेच दर्शन होत असे. कृष्ण मथुरेत असत तरीही गोपींना ते गोकुळांतच दिसत.

गोपींनी उध्दवाला सुध्दा म्हटले, "तुम्ही कोणाचा संदेश घेऊन आला आहात? कान्हा तर आमच्याबरोबर येथेच आहे. आणि संदेश तरी काय आणला असेल? गोपींची वृत्ति कृष्णाकार, कृष्णमय झालेली होती.

गोपींना जाणवतच नव्हते की, श्रीकृष्ण त्यांना सोडून गेले आहेत. प्रत्येक गोपी तर असेच म्हणत असे, "मी जिथे जाते तिथे कान्हा तर माझ्याबरोबरच आहे." हे आहे गोपीप्रेम.

जीवाला भय असते. कारण त्याला ईश्वराच्या सान्निध्याचा अनुभव सतत होऊ शकत नाही. ब्रह्माकार वृत्ति अदिति हिचा कश्यपाशी संबंध झाला. कश्यप शब्दाचा अर्थ तर पहा. या शब्दाला उलटा वाचाल तर होईल 'पश्यक.' उपनिषदानुसार "क" चा अर्थ आहे ईश्वर, आणि पश्यचा अर्थ आहे पाहणे. अर्थात सगळ्यांमधे एका ईश्वरालाच पाहणारा 'कश्यप' आहे.

जेव्हा कश्यपाची वृत्ति ब्रह्माकार झाली, ब्रह्ममयी झाली तेव्हा परमात्म्याला प्रकट व्हावे लागले.

गृहस्थाश्रम भक्तीत बाधक नाही, साधक आहे. बाधक आहे ती गृह-आसक्ति! गृहस्थाश्रमांत कामासक्ति, द्रव्यासक्ति, विषयासक्तीच बाधारूप आहेत. संसारातील कोणत्याच वस्तूत खरे सुख नाही. खरा आनंद आहे एकमात्र ईश्वरांतच.

संसारातच सुख आहे असे जोपर्यंत मानत राहाल तोपर्यंत भक्तीत मन लागणार नाही. जर सांसारिक विषयांतच खरे सुख असते तर झोपेची आवश्यकताच का पडली असती? विषयाचा त्याग झाल्यावर-विसरल्यावर झोपेची इच्छा होणे हे दर्शविते की विषयांत सुख नाही.

ज्याप्रमाणे आपण दररोज अन्नाचे सेवन करतो त्याचप्रमाणे रोज सत्संगाची देखील आवश्यकता असते.

ईश्वराच्या प्रकाशाशिवाय जडप्रकृति काहीच करू शकत नाही.

भगवंत गीतेत म्हणतात, 'मी अविनाशी, अजन्मा आणि सर्व भूतप्राण्यांचा ईश्वर आहे. तरी पण आपल्या प्रकृतीच्या आधीन राहून मी योगमायेने प्रगट होत असतो.'

स्वरूपचैतन्य प्रकाश देते, परंतु दुःख दूर करू शकत नाही.

अंतर्यामीच्या रूपाने ईश्वर सगळ्यांतच वसलेला आहे तरीही जीव दुःखी आहे. केवळ स्वरूपचैतन्य, अज्ञान आणि दुःख निवारण करू शकत नाही. आतील निराकार आणि बाहेरील साकार स्वरूप एकत्रित होऊन प्रकट होईल तेव्हाच भगवान वामन अवतीर्ण होतील.

अदितीने पयोव्रत केले. तिला रात्री स्वप्नांत चतुर्भुज नारायणाचे दर्शन झाले. अदितीने स्वप्नावस्थेतच वंदन केले. स्तुति केली – 'जगत्-पति! लक्ष्मीपति! तात्त्विक दृष्टीने तर आपण माझेही पति आहात.'

भगवंत तिला म्हणाले, 'माझे चतुर्भुज रूप पहा, माझ्या या स्वरूपाचे सतत आपल्या पतींत ध्यान करशील तर मी तुझ्या येथे पुत्ररूपाने येईन.'

वेदात अदिति शब्द वारंवार आला आहे. अदिति अर्थात अभेदबुध्दि – ब्रह्माकार वृत्ति. एकाच स्वरूपाचे वारंवार चिंतन केल्याने ते मनात पूर्णपणे ठसून जाते.

अदिति आणि कश्यप नारायणाचे ध्यान करू लागले. त्यांची वृत्ति नारायणाकार होऊन गेली आणि त्यांच्या येथे नारायण आले. अदिति गर्भवती झाली. नऊ महिने पूर्ण झाले तेव्हां अदिति तन्मयतेने प्रार्थना करू लागली, 'भगवान , केव्हा प्रगट व्हाल ?' आतुरतेशिवाँय भगवंताचा अवतार होत नाही. या जीवाच्या मनांत जोपर्यत इतर इच्छेचे अस्तित्व असेल तोपर्यंत भगवंत येणार नाहीत.

परमपवित्र वेळ आली. भाद्रपदाच्या शुक्ल पक्षाच्या द्वादशीच्या दिवशी मध्यान्ह काळी अदितीसमोर भगवान वामन प्रगट झाले. चोहोकडे प्रकाश फाकला. हृदय आनंदाने भरून गेले. कश्यपसुध्दा वामनांचे दर्शन करण्यासाठी धावतच आले.

माता-पित्यांना भान यावे या हेतूने वामनांनी आपल्या चतुर्भुज रूपाचे दर्शन दिले. मातापित्यांची हृदये आनंदाने भरून गेली होती. आनंद आंत मावत नव्हता. त्यांची मूक हृदये भगवंताचा जयजयकार करीत होती.

नारायणाचे चतुर्भुज रूप अदृश्य झाले आणि ते सात वर्षांचे बटु वामन बनून गेले. सुंदर लंगोटी होती. मुखावर दिव्य तेज चमकत होते. ब्रह्मादि देवसुध्दा तेथे आले. त्यांनी कश्यप-अदितीचे अभिनंदन करून म्हटले – 'तुमचा गृहस्थाश्रम सफल झाला आहे– सार्थक झाला आहे. आज तर तुम्ही जगाच्या पित्याचेही मातापिता झाले आहात!'

कश्यप-अदितींचा गृहस्थाश्रम अत्यंत पवित्र होता म्हणून भगवंत त्यांच्याच येथे प्रगट झाले. जेंव्हा वामन प्रगट झाले तेव्हाच ते सात वर्षांचे होते म्हणून त्यांच्या बाललीलांचे वर्णन नाही. त्यांचा व्रतबंध करून यज्ञोपवीत घालण्याचा निश्चय केला गेला.

जानवे घातले म्हणजे ब्रह्मसंबंध होतो. मंत्रदान करणारा पिता पुत्राला म्हणतो की, आजपासून तू आमचा नसून ईश्वराचा झालेला आहेस. त्या दिवशी आईबरोबर त्याचे शेवटचे जेवण केले जाते. या पवित्र विधीनंतर मुलाचे मातापिता होतात सूर्यनारायण आणि गायत्री देवी. व्रतबंध-मौंजीबंधन वेदविहित कर्म आहे. मी नारायणाचा सेवक आहे. जानव्यात प्रत्येक देवाची स्थापना केलेली असते.

आजकालचे लोक मौंजीबंधन संस्कार इत्यादीत विश्वास ठेवत नाहीत. संस्काराशिवाय जीव शुध्द होत नाही. लोक सगळेच संस्कार विसरून गेले आहेत. फक्त विवाहसंस्कार काय तो शिल्लक

राहिला आहे. कारण याशिवाय कोणालाही राहवत नाही. संस्काराचा लोप झाल्यामुळे अधार्मिक आणि पापी प्रजा उत्पन्न होत आहे.

तैत्तिरीय आरण्यकांत जानवे तयार करण्याचा विधि सांगितला आहे. ते हातानेच तयार केले पाहिजे. एकंदर ९६ वळसे सूत घ्यावे लागते. वेदात कर्म आणि उपासनेशी संबंधित ९६००० मंत्र आहेत. ते शिकण्याचा अधिकार मौंजीबंधनाच्या संस्कारांत मिळतो. तसे तर वेदाचे एक लक्ष मंत्र आहेत, परंतु बाकीचे ४००० मंत्र संन्याशांसाठी आहेत. जानवे निर्माण करणारे ब्रह्मदेव आहेत आणि त्याला त्रिगुणातीत करणारे आहेत विष्णू. यांचे गठबंधन शंकर करतात आणि अभिमंत्रण गायत्री देवी करते. हे दिव्य तेजाने परिपूर्ण आहे. तसा तर हा संस्कार सातव्याच वर्षांत करायला पाहिजे, परंतु अकराव्या वर्षापर्यंत करण्याची अनुमति आहे.

जानव्याच्या एकेका सुतांत एका एका देवीची प्रतिष्ठा केली जाते, म्हणून याला लोखंडाचा स्पर्श होऊ नये. यांत किल्ली बांधू नये. आजकालचे ब्राह्मण जानव्याला किल्ली अडकवून फिरतात. असे करणे ठीक नाही. असे केल्याने सर्वच देव-देवी स्थान सोडून निघून जातात.

संस्कारांची परंपरा नाहीशी झाली आहे. म्हणून प्रजेत सदाचार आणि संयमाचा अभाव झालेला आहे. आमच्या कल्याणासाठीच तर प्राचीन ऋषींनी संस्कारांची रचना केली होती.

वामनांचेही मौंजीबंधन करून त्यांना जानवे घातले गेले. त्यांना अदितीने लंगोटी, धरतीमातेने आसन, ब्रह्मदेवाने कमंडलु, सरस्वतीने जपमाळ तर कुबेराने भिक्षापात्र दिले. ब्राह्मणाला तीनदा संध्या करायचा आदेश आहे. महाप्रभूंनी सुध्दा तीन वेळा संध्या करून जगाच्या समोर हा आदर्श स्थापित केला की ते महान असून सुध्दा तीन वेळेला संध्या करीत होते.

प्रातःसंध्येने रात्रीचे पाप नष्ट होते. मध्यान्ह संध्येने अन्नपाण्याचा दोष नाहीसा होतो. त्रिकाळ संध्येचे मोठे माहात्म्य आहे. संध्येच्या वेळी सूर्याचा जप करीत जगदंबा गायत्रीमातेचे ध्यान करावे. संध्येत गायत्रीमातेला आवाहन करावे– 'हे माते, माझ्या ह्रदयांत ये, माझे रक्षण कर.'

संध्येत अघमर्षण करायचे असते, ध्यान करायचे असते. संध्या नियमित आणि वेळेवरच झाली पाहिजे. आकाशात तारे असतानाच केलेली संध्या उत्तम संध्या आहे. नक्षत्र दिसत नसता आणि सूर्यनारायणाचा उदय झालेला नसता केलेली संध्या मध्यम आणि सूर्योदयानंतर केलेली संध्या अधम संध्या होय.

बृहस्पतीने वामनाला उपदेश दिला. 'आता आजपासून माधुकरी (भिक्षा) मागायला जायचे आहे.' या अन्नात माधुर्य असते. मंत्रोपदेशाबरोबरच ब्रह्मचर्याचा धर्मही समजवून सांगितला.

जेव्हापासून ब्रह्मचर्याची परंपरा आमच्या देशांतून नष्ट झाली आहे तेव्हापासून या देशाची दुर्दशा झाली आहे. ब्रह्मचर्यपालनाविना कोणीही महान झाला नाही, होणार नाही.

जो ब्रह्मचर्यपालनाची इच्छा करतो त्याने सजीव स्त्रीच काय, परंतु काष्ठाच्या स्त्री-मूर्तीलाही स्पर्श करू नये; मनानेही स्पर्श करू नये.

जर ब्राह्मचर्यपालन करायचे असेल तर स्त्रीच्या मुखाकडे किंवा केशकलापाकडे पाहू नका. त्यात काम वास करीत असतो. ही स्त्रीची निंदा नाही. कामाची निंदा आहे. परस्त्रीला मातेसारखी समजा. जगांत जेवढे म्हणून महापुरुष होऊन गेले आहेत त्यांनी परस्त्री मातेसमान मानली आहे. ते ब्रह्मचर्याच्या पालनाने महापुरुष झाले होते.

लक्ष्मणाने चौदा वर्षांच्या वसवासांत सीतामाऊलीच्या चरणांचेच दर्शन घेतले होते अन्य कांहींच

पाहिले नव्हते. एकदा रामचंद्रांनी एक चंद्रहार लक्ष्मणाला दाखवीला आणि त्यांना विचारले 'हा हार तुझ्या वहिनीचा आहे का?

तेव्हा लक्ष्मण म्हणाले: मला काय ठाऊक? मी वहिनीचे तोंड कधीच पाहिलेले नाही.

रामचंद्रानी इतर दागिन्यांविषयींही तसेच प्रश्न विचारले, तर लक्ष्मण म्हणाले:

मी हारही ओळखत नाही अन् कुंडलेही ओळखत नाही. मी तर फक्त त्यांची नूपुरे ओळखतो. कारण ती, मी नित्य नमस्कार करीत असता मला दिसत असत.

कसे आदर्श ब्रह्मचर्यपालन होते त्यांचे!

कामाला पराजित करणे फार कठीण आहे, म्हणून ब्रह्मचर्याची फार प्रशंसा केली गेली आहे.

जेव्हा भगवान व्यास भागवताची रचना करीत होते तेव्हा ते श्लोकांची रचना करून आपले शिष्य जैमिनी यांना तपासायला देत असत. त्या वेळी जैमिनीने नवव्या स्कंधातला हा श्लोक पाहिला–

**"बलवानिन्द्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति।'**

"इन्द्रिये इतकी बलवान असतात की मोठमोठे विद्वान देखील त्यांच्यायोगे विचलित होतात."

हा श्लोक वाचून जैमिनीला वाटले की व्यासांची यात काही तरी चूक झाली आहे. इन्द्रिये काय कधी विद्वानांनासुद्धा विचलित करू शकतात? त्यांनी व्यासांना म्हटले: या श्लोकांत **"विद्वांसमपि कर्षति"** च्या जागी **"विद्वांसंनापकर्षति"** लिहायला पाहिजे.

व्यास म्हणाले मी जे लिहिले आहे ते बरोबरच आहे. त्यात काही चूक वाटत नाही.

एक दिवस जैमिनी संध्या संपवून पाणी टाकण्यासाठी बाहेर जात होते. तर त्यांनी झाडाखाली एक सुंदर युवति पावसांत भिजत असताना पाहिली. भिजलेल्या वस्त्रांतून ओथंबलेले सौंदर्य पाहून जैमिनी विचलित झाले आणि त्या सुंदरीला म्हणाले: "ही झोपडी तुझीच तर आहे! आत ये आणि आश्रमात विश्रांती घे.'

सुंदरी: 'पुरुष कपटी असतात. मी तुमचा विश्वास कसा करू?'

जैमिनी म्हणू लागले: मी तर पूर्वमीमांसेचा आचार्य जैमिनी ऋषि आहे. काय, माझ्यावरही तू विश्वास ठेवणार नाहीस? माझ्यासारख्या तपस्व्यावर भरवसा नाही तर मग कोणावर भरवसा करशील? ही तुझीच झोपडी आहे. आश्रमात विश्रांती घे.

ती सुंदरी आश्रमात आली. बदलण्यासाठी तिला दुसरी वस्त्रे दिली. जैमिनीच्या नजरेस सुस्पष्ट रूप पडले व त्यांचे मन आणखीच लालचावले. त्यांनी त्या स्त्रीला विचारले, तुझे लग्न झाले आहे का? ती अविवाहित असल्याचे तिने सांगितले म्हणून जैमिनीनी विवाहाचा प्रस्ताव मांडला असल्याचें तिने सांगितले.

ती युवति म्हणाली, माझ्या वडिलांनी अशी प्रतिज्ञा केली आहे की जो पुरुष घोडा बनून माझ्या मुलीला अंबामातेच्या दर्शनाला घेऊन जाईल त्याच्याबरोबरच तिचा विवाह करीन आणि मी पण वडिलांना सांगितले आहे की, तुमच्या जावयाचे तोंड काळे करून त्यांना घेऊन येईन.

जैमिनीने विचार केला की भलेही घोडा बनावे लागो आणि तोंडही काळे करावे लागो, पण ही सुंदरी तर माझीच होईल ना? ते सर्व काही करायला तयार झाले.

पुरुष परस्त्रीला कामभावनेने पाहील तर त्याचे तोंड काळे होत असते.

जैमिनीने घोडा बनून त्या स्त्रीला आपल्यावर स्वार करून घेतले आणि ही अभूतपूर्व स्वारी अंबेच्या मंदिरांत आली. त्या मंदिराच्या चबुतऱ्यात व्यास बसलेले होते. त्यांनी सर्व जाणून जैमिनीला

विचारले: त्या श्लोकांत कोणता शब्द पाहिजे होता 'कर्षति' की 'नापकर्षति'?

आता जैमिनीच्या मनावर जणू काय वीजच पडली. ते व्यासांना म्हणाले– 'तुमचेच म्हणणे खरे आहे.' **विद्वांसमपि कर्षति** हेच बरोबर!

क्षणमात्र गाफिल राहू नका. गाफिल राहिलात तर काम डोक्यावर चढलाच समजा. ज्ञानी असूनही जैमिनी गाफिल राहिले. त्या सुंदरीला 'तुझे लग्न झाले आहे किंवा नाही? हा प्रश्न त्यांनी केलाच कां? ऋषीचा अवतार परोपकारासाठी असतो, अनावश्यक गोष्टींची चौकशी करण्यासाठी नाही.

कामामुळे मोठमोठे ज्ञानीसुद्धा पथभ्रष्ट होऊन गेले आहेत तर मग सामान्य माणसाची गोष्टच ती काय?

भतृहरीने सुद्धा म्हटले आहे:

वृक्षांची पाने आणि जलमात्र पिऊन निर्वाह करणाऱ्या ऋषिंना देखील कामाने विचलित करून टाकले, तर जिभेचे लाड पुरविणारा आणि सिनेमांच्या नटींची रात्रंदिवस पूजा करणारा आजचा मनुष्य कामावर विजय मिळविण्याचा प्रयत्न करील तर तो निरर्थकच ठरेल.

ज्याला ब्रह्मचर्याचे पालन करायचे आहे त्याने आपल्या पोटांत कधी अर्जीर्ण होऊ देऊ नये. भेळपुरी आणि फरसाण-भजी खाणारा ब्रह्मचर्याचे पालन कसे करून शकेल?

श्रीकृष्णाला दुर्बलता आवडत नाही.

म्हणून ब्रह्मचर्याचे पालन करा आणि बलवान व्हा.

स्त्रीचे तोंड किंवा केस केव्हांही टक लावून पाहू नका. डोळ्यांत किंवा मनांत विकार आल्याबरोबर गायत्रीचा जप करा. मनरूपी हत्तीला सत्कर्मरूपी अंकुशच काबूत ठेवू शकतो.

वामन जगदंबा पार्वतीजवळ जाऊन म्हणाले– '**ॐ भगवति भिक्षां देहि मे।**' पार्वतीने दिलेली भिक्षा त्यांनी गुरूसमोर ठेवली. गुरु म्हणाले, भिक्षा फार कमी आहे. तर वामनांनी कोणा मोठ्या बड्या यजमानाचें नाव-पत्ता विचारला. बृहस्पतींनी आज्ञा केली कीं नर्मदेच्या किनाऱ्यावर बलिराजा अश्वमेध यज्ञ करीत आहे. त्यांच्याकडून तुला अवश्य चांगली भिक्षा मिळेल. तिथे जा.

वामनांनी त्याच स्थितींत प्रयाण केले. लंगोटी नेसलेले आहेत. पायांत पादुका आहेत, हातांत कमंडलु, छत्र आणि दंड. कमरेवर मुंजमेखला आहे, बगलेंत मृगचर्म, डोक्यावर जटा, गळ्यांत जानवे आणि मुखावर ब्रह्मतेज झळकत आहे.

एखाद्या अपरिचित व्यक्तीला अनायासेच नमस्कार केला गेला तर समजा की त्या व्यक्तींत ईश्वराचा अंश आहे.

अपरिचित असूनही वामनांना मार्गात सर्वजण नमस्कार करीत चालले आहेत. ते नर्मदेच्या काठी यज्ञमंडपांत पोचले. ब्रह्मतेज लपत नाही. यज्ञमंडपांत उपस्थित असलेले ऋषिमंडल विचार करू लागले कीं आजपर्यंत असा ब्रह्मतेजस्वी कधीच पाहण्यात आलेला नाही! प्रत्यक्ष सूर्यनारायण तर या रूपांत आलेले नाहीत ना? हा ब्राह्मणकुमार कोण असेल?

श्रीशंकराचार्यांना विचारले होते की जगांत भाग्यशाली कोण असतो? आचार्यांनी उत्तर दिले होते– जो लंगोटी नेसतो, जितेन्द्रिय आहे, सदासर्वदा प्रभूशीच गोष्टी करतो, प्रभूबरोबरच खेळतो, राहतो तोच सर्वाधिक भाग्यशाली आहे. जो धनसंपत्ति आणि देहाबरोबरच खेळत राहतो तो भाग्यहीन आहे, असे समजावे.



या अपरिचित बालकाविषयी ब्राह्मण विचारच करीत होते इतक्यांत यज्ञाचे प्रधानाचार्य शुक्राचार्यांनी

वामनाचे स्वागत केले. या महातेजस्वी बटूचे शुक्राचार्यांसमवेत सर्वच ऋषींनी स्वागत केले.

ब्राह्मणाला ब्रह्मतेज आणि ज्ञानामुळेच सन्मान मिळत असतो. क्षत्रियांना बलाने आणि वैश्यांना धनसंपत्तीने सन्मान मिळतो. शूद्रांत वृद्धांना मान मिळतो. शेठ सावकार वाटेल तितकी काळी कमाई करो, तरी पण कथेत सुद्धा त्यांना पुढे आसन दिले जाते. उशिरा आले तरी पुढे बसविले जाते. हा मान शेठजींचा नसून लक्ष्मीचा आहे.

चारी वर्णांची दिवाळी सुद्धा निरनिराळी झालेली दिसते. ब्राह्मणांची दिवाळी राखीच्या दिवशीं, क्षत्रियांची विजयादशमीच्या दिवशी आणि वैश्यांची लक्ष्मीपूजनाचे दिवशीं, तर शूद्रांची होळीच्या दिवशी दिवाळी असते.

ब्राह्मणांनी त्या ब्रह्मचारी बटूचे स्वागत केले तेव्हां बळीराजासुद्धा पाहू लागला. त्याने मनाशीच म्हटले, 'मी आजपर्यंत कित्येक ब्राह्मणांची सेवा केली परंतु असा तेजस्वी तर कोणी पाहण्यांत आला नाही!' त्याने वामनांना महालांत नेले, सिंहासनावर बसविले आणि राणीला पूजासाहित्य तयार करण्याची आज्ञा दिली.

बलिराजाच्या पत्नीचें नाव होते विंध्यावली आणि मुलीचे नाव होते रत्नमाला. बटूच्या सौंदर्याने प्रभावित होऊन रत्नमाला म्हणू लागली, 'ज्या आईने याला दूध पाजले असेल ती किती भाग्यशाली आणि सुखी असेल? बटूला पाहून तिच्या मनांत वात्सल्यभाव जागृत होऊन दूधही पाजण्याची इच्छा झाली; आणि पुढे जाऊन जेव्हा वामनांचा पराक्रम पाहिला तेव्हां त्यांची हत्याही करण्याची इच्छा उत्पन्न झाली. रत्नमाला आपल्या या दोन परस्परविरोधी भावनांना घेऊनच पुढल्या जन्मीं पूतना बनून आली आणि तिने कान्ह्याला आपले दूध पाजून मारण्याचा प्रयत्न केला, परंतु तिचाच उद्धार झाला.

वामनांच्या चरणांवर विंध्यावली पाणी घालू लागली, बलिराजा चरण धुवू लागला आणि सर्वच ब्राह्मण पुरुषसूक्ताचा पाठ करू लागले. चरणसेवा करता करता राजा म्हणू लागला – आपल्यासारख्या पवित्र ब्राह्मणाचे चरणोदक मिळाल्याने मी पवित्र झालो आहे आणि माझ्या पितरांनाही सद्गति मिळाली आहे. माझा यज्ञ सफल झाला आहे. आज माझे कल्याण झाले आहे. मी आपल्या चरणी पुनःपुन्हा नमस्कार करीत आहे. मोठ्या पुण्यशील मातापित्यांनाच तुमच्यासारखे पुत्ररत्न प्राप्त होऊ शकते. मला वाटते कीं माझे सर्व कांही आपल्याला अर्पण करून वनवासी होऊन मी ईश्वरभजनांत लीन होऊन जावे.

वामन मनांत म्हणाले: मी सगळे काही घ्यायलाच तर आलो आहे.

राजाने त्यांना म्हटले: असे वाटते कीं आपण काही मागू इच्छिता. जे काही पाहिजे असेल ते निःसंकोचपणे मागून घ्या. राज्य, गाय, कन्या, धन-संपत्ति इत्यादी जे कांही मागाल ते मी देईन. पुनःपुन्हा बलिराजाने हीच प्रार्थना केली.

शुकदेव वर्णन करतात. राजा, अतिशय आनंदी झाला आहे.

ज्याच्याजवळ काही मागायचे असेल त्याच्या पितरांची प्रशंसा करा. आजकाल तर त्याच्या बायकोची प्रशंसा केल्यानेही पुष्कळ मिळू शकते.

वामनसुद्धा बलिराजावर प्रशंसेची फुले उधळू लागले. तुमचे पितामह प्रल्हाद यांच्यासारखे महान भक्त आजपर्यंत कोणी झाले नाही आणि होणारही नाही. त्यांचे प्रभुप्रेम इतके प्रबल होते की भगवंतांना स्तंभ फोडून प्रगट व्हावे लागले. मी ऐकले आहे, तुमचे वडील राजा वीरोचनसुद्धा फार उदार व्यक्ति होते. त्यांचेकडे इंद्र ब्राह्मणाचे रूप घेऊन आला आणि म्हणू लागला– "राजा, माझे आयुष्य आता

संपत आले आहे. माझ्या मृत्यूमुळे माझी बायको विधवा होईल. तुमच्या आयुष्याचे मला दान करा. दान मागायला आलेल्या ब्राह्मणाला निराश कसे करायचे? तर तुझ्या पित्याने आपल्या आयुष्याचेच दान करून दिले. तुमचे प्रपितामहसुद्धा महान वीर होते.''

बलिराजा विचार करू लागला की हा बटु वाटतो तर सात-आठ वर्षांचाच, पण गोष्टी तर माझ्या पिता, पितामह आणि प्रपितामहाच्या करीत आहे. त्याने वामनांना विचारले की, महाराज, तुम्ही काय माझ्या त्या पितरांना पाहिले आहे?

वामनः ''मी तर आठच वर्षांचा आहे. मी त्यांना कसा पाहू शकेन? मी तर आपल्या वडीलधाऱ्या लोकांकडून त्यांच्या कथा ऐकल्या आहेत. आणि हो, राजा तुम्ही देखील काही कमी नाही. तुमच्यातही आपले प्रपितामह हिरण्यकशिपुसारखे बलवीर्य आणि शक्ति आहे. तुमच्यांत तुमचे पितामह प्रल्हादांसारखी भक्ति आहे आणि पिता वीरोचनासारखी उदारतापण. तीनही पितरांचे गुण तुमच्यांत एकाच वेळी आलेले आहेत. तुम्ही फार भाग्यवान आहात.''

आपली आणि आपल्या पितरांची प्रशंसा ऐकून बलिराज पुनः वामनांना म्हणाला– ''जी काय इच्छा असेल ती मागून घ्या. आपण जे काही मागाल ते मी द्यायला तयार आहे.''

बलिराजाला वामनांनी वचनबद्ध करून घेतले आणि म्हणू लागले– ''राजा, मी लोभी नाही. संतोषी ब्राह्मण आहे. मी तर माझ्या या पावलांनी मोजून फक्त तीन पावले जमीन मिळवण्याची इच्छा धरून आलो आहे.''

बलिराजाने विचार केला की या बालकाला मागताही येत नाही. ज्ञानी आणि शिकलेला तर आहे, पण बालबुद्धीच आहे! आणि म्हणू लागला, महाराज तुम्ही एवढेच कां मागितले? मी तीन पावलेच काय तीन गावे देऊ शकतो तुम्हाला. हे जगप्रसिद्धच आहे की मी पूजन इत्यादी करून ज्या ब्राह्मणांना दान देत असतो त्याला इतर कोणाकडून काहीही मागावे लागत नाही. माझे दान स्वीकारून तुम्हाला आणखी कोणाकडून काही मागावे लागले तर तो माझाच अपमान होईल. मी तर आपल्याला पाहूनच हे जाणले होते की आपण संतोषी ब्राह्मण आहात. परंतु फक्त तीन पावले भूमी देण्यात मला संकोच आणि लाज वाटत आहे.

वामन म्हणाले– 'राजा, धन्य आहे तुझी! तू असेच म्हणशील यात काही आश्चर्य नाही. राजा! तू तर उदार आहेस. परंतु मला सुद्धा मागताना काही विचार करायला हवा ना? लोभाने लोभ वाढतो आणि संतोषाने संतोष. जगातील सगळेच भोगपदार्थ मिळवूनसुद्धा संतोष आणि वैराग्याच्या अभावी शांति मिळत नाही. लोभ तर पापाचे मूळ आहे. संग्रह वृत्तीने ब्राह्मणाने दान घेऊ नये. ब्राह्मणाने जर संग्रहवृत्तीने दान घेतले तर यजमान देखील पापाचा धनी होईल. अतिसंग्रह विग्रहाला जन्म देत असतो. मला अधिक कांही नको.'

भागवत सांगते की, आपल्या उत्पन्नाच्या पंचमांशाचे दान द्यावे. मनूने दशमांशाचें दान करायला सांगितले आहे. घरांत येणारे सर्व धन शुद्ध असत नाही. दानाने त्याची शुद्धि होते.

भिकारी फक्त भीक मागायला येत नाही, उपदेश द्यायला सुद्धा येत असतो. तो म्हणतो, मी मागल्या जन्मात कोणाला काहीच दिले नव्हते याच कारणाने माझी अशी दुर्दशा झाली आहे. तुम्ही दिले नाही तर तुमचीही अशीच दुर्दशा होईल.

राजा, मी आणखी कोणाकडे दान घ्यायला गेलो नाही. मी तर संतोषी ब्राह्मण आहे. तू भाग्यशाली आहेस की मी तुझ्या दारीं आलो आहे.

आज मी एका शेठजीच्या अंगणांत बसून पूजा करीत होतो, तर त्याने मला येथून हाकून लावले. माझी संध्यापूजा अपूर्णच राहिली. काही लोक अंगणांत बसलेल्या लोकांना हाकलून देतात. 'उठा इथून, हे अंगण आमचे आहे.' मूर्ख आहेत ते! ते काय अंगण आपल्या बरोबर घेऊन जाणार आहेत?

या संसारात आपले काय आहे आणि काय नाही हे जर मनुष्य जाणून घेईल तर तो सुखी होईल.

अंगणांत आलेल्या कोणाही माणसास विचारले पाहिजे– 'पाणी प्यायचे का?' हं, ठग आणि धूर्तापासून सावध राहिले पाहिजे. असे लोक दिवसा घर पाहून रात्री चोरी करायला येत असतात.

वामन म्हणाले– जेव्हा माझी संध्या अपुरीच राहिली तेव्हा मी विचार केला की माझी आपली थोडीशी जमीन असली तर मी संध्यापूजा तरी करू शकेन. तुला याचेसुद्धा पुण्य मिळेलच. मी ब्रह्मचारी आहे. फक्त तीन पावले भूमीचेच दान मला दे.

बलिराजाला आनंद झाला. चला, माझी जमीनसुद्धा या पवित्र ब्राह्मणाच्या संध्ये-पूजेने पवित्र होईल. कसा विरागी आहे हा ब्राह्मण! मी आपले सर्वस्व द्यायला तयार आहे तरी पण हा घेत नाही. वामनांना तो म्हणू लागला: महाराज, जशी आपली इच्छा! आपल्या इच्छेनुसार तीन पावले जमीन मी आज आपल्याला देतो. परंतु भविष्यांत सुद्धा तुम्हाला आणखी कोणत्या वस्तूची आवश्यकता वाटली तर माझ्याच जवळ मागा. आपली सेवा करायची संधी आपण मला देत राहावे.

वामन म्हणाले: भविष्याची गोष्ट भविष्यात. आज तर मला फक्त तीन पावले भूमी पाहिजे.

बलिराजा तीन पावले भूमि दान करण्याचा संकल्प करायला तयार झाले. पण यज्ञमंडपाचे आचार्य शुक्राचार्य समजून गेले की हा काही कोणी सामान्य ब्राह्मण नाही. ते बलिराजाला म्हणाले, घाई करू नको. देवांचे कार्य सिद्ध करण्यासाठी साक्षात नारायणच वामन बनून आले आहेत. राजा, तुझे सगळे साम्राज्य यांच्या दोन पावलांत सामावून जाईल. तिसरे पाऊल ठेवायला जमीनच शिल्लक राहणार नाही. म्हणून तुला पाताळात बुडवून टाकतील. जरा विचार करूनच संकल्प कर. हा वामन तुझे सर्वस्वच हरण करून घेईल.

राजा, दान तर द्यावे पण विवेकपूर्ण. या बालकाचे पाय कसे असतील हे तुला ठाऊक नाही. दान असे देऊ नकोस की जेणेकरून तू दरिद्री होशील आणि घरचे सर्व दुःखी.

साधुसंतांना सद्भावाने, ईश्वरभावाने दान करा तरच तुमचे कल्याण होईल. पवित्र सदाचारी ब्राह्मण आणि सती स्त्री हेच या पृथ्वीचे आधार होत.

बलिराजाने विचारले: दान दिले नाही तर?

शुक्राचार्य: दान अवश्य दे, पण आपल्या पायांनी जमीन मापून दे. हा वामन तर विराट रूप धारण करील. देवांच्या हिताकरता स्वतः विष्णूच वामनरूप होऊन आले आहेत.

संकल्पानुसार दान न देणारा नरकांत जातो. भविष्याचा विचार करून समजून उमजून दान कर. सर्वस्वाचे नाही, पंचमांशाचे दान कर.

कलियुगांतील मुले धनसंपत्तीची सेवा करतात; माता-पित्यांची नाही. पैसा असेल तर तुमचे नातेवाईक तुमची सेवा करतील.

वृद्धावस्थेसाठी काही ना काही संग्रह अवश्य करा ज्यामुळे म्हातारपणी मुलांजवळ मागण्याची वेळच येऊ नये.



एक म्हातारा अजारी पडला. त्याला समजले की त्याचा मृत्यु जवळ आला आहे. त्याने आपली

सगळी संपत्ति आपल्या तीन मुलांमध्ये वाटून दिली. म्हाताऱ्याचें दुर्भाग्य तर पहा. मरायच्याऐवजी तो तर बरा झाला. परंतु आता तर त्याच्याजवळ काहीच नव्हते. आता तीनही मुले त्याला झिडकारू लागली. म्हातारा फार दुःखी झाला. कोणा मुलाजवळ एखादे वेळेस काही मागितले तर तो पाच पैसे-दहा पैसे द्यायच्या गोष्टी करू लागला. म्हाताऱ्याचेच सर्व काही होते तरी आज त्याचाच परिवार त्याची उपेक्षा करू लागला.

एकदा या म्हाताऱ्याने आपले रडगाणे आपल्या एका मित्राजवळ गाइले. तेव्हा तो मित्र म्हणाला, "माझ्याजवळ एक पेटी आहे. त्यांत दगड भरून कुलूप लावून मी तुझ्याकडे पाठवून देईन. तू ती पेटी मुलांना दाखवून म्हण की 'मी ही थोडीशी शिल्लक राहिलेली पुंजी घेऊन हरिद्वारची यात्रा करायला जात आहे.' मग पहा मजा!" त्या मित्राने दुसरे दिवशी पेटी त्या म्हाताऱ्याला दिली.

पेटी मिळाल्याबरोबर त्या म्हाताऱ्याने यात्रेला जाण्याचा बेत मुलांना सांगितला. "आता तर मी म्हातारा झालेलो आहे. म्हणून माझी इच्छा आहे की या पुंजीने मी यात्रा करावी, साधुसंतांना भोजन द्यावे आणि तीर्थस्थानांत काही दिवस राहावे."

एका मुलाने विचारले: कुठे जाल तुम्ही?

म्हातारा: हरिद्वार.

दुसऱ्या मुलाने विचारले: ही पेटी आजपर्यंत कुठे होती? काय आहे यात?

म्हातारा: ही पेटी मी एका मित्राच्या येथे ठेवली होती. असतील दहा-पंधरा हजार रुपये यांत.

पेटी वजनदार होती. मुलांना पटले की अजूनही बापाजवळ पुंजी आहे. बस, मग तर काय! सगळीच मुले बापाला आपल्या आपल्या घरी राहायचा आग्रह करू लागली. माझ्याजवळ रहा. तुम्ही एकटेच तीर्थस्थानांत राहाल हे आम्हाला शोभणार नाही. जग आम्हांला काय म्हणेल? तुम्ही जाऊ नका. आम्ही आपली पूर्ण सेवा करू.

जग स्वार्थी आहे. तरीही जीव अविवेकीच राहिला आहे. जीव असा दुष्ट होऊ शकतो याचे त्याला दुःख नाही. त्याला तर आपले वर्तन जगाला वाईट दिसेल याचेच तेवढे दुःख आहे. तो करीत असतो वाईट, पण इच्छा अशी असते की ते चांगले दिसावे.

आता ते सर्व कुटुंब त्या म्हाताऱ्याची सेवा करू लागले. मित्राने सांगितले होते की मरायच्या वेळेपर्यंत (शेवटच्या श्वासापर्यंत) किल्ली कोणाला देऊ नको. शेवटी एक दिवस तो मेला.

मुलांना वाटले, बाप पुष्कळसे ठेवून गेला आहे आमच्यासाठी.

लोकही म्हणाले: तुमचे वडील तीन पिढ्यांना हसते-खेळते पाहून सुख-संतोषाने गेले आहेत. तेव्हा निःसंकोचपणे उत्तरक्रिया केली तर चांगले होईल.

मुलांनी मोठ्या दिलदारपणाने उत्तरक्रिया केली. त्यांनी विचार केला की सर्व नातलग, स्नेही, शेजारी यांची गर्दी कमी झाल्यावर पेटी उघडू. शेवटी पेटी उघडली गेली तर त्यांत दगडच मिळाले.

जगात सर्वदूर स्वार्थाचेच साम्राज्य पसरले आहे.

शुक्राचार्यांनी बलिराजाला सांगितले: वामनाच्या तीन पावलांनी मापून भूमीचे दान करशील तर तुझे सर्वस्वच जाईल. म्हणून तुला सावध करीत आहे.

बलिराजा म्हणाला: मी तर वचन दिले आहे. आता नाही म्हणेन तर असत्य बोलण्याचे पाप लागेल.

शुक्राचार्य म्हणाले: विपरीतच्या वेळीचे असत्य भाषण क्षम्य आहे, सत्य बोलणेंच धर्म आहे.

असत्य भाषण धर्म आहे असे म्हटलेले नाही. परंतु अशा वेळी क्षम्य आहे आणि कदाचित स्तुत्य देखील.

या चार प्रसंगी खोटे बोलणे क्षम्य समजले गेले आहे:

(१) कोणाच्या विवाहप्रसंगी, (२) स्त्रियांशी (पत्नीशी) बोलताना. महाभारतात म्हटले आहे 'न तु गुप्तं धारयति' स्त्रियांना शापच आहे की त्या कोणतीच गोष्ट गुप्त ठेवू शकत नाहीत, (३) जेव्हा प्राण संकटात असेल तेव्हा. सत्य बोलण्याने कोणा प्राण्याची हत्या होत असेल तर असत्य बोलू शकता, (४) गाय आणि साधु, संत, तपस्वी, ब्राह्मण यांच्या रक्षणार्थ.

राजा तुझ्या डोक्यावर प्राणसंकट उभे राहिले आहे. आपले वचन पाळू नकोस. वामनांना 'नाही!' सांग. अशा वेळी वचनभंगाने काही दोष लागणार नाही.

बलिराजा म्हणाला: गुरुजी, तुम्ही उपदेश तर फार चांगला केलात. परंतु मी तर वैष्णव आहे. पहिले मी समजत होतो की कोणी ब्राह्मणबालक भिक्षा मागायला आला आहे. आता मी जाणले की साक्षात् विष्णू भगवान माझ्याकडे भिक्षा मागायला आले आहेत. तर मग मी नारायणाला आपले सर्वस्व कां अर्पण करू नये? मी वचनभंग करणार नाही.

आम्ही वैष्णव तर सेवा करताना सर्व काही भगवंताच्या चरणावर ठेवून देत असतो. आपण सांगितले की हे साक्षात विष्णू आहेत. ही फारच चांगली गोष्ट आहे. माझे इष्टदेव विष्णूच आहेत. ते आज बालकरूपाने माझ्याकडे दान मागायला आले आहेत तर माझे सर्वस्व मी त्यांच्या चरणावर ओवाळून टाकीन. दात्याचे महत्त्व आगळे आहे, घेणाऱ्याचे नाही. जगात माझीच प्रतिष्ठा होईल.

शुक्राचार्य समजावू लागले: तिसरे पाऊल ठेवायला जमीनच राहणार नाही, आणि दान देऊ शकला नाहीस तर तुला नरकात पडावे लागेल.

बलिराजा म्हणाला: मला नरकाचे काही भय नाही. पाप करून नरकांत जाणे चांगले नाही. पण परमात्म्याला सर्वस्व अर्पण करून नरकांत जाणे चांगलेच आहे.

ह्या लोकी आणि परलोकी सुखी व्हायचे असेल तर धनाचा उपयोग विवेकाने करा. धनाचा सदुपयोग झाला नाही तर मृत्यूपर्यंत शांति मिळणार नाही.

बलिराजा म्हणाला: मी प्रल्हादाचा वंशज आहे. मी वैष्णव आहे. मी गळ्यात-कंठी (माळ) धारण करतो. मी परमेश्वराला सर्वस्व अर्पण करतो. आज मी सर्वस्वाचे दान करीन. दान दिल्यावर मला जरी नरकांत जावे लागले तरी काही अडचण वाटणार नाही. मी पापकर्माने नरकांत जाणार नाही, भलेही दान करण्याने जावे लागो. मी तर भगवंताचाच होऊन जाईन. भगवंताचा झाल्यावर नरकवासांत जाण्यास काही हरकत नाही. एकदा ब्रह्मसंबंध स्थापित झाल्यावर तर माझ्या प्रभूला देखील माझ्याबरोबर नरकवासी व्हावे लागेल.

ब्राह्मणाला जेव्हा दान दिले जाते तेव्हा त्याच्या शरीरांत विष्णूचे आवाहन केले जाते. इथे तर स्वतः महाविष्णू आपण होऊनच आले आहेत. गुरुजी, मी श्रीविष्णुंना सर्वस्वाचें दान करीन. जीव विश्वासघात करू शकतो, परंतु आपत्तीच्या वेळी भगवंतच स्वतः धावत येत असतात. मी प्रभूंचा होईन आणि ते माझे. मग मी जेथे जाईन तेथे ते येतील, नरकातसुद्धा येतील.

तुकारामाने म्हटले आहे: "गर्भवासी व्हावे लागो नाही तर नरकवासी, परंतु जर माझे विठ्ठल मजजवळ असले तर मी कोठेही जायला तयार आहे." तुकाराम गर्भवास मागतात, कारण त्यांचा विश्वास आहे: "तुका म्हणे गर्भवासी सुखे घालावे आम्हासी"— मी जिथे कुठे जाईन तिथे विठ्ठलनाथ

माझ्याबरोबर येतील.

गुरुजी, प्रत्येक सत्कर्माचे वेळी तुम्ही संकल्प करायला सांगता. आपण सगळे कर्म कृष्णार्पण करवून घेता. जर आज तेच स्वतः दान मागायला आले आहेत तर मी नाही कसे म्हणू? आपण संकल्प सांगा. कृपा करून दानाचा संकल्प सांगा. आपल्या भगवंतांना मी सर्वस्व दान करीन.

शुक्राचार्य : मी संकल्प सांगणार नाही.

वामन : तुझे पुरोहित नाही म्हणत असतील तर मी संकल्प सांगतो. मी ब्राह्मणपुत्र आहे. संकल्प करवून घेणे मला येते.

बलिराजाने अनुमती दिली आणि वामन संकल्प सांगू लागले. त्यांनी झारीतून पाणी हातावर घ्यायला सांगितले. शुक्राचार्यांना हे पाहवले नाही. त्यांनी सूक्ष्म देह धारण केला आणि झारीच्या तोटीत (छिद्रांत) बसून पाण्याचा अवरोध केला. ते तिथे बसल्यामुळे पाणी बाहेर येईना.

शुक्राचार्यांची करणी वामनाच्या लक्षात आली. त्यांनी दर्भाची एक काडी घेऊन ती तोटीच्या छिद्रांत खुपसली. असे केल्याने शुक्राचार्यांचा एक डोळा फुटला.

जेव्हा भगवंत कृपा करतात तेव्हा एक डोळा फोडून टाकतात. ते म्हणतात, माझे दर्शन झाल्यावर जगाला एकाच डोळ्याने, दृष्टीने पहा. अनेकांत एकच व्याप्त आहे, अशा दृष्टीने पहा. हाच समभाव होय. एकच ईश्वर सर्वभूतीं आहे असे पाहणे म्हणजेच समता होय. एक ईश्वर अनेक रूपांनी क्रीडा करीत आहे, अशा भावाने पाहणे हाच समभाव आहे. दोन डोळ्यांनी पाहणे विषमता आहे. एकाच डोळ्याने– समदृष्टीने पहा. काहीही कपटभाव मनांत ठेवू नका.

भगवंत स्वतः मागायला आले तरी शुक्राचार्यांच्या मनातून द्वैतभाव गेला नाही. हा माझा यजमान आहे, तो भिक्षुक आहे असा द्वैतभाव त्यांच्या मनात होता. त्यांचा एक डोळा फोडून टाकला अर्थात् अद्वैत दृष्टीनेच पाहायचे आहे. योगी एकाच दृष्टीने जगाकडे पाहतात.

परमात्मा म्हणतात : दोन्ही डोळे फुटले तर माझे दर्शन कसे होईल?

परमात्म्याचे दर्शन झाल्यावर एकाच दृष्टीने सर्व काही पहा. दोन डोळ्यांनी, दोन दृष्टींनी पाहाल तर विषमता येईल.

शुक्राचार्य समजले, आणखी काही बाधा केली तर माझा दुसराही डोळा फोडला जाईल आणि ते तिथून निघून गेले.

डोळा विकृत झाल्यावर नावही बिघडते. कलंकित होते. रावणाची दृष्टी बिघडली तेव्हाच तर त्याचे नावही बिघडले.

देव एक डोळा फोडून टाकतो. रामायणांतसुद्धा एक प्रसंग आहे. रामचंद्रांनी जयंताचा एक डोळा फोडून टाकला होता.

भगवंत म्हणतात एकाच दृष्टीने जगाला पहा. आपपर भाव सोडा. सगळ्यांत भगवदंश आहे असे समजा. एका दृष्टीने पाहणे समता आहे. दोन दृष्टींनी पाहणे विषमता आहे.

गीतेत म्हटले आहे– **'समत्वं योग उच्यते'** सर्वांच्या प्रति समता ठेवणे म्हणजेच योग.

संकल्प पूर्ण झाल्याबरोबर वामनाचे रूप विराट झाले.

भगवंताने जगाला आवृत्त करून घेतले. सगळ्याच जागी त्यांचे रूप दिसू लागले. जग बाहेर (वर) दशांगुले आहे. दशांगुलाचा अर्थ शंकराचार्यांनी असा केला आहे.– दहा अंगुलींनी (बोटांनी) प्रभूला वंदन करतात. परमात्मा वंदनीय आहे. वेदसुद्धा परमात्म्याचे वर्णन करू शकत नाहीत, म्हणून

निषेधात्मक रीतीने 'नेति नेति' असे सांगतात. ईश्वराला जाणणारा देखील त्याच्या स्वरूपाचे वर्णन करू शकत नाही. भगवंत वंदनीय आहेत, चिंतनीय आहेत. ते आपल्या कृपेने अज्ञान दूर करतात. तेव्हाच त्यांना जाणले जाऊ शकते.

प्रभूच्या एकाच चरणांत सर्व पृथ्वी सामावून गेली, दुसऱ्या चरणाने ब्रह्मलोक व्यापून घेतला, तिसऱ्या पावलासाठी जागाच उरली नाही. त्यावेळी सर्व दैत्य युद्ध करायला तयार झाले. आमच्या स्वामींचा छळ होत आहे. मारा, मारा. तर बलिराजा म्हणाला, ही वेळ प्रतिकूल आहे. शांत रहा, नाही तर तुम्हीच मारले जाल.

वामन म्हणालेः राजा, तू संकल्प केला आहेस की तीन पावलांइतकी जमीन देईन. आता मी तिसरे पाऊल कुठे ठेवू? संकल्पाप्रमाणे दान न देणारा नरकवासी होत असतो. तू माझा छळ करीत आहेस.

जरा विचार करा की या प्रसंगी कोण कोणाचा छळ करीत आहे? भगवंत दान घ्यायला आले तेव्हा सात वर्षांचे बटु होते, परंतु दानाचा संकल्प झाल्याबरोबर विराट होऊन गेले.

गणेशपुराणांत बलिराजाने भगवंताला विचारले आहे की, तो निष्पाप आहे, तरी पण त्याचा असा छळ का केला गेला?

बलिराजा निष्पाप होता म्हणून भगवंतांनी त्याच्याशी युद्ध नाही केले.

ईश्वर निष्पाप आहे. तो कोणालाच मारीत नाही. मनुष्याचे पापच त्याला मारीत असते.

तुम्ही कपट करून मला पाताळांत उतरविलेस हे योग्य आहे काय? तुम्हीच निर्णय करा.

वामनांनी उत्तर दिलेः तू पूर्ण निष्पापी नाहीस. यज्ञाच्या आरंभी गणपति-पूजेची आज्ञा केली गेली, तरी तू ती ऐकली नाहीस. मी विष्णूचीच पूजा करीन म्हणालास. गणपतिसुद्धा विष्णूच आहेत हे तू ऐकले नाहीस. तुझी भेददृष्टी होती.

जोपर्यंत अनन्यभक्ति सिद्ध होत नाही तोपर्यंत इतर देवांनासुद्धा आपल्या इष्ट देवाचा अंश मानून त्यांना वंदन करा आणि इष्ट देवाची अनन्यभक्ति करा.

तू शास्त्राच्या मर्यादेचे उल्लंघन केलेस. तू गणपतीची पूजा तर केलीस, पण पूज्यभावाने नाही केलीस. गणपतीने मला प्रार्थना केली की मी तुझ्या यज्ञांत बाधा उत्पन्न करावी. म्हणून मी येथे आलो आहे. शास्त्रशुद्ध आचार हा नेहमीच उपकारक असतो.

गणपतिमहाराज विघ्नहर्तेही आहेत आणि विघ्नकर्तेही आहेत.

आता मी तिसरे पाऊल कोठे ठेवू?

भगवंताचे विराट स्वरूप पाहून बलिराजा भयभीत झाला. त्यावेळी सत्त्वगुण स्वरूपा विंध्यावली म्हणू लागली, ही सगळी तर तुमची क्रियाभूमि आहे, या शरीरावरच जर जीवाचा अधिकार नाही तर संपत्ति आणि संततीवर तरी कसा असेल? शरीर मातीचेच बनलेले आहे. जीव व्यर्थच असे समजत असतो की शरीर, संपत्ति इत्यादी त्याचे स्वतःचे आहे. वास्तविक तसे नाही.

गीतेचा आरंभ धर्म शब्दापासून केलेला आहे. गीतेचा प्रथम शब्द आहे 'धर्म-क्षेत्रे'. गीतेची समाप्ति 'मम' शब्दाने केली आहे. गीतेचा शेवटचा शब्द आहे 'मम'. या दोन शब्दांत सर्व गीता सामावली आहे. 'मम' चा अर्थ आहे माझा. 'मम धर्मः' माझा धर्म. धर्म अर्थात् सत्कर्म. माझ्या हातून जे काही सत्कर्म होईल तेवढेच आणि तेच माझे आहे.



फक्त सत्कर्मच तुमचे आहे, शरीर नाही. जितके सत्कर्म केले असेल तेवढेच बरोबर जाईल.

जितके सत्कर्म कराल तेवढेच तुमचे होईल.

धृतराष्ट्र म्हणाला होता, 'मामकाः'– हे माझे पुत्र आहेत. याच कारणाने भगवंतांनी त्याच्या पुत्रांना मारले होते. धृतराष्ट्र म्हणाला होता 'मामकाः पांडवाः'.

अर्जुनाने भगवंतांना म्हटले होते, **'शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्'** मी तुमचा आहे आणि तुम्हाला शरण आलो आहे. तर भगवंतांना त्याला आपले म्हणावे लागले आणि त्याचा रथ चालवावा लागला.

मनुष्य हे जाणत नाही की त्याचे स्वतःचे काय आहे आणि काय नाही. परिणामी वादविवाद आणि संघर्ष होत राहतो. जर तो खरोखरच समजेल की वास्तविक त्याचे काय आहे तर सगळी भांडणे मिटून जातील. द्रव्याशिवाय आणखी काही सुख आहे की नाही? आत्मानंदासारखी काही वस्तू आहे का, हे मनुष्य जाणत नाही.

आपल्या हाताने केलेले सत्कर्मच आपले आहे, हा जीव स्वामी नाही. प्रभूच स्वामी आहेत. जीव फक्त मुनीम आहे. या शरीरावर जर जीवाची सत्ता नाही तर इतर कोणत्याही वस्तूवर तरी कशी असू शकेल? यमराजाची आज्ञा झाल्याबरोबर शरीराचा त्याग करावा लागतो. जगाचे कायदे तेथे चालू शकत नाहीत. तन आणि मनाचे स्वामी एक परमात्मा मात्र आहेत हे कधीही विसरू नका. कोणत्याच वस्तूवर जीवाचा अधिकार नाही आणि परमात्मा स्वामी आहे तरीही जीव माझे माझे करीत असतो. जो माझे माझे करतो त्याला भगवंत मारतात. जो तुझे तुझे करतो त्याला भगवंत तारतात.

विंध्यावली म्हणाली: हे प्रभु! ही तर सर्व आपलीच लीला आहे. आपल्याला कोण काय दान देऊ शकेल? माझ्या पतीने अभिमानाने दान देण्याची इच्छा केली आणि दिले. तुम्हाला कोणी काही देऊ शकत नाही. सर्वस्वाचे आपणच स्वामी आहात. यामुळेच वैष्णव संप्रदायी दानाच्या ऐवजी भेट शब्दाचा प्रयोग करतात. जे ईश्वराचे आहे तेच त्याला समर्पण करायचे आहे.

प्रभु! माझ्या पतीच्या म्हणण्यांत गडबड झाली आहे.

बलीमधे जो सूक्ष्म अभिमान अजून शिल्लक राहिला होता की 'मी दान दिले', या अभिमानाला दूर करण्यासाठी विंध्यावली आपल्या पतीला म्हणाली: भगवंताला प्रणाम करा. त्यांना कोण काय देऊ शकते? त्यांनी जे दिले होते तेच त्यांना द्यायचे आहे. हे शरीर शिल्लक आहे, ते मातीचेच आहे. भगवंतांना सांगा की, त्यांनी तिसरे पाऊल तुमच्या डोक्यावर ठेवावे.

मस्तक बुद्धिप्रधान आहे. यात कामाचा वास आहे. मस्तकावर भगवंताचे चरण आल्यावर त्या बुद्धिगत कामाचा नाश होतो. जो तन, मन आणि धन भगवंताला अर्पण करतो, त्याच्याच मस्तकावर चरण ठेवण्याची कृपा भगवंत करतात. परमात्म्याचा हात किंवा चरण मस्तकावर आल्याने मस्तकस्थित सूक्ष्म कामाचा नाश होतो.

गोपी गोपीगीतांत भगवंतापासून कामना करतात की त्यांच्या मस्तकावर भगवंताचा करकमल फिरावा, गोपी कोण आहेत?

गोभिः इंद्रियैः भक्तिरसं पिबति सा गोपी.

ज्यांचे प्रत्येक इंद्रिय भगवत्‌रसाचे पान करील तेच गोपी.

प्रभूंना प्रार्थना करा की आपले चरण माझ्या मस्तकावर ठेवा.

बलिराजाने भगवंतांना म्हटले: **'पदं तृतीयं शिर्ष्णि मे निजम्'.** माझ्या मस्तकावरच आपण आपला तिसरा पाय ठेवा.

मस्तकांत बुद्धि असते आणि बुद्धींत सूक्ष्मरूपाने काम सामावलेला असतो. त्याचा नाश करण्यासाठीच आपल्या मस्तकावर चरण ठेवण्याची प्रार्थना केली आहे. असे केल्याने सकाम बुद्धि नष्ट होते.

जीव आणि ईश्वराच्या मीलनांत बाधक-अवरोधक कामच आहे.

मी नीट रीतीने बोलू शकलो नाही. मला क्षमा करा. माझे तर काहीच नाही. आपलेच जे आहे ते आपल्याला देत आहे. अपराध क्षमा करा. खरोखरच आपण आम्हा असुरांचे देखील परोक्ष गुरू आहात, कारण की आमच्या मोठेपणाची भिंत फोडून आपण आमचे डोळे उघडले आहेत.

इतक्यात बलिराजाचे पितामह प्रल्हाद यांचे तेथे आगमन झाले. ते भगवंतांना म्हणू लागले: 'आपण माझ्या नातवाला दिलेले इंद्रपद हिसकावून घेतले आणि त्याला लक्ष्मीविहीन देखील केले! मी समजत आहे की असे करून आपण त्याच्यावर मोठा अनुग्रहच केला आहे.'

दात्याने केव्हाही अभिमानी होऊ नये. जो वंदन करतो तो प्रभूलासुद्धा बंधनात ठेवू शकतो.

शरीराचे अर्पण अर्थात 'मी' पण, अहंकार आणि अभिमानाचे अर्पण. जर दाता दीन होणार नाही तर त्याचे दानसुद्धा सफल होणार नाही.

बलिराजाच्या हृदयांत जेव्हा दीनता आली तेव्हा परमात्म्याचे हृदय विरघळले. ते बलिराजाला म्हणाले, तू मला सर्वस्वाचे दान दिलेस म्हणून मी तुझा ऋणी झालो.

नम्रता-दीनता आल्यावर परमात्मा ऋणी झाले.

मी इंद्रादींना स्वर्गाचे राज्य दिले आहे, पण तुला पाताळाचे राज्य देतो. आजपासून तुझ्या प्रत्येक द्वारात मी चौकीदार होईन.

बलिराजाचें कानांत आणि डोळ्यांत ईश्वर सामावून गेले. बलिराजा म्हणाला, स्वर्गाच्या राज्यापेक्षा हे सुतलपातालाचे राज्य जास्त चांगले आहे, येथे भगवंताचे सतत सान्निध्य आहे.

या बलिराजाच्या कथेचे काही थोडे रहस्यही आहे. बलि जीवात्मा आहे आणि वामन परमात्मा. बलिराजाचे गुरू आहेत शुक्राचार्य. याचा अर्थ हा की जो शुक्राची सेवा अर्थात– वीर्य आणि ब्रह्मचर्याचे रक्षण करतो आणि जो संयमी आहे त्याला कोणी मारू शकत नाही.

बलिराजाला कोणी मारू शकत नाही. कंस इत्यादींना तर मारले होते. परंतु भगवान वामनांनी बलीला मारले नाही. बलि निष्पाप आहे, शुक्राचार्यांची सेवा करीत असतो, सदाचारी आहे.

भक्त शुक्राची सेवा करून जेव्हा बळी होतो तेव्हाच भगवंत अंगणात येतात. तुम्ही बळी बनाल तेव्हाच तुमच्या अंगणात भगवंत येतील. बळी बलवान आहे. बलवानच भगवंताच्या मार्गावर चालू शकतो.

पण बलवान कोण असतो? जो आतले शत्रु, काम, क्रोध, मद, मोह, लोभ आणि मत्सर यांना मारतो तोच बलवान होय.

जीवात्मा बलि जेव्हा बलवान होतो, तेव्हा त्याच्या दारी भगवंत येऊन उभे राहतात. शारीरिक, बौद्धिक, आणि ज्ञानबलापेक्षा प्रेमबल अधिक श्रेष्ठ आहे. प्रेमबलापुढे इतर सर्व प्रकारचें बल गौण आहे. जो एका प्रभूवर प्रेम करतो तोच बली आहे. सर्वच बलापेक्षा प्रेमबल श्रेष्ठ असल्यामुळे तुम्ही परमात्म्यावर प्रेमच करा. द्रव्यबल किंवा ज्ञानबलाने परमात्म्याला जिंकता येत नाही. प्रेमबलाने परमात्म्याला जिंकता येणे शक्य आहे.

जर परमात्म्यावर प्रेम करायचे असेल तर जगाच्या पदार्थांवरचे प्रेम सोडावे लागेल. जेव्हा जीव

जगाच्या पदार्थांवरील प्रेम सोडील तेव्हांच परमात्म्याशी प्रेम करू शकेल. परमात्म्यावर प्रेम कराल आणि संयम वाढवाल तेव्हाच तुम्ही बली होऊ शकाल आणि वामन होऊन भगवंत तुमच्या घरी येतील.

भगवंताला मागताना संकोच होत होता म्हणून वामन होऊन आले होते. जीवाने प्रेमभाव वाढविला तर भगवंत बटु बनून निर्बलासारखे होऊन अंगणात येतील.

कोणी एक बाई कथा ऐकायला निघाली. वाटेत तिचा मुलगा रडू लागला. आईने त्याला काही खेळणी दिली तरी तो रडतच राहिला. तो आईचा पदर ओढून आईला कथेला जाण्यापासून अडवू लागला. मुलाच्या प्रेमामुळे आई दुर्बल झाली. म्हणून ती बाई कथेला गेली नाही. तोच मुलगा तरुण झाला, विवाहितही झाला आणि आईचे प्रेमसुद्धा विसरून गेला. आणि जसा काळ गेला तसतसे आईचे प्रेम कमी कमी होत गेले. आता जर मुलगा कथेला जाण्यापासून आईला अडवू लागला तर आईने ऐकले नसते. ती म्हणाली असती की, आता तुझे माझ्यावर अथवा माझे तुझ्यावर प्रेम नाही. तो जेव्हा लहान होता तेव्हा आईचे सर्व प्रेम त्याच्यावर होते.

तुम्ही जर प्रेमबल वाढविले आणि बलि झालात तर परमात्मा तुमच्या अंगणात येतील.

जो सदाचारी आणि संयमित जीवन जगतो त्याच्याच घरी भगवंत येतात.

परमात्मा जेव्हा दारी येतात तेव्हा तीन गोष्टी मागतात. ते तीन पावले पृथ्वी मागतात, अर्थात ते जीवमात्राकडून तन, मन आणि धन मागतात. या तिन्हींचे भगवंताला दान केले पाहिजे. तनाने सेवा केल्यावर अहंकार कमी होतो. धनाने सेवा केल्यावर धनाची माया, ममता, मोह नष्ट होऊ लागतो. मनाने सेवा केल्याने श्रम होत नाहीत. तन, मन आणि धन भगवंताला दिल्यावरच रासलीलेत स्थान मिळते; जीव आणि ब्रह्माचे मीलन होते. म्हणून या तिन्हींनी भगवंताची सेवा करा.

सगळ्या वस्तू भगवंताच्याच आहेत आणि त्यांनाच अर्पण करायच्या आहेत. त्यांनीच दिलेले त्यांना द्यायचे आहे.

जो मनुष्य बलीप्रमाणे तन, मन, धन भगवंताला अर्पण करतो त्याचे भगवंत द्वारपाल होतात. अशा दात्याच्या प्रत्येक इंद्रियरूपी द्वारावर भगवान नारायण उभे राहतात. त्याचे रक्षण भगवंत करतात. ही इंद्रिये शरीराची द्वारे आहेत. या सर्वच द्वारांवर रामाचा पहारा असेल तर काम आत शिरू शकणार नाही.

जी व्यक्ति आपले तन, मन, धन परमात्म्याला अर्पण करून टाकते तिच्या शरीर आणि इंद्रियांचे रक्षण तो करतो. तन, मन, धनाने सेवा केल्यावर भगवंत तुमच्या प्रत्येक इंद्रियावर पहारा देतील. अशा व्यक्तीच्या कानांत, डोळ्यांत, ह्रदयांत कान्होबाचा वास राहील.

तीन पावले जमिनीचा एक आणखी अर्थ आहे. सत्त्व, रज आणि तम हे तीनही गुण भगवंताला अर्पण करा. शरीराने सेवा केल्याने तमोगुण कमी होईल. ईश्वरसेवेत धनाचा उपयोग केल्याने रजोगुण कमी होईल. तन आणि धन द्याल परंतु मन दिले नाही तर ईश्वर प्रसन्न होणार नाही. तन आणि धनाने जरी सेवा केली, पण मन त्यात नसेल तर प्रभुसेवेत आनंद येणार नाही. ईश्वराशी मनाने संबंध जोडायचा आहे. मनुष्य आपले सर्वस्व ईश्वराला देत नाही. काही आपल्यापाशी राखून ठेवतो म्हणून प्रभु प्रसन्न होत नाहीत.

सत्त्वगुणाचा क्षय होण्यास्तव मनसुद्धा ईश्वराला अर्पण करायचे आहे. मनाला त्यांच्या सेवेत लावायचे आहे. मन विषयांत आणि तन देवाजवळ असेल तर काम व्हायचे नाही. सेवा-पूजा करीत असता डोळ्यांतून अश्रू आले तर समजा की देवाने कृपा केली आहे. सेवा केल्याने थकावट दूर होते.

ईश्वराशी संबंध झाला म्हणजे थकावट दूर होते. ज्ञानी व्यक्ति ईश्वराशी शरीराने नाही, मनाने संबंध जोडत असतो.

समर्पणकर्त्यांने आपल्या स्वतःला सुद्धा समर्पित केले पाहिजे.

दान दिल्यावर बलिराजाने नमस्कार केला नाही तेव्हा ते अप्रसन्न राहिले. बलीच्या मनात सूक्ष्म अभिमान होता की पुष्कळ दिले आहे. अर्पण करून सुद्धा त्याच्या मनात दीनता-नम्रता आली नाही.

सर्व काही विधिपूर्वक करूनही असे समजा की मी काहीच केले नाही.

भगवंताला म्हणा : '**मंत्रहीनं, क्रियाहीनं, भक्तिहीनं, सुरेश्वर। यत्पूजितं मया देव, परिपूर्णं तदस्तुमे।**'

मी मंत्ररहित, क्रियारहित, भक्तिरहित आहे. माझ्याकडून काही न्यून झाले असेल तर क्षमा करा आणि मी केलेले कर्म परिपूर्ण समजा.

सत्कर्म केल्यावर जर दीनता आली नाही तर सत्कर्म फलद्रूप होत नाही. कर्म बाधक नाही पण मी कर्म केले आहे, हा अभिमान (अहंकार) बाधक आहे. मी कर्ता आहे, मी ज्ञानी आहे, असा अहंकार असला तर प्रभु उपेक्षा करतात.

अंतःकरणापासून नमन कराल तर भगवंताला प्रिय व्हाल.

बलीच्या मनात दीनता आली तेव्हा सेव्याला सेवक व्हावे लागले. प्रभु द्वारपाल होण्यालासुद्धा राजी झाले.

ज्याचे प्रत्येक इंद्रिय भगवंताचे नाम जपत असते त्याच्या प्रत्येक इंद्रियांत भगवंत राहतात. सुतलपातालाच्या पहाऱ्यावर भगवंताच्या अस्तित्वाचा हाच अर्थ आहे.

सुतलपातालांत बलीने प्रवेश केला. प्रत्येक द्वारावर शंख, चक्र. गदा, पद्मधारी श्रीकृष्ण विराजमान होते.

तन, मन, धनाने सेवा करणाऱ्याच्या डोळ्यांत, कानांत आणि प्रत्येक इंद्रियांत श्रीकृष्ण राहतात.

एकदा रावण फिरत फिरत बलीच्या जवळ आला आणि लढायला तयार झाला. त्याने पाहिले की, बलीच्या द्वारावर वामन पहारा देत आहेत. तो म्हणाला की त्याला बलीशी युद्ध करायचे आहे. तर वामन म्हणाले, पहिले माझ्याशी युद्ध कर. मी सेवक आहे आणि तो स्वामी. रावण वामनाशी लढू लागला. वामनांनी त्याच्या छातीवर अशी एक लाथ मारली की तो दूर समुद्रकिनारी जाऊन पडला.

रावण म्हणजे काम. तुमच्या इंद्रियांच्या द्वारावर जर भगवंत पहारा देऊ लागले तर कामाला त्यात प्रवेश मिळणार नाही.

वामनांनी स्वर्गाचे राज्य इंद्राला दिले. वामन बलिराजाच्या येथे दान घ्यायला गेले तर तेथे त्यांना द्वारपाल व्हावे लागले.

जो दान घेतो तो बंधनात अडकतो.

वामन बंधनात अडकले तर सर्वांनाच आनंद झाला, परंतु महालक्ष्मीला दुःख झाले. घरांत सर्वकाही होते, पण नारायणांच्या अनुपस्थितीमुळे ती बेचैन झाली होती. तिला सदा हीच चिंता असायची की ते केव्हा येतील? कुठे असतील? एकदा कासावीस होऊन तिने नारदांना विचारले, 'कुठे आहेत माझे स्वामी? तुम्हाला काही माहीत आहे का?' नारदांनी उत्तर दिले, 'ऐकले आहे की नारायण सुतलपाताळात बलिराजाच्या घरी दारावर पहारा करीत आहेत. बलीच्या जवळ दान घ्यायला गेले होते तर बंधनांत पडले. सर्वस्वाचे दान घेऊन ऋणी झाले आहेत.

लक्ष्मी सुतलपाताळात गेली. घरात नारायणांना प्रसन्नतेत स्थापन कराल तर लक्ष्मी देखील

त्यांच्या मागोमाग आमंत्रणाशिवाय येईल. जेथे भगवान नारायण असतात तेथे लक्ष्मी येतेच.

ज्या घरी नारायण द्वारपाल असतील, विराजमान असतील तेथे न बोलावताही लक्ष्मी येऊन ठेपेल; यात काही आश्चर्य नाही. म्हणून लक्ष्मीच्या मागे नाही, भगवंताच्या मागे लागा. नारायणाची आराधना कराल तर लक्ष्मी आपोआपच येईल.

लक्ष्मीने ब्राह्मणपत्नीचे रूप घेतले. ती बलिराजाला म्हणाली, मी तुमची धर्मबहीण आहे. जगात मला कोणी भाऊही नाही आणि तुम्हाला कोणी बहीणही नाही! आजपासून मी तुमची धर्मभगिनी आणि तुम्ही माझे धर्मबंधू. बलीला आनंद झाला. त्याने लक्ष्मीला वंदन केले. त्याला एक दुःख होते की त्याला कोणी बहीणच नव्हती. लक्ष्मीच्या येण्याने सगळ्यांनाच आनंद झाला. परंतु स्वतः लक्ष्मीला काहीच आनंद झाला नाही. तिने पाहिले कीं आपले स्वामी हातात दंड धरून एखाद्या सामान्य चौकीदाराप्रमाणे पहारा देत आहेत.

श्रावण महिना आला. लक्ष्मी राखी पौर्णिमेच्या दिवशी बलिराजाला म्हणाली की, मी आज तुला राखी बांधीन. बलिराजाने राखी बांधून घेतली आणि वंदन करून लक्ष्मीला म्हणाला, 'ताई, आज मी तुला काही दिले पाहिजे. जे मनात येईल ते मागून घे. थोडा देखील संकोच ठेवू नको.

लक्ष्मी म्हणाली: मागायला संकोच होत आहे.

बळिराजा म्हणाला: आज जे तुझ्या घरी नसेल तेच मागून घे.

लक्ष्मी: तसे तर माझ्या घरी सर्वच काही आहे, परंतु एक तेच नाही की ज्यामुळे मी बेचैन आहे. मला आणखी काही नको, तुझ्या द्वारपालालाच मला देऊन टाक. तू त्यांना मुक्त करून दे.

बलिराज: कां? तो कोणी तुझा नातेवाईक आहे का?

लक्ष्मी: ते तर माझे नारायण आहेत. माझे सर्वस्व आहेत. आणि नारायण चतुर्भुज स्वरूपांत प्रगट झाले.

शुकदेव वर्णन करीत आहेत:

राजन्, माता महालक्ष्मी भगवान नारायणासह श्रावण शुक्ल पौर्णिमेच्या दिवशी वैकुंठधामी आली. ह्याच स्मृतीनिमित्त रामानुजाचार्यांच्या पंथीयांच्या मंदिरांत या दिवशी पाटोत्सव साजरा करण्याची प्रथा चालत आली आहे.

आणि याप्रमाणे दानाने बद्ध झालेल्या नारायणांना लक्ष्मीने मुक्त केले. म्हणून भगवंत म्हणतात:

ब्रह्मदेवा! मी ज्याच्यावर कृपा करतो त्याचे धन हरण करून घेत असतो. कारण पैशाने मनुष्य अभिमानी होतो आणि माझा आणि इतर लोकांचा अपमान करू लागतो.

याचसाठी प्रल्हाद भगवंतांना म्हणाले होते: माझा नातू बली याला तुम्ही इंद्रपद आणि स्वर्गाचे जे राज्य दिले होते ते हिसकून घेऊन लक्ष्मीभ्रष्ट केले हे त्याच्यावर कृपा करण्याच्याच उद्देशाने केले आहे.

या परमपवित्र वामनचरित्राची कथा समयानुसार यथामति सांगितली. पितृतिथीच्या दिवसात याचा पाठ केल्याने पितरांना सद्गती मिळते.

**६. मत्स्य अवताराची कथा:**

आता शरणागतीची कथा सुरू होत आहे. रासलीलेंत जायचे आहे. जर मनात वासनेचे आवरण असेल तर श्रीकृष्णाशी मीलन होणार नाही. वासनेच्या नाशासाठीसुद्धा उपाय सांगितले गेले आहेत.

महाप्रभूंनी म्हटले आहे: मी भगवंतांना शरण आहे असे ज्याला सतत स्मरण राहील तोच सिद्ध पुरुष असतो.

शुकदेव वर्णन करतात:

राजा, कूर्म किंवा मत्स्याचे गुणदोष परमात्म्यांत येत नाहीत. परमात्मा कूर्म बनो की मत्स्य, परंतु ते सदा परमात्माच राहतात. जीव जेव्हा पशूचा जन्म धारण करतो तेव्हा त्या पशुविशेषाचे गुणधर्म त्याच्यात येतात.

महाराज सत्यव्रत मनु एके समयी कृतमाला नदीच्या काठी तपश्चर्या करीत होते. ही नदी त्रिवेंद्रमच्या बाजूला आहे. तिथे त्यांनी कैक वर्षे तपश्चर्या केली. एकदा ते नदीत जलतर्पण करीत होते.

ऋषितर्पणाने बुद्धि शुद्ध होते. भारत धर्मप्रधान देश आहे. ऋषींचे स्मरण केल्याने दिव्य संस्कार आमच्या हृदयात अवतीर्ण होतात. आज तर शिक्षणांत धर्माला काहीच स्थान नाही.

जलतर्पण करताना मनुमहाराजांच्या हातात एक मासा आला. मनूने त्याला पाण्यात सोडून दिले.

मासा म्हणाला: मी आपल्या हातात अर्थात आपल्याला शरण आलो आहे. नदीतील इतर मोठे मासे मला खाऊन टाकतील म्हणून तुम्ही माझे रक्षण करा.

राजाने त्याला कमंडलूत ठेवून घेतले. मत्स्य जसजसा मोठा होत गेला, तसतशी त्याच्यासाठी मोठ्या जागेची आवश्यकता पडू लागली. दिवसेंदिवस तो विशाल रूप धारण करू लागला. सत्यव्रताला आश्चर्य वाटू लागले. त्याने विचार केला की खरोखरीच हा कोणी तरी असाधारण मासा आहे.

वस्तुतः वृत्तीच हा मासा होता. वृत्ति विशाल बनो, परंतु जोपर्यंत ती ब्रह्माकार होत नाही तोपर्यंत शांति नाही. मीपणा 'अहम्' एकाच जागी राहू शकत नाही. सामावू शकत नाही. मी सर्वांत आहे आणि सर्व माझ्यात आहेत. मनाच्या आवरणाला तोडण्यासाठी ब्रह्माकार वृत्ति आवश्यक आहे. या जीवाच्या हृदयात ईश्वर राहतो. तरी पण जीवाची पीडा किंवा मृत्यु ईश्वराला व्यथित करू शकत नाही. जणू काही भगवंताला याच्याशी काही संबंधच नाही.

परमात्मा सगळ्यांच्याच हृदयांत बसून दिव्याप्रमाणें प्रकाश देत असतात. जीव पाप करो की पुण्य, साक्षीभूत परमात्म्यावर याचा काही परिणाम होत नाही. ईश्वर निष्ठुरही नाही आणि दयाळूही नाही. ईश्वराला स्वतःचा काही धर्म नाही. ईश्वर आनंदरूप आहे, सर्वव्यापी आहे. या स्वरूपांत आम्हाला काही विशेष हानि किंवा लाभ नाही. परमात्मा बुद्धीच्या पलीकडे आहे. ईश्वरच बुद्धीला प्रकाशित करतो. ईश्वराला प्रकाश देणारा कोणी नाही. ईश्वर तर स्वयंप्रकाशी आहे. ईश्वराशिवाय सर्व परप्रकाशी आहेत.

ईश्वराचे दिव्यासारखे हे स्वरूप आम्हाला प्रकाश देते. या स्वरूपाचा अनुभव घेण्यासाठी ज्ञानी पुरुष ब्रह्माकार वृत्ति धारण करीत असतात. मन जेव्हा ईश्वराचें सतत चिंतन करील तेव्हाच वृत्ति कृष्णाकार, ब्रह्माकार होईल आणि तेव्हाच शांति मिळेल. ईश्वराला वगळून मनोवृत्ति जेथे कोठे ठेवाल त्या स्थानांत तो सामावणार नाही. ईश्वराला सोडून सगळेच अल्प आहे. म्हणून इतर कोणत्याही वृत्ति किंवा प्रवृत्तींत मनोवृत्तीला शांति मिळणार नाही. वृत्ति कृष्णाकार-ब्रह्माकार होईल, भगवत्स्वरूप होईल, तेव्हाच आनंदाची प्राप्ति होईल.

लाकडांत जो अग्नि सामावलेला आहे त्याचा उपयोग कसा करून घ्यावा हे जाणून घेतले पाहिजे. लाकडाला बाहेरून अग्नि लावाल तरच ते जळू लागेल. स्वयंप्रकाशी परमात्मा सर्वांच्या हृदयांत राहून प्रकाशच देत असतात; आणखी काहीच करीत नाहीत. प्रभूच्या सगुण स्वरूपाला हृदयांत वसवून त्यांतच वृत्ति तदाकार कराल तरच शांति मिळेल. मनालाच मत्स्याची उपमा दिली आहे.

मत्स्यनारायण म्हणाले: राजा! मी तुझे कल्याणच करायला आलो आहे. आजच्या सातव्या दिवशी प्रलय होईल आणि सर्वनाश होईल. तेव्हा तू माझे स्मरण कर. मी तुझे रक्षण करीन. माझ्या अंगाशी आपली नाव बांधून टाक.

मनुमहाराज प्रभूचे ध्यान करू लागले. पृथ्वी जलमय झाली.

जेव्हा एखादा ब्रह्मनिष्ठ गुरू भेटतो तेव्हाच वृत्ति ब्रह्माकार होते. मत्स्यनारायण सद्गुरूंचेच स्वरूप आहे. गुरुकृपेशिवाय मन ईश्वरांत स्थिर होत नाही.

मी आपल्याला शरण आलो आहे. माझी नाव आपण पार करून द्या.

वृत्तीला ब्रह्माकार करा. सत्यव्रती करा. सत्यपालन करा. सत्यनिष्ठ जीवच सत्यव्रत मनु आहे. कृतमालेच्या किनाऱ्यावर वसणे याचा अर्थ सत्कर्मांच्या परंपरेत जगणे. असे झाल्यावरच सत्यव्रत जीवात्म्याची वृत्ति ब्रह्माकार होते आणि मत्स्यनारायण भगवान त्यांच्या हातात येतात. अशा अधिकारी जीवालाच परमात्मा भेटत असतात. प्रलयांत भगवंत सत्यनिष्ठाचा नाश होऊ देत नाहीत. सत्कर्मी आणि सत्यनिष्ठ व्यक्ति प्रलयांतही मरणार नाही. जो भगवंताला शरण जातो, ज्याला भगवंत आपला म्हणतात त्याचा प्रलयांत नाश होत नाही. प्रलयांत सगळी सृष्टी नष्ट झाली, परंतु सत्यव्रताचा नाश झाला नाही. कारण त्याने मत्स्यनारायण भगवंताशी आपला संबंध जोडून घेतला होता.

शरीर नाव आहे. प्रभूचे चरण नांगर आहे. या शरीराला परमात्म्याच्या चरणाशी बांधून टाका.

आदि मत्स्यनारायणाला भगवान शुकदेव पुनःपुन्हा नमस्कार करतात. मत्स्यनारायणाच्या स्तुतीला महात्म्यांनी गुरुष्टकी म्हटले आहे. या मत्स्यनारायणाच्या कथेचा जो कोणी पाठ करतो त्याच्या सर्वच संकटांचा विनाश होतो. मत्स्यनारायण प्रभूने वेदांचा चोर, दैत्य हयग्रीव याचा संहार केला. मनुमहाराजांना संहितेचा उपदेश दिला. अशा प्रभूंना नमस्कार करून आम्ही हा आठवा स्कंध समाप्त करतो.

**हरे राम हरे राम, राम राम हरे हरे।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥**

**॥ अष्टम स्कंध समाप्त ॥**

●●●

|| श्रीहरिः ||

# || नवम स्कंध ||

श्रीकृष्णाय नमः||

प्रथम स्कंध अधिकारलीलेशी संबंधित होता. शिष्याचा अधिकार सांगितला गेला होता. ज्याचा अधिकार सिध्द होतो त्याला संत भेटतात. मृत्यू डोक्यावर येऊन ठेपला आहे कळल्याबरोबर परीक्षित राजाने आपले विलासी जीवन आटोपते घेतले आणि तो सन्मार्गाकडे वळला. विलासी जीवनाचा अंत होऊन भक्ति सिध्द झाली म्हणजेच जीव अधिकारी होतो. वैराग्य आत्मसात करून जो बाहेर पडतो तो संत होतो आणि त्याला आपोआप सद्गुरू येऊन भेटतात. संताच्या येथेच संत येतात. तुम्ही संत व्हाल तर तुम्हालासुध्दा संत स्वतः येऊन भेटतील.

दुसऱ्या स्कंधात ज्ञानलीलेचे वर्णन आले आहे. मनुष्यमात्राचे कर्तव्य काय आहे? आसन्नमरण मनुष्याचे कर्तव्य काय? अशा प्रश्नांची चर्चा करून ज्ञान दिले गेले आहे.

तिसऱ्या आणि चौथ्या स्कंधांत सर्ग-विसर्ग-लीला वर्णन करून ज्ञानाला क्रियात्मक रूप देण्याचा उपदेश केला आहे. ज्ञानाला कशा प्रकारे जीवनात उतरवावे, ते कसे आचरणात आणले जाऊ शकेल हे ध्रुव इत्यादींच्या दृष्टान्तांनी दाखविले आहे.

ज्ञान जोपर्यंत शब्दांतच आहे, तोपर्यंत शांति मिळत नाही. ते जेव्हा सक्रिय होते, आचरणांत येते तेव्हाच शांतीचा लाभ होतो.

पाचवा स्कंध स्थितिलीलेचा आहे. गुरूच्या द्वारे प्राप्त झालेले ज्ञान जेव्हा आचरणांत आणाल तेव्हाच स्थिरता मिळेल हे या स्कंधांत दाखविले आहे. सहाव्या स्कंधांत पुष्टिलीला, अनुग्रहलीला यांचे वर्णन आहे.

जो साधना करतो त्याच्यावरच प्रभु कृपा करतात. मनुष्य जेव्हा एखाद्या स्वरूपांत स्थिर (निमग्न) होतो तेव्हाच देव कृपा करतो. काही लोकांना वाटते की खाऊन पिऊन पुष्ट होणे म्हणजेच पुष्टिमार्ग आहे हा समज चुकीचा आहे. देवाच्या विरहामधे मनुष्याचे जीवन कसे असले पाहिजे याचे निर्देशन पुष्टिमार्ग करतो.

ईश्वराला आपले सर्वस्व अर्पण करा. इंद्रियांना भक्तिरसांत बुडवून ठेवा. असे केल्यानेच पुष्टि मिळत असते. मनुष्याने पुष्टीचा जर सदुपयोग केला नाही आणि जर तो वासनेच्या वेगात वाहून गेला तर तो पुष्ट होण्याऐवजी दुष्टच बनत असतो. अनुग्रहानंतर सुध्दा जर मनुष्य वासनेच्या आधीन होत असेल तर तो पुष्ट होत नाही.

सातव्या स्कंधात असद्वासनेला दूर करण्याचे संतांचे धर्म सांगितले आहेत. सातवा स्कंध वासनालीलेचा आहे. प्रभुकृपेचा जर मनुष्याने चांगला उपयोग केला नाही तर वासनाच बळावत असते.

जे काही आहे ते स्वतःच्या सुखासाठीच उपयोगांत आणीन अशी बुद्धी ठेवणे असद्वासना होय. प्रल्हादास जे काही मिळाले होते त्याचा त्याने सर्वांसाठीच उपयोग केला होता.

मला जे सुख मिळाले आहे ते प्रभूचेच आहे. सुख भोगून जो दुसऱ्याला सुख देतो तो सज्जन तर आहे, परंतु संत नाही. जो स्वतः दुःख सहन करून दुसऱ्याला सुख देतो तो संत!

रासलीला भागवताचे फळ आहे. रासलीलेत वासना बरोबर घेऊन जाल तर तेथे प्रवेश मिळणार नाही. पुष्टिनंतर जागृत झालेली वासना अनर्थ उत्पन्न करते. पुष्टीचा सदुपयोग करणारा देव होतो आणि दुरुपयोग करणारा दैत्य. प्रल्हाद देव मानला गेला; कारण त्याने पुष्टीचा सदुपयोग केला. हिरण्यकशिपूने पुष्टीचा दुरुपयोग केला म्हणून तो दैत्य म्हटला गेला. ईश्वराने दिलेला वेळ, संपत्ति आणि शक्ति यांचा जो सदुपयोग करील तो देव आणि दुरुपयोग करील तो दैत्य. ईश्वर तर जीवावर कृपा करतो. परंतु अज्ञानी जीव मात्र त्याचा दुरुपयोग करतो म्हणून तो दुष्ट बनतो.

सातव्या स्कंधात वर्णन केलेल्या चार उपायांनी वासनेचा नाश होऊ शकतो. आठव्या स्कंधात संतांचे चार धर्म वर्णन केले आहेत.

१) आपत्तींत दुःखाचे वेळीं हरीचें-भगवंताचे स्मरण. दृष्टान्त– गजेंद्र. २) संपत्तीच्या अवस्थेंत सर्वस्वाचे दान. बलिराजाप्रमाणे या अवस्थेत सर्वस्वाचे दान केल्याने वासनेचा क्षय होतो. ३) विपत्तीत सुद्धा स्ववचनाचे पालन. दृष्टान्त - बलिराजा. ४) सर्वच अवस्थांत भगवत्‌शरणागति. दृष्टान्त सत्यव्रत भगवान मत्स्यनारायणाला शरण गेला होता.

वासनेला नष्ट करण्याचे हे चार उपाय आपण पाहिले. वासना जर परमेश्वराकडे वळविली, तर तीच वासना भक्ति बनते. रासलीलेत आम्हाला प्रभूला भेटायचे आहे. परंतु वासनेचे आवरण जोपर्यंत मध्ये असेल तोपर्यंत आनंद मिळू शकणार नाही. वासनेचा विनाश करून, वासनामुक्त होऊन रासलीलेत सहभागी व्हायचे आहे. वासनेचा क्षय झाल्यावर रासलीलेत ईश्वर आणि जीवाचे मीलन होते. संयम आणि सदाचाराचा आसरा घेतला तरच रासलीलेत स्थान मिळेल.

**१. मर्यादापुष्टीने काम-विनाशः**

आठव्या स्कंधात संतांचे चार धर्म सांगितले तरी शुकदेवांना वाटले की परीक्षित राजाच्या मनात अजूनही थोडीशी सूक्ष्म वासना शिल्लक आहे. राजा जर ही सूक्ष्म वासना मनात ठेवून रासलीलेत जाईल, तर तेथेही त्याला कामच दिसेल. मी राजाला रासलीलेत घेऊन तर जाईन पण जर त्याच्या मनांत काम शिल्लक असेल तर तिथे सुद्धा लौकिक कामाचारच त्याच्या दृष्टीत येईल.

ज्याच्या मनांत काम असतो त्याला सर्वदूर कामच दिसत असतो. एका गृहस्थाची तरुण मुलगी सासरी जायला निघाली तेव्हा तिला रडू आले. पित्याचे हृदय सुद्धा भरून आले. रडत रडत मुलगी बापाला नमस्कार करू लागली, तर बापाने मुलीला हृदयाशी धरले आणि सांत्वन करू लागला. तर हे वात्सल्यपूर्ण निर्दोष आलिंगन होते. परंतु सडकेवरून जाणाऱ्या एका व्यक्तीला यांत विकार दिसला. त्याला हे ठाऊक नव्हते कीं हे कोण आहेत.

बाप-मुलीचे मीलन शुद्ध आहे, परंतु त्याहीपेक्षा लाख पटीने शुद्ध गोपी आणि कृष्ण, जीव आणि ईश्वराचे मीलन आहे. हे मीलन रासलीलेंत होत असते. रासलीलेत काम बिलकूल नाही. शुकदेवांच्या केवळ दर्शनानेच अप्सरांच्या कामाचा नाश झाला होता.

जो अतिशय निष्काम आहे तो कामाची कथा कशी करू शकेल? शुकदेव निष्काम आहेत.

ज्याच्या निव्वळ दर्शनानेच इतर लोकांच्या मनांत वसत असलेला काम नाश पावतो असा तो महात्मा ही कथा सांगत आहे.

ज्याप्रमाणे सूर्याजवळ अंधार जाऊ शकत नाही, त्याचप्रमाणे काम कृष्णाजवळ जाऊ शकत नाही.

बुद्धींत काम असेल तर कृष्णाचे दर्शन होणार नाही. बुद्धीत जोपर्यंत वासनारूपी विष शिल्लक असेल तोपर्यंत ईश्वररूपी रस स्थिर होऊ शकणार नाही.

राजाची बुद्धी स्थिर करण्यासाठी– शुद्ध करण्यासाठी नवव्या स्कंधात सूर्यवंशी आणि चंद्रवंशी राजांच्या कथा सांगितल्या आहेत.

सूर्य बुद्धीचा स्वामी आहे, चंद्र मनाचा स्वामी आहे. बुद्धीच्या शुद्धीसाठी सूर्यवंशी रामचंद्राचे चरित्र सांगितले आहे आणि मनाच्या शुद्धीसाठी चंद्रवंशी श्रीकृष्णाचे.

रामचंद्राच्या मर्यादेचे पालन कराल तर तुमच्या मनांतील कामरूपी रावण मरेल. तुमच्या मनांतील काम मेला की परमात्मा श्रीकृष्ण भेटेल. रामानंतर कृष्ण येतात. जो रावणरूपी कामाला मारू शकतो तोच कृष्णलीलेचे दर्शन करू शकतो.

रामचंद्रांच्या चरित्राचे वर्णन रामायणात विस्ताराने केले गेले आहे. त्याचेच संक्षिप्त वर्णन येथेही कांही हेतुपूर्वकच केले आहे. जो रामचंद्राच्या मर्यादेचे पालन करतो त्यालाच कान्होबा भेटत असतो.

मनाला शुद्ध करण्यासाठीच या लीला आहेत.

या नवव्या स्कंधांत दोन प्रकरणे आहेत. ती सूर्यवंशी आणि चंद्रवंशी राजांच्या संबंधांत आहेत. सूर्यवंशात श्रीरघुनाथ आणि चंद्रवंशांत श्रीकृष्ण अवतीर्ण झाले.

सातव्या स्कंधात वासनेची कथा होती. त्या वासनेचा नाश करण्यासाठी आठव्या स्कंधात चार उपाय सांगितले. संतांच्या या चार धर्मांना जीवनांत उतरविल्याने वासनेचा नाश होऊ शकतो.

वासना जर विवेकपूर्वक प्रभूच्या मार्गाकडे वळविली तर ती उपासना होते आणि मनुष्याला मुक्तीपण मिळवून देते. वासनेच्या विनाशानंतर नवव्या स्कंधात प्रवेश करायचा आहे. मन आणि बुद्धीच्या शुद्धीसाठी हा नववा स्कंध आहे.

इंद्रियांमध्ये वसलेली वासना स्थूल वासना आहे. आणि मनोगत वासना सूक्ष्म वासना आहे. संतांची लक्षणे आचरणांत आणल्याने स्थूल वासनेचा तर नाश होतो, परंतु मन आणि बुद्धीत वसलेल्या सूक्ष्म वासनेचा इतक्या सहजासहजी नाश होत नाही.

मनाचा स्वामी चंद्र आहे आणि बुद्धीचा सूर्य. सूर्य आणि चंद्र बुद्धी आणि मनाचे देव आहेत. या दोघांची आराधना केल्यावर बुद्धिगत वासनेचा क्षय होतो. वासनेचा पूर्णपणे क्षय झाल्याशिवाय मोहाचा क्षय होत नाही. आणि मोहाचा क्षय झाल्याशिवाय मुक्ती मिळत नाही. मनातील सूक्ष्म अशा मलाचाही नाश झाल्यावरच मुक्ती मिळत असते.

संसारांत खरें सुख नाही असें ज्ञानी पुरुष वारंवार चिंतन करीत असतात. जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत सुखसोईंची अपेक्षा तर राहते, परंतु अंती परिणाम तर दुःखमयच होतो हे जाणूनच ते भोगोपभोग करीत असतात.

सूर्य-चंद्रांच्या उपासनेशिवाय बुद्धिगत वासनेचा नाश होऊ शकत नाही.

मनांत सूक्ष्म मलसुद्धा शिल्लक राहिला नाही तर मन मरेल, अर्थात श्रीकृष्णांत मिळून जाईल. मन मरेल तर मुक्ति मिळेल. आत्मा तर नित्य मुक्त आहे. मनाला मुक्त करायचे आहे. संतधर्माच्या आचरणाने इंद्रियगत विकारांचा नाश होतो. विकार-वासना मन आणि बुद्धींत सूक्ष्म रूपाने व्याप्त आहे.

त्याचा लवकर विनाश होत नाही. ज्याचा जन्म अंतिम आहे, त्याचेच मन अतिशुद्ध होऊ शकते. आपले मन अतिशुद्धच आहे असा विचार केव्हांही करू नका. कारण असे केल्याने साधन आणि साधनेची उपेक्षा होण्याची शक्यता आहे.

भोजनांत तृप्ति येऊ द्या, पण भजनांत तृप्त होऊ नका. सत्कर्माविषयीं तर असंतोषच राहिला पाहिजे. थोड्याशाच सत्कर्मानें समाधानी होऊं नका.

इंद्रियगत वासना नष्ट झाल्यावर सुद्धा मनोगत वासना शिल्लक राहते. ईश्वराशी एक व्हायचे आहे. मन आणि बुद्धीत वसलेली वासना कृष्णमीलनांत बाधा उत्पन्न करीत असते. आमचा लक्ष्यबिंदू तर श्रीकृष्णमीलनच आहे. आम्हाला ईश्वराशी एकत्व साधायचे आहे. भगवंताशी एक होण्यासाठीच ही भागवतकथा आहे.

भागवतकथा जीवाला भगवंताशी तन्मय करते. कथाश्रवण पुण्यकार्य आहे. कर्माचे फळ तर कालांतराने मिळते. परंतु भागवतकथेचे श्रवणफल तर शीघ्र मिळते. या कथाश्रवणांचे फळ आहे सांसारिक विषयांचे विस्मरण आणि ईश्वराशी तन्मयता. सगळ्याच साधनांचे हेच फळ आहे. कथाकीर्तनांत अनायासेच तन्मयता होत असते. जगाला अनायासे विसरून जाऊन ईश्वराशी तन्मय होणेच सर्व साधनांचे फळ आहे. हेच सर्व साधनांचे उद्दिष्ट आहे.

मला जगांत राहायचे आहे, परंतु जगाला माझ्या मनांत वसवायचे नाही. ज्याच्या मनांत संसाराचे विषय येतच नाहीत त्याच्यासाठी मुक्ती सुलभ आहे.

प्रभुद्वारा उत्पन्न जगत् भजनांत विक्षेप करीत नाही, परंतु जीव आपल्या मनांत जे जग वसवितो तेच भजनांत विक्षेप करीत असते. मनांतून संसाराच्या सूक्ष्म स्वरूपाला जेव्हां बाहेर काढाल तेव्हांच तेथे श्रीकृष्ण येऊन वसतील.

बुद्धिगत कामविकाराच्या विनाशासाठीच ही नवव्या स्कंधाची कथा आहे. ज्यात वर्षानुवर्षे तेल ठेवले गेले आहे अशा भांड्याला पाच-दहा वेळा धुतल्यावर स्वच्छ होईल, परंतु तेलाचा वास जाणार नाही. आता त्यात चटणी, लोणचे ठेवले तर त्याला जुनाट वास येतच राहील. मनुष्याचा मेंदूही अगदी असाच आहे. ह्यात अनेक वर्षांपासून कामवासनारूपी तेल ठेवलेले आहे. या बुद्धिरूपी पात्रांत श्रीकृष्णरूपी रस ठेवायचा आहे. आता या मेंदूरूपी पात्रांत कामाचा अंशमात्र सुद्धा वास असेल तर त्यात प्रेमरस, भक्तिरस जमा होणार नाही.

जेव्हां बुद्धींत परमात्म्याचा निवास होतो तेव्हांच पूर्ण शांति मिळू शकते. जोपर्यंत बुद्धींत ईश्वराचा अनुभव होत नाही तोपर्यंत आनंदाचा अनुभव होऊ शकत नाही. सांसारिक विषयांचे ज्ञान बुद्धीत आल्यावर विषय सुखरूप होतात. परमात्म्याला बुद्धींत ठेवायचे आहे. डोक्यांत जेव्हां ईश्वर येऊन राहतो तेव्हांच ईश्वरस्वरूपाचे ज्ञान पूर्ण आनंद देते. तेलाच्या अंशाने चटणी, लोणचे बिघडते. त्याचप्रमाणे बुद्धींत वासनेचा अंश राहिल्यामुळे ती अस्थिरच राहील.

बुद्धीला स्थिर आणि शुद्ध करण्यासाठी मनाचा स्वामी चंद्र आणि बुद्धीचा स्वामी सूर्य यांची आराधना करायची आहे. त्रिकाल संध्या केल्याने बुद्धी विशुद्ध होते.

वासना विनाशासाठी संतधर्म सांगितल्यावर सुद्धा शुकदेवांना वाटले की परीक्षिताच्या मनांत अजूनही सूक्ष्म वासना शिल्लक राहिली आहे. राजाला रासलीलेत घेऊन जायचे आहे. मृत्यूपूर्वीच त्याला परमानंद द्यायचा आहे. बुद्धीत जोपर्यंत कामवासना असेल तोपर्यंत त्याला श्रीकृष्ण दर्शन होणार नाही. म्हणून राजाच्या मनांत शिल्लक राहिलेल्या वासनेचा पूर्णतः नाश करण्यासाठी शुकदेवांनी सूर्य

आणि चंद्र-वंशाची कथा सांगितली.

जोपर्यंत राम येत नाहीत तोपर्यंत कृष्णही येत नाहीत. भागवतात मुख्य कथा श्रीकृष्णाची आहे. तरी पण रामाच्या आगमनानंतरच श्रीकृष्ण येतात. ज्याच्या घरी राम येत नाही त्याच्या येथील रावण-काम मरत नाही आणि जोपर्यंत कामरूपी रावण मरत नाही तोपर्यंत श्रीकृष्ण येत नाही. ह्या रावणाला मारायचे आहे. जर रामाच्या मर्यादेचे पालन केले गेले तरच रावण मरेल. कोणत्या का संप्रदायावर विश्वास असेना, जोपर्यंत रामचंद्राच्या मर्यादेचे पालन करणार नाही तोपर्यंत आनंद मिळणार नाही.

आरंभी रामचंद्राचे चरित्र वर्णन केले आहे. मग दहाव्या स्कंधाची कथा येईल. भागवताच्या कथेच्या श्रोत्यांनी आणि वक्त्यांनी रामाच्या मर्यादेचे पालन केले पाहिजे. माणसाला थोडीशी संपत्ति आणि थोडासा अधिकार मिळाल्याबरोबर तो रामाची मर्यादा विसरून जातो. राम आल्याशिवाय कृष्णही येत नाही. रामचंद्रांची उत्तम सेवा म्हणजे त्यांच्या मर्यादेचे पालनं करणे. त्यांचे आचरण आपल्याला आपल्या जीवनांत आणायचे आहे.

जर रामांना मनात वसवाल– मर्यादापुरुषोत्तम रामांचे अनुकरण कराल तर भगवंत भेटतील. त्यांच्या लीलेचे अनुकरण करा. त्यांचे चरित्र सर्वथा अनुकरणीय आहे.

श्रीकृष्णाच्या सर्वच लीलांचे अनुकरण करायचे नाही. श्रवण करायचे आहे. त्यांचे चरित्र चिंतनीय आहे. श्रीकृष्णाच्या लीला चिंतन करण्यासाठी आणि चिंतन करून तन्मय होण्यासाठी आहेत.

रामचंद्रांनी जे केले तें करायचे आहे. परंतु श्रीकृष्णांनी जे सांगितले आहे ते करावयाचे आहे. राम पूर्ण पुरुषोत्तम असूनही त्यांनी माणसाला आदर्श दाखविले आहे.

रामचंद्राचे मातृप्रेम, पितृप्रेम, बंधुप्रेम, एकपत्नीव्रत इत्यादी सर्व कांही जीवनांत उतरविण्यासारखे (आचरणांत आणण्यासारखे) आहे. रामायणांतील सर्वच पात्रे आदर्श आहेत. दशरथाचे पुत्रप्रेम, सीतेची पतिभक्ति, लक्ष्मण आणि भरताचे बंधुप्रेम इत्यादी सर्व आदर्शमय आहेत.

श्रीकृष्ण जे कांही करीत असत ते सर्वकांही करणें आम्हाला अशक्य आहे. त्यांनी तर कालिया नागाला वश करून त्याच्या डोक्यावर नृत्य केले होते. गोवर्धन पर्वतसुद्धा करंगळीवर उचलून धरला होता. श्रीकृष्णचरित्राचे अनुकरणच करायचे असेल तर पूतनाचरित्रापासून प्रारंभ करावा. पूतनेचे सर्व विष ते प्याले होते. विषाचे पचन झाल्यावरच मग इतर सर्व लीलांचे अनुकरण करा.

रामचंद्रांनी आपले ऐश्वर्य लपवून ठेवले होते आणि मनुष्याच्या चरित्राचे नाटक केले होते.

साधकाचे वर्तन कसे असले पाहिजे हे रामचंद्रांनी दाखविले आहे. साधकाचे वर्तन रामचंद्रासारखे असायला हवे. सिद्ध पुरुषांचे वर्तन श्रीकृष्णासारखे असू शकते.

रघुनाथाचा अवतार राक्षसांना मारण्यासाठी नव्हे, तर मनुष्यांना मानवधर्म शिकविण्यासाठी झाला होता. ते जीवमात्राला उपदेश देऊन गेले. त्यांची बाललीला सुद्धा सरळ आहे; तर कृष्णाची सर्वच लीला गहन आहे.

रामचंद्रांचे सरळपण तर अगदी उच्च पायरीचे आहे. त्यांच्यासारखा सरळ आजपर्यंत कोणी झाला नाही.

अग्निनारायणाने सीतेला निर्दोष घोषित केले होते. तरीपण त्या मूर्ख धोब्याचे कटु वचन ऐकून रामचंद्रांनी सीतेचा त्याग केला. जगाच्या समोर आदर्श ठेवण्यासाठी त्यांनी सीतेचा त्याग केला. जगासमोर आदर्श ठेवण्यासाठीच केवळ त्यांनी असा निष्ठुर व्यवहार केला. आदर्श राजाचे वर्तन कसे असू शकते आणि कसे असले पाहिजे हे, ते जगाला दाखवू इच्छित होते.

सीतेने स्त्रीधर्माचा आदर्श प्रस्तुत केला आहे. ' माझे पतीच माझे परमेश्वर आहेत. '

राम मर्यादापुरुषोत्तम आहेत आणि श्रीकृष्ण पुष्टि-पुरुषोत्तम. कृष्ण लोणीचोर आहेत अर्थात मृदु मनाचे चोर आहेत. ते सर्वस्वच मागतात.

रामनाम जितके सरळ आहे तितकाच त्यांचा काम आणि त्यांच्या लीला पण सरळ आहेत. रामाच्या नावांत एकही जोडाक्षर नाही. कृष्णाच्या नावात एकही अक्षर सरळ नाही, सगळीच जोडाक्षरे आहेत.

राम दिवसा बारा वाजता आले तर कृष्ण रात्री बारा वाजता. एक मध्यान्हीला आले तर एक मध्यरात्री. एक राजा दशरथाच्या प्रासादांत अवतीर्ण झाला तर दुसरा कंसाच्या कारागृहांत.

रामांना समजणें-ओळखणे सरळ आहे, परंतु कृष्णाला समजणे फार कठीण. परंतु रामांची मर्यादा आचरणांत आणणे फार कठीण कर्म आहे.

सूक्ष्म वासनेच्या नाशासाठी नवम स्कंधात संतांची चरित्रे सांगितली आहेत.

सूर्यवंशाच्या प्रकरणांत रामांचे चरित्र येते.

रामचंद्र मर्यादा आहेत तर श्रीकृष्ण प्रेम. मर्यादा आणि प्रेम आचरणांत आणाल तर सुखी व्हाल.

नरसिंह अवताराच्या कथेत क्रोधाच्या नाशाची, वामन अवताराच्या कथेंत लोभाच्या नाशाची आणि रामचंद्रांच्या अवतारांत कामाच्या नाशाची रीत दाखविली आहे. क्रोध, लोभ आणि कामाचा नाश झाला म्हणजेच भगवान कृष्ण प्रगट होतात.

तसे तर भागवताचे लक्ष्य कृष्णलीलाकथनच आहे. तर मग प्रथमस्कंधापासूनच कृष्णलीलेचे वर्णन कां नाही ? याचें कारण हेच कीं क्रोध, लोभ आणि काम इत्यादींचा नाश झाल्यावरच कृष्ण परमात्मा भेटतात.

आठव्या स्कंधाच्या शेवटीं शेवटीं सत्यवान मनुमहाराज आणि मत्स्यावतार यांच्या कथांचा ओझरता उल्लेख केला आहे.

परीक्षित राजा म्हणाला— मला या सत्यव्रत मनुच्या वंशाची कथा सांगा.

**२. सत्यव्रत वैवस्वत मनु आणि त्याच्या वंशाची कथा:**

शुकदेव वर्णन करतात— राजा! या कल्पांत राजर्षि सत्यव्रत मनु झाला होता. विवस्वताच्या घरीं वैवस्वत झाला होता. मनु वैवस्वत सूर्यवंशाचे आदिप्रवर्तक आहेत. त्यांचा विवाह श्रद्धा नावाच्या स्त्रीशी झाला होता. त्यांना दहा संताने झाली. त्यांची नावे अनुक्रमे इक्ष्वाकु, नृग, शर्याति, दिष्टि, करूष, नरिष्यंत, पृषघ्न, नभग आणि कवि अशी होती.

दिष्टीच्या वंशांत मरुत्त नावाचा चक्रवर्ती राजा झाला होता. मरुत्ताचे गुरू बृहस्पति होते. ते इन्द्राचे देखील गुरू होते. मरुत्त राजाला यज्ञ करायचा होता. बृहस्पतीने येण्यास नकार दिला. प्रत्येक कार्यात पहिले कुलगुरूचे पूजन तर केलेच पाहिजे. आता काय करावे ?

एकदा मरुत्ताला वाटेत नारद भेटले, तेव्हां त्यांना मरुत्ताने आपली अडचण सांगितली. नारद म्हणाले, ' बृहस्पतीचा छोटा भाऊ संवर्ताला बोलावून घे. तोसुद्धा गुरूसारखाच आहे. यज्ञ तर केलाच पाहिजे. '

राजा— संवर्त तर योगी आहे आणि त्याचा पत्ताच नाही.

नारद— त्यांचा पत्ता मी सांगतो, पण माझे नाव घेऊ नको.

पुष्कळ वेळा ज्ञानी पुरुष सुद्धा जगाला भितात. जगांतील स्त्री-पुरुषांची संगती झाल्यावर ब्रह्माकार वृत्तीचा भंग होत असतो.

संवर्त योग्याचा नियम होता की, चोवीस तासांत एकदा तो काशीला येत असे. असे महापुरुष भजनांत सुद्धा नियम-पालन करतात. संवर्त काशी विश्वनाथाचे दर्शनासाठीं येत, परंतु वाटेत जर शवाचे दर्शन झाले तर त्यालाच शिवरूप मानून वंदन करून परत जात.

महाभारताच्या अनुशासनपर्वांत विस्ताराने ही कथा सांगितली गेली आहे.

मरुत्त राजा शव घेऊन रात्री वाटेत बसून राहिले. एक पागलासारखी व्यक्ती आली. त्याने शव पाहिले तर वंदन करून परत जाऊ लागला. मरुत्त राजाला खात्री झाली की हाच संवर्त योगी आहे. राजाने त्यांचे पाय धरले आणि नमस्कार केला. संवर्त म्हणाले, 'मी अज्ञानी आहे. मला जाऊ द्या.'

मरुत्तः तुम्ही संवर्त आहात. माझे गुरू आहात. तुम्ही तर बृहस्पति गुरूंचे कनिष्ठ बंधू आहात. बृहस्पति देवांचे गुरू झाले आहेत आणि माझ्या घरी येणे बंद केले आहे. मी यज्ञ करू इच्छितो. कोणी माझ्याकडून यज्ञच करवीत नाही.

संवर्तः मी यज्ञ तर करून घेईन, परंतु तुझे ऐश्वर्य पाहून बृहस्पति तुला म्हणतील कीं ते तुझा यज्ञ करायला तयार आहेत आणि तुझे गुरू होऊ इच्छितात. जर तशी वेळ आली आणि तू माझा त्याग केलास तर मी तुला भस्मीभूत करून टाकीन.

राजाने संवर्ताची अट कबूल केली. संवर्ताने राजाला मंत्रदीक्षा दिली. यज्ञाचा आरंभ व्हायला आला. यज्ञाची सर्वच पात्रे सुवर्णाची होती. राजाचे वैभव आणि यज्ञाची भव्य तयारी पाहून बृहस्पतींना लोभ सुटला. त्यांनी राजाला निरोप पाठविला– 'तुझा मीच आचार्य आहे. मी यज्ञ करायला तयार आहे.' बृहस्पतीने इंद्राला सांगितले आणि इंद्राने अग्नीबरोबर निरोप पाठविला की, बृहस्पतीलाच गुरु करावे. जर असे झाले नाही तर इंद्र यज्ञांत बाधा उत्पन्न करील. अग्नीने संवर्ताला सांगितले की, माझ्या आज्ञेचे तू उल्लंघन करशील तर मी तुला भस्म करून टाकीन.

ज्या देवाला संवर्त आज्ञा देतात तो तेथे उपस्थित होतो आणि तो देव प्रत्यक्ष हविर्भाग ग्रहण करतो. जसा यज्ञ मरुत्ताचा झाला तसा कधी कोणाचा झाला नाही आणि पुढेही होणार नाही. मरुत्ताच्या या यज्ञाचे वर्णन ऋग्वेदांतही आहे. भागवतांत तर ह्याचे संक्षिप्तच वर्णन केले आहे.

**३. महान भक्त राजा अम्बरीश आणि दुर्वास ऋषींचा क्रोधः**

मनुपुत्र नभगाच्या घरी नाभाग झाले आणि भगवान शंकराच्या कृपेने नाभागाच्या घरी अंबरीश भक्ताचा जन्म झाला. अंबरीश मर्यादाभक्तीचे आचार्य आहेत. राजा अंबरीश कांकरोलींतील विराजमान देव द्वारकानाथ यांची नित्य नियमाने सेवायुक्त पूजा करीत. ते त्यांचे इष्टदेव. या देवांना दररोज बावन्न मणाचा नैवेद्य अर्पण केला जातो. त्यासाठी किती सामुग्री एकत्रित केली जात असेल?

अंबरीश शद्बांचा अर्थ पहा. अंबर म्हणजे आकाश आणि ईश अर्थात ईश्वर. आकाश आतही आहे आणि बाहेरही. ज्याच्या आत आणि बाहेर दोन्हीकडे ईश्वर आहे तोच अंबरीश. चोहोबाजूला ज्याला परमात्मा दिसेल तो अंबरीश.

ज्ञानमार्गात इन्द्रियरूपी दारे बंद ठेवावी लागतात. भक्तिमार्गात सर्वच इंद्रियांना भगवंताच्या मार्गात लावावे लागते. भगवंताच्या चरणी भक्त आपली इन्द्रिये अर्पित करतो. भक्त आपल्या सगळ्या इंद्रियांचा

भगवंताशी विवाह लावून देतो. भगवान हृषीकेश-इंद्रियांचे स्वामी आहेत.

राजा अंबरीश महान् भक्त होते. त्यांचे मन भगवंताच्या चरणकमली, वाणी भगवत्‌गुणवर्णनांत, हात हरि मंदिरांच्या स्वच्छतेत, पाय प्रभूच्या क्षेत्रादींच्या पदयात्रेत, कान भगवंताच्या उत्तम कथेच्या श्रवणांत आणि दोन्ही डोळे मुकुंद भगवानांच्या मूर्तीच्या दर्शनांत व्यग्र राहात असत. मस्तकाने ते भगवान श्रीकृष्णांना वंदन करीत राहात.

भगवंताच्या सेवेंत जी व्यक्ति आपले सर्व शरीर लावते तिचा देहाभिमान कमी कमी होत जातो.

भक्तिमार्गांत धन किंवा तन नाही, तर मनच प्रधान आहे. जेव्हांपासून भक्तींत धनाचे प्राधान्य झाले आहे तेव्हांपासून भक्ति छिन्नभिन्न होत चालली आहे.

राजा अंबरीश म्हणूनच सर्वप्रथम म्हणत– माझे मन सदा श्रीकृष्णाच्या चरणकमलांत राहो.

सेवेंत धन नाही, मनच मुख्य आहे. सेवेचा अर्थ सेव्य श्रीकृष्णांत मनाला ओवून ठेवायचे. सेवेचा संबंध मनाशी आहे. शरीराने जी क्रिया केली जाईल त्यांत जर मनाचा सहकार नसेल तर सेवा व्यर्थ होऊन जाईल.

सेवेचा क्रम अंबरीशाने सांगितला आहे. सेवेचा आरंभ मनापासून होतो. मन सूक्ष्म असते. ते जग आणि ईश्वराशी एकाच वेळी संबंध ठेवू शकत नाही. मनाला वळवाल तर ते वळेल. कोणाच्या उपदेशाने नाही. तुम्ही आपल्या मनाला स्वतः समजवाल तरच परिणाम होईल. आपल्या मनाला दुसरा कोण आणि कसे समजावू शकेल?

राजा अंबरीशाचे इष्ट देव द्वारकानाथ आहेत. राजा असून सुद्धा ते स्वतः सेवापूजा करीत. घरांत अनेक सेवक असूनदेखील ते म्हणत : मी देवाचा दास आहे. त्यांची सेवा मला स्वतःलाच केली पाहिजे.

दास्यभावांत सेवाच मुख्य आहे.

जो स्वतः जेवतो त्याचेच पोट भरते. भजन आणि सेवा जो स्वतः करतो त्यालाच फळ मिळते. चार कामे स्वतःलाच करावी लागतात. भोजन, विवाह, देवाची पूजा-सेवा आणि मृत्यु. येथे बदली चालत नाही.

अंबरीश तर चक्रवर्ती राजा होता तरी पण प्रभुसेवा तो स्वतःच करीत असे. देवाच्या मंदिराची स्वच्छता सुद्धा करीत असे. तसे केल्याने वैष्णवांच्या चरणरजाचा लाभ मिळतो. भागवतांत स्पष्ट लिहिले आहे कीं अंबरीश, भगवंताच्या दर्शनासाठी अनवाणी जात असत. आम्ही अंबरीशांचे पूर्णपणे अनुकरण करू शकत नसलो तरी त्यांचे कांही ना काही अनुकरण तर केलेच पाहिजे.

एकदा तर अंबरीशाने भगवान श्रीकृष्णाच्या आराधनेच्या हेतूने एक वर्षपर्यंत एकादशी करण्याचे व्रत घेतले होते.

एकादशी व्रत सर्व व्रतांमध्ये श्रेष्ठ आहे. याचे दोन प्रकार आहेत– निषेध व्रत आणि परिपालन व्रत. अन्नाहाराने दोष होऊ नये यासाठी निषेध व्रत केले जाते. भगवंताच्या आराधनेच्या हेतूने केले गेलेले भागवत व्रत सुखदायी आहे. एकादशीचे व्रत त्रिदिवसीय आहे. दशमीच्या दिवशी एक वेळ जेवावे. शक्य झाले तर हविष्यान्न जेवावे, दूधभातासारखा सात्त्विक आहार करावा. या दिवशी अजीर्ण होईल इतके जेवू नये. शक्य असल्यास एकादशी निर्जलाच करावी. असे होऊ शकले नाही तर दूध आणि ऋतुफळांचा संयमपूर्वक आहार करावा. असे केल्यानेच या व्रताचे फळ मिळेल, अन्यथा नाही.

व्रत करण्याचा विचार दृढ असेल तर भगवंत शक्ति देतील. एकादशी करण्याचा संकल्प कराल तर प्रभु साहाय्य करतील. सत्यनारायणाचे कथेत त्या लाकूडतोड्याची गोष्ट आहे. त्याने आपल्याजवळ

पैसे नसताना सुद्धा सत्यनारायणाच्या पूजेचे व्रत घेतले आणि देवाने त्याचा संकल्प पूर्ण केला.

परमात्मा सत्कर्मांत नेहमी साहाय्यभूत होतात. लोक समजतात, एकादशी आली म्हणजे जणू काय दिवाळीच्या आगमनाचा संदेशच आला. असा कधीच विचार करू नये. एकादशीच्या दिवशी घरी अन्न शिजविणेच काय, त्याचे दर्शनसुद्धा करू नये. या दिवशी अन्नांत सर्वच पापे राहतात. ती सर्व त्या अन्न खाणाऱ्याच्या डोक्यावर जाऊन बसतात. एकादशीच्या दिवशी पानसुपारी सुद्धा खाऊ नये. दिवसा निजू नये. रात्री एक-दोन तास जास्त भजन करावे. या दिवशी पंढरपुरांत विठ्ठलनाथ सुद्धा निजत नाहीत.

पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये आणि एक मन या सर्वांना प्रभूचरणी लीन ठेवणे म्हणजेच एकादशी आहे. आजकाल तर लोक एकादशीच्या दिवशी अकरा रसांचा भोग घेतात आणि तिचे दिवाळीचे लघुरूप बनवितात. असे करू नये. अशा एकादशीने काही फळ मिळत नाही.

उप = समीप आणि वास = राहणे. समीप रहाणे असा उपवासाचा अर्थ आहे. प्रभूजवळ राहणे आणि तीच आहे खरी एकादशी.

द्वादशीच्या दिवशी एकच वेळ जेवण करा. सुपात्र ब्राह्मणाची सेवा केल्यानंतर प्रसाद ग्रहण करा. द्वादशीच्या दिवशी दोनदा जेवल्याने एकादशीव्रताचा भंग होतो.

एकादशी व्रत विधिपूर्वक करा. जर विधिपूर्वक करता आले नाही, तर मर्यादेनुसार अन्नाहाराचा त्याग करून फलाहार करा. हे व्रत आरोग्याच्या दृष्टीने सुद्धा आवश्यक आहे. लोक आजकालच्या डॉक्टरांवर विश्वास ठेवतात. परंतु व्यासांसारख्या महान ऋषि-मुनींच्या शब्दावर नाही. डॉक्टर टायफॉईड सांगून एकवीस दिवस अनशन करण्यास सांगितले तर करतीलही; पण एकादशीच्या दिवशी एक दिवसही अनशन करीत नाहीत. एकादशी न करणाऱ्याला एकदम अशा अनेक एकादशा अनिवार्यतः कराव्या लागतात.

राजा अंबरीशाने विधिपूर्वक एकादशीचे व्रत केले आणि व्रताच्या पूर्णाहुतीच्या वेळी यमुनाकिनारी आला. तेथे त्याने स्नान केले आणि ब्राह्मणाची पूजा करून व्रताची पूर्णाहुती देण्याची तयारी करू लागला. इतक्यात तेथे दुर्वास ऋषि अतिथि होऊन आले. भगवंताला नैवेद्य दाखविला. राजाने मुनींचे स्वागत करून म्हटले, 'यावे महाराज! माझ्या येथे प्रसाद ग्रहण करावा.' दुर्वास म्हणाले, 'मी मध्यान्ह कर्म इत्यादीपासून निवृत्त होऊन येतो.'

ईश्वराची धर्ममर्यादा तोडण्यासारखे आणखी कोणते पाप नाही. ईश्वराच्या धर्ममर्यादेचे उल्लंघन कराल तर भक्ती असफल राहील. ईश्वराशी तन्मयता झाल्यानंतर देहभान विस्मृत झाल्यामुळे जर धर्ममर्यादा सुटली तर कांही हरकत नाही, परंतु भानावर असता केव्हांही धर्ममर्यादेचे उल्लंघन होऊ नये.

इकडे राजाला त्रयोदशीच्या पूर्वी व्रत सोडून प्रसाद घ्यायचा आहे आणि तिकडे दुर्वास संध्येपूजेमध्ये इतके लीन झाले होते कीं त्यांना वेळेचे भानच राहिले नाही.

राजाला काळजी वाटू लागली. दुर्वासांना जेवणासाठी आमंत्रण दिलेले आहे. त्यांना जेवायला घालायच्या पूर्वी तर जेवण करता येत नाही. जर मी प्रसाद घेईन तर ब्राह्मणाच्या मर्यादेचा भंग होईल आणि प्रसाद न घेतला तर त्रयोदशीचा आरंभ होऊन व्रतभंग होईल. द्वादशीच्या समाप्तीसाठी कांही पळेच शिल्लक आहेत. ब्राह्मणांची आज्ञा घेऊन राजाने प्रसाद म्हणून जलप्राशन केले. तोच दुर्वास आले. राजाने दुर्वासांचे स्वागत केले. दुर्वासांनी अनुमानाने जाणले कीं राजाने प्रसाद घेतला आहे.

ते म्हणाले– राजा, तू मला आमंत्रण तर दिलेस, परंतु मी येण्यापूर्वीच तू भोजन केलेस हे चांगले केले नाहीस. मी अतिथि, आणि मला सोडून तूच भोजन करून घेतलेस ? अशी कशी तुझी विष्णुभक्ति ?

राजा– मी तर केवळ जलपानच केले आहे महाराज ?

परंतु दुर्वास काय ऐकतात राजाचे ! त्यांनी क्रोधाच्या भरात राजाचे कांहीच ऐकले नाही.

जोपर्यंत दुर्वासना आहे तोपर्यंत क्रोध सुद्धा राहील. दुर्वास ऋषींनी आपल्या डोक्यातील केसांपासून एक कृत्या उत्पन्न केली आणि तिला राजाला मारण्याची आज्ञा केली.

कृत्या अंबरीशाला मारायला धावली, तेंव्हा अंबरीशाच्या प्रार्थनेमुळे भगवंतांनी सुदर्शनचक्र सोडून त्या कृत्येला मारून टाकले. आता ते सुदर्शनचक्र दुर्वासांच्या मागे लागले. मुनि एका लोकांतून दुसऱ्या लोकांत असे धावू लागले, परंतु चक्राने पाठलाग सोडला नाही. दुर्वासांचे रक्षण कोणी करू शकले नाही. सरतेशेवटी ते वैकुंठात येऊन नारायणांना प्रार्थना करू लागले– 'भगवन्, माझे रक्षण करा.' नारायणाने स्वागत केले. मुनि म्हणाले, 'माझ्या मागे तुमचे सुदर्शन धावत आहे, माझे रक्षण करा.'

भगवंत मुनींना म्हणू लागले– 'जो वैष्णव अनन्यभावाने माझी सेवा करून मला आपले सर्वस्व अर्पण करतो त्याला मीपण आपल्या सर्वस्वाचे दान करीत असतो. मी भक्ताधीन आहे. माझे चक्र या वेळी अंबरीश राजाचे आधीन आहे.

भक्तासाठी मी माझीही पर्वा करीत नाही आणि लक्ष्मीचीही नाही. भक्त सर्व कांही सोडून मला शरण येतात. माझ्यासाठी ते आपल्या सर्वस्वाचा त्याग करतात. मला सोडून त्यांना इतर कोणाचाही आश्रय नाही. अशा भक्ताचा त्याग करायचा मी विचार तरी कसा करू ?

भक्तांनी माझे हृदय वश वरून घेतले आहे. ते मला अत्यंत प्रिय आहेत. माझ्याशिवाय इतर कोणत्याही प्रकारच्या मुक्तीची ते इच्छा करीत नाहीत. मी भक्ताचे हृदय आहे आणि भक्तजन माझे हृदय आहेत.

भगवान म्हणतात– तप आणि विद्या अतिउत्तम आहे. तरी पण त्यांना विनय आणि विवेकाचा आधार नसेल तर ते व्यर्थच होत. तुम्ही तपस्वी आहात आणि तुमच्याजवळ प्रबल शक्ती पण आहे. परंतु तुम्ही तिचा दुरुपयोग केला आहे. तुम्हीच स्वतः थोडा विचार करा. अंबरीशाने कांही कोणता अपराध केला होता का ? त्याची कांही चूक होती का ? त्याने व्रतपालनाच्या हेतूनेच केवळ जलपान केले होते, तरीही तुम्हाला क्रोध आला ! तुम्ही त्याच्याकडे जा आणि त्याची प्रार्थना करून क्षमा मागा. जर भक्तराज अंबरीश क्षमा करतील तरच या चक्राची गति थांबेल.

दुर्वास अंबरीशाकडे आले आणि क्षमायाचनेसाठी नमस्कार करणार होते, एवढ्यांत राजा म्हणाला– 'नाही, नाही, महाराज ! आपण क्षमायाचना करावी हे शोभत नाही. नमस्कार तर मीच आपल्याला करायला हवा.'

राजाने सुदर्शनचक्राला प्रार्थना केली कीं, "शांत हो ! जर आजपर्यंत मी कधी कांही दान, पुण्य, यज्ञसेवा केली असेल तर त्या सर्वांच्या पुण्यप्रभावाने तुझा वेग शांत होवो. आणि सुदर्शनचक्र शांत होऊन परत फिरले.

अबंरीशाच्या कथेंतही एक रहस्य आहे. अंबरीश शुद्ध भक्तीचे स्वरूप आहे. म्हणून चरित्राच्या आरंभी सर्वच इंद्रियांची भक्ति दाखविली गेली आहे. अंबरीशाचे चरित्र भक्तीचे चरित्र आहे.

भक्तिमार्गांत दुर्वास अर्थात दुर्वासना बाधा उत्पन्न करीत असते. मीच सर्वात मोठा आहे आणि बाकी सर्व छोटे आहेत. तुच्छ आहेत. अशी दुर्भावना दुर्वासना आहे. सुख मीच भोगावे अशी भावना

सुद्धा दुर्वासनाच आहे. दुसऱ्यांना दुःखी करण्याची दुर्वासना भक्तीत बाधारूप आहे.

भक्ती करीत असता जर अहंकार आला तर समजा कीं दुर्वासना आली आहे. दुर्वासनेतून अभिमान जागृत होतो आणि अभिमानाने क्रोध. क्रोध, कृत्या-कर्कशवाणी उत्पन्न करतो. कृत्या-कर्कशवाणी भक्तीला मारण्याची तयारी करते तेव्हां ज्ञानरूपी सुदर्शनचक्र भक्तीला वाचवायला येते. ज्ञान कृत्येला विनष्ट करते. जर भक्ती शुद्ध असेल तर कृत्या-कर्कशवाणी तिला काहींच करू शकत नाही. भक्तीचे रक्षण सुदर्शनचक्र अर्थात ज्ञान करते.

सगळ्यांमध्ये श्रीकृष्णाचे दर्शनच सुदर्शनचक्र आहे. भक्तीच्या जवळ जेव्हा कृत्या-कर्कशवाणी येते तेव्हा वैष्णव ज्ञानरूपी सुदर्शनाने तिचा नाश करतात. जर मन निंदेने प्रभावित झाले तर तो खरा वैष्णव नाही, कर्कशवाणी सहन कराल तर सुखी व्हाल. कर्कशवाणी बोलणाराच अधिक दुःखी होतो. कसा ? तर दुर्वासासारखा !

जर भक्ती शुद्ध असेल तर ज्ञान आणि वैराग्य धावत येतील आणि कर्कशवाणीरूपी कृत्येचा— निंदेचा नाश करतील.

दुर्वास ऋषींनी अंबरीशाला कटु वचने ऐकविली तरीही तो क्रोधित झाला नाही. ज्याच्या डोक्यावर देव वसति करून असतात तोच अंबरीश. जेव्हां दुर्वास ऋषींनी प्रशंसा केली तेव्हां राजा आनंदीही झाला नाही. अर्थात दोन्ही स्थितींत (निंदेच्या आणि प्रशंसेच्या) तो एकसारखाच राहू शकत असे.

खरा भक्त निंदा आणि स्तुतीला एकसारखेच समजतो— **'तुल्य निंदास्तुतिः'** जरी भक्ताला कोणी कांही कर्कश बोलले, त्यांची निंदा केली तरी अंबरीशाप्रमाणे त्यांच्यावर कांही परिणाम होत नाही.

भक्ति करावी तर अंबरीशासारखी. अंबरीशाची भक्ति इतकी खरी आणि बलवान होती की भगवंताला सुद्धा **'अहंभक्त पराधीनः'** असे म्हणावे लागले.

सगळ्यांशीच समभाव— समता ठेवील तोच ज्ञानी होय. सगळ्यांतच ईश्वर आहे असें ज्ञान होणेच खरे ज्ञान होय. ईश्वरस्वरूपाच्या ज्ञानाविना भक्तीही करता येत नाही आणि ती दृढही होत नाही. म्हणून भक्तीत ज्ञानदेखील आवश्यक आहे.

विषयांबद्दल जोपर्यंत वैराग्य उत्पन्न होत नाही, तोपर्यंत भक्ति होऊ शकत नाही. भक्तीच्या आधी ज्ञान आणि वैराग्य येतात. जेथे भक्ती आहे तेथे ज्ञानरूपी सुदर्शनचक्र रक्षण करते. भक्ती सिद्ध झाली की सर्व शास्त्रांचे ज्ञान प्राप्त होते.

नामाचा महिमा पण फार मोठा आहे.

अंबरीशाने दुर्वास ऋषींना प्रेमाने जेवायला घातले आणि क्षमा मागितली. खरा वैष्णव होता अंबरीश ! दुर्वासांच्या क्रोधाने तो व्यथितही झाला नाही आणि त्यांच्या प्रशंसेने सुखी पण झाला नाही.

खरा वैष्णव कधीच दुसऱ्याचा दोष पाहात नाही. परंतु आपले दोष मात्र पुनःपुन्हा तपासत असतो.

अंबरीश समजला की देव जिंकले आहेत, तो स्वतः नव्हे. जो समजतो की आपली जित झाली आहे त्याचीच हारही अवश्य होत असते.

जरा विचार करा. या राजाची कथा सांगायची शुकदेवांना गरजच काय होती ? परंतु अंबरीश राजा शुकदेवांना फार प्रिय आहे. ते म्हणतात, धन्य आहे राजा अंबरीश ! घरांत देखील तो संन्याशाचे जीवन जगतो. आणि मी वनवासी झाल्यावर संन्याशासारखे जीवन जगत आहे.

शुकदेव विचार करीत की मी सर्वस्वाचा त्याग करून, वनवासी होऊन संन्यासी झालो आहे, तर अंबरीश राजप्रासादांतच वैभवयुक्त वातावरणांत राण्यांच्या सहवासांत राहूनही संन्याशासारखे जीवन जगत आहे. मी सर्वकाही सोडून प्रभूच्या मागे धावत आहे तर इकडे अंबरीश घरातच राहून द्वारकाधीशाच्या शेजारी आहेत. निःसंशय तो माझ्यापेक्षा श्रेष्ठ आहे. म्हणूनच मी त्याची कथा सांगितली.

ज्ञान प्रभूला परतंत्र करू शकत नाही, बांधू शकत नाही. भक्ति भगवंताला बांधू शकते, परतंत्र करते. ज्ञानी महात्मा ब्रह्मानुभव करू शकतात, परंतु भगवंताला स्वाधीन करू शकत नाही, पराश्रयी करू शकत नाही. बांधू शकत नाही.

भक्ति माता आहे तर ज्ञान-वैराग्य तिचीं लेकरें आहेत. जेथे शुध्द भक्ति आहे तेथे ज्ञान-वैराग्य धावत येतात.

**४. इक्ष्वाकु, मांधाता व सौभरी ऋषीः**

मनुमहाराजांना पुत्र झाला-इक्ष्वाकु. त्या वंशांत मांधाता झाला. या मांधाता राजाच्या पन्नास कन्यांचा विवाह सौभरी ऋषीशी झाला.

सौभरी तपश्चर्या करून सिध्द झाले. त्यांच्या तपश्चर्येच्या ठिकाणी दर्शनार्थी जनतेची खूप गर्दी जमत असे. गर्दी जमा झाल्यावर भजनांत खंड पडणे स्वाभाविक आहे. म्हणून सौभरींनी विचार करून यमुनेत प्रवेश केला आणि तेथे पाण्यात तपश्चर्या करू लागले.

सौभरीच्या मनांत एकदा आले की परमात्म्याची माया मला बिलकूल प्रभावित करू शकत नाही. तेव्हा भगवंतांनी माया रचली. ऋषींनी पुनःपुन्हा एका मत्स्ययुगुलाच्या प्रणयचेष्टा व कामक्रीडा पाहिल्या तर त्यांच्या मनातही काम जागृत झाला. आणि तसेच सुख भोगण्याची इच्छा ते करू लागले. म्हणून पंच्यायशी वर्षांच्या वृध्दावस्थेत सुध्दा विवाह करण्याचा त्यांनी विचार केला आणि मांधाता राजापाशी आले.

राजाने विचार केला की जर या वृध्द मुनीशी कोणा कन्येने विवाह केला तर ती जन्मभर दुःखी राहील आणि विवाह न केला तर हे मुनि मला शाप देतील. मग त्याने मुनींना संगितले की त्यांनी राजमहालांत यावे. जी मुलगी तुम्हाला पसंत पडेल तिच्याशी तुमचा विवाह होईल.

सौभरी ऋषीच्या मनात विवाहाची तीव्र इच्छा झाली होती. ते स्वरूप बदलून गेले. ते सिध्द होते म्हणून सुंदर रूप धारण करून राजमहालात पोहोचले. त्यांचे स्वरूप पाहून पन्नासही राजकन्या त्यांच्याशी विवाह करण्याकरता आपसात भांडू लागल्या. असे पाहून राजाने सर्वच कन्यांचे विवाह त्या ऋषीशी करून दिले. सौभरी सुखोपभोग करू लागला.

परंतु पुढे जाऊन ऋषींची विवेकबुध्दी जागृत झाली. त्यांना पश्चात्ताप वाटू लागला. अरे! मी हा कसा अनर्थ करून बसलो? मी तर होतो तपस्वी, पण मत्स्ययुगुलाची कामक्रीडा पाहून मतिभ्रष्ट झालो आणि विलासी झालो.

जो साधना करू इच्छितो, जो याच जन्मात साध्याची प्राप्ति करू इच्छितो त्याने कामसुख भोगणाऱ्याचा संग करू नये. कामसुखाच्या भोक्त्याचा संग सुध्दा कुसंगच आहे. स्त्रीसंग करणाऱ्याची संगतही कुसंगत आहे. ही स्त्रीपुरुषसंबंधाची नाही – कामाची निंदा आहे.

संगाच्या रंगाची ही घटना आहे. म्हणून मोक्षाची इच्छा करणाऱ्याला हे अत्यंत आवश्यक आहे की त्याने मैथुनधर्मी स्त्री-पुरुषांच्या आणि त्यांच्या संगतीत असलेल्यांचा सुध्दा संग करू नये.

स्त्रीचा आणि स्त्रीसंग करणाऱ्याचाही संग साधकाने करू नये.

सौभरी ऋषींनी जगाला उपदेश दिला आहे की कामी आणि विलासी लोकांमधे राहून ब्रह्मज्ञानी होणे फार कठीण आहे. मानवाबरोबर राहून मानव बनणे सोपे आहे. सत्संग करता आला नाही तरी काही हरकत नही, परंतु कामुक व्यक्तीचा संग तर कधीच करू नये.

**५. गंगावतरण :**

यानंतर सगर नावाचा सम्राट चक्रवर्ती झाला. त्याच्या यज्ञाचा घोडा इंद्राने लपवून ठेवला होता म्हणून त्याची मुले घोड्याच्या शोधार्थ निघाली. त्यांनी आपल्या घोड्याला कपिल मुनींच्या आश्रमात पाहिले. त्यांना वाटलें की कपिल ऋषींनीच घोडा चोरला आहे. "मारा याला! हाच चोर आहे!" असे म्हणून ते ऋषीवर चालून गेले तोंच ते सर्वच्या सर्व कपिलमुनींच्या तेजाग्नींत जळून भस्म होऊन पडले.

आता यांना शोधायला सगराचा नातू अंशुमान निघाला. त्याने भगवान कपिलांची स्तुति केली, तेव्हा मुनी त्याला म्हणाले, 'हा घोडा तुझ्या आजोबांच्या यज्ञाचा आहे, घेऊन जा याला.'

अंशुमानाने ऋषींना आपल्या काकांच्या उध्दाराचा उपाय विचारला, तेव्हा ऋषि म्हणाले की त्यांचा उध्दार गंगाजलानेच होऊ शकतो. जर गंगा तेथे येईल तरच उध्दार होऊ शकेल. आणखी इतर उपाय नाही.

गंगेला प्रसन्न करण्यासाठी अंशुमानाने, त्याचा मुलगा दिलीप याने आणि दिलीपचा मुलगा भगीरथ याने तप केले. तीन पिढ्यांचे पुण्य एकत्रित झाले तेव्हाच गंगावतरण झाले.

तीन-चार जन्मांचे तप-पुण्य एकत्र झाल्यावरच ज्ञानगंगेचे अवतरण होते.

भगीरथाने भगवान शंकराची प्रार्थना केली तेव्हा गंगेच्या प्रवाहाला आपल्या डोक्यावर झेलायला (धारण करायला) ते तयार झाले. शंकरानी वेगाने उतरणाऱ्या गंगेला झेलून आपल्या जटेत साठविले आणि तिथून ती पृथ्वीवर प्रवाहित झाली. गंगा अनेक स्थानांना पवित्र करीत करीत पाताळात गेली. गंगेचा स्पर्श झाल्यावर त्या भस्मांतून दिव्य पुरुष उत्पन्न झाले. याप्रमाणे सगरांच्या पुत्रांना सद्गति मिळाली.

राजा, गंगाजळाचा स्पर्श जर मृत्यूनंतरही मुक्ती देतो तर जिवंत असता तिचे प्राशन केल्याने सद्गति मिळणे काही आश्चर्य नव्हे.

जीवाला शिव व्हायचे आहे. जर ज्ञानगंगेला तो आपल्या शिरावर धारण करील तर शिव होता येईल. गंगा ज्ञानाचे स्वरूप आहे.

गंगेला भगीरथ राजाने अवतरित केले म्हणून तिचे एक नाव भागीरथी असेही झाले. गंगा नारायणांच्या चरणापासून प्रगट झाली आहे. गंगा नारायणांच्या चरणांत आहे तशीच शिवांच्या डोक्यावर.

पुढे जाऊन या वंशांत खट्वांग नावाचा राजा झाला. त्याला देवांकडून कळले की दोन घटकांनी त्याचा मृत्यु आहे, तर त्याने सर्व काही सोडून भगवंताकडे मन लावले. परमात्म्याचे ध्यान करीत करीत त्याने देहत्याग केला. त्याला सद्गति मिळाली. याप्रमाणे केवळ दोन घटकांमध्ये (३९ मिनिटे) खट्वांगाने आत्मकल्याण करून घेतले.

खट्वांगानंतर दीर्घबाहू राजा झाला आणि त्यानंतर झाला रघू. रघू महाज्ञानी आणि उदार होता. सरतेशेवटी तर त्याने सर्वस्वाचा — भोगाचासुद्धा त्याग केला होता. त्याची पुष्कळ कीर्ति पसरली.

याच कारणाने सूर्यवंशाचे नाव रघुवंश झाले. रघुराजाने अनेक यज्ञयाग देखील केले होते.

जो भगवंताच्या वंशाला (संबंधाला) सांभाळतो त्याच्या स्वतःच्या वंशाचा कधीच नाश होत नाही.

**६. श्रीरामचंद्रांच्या रूपांत अजन्मा नारायण जन्मास येतात :**

राजा रघूच्या घरी अज नावाचा राजा झाला आणि अजानंतर दशरथ. दशरथ अयोध्येत राज्य करीत होते. ते पुर्वजन्मी ब्राह्मण होते.

या पूर्वजन्मीच्या ब्राह्मणाचा नियम होता की गावाबाहेर असलेल्या मंदिरात रणछोडरायाला दररोज एक हजार तुळशीची पाने वाहायची. ते म्हातारे होऊन पंच्यायशी वर्षांचे झाले. एकदा ज्वर आला तर ते ज्वराला म्हणाले, 'तू आलास तर मला काही अडचण नाही, पण माझ्या देवाच्या पूजेनंतर ये. माझ्या पूजेचा नियम अखंड राहिला पाहिजे.' असा संकल्प ऐकून ज्वर पळून गेला.

ते मंदिरात आले तर कोणाच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. पाहिले तर एक पिशाच्चीण रडत होती. ती म्हणत होती, 'पूर्वजन्मी मी दुराचार केला होता. माझ्या नवऱ्याला मी फार त्रास (दुःख) दिला होता म्हणून मला या जन्मी पिशाच्चीण व्हावे लागले. आपण कृपया माझा उध्दार करा.'

ब्राह्मण दयाळू होता. त्याने दररोजच्या नियमाप्रमाणे विष्णुसहस्रनामाच्या पाठाबरोबर तुलसीदल अर्पण करून भगवंताला प्रार्थना केली, 'हे प्रभु! हा पापी जीव व्यथित होत आहे. मी आपले सर्व पुण्य अर्पण करतो. आपण याचा उध्दार करा'. प्रभु प्रसन्न झाले. ते म्हणाले, 'पुढल्या जन्मी तू दशरथ होशील आणि ही पिशाच्चीण कौसल्या होईल. मी पुत्ररूपाने तुझ्या घरी येईन. आपले सगळे पुण्य तू एका जीवाच्या उध्दारार्थ सोडून दिले आहेस म्हणून ते आता अनंत अमाप झाले आहे. ब्राह्मणाने तेथेच शरीराचा त्याग केला.

तोच ब्राह्मण आता या जन्मात दशरथ झाला आहे. त्यांना तीन राण्या होत्या – कौसल्या, सुमित्रा आणि कैकेयी. कौसल्या धर्मपत्नी होती आणि सुमित्रा-कैकेयी भोगपत्न्या. तीन पत्न्या असूनही दशरथ निःसंतान होते. म्हणून ते वसिष्ठांपाशी गेले. वसिष्ठ म्हणाले, 'पुत्रकामेष्टि' यज्ञ करा. या यज्ञाने तुला चार मुलगे होतील.

पुत्रकामेष्टि यज्ञ केला तर यज्ञकुंडांतून क्षीर घेऊन स्वतः अग्निदेव प्रगट झाले. ते राजाला म्हणाले, 'हा प्रसाद आपल्या राण्यांना खाऊ घाल. तुझ्या येथे दिव्य संतति होईल.'

वसिष्ठ मुनींनी राजाला आज्ञा केली की, 'धर्मपत्नी कौसल्येला या प्रसादाचा अर्धा भाग दे आणि शिल्लक राहिलेला प्रसाद सुमित्रा-कैकेयीला वाटून दे.' दशरथ राजाने तसेच केले.

तुलसीदासांनी रामचरितमानसांत कैकेयीच्या वतीने पुष्कळ रदबदली केली आहे, पण एकनाथ महाराजांनी कैकेयीला कर्कशाच म्हटले आहे.

कर्कशवाणीने पतीचा अपमान करणारी स्त्रीच कैकेयी असते.

कैकेयीने दशरथाचा अपमान केला, भांडण केले की तिला प्रसाद शेवटी का दिला? तिने प्रसाद उचलून बाहेर फेकून दिला. तो प्रसाद एक घार उचलून घेऊन गेली आणि एका पर्वतावर आली. तेथे अंजनीदेवी तपश्चर्या करीत होती. त्या घारीने अंजनीदेवीवर छाया केली आणि प्रसादही दिला.

अंजनीदेवीने प्रसाद खाल्ला तर तिच्या पोटी हनुमन्त जन्माला आले.

आता कैकेयीला प्रसाद फेकल्याचे दुःख आणि पश्चात्ताप होऊ लागला. कौसल्या फार हुशार

होती. तिने आपल्या भागातील काही अंश कैकेयीला दिला. सुमित्रेनेही थोडा प्रसाद कैकेयीला दिला. याप्रमाणे तिन्ही राण्यांनी प्रसाद खाल्ला.

आपल्या घराला अयोध्येसारखे करा. जेथे युध्दक्लेश नाहीत तीच अयोध्या असते. शरयू नदी अर्थात भक्ति प्रवाहाच्या किनाऱ्यावर राहिल्यावर शरीर देखील अयोध्या होईल. आणि अशा नगरीत वसलेला जीवात्मा दशरथ– जितेन्द्रिय होईल.

मानवजीवन क्षणभंगुर आहे असे समजून मनुष्याने निरपेक्षता आणि नम्रता धारण केली पाहिजे. आपल्या इन्द्रियरूपी अश्वांना नियंत्रित करून शरीररथाला घेऊन जो रामचंद्राकडे जातो तोच दशरथ. अशा दशरथाच्या घरी भगवंत पुत्ररूपाने येत असतात.

दशानन रावण अर्थात विषयांचा अमर्याद भोक्ता, अशाच्या घरी भगवंत कालरूपाने येतात.

दशरथ जीवात्मा आहे. या दहा इन्द्रियांना वश करून जो जितेन्द्रिय होऊ शकतो तोच दशरथ. जो सर्वांनाच प्रसन्न करतो त्याचे घरी सर्वेश्वर येतात. दशरथ सर्वच राण्यांची इच्छा जाणून घेत असत. सुमित्रा म्हणत असे की ती तर कौसल्येच्याच सेवेत राहू इच्छिते. दशरथाला वाटले, हिचा पुत्र मोठा ज्ञानी होईल.

रामाच्या गर्भजन्माच्या वेळेपासूनच कौसल्या ईश्वराच्या ध्यानात रमून गेली होती. सहजस्मरण अव्याहत होत होते. कौसल्येच्या तर रोमरोमातून परमात्म्याच्या मंगलमय नामाचा जप होत होता.

दशरथाने कौसल्येला विचारले– महाराज्ञी! आपली काय इच्छा आहे?

कौसल्या– इच्छाच तर दुःखाचे कारण आहे. मला सुखाची इच्छा नाही. मी तर आनंदरूप आहे. मला एकटीलाच ध्यान करू द्या.

दशरथाने वसिष्ठांना सांगितले की कौसल्या तर अशा गोष्टी करीत आहे.

वसिष्ठः हे तर शुभचिन्ह आहे!

नवमास पूर्ण व्हायला आले होते. एका रात्री दशरथाने स्वप्नात पाहिले की त्यांच्या अंगणात काही ऋषिमहात्मा आले आहेत आणि त्यास जागवीत आहेत. राजाने स्वप्नांतच शरयूचे स्नान केले. श्रीनारायणाचा पंचामृताने अभिषेक केला. स्वप्नातच लक्ष्मीनारायणाची आरती केली आणि दर्शन घेतले. त्यांना वाटले की प्रभूसुध्दा प्रसन्न आहेत.

हे सुंदर स्वप्न संपल्यावर त्यांना जाग आली. चांगल्या स्वप्नानंतर झोपू नये. राजाने विचार केला की ह्या स्वप्नासंबंधी गुरुजींना निवेदन केले पाहिजे. ते वसिष्ठांपाशी आले.

वसिष्ठांनी विचारलेः तुम्ही इतक्या प्रातःकाली कशाला आला आहात?

दशरथः मी आज स्वप्नांत लक्ष्मीनारायणाची आरती केली. मी हेही पाहिले की नारायणाचे दिव्य तेज कौसल्येच्या गर्भात जात आहे.

वसिष्ठः या स्वप्नाचे फळ उत्तम असेल. तुमच्या घरी भगवान नारायणाच्या आगमनाची ही सूचना आहे. मला खात्री आहे की या स्वप्नाचे फळ तुम्हाला चोवीस तासांतच मिळेल.

राजे आनंदाने डोलू लागले. त्यांच्या घरी स्वतः भगवंतच तर येणार होते. त्यांनी शरयूंत स्नान केले आणि पूजेत निमग्न होऊन गेले.

इकडे कौसल्या सुध्दा प्रभुध्यानांत मग्न आहे. आज परमपवित्र रामनवमीचा दिवस आहे.

भगवान शंकर ज्योतिष्याच्या वेशांत अयोध्येच्या गल्ल्यांमधून फिरत आहेत. त्यांचे इष्टदेव बालक राम आहेत. सकाळपासूनच देव-गंधर्व प्रतीक्षा करीत आहेत.

वैष्णव जन जोपर्यंत अत्यंत आतुर होत नाहीत तोपर्यंत भगवंताचा जन्म होत नाही.

परमपवित्र समय आला. चैत्रमास शुक्ल पक्ष आणि नवमी तिथि. मध्यान्हीची वेळ झाली आणि दशरथाच्या घरी साक्षात परब्रह्म श्रीहरि प्रगट झाले. जे निर्गुण होते तेच भक्तांच्या प्रेमाकारणे आज सगुण झाले आहेत.

'निर्गुण, निराकार, अलख, अजन्मा, भक्त-प्रेमापायीं सगुण होणारा' असें वेदांत ज्यांचे वर्णन केले आहे तेच श्रीहरी भक्ताच्या हितार्थ आज दशरथाचे घरी पुत्ररूप घेऊन आले आहेत.

आकाशांतून देव आणि गंधर्वांनी पुष्पवृष्टि केली. प्रभूंनी आज दाखविले कीं मी आपल्या भक्तांचे चारी बाजूंनी रक्षण करीत असतो. त्याचकरितां आज चतुर्भुज रूपाने प्रगट झालो आहे.

मातेने स्तुति केली आणि विनविले कीं, 'माझ्यासाठी तुम्ही बालक व्हा, मला आई म्हणून हाक मारा.' आईला त्यांनी दाखविले कीं "मी परमात्मा आहे." त्यांचे चतुर्भुज रूप अदृश्य झाले आणि ते छोट्या छोट्या दोन हातांचे बालक झाले.

दासींमधेही हा शुभ समाचार पसरला. कौसल्येने दासीला नवलखा हार दिला. माझा राम सुखी होईल. मी आनंदाने देत आहे. दासी म्हणाली, मला तर कांहीच नको. मी तर रामाला खेळवू इच्छिते. राम दासीच्या कडेवर गेले. आज तिचा देखील परब्रह्माशीं संबंध झाला आहे.

दासी धावतच राजाकडे आली आणि अभिनंदन केले. मुलगा झाला आहे! वाटतंय की साक्षात नारायणच आले आहेत. वृद्ध दशरथांचे घरीं पुत्रजन्म झाला; आणि पुत्र सुद्धा साधारण नाही — साक्षात् परमात्मा पुत्राचे रूप घेऊन आले आहेत. दशरथाने पोशाखादि शृंगार केला.

प्रथम गणपतीची पूजा केली. दान तर इतके दिले कीं सगळ्या अयोध्येंत कोणीच दरिद्री राहिले नाही. वसिष्ठांनी वेदमंत्रांचा उच्चार करून मानसिक अभिषेक केला. दशरथ अंतःपुरांत आले. आज रामाच्या दर्शनाने सगळ्या दासी इतक्या आनंदित झाल्या होत्या कीं त्या देहभानच विसरून गेल्या. देहभानच नाही तर मान-मर्यादा आणि लाजेची गोष्टच काय?

परमानंद झाला. देवगंधर्वादिसुद्धा सूक्ष्म रूपाने पुत्र रामाचें दर्शन करीत आहेत.

रामजन्मामुळे सगळ्याच देवांना आनंद झाला. परंतु एका चंद्राला दुःख झालें. रामलीलेच्या दर्शनाने सूर्यनारायण आनंदाने स्तब्ध होऊन स्थिरच झाले. पुढे जातच नव्हते. सूर्यास्ताशिवाय चंद्र रामाचे दर्शन कसे करू शकेल? चंद्राने रामाची प्रार्थना केली कीं या सूर्याला सांगा कीं तू पुढे सरक. तो मला तुमचें दर्शनच होऊ देत नाही! चंद्राला रडू आले, तर रामाने त्याला आश्वासन देत म्हटले, 'आजपासून मी तुझें नाव धारण करीन! तरी पण तो प्रसन्न झाला नाही.

रामचंद्र त्याला म्हणाले — तू धीर धर! ह्या वेळेला मी सूर्याला लाभ दिला आहे, पण भविष्यांत कृष्णावतारांत सगळ्यांत पहिले तुला दर्शन देईन. कृष्णावतारांत मी रात्री बारा वाजता जन्म घेईन. मग तुलाच लाभ मिळेल.

कृष्णजन्माच्या वेळी तीनच व्यक्ति जागत होत्या — वसुदेव, देवकी आणि चंद्र.

जे रात्रीच्या वेळी जागत राहतात त्यांनाच कान्हा भेटतो. झोपलेल्याला कान्हा भेटत नाही. जागण्याचा अर्थ काय? तर नित्य शुद्ध परमानंद मिळविण्याकडे जे ध्यान देत नाहीत त्या सर्व भूतमात्रांसाठी जी रात्र असते, त्याचवेळी योगीजन जागून प्रभुस्मरण करतात. प्राणी ज्या सांसारिक नाशवंत सुखांत जागतात ते तत्त्वज्ञानी योगीजनांना रात्रीसारखेच आहेत. त्या नश्वर सुखाकडे भोगी-मुनी जरासुद्धा पाहात नाही.

वसुदेव-देवकीची स्थिति तर पहा. संपत्ति, राज्य, संतति सर्व हिसकावून घेतले गेले. निरपराध

असताना सुद्धा हाता-पायांत साखळदंड घातले गेले. तरीही ते नेहमी प्रभु-स्मरण करीत राहिले.

दुःखात सुद्धा प्रभुच्या नामाचें विस्मरण होऊ देऊ नये. दुःखांत सावध राहून जी व्यक्ति ईश्वराचें भजन करते तिच्या घरीं स्वतः भगवंत येतात.

स्वामी विद्यारण्यांनी म्हटले आहे कीं, राम आणि नल यांच्यासारख्या विभूतींच्या जीवनांत सुद्धा दुःखद प्रसंग आले होते, तर आमच्यासारख्या साधारण जनांची तर गोष्टच काय करावी? म्हणून दुःखाला केव्हांही घाबरू नये.

वियोगांतच कथा होत असते, संयोग झाला की कथा बंद. जोपर्यंत जीवाचा ईश्वरापासून विरह आहे तोपर्यंतच कृष्णकथा आहे. जीव आणि ईश्वराचें मीलन झाल्यावर तर कथेचा प्रश्नच राहात नाही.

भागवताच्या दशमस्कंधांतील चौदाव्या अध्यायांत सुदाम्याच्या चरित्राच्या वेळी शुकदेवांना प्रेमाला नियंत्रित करावे लागले– आवरून दाबून ठेवावे लागले होते. जर प्रेमांत समाधी लागली तर राजाचें काय होईल हा विचार करावा लागला, असो.

दशरथाने बालस्वरूप पाहिलें तर त्यांचे हृदय प्रेमाने भरून आले. दशरथाच्या आनंदाचें वर्णन तर सरस्वती सुद्धा करू शकत नाही. पितापुत्रांची दृष्टादृष्ट झाली. बालरामचंद्र हसले. दशरथ रामाला मध चाटवू लागले. त्यांनी वसिष्ठांना वेदमंत्राचा पाठ करायला सांगितला.

वसिष्ठः रामाचें दर्शन घेल्यानंतर मी वेदमंत्र तर काय, आपले नावही विसरून गेलो आहे. मी म्हणू, तर काय म्हणू? दर्शनांत नामरूप विसरल्याने दर्शनाचा आनंद अधिकच वाढतो. ब्रह्मदर्शनाचा आनंद आगळाच असतो.

ईश्वरदर्शन झाल्यावर तर वेदसुद्धा विसरायला होतात. ईश्वराच्या साक्षात्कारानंतर वेद सुद्धा मिथ्या आहेत. ईश्वराच्या साक्षात्कारानंतर वेदांची कांहीच आवश्यकता नाही. प्रभूचा साक्षात्कार झाल्यावर वेद, जगांतील नाम-रूपें आणि आपलेपणा सर्वच कांही विसरायला होते. म्हणून वसिष्ठ म्हणतात, मी आपले नावसुद्धा विसरून गेलो आहे.

कौसल्या बालरामाला कडेवर घेऊन बाहेर आली. अयोध्येच्या प्रजेने रामलालाचे दर्शन घेतले. कोणालाही तहान-भूकेचें देखील भान राहिले नाही.

रामावाचून आराम नाही. जीवमात्राला आराम पाहिजे असतो. जीवमात्र शांतीचा उपासक आहे– अशा शांतीचा कीं जी कधीही भंग न व्हावी. रामाच्या मयदिचें पालन कराल तर जीवनांत खरी शांति मिळेल. मनुष्य रामाची मर्यादा आचरणांत आणत नाही म्हणून खरी शांति मिळत नाही.

धर्माचें फळ शांति असते. अधर्माचें फळ अशांति असते. धर्माची मर्यादा पाळली नाही तर शांति मिळत नाही. स्त्री आणि पुरुषांनी आपापल्या मयदिंत राहिले पाहिजे. मानव जेव्हां मयदिचें उल्लंघन करतो तेव्हां अशांति येते. धर्म-मयदिविना ज्ञान, भक्ति किंवा त्याग सफळ होऊ शकत नाही.

आजकाल मंदिरांत आणि कथाआख्यानांत गर्दी वाढत आहे. वाटते कीं आजकाल ज्ञान आणि भक्ति यांत वाढ झाली आहे. तरी पण कोणाला शांति मिळतच नाही. याचे कारण हेच कीं लोक धर्ममयदिचें पालन करीतच नाहीत. लोक आजकाल धर्माला विसरून गेले आहेत. धर्मांविना शांति नाही. धर्माची मर्यादा कधीच मोडू नका. धर्मपालनाशिवाय ज्ञान आणि भक्ति व्यर्थ आहेत. चंद्र, सूर्य, समुद्र केव्हांही आपल्या मयदिचें उल्लंघन करीत नाहीत. येथे तर लोकांना थोडा फार पैसा, अधिकार किंवा मान मिळाला कीं आपल्याला मोठे समजू लागतात. मला विचारणारा, रोखणारा या जगांत कोणीही नाही असें समजून वागतात.

तुम्हाला ज्ञान, धर्ममर्यादेचें पालन करण्यासाठी दिलें आहे, उल्लंघन करण्यासाठी नाही.

रघुनाथ मर्यादापुरुषोत्तम आणि सर्वच सद्‌गुणांचें भांडार आहेत. ते स्वतः परमात्मा असूनही धर्ममर्यादेचे पूर्णतः पालन करतात.

सगळेच दिव्य ज्याच्याः ठिकाणी एकत्र होते तोच परमात्मा होय. लक्ष्मण विवेकाचें, भरत वैराग्याचें तर शत्रुघ्न सद्‌विचाराचें स्वरूप आहे. भरत आणि शत्रुघ्न अर्थात वैराग्य आणि सद्‌विचार जर अयोध्येंत नसतील तर दशरथ कैकेयीच्या आधीन होतात.

चंदन आणि फुलांनी रामाची पूजा करणें चांगले आहे. पण त्यांच्या आज्ञांचें पालन करणें ही सर्वोत्तम सेवा होय. त्यांच्या आज्ञांचें पालन न केले तर कदाचित ते तुमची प्रार्थना ऐकणार नाहीत. भगवंताच्या आज्ञेचें पालन करणेंच त्यांची सर्वोत्तम सेवा होय. असें न केल्याने ईश्वर म्हणतात कीं मी सांगितलेलें तर तूं ऐकत नाहीस म्हणून तुझी पूजा-सेवा मला स्वीकार्य नाही.

श्रीरामांचें जीवन इतकें पवित्र आहे कीं त्यांच्या स्मरणानेच आम्ही पवित्र होऊन जातो. वर्तन जर रावणासारखे असेल आणि जप मात्र रामाचा, तर रामजपाचें फळ कधीच मिळत नाही. रामासारखे वर्तन असून रामनामाचा जप होईल तरच कुंडलिनींतून अमृत झरेल. रामांच्या एक-एक गुणाला आपल्या आचरणांत आणण्याचा प्रयत्नच त्यांची सर्वोत्तम सेवा आहे.

रामचंद्रांचा अवतार राक्षसांच्या संहारासाठी नाही, तर मनुष्याला उच्च आदर्श दाखविण्यासाठी झाला होता. ते राक्षसांना मारण्यासाठी नाही, मानवाला आदर्श मानवधर्म समजावून देण्यासाठी आले होते. त्यांचा अवतार जगाला मानवधर्माचा उपदेश देण्यासाठी होता.

वाल्मीकींनी रामासाठी उपमा शोधली पण एकही सापडली नाही. राम तर रामच आहेत.

मनुष्य कोणत्या का देवदेवीमध्ये श्रद्धा ठेवो; वाटल्यास त्याने विष्णूची पूजा करावी, वाटल्यास शंकराची; परंतु त्याचें वर्तन तर रामासारखेच असायला पाहिजे. ज्याचा व्यवहार रामासारखा असेल त्याचीच भक्ति सफल होईल.

कृष्णाच्या लीला अनुकरणासाठी नाहीत. श्रवण करून तन्मय होण्यासाठी आहेत. गोकुळच्या लीलांमध्ये पुष्टि आहे. द्वारकेच्या लीलांमधे मर्यादा.

असें नाही कीं रामाची अमुक लीला अनुकरणीय आहे आणि अमुक लीला चिंतनीय. त्यांच्या तर सर्वच लीला अनुकरणीय आहेत. ते सर्वच गुणांचे भांडार आहेत. ते प्रत्येक स्त्रीकडे मातृभावनेने पाहात असत. कोणत्याच स्त्रीकडे ते कामभावनेने पाहात नसत.

मनुष्य एकीकडे पुण्य करीत असतो पण दुसरीकडे पापही करीत राहतो. परिणामी त्याच्या हाती कांहीच लागत नाही. केव्हांही स्वच्छंदी होऊ नका.

राम माता-पित्यांची आज्ञा नेहमी ऐकत असत. ते नेहमी दशरथ आणि कौसल्येला नमस्कार करीत. आजकालच्या प्रजेला आपल्या आई-वडिलांना नमस्कार करायला लाज वाटते. तुच्छ आहे तुमचें हें शिक्षण कीं जे तुम्हाला तुमच्या आईबापांना नमस्कार करण्याचें शिकवत नाही ! बापाची धनसंपत्ति घ्यायला तुम्हाला कांही लाज-संकोच वाटत नाही आणि नमस्कार करायला संकोच वाटतो; लाज वाटते ! मातापिता तर लक्ष्मीनारायणाचे स्वरूप आहे. त्यांना नमस्कार करा.

रघुनाथांची उदारता आणि दीनवत्सलता यांना जगांत तोड नाही. त्यांच्यासारखा राजा जगांत पूर्वीं कधी झाला नाही आणि भविष्यांतही कधी होणार नाही.

रामचरित्र दिव्य आहे. त्यांचें चरित्र सर्वांनाच बोलायला लावते. सापाला कान नसतात. कारण

माहीत आहे याचे ?

शेषनाग सर्पांचा राजा आहे. त्याच्याच फणीवर पृथ्वी राहिलेली आहे. रामकथेच्या श्रवणाने जर नाग डोलू लागला तर धरतीचा विनाश होईल. म्हणून ब्रह्मदेवाने विचार केला कीं शेषाला कान देऊ नये यातच कल्याण आहे. तशी तर ही केवळ कविकल्पनाच आहे.

रामांत सर्वच सद्गुण एकत्रित झाले आहेत. त्यांनी एकपत्नीव्रताचें पालन केलें. आपल्यापेक्षा मोठ्यांचे जे कांही चांगले वाटले ते आचरणांत आणले. त्यांनी दशरथापासून सर्व कांही घेतले पण बहुपत्नीत्व नाही घेतले.

पुरुष जर एकाच स्त्रीच्या ठिकाणीं (पत्नी) कामभाव ठेवील आणि धर्मानुकूल कामोपभोग करील तर गृहस्थ राहूनही तो ब्रह्मचारीच असतो. कामाला व्यापक होऊ देऊ नका. त्याला एकाच पात्रांत संकुचित करा. याच हेतूसाठी विवाहाची योजना केली गेली आहे. कामभावाला एकाच पात्रांत निहित करून त्याचा नाश करा.

निर्दोष तर एक ईश्वरच आहे. संभव आहे कीं गुरूमध्येंही कांही दोष असेल. परंतु गुरूच्या दोषांचें अनुकरण करू नये. राम कोणाही स्त्रीला आणि सीता कोणत्याही पुरुषाला पाहात नसत. शास्त्राची ही मर्यादा आहे. अशा मर्यादेचें पालन करण्याने जीवन सुधारेल. रामचंद्रांनी एकपत्नीव्रताचें आणि सीतेने एकपतिव्रताचें पालन केले. ईश्वराच्या मर्यादेचे जो पालन करील तोच खरा मनुष्य आहे.

वाल्मीकि-रामायणाच्या सुंदर कांडांतला एक प्रसंग आहे. हनुमान सीतेला भेटण्याकरता अशोकवनांत आलेले होते. परत जाताना ते सीतामातेला म्हणाले– 'अच्छा, मी आता जातो आहे'

सीता– चांगलेच झाले कीं तू मला भेटायला आलास. तू गेल्यानंतर या राक्षसी मला त्रास देतील.

हनुमान– माते, तू आज्ञा देशील तर मी आपल्या खांद्यावर बसवून आता याच वेळी तुला रामचंद्रापाशी घेऊन जाईन. मी रामदूत आहे. मला कोणी मारू शकत नाही.

सीता– नाही, असें होऊ शकत नाही. तू माझ्या पुत्रासारखा आहेस. बालब्रह्मचारी आहेस, पवित्र आहेस. तरी पण तू पुरुष आहेस आणि मी स्त्री. माझ्याकरता कोणाही परपुरुषाचा स्पर्श वर्ज्य आहे. परपुरुषाच्या स्पर्शाने स्त्रीच्या पातिव्रत्याचा भंग होतो. जगाला स्त्री-धर्माचा आदर्श दाखविण्यासाठीच माझा जन्म झाला आहे. मी जर तुझ्या खांद्यावर बसले तर लोक काय म्हणतील ?

रघुनाथ माझ्याशिवाय इतर कोणत्याच स्त्रीला स्पर्श करीत नाहीत. मी सुद्धा त्यांच्याशिवाय इतर कोणत्याही पुरुषाच्या चरणांनासुद्धा स्पर्श केलेला नाही.

मनाने सुद्धा कोणाला स्पर्श करू नका. स्त्रियांनी पतीशिवाय इतरांना– साधुसंतांच्या चरणांना सुद्धा स्पर्श करू नये. त्यांना दुरूनच नमस्कार करावा.

बाळा, तू बालब्रह्मचारी आहेस. तरी मी तुला स्पर्श केला तर धर्माची मर्यादा सुटेल– ओलांडली जाईल.

सीता जगाला आदर्श स्त्री दाखविते. याच कारणासाठी ती प्रगट झाली आहे. राम सरळ आहे पण सीतेची सरळता तर अलौकिक आहे.

रामाची मातृ-पितृभक्ति अलौकिक आहे. बंधु-प्रेम देखील दिव्य आहे.

मोठ्यांचे अंतःकरण केव्हांही दुखवू नये. कैकेयीने जेव्हां रामांना वनवास दिला तेव्हां ते नमस्कार करून म्हणाले– 'माते, माझा भाऊ भरत जर राजा होणार असेल तर मी चौदाच वर्षें काय, आजीवन

वनवासी राहायला तयार आहे. तुझा हा निर्णय मला दुःख देणारा नसून उलट संतोषजनकच आहे. भरतापेक्षा माझ्यावरच तुझें प्रेम अधिक आहे. मला ऋषिमुनींच्या सहवासाचा लाभ मिळावा या हेतूनेच तू मला वनवास दिला आहेस. माझ्या कल्याणासाठीच तू आज मला वनवासाला पाठवीत आहेस.'

रामकथा तर सागरासारखी आहे. शंकरांनी एक कोटी श्लोकांत ही कथा वर्णन केली आहे. रामाचे सर्वच गुण जीवनांत उतरवा. रामराजाची प्रत्येक मर्यादा जीवनांत उतरवाल (आचरणांत आणाल) तर रामनवमीचा उत्सव परिपूर्ण होईल.

शिव दररोज उमेला ह्या रामकथेचे रसपान करवीत असत. हनुमान देखील रोज ऐकत असत. या रामकथेचा एक एक श्लोक पापांचा नाशकर्ता आहे.

एकदा देव, ऋषि आणि मनुष्य शिवांकडे रामायण मागायला गेले. रामायणाचे एक कोटी श्लोक आहेत. शंकरांनी तिघांनाही सारखे वाटले तरी एक श्लोक शिल्लक राहिला. देव, ऋषि आणि मनुष्य या एका श्लोकासाठी भांडू लागले.

शंकर म्हणाले, श्लोक एकच आहे आणि त्याची इच्छा करणारे तिघे. या श्लोकांत बत्तीस अक्षरें आहेत. म्हणून शंकरांनी प्रत्येकाला दहा दहा अक्षरें दिली. आता शिल्लक राहिली दोन अक्षरें. तर शंकर म्हणाले, ही दोन अक्षरें मीच आपल्या कंठांत ठेवून घेतो. ही दोन अक्षरें होती 'राम'. शंकराने रामाला आपल्याच जवळ – आपल्या ह्रदयांत ठेवून घेतले. याप्रमाणेच तुम्ही सुद्धा रामाला नेहमी आपल्या ह्रदयांत ठेवा. शंकरांप्रमाणें ह्रदयांत रामाला स्थान आणि मुखांत त्याचे नाम राहील तर संतोष आहे.

शंकरांना भांडण-तंटा आवडत नाही. जेथे युद्ध, वैर, स्वार्थ, वासना, विषमता नाही तीच अयोध्या होय आणि रामदेखील तेथेच अवतीर्ण होतात. जेव्हां कैकेयीच्या मनांत विषमता, स्वार्थ, वासना यांचा जन्म झाला तेव्हांच रामाने अयोध्येचा त्याग केला. विषमता, भांडण, तंटा झाला रे झाला कीं राम अयोध्या सोडून निघून जातात.

शंकराच्या सभेंत तर बैल आणि सिंह, उंदीर आणि साप, मोर आणि साप सर्वच आपापले जन्मजात वैर विसरून एकत्र बसतात. गरुड आणि सापसुद्धा विष्णु भगवंतांच्या समोर शांत बसून राहतात. वैर विसरून जा.

श्रीरामाच्या नामजपानें सर्वच कष्ट दूर होतात आणि सर्व काही शुभ होते.

भगवान शंकर रामायणाचे आचार्य आहेत. ते जगाला दाखवतात कीं मी विष प्यालो तरी रामनामाच्या प्रतापाने मला कांहीच झाले नाही. आयुष्यांत विष प्यायचे प्रसंग येतात. जेव्हां असा कटु प्रसंग येईल तेव्हां प्रेमाने 'श्रीराम श्रीराम' म्हणा. रामनामानें कंठांतून अमृत झरते आणि ते विषाचा नाश करते.

रामाचें नाव घेऊन शंकर विष प्याले तर त्याचे अमृत होऊन गेले. संसारांत सुद्धा निंदा, वैर, व्याधि इत्यादी विषच आहेत. असे सांसारिक विष जेव्हां जेव्हां जाळण्यासाठी येऊन थडकेल तेव्हां तेव्हां रामनामाचा जप करा. जेव्हां जेव्हां परिस्थिती प्रतिकूल होईल तेव्हां तेव्हां पंधरा मिनिटे रामनामाचा जप करा. यामुळेच तर शंकरांना स्मशांनातही शांति लागते.

भगवान शिव रामनामाचें सदा पान करीत असतात म्हणून ते शिव आहेत. ते म्हणतात रामांची कथा तर मी करतो तरी पण ते कसे आहेत हे मी जाणत नाही. शंकरांचा हा विनय आहे.

जो जाणत असूनही अज्ञान्यासारखाच होऊन जप करतो तोच कांही ना कांही जाणत असतो.

अयोध्येंत श्रीरघुनाथांचें प्रागट्य झालें. लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न यांचेही जन्म झाले. चारही बाळे कौसल्येच्या अंगणांत खेळू लागली आणि दिवसेंदिवस मोठी होऊ लागली.

रामचंद्र तर खेळांतही आपल्या लहान भावांना त्रास देत नसत. ते नेहमी आपल्या धाकट्या भावंडांनाच जिंकू द्यायचे. ते समजत असत, माझ्या छोट्या भावांची जीत ही माझीच जीत आहे. जर त्यांची हार झाली तर त्यांना वाईट वाटेल म्हणून स्वतःच हार खात. भरताच्या डोळ्यांतील अश्रू त्यांच्याच्यानें पाहवले जात नसत.

आज तर लोक एकीकडे रामायण वाचत असतात, रामनामाचा जप करीत असतात आणि दुसरीकडे संपत्तीकरता भावाच्या विरुद्ध कोर्टांत भांडत असतात. जर मोठा भाऊ रामासारखा झाला तर छोटा भाऊ भरतासारखा होईल आणि मग सारे जग आजही अयोध्या होऊ शकेल; रामराज्य स्थापित होऊ शकेल. भरताला राज्य मिळाले तरी त्याने त्याचा त्याग केला. मोठा भाऊ अयोध्येंत नव्हता तर स्वतः महालांत राहून देखील तपश्चर्या करू लागले. भरताच्या तपश्चर्येची जगतांत सर्वच महापुरुषांनी खूपच प्रशंसा केली आहे.

भारतभूमी तर कर्मभूमी आहे. या कर्मभूमींत जसें कर्म कराल तसेंच फळ मिळेल. जसा भाव तुम्ही दुसऱ्यांबद्दल बाळगाल तसाच भाव त्यांच्या मनांत तुमच्याविषयीं निर्माण होईल. अभिमानाचा मूर्खांना त्रास होत नाही, परंतु ज्याला जग मान-कीर्ति देते त्यालाच अभिमानापासून त्रास होतो. मानाच्या लगोलगच मागे अभिमानही उभा असतो.

विष्णुसहस्रनामांत भगवंताला **अमानी मानदः** म्हटलें गेले आहे. भगवंत मानाचे दाते आहेत. भरत कैकेयीला म्हणतो, 'राम मोठे असूनसुद्धा आपल्याला मान देतात.' रामाने बाललीलेंत देखील मर्यादेचा भंग केला नव्हता.

जो आपल्या भावांत प्रभूचें दर्शन करू शकणार नाही त्याला जगांत कुठेच ईश्वर दिसणार नाही.

**७. श्रीरामाच्या व श्रीकृष्णाच्या बाल-लीला यांतील फरकः**

रामांची बाललीला सरळ आहे. ते आईजवळ कांहीच मागत नसत. ते फार भोळे होते. रामांनी आईला कधीच त्रास दिला नव्हता. कान्ह्याने विचार केला कीं रामावतरांत मी मर्यादेचें अतिशय पालन केलें आहे. तेव्हां मला दुःखी व्हावें लागले होते. आता मी कृष्णावतारांत मर्यादेचें पालन करणार नाही. कान्हा मातेला त्रास देतो (छळतो). आई, तूं मला सोडून कुठेच जाऊ नकोस. तूं घरकाम सोडून माझ्याशीच खेळत रहा.

यशोदा अर्थात बुद्धि ईश्वरापासून दूर झाली तर त्यांना दुःख होते. म्हणून कान्हा आईला म्हणतो, मला मांडीवरच घेऊन बस. मला सोडून कुठेच जाऊ नकोस. यशोदा बुद्धीला ते आपल्याबरोबरच ठेवू इच्छितात.

रामचंद्रांचा अवतार मर्यादापुरुषोत्तमाचा आहे. कृष्णाचा अवतार पुष्टिपुरुषोत्तमाचा आहे. रामाच्या लीलेत मर्यादा आहे. कृष्णलीलेत प्रेम.

कान्हा म्हणतो, मी रामावतारामध्ये मर्यादेचे परिपूर्ण पालन केले. मी सरळही फार राहिलो. एकपत्नीव्रत आचरले. परंतु जगाला माझी काही योग्यता समजली नाही. म्हणून या कृष्णावतारांत मी सर्व मर्यादा फेकून दिली. आता मी पुष्टिपुरुषोत्तम आहे. जो कोणी जीव माझ्या निकट येईल त्याला मी आपला म्हणेन. कृष्णावतारांत सर्वांसाठीच द्वार मोकळे आहे. ज्याला वाटेल तो येऊ शकतो.

कान्ह्याच्या वाणीला कोणी बांधू शकत नाही. एकेका गोपीला त्यांनी बांधून घेतले. त्या सर्व कृष्णाला प्रार्थना करतात कीं आम्हाला सोडून दे. तर कान्हा म्हणतो, मला तर माझ्या आईने बांधायला शिकविले आहे. सोडायला शिकविलेच नाही. मी जातो. जय जय. कान्हा ज्याला बांधतो त्याला कधी

सोडतच नाही.

ईश्वर ज्याला आपल्या बंधनात बांधतो– आपले करून घेतो तो जरी मायेच्या प्रवाहांत वाहू लागला तरी सुद्धा भगवंत त्याला वाचवतात.

कृष्णाची बाललीला काही न्यारीच आहे. एका गोपीने पाहिले की तो लोणी चोरत आहे तर तिने त्याला बांधून ठेवले. कान्हा म्हणाला, सोड मला. तुला तुझ्या बापाची शप्पथ, तुझ्या पतीची शप्पथ. गोपी म्हणाली, नाही, मी तुला बांधीनच आणि तिने त्याला एका खांबाला बांधून ठेवले. गोपीने विचारले, तुला कांही त्रास तर होत नाही ना? कान्हा रडण्याचा अभिनय करू लागला. खूप त्रास होतो आहे. बंधन थोडे ढिले कर. गोपीने विचार केला, कसून बांधणे ठीक नाही; कृष्णाला दुखत असेल. तिने बंधन थोडे ढिले केले. असे झाल्याबरोबर कान्हा निसटून पळून गेला. गोपी म्हणाली, दोन मुलांची आई असूनही मला बांधता आले नाही.

श्रीकृष्ण गोपीला बांधतात. श्रीकृष्णाला मनानेच स्पर्श केला तर हृदय द्रवते, तर प्रत्यक्ष श्रीअंगाच्या स्पर्शानंतर किती अधिक आनंद होत असेल! गोपीचा ब्रह्मसंबंध झाला. तिने कान्ह्याला म्हटले, 'मला सोडून दे.' तर कान्हा म्हणाला, 'सोडणे तर मला येतच नाही.' परमात्मा ज्याला बांधतात त्याला कधीच सोडत नाहीत. ते त्या जीवाला आपल्यापाशीच ठेवतात.

ईश्वर कोणाला लवकर आपले करून घेत नाही आणि एकदा ज्याला आपले करून घेतो त्याचा पुन्हा त्याग कधी करीत नाही. जीव स्वार्थी आहे. तो आपलेसे केल्यावर सोडून देखील देतो. स्वार्थ साधून झाल्यावर संबंध सुद्धा संपवतो आणि ईश्वर संबंध नेहमीसाठी राहू देतो.

हृदय म्हणते की, कान्हा, जेव्हा तू प्रगट होशील तेव्हा मला गोपी बनव.

प्रेम मागू नये, द्यावे. सर्वेश्वराला तोच पसंत होत असतो जो सर्वांवरच प्रेम करतो. विकार, वासना, स्वार्थ आला रे आला कीं प्रेम खंडित होते. दुसऱ्यांना सुखी करण्याची भावना बाळगणारा कधीच दुःखी होत नाही.

कृष्णलीलेत प्रेम शुद्ध आहे. रामांच्या लीलेत विशुद्ध मर्यादा आहे. जो रामाच्या मर्यादेचे पालन करतो तोच कृष्णाला समजू शकतो.

नंदलाल कधी सरळ उभा राहात नाही. तो तर बाकेबिहारी आहे. तो वाकड्याशी वाकडा आहे. तो योग्याशी योगी, भोग्याशी भोगी, बालांबरोबर बाल आणि संन्याशांबरोबर संन्यासी आहे.

श्रीकृष्णांनी म्हटले होते की 'जगत् मिथ्या आहे.' सोन्याची द्वारकादेखील बुडून गेली.

ज्यांनी लंगोटी देखील सोडून टाकली आहे असे शुकदेवांसारखे विरक्त महात्मे सुद्धा श्रीकृष्णप्रेमांत वेडे होऊन जातात. श्रीकृष्णांची बाललीला अशी दिव्य आहे की शुकदेवांसारखे सुद्धा तिचे वर्णन करताना प्रेमाश्रूंनी भिजून वेडे होत असतात. महायोगी हसतच नाहीत. तेव्हा त्यांना रडण्याचा प्रसंगच येत नाही. श्रीकृष्ण भोगी नाहीत, योगी आहेत.

भक्तींत दुराग्रह ठेवू नका. राम काही कमी आहेत असे समजू नका. कृष्ण आणि राम दोन्ही अवतार परिपूर्ण आहेत. श्रीकृष्ण पुष्टिप्रेमाचा आनंद देतात.

रामचंद्राच्या बाललीलेचे वर्णन जास्त नाही. ते वसिष्ठांच्या आश्रमांत शिकण्यासाठी गेले.

संसार माया आहे. ह्या मायेंत आल्यावर तर भगवंताला सुद्धा गुरूची आवश्यकता असते. एखाद्या सद्गुरूच्या अनुग्रहाशिवाय मन नेहमीकरिता पवित्र होऊ शकत नाही. संसारांत आल्यावर भगवंताला आपल्या स्वरूपाचे विस्मरण होते आणि गुरूची आवश्यकता लागत असते.

श्रीराम तर परमात्मा आहेत. त्यांना मायेचा स्पर्श होऊ शकत नाही. तरीपण जगाला आदर्श शिकविण्यासाठी ते गुरूपाशी विद्याभ्यासासाठी गेले. गुरुजींची सेवाही केली. विद्याभ्यास संपविला.

श्रीराम सोळा वर्षांच्या अवस्थेत यात्रेला गेले. याच कारणाने त्यांना वैराग्य आले. हे वैराग्य दूर करण्यासाठी वसिष्ठांनी योगवासिष्ठ महारामायणांत उपेदश केला आहे. याचे पहिले प्रकरण वैराग्यासंबंधीचे आहे. हे प्रकरण सर्वांनी वाचावेच. यांत वसिष्ठ म्हणतातः वैराग्य आंतच ठेवावे. प्रारब्ध तर भोगलेच पाहिजे. परंतु नवे प्रारब्ध उत्पन्न न होईल हे सुद्धा पाहिले पाहिजे. वनांत संसार बरोबर येईल. घर बाधक नाही, परंतु घरांतील वस्तूंची आसक्ती बाधक आहे.

रामा, तू जर राजप्रासादाचा त्याग करशील तरी कुटीची आवश्यकता उपस्थित होईल. सुंदर वस्त्र सोडून देशील तरी लंगोटीची आवश्यकता होईल. सुग्रास भोजन सोडले तरी कंदमुळे तर खावीच लागतील. म्हणून राज्याचा त्याग करण्याची कांहीच आवश्यकता नाही. सोडायचे जे आहे ते काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, वासना इत्यादी होत.

वैराग्य आतून पाहिजे. जगाला दाखविण्यासाठी नाही. साधु बनण्याची नाही, तर सरळ होण्याची आवश्यकता आहे.

भजनासाठी भोजन आहे असे मानाल तर भोजन साधन आहे. केवळ भोजनासाठीच भोजन बाधक आहे.

सुखी व्हायचे असेल तर म्हणाः जे काही होईल ते चालेल, आवडेल, पसंत पडेल. प्रभु मला ज्या स्थितीत ठेवतील त्याच स्थितीत मी राहीन. ताटांत जे काही मिळेल तेच खाऊन राहीन.

ज्ञानी पुरुषांना सुद्धा भाग्य तर भोगावेच लागते. रामचंद्रांचे वैराग्य दूर झाले. ते आता सोळा वर्षांचे झाले.

### ८. यज्ञरक्षणार्थ विश्वामित्रासमवेत प्रयाणः

त्यावेळी विश्वामित्रांचा यज्ञ संपन्न होत होता. त्यात मारीच, सुबाहू इत्यादी राक्षस विघ्न उत्पन्न करीत होते. विश्वामित्रांनी विचार केला की रामचंद्रच माझ्या यज्ञाचे रक्षण करू शकतील. अयोध्येला जाऊन रामचंद्रांना घेऊन यावे. दर्शन घेऊन कृतार्थही होईन. भागवतात रामचरित्राचा आरंभ याच प्रसंगापासून केला आहे. विश्वामित्र अयोध्येत आले. शरयूंत स्नान केले आणि मग दशरथ महाराजांच्या सभेंत आले. दशरथांनी स्वागत करून नमस्कार केला. माझ्या पूर्वजांच्या पुण्यप्रतापाने आपल्यासारखे ऋषि माझ्या घरी आले आहेत. मी काय सेवा करावी आपली ? विश्वामित्रांनी आशीर्वाद देऊन म्हटले– माझ्या यज्ञांत राक्षस विघ्न करीत आहेत. म्हणून राम आणि लक्ष्मणांना माझ्या यज्ञाचे रक्षण करण्यासाठी पाठवा. विश्वामित्रांच्या या मागणीमुळे राजा घाबरून गेला.

दशरथ म्हणाला– मुनिमहाशय, आपण मागणी योग्य केली नाही. ही बालकें मला वृद्धावस्थेत लाभली आहेत. मला तर संततीची कांही आशाच नव्हती. परंतु आपणा सर्वांच्या आशीर्वादाने चार पुत्र झाले. हे सर्व मला अत्यंत प्रिय आहेत. परंतु त्यातही राम सर्वाधिक प्रिय आहे. रामाशिवाय मी राहू शकत नाही. त्याला माझ्या डोळ्यांसमोरून दूर करू नका. मी आपल्याला काय म्हणू! राम दररोज मला दोन-चार साष्टांग नमस्कार करीत असतो. माझ्या प्रत्येक आज्ञेचे पालन करतो. असा पुत्र कधीच झालेला नाही आणि भविष्यांत कधी होणारही नाही. छोट्या भावंडांवरसुद्धा त्याचे अलौकिक प्रेम आहे. तो फारच भोळा आहे. मर्यादेचे पूर्णपणे पालन करतो.

रामाची प्रशंसा करता करता राजाचे हृदय भरून आले. पाण्यावाचून कदाचित मासोळी राहू शकेल, परंतु रामाशिवाय दशरथ जिवंत राहू शकणार नाही. गुरुजी, मी आपणाला खरेच सांगत आहे कीं राम निघून गेल्यावर माझे प्राण निघून जातील. आपली इच्छा असेल तर मी आपल्याला सर्व राज्य देतो. माझे प्राण सुद्धा देऊ शकेन, परंतु माझ्या रामाला माझ्यापासून दूर करू नका.

जगांत दशरथासारखा पिता झाला नाही आणि रामासारखा पुत्रही झाला नाही. राम जेव्हा वनांत गेले होते तेव्हा दशरथाने आपल्या शेवटच्या श्वासापर्यंत रामाचेच नाव घेतले होते. त्याने कौसल्येला पुनःपुन्हा विचारले की राम कोठे आहे? मला कोणी रामाजवळ घेऊन जा. मी रामाशिवाय जगू शकत नाही आणि रामाच्या वनगमनाबरोबरच दशरथाचा प्राणपक्षी उडून गेला.

रामायणाचें एक एक पात्र दिव्य आहे. भरतासारखा कोणी भाऊ नाही. सीतेसारखी कोणी स्त्री नाही. रामापेक्षाही सीतेचे हृदय अतिकोमल होते. वाल्मीकीसुद्धा सीतेच्या चरित्राचे वर्णन करताना द्रवून गेले होते. त्यांनी म्हटले होते रामायणांत रामाचे नाही, तर सीतेचे चरित्र अलौकिक आहे. राम सरळ आहे पण सीतेचे सरळपण तर अद्भुत आहे.

वाल्मीकि-रामायणांत एक प्रसंग आहे. रावणाबरोबर झालेल्या युद्धाची समाप्ती झाल्यावर हनुमान अशोकवनात आले. सगळ्या राक्षसांचा तर नाश झालेला होता आणि श्रीरामांचा विजय झाला होता. सीतेने हनुमानास खूप आशीर्वाद दिले, काळ तुझा सेवक होईल. अष्टसिद्धी तुझी सेवा करतील.

सीतामातेने आनंदाने आशीर्वाद दिला. तरीही हनुमानाची तृप्ती झाली नाही. ते म्हणाले– माते, तू मला आशीर्वाद तर पुष्कळ दिले! तरी पण हृदयांत एक इच्छा बाकी राहिली आहे.

सीता– वत्सा, काय पाहिजे ते मागून घे.

हनुमान– प्रथम जेव्हा मी लंकेत आलो होतो तेव्हां पाहिले होते कीं राक्षसस्त्रिया तुला खूप त्रास देत होत्या. तुला भिववीत होत्या. आता राक्षसांचा तर प्रभूंनी विनाश केला आहे. परंतु या राक्षसस्त्रिया बाकी राहिल्या आहेत. माझी इच्छा आहे कीं तुझ्या आज्ञेने आणि आशीर्वादाने मी त्यांचा विनाश करून टाकावा.

सीता– अरे, हा काय वर मागत आहेस तू! असा वर मागणे कांही चांगले नाही.

हनुमान– यांनी तुला फार त्रास दिला आहे, हे मी आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे.

माता हनुमंतांना उपदेश देऊ लागली– वत्सा, अपकाराच्या बदल्यात जो उपकार करतो तोच संत असतो. या राक्षसींचा कांही दोष नाही. त्या तर रावणाच्या आज्ञेने मला त्रास देत होत्या. ते दुःख तर माझ्याच कर्माचे फळ होते. मी लक्ष्मणाचा अपमान केला होता म्हणून मला दुःखी व्हावे लागले. माझा तर असा विचार आहे की या राक्षसींना वर देऊन त्यांना अयोध्येला घेऊन जावे. मी तसा आशीर्वाद तुला देऊ शकत नाही.

हनुमानांनी नमस्कार करून म्हटले– माते, तुझ्याशिवाय अशी दया इतर कोणीच करू शकत नाही.

राक्षसांसाठी राम कठोर होते पण राक्षसींसाठी सीता दयाळू होती. राक्षसींना सीतेने आशीर्वाद दिला. सीतेसारखी दयाळू स्त्री कोणीच झाली नाही. ती साक्षात् दयेची मूर्ति होती. मातेच्या गुणांना लक्षांत घेता असे वाटते की रामापेक्षा सीता श्रेष्ठ आहे.

जेव्हा दशरथांची रामाला सोडण्याची इच्छा दिसली नाही तेव्हा वसिष्ठ त्यांना समजावू लागले. दशरथांचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास होता. ते सद्गुरुंच्या आधीन होते. वसिष्ठ दशरथाला म्हणाले–

युवराज, रामाची पत्रिका सांगत आहे की या वर्षांत रामाच्या लग्नाचा योग आहे. म्हणून यांना पाठवायला कांही प्रत्यवाय नाही. सर्व काही कुशल मंगल होईल. मला तर वाटते की विश्वामित्र यांना लग्नासाठीच नेण्याकरता आले आहेत.

लग्नाविषयीं ऐकून दशरथांना आनंद झाला. काय, माझ्या रामाचा विवाह होणार आहे? मग तर मी आजच पाठवायला तयार आहे आणि रामलक्ष्मणांना राजसभेंत बोलावले गेले. त्यांनी येऊन नमस्कार केला.

दशरथ— तुम्हा दोघांना विश्वामित्रांच्या यज्ञाचे रक्षण करण्यासाठी जायचे आहे.

राम— जशी आपली आज्ञा.

राम-लक्ष्मण तयार होऊन कौसल्यामातेचा आशीर्वाद घेण्यासाठी गेले. कौसल्येने सुद्धा पित्याची आज्ञा पालन करायला सांगितले. नारदांनी कौसल्येला पूर्वीच राम-लक्ष्मणांच्या लग्नाविषयीं सांगून ठेवले होते.

राम-कृष्णांना लोणी आणि साखर फार आवडत असे. जीवन मधुर करायचे— साखरेसारखे गोड करायचे. जीवनांत सद्गुणांनीच गोडपणा येत असतो. सगळ्यांनाच मान द्याल तर तुमचे स्वतःचे जीवन सुद्धा साखरेसारखे गोड होईल. सगळ्यांनाच मानाचे दान देणे उत्तम आहे. दुसऱ्यांना मान देण्याने आणि संयम वाढविल्याने आपलें जीवन मधुर आणि उत्तम होत असते.

ज्याच्या जीवनांत (वागणुकींत) मधुरता नसेल तो देवाला प्रिय होत नाही. विद्यादान, ज्ञानदान आणि द्रव्यदान ह्यापेक्षांही मानदान अधिक श्रेष्ठ आहे. मानदान श्रेष्ठ दान आहे. यांत एक पैशाचा सुद्धा व्यय लागत नाही. सगळ्यांनाच मान द्या.

जो कर्कशवाणीने बोलत नाही त्याच्या जीवनांत साखरेसारखी गोडी येत असते.

कौसल्येने विश्वामित्रांना सांगितले कीं माझ्या रामाला लोणीसाखर खाऊ घाला, नाहीं तर तो दुबळा होऊन जाईल.

जेव्हा विश्वामित्रांबरोबर राम-लक्ष्मण चालू लागले तेव्हा ते किती शोभिवंत दिसत होते!

विश्वामित्र अर्थात सगळ्या विश्वाचे मित्र, विश्वस्य मित्रः सः विश्वामित्रः। पाणिनीने हा अर्थ सांगितला आहे. विश्वामित्राने आशीर्वाद दिला कीं पाणिनीचे व्याकरण अमर होईल. एक तर विश्व ज्याचे मित्र तोच विश्वामित्र. जगताचा मित्र आहे जीव. मनुष्य अर्थात जीव मित्र बनला तर शब्दब्रह्म त्याच्या मागोमाग येते आणि त्याच्याच मागून परब्रह्मसुद्धा येते. तुम्ही जगन्मित्र व्हाल तर राम-लक्ष्मण तुमच्या मागोमाग येतील. रामच परब्रह्म आहे— शब्दब्रह्म आहे. शब्दब्रह्माविना परब्रह्म प्रगट होत नाही.

विश्वामित्रांच्या मागोमाग राम-लक्ष्मण चालू लागले. मार्गात त्राटिकेचा उद्धार केला. विश्वामित्रांनी राम-लक्ष्मणांना बला आणि अतिबला विद्या दिल्या होत्या. म्हणून त्यांना तहानभूक लागतच नव्हती.

आश्रमांत आले. रामांनी विश्वामित्रांना सांगितले— 'गुरुजी, तुम्ही आपल्या यज्ञाचा आरंभ करा. मी त्याचे रक्षण करीन.'

विशाल यज्ञमंडप बनविला गेला आहे. राम-लक्ष्मण धनुष्यबाणांनी सज्ज होऊन यज्ञाचे रक्षण करण्यासाठी उभे राहिले आहेत.

भगवंत म्हणतात— जेव्हा जो माझ्या दर्शनासाठी येतो तेव्हा मी त्याला उभा राहूनच दर्शन देत असतो. मी जीवाला भेटायला आतुर आहे. माझ्या वैष्णवांना-भक्तांना भेटण्याची वाट पाहात मी उभा आहे. मी उभ्या उभ्या भक्तांची प्रतीक्षा करतो. माझ्यापासून विभक्त झालेला जीव मला भेटायला

केव्हा येईल ?

ईश्वराची दृष्टी तर जीवाकडे अखंडरूपाने लागलेली आहे. परंतु जीवच ईश्वराकडे दृष्टी वळवीत नाही.

राम तर जीवाला आपलेसे करायला तत्पर आहेत. परंतु हा अभागी जीवच त्यांना भेटण्यासाठी आतुर कोठे आहे ?

श्रीराम आजानुबाहु आहेत. कोणी याचे कारण विचारले तर त्यांनी उत्तर दिले की माझे भक्त मला भेटा५.ा येतात. त्यांच्यांत एखादा कोणी लठ्ठ असला तर त्याला सुद्धा आपल्या बाहुंमध्ये धरू शकेन. यासाठी मी आपले हात लांब ठेवले आहेत. मला भेटायला येणाऱ्या भक्तांना आलिंगन देण्यासाठी मी आपले हात लांब ठेवले आहेत.

राम वानर इत्यादी पशूंना सुद्धा आलिंगन देतात. राम सगळ्यांवरच प्रेम करतात. ते धनुष्यबाण आपल्या बरोबर ठेवतात. धनुष्यबाणाशिवाय रामाचे दर्शन कोठेच होत नाही. राज्यासनावर असो, नाही तर अंतःपुरांत सीतेजवळ असो, त्यांच्या हातांत धनुष्यबाण असतातच. उपनिषदांतही म्हटले आहे– "प्रणवोहि धनुः" उपनिषदांत धनुष्याला ॐ काराची उपमा दिली आहे. ॐ अर्थात ज्ञान. ज्ञानच धनुष्य आहे.

धनुष्य ज्ञानाचे स्वरूप आहे. बाण विवेकाचे स्वरूप आहे.

धनुष्य आणि बाण अर्थांत ज्ञान आणि विवेकानें नेहमी सज्ज रहा. कारण कामरूपी राक्षस न जाणो केव्हां विघ्न करायला येईल. कामराक्षस तुमच्या मागे धावत आहे– तुम्हाला पराजित करायला येत आहे. रामाप्रमाणें धनुष्यबाणानें नेहमी सज्ज असा. ज्ञान आणि विवेकाला सतेज ठेवाल तर राक्षस बाधा उत्पन्न करू शकणार नाही. धनुष्यबाणांनी सज्ज राहाल तर राक्षस पळून जातील. ज्याच्या डोळ्यांत पाप आहे तोच राक्षस असतो. राक्षस जीवमात्राच्या मागे लागलेले आहेत. काम, लोभ, मोह इत्यादी राक्षसच आहेत. ते जीवात्म्याला त्रास देत असतात. जो दर क्षणी सावध राहतो त्याला राक्षस मारू शकत नाहीत.

रामाचें स्वरूप अद्भुत आहे. शूर्पणखा राक्षसी होती, पण तिच्या मनांत रामाला पतिरूपाने वरण्याची इच्छा जागृत झाली होती. आमचें हृदय तर त्या राक्षसीपेक्षाही कठोर आहे, कारण आम्हाला रामाच्या प्राप्तीची इच्छाच जागृत होत नाही.

श्रीधरस्वामींनी रामविजयलीला कथेंत म्हटलें आहे कीं यज्ञाच्या चारी बाजूला राम पहारा देत होते. त्यांनी इतकी रूपे धारण केली होती कीं सगळ्याच द्वारांवर राक्षसांना यांची उपस्थिति दिसत होती.

विश्वामित्र यज्ञकुंडांत आहुती देत असत आणि रामलक्ष्मणांकडे पाहात असत. श्रुति वर्णन करते– अग्नि भगवंताचें मुख आहे. परमात्मा अग्निमुखाने आहार घेतात. अग्निज्वाला प्रभूची जीभ आहे. ब्राह्मणगण वेदमंत्रांचे उच्चार करीत अग्नींत आहुती देत आहेत.

मनाची मलीनता दूर करण्यासाठी यज्ञ करावा. यज्ञ, स्वाध्याय, तप आणि ध्यानाचे फळ आहे मनशुद्धि. मनशुद्धीचें फळ आहे परमात्म्याचें दर्शन.

राक्षसांना समजलें कीं विश्वामित्रांनी यज्ञाला आरंभ केला तेव्हां ते त्यांत बाधा आणण्यासाठीं येऊन पोचले. रामाचें वारंवार दर्शन झाल्यामुळे मारीचाचा स्वभाव बदलून गेला. ज्याच्या दर्शनाने स्वभाव बदलतो तोच ईश्वर. मारीचाला वाटले विश्वामित्राच्या या यज्ञांत विघ्न करणें चांगलें नाही.

आज माझ्या मनांत असे विचार कां येत आहेत? कदाचित या बालकांना पाहून माझें मन बदलून गेले आहे! आज माझें मन माझ्या वश नाही. या बालकांना भेटण्याची इच्छा होत आहे. मारीच राक्षस होता, तरी पण रामाच्या दर्शनाने त्याची बुद्धी चांगली झाली.

आजकालचे लोक रामाच्या दर्शनाला जातात खरे, पण दर्शन केल्यावरही त्यांची बुद्धी सुधारत नाही. रामाच्या दर्शनानंतर सुद्धा बुद्धी सुधारली नाही तर समजा कीं तुम्ही राक्षसांपेक्षा सुद्धा अधम आहात. रोज रामायण वाचले, देवदर्शन केले तरी आचरणांत संयम, सदाचार, सरलता आली नाही तर समजा कीं मारीचापेक्षाही तुमचें अधिक पतन झालेलें आहे.

राम परमात्मा आहे. त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनाने मारीचाची बुद्धि बदलली तर त्यांत आश्चर्य काय? रामाची नक्कल करता करता आणि रामाचें चिंतन करता करता रावणाचा काम मरतो.

रामाचें स्मरण केल्याने सगळे जग मातृवत् दिसते.

एकनाथ महाराजांनी राम-रावण युद्धाच्या वेळचा एक प्रसंग लिहिला आहे. गाढ झोपेंत बुडालेल्या कुंभकर्णाला जेव्हां जागविले गेले तेव्हां त्याने विचारले, मला जागे का केले गेले आहे?

रावण— जानकी आणल्यामुळे युद्ध चालू आहे म्हणून.

कुंभकर्ण— तुझी इच्छा पूर्ण झाली का?

रावण— नाही.

कुंभकर्ण— तू आपल्या मायेने रामाचें रूप धारण करून सीतेच्या जवळ जा. तुला राम समजून ती तुला वश होईल.

रावण— या रामाजवळ कांही अजब जादू आहे. मी त्याचें रूप धारण करण्यासाठी त्याच्या रूपाचा विचार करू लागताच माझें मन बदलून जाते. जे रूप घ्यायचे असेल त्याचा विचार तर करावाच लागतो. जेव्हां मी मायेने रामाचें रूप घेऊ पाहतो तेव्हां सीता मला मातेच्या रूपांत दिसू लागते. माझ्या मनांत कामही शिल्लक राहात नाही.

कुंभकर्ण म्हणू लागला— रामाचें मायावी रूप तुझ्या कामाला मारते! ज्याचें नकली रूप इतके प्रभावशाली आहे तर त्याचें खरे रूप किती अधिक प्रभावी असेल? म्हणून निश्चयपूर्वक समज कीं राम परमेश्वर आहे. अशा रामाबरोबर युद्ध करणें चांगलें नाही. देवाधिदेवाशी युद्ध करणारा तू मूर्खच आहेस. मी तुला साहाय्य करू शकणार नाही. बिभीषणाप्रमाणे मीही रामचरणांचा आश्रय घेईन.

रावण— मी रामाची शत्रुभावानें भक्ति करतो. जर मी एकट्यानेच भक्ति केली तर फक्त माझें एकट्याचेंच कल्याण होईल. पण शत्रुभाव ठेवीन तर माझ्याबरोबर माझ्या संपूर्ण वंशाचें कल्याण होईल. हे सर्वच राक्षस तामसी आहेत. ते जप, तप, ध्यान, सेवा, पूजा तर करू शकत नाहीत. रामचंद्राशी शत्रुता झाली तर युद्ध होईल. युद्ध झालें तर रामाचें प्रत्यक्ष दर्शन होईल. आणि रामदर्शनाने आमचा सर्वांचाच उद्धार होईल. आपल्या सगळ्या वंशाच्या कल्याणासाठीच मी रामाशी वैर केले आहे.

यज्ञ करताना तुम्ही सुद्धा आपल्या प्रत्येक द्वारावर रामलक्ष्मणांना बसवा. जप, कथा श्रवण, नारायणांशी मानसिक मीलन इत्यादी सर्व यज्ञच आहेत. आणि ते गरिबांत गरीबही करू शकतो.

कांही यज्ञ असे आहेत कीं त्यांत कुलाची श्रेष्ठता आणि अत्यधिक धनाची आवश्यकता असते. विधुर आणि विधवांना ते निषिद्ध असतात. प्रायश्चित्त सुद्धा करावे लागते. साधारण ब्राह्मण चालत नाही, तर अग्निहोत्री ब्राह्मणच ते करू शकतात. खूप पैसे खर्च करावे लागतात. कांही यज्ञांना देशकालाची मर्यादा सुद्धा निर्दिष्ट असते.

उपनिषदांत एक यज्ञ असा सांगितला आहे कीं जो जाति-समय-स्थळ इत्यादी कोणत्याही बंधनाविना केला जाऊ शकतो तो आहे जपयज्ञ. हा सगळ्याच यज्ञांत श्रेष्ठ आहे. डोळ्यांनी दर्शन, कानांनी श्रवण आणि मनानें स्मरण करीत करीत जप कराल तर समाधीची स्थिति प्राप्त होऊ शकेल. कृष्णमीलन महायज्ञ आहे.

कृष्णमीलन यज्ञांत श्रद्धा पत्नी आहे, आत्मा यजमान आहे, शरीर यज्ञभूमि आणि परमात्मा विष्णूंशी मीलन हें यज्ञफल आहे. परमात्म्याशी मीलन महानतम यज्ञ आहे. जीवात्मा आणि परमात्म्याचें मीलन महायज्ञ आहे.

यज्ञाने चित्तशुद्धि होते. चित्तशुद्धीचें फळ आहे परमात्म्याची प्राप्ति. सगळीच इंद्रिये यज्ञमंडपाची द्वारे आहेत. या यज्ञांत काम, क्रोध, लोभ, मोह इत्यादी राक्षस बाधा करण्यासाठी येतात. या महायज्ञांत विषयरूपी मारीच बाधा उत्पन्न करतो. द्वारी राम-लक्ष्मण स्थापन कराल तर काम, क्रोध, वासनारूपी मारीच-सुबाहू विघ्न करण्यासाठी येऊ शकणार नाहीत.

डोळ्यांत, कानांत, तोंडांत सर्वच इंद्रियांच्या द्वारावर राम-लक्ष्मण बसवा. असें केल्याने मारीच-विषय विघ्न करू शकणार नाही. आपल्या प्रत्येक इंद्रियद्वारावर रामलक्ष्मणांना – शब्दब्रह्म परमात्म्याला आसनस्थ कराल तेव्हांच तुमचा जीवनयज्ञ निर्विघ्नपणें समाप्त होईल. माया-मारीचाला रामचंद्र विवेकबाणानें मारतात.

ज्याच्या नुसत्या चिंतनानेच कामाचा नाश होतो तोच ईश्वर आहे.

ज्ञानी महात्मा आपल्या इंद्रियांची दारें बंद ठेवतात. आणि वैष्णवजन द्वारावर रामलक्ष्मणांना बसवितात. भागवतांतला राहु आणि रामायणांतील मारीच-विषय दोन्ही एकच होत. ते ताबडतोब मरत नाहीत.

**९. राजा जनकाद्वारें स्वयंवराचें आयोजन:**

विश्वामित्रांचा यज्ञ संपायला आला होता, एवढ्यांत जनकपुराहून निमंत्रणपत्रिका आली कीं सीतेचे स्वयंवर होणार आहे. यज्ञादींमधून निवृत्त झाल्यावर रामलक्ष्मणांना घेऊन विश्वामित्रांनी जनकपुरीकडे कूच केले. वाटेत अहिल्येचा उद्धार करण्याचा प्रसंग आला. विश्वामित्रांनी रामाला एका शिळेला स्पर्श करण्याची आज्ञा केली. या शिळारूपी अहिल्येचा उद्धार कर.

राम विचारांत पडले. कारण जो साधक असतो तो लाकडाच्या स्त्रीला सुद्धा स्पर्श करीत नाही. **'न स्पर्शते दारवीरपि'**. एकादशस्कंधांतील एका श्लोकाचा हा चरण आहे.

राम म्हणाले – मी हिला नमस्कार करतो.

विश्वामित्र – नमस्कार करून तर कांहीच होणार नाही.

राम– मी पायाने देखील स्पर्श करीन तर पापाचा वाटेकरी होईन.

राम पापाला भीतात. आजकालचे लोक पापाला भीत नाहीत. मनाला वाटेल तसे करीत असतात. पापाला भिऊन वागाल तेव्हांच कल्याण होईल. पाप आणि परमेश्वराला भिऊन वागाल तर मन शुद्ध राहील.

मी परस्त्रीला वंदन करतो, स्पर्श नाही.

राम परस्त्रीला आणि सीता परपुरुषाला स्पर्श करीत नसत.

शक्यतोवर परस्त्रीला आणि परपुरुषाला स्पर्श करू नये. ब्रह्मचर्याचा हाच आदर्श आहे.

कवींनी कल्पना केली आहे. फक्त कामसुखाचाच विचार करणारी बुद्धी जड दगडासारखी होऊन

जाते. कोमल बुद्धीच ईश्वरापाशी जाऊ शकते, जड दगडासारखी नाही. कोमल बुद्धीच कृष्णसेवेंत द्रवित होऊ शकते. कृष्णकीर्तनानें आजकाल आनंद मिळत नाही, कारण कामसुखाचें चिंतन करीत राहिल्याने बुद्धी दगडासारखी होऊन गेली आहे. जड-बुद्धि चेतन कशी होऊ शकेल? जेव्हां कोणी सद्गुरू, संत महात्मा भेटतील तेव्हांच. जेव्हां एखाद्या संताची चरणरज पवित्र करील तेव्हांच दगडासारखी जडबुद्धी प्रभूच्या चरणरजानें जागृत चैतन्यमय होते.

अहिल्या— बुद्धि रामचरणरजानें शुद्ध-सचेतन झाली. अहिल्येने प्रभूंना प्रार्थना केली— माझ्या पतीने शाप देऊन चांगलेच केले होते. कारण त्यामुळेच मला आपलें दर्शन होऊ शकले. त्याचवेळी गौतमऋषि सुद्धा तेथे आले. त्यांनी सुद्धा भगवान रामांना 'माझ्या पत्नीचा तुम्ही उद्धार केला, मी आशीर्वाद देतो कीं तुमचा विवाह एका सुंदर गुणवती कन्येशी होईल.'

विश्वामित्र राम-लक्ष्मणांना घेऊन जनकाच्या राजसभेंत आले. त्या कुमारांना पाहून जनकांना प्रश्न पडला कीं हे ऋषिकुमार आहेत कीं राजकुमार?

त्यांनी विश्वामित्रांना विचारले— हे कोण आहेत?

विश्वामित्र— तुम्ही तर महाज्ञानी आहांत! तुम्हीच ओळखा हे कोण आहेत ते.

जनकाचें एक आणखी नाव आहे विदेह. जो देहधारी असूनही देहधर्मातीत आहे तोच विदेह आहे. विदेह— जीवित असता मुक्त. जनक तर शुकदेवांचे सुद्धा गुरू आहेत.

धर्मराज म्हणतात— ब्रह्मानुभवांत जो विषयरसांचे भान विसरून जाईल तोच ज्ञानी. आसक्ति आणि अहंकार अभिमानी जीवाला चिकटून राहतात. ज्ञानी या दोहोंचाही त्याग करतात.

सगळीच इंद्रियें आपापल्या कार्यांत आणि त्यांच्या हेतुसाधनेत मग्न असतात; असें समजून ज्ञानी कोणत्याच विषयांत आसक्त होत नाहीत. या जगांत सगळे कांही करीत असता सुद्धा ते तर अशीच भावना ठेवून काम करतात कीं ते स्वतः कांहीच करीत नाहीत.

जनकराजानें नाटक केले. हे तर कोणी परब्रह्म-परमात्मा आहेत.

जनक म्हणतात, माझ्या डोळ्यांनी मी येथे उपस्थित असलेल्या साऱ्यांना पाहतो आहे, परंतु माझे मन कोणाकडेच आकर्षित होत नाही, माझ्यांत वैराग्य भरलेलें आहे. पण या कुमारांना पाहून मात्र माझें मन आकर्षित होत आहे. माझ्या मनाला तर ईश्वराशिवाय कोणीच आकर्षित करू शकत नाही. तेव्हां हे खरोखरच ईश्वर आहेत. ईश्वराशिवाय माझें मन कोणत्याच विषयाकडे जाऊ शकणार नाही. त्यांचा आपल्या मनावर किती विश्वास होता.

जनकराजानें रामाला ओळखले. त्यांनी म्हटले:— हे ऋषिकुमार नाहीत, राजकुमार पण नाहीत. वेद ज्यांचे नेति नेति म्हणून वर्णन करतात, शंकर ज्यांचे सदासर्वदा चिंतन करतात, तेच साक्षात परब्रह्म परमात्मा आहेत हे.

हे राम माझ्या मनाला वेधून घेत आहेत. म्हणून असें वाटते कीं हे ईश्वरच आहेत. हे जर प्रभु नसते तर त्यांनी माझ्या मनाला आकर्षित केलें नसते.

कण्व मुनींच्या आश्रमांत प्रथम मीलनाचे वेळीं दुष्यंताने शकुंतलेला विचारलें:— 'कोण आहेस तू?'

शकुंतला— मी महर्षि कण्व मुनींची कन्या आहे.

दुष्यंत— तुला पाहून माझें मन चंचल झालें आहे. तसें तर माझें मन पवित्र आहे. ब्राह्मणकन्या मला मातेसमान आहे. असें असूनही, तुला पाहून ज्याअर्थी माझें मन चंचल झाले आहे त्याअर्थी

मला असे वाटत आहे कीं तू माझ्या जातीची असावीस. माझें मनच या गोष्टीला प्रमाण आहे. आपल्या मनावर त्याचा किती विश्वास होता हा!

शकुंतला— तुम्ही पवित्र आहांत, महान आहात. माझे वडील आहेत क्षत्रिय विश्वामित्र. कण्वऋषि तर माझे पालक-पिता आहेत. मी क्षत्रिय कन्या आहे.

जनकराजा म्हणू लागला— आजपर्यंत मी निराकार ब्रह्माचें चिंतन करीत होतो. आज माझें मन म्हणत आहे कीं निराकार ब्रह्माचें चिंतन सोडून या सगुण रामाचेंच चिंतन केले तर चांगले होईल. मला आता असें वाटत आहे कीं निराकाराचें नाही, साकाराचेंच ध्यान करावें. हे राम ईश्वरच आहेत.

विश्वामित्र म्हणाले— राजा, हा तर तुझ्या दृष्टीचा गुण आहे. ज्ञानी अभेदभावानें चिंतन करतात. तुझी वृत्ति ब्रह्माकार आहे म्हणून तुला असें वाटत आहे. अन्यथा हे तर दशरथ राजाचे पुत्र आहेत.

जनक तर महाज्ञानी आहेत. त्यांची प्रशंसा गीतेंत श्रीकृष्णाने सुद्धा केली आहे.

जनक राजाने कर्माच्या द्वारेच परमसिद्धि प्राप्त करून घेतली होती. गीतेंत आणखी जनका व्यतिरिक्त कोणाचीच प्रशंसा केलेली नाही.

विश्वामित्र, राम आणि लक्ष्मण जनकपुरीच्या बाहेर एका उद्यानांत राहिले आहेत. संध्याकाळची संध्योपासनासुद्धा नियमितपणें करीत आहेत. विश्वामित्रांबरोबर सत्संग केला. रात्रीच्या वेळी ते विश्वामित्रांची चरणसेवा करू लागले.

आशीर्वाद, मागून नव्हे, आपोआप हृदयांतून मिळत असतात. विश्वामित्रांनी देखील या राजकुमारांना अगदी हृदयापासून आशीर्वाद दिला— कल्याण होवो तुमचें!

लक्ष्मण रामाची सेवा करीत आहे. त्यांना वाटत आहे कीं उद्यापासून बहुधा मला या चरणसेवेचा लाभ मिळणार नाही. उद्या मोठ्या भावाचें लग्न होईल तर चरणसेवेचा लाभ वहिनीलाच मिळेल. सेवा करण्याचा माझा हा शेवटचा दिवस आहे. उद्यापासून मला सेवा करायला मिळणार नाही. रामाच्या सेवेशिवाय मला चैन पडत नाही.

सेवा आणि स्मरणावाचून ज्याला चैन पडत नाही तोच खरा वैष्णव होय. जो केवळ सेवा आणि स्मरणासाठीच जगतो तोच वैष्णव होय.

लक्ष्मणाला फार वाईट वाटले. कारण आता सेवेचा अधिकार हिसकावला जाणार आहे. त्यांचे मन व्याकुळ झाले. त्यांचे हृदय भरून आले. डोळ्यांमधून आसवांच्या धारा वाहूं लागल्या. प्रभूंनी पाहिले कीं त्यांचा लक्ष्मण रडत आहे. त्यांनी लक्ष्मणाला रडण्याचें कारण विचारलें. का रडत आहेस? आईची आठवण तर नाही आली? तू रडत आहेस हे पाहून मला वाईट वाटत आहे.

रामांचे प्रेम आदर्श प्रेम होते. लक्ष्मण संकोचामुळे बोलू शकत नाही. रामांना लक्ष्मणाच्या हृदयाची जाणीव होती. ते म्हणाले: लक्ष्मणा, माझ्या विवाहानंतर उजव्या पायाची सेवा तू कर आणि डाव्या पायाची सेवा सीतां करील. तुला पाहिल्यावाचून मला झोप येत नाही. विवाहानंतर सुद्धा तुला सोडणार नाही.

राम तर सगळ्यांचेच अंतर्यामी आहेत, पण लक्ष्मण तर रामाचे अंतर्यामी आहेत.

तर असें होते रामाचें बंधुप्रेम!

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळी. लक्ष्मण सर्वांच्या आधी उठले.

स्त्रीचा धर्म असा आहे कीं पतीच्या जेवणाच्या आधी जेवण आणि झोपण्याच्या आधी झोप तिने कधी घेऊ नये. हाच धर्म सेवकाचा सुद्धा आहे.

विश्वामित्र शाळिग्रामाची पूजा करीत होते म्हणून राम-लक्ष्मणांना पूजेसाठी फुलें-तुळस इत्यादी आणण्यासाठी त्यांनी बगीचांत पाठविले.

राम-लक्ष्मण फुलें आणि तुळस गोळा करण्यासाठी उद्यानांत फिरू लागले. माळ्याला काका म्हणून हाक मारली. माळ्याने मागे वळून पाहिले तर राम-लक्ष्मण त्याला बोलवीत होते. तो म्हणाला, मी एक यःकश्चित सेवक आहे. राम म्हणाले, भलेही सेवक असा, पण आमच्यापेक्षा तर मोठे आहात. रामाच्या विनयामुळे माळी त्यांना वारंवार प्रणाम करू लागला.

राम सगळ्यांना समानच मानत असत. म्हणूनच वनगमनप्रसंगीं अयोध्येची समग्र प्रजा रडली ही कांही आश्चर्याची गोष्ट नाही. राम-लक्ष्मण तुळशीला सुद्धा नमस्कार करीत. तुळशीला नित्य वंदन करणाऱ्याला केव्हाच आजार येत नाही.

नमस्कार केल्याशिवाय तुळसीदल केव्हांच घेऊ नका. तुळसीदल नखाने तोडू नका. ज्या वेळी तुळसीदल तोडण्याचा प्रसंग येईल तेव्हां तिला नमस्कार करून म्हणा कीं परमेश्वरचरणीं वाहण्यासाठी तोडण्याची अनुमति दे. तुळस तर राधेचा अवतार आहे. संध्याकाळनंतर तुळशीला स्पर्श करू नका. दररोज़ तुळशीची आणि पार्वतीची पूजा करणें हा स्त्रियांचा धर्म आहे. असे केल्याने सौभाग्य अखंडित राहते.

त्याच वेळीं उद्यानांत सीता देखील आली. राम आणि सीतेच्या दृष्टीचें मीलन झाले. या दृष्टिमीलनाविषयीं उल्लेख फक्त तुलसीरामायणांतच आहे. वाल्मीकिरामायण, भावार्थरामायण, आनंदरामायण, अध्यात्मरामायण इत्यादींमधे नाही.

सीतेने जगदंबेला प्रणाम करून रामासारखा नव्हे, तर रामच पति मिळावा म्हणून प्रार्थना केली.

रामलक्ष्मण पुष्पादि घेऊन परत आले आणि विश्वामित्रांना म्हणाले की ज्या कन्येचे स्वयंवर होणार आहे तीसुद्धा उद्यानात आली होती.

रामांचा स्वभाव अतिशय सरळ आहे. त्यांच्या मनात छलकपट नाही.

विश्वामित्र म्हणालेः ती दररोज ह्याच वेळी उद्यानांत येत असते हे मला माहीत आहे आणि तुम्ही तिला पाहून घ्यावे ह्याच उद्देशाने मी तुम्हाला तेथे पाठविले होते.

स्वयंवराची वेळ आली. राजा जनक राजसभेत म्हणालाः 'माझी मुलगी जेव्हा तीन वर्षांची होती तेव्हा ती ह्या धनुष्याचा घोडा करून खेळत राही. ह्या धनुष्याचा जो कोणी भंग करील त्याच्याशी मी माझ्या मुलीचा विवाह करीन.'

त्या सभेत रावण देखील उपस्थित होता. विनाकारण इतरांना क्लेश देतो, आपला स्वतःचा जयजयकार स्वतःच करतो आणि जो आत्मप्रशंसा करीत हिंडतो तोच रावण असतो. त्या सभेत सुद्धा तो आपलाच जयजयकार करू लागला. काही कारण नसता त्याने जनकराजाशी भांडण उकरून काढले. धनुष्य उचलण्याचा प्रयत्न करीत असता तो आपला जयजयकार करू लागला.

आपली प्रशंसा आपणच करतो तो रावणच नाही का?

पार्वती शंकरांना म्हणालीः तुमचा शिष्य रावण फारच अभिमानी झाला आहे. काही असा उपाय करा की ज्यामुळे तो धनुष्य उचलूच शकणार नाही. तीनशे शिवगण सूक्ष्म रूप धारण करून त्या धनुष्यावर बसले.

रावण धनुष्य उचलू शकला नाही आणि भर सभेंत त्याची फजिती झाली. असें पाहिल्यावर इतर राजे देखील सावध झाले. जर महाबलवान रावण तोंडघशी पडला तर आमची काय दशा होणार?

धनुष्य उचलण्याला सगळेच संकोचू लागले.

**१०. धनुष्यभंग - अर्थात रामविवाह:**

विश्वामित्रांनी रामचंद्रांना धनुष्य उचलण्याची आज्ञा दिली तेव्हां विश्वामित्रांना प्रणाम करून त्यांची आज्ञा घेऊन ते धनुष्य उचलण्यासाठी उठून चालू लागले.

सीता प्रार्थना करू लागली कीं ह्या वेळीं धनुष्य अगदी फुलासारखे होवो. रामांनी धनुष्याला नमस्कार करून ते उचलले आणि दोरी चढविण्यासाठी खेचली मात्र, तोच धनुष्याचे दोन तुकडे होऊन पडले.

विश्वामित्र म्हणाले– आता सीतेने बाहेर यावे. आम्हाला तिचें दर्शन व्हावे.

सीता वरमाला घेऊन बाहेर आली.

इकडे रामचंद्र विचारमग्न झाले कीं मातापित्यांच्या आज्ञेविना विवाह कसा करावा? सुंदर राजकन्या विजयमाला घालण्यासाठी आलेली आहे, परंतु मातापित्यांच्या आज्ञेविना रामचंद्र तिचा स्वीकार करण्यास तयार नाहीत! सीता माळ घालण्याचा प्रयत्न करीत आहे, पण रामचंद्र तिच्यापेक्षा उंच असल्यामुळे ती माळ घालू शकत नाही. हार घालण्यासाठी तिनें हात वर केले तर कंकणांत रामचंद्रांचें प्रतिबिंब दिसू लागले. तेव्हां ते पाहण्यांत ती तल्लीन होऊन गेली. रामचंद्र डोके वाकवीत नव्हते. हे पाहून विश्वामित्रांनी जवळ येऊन कारण विचारले. तर राम म्हणाले– माझा लक्ष्मण अविवाहित आहे. त्याचासुद्धा विवाह झाला पाहिजे. आणि तो सुद्धा माझ्याआधी. राम आपल्या धाकट्या भावाला विसरत नाहीत.

विश्वामित्र म्हणतात– माझ्या रामाची जितकी प्रशंसा करावी तितकी थोडीच आहे.

जनक राजानें घोषित केलें कीं त्यांच्या दुसऱ्या मुलीचा विवाह लक्ष्मणाशी केला जाईल. रामाला आनंद झाला आणि सीतेच्या वरमालेचा त्यांनी स्वीकार केला.

जनक राजाचे सेवक कुंकुमपत्रिका घेऊन अयोध्येला आले. दशरथांनी पत्रिका वाचली. वैदिक विधिपूर्वक विवाह संपन्न करण्यासाठी अयोध्येच्या प्रजेसह जनकपूरला येण्याचे निमंत्रण होते. दशरथाचें हृदय आनंदानें भरून आले. ते जनकाच्या सेवकांना पुरस्कार देऊ लागले तर ते सेवक म्हणाले, "आम्ही याचा स्वीकार करू शकत नाही. कारण आम्ही तर वधू पक्षाचे आहोत.

प्रातःकाळी वसिष्ठ आणि अयोध्येच्या प्रजेसह दशरथ राजाने जनकपुरीच्या दिशेने प्रयाण केले. वाटेंत शकुनही चांगले झाले. दोन पवित्र ब्राह्मण भेटले आणि डोक्यावर पाण्याचे घडे आणि लहान मूल घेऊन येणाऱ्या सौभाग्यवती स्त्रियाही दिसल्या.

वरात जनकपूरला येऊन पोचली. जनक आणि दशरथाची भेट झाली. रामलक्ष्मणांना घेऊन विश्वामित्र सुद्धा आले. दोघाही पुत्रांनी वडिलांना नमस्कार केला.

नारदांनी विवाहाचा मुहूर्त सांगितला, मार्गशीर्ष महिन्यांतील शुक्लपक्षाची पंचमी आणि वेळ गोरज.

वरात धनत्रयोदशीच्या दिवशी आली होती. आणि वसंतपंचमीनंतर परत गेली होती.

रघुनाथांच्या वरातींत कामदेव घोडा बनून आले होते. काम-अश्वावर बसून राम विवाहासाठी गेले. जेव्हां साधारण मनुष्य विवाहाला जातो तेव्हां काम त्याच्यावर स्वार झालेला असतो.

शुकदेव वर्णन करीत आहेत. राजाला परमानंद झाला आहे.

भगवंतांना सुवर्णखचित सिंहासनावर बसविले गेले.

एक एका राजकुमारांला एकेका कन्येचे दान करायचे आहे. सर्वच ब्राह्मण मंगलाष्टक म्हणू लागले.

विधिपूर्वक राम-सीतेचा विवाह झाला. जनक म्हणाले, मी कन्येचें दान दिलें आहे.

राम– "प्रतिगृह्णामि" मी ते स्वीकारतो. राम सरळ स्वभावाचे आहेत.

आता लक्ष्मणाची पाळी आली.

लक्ष्मण म्हणाले– 'आम्ही क्षत्रिय आहोत. आम्ही दान घेत नाही. मी 'प्रतिगृह्णामि' म्हणणार नाही.

ब्राह्मण– तुमचे मोठे भाऊ तसे म्हणाले आहेत.

लक्ष्मण– ते तर भोळे आहेत. मी म्हणणारं नाही.

रामचंद्र त्याला समजावू लागले:– लक्ष्मणा, असे तर म्हणावेच लागते.

लक्ष्मण– तुम्ही दुसरें कांही सांगाल ते करीन, पण कन्येचा दानाच्या रूपांत मी स्वीकार करू शकणार नाही.

विश्वामित्रांनी समजाविलें कीं त्या शब्दांच्या उच्चाराशिवाय विवाहविधि पूर्ण होत नाही– पूर्ण झाला असें समजले जात नाही. गुरुजींनी समजाविल्यावर लक्ष्मण 'प्रतिगृह्णामि' म्हणाला.

विवाहविधि संपन्न झाला. वरवधू जेवायला बसले. जेवायच्या वेळी थोडा विनोद केला तर जेवण चांगले जाते. जनकपुरीच्या (स्त्रिया) बायका अवतिभवति बसून विनोद करीत आहेत. त्या म्हणतात, हे युवक भाग्यशाली आहेत. नाहीतर इतक्या रूपवान मुली मिळतातच कुठे? दशरथांना आधीतर मुलगेच नव्हते. त्यांच्या बायकांनी खिरीचा प्रसाद खाल्ला तर वृद्धावस्थेंत त्यांना मुले झाली, हे चांगलेच झाले.

लक्ष्मणांना हा विनोद सहन झाला नाही. ते म्हणाले– अयोध्येत तर खिरीच्या आहाराने संतति होते, परंतु जनकपुरीला येऊन तर आम्हाला हे कळलें की येथील बायकांना तेही करावे लागत नाही. येथे तर जमिनीतूनच संतति उत्पन्न होत असते.

विवाहानंतर एकी-बेकीचा खेळ खेळला जातो.

जोपर्यंत पतिपत्नींचा स्वभाव एकरूप होणार नाही तोपर्यंत विवाहित जीवन सफल होऊ शकत नाही. दोन शरीरें असूनही मन एकच असेल तरच तो विवाह! विवाहानंतर दोघेही एकरूप होतात. अद्वैताच्या सिद्धीसाठी विवाह ही पहिली शिडी आहे.

सीतेने मुठीमध्ये कवड्या लपवून विचारले– एकी की बेकी? (अर्थात मुठींत एक कवडी आहे की दोन आहेत?) राम म्हणाले– एकी. सख्या हसू लागल्या. आजपर्यंत तर एकटेच होते. आता तर बेकी (दोन) झाले आहात. तरी म्हणत आहात एकी?

लक्ष्मण म्हणाले– रामदादांचे म्हणणे अगदी बरोबर आहे. त्यांच्या भाषेंत गूढार्थ आहे. विवाहानंतर बेकीची (दोन व्यक्ति) एकी (एक) होत असते. राम आणि सीता आता दोन नाही– एकच आहेत– अभिन्न आहेत.

सर्वांनाच आनंद झाला. परंतु आनंदाची तृप्ति झाली नाही. सोन्याच्या सिंहासनावर राम आणि सीता विराजले आहेत.

रामचरित्र अनंत आहे. रामाच्या विवाहाची कथा जो प्रेमाने ऐकेल त्याचे सदा मंगल होईल.

विवाहाचा सर्व विधि पूर्ण झाल्यानंतर रंगमहोत्सव झाला आणि नंतर सगळ्यांनीच अयोध्येकडे प्रयाण केले.

चारी भावांचे विवाह झाले. आज तर माझ्या अंगणांत चार चार लक्ष्मीनारायण आले आहेत. असे समजून कौसल्येने पूजा इत्यादी उपचारांनी त्यांचे हार्दिक स्वागत केले.

साक्षात् महालक्ष्मी जनकपुरी सोडून जात आहे. माझ्या जाण्यानंतर यांचे काय होईल ? सीतामातेने आपल्या पदरांत तांदूळ घेऊन चारी दिशांना फेकून दिले. आज सुद्धा मिथिलेंत तांदूळ खूप उत्पन्न होतात.

अयोध्येची प्रजा सीता-रामांचें दर्शन करीत आहे. अतिशय आनंद झालेला आहे. विश्वामित्रांचा सुद्धा खूप सन्मान केला गेला आहे. घरी आल्यावर दशरथ राजाने राण्यांपाशी जनकराजांची खूप खूप प्रशंसा केली.

कन्येच्या (वधूच्या) आई-वडिलांची प्रशंसा केल्याने ती प्रसन्न राहील. तुम्ही लोकांशी प्रेमाने वागाल तर लोकही तुमच्याशी प्रेमाने वागतील. जनक राजांची प्रशंसा सीतेने देखील ऐकली.

दशरथ म्हणाले— ही दुसऱ्याची मुलगी आता आमच्या घरीं आली आहे. ज्याप्रमाणे आपल्या डोळ्यांचे रक्षण आपल्या पापण्या करतात त्याचप्रमाणे सीतेचें रक्षण केले पाहिजे.

सूत सावध करतात—

आनंदाचें दिवस कांहीसे लवकरच निघून जातात. रामचंद्र २७ वर्षांचे झाले आणि सीता १८ वर्षांची.

**११. दशरथाचा रामाला राज्याभिषेक करण्याचा विचारः**

एक दिवस दशरथ राजे राजसभेंत विराजमान होते. त्यांचा मुकुट थोडा वाकडा झाला. आरशांत पाहिलें तर मुकुटाबरोबरच त्यांना दिसले कीं आपल्या कानाचे कांही केस पांढरे होऊ लागले आहेत. कानाचे केस पांढरे होऊ लागले की समजा वृद्धावस्था फार वाढली आहे. दशरथाने विचार केला कीं हे श्वेत केस मला सांगत आहेत (उपदेश देत आहेत) कीं तू आता अतिशय वृद्ध झाला आहेस. रामाला राज्याभिषेक कां करीत नाहीस ? राम-सीतेचा राज्याभिषेक मी आपल्या डोळ्यासमोरच करून घेतला तर चांगले होईल. तशा तर माझ्या सर्वंच इच्छा पूर्ण झालेल्या आहेत, परंतु हीच एक बाकी राहिली आहे.

इच्छांना तर कांही शेवटच नसतो. तेव्हां त्यांचा त्याग करून भगवत्भजन करणें उत्तम.

दशरथ राजाच्या इच्छेविरुद्ध कोण काही बोलू शकत होते ? दशरथाचें राज्य तसें तर प्रजातंत्रच आहे. मंत्रिगण आणि महाजनांच्या अनुमतीशिवाय रामाचा राज्याभिषेक केला जाऊ शकत नाही. प्रजेची सुद्धा इच्छा होती कीं राम राजा व्हावा. दशरथ राजाने मंत्रिगण आणि महाजनांना म्हटलें, ‘ जर तुमची अनुमति असेल तर मी रामाला राज्यपद देण्याचा विधि संपन्न करीन. ’

सुमंत मंत्री म्हणाले— फार छान ! आमचीसुद्धां हीच इच्छा आहे, पण आम्ही संकोचामुळे बोलू शकत नव्हतो.

त्याच वेळीं वसिष्ठांचें येणे झाले. सर्वांनीच त्यांचा सत्कार केला. दशरथ नमस्कार करीत त्यांना म्हणाले— ‘ रामाला राज्याभिषेक व्हावा अशी प्रजेची इच्छा आहे. आम्ही आपली आज्ञा मागतो. ’

वसिष्ठ— राजा ! विचार तर चांगला आहे.

दशरथ— महाराज, एखादा शुभमुहूर्त सांगा. वसिष्ठांनी मुहूर्त सांगितला असता, परंतु ते जाणत होते की त्या मुहूर्तावर रामाला राज्याभिषेक होऊ शकणार नाही. म्हणून ते म्हणाले— राम ज्या दिवशीं ज्या वेळी राज्यपद ग्रहण करील तोच श्रेष्ठ दिवस असेल.

वसिष्ठांची गूढ अर्थ असलेली वाणी दशरथाला समजली नाही. त्यांनी तर पुढल्याच दिवशीं

राज्याभिषेक करण्याची इच्छा जाहीर केली. त्यांनी मंत्रिगणांना राज्याभिषेकाची तयारी करण्याची आज्ञा केली.

सुमंत मंत्री म्हणाले— राजन्, सर्वच तयारी झालेली आहे.

दशरथ— वसिष्ठ महाराज! रामचंद्राला हा समाचार आपणच द्याल तर चांगले. आपण कुलगुरू आहांत.

तेव्हां वसिष्ठ रामचंद्रांच्या महालांत गेले.

राम म्हणाले— आपण येथे येऊन मला पावन केले आहे.

वसिष्ठ— तू तर साक्षात् विनयाची मूर्ति आहेस. तेव्हां अशा गोष्टी स्वाभाविकच आहेत. उद्या तुझा राज्याभिषेक होईल. राज्याभिषेकाचा समाचार ऐकून सर्वच लोक आनंदित झाले आहेत. परंतु राम कांहीसे उदास झाले. ते वसिष्ठांना विचारू लागले. 'मला एकट्यालाच राजा व्हायचे आहे काय?'

वसिष्ठ— राजा तर एकच होत असतो.

राम— नाही, नाही. आम्हा चारी भावांना राज्याभिषेक झाला पाहिजे. माझ्या भरत, लक्ष्मण आणि शत्रुघ्नांनाही राजे करा.

वसिष्ठांनी मंद स्मित करीत म्हटले— मी तुला कसे समजावू कीं राजा तर एकाच व्यक्तीला केले जाऊ शकते. जो ज्येष्ठ असेल तोच राजा होऊ शकतो. आणि तू ज्येष्ठ आहेस. सर्वांचीच ही इच्छा आहे कीं सीतेसह तुला राज्याभिषेक व्हावा. उद्यापासून रामराज्याला आरंभ होईल.

तेथे लक्ष्मण आले. राम त्यांना म्हणाले— लक्ष्मणा, बाबा मला उद्या राज्याभिषेक करणार आहेत. रामांना लक्ष्मण फार प्रिय आहे. लक्ष्मणा, ही राज्यलक्ष्मी तुम्हां सर्व बंधूंचीच तर आहे. तू जसे म्हणशील तसेच होईल. लक्ष्मणाला अत्यंत आनंद झाला. त्याला स्वतःला तर राजा होण्याची इच्छाच नव्हती. त्याने असाच विचार केला कीं मोठा भाऊ सिंहासनावर बसेल आणि मी चामर घेऊन त्याची सेवा करीन. लक्ष्मणाचें बंधुप्रेम दिव्य आहे.

आज सर्व नगर सुशोभित केले गेले आहे. वसिष्ठांच्या आज्ञेनुसार दशरथानेही आज्ञा केल्या. हृदय आनंदानें भरून आले आहे. दशरथाच्या राज्यकालांतील ही शेवटची राज्यसभा आहे. हे तर सूर्यवंशाचे पवित्र सिंहासन आहे. ज्या राज्यासनावर कधी रघु, भगीरथ, दिलीप, इत्यादी विराजमान झालेले होते त्याला नमस्कार करून दशरथ म्हणाले— 'आजपर्यंत तुझ्या मांडीवर तुझ्या छत्राखाली, मी होतो. उद्या माझा राम इथे बसेल. त्याचें रक्षण कर.'

सगळ्या अयोध्येंत बातमी पसरली. सर्वच नगरांत आनंदाची लहर पसरली. परंतु देवांना दुःख झालें. जर रामाने उद्या राज्यपद ग्रहण केलें तर रावणाचा नाश कोण करील? रावण आणि त्याचे राक्षस फार उपद्रव देत आहेत. देवांनी विघ्नेश्वरी देवीला आवाहन केलें. माता आली.

देव विघ्नेश्वरी देवीला म्हणाले— अयोध्येंत जाऊन रामाच्या राज्याभिषेक प्रसंगांत कांही बाधा उत्पन्न कर. राम तर सुखदुःखांच्या पलीकडे आहे. तो तर आनंदरूपच आहे आणि दशरथाला देखील सद्गतीच मिळणार आहे.

महात्मा लोकांनी सांगितलेले आहे— कोणाचे संपूर्ण सुख तर काळालादेखील पाहवत नाही. दशरथ राजाच्या सुखाला काळाची अशुभ नजर (दृष्ट) लागली.

काळानें विघ्नेश्वरी मातेत प्रवेश केला. विघ्नेश्वरी विचार करू लागली, आता काय करावे? कोणाच्या शरीरांत प्रवेश करू? विचार करता तिच्या मनांत मंथरा आठवली. मंथरेचा जन्म कैकय

देशांत झाला होता. विघ्नेश्वरीने मंथरेंत प्रवेश केला. मंथरा अयोध्येंत फिरता फिरता नगराची शोभा-शृंगार पाहू लागली. तिनें एकाला विचारले, ही कोणत्या उत्सवाची तयारी चालू आहे?

लोक म्हणाले— तुला अजून कांही शुभ समाचार समजला नाही का? उद्या राजकुमार रामचंद्रांचा राज्याभिषेक होणार आहे.

महात्मा म्हणतात की कौसल्येकडून एक चूक झाली. एका दासीने धावत येऊन जेव्हां कौसल्येला राज्याभिषेकाची बातमी सांगितली तेव्हां तिने आनंदित होऊन त्या दासीला एक मोत्याचा हार बक्षीस दिला आणि म्हटले, उद्या माझा मुलगा राम राजा झाला म्हणजे तुला दोनतीन गावांची जहागिरी देईल. राम तुला माझ्यासारखाच सन्मान देईल.

दासी आनंदाच्या भरांत घरांत जाऊ लागली तर वाटेंत तिला मंथरा भेटली. मंथरेने आनंदाचे कारण विचारले. दासी म्हणाली, उद्या राम राजा होईल. पहा तर खरे, मला कौसल्या मातेने ही मोत्याची माळ दिली आहे. राम राजा उद्या मला दोन गावांची जहागिरी देतील, मी कौसल्येची दासी आहे म्हणून. तुला तर कांहीच नाही मिळाले!

परमार्थांत जर कांही चूक झाली तर बहुधा भगवान क्षमा करतात, परंतु व्यवहारांतली लहानशी चूक सुध्दा लोक क्षमा करीत नाहीत. परमात्मा मोठी चूकही क्षमा करतात. व्यवहार फार कठोर आहे. व्यवहारांत अत्यंत सावध राहिले पाहिजे.

कौसल्येने आपल्या दासीला तर पुष्कळ दिले, परंतु आपल्या सख्यांच्या दासीला कांही दिले नाही. मंथरा इत्यादींना सुद्धा जर कांही दिले असते तर ते विघ्न टळू शकले असते.

व्यवहार करा, पण व्यवहारांतच बुडून राहू नका. जोपर्यंत साधू महात्म्यांना मूठभर अन्नाची आवश्यकता असते तोपर्यंत त्यांनाही गृहस्थाप्रमाणेंच व्यवहार करावा लागतो. जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत व्यवहार सोडला जाऊ शकत नाही. व्यवहार करा, पण त्याच्या बाहेर राहून.

व्यवहार करताना आत्मस्वरूपाशी संबंध ठेवला नाही तर पाप होते. मनाचे दोन भेद आहेत— सूक्ष्म आणि स्थूल. मनाचा स्थूल अंश भलेही व्यवहाराशी निगडित राहो; पण त्याचा सूक्ष्म अंश तर भगवंतापाशीच ठेवला पाहिजे. पाणी भरणारीण जेव्हां आपल्या डोक्यावर पाण्याची घागर घेऊन चालत असते तेव्हां तिचें स्थूल मन सख्यांच्या गोष्टींत लागलेले असते. परंतु सूक्ष्म मनाने तिचें लक्ष पाण्याच्या घागरींतच अडकलेले असते.

परमार्थ सरळ आहे, परंतु सांसारिक व्यवहार फार कठीण आहे. व्यावहारिक कामाच्या वेळी भगवंताला विसरू नका.

ज्याप्रमाणे एखादी आई आपलें सूक्ष्म मन आपल्या बाळापाशी ठेवून घरांतील कारभार सांभाळते त्याचप्रमाणें सूक्ष्म मनाला परमेश्वरापाशीं जोडून व्यवहार कराल तर सफल व्हाल.

### १२. कुसंगामुळें कैकेयी मतिभ्रष्ट होते व रामांना वनवास घडतो:

कौसल्येच्या दासीने मंथरेला टोमणा मारला तर तिच्या मनांत मत्सर जागृत झाला. ती ईर्षेच्या अग्नींत धुमसू लागली. ती कैकेयीपाशी आली आणि तिनें स्त्री-चरित्र सुरू केलें. कैकेयीसमोर ती मोठमोठ्यानें रडू लागली. कैकेयीने विचारले— कां रडते आहेस ग तू? लक्ष्मणाने तुला कांही शिक्षा केली का?

मंथरा तर कांहीही न बोलता-सांगता रडतच होती. कैकेयीच्या हृदयांत रामाविषयीं स्नेह आहे म्हणून ती रामाचें कुशल विचारीत आहे. राम तर कुशल आहेत ना? तसें तर पतीचें कुशल सर्वांत

पहिले विचारायला हवे. परंतु रामावर अतिशय प्रेम आहे. ती कुशल समाचार विचारीत आहे.

मंथरा सांगू लागली— होय, राम तर आनंदातच आहेत. आनंदांत कां असणार नाहीत ते? उद्या त्यांना राज्याभिषेक होणार आहे. ही बातमी ऐकल्याबरोबर कैकेयीने मंथरेला माळेचे बक्षीस दिले. कैकेयीच्या मनांत अजून कलीने प्रवेश केला नव्हता. परंतु मंथरेने तर ती माळ फेकून दिली. सगळेच आनंदात होते, पण मंथरा मात्र बेचैन होती.

कैकेयी म्हणाली— तू तर मूर्ख आहेस. ज्येष्ठ पुत्राला राज्य मिळावे अशीच सूर्यवंशाची परंपरा आहे. मी अनेक वेळा रामाची परीक्षा करून पाहिली. तो कौसल्येपेक्षा सुद्धा माझ्यावर जास्त प्रेम करतो.

कैकेयी तर भोळी आहे. मंथरेचा स्पर्श झाल्यावरच तिच्या मनांत पाप उभे राहिले. मंथरेने स्त्रीचरित्र सुरू केलें. रडत रडत ती जमिनीवर जाऊन पडली आणि हुंदके देत देत म्हणू लागली— 'राम राजा होवो नाही तर भरत, मला काय त्याचे? मी तर दासीची दासीच राहीन. ज्या कोणाचे भले करू पाहते तोच माझ्या विरुद्ध होत असतो. माझा तर कांहीच स्वार्थ नाही. खरं तर तुझेच भवितव्य बिघडणार आहे. माझी इच्छा हीच आहे कीं तुझें अहित होऊं नये. माझा स्वभावच असा आहे.

कैकेयी मंथरेच्या कपटाने भरलेल्या भाषेने भुलली. माझ्याविषयीं तिला प्रेम आहे म्हणूनच तर ती मला सांगायला आली आहे. तिनें मंथरेला थोपटून उठविलें. कैकेयीनें मंथरेला स्पर्श केल्याबरोबर तिच्या मनांत कलीनें प्रवेश केला.

पाप्याला कधीच स्पर्श करू नका. शास्त्रांत दोषांचे वर्णन केले गेले आहे. कोणालाही विनाकारण स्पर्श करू नका.

कैकेयी— मंथरे, खरं खरं सांग. तुला काय दुःख आहे?

मंथरा— मला तसं तर कांहीच म्हणायचं नाही. परंतु तुझें जे अहित होणार आहे ते माझ्याच्याने पाहवत नाही. मी तुझें बिघडलेले काम सुधरवू इच्छिते. माझा स्वतःचा तर कांहीच स्वार्थ नाही.

कैकेयी— सांग, मला काय करायला हवे आहे?

मंथरा— कैकेयी, तू तर अगदीच भोळी आहेस! तू समजत आहेस कीं राजे तुझ्या आधीन आहेत. परंतु पुरुष खोटे असतात. ते तुझ्या सांगण्यांत नाहीतच. ते तर कौसल्येचे ऐकतात. कौसल्येने तुला आपल्या मार्गांतून काढून टाकण्याचा कट योजला आहे. पंधरा दिवसांपासून रामाच्या राज्याभिषेकाची तयारी चालू आहे आणि तुला तर तें माहीतच नाही! दशरथ फार कपटी आहेत. ते कौसल्येवरच प्रेम करतात. तुझ्यावर तर नुसता प्रेमाचा देखावाच करतात. रामांचा राज्याभिषेक करण्यांत एवढी घाई कां केली जात आहे? कौसल्येच्या सांगण्यावरूनच तर भरत-शत्रुघ्नांना मामाच्या घरीं पाठवून दिलें आहे. देशांतील सर्वच राजांना निमंत्रणें पाठविली गेली आहेत, पण भरत-शत्रुघ्नांची तर कोणी आठवण सुद्धा काढीत नाही, तुला तर कांही माहीतच नाही. बस, आरामांत निजलेली आहेस तू!

कैकेयी— हो! हो! तुझें म्हणणें अगदी खरें आहे. माझे कोणीच नाही. तूच सांग, आता मी काय करू?

मंथरा अजूनही विष कालवीतच होती. राम राजा झाल्यावर तुझी सेवा कोणीच करणार नाही. लक्ष्मणाला मंत्रीपद दिलें जाईल आणि भरताला कारावास. तुला कौसल्येची दासी बनून राहावे लागेल. तुझें राणीपद हिसकावले जाईल. कौसल्या राजांना तुझ्या आधीन राहू देऊ इच्छित नाही. मला तर हे सगळे पाहवतच नाही.

कैकेयी – मी करूच काय शकते ? तीन दिवसांपासून मला अशुभ स्वप्नें दिसत आहेत. ती अशुभ स्वप्नें तर तिच्या विधवा होण्याचीच होती, परंतु तिला हे समजतच नव्हते. ती एवढेच समजत होती कीं माझ्या भरताची दुर्दशा होणार आहे.

मंथरा – बाजी अजूनही तुझ्या हातात आहे. तुला राजापासून दोन वर मागायचे आहेत. ते तू आजच मागून घे.

कैकेयी – काय मागू मी ?

मंथरा – एक वर असा माग कीं तुझ्या भरताला राजा केले जावे, आणि दुसरा वर असा माग कीं रामचंद्राला चौदा वर्षांचा वनवास दिला जावा. वस्त्रा-भूषणांचा त्याग करून क्रोधागारांत निघून जा. तुझ्या या अवताराला पाहून जेव्हां दशरथ भेदरून जातील तेव्हां ते तुला कांही तरी वस्तू मागायला सांगतील. ते रामाची शपथ सुद्धा घेतील. फारच सावधानपणें काम कर. ते रामाला वनवास द्यायला तसे तयारच होणार नाहीत. म्हणून त्यांना रामाच्याच शपथेंत बांधून घे. भूपतीने रामाची शपथ घेतल्याबरोबर तू आपले दोन्ही वर मागून घे.

कैकेयी तशी तर फारच भोळी होती. परंतु कुसंग प्रत्येकालाच बिघडवत असतो. कुसंगामुळेच कैकेयीची मति भ्रष्ट झाली.

कैकेयीनें क्रोधागारांत जाऊन आपली आभूषणें इत्यादी काढून इतस्ततः फेकून दिली आणि रागीट मुद्रा करून जमिनीवर पडून राहिली. ती वीरांगना असल्यामुळे राजांना प्रिय होती. ते राजसभेच्या समासीनंतर दररोज कैकेयीला भेटायला येत असत. आज त्यांनी येऊन पाहिले तर कैकेयीचा ठावठिकाणाच नव्हता.

राजांना समाचार मिळाला कीं कैकेयी तर कोपभवनांत पडली आहे. धैर्य धारण करून ते तेथे गेले. राजे जवळ जाऊन कैकेयीला स्पर्शच करणार होते एवढ्यांत तिने संतापून ‘ मला हात लावू नका ’ असें म्हटले. कैकेयीने आपल्या पतीचा अपमान केला. दशरथ म्हणाले – मी तुझ्यासाठी एक आनंदाची बातमी आणली आहे. एकदा तूच म्हणाली होतीस कीं ‘ तुम्ही आता वृद्ध झाला आहात, तेव्हां रामाला राज्यावर बसवून तुम्ही निवृत्त व्हा. ’ मी तुझें म्हणणें मानले आहे. उद्या रामाला राज्याभिषेक होणार आहे. तुला कसें काय वाटते हे ?

भरत वैराग्याचें स्वरूप आहे, तर शत्रुघ्न सद्विचाराचें स्वरूप. जर हे दोघेही (दोन्ही गुण) दशरथांच्याजवळ असते तर दशरथ कैकेयीच्या आधीन झाले नसते. परंतु ते दोघेही जवळ नव्हते. म्हणून ते कैकेयीच्या आधीन झाले.

सगळ्या प्रकारची अनुकूलता असूनही मन जर कोणत्या विषयांत गुंतणार नाही तर तेच खरें वैराग्य होय. भरताचे वैराग्य दिव्य आहे.

संपत्ति प्राप्त असताना सुद्धा संपत्तीविषयी मोह होणार नाही तेच वैराग्य.

भोज्य पदार्थ अप्राप्त असता उपवास करणें निरर्थक आहे. परंतु भोजनासाठी गोड अन्न समोर असूनही जो संयम राखू शकेल तोच विरागी.

ईश्वरचरणीं वास करणें म्हणजेच उपवास. जो ईश्वराच्या चरणापाशी बसण्याची इच्छा ठेवतो त्याला देहधर्म भूक-तहानेचे भान विसरावेच लागेल. भूक-तहान विसरूनच ईश्वरचरणीं वास करता येतो. देहभान विसरूनच ईश्वरचरणीं वास करावा.

भरतरूपी वैराग्य नेहमी आपल्याजवळ ठेवा. जो आपल्याजवळ भरत (वैराग्य) आणि शत्रुघ्न

(सद्विचार) ठेवीत नाही तो कैकेयी (कुबुद्धी) च्या आधीन होत असतो.

कौसल्या म्हणजे निष्काम बुद्धि, सुमित्रा श्रद्धा आणि कैकेयी कुबुद्धीच होय.

कैकेयीचा राग काय जाणार होता? दशरथ तिला म्हणाले, 'जे पाहिजे असेल ते मागून घे. मी तुझ्याच आधीन आहे. मी आजपर्यंत कधीच रामाची शपथ घेतली नाही. आज रामाची शपथ घेऊन सांगतो कीं तू जे कांही मागशील ते मी तुला अवश्य देईन.'

दशरथ राजे रामाच्या शपथेंत बांधले गेले तेव्हां कैकेयी म्हणाली, 'तुम्हाला आठवत असेल कीं माझे दोन वर आपल्यापासून घेणें आहे. मी आता तेच वर मागू इच्छिते!

दशरथ – अग, दोनच काय चार मागून घे.

कैकेयी – कदाचित आपण देण्याचें नाकारले तर?

दशरथ – माझें वचन कधी खोटे पडू शकत नाही. जी इच्छा असेल ते मागून घे.

कैकेयीला ठाऊक होते कीं राम उद्या वनांत जाणार आहे तेव्हां आज शृंगार कसा करावा? माझ्या रामानें रावणाचा नाश केल्यानंतरच त्याने राज्य सांभाळावे यातच त्याला शोभा आहे.

भांडण होत असते स्वार्थ आणि लोभामुळे. वनवासाशिवाय जीवनांत सुवास यायचा नाही. तपश्चर्येशिवाय जीवन सुवासित होत नाही. राम युवावस्थेंतच वनवासी झाले.

काम हाच रावण होय. हा रावण सगळ्यांनाच रडवीत असतो. सगळ्यांना रडवील तोच रावण. रावण (काम) जीवमात्राला रडवीत असतो. अशा रावणाला मारण्यासाठी तपश्चर्येच्या द्वारें जीवनांत सात्त्विकता प्राप्त करून घेतली पाहिजे.

कैकेयीची कुबुद्धीच रामाच्या वनवासाला कारणीभूत झाली.

कैकेयीने पहिला वर मागितला: 'भरताला राज्याभिषेक केला जावा.'

मंथरेने कैकेयीला सांगून ठेवले होते, रामाच्या वनवासाची गोष्ट प्रथम काढशील तर राजे मूर्च्छित होतील आणि जर त्यांचा मृत्यू झाला तर दुसरा वर बाकी राहील.

दशरथ म्हणाले – तुझी इच्छाच आहे तर भरताला राज्याभिषेक करू. आता दुसरे वरदान मागून घे.

कैकेयी म्हणाली – रामाला चौदा वर्षे वनवासात पाठवावे.

हे दुसरें वरदान ऐकून राजा निस्तेज आणि मूर्च्छित होऊन पडला. ते मूर्च्छित अवस्थेनंतर सीताराम सीताराम म्हणू लागले. मूर्च्छेतून जागे झाले तेव्हा म्हणाले – कैकेयी, तू हे काय मागितलेस? माझ्या रामाला वनांत कां पाठवीत आहेस तू? त्याने तुझा कोणता अपराध केला आहे? रामासारख्या सरळ मुलाला वनांत कसे पाठवावे! माझ्या रामाला माझ्या डोळ्यासमोरून दूर करू नकोस. मी रामाविना जगू शकत नाही.

एक वेळ मासोळी पाण्याशिवाय जगू शकेल, साप मण्याशिवाय दुःखी दीन होऊन जगू शकेल; परंतु मी स्पष्टच सांगतो कीं रामाशिवाय जगणें मला अशक्य आहे. माझें जीवन रामाच्या दर्शनाधीन आहे.

आता आणखी अधिक काळ तर मी जिवंत राहू शकणार नाही. तुला आणि मला लोक काय म्हणतील? कैकेयी, इच्छा असल्यास भरताला राज्याभिषेक होऊ दे, पण रामाला तर अयोध्येंतच राहू दे. मला असे वाटते कीं तुला न सांगता राज्याभिषेकाची तयारी केली जात आहे म्हणून तू रागावली आहेस. पण मी खरं खरं सांगतो कीं कौसल्येने मला कांहीच सांगितलेले नाही.

कैकेयी— कौसल्या आणि राम कसे आहेत हे मी चांगल्या रीतीनें जाणते. आपण आपले वचन पाळण्याला संकोच कां करीत आहांत? तुमची रघुकुलरीत कुठे गेली?

दशरथाने कैकेयीची मनधरणी करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. विनंति केली. पण ती काय ऐकणार होती?

सरतेशेवटी मोठ्या दुःखाने दशरथ राजे म्हणाले— कैकेयी, तुझा तरी काय दोष? माझा काळच तुझें रूप घेऊन आलेला आहे. अजून देखील म्हणतो कीं, ऐक माझे. जरा विचार कर. माझ्या रामाशिवाय मी एक क्षणभर सुद्धा जिवंत राहू शकणार नाही.

परंतु कैकेयी तर आता अधिकच निष्ठुर झालेली होती. तिनें ऐकलें नाही ते नाहीच.

दशरथ म्हणाले— काळतोंडे, निघून जा समोरून! माझा विश्वास आहे कीं भरत कधीच राजा होणार नाही. चौदा वर्षांनंतर रामच राजा होईल. आज ब्रह्मदेवच प्रतिकूल झाला आहे. मी रामाचा राज्याभिषेक पाहण्यासाठी जिवंत राहू शकणार नाही.

दशरथ राजे सूर्यनारायणांना प्रार्थना करू लागले. 'आजची रात्र संपूच नये. जेणेकरून रामाला कधीच वनवासांत जायला लागू नये.'

ते शंकरांनाही प्रार्थना करू लागले. 'हे शंकर भगवान! रामाला अशी प्रेरणा द्या की त्याने माझ्या आज्ञेचे उल्लंघन करून वनवासात जाऊ नये.'

सकाळ झाली. राजे जागे झाले नाहीत. सुमंत मंत्री आले. त्यांनी कैकेयीच्या महालांत येऊन पाहिलें, तर दशरथ मूर्च्छित पडलेले होते. त्यांना समजून आले कीं कैकेयीनेच काही कपट केलें आहे. त्यांनी कैकेयीला विचारले कीं, महाराज आज अजूनपर्यंत जागे कां झाले नाहीत?

कैकेयी रागावून म्हणाली - मला कांहीच माहित नाही. रात्रभर 'राम राम' करीत होते. तेव्हां रामालाच जाऊन विचारा.

तर सुमंत रामाजवळ जाऊन म्हणाले कीं, पिताजी तुमची आठवण करीत आहेत. रामांनी कैकेयीच्या महालात जाऊन पिताजींची स्थिति पाहिली आणि कैकेयीला विचारले— काय झाले आहे माझ्या वडिलांना? मला समाचार कां नाही कळविला गेला?

कैकेयी— काय सांगू तुला? तुझ्या पित्याच्या दुःखाचें कारण तूच आहेस. मी त्यांच्याकडून दोन वर मागितले होते. ते पहिलेच वचनबद्ध झालेले होते. वर मागताच ते बेशुद्ध झाले आहेत.

वर ऐकताच रामचंद्राने मातेला नमस्कार केला आणि म्हटलें— माते कैकेयी, तू माझ्या हिताची किती काळजी वाहतेस? मला वनांत ऋषिमुनींच्या सत्संगाचा लाभ व्हावा आणि माझे कल्याण व्हावे याच हेतूने तू मला वनांत पाठवत आहेस. भरतापेक्षा सुद्धा अधिक प्रेम तू मजवर करीत आहेस.

कैकेयीच्या निष्ठुरतेला तर कांही सीमाच नाही!

रामाचे शब्द ऐकताच दशरथांचे डोळे उघडले गेले. रामांनी नमस्कार केला. दशरथांनी त्याला आपल्या बाहूंत कवटाळले. 'राम, मला सोडून जाऊ नकोस रे!'

रामचंद्र वडिलांना धीर देऊन समजावू लागले— तुम्ही तर धर्मधुरंधर आहांत. तुम्हाला कोण समजावू शकेल? चौदा वर्षांचा काळ तर हां हां म्हणता निघून जाईल आणि तुमच्या दर्शनासाठी मी परत येईन. तुमच्या आशीर्वादाने वनांत माझें कल्याणच होईल. मला खूप आनंद वाटत आहे कीं माझा प्रिय बंधू भरत राजा होत आहे.

रघुनाथांनी गंभीरपणे कौसल्या मातेस सांगितले— पिताजींनी भरताला अयोध्येचें राज्य दिले

आहे आणि मला वनवास.

कौसल्येने सर्व कांही ऐकले आणि ती दुःखाने स्तब्ध झाली. ही सर्व घटना तिच्या हृदयाला बाणासारखी टोचली. तिला जे दुःख झालें त्याचें शब्दांत वर्णन कसें करता येईल.

परंतु कौसल्येने आपल्याला सावरून म्हटले– भरत राजा होईल आणि तू वनवासाला जाशील हे सर्व तर ठीक, पण तुझ्या जाण्यानंतर तुझ्या वडिलांचे कसे होईल? आज तर अशी स्थिति आहे कीं, मी तुझ्याबरोबर वनांत येऊ शकत नाही. कारण माझा पातिव्रत्य धर्म तशी अनुमति देत नाही.

पुत्रा! वनांतील देव तुझें रक्षण करो.

त्याच वेळीं सीताही तेथे येऊन पोचली. आपल्या सासूला नमस्कार करून जमिनीवर दृष्टी खिळवून तेथे उभी राहिली.

कौसल्या रामाला म्हणाली– बाळा, ही माझी केवळ सूनच नव्हे, तर साक्षात् लक्ष्मी आहे. मला तर अत्यंत आशा होती कीं ही प्रेमलता फुलेल, फळेल.

बाळा, तुला वनांत जायचे आहे तर तू जाऊ शकतोस. परंतु माझी सीता तर माझ्याच जवळ राहील. माझा मुलगा दुःखी झाला तर हरकत नाही. पण परक्याच्या मुलीला केव्हांच दुःखी करू नये. आपल्या डोळ्यांचे रक्षण ज्याप्रमाणे पापण्या करतात त्याचप्रमाणे हिचे मला रक्षण केले पाहिजे.

राम सीतेला म्हणाले– तू येथेच घरांत राहशील तर आई प्रसन्न राहील. सासू-सासऱ्यांची सेवा करणें सुद्धा तुझा धर्म आहे. वनांत राक्षस असतात. वनवासांत फार कष्ट होतात. वनवास फक्त मलाच दिलेला आहे, तू येथेच राहून सर्वांची सेवा कर.

सीता मनांत विचार करीत होती कीं, प्राणनाथांच्या बरोबर माझें शरीर आणि प्राण दोन्ही जातील का नुसते प्राणच?

धैर्य एकवटून सीता म्हणाली– तसे तर तुमचें म्हणणे रास्त आहे. पण स्त्रीला आधार एक पतीच असतो. जर आपल्याला असें निश्चितपणें वाटत असेल कीं आपल्या विरहांत मी चौदा वर्षेपर्यंत जिवंत राहीन तर आपण मला खुशाल येथे सोडून जाऊ शकता. आपल्या विरहांत माझे प्राण निघून गेले तर मी भाग्यशालीच ठरेन. पण माझ्या शरीरावर सुद्धा आपण कृपा करावी. आणखी मी काय सांगू? आपण तर अंतर्यामी आहांत.

रामचंद्रांनी विचार केला कीं हिला इथे राहण्याचा अतिआग्रह केला तर ही प्राणत्याग करील. या विचारांतीं ते म्हणाले, ठीक आहे, मी तुला आपल्याबरोबर घेऊन जाईन.

कौसल्या– वत्सा, माझ्या सीतेला एक क्षणभर सुद्धा एकटी सोडू नको. तुमच्या या मनोहर जोडप्याचें दर्शन मला पुनः केव्हां होईल?

त्याचवेळीं लक्ष्मणही तेथे येऊन पोचला. राम त्याला म्हणाले– 'लक्ष्मणा! मातापिता इत्यादींची चांगली सेवा कर.'

लक्ष्मण– माझे माता-पिता तर आपणच आहांत. जर आपणच माझा त्याग केला तर मी कोणाला शरण जाऊ? माझा त्याग नका करू. पाण्याशिवाय एखाद वेळ मासा जिवंत राहीलही, पण राम-सीतेशिवाय मी जिवंत राहू शकत नाही.

रामांना सुद्धा ठाऊक होते कीं लक्ष्मण त्यांच्याशिवाय राहू शकत नाही. म्हणून त्यांनी लक्ष्मणाला सांगितलें कीं, सुमित्रामातेची अनुमति घेऊन ये.

लक्ष्मणांनी सुमित्रा मातेला सर्व हकीगत सांगितली. सुमित्रा म्हणाले– कैकेयी, तू तर सर्वच

अयोध्या उजाड करून टाकली आहेस! आणि लक्ष्मणाला म्हणाली—

लक्ष्मणा, फक्त तुलाच आपल्या सेवेचा लाभ देण्यासाठी राम वनांत जात आहेत. अनन्यभावाने तू राम-सीतेची सेवा करीत जा.

तोच तेथे ऊर्मिला आली. ती एकही शब्द बोलू शकली नाही. मनांतल्या मनांत तिने नमस्कार केला.

सीता, राम आणि लक्ष्मण दशरथापाशी आले. दुःख-संतप्त पित्याला राम धीर देऊन म्हणू लागले— तात, शांत व्हा. आम्ही वनांत जात आहोत. आम्हाला आज्ञा द्या, आशीर्वाद द्या.

या प्रसंगाचें वर्णन कोण करू शकेल?

दशरथ तर मूर्च्छित झाल्यासारखेच होते. कैकेयी म्हणू लागली, 'माझी आज्ञाच पित्याची आज्ञा आहे. ते स्वतः तर कांहीच सांगू शकणार नाहीत.'

कैकेयीच्या आज्ञेने वल्कले आणली गेली. राम, लक्ष्मण, सीता आपली राजसी वस्त्रें उतरवून वल्कलें धारण करण्याची तयारी करू लागले. इतक्यांत तेथे वसिष्ठ आले. त्यांनी सीतेच्या हातांतले वल्कल ओढून घेतले आणि कैकेयीला म्हणाले— तू रामाला वनवास दिला आहेस, सीतेला नाही. सीता तर आमची राजलक्ष्मी आहे.

अयोध्येची प्रजा दुःखाकुल झाली.

रामांनी जनतेला सांगितले— माझ्या माता-पित्यांची सेवा करा. जो त्यांची सेवा करील तोच मला प्रिय होईल. वसिष्ठ महाराज! आपण सगळ्यांचेच रक्षण करावे.

परंतु प्रजा म्हणू लागली— जेथे आमचें राम असतील तेथेच आम्ही असू.

राम, लक्ष्मण, सीतेने वनात प्रयाण केले. कौसल्या म्हणाली, राम तर गेलाच पण आपल्याबरोबर अयोध्याही उजाड करून गेला!

जेथे तुझे-माझे, आप-पर भेदभाव आहेत तेथे भगवंत विराजू शकत नाहीत.

दशरथ मूर्च्छेतून जागृत झाले तेव्हा त्यांना वार्ता कळली की राम वनाकडे निघून गेले आहेत. अरेरे! माझा राम गेला तर! माझे प्राण आतापर्यंत कसे शिल्लक राहिले आहेत?

सुमंता! माझा सुवर्णरथ घेऊन जा. रामाला सांगा की, त्याने पायी जाऊ नये, रथांतच बसून जावे. माझी आज्ञा आहे. दोन-चार दिवस त्यांना वनातून फिरवा आणि मग सगळ्यांनाच अयोध्येत परत घेऊन या. राम जर परत नाहीच आला तर सीतेला तरी घेऊनच या.

दशरथाची ही आज्ञा शिरसावंद्य मानून सुमंत रथ घेऊन रामापाशी आले. म्हणाले, आपल्या पिताजींची आज्ञा आहे की वनात पायी जाऊ नका, रथांत बसून जा. अयोध्या उजाड झाली आहे.

सर्वच तमसा नदीच्या काठी आले आहेत. मध्यरात्रीची वेळ आहे. सर्वच गाढ झोपेत आहेत. रामाने सुमंतांना सांगितले— हे सर्व निजलेले आहेत. हळू रथ चालवा. कोणाला जाग येणार नाही अशी काळजी घ्या. आपण इथून निघून जाऊ. भगवान शंकरांना नमस्कार करून रामचंद्रांनी तेथून पुढे प्रयाण केले.

सकाळ झाली तेव्हा रामांचा रथ शृंगवेरपूरला आला होता.

इकडे प्रजाजनांनी उठून पाहिले तर रामाचा कोठे पत्ताच लागेना. ते सर्व व्याकुळ होऊन विलाप करू लागले. रामाचा वियोग त्यांना असह्य झाला.

शृंगवेरपूरच्या राजाला रामाच्या येण्याचा समाचार मिळाला. गुहक तेथे आले. प्रभूंनी गुहकाचे

स्वागत केले. गुहकांनी रामाला म्हटले: माझे राज्य आपलेच आहे. माझ्या येथे यावे. माझे नगर पावन करावे.

रामचंद्र– चौदा वर्षेपर्यंत मी कोणाच्याही नगरात प्रवेश करू शकत नाही.

एक दिवस व्रत केले आणि दुसऱ्या दिवशी फलाहार. रामचंद्र सुमंतांना म्हणू लागले– आता आपण अयोध्येला परतावे. विपत्तीच्या वेळी सुध्दा महापुरुष धैर्यरहित होत नाहीत. माझ्या पिताजींना माझा नमस्कार सांगा.

सुमंत– सीतामाईला तर माझ्याबरोबर पाठवा. सीता दशरथराजाला मोठा आधार होईल.

सीता– मंत्रीमहाशय, मी येणार नाही. मी जनकपुरीचे वैभवही पाहिले आहे आणि अयोध्येचेही वैभव पाहिले आहे. मी तर जेथे माझे पति असतील तेथेच राहीन.

सुमंत एकटेच परतले. रामांनी गुहकराजाकडून वटवृक्षाचे दूध मागवून केसाला लावले आणि जटा तयार केल्या. रघुनाथ तपस्वी झाले. गुहकाला ते पाहवले नाही आणि ते मूर्छना येऊन जमिनीवर कोसळले.

**१३. केवटाची भक्ती-श्रद्धा:**

गंगा पार करायची होती म्हणून गंगाकिनाऱ्यावर आले. लक्ष्मणांनी नावाड्याला हाक मारून विचारले की तू आम्हाला घेऊन जाशील का? केवट आपल्या नावेतूनच म्हणू लागला की मला तुमचे मर्म माहीत आहे.

लक्ष्मण– अरे बाबा, कोणते मर्म ठाऊक आहे तुला?

नावाडी– रामचरणांच्या धुळीच्या स्पर्शाने दगडाची सजीव अहल्या झाली. माझी नाव लाकडाचीच आहे. रामचरणांच्या स्पर्शाने जर माझ्या नावेची स्त्री झाली तर माझ्या कुटुंबाचे पालनपोषण कसे करू मी? आणि त्या दुसऱ्या स्त्रीचे काय करू? जर तुम्हाला माझ्या नावेत बसायचे असेल तर प्रथम मला रामचंद्राचे चरण धुण्याची अनुमति दिली जावी. त्यांचे चरण धुवून धूळ स्वच्छ केल्यानंतरच मी त्यांना माझ्या नौकेत बसू देईन.

नावाड्याच्या प्रेमळ बोलण्याने रघुनाथ प्रसन्न झाले. त्यांनी नावाड्याला आपल्यापाशी बोलावले. तो लाकडाचे भांडे घेऊन आला आणि म्हणाला, आपले पाय धुवावे अशी माझी इच्छा आहे.

रामचंद्र विचार करू लागले. माझ्या दोन्ही पायांचे स्वामी तर इथेच आहेत! आता हा तिसरा आला! वसिष्ठांनी निवाडा दिला होता की, निर्विकारी लक्ष्मण उजव्या पायाची सेवा करील आणि सीता डाव्या पायाची.

नावाडी भाग्यवान होता. तो दोन्ही पायांची सेवा करू शकला. गंगाजळाने दोन्ही पाय प्रक्षाळू लागला. मोठ्या तन्मयतेने पाय प्रक्षालन केले. माझी इच्छा पूर्ण करू द्या, असे म्हणू लागला.

हा नावाडी पूर्वजन्मी क्षीरसमुद्रात कासव होता. त्याला नारायणाची सेवा करायची इच्छा होती. लक्ष्मी आणि शेषांनी त्याला अनुमति दिली नाही. आज लक्ष्मी सीता झालेली आहे, आणि शेष लक्ष्मण. 'मागल्या जन्मी तर तुम्ही मला नारायणाची सेवा करू दिली नव्हती. आज तुम्ही दोघे उभे आहात आणि मी सेवा करीत आहे.'

नावाड्याने राम, लक्ष्मण, सीता यांना गंगापार केले. त्यांना साष्टांग प्रणाम केला. रामांना वाटले, याला काही दिले पाहिजे. परंतु काय द्यावे? माझ्याजवळ तर काहीच नाही. सीता रामाचा मनोभाव

समजली. तिने आपली अंगठी रामांना दिली. रघुनाथ अंगठी नावाड्याला देऊ लागले. आम्ही तुला मोल म्हणून नाही तर उपहार म्हणून देत आहो.

केवट म्हणाला– माझी अशी प्रतिज्ञा आहे की साधुसंतांना मी विनामूल्यच गंगा पार नेणार.

श्रीराम– प्रसाद म्हणून घे.

नावाडी– आजचा प्रसंग प्रसाद घेण्यासारखा नाही. चौदा वर्षांच्या वनवासाची समाप्ति झाल्यावर जेव्हा आपला राज्याभिषेक होईल, तेव्हाच मी प्रसाद घेईन.

नावाडी पुनःपुन्हा अंगठी घेण्याचे नाकारू लागला तर लक्ष्मण त्याने ती स्वीकारावी म्हणून आग्रह करू लागले. नावाडी म्हणाला– मी आणि राम एकाच जातीचे आहोत. मी आपल्या जातभाईकडून पैसे कसे घेऊ? नावाडी नावाड्याकडून कधी भाडे घेतात का?

लक्ष्मण रागावून म्हणाले– काय बडबडतो आहेस तू? आम्ही काय एकाच जातीचे आहोत?

नावाडी– माझी आणि तुमची नाही पण माझी आणि रामचंद्राची जात एकच आहे.

मी गंगा नदीचा नावाडी आहे, लोकांना गंगापार करतो, तर रामचंद्र संसार-सिंधूचे नावाडी आहेत, लोकांना संसारसागर पार करून नेतात. ह्या जीवाला सुध्दा कधी संसारसागर पार किनारी लावून द्या महाराज!

राज्याभिषेकाच्या वेळी नावाडी येऊ शकला नव्हता. कारण रामचंद्र विमानाने अयोध्येला परतले होते. परंतु रामचंद्रांनी आठवण ठेवून गुहकाकरवी त्याला प्रसाद पाठविला होता.

आता तिघेही पुढे जाऊ लागले. सीता साहजिकच विवेक आणि संकोचाने चालत होती. पुढे राम चालत होते, मध्ये सीता आणि शेवटी लक्ष्मण. राम आणि लक्ष्मण या दोघांच्या मध्ये चालणाऱ्या सीतेची शोभा काय वर्णन करावी!

जणू काय जीव आणि ब्रह्माच्या मधून माया चालत आहे!

पायवाट फार अरुंद होती. लक्ष्मण काट्यांतून चालत होते. रामांना हे पाहवले नाही. त्यांनी लक्ष्मणाला पुढे केले आणि स्वतः सीतेच्या मागे चालू लागले.

रस्त्यांत मुक्काम केला. गावांतील लोक दर्शनाला आले. स्त्रिया सीतामाईंना नमस्कार करून जात होत्या.

गावकरी आपापसांत बोलत होते– अशा सुकुमारांना वनांत पाठवताना कैकेयीला जरासुद्धा लाज वाटली नाही! तिच्या दुष्ट स्वभावाची ही कमाल झाली!

गावांतील बायकांनी सीतेला विचारले, हे दोघे तुमचे कोण आहेत?

सीता म्हणाली– ते जे गोरे आहेत ते माझे दीर आहेत. रामाचा परिचय शब्दांनी नाही, तर डोळ्यांच्या संकेताने दिला.

श्रुतीने देखील परमात्म्याचे वर्णन निषेधात्मक केले आहे– 'न इति, न इति'

राम-सीता दर्भासनावर झोपली. गुहक आणि लक्ष्मण पहारा करू लागले.

गुहक कैकेयीविषयी कटु वचन बोलू लागले, तर लक्ष्मण त्यांना समजावू लागले. हा उपदेश लक्ष्मणगीता या नावाने प्रसिध्द आहे.

मनुष्याला आपले कर्मच सुख किंवा दुःख देत असते. या सृष्टीचा आधारच कर्म आहे. याच कारणाने ज्ञानी महात्मा कोणालाच दोष देत नाहीत.

रामचंद्र स्वेच्छेनेच वनवासी झाले आहेत. सीता-रामांच्या चरणारविंदाचे नित्य स्मरण म्हणजेच

परमार्थ.

जो सुखदुःखाचे कारण आपल्या आंतच शोधतो तोच संत. ज्ञानी पुरुष सुखदुःखाचे कारण बाहेर शोधत नाहीत. मनुष्याच्या सुखदुःखाचा दाता बाहेरच्या जगात कोणी नाही. मला कोणी सुखदुःख देत आहे, ही कल्पनाच भ्रामक आहे. अशा कल्पनेमुळे तर इतरांबद्दल वैरभाव जागृत होईल. वस्तुतः सुख किंवा दुःख कोणी देऊ शकत नाही. ती मनाची कल्पना मात्र आहे. सुखःदुःख तर कर्माचेच फल आहे. सदासर्वदा मनाला समजवत रहा की त्याला जो सुखदुःखाचा अनुभव होत आहे ते त्याच्या कर्माचेच फळ आहे.

राम तर परमानंदस्वरूप आहेत. रामाचें स्मरण करणाऱ्याला दुःख होणार नाही, उलट सुखप्राप्तिच होईल. मग रामांना दुःख कसें होईल? सुखदुःखाला कारण स्वकर्मच असल्याने कोणाला दोष देणे गैर आहे. कैकेयीविषयीं रामाचें मन पूर्ववत स्वच्छ, निर्मळ, राग-द्वेषविरहित होते. रामांना कर्माचें बंधन तर नाहीच. ते कर्माच्या पलीकडचे आहेत. ते आपल्या इच्छेनेच प्रगट होतात. जीवाला आपल्या कर्मामुळे जन्म घ्यावा लागतो. ईश्वर स्वेच्छेने प्रगट होतो.

तरीही परमात्मा लीला करण्यासाठी प्रगट झाले आहेत, म्हणून कर्माच्या मर्यादेत राहतात. जगाच्यासमोर एक आदर्श ठेवतात – स्वतः परमात्मा असून देखील कर्माच्या बंधनांत आहेत. ते स्वेच्छेनेच अवतरले आहेत. जीव आपल्या कर्मामुळेच जन्म घेतो.

रामकथा अनेक ग्रंथांत वर्णन केली आहे. कैकेयीने रामास वनवास दिला. कौसल्यामातेला अतिदुःख झाले. रामचंद्र म्हणतात, हे माझ्या कर्माचे फळ आहे. पूर्वजन्मी मी कैकेयीला दुःख दिले होते त्याचेच हे फळ आहे. मी परशुराम अवतारात जे केले त्याचे फळ या अवतारांत घेत आहे. पूर्वजन्मात कैकेयी जमदग्नि ऋषींची पत्नी रेणुका होती. परशुराम तिचेच पुत्र होते.

एकदा चित्रसेन गंधर्व अनेक अप्सरांबरोबर सरोवरात विहार करीत होता. रेणुकेने हे दृश्य पाहिले. तर तिच्या मनातही विकार जागृत झाला आणि काही असंतोषसुध्दा वाटला. या अप्सरांना जसे सुख मिळाले आहे तसे मला तर कधीच मिळाले नाही. रेणुकेला परतायला उशीर झाला. जमदग्नींना समजले की, रेणुकेने मनाने व्यभिचार केला आहे. जमदग्नि खिन्न झाले. त्यांनी मुलाला सांगितले की तुझ्या आईने पाप केले आहे, तिला मारून टाक. पित्याची आज्ञा ऐकून काहीही विचार न करता परशुरामाने रेणुकेचा शिरच्छेद केला.

रामचंद्र कौसल्येला समजवत आहेत की त्या जन्मी मी मातेला दुःख दिले होते म्हणून या जन्मी ती मला दुःख देत आहे.

महात्मा तर इथपर्यंत सांगतात की रामाने वालीला मारून टाकले होते तोच वाली कृष्णावताराचे वेळी पारध्याचे रूप घेऊन आला आणि भगवंतांना त्याच्या बाणाने मरावे लागले.

केलेल्या कर्माचे फल भोगावेच लागते.

रात्रभर लक्ष्मण आणि गुहक गोष्टी बोलत पहारा करीत राहिले. ब्राह्ममुहूर्ती रामचंद्रांनी स्नानादीतून निवृत्त होऊन शंकराची पूजा केली.

आपल्या आचारांत काही नियम असलेच पाहिजेत. ज्याच्या जीवनांत काही शुभसंकल्प नाहीत तो पशूपेक्षाही अधम आहे. नियम-पालनाच्या अभावी मनुष्य पशूपेक्षाही हीन होत असतो.

रघुनाथांनी जगाच्या समोर आदर्श ठेवला आहे. ते स्वतः ईश्वर असून सुध्दा शंकरभगवानांची पूजा करतात.

गुहकाला परत जायला सांगितले, पण त्याने ऐकले नाही. राम म्हणाले, ठीक आहे. आम्ही चित्रकूटाला पोचलो म्हणजे परत जा.

भगवंत हळू हळू पुढे जात आहेत. प्रयागराजला आले आणि तेथे भरद्वाज मुनींच्या आश्रमांत थांबले.

तुम्ही भरद्वाज व्हाल तर तुमच्या येथे सुध्दा भगवंत येतील. भरद्वाज अर्थात उपदेश कानात भरून घेणारा.

या जगाच्या घटनांवर जास्त ध्यान दिल्याने काही लाभ होत नाही, परंतु भक्तीत मात्र विक्षेप येतो. भरद्वाज जास्त बोलत नाहीत. ते पुनःपुन्हा रामकथा ऐकत. रामचरणाचे फारच अनुरागी होते ते. राम-सीता-लक्ष्मणांच्या आगमनामुळे ते मोठे झाले. जवळपासचे इतर ऋषीही येऊ लागले. भरद्वाजांना आजपर्यंतच्या कडक साधनेचे फळ मिळाले. सर्वच साधनांचे फळ आहे भगवत्-दर्शन. भगवंताच्या प्रत्यक्ष दर्शनाविना शांति नाही. भगवंतांनी एक रात्र त्यांच्या आश्रमात काढली.

दुसऱ्या दिवशी सकाळी राम मुनींना म्हणाले – वाल्मीकि-आश्रमाचा मार्ग दाखविण्यासाठी एखाद्या मुनि-कुमाराला आमच्याबरोबर पाठवा. त्याप्रमाणे चार ऋषिकुमार बरोबर आले. सर्वच वाल्मीकि-आश्रमांत येऊन पोचले.

वाल्मीकींनी समाधिभाषेत रामकथा लिहिली आहे. रामांच्या प्राकट्याच्या पूर्वीच वाल्मीकींनी रामायण लिहिले होते. त्यांच्या मुखांतून सर्वप्रथम श्लोक प्रगट झाला होता. त्यापूर्वी कोणता श्लोकच नव्हता. पहिला श्लोक क्रौंचवधासंबंधी आहे. कोणा एका पारध्याने क्रीडेत रत असलेल्या क्रौंचयुगुलावर बाण सोडला तर त्यांतला एक पक्षी मरून पडला. हे दृश्य पाहून वाल्मीकींना फारच दुःख झाले. त्यांनी त्या पारध्याला शाप दिला. या श्लोकाचे दोन अर्थ आहेत. एक सामान्य आणि दुसरा रामांशी संबंधित.

वाल्मीकि-आश्रमांत श्रीराम, जानकी आणि लक्ष्मण आले. श्रीराम, वाल्मीकींना म्हणाले – आपण तर त्रिकालदर्शी आहात.

### १४. नारदोपदेशाने वाल्याकोळी वाल्मीकी ऋषी होतो :

वाल्मीकी – हे तर सत्संगाचे फळ आहे. प्रथम मी वाल्या कोळी होतो आणि लोकांना लुटत असे. कुटुंब चालविण्यासाठी पापाचार करीत असे. नारदांच्या सत्संगाने माझे जीवन बदलले.

एकदा नारद वाटेत भेटले आणि त्यांनी मला विचारले, तू कोणासाठी पाप करतोस ? मी म्हटले, आपल्या कुंटुंबासाठी.

नारद – तू आपल्या घरी जा आणि सगळ्यांना विचार – 'तुम्ही माझ्या पापाचा वाटा उचलाल का ?'

मी आपल्या घरी येऊन बायको आणि मुलांना विचारले, 'तुमच्या सर्वांच्या करता मला अत्याचार आणि पाप करावे लागते. म्हणून तुम्ही सुध्दा माझ्या पापाचे वाटेकरी आहात, ठीक आहे ना ? तर ते सर्व म्हणाले, 'आम्ही कां व्हावे भागीदार ? जो पाप करील त्यालाच पापाचे फळ भोगावे लागेल. आम्हाला तुझ्या पापाचे काहीच देणे-घेणे नाही.

तेव्हा माझे डोळे उघडले. त्या सर्वांविषयी मला तिरस्कार वाटू लागला. माझा भ्रम आणि मोह मग नष्ट झाला. मी नारदांना सर्व हकीगत सांगितली. तर त्यांनी मला रामनामाचा मंत्र दिला. परंतु मी पापी आणि शिकलेला नसल्यामुळे माझ्या तोंडून 'राम, राम' मंत्राच्या ऐवजी 'मरा, मरा' शब्द

बाहेर येऊ लागले. रामनामाचा जप मी बरोबर करू शकलो नाही. मी तर उलटाच जप करीत होतो. परंतु प्रभूंनी माझ्यावर कृपा केली आणि माझा उध्दार केला.

आपण कृपा करून ज्याला आपल्या स्वरूपाचे ज्ञान देता तोच आपणाला जाणू शकतो. आपल्याला जाणल्यावर तो स्वतः आपलेच स्वरूप होत असतो.

तुलसीदासांनी रामायणांत पूर्ण अद्वैताचे वर्णन केले आहे. पुढे जाऊन भगवंत आणि भक्तांत भेदच राहात नाही.

रामचंद्रानी वाल्मीकींना विचारले— आम्ही वनात राहू इच्छितो. आम्ही कोठे राहावे ? आम्हाला एखादे चांगलेसे स्थान दाखविण्याची कृपा करावी.

वाल्मीकी आपल्या मनाशीच म्हणतात— तसे तर तुम्ही कोठे नाही आहात ? जिथे आपण नाही असे स्थानच कुठे आहे ? आपण तर सर्वच जागी आहात. भक्तांच्या हृदयांतही आपण आहात.

वाल्मीकी श्रीरामांना म्हणतात— प्रभु, आपण राहण्यासाठी जागा विचारीत आहात परंतु आपण कोठे नाही ? स्वामी, आपण तर लीला करीत आहात. आपण चित्रकूट पर्वतावर निवास करावा.

श्रीमद्‌भागवत समाधिभाषेत आहे. वाल्मीकिरामायण सुध्दा समाधिभाषेतच आहे.

चित्तच चित्रकूट पर्वत होय. अंतःकरण सतत परमात्म्याच्या स्वरूपाचे ध्यान करील तर त्यालाच चित्त म्हणतात. परमात्म्याचे चिंतन सतत होईल तेव्हाच चित्त म्हटले जाते. चिंतन करणे चित्ताचा धर्म आहे. एकाच अंतःकरणाचे इतके भेद आहेत. पाप अज्ञानाने होत असते. परमात्मा जर चित्तांत येतील तर जीव कृतकृत्य होईल.

लक्ष्मण वैराग्य आहे. जेव्हा संकल्प कराल तेव्हा तो शुभच करा. नेहमी असे समजा की परमात्मा चित्तात वसत आहे.

रघुनाथ मंदाकिनीच्या किनारी आले. तेथे अत्रि ऋषींचा आश्रम आहे. ते वयोवृध्द ऋषि आहेत. त्यांचा गंगास्नानाचा नियम होता. परंतु जाऊ शकत नव्हते. म्हणून अनसूयेने गंगेची प्रार्थना केली की तिने आपल्या आश्रमांत प्रगट व्हावे. तिच्या प्रार्थनेने प्रसन्न होऊन गंगा तेथेच प्रगट झाली.

तुलसीदासांना चित्रकूटाच्या घाटावर रघुनाथांचे दर्शन झाले होते.

विचार करा, पापाचे मूळ चित्तात आहे. पाप अज्ञानाने होत असते. या चित्तांत जर रघुनाथ आले तर चित्त विशुध्द होते.

गुहक सेवा करीत आहे. रामाच्या आगमनाची वार्ता भिल्ल, किरात इत्यादी लोकांमध्ये पसरली. रामचंद्रांचे दर्शन घ्यायला सगळेच येऊ लागले. त्यांचे दर्शन घेताना जड चेतन होते आणि चेतन जडासारखे. कुशल मंगल विचारपूस झाली. प्रभु, तुमच्या दर्शनाने आमचे कल्याण झाले आहे. पाप नष्ट झाले. स्वभाव बदलून गेला आणि सगळे जीवनच सुधारले आहे. इथले वन, पहाड, गुंफा इत्यादी सर्व काही आमच्या पाहण्यांतले, माहितीचे आहे. आम्ही आपले सेवक आहोत. आपली इच्छा असेल तिथे आम्ही आपल्याला घेऊन जाऊ.

रामचंद्र चित्रकूटात वास्तव्य करून राहिले. तेव्हापासून तिथली झाडे फुला-फळांनी बहरून डोलू लागली. दररोज अनेक ऋषि रामचंद्रांचे दर्शन घ्यायला येऊ लागले.

रामाच्या चरित्राचे वर्णन कोण करू शकेल ? एक एक अक्षर महापातकाचा नाश करणारे आहे.

**१५. सुमंताचें अयोध्येस परतणे, दशरथाचा मृत्यू व भरताचें बंधु-प्रेम :**

श्रीरामांनी मंत्री सुमंतांना अयोध्येला परतायची आज्ञा दिली होती. गुहक चित्रकूटांतून परत येईपर्यंत सुमंत गंगाकिनाऱ्यावरच राहिले होते. अयोध्येची प्रजा विचारील की रामाला कोठे सोडले, तर मी काय उत्तर देणार ? मला वाटते की रामवियोगाने राजा दशरथांचे प्राण तग धरणार नाही.

सुमंतांच्या रथाचे घोडेदेखील, ज्या दिशेला राम गेले त्याच दिशेकडे टक लावून पाहात आहेत. त्यांनाही हे समजत आहे की त्यांचा धनी त्यांना सोडून दूर कुठे तरी निघून गेला आहे. त्यांनी दाणापाणी पण सोडून दिले. ज्यांच्या वियोगाने पशूदेखील इतके दुःखी होत आहेत त्यांच्या माता-पित्यांची व्याकुळता काय सांगावी ? ते आता जिवंतच कसे राहू शकतील ?

गुहक आले आणि सुमंतांना सांगू लागले— मंत्रीमहाराज, आपण तर ज्ञानी आहात. आता आपण धैर्य धरावे आणि अयोध्येला परतावे. बरोबर चार भिल्ल सेवकही दिले.

मध्यरात्रीच्या वेळी सुमंत अयोध्येला पोचले. त्यांनी विचार केला— ‘मी कोणालाच माझे तोंड दाखविणार नाही. कोणी काही विचारील तर मी काय उत्तर देऊ ?’ तरी पण ते कैकेयीच्या महालात गेले. दशरथ महाराजांचे दर्शन झाले नाही तेव्हा कैकेयीला विचारले— महाराज कोठे आहेत ?

जेव्हां रामांनी वनाकडे प्रयाण केले तेव्हा दशरथ म्हणाले होते कीं मी आता कैकेयीच्या महालात राहू शकत नाही. मला कौसल्येच्या महालात घेऊन चला. म्हणून ते कौसल्येच्या महालात गेले.

रामविरहात ज्यांच्या डोळ्यांतून दोन टिपेही गळत नाहीत त्यांचे मन शुद्ध होऊ शकत नाही.

एक दासी सुमंतांना कौसल्येच्या महालांत घेऊन आली.

रामवियोगांत पाच दिवस निघून गेले आहेत. दशरथाच्या तोंडावर मृत्यूची छाया पडू लागली आहे. मंत्र्यांनी जवळ येऊन त्यांना दंडवत केले. दशरथांनी डोळे उघडून पाहिले आणि विचारले— “माझा राम कोठे आहे ? कुठे आहे माझा राम ? कुठे सोडलात माझ्या रामाला ? सीता परत आली की नाही ? जिथे राम असेल तिथेच मला घेऊन चला.”

दशरथाची व्याकुळता पाहून सुमंतांच्या डोळ्यांतून आसवे येऊ लागली. ते म्हणू लागले— महाराज, आपण तर ज्ञानी आहात ! धीर धरा. मी रामाचा निरोप घेऊन आलो आहे. त्यांनी सांगितले आहे कीं माझ्या वडिलांना माझा नमस्कार सांगा आणि त्यांच्या आशीर्वादानेंच आम्ही वनांत कुशल आहोत, किती निर्दय आहे मी ! रामाचा वियोग होऊनही मी जिवंत परत आलो आहे !

सीतेनेही मला सांगितले, ‘मंत्रीमहाराज, आपण तर मला पित्यासमान आहात. मी अयोध्येला परत येऊ शकत नाही. माझ्या पतीशिवाय मी जिवंत राहू शकत नाही. माझ्या श्वशुरांना माझा नमस्कार सांगा. माझी काळजी करू नका. माझ्या पतीच्या म्हणजेच परमेश्वराच्या सान्निध्यांत मी आहे.’

“नावाड्याने त्या सर्वांची सेवा केली आणि निषादराजानेही त्यांची खूप सेवा केली. मीच काय तो परत आलो ! माझ्यासारखा निष्ठुर कोण असू शकेल ?”

सुमंतांचे भाषण ऐकताच राजे ‘हे राम ! हे राम !’ म्हणतच खाली कोसळले. कौसल्या व्याकुळ झाली. तरी पण राजांना धीर देत आहे.

रामविरह तर एक महासागर आहे. तो पार करणे अत्यंत कठीण आहे. आपण तर कर्णधार आहात; जर आपणच धैर्य सोडले तर सर्वांचे काय होईल ?

दशरथ म्हणाले, ‘माझ्या हृदयांत वेदना होत आहेत. मला श्रवणकुमाराच्या आईबापांनी शाप दिला होता कीं पुत्रविरहाने माझा मृत्यु होईल.’ सर्व हकीगत या वेळीं त्यांना आठवली आणि ती

सर्वांना सांगितली. विलाप करीत दशरथ म्हणू लागले, 'जिकडे माझा राम आहे तिकडेच मला घेऊन चला. बायकोच्या आधीन होऊन मी माझ्या सुपुत्राला वनवास दिला.'

मध्यरात्रीची वेळ होती. राजांनी राम राम म्हणत देहत्याग केला.

दशरथांचे रामप्रेम आणि रामविरह इतके हृदयद्रावक होते की त्यांचा प्राणपक्षी उडून गेला.

सगळेच विलाप करू लागले. सर्व नगरांत हाहाकार उडाला. वसिष्ठ गुरू सर्वांचे सांत्वन करू लागले. त्यांनी सेवकांना आज्ञा दिली की कैकय देशांत जा आणि भरत-शत्रुघ्नांना सांगा की गुरुजींनी त्यांना सत्वर बोलावले आहे.

भरत-शत्रुघ्न येऊन पोचले. त्यांना मार्गात अपशकुनही बरेच आले. सगळा बाजार आणि कारभार बंद होता. लोकांनी काळे कपडे घातले होते. भरताला समजत नव्हते कीं हे सगळे काय आहे!

भरताच्या येण्याची बातमी ऐकून कैकेयी आनंदाने धावतच त्याचे स्वागत करण्यासाठी पुढे आली. भरताने विचारले, माझे पिताजी कुठे आहेत? ते कुशल आहेत ना?

कैकेयी– काय सांगू तुला, सगळे साम्राज्य निघून चालले होते; पण मी वाचवून ठेवले आहे. मंथरेच्या सूचनेप्रमाणे तुझ्या पित्याकडून मी दोन वर मागितले. म्हणून आता हे सर्व राज्य तुझे आहे. आणि पिताजी तर वरदान देऊन व्याकुळ झाले आणि त्यांनी प्राणत्याग केला.

भरत– त्यावेळी माझे मोठे बंधू राम कुठे होते? आता का दिसत नाहीत ते? कुठे आहेत ते?

कैकेयी– ते तर वनांत आहेत. माझ्या वरानुसार त्यांना वनवास दिला गेला आहे.

सगळ्या गोष्टी समजल्यावर भरताचे हृदय दुःखाने कापू लागले. आपल्या आईविषयी त्यांचे मनांत भयंकर क्रोध आणि तिरस्कार निर्माण झाला. माझ्या मोठ्या भावाला वनवासाला पाठविताना तुला काहीच कसे वाटले नाही? असे अशुभ वरदान मागताना तुझी जीभ कशी गळून पडली नाही?

शत्रूघ्नाने मंथरेला पाहिले आणि तिला एक लाथ हाणली.

भरत-शत्रुघ्न कौसल्येजवळ आले. मातेचे विरहसंतप्त रूप त्यांच्याने पाहवले नाही. भरताला तर मूर्च्छाच आली. भरत कौसल्येला म्हणू लागला– माते, राम कुठे असतील? या सर्व अनर्थाचे मूळ मीच आहे. कैकेयीच्या वरदानांत जर माझी कणभरही संमति असेल तर मातृपितृहत्येच्या पापाचें फळ मला मिळावे.

कौसल्या– बाळ भरता, धीर धर, शोक सोड. राम तर हसतच वनांत गेला आहे. तुझ्या पित्याने प्राणत्याग केला आहे. माझे भाग्यच रुसलेले आहे. मीच आहे या सर्व अनर्थाचे कारण! अजूनसुद्धा माझे प्राण का शिल्लक राहिले आहेत?

सकाळच्या वेळी शरयू नदीच्या किनारी दशरथ महाराजांच्या पार्थिव शरीराला अग्निसंस्कार केला गेला.

दशरथ महाराजांची आज्ञा होती की रामाला वनवास देण्यात भरताची संमति असेल तर त्याच्या हातून अग्निसंस्कार करवू नये.

दशरथाच्या बायकासुद्धा चितेंत जळून सती जाणार होत्या. परंतु भरताने त्यांना तसे करू दिले नाही.

पंधरा दिवसांनंतर शोकसभेचे आयोजन झाले. वसिष्ठांसह इतर अनेक ऋषि तेथे उपस्थित होते. सर्वात पहिले वसिष्ठांनी दशरथ महाराजांचे गुणगान केले आणि शोकांजली वाहिली. नंतर त्यांनी राजकुमार रामाची पुष्कळच प्रशंसा केली आणि भरताला म्हणाले, पित्याची आज्ञा शिरसावंद्य करून रामाने वनगमन

केले आहे. दशरथ स्वर्गाला गेले, म्हणून आम्ही उद्या तुझा राज्याभिषेक करू.

परंतु भरताला ही गोष्ट मान्य नव्हती. त्याला खूप समजावले गेले.

विधात्याची करणी अतिक्रूर आहे.

ब्राह्मणाचे शरीर मिळाले असूनही जर तो वेदशास्त्र जाणत नसेल आणि आपला धर्म सोडून विषयभोगांतच लीन राहात असेल तर अशांच्याविषयी शोकच केला पाहिजे.

ज्या वैश्याजवळ धन असूनही तो जर दान करीत नसेल आणि भक्तीही करीत नसेल तर त्या वैश्याबद्दल सुद्धा शोक केला पाहिजे.

त्या गृहस्थाविषयींही शोक केला पाहिजे की जो मोहाला वश होऊन आपल्या कर्ममार्गाचा त्याग करतो.

जो संन्यासी वैराग्य सोडून सांसारिक प्रपंचात पडतो त्याच्याविषयीही शोक केला पाहिजे.

जी स्त्री आपल्या पतीचा छळ करते, कुटिल कलहप्रिय आणि स्वेच्छाचारिणी असेल त्या स्त्रीविषयीही शोक केला पाहिजे.

जो आपला वेळ आणि संपत्तीचा दुरुपयोग करतो, दुसऱ्याचे अनिष्ट करतो आपल्या शरीराच्या लालनपोषणांतच रत असतो आणि नाममात्र सुद्धा हरिभक्ती करीत नाही असा तर सर्वाधिक शोचनीय आहे.

दशरथ महाराजांसाठी कां शोक करावा ? खरे रामप्रेम तर त्यांचेच होते की ज्यामुळे रामवियोगाच्या दुःखाने त्यांचा प्राणपक्षी उडून गेला. त्यांचा तर इहलोक आणि परलोक दोन्ही सफल झाले.

भरता, वनवास संपल्यानंतर रामाच्या पुनरागमनानंतर तुझी जशी इच्छा असेल तसे कर. परंतु उद्या आम्ही तुला राजसिंहासनावर आरूढ करूच. आज अयोध्या अनाथ आहे. तिला उद्या तुला सनाथ करायचे आहे.

कौसल्येने सुद्धा भरताला तीच आज्ञा दिली.

भरत उत्तर देण्यासाठी उभा राहिला. राम-सीतेच्या स्मरणाने त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या.

पिताजी स्वर्गवासी झाले आणि राम वनांत निघून गेले. आता मला राज्याभिषेक झाल्यावर कोणता आनंद आणि सुख मिळणार आहे ? अयोध्येच्या प्रजेला सुद्धा कोणता लाभ होईल ? सगळ्याच अनर्थाचे कारण मीच आहे. जगांत माझ्यासारख्या पाप्याचा जन्मच झाला नसता तर फार चांगले झाले असते. माझ्या वडिलांना तर सद्‌गति मिळाली आहे, त्यांच्यासाठी मला इतके दुःख नाही. मला दुःख आहे ते हे की माझ्याचमुळे माझ्या मोठ्या भावाला वल्कले धारण करून अनवाणी वनांत भटकावे लागत आहे.

रघुनाथाशिवाय सर्वकांही व्यर्थ आहे. मला माझ्या भावा-वहिनीचे दर्शन झाले म्हणजेच मला शांति मिळेल. कैकेयीचा हा पुत्र कैकेयीपेक्षा सुद्धा अधम आहे. रामचंद्रांची सेवा केली तरच माझे जीवन सफल होईल.

ज्या सिंहासनावर कधी भगीरथ विराजले होते त्या सिंहासनावर बसण्याची माझी पात्रता नाही. मला आज्ञा आणि आशीर्वाद द्या. मी उद्या रामचंद्रांपाशी जाईन. आपण प्रार्थना करावी की त्यांनी माझ्याबरोबरच अयोध्येला परत यावे. मी त्यांच्याजवळ आपल्या पापाची क्षमा मागीन. ते माझे स्वामी आहेत आणि मी त्यांचा सेवक.

राम-सीतेचे स्मरण करताना भरताच्या डोळ्यांतून अश्रू वाहात होते. जनतेला विश्वास वाटू लागला की भरत तर प्रेमाची मूर्ति आहे. सर्वच भरताबरोबर रामाच्या दर्शनाला जाण्याची तयारी करू लागले.

भरतचरित्रांत तुलसीदाससुद्धा समाधिस्थ झाले होते.

सभा विसर्जित झाली. नगरांतील आबालवृद्ध स्त्री-पुरुष सर्वच रामचंद्रांच्या दर्शनासाठी आतुर होते. म्हणून वनगमनाची तयारी करू लागले. सगळ्यांच्या मनांत एकच विचार घोळत होता कीं केव्हा प्रातःकाळ होतो आणि केव्हा आम्ही वनाकडे वाटचाल करतो.

सकाळी राजप्रासादाच्या प्रांगणांत सगळे नगर उसळून आले. सगळ्यांनाच आशा वाटू लागली कीं राम-सीता आज अयोध्येला परत येतील. भरत म्हणाला, ज्याला ज्याला बरोबर यायचे असेल त्याने खुशाल चलावे.

वसिष्ठ ऋषि आणि अरुंधतीसुद्धा रथावर विराजमान झाले. आता तर कैकेयीच्या डोक्यांतून सुद्धा कलीचे भूत उतरून गेले होते, आणि रामाच्या दर्शनाला तीही आतुर झाली होती. भरतासाठी सोन्याचा रथ तयार केला गेला पण त्यात त्याची बसण्याची इच्छा नव्हती. लोक म्हणून लागले कीं जर तुम्ही रथांत बसला नाही तर आम्हीसुद्धा पायीच चालू. कौसल्यामातेने भरताला समजविले, जर तू रथांत बसला नाहीस तर अयोध्येच्या सर्व प्रजेला कष्ट होतील. कौसल्येच्या आज्ञेने तो रथावर आरूढ झाला.

भरतादि जन शृंगवेरपूरच्या जवळ आले तर गुहकाच्या सेवकांनी त्याला भरत चतुरंगिणी सेनेसह येत असल्याची वार्ता सांगितली. गुहकाला वाटले की सेनेसह भरत राम-लक्ष्मणांशी युद्ध करायला येत आहे. जर असे नसते तर सेनेला बरोबर कशाला आणले असते? गुहकांनी भिल्ल सेनेला आज्ञा दिली की, कोणालाही हद्दीपलीकडे येऊ देऊ नका.

एक वृद्ध भिल्ल म्हणाला– कदाचित भरत रामचंद्रांना विनविण्यासाठी येत असेल. गुहकाला वाटले हेही शक्य असू शकते. उतावीळपणे भांडण करणे ठीक नाही. ते आपल्या मंत्र्यासह भरताला भेटायला आले.

सर्वात पुढे वसिष्ठ ऋषींचा रथ होता. गुहकांनी त्यांना साष्टांग दंडवत घातले. वसिष्ठ म्हणाले– भरता, रामाचा अंतरंग सेवक तुला भेटायला आला आहे.

भरताची दृष्टि निर्गुण आहे. मोठ्या भावाचा सेवक भेटायला आला आहे हे जाणून त्याला आनंद झाला.

भरताची परीक्षा पाहण्यासाठी गुहक सात्त्विक, राजस आणि तामस अशा तिन्ही प्रकारची भोजनसामुग्री बरोबर घेऊन आले आहेत. कंदमुळे सात्त्विक भोजन, मिष्टान्न राजस भोजन, आणि मांस-मदिरा तामस भोजनही आणले आहे. या तिन्हींतून ज्यावर भरताची दृष्टी प्रथम जाईल तोच भाव भरतात आहे असे मी समजेन. परंतु पहा तर खरे; या तीनपैकी एकावरही भरताने दृष्टी टाकली नाही. कारण ते निर्गुण आहेत.

मनुष्याच्या मनाची परीक्षा आहार-विहाराने होऊ शकते.

भरताच्या तोंडातून तर नुसता रामनामाचा उच्चार चालू होता. गुहकांना विश्वास वाटला कीं भरत लढण्यासाठी नाही तर भेटायलाच आले आहेत. गुहकाने भिल्लांना आज्ञा दिली की अयोध्येच्या प्रजेचे चांगले स्वागत करा. भिल्ल तऱ्हेतऱ्हेची कंदमुळे घेऊन आले, आणि त्यांनी प्रजेचे स्वागत केले.

भरताने गंगेला नमस्कार करून म्हटले– माते, मी आज कांही मागत आहे.

माझी हीच इच्छा आहे, मला हेच वरदान दे कीं माझे रामचरणी प्रेम राहो. त्याची प्रार्थना ऐकून गंगेने ध्वनित केले कीं तू चिंता करू नकोस. सगळ्यांचेच कल्याण होणार आहे.

ज्याच्या छायेंत रामांनी विश्रांती घेतली होती तो अशोकवृक्ष गुहकाने भरताला दाखविला. भरताने त्या वृक्षाला सुद्धा नमस्कार केला, श्रीरामाची दर्भाची शय्या पाहून तर त्याचे हृदय भरून आले. माझ्या वहिनीला किती कष्ट सोसावे लागत आहेत! कैकेयी, या सर्व कष्टांचे कारण मीच आहे.

रात्रभर सगळ्यांनी तेथेच विश्रांती घेतली.

सकाळ झाल्यावर भरत म्हणू लागला, या स्थानापासून तर राम पायीपायीच पुढे गेले, म्हणून मीही पायीपायीच चालत जाईन. सगळ्यांचेच रथ पुढे करा.

पुढे पुढे सर्व रथ चालू लागले आणि मागे मागे भरत; शत्रुघ्न आणि गुहक चालू लागले. भरताची दशा करुणाजनक आहे. तो शत्रुघ्नाच्या खांद्याचा आधार घेत, हे राम! हे राम! म्हणत म्हणत पुढे जात आहे.

पित्याकडून मिळालेल्या राज्याचा स्वीकार न करता मोठ्या भावाचे मन वळविण्यासाठी जात आहे अशा भरताची धन्य आहे!

भरताची भक्ति दास्यभक्ती आहे. त्याच्यासारखा भाग्यवान कोण असेल? भरत रामांचे नेहमीच स्मरण करीत. रामही भरताचें स्मरण करीत होते.

स्वतः ईश्वरच ज्याचे स्मरण करील त्याचीच भक्ति खरी म्हटली जाईल.

जीव ईश्वराचे स्मरण करील ही तर सामान्य गोष्ट झाली. परंतु स्वतः ईश्वर ज्या जीवाचे स्मरण करतो तो धन्य आहे. त्याची भक्ती धन्य आहे.

चालून चालून भरताच्या पायाला फोड आले, परंतु वाहनांत न बसण्याची त्यांनी प्रतिज्ञा केली होती.

ते सर्व प्रयागराजला आले. भरताने नमस्कार करून म्हटले– तीर्थराज, माझी आणखी कांहीच इच्छा नाही. एकच मागणे आहे माझे–

लोक भरताला म्हणाले, भरद्वाज मुनींच्या आश्रमांतही गेले पाहिजे. भरत कैकेयीला म्हणाला– कैकेयी, तू माझ्या तोंडाला काळीमा फासला आहेस. मी संतांना तोंड कसे दाखवू?

तीर्थयात्रेचा असा नियम आहे की, तिथे साधुसंतांचा संग केला नाही तर तीर्थयात्रेचे फळ मिळत नाही. तीर्थयात्रा सफल होत नाही.

भरत भरद्वाज मुनींच्या आश्रमांत आले. मुनींनी भरताला म्हटले– शोक करू नकोस. ही तर सर्व देवाचीच लीला आहे. तू तर मोठा भाग्यशाली आहेस. भगवान रामचंद्र तुझी दररोज आठवण करतात. म्हणतात, तुझ्यासारखा कोणी भाऊ नाही. भ्रातृप्रेमाचा आदर्श प्रस्थापित व्हावा म्हणून आज तू रामाचे मन वळविण्यासाठी जात आहेस ही चांगली गोष्ट आहे.

सर्वच साधनेचे फळ रामदर्शन आहे. साधना केल्याने आम्हाला रामदर्शनाचा लाभ झाला. परंतु रामाच्या दर्शनाचे फळ तर (स्वतः) भरत आहे. तुझ्या दर्शनाने आम्ही कृतार्थ झालो. रामाच्या दर्शनानंतर मी विचार करीत होतो कीं त्यांच्या दर्शनाचे फळ काय मिळेल? माझ्या हे लक्षांत आले की रामाच्या दर्शनाचे फळ आहे भरतदर्शन.

भरताने तेथे वार्तालाप केला. तो म्हणाला, या सर्व अनर्थाला आणि दुःखाला कारण मीच आहे.

भरद्वाज ऋषि भरताला म्हणाले– राक्षसांचा वध करण्यासाठीच रामचंद्रांनी ही सर्व लीला रचली

आहे. म्हणून तू शोक करू नये.

भरद्वाजांनी अणिमा इत्यादी ऋद्धिसिद्धींना आवाहन करून भरत आणि त्याच्याबरोबर आलेल्या सर्वच लोकांचे यथेच्छ स्वागत केले. रामांच्या दर्शनार्थींचे भव्य स्वागत होणे कांही मोठी आश्चर्याची गोष्ट नाही.

भरताच्या भ्रातृप्रेमाची परीक्षा पाहण्यासाठी रात्रीच्या वेळी भरद्वाज मुनि तेथे आले. दर्भासन घालून नासिकाग्रावर दृष्टी लावून भरत, सीता-रामांचा जप करीत आहे असे त्यांनी पाहिले. अणिमा सिद्धीने त्यांना जेवण आणि विश्रांति घेण्याची विनंति केली, परंतु भरत म्हणाला राममीलनानंतरच मला खरी विश्रांति मिळेल.

भरताच्या प्रेमाचे वर्णन कोण करू शकेल ? वाणीच्या सामर्थ्याच्या बाहेरची गोष्ट आहे ही !

प्रातःकाळी भरद्वाज पुनः तेथे आले. सर्व रात्र भरताने शय्येला स्पर्श सुद्धा केला नव्हता. भरताच्या अशा कठोर तपश्चर्येने मुनींचे हृदय भरून आले. ते उद्गारले— भरतदर्शनच रामदर्शनाचे फळ आहे !

भरद्वाज मुनींनी पुष्कळशा सिद्धी दाखविल्या, परंतु भरत त्यांत अडकला नाही.

चक्रवाक आणि चक्रवाकी रात्रीच्या वेळी एकत्र राहात नाहीत. त्यांना पिंजऱ्यांत ठेवले तरी रात्रीच्या वेळी ते संयोग करीत नाहीत. ऋषींची परीक्षा घेण्याची इच्छा म्हणजे पिंजरा; सिद्धी-भोगविलासांच्या वस्तू म्हणजे चक्रवाकी आणि भरत म्हणजे चक्रवाक. भरताने त्या भोगविलासाच्या सामुग्रीला मनाने सुद्धा स्पर्श केला नाही.

ज्याला भक्तीचा रंग लागतो त्याला सांसारिक भोग-रोगासमानच वाटतात. जोपर्यंत सांसारिक माया गोड लागत असते तोपर्यंत जीवाला भक्तीचा रंग लागत नाही. भोग आणि भक्ती एकाच जागी राहू शकत नाही.

लोकांना वाटते भक्ती करणे फार सोपे आहे. परंतु भक्ती करणे फारच कठीण काम आहे. हा तर डोक्याचा सौदा आहे, तेव्हांच नटवराशी संबंध होऊ शकतो. जोपर्यंत मन संसाराच्या कोणत्याही विषयसुखांत अडकलेले असेल तोपर्यंत भक्तीचा रंग लागू शकत नाही. सांसारिक विषयांचा मनाने त्याग केल्यावरच भक्ती होऊ शकेल.

काम शब्दांत दोन अक्षरे आहेत. 'क' चा अर्थ आहे सुख आणि 'आम' चा अर्थ आहे कच्चे. अर्थात कामचा अर्थ झाला कच्चे सुख. काम खरे सुख नाही. कामाला हृदयांतून बाहेर काढून टाका. हृदयाच्या सिंहासनावर देवाला बसवा.

एका शेटजीचा मुलगा एका वेश्येच्या मोहात अडकला होता. शेटजी म्हणाले, तू जर ही कुसंगत सोडशील तर तुझे लग्न एखाद्या छानशा मुलीशी होऊ शकेल.

पुत्र— बाबा, मला तशी कन्या मिळाल्यावर मी वेश्येला सोडून देईन.

पिता— विचार तर कर. वेश्येचा संग सोडल्याशिवाय एखाद्या कुलीन घराण्यांतील कन्या मिळूच कशी शकेल ?

आमची सुद्धा हीच कथा आहे. आम्ही विषयभोगाचा त्याग करण्याची इच्छा किंवा प्रयत्नच करीत नाही आणि म्हणत असतो की मला भक्तीने आनंद मिळत नाही. आनंद मिळावा तरी कसा ?

भोग बाधक नाही पण भोगासक्ति बाधक आहे. भोगवासनेत अडकलेले मन ईश्वरापासून दूर पळते.

भरताचा त्याग अतिउत्तम आहे. अष्टसिद्धी सेवा करण्यात तत्पर आहेत. परंतु भरत त्यांच्याकडे

दृष्टी देत नाहीत. वैराग्याविना भक्ती रडत असते. वैराग्य नसेल तर भक्ती कुचकामाची आहे. भरताला एकच इच्छा आहे, रामदर्शनाची.

ही भागवतकथा ज्ञान आणि वैराग्याला पुष्ट करण्यासाठी आहे.

सीतारामाविना भरत विकल झालेला आहे. भोगाचे अनेक पदार्थ त्याच्यासमोर आहेत, पण त्याचे मन त्यांच्याकडे जातच नाही.

सगळे भोग्य पदार्थ सुप्राप्य असून सुद्धा ज्याचे मन त्यांच्याकडे जात नाही तोच खरा वैष्णव, तोच खरा भक्त.

भरत त्रिवेणी गंगेपाशी भिक्षा मागत आहे– मला आणखी कोणतीच इच्छा नाही, मी मोक्ष मागत नाही. अर्थ, धर्म, कामाची सुद्धा इच्छा नाही. आता तर मला केवळ रामदर्शनाची इच्छा आहे.

ज्ञानी पुरुष मुक्तीची इच्छा करीत नाहीत. जो भक्तिरसांत बुडून गेलेला आहे त्याला मोक्षाचा आनंद तुच्छ वाटतो. वेदान्त म्हणतो आत्मा तर सदा मुक्तच आहे, त्याला आणखी कोणती मुक्ति हवी? भगवंत मुक्ति देतात, पण भक्ती देत नाहीत.

साधुगण भरताची प्रशंसा करीत आहेत. आपल्या वैराग्यापेक्षासुद्धा त्याचे वैराग्य श्रेष्ठ आहे.

भरत पुढे गेले. दहाव्या दिवशी त्यांची रामाशी भेट होणार आहे. सूर्यनारायण अस्ताचलाकडे निघून गेले. भरत 'सीताराम, सीताराम' म्हणत पुढे पुढे जात आहेत. चित्रकूट पर्वत दिसू लागला तेंव्हा सर्व लोक साष्टांग दंडवत घालू लागले. लोकांनी चित्रकूटाच्या पायथ्याशी विश्रांती घेतली.

इकडे सीतेला स्वप्न पडले की भरत त्यांना भेटायला येत आहेत. त्यांच्याबरोबर अयोध्येची प्रजाही आहे. सासूचा वेश शोकसूचक आहे. रामांनी स्वप्न ऐकले तर म्हणाले हे स्वप्न मंगल नाही. कदाचित एखादी दुःखद वार्ता ऐकावी लागेल.

सकाळ झाल्यावर भरतांनी पर्वतावर जाण्यासाठी वसिष्ठांची आज्ञा मागितली. परंतु व्याकुळ होऊन त्यांच्या मनांत हाही विचार आला कीं मी माझे काळे तोंड रामांना कसे दाखवू? मला पाहिल्याबरोबर जर त्यांनी आपले तोंड फिरवून घेतले तर? पण नाही! नाही! असे तर ते कधीच करणार नाहीत. ते मला निश्चितच आपला समजतील. परंतु जर वहिनींनी माझ्या भेटीला हरकत घेतली तर? नाही! नाही! त्यादेखील तसें करणार नाहीत. भरत 'सीताराम, सीताराम' म्हणत म्हणत जाऊ लागले.

भिल्लांनी हे पाहिले आणि ते धावतच रामचंद्रांपाशी आले. सांगू लागले कीं कोणी भरत नावाचा राजा आपल्याला भेटायला आला आहे. बरोबर चतुरंग सैन्य देखील आहे. त्यामुळे जंगलातील पशू-पक्षी भिऊन पळत आहेत.

रामचंद्र विचारमग्न झाले. लक्ष्मणाच्या मनांत आले की, जर त्याला केवळ भेटायलाच यायचे होते, तर बरोबर सेना कशाला आणली आहे. तसा तो तर साधूसारखाच होता. पण राज्य प्राप्त झाल्यावर त्याची मति भ्रष्ट तर झाली नाही ना? होय! तो आपला मार्ग निष्कंटक करण्यासाठीच येत आहे. सत्ता मनुष्याला आंधळा आणि स्वार्थी करून टाकते. लक्ष्मणाला राग आला पण रामचंद्र त्याला समजावून शांत करून म्हणाले– लक्ष्मणा! भरताला ब्रह्मलोकाचे राज्य प्राप्त झाले तरी सुद्धा त्याला सत्तेचा मद प्रभावित करू शकणार नाही. भरतासारखा भाऊ जगांत कधी झाला नाही आणि पुनः कधी होणारही नाही.

भरत सीतारामाचा जप करीत करीत पुढे पुढे जात आहेत. त्यांचे प्रेम पाहून चित्रकूटाचे दगड देखील जणू सचेतन झाले आहेत. भरताने दुरून पाहिले कीं राम अंगणांत विराजमान आहेत आणि

ज्ञानवार्ता करीत आहेत. सीता आणि लक्ष्मण उपस्थित आहेत. भरताला विचार पडला– मी तर पापी आहे, त्यांच्यासमोर कसा जाऊ?

आपल्याला स्वतःलाच धीर देत देत भरत रामांच्या निकट आले आणि त्यांना साष्टांग नमस्कार घातला. लक्ष्मणाने हे पाहिले आणि रामांना म्हणाला– भरत तुम्हाला नमस्कार करीत आहे. राम म्हणाले, कुठे आहे माझा भरत? त्यांनी भरताला उठवून आपल्या हृदयाशी धरले.

चित्रकूट पर्वतावर जीवाशिवाचे मीलन झाले.

चित्रकूटांत भगवंत, लक्ष्मण आणि जानकीबरोबर राहात आहेत. लक्ष्मण वैराग्य आहे, सीता पराभक्ती आणि चित्रकूट चित्त.

माझा भरत दुःखी आहे या विचाराने रामांच्या मुखांतून एकही शब्द निघत नाही.

दुःख आपल्या स्वतःच्या कर्माचेंच फळ आहे. कसेही दुःख येवो, प्रभूला नवस करू नका. प्रभूला संकटांत पाडू नका. नेहमी विचार करा की मी आपल्या सुखाकरिता कृष्णाला कधीच कष्ट देणार नाही. नेहमी परमेश्वराच्या सोईचाच विचार करा.

भरताबरोबर वसिष्ठ ऋषि आणि मातोश्री पण आहेत. भरताने सीतेला नमस्कार केला आणि सीतेने आशीर्वाद दिला. आता भरताला विश्वास वाटू लागला की यांनी माझ्या पापाची क्षमा केली आहे.

रामचंद्रांनी वसिष्ठांना नमस्कार केला आणि कैकेयीला भेटले. कैकेयी दुःख आणि पश्चात्तापाने कापत आहे. रामांनी तिला समजाविले– मनांत क्लेश करून घेऊ नकोस. तुझा काही दोष नाही. ही तर विधीची लीला आहे. ते सगळ्याच मातांना भेटले आणि सगळ्यांनाच धीर दिला.

सासूच्या दुःखामुळे सीता व्याकुळ झाली, तर सीतेच्या तापसी वेशाने कौसल्येचे हृदय भरून आले.

कौसल्येने दशरथाच्या महाप्रयाणाचे वर्तमान सांगितले. रामचंद्र विलाप करू लागले. पिताजींच्या प्रेमाची आठवण काढून रडू लागले.

दुसरे दिवशीं रामचंद्रांनी वडिलांचे श्राद्ध केले.

भरताला एकच चिंता आहे की राम-सीता परत येतील कीं नाही. मी आपल्या तोंडून यांना म्हणू तरी कसे? वसिष्ठ भरताची परीक्षा घेऊ इच्छितात. म्हणून त्यांनी भरताला म्हटले– तूच विनंति कर.

भिल्ल लोकांनी अयोध्येच्या प्रजेचे स्वागत केले.

लोक त्यांना भेट देत आहेत, पण भिल्ल कांहीच स्वीकारीत नाहीत. रामचंद्रांच्या आगमनापूर्वी जर त्यांना काही दिले असते तर ते त्यांनी अवश्य स्वीकारले असते. परंतु रामचंद्रांचे दर्शन झाल्यामुळे त्यांची मनोवृत्ति बदलून गेली. रघुनाथांची दृष्टीच हृदयभेदी आहे. रघुनाथांच्या दर्शनाने पाप संपले. चोरी, हाणामारी, हिंसा इत्यादी दुष्ट प्रवृत्तीही नष्ट झाल्या.

रामचंद्रांच्या दर्शनाने चित्रकूटांतील अशिक्षित भिल्ल लोकांचेही जीवन सुधारते आणि आमच्यासारख्यांचे जीवन मात्र सुधारत नाही, ह्यापेक्षा मोठे दुर्भाग्य कोणते? रामचंद्रांच्या दर्शनाने स्वभाव सुधारणे आश्चर्याची गोष्ट नाही. केवळ त्यांच्या नामजपाने सुद्धा स्वभाव बदलू शकतो.

दुसरे दिवशीं श्रीरामचंद्रांना अयोध्येस परतण्यास राजी करण्याच्या प्रयत्नांना सुरुवात झाली.

इकडे प्रजाजन व्याकुळ आहेत. रामचंद्रांच्या परतण्याशिवाय शांति मिळू शकत नाही. 'भरत

आणि शत्रुघ्न! हवे असल्यास तुम्ही वनांत रहा. आम्ही तर राम-लक्ष्मण-सीतेला आपल्याबरोबर घेऊन जाऊ,' असें प्रजा म्हणूं लागली.

भरत म्हणाला– गुरुजी, माझ्याच अंतरींचे हे बोल बोलले जात आहेत जणू! जर रामचंद्र अयोध्येला परत जायला तयार असले तर चौदाच वर्षे काय, सबंध आयुष्यभर आम्ही वनांत घालवायला तयार आहोत.

कौसल्येने ते ऐकले, आणि म्हणाली– ही काय गोष्ट झाली? माझ्या दृष्टीला तर भरत आणि राम दोघेही एकसारखेच आहेत. मी कोणालाच वनवासी म्हणून पाहायला तयार नाही.

वसिष्ठ म्हणाले, लोक मला ब्रह्मनिष्ठ समजतात. आज भरताला पाहून असे वाटते कीं तो माझ्यापेक्षा अनेक बाबतीत श्रेष्ठ आहे. रामा, भरताच्या सुखाचा उपाय सांगा.

राम– भरत जे सांगेल ते मी करायला तयार आहे. त्याने आपल्या मनांत कोणत्याच प्रकारचा संकोच बाळगू नये. मी त्याला नाराज करणार नाही.

भरताला वाटले– मोठ्या भावाने त्याच्या सर्वच पापांची क्षमा केली आहे. त्यांनी माझे मन केव्हांच दुखविले नाही. भरत म्हणू लागला, मी तर आपला सेवक आहे. आपली आज्ञा शिरोधार्य आहे. आपल्या राज्याभिषेकाची सर्व तयारी आम्ही करूनच आलो आहोत. आपल्याला राज्याभिषेक होऊ द्या. अयोध्येला परतून आपण सगळ्यांनाच सनाथ करा. राम-लक्ष्मण-सीता यांनी अयोध्येला परतावे आणि मी शत्रुघ्नाबरोबर वनवास करीन किंवा लक्ष्मणाबरोबर शत्रुघ्नाला सुद्धा अयोध्येला पाठवा आणि मला सेवेचा लाभ द्या किंवा आम्ही तिघाही भावांनी वनांत राहावे आणि सीतेसह आपण अयोध्येला जावे. राम म्हणाले– चौदा वर्षे तर लवकरच पूर्ण होतील.

त्याच वेळी जनकाचा दूतही तेथे आला. प्रातःकाळी जनकराजाही तेथे आले. त्यांचे स्वागत केले गेले. पुष्कळ गोष्टीही ऐकल्या. आपल्या मुलीचा तपस्विनीचा वेष पाहून त्यांचे हृदय भरून आले.

कौसल्या म्हणाली– या भरताला समजवा. तो वनांत चौदा वर्षे कसा राहू शकेल? त्याला राम-विरह सहन व्हायचा नाही. भरताला जेणेकरून संतोष होईल असे काही तरी करा.

जनक– तसा तर मी ब्रह्मज्ञानी आहे, पण त्याच्या प्रेमामुळे माझी बुद्धी कुंठित झाली आहे. मी सीतेला आपल्याबरोबर घेऊन जाईन. मुली, तू तर दोन्ही कुलांचा उद्धार केला आहेस.

सीता– माझ्या पतीचा वनवास म्हणजे माझा पण वनवासच आहे. बाबा, मी तुमच्याबरोबर येऊ शकत नाही. तुम्ही जास्त आग्रह करू नका.

आजचा तिसरा दिवस. पुन्हां नव्याने रामाच्या विनवणीस सुरुवात झाली. भरत आज्ञा मागत आहे.

रामचंद्र– भरता! मी आजपर्यंत कधी तुझे मन दुखविले नाही. परंतु आजची गोष्ट अगदीच वेगळी आहे. आपल्या दोघांनाही वडिलांची आज्ञा पालन करायची आहे.

भरत– नाथ! मी एकटा कसा जाऊ शकेन? मला कांही आधार द्या.

रामचंद्रांनी आपल्या स्मरणाचे प्रतीक म्हणून स्वतःच्या चरणपादुका भरताला दिल्या. भरताने त्या आपल्या मस्तकाला लावल्या.

**१६. भरत रामाच्या चरणपादुकांसह अयोध्येस परततो:**

बंधुप्रेमाचा आदर्श स्थापित करण्यासाठी भरत 'सीताराम सीताराम' असा घोष करीत अयोध्येला

परतले. भगवंताच्या चरणपादुका सिंहासनावर स्थापन केल्या.

भरत गोमुखयावक व्रत करू लागले. गाईला खाऊ घातल्यानंतर ते धान्य जेव्हां शेणाबरोबर बाहेर येईल ते गोमूत्राबरोबर उकळले जाते. असे अन्न तो दिवसांतून एक वेळ खाऊ लागला. रामचंद्रांच्या तपश्चर्येपेक्षाही भरताची तपश्चर्या श्रेष्ठ आहे. त्यांचे प्रेम इतके प्रबळ आहे कीं जणू काय जड पादुका देखील चेतन झाल्या होत्या.

रामवियोगाचे जीवन कसे असले पाहिजे त्याचा आदर्श भरताने जगासमोर ठेवला आहे. आम्ही सुद्धा रामवियोगीच आहोत. भरतासारखे जीवन होऊ शकेल तरच राम भेटतील. भरताचे जीवन आमच्यासाठी अनुकरणीय आहे.

प्रत्येक बाबतीत भरत रामाच्या पादुकांची आज्ञा मागतात.

कोणत्याही अडचणीच्या प्रसंगी कोणत्याही जीवाशी संपर्क साधणे चांगले, परंतु भगवंताशीच संपर्क साधणे अतिउत्तम होय. जीवाचे मन कदाचित राग-द्वेषाने कलुषित असू शकते. म्हणून परमेश्वराशीच संबंध ठेवणे चांगले. जर तुम्हाला कांही प्रश्न पडला असेल, संकट वाटत असेल तर देवाचा शृंगार, नैवेद्य, आरती करून शांत चित्ताने हात जोडून जप करा.

भगवंत तुम्हाला स्वप्नांत मार्गदर्शन करतील.

रामचंद्र शय्येवर निजत, भरत जमिनीवरच निजत असत.

रामचंद्रांनी चित्रकूट सोडायचा निश्चय केला. ते अत्रि ऋषींच्या आश्रमांत आले. अनसूयेने सीतेची फार प्रशंसा केली. तेथून ते सुतीक्ष्णाच्या आश्रमांत गेले. हा प्रसंग दिव्य आहे.

सुतीक्ष्ण मुनी अगस्तींचे शिष्य होते. विद्याभ्यासाची समाप्ति झाल्यावर त्यांनी गुरुजींना दक्षिणा मागण्यासाठी प्रार्थना केली. अगस्त्य ऋषि म्हणाले— कल्याण होवो तुझे! काही मिळावे या आशेने मी विद्यादान केलेले नाही. जर शक्य झाले तर मला कधीतरी रामचंद्रांचे दर्शन घडू दे.

सुतीक्ष्णाला आज रामचंद्रांचे दर्शन झाले. ते रामांना म्हणाले, चला, मी आपल्याला मार्ग दाखवितो.

रामचंद्र लक्ष्मणाला म्हणाले— सुतीक्ष्णाने मार्ग दाखविण्यासाठी नाही, तर आपली प्रतिज्ञा पुरी करण्यासाठी आमच्याबरोबर येणे केले आहे. सुतीक्ष्ण सर्वांना अगस्तींच्या आश्रमांत घेऊन आले.

ॐ काराचा भावार्थ रामनामांत सामावलेला आहे.

सुतीक्ष्ण ऋषि अगस्ति मुनींना सांगू लागले— गुरुजी, नमस्कार! आज आपल्याला श्री रामांचे दर्शन व्हावे म्हणून मी त्यांनाच घेऊन आलो आहे. ऋषि धावतच आले. प्रभूंचे दर्शन घेऊन कृतार्थ झाले.

तेथून सर्व गोदावरी नदीच्या किनारी आले. तेथे राहण्यासाठी पंचवटीत आश्रम तयार केला.

पंचवटीचा अर्थ आहे पाच प्राण. परमात्मा पाच प्राणांत विराजमान आहेत. संसार-अरण्यांत भटकणाऱ्याला वासनारूपी शूर्पणखा भेटते. राम तर तिच्याकडे पाहातही नाहीत. शूर्पणखा मोहाचे स्वरूप आहे. ती रावणाची बहीण आहे. नटूनथटून ती रामाजवळ आली आणि म्हणू लागली, मी कुमारी आहे. माझे मन तुझ्यातच हरवून बसले आहे. मी तुमच्याशी विवाह करू इच्छिते. शूर्पणखा कामवासना आहे.

रामचंद्र— तुझ्याचप्रमाणे माझा भाऊ लक्ष्मणही अविवाहित आहे. त्याच्याजवळ जा. मी तर एकपत्नीव्रताचे पालन करीत आहे.

शूर्पणखा जळफळली. तुम्ही आपल्या सीतेमुळे माझी उपेक्षा करीत आहांत. तिने आपले विशाल

राक्षसी रूप धारण केले.

वासनासुद्धा शूर्पणखेप्रमाणेच सुरवातीला तर सुंदरच वाटते. परंतु पुढे गेल्यावर तिचें वास्तविक स्वरूप समोर येत असते आणि जीव फसतो. सुरवातीला ती सुकुमार वाटत असते, परंतु पुढे जाऊन ती भयंकर होऊन बसते. तिच्या पकडींतून सुटणें सोपे नसते.

लक्ष्मणाने शूर्पणखेचे नाक-कान कापून टाकले. ती रडत ओरडत रावणापाशी गेली. रावणाने विचारले, काय झाले ? कशाने झाली तुझी ही दशा ?

शूर्पणखा— दशरथाचे दोन मुलगे पंचवटींत राहतात. त्यांच्याबरोबर एक सुंदर स्त्री पण आहे. मी तुझ्यासाठी तिला आणण्याकरिता तेथे गेले होते तर माझी अशी दशा झाली. रावण तिचें सांत्वन करू लागला.

### १७. सीता-हरण व जटायु-मरण :

इकडे रामचंद्र सीतेला म्हणू लागले— देवी, आता लीलेचा समय आलेला आहे. तू अग्नींत वास करून रहा.

म्हणूनच म्हटलें आहे कीं रावण ज्या सीतेला घेऊन गेला होता ती खरी सीता नसून सीतेची छाया मात्र होती.

रावण मारीचाबरोबर पंचवटींत आला. मारीचाने कपटाने सोन्याच्या हरणाचें रूप धारण केले. सीतेनें ते सोन्याचें हरीण पाहिलें आणि रामाला म्हणाली कीं, मला या हरणाच्या कातड्याचें वस्त्र पांघरायची इच्छा आहे. आपण याची शिकार करावी. राम पळणाऱ्या हरणामागोमाग दूर वनांत गेला. रामानें धावत असलेल्या हरणावर बाण सोडला, तर ते 'हे लक्ष्मणा' अशी हाक मारून जमिनीवर कोसळले.

इकडे सीतेने लक्ष्मणाच्या नावाची हाक ऐकली आणि लक्ष्मणाला आपल्या पतीच्या रक्षणासाठी पाठविलें. लक्ष्मण आश्रमाच्या बाहेर गेल्यावर रावणाने भिक्षुकाचें रूप घेऊन सीतेचें हरण केले.

रावण सीतेला रथावर बसवून आकाशमार्गानें जात होता. वाटेंत जटायूनें सीतेची आर्त वाणी ऐकली, त्याने रावणाशी युद्ध केलें. त्याने रावणाला विचारले कीं त्याचा मृत्यु कशांत आहे ? तर रावणाने खोटे खोटेच सांगितले कीं त्याचा मृत्यू पायांत आहे. जटायू त्याच्या पायाच्या अंगठ्याचा चावा घेण्यासाठी वाकल्याबरोबर रावणाने त्याचे पंख कापून टाकले.

लक्ष्मणाला आलेला पाहून रामांनी विचारले— तुला तुझ्या वहिनीचें रक्षण करण्यासाठी राहायला सांगितलें असता तू इथे कां आलास ?

लक्ष्मण— मी तर तिथेच राहू इच्छित होतो, परंतु वहिनीच्या आग्रहामुळे मला यावे लागले. आणि त्याने मोठ्या भावाला सर्व संवाद सांगितला.

लक्ष्मणाप्रमाणे रामचंद्रांची सेवा करणें फार कठीण आहे. लक्ष्मणाला राम म्हणाला— पुढल्या जन्मी मी तुमची सेवा करायला येईन. लक्ष्मणच दुसऱ्या जन्मीं बलराम झाले.

तर दोघे भाऊ आश्रमांत आले आणि पाहिले तर सीतेचा कांही पत्ताच नव्हता.

एकनाथांनी सीतावियोगाचें वर्णन फारच चांगले केले आहे. राम 'सीते! सीते!' अशी हाक मारीत विलाप करू लागले. लक्ष्मण पुनःपुन्हा त्यांना धीर देऊन समजवीत आहेत.

राम म्हणत आहेत— ही पृथ्वी माझी सासू आहे. जेव्हां जेव्हां तिच्याकडे दृष्टी जाते तेव्हां तेव्हां

मला असे वाटते कीं ती मला रागावत आहे आणि म्हणते आहे कीं, 'तुझ्यांत आपल्या बायकोचे रक्षण करण्याची शक्ति नव्हती तर लग्नच कां केलेस? आकाशाकडे दृष्टी जाते तेव्हां असे वाटते कीं जणू काय सूर्यनारायण दुःखाने म्हणत आहेत कीं, 'माझ्या कुळांत हा कसा कुपुत्र जन्माला आला कीं जो आपल्या बायकोचे रक्षण करू शकला नाही.'

दोघेही भाऊ सीतेचा शोध करीत हिंडत आहेत. एका स्थानीं घायाळ झालेल्या जटायूला पाहिलें. जटायूनें सांगितले कीं, रावणानेच माझी अशी दशा करून टाकली आहे. तो सीतेला घेऊन दक्षिणेकडे निघून गेला आहे.

रामचंद्र म्हणाले– जर तुझी इच्छा असेल तर मी तुला वेदना आणि व्याधीमुक्त करू शकेन.

जटायू म्हणाला, मरण्याचे वेळीं ज्याचें नाव मुखांतून उच्चारल्यावर अधमास देखील मुक्ती मिळते तेच आपण स्वतः माझ्या डोळ्यांसमोर उभे आहांत! मग आता मला अशी कोणती इच्छा प्राप्त करायची आहे कीं जिच्यासाठी मी हा देह धारण करून राहू? तेव्हां मी आतां हा देह सोडूं इच्छितो.

जटायूने गिधाडाचा देह सोडून दिला आणि हरिधामी गेला. ज्या गतीची योगी इच्छा ठेवतात ती गती रामांनी जटायूला दिली.

याचकरिता शिव पार्वतीला म्हणतात– पार्वती, जे लोक हरीला सोडून सांसारिक विषयांवर प्रेम करतात ते खरोखरच दुर्भागी होत.

### १८. शबरीची भेट:

तेथून श्रीराम शबरीच्या कुटीजवळ आले.

ही शबरी मागल्या जन्मीं कोणा राजाची राणी होती. ती धनाने तर सेवा करू शकत होती पण तनाने नाही. एकदा ती प्रयागराजला गेली. तेथे अनेक महात्म्यांशी तिची भेट झाली. पुढल्या जन्मीं एखाद्या खऱ्या संताचा सत्संग व्हावा अशी इच्छा करीत तिने त्रिवेणीमध्यें आत्मविसर्जन केलें. त्याच राणीचा भिल्ल जातींत शबरीच्या रूपांत जन्म झाला.

शबरीच्या लग्नाचा दिवस आला. तिच्या वडिलांनी जेवण देण्याची तयारी केली. पुष्कळशा बकऱ्या आणल्या गेल्या, कारण त्यांच्या मांसाचा आहारात उपयोग केला जायचा होता. शबरीला विचार आला कीं माझ्यामुळेच तर ही हिंसा होणार आहे. नाही! नाही! असे व्हायला नको. ती मध्यरात्रीच्या वेळीं घर सोडून निघून गेली.

शबरी पंपा सरोवराच्या तीरावर आली आणि मातंग ऋषींच्या जवळ राहू लागली.

मातंग ऋषि वर्षांतून एकदा हत्तीची शिकार करीत आणि त्याचें मांस भक्षण करीत एक वर्ष काढीत असत. इतर ऋषि त्यांची निंदा करायचे. ते म्हणत, तुम्ही तर किती तरी जीवांची हिंसा करता आणि मी तर वर्षांतून एकाच जीवाची हत्या करतो.

शबरी तेथे आली. सर्व दिवसभर एखाद्या वृक्षावर बसून राह्यची आणि रात्रीच्या वेळी संताची सेवा करायची.

सत्कर्मांच्या प्रसिद्धीमुळे पुण्य नष्ट होते. कोणाला दाखवायला नाही, परंतु भगवंताला प्रसन्न करण्यासाठी सेवा करा.

ज्या मार्गाने ऋषि-मुनि स्नानाला जात तो मार्ग शबरी रात्रीच्या वेळीं स्वच्छ करून ठेवी. कोणाला समजत नसे. तिला मातंग ऋषींनी विचारले, तू कोणत्या जातीची स्त्री आहेस? शबरीने खरें तेच

सांगितलें कीं ती किरातकन्या आहे.

मातंग ऋषींनी विचार केला कीं ही हीन जातीची स्त्री आहे. हीन कर्माची नाही. त्यांनी म्हटले, 'बेटी, तू माझ्या आश्रमांतच रहा.' शबरी शुद्ध होती, तरीपण लोक निंदा करायचे कीं ऋषि असूनही भिल्लकन्येला आपल्याजवळ ठेवले आहे. ऋषींनी तिला राममंत्राची दीक्षा दिली.

एक दिवस मातंग ऋषि ब्रह्मलोकांत जायची तयारी करू लागले तर शबरीला फार दुःख झाले. ती म्हणाली, तात, तुम्ही जाऊ नका. तुम्ही निघून जाल तर माझें कसे होईल?

ऋषि म्हणाले, मी तुला राममंत्राची दीक्षा दिली आहे. श्रद्धा ठेव. एक ना एक दिवस तुझ्या कुटींत रामचंद्राचें आगमन होईल. केव्हां येतील हे तर मी जाणत नाही, परंतु अयोध्येत तर त्यांचे प्रागट्य झालेलें आहे.

जप, तप, दान, तीर्थ इत्यादी सर्व करूनही जर कोणा खऱ्या संताची कृपा झाली नाही तर भक्ति सफल होणार नाही.

प्रभु मला आपलेसे करून घेतीलच याच आशेंत वैष्णव जीवन कंठीत असतात.

मोठ्या उत्साहाने सेवास्मरण करीत राहा. मनाने तर सतत सत्कर्म करीत रहा.

शबरीला विश्वास होता कीं केव्हां तरी राम येतीलच. ती वनांतून बोरे इत्यादी फळें आणीत असे. सर्व दिवसभर प्रतीक्षा करीत असे आणि संध्याकाळनंतरच जेवत असे. तिला वाटत असे, 'मी पापिणीच आहे, म्हणूनच तर ते माझ्या येथे येत नाहीत.'

रामाची प्रतीक्षा करीत करीत ती आता वृद्ध झाली आहे. तरी पण अजून ती त्याच आशेंत जिवंत राहिली होती. माझ्या गुरुजींनी सांगितले आहे ना! रामाकरिता आणलेली फळें ती ऋषिकुमारांना वाटून देत असे.

घटाघटांत राम वसलेले आहेत. तपश्चर्या करून सिद्धी अवश्य मिळते.

शबरी दिवसभर राममंत्र जपत राही. तिचें जीवन संयमी आणि सेवारत होते. तिची निष्ठा दिव्य होती. अशांच्या घरीं राम जाणार नाहीत तर मग कोणाच्या घरी जातील?

राम-लक्ष्मण पंपा सरोवरावर आले. तेथें ऋषिमुनींनी त्यांचे स्वागत केले. ते सर्व त्यांना आपल्या येथे येण्याचा आग्रह करू लागले. तर राम म्हणाले— सर्वप्रथम मी शबरीच्या झोपडींत जाईन.

सर्वच ठिकाणी जो मला नेहमी शोधत असतो त्याला मी सुद्धा शोधत असतो.

ज्या वेळी राम-लक्ष्मण शबरीच्या कुटीवर पोचले त्या वेळीं ती राममंत्राचा जप करीत होती. शबरीनें दोघांचें स्वागत केलें त्यांना आणि बसायला चांगलें आसन दिलें. ती म्हणाली, मी तशी तर जातिहीन आहे तरी पण आपल्याला शरण आले आहे.

राम— मी अन्य कोणत्याही जातिभेदाचा विचार करीत नाही. मी तर निर्मळ, शुद्ध प्रेम-भक्तीच्या शोधांत असतों.

शबरी बोराचा द्रोण घेऊन आली आणि चाखचाखून सर्वांना देऊ लागली; हेतू हा कीं आंबट बोरे दिली जाऊ नयेत. भगवंताचें दर्शन करून ती इतक्या भावावेशांत आहे कीं तिला आपण भगवंतांना उष्टी बोरे देत आहोत हा विचारही जाणवत नाही. रामांनी बोरांची फारच तारीफ केली.

गोडपणा तर प्रेमांतच आहे. प्रेम कलंकित होऊ देऊ नका. ईश्वरावर ईश्वराकरताच प्रेम करा.

महापुरुष वर्णन करीत असतात कीं शबरीची बोरें खाऊन रामांनी ज्या बिया फेकून दिल्या होत्या त्यांतून द्रोणाचल पर्वतावर संजीवनी वनस्पति उगवली. याच संजीवनीनें लक्ष्मणास जीवदान

मिळाले होते.

खूप भजन करा. खऱ्या साधुसंतांवर विश्वास ठेवा. शबरीचें चरित्र मानवमात्रासाठी आश्वासनरूप आहे. भगवंत अवश्य भेटत असतात.

श्रीरामांनी शबरीला विचारले, ' तुझी कांही इच्छा आहे का ? ' शबरी म्हणाली, ह्या पंपा सरोवराच्या वाईट झालेल्या पाण्याला आपण शुद्ध करून द्या. कोण्या एके काळीं एका ऋषींनी शबरीला लाथ मारली होती तेव्हांपासून या सरोवराचें पाणी वाईट झाले होते.

रामांनी लोकांना सांगितलें कीं या पाण्याला शुद्ध करण्याची शक्ति माझ्यांत नाही. जर शबरीच्या चरणतीर्थाची ओंजळ या सरोवरांत टाकली गेली तर काही काम होऊ शकेल.

शबरीला त्या सरोवरांत स्नान करण्यास श्रीरामांनी सांगितले. परिणामी सरोवराचें पाणी शुद्ध झालें. रामांनी शबरीचाही उद्धार केला. रामाचें दर्शन करीत करीत शबरी योगाग्नीत विलीन होऊन गेली.

## १९. हनुमान भेट, सुग्रीवाशीं मैत्री व वालीचें मरण:

रघुनाथ आता ऋष्यमूक पर्वताजवळ आले. तेथे सुग्रीव राहात होता. तिथे प्रथम हनुमानाशी भेट झाली. हनुमानाने त्यांचा परिचय जाणून घेतला आणि सुग्रीवाशी मैत्री करून दिली.

जोपर्यंत जीवाची ईश्वराशी मैत्री होत नाही तोपर्यंत जीवन सफल होत नाही. आणि अशी मैत्री हनुमान अर्थात ब्रह्मचर्याशिवाय होऊ शकत नाही.

रामनाम तर अमृताहून श्रेष्ठ आहे. रामनाम भवरोगाचें औषध आहे. परंतु संयमाशिवाय तेही उपयोगी ठरत नाही.

जोपर्यंत हनुमान शिफारस करीत नाहीत तोपर्यंत रामचंद्र आपले करून घेत नाहीत.

परमात्मा जीवमात्राचे खरे मित्र आहेत. ईश्वराशी मैत्री केल्याने जीवन सफल होते. संसारांतील मित्र तर फक्त याच जगांत सुख देऊ शकतो, परंतु परलोकांत आणि अंतकाळीं तो सुख देऊ शकत नाही.

जीवाने जर ईश्वराशी मैत्री जोडली तर तो त्याला आपले करून घेतो. तो त्यालासुद्धा ईश्वर बनवून घेतो. तो तर अतिउदार आहे. तो जेव्हां देऊ लागतो तेव्हां खूपच उदार होऊन देत असतो. जीवाला जेव्हां द्यायचा प्रसंग येतो तेव्हां जीव विचार करून आपल्यासाठी बरेच शिल्लक ठेवून मग देत असतो. विश्वाचा सर्जक देतेवेळीं असा कांहीच विचार करीत नाही कीं आपल्यासाठी सुद्धा कांही शिल्लक ठेवले पाहिजे.

मैत्री परमात्म्याशीच करा. जो कामाला आपला शत्रु मानतो तोच परमात्म्याशी मैत्री जोडू शकतो. कृष्ण आणि काम, राम आणि रावण एकत्र राहू शकत नाहीत.

रामचंद्रांनी सुग्रीवाला आपला मित्र बनविले. कारण हनुमानाने सुग्रीवाला आपले म्हटले होते.

हनुमान ब्रह्मचर्याचें स्वरूप आहे. ब्रह्मचर्याशी मैत्री जितेंद्रिय बनवील, आणि तेव्हांच परमात्म्याशी मैत्री जडेल. संयम आणि धर्ममर्यादेचें पालन कराल तर रामराज्याच्या कालाप्रमाणें डॉक्टर आणि वकीलांची आवश्यकता राहणार नाही.

हनुमानाला जो आपला मित्र बनवत नाही त्याला राम देखील आपला मित्र करीत नाहीत. परमात्म्याशीं प्रेम केल्याशिवाय जीवन सुंदर होत नाही. प्रेम केल्याशिवाय मनुष्य जिवंत राहू शकत नाही. कोणी

धनावर, कोणी बायकोवर तर कोणी मुलांवर प्रेम करतात. परंतु प्रेम करण्यालायक तर एक परमात्माच आहे. परमात्म्याशिवाय इतर कोणत्याही व्यक्तीवर केले गेलेले प्रेम अंतीं रडवीतच असते.

जगत् अपूर्ण आहे आणि जीवही अपूर्ण आहे. परमात्म्याशीं मैत्री झाल्यावरच जीवन परिपूर्ण होत असते. परमात्म्याशी प्रेम करणाऱ्याला तो पूर्ण करीत असतो. ईश्वरावर पूर्णतः प्रेम करणाऱ्यालाच ईश्वर भेटतो. अशीच व्यक्ति प्रभू आपला समजत असते. ईश्वरावर प्रेम करायचे असेल तर इतरांवरचे प्रेम सोडावे लागेल. लौकिक प्रेम हळू हळू कमी करीत जाऊन प्रभूवरचें प्रेम वाढवीत चला.

हनुमानाने विचारल्यानंतर रामचंद्रांनी आपला परिचय दिला. हनुमंताने नमस्कार करून स्तुति केली आणि म्हटलें, 'या पर्वतावर वानरराज सुग्रीव राहतो. त्याच्याशी मैत्री करा. ते आपले दास आहेत' आणि सर्वच सुग्रीवापाशी आले.

रामांनी सुग्रीवाला विचारले– तू इतका दुःखी कां आहेस?

सुग्रीव– 'माझा भाऊ वाली याने माझी धन-संपत्ति आणि बायको हरण करून मला बाहेर हाकून दिलें आहे.'

जो मित्राच्या दुःखाने दुःखी होतो तोच खरा मित्र होय.

सुग्रीव आणि वाली यामध्ये युद्ध झालें. राम सुग्रीवाच्या पक्षाला होते. त्यांनी एका वृक्षाच्या आड राहून वालीवर बाण सोडला. वाली म्हणाला–

'आपण तर धर्माच्या रक्षणार्थ अवतार धारण केला आहे आणि मी तर आपला कांहीच अपराध केला नाही. तरीही आपण माझा वध कां करू इच्छिता? धर्माच्या रक्षणासाठींच अवतार धारण करून सुद्धा आपण अधर्माचरण केलें आहे.'

रामचंद्र– 'वाली, आपला दोष तू पाहातच नाहीस आणि मला दोषी ठरवू पाहात आहेस!'

भावजय, बहीण, सून आणि आपली मुलगी ह्या समान असतात. तरी तू आपल्या भावाच्या बायकोवर पापी दृष्टी ठेवलीस, असा तू महापापी आहेस. म्हणून तुझा उद्धार करण्यासाठीच तुझा वध करीत आहे.

स्वदोषदर्शनाशिवाय ईश्वराचें दर्शन होत नाही. परदोषदर्शन परमात्म्याच्या दर्शनांत बाधारूप आहे.

वाली म्हणू लागला– 'प्रभु, मी जर पापी आहे तर मला सांगा कीं कोणत्या ग्रंथांत असें लिहिलेले आहे कीं पाप्याला सुद्धा आपल्या दर्शनाचा लाभ होऊ शकतो?'

मुनिगण जन्मजन्मांतरांत कित्येक प्रकारची साधना करीत राहतात. तरी पण अंतकाळीं त्यांच्या तोंडांतून रामनामाचें उच्चारण होत नाही.

मी पुण्यशील आहे म्हणूनच तर आपलें दर्शन या वेळीं होत आहे. आपल्या दर्शनामुळे मी आता पापी राहिलोच नाही. आपल्या दर्शनाने पापाचा नाश होत असतो. आपलें दर्शन देवांनाही दुर्लभ असे आहे. पण मी आपल्या दर्शनाचा लाभ घेत आहे.

भगवान म्हणाले– माझें दर्शन तुझ्या प्रतापामुळे तुला झालेले नाही. तू सुग्रीवाचा भाऊ आहेस म्हणून मी तुझा उद्धार करीत आहे. तू सुग्रीवामुळेच माझें दर्शन घेऊ शकत आहेस.

भगवंताचें बोलणें ऐकून वालीने सुग्रीवाला नमस्कार केला आणि म्हणाला, तुझ्यामुळेंच भगवंतांचे दर्शन घडण्याचे सौभाग्य मला प्राप्त झाले.

सुग्रीव म्हणाला– नाही! नाही! तुझ्यामुळेच भगवंतांचें दर्शन होण्याचें सौभाग्य मला मिळाले. जर तू मला घरांतून घालवून दिलें नसतेंस तर मला प्रभुदर्शन कसे होऊ शकले असते?

वाली देह टाकीत असता सुग्रीवाने भगवंताची प्रार्थना केली कीं, 'माझ्या भावाच्या पापाची क्षमा करा.' तो वालीला म्हणाला, 'बंधू, माझा कांहीं अपराध झाला असेल तर मला क्षमा करावी.'

वैर आणि वासना गती बिघडवीत असतात. जो वैर आणि वासना आपल्याच मनांत ठेवून मरतो त्याला सद्‌गति मिळत नाही. आपले कर्तव्य आहे कीं कोणाशीही वैर ठेवू नये.

राम राम जप करीत वालीनें प्राणत्याग केला. सुग्रीवाला किष्किंधाचे राज्य दिले गेले. रामाची अनासक्ति तरी कशी आहे पहा!

**२०. लंकादहन व बिभीषणाची शरणागति:**

रावण हरला आणि लंकेचे राज्य रामाला मिळाले. परंतु ते म्हणाले, मला धन किंवा राज्याची आसक्ति नाही. लंकेचें राज्य बिभीषणाला दिले. कंसाचा वध झाल्यावर मथुरेचे राज्य कृष्णाच्या हातीं आलें. पण त्याने ते उग्रसेनाला देऊन टाकले.

राम आणि कृष्ण बोलतात तसेंच आचरण करतात. युद्धभूमीवर अर्जुनाला श्रीकृष्णानें सहाही शास्त्रांचें सार एकाच तासांत ऐकविलें होते. भगवंताचें ज्ञान तरी कसे आहे! शेवटी अर्जुन म्हणाला होता कीं आपण जे सांगाल तेच करीन.

ज्ञानाची शोभा व्याख्यानांत नाही, तर क्रियात्मक भक्तियोगांत आहे.

रामासारखा जग-हितार्थी कोणीच नाही, असे भगवान शंकरांनी पार्वतीला सांगितले. देव, मनुष्य आणि मुनि या सर्वांचीच अशी रीत आहे कीं आपल्या स्वार्थासाठी ते सर्वांवरच प्रेम करतात.

भगवान राम प्रवर्षण पर्वतावर आले. हनुमान आपल्या वानरसेनेसह आले. रामांनी आपली अंगठी हनुमानाला देऊन म्हटले, 'ही अंगठी सीतेला दे आणि माझा विरह आणि बळाविषयीं सर्व हकीगत सांगून ताबडतोब परत ये. हनुमंतांनी आपल्या वानरसेनेसहित दक्षिण दिशेला प्रयाण केलें. तो जांबुवंतापाशी आला. तिथे संपातीने वर्तमान सांगितलें कीं जानकीला अशोकवनांत ठेवले आहे. समुद्राला पार करणें फार कठीण होते. रामनाम आणि संयम या बलांशिवाय समुद्र पार केला जाऊ शकत नाही.

हनुमंत मोठ्या आवेशानें म्हणाला, तुम्ही म्हणाल तर सगळी लंकाच समुद्रांत बुडवून टाकतो.

जांबुवंत– धीर धर. जर लंका बुडविशील तर सीताही बुडून जाईल.

हनुमंतानें उड्डाण केलें आणि उड्या मारत मारत समुद्र पार करू लागला. वाटेंतील विरोधकांना न जुमानतां त्यांचा नाश केला. हनुमान लंकेला येऊन पोचला. संध्याकाळची वेळ होती. लंकादर्शन करायला निघाला. तेथील वैभव अलौकिक होते.

मध्यरात्रीच्या वेळीं लंकेंत प्रवेश करीत असता लंकाराक्षसीनें रोखले, तेव्हा हनुमंताने तिला मारून टाकले. मरता मरता ती म्हणाली, 'मला ज्योतिष्याने सांगितलें आहे कीं तुला कोणी मारील तेव्हां समज कीं रावणाचा मृत्यू होणार आहे.' लंकिणीनें हनुमंताला हेही सांगितलें कीं लंकेत फिरत असता रामचंद्रांना आपल्या हृदयांत ठेव. कदाचित राक्षसिणींचा विहार पाहून मन विकारी होईल.

मानवसमाजांत वसति करून मानव बनणें सोपे नाही. एकांतांत ब्रह्मचिंतन करणें सोपे आहे. जनसमाजांत विलासी लोकांबरोबर राहून निर्विकार राहणे फार कठीण आहे. शरीरानें भलेही पाप न होवो, मनाने तर होतच असते.

हनुमंताला कोण उपदेश देऊ शकतो? ते तर सकल विद्यांचे आचार्य आहेत. तरी पण लंकिणीचे शब्द उपेक्षणीय नाहीत. हनुमंताला वाटलें, मी डोळ्यांनी हे दृश्य पाहिलें, पण नाही! डोळ्यांनी भलेही

पाहिले असो, मनानें तर चिंतन केलेच नाही. हनुमान तर बाल-ब्रह्मचारी आहे.

तेथून तो इंद्रजिताच्या महालांत आला. तेथे सुलोचना सुंदरीला पाहून त्याला वाटले कीं कदाचित हीच सीता आहे. पण लगेचच त्याला जाणवले की, ही सीता नाही.

एकनाथांनी सुंदरकांडांत फारच छान वर्णन केले आहे.

हनुमंत साक्षात् शंकराचे अवतार होते. पार्वती सुद्धा अवतार घेऊ इच्छित होती. शंकर म्हणाले, 'नको. मला ब्रह्मचारी राहायचे आहे. पार्वती म्हणाली– मी आपल्याशिवाय जिवंत राहू शकत नाही. म्हणून हनुमतांचे रूप घेतले शंकरांनी आणि त्यांची शेपूट झाली पार्वती! ही योगमाया सर्वांच्याच घरांत जात असते.

हनुमंतांची शेपूट वाढतच गेली. रावणाची खूपच फजिती झाली.

हनुमानानें सगळ्या रात्रभर सूक्ष्म रीतीनें भ्रमण केलें, पण सीता कुठेच दिसली नाही. सकाळी बिभीषणाच्या घरांत प्रविष्ट झाला. तिथे त्यानें पाहिलें कीं बिभीषणानें झोपेतून उठल्याबरोबर रामाचें स्मरण आणि उच्चार केला. हनुमंतांना विचार पडला, या राक्षसांच्या वसतींत हा वैष्णव कोण आहे? हनुमानानें ब्राह्मणाचें रूप घेतलें आणि बिभीषणाजवळ गेला. बिभीषणानें विचारले, कोण आहांत आपण? रामच तर नाही ना तुम्ही? सकाळी-सकाळी तुमचें दर्शन झाले आहे, म्हणून माझा सगळा दिवस चांगला जाऊन माझें कल्याण होईल. हनुमानाने सगळी हकीगत सांगून सीतेचा पत्ता विचारला.

बिभीषण :– तुमचें दर्शन झाल्यामुळे माझा विश्वास बसला आहे कीं रामाचें मला दर्शन अवश्य होईल. मी तर नीच आहे पण तुमच्यामुळे राम मला अवश्य आपले करून घेतील.

रात्री निजण्याच्या आधी आणि प्रातःकाळी जागल्याबरोबर प्रभुस्मरण आणि शुभविचार करा.

हनुमान अशोकवनांत आले. तेथे सीता समाधिअवस्थेंत बसून रामनामाचा जप करीत होती. तिचें शरीर क्षीण झालेले होते. हनुमंतांनी तिला मनोमन नमस्कार केला आणि वृक्षाच्या फांदीवर बसून रामकथा ऐकवायला सुरुवात केली. "तुम्हाला शोधायला अनेक वानर पाठविले गेले आहेत; त्यांतला एक मी आहे. मी रामचंद्रांचा दूत आहे. आज माझें जीवन सफल झाले आहे. साक्षात् आदिशक्ति सीतामातेला मी नमस्कार करीत आहे."

सीता– 'बंधु, कोण आहेस तू? प्रत्यक्ष समोर कां येत नाहीस तू? माझ्यासमोर ये.'

हनुमंताने समोर येऊन मातेला नमस्कार केला. माते, मी आहे रामचंद्राचा दूत. आज मला फारच आनंद झाला आहे. त्याने रामचंद्राचा निरोप सांगितला. 'ते तुझी उपेक्षा करीत नाहीत. ते लवकरच येथे येणार आहेत.'

माते, मला भूक लागली आहे. इथे फळे तर पुष्कळ आहेत, पण राक्षस लोक पहारा करीत आहेत.

सीता म्हणाली, खाली पडलेलीच फळें खा. तोडून खाऊ नकोस. हनुमंतांनी विचार केला– मातेने तोडायचे नाही सांगितलें आहे. वृक्षांना झोडून फळें खाली पाडण्याची मनाई केली नाही. त्यानें वृक्षांना हलवून हलवून फळें खाली पाडून आहार केला.

संत तर भोजन करीत असता सुद्धा भजन चालूच ठेवतात. अन्नाची निंदा पाप आहे.

हनुमंतांनी दिव्य वानराचें रूप घेतलें आणि शेपटीला तिचे काम करायला सांगितले. शेपटीने पुष्कळांना मारले. कित्येक राक्षसींचा संहार केला. इतक्यांत इंद्रजिताने तेथे येऊन ब्रह्मास्त्र सोडलें. हनुमंतांनी ब्रह्मास्त्राचा मान राखला. इंद्रजिताने हनुमानांना बांधून राजसभेंत आणलें. रावणानें विचारले–

'ए वानरा, तू कोठून आला आहेस? कां आला आहेस?'

हनुमान– 'हे दशानना! मी तुला उपदेश द्यायला आलो आहे. शंकरांना प्रसन्न करण्यासाठी तू तपस्वी झाला होतास. तरीही परस्त्री सीतेला बंदी बनविलेस? रामचंद्रांना शरण ये. ते तुझी सर्वच पापे क्षमा करतील.'

परंतु रावण काय समजणारा होता? तो तर अहंकारी होता. त्याने आपल्या सेवकांना सांगितलें कीं या वानराच्या शेपटीतच शक्ती आहे. जाळून टाका हे शेपूट. सेवक हनुमानांच्या शेपटीला कपडे गुंडाळू लागले. हनुमान आपले शेपूट वाढवू लागले. लंकेंतील बाजारांतले सगळेच कापड संपून गेले. कापड तूप-तेलांत भिजविलें गेले आणि मग त्याला आग लावली गेली.

हनुमान म्हणाले, हा तर शेपूट-यज्ञ होत आहे. रावणा, तुझ्या तोंडानें त्याला फुंकर घाल. रावण फुंकर घालू लागला तर त्याची दाढीच जळून गेली.

हनुमंतांनी अनेक घरांवर उड्या मारीत सर्वच लंकेला आग लावून दिली.

राक्षसी धावत धावत सीतेकडे गेल्या आणि म्हणाल्या, आपल्याकडे जो पुरुष आला होता त्याची शेपूट सगळ्या लंकेला जाळीत आहे.

सीता प्रार्थना करू लागली, 'हे अग्निदेवा! जर मी आपल्या पतीशिवाय इतर कोणत्याही पुरुषाचें चिंतन केले नसेल आणि पातिव्रत्याचें पूर्ण पालन केले असेल तर तू शांत हो. अग्निदेव चंदनापेक्षा सुद्धा शीतल झाला.

लंका जळत होती. हनुमान समुद्रकिनारी येऊन पाहू लागले. त्यांना वाटू लागले लंका पेटवली, हे चांगले झाले नाही. अशोकवन सुद्धा जर जळाले असेल तर! समुद्रस्नान करून ते अशोकवनांत आले. तिथे पाहिलें तर एकही झाड जळालें नव्हते. सीतेला भेटले. सीतेने आशीर्वाद दिले. अष्टसिद्धि तुझी सेवा करतील आणि सर्व जगांत तुझा जयजयकार होईल. परंतु या आशीर्वादांनी हनुमंताचें समाधान झालें नाही. त्यांनी रामसेवेविषयीं आशीर्वाद मागितला. हनुमान अमर आहेत. काल त्यांचा सेवक आहे.

हनुमान तिथून जाऊ लागले तर ब्रह्मदेवांनी त्यांच्या पराक्रमाची सर्व हकीगत पत्रांत लिहून दिली. हनुमान इतके नम्र आहेत कीं आपल्या कार्याचें वर्णन स्वमुखानें करणार नाहीत म्हणून पत्र लिहून दिलें.

हनुमान रामापाशी आले. लक्ष्मणाने रामाला पत्र वाचून दाखविलें. हनुमान म्हणाले, प्रभु, हा तर सर्व आपलाच प्रताप आहे. अशी कृपा करा कीं मी अभिमानी न व्हावें. राम विचार करू लागले, या हनुमानाला मी देऊ तरी काय? त्यांनी हनुमानांना आपल्या बाहूमध्यें घेऊन संतोष व्यक्त केला.

रामचंद्रांनी तेथून विजयादशमीच्या दिवशी प्रयाण केले आणि समुद्रकिनाऱ्यावर आले. त्यांचा नियम होता कीं दररोज शंकराची पूजा करावी. तेथे कोणते शिवलिंग मिळाले नाही, तर हनुमंतांना काशीहून शिवलिंग आणण्याची आज्ञा दिली. हनुमंतांना परतायला वेळ लागला म्हणून रामांनी वाळूचें शिवलिंग बनवून त्याची पूजा केली. तेच शिवलिंग रामेश्वर होय. जो रामेश्वराचें दर्शन करील तो देहत्यागानंतर ईशधामीं जाईल.

इकडे लंकेंत रावणानें नगरजनांची सभा बोलाविली. बिभीषण म्हणाला– दादा, रामाला शरण जा आणि सीतेला सुखरूप परत कर.

रावणानें रागारागानें बिभीषणाला लाथ मारली. धन्य आहे बिभीषण! ज्याने लाथ सहन करूनही मोठ्या भावाला नमस्कार केला. तुला जे योग्य वाटेल तेच तू कर. मी तर रामाला शरण जात आहे.

बिभीषणाने लंकात्याग केल्याबरोबर सर्व राक्षस आयुष्यहीन होऊन गेले.

साधुपुरुषाचा अपमान सर्वनाशाचें कारण होऊ शकतो.

बिभीषण वानरसेनेपाशी आला. त्याला विचार पडला होता कीं माझा येथे स्विकार केला जाईल कीं नाही? रावणाचा भाऊ असल्यामुळे माझा तिरस्कार तर करणार नाहीत ना? नाही! नाही! प्रभु तर अंतर्यामी आहेत. माझा मनोभाव शुद्ध आहे म्हणून ते मला अवश्य आपला मानतील.

सुग्रीवानें भगवंतांना बातमी सांगितली कीं रावणाचा भाऊ बिभीषण आला आहे. मला तर असे वाटते कीं ही राक्षसांची माया आहे. ते आपला भेद जाणू इच्छितात.

राम— पण बिभीषण काय म्हणत आहे ते तर सांगा.

सुग्रीव— तो तर म्हणत आहे, "राघवं शरणं गतः।"

हनुमान वकिली करू लागले— त्याच्या मनांत छलकपट नाही. त्याला आपण आपलाच करून घेतले पाहिजे.

राम— सुग्रीवा! बिभीषणाचें स्वागत करा आणि त्याला येथे घेऊन या. जेव्हां केव्हां जीव माझ्यासमोर येतो तेव्हां त्याच्या कोटिकोटि जन्मांचें पाप नष्ट होत असते.

जो मनुष्य मनाने निर्मल आहे तो मला प्राप्त करून घेऊ शकतो. मला छलकपट आणि छिद्रान्वेषण पसंत नाही.

सुग्रीव बिभीषणाला घेऊन आला. बिभीषण म्हणाला— नाथ, मी आपल्याला शरण आलो आहे. माझ्या भावाने मला लाथ मारून तिरस्कृत केलें आहे.

रामांनी आसनावरून उठून बिभीषणाचा सत्कार करीत म्हटलें— तू माझा भाऊ लक्ष्मणासमान प्रिय वाटत आहेस. लंकेचे राज्य तुलाच दिले जाईल.

बिभीषणालाही वाटलें होते कीं रावणाच्या मृत्यूनंतर प्रभु आपल्यालाच लंकापति बनवतील. आज त्याची इच्छा पूर्ण झाली.

सुग्रीव रामांना म्हणाला— आपण फार घाई करत आहांत. बिभीषणाला लंकेचे राज्य देण्याचें वचन तर देऊन टाकले, परंतु जर रावण शरण येऊन सीतेला बंधनमुक्त करील तर मग आपण त्याला काय द्याल?

रघुनाथ— मी जेव्हां कांही बोलतो ते विचार करूनच बोलतो. जर रावण शरण आला तर मी त्याला अयोध्येचें राज्य देईन.

रावण जर शरण आला तर त्याला अयोध्येचें राज्य देऊन आम्ही सर्वच भाऊ वनवास पत्करू.

**२१. रावण-वध व श्रीरामाचें सीतेसह अयोध्येंत आगमन:**

समुद्रावर दगडांचा सेतु बांधला गेला. दगडांवर रामनाम लिहिले म्हणजे ते तरंगू लागतात.

रामनामानें जर दगड तरू शकतात तर मग मनुष्य कां तरून जाणार नाही. विश्वास ठेवून श्रद्धेने रामनामाचा जप कराल तर भवसागर पार करू शकाल. या कलियुगांत याशिवाय इतर कोणता उपाय नाही. फत्तर सुद्धा रामनामानें तरून जातात.

रामचंद्रांनी लंकेंत प्रवेश केला. अंगदाला शिष्टाईसाठी पाठविले गेले. अनेक राक्षस मरून पडले. लक्ष्मणाने कपटाने इंद्रजिताचें मस्तक तोडून टाकले. सुलोचनेने सती जाण्याची इच्छा केली. तिनें रावणाजवळ आपला पति इंद्रजित याचे मस्तक मागितले. रावण म्हणाला, ते तर रामापाशी आहे.

त्याच्याजवळ जा, आणि तुझ्या पतीचें शिरकमळ मागून घे.

सुलोचना म्हणाली– मला शत्रूकडे कशाला पाठविता ? मी सुंदर आहे म्हणून तिथे कांही अनर्थ झाला तर!

रावण रामचंद्रांची प्रशंसा करीत म्हणू लागला– राम तर तुला मातेसमानच मानील. तुझी स्तुति करील. आणखी तर मी काय सांगू? मी रामाला आपला शत्रु समजतो, पण राम मला शत्रु मानत नाही. रामाला शरण जा. ते तुला अवश्य इंद्रजिताचें मस्तक परत देतील.

सुलोचना रामाजवळ आली व म्हणाली, माझ्या पतीचा हात अंगणांत आला आणि त्यानें पत्र लिहून दिले. रामाने तिला विचारले, जड हात लिहू कसा शकेल? तू आपल्या पतीची प्रार्थना कर आणि जर डोळे हसले तर मी समजेन कीं जड हातानें पत्र लिहिलें आहे.

सुलोचना खूप मनधरणी करीत आहे, पण मस्तक हसत नाही. नाथ, तुम्ही अप्रसन्न आहांत! असे ऐकल्याबरोबर मस्तक डोलू लागले आणि हसू लागले.

शेषनाग लक्ष्मणाचें रूप घेऊन आले.

मस्तकाने सुलोचनेला म्हटले– तुझ्या पित्याने मला मारले आहे.

आज श्वशुर आणि जावई यांमध्ये नाही तर दोन पतिव्रतांमध्ये युद्ध होत आहे. ऊर्मिला आणि सुलोचना यांचा संग्राम आहे. सुलोचनेचा पराजय झाला. सुलोचनेने लक्ष्मणाला म्हटले– जय तुमचा नाही तर ऊर्मिलेचा झाला आहे. तिचें पातिव्रत्य माझ्यापेक्षा श्रेष्ठ आहे. माझे पति पापी रावणाच्या बाजूने असल्याने दुर्बल आहेत. माझे पति पाप्याला साहाय्य करीत होते म्हणून माझा पराजय झाला आणि ऊर्मिलेचा जय झाला. परस्त्री हरण करणाऱ्याला माझे पति मदत करीत होते म्हणून मला हरावे लागले.

सुलोचना सती झाली. रामांनी तिची खूप प्रशंसा केली.

राम आणि रावणामधे भयंकर युद्ध जुंपलें. रावणाच्या बेंबीत जे अमृत होते ते अग्न्यास्त्राने शोषून घेतले गेले. रावणाचा मृत्यू झाला.

हनुमानांनी रामाच्या विजयाची बातमी सीतेला कळविली.

प्रभूंनी स्वतः कांहीच घेतलें नाही. लंकेचे सबंध राज्य बिभीषणाला सोपवून दिले. वानरांचा सन्मान केला.

आता रामचंद्र सीता, लक्ष्मण आणि हनुमान सुग्रीवादि पुष्पक विमानांत बसून अयोध्येच्या दिशेकडे परतले. वाटेंत त्यांनी सीतेला रामेश्वराचें दर्शन करविले.

विमान प्रयागराजला आलें. हनुमंतांना भरताला भेटण्यासाठी पुढे जाण्याची आज्ञा केली. हनुमान भरतांजवळ आले. भरत रामपादुकांची पूजा करीत सीतारामांचा जप करीत होते. हनुमंतांनी सांगितलें– हे कुलश्रेष्ठा भरता! राम-लक्ष्मण-जानकी येत आहेत.

भरत विमान पाहून आनंदित झाले. विमानांतून सर्वजण खाली उतरले. रामचंद्रांनी भरताला आपल्या बाहूंमध्ये घेऊन आलिंगन दिलें. दोघांची भेट झाली तेव्हां लोकांना हे समजतच नव्हते कीं यात राम कोणता आणि भरत कोणता! दोघांचा रंग श्याम, वल्कले एकसारखी आणि शरीरें कृश.

वसिष्ठ ऋषींनी राज्याभिषेकाचा मुहूर्त काढला. वैशाख मासांतील शुक्लपक्षांतील सप्तमी. राज्याभिषेक विधि संपन्न झाला. भगवान रामचंद्र आणि सीता सुवर्णसिंहासनावर बसले.

रामराज्यांत कोणी दरिद्री, रोगी, लोभी, भांडखोर नव्हते. प्रजा सर्व प्रकारें सुखी होती. त्यांच्या

राज्यांत वकील किंवा वैद्यांचे कांहीच काम नव्हते. त्यावेळी वकील आणि वैद्य बेकार होते. बहुधा याचमुळे आजकाल ह्या धंद्यांना पुष्कळच भाव आला आहे.

रामराज्यांत सर्व प्रजा एकादशीचें व्रत करीत असे.

एकादशीच्या दिवशी अन्न शिजविण्याची गोष्ट तर दूरच राहो, अन्नाचें दर्शन सुद्धा घेऊ नये. कथा ऐकता तर एखादे व्रतही करा. जप करीन, एकादशी करीन, प्रभुपूजेच्या आधी जेवणार नाही, असा एखादा नियम पाळाल तर कथाश्रवणाचें फळ मिळेल.

**२२. हनुमंताची दास्यभक्ती :**

हनुमंत रामचंद्रांची सेवा करीत आहेत. ते अशा प्रकारे सेवा करीत कीं इतर कोणाला सेवा करायला संधीच मिळत नसे. सीतेला वाटू लागले– या हनुमानामुळे मला तर आपल्या पतीची कांही सेवाच करता येत नाही. सेव्य एकच असून सेवक अनेक असतील तर अशी विषमता होतच असते.

दासोऽहम् नंतर सोऽहम् होऊ शकते. ज्ञानी लोक सुद्धा आधी दास्यभाव ठेवतात आणि नंतर सोऽहम्‌ची भावना करतात.

सीतेने आपल्या पतिदेवांना सांगितले– मी सेवा करीन. हनुमानाकडील सेवा तुम्ही स्वीकारूं नका.

राम– हनुमानाला सुद्धा सेवेची संधि दिलीच पाहिजे. त्याने आतापर्यंत माझी खूपच सेवा केली आहे. मी त्याचा ऋणी आहे. प्रभूला ह्या गोष्टीचें वाईट वाटले कीं लोक हनुमंताला नीट ओळखत नाहीत आणि नीटपणे समजूनही घेत नाहीत.

सीता, भरत आणि शत्रुघ्न हनुमानाला सेवा करू देत नाहीत. रामसेवाच तर हनुमंतांचे जीवन होते.

सेवा आणि स्मरणासाठीच जो जिवंत राहतो तोच तर खरा वैष्णव असतो. वेषाने वैष्णव होणे किंवा वैष्णव म्हणवून घेणे कठीण नाही, परंतु हृदयाने वैष्णव होणे फार कठीण आहे.

हनुमंतांनी सीतेला विचारले– मातोश्री! तुम्ही माझ्यावर रागावला आहांत काय? आपण मला रामचंद्रांची सेवा कां करू देत नाही?

सीता– काल सेवेचे सर्व काम वाटले गेले आहे आणि तुझ्यासाठी आता कांहीच काम शिल्लक नाही.

हनुमान– एक सेवा शिल्लक आहे! राम जांभई देतील त्यावेळी चुटकी कोण वाजवील? जांभई आल्यावर चुटकी वाजविली पाहिजे, नाहीतर आयुष्य कमी होते.

सीता– ठीक आहे तर! ही सेवा तू करीत जा.

हनुमान आजपर्यंत दास्यभावानें रामचंद्रांचें फक्त चरणच न्याहाळीत असत. आता मातोश्रींच्या आज्ञेने मुखारविंदाचेंही अवलोकन करू लागले आहेत.

सीता आणि राम आपापसांत गोष्टी करीत असतील तरी मध्ये हनुमान आहेतच! सगळा दिवस तर विनोदांत निघून गेला. आता रात्र आली. रामांजवळ हनुमान पहिल्यापासूनच आलेले आहेत.

सीता– हनुमंत! आता तू जाऊ शकतोस!

हनुमान– आपणच तर माझ्यावर ही सेवा सोपवली आहे. प्रभूला केव्हां जांभई येईल हें कोण सांगू शकेल? म्हणून मला तर इथेच राहावे लागेल.

सीता रामाला म्हणाली– नाथ! आपल्या ह्या सेवकाला आता बाहेर जाण्याची आज्ञा द्या ना!

राम– मी हनुमंताला असे कसे म्हणू? मी त्याचा ऋणी आहे. त्याच्या एकेका उपकारासाठी मी जरी आपला एकेक प्राण दिला, तरी ते कमीच होईल.

प्रभूंचें असे बोलणें ऐकूनही सीतेने हनुमंताला बाहेर जाण्याची आज्ञा दिली. ते बाहेर येऊन विचार करू लागले कीं एक सेवा मिळाली होती ती सुद्धा हिसकावून घेतली गेली आहे. आता साऱ्या रात्रभर मी चुटकीच वाजवीत राहीन म्हणजे रामाची सेवा केव्हांतरी आपोआपच होत राहील.

इकडे राम विचारांत पडले आहेत कीं माझ्यामुळेच हनुमान जागत राहिला आहे. तो जागत राहावा आणि मी झोपावे हें ठीक नाही.

कीर्तनभक्ति भगवंताला अतिशय प्रिय आहे.

माझा हनुमान जागत आहे! मी एकटा कसा झोपू शकेन? माझ्या हनुमंताला माझ्या पत्नीने बाहेर घालवून दिलें आहे. रघुनाथांनी देखील युक्ति शोधली. ते वारंवार जांभई देऊं लागले आणि हनुमंताबरोबर जागे राहू लागले.

सीता मनांतल्या मनांत घाबरली. पतिदेव तर कांहीच बोलत नव्हते. ती धावतच कौसल्येकडे गेली आणि म्हणाली– मातोश्री! त्यांना एखाद्या राक्षसाची दृष्ट लागली आहे असें वाटतें. वसिष्ठांना बोलावले गेले. ते समजले कीं भगवंतांच्या एखाद्या लाडक्या भक्ताचा आज अपमान झाला आहे. भक्ताच्या दुःखामुळे भगवंतही दुःखी आहेत.

वसिष्ठांनी सीतेला विचारले– आजचा सगळा दिवस कसा काय गेला होता? कांही गडबड तर झाली नव्हती ना?

सीता– हनुमंताकडून सेवाभार काढून घेतल्यामुळे हे सगळे झाले आहे आणि भगवंतांनी नेहमीप्रमाणें भोजनही आज नीटसे घेतलें नाही.

हनुमंताची चुटकी वाजवण्याची गोष्टही तिने सांगितली.

सगळेच रामाच्या महालांत आले. तेथे हनुमंत नाचत नाचत रामनामाचा जप करीत होते.

वसिष्ठ– महाराज, कीर्तन करा परंतु चुटकी वाजवू नका. तसें केल्याने रामांना जांभई येईल.

जग रामाच्या आधीन आहे आणि राम आपल्या भक्ताच्या आधीन आहेत.

तर तसे तुम्ही कोण आहात? हनुमान सांगतात– देहबुद्धीने तर मी रामाचा दास आहे. जीवबुद्धीने रामाचा अंश आहे, आणि आत्मदृष्टीनें पाहिले तर आम्ही एकच आहोत. माझ्यांत आणि रामांत कांहीच भेद नाही. भक्त आणि भगवंत एकच आहेत.

ब्रह्माचा ज्ञाता ब्रह्माहून वेगळा राहू शकत नाही.

रामायणाची कथा करुणरसप्रधान आहे. बालकांड सोडून इतर सर्वच कांडे अश्रूंनी भरलेली आहेत. रामायण संपल्यावर वाल्मीकींना वाटू लागले कीं यात तर फक्त करुणरसच आहे. म्हणून नंतर त्यांनी आनंद-रामायणाची रचना केली. त्यांत शोकपूर्ण प्रसंग नाहीत.

महापुरुषांनी तर इथपर्यंत म्हटले आहे कीं हे सीते! हे देवी! या जगांत तू कां आलीस? हे जग तुझ्याकरता अपात्र होते.

रामचंद्राचें चरित्र दिव्य आहे. रामचंद्राप्रमाणें मर्यादापालन, माता-पित्याची सेवा, एकपत्नीव्रत, भ्रातृप्रेम इत्यादी सर्व असल्यावरच राम भेटतात, राम भेटतील तर आराम मिळेल. रामाशिवाय आराम शक्य नाही. रामाशिवाय सुख-शांति नाही.

रामायणांतले एक एक पात्र आदर्श आहे–

**श्रीरामासारखा कोणी पुत्र झाला नाही. वसिष्ठांसारखे कोणी गुरू झाले नाहीत.**
**दशरथासारखा कोणी बाप झाला नाही. कौसल्येसारखी कोणी माता झाली नाही.**
**श्रीरामासारखा कोणी पति झाला नाही. सीतेसारखी कोणी पत्नी झाली नाही.**
**भरतासारखा कोणी भाऊ झाला नाही. रावणासारखा कोणी शत्रू झाला नाही.**

मातृप्रेम, पितृप्रेम, पुत्रप्रेम, भ्रातृप्रेम, पतिप्रेम, पत्नीप्रेम यांचे सर्वोच्च आदर्शरूप रामायणांत दाखविले गेले आहे.

**२३. रामायणाचें श्रेष्ठत्व व आध्यात्मिक रहस्य:**

एकनाथांनी भावार्थ रामायणांत लिहिलें आहे कीं रावणाची भक्ति शत्रुभक्ति होती, विरोधभक्ति होती. रावणानें विचार केला कीं मी एकटाच जर रामाची भक्ति करीत राहीन तर माझा एकट्याचाच उद्धार होईल. माझे हे राक्षस तर कधीच प्रभूचें नाव घेणार नाहीत. म्हणून मी जर रामाशीं शत्रुत्व करीन तर रामाबरोबर युद्ध होईल. या युद्धांत सर्व राक्षस रामाकडून मारले जातील व मृत्यूसमयीं त्यांस रामाचें दर्शन घडेल. पर्यायाने उद्धार होईल. याप्रमाणे सर्व राक्षस-समुदायाच्या उद्धाराच्या हेतूनेच रावणानें रामाशी वैर विकत घेतले. आपल्या रामाशी असलेल्या शत्रुत्वाचें हेंच कारण रावणाने कुंभकर्णाला सांगितले होते.

रामायण श्रीरामांचें नामस्वरूप आहे. रामायणाचें एक एक कांड रामांचे (एक एक) अंग आहे.

**बालकांड श्रीरामांचे चरण आहेत. अयोध्याकांड श्रीरामांच्या जंघा आहेत.**
**अरण्यकांड श्रीरामांचें उदर आहे. किष्किंधाकांड श्रीरामांचें हृदय आहे.**
**सुंदरकांड श्रीरामांचा कंठ आहे. लंकाकांड श्रीरामांचें मुख आहे.**
**उत्तरकांड श्रीरामांचें मस्तक आहे.**

श्रीरामांचा नामस्वरूप रामायणग्रंथ जीवमात्राचा उद्धारक आहे. श्रीराम जेव्हां साक्षात् या पृथ्वीतलावर अवतीर्ण होतात त्या वेळीं अनेक जीवांचा उद्धार होतो. इतकेच नाही, तर जेव्हां ते प्रत्यक्ष विद्यमान नसतात तेव्हांही रामायण अनेक जीवांचा उद्धार करते. श्रीरामांनी स्वतः तर थोड्याच जीवांचा उद्धार केला होता; पण रामायण अजूनसुद्धा अनेक जीवांना प्रभूच्या मार्गाकडे घेऊन जात आहे. त्याने अनेकांचें कल्याण केले आहे, करीत आहे आणि करीत राहील. म्हणून एका दृष्टीनें आम्ही रामायणाला रामापेक्षा श्रेष्ठ म्हटलें तर कांही हरकत नाही.

रामचरित्र मार्गदर्शक आहे. रामायणापासून सगळ्यांनाच शिकवण मिळते. आपलें मन कसे आहे हे जाणायचे असेल तर रामायण वाचा. रामायणाचें मनन केल्यानें त्यांत आपलें मन दिसून येईल. रामायण मनोमालिन्याचें दर्पण आहे. ज्याचा अधिकतर वेळ निद्रा आणि आळसांत जातो तो कुंभकर्ण होय. परस्त्रीचें कामभावाने चिंतन करणारा रावण आहे. रावण अर्थात काम. कामच रडवीत असतो. कामच दुखवीत असतो. जो रडवितो तो रावण. परमानंदांत डोलणारे राम आहेत.

रामायणाची सात कांडें आहेत. त्या सर्वांतील कथासार संक्षिप्तांत सांगितले गेले आहे. आता त्याचें आध्यात्मिक रहस्य पाहायचे आहे. याची सात कांडे मनुष्याच्या उन्नतीच्या सात पायऱ्या आहेत.

एकनाथ महाराजांनी म्हटलें आहे कीं कांडविशेषांच्या नावांतही रहस्य आहे.

प्रथम कांड बालकांड आहे. बालकासारखे निर्दोष व्हाल तर रामाला प्रिय व्हाल. बालके प्रभूंना प्रिय आहेत. कारण बालके निरभिमानी असतात. त्यांच्यांत छलकपट नसते. विद्या, धन आणि प्रतिष्ठा वाढल्यावर सुद्धा आपलें हृदय बालकासारखें निर्दोष आणि भोळेभाबडें असेच ठेवा. बालकांड निर्दोष कांड आहे. राम कोणाला भेटतात? जो बालकासारखा निर्दोष असतो त्यालाच. बालकांसारखे निर्दोष आणि निर्विकारी बनायचा प्रयत्न करा.

डोळ्यांच्या द्वारें दोष मनांत प्रविष्ट होतो. म्हणून दृष्टीवर अंकुश ठेवाल तर जीवन निर्दोष होईल. जशी दृष्टी तशीच सृष्टी. सृष्टी कोणाला सुखरूप वाटते तर कोणाला दुःखरूप. सृष्टींत तर तसे कांही सुखही नाही आणि दुःखही नाही. सुख आणि दुःख तर आपल्या दृष्टीतच असते. याच कारणाने तर भगवान् शंकराचार्य संसाराला अनिर्वचनीय मानतात. राम-स्वरूप वर्णनाच्या पलीकडे आहे.

बालकांडासारखी निर्दोष, निर्विकारी दृष्टी ठेवाल तर रामाच्या स्वरूपाला ओळखू शकाल. जीवनांत सरलता येते संयमाने, ब्रह्मचर्याने. जीव मानापमान विसरून जाईल तर जीवनांत सरलता येईल. बालकांप्रमाणें निर्मोही आणि निर्विकारी बनल्याने तुमचें शरीर अयोध्या होईल. जेथे युद्ध, वैर, ईर्षा नाही तीच अयोध्या असते.

बालकांडानंतर अयोध्याकांड आहे. अयोध्याकांड माणसाला निर्विकारी बनविते. जेव्हां जीव भक्तिरूपी शरयू नदीच्या किनाऱ्यावर नेहमी निवास करतो तेव्हांच मनुष्य निर्विकार होतो.

भक्ति अर्थात प्रेम. अयोध्याकांड प्रेम प्रदान करते. रामाचे सावत्र आईवरील प्रेम, रामाचें भरतप्रेम इत्यादी सर्व या कांडांत आहे. रामाचें निर्विकारपण येथेच दिसून येते.

आनंद-रामायणांत प्रत्येक कांडाची फलश्रुति निरनिराळी सांगितली आहे. जो अयोध्याकांडाचा पाठ करतो त्याचें घर अयोध्या होते. त्याच्या घरांत भांडणतंटे होत नाहीत. गृहस्थाश्रमींसाठी हें कांड आवश्यक आहे. कलहाचें मूळ आहे धन आणि प्रतिष्ठा. अयोध्याकांडाचें फळ आहे निर्वैरता.

शास्त्र म्हणते— सर्वात आधी तर आपल्या घरांतील सर्व व्यक्तींविषयीं भगवद्भाव ठेवला पाहिजे. जो आपला भाऊ इत्यादींमधे प्रभूला पाहू शकत नाही त्याला मंदिरांत भगवान कसे दिसतील?

जग निर्माण केल्यावर त्यांतील प्रत्येक वस्तूंत भगवंतांनी वास केला आहे.

जेव्हां कैकेयीने म्हटले कीं तिने भरताला राज्य दिलें आहे तेव्हां रामाने वनांत जाताना म्हटलें होते— माते, माझ्या भावाला जर यांतच सुख मिळत असेल तर मला वनवास स्वीकार्य आहे. माझी तर हीच भावना आहे कीं माझा भाऊ सुखी व्हावा.

ज्याला भावांत देव दिसत नाही त्याला मंदिरांतही देव दिसणार नाही. मूर्तिवासी भगवंत आमच्यासाठी धावत येत नाहीत. तरी पण त्यांच्यांत भगवद्भाव स्थिर करायचा आहे. परंतु सजीव देवांशी (कुटुंबीय जनांशी) जो भगवद्भाव जोडू शकत नाही तो दगडाच्या मूर्तींविषयी भगवद्भाव कसा जोडू शकेल?

सृष्टिनिर्माणानंतर सर्वच पदार्थांत भगवंतांनी वास केला आहे. जोपर्यंत ते प्रवेश करीत नाहीत तोपर्यंत सृष्टि निरर्थक आहे.

सगळ्यांमधेच ईश्वर आहे. माझे भाऊ-बहीण, आई-बाप सर्वांमधे तोच ईश्वर आहे. आपल्या भावाच्या सुखासाठी हसत हसत वनगमन करून रामांनी अलौकिक आदर्श स्थापित केला आहे. भरताचें भ्रातृप्रेमही तसेंच दिव्य होते. त्यांनी राज्याचा स्वीकार केला नाही. माझे मोठे बंधू वनांत धूळ तुडवीत आहेत, कंदमुळे खात आहेत, दुःखी होत आहेत; तेव्हां मला हें राज्य स्वीकार्य नाही. माझ्याकारणेंच

त्यांना दुःखी व्हावे लागत आहे.

अयोध्याकांडाच्या पठणानें भांडणतंटा मिटून जातो.

जीवनाला विशुद्ध प्रेममय बनवा.

अयोध्याकांडानंतर येते अरण्यकांड. ते वासनारहित बनविते. निर्वैर झाल्यानंतर सुद्धा वासना त्रास देतात. या अरण्यकांडाच्या मननानें वासना निर्मूल होईल. अरण्यवास करून तप केल्याशिवाय जीवनांत दिव्यता येत नाही. राजा असून देखील रामचंद्रांनी सीतेबरोबर वनवास केला आणि तपश्चर्या सुद्धा केली. तप केल्यानंतर राम राजे झाले.

ज्याने प्रथम तपश्चर्या केली असेल तो भोगोपभोगाचे प्रसंगीं संयम आणि सावधानतेने कार्य करील.

सगळ्याच महान व्यक्तींनी अरण्यवास केला होता. महाप्रभूंनी अनवाणीच भारताची यात्रा केली होती. ते दोनाशिवाय जास्त वस्त्रे देखील ठेवीत नसत. जीवनांत तपश्चर्या आवश्यक आहे.

वनवासाशिवाय जीवनांत सुवास येत नाही. वनवासाविना जीवन सत्त्वहीन राहून जाते. जास्त नाही तरी वर्षांतून कमीतकमी एक महिना तरी एखाद्या पवित्र नदीच्या किनारी वास केलाच पाहिजे. जेथे भगवंत आणि तुमच्याशिवाय इतर कोणी नसेल अशा ठिकाणीं तिसरा आला रे आला कीं गडबड सुरू होते. वनवास मनुष्याच्या हृदयाला कोमल बनवितो. वनवासाने विश्वास बसतो कीं भगवंताशिवाय आपलें कोणीच नाही.

अरण्यकांड आम्हाला वासनारहित बनविते.

स्वतः भगवंत असून सुद्धा रामचंद्रांनी हें दाखवून दिलें कीं तपाशिवाय वासना नष्ट होऊ शकत नाही. उत्तम संयम तपच आहे. पहिल्याप्रथम तर जिभेवर संयम ठेवायचा आहे. वनवासाच्या काळीं रामांनी अन्नाहार नाही, फळाहारच केला होता. अन्नांत निहित असलेला रजोगुण काम उत्पन्न करतो. सात्त्विक आहाराशिवाय कामाचा नाश अशक्य आहे. रामांनी वनांत कंदमुळांचें सेवन करून तप केले होते. वनांत त्यांनी कोणत्याही धातूला स्पर्श केला नव्हता. नारळाच्या करवंटीतूनच जलपान केले होते. सीता बरोबर असूनही राम निर्विकारीच राहिले. वासनेचा हळू हळू कशा प्रकारे नाश केला जाऊ शकतो हे अरण्यकांड दाखविते.

जर वासनेवर विजय मिळवायचा असेल तर जीवन सात्त्विक केलें पाहिजे. तपश्चर्या कराल तरच रावण मरेल. कामरूपी रावणाला मारण्यासाठी अरण्यवासरूपी तपश्चर्या आवश्यक आहे. ह्या अरण्यकांडांत शूर्पणखाकडे अर्थात मोहाकडे भगवंत कधीच पाहात नाहीत. या कांडांत शबरी (भक्ति) सुद्धा आहे. तर ते शबरीकडे अर्थात शुद्ध भक्तीकडेच पाहतात. मोहाचा नाश करा आणि शुद्ध भक्ती आपलीशी करा.

मनुष्य निर्वैर, निर्विकार आणि वासनारहित झाला म्हणजेच किष्किंधाकांडांत जीवाची ईश्वराशी मैत्री जमते.

अरण्यकांडांत वासनेचा विनाश झाल्यावर किष्किंधाकांडांत सुग्रीवाशी रामाची मैत्री झाली. जीव जोपर्यंत कामाच्या मैत्रीचा त्याग करीत नाही तोपर्यंत ईश्वराशी मैत्री होत नाही.

ह्या किष्किंधाकांडांत सुग्रीव आणि राम अर्थात जीव आणि भगवान यांच्या मैत्रीचें वर्णन आहे. सुग्रीवाने कामाचा त्याग केला म्हणून ईश्वराशी भेट होऊ शकली. हनुमान (ब्रह्मचर्य आणि संयम) जेव्हां मध्यस्थी करतात तेव्हांच जीवाची ईश्वराशी भेट शक्य होते. ज्याचा कंठ सुरेख आहे तोच सुग्रीव.

कंठाला शोभा अलंकाराने नाही, तर ब्रह्मचर्य आणि रामजप यांनीच येते. ईश्वर आणि जीवाची मैत्री हनुमान-ब्रह्मचर्यावरच आधारित आहे. हनुमंत ब्रह्मचर्य आणि संयमाचें प्रतीक आहे.

ज्याचा कंठ सुंदर असतो त्याचीच रामाशी मैत्री जमते. परंतु सुग्रीव एकटा कांही करू शकत नाही. त्याला हनुमान-ब्रह्मचर्याचा सहयोगही आवश्यक आहे. ब्रह्मचर्याच्या शक्तीशिवाय भजनांतून आनंद मिळायचा नाही. कारण एकाग्रता होत नाही. हनुमानरूपी ब्रह्मचर्याच्या साहाय्यावाचून रामाशी मैत्री होऊ शकत नाही. सुग्रीवाला हनुमंतांमुळेच राम आपले करतात.

सुंदरकांड– ईश्वराशी मैत्री झाली म्हणून जीवन सुंदर झाले. म्हणून किष्किंधाकांडानंतर आले सुंदरकांड. जोपर्यंत जीव प्रभूशी मैत्री करीत नाही तोपर्यंत त्याचें जीवन सुधारत नाही.

किष्किंधाकांडानंतर आलेले सुंदरकांड खरोखरच सुंदर आहे. यांत रामभक्त हनुमंताची कथा वर्णिली आहे. भागवताच्या दहाव्या स्कंधासारखेच हे सुंदरकांड सुद्धा फार रोचक आहे. भागवतांत जे स्थान दशमस्कंधाला आहे तेच स्थान रामायणांत सुंदरकांडाला आहे. सुंदरकांडांत हनुमंतांना सीतेचें दर्शन झालें. सीता-पराभक्ति आहे. परंतु तिचें दर्शन केव्हां होते ? ज्याचें जीवन सुंदर होऊ शकते त्यालाच सीता-पराभक्तीचें दर्शन होऊ शकते. संसारसागर पार करणारालाच सीता-पराभक्तीचें दर्शन होऊ शकते. एकटे हनुमंतच संसारसमुद्र पार करतात. ब्रह्मचर्य आणि रामनामाच्या प्रतापामुळेच त्यांच्यांत दिव्यशक्तीचा संचार झाला. त्यांच्याशिवाय इतर कोणीच हा समुद्र पार करू शकले नाही. ब्रह्मचर्य आणि रामनामानेच त्यांना ही अपार शक्ति दिली. समुद्र पार करतानासुद्धा एखादी बाधा येऊन थडकते. सुरसा त्रास देते. चांगले चांगले रसच सुरसा आहेत. सुरसा नवी होती. नव्या नव्या रसांची वासना ठेवणारी जीभ हीच सुरसा आहे. सुरसेला हनुमानरूपी संयमच नष्ट करू शकतो. जे संसारसागर पार करू इच्छितात त्यांना आपली जीभ वश करावी लागेल. स्वादवासनेला मारावे लागेल.

जीवनाला जर सुंदर करायचे असेल तर ते भक्तिमय करा. सीता पराभक्ति आहे. तेथे शोक राहात नाही. म्हणून सीतेचा जेथे वास आहे तेच अशोकवन होय. ब्रह्मदृष्टीची सिद्धि झाल्यावर शोक राहातच नाही. तेच अशोकवन होय.

लंकाकांड– जीवन भक्तिपूर्ण आणि सुंदर झाल्यावर लंकाकांडांत राक्षसांचा नाश झाला. राक्षस मेले की कामही मरतो– क्रोधही नष्ट होतो. भक्तिदेवीच्या दर्शनाने जीवन सुंदर झाले. लंकाकांडांतला रावणच काम, आणि तो नष्ट झाला.

भक्तिरसाने परिपूर्ण झाल्यावरच जीवन सुंदर होत असते. जो कामाला मारू शकतो तो काळालाही मारू शकतो. ज्याला काम मारतो त्याला कालही मारतो. लंका शब्दांतील अक्षरांना मागेपुढे केले म्हणजे काल होते. काल सगळ्यांनाच मारीत असतो. पण हनुमान त्यालाही मारतात. ते लंकेला अर्थात काळाला जाळून टाकतात. हनुमंताना काल मारू शकत नाही; कारण ते ब्रह्मचर्याचें पालन करतात आणि पराभक्तीचें दर्शन करीत असतात.

उत्तरकांड– तुलसीदासांनी या कांडांत सर्वकांही भरलेले आहे. या कांडांत मुक्ति मिळेल. गरुड आणि काकभुशुंडी यांचा संवाद पुनःपुन्हा वाचा. जोपर्यंत राक्षस-कामाचा विनाश होत नाही तोपर्यंत उत्तरकांडांत प्रवेश मिळत नाही. उत्तरकांडांत भक्तीची कथा आहे. भक्त कोण असतो ? भगवंतापासून एक क्षणभर देखील जो विभक्त होत नाही तो भक्त.

पूर्वार्धांत जो रावणाला मारतो त्याचेच उत्तरकांड सुंदर होते. तोच वृद्धावस्थेंत राज्य करतो. जीवनाच्या पूर्वकांडांत म्हणजे यौवनावस्थेंतच कामाला मारायचा प्रयत्न कराल तेव्हांच तुमचा उत्तरार्ध–

उत्तरकांड चांगला होईल. म्हणून जीवनाला सुधारण्याचे प्रयत्न युवावस्थेपासूनच केले पाहिजेत.

या प्रकारे ही सात कांडे मानवजीवनाच्या उन्नतीचें सात सोपान आहेत.

रामकथा सागरासारखी आहे. रामकथा अमृतकथा आहे. परंतु यातच गुरफटलेले राहाल तर कान्हा केव्हां येईल ?

शंकरांप्रमाणें रामाचें नाव हृदयांत ठेवाल तर चांगलेच होईल. म्हणून नेहमी रामाचें नाव जपत रहा. हनुमान म्हणतात, सर्वात मोठी विपत्ति त्याचवेळी येते कीं, ज्यावेळीं रामनामाचें स्मरण ठेवले जात नाही.

रावण इत्यादी राक्षसांचा संहार करून राम अयोध्येला परतले. त्यांचा राज्याभिषेक झाला. राज्याभिषेकानंतर रामांनी अयोध्यावासी जनांना (मानवसमाजाला) उपदेश दिला.

हे मानवशरीर मिळालें आहे ते विषयभोगासाठी नाही. विषयसुख घटकाभरासाठी स्वर्गसुखासारखे सुखद वाटते, परंतु अंती तर दुःख, दुःख आणि दुःखच हाती लागते. मानवशरीर मिळूनही जो मनुष्य फक्त विषयांच्याच मागे लागतो तो अमृताच्या बदल्यांत विषच घेत असतो. म्हणून असें कधीच करू नका.

अर्थात भगवंतांना भावानें भजा, कारण जीवन आता फारच थोडे बाकी राहिले आहे.

सुखोपभोगानें कधीच शांति मिळत नाही.

### २४. ययातीची कथा :

ययाति राजाकडे पहा. त्याचे लग्न शुक्राचार्यांची मुलगी देवयानी हिच्याशीं झालें होते.

एकदा देवयानीबरोबर वृषपर्वा राजाची मुलगी शर्मिष्ठा आणि इतर सख्या स्नानासाठी गेल्या होत्या. स्नानादि करून जेव्हां त्या सर्व आपापली वस्त्रें नेसू लागल्या तेव्हां शर्मिष्ठा चुकीने देवयानीचें वस्त्र नेसली. देवयानीनें रागाच्या भरात शर्मिष्ठेला खूपच झोंबणारी कटु वचनें ऐकविली. तेव्हा शर्मिष्ठेलाही राग आला आणि तिनें देवयानीची वस्त्रें हिसकावून घेऊन तिला विहिरींत ढकलून दिले आणि सर्वजणी निघून गेल्या.

इकडे शुक्राचार्यांनी आपल्या मुलीविषयीं वर्तमान ऐकले तर ते वृषपर्वाच्या नगराकडे निघाले. तिकडे वृषपर्वासुद्धा गुरुजींची क्षमा मागण्यासाठी आला. तर गुरुजींनी आपल्या मुलीला प्रसन्न ठेवण्याचा प्रस्ताव ठेवला. देवयानी म्हणाली– मी विवाहानंतर जेथे कोठे जाईन तेथे तुझी मुलगी शर्मिष्ठा माझी दासी म्हणून आली पाहिजे. शर्मिष्ठा दासी होऊन ययाति राजाच्या महालांत आली.

शुक्राचार्यांनी ययाति राजाला शर्मिष्ठेबरोबर विषयसुख भोगणें वर्ज्य केले होते. राजाने शुक्राचार्यांच्या आज्ञेचें उल्लंघन केलें तर शुक्राचार्यांनी त्याला वृद्धत्व दिले. ययातीने प्रार्थना करून गुरुजींना विचारले कीं, त्याचें वृद्धत्व कसे दूर होऊ शकेल ? शुक्राचार्य म्हणाले: तुझी वृद्धावस्था घेऊन त्याच्या बदल्यांत कोणी आपलें यौवन तुला देईल तरच कांही उपाय आहे.

राजाने आपलाच मुलगा पुरू याचें यौवन घेतलें, आणि हजारो वर्षें विषयसुखाचा उपभोग घेतला, तरी पण त्याची तृप्ति झाली नाही. पण त्याच्या मनांत वैराग्य उत्पन्न झालें. त्याने जगाला उपदेश दिला–

विषयांचा उपभोग घेत राहिल्याने कामवासना कधीच तृप्त किंवा शांत होत नाही. उलट तुपाच्या आहुतीनें अग्नि जसा अधिकच भडकतो तशीच वासनाही उग्र होत जाते. सुखोपभोगाने वासना अधिकाधिक

वाढत जाते, कमी होत नाही.

मनुष्याचें शरीर तर म्हातारे होत जाते, पण वासना-तृष्णा कधीच वृद्ध होत नाही.

भर्तृहरीनें सुद्धा म्हटले आहे:— भोगांचा नाही पण आमचाच उपभोग होत असतो. तृष्णा नाही आम्हीच जीर्ण होत असतो.

भागवत तर गीतेचें भाष्य आहे. गीतेच्या सिद्धान्तांचें दृष्टान्त आम्हाला भागवत (पुरविते) देते. अग्नीप्रमाणें भोगांनी कधीही तृप्त न होणारा काम महापापी आणि वैरी आहे. काम शत्रु आहे तरी पण ययातिप्रमाणें कित्येक लोक त्याला मित्र करण्याचा प्रयत्न करीत असतात, आणि शेवटी दुःखीच होतात. काम आणि क्रोधाला कधीच मित्र बनवू नका. ते वैरी आहेत. त्यांच्याशी वैऱ्यासारखाच व्यवहार केला पाहिजे. भागवतांत प्रल्हाद, अंबरीश इत्यादी अनेक उदाहरणें दिली आहेत.

**२५. राजा रंतिदेव व यदुवंशाचा ओझरता उल्लेख:**

राजा रंतिदेवाचें चरित्रसुद्धा अद्भुत आहे. त्याला जे कांही मिळत असे ते तो दुसऱ्याला द्यायचा. त्याच्या जीवनाचें हेच ध्येय होते कीं स्वतःला वाटेल तितके का दुःख सोसावे लागेना, पण दुसऱ्यांना सुखी करीत राहायचें.

रंतिदेवाने एकदा तर आपले प्राणसुद्धा संकटांत घालून आपलें भोजन, पाणी इत्यादी सर्व कांही दुसऱ्यांना देऊन टाकले होते. मी ईश्वरापासून अष्टसिद्धीची किंवा उत्तम गतीची इच्छा करीत नाही. मला मोक्षाची पण इच्छा नाही. माझी एवढीच इच्छा आहे कीं सर्वच प्राण्यांच्या हृदयांत वसावें, त्या सर्वांची दुःखें मीच सहन करावी जेणेकरून त्यांना दुःख भोगावे लागू नये.

माझी फक्त हीच इच्छा आहे कीं सर्वच प्राणी दुःखमुक्त होऊन जावे आणि त्यांचें दुःख मी सहन करावे.

अंतीं यदुराजाच्या वंशाचें वर्णन आहे. यदुराजाचा वंश दिव्य आहे. याच वंशांत श्रीकृष्णाने जन्म घेतला होता.

राजा, सावध हो. या वंशाच्या कथेचे जो कोणी श्रवण करील त्याच्या वंशाची वृद्धि होईल. ही हरिवंशाची कथा आहे.

आहुकाच्या घरीं दोन पुत्र झाले— देवक आणि उग्रसेन. देवकाने सात मुलींचा विवाह वसुदेवाशीं करून दिला. वसुदेव-देवकीच्या येथे सहा मुलें जन्माला आली. रोहिणीपासून सातवी संतति बलराम आणि आठव्या संतानाच्या रूपांत जन्म घेतला होता भगवान श्रीकृष्णांनी.

भगवान श्रीकृष्ण चौदा वर्षें मथुरेंत राहिले आणि द्वारकेंत वास केला. ते द्वारकानाथ झाले. पृथ्वीवरून अधर्माचा भार दूर करण्यासाठी त्यांनी पांडव आणि कौरवांच्या युद्धाची योजना केली.

या प्रकारे नवव्या स्कंधाच्या समाप्तींत संक्षिप्त कृष्णकथा सांगितली आहे.

**हरे राम हरे राम, राम राम हरे हरे।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥**

**॥ नवम स्कंध समाप्त ॥**

## ॥ श्रीहरिः ॥

# ॥ दशम स्कंध ॥

## (पूर्वार्ध)

श्रीकृष्णायनमः ॥

**१. 'रसो वै सः' असा दशमस्कंध– भगवंताचे हृदय, भागवताचे फळः**

आता दहाव्या स्कंधाचा आरंभ होत आहे. भागवताचें फळ दशमस्कंध आहे. दहाव्या स्कंधांत शुकदेवांच्या वाणींतून आनंद ओसंडत आहे, कारण ही शुकदेवांच्या इष्ट देवाची कथा आहे.

श्रीमद्भागवत सात दिवसांत मुक्ति देणारा ग्रंथ आहे. अनेक जन्मांपर्यंत सुद्धा साधन-साधना करून न मिळणारी अतिदुर्लभ मुक्ति परीक्षित राजाला सातच दिवसांत मिळाली.

परीक्षिताचा प्रश्न होता– ज्याच्या डोक्यावर मृत्यू जाणवण्याइतपत घिरट्या घालतो आहे अशा व्यक्तीचें कर्तव्य काय आहे? शुकदेवांनी जर यज्ञ करायची आज्ञा दिली असती तर सात दिवसांत मुक्ति मिळणें शक्य नव्हते. आयुष्याच्या शेवटच्या श्वासांतसुद्धा विकाराचा विचार येणार नाही असा उपाय करायचा होता. शुकदेवांना वाटले कीं जर राजा कृष्णकथेंत तन्मय होईल तर त्याला मुक्ति मिळू शकते.

मुक्ति मनाला मिळत असते, आत्म्याला नाही. कांही आचार्य मानतात कीं आत्मा आणि परमात्मा एकच आहेत; तर कांही आचार्य आत्मा आणि परमात्मा भिन्न भिन्न समजतात. ते आत्मा अंश आणि परमात्मा अंशी असे मानतात.

शंकराचार्यांचा सिद्धान्त असा आहे– जीव आणि ईश्वर एकच आहेत. हा जो भेद दिसतो तो अज्ञानामुळे दिसतो. (हा) भेद औपाधिक भेद आहे. उपाधीमुळे भेदाचा भास होतो. तत्त्वतः भेद नाहीच.

भेदाचे दोन प्रकार आहेत– स्वतःसिद्ध भेद आणि औपाधिक भेद.

स्वतःसिद्ध भेद– घोडा आणि गाईतील भेद स्वतःसिद्ध आहे. घोडा गाय होऊ शकत नाही आणि गाय घोडा होऊ शकत नाही.

औपाधिक भेद– पाण्याचें वास्तविक स्वरूप (गुण) शीतलता आहे. ऊन पाण्याच्या उष्णतेचें कारण उपाधि आहे.

वस्तुतः तत्त्वदृष्ट्या आत्मा आणि परमात्मा, जीव आणि ईश्वर एकच आहेत. जो भेद दिसतो तो औपाधिक आहे. घटाकाश आणि व्यापक आकाश एकच होत. परंतु घटाच्या उपाधीमुळें भेदाचा आभास होतो. घट फुटल्यानंतर घटाकाश आणि मठाकाश एकच होते. परंतु एक काय होते? ते तर एकच आहे! वास्तविक दृष्टीने दोन्ही एकत्र मिळालेलीच आहेत.

व्यापक चैतन्यच ईश्वर आहे. व्यापकाधिष्ठित चैतन्यच परमात्मा आहे. शरीराधिष्ठित चैतन्यच जीव आहे. अविद्येच्या आवरणाने युक्त चैतन्यच जीव आहे. अविद्यारूपी आवरण दूर झाल्यावर जीव आणि शिव एकच होत असतात. उपाधीमुळेच शिव आणि जीव निरनिराळे भासत असतात हा वेदान्ताचा सिद्धान्त आहे. हा जीव अंश होऊ शकत नाही. जर अंशीमधून अंश निराळा झाला तर अंशीचें रूप खंडित होईल. फुलाची एक पाकळी निराळी झाली तर फुलाचें रूप खंडित होते. अंशीमधून अंश वेगळा झाल्यावर अंशीचे अखंडित स्वरूप भंगून जाईल. म्हणून शंकराचार्य म्हणतात, जीव अंशासारखा आहे, पूर्णांश नाही. ईश्वर असा नाही कीं ज्याचे भाग केले जाऊ शकतील. तो व्यापक चैतन्य आहे, सर्वव्यापी आहे. आकाशाप्रमाणें तो सर्वत्र आहे.

जीव आणि ईश्वर एक नाहीत असें वैष्णव आचार्य मानतात. जीव ईश्वराचा अंश आहे. अंशीपासून अंश निराळा झाल्यावर सुद्धा अंशीचा नाश होत नाही. समुद्रांतून थेंबभर पाणी काढून घेतल्याने समुद्राचा नाश होत नाही. याचप्रमाणें अंश विभक्त झाला तरी अंशीचा नाश होत नाही. त्याच्या स्वरूपांतही कांही परिवर्तन होत नाही.

जशी कांही आपण सर्व एकाच राजाची मुलें आहोत. माया एक दासी आहे आणि ती आमचें लालनपालन करण्यासाठीच आहे. आम्हाला त्रास द्यायला नाही. जर ती आमचा छळ करील तर राजा (प्रभु) तिला कामावरून दूर करील. परमात्म्यावर घनिष्ट असें प्रेम कराल तर मायेचे बंधन सुटून जाईल. गोकुळांतील लीलेचें हेच रहस्य आहे.

अत्यंत सूक्ष्म बुद्धी असलेला जिज्ञासू वेदान्ताचा विवर्तवाद समजू शकतो. ऊर्मिप्रधान व्यक्तीला वैष्णवाचार्यांचा सिद्धान्त पसंत पडेल. हे दोन्ही सिद्धान्त दिव्य आहेत.

शुकदेव सावध करतात.

वाटेल त्या बाजूने पहा किंवा माना, हेंच आढळेल कीं मुक्ति मात्र मनालाच मिळत असते, आत्म्याला नाही. आत्मा तर नित्य मुक्तच आहे. जीवाला ईश्वराचें रूप समजा किंवा अंश परंतु तो आत्म्याहून निराळा आहे. सुख आणि दुःखाचा अनुभव मनाला होतो, आत्म्याला नाही. असें असूनही आत्म्यावर त्याचा आरोप केला जातो.

परीक्षिताला केवळ सातच दिवसांत मुक्ति मिळवायची आहे. जर त्याचें मन श्रीकृष्णाशिवाय अन्यत्र कोठेही केन्द्रित झाले नाही तरच त्याला मुक्ति मिळण्याची शक्यता आहे.

ज्याचें मन मरते त्याला मुक्ति मिळत असते. पूर्वजन्मींचें शरीर भलेही मरून गेले असेल पण पूर्वजन्मींचें मन घेऊन जीवात्मा या जन्मांत आलेला आहे. कशाही प्रकारे मनाला मारायचे आहे. थोड्या पाण्यांत मासोळी धड जिवंतही राहू शकत नाही आणि धड मरूही शकत नाही. मनानें जर सांसारिक विषयांचें चिंतन सोडून दिले तर ते ईश्वरांत लीन होऊ शकते. मनाला सांसारिक विषयांतून काढून कृष्णलीलेंत लावून द्या. कृष्णाची बाललीला, गोपालनलीला इत्यादींना आठवा.

मन प्रतिकूल गोष्टींतून काढून अनुकूल विषयांत गुंतवा. या कथेचा देखील हेतु हाच आहे. या कथेने ज्ञान आणि वैराग्य वाढतात. या कथाश्रवणाने मनुष्याला प्रवृत्तीपासून सुटका करून घ्यायची इच्छा होते. भागवताची कथा ज्ञान, वैराग्य आणि कृष्णप्रेम वाढविणारी आहे. भागवताची कथा श्रोत्यांना कृष्णप्रेमांत वेडे करून टाकते. परीक्षित राजाचा संसारमोह नष्ट होऊ शकला आणि मन कृष्णलीलेंत तन्मय होऊ शकले म्हणूनच मनाचा निरोध होऊ शकला.

श्रीकृष्णलीला निरोधलीला आहे. मनाचा निरोध करायचा आहे. जगाचें विस्मरण आणि भगवत

आसक्ति म्हणजेच निरोध. सांसारिक विषयांचें विस्मरण झाल्यावरच खरा आनंद मिळतो. सांसारिक संबंध सुटल्यावरच ब्रह्मसंबंध जुळतो. जर सांसारिक विषयांतच खरा आनंद असता तर हे सगळे सोडून झोप घेण्याची इच्छाच झाली नसती.

कृष्णकथा अशी आहे कीं ती जगाचा विसर पाडते. जगतांत राहायचेंही आहे आणि जग विसरायचेंही आहे, संसार सोडून कुठे जाल? जिथे कुठे जाल तिथे संसार बरोबरच येईल. संसार सोडायचा तर नाही, परंतु त्याला मनांतून बाहेर घालवायचा आहे. संसारांत राहूनही त्यापासून वेगळे देखील राहायचे आहे. भागवताची कथा, भूक, तहान आणि सांसारिक ताप विसरायला शिकवते.

दहाव्या स्कंधांत आरंभी शुकदेवांनी राजाची परीक्षा घेतली. पांच दिवसापासून एकाच आसनावर बसलेला आहेस, काही खाणें-पिणें करायचे असेल तर करू शकतोस.

परीक्षित म्हणाला— भगवन्, मी अन्नच काय, पाण्याचाही त्याग केला आहे. ज्या तहान आणि भुकेच्या कारणामुळे मी मुनींच्या गळ्यांत मृतसर्पाचा हार घातला होता, ती भूकतहान आता मला त्रास देत नाही. याचें कारण हेच कीं मी आपल्या मुखांतून वाहत असणाऱ्या श्रीहरिकथामृताचें पान करीत आहे; आणि कथेच्या रसपानामुळे मला तहानभुकेचा त्रास होऊ शकत नाही.

राजाचें हे बोलणें ऐकून शुकदेव प्रसन्न झाले. राजा सुपात्र आहे आणि जिज्ञासूही आहे.

कथेंत अशीच तन्मयता असली पाहिजे. कृष्णकथा अनायासेच संसार विसरायला लावते. हिच्यामुळे जग विसरले जाते. कृष्णकथेने जगाचे विस्मरण होते. कृष्णकथेचा महिमाच असा आहे की देहभान हरपते. कृष्णकथेचा महिमा काय सांगावा? या कथेंत लीन झालेलें मन जग विसरते.

संसाराचें संपूर्ण विस्मरण आणि परमात्म्याचें सतत स्मरण राहील तर मुक्तीच आहे.

कथा तुम्हाला आपल्या दोषांची जाणीव करून देते. कथा ऐकता ऐकता रडू आले तर समजा कीं कथा श्रवण केली जात आहे. अंबरीशाची भक्ति कशी दिव्य होती आणि माझें जीवन कसें क्षुद्र आहे! अरेरे! माझें आयुष्य कुत्र्यासारखे व्यर्थच गेले!

कृष्णकथा सगळ्यांनाच आनंद देते. कारण यांत सगळ्याच रसांचा समन्वय आहे. ही कथा लहानांनाही आनंद देते आणि संन्याशांनाही आनंद देते. श्रीकृष्ण बालकांबरोबर बालकांसारखे आहेत आणि युवकांबरोबर युवकांसारखे. ते ज्ञान्यांकरिता ज्ञानी आणि योग्यांकरता योगी आहेत.

श्रीकृष्ण भोगी तर आहेत पण रोगी नाहीत, योगीच आहेत. साधारणतः भोगी म्हातारा गलितगात्र होऊन जातो, परंतु एकादशस्कंधांतील वर्णनानुसार श्रीकृष्ण जेव्हां एकशेपंचवीस वर्षांचे आयुष्य पूर्ण करून स्वर्गांत गेले तेव्हां त्यांच्या डोक्याचा एकही केस पांढरा झालेला नव्हता.

मनुष्याचें मन कोणत्या ना कोणत्या रसांत रमलेले असते. या कथेंत हास्य, शृंगार, करुण, भयानक इत्यादी सर्वच रस भरलेले आहेत. कारण श्रीकृष्ण स्वतःच रसरूप आहेत. बाललीलेंत हास्यरस आहे, रासलीलेंत शृंगाररस आहे, तर चाणूर, मुष्टिक, कंस इत्यादींच्या वधांत वीररस आहे. कोणत्या का रसांत रुचि असो, कृष्णकथा सगळ्यांनाच आवडते. या कथेची हीच विशेषता आहे.

कान्हा सर्वांनाच दहावा रस— प्रेमरस— देत असतो. या कृष्णकथेंत सर्वश्रेष्ठ असलेला प्रेमरस ओसंडून भरलेला आहे.

ज्यानें प्रेमरसाचा आस्वाद घेतला आहे त्याच्यासाठी इतर सर्व रस नीरसच होत. मीराबाईच्या शब्दांत सांगायचे तर इतर रस कडू आहेत.

अर्थात कृष्णप्रेम साखर आणि उसाचा मधुर रस आहे. तो टाकून कडूलिंबाचा (सांसारिक)

रस कां प्यावा ? राधाकृष्णाशिवाय आणखी इतर कां बोलावे ?

हो ! या कृष्णरसाचा आस्वाद घेता येणें सोपे नाही.

अर्थात या रसाचा आस्वाद शंकर, शुकदेव, योगी आणि व्रजांतील गोपी यांसारखेच घेऊ शकतात.

जगांतील सगळेच रस कटुतेने भरलेले आहेत. शृंगाररस आरंभी तर गोड लागतो, परंतु परिणामी मात्र कडूच वाटतो. इतर कोणत्याच रसांत गोडी नाही. फक्त एक प्रेमरसच मधुर आहे.

प्रेमाशिवाय प्रभूचा साक्षात्कार होऊ शकत नाही. श्रीकृष्ण प्रेमरूप आहेत. ते अलौकिक प्रेमाचें दान करतात. प्रेमरसांत वासनाही नाही आणि विषमताही नाही, स्वार्थ नाही आणि आपपरभावही नाही.

गोपी कृष्णाला शोधायला गेली तर तिचें 'मी' पण शिल्लक राहिले नाही; ती कृष्णाशी एकरूप होऊन गेली. श्रीकृष्णाच्या समक्ष मी आणि माझेपण शिल्लकच राहू शकत नाही.

मनुष्यजीवनाची विशेषता आणि सार्थकता कृष्णप्रेमांत वेडे होऊन जाण्यांतच आहे.

दररोज कृष्णदेवांना प्रार्थना करा कीं तुम्ही माझें मन आपल्याकडे ओढून घ्या. माझ्यांत अशी शक्ती नाही कीं मी तुम्हाला आकर्षू शकेन. म्हणून तुम्हीच मला आकर्षून घ्या.

कृष्णप्रेमांत हृदय लीन होईल, ओथंबून जाईल, डोळे प्रेमाश्रूंनी भिजतील तेव्हांच ब्रह्मसंबंध होईल– तेव्हांच ब्रह्मस्वरूप होता येईल.

ब्रह्मसंबंध सतत ठेवा. पुनः मायेच्या चक्रांत मन फसणार नाही याविषयीं सावध रहा. जर परीक्षिताप्रमाणें मायेशीं विच्छेद आणि ब्रह्माशीं संबंध होईल तर सातच दिवसांत मुक्ति मिळू शकते. ब्रह्मचिंतन करता करता मरण आल्याने मुक्ति मिळत असते.

दशमस्कंध तर भगवान् श्रीकृष्णाचें हृदय आहे. ते रसस्वरूप आहेत आणि म्हणून जीवही रसरूप आहे. प्रत्येक जीवाला कोणत्या ना कोणत्या रसांत रुचि असते. निरनिराळ्या रुचि असणाऱ्या सर्वांनाच कृष्णकथा आनंद देते. श्रीकृष्ण देखील एक दिव्य रसच आहेत.

प्रेम आणि विरह दोहोंतही हृदय आर्द्र बनते तेव्हां रसानुभूति होते.

**२. श्रीकृष्णकथा भोगी, योगी इ. सर्वांचेच आकर्षण आहे :**

श्रीकृष्णकथा सर्वच प्रकारच्या जीवांना आकर्षित करते.

सामान्यतः जीवाचे चार भेद आहेत– १) पामर २) विषयी ३) मुमुक्षु ४) मुक्त.

अधर्माने धनार्जन करील आणि अनीतीने त्याचा उपभोग करील तो जीव पामर होय. धर्माचें पालन करून पैसा कमवून इंद्रियसुखाचा उपभोग घेईल तो विषयी जीव; संसाराच्या बंधनापासून मुक्ति मिळविण्याची इच्छा बाळगून प्रयत्न करणारा जीव मुमुक्षु जीव; आणि कनक आणि कांतारूपी मायेच्या बंधनापासून मोकळा व प्रभूमध्यें तन्मय झालेला जीव मुक्त जीव होय.

श्री महाप्रभु म्हणतात– राजस, तामस किंवा सात्त्विक कोणत्याही प्रकृतीचा जीव कृष्णकथेंतून आनंद मिळवू शकतो. याच कारणाने त्यांनी दशमस्कंधाचे तीन विभाग केले आहेत– सात्त्विक प्रकरण, राजसिक प्रकरण आणि तामसिक प्रकरण.

श्रीकृष्णकथा सगळ्यांच्याच उपयोगाची आणि सगळ्यांनाच आनंद देणारी आहे. याचे कारण असे कीं श्रीकृष्ण भोगीही आहेत आणि योगी पण. याचमुळे तर शुकदेवांसारख्या योग्याला सुद्धा कृष्णकथेने आनंदलाभ होतो.

भगवान् श्रीकृष्णांनी गृहस्थाश्रम आणि संन्यासाश्रम दोघांचाही समन्वय जगासमोर ठेवला आहे.

सोळा हजार राण्यांचे स्वामी अशा श्रीकृष्णांना संन्याशांच्या व्यासपूजेंत अग्रस्थान मिळते.

श्रीकृष्णांची दिव्यता तर पहा कीं सोळा हजार राण्यांमधें राहूनही त्या सर्वांवर प्रेम करीत असताना सुद्धा ते अनासक्त राहू शकतात.

पतिपत्नींनी एक दुसऱ्यावर प्रेम करीत राहूनही अनासक्त राहिले पाहिजे. श्रीकृष्ण सर्वच राण्यांवर प्रेम करीत असताना सुद्धा कोणत्याच राणींत आसक्त नव्हते. आजकाल लोकांनी प्रेम शब्दाला देखील कलंक लावला आहे. जिथे विकार आणि वासना असतील तेथे प्रेम नसून मोहच असतो.

श्रीकृष्णांच्या वैकुंठगमनाचें शुकदेवांनी वर्णन केलें आहे. त्यावेळीं, युवकांना लज्जित व्हावे लागेल अशी दिव्य कांति भगवंतांच्या मुखावर होती. एकशेपंचवीस वर्षांची अवस्था असून सुद्धा त्यांचा एकही केस पांढरा झाला नव्हता आणि एकही दात तुटला नव्हता. असे होते त्यांचे दिव्य रूप! याचमुळे तर ते योग्यांनाही प्रिय आहेत.

खऱ्या महायोग्याचें हेंच लक्षण आहे कीं तो कधी आजारी पडत नाही. ज्या योग्याला कांही आजार होतो त्याच्या योगांत काही ना कांही उणीव राहिलेली असते. श्रीकृष्ण योग्यांना आणि भोग्यांना दोघांनाही प्रिय आहेत.

श्रीकृष्णलीलेंत सगळ्याच प्रकारचे रस दिसून येतात. साधारणतः साहित्यांत नऊ रस असतात — हास्य, करुण, वीर, शृंगार, बीभत्स इत्यादी. श्रीकृष्णांचे हास्यविनोदही अद्वितीय आहेत. श्रीकृष्णाच्या वीररसाचें तर महाभारतांत अनेक स्थानीं वर्णन आहे. श्रीकृष्ण प्रेमस्वरूप असल्याकारणाने परिपूर्ण मधुररसानें ओतप्रोत भरलेले आहेत. म्हणून कृष्णकथेने कोणत्याही रसाची रुचि पुष्ट होऊन ती अलौकिक प्रेमरसाचीही प्राप्ति करून देईल. लौकिक आसक्ति हळू हळू कमी होईल आणि श्रीकृष्णाची अलौकिक आसक्तिरूप भक्ति प्राप्त होऊन जीवन सफल होईल.

महापुरुष श्रीकृष्णलीलेला निरोधलीला म्हणतात. मनाचा निरोध झाल्यावर मुक्ति सुलभ आहे.

मनाचा निरोध ईश्वरांतच होऊ शकतो, इतर कोणत्याही वस्तूंत नाही. कारण कीं संसार जड आहे, मन नाही. दूध आणि खडीसाखरेसारखे सजातीय एकमेकांत मिसळून जातात. दगड एकरूप होऊ शकत नाही. याचप्रमाणें मन संसारांतल्या जड पदार्थांशी एकरूप होऊ शकत नाही. मन पूर्णपणे जडही नाही आणि पूर्णपणें चेतनही नाही. ते अर्धचेतन आणि अर्धजड आहे.

परीक्षित राजाच्या मनाला सांसारिक विषयांपासून अनायासे दूर करून श्रीकृष्णाशी एकरूप करून त्याला मुक्ति प्राप्त करवून देण्यासाठी हा दहावा स्कंध रचला आहे.

दशमस्कंध तर भगवंताचें हृदय आहे. यांत श्रीकृष्णांची ती लीला वर्णिलेली आहे कीं जिने अनेकांना प्रेमवेडे केले.

सनातन स्वामी कोणातरी राजाचे महामंत्री होते. दहाव्या स्कंधांतील कथा ऐकून ते साधू होऊन गेले.

श्रीकृष्ण योगीही होते आणि भोगीही होते.

ही कथा राजांनाही आकर्षित करते आणि योग्यांनाही आकर्षित करते. याचें कारण श्रीकृष्ण आहे.

श्रीकृष्ण चित्ताची शांति तर काय, मूळ चित्तच चोरून घेतात.

त्यांचे रूपही मोठे अद्भुत आहे.

भगवान कृष्णांचें रूप, त्यांच्याविषयींचें आकर्षण आणि त्यांच्याविषयीच्या प्रेमाची तीव्रता यांनी

एकदा का ह्रदयांत स्थान मिळविलें कीं तेथून निघण्याचें नांव देखील घेत नाहीत.

राजा परीक्षित म्हणाला, आपण सूर्यवंश आणि चंद्रवंशाच्या कथा सांगितल्या. चंद्रवंशी श्रीकृष्णाची कथा संक्षेपातच सांगितली.

कृष्णकथा योगी आणि भोगी दोघांनाही आनंद देते. शुकदेव तर महायोगी आहेत. ध्यानाच्या आत्यंतिकतेमुळे त्यांना वस्त्राचेंही भान राहिलेले नाही. ते कृष्णकथेत वेडे झाले आहेत.

परीक्षित शुकदेवांना म्हणतात, आपण तसा तर सर्वस्वाचा त्याग केला आहे, पण कृष्णकथेचा त्याग करू शकला नाहीत. आणि वडिलांना सांगून टाकले होते की ते तुमचे पिता नाहीत आणि तुम्ही त्यांचे पुत्र नाहीत. तुम्ही पित्याचा तर त्याग केला आहे, पण कृष्णकथेचा त्याग केलेला नाही. तुमच्यासाठी सुद्धा ही कथा आनंददायिनी आहे.

शुकदेवांसारखे वीतरागी साधुपुरुषसुद्धा कृष्णकथेचा मोह सोडू शकले नाहीत. महापुरुषांना वाटत असते की जोपर्यंत नाक धरून बसलों आहोत (अर्थात तप करीत आहोत) तोपर्यंत तर ठीक आहे. परंतु आसनावरून उठून गेल्यावर मन केव्हा इकडे तिकडे धावू लागते ते समजतही नाही.

मनाला निर्विषयी बनवा. त्याला कृष्णकथेंत ओवून ठेवा. चिंतन करायचे असेल तर कृष्णलीलांचे करा. मनाला निर्विषयी करावयाचा आदेश वेदान्त देखील देतो. हे फार कठीण कर्म आहे. ह्याचकरिता वैष्णव म्हणत असतात की मनाला प्रतिकूल विषयांतून काढून अनुकूल विषयांत गुंतवा.

वेदान्ती म्हणतात की जर आत्म्याला बंधनच नाही तर मग मुक्तीचा प्रश्न कसा उपस्थित होतो? वैष्णवांना भगवंताच्या सेवेमध्ये असा काही आनंद मिळत असतो की ते मुक्तीची इच्छाच करीत नाहीत.

जोपर्यंत डोळे मिटून समाधिमग्न राहतात तोपर्यंत योग्यांचे मन स्थिर राहते. परंतु योगावस्थेंतून जागृत झाल्यावर त्यांचे मन चंचल होऊन विषयांत हरवून जाते. विश्वामित्र ऋषींनी साठ हजार वर्षेपर्यंत डोळे मिटून तपश्चर्या केली, परंतु डोळे उघडल्याबरोबर ते मेनकेच्या मायेला भुलले.

अहो, उघड्या डोळ्यांनी आणि उघड्या कानांनी देखील जी समाधी लागेल तीच खरी समाधी!

समाधीचे दोन प्रकार आहेत – जड आणि चेतन. ज्यांत योगी लोक मनाला बलपूर्वक वश ठेवण्याचा प्रयत्न करतात ती जड समाधि होय. मनावर असा बलात्कार करणे काही चांगले नाही. तसे योगी कधी कधी रोगीसुद्धा होत असतातच. म्हणूनच हठयोग्यांची निंदा केली गेली आहे. हठयोग्याला जर भक्तीचे साहाय्य न मिळाले तर त्याचा योग निरर्थक होतो.

मनावर बलात्कार करण्यापेक्षा त्याला प्रेमाने समजवून उमजवून वश करणे चांगले असते.

मन सज्जन आहे. मनाला काही सत्ता नसते. मन आत्म्याच्या आज्ञेंत असते. आत्म्याच्या आदेशाप्रमाणे मनाला कार्य करावे लागते. मनाला शास्त्रांत नपुंसक म्हटले आहे. आत्म्याच्या सत्तेनुसार आणि आज्ञेनुसार मन धावू शकते. योगी बलपूर्वक मनाला ब्रह्मरंध्रांत स्थापन करतात. त्यावेळी त्याचे शरीर जड होऊन जाते. जड समाधींत शरीराचे भान राहात नाही.

जड समाधीपेक्षा चेतन समाधी श्रेष्ठ आहे.

गोपींची समाधी चेतन समाधी आहे. त्या कान बंद करून किंवा डोळे मिटून बसत नाहीत. त्या तर उघड्या डोळ्यांनी आणि उघड्या कानांनीच कृष्णाच्या ध्यानांत तन्मय होतात. त्या तर आपल्या कानांत आणि डोळ्यांत कृष्णालाच बसवतात. त्यांना पाहूनच तर उद्धवांचा भ्रमनिरास झाला.

गोपी उघड्या डोळ्यांनीच समाधी लावू शकतात. जिथे जिथे त्यांची दृष्टी जाते तिथे तिथे त्यांना

कृष्णाचेच दर्शन होत असते.

समाधि अशी सहजच असली पाहिजे. म्हणूनच उद्धवाच्या निर्गुण निराकार ब्रह्माच्या आराधनेची हकीगत ऐकून गोपी म्हणाल्या होत्या, " आम्हाला तर उघड्या डोळ्यांनीच सर्वत्र साकार ब्रह्म श्रीकृष्णाचे दर्शन होत असते, म्हणून साकार ब्रह्माला सोडून तुमच्या निराकार ईश्वराचे ध्यान-चिंतन का करावे ?

उद्धव महाराज ! जो उघड्या डोळ्यांनी ब्रह्माचे दर्शन करू शकत नाही तोच आपल्या डोळ्यांना बंद करून ललाटामध्ये ब्रह्माचे दर्शन करण्याचा प्रयत्न करतो. आम्ही तर श्रीकृष्णाचे दर्शन, चिंतन आणि ध्यान करीतच असतो.

डोळे मिटल्यावरच जो समाधिस्त होऊ शकतो, त्याच्या बाबतींत हे संभव आहे की डोळे उघडल्यावर त्याचे मन संसारात भरकटून जाईल.

गोपी घरांत राहणाऱ्या (संसारी) असून सुद्धा परमहंस आहेत. व्रजवासीच उत्तमोत्तम परमहंस आहेत; ते सर्व बाह्य विषयांपासून अलिप्त होऊन कृष्णप्रेमांत तन्मय होऊन जातात.

श्रीकृष्ण महागृहस्थ आहेत आणि महासंन्यासीही. घरांत राहूनही संन्यासी जीवन कसे जगावे हे श्रीकृष्णांनी दाखविले आहे. ते तेरा वेळा जेवतात आणि सोळा हजार स्त्रियांचे स्वामी आहेत. तरी पण ते अच्युत युवक आहेत, ते कधीच वृद्ध होत नाहीत, जीर्ण होत नाहीत. ते अर्जुन आणि दुर्योधन दोघांनाही समान दृष्टीने पाहात होते आणि त्यांनी दोघांनाही साहाय्य केले होते. यदुवंश आणि सुवर्णाच्या द्वारकेचा नाश झाला तरी त्यांची मनःशांति अविचल राहिली.

भागवत परमहंसाची संहिता आहे.

परीक्षित म्हणतात – महाराज, आपण वीतरागी योगी आहात तरी पण कृष्णकथा सोडू शकलेला नाही.

कथा मनुष्याची थकावट दूर करीत असते. भगवंताची कथा आतुरता वाढविते, वारंवार ऐकूनही तिने तृप्ति मिळत नाही.

श्रीखंडासारखे मिष्टान्न खाल्ल्यावर, विषयसुखांचा उपभोग घेतल्यावर तृप्ति होते आणि अरुची पण होते. परंतु ती तृप्ति आणि अरुचि कायम राहात नाही. जर कायम राहिली तर बेडा पारच होऊन जाईल.

महाराज, मला कृष्णकथा ऐकायची इच्छा आहे. आपण सविस्तर सांगा. प्रभूची बाललीला आणि इतरही सर्व लीला सांगा. आपल्या चरणीं पुनःपुन्हा प्रणाम करून मी प्रार्थना करीत आहे.

शुकदेव – राजा कित्येक दिवसांपासून तू काही खाल्ले प्यायले नाहीस. पहिले थोडेसे जलपान करून घे, मग कथा ऐकू.

परीक्षित – काही दिवसांपूर्वी तर मी भूक आणि तहानेने व्याकुळ होत असे. एकदा शिकार करण्यासाठी वनांत गेलो होतो तर भूक-तहानेच्या व्याकुळतेनेच मी ऋषींचा अपमानसुद्धा केला होता. परंतु तुमच्या तोंडून कथा ऐकल्यानंतर ना मला भूक त्रास देत ना तहान. बस्स, तुम्ही फक्त कथा ऐकवा !

शुकदेव – कृष्णकथेविषयीं तुझे प्रेम पाहून मला फारच आनंद झाला आहे. राजा, तुझ्याचमुळे मलासुद्धा कृष्णकथारूपी गंगेचे अमृतपान करण्याचा लाभ मिळाला. जेव्हापासून कृष्णकथारूपी गंगेचे प्राकट्य झाले आहे, तेव्हापासून भागीरथी गंगेचे महत्त्व कमी झाले आहे. भागीरथी गंगेत स्नान केल्याने शारीरिक मलीनता दूर होते. परंतु मानसिक मलीनता तर कृष्णकथाच दूर करू शकते. कृष्णकथा तर जेथे इच्छा कराल तेथे प्रगट होऊ शकते; परंतु ती भागीरथी गंगा इतर कोणत्याही स्थानी प्रगट होत

नाही.

शुकदेव राजाचे आभार मानतात. कारण त्याच्याचमुळे त्यांना कृष्णस्मरण आणि दर्शनाचा लाभ मिळाला.

महात्मा तर म्हणतात की, नवव्या स्कंधापर्यंतची कथा तर शुकदेवांनी सांगितली आहे आणि दहाव्या स्कंधातील कथा स्वतः श्रीकृष्णांनी ऐकविली आहे.

शुकदेवांनी विनंती केली की राधाकृष्णांनी स्वतः ह्रदयामध्ये विराजमान होऊन त्यांनीच कथा करावी.

ज्ञानी पुरुष मृत्यु टाळण्याचा नाही, मंगल व्हावा म्हणून प्रयत्न करीत असतात. मृत्यु मंगल होतो. कृष्णकथेने, कृष्णनामाने, कृष्णभक्तीने ज्याचा मृत्यु मंगल होतो त्याला पुनः जन्म घ्यावा लागत नाही.

वैर आणि वासना आयुष्य बिघडवीत असतात. ते दूर झाल्यावरच जीवन आणि मृत्यु उजळून निघतात. वैर आणि वासनेला मृत्यूच्या पूर्वीच दूर करून टाका. नाही तर मृत्यु बिघडेल. तुम्ही वैऱ्याला वंदन केल्यावरही त्याने वैर ठेवले तर त्याच्या पापाचे वाटेकरी तुम्हाला व्हावे लागणार नाही.

दशमस्कंधांत निरोधलीला आहे. ईश्वरांत मन लय करणेच निरोध आहे.

श्रीकृष्णाला आपल्या ह्रदयांत ठेवाल किंवा कृष्णाच्या ह्रदयात वसति कराल तर मनाचा निरोध होईल. मनाचा निरोधच मुक्ति आहे.

**३. कृष्णजन्माचा वृत्तांतः**

पृथ्वीवर दैत्यांचा उपद्रव वाढला. लोक दुःखी झाले. पाप वाढले. पृथ्वीला हे सर्व सहन झाले नाही. तेव्हा ती ब्रह्मदेवाला शरण गेली. ब्रह्मादि देव ब्रह्मलोकांत नारायणाकडे आले आणि पुरुषसूक्ताने प्रार्थना करू लागले, "नाथ! आता तर कृपा करा. आपण अवतार घ्या.' भगवान ब्रह्मदेवाला म्हणाले– 'थोड्याच काळानंतर मी वसुदेव-देवकीच्या येथे प्रगट होईन. माझ्या सेवेसाठी तुम्ही सर्व देव देखील अवतार घ्या!'

ब्रह्मदेवाने आकाशवाणी ऐकली आणि सर्व देवांना आश्वासन दिले.

इकडे मथुरेत विवाहासाठी वसुदेव आले. वसुदेव-देवकीचा विवाह झाला. स्वतः कंसानेच वधू-वराचा रथ चालविला.

कंसाने जर वसुदेवाला फार त्रास दिला तरच भगवंत लवकर प्रगट होतील. भक्तांची दुःखें भगवंताला सहन होत नाहीत. पाप्याचें दुःख भगवंत साक्षीरूपाने पाहून घेतात आणि सहन करतात. परंतु पुण्यात्म्याचे दुःख त्यांना सहन होत नाही.

आकाशवाणी ऐकू आली– 'हे कंसा, देवकीचे आठवे संतान तुझा वध करणार आहे!'

कंसाने आकाशवाणी ऐकल्यावर तो तलवार घेऊन देवकीचाच वध करायला तयार झाला. त्यावेळीं वसुदेव त्याला समजावू लागले– जो येईल तो जाईलही. ज्याचा जन्म झाला आहे त्याला मृत्युसुद्धा येणारच. म्हणूनच महात्मा लोक मृत्यु टाळण्याचा नाही, तर मंगल व्हावा म्हणून प्रयत्न करीत असतात. मृत्यूचे निवारण अशक्य आहे. शरीराचा नाश तर होणारच. वैर करू नका. वैर किंवा सुखाची वासना मृत्यू भ्रष्ट करीत असते. वैर आणि वासनेचा त्याग करून प्रभुस्मरण करीत राहून जो मरतो त्याचा मृत्यु उज्ज्वल होतो. देवकीचा वध करून तर तू अमर होणार नाहीस आणि देवकी स्वतःतर तुझ्या

मृत्यूचे कारण नाही.

कंस – हं! हे तर आहे.

वसुदेव – तर मग मी देवकीची सर्वच अपत्ये तुझ्या स्वाधीन करीत जाईन.

कंस म्हणाला – हेही ठीकच आहे. स्त्रीहत्येच्या पापापासून तर वाचेन. त्याने म्हटले, बरं, मी देवकीची हत्या करणार नाही.

वसुदेव शुद्ध सत्त्वगुणांचे स्वरूप आहे. विशुद्ध चित्तच वसुदेव आहे. देवकी निष्काम बुद्धि आहे. या दोघांचे मीलन झाल्यावर भगवंताचा जन्म होतो.

वसुदेव-देवकी घरी आले. पहिल्या बालकाचा जन्म झाला. वसुदेवांनी बालक कंसाला देऊन टाकले. कंसाचे ह्रदय द्रवले. या बालकाला मारून मला काही लाभ होणार नाही. आठवी संतति मला मारणार आहे. हा पहिला आहे. याला मी मारणार नाही. सातही बालकांना तुमच्याजवळ ठेवा. आठवाच मला द्या. वसुदेव बालकाला घेऊन परतले.

नारद म्हणाले, हा कंस जर चांगुलपणा करू लागला तर पाप कसे होईल आणि हा जर पाप करणार नाही तर तो लवकर मरणारही नाही. पाप न करणाऱ्याला भगवान मारीत नाहीत.

ईश्वर तर कोणालाच मारीत नाही. मनुष्याला त्याचे पापच मारीत असते. नेहमी दोन वस्तूंचे भय बाळगा – पापाचे आणि ईश्वराचे.

नारद कंसापाशी आले आणि म्हणाले, कंसा, तू तर फारच भोळा आहेस! देव तुला मारण्याचा विचार करीत आहेत. वसुदेवाच्या बालकाला तू सोडून दिलेस हे चांगले केले नाहीस. कोणतेही बालक आठवे होऊ शकते. जर आठव्या बालकाला पहिला म्हटले तर हा पहिला आठवा होऊ शकेल.

कंस – तर मग मी काय सगळ्याच बालकांची हत्या करू?

दुसऱ्यांना पापाची प्रेरणा देणारासुद्धा पापीच असतो.

नारद – राजा, मी तर तुला सावध करण्यासाठी आलो आहे. तुला जे योग्य वाटेल तेच करीत राहा.

आणि ते 'नारायण नारायण' म्हणत निघून गेले.

नारदांनी कंसाचे पाप वाढवण्यासाठी त्याला उलटे-सुलटे सांगितले.

कंसाने वसुदेव-देवकीला कारागृहात बंद करून टाकले. विना अपराधच बंधनांत टाकले. तरी पण त्यांनी समजून घेतले की ईश्वराला कदाचित हेच पसंत असेल. ही तर परमेश्वराची कृपाच आहे की त्यांचे नामस्मरण करण्यास एकांतवास मिळाला आहे.

अतिशय दुःखालासुद्धा ईश्वराचीच कृपा समजली पाहिजे. कंस म्हणजे अभिमान आहे जो जीवमात्राला बंद करून ठेवीत असतो. सर्वच जीव या संसाररूपी कारागृहांत बंद आहेत. आम्ही सर्वच बंदी आहोत. जीव जोपर्यंत कामाच्या आधीन आहे तोपर्यंत तो स्वतंत्र नाही. सगळेच बंदिवान आहेत.

वसुदेव-देवकी कारावासांत सुद्धा जागृत होते. आम्ही तर झोपूनच असतो. आमचा जीव संसाररूपी कारागृहांत एकांतात जागृत राहण्याऐवजी झोपूनच राहतो. संसारात जो जागृत राहतो तोच देव मिळवू शकतो.

जो भगवंताकरिता जागतो त्यालाच भगवान भेटतात.

कबीर त्यांच्यासाठी जागले आणि रडले म्हणून त्यांना भगवान मिळाले.

मीराबाई सुद्धा त्यांच्यासाठी जागली आणि रडली म्हणून तिलाही भगवान मिळाले.

कंसाने देवकीच्या सात मुलांची हत्या केली.

मायेचा आश्रय घेतल्याशिवाय भगवान अवतार घेत नाहीत. शुद्ध ब्रह्माचा अवतार होऊ शकत नाही. जर ईश्वर शुद्ध स्वरूपाने आला तर जो कोणी त्याचे दर्शन घेऊ शकेल त्याचा उद्धार होऊन जाईल. दुर्योधनाने द्वारकाधीशांचें दर्शन तर घेतले होते, परंतु मायेने आवृत्त प्रभूचे दर्शन घेतले होते. जो निरावृत्त ब्रह्माचा साक्षात्कार करून घेतो त्याला मुक्ति मिळते. मायावृत्त ब्रह्माचे दर्शन घेणाऱ्यास मुक्ति मिळत नाही. शक्य आहे की भगवंताच्या अवताराच्या वेळी आम्ही किडे-मुंग्यादि असू. आम्ही भगवंताचे दर्शन तर घेतले असेल तरी पण आजपर्यंत आमचा उद्धार झालेला नाही.

योगमायेचे आगमन झाले. तिने सातव्या गर्भाची रोहिणीच्या उदरांत स्थापना केली. रोहिणी सगर्भा झाली आणि दाऊजी (बलराम) प्रगट झाले. भाद्रपद शुक्ल एकादशीच्या दिवशी. बलदेव शब्दब्रह्माचे स्वरूप आहे. पहिला शब्द येतो ब्रह्म आणि नंतर येतो परब्रह्म. बलरामाचे आगमन झाल्यावर परब्रह्म गोकुळांत येते.

बलरामाने डोळेच उघडले नाहीत. जोपर्यंत माझा कान्हा येणार नाही तोपर्यंत मी डोळेच उघडणार नाही. यशोदा पौर्णिमेला बलरामाची दृष्ट काढायची विनंती करीत आहे. पौर्णिमा म्हणते, हा तर कोणाचे तरी ध्यान करीत आहे. या बालकामुळे तुझ्या घरी कृष्ण येतील.

यशोदेने सगळ्यांनाच प्रसन्न केले.

यश सगळ्यांना द्याल आणि अपयश आपल्यापाशी ठेवाल तर कृष्ण प्रसन्न होतील. जीव इतका दुष्ट आहे की यश आपल्यापाशी ठेवतो आणि अपयश दुसऱ्याच्या माथी मारतो.

यशोदा – जी दुसऱ्याला यश देते ती यशोदा.

नंद – जो सगळ्यांनाच आनंद देतो तो नंद.

विचार, वाणी, वर्तन, सदाचार इत्यादींनी जो दुसऱ्याला आनंद देतो त्याच्याच घरी भगवान येत असतात. जो सगळ्यांनाच आनंद देतो त्यालाच परमानंद मिळतो.

नंदबाबांनी सगळ्यांनाच आनंद दिला म्हणून त्यांच्या घरी परमानंद–प्रभू येणार होते.

सर्वच गोपाळ शांडिल्य ऋषींपाशी आले. महाराज, असे काही करा की नंदाच्या येथे पुत्राचा जन्म व्हावा. शांडिल्यांनी सांगितल्याप्रमाणे सर्वच एकादशी व्रत करू लागले.

एकादशी हे महाव्रत आहे. एकादशीच्या दिवशीं पानसुपारी खाणे किंवा निजणे निषिद्ध आहे. थोडासा फलाहारच करू शकता. पुष्कळ लोक साबुदाणा आणि सुरण पोटभर खातात. सुरण, बटाटे खाल्ल्याने अन्नदोष तर लागत नाही, परंतु एकादशीचे पुण्यही मिळत नाही. दुसऱ्या दिवशी काय खायचे इत्यादींचा विचार केल्याने व्रतभंग होतो. एकादशीच्या दिवशी तर भगवत्स्मरण केले पाहिजे.

सगळ्या गोपाळांना एकच इच्छा होती की परमात्मा प्रसन्न होऊन नंद बाबांच्या घरी पुत्रजन्म व्हावा. भाद्रपद शुक्ल एकादशीपासून सर्वच गोकुळवासी निर्जला एकादशी व्रत करू लागले म्हणून भगवंत गोकुळांत आले.

बालकांनीसुद्धा व्रत केले होते म्हणून ते म्हणू लागले, आमच्या व्रतामुळेच कान्हा आला आहे. कान्हा तर सगळ्यांचाच आहे. नंदमहोत्सवांत सगळे गावच आनंदाने नाचत होते. सगळ्यांनाच वाटत असते की कान्हा त्यांचाच आहे. सगळ्या गावानेच तर व्रत केले होते.

शुकदेव वर्णन करीत आहेत –

इकडे देवकीने आठवा गर्भ धारण केला तर तिकडे कंसाने सेवकांना सावध केले. – माझा काळ

येत आहे, सावध राहा!

सेवक म्हणाले, आम्ही तर नेहमी जागतच असतो. आम्ही अगदी सावध असतो. बालकाचा जन्म झाल्याबरोबर आपल्याला वार्ता कळवू.

देवगण, देवकी-गर्भवासी नारायणाची प्रार्थना करतात, आपण तर सत्यस्वरूप त्रिकालाबाधित आहात. अनेक विद्वानांची अधोगति आम्ही पाहिली आहे. परंतु जी व्यक्ति आपल्या लीलेचे स्मरण आणि आपल्या नावाचा जप करते तिची कधीच अधोगति होत नाही. नाथ आपण कृपा करावी.

देवांनी देवकीलाही आश्वासन दिले. नऊ महिने पूर्ण व्हायला आले. मन, बुद्धि, पंचप्राण इत्यादींची शुद्धी झालेली आहे. या सर्वांची शुद्धि झाल्यावर परमात्म्याच्या दर्शनाची आतुरता वाढत जाते. ईश्वराच्या दर्शनाविना चैन पडत नाही. म्हणून जीव तडफडत असतो आणि अतिशय आतुर होतो, आणि तेव्हाच भगवंत अवतार धारण करतात.

परम शोभायमान आणि सर्वगुणसंपन्न क्षण आला, चंद्र रोहिणी नक्षत्रांत आला, दिशा स्वच्छ झाल्या, आकाश निरभ्र झाले. नदीचे पाणी स्वच्छ झाले, वनराजींमध्यें पक्षी आणि भुंगे गुणगुणू लागले, शीतल सुगंधित पवित्र वायू वाहू लागला. महात्मा लोकांची मने प्रसन्न झाली. स्वर्गात दुंदुभि वाजू लागल्या. मुनि आणि देवगण आनंदाने पुष्पवृष्टी करू लागले आणि परमपवित्र क्षण येऊन ठेपला. श्रावण महिन्याच्या कृष्ण पक्षाच्या अष्टमीच्या मध्यरात्रीची घटका आली आणि कमलनयन चतुर्भुज नारायण भगवान बालकाचे रूप घेऊन वसुदेव-देवकीच्या समोर प्रगट झाले.

भगवंतांनी आपल्या श्रीहस्तांत शंख, चक्र, गदा आणि पद्म धारण केलेले होते. चोहो दिशांना प्रकाश फाकला. त्यांचे चतुर्भुज रूप हेच सांगते कीं त्यांच्या चरणी शरण जाणाऱ्याला चारी पुरुषार्थ ते सिद्ध करून देतील.

जो भक्त अनन्यतेने माझी आराधना करतो त्यांचे धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे पुरुषार्थ मी सिद्ध करतो आणि त्याचे सर्व तऱ्हेने रक्षण करीत असतो.

संपत्ति आणि संततीचा सर्वनाश झालेला होता तरीही वसुदेव-देवकी दीनतेने ईश्वराची आराधना करीत आहेत. प्रभु म्हणाले, माझ्या चतुर्भुज स्वरूपाचे दर्शन घ्या आणि अकरा वर्षेपर्यंत माझे ध्यान करीत राहा. मी अवश्य तुमच्यापाशी येईन.

भगवंतांचे चतुर्भुज स्वरूप अदृश्य झाले आणि दोन इवल्याशा हाताचे बालक श्रीकृष्ण प्रगट झाले.

बाल कान्ह्याचा जय असो.

प्रभु प्रत्यक्ष प्रगट झाले तरी पण ध्यानाची आवश्यकता तर नेहमीच असते.

ज्ञानदीप प्रगट झाल्यावर सुद्धा एखादे इंद्रिय मोकळे राहिले तर विषयरूपी कामपवन प्रविष्ट होऊन ज्ञानदीप मालवून टाकतो. या ज्ञानमार्गात अनेक बाधा येत राहतात.

भक्तिमार्ग फार सरळ आहे. प्रत्येक इंद्रियाला भक्तिरसात भिजवून ठेवा. मग विषयरूपी पवन त्रास देणार नाही.

जेव्हा अकरा इंद्रिये ध्यानांत एकाग्र होऊन जातात तेव्हा प्रभूचा साक्षात्कार होतो. याच कारणाने अर्जुनाला गीतेच्या अकराव्या अध्यायात विश्वरूपाचे दर्शन झाले आहे.

**४. बाळकृष्ण गोकुळांत जातात, आनंदी-आनंद होतो :**

प्रभू म्हणाले, मला गोकुळांत नंदबाबांच्या घरी सोडून या. वसुदेवांनी त्यांना टोपलीत बसविले. पण बाहेर कसे निघावे ? कारागृहाची दारे बंद आहेत आणि बंधनही सुटत नाही. परंतु टोपली डोक्यावर घेताक्षणीच सर्व बंधने तुटून गेली.

डोक्यांत बुद्धी आहे. जेव्हा बुद्धी ईश्वराचा अनुभव करते तेव्हा संसारांतील सर्व बंधने तुटून जातात. जो ईश्वराला आपल्या डोक्यावर धारण करतो त्याच्यासाठी कारागृहाचीच काय, मोक्षाची सुद्धा द्वारे उघडली जातात. हातापायांच्या बेडया तुटून जातात, नदीचा पूरही थांबतो. ज्यांच्या डोक्यावर भगवंत आहेत त्याच्या मार्गात विघ्नें बाधा करू शकत नाहीत.

नुसत्या घरांत येऊन नाही, तर भगवंताने मनांत येऊन राहिल्यावरच बंधने तुटतात.

जो वसुदेवाप्रमाणे श्रीकृष्णाला आपल्या डोक्यावर विराजमान करतो त्याची सर्वच बंधने तुटून जातात. कारागृहाची– सांसारिक मोहाची बंधने तुटून जातात, दारे उघडली जातात. नाही तर हा सगळा संसार मोहरूपी कारागृहांतच निजलेला आहे.

वसुदेव कारागृहांतून बाहेर आले. बलराम धावतच आले. शेषनागाच्या रूपाने बालकृष्णावर छत्र धारण केले. यमुनेला अत्यंत आनंद झाला. नुसत्या दर्शनाने तृप्ति होत नव्हती. माझ्या प्राणनाथांना भेटायचे आहे. यमुनेत पाणी वाढू लागले. प्रभूने लीला केली. टोपलीतून आपला पाय बाहेर काढला. यमुनेने चरणस्पर्श करून कमळाचे फूल अर्पण केले. प्रथम दर्शन आणि मीलनाचा आनंद यमुनेला मिळाला. हळू हळू पाणी कमी झाले.

वसुदेव गोकुळांत येऊन पोचले. योगमायेच्या आवरणांत वश झाल्यामुळे सगळे गाव गाढ झोपेत बुडालेले होते. वसुदेवाने कृष्णाला यशोदेच्या कुशीत ठेवून दिले आणि बालिकारूपी योगमायेला उचलून घेतले. वसुदेव म्हणाले, अजूनही आपले प्रारब्धकर्म बाकी राहिले आहे. म्हणूनच तर भगवंताला सोडून मायेला गळ्याशी धरण्याचा प्रसंग आला आहे.

वसुदेव योगमायेला टोपलींत बसवून परत कारागृहांत येऊन पोचले.

प्रभूस्पर्श झाल्यावर सगळीच बंधने तुटून गेली होती. आता माया आली तर सर्वच बंधने आली. वसुदेव गोकुळांतून मायेला आपल्या डोक्यावर बसवून घेऊन आले म्हणून बंधनेही आली आणि कारागृहाची दारेही बंद झाली. माया बंधन-कर्ती आहे. भगवंतांच्या आज्ञेमुळेच वसुदेवाने बंधनाचा स्वीकार केला आहे.

आता कारागृहांत देवकीच्या कुशींत निजलेली योगमाया रडू लागली. सेवकांनी लगेच संततीच्या जन्माचा समाचार कंसाकडे पोचवला. कंस धावतच आला. कुठे आहे माझा काळ ? माझ्याकडे द्या त्याला.

कंस योगमायेचे पाय धरून तिला दगडावर आपटू लागला. परंतु माया कधी कोणाच्या हाती लागेल काय ? आदिमायेने तर कंसाच्याच डोक्यावर एक लाथ हाणली आणि कंसाच्या हातातून निसटून आकाशगामी झाली. आकाशांत तिने अष्टभुजा जगदंबा भद्रकालीचे रूप धारण केले. तिने कंसाला हाक मारून सांगितले– 'अरे पाप्या, तुझा काल अवतीर्ण झालेला आहे आणि तो सुरक्षित आहे.'

कंसाने पश्चात्ताप करीत वसुदेव-देवकीची केलेल्या अपराधाबद्दल माफी मागितली.

इकडे जन्माष्टमीच्या दिवशी नंदाने बारा वाजेपर्यंत जागरण केले. शांडिल्याच्या सांगण्यावरून सर्वच गाढ झोपी गेलेले होते. बालकृष्ण जेव्हा नंदाच्या घरी आले तेव्हा नंदबाबा निजलेले होते. नंदबाबांनी

पाहिले की कित्येक मोठमोठे ऋषीमुनि त्यांच्या अंगणांत आलेले आहेत, यशोदेने शृंगार केला आहे आणि तिच्या मांडीवर एक सुंदर बाळ खेळत आहे. त्या बाळाला ती न्याहाळीत आहे. शंकर देखील त्या बाळाचे दर्शन करण्यासाठी आलेले आहेत.

नंदबाबा प्रातःकाळी जाग आल्यावर मनांत अनेक संकल्प-विकल्प करीत करीत गोशाळेत आले. ते स्वतःच गोसेवा करीत. गायीची जो प्रेमाने सेवा करतो त्याचा वंश नाश पावत नाही.

नंदबाबांनी प्रार्थना केली— हे नारायणा! दया करा. माझ्या घरी गोसेवक गोपाळकृष्णांचा जन्म होवो.

त्याचवेळी बालकृष्णांनी लीला केली. पिवळा अंगरखा घातलेले, कपाळावर कस्तुरीचा टिळा असलेले बाळकृष्ण गुडघ्यावर रांगत रांगत गोशाळेत आले. या बाळाला नंदांनी पाहिले आणि म्हणाले, 'अरे! हे तर तेच बाळ आहे जे मी आज स्वप्नांत पाहिले. बालकृष्णांनी नंदबाबांना सांगितले, ' बाबा, मी तुमच्या गाईंची सेवा करायला आलो आहे. '

गोशाळेत आलेल्या कान्ह्याला नंदबाबा प्रेमाने न्याहाळीत स्तब्ध झाले. त्यांना देहभानही राहिले नाही. बाळकृष्णाच्या दर्शनाने ते समाधिस्थ झाले.

त्यांच्या कांही लक्षांतच येत नव्हते कीं ते जागे आहेत की निजले आहेत!

सुनंदाला यशोदेच्या कुशींतील बाळकृष्णाचे दर्शन झाले आणि ती धावतच गोशाळेत भावाला सांगायला आली. दादा! दादा! मुलगा झाला आहे.

आनंद! आनंद वाटला. श्रीकृष्ण हृदयांत आले.

नंदांनी यमुनेत स्नान केले. आज जन्मोत्सवाप्रीत्यर्थ स्नान केले जात होते. त्यांना सोन्याच्या आसनावर बसविले गेले. शांडिल्य मुनींनी त्यांना दान द्यायला सांगितले. नंद म्हणाले जे पाहिजे ते घेऊन जाऊ शकता. नंदबाबांनी मोठ्या उदारतेने दान केले. दानाने धनाची शुद्धि होते. गोदान केले.

कित्येक वर्षे तपश्चर्या करूनही महाऋषिमुनींचा काम नष्ट झाला नाही. अभिमान निःशेष झाला नाही. तेव्हां ते सर्व ब्रह्मसंबंध होऊन निष्काम होण्याच्या इच्छेने गायींच्या रूपांत गोकुळांत आले.

नंदबाबांनी दोन लाख गाईंचे दान दिले.

एका ब्राह्मणाला दहा हजार गाई दानरूपाने मिळाल्या. त्याचे छोटेसेच घर होते. कोपऱ्या कोपऱ्यात गाई बांधल्या; तरी पुष्कळ गाई शिल्लक राहिल्या. या ब्राह्मणाची बायको मोठी कर्कशा होती. ती आपल्या पतीला म्हणू लागली— कोणी किती गाई देवो, पण तुम्ही सगळ्याच गाई कशाला आणल्या? इतक्या गाई देणारा कोण निघाला?

ब्राह्मण— अग, तुला ठाऊक नाही का? नंदबाबाच्या घरी पुत्ररत्न झाले आहे. त्यांनी आज हजारो गाईंचे दान केले आहे.

नंदबाबांच्या घरीं पुत्ररत्न झाल्याची वार्ता ऐकून ब्राह्मणी आनंदली. पतिपत्नी दोघेही आनंदाच्या भरांत नाचू लागले.

गावांतल्या सर्वच गोपींमध्ये कन्हैयाच्या जन्माची वार्ता पसरली. तर सर्वच त्याच्या दर्शनासाठी धावत आल्या. जणूकाय नवविधाभक्ती धावतच ईश्वराला भेटायला आली आहे.

गोपींचे एक एक अंग कृष्णमीलनासाठी आणि कृष्णस्पर्शासाठी आंदोलित होत होते. त्यांचे डोळे म्हणत होते— ' आमच्यासारखे भाग्यवान कोणी नाही. आम्हालाच कृष्णदर्शनाचा आनंद मिळेल. ' तर हात म्हणू लागले— 'आम्हीच भाग्यवान आहोत. आम्ही प्रभूला भेट देऊ. ' तर गोपींचे कान म्हणू

लागले– 'आमच्यामुळेच तुम्ही सर्व भाग्यवान आहात. कारण कीं कृष्ण प्रगट होण्याची वार्ता आम्हीच सर्वांच्या आधी ऐकली होती; आम्ही तर कान्ह्याचे बासरीवादन सुद्धा ऐकू', तर हृदय म्हणाले, 'जोपर्यंत मी विरघळत नाही तोपर्यंत आनंद येतच नाही.' पाय बोलले– "हजारो वर्षांपासून आम्ही यौवनसुख आणि धनसंपत्तीच्या मागे धावत आलो आहोत आणि आज प्रभुदर्शनासाठी धावलो आहोत. आता जन्ममरणाच्या दुःखापासून सुटका होईल. सर्वांनाच आनंदानुभव होत होता.

गोपींच्या वेणींतून फुले खाली पडत आहेत आणि म्हणत आहेत– तुम्ही कृष्णदर्शनासाठी आतुरतेने धावत आहात. तुम्ही भाग्यशाली आहात. तुमच्या डोक्यावर राहायला आम्ही योग्य नाही. आम्ही तर तुमच्या चरणांवर पडून तुमच्या चरणरजाच्या स्पर्शाने पावन होऊ.

यशोदेच्या मांडीवर खेळणाऱ्या सर्वांगसुंदर बाळकृष्णाला गोपी दह्याने अभिषेक करू लागल्या. निर्धन गोपी दूध आणि दही घेऊन आल्या आहेत. कृष्णबाळाचे दर्शन झाल्यावर आनंदावेशाने त्यांचें भान हरपले आणि त्या स्वतःलाच दुधादह्याने स्नान घालू लागल्या. सर्वच गोपींचे मन कन्हैयाने आकर्षित करून घेतले. हृदयांत आनंदाचा डोह उसळला आहे. गोपी जेवढे कांही घेऊन आल्या आहेत त्याच्या दसपट करून परत करायचे आहे. कोणाला चांदीचे ताट दिले गेले, तर कोणाला चंद्रहार. यशोदेने विचार केला होता कीं घरांतले सर्वच का ना लुटवावे लागो, पण सगळ्यांच्या शुभेच्छा मिळवायच्या आहेत. गोपी जे कांही मागतील ते त्यांना दिले जावे.

आनंदाने वेड्या झालेल्या गोपी कान्ह्याचा जयजयकार करीत आहेत. एक तर म्हणाली, द्यायचेच असेल तर मला कन्हैयाला द्या. यशोदेने तिला आपल्याजवळ बसवून घेतले आणि तिच्या मांडीवर बाळाला बसविले. आनंद! आनंद!! आनंदी आनंद!!! हजारो जन्मांपासून तुटलेला जीव आज प्रभूला भेटू शकला. ईश्वराशीं भेट झालेला जीव आनंदाने डोलू लागला.

पुरुष तर सगळे बाहेरच राहून गेले, परंतु गोपी मात्र आत जाऊन नाचत आहेत.

पुरुष अहंकार-अभिमानाचे रूप आहे आणि स्त्री नम्रतेचे आणि दीनतेचे. जो गोपींप्रमाणे नम्र होतो त्यालाच ईश्वराच्या राजसभेत प्रवेश मिळतो. अहंकाऱ्याला तेथे प्रवेश मिळत नाही.

नंदाच्या घरी– सर्वांनाच आनंद देणाऱ्याच्या घरी परमानंद (कन्हैया) प्रगट झाला आहे. सगळ्यांचेच आशीर्वाद मिळविणे तसे तर फार कठीण काम आहे, परंतु कोणाचा दुःस्वास तर नका घेऊ! कोणाचा वाईटपणा घेतला नाहीत तर तुम्ही सुद्धा नंदासारखे व्हाल.

वाणी, विचार, वर्तन, व्यवहाराने जो सर्वांना आनंद देतो तोच नंद होय.

सगळ्यांचाच आदर करा. उत्तमोत्तम दान आदरदान आहे. सगळ्याच जीवांना शिवस्वरूप मानून सगळ्यांचा आदर करा. ज्ञान्याचे लक्षणच हे की त्याच्या उद्गाराने, व्यवहाराने कोणालाच उद्वेग किंवा अशांति न व्हावी.

दुसऱ्यांच्या वर्तनाने आपल्या मनाला केव्हांही विचलित किंवा अशांत होऊ देऊ नका. नंदबाबा सदासर्वदा आनंदात राहात असत आणि दुसऱ्यांनाही आनंद देत असत. अशा नंदांच्या घरी परमानंद येतो. सगळ्यांनाच आनंद देता आला नाही तर कांही हरकत नाही. परंतु दुःख तर कोणालाच देऊ नका. कोणी दुःखी होईल असे कधीच कांही करू नका.

आजकाल लोक वर्षातून एकदाच नंदमहोत्सव साजरा करतात, परंतु दरदिवशी नंदमहोत्सव केला पाहिजे. रोज पहाटे चार वाजेपासून साडेपाच वाजेपावेतो नंदमहोत्सव करावा 'उत' चा अर्थ आहे ईश्वर आणि 'सव' चा अर्थ प्रागट्य आहे ईश्वराचे प्रागट्यच उत्सव होय. उत्सवांत धन किंवा भोगादि

नाही, प्रेमच मुख्य असावे.

मंदिरांत नाही, आपल्या घरांतच नंदमहोत्सव साजरा केला पाहिजे. जीवात्म्याचे घर आमचे शरीरच तर आहे. नंदमहोत्सवाचा अर्थ मिठाई वाटणे किंवा दहीदूध उडवणे नाही. असे केल्याने तर आनंदाचा अतिरेक होईल. उत्सव तर हृदयांत व्हायला पाहिजे– हृदयांतच तो साजरा झाला पाहिजे. ईश्वर प्रगट झाल्यावर, मनुष्याला देहांत असूनही देहाचे भान राहात नाही.

देहभान विसरल्यावरच उत्सव सफल होत असतो. परमात्म्याला आपल्या हृदयांत बसवा. हृदयांत परमात्मा प्रगट झाल्यावर, भूक-तहान त्रास देत नाही. जो दररोज नंदमहोत्सव करतो त्याचा सगळा दिवस आनंदांत जातो, निर्धन व्यक्ती सुद्धा हा महोत्सव करू शकते. या उत्सवांत धन नाही, मनच प्रधान आहे.

नंदमहोत्सवाची तयारी तर करावीच लागते. आपल्या शरीराला मथुरा आणि हृदयाला गोकुळ करा; आणि नंतर नंदमहोत्सव कराल तेव्हाच हृदयगोकुळांत परमात्मा प्रगट होतील. 'गो'चा अर्थ इंद्रिये आहे आणि कुल म्हणजे समूह. गोकुलाचा अर्थ इंद्रियांचा समूह अर्थात हृदय.

शरीर मथुरा आहे; हृदय गोकुळ, आणि नंद जीव. ह्या शरीराला मथुरा बनवा. हृदयगोकुळांत बाळकृष्णाला बसवा. मनाला आसक्तीपासून वाचवाल तर शरीर मथुरा बनेल; आणि हृदय गोकुळ. पवित्र कायाच मथुरा आहे.

महाप्रभूंची आज्ञा आहे– मथुरा आणि मधुरा एक आहे. कामसुख आणि संपत्ति मध आहे. ह्या मधापासून जो आपल्याला वाचवितो त्याचे शरीर मथुरा बनू शकते. या दोन वस्तूंमध्ये मन फसलेले आहे. या मनालाच वाचवायचे आहे. मनुष्य अनेक वेळा तनाने तर कामसुखाचा त्याग करतो, परंतु मनाने करीत नाही. तनाने त्याग करील पण मनाने करणार नाही तर तो त्याग दंभमात्र होईल. या दोन वस्तूंमध्ये माया आहे. या दोहोंपासून मनाला वाचवावयाचे आहे.

दोन वस्तूंना प्रभूंनी आसक्तिपूर्ण केले आहे– स्त्री आणि धन. ह्या दोन आसक्तींत मधासारखे आकर्षण आहे. या दोहोंपासून आम्हांला वाचावे लागेल.

संपत्ति, शक्ती आणि भोगाची उपस्थिति असल्यावर सुद्धा मनाला त्यांपासून दूर ठेवणे खरा संयम आहे.

आपल्या तारुण्यांतच जो मनाला अंकुशित करू शकेल तोच शहाणा. म्हातारपणी डोळे तेजोहीन झाल्यावर जर कोणी सिनेमाचा शोक सोडून देईल तर त्याची काय प्रशंसा करावी? भोगविलासांनी यौवन नष्ट करू नका.

कोणी महात्म्याने म्हटले आहे– कांही लोकांचे धन दगडाच्या पूजेत जाते, वाण्याचे धन प्रसादांत जाते आणि जमीनदाराचे धन विवाह इत्यादींमध्ये जाते.

भक्ती सोपी नाही. परस्त्री आणि परसंपत्तीची आसक्ती सोडल्याशिवाय भक्तीचा आरंभ होऊ शकत नाही. सकाळी पूजा केली आणि सर्व कांही झाले, भक्ती झाली असे मानणे बरोबर नाही. जोपर्यंत भोगबुद्धी आहे तोपर्यंत ईश्वराची भक्ती कशी होऊ शकेल. भक्तिमार्गांत भोग बाधक आहे. मनाला हळू हळू भक्तिमार्गाकडे वळवा.

द्रव्याचे चिंतन करीत राहून तर द्रव्य मिळायचे नाही. द्रव्य आणि कामसुखाचा विचारही सोडाल तेव्हांच तुमची काया पवित्र होईल. **यमुना भक्तीचेच नाव आहे. शरीराला मथुरा करायचे आहे आणि हृदयाला गोकूळ. भक्ती-यमुनेच्या किनाऱ्यावर तुम्हाला बसावे लागेल. यमुनेचा– भक्तीचा किनारा**

कधीच सोडू नका. चोवीस तास भक्तीकिनाऱ्यावर राहाल तेव्हांच तुमचे शरीर मथुरा आणि हृदय गोकुळ होऊ शकेल.

जोपर्यंत मनांत मत्सर असेल तोपर्यंत शरीर मथुरा होऊ शकणार नाही. मत्सर तर विद्वान आणि श्रीसंत या दोघांनाही असतो.

देवाच्या राज्यांत अन्याय नाहीच. जे कांहीं होत आहे (घडत आहे) ते योग्यच होत आहे. मनुष्याच्या शासनांत पाप आहे, ईश्वराच्या शासनांत नाही. आजकालचे लोक शरीरापेक्षा मनाने अधिक पाप करतात. या शरीराला मथुरा करा. वर सांगितलेल्या मधापासून मनाला दूर ठेवाल तर शरीर मथुरा होईल. त्या मधापासून शरीराला वाचविण्याचा उपाय काय आहे? मथुरा शब्द उलटला तर 'राथुम' शब्द होईल आणि मधले थु अक्षर काढून टाकाल तर 'राम' राहील. ज्याच्या तोंडात नेहमी राम शब्द वसलेला असतो त्याचेच शरीर मथुरा होत असते. जर परमात्म्याशी नेहमी संबंध झालेला राहील तर 'राम' राहील नाही तर थूच राहील आणि त्याच्यावर सगळेच यमदूत 'थू, थू' करतील.

आम्ही तीर्थयात्रा करावी हे तर ठीकच; पण आपल्या शरीरालाच तीर्थासारखे पवित्र करा आणि हृदयाला गोकुळ करा.

'गो' शब्दाचे अनेक अर्थ आहेत. 'गो' चे अर्थ इंद्रिय, भक्ती, गाय, उपनिषद इत्यादी आहेत. इंद्रियांना विषयांकडे जाऊ देण्यापेक्षा प्रभूकडे वळवा, कारण त्यांचे स्वामी प्रभूच आहेत. भक्ती डोळ्याने सुद्धा होऊ शकते आणि कानाने देखील. डोळ्यांनी भक्ती करण्याचा अर्थ आहे डोळ्यांत प्रभूंना धारण करून जगाला पाहणे. याप्रमाणे जगाकडे पाहण्याने ते कृष्णरूप दिसू लागेल. तुलसीदासांना आणि मारुतिरायांना सीतारामांशिवाय आणखी कांहीच दिसत नव्हते.

मनांत तर नेहमी भगवत्स्मरण चालू द्या. हृदय गोकुळ झाल्याबरोबर कान्हा येईल. एकेका इंद्रियाला भक्तिरसांत ओथंबून टाका. ज्याचे प्रत्येक इंद्रिय भक्ती करते त्याचे हृदय गोकुळ बनते. पुष्कळ लोक कानाने तर भक्ती करतात किंवा डोळ्यांनीही भक्ती करतात, परंतु मनाने करीत नाही. प्रत्येक इंद्रियाने श्रीकृष्णरसाचे पान करा; तरच तुमचे मन— तुमचे हृदय गोकुळ बनेल; आणि सरतेशेवटी परमानंद प्रगट होईल. जे जे इंद्रिय भक्ती करीत नाही ते ते पापाचार करीत असते.

जो आपल्या प्रत्येक इंद्रियाकरवी कृष्णरसाचे पान करवितो तोच गोपी होय.

ज्ञानी आपल्या इंद्रियांना निरोधून प्राणाला ब्रह्मरंध्रांत स्थिर करून आपल्या ललाटांत ब्रह्मज्योतीचे दर्शन घेतात. वैष्णवजन आपल्या हृदयसिंहासनावर बालकृष्णाला विराजित करतात. वैष्णव आपल्या हृदयांत प्रभूचा दिव्य प्रकाश पाहतात.

देवाचे दर्शन घेतल्यानंतर डोळे मिटून त्यांचे स्वरूप आपल्या आंत पहा. श्रीकृष्णाचे स्मरण करतेवेळी देह आणि संसाराचे भान विसरून गेल्यावर नंदमहोत्सव सफल होतो. परमात्मा हृषीकेश आहे. एकेका इंद्रियाचा श्रीकृष्णांशी विवाह करा.

भागवताचा भक्तीत दुराग्रह नाही. केवळ स्वरूपांत निष्ठा ठेवल्याने, एकाच स्वरूपाचे पुनःपुन्हा सतत चिंतन केल्याने मन तेथेच लागून राहते. असे केल्याने मनाची शक्ती सुद्धा वाढते. शरीराने नाही, तर मनाने दररोज गोकुळांत जा. मनाने मथुरेला जा. शरीर कोठेही असो, मनाला मथुरा आणि वृंदावनात पाठवा. मनाने कल्पना करा, भावना करा की यशोदेच्या मांडीवर बाळकृष्ण खेळत आहे, बाळाच्या दर्शनासाठी सगळ्या गोपी धावत येत आहेत इत्यादी. कान्ह्याच्या एकेका लीलेचे कल्पनेने दर्शन करीत रहा. देवाच्या दर्शनानंतर सुद्धा आपले डोळे मिटून त्यांच्या रूपाचे मनोमन दर्शन करीत

रहा. त्याच्या रूपाचे चिंतन करीत रहा.

ज्ञानमार्गांत भेदाचा निषेध आहे. भक्त भक्तीद्वारे भगवंताशीं एकरूप होतो. दोघांचे ध्येय एकच आहे. भक्तीत आरंभी भेद आहे आणि पुढे जाऊन भक्त प्रभूशी एकरूप होतो.

ध्यानांत, दर्शनांत तन्मयता झाल्यावर नंदमहोत्सव संपन्न होतो. जोपर्यंत जगाविषयी भान आहे तोपर्यंत खरा आनंद मिळत नाही. ध्यानाशिवाय ईश्वराचा साक्षात्कार होत नाही.

वसुदेव-देवकींनी अकरा वर्षेपर्यंत प्रभूचे ध्यान केले होते.

ध्यान करणाऱ्याने, तो ध्यान करीत आहे हेही विसरले पाहिजे. आपल्या स्वतःला आणि जगाला विसरून एक ईश्वरच तेवढा शिल्लक राहील तेव्हाच अद्वैत सिद्ध होते. देह आणि जगताचे भान विसरून जो ईश्वरभाव शिल्लक राहतो तेच अद्वैत होय.

संतांची चरित्रे वाचाल तर समजून येईल की आयुष्यभर त्यांनी कष्ट सहन केले आहेत. सांसारिक व्यवहारात तर ते फार दुःखी होते, पण त्यांचे मन अलिप्त राहात होते. आपल्या बायकोच्या मृत्यूनंतर नरसिंह मेहता म्हणाले—

एकदाचे चांगलेच झाले की, जंजाळ मिटले. आता सुखाने श्रीगोपाळाची भक्ती करीन.

नरसिंह मेहताने एक असे तत्त्व आत्मसात केले होते कीं ज्याच्यामुळे दुःखाचे प्रसंग सुद्धा त्यांच्यावर प्रभाव पाडू शकत नसत. त्यांच्या हृदयांत सदैव श्रीकृष्ण विराजमान होते.

वृंदावनांत अनेक साधु दररोज नंदमहोत्सव साजरा करतात. तुम्ही कल्पनेने आणि भावनेने वृंदावनाला जा आणि हा महोत्सव करा. शरीर कोठे का असेना, परंतु मनाने तरी नंदबाबांच्या घरी निवास करा. असा भाव ठेवा की तुम्ही तेथे सेवा करीत आहांत आणि बाळकृष्णाचे दर्शन घेत आहात. यशोदेच्या मांडीवर कान्हा खेळत आहे. गाई उड्या मारीत आहेत. गोपी आनंद लुटत आहेत. अशी कल्पना करीत राहिल्याने सगळा दिवस मोठ्या आनंदांत निघून जाईल.

एखाद्या रूपाचे ध्यान करता येत नसेल तर कृष्णलीलेचे कीर्तन करा. कीर्तनांत असे लीन व्हा की देहभान आणि देशकालाचे सुद्धा भान असणार नाही!

नंदबाबाचे गोकुळ शुद्ध प्रेमभूमि आहे. त्यांत स्वतः सुख मिळविण्याची नाही तर इतरांना सुखी करण्याची भावना आहे. स्वतःला सुखी करण्याची आणि इतरांना दुःखी करण्याची भावना बाळगाल तर सुख तुमचाच त्याग करील. इतरांना सुखी करण्याची इच्छा करणारा कधीच दुःखी होत नाही.

नंदमहोत्सवाचा आनंद पहाटे चार वाजता झाला होता. म्हणून हा ब्राह्म मुहूर्तीच साजरा केला पाहिजे. प्रातःकाळी प्रभुभजनाचा आनंद घेतल्यावर सगळा दिवस मोठ्या आनंदांत व्यतीत होतो. प्रातःकाळी लवकर उठून अर्धा तास ध्यान करा. ईश्वराशीं एकत्व साधा. बारा वर्षेपर्यंत याप्रमाणे नियमितपणे पूजा केल्याने ईश्वराचा अनुभव होईल.

प्रातःकाळी जप, ध्यान, प्रार्थना केल्याने परमात्मा तुम्हाला सगळ्या दिवसभर पापकर्मांपासून वाचवील. प्रातःकाळीं हृदय थोडे विरघळल्यावर सगळाच दिवस आनंदांत जाईल. जर आणखी कांही करू शकला नाही तर नंदमहोत्सवाचे ध्यान केलेत तरीसुद्धा मन शुद्ध होईल. वृंदावनांत अनेक संत नंदमहोत्सवाच्या अठरा श्लोकांचा नित्य पाठ करीत असतात.

नवमीच्या दिवशी महोत्सव झाला. श्रावण वद्य द्वादशीच्या दिवशी शंकर गोकुळांत आले.

**५. श्रीशंकरांचें बाळकृष्ण-दर्शनासाठी आगमन :**

शंकर योगीश्वर आहेत आणि कृष्ण योगेश्वर. योगीश्वर आणि योगेश्वरांची भेट झाली. भगवान शंकर निवृत्तिधर्माचा आदर्श दाखवितात, तर कृष्ण प्रवृत्तिधर्माचा. बाहेरून प्रवृत्त आणि आतून निवृत्त. सर्वच प्रवृत्ति करतात परंतु कोणत्याच प्रवृत्तींत आसक्त होत नाहीत. प्रवृत्ति करतात खरी, पण ती प्रवृत्ति निवृत्ति समानच आहे.

भगवान शंकर म्हणतात– ज्याला ब्रह्मानंदाचा आनंद घ्यायचा आहे त्याला थोडी फार निवृत्ती तर घ्यावीच लागेल.

जो चहा-वीडीसारख्या साधारण तुच्छ वस्तूंचाही त्याग करू शकत नाही तो मोह, माया, काम कसे सोडू शकेल ? ज्याला भजनानंद पाहिजे त्याला विषयानंद सोडावाच लागेल.

शंकर कोणत्याच गावांत जास्त काळ राहात नाहीत. ते स्मशानांतच वास करतात. ते म्हणतात ध्यानानंद-भजनानंद मिळवायचा असेल तर प्रवृत्ति कमी करीत जा.

एका गृहस्थाने आपली एक मुलगी एका शेतकऱ्याला दिली होती आणि एक मुलगी कुंभाराला. एकदा त्याने शेतकऱ्याच्या घरी येऊन आपल्या मुलीचे कुशल विचारले. मुलगी म्हणाली– पाऊस पडत नाही, पाऊस पडला तर सर्व काही ठीक होईल. मग तो गृहस्थ तिथून त्या कुंभाराच्या घरी आला आणि तिथे राहात असलेल्या आपल्या मुलीचे हाल-हवाल विचारू लागला. तर मुलगी म्हणाली– मातीची पुष्कळ भांडी बनविली आहेत; आता त्यांना भट्टीत भाजायचे तेवढे आहे. पण पावसाचा अडथळा येता कामा नये.

ही कथा सगळ्यांचीच आहे. जीव पिता आहे आणि प्रवृत्ति, निवृत्ति त्याच्या दोन मुली. या दोन मुली एकत्र राहू शकत नाहीत. एकत्र राहू लागतील तर दुःखी होतील. निवृत्तीचा आनंद घ्यायचा असेल तर प्रवृत्तीचा मनानें त्याग करा. जोपर्यंत शारीरिक शक्ती आहे तोपर्यंत प्रवृत्तीचा विवेकपूर्वक त्याग करीत जा. तसें तर रक्तदाब (ब्लडप्रेशर) वाढल्यानंतर तर डॉक्टरांच्या सांगण्यावरून शेठ आराम करतात पण ती खरी निवृत्ति नाही.

सगळ्याच प्रवृत्ति एकदम सोडणें असंभव आहे. परंतु प्रवृत्तींना अशा रीतीने आवरा कीं प्रभुसेवेसाठी पुरेसा वेळ मिळत जाईल.

वेदान्ताचा अधिकार विरक्ताला आहे. विलासी माणसाला नाही. गोष्टी तर ब्रह्मज्ञानाच्या करील परंतु धन-संपत्ति, स्त्री, जड पदार्थांवर प्रेम ठेवील तर तो खरा ब्रह्मज्ञानी नाही. जगत् मिथ्या आहे असे नुसते म्हणण्याने नाही तर तसा अनुभव घेण्याने लाभ होत असतो. व्यवहार मिथ्या आहे असें समजून व्यवहार करा. धनसंपत्तीच्या धावपळींत आपण देवाला विसरत आहोत हें भानच मनुष्याला राहात नाही.

भगवान शंकर श्रावण महिन्याच्या कृष्णपक्षाच्या द्वादशीच्या दिवशीं कृष्णाचें दर्शन घ्यायला आले. योगीश्वर आणि योगेश्वरांची भेट झाली. शंकर एकटेच आले.

भक्तींत जर संगति चांगली मिळाली नाही तर भक्तीच्या कार्यांत विक्षेप येईल. भजन आणि दर्शन तर शक्यतो एकट्यानेच करा. इतरांना बरोबर घेतल्याने आम्ही रजोगुणी होतो.

कित्येक लोक भजन आणि दर्शन करण्यासाठी इतरांनाही सोबत बोलवीत असतात. सत्कर्मासाठी इतरांना प्रेरणा देणें ही चांगली गोष्ट आहे. परंतु बरोबर इतरेजन असल्यामुळे रस्त्यांत चांगल्या-वाईट गोष्टी चर्चिल्या जातात. ते चांगले नाही.

भजनाविना अन्य कांहीं उच्चारणारच नाहीं अशा निश्चयानें अनेकांनी एकसाथ प्रवास केला तर तें फार हितकारक ठरेल. भजन आणि दर्शन एकचित्ताने करा. दर्शनानंतर मंदिराच्या व्हरांड्यांत थोडा वेळ बसण्याचें कारण असे आहे कीं भगवंताच्या ज्या रूपाचें दर्शन केले आहे ते हृदयांत ठसवून घ्यावे म्हणजे दुसऱ्या दिवशी सकाळपर्यंत ते मनांत ठसलेले राहील.

कित्येक लोक असे असतात कीं त्यांना दर्शनानंतर जर विचारले कीं देवाचा शृंगार काय होता, कोणते वस्त्र परिधान केले होते, तर ते डोके खाजवू लागतात. दर्शन केल्यावर जर देवाला मनांत ठसवून घरीं गेले तरच तें दर्शन सार्थकी लागते. अधिकतर माणसे भगवंताला मंदिरांतच सोडून आपापल्या बंगल्यांत किंवा दुकानांत जातात.

ईश्वराशिवाय आणखी कोणाचा संग करू नका. जीव अभिमानी आणि विश्वासघातकी आहे.

संतांची दृष्टी नेहमी प्रभूच्या कोणत्या ना कोणत्या रूपांत रमलेली असते. बाह्यदृष्टी तर नेहमी झुकलेलीच असते.

भगवान शंकरांची दृष्टीसुद्धा ब्रह्मांतच स्थिर होती.

शंकरांचे दोन विशिष्ट गण होते– शृंगी आणि भृंगी. ते दोघेही शंकरांच्या बरोबर चलण्याचा हट्ट करू लागले. ते म्हणू लागले कीं, जर त्यांना बरोबर नेले नाही तर ते सर्वांनाच सांगतील कीं हा कोणी साधू नसून हे भगवान शंकर आहेत.

शंकर म्हणाले, 'मी एकटाच जाईन'. तुम्हाला बरोबर नेले तर दर्शन ध्यानांत विक्षेप होईल.

आज सदाशिव गोकुळांत आले आहेत. या लीलेचें कित्येक महात्म्यांनी फारच रसभरित वर्णन केलें आहे. जे आजपर्यंत निरंजन होते ते आज अपेक्षा करणारे झाले आहेत.

जर प्रभूंनी तुम्हाला संपत्ति दिली असेल तर संकल्प करा कीं दररोज सुपात्र साधुसंत आणि गरिबांना भोजन घालीन. रोज कोणा तरी सुपात्राला भोजन-भिक्षा घालण्याचा यशोदेचा नियम होता.

शिवाचें आगमन झालें. लोक म्हणू लागले कीं हा साधू तर शंकरासारखा दिसतो. शंकर शेवटीं आपलें तेज कुठपर्यंत लपवून ठेवू शकतील!

शंकरांच्या जवळ दासी आली आणि म्हणू लागली, 'यशोदेने ही भिक्षा पाठविली आहे, आपण हिचा स्वीकार करावा आणि कृष्णाला आशीर्वाद द्यावा.'

शिव– मी भिक्षा घेणार नाही. मला कोणत्याच वस्तूची अपेक्षा नाही. मला बाळकृष्णाचें दर्शन घ्यायचें आहे.

दासीने कळविलें कीं साधुमहाराजांना आणखी कांहीच नको. ते तर फक्त बाळकृष्णाचें दर्शन घेण्याकरता इतक्या दूरपर्यंत आले आहेत.

संतांची परीक्षा वेशभूषा किंवा जातीपातीने होत नाही, तर त्यांचे डोळे आणि मनोवृत्तीवरून केली जाते. ब्रह्मज्ञान सुलभ आहे पण ब्रह्मद्रष्टा– प्रत्येकांत ब्रह्माचें दर्शन घेणारा– संत दुर्लभ आहे. यशोदेने खिडकींतून डोकावून महाराजांना पाहिले आणि म्हणाली– महाराज, भिक्षा कमी असली तर मी आणखी द्यायला तयार आहे, पण मी बाळाला बाहेर आणणार नाही. तुमच्या गळ्यांत साप आहे. त्याला पाहून बाळ घाबरून जाईल.

शिव– माते, तुझा कान्हा तर "काळाचा काळ, ब्रह्माचें ब्रह्म आहे. तो कोणालाही भिणार नाही कीं त्याला कोणाची दृष्ट लागणार नाही. तो मला ओळखतो सुद्धा.

यशोदा– कशा गोष्टी करत आहांत आपण? माझा बाळ तर तान्हा आहे. आपण हट्ट करू

नका, भलताच आग्रह धरू नका.

नंदबाबाच्या गावाजवळ आजदेखील आशेश्वर महादेवाचें देऊळ आहे. आज देखील शंकर बाळकृष्णाच्या दर्शनाची आशा बाळगून तेथे बसलेले आहेत. व्रज चौऱ्यांयशीची परिक्रमा महापुण्यदायी आहे. याने आयुष्यांतील सगळी पापें जळून जातात. व्रज तर लीलाभूमि आहे. तिथे बसून ध्यान कराल तर परमात्मा स्वतः लीलेचें रहस्य समजावून सांगतील.

इकडे बाळकृष्णाला समजलें कीं शंकर आले आहेत आणि आई त्याला तेथे घेऊन जाण्यास तयार नाही, हें जाणून त्याने जोराने रडायला सुरुवात केली.

दासी यशोदेला म्हणाली त्या साधूचे ओठ हलत आहेत. तू मान किंवा मानू नकोस, पण त्यानेच कांही तरी मंत्रप्रयोग केला आहे आणि त्यामुळे बाळ रडत आहे. असा साधु कधीच पाहण्यांत आलेला नाही. मी बाळकृष्णाला बाहेर नेऊन त्या साधूचा आशीर्वाद मागू ? आणि तिने कान्ह्याला नटवून-सजवून बाहेर नेले.

यशोदा दासीला म्हणाली– त्या महाराजांना सांग कीं बाळाला पाहा, पण टक लावून पाहू नका.

वृंदावनच्या बांकेबिहारीचें रूप दिव्य आहे. श्रीनाथांचें स्वरूप सुद्धा अद्भुत आहे.

जोपर्यंत स्वरूपासक्ति होत नाही तोपर्यंत भक्ति होत नाही. लौकिक नामरूपाची जशी आसक्ति असते तशीच आसक्ति प्रभूच्या नामरूपाविषयीं झाली म्हणजे तीच भक्ति होते.

बांकेबिहारीच्या मंदिरांत पडदा असतो. पडदाच तर माया आहे. जीव ईश्वराचें दर्शन घेतो तेव्हां मध्ये मायेचा पडदा येतो. मंदिरांत राधेचे सेव्य स्वरूप आहे. बांकेबिहारी दोन मिनिटे राधेला आणि मग जगाला दर्शन देतात. चार डोळे मिळाले म्हणजेच दर्शनांत आनंद येतो.

कान्हा हसतो. ह्या साधूनें जादू केली आहे! महाराजांच्या नजरेंत जादू आहे. हा साधारण साधू नाही.

दासी बाळकृष्णाला शिवांच्या जवळ घेऊन आली. शंकरांनी दर्शन घेऊन नमस्कार केला. दर्शन घेऊन आनंद तर झाला, पण तृप्ति झाली नाही. मला कान्ह्याला भेटायचे आहे. आनंद अद्वैतांत आहे, द्वैतांत नाही. मला आपल्या प्रभूंना भेटायचे आहे– श्रीकृष्णाशीं एक व्हायचे आहे. जोपर्यंत ईश्वरापासून जीव थोडा सुद्धा दूर असेल तोपर्यंत त्याला भय राहील.

शंकरांना वाटले जर बाळकृष्ण माझ्या कडेवर येईल तर खूप आनंद होईल. शंकर म्हणाले, तू या बाळाच्या भविष्याविषयीं विचारत आहेस ना ? मग जर याला माझ्या कडेवर देशील तर याच्या हातावरील रेषा चांगल्या रीतीनें पाहतां येतील.

यशोदेने बाळकृष्णाला शंकरांच्या कडेवर दिले. शंकर समाधींत मग्न झाले.

अद्वैतांत गोष्टी होऊ शकत नाहीत, द्वैतातच होत असतात. जर हरि आणि हर एक झाले तर तेथे कोण काय बोलेल ? तेथें समाधी ही ठरलेलीच.

शंकरांनी यशोदेला सांगितलें कीं, तुझा मुलगा तर सम्राट होणार आहे.

शंकरांनी तांडवनृत्य केलें. अतिआनंदाच्या अवस्थेंत जीव नाचू लागतो. हातांत आंबा आल्यावर लोक नाचू लागतात. इकडे तर शंकरांच्या हातांत बाळकृष्ण आले आहेत.

शंकर नृत्यांत तन्मय झाले आहेत. तेथे नंदबाबा आले, भगवान शंकरांचा जयजयकार झाला.

बाळकृष्णाला हृदयांत ठेवून शंकर कैलासांत परतले.

त्रयोदशीच्या दिवशीं नंद मथुरेला आले. चतुर्दशीच्या दिवशी पूतना आली.

नंदबाबा दरवर्षी कंसाला कर देत होते. या वेळी सुद्धा कर देण्याची वेळ आली. नंदबाबा म्हणाले— कान्ह्याला संभाळा.

परमात्म्याशी नेहमी संबंध ठेवून असा. सगळ्यांच्याच रक्षकाचें रक्षण कोण करणार? परंतु त्यांना ह्रदयांत बसवल्यानंतर मनामध्ये लौकिक भोगाची इच्छा निर्माण होऊ नये यासाठी नेहमीच सावध रहा. कारण एखादी इच्छा मनांत आली कीं भगवंत ताबडतोब ह्रदयांतून पळून जातात.

कान्हा नेहमीकरताच जर ह्रदयगोकुळांत बसलेला राहील तर बेडा पार होईल. ह्रदयगोकुळांत श्रीकृष्णाचें आगमन झालें तर नंदाचें (जीवाचे) बाहेर भटकणे बंद होईल.

नंदबाबा कर देण्यासाठी मथुरेंत आले. ते कंसाच्या राजसभेंत आले आणि त्यांनी कंसाला कर— सुवर्णाचें ताट आणि पंचरत्नें भेट दिली. आणि समाचारही सांगितला कीं त्यांच्या या उतरत्या आयुष्यांत त्यांच्या घरीं पुत्रजन्म झाला आहे.

कंसाला काय ठाऊक कीं हा कान्हाच त्याचा काळ आहे. त्याला तर साश्चर्य आनंद झाला. त्याने विचार केला कीं भेटीला अनुरूप त्या बाळाला आशीर्वादही दिला पाहिजे. त्याने बालकाला आशीर्वाद दिला कीं मोठा झाल्यावर तो राजा होवो! त्याचा जयजयकार होवो! त्याच्या शत्रूंचा लवकर विनाश होवो. कंसाने नकळतच कृष्णाचा जयजयकार केला आणि त्याला आशीर्वाद दिला.

शत्रु देखील ज्याला आशीर्वाद देतील आणि वंदन करतील तो ईश्वरच असेल ना?

भेटीला अनुरूप आशीर्वाद देणारा कंसच आहे.

नंदबाबा म्हणाले— सगळ्या व्रजवासींनी माझ्यासाठी एकादशी इत्यादी व्रतें केली. त्यांच्यामुळे मला पुत्र झाला आहे. नंदबाबा यश इतरांना देत आहेत!

शुकदेव वर्णन करीत आहेत.

नंद वसुदेवाला भेटायला गेले. वसुदेवांना खूप आनंद झाला. दोघांनीही एकमेकाला कुशल विचारले.

कोणा मित्राची भेट झाल्यावर आपल्या स्वतःच्या सुखाच्या गोष्टी करू नका, परंतु त्याचें दुःख जाणून घेऊन त्याला धीर द्या. त्याचें सांत्वन करा.

नंद वसुदेवांच्या सुखदुःखाविषयीं बोलू लागले. ऐकले आहे की तुमच्या येथे मुलगी जन्माला आली होती आणि तिची हत्या करण्यासाठी कंस आला होता.

वसुदेव— हो, हे तर खरे आहे, पण यात कंसाचा नाही, माझ्या कर्माचाच दोष आहे. परंतु तुमच्या घरी जे बाळ आहे ते माझेच आहे.

नंदबाबांनी भोळेपणाने म्हटले, 'हो, तुमचेच आहे.'

वसुदेव मनांत म्हणत होते, कान्हा माझाच आहे. मीच त्याला तुमच्या घरी त्या रात्री ठेवून आलो होतो. परंतु नंद ही गूढार्थ असलेली गोष्ट समजू शकले नाहीत.

नंद (जीव) गोकुळ सोडून कुठे दूर जातो तर तिथे काम, मद, लोभ, मोह, मत्सर इत्यादी राक्षस येऊन थडकतात. नंद कृष्णाला सोडून कंसाकडे जातात तर इकडे गोकुळांत विपत्ति येते, बंड माजतें.

नंद बाबांना वाटले काही खेळणी घेऊन जाईन तर बाळाला आनंद वाटेल.

कोठे बाहेर जावे लागले तर तेथून देवासाठी एखादी चांगली वस्तू आणावी. तुमचा प्रवास भक्तिमय होऊन जाईल.

आता पूतनावधाची गोष्ट येत आहे.

**६. पूतना-वध: 'पूतना' चा अर्थ:**

योगमायेने आकाशवाणीच्या द्वारे कंसाला सांगितले की तुझ्या काळाचा जन्म झालेला आहे. तर कंस घाबरून गेला. त्याने त्याचवेळी जन्माला आलेल्या सगळ्याच मुलांची हत्या करून टाकण्याचा आदेश दिला; आणि याच हेतूने त्याने पूतनेची गोकुळाकडे पाठवणी केली. चतुर्दशीच्या सकाळी ती गोकुळात आली.

'पूत' चा अर्थ पवित्र असा आहे आणि जी 'पूत' नाही ती 'पूतना'.

पवित्र काय नाही ? अज्ञान. तेव्हा 'पूतने'चा अर्थ झाला 'अज्ञान', 'अविद्या'. आणि पवित्र काय आहे ? ज्ञान ! या संसारात ज्ञानाशिवाय आणखी काही पवित्र करणारे नाही. ज्ञानासारखे पवित्र काहीच नाही. ज्ञान धनार्जनाचे साधन नाही. आत्मस्वरूपाचे ज्ञानच खरे ज्ञान होय. ज्ञान पवित्र आहे आणि अज्ञान अपवित्र. अज्ञानांतून वासनेचा जन्म होतो. पूतना वासनेचेच स्वरूप आहे.

पूतना चतुर्दशीच्या दिवशी का आली ? कारण तिने चौदा ठिकाणी वास केला होता.

अविद्या वासना चौदा स्थानी राहते. पांच ज्ञानेंद्रिये, पांच कर्मेंद्रिये, मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार. ही चौदा स्थाने वासना-अविद्या-पूतनेच्या बसण्याची आहेत. याच कारणाने ती चतुर्दशीच्या दिवशी आली.

रामायणांत सुद्धा आम्ही पाहिले आहे की कैकेयीने रामासाठी चौदा वर्षांच्या वनवासाची मागणी केली होती. याचेसुद्धा हेच कारण आहे की त्या चौदा स्थानांत वसलेल्या रावणाला मारण्यासाठी चौदा वर्षांच्या तपश्चर्येची आवश्यकता होती.

नीति आणि धर्माने प्रतिबंध केल्यावरसुद्धा डोळे जर परस्त्रीकडे धावतील तर समजा की आपल्या डोळ्यांत पूतना येऊन बसली आहे. स्त्रीला स्त्रीरूपांत नाही, ब्रह्मस्वरूपांत पहा. डोळ्यांतून शिरलेले पाप मनात येऊन बसते, डोळ्यात पूतना असेल तर काम मनांतही बसेल.

जगांतील कोणत्याही व्यक्तीला भगवद्भावाने पाहण्यात काही वाईट नाही, ते चांगलेच आहे. परंतु कोणत्याही व्यक्तीला सांसारिक कामभावाने पाहाल तर समजा की मनात पूनता येऊन बसली आहे.

धर्म आणि नीति ज्या खाद्यपदार्थांचा आहार करण्याचा निषेध करतात तेच खाण्याची इच्छा व्हायला लागली तर समजा की तुमच्या जिभेंत पूतना येऊन बसली आहे.

बीभत्स आणि अतिशय कामुक गोष्टी ऐकण्याची इच्छा झाली तर समजा की पूतना तुमच्या कानावर स्वार झाली आहे.

पूतना प्रत्येक इंद्रियावर बसलेली आहे आणि ती त्रास देत असते. सगळ्याच इंन्द्रियांची द्वारे बंद करून टाका ज्यामुळे पूतना आत प्रविष्टच होऊ शकणार नाही.

पूतना नटूनथटून सुंदरीचे रूप घेऊन गोकुळात आली.

तीन वर्षांच्या वयापर्यंत बालकाला शिशु म्हटले जाते. या शिशूंना मारण्यासाठी पूतना आली आहे.

प्रश्न हा आहे की पूतना शिशूलाच का मारते आणि शिशुवयाच्या पुढच्या अवस्थेच्या बालकाला का मारीत नाही ?

जीवाच्या चार अवस्था आहेत— (१) जागृती, (२) स्वप्न, (३) सुषुप्ति आणि (४) तुर्यगा. जागृत अवस्थेत पूतना डोळ्यावर स्वार असते. डोळ्यांतील चंचलता मनाला चंचल करते. याप्रमाणे

जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीनही अवस्थांमध्ये अज्ञान त्रास देते. अर्थात् पूतना तीन वर्षापर्यंतच्या शिशूंना मारते. या तीन अवस्थांना सोडून तुर्यगा अवस्थेंत जीवाचा संबंध ब्रह्माशी होतो त्यावेळेला पूतना त्रास देऊ शकत नाही.

जो तुर्यगा अवस्थेंत प्रभूशीं एकरूप होतो त्याला पूतना— अज्ञान मारू शकत नाही.

पूतना तीन वर्षांच्या आतील बालकाला मारते याचा अर्थ असा सुद्धा आहे की जो सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांत फसलेला आहे त्याला ती मारते. माया त्रिगुणात्मक आहे. या मायेत फसलेल्या व्यक्तीला पूतना मारते.

संसाराच्या मोहजालांत फसलेले सगळेच जन बालकेच आहेत. त्यांना पूतना-अज्ञान मारते, परंतु सांसारिक मोहाचा त्याग करून जो ईश्वराच्या निर्गुण स्वरूपांत लीन झालेला आहे, गुणातीत झालेला आहे त्याला पूतना मारू शकत नाही. गुणातीत अर्थात प्रकृतीच्या पलीकडे गेलेल्या व्यक्तींचे पूतना काही बिघडवू शकत नाही.

जेव्हा पूतना आली तेव्हा गोकुळच्या गाई वनांत चरायला गेल्या होत्या आणि नंद मथुरेला गेलेले होते. या घटनेचा सूचितार्थ काय आहे?

गाईंचे वनगमन अर्थात इंद्रियांचे विषयवनांत गमन. इंद्रियें जर विषयवनांत भटकत असतील तर पूतना-वासना मनात येऊन थडकेल. अज्ञान मनावर स्वार होईल तेव्हा इंद्रिये विषयामध्ये हरवून जातात. बहिर्मुख होतात तेव्हा वासना येते.

इंद्रियांना प्रभूकडे वळवून निरुद्ध कराल तर पूतना-वासना त्रास देणार नाही.

नंद अर्थात जीव. जीव जेव्हा हृदयगोकुळ सोडून मथुरा अर्थात देहसुख, देहदृष्टींत हरवून जाईल तेव्हा हृदयगोकुळांत पूतना-अज्ञान वसति करते.

नंद अर्थात जीव श्रीकृष्णाला सोडून मथुरेला गेला, अर्थात देहसुखात अडकला की वासना येऊन थडकते.

नंद आपल्या आवासात नसला म्हणजेच पूतना येते.

पवित्र शरीरा (मथुरे) त पुण्यशाली हृदयच गोकुळ आहे, नंद जीवात्मा आहे.

नंद म्हणजे जीवात्मा परमानंद परमात्मा श्रीकृष्णाशी विन्मुख होऊन काम-कलहरूपी कंसाला भेटायला गेला आणि इंद्रिये ह्याच गायी विषम वनाकडे धावत गेल्या तेव्हाच अविद्या रूपी पूतना आली.

पूतना शृंगार करून आली आहे. अविद्या आपल्याबरोबर कित्येक दोष घेऊन येत असते.

अविद्या आपल्याबरोबर पाच दोष घेऊन येते. ते पाच दोष याप्रकारे आहेत—

(१) देहाध्यास, (२) इन्द्रियाध्यास, (३) प्राणाध्यास, (४) अंतःकरणाध्यास आणि (५) स्वरूप-विस्मृति (विवेक-भान सुटणे).

पूतनेचे स्वरूप पाहून यशोदा आणि अन्य गोकुळवासी मोहित झाले. पूतनेची वेणी पाहून देहाध्यास झाला, रूप पाहून इंद्रियाध्यास झाला म्हणून स्वरूपाची विस्मृति झाली. परिणामी तिला कोणीच अडवले नाही. ती सरळ नंदबाबांच्या घरात शिरू शकली.

पूतनेला पाहिल्याबरोबर कान्ह्याने आपले डोळे झाकून घेतले. पूतना वर वर तर चांगली वागणूक करीत होती पण तिच्या हृदयात कुटिलतेचे विष भरलेले होते. पूतनेने आपल्या स्तनांनासुद्धा विष लावले होते.

संसार-सुखाचा उपभोग घेण्यासाठी मनुष्यसुद्धा आपल्या आत्म्यावर वासनेच्या विषाचे आवरण

घालतो.

पूतनेने बाळाला मांडीवर घेऊन आपले विषाने माखलेले स्तन त्याच्या तोंडात दिले. कान्ह्याने तर दूध प्यायला सुरुवात केली आणि पूतना वेदनेमुळे आक्रंदन करू लागली. परंतु कान्हा तर दूध पीतच राहिला. आणि पूतना हळूहळू निष्प्राण झाली.

सौंदर्य पाहून मनुष्यमात्र लुब्ध होतो आणि त्याचें भान हरपते. सर्वच व्रजवासी पूतनेच्या कृत्रिम शृंगारावर मोहित झाले होते आणि तिला कोणीच अडविले नाही.

श्रीमद् शंकराचार्यांनी शतश्लोकीत म्हटले आहे, लोक त्वचेची, रूपरंगाची तर खूप मीमांसा करतात, परंतु आत्म्याची मीमांसा करीतच नाहीत. जो मनुष्य कातड्याचे चिंतन करतो तो पुढल्या जन्मी चांभार होतो, म्हणून शरीराच्या शृंगारात वेळ घालवू नका.

ज्याचे शरीर सुंदर आहे परंतु हृदय विषाने भरलेले आहे तोच पूतना आहे. पूतना बाहेरून फार सुंदर होती, परंतु तिचे मन फार मलीन होते. ज्याची वस्त्रें सुंदर आहेत परंतु मन अस्वच्छ आहे तो पूतनाच आहे.

ज्याची आकृति तर चांगली आहे परंतु कृति वाईट, तोच पूतना.

चारित्र्याची परीक्षा केल्याशिवाय कोणाकडून पाणीसुद्धा पिऊ नये. भलेही भांडी-पेले चमकत असतील, पण त्याचे मन मळलेले असू शकते. मोठमोठे तपस्वीसुद्धा सौंदर्याच्या मोहजालात अडकलेले आहेत आणि फसले आहेत.

समोरासमोर असल्यावर प्रशंसा करतील, परंतु त्याच्या अनुपस्थितींत निंदा करतील ते सुद्धा पूतनाच होत. जे काही भले-वाईट म्हणायचे असेल ते ज्याच्या त्याच्या समोरच म्हणून टाकले पाहिजे.

जीवाचा स्वभाव त्या पूतनेसारखाच आहे. आपल्या आत्म्यावर अज्ञान, अविद्येचे पांघरूण घालून तो विषयानंदात बुडून जातो.

कोणाच्याही बाह्य रूपरंगाने किंवा कृत्रिम शृंगाराने मोहित होता कामा नये. जो बाहेरून सुंदर आहे तो आतूनही सुंदर असेलच असे मानणे मूर्खपणा होईल. पूतना दुष्ट होती तरीही व्रजवासी तिच्या बाह्य रूपरंगाकारणे फसले.

वासना निर्माण झाल्यावर जीव आपले स्वरूप विसरून जातो. पूतनारूपी अज्ञानामुळे स्वरूपाची विस्मृति होते.

पूतनेला पाहून व्रजवासियांना इंद्रियाध्यास झाला आणि स्वरूपाची विस्मृति पण झाली.

वासनारूपी पूतनेचा विनाश झाल्यावरच कृष्णमीलन होते. तेव्हा असे समजा की श्रीकृष्ण, वासनारूपी पूतनेला मारून (शुभ) शकुन करतात.

मनुष्य वासनेचा दास आहे म्हणून त्याचे पतन होते.

वासनारूपी पूतनेशी कधीच डोळे मिळवू नका. डोळे ईश्वराकडे लावून ठेवाल तर वासना तुमच्या हृदयांत केव्हाच येऊ शकणार नाही.

पूतनेला कोणीच अडविले नाही म्हणून ती आत आली. जेव्हा ती आत आली तेव्हा कान्ह्याने डोळे मिटून घेतले.

साधारणतः पूतना डोळ्यांच्या द्वारेच मनांत शिरत असते आणि मग निघण्याचे नावच घेत नाही. डोळे बिघडले की मनही बिघडते. म्हणून डोळ्यांना नेहमी संभाळून ठेवा.

भगवंत जेव्हा डोळे मिळवतात– दृष्टी आपल्याकडे करतात तेव्हाच दर्शनात आनंद येतो. पूतना

मलीन हृदय घेऊन प्रभूपाशी गेली तेव्हां भगवंतांनीही डोळे मिळविलेच नाहीत, मिटून घेतले.

भगवंत आम्हाला हे दाखवू इच्छितात की ते पाप्याशी डोळे मिळवत नाहीत, त्याच्याकडे पाहात देखील नाहीत.

भगवंताला तर आम्हाला हीच प्रार्थना करायची आहे की, 'हे नाथ, आम्ही आपल्याला शरण आलो आहोत, मला पाप्याला भवसागर पार करून द्या.'

परंतु जीव फार अभिमानी आहे. तो अशी प्रार्थनाच करीत नाही. तो तर आहे रिकाम्या हाताचा पण तो अखडून चालतो.

विद्या, बल, चातुर्य काहीच नाही. ईश्वराच्या कृपेशिवाय मनुष्याजवळ काय येऊ शकते?

जीव भगवंताला शरण जाईल तर त्याची सर्वच पापे दूर होऊ शकतील. कारण भगवंतांनीच तर वचन दिले आहे.

जो माझा झालेला आहे त्याचा कोणी कधीच विनाश करू शकत नाही. शुद्ध प्रेमात तर इतरांना सुखी करण्याचीच भावना असते.

तैत्तिरीय उपनिषदांत चार सूत्रें आहेत—

मातृदेवो भव। पितृदेवो भव।
आचार्य देवो भव। अतिथि देवो भव॥

एका महात्म्याने यात एक सूत्र आणखी जोडले आहे ते असे—

परस्पर देवो भव।

काळ नाही परंतु काळीज (मन) बिघडले आहे आणि त्यामुळेच कलियुग आले आहे. माणसे जर एकमेकाना देवरूप समजू लागतील तर सत्ययुग येऊ शकते.

पूतनेला पाहिल्याबरोबर कन्हैयाने आपले डोळे का मिटून घेतले? महात्म्यांनी अनेक कारणे सांगितली आहेत—

(१) पूतना स्त्री होती. स्त्री अवध्य समजली गेली आहे. पूतनेला पाहून भगवंताला वाटले हिला मारावे तर लागेलच. स्त्रीहत्या करण्याचा त्यांना संकोच होत होता म्हणून त्यांनी डोळे मिटून घेतले. समोर एखादा पुरुष असेल आणि वीरता दाखवायची असेल तर गोष्ट निराळी आहे. परंतु एखाद्या स्त्रीला मारण्यात काय वीरता?

(२) तर दुसऱ्या महात्म्यांना हे कारण पटत नाही. पूतना स्त्री तर होती पण ती राक्षसी होती. तिने अनेक मुलांची हत्या केली होती. आणि इथे सुद्धा कान्ह्याच्या हत्येच्या हेतूनेच आली होती.

भगवंताच्या डोळे मिटण्याचे कारण आणखी निराळेच आहे. यांच्या डोळ्यात वैराग्य आहे. त्यांनी विचार केला, जर पूतनेशी डोळे मिळवले तर तिला ज्ञान प्राप्त होईल. ती समजेल की हे ईश्वर आहेत. माझ्या ईश्वरत्वाचे ज्ञान तिला झाल्यावर मी जी लीला करू इच्छितो ती करू शकणार नाही.

ईश्वराचे ज्ञान लीलेत बाधारूप आहे.

जर पूतनेला कळले की हा ईश्वर आहे तर मग ती दूध पाजणार नाही.

कृपा करीत असता जर भगवंतांनी कोणाशी डोळे मिळविले तर त्याला ज्ञान प्राप्त होते.

भगवान अर्जुनाला म्हणाले होते— अर्जुना, मी ज्याच्यावर कृपा करतो त्याला माझ्या स्वरूपाचे

ज्ञान होत असते.

जर मी पूतनेकडे पाहिले तर तिला, मी कोणी सामान्य नाही, काळाचाही काळ आहे याचे ज्ञान होईल. तिला असे ज्ञान झाल्यावर मी लीला करू शकणार नाही. ही मला सामान्य बालक समजूनच मारायला आली आहे, म्हणून तिला माझ्या खऱ्या स्वरूपाचे ज्ञान देणे ठीक नाही.

याप्रमाणे पूतनेला अज्ञानांत ठेवण्यासाठीच भगवंताने आपले डोळे मिटून घेतले होते.

(३) एक महात्मा म्हणतात की हेही कारण ठीक नाही. दृष्टिमीलन होण्याबरोबर पूतनेला ज्ञान होण्याविषयींचे म्हणणे बरोबर नाही. दुर्योधनाला ज्ञान झाले होते का?

पूतना विष घेऊन आली तर कृष्ण डोळे मिटून विचार करू लागले की हिला गोलोकांत पाठवावी की वैकुंठात!

(४) तर दुसरे एक महात्मा आणखीनच निराळे कारण सांगतात. एखादें पुण्य तरी गाठी असल्याशिवाय जीव ईश्वराच्या समीप जाऊ शकत नाही. भगवंत डोळे मिटून हे पाहू लागले की या पूतनेने एखाद्या जन्मी तरी काही पुण्य केले आहे की काय?

(५) एक महात्मा सांगतात– कान्हा तर समजून चालला होता कीं गोकुळचे लोक त्याला लोणी-खडीसाखर खायला देतील, परंतु इथे तर लोक लोणीसाखरेच्या ऐवजी विष पाजू इच्छितात! आणि भीतीमुळे त्याने डोळे मिटून घेतले.

(६) तर आणखी एक महात्मा सांगतात, परमात्मासुद्धा कधी भिऊ शकतात का? कान्ह्याने विचार केला की विष पिण्याची तर शिवांना सवय आहे, मला तर विष आवडतच नाही. म्हणून त्यांनी डोळे मिटून शंकरांची प्रार्थना केली. तुम्ही विष प्यायला या, मी दूधच पिणार. भगवान शंकरांचे ध्यान करण्यासाठीच कान्ह्याने डोळे मिटून घेतले होते.

कान्हा डोळे बंद करून शिवांचे स्मरण करीत विष प्यायला त्यांना बोलावीत आहे, शिवतत्त्वाचे आवाहन करीत आहे.

जेव्हा एखाद्या देवाचे स्मरण करायचे असते किंवा त्याला बोलवावयाचे असते तेव्हा डोळे बंद करूनच त्याचे ध्यान करावे लागते.

(७) एक महात्मा निराळेच म्हणतात, मला हे कारण योग्य वाटत नाही. कृष्ण विष पचवू शकत नव्हते का? ते तर काळाचेही काळ आहेत.

कृष्णाचे डोळे मिटून घेण्याचे कारण निराळेच आहे. त्यांच्या डोळ्यांत सूर्य आणि चंद्राचा वास आहे. महायोगी सूर्यमंडळाला पार करून ब्रह्मलोकांत जात असतात.

कृष्ण पूतनेला ब्रह्मलोकांत पाठविणार आहेत हे पाहून सूर्य-चंद्रांना (अर्थात भगवंतांच्या नेत्रांना) बरे वाटले नाही. आपल्या कृष्णाला तर ही विषपान करायला आली आहे. तर मग तिला ब्रह्मगति का दिली जावी? असा विचार करून डोळ्यांनी पापण्या बंद करून घेतल्या.

चांगले तर हेच की ईश्वराला उत्तमोत्तम वस्तू अर्पण करावी. स्वतः खाण्याने संतोष होत नाही. इतरांना खाऊ घालूनच संतोष मिळत असतो.

सूर्य-चंद्र (दोन्ही डोळे) विचार करू लागले की सर्वोत्तम वस्तु अर्पण करण्याऐवजी ही पूतना तर विष घेऊन आली आहे. हिला सद्गति मिळू नये हेच चांगले. असा विचार करून सूर्य-चंद्ररूपी नेत्रांनी आपली प्रवेशद्वारे (पापण्या) बंद करून घेतली.

(८) दुसरे एक महात्मा निराळेच कारण सांगतात–

भगवंत विचार करीत होते की या विषदायिनी पूतनेला मी मुक्ति देणार आहे तर लोणी-खडीसाखर खाऊ घालणाऱ्या व्रजवासियांना मी कोणती गति द्यावी? कारण मुक्तीपेक्षा श्रेष्ठ अशी दुसरी वस्तु द्यायला माझ्यापाशी नाही. आणि याप्रमाणे विचारात मग्न असलेल्या भगवंतांनी डोळे मिटून घेतले.

याप्रमाणे हे महात्मा लोक दशमस्कंधांत भगवंताच्या लीलेत वेड्यासारखे झाले आहेत. जीव गोस्वामी जे एका काळी एका राजाचे दिवाण होते, ते कृष्णप्रेमांत वेडे होऊन लंगोटी लावून फिरू लागले. दशमस्कंधाचे श्रवण झाल्यावर ते कृष्णप्रेमांत वेडे होऊन गेले आणि ताडपत्राची लंगोटी नेसून लीलानिकुंजात 'राधेकृष्ण राधेकृष्ण' म्हणत फिरू लागले.

आम्ही पाहिले आहे की रामचंद्रांनी सुद्धा शूर्पणखेशी डोळे मिळवले नव्हते. रामायणातील शूर्पणखा आणि भागवतांतील पूतना दोन्ही एकच होत. दोघीही वासना*च* आहेत. पूतना डोळ्यांतून मनात येते. सुंदर विषयांना पाहून डोळे त्यांच्यामागे धावतात. मनाला ठाऊक असते की हे माझे नाही, मला हे मिळायचे नाही. तरी पण ते पाप करते. पूतना-कामवासना प्रथम डोळ्यांत येते, नंतर मनांत उतरते.

पूतनेने यशोदेला म्हटले, मी तुमच्या बाळाला दूध पाजीन तर तो धष्ट-पुष्ट होईल. यशोदेने बाळाला पाळण्याबाहेर काढले आणि पूतनेच्या मांडीवर दिले. पूतना मामी या सहा दिवसांच्या बाळाचे लाड करून गोंजारू लागली. कान्ह्याला माहीतच आहे कीं ही लाड करायला नाही, मारायला आली आहे.

पूतना यशोदेला म्हणाली, तुला घरांत काही कामकाज करायचे असेल तर जाऊ शकतेस.

भोळी यशोदा घरांत जाऊन कामाला लागली. इकडे पूतनेने बाळाला दूध पाजायला सुरुवात केली. कान्हा तर दोन्ही हातांनी स्तन धरून बळ लावून दूध पिऊ लागला. कान्ह्याला तर दुधाबरोबर जणू काय प्राण देखील प्यायचा होता. पूतना व्याकुळ झाली. ती रडून रडून म्हणू लागली, मला सोडून दे, कान्ह्या मला सोडून दे.

कान्हा म्हणाला– पूतना मावशी! माझ्या आईने तर धरायलाच शिकविले आहे, सोडायला नाही.

मला धरून ठेवता येते, सोडायला नाही. मी आज तुला सोडणार नाही. मी तर तुझा उद्धारच करीन.

भगवंताच्या मारात सुद्धा प्रेमच असते.

परमआश्चर्य झाले!

पूतनेने दोनदा "मला सोडून दे, मला सोडून दे" म्हटले. जणूकाय, इहलोक आणि परलोकांतून सोडवून गोलोकधामांत घेऊन जायची प्रार्थना करीत होती ती. ती अहंता आणि ममतेतून सोडवून कृतार्थ करण्यासाठी प्रार्थना करीत होती. पूतना व्याकुळ झाली म्हणून स्वरूपानुसंधान राहिले नाही. तिने आपले राक्षसी रूप धारण केले आणि आकाशमार्गाने कृष्णाला उडवून घेऊन जाऊ लागली, तेव्हा नंदाच्या बगीच्यातील एका झाडावर कान्ह्याने पूतनेला पाडलें. ती वृक्षावर पडली त्यावेळी आणखीही वृक्ष तुटून पडले. पूतना आणि वृक्ष पडल्यामुळे फार मोठा आवाज झाला.

अविद्येमुळे षड्‌विकार उत्पन्न होतात.

राक्षसीच्या छातीवर कान्हा विराजमान होता. आवाज ऐकून गोपी धावत आल्या. यशोदेला रागाऊ लागल्या. आम्ही किती नवससायास केले तेव्हा कोठे तुला मुलगा झाला, पण तुला तर त्याची काहीच कदर नाही!

यशोदेने गोपींचे रागेजणे रास्त मानले. ती म्हणाली, हे माझे पहिलेच मूल आहे. मला मुलाच्या लालन-पालनाचा काहीच अनुभव नाही! तेव्हा चूक झाली. आजपासून तुमचे सांगणे ऐकत जाईन.

गोपी म्हणाल्या– कोणाही अनोळखी स्त्रीकडे आपण आपले मूल कधीच देऊ नये. व्हायचे होते ते झाले. आता आम्ही घरी जाऊन कन्हैयाची दृष्ट काढतो.

बाळकृष्णाला गाई फार आवडायच्या. एक गंगी नावाची गाय तर कृष्णाचे दर्शन केल्याशिवाय पाणी देखील पीत नसे. जेव्हा गोपाळ तिला समजवून थकून जात तेव्हा ते यशोदेपाशी येत आणि म्हणत– माते, गोशाळेत कृष्णाला घेऊन जायचे आहे. बाळकृष्णाचे दर्शन झाले म्हणजेच गंगी घास खाते आणि पाणी पिते.

उपवास केल्याने शरीर हलके होते आणि मनांत सात्त्विक भाव जागतात. विधिपूर्वक उपवास केल्याने पाप जळून जाते.

मोठमोठे ऋषीमुनि हजारो वर्षे तपश्चर्या करून सुद्धा जेव्हा प्रभुदर्शन मिळवू शकले नाहीत तेव्हा ते गाईंचा जन्म घेऊन गोकुळांत येऊन राहिले. त्यांची हजारो वर्षांची तपश्चर्यासुद्धा त्यांचा अभिमान आणि वासना जाळू शकली नव्हती. म्हणून त्यांनी विचार केला की गोकुळात गाईंचा जन्म घेऊन आपला काम निष्काम कृष्णाला अर्पण करून आपण निष्काम व्हावे.

**७. गोपींचे कृष्णावरचे उत्कट प्रेम:**

गोपी बाळाला घेऊन गोशाळेत आल्या आणि गंगीची शेपटी हातात घेऊन बाळाच्या शरीरावरून डोक्यापासून पायापर्यंत तीन वेळा फिरविली. माझ्या बाळाला जर कोणाची दृष्ट लागली असेल तर ती या गंगीच्या शेपटीत जावो.

गोपी तर काय जणू प्रेमाच्या ध्वजा आहेत. आपल्या कन्हैयाला जर काही अनिष्ट व्हायचे असेल तर ते आम्हालाच व्हावे. त्यांचे प्रेम विशुद्ध आहे. बाळाला राक्षसीचा स्पर्श झाला हे चांगले झाले नाही. कुठे काही अनिष्ट झाले तर! या वेळी तर आमचा बाळ वाचला.

आता बाळाला आंघोळ घालावी. बाळकृष्णाला राक्षसीच्या पापदृष्टीने काही होऊ नये असा विचार करून गोपींनी कान्ह्याला गोमूत्राने स्नान घातले.

बाजारी साबणाने नाही, गोमूत्राने स्नान घातले गेले.

आपले जीवन साधे करा.

गोमूत्राचे पान करण्याने आणि त्याने स्नान केल्याने शरीर निरोगी होते. गोमूत्र फार गुणकारी आहे. ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे.

गोमूत्र पिण्याने केवळ शरीरच नाही तर मन सुद्धा शुद्ध होते. गोमूत्राला तलम कापडाने १०८ वेळा गाळून प्यायल्याने मनाचा मळ दूर होतो. मनांतील पाप दूर होते आणि मन शुद्ध होते. हा प्रयोग सहा महिनेपर्यंत करावा. गोमूत्रपानाच्या या प्रयोगाने स्वभावांत पुष्कळ परिवर्तन होईल. गोमूत्रांत दिव्य शक्ति आहे. ते स्वभाव सुधारते, ते बुद्धीलाही निरोगी बनवते.

गाईचे शेण त्वचेवर चोळल्याने शरीराच्या अनावश्यक उष्णतेचे शोषण होते आणि त्वचा नरम होते.

जोपर्यंत मनुष्याचा स्वभाव सुधारत नाही तोपर्यंत तो ज्ञानमार्ग किंवा भक्तिमार्गांत गति मिळवू शकत नाही.

आजकाल जीवन असे झालेले आहे की मनुष्याचा वेळ, संपत्ति आणि शक्ति फॅशन्स आणि निरनिराळ्या व्यसनातच खर्च होते. व्यसन आणि फॅशनमध्येच जो आपली सगळी शक्ति व्यय करीत राहील तो ज्ञान आणि भक्तिमार्गात पुढे वाढू शकत नाही.

कान्ह्याला पहिले गोमूत्राने आणि नंतर ऊन पाण्याने स्नान घातले. तो तर मोठ्या मजेत होता. ऋषिरूप असलेल्या गोपी कान्ह्याभोवती फेर धरून बसल्या होत्या.

एक गोपी म्हणते— अहाहा! किती सुंदर आहेत डोळे आमच्या बाळाचे. दुसरी म्हणाली, याचे केस सुद्धा सुंदर आहेत. तिसरी म्हणाली, अग, ह्याचे चरणकमल तर पहा किती सुंदर आहेत ते. सगळ्या गोपी बाळकृष्णाच्या एका एका अंगाच्या सौंदर्याचे पान करू लागल्या. ह्या ऋषिरूप गोपी तर वेदशास्त्रसंपन्न होत्या. त्या स्तुति करू लागल्या—

कान्ह्या! आज भगवंतांनी तुझ्या मंगलमय चरणांचे, यज्ञपुरुषाने तुझ्या जांघांचे, अच्युतदेवांनी तुझ्या कटीचे, भगवान हयग्रीवांनी तुझ्या पोटाचे, भगवान केशवांनी तुझ्या हृदयाचे, ईश भगवंतांनी तुझ्या वक्षःस्थळाचे, सूर्याने तुझ्या कंठाचे, भगवान विष्णूंनी तुझ्या भुजांचे, वामन भगवंतांनी तुझ्या मुखारविंदाचे आणि ईश्वराने तुझ्या मस्तकाचे रक्षण केले.

माझा कान्हा खेळत असेल तेव्हा भगवान गोविंदांनी, निजलेला असेल तेव्हा माधवांनी, चालत फिरत असेल तेव्हा भगवान वैकुंठांनी आणि बसलेला असेल तेव्हा लक्ष्मीपतींनी त्याचे रक्षण करावे.

दशमस्कंधाच्या सहाव्या अध्यायाच्या २२ ते २९ या श्लोकांत बालरक्षास्तोत्र आहे.

गोपी तसे तर जाणतच नव्हत्या कीं ज्या भगवंतांची त्या प्रार्थना करीत आहेत तोच हा कान्हा आहे.

गोपी सरतेशेवटी म्हणतात, भगवान नारायणाने आमच्या बाळकृष्णाचे सदासर्वदा रक्षण करावे.

गोपी बाळकृष्णाला थोपटून थोपटून प्रार्थना करीत आहेत. त्या यशोदेला म्हणत आहेत, 'याला दूध पाजा, जर नीट रीतीने दूध प्याला तर आम्ही समजू कीं, आता हा भीत नाही.' बाळकृष्ण स्तनपान करू लागला, तेव्हा गोपी आनंदित झाल्या.

चतुर्दशीच्या दिवशी संध्याकाळी नंदबाबा मथुरेहून गोकुळांत परत आले. याच दिवशी पूतनेचा अग्निसंस्कार केला गेला. अज्ञान नष्ट केलें गेलें.

जर योग्यालाही श्रीकृष्णांच्या स्वरूपाची कल्पना करता करता प्राणत्याग केल्याने मुक्ति मिळते तर त्यांचे साक्षात् दर्शन करणाऱ्याला सद्गति प्राप्त होणे काही आश्चर्याची गोष्ट नाही. श्रीकृष्ण फार दयाळू आहेत. विषदायिनी पूतनेलासुद्धा आपल्या मातेप्रमाणेच सद्गति दिली. असा दयाळू आणखी कोण असू शकतो?

ही पूतना कृष्णमीलनांत बाधा उत्पन्न करीत राहते. ईश्वर हा सहा गुणांचा आहे. त्याने सहा दोषांच्या पूतनेला सहाव्याच दिवशी मारले. पूतनेचे दोष काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर हे आहेत.

भगवंताचे सहा सद्गुण— ऐश्वर्य, वीर्य, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य हे होत. भगवंताचा प्रत्येक सद्गुण आपल्या अंतःकरणांत उतरविणारा दोषरहित होत असतो. भगवंताचे नाम तर चिन्मयधाम आहे. चिन्मयधामात प्रवेश करायचा आहे. या चिन्मयधामात प्रवेश कसा करता येऊ शकेल? जेव्हा वासनेचा नाश होतो. तेव्हाच चिन्मयधामांत प्रवेश मिळतो. इंद्रियांना श्रीकृष्णाच्या लीलेत न्हाऊ घाला. इंद्रियांना परमात्म्याच्या सन्मुख करा.

गोपींनी आपल्या इंद्रियांद्वारा कृष्णाला पहावे, कृष्णाला ऐकावे, मनांत ठेवावे याच हेतूने ही गोकुळलीला रचली आहे.

भागवतांत या पूतनाचरित्राशिवाय इतर कोणत्याच बाललीलेची फलश्रुति सांगितलेली नाही. याचा अर्थ हाच की या एका अज्ञान कामनेला ओळखले तरी काही कमी नाही. अज्ञान दूर झाल्यावर श्री गोविंदाशी प्रेम होत असते.

हा पूतनामोक्ष तर भगवंताची अद्भुत लीला आहे. हिचे श्रद्धापूर्वक श्रवण, मनन करणाऱ्याला श्रीकृष्णाप्रति प्रीति उत्पन्न होते. या चरित्राच्या चिंतनाची आज्ञा दिली गेली आहे.

यशोदा बुद्धि आहे आणि नंद जीव.

बुद्धि आणि जीव दोन्ही जर श्रीकृष्णाबरोबरच राहिले तर काही विपत्ति येणार नाही.

बाललीलांचे एक रहस्य असे की नंद आणि यशोदा (जीव आणि बुद्धि) जेव्हा जेव्हा गोकुळापासून दूर होत असत तेव्हा तेव्हा काही ना काही संकट येत असे. याचा अर्थ हाच झाला की जेव्हा जीव ईश्वरापासून दूर जातो तेव्हा तो दुःखी होतो.

यशोदा अर्थात् बुद्धि जेव्हाही श्रीकृष्णापासून दूर जाते आणि नंद अर्थात जीव श्रीकृष्णाला विसरून जातो, तेव्हा राक्षस येऊन थडकतात.

शरीर आणि इंद्रियांना व्यावहारिक कार्य तर करायचेच आहे. परंतु बुद्धि (यशोदा) श्रीकृष्णापासून दूर न झाली पाहिजे. –

ही पूतना कोण होती ?

बलिराजा आणि विंध्याबली राणी यांच्या मुलीचे नाव होते रत्नमाला. जेव्हा वामन बलिराजाच्या यज्ञात भिक्षा मागायला आले तेव्हा त्यांचे स्वरूप पाहून रत्नमालेच्या हृदयांत स्नेह उत्पन्न झाला होता आणि तिच्या मनात आले होते की हा बालक जर मला पुत्ररूपाने प्राप्त झाला असता तर किती चांगले झाले असते! मी त्याला दूध पाजून आणि त्याचे लालनपालन करून धन्य झाले असते.

वामनाचे तेजस्वी स्वरूप पाहून रत्नमालेच्या हृदयांत पुत्रस्नेह उसळून आला होता. परंतु त्याने आपल्या पित्याची जी दुर्दशा केली त्यामुळे शत्रुभावही जागृत झाला होता. आणि तिच्या मनांत वामनाला मारून टाकण्याची इच्छा देखील झाली होती. हा वत्सल भाव आणि शत्रुभाव असे दोन्ही भाव घेऊन रत्नमाला पुनर्जन्मांत पूतना होऊन आली.

श्रीकृष्णाची लीला निरोधलीला आहे. ज्याच्या मनाचा निरोध होतो त्याला मुक्ति मिळते. जोपर्यंत मनांत वासना आणि विरोध असेल तोपर्यंत निरोध होऊ शकणार नाही. जोपर्यंत कोणत्याही वस्तूंत सूक्ष्म देखील वासना राहिली असेल तोपर्यंत मनाचा निरोध होणार नाही आणि म्हणून मुक्तीही मिळणार नाही.

शुकदेव वर्णन करतात –

राजा श्रीकृष्णाने जेव्हा शकटासुराचा वध केला तेव्हा त्याचे वय १०८ दिवसांचे होते.

कृष्णाचे दर्शन केल्याशिवाय गोपींना चैन पडत नसे. त्या सकाळीच कान्ह्याच्या दर्शनाला जात असत.

यशोदेजवळ भल्या सकाळी गोपी आल्या तर ती म्हणाली, अहो भाबड्या सख्यांनो! काय माझ्या बाळाला पाहिल्याशिवाय तुम्हांला चैनच पडत नाही का? तो तर निजलेला आहे. इतक्या लवकर का आलात तुम्ही? त्याला पाहायचे असेल तर पाहून घ्या, पण तिथे मोठ्याने गोष्टी बोलू नका, नाही

तर तो जागा होईल.

कान्ह्याला पाहून गोपी आनंदविभोर झाल्या. एक म्हणाली, निजलेला कान्हा किती सुंदर दिसतो! एक म्हणाली, बाळाचे केस दाट सावळे आहेत! तर दुसऱ्या एका गोपीने म्हटले– बाळाचे पाय कसे कोमल (मऊमऊ) आहेत. तिसरी म्हणाली, याची बोटे किती नाजूक आहेत! असे वाटते की याचे पाय धुवून घ्यावेत. एक गोपी बाळाच्या डोळ्याविषयीं बोलू लागली, तर दुसरी त्या अधरोष्ठाच्या लालीविषयीं.

त्या गोपी गोष्टी नव्हेत, भक्ति करीत होत्या. गोपी तर भक्तिमार्गाच्या आचार्या आहेत. भक्ति कशी करावी हे गोपींनी दाखवून दिले आहे. जर तुम्हांला भक्ति करायची असेल तर परमात्म्याच्या अंगाअंगाचे चिंतन करा.

कृष्णाच्या सर्वच अवयवांमध्ये दृष्टि स्थिर करणेसुद्धा भक्तीच आहे. स्वरूपासक्तीशिवाय भक्ति सिद्ध होत नाही. फलद्रूप होत नाही. भगवंताचे रूप चित्तांत, हृदयांत आणा. भगवंताचा आकार मनांत ठसून गेला म्हणजे दर्शनात मोठा आनंद येतो.

जोपर्यंत भगवंताच्या स्वरूपाची आसक्ति होत नाही तोपर्यंत संसारासक्तीतून सुटका होत नाही.

श्रीकृष्णाने आपल्या सौंदर्यतेजाने गोपींची दृष्टि आणि बासरीच्या मधुर वादनाने कान आकर्षित करून घेतले होते. गोपी कृष्णाच्याच गोष्टी करीत असत आणि कथा ऐकत.

कृष्णलीलेत, कृष्णकथेत जगाची विस्मृति होते. भगवंत म्हणतात, जो मनुष्य त्यांचे भजन आणि सेवा करतो त्याच्याबद्दल त्यांना फार स्नेह उत्पन्न होत असतो.

जेव्हा यादवांचा नाश झाला होता तेव्हा कृष्णाच्या डोळ्यातून एकही अश्रुबिंदु टपकला नव्हता.

कृष्ण कुशीवर वळला असता अंगपरिवर्तन नावाचा उत्सव केला गेला.

परमात्म्याला घरी आणल्यावर नेहमी उत्सव करीत राहाल तर तो नेहमी तुमच्या येथे राहील.

भगवान श्रीकृष्ण तर उत्सवप्रिय आहेत. उत्सवाच्या दिवशी मन, शक्ति आणि वाणीचा सदुपयोग करा. भगवंताचे स्मरणसुद्धा सगळा दिवसभर करीत रहा. उत्सवाच्या दिवशी प्रभुस्मरणांत देहभानसुद्धा हरपले पाहिजे. या दिवशी प्रभुप्रेमाच्या व्याकुळतेने दोन अश्रुबिंदु देखील गळले गेले नाहीत तर उत्सव करणे व्यर्थच होईल. उत्सवाच्या दिवशी, विद्वान, वेदज्ञाता, सच्चरित्र ब्राह्मणाचा सन्मान करा. फक्त नातेवाईकांनाच नव्हे, तर गरिबांनासुद्धा भोजन द्या. गरिबांना संतुष्ट केल्याने प्रभु प्रसन्न होत असतात. खऱ्या साधुसंन्याशांना सुद्धा जेवण द्या. स्वतःच सुखोपभोग करीत राहण्यापेक्षा गरजू लोकांना सुद्धा काही ना काही देऊन पुण्य प्राप्त करा.

'उत' चा अर्थ ईश्वर आहे आणि 'सव' म्हणजे प्रागट्य. जेव्हा ईश्वराचे आमच्या हृदयात प्रागट्य होते तोच 'उत्सव.' उत्सव केवळ लुळ्या जिभेचे लाड पुरविण्यासाठी नाही, तो परमेश्वराशी एकरूप होण्यासाठी केला जावा. उत्सव तर प्रभूशी तल्लीन होण्यासाठी करायचा आहे.

यशोदेने अंगपरिवर्तन उत्सव साजरा करण्याची इच्छा व्यक्त केली. तिने विचार केला की हे तर ठीकच आहे की मी दररोज ब्राह्मणांची पूजा करते. परंतु ज्या गोपगोपींच्या आशीर्वादाने पुत्र मिळाला आहे त्यांचीच आज मी पूजा करीन.

यशोदा, गरिबांना दान करायचे आहे असे म्हणत नाही. प्रत्येक जीव ईश्वराचा अंश आहे, ईश्वराचाच पुत्र आहे. मग जर कोणाही जीवाला गरीब म्हटले तर ईश्वराला वाईट वाटणार नाही का?

नम्रतापूर्वक, दीनतापूर्वक, नजर नमवून दान करावे. घेणारा देखील एक जीव आहे. त्याच्या हृदयांत सुद्धा परमेश्वराचा वास आहे असे समजून दान करा. ह्याच करता तर यशोदा दान करायची

नाही, पूजा करायची, सन्मान करण्याची भाषा बोलत आहे.

साहाय्य करणे एक गोष्ट आहे, पूजा करणे निराळे. दोहोंतही भावात्मक अंतर आहे.

कान्ह्याच्या प्रगट होण्याच्या दिवशी यशोदा गोपींना उपहार देण्यासाठी गेली होती. तर त्या दिवशी गोपी म्हणाल्या होत्या, 'आज तर आम्हाला काहीच घ्यायचे नाही, कान्ह्यालाच दिले पाहिजे,' त्यांनी त्या दिवशी काहीच घेतले नव्हते.

जिथे घेण्याची इच्छा असते तिथे मोह असतो आणि जिथे देण्याची इच्छा असते तिथे प्रेम.

यशोदा म्हणते आज मला सर्वच व्रजवासियांची पूजा करायची आहे. तिने सगळ्या गावाला आमंत्रण दिले. नंदसुद्धा 'निःसंकोच दे' असे म्हणाला. जेव्हापासून कान्हा घरात आला आहे तेव्हापासून घरात लक्ष्मी कोण ठेवून जातो हे समजतच नाही!

जेव्हा मनुष्य लक्ष्मीचा दुरुपयोग करू लागतो तेव्हा ती निघून जाते.

आयुष्यात असाही एक काळ येतो की जेव्हा भाग्य अनुकूल असते, भाग्योदय झालेला असतो. अशा वेळी मोठ्या प्रेमाने दान करावे. निःसंकोच देत रहा. जे काही द्याल ते दुप्पट होऊन परत मिळेल आणि जेव्हा भाग्य प्रतिकूल होईल तेव्हा संपत्ति सांभाळून ठेवण्याचा लाख प्रयत्न केला तरी सर्व काही निघून जाईल. भाग्य प्रतिकूल झाल्यावर धर्मराज युधिष्ठिरसुद्धा दरिद्री झाले आणि त्यांना वनात भटकावे लागले. तर मग सामान्य माणसाविषयी काय चर्चा करावी? नल राजालासुद्धा सर्व काही गमवावे लागले होते. जे काही मिळेल ते सत्कर्मात खर्च करीत रहा. सुपात्राला दान द्या.

आज भाग्य अनुकूल होते म्हणून यशोदा मन लावून दान करू लागली. पीतांबर, साड्या, भूषणे इत्यादींचा ढीग लुटूं दिला.

यशोदेला वाटले, कान्हा निजल्यावर मी चांगल्या रीतीने दान करू शकेन. जर तो जागा असेल तर मला त्याला मांडीवर घेऊन बसून राहावे लागेल आणि सेवक सन्मान करीत राहतील. सर्वच दानापेक्षा मानदान श्रेष्ठ आहे. ती विचार करीत होती कीं कान्हा जागाच राहिला तर मी सर्वांचा सन्मान कसा करू शकेन?

जेव्हां गरिबांचा आणि पवित्र ब्राह्मणांचा सन्मान केला जातो तेव्हां परमात्म्याला मोठा आनंद होतो. ईश्वर जेव्हां कोणाला संपत्ति देतो तेव्हां तो अशीही आशा करतो कीं तो दुसऱ्यांचे पालन-पोषण करील.

बाळाने डोळे मिटून घेतले, पण आंतून तर तो ज़ागाच होता. जर माझ्या निजण्याने आईला आनंद होतो तर मी निजून जातो. भगवंताला नाटक करण्याची खूप सवय आहे. ह्याच कारणाने त्यांचे एक नाव नटवर आहे. आईला बतावणी करीत आहे कीं तो निजलेला आहे.

कृष्णाच्या जागण्या-निजण्याविषयीं शांकरभाष्यांत म्हटलें आहे– 'तसा तर ईश्वर निष्क्रिय आहे. परंतु जीव मायेच्या कारणें क्रियेचा आरोप करीत असतो. ईश्वर क्रिया तर करीत नाही परंतु मायेच्या कारणें क्रियेचा आरोप केला जातो'

जेव्हां आम्ही गाडींत बसून कोठे जात असतो तेव्हां म्हणतो कीं अमुक शहर आले. परंतु नीट विचार केल्यावर हें समजून येईल कीं कोणतेही शहर येतही नाही आणि जातही नाही. गाडीच आम्हाला एका जागेवरून दुसऱ्या जागीं नेत असते.

याच प्रकारें ईश्वर स्वतः कोणतेच कर्म करीत नाही. तो तर लीलाच करीत असतो. लीला निःस्वार्थ असल्यामुळे आनंदरूप असते.

कर्म आणि लीला यांत अंतर आहे. ज्याचेविषयीं कर्तृत्वाचा अभिमान आणि सुखी होण्याची इच्छा आहे तें कर्म (क्रिया) आहे; आणि ज्याचेविषयीं कर्तृत्वाचा अभिमान नाही आणि इतरांना सुखी करण्याची इच्छा आहे ती लीला आहे. जीव जे काही करतो ती क्रिया आणि ईश्वर जे कांही करतो ती लीला होय.

यशोदेला वाटले कीं आज माझ्या येथे सगळे गाव लोटेल; तेव्हां बाळाचा पाळणा जर बाहेर अंगणांत गाड्याच्या खालीं ठेवला तर चांगली जागा मिळेल. सगळ्याच गोपी येणार होत्या. म्हणून जागेच्या अडचणींमुळे यशोदेने कान्ह्याचा पाळणा गाड्याच्या खाली ठेवून दिला. गाड्यावर दही, दूध इत्यादींचे रांजण ठेवले.

यशोदा एक एक करून सर्वच गोपींचा आदर करू लागली. गोपबाळांना सुद्धा सुंदर कंठी देत होती, आणि त्यामुळे सर्वच माता प्रसन्न होत होत्या. गोपी कान्ह्याला अगदी हृदयापासून आशीर्वाद देऊन जात होत्या.

आलेल्या सर्वच व्रजवासींचा आदरसन्मान करीत करीत यशोदा आनंदांत मग्न होऊन गेली.

इकडे बाळाची झोप उडून गेली. कुठे आहे माझी आई? ती उत्सव तर माझाच करीत आहे आणि मला मात्र येथे अंगणांत गाड्याच्या खाली ठेवून दिले आहे!

उत्सवाच्या दिवशीं भगवंताला विसरणें चांगले नाहीं.

यशोदा उत्सवाच्याच दिवशीं कृष्णाला विसरून गेली आणि विपत्ति आली.

व्यवहारांतून सुटका मिळू शकत नाही. तो तर सांभाळावाच लागतो. जोपर्यंत कांही ना कांही अपेक्षा आहे तोपर्यंत व्यवहार चालूच राहतो. व्यवहार सोडायचाच नाही; शिवाय व्यवहाराचे पालन काही अपराध नाही. परंतु केवळ व्यवहारच करीत राहणे, व्यवहारमग्न होऊन जाणे आणि व्यवहारांत भगवंताला विसरून जाणे अपराध आहे.

व्यापारी दुकानांत भगवंताच्या तसबिरीची पूजा करतो. परंतु गिऱ्हाइकाशी बोलताना भगवंताला विसरतो. तो गिऱ्हाइकाला भगवंतादेखतच ठकवीत असतो तो गिऱ्हाइकाला पांच रुपायांची वस्तू पंचवीस रुपयांना विकतो आणि म्हणतो, तू माझ्या ओळखीचा आहेस म्हणून कांही नफा न घेताच मी तुला विकत आहे. गिऱ्हाइकाला वाटते हा दुकानदार ओळखीचा आहे म्हणून मूळ किंमतीतच माल देत आहे. गिऱ्हाइकाला काय माहीत कीं दुकानदार मूळ किमतीचा अर्थ काय करीत आहे ते! दुकानदाराचा अर्थ तुमच्या मुळावर घाव घालण्याचा आणि स्वतःच्या फायद्याचा असतो.

आमचें सर्वांचे लक्ष्य श्रीकृष्णमीलन आहे. ह्या लक्ष्याला नेहमी ध्यानांत ठेवूनच सगळा व्यवहार करीत रहा.

ज्ञानी महात्मा सुद्धा व्यवहार तर करतातच, परंतु ईश्वराला ते कधीच विसरत नाहीत.

गोपींचा सन्मान करण्यांत यशोदा कृष्णाला विसरून गेली.

कित्येक लोक असे असतात कीं ते ऐन उत्सवाच्या वेळीच देवाला विसरून जातात. अहो, देवानिमित्तच तर उत्सव आहे! मग त्यालाच कसे विसरता? व्यवहारांतील कारभार करीत असताना सुद्धा देवाकडे पाहिले पाहिजे. घरांतील कामकाजाच्या वेळी देखील दृष्टी देवाकडे लागलेली राहिली पाहिजे.

जेव्हां कोणी पाहुणा आमच्या घरीं येतो तेव्हां त्याला प्रसन्न करण्यासाठी आम्ही त्याच्याशी पुनःपुन्हा गोष्टी बोलतो. इतर कामें करीत असता सुद्धा आमचें ध्यान पाहुण्याकडे असते. मग इथे तर साक्षात्

देवच आहे. त्याच्या आगमनाचे वेळीं आमचे मन आणि ध्यान त्याच्याकडे लागलेले राहिले पाहिजे.

प्रभुसेवेचा कांही अंतच नाही. देहविलय झाल्यावरच सेवेची समाप्ति होत असते. सत्कर्म करण्याचे बाबतींत तर नेहमी असंतुष्टच रहा. जीवंत जीव असतानाच सेवेची समाप्ति करणारा खरा वैष्णव नाही.

गोपींचा सन्मान करताना यशोदा कृष्णाला विसरून गेली तेव्हां त्याला वाईट वाटले. बाळाने गंमत करण्याचा विचार केला. तो रडू लागला, पण आईला तर ऐकूच येत नव्हते. तो हात-पाय हलवून रडू लागला. रडता रडता त्याने पाहिले कीं गाड्यावर पूतनेचा भाऊ शकटासुर येऊन बसला आहे.

शकटासुर आपली बहीण पूतना हिचा सूड घ्यायला आला होता. कृष्णाने ताडले कीं हा शकटासुर देखील कंसाचेच कळसूत्री बाहुले आहे.

बाळाने गाड्याला एक जोराने लाथ मारली तर गाडा उलटून पडला. दूध, दही इत्यादी सर्व जमिनीवर सांडले आणि शकटासुर देखील गाड्याखाली चिरडून मरून पडला.

हा असा भाचा आहे कीं कंसमामांची सगळीच खेळणी तोडूनमोडून फेकीत असतो.

गाडा उलटल्याबरोबर मोठ्ठा आवाज झाला. सगळेच धावत आले. मुलांनी सांगितलें कीं बाळाने पायानें ह्या गाड्याला उलटून पाडलें आहे.

या प्रसंगांतही एक रहस्य आहे. जर तुम्ही प्रभूला आपल्या संसारगाड्याच्या खाली ठेवाल तर तुमचा गाडा देखील तो उलटून टाकील. मुख्य वस्तु गाड्याच्या वर ठेवा आणि गौण वस्तु गाड्याच्या खाली.

ज्याच्या जीवनांत प्रभूला गौण स्थान असते त्याची संसाराची गाडी उलटलीच जाते.

गृहस्थाश्रम एक गाडी आहे; पति-पत्नी त्याची चाके आहेत. या गाडीवर श्रीकृष्णांना बसवा. जीवन-रथाचें सारथी श्रीकृष्ण आहेत. या जीवन-रथाचें घोडे आहेत आमची इंद्रियें.

प्रभूला प्रार्थना करा, "नाथ, मी आपल्याला शरण आलो आहे. ज्याप्रकारे आपण अर्जुनाच्या रथाचें संचालन केले होते त्याचप्रमाणे आपण माझ्या जीवन-रथाचे सारथी व्हा; आणि सन्मार्गावर घेऊन जा.

ज्याच्या शरीर-रथाचें संचालन प्रभूच्या हातांत नाही त्याचें संचालन मन करीत असते. आणि मन एक असा सारथी आहे कीं तो जीवनरथाला पतनाच्या गर्तेंत पाडतो. जर तुमची गाडी परमात्म्याच्या हातांत नसेल तर इंद्रियरूपी अश्व तिला पतनाच्या खड्ड्यांत लोटून देतील.

अर्जुनाने परमात्म्याला सारथ्य दिल्यामुळेच त्याचा जय झाला होता– मनाला सारथ्य दिले नाही.

कांही लोक समजतात– आज सुटी आहे तर संपूर्ण दिवसभर चांगले चांगले खाऊपिऊ आणि झोप काढू. ह्या कुंभकर्णासारख्या गोष्टी झाल्या. असें कधीच करू नये. रविवार तर वीर होण्याचा वार आहे. रविवारच्या दिवशी तेल-मिरची-भजी खाण्याऐवजी दूध आणि भात खा. सर्व आठवडाभर पुष्कळच खाल्ले गेले आहे. तेव्हां सुटीच्या दिवशी तर सात्त्विक आहारच करावा आणि दिवसभर जपमाळ फिरवावी. रविवारच्या दिवशीं ब्रह्मचर्याचें पालन करा.

रविवारच्या दिवशी एक गृहस्थ कथा ऐकायला निघाला तर त्याचा मुलगा रडू लागला. पत्नी म्हणाली, हा मुलगा रडतो आहे तेव्हां तुमचे कथेला जाणे ठीक नाही. त्याला रडत सोडून कथेला जाल तर कोणते पुण्य मिळेल ? तर तो गृहस्थ म्हणाला, असें ऐकले आहे कीं कोणाचें हृदय दुखविणें चांगले नाही. मी जर कथेला गेलो तर माझ्या पत्नीला दुःख होईल. असा विचार करून कथेला जायचा

बेत त्याने रहीत केला.

सर्वांनी मिळून घरांतच जर विष्णुसहस्रनामाचा पाठ केला असता तर चांगले झाले असते. परंतु त्यांना लक्षांत आले कीं अमक्या फिल्मचा हा शेवटचा सप्ताह आहे. कथा तर दररोजच होत राहील, परंतु ही फिल्म निघून जाईल. आणि ते सर्व कथेऐवजी सिनेमाला जाऊन बसले.

पति-पत्नींचा संबंध केवळ चैनविलासासाठी नसून प्रभुभजनासाठी सुद्धा आहे. गृहस्थाच्या जीवनांत कामसुख नाही. भगवत्सेवाच मुख्य आहे. मनुष्याच्या जीवनांत भोगाला नाही तर भगवंताला प्राध्यान्य असले पाहिजे. गाडी एखाद्या वाकड्यातिकड्या रस्त्यावर जाऊन उलटून जाते. भगवंताला गाडीच्या खाली नाही, वरच बसवा.

## ८. शकटासुर आणि तृणावर्त वधः

यशोदेने भगवंताला तर गाड्याच्या खालीच ठेवून दिले आणि दूध-दही इत्यादी सांसारिक पदार्थ गाड्यावर ठेवले. तिने भगवंताला गौण स्थान दिले आणि सांसारिक, भौतिक पदार्थांना मुख्य. त्यामुळे सगळी गाडी उलटली.

तुमच्या जीवनांत कामसुख प्रधान होईल आणि परमेश्वर गौण तर तुमचा जीवनरथ उलटूनच जाईल. भगवंताला गाडीच्या खाली ठेवाल तर शकटासुर गाडीवर स्वार होईल. काम, लोभ इत्यादीच तर शकटासुर आहेत. दूध, दही, लोणी इत्यादी भोगपदार्थांचे प्रतीक आहेत. ज्याच्या जीवनांत भौतिक पदार्थांची प्रधानता असते त्याच्या जीवनगाडीवर शकटासुर स्वार होत असतो.

दांपत्यजीवनांत धर्माचेच प्राधान्य असले पाहिजे. पत्नी कामपत्नी नाही, धर्म-पत्नी म्हटली गेली आहे. प्राथमिकता कामसुखाला नाही, धर्माला दिली पाहिजे.

जेव्हांपासून आम्ही धनालाच सर्व कांही मानले आहे तेव्हांपासून जीवनांतून शांति लुप्त झाली आहे. धनाला प्राधान्य दिल्यामुळे सदाचार निघून गेला आहे. धनापेक्षा संयम आणि सदाचारच जास्त सुखदायी आहे. धन जर मर्यादेने जोडलेले असेल तर शांति मिळेल.

जीवनांत चार पुरुषार्थ मानले गेले आहेत. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष. यांच्या क्रमांत सुद्धा तारतम्य आहे. धर्म आणि मोक्षाच्या मधे अर्थ, काम आहेत. अर्थ आणि कामाची प्राप्ति धर्म आणि मोक्षाच्या मर्यादेंत राहूनच केली जावी. अर्थ आणि काम गौण आहेत; धर्म आणि मोक्ष प्रधान. जर धर्म आणि मोक्ष गौण होतील तर जीवनरथ अधोगतीच्या गर्तेंत पडून जाईल.

जीवनांत लौकिक सुखांना प्राधान्य मिळेल तर शकटासुर स्वार होईल. एका संताच्या मताप्रमाणें शकटासुराच्या वधाच्या वेळीं श्रीकृष्णाचें वय एकशेआठ दिवसांचे होते. जेव्हां जेव्हां तुमच्या डोक्यावर शकटासुर स्वार होईल तेव्हां तेव्हां एकशेआठ मोत्यांची माळ घेऊन भगवंताच्या नामाचा जप करा.

लौकिक व्यवहाराला प्रधानता आणि श्रीकृष्णाला गौणता दिल्याबरोबर काम, क्रोध, मोह इत्यादी शकटासुर येऊन थडकतात. जीवनांत श्रीकृष्णाला प्रधानता दिल्याने शकटासुराचें भय निर्मूल होईल.

कांही लोक म्हणतात, कथाश्रवणावाचूनच यौवन संपवले आणि आता हा शकटासुर खाली उतरण्याचे नावच काढीत नाही.

श्रीकृष्ण शकटासुराचा वध अवश्यच करतात. जेव्हां तुमच्या हृदयावर काम-क्रोध-मोहरूपी शकटासुर स्वार होईल तेव्हां तुम्ही माळ घेऊन नारायणाच्या नावाचा जप करू लागा.

माळेशी मैत्री झाल्यावर शकटासुराला निरुपद्रवी व्हावे लागेल. माळेशी संबंध होऊ शकला नाही

तर शकटासुर स्वार होईल. काम-क्रोध इत्यादींशी सामना करायचा असेल तर परमात्म्याचा आश्रय घ्यावा लागेल. परमात्म्याचेच स्मरण करावे लागेल.

आता तृणावर्ताच्या वधाचा प्रसंग येत आहे.

कोणे एके दिवशीं यशोदा कृष्णाला मांडीवर घेऊन डोलवीत होती. त्यावेळीं तृणावर्ताला मारण्यासाठी भगवंतांनी आपलें वजन वाढविले. यशोदेला तो भार सहन झाला नाही म्हणून तिने कान्ह्याला जमिनीवर बसवले आणि घरकामांत गुंतून गेली.

तृणावर्त वावटळीचें रूप घेऊन आला आणि कृष्णाला हरण करून आकाशांत उडाला. भगवंतांनी आपलें वजन वाढविलें आणि तृणावर्ताला धरले. तृणावर्ताचा प्राणपक्षी उडून गेला.

रजोगुणाचा फेराच तृणावर्त आहे. काम आणि क्रोध हे रजोगुणाचे पुत्र होत. रजोगुण मनांत आला कीं मन चंचल होते. तृणावर्तरूपी वावटळे मनांत येताच ते चंचल होते. बुद्धि जेव्हां ईश्वरापासून विन्मुख होते तेव्हां तृणावर्त-रजोगुण मनांत शिरतो आणि त्याला चंचल करून टाकतो.

यशोदेच्या डोळ्यांत धूळ शिरली.

जेव्हां सांसारिक सौंदर्य न्याहाळण्यांत सुख वाटू लागते तेव्हां समजा कीं डोळ्यांत तृणावर्त येऊन बसला आहे; आणि मग परमेश्वर दिसत नाही.

कान्हा हळू हळू मोठा होऊ लागला. गुडघ्यावर रांगत रांगत तो गाईच्या गोठ्यांतही पोहोचत असे. सगळ्याच गाई त्याला ओळखत होत्या.

कित्येक मोठमोठे ऋषीसुद्धा गाईंचा अवतार घेऊन गोकुळांत येऊन बसले होते. एक लहानसे वासरू होते. ते छोटेसे होते आणि कान्हा पण छोटाच. कृष्ण त्याला आपला दोस्त समजत. ते वासरू हम्मा हम्मा करी तर कृष्ण, आई-आई म्हणे.

कान्हा त्या वासरापासून दूरच होत नसे. गाय देखील आनंदावेशात वासराला विसरून कान्ह्यालाच चाटू लागे.

गाईंची सेवा केली. त्यामुळे त्यांच्या आशीर्वादाने आम्हाला मुलगा मिळाला. हा गाईंची सेवा करील असा यशोदेला विश्वास वाटू लागला. कान्हा तर त्या गाईवासरांशीच खेळत राहायचा. तो गाईची शेपटी धरून उभा राहण्याचा प्रयत्न करू लागला.

आई म्हणे– अरे कान्हा! फारच खोडसाळ आहेस रे तू! ह्या गाई तर तुला मारतील. कान्ह्याचें एक आणखी नाव पडले, 'वत्सपुच्छावलंबनम्.'

एकदा यशोदा बाळाला स्तन्य पाजित होती. त्याचें सुंदर रूपडे न्याहाळीत होती. आईचें प्रेम पाहून कान्हा जोराने दूध पिऊ लागला. बाळ जर दूध जास्त पिऊ लागला तर आईला काळजी वाटू लागते कीं कुठे माझा लाडका बाळ आजारी न पडो.

जोपर्यंत वैष्णवाच्या हृदयांत प्रेम उसळू लागत नाही तोपर्यंत प्रभूंना भूक लागत नाही. त्यांना प्रार्थना करून विचारा– आपल्यासाठी कोणते भोजन आणू? आपण सर्व जगाचें अन्नदाते आहांत. तरी पण मी जे कांही थोडे अन्न तयार केलें आहे त्याचा आपण स्वीकार करावा.

कान्ह्याच्या अत्याधिक दुग्धपानामुळे यशोदा काळजी करू लागली. तर कान्हा म्हणाला– आई, तुझें दूध मी एकटा पीत नाही. माझ्या तोंडांत सामावलेले सारे विश्व तुझ्या दुधाचें पान करीत आहे.

कान्ह्यानें जांभई देण्यासाठी तोंड उघडले आणि यशोदेला सगळ्या ब्रह्मांडाचें दर्शन घडविले. कान्हा मातेला म्हणाला– तू एकट्या मलाच नाही, अनंत जीवांना दूध पाजीत आहेस. समग्र ब्रह्मांडाला

तू दुग्धपान करवीत आहेस.

भगवंतांनी सुदाम्याला अपार संपत्ति दिली तर यमराजाला चिंता झाली. ते भगवंताला म्हणाले, सुदाम्याच्या भाग्यांत दारिद्र्याचा योग आहे. त्याच्या भाग्यांत संपत्तीचा क्षय लिहिला आहे. आपण त्याला इतके ऐश्वर्य देऊन चांगले केले नाही. कर्ममर्यादेचा भंग होईल. कर्मानुसारच सुखदुःख दिले जाते.

प्रभु यमराजाला म्हणाले— मी वेदोक्त कर्ममर्यादा उल्लंघू इच्छित नाही. जो मला जेवू घालतो तो समस्त ब्रह्मांडाला जेवू घालतो. एक मूठभर पोहे मला खाऊ घालून सुदाम्याने सगळ्या विश्वाला जेवू घातले आहे.

जो श्रीकृष्णाला जेवू घालतो तो सगळ्या विश्वाला अन्नदान करीत असतो आणि त्याच्या नावे पुण्य जमा होत असते. भगवंत कर्ममर्यादेचा भंग कधीच करीत नाही.

बाळ यशोदेला म्हणाला— आई, तू फक्त मलाच नाही, सगळ्या ब्रह्मांडाला तृप्त करीत आहेस.

### ९. कृष्णाचा नामकरणविधि आणि विविध बाललीला:

गर्गाचार्य नामकरणविधि (नामकरणसंस्कार) संपन्न करण्याच्या हेतूनें आले.

संस्कारांनी मन शुद्ध होत असते. संस्कारांनी दोष नाश पावतात.

शास्त्राने सोळा संस्कारांची योजना केली आहे. आजकाल तर बहुधा सगळेच संस्कार विसरून गेलेले आहेत. हो, दोन संस्कार शिल्लक आहेत:— विवाह आणि अग्निसंस्कार!

बालकाचा जन्म झाल्यावर जातकर्म संस्कार केला जातो. परंतु आता तर बालक प्रसूतिगृहांत जन्माला येते. मग जातकर्मविधि कसा होऊ शकेल? तेथे मधुप्राशनविधि कसा करीत असतील? डॉक्टर, न जाणो, काय काय पाजित असतील? याच कारणाने संस्कारांचा लोप होत आहे आणि म्हणून देश दुःखी होत आहे.

अन्नप्राशन, नामकरण, व्रतबंध इत्यादी सोळा संस्कार सांगितले आहेत. जीवाच्या शुद्धीसाठी संस्कार आवश्यक आहेत. आजकाल सर्वच धार्मिक विधींना गौण मानले गेले आहे. केवळ लौकिक आचारांनाच महत्त्व दिले जाऊ लागले आहे. ब्राह्मणाला सांगितले जाते— गुरुजी! पूजाविधि जरा लवकर उरकून घ्या, सगळ्या गावभर वरात मिरवायची आहे.

गर्गाचार्य म्हणाले, नामकरणसंस्कार जर यथाविधि करायचा असेल तर अर्धा दिवस लागेल. बाबा, तुम्ही तर सगळा गाव बोलवाल. ते सगळे येथे येऊन मला घाई करू लागतील तर सर्व विधि नीट होणार नाहीत.

नंद— धार्मिक विधि तर नीटच झाला पाहिजे. तुमची तशी इच्छा असल्यास मी कोणालाच बोलावणार नाही.

एकांतातच नामजप होऊ शकतो. "एकांत" चा लक्ष्यार्थ आहे एकमात्र ईश्वरांतच सर्व प्रवृत्तीचा लय होऊ शकतो. मनाला पूर्णतः एकाग्र करूनच नामजप करा.

गर्गाचार्यांच्या ज्योतिषविद्येची परीक्षा करण्याचा विचार केला गेला.

श्रीकृष्णाला रोहिणीच्या मांडीवर बसविले गेले. आणि बलरामाला यशोदेच्या मांडीवर.

गर्गाचार्य म्हणाले— नंदजी! रोहिणीच्या मांडीवर बसलेला मुलगा तुमचा आहे. तो नेहमीच रंग बदलत आलेला आहे. या वेळीं त्यानें श्याम रंग धारण केला आहे. तो सर्वांचीच मनें आकर्षित करील

आणि सर्वांनाच आनंद देईल. त्याचें नाव कृष्ण ठेवले जावे. हा बालक महाज्ञानी होईल. याची जन्माक्षरें फारच चांगली आहेत. याचें पाचग्रह उच्चीचे आहेत, आठ ग्रह चांगले आणि एक राहू मात्र वाईट स्थानांत आहे.

नंदबाबा घाबरून गेले. राहू वाईट स्थानांत आहे. काय होईल माझ्या मुलाला ?

गर्गाचार्य– तसें घाबरण्यासारखे कांहीच नाही. ज्याच्या सप्तमस्थानांत नीचेचा राहू असतो तो पुरुष अनेक स्त्रियांचा पति होत असतो.

नंद– तुमच्या गोष्टी खऱ्या होऊ शकतात. एका ब्राह्मणाने मला आशीर्वाद दिला होता कीं 'तुझा मुलगा सोळा हजार राण्यांचा स्वामी होईल.'

गर्गाचार्य– बाबा, आणखी मी काय सांगू तुम्हाला ? हा कान्हा नारायणासारखाच आहे. नारायण माझे इष्टदेव आहेत. पक्षपात होण्याची भीती असते.

कोण्या एके ठिकाणीं चार व्यक्ति जेवत होत्या. कोणी विचारले कीं यांत जावई कोण असेल ? एकाने सांगितलें कीं जो लाजरा असेल तोच जावई असेल. दुसरा म्हणाला, तो जो आखडून बसला आहे तो जावई असेल. तिसऱ्याने सांगितलें कीं जेव्हां सासू वाढायला येईल तेव्हां समजेल. सासू जेव्हा तूप वाढायला आली तेव्हां त्या चार व्यक्तींमधे एकाला तूप जास्त वाढले. तोच तर जावई होता.

सनातन गोस्वामी म्हणतात, 'नारायणासारखे कृष्ण आहेत असें म्हटल्यावर तर नारायण श्रेष्ठ मानले जातील. म्हणून असें म्हटलें पाहिजे, 'नारायणासारखे श्रीकृष्ण नाही, तर श्रीकृष्णासारखे नारायण आहेत.' वृंदावनाचे साधू म्हणतात, नारायणासारखे नाही तर नारायणच श्रीकृष्णासारखे आहेत.

नारायणासारखे श्रीकृष्ण आहेत याचा अर्थ नारायण वरिष्ठ आहेत. श्रीकृष्णासारखे नारायण आहेत असे म्हटल्याने नारायण नाही, श्रीकृष्ण वरिष्ठ होतील.

तसें श्रीकृष्ण आणि नारायणांत कांही अंतरच नाही. ह्या सगळ्या गोष्टी म्हणजे एक मधुर कलह मात्र आहेत. नारायणांत साठ आणि मुरलीमनोहर श्रीकृष्णांत चौसष्ट गुण सांगितले आहेत. अर्थात नारायणपेक्षा श्रीकृष्णांत चार गुण अधिक आहेत. ते याप्रकारे आहेत– १) रूपमाधुरी २) लीलामाधुरी ३) प्रियामाधुरी ४) वेणुमाधुरी. श्रीकृष्णाचे हे चार गुण नारायणांत नाहीत.

नारायणाला चार हात असल्यामुळे ते कांहीसे कुरूप वाटतात. दोन हातांचे श्रीकृष्ण श्रेष्ठ आहेत.

वैकुंठवासी नारायण राजाप्रमाणे कांहीसे आखडून (ऐटीने) उभे राहतात. म्हणून ते कांहीसे अभिमानी वाटतात. ते आमच्याशी बोलतही नाहीत. कान्ह्यांत काही आखडूपणा नाही. तो आम्हा सर्वांशी बोलतो, आमच्यामधे खेळतो, फिरतो. म्हणून आमचा कान्हाच श्रेष्ठ आहे.

अतिशय आतुरता असल्यावर परमात्मा धावत येत असतात.

गोकुळांत एक नववधू आली होती. ती कान्ह्याच्या दर्शनासाठी फार आतुर होती. परंतु तिची सासू तिला तेथे जाऊच देत नव्हती. आज जेव्हां ती पाणी भरायला जात होती तेव्हां वाटेंत श्रीकृष्णाचेंच चिंतन करीत होती. कन्हैयाने वाकडे केस, डोक्यावर मोरपिसे, ओठावर बासरी, कानांत मकराकृति कुंडले, कटिवर पीतांबर धारण केले होते. तो झुमक झुमक करीत त्या गोपीच्या मागे चालू लागला. बालकान्ह्यानें पाठीमागून गोपीचा पदर धरला. कान्हा आपला पदर धरून उभा असलेला तिनें पाहिला. तीन वर्षांच्या त्या कान्ह्याला त्या गोपीने मोठ्या प्रेमानें आपल्या छातीशी लावले.

बाळाने सुद्धा त्या गोपीला आपल्या छोट्या छोट्या हातांत धरून घेतले, आणि म्हणू लागला–

'तू किती सुंदर आहेस! असे वाटते कीं मीच तुझा स्वामी आहे. रात्रीच्या वेळीं रासक्रीडेंत ये.'

कान्हा फारच वाणी-चतुर आहे.

कोणी देव रस्त्याने चालत जाणाऱ्या कोणत्याही स्त्रीला 'आपण दोघेही एकमेकांचे आहोत' असे कधीतरी म्हणेल का?

कान्हा तर सगळ्यांचाच पिता, पति आणि संतान देखील आहे.

जरा विचार करा– असा आणखी कोणता देव आहे कीं जो रस्त्यावरून जाणाऱ्या कोणत्याही स्त्रीच्या गळ्यांत आपल्या हातांचा हार घालू शकेल? परस्त्रीला तर सर्वच देव भितात. परंतु वैकुंठांतील नारायण मर्यादापुरुषोतम आहेत आणि कन्हैया पुष्टिपुरुषोत्तम आहेत.

कान्ह्यासारखी लीला मनुष्य तर काय, इतर कोणी देवसुद्धा करू शकणार नाही. श्रीकृष्ण देवाधिदेव आहेत.

एक सखी दूध, दही आणि लोणी विकायला निघाली आहे. कृष्णप्रेमांत ती शुद्ध हरपून गेली आहे. ती दही घ्या, लोणी घ्या, असें म्हणू इच्छित आहे परंतु तिच्या अंतर्यामीं माधव लपलेला आहे म्हणूत ती 'माधव घ्या, कोणी गोविंद घ्या' असेच म्हणत आहे.

भोळी गोपी हरीला विकायला निघाली आहे. चौदा भुवनांच्या स्वामीला मडक्यात घालून चालली आहे. कृष्णप्रेमांत इतकी दंग झाली होती कीं आपण काय बोलत आहोत याचें तिला भानच नव्हते.

बाळकृष्णाने ऐकलें कीं, 'माधव घ्या, कोणी माधव घ्या'! तर तो म्हणाला, अरे वा! ही तर मलाच विकायला निघाली आहे!

वाटेत श्रीकृष्ण प्रगट झाले आणि म्हणाले, "अग गवळणी! मी गोकुळचा राजा आहे, थोडे लोणी तर दे."

अतिशय प्रेम असल्यावर त्रास देण्यांत मोठा आनंद येतो. गोपीच्या हृदयांत प्रेम आहे. ती कृष्णाला त्रस्त करूं लागली. अरे, तू कसा रे झालास गोकुळचा राजा? गोकुळचे राजे तर बलरामदादा आहेत. मी तुला नाही, त्यांनाच लोणी देईन. न जाणे, या काळ्यासावळ्या कान्ह्याला नंदबाबा कोठून उचलून घेऊन आले! नंदबाबा तर गोरे आहेत आणि तू तर काळा आहेस! कुठून आणले आहे तुला त्यांनी?

कान्ह्यानें गोपीच्या साडीचा पदर धरला. गोपी म्हणू लागली, 'अरे कृष्णा, सोड माझा पदर. माझं दूध, दही, लोणी मातींत मिसळून जाईल आणि माझी सासू माझं चामडं सोलून वाळत टाकील.'

गोपीने बळ लावून आपला पदर सोडवून घेतला आणि पुढे जाऊ लागली. मागे वळून पाहिले तर कृष्ण तोंड फुगवून बसले होते. गोपी परत येऊन मनधरणी करू लागली. कान्ह्या, लोणी घे, खडीसाखर घे, जे पाहिजे ते देते. माझी चूक झाली.

परंतु कान्हा आता कां ऐकेल? मला कांही नको. कान्ह्यानें ऐकलें नाही तशी गोपी पुढे जाऊ लागली. इतक्यांत कन्हैयानें एक दगड उचलून असा अचूक नेम मारला कीं गोपीचे मडके फुटून त्याचा चक्काचूर होऊन गेला.

अशी लीला श्रीकृष्णाशिवाय इतर कोणताही देव करू शकत नाही. श्रीकृष्ण म्हणतात की ते सर्वांचे पति आहेत.'

श्रीकृष्ण घरीं येऊन आता चुपचाप आईच्या मांडीवर बसला. तो इतका शांत, शहाण्यासारखा बसला होता कीं जणू कांही कांहीच झालें नाही. त्या गोपीने यशोदेजवळ येऊन कृष्णाच्या खोडीचें गाऱ्हाणें सांगितलें. माते, तू कृष्णाचा मुका घेत आहेस, त्यांचे खूप लाड करत आहेस, पण तो फारच

खोडकर, खट्याळ होत चालला आहे. त्यानें माझी घागर फोडून टाकली, माझे कपडे मळवले.

कृष्ण म्हणू लागला, 'आई, मला हिची फार भीती वाटते. ही येथून गेल्यानंतर मग मी सगळी हकीगत सांगेन.'

कान्हा आईला म्हणू लागला, ही गोपी फार कंजूष आहे. ती तीन-चार दिवसाचें शिळे दूध-दही विकत होती. मी विचार केला कीं नासलेले दूध-दही विकणे चांगले नाही. जर एखादा गरीब हे खाऊन आजारी झाला तर? असा विचार करून मी तिची मडकी फोडून टाकली. मी आरोग्य प्रचारक मंडळाचा प्रधान आहे ना!

यशोदा गोपीला दाटू लागली. 'कां गे गोपी? नासलेले दही-दूध कां विकतेस तू?'

कान्हा हसू लागला आणि गोपी देखील हसू लागली. कान्हा बोलण्यात तर फारच चतुर आहे.

कान्हा घागर फोडतो तरी पण आवडतो. तो रस्त्याने जाणाऱ्या कोणत्याही गोपीची मडकी फोडू शकतो. असा अन्य कोणता देव आहे की जो रस्त्यावरून जाणाऱ्या कोणत्याही स्त्रीला छेडू शकेल? इतर सर्व तर भीत असतात की कोणत्याही स्त्रीला हात लागला तर थप्पड खावी लागेल. आमची पूजा कोणी करणार नाही.

श्रीकृष्णाची लीला-माधुरी दिव्य आहे. त्यांचे अनुकरण इतर कोणताही देव करू शकत नाही.

भगवान नारायण हातांत शंख ठेवतात. शंख फुंकणारा देव श्रेष्ठ आहे की बासरी वाजवणारा?

इतर देव तर हातात शस्त्रास्त्र बाळगून आहेत. कोणाच्या हातांत सुदर्शन आहे, तर कोणाच्या हातांत धनुष्य-बाण तर कोणाच्या त्रिशूळ. जणू या सर्वांना संसाराचे भय वाटते. कान्हा हातांत शस्त्र ठेवीत नाही. कृष्णाच्या एका हातात बासरी आणि दुसऱ्या हातांत खडीसाखर. शस्त्रधारी देव श्रेष्ठ आहेत की कन्हैया? आम्ही तर कन्हैयालाच श्रेष्ठ म्हणू.

कृष्ण रोज बासरी वाजवतो. कृष्णाची बासरी ज्याने कोणी ऐकली असेल तो संसाराविषयी उदास होऊन जातो. बासरीची धुन ऐकल्याबरोबर 'राधेकृष्ण, राधेकृष्ण' करू लागतो. श्रीकृष्णाची वेणुमाधुरी दिव्य आहे.

गोपी म्हणते–'मुरली वाजवूनी माझे मन हरिले।'

एक गोपी प्रेमपूर्ण रागे भरते–

हे मुरारे! स्वयंपाक करायच्या वेळी कृपा करून मुरलीचे सूर काढूं नको. तुझ्या मुरलीची धुन ऐकून चुलीतली सुकी लाकडे सुद्धा रसभरित होऊन रस वाहवू लागतात आणि विस्तव विझून जातो. मग मी स्वयंपाक कसा करू?

कृष्णाच्या बासरीची धुन ज्या कोणाच्या कानांत जाते तो त्यांचा सेवक होऊन जातो. म्हणून कान्हाच सर्वश्रेष्ठ आहे असे मी मानले आहे.

कान्ह्याच्या रूपमाधुरीने देखील अनेकांना आकर्षित केले आहे. निर्गुण ब्रह्माचे उपासक मधुसूदन स्वामी सुद्धा श्रीकृष्णाच्या रूपमाधुरीच्या मागे वेडे झाले होते.

अद्वैत मार्गाच्या अनुयायींकडून पूजनीय आणि स्वराज्यरूपी सिंहासनावर प्रतिष्ठित होण्याचा अधिकार प्राप्त अशा आम्हाला गोपींच्या मागे मागे फिरणाऱ्या कोणी शठाने आमची इच्छा नसताना सुद्धा आपल्या चरणांचा दास करून घेतले आहे.

श्रीकृष्णाच्या रूपमाधुरीच्या मागे कवि रसखान सुद्धा वेडे झालेले होते.

श्रीकृष्णाची रूपमाधुरी दिव्य आहे. तो तर वैकुंठनिवासी नारायणापेक्षाही श्रेष्ठ आहे.

यशोदा गर्गाचार्यांना म्हणते– महाराज, जेवणाची वेळ झाली. प्रथम आपण जेवण करून घ्यावे, मग गोष्टी होत राहतील.

गर्गाचार्य– मी दुसऱ्याने शिजविलेले अन्न खाऊ शकत नाही. आपले जेवण मी आपल्या हातानेच शिजवीन. प्रथम मी यमुनेचे पाणी घेऊन येतो.

गर्गाचार्यांनी यमुनेत स्नान करून यमुनेचे पाणीही आणले. त्यांचे इष्टदेव चतुर्भुज द्वारकानाथ होते. गर्गाचार्यांनी आपल्या देवासाठी खीर बनविण्याचे इच्छिले. भगवंताला खिरीचा नैवेद्य दाखवून मग प्रसाद घेईन.

स्वतःसाठीच केवळ अन्न शिजविणारा अन्न खात नसून पाप खात असतो. म्हणून अन्न शिजवायचेच असेल तर देवासाठी शिजवावे.

प्रभुसेवेत उपयोगी पडली तरच संपत्ती सार्थक होईल. आपल्या शरीरापेक्षा जास्त प्रेम प्रभूवर करा.

यशोदेने विचार केला की, हे गर्गाचार्य भगवंताला खीर समर्पण केल्याशिवाय तर खाणारच नाहीत. म्हणून खीर थंड करण्यासाठी तिने गर्गाचार्यांना सोन्याचे ताट दिले. खीर थंड झाल्यावर गर्गाचार्यांनी तुलसीपत्र घालून भगवंताची स्तुति सुरू केली–

हे नारायणा! हे लक्ष्मीपते! हे वैकुंठपते खीर खावी (घ्यावी).

कान्हा म्हणू लागला– मीच लक्ष्मीपति वैकुंठनाथ आहे. गुरुजी बहुधा मलाच हाका मारीत आहेत. म्हणून मला खीर खायला जावेच लागेल. असे समजून घेऊन तो खीर खाण्यासाठी धावतच आला आणि खीर खाऊ लागला.

बारा वेळा माळ फिरवायला जितका वेळ लागतो तितक्या वेळपावेतो देवासमोर ताट ठेवावे. बाळकृष्णाला विनवावे लागतेच ना!

गर्गाचार्य म्हणत आहेत– ॐ नमः नारायणाय।

कान्हा म्हणतो– महाराज, डोळे मिटलेले ठेवा.

गर्गाचार्यांनी बारा वेळा माळ फिरवून डोळे उघडले. तर त्यांनी पाहिले की बाळकृष्ण खीर खाण्यांत मग्न आहेत. अरे! हा वैश्याचा मुलगा माझ्या खिरीला शिवला. अग यशोदे! पहा तर तुझा मुलगा माझी खीर खात आहे.

यशोदा धावतच आली. पाहिले तर कान्ह्याने अर्धी खीर संपवून टाकली होती आणि त्याचे तोंड खिरीने माखले होते.

यशोदा कान्ह्याला रागाने बोलू लागली, 'घरांत तुला खायला मिळत नाही का? महाराजांची खीर कां खाल्लीस तू?'

कान्हा– आई, मला तू रागावत आहेस! पण मी तरी काय करू? महाराजांनीच तर मला खीर खायला बोलाविले होते.

यशोदेने गर्गाचार्यांना विचारले– महाराज, आपणच ह्याला खीर खायला बोलाविले होते काय?

गर्गाचार्य– नाही ग नाही! मी वैकुंठवासी नारायणाला बोलाविले होते.

कान्हा– मीच तर आहे तो वैकुंठवासी नारायण.

यशोदा– लहान तोंडी मोठा घास कां घेत आहेस? तू कुठला नारायण झालास? वैकुंठीच्या नारायणांना तर चार हात आहेत. आहेत तुला चार हात?

कान्हा – तू म्हणशील तर मी चतुर्भुज होईन.

यशोदेने विचार केला कीं जर याने चतुर्भुज रूप धारण केले तर लोक म्हणतील, हा मुलगा यशोदेचा नाही. कोणी जादूगार आहे. म्हणून ती म्हणाली – नाही, नाही. चार हातांच्या नारायणापेक्षा तर माझा दोन हातांचा मुरलीधरच चांगला आहे – श्रेष्ठ आहे. तू जो आहेस तोच रहा.

मग यशोदा गर्गाचार्यांना म्हणाली, हा तर नादान मुलगा आहे. ह्याच्या बडबडीकडे लक्ष देऊ नका. कृपा करून तुम्ही पुनः खीर बनवावी.

गर्गाचार्य पुनः स्नानासाठी यमुनेकडे निघून गेले.

कृष्ण यशोदेच्या कुशींत बसून म्हणू लागला – माते, मी कोकिळेची वाणी बोलू शकतो आणि तो कुहू, कुहू करू लागला. सगळ्यांनाच मोठा आनंद झाला.

कान्हा जेव्हां अंगणांत खेळतो तेव्हां त्याला पाहून मोर सुद्धा आनंदाने नाचू लागतात. कन्हैया आईला म्हणतो – मी सुद्धा मोरासारखा नाचू शकतो आणि तो ठुमक ठुमक नाचू लागला.

यशोदा – बेटा, तू हे नाचणे कोणाजवळून शिकलास ?

कान्हा – आई, मी तर तुझ्या पोटांतूनच शिकून आलो आहे. आई, मोराच्या मागे जो आहे तो कोण आहे ?

आई – ती मयूरी (लांडोर) आहे. तुला ठाऊक आहे का मयूरी कोणाला म्हणतात ? लांडोर मोराची बायको असते.

कान्हा – आई, माझी बायको कुठे आहे ?

कान्हा आपल्या अद्भुत बाललीलेने सगळ्यांनाच आनंद देत आहे.

गर्गाचार्यांनी पुनः खीर बनविली. बाळकृष्णाने गंमत करायचा विचार केला. तो आईच्या मांडीवर झोपी गेला. यशोदा म्हणाली, चला, चांगलेच झाले. बाळ निजला आहे. आता महाराज शांतिपूर्वक भोजन करू शकतील.

गर्गाचार्यांनी खिरीवर तुलसीपत्र ठेवले आणि प्रार्थना करू लागले !

"त्वदीयं वस्तु गोविंद... !"

नाथ ! मी आपला सेवक आहे ! हे नारायणा, हे लक्ष्मीपति, आपण लौकरच या आणि खीर प्राशन करा.

कान्ह्याने हे ऐकले आणि तो तिथे जायला अधीर झाला. त्याने योगमायेला यशोदेच्या डोळ्यात जाऊन बसायला सांगितले. यशोदेने डोळे मिटले असतील एवढ्यांत कान्हा धावतच येऊन गर्गाचार्यांच्या जवळ येऊन खीर खाऊ लागला.

गर्गाचार्यांनी पाहिले की या वैश्य बालकाने या वेळीही माझी खीर उष्टी करून टाकली.

कान्ह्याने विचार केला की या बिचाऱ्या ब्राह्मणाला कोठपर्यंत भ्रमात ठेवावे ? त्याने आपले चतुर्भुज रूप प्रगट केले व म्हणाला, महाराज, आपण ज्या नारायणाची आराधना करीत आहात तो मीच आहे, आणि गोकुळांत कन्हैयाचे रूप घेऊन अवतीर्ण झालो आहे. आपली तपश्चर्या सफल झाली आहे.

गर्गाचार्यांनी सानंदाश्चर्य दर्शन घेतले आणि स्तब्ध झाले. ते विचार करू लागले की प्रभु माझ्या मांडीवर येऊन बसतील तर किती चांगले होईल !

कान्हा गर्गाचार्यांच्या मांडीवर येऊन बसला आणि म्हणाला, आता आपण जेवण करा.

गर्गाचार्य – जेव्हा माझे इष्टदेव माझ्या तोंडात घास घालतील तेव्हाच मी जेवीन.

बाळकृष्णाने एक घास गर्गाचार्यांच्या तोंडात घातला. गर्गाचार्यांना आपले जीवन सफल झाले असे वाटू लागले.

इकडे यशोदा जागी झाली आणि तिने पाहिले की बाळकृष्ण कुशीत नाही. अरे, कुठे गेला तो? तिने पाहिले तर तो गर्गाचार्यांच्या मांडीवर बसला आहे.

गर्गाचार्य– यशोदे, तू मोठेच पुण्य केले आहेस. माझे नारायण तुझ्या येथे पुत्ररूपाने जन्माला आले आहेत.

बाळकृष्णाला वाटले, गर्गाचार्यांनी आपले भांडे फोडले. यशोदेचा तर वात्सल्यभाव आहे. वात्सल्यभावात ऐश्वर्य विरोध करते. कन्हैयाने विचार केला की गर्गाचार्यांचे म्हणणे जर यशोदेच्या मनात ठसले तर ती माझे लाड करणार नाही.

मी तर प्रेमदान करण्यासाठी आणि प्रेमरसाचे पान करण्यासाठी गोकुळात आलो आहे. त्याने मायेला आज्ञा केली की आईला माझ्या वास्तविक स्वरूपाचे ज्ञान होऊ देऊ नकोस. यशोदेला भुलविण्यासाठी कृष्णाने मायेचे आवरण पांघरून घेतले.

आदिमाया तर राधिकेचेच रूप आहे. ती कृष्णाचा मोह उत्पन्न करते.

वैष्णवमतानुसार मायेची तीन रूपे आहेत–

(१) स्वमोहिका

(२) स्वजनमोहिका (ऐश्वर्याचे ज्ञान न होऊ देण्यासाठी)

(३) विमुखजनमोहिका – जी आम्हा सर्वांना फसवीत असते– जी ईश्वराचे स्वरूप विसरायला लावते तीच विमुखजनमोहिका आहे.

**१०. लोणी चोरण्याची लीला, क्रममुक्ति आणि सद्यःमुक्तीचे वर्णन :**

आता लोणी चोरण्याच्या लीलेचे देखील वर्णन करू.

बाळकृष्ण दिवसेंदिवस मोठा होत होता. गावातले इतर गोपबालक सुद्धा खेळायला येत. त्यातील काही अशक्त होते. कान्ह्याने त्यातल्या एका अशक्त बालकाला म्हटले, 'मधुमंगल! तू फारच दुबळा आणि हाडकुळा आहेस. खाऊन पिऊन माझ्यासारखा तगडा हो.'

मधुमंगल– कान्ह्या, आम्ही तर फारच गरीब आहोत. आम्ही दूध-लोणी कसे खाऊ शकू?

कंसाची आज्ञा होती की सगळे लोणी कराच्या रूपात त्याच्याकडे पाठवण्यात यावे. व्रजवासी बिचारे भोळे होते. ते आपल्या मुलांना लोणी खायला द्यायच्या ऐवजी सर्व लोणी कंसाकडे पाठवून देत असत. कंस आपल्या मल्लांना सगळे लोणी देत असे.

कन्हैया आपल्या बालमित्रांना म्हणाला– व्रजवासी सगळे लोणी जे कंसाला पाठवितात ते आता मी बंद करणार. गावातले लोणी गावच्या लोकांसाठीच असले पाहिजे. आम्ही लोणी मथुरेला जाऊ देणार नाही. मधुमंगल, तू रडू नकोस. मीच तुला लोणी खाऊ घालीन.

ईश्वराची नेहमी अशी अपेक्षा असते की जीव आपल्यासारखाच व्हावा. जीव जर ईश्वरावर प्रेम करील तर ईश्वर त्याला आपल्यासारखे बनवण्याचा प्रयत्न करीत असतो.

मित्र– जर का तू आम्हाला रोज रोज लोणी देऊ लागलास तर तुझी आई तुला मार देईल.

कन्हैया– नाही, नाही! मी आपल्या घरचे लोणी देणार नाही, बाहेरून मिळवून तुम्हा सगळ्यांना लोणी खायला घालीन. तुम्हाला बलवान करीन.

मित्र – तू काय लोण्याची चोरी करशील ?

कन्हैय्या – हो, चोरीच करावी लागेल. आपण एक मंडळ तयार करू. त्याचे नाव राहील ' बाल-गोपाल चौर्य विद्या प्रचार मंडळ. '

मित्र – जर चोरी करताना आपण पकडले गेलो तर ?

कन्हैय्या – माझ्या गुरूंनी मला एक मंत्र शिकविला आहे. त्याचा पाठ केला असता आम्हाला कोणी पाहू शकणार नाही, आणि जर पकडले गेलो तरीही सुटून जाऊ.

मित्र – कोणता मंत्र आहे ?

कृष्ण – चोरी करताना "कफल्लकम्, कफल्लकम्" बोलत रहा. कफल्ल ऋषींनी चौर्यविद्येचा प्रसार केला होता. हा मंत्र त्याच ऋषींचा आहे.

लक्षांत ठेवा, तो मंत्र कान्ह्याने आपल्या मित्रांना दिला होता, आम्हाला नाही. आम्हाला कोठेच चोरी करायची नाही. चोरी करणे पाप आहे.

आतापासूनच भगवंताची सेवा, पूजा, भजन-कीर्तन करा आणि त्यांना प्रार्थना करा – जेव्हा तुम्ही पुढल्या द्वापरयुगात जन्म घ्याल तेव्हा मला गोप-बालक बनवा.

याप्रमाणे गोप-बालकाचा जन्म मिळाल्यावर कृष्णाबरोबर खेळा आणि कृष्णाचा आदेश झाला तरच चोरी करा, मग चोरी करणे पाप होणार नाही.

आपल्याच शरीराशी खेळत राहणारा पापकर्म करीत असतो. आत्म्याशी खेळ करणारा पाप करू शकत नाही. जो ईश्वरावर प्रेम करतो, जो ईश्वराबरोबर खेळतो त्याच्या हातून पाप होत नाही.

ईश्वराच्या उपस्थितींत मनुष्य पाप करू शकत नाही आणि जरी झाले तरी त्याचे उत्तरदायित्व ईश्वरावरच असते.

शंकराचार्यांनी शांकरभाष्यांत म्हटले आहे – परमात्म्याचा साक्षात्कार झालेल्या ज्ञान्याच्या हातून पाप होऊ शकत नाही आणि जर यदाकदाचित झाले तरी त्याचा दोष त्याला लागत नाही. शास्त्र तर ज्याला प्रभूचा साक्षात्कार झाला नाही त्याच्याचकरता आहे. शास्त्राची आज्ञा आणि मर्यादा अज्ञानी जीवांसाठी आहे. शास्त्राने चोरी निषिद्ध सांगितली आहे.

परमात्मा ज्याला आपले म्हणतात त्याच्यासाठी तर सगळे जगच आपले आहे. तो चोरी करू शकत नाही. अपरोक्षानुभूतिनंतर शास्त्राचे अस्तित्वच राहात नाही.

ब्रह्मसाक्षात्कारानंतर शास्त्र काय आणि विधि काय, सर्व काही निरर्थक आहे.

तात्त्विक दृष्टीने पाहिले तर ईश्वरच सर्वस्वाचे स्वामी आहेत, म्हणून ते चोरी करूच शकत नाही. ही तर दिव्य लीला आहे. गोपींना परमानंदाचे दान करण्यासाठी ह्या लीलेचे प्रभूंनी आयोजन केले होते.

शुकदेव वर्णन करीत आहेत —

आज मंडळाची स्थापना झाली आहे. आता या मंडळाचा मी अध्यक्ष होईन. तुम्हाला तर येवढेच पाहायचे आहे की गोपी दूध-दही-लोणी घेऊन केव्हा बाहेर जातात, कोणत्या रस्त्याने जातात आणि परत केव्हा येतात. बाकी सगळे मी सांभाळून घेईन.

गोपींना वाटत असते की कान्ह्याने रोज रोज त्यांच्या घरी येत राहावे. कृष्णाचे रूपडे पाहण्यासाठी कोणत्या ना कोणत्या मिषानें गोपी यशोदेच्या घरी पोहोचतच असत.

गोपी यशोदेला गाऱ्हाणी सांगत – यशोदे ! गाईचे दोहन करण्याच्या आधीच तुमचा कान्हा वत्सांना

सोडून देतो. दही-दूध-लोणी चोरून घेऊन जातो आणि आपल्याच मित्रांमधे आणि वानरांना वाटून देतो. जर आमच्या घरात त्याला काही मिळाले नाही तर रागारागाने आमच्या बालकांना रडवून जातो. आम्ही दूध, दही, लोणी कुठे का ठेवोत ना, शिंक्यावर ठेवले तरी पण तो चोरून नेतोच. लोणी अंधारात लपवू इच्छिले तरी अंधार त्याला रोखू शकत नाही.

कृष्ण जेथे जेथे जातो तेथे तेथे प्रकाश पसरतो.

जर आम्ही कान्ह्याला चोर म्हटले तर तो आम्हाला म्हणतो – तू चोर आहेस, तुझा बाप चोर आहे, तुझी आई चोर आहे. ह्या घराचा मीच मालक आहे.'

माते, काय सांगू तुला? गाईंच्या दोहनाच्या वेळेआधीच कान्हा वासरांना सोडून देतो.

वेळेवर वासरांना सोडणारा तर सामान्य गोपाळ आहे. हा तर श्रीकृष्ण आहे ना! श्रीकृष्ण तर वेळेच्या आधीच वासरांना अर्थात जीवांना मुक्त करण्याला समर्थ आहेत.

वासरांचा अर्थ आहे विषयासक्त जीव. वत्स अर्थात् विषयासक्त जीव.

शास्त्राने मुक्तीचे दोन प्रकार सांगितले आहेत – क्रममुक्ती आणि सद्यःमुक्ती.

समय आल्यावर जीवाला मुक्त करतात ते मर्यादापुरुषोत्तम राम. परंतु कान्हा तर पुष्टिपुरुषोत्तम आहे. क्रमशः मुक्ती देण्यापेक्षा, जर जीव पात्र असेल तर वेळेच्या आधी सुद्धा कृष्ण मुक्ति देऊ शकतात.

ज्या जीवावर कृष्णांचा अनुग्रह होतो त्याला मुक्ती मिळविण्यासाठी क्रमाची प्रतीक्षा करावी लागत नाही. हा पुष्टिमार्ग तर कृपामार्ग आहे.

क्रममुक्ती येणेप्रकारे होते – जीव शूद्र वर्णांत जन्मला आहे. आता जर या जन्मांत त्याने चोरी, व्यभिचार इत्यादी न केले, जर वर्णांची चांगली सेवा केली तर पुढच्या जन्मी त्याला वैश्य जातीत अवतार मिळेल. वैश्य जर नीतिधर्माप्रमाणे जीवन जगेल तर पुढल्या जन्मी तो क्षत्रिय होईल आणि क्षत्रिय जन्मात जर तो क्षात्रधर्माचे पूर्ण पालन करील तर पुढच्या जन्मांत तो ब्राह्मण होईल.

आता जर तो सदाचारी ब्राह्मण झाला तर पुढच्या जन्मी अग्निहोत्री ब्राह्मण होईल आणि मग त्याच्या पुढच्या जन्मी तो ब्रह्मनिष्ठ योगी होईल. याप्रमाणे सद्वर्तन, योगाभ्यास आणि ब्रह्मचिंतन उत्तरोत्तर वाढत गेले तरी त्याला दोन-तीन जन्म आणखी घ्यावे लागतात. आणि याप्रमाणे त्याचे क्रियमाण, संचित आणि प्रारब्ध निःशेष झाल्यावर जीव शुद्ध होईल आणि शुद्ध झाल्यावरच जीवाला मुक्ती मिळेल. तर हा आहे क्रममुक्तीचा मार्ग.

आता सद्यःमुक्तीविषयी बोलू. अशा प्रकारच्या मुक्तींत जन्माचा काही क्रम नसतो. देव ज्या कोणत्या जीवावर विशिष्ट अनुग्रह करतो, त्याची मुक्ति होते; मग तो कोणत्या का वर्णाचा असेना. जर कोणी वैश्य हार्दिकतेने भगवद्भक्ति करील तर कृष्ण प्रसन्न होऊन त्याला गोलोकधामात घेऊन जातात.

श्रीकृष्ण गोदोहनाची वेळ व्हायच्या आधीसुद्धा वासरांना सोडून देतात, अर्थात् निश्चित वेळेपूर्वी सुद्धा जीवाला मुक्त करतात.

श्रीकृष्ण तर अनुग्रह अर्थात पुष्टिपुरुषोत्तम आहेत. ज्या कोणा जीवावर ते अनुग्रह करतात तो तात्काळ मुक्त होत असतो. ज्याप्रमाणे एखादा राजा जेव्हा त्याच्या इच्छेला येईल तेव्हा वाटेल त्या व्यक्तीला राजा बनवू शकतो, त्याचप्रमाणे श्रीकृष्ण जेव्हा इच्छा होईल तेव्हा कोणत्याही सुपात्र जीवाला बंधनमुक्त करू शकतात. परमात्मा प्रमेयबलाने कोणत्याही वैष्णवाला तत्काळ मुक्त करू शकतात. श्रीकृष्ण सद्यःमुक्तीचे दाते आहेत.

श्रीकृष्ण पुष्टिपुरुषोत्तम आहेत म्हणून ते सद्यःमुक्ती देतात. नाहीतर वैश्य, क्षत्रिय, ब्राह्मण, अग्निहोत्री ब्राह्मण, ब्रह्मनिष्ठ योगी इत्यादी उत्तरोत्तर क्रमिक वर्णांतून गेल्याशिवाय मुक्ति मिळू शकत नाही. जर कान्हा कोणा जीवावर दयाळू होईल आणि त्याच्यावर कृपा करील तर तो जीव सरळ वैकुंठात जाऊ शकतो.

तशी भगवंताची साधारण कृपा तर सर्वच जीवांवर असते. परंतु एखाद्या विशिष्ट जीवावर ते विशिष्ट कृपा सुद्धा करू शकतात. जेव्हा एखादा जीव परमात्म्याची प्रार्थना, धारणा, चिंतन करीत करीत थकूनभागून रडू लागतो, दीन होतो, त्या जीवावर प्रभूची विशिष्ट कृपादृष्टी होते; आणि त्या जीवाची त्याच जन्मांत मुक्ती होते. कृष्ण तर ब्रह्मांडाचे स्वामी आहेत. ते जे इच्छितील ते, ते करू शकतील.

जीव जेव्हा अतिशय साधना करून नम्र होतो तेव्हा तो प्रभूचा प्रियपात्र होऊन त्याला कृपा मिळते. निःसाधन होऊन जो साधन करतो तो श्रेष्ठ होय. निःसाधनाचा अर्थ आहे की सर्व काही साधन करूनही काहीच केले नाही असे मानणे. निरभिमानी व्हा. कित्येक वेळा असे होते की साधन करता करता जीव अभिमानी होऊ लागतो. असे केल्याने त्याचे पतन होते.

यशोदेने गोपींना सांगून ठेवले की माझा मुलगा तुमच्या घरी येऊन काहीही खोडी करील तर त्याला रागवत जा.

गोपी – माते, आम्ही त्याला काय रागवू शकतो ? तोच आम्हाला दाटत असतो. काल तो माझ्या घरीं आला होता. मी त्याला धरायला गेले तर तो असा पळाला, असा पळाला की त्याच्या मागे धावता धावता मीच थकून गेले. आणि जेव्हा मी त्याला पकडू शकले नाही तेव्हा उलट मलाच अंगठा दाखवून चिडवू लागला.

एक सखी म्हणाली, माते, तुझा कान्हा लोणी चोरतो.

यशोदेने तिच्या कानांत सांगितले, 'जरा हळू बोल' ही गोष्ट कोणाला सांगू नको. ही गोष्ट पसरली तर त्याला मुलगी कोण देईल ?

गोपी – कान्हा जे मागील ते त्याला देऊ, पण तो चोरी कां करतो ?

यशोदेने कृष्णाला दाटू इच्छिले. पण मग विचार केला की त्याला दाटले तर तो भिऊन जाईल.

गोपींची सर्वच इंद्रियें आपणाकडे आकर्षित करून, परमानंदात बुडवून त्यांना वैकुंठमोक्षाचें दान करण्यासाठी ही श्रीकृष्णलीला आहे.

यशोदामाता कृष्णाला समजावू लागली की त्याने आपल्या घरचेच लोणी खावे.

कान्हा – मला घरचे लोणी आवडत नाही, आणि घरचे लोणी खाईन तर कमी होईल. म्हणून मी बाहेर कमवून खातो. गोपींच्या घरचे लोणी खूप गोड लागते.

सख्या म्हणाल्या – या लोणीचोराचे फार लाड करू नका.

शुकदेव मोठ्या विवेकाने कथा सांगत आहेत – श्रीकृष्ण चोर आहे असे म्हटलेले नाही; परंतु व्रजांतील गोपी या प्रकारे यशोदेला लोणी चोरण्याच्या लीला सांगत असत असे म्हटले आहे.

मातेने विचारले – कान्ह्याचे येणे आणि लोणीचोरी यांची खबर तुम्हाला मिळते का ?

गोपी – हो, केव्हा केव्हा त्याचे येणे आम्हांला स्वप्नांत दिसते. जेव्हा आम्ही निजायला जातो तिथे सुद्धा कान्हा आम्हाला दिसतो. तो स्वप्नांतसुद्धा येत असतो.

बिछान्यावर पडल्यावर सुद्धा जर एखादी वस्तू आठवली तर समजा की तुमचे मन त्या वस्तूंतच

अडकलेले आहे. कित्येक लोक बिछान्यावर निजल्या निजल्या पुढच्या दिवसाचा कारभार, देणे-घेणे, हिशोब-किताब इत्यादीविषयी विचार करीत रहातात. लोभ्याचे मन द्रव्यांत, काम्याचे मन स्त्रीमध्ये, दुष्टाचे मन भांडण-तंटा, लढाईमध्ये अडकलेले असते. बिछान्यात तर हे सर्व विसरून जाऊन 'हरे कृष्ण हरे कृष्ण' करीत राहिले पाहिजे.

एका गोपीने म्हटले, बिछान्यात सुद्धा मला कान्हाच आठवत राहतो. तो घरात नसूनही त्याची छबी डोळ्यांतून जात नाही. बाळकृष्णाचे नाव तर अमृताहूनही गोड आहे. मला तर 'कृष्ण कृष्ण' बोलायची सवयच झाली आहे.

मनुष्याचा हा स्वभावच आहे की दिनचर्येतून निवृत्त झाल्यावर बिछान्यावर निजण्यापूर्वी प्रिय विषयाच्या वस्तूची आठवण होत असते.

मला तर आणखी काही आठवतच नाही. कृष्ण कृष्ण म्हणत आणि त्याचेच दर्शन घेत निजून गेल्यावर स्वप्नांतही तोच येत राहतो. स्वप्नांत मला दिसले की कान्हा आपल्या मित्राबरोबर माझ्या घरी आला, लोणी चोरले आणि मित्रांना वाटून टाकले.

ज्या कोणत्या वस्तूत मन अडकलेले असेल तीच वस्तू स्वप्नांतही आठवेल. मनाची परीक्षा स्वप्नांत होते.

खऱ्या वैष्णवाचें मन कृष्णालाच बांधलेले राहते. म्हणून स्वप्नांतही तो येतो. स्वप्नांतसुद्धा जेव्हा कृष्णदर्शन होईल तेव्हाच तुम्ही समजा की तुम्ही खरे वैष्णव आहात. अधिकाऱ्याला प्रभूचे पहिले दर्शन स्वप्नांतच होत असते.

गोपीचे मन श्रीकृष्णांत अडकले आहे. आई, मला वाटले की कान्हा माझ्या घरी अवश्य येईल. पहाटे उठल्यापासून मी वेड्यासारखी झालेली होते. आनंदात इतकी बावळी होऊन गेले होते की लाकडाबरोबर मी लाटणेही जाळून टाकले.

एका दुसऱ्या गोपीने सांगितले: माझ्या घरी कान्हा सगळ्यांनाच आवडतो. माझ्या भावोजींना मी वाढत होते. मन कान्ह्याच्या गोड आठवणींमध्ये हरपले होते. भावोजींनी माझ्याजवळ मोरंबा मागितला. शिंक्यावरून मोरंब्याची कासंडी काढून वाढू लागले. मोरंबा फारच रसभरित सुंदर होता. कोणतीही चांगली वस्तू कान्ह्याला द्यायची इच्छा होते. कान्ह्याला किती छान लागेल मोरंबा! जर या वेळी कान्हा आला तर! माझे भावोजी त्याला सुद्धा जेवायला बसवून घेतील. मी त्याला मोरंबा देईन.

माते! कान्हा यावा या इच्छेने मी इतकी वाहवून गेले की मी वेड्यासारखी झाले; आणि मोरंब्याची कासंडी शिंक्यावर ठेवण्याऐवजी माझ्या मुलालाच तिथे वर ठेवले.

माझे पति पण कान्ह्याच्या प्रेमांत असे वेडे होऊन गेले आहेत की सगळे कामकाज सोडून ते त्याचे गुणगान करीत असतात.

ईश्वरावर जर प्रेम कराल तर तो कधी विसरला जाणार नाही.

आणखी एका गोपीने सांगितले की, माते, आज कान्ह्याने तर माझी लाज राखली.

यशोदा – काय घडले तुझ्या घरी?

सखी – माझा स्वभावच झाला आहे की स्वयंपाक करता करता सुद्धा 'हरे कृष्ण, हरे राम' जपत असते. माझ्या येथे पाहुणे आले होते. माझे सासरे फारच रागीट स्वभावाचे आहेत. ते म्हणाले, आज पाहुणे जेवणार आहेत, जरा काळजीपूर्वक स्वयंपाक कर. आम्ही बाग-बगिच्यांत जाऊन येतो. दोन वाजता परत येऊन जेवण करू. कृष्णजपाच्या नादांत कुठे जेवण बिघडवू नकोस.

मी स्वयंपाक करता करता विचार करीत होते की भोक्ता तर परमात्माच आहे. जेवण तर साररूप प्रभूसाठीच शिजवावे. आणि मी हरेकृष्णाचा जप करीतच अन्न शिजवू लागले.

स्वयंपाक करताना अशी उच्च भावनाच मनांत असायला पाहिजे. जर त्या वेळी सिनेमाच्या गोष्टी आठवू लागाल तर कामाच्या परमाणुमुळे जेवण दूषित होऊन जाईल. जेवण तयार करीत असता मनाचे भल्या-बुऱ्या विचारांचे परमाणू अन्नांत जाऊन मिसळतात. अन्न शिजविताना, पोळ्या लाटताना 'हरे कृष्ण, हरे कृष्ण' म्हणत राहाल तर जेवणाऱ्याचे कल्याण होईल.

आजची स्त्री तर रात्री पाहिलेल्या सिनेमाचे गाणेच गुणगुणत राहते. स्वयंपाक करताना ती सिनेमाचे गाणेच गात असते. असे केल्याने जेवण अपवित्र होते. सिनेमातील अमंगळ शृंगार-वासनेने ओथंबलेली गाणी गात राहिल्याने जेवण दूषित होऊन जाते. त्यात संस्कारहीनता उतरते. तेव्हा गाणी म्हणायचीच असली तर कृष्णभक्तीची गाणी म्हणा.

मी सगळा स्वयंपाक अत्यंत सावधपणे शिजवला. शेवटी घीवर बनवू लागले तर विचार आला की कान्ह्याला हा फार आवडतो. मनांत कान्ह्याला घीवर खाऊ घालण्याची इच्छा झाली. माझे हृदय जणूकाही हातांतून जाऊ लागले. मला भास होऊ लागला की कान्हा अंगणात आला आहे, घरात येत आहे, स्वयंपाकघरांत येऊन पोहोचला आहे.

अशा प्रकारे मन कान्ह्याच्याच कल्पनेंत बुडालेले होते त्यामुळे घीवरात साखरेऐवजी मीठच घातले गेले. देवाला नैवेद्य दाखविला. मामंजी आणि पाहुणे आले. त्यांनाही वाढले, घीवर तर खारट झाला होता, परंतु त्याला भक्तीचे पुट लागले होते म्हणून पाहुण्यांनी तर वाखाणणी करीत करीत खाल्ला. 'हे जेवण नाही अमृत आहे' असे म्हणाले. भगवंताच्या नामामृताच्या पुटाने मिठाचा स्वाद गोड झाला होता. माझ्या रागीट सासऱ्यांनी सुध्दा माझ्या स्वयंपाकाची व माझी सुध्दा वाखाणणी केली. ही माझी सून नाही, अन्नपूर्णा आहे. लक्ष्मी आहे. सरतेशेवटी मी जेव्हा जेवले तेव्हा समजले की घीवर गोड नव्हे, खारा होता.

माते, माझी या कान्ह्यानेच लाज राखली.

आणखी एक गोपी म्हणाली– माते, काय सांगू? मी दूध-दही विकायला निघाले. का कोण जाणे पण मला असे वाटू लागले की माझ्या माठांत कान्हा का कोण जाणे कसे मला पण असे वाटू लागले की माझ्या माठांत कान्हा लपून बसला आहे. डोक्यावरून माठ खाली ठेवून पाहिले तर त्यात बाळकृष्णाचे दर्शन झाले. आता कान्ह्यालाही का विकायचे? मी काहीच न विकता परत घरी आले, तर घरी माझी खूपच फजिती झाली.

आपल्या बुद्धिरूपी माठात जर कान्हा सामावला असेल तर प्रत्येक ठिकाणी त्याचे दर्शन होत राहील. गोपी आपल्या बुद्धींत, मनांत नेहमी देवाला ठेवीत होत्या.

जर आपल्या डोक्यात, हृदयांत, मनांत, बुद्धींत जड पदार्थ असतील तर प्रत्येक ठिकाणी तेच दिसतील आणि जर तेथे श्रीकृष्ण असतील तर कणाकणांत त्यांचेच दर्शन होत राहील.

माते, आम्ही जिथे कोठे जातो तिथे तिथे कन्हैयाचेच दर्शन होत राहते.

या गोपी घरातले काम करता करता आणि निवृत्त झाल्यानंतर सुद्धा श्रीकृष्णाला आठवत राहतात.

मोठमोठ्या महात्म्यांना सुद्धा परमात्म्याचे नित्य स्मरण करीत राहण्यासाठी प्रयत्न करावे लागतात. पण व्रजांतील गोपी कान्ह्याला विसरायचा प्रयत्न करूनही विसरू शकत नाहीत. कदाचित कान्हा सुद्धा त्यांना विसरू शकत नसावा.

गोपी भगवी वस्त्रें नेसत नव्हत्या. पण त्यांचे मन कृष्णप्रेमातच रंगलेले राहात असे. ही तर गोपींच्या प्रेमसंन्यासाची कथा आहे.

ही गोपींच्या मनाची तन्मयता आणि हाच त्यांचा निरोध.

बाळकृष्णाची विविध लीला पाहता पाहता गोपी घरकाम विसरून वेड्यासारख्या होत असत. घरची कामे सोडून लीला पाहात राहत. कान्ह्याच्या लीला पाहून त्यांचे मन अस्थिर होऊन लीलांमध्येच तन्मय होत असे. ही गोपींची तन्मयता आहे.

कृष्णांतच तन्मयता झाल्याकारणें गोपी संसार-व्यवहारांची कामे चांगल्या रीतीने करू शकत नव्हत्या. कृष्णप्रेमात शुद्ध-बुद्ध हरवून जी कामें करू नये ती त्या करून बसत. प्रभूसाठी तर अशीच तन्मयता असली पाहिजे.

कृष्णकथेत, कृष्णलीलेत जी व्यक्ति गोपींप्रमाणे तन्मय होऊन राहते ती मुक्त होते. भागवत मृत्यूपूर्वीच मुक्ती देते होय. मात्र तन्मयता गोपींसारखीच असली पाहिजे. गोपी घरच्या कामकाजाच्या वेळी देखील देवाला विसरत नसत.

भक्तिमार्गांत व्यवहार आणि परमार्थ वेगवेगळे नाहीत. एकच होत.

प्रत्येक कार्यांत व्यवहाराला प्रभुमय मानणेच भक्ति होय. गोपीच ह्या भक्तिमार्गाच्या आद्य आचार्या आहेत. याच सिद्धान्ताला महाप्रभूंनी पुढे वाढविले.

सर्वच कामकाजांतून निवृत्त झाल्यावर भक्ती करणे मर्यादाभक्ती आहे.

सुबोधिनींत महाप्रभूंनी गोपींना प्रेमसंन्यासिनी म्हटले आहे. गोपींजवळ तर केवळ निःस्वार्थ प्रेम होते, त्यांचे प्रेमच तर संन्यास होता.

वस्त्रसंन्यासापेक्षा प्रेमसंन्यास उत्तम. कृष्णप्रेमात हृदय विलीन झाल्यावर संन्यास होऊ शकतो आणि तेव्हांच तो श्रेष्ठ ठरतो. सर्वच कर्मांचा न्यास– त्याग संन्यास होय. ईश्वरासाठीच जो जगतो तोच संन्यासी. गोपी ईश्वरासाठीच जगत होत्या म्हणून त्यांना प्रेमसंन्यासिनी म्हटले गेले आहे.

ज्ञान आणि योगावर भक्तीचा विजय सांगितला आहे. भक्ती भगवंताला बांधून ठेवते, वश करते, किंबहुना भक्ताधीन करते.

लोणी चोरण्याच्या लीलेचें हेच रहस्य आहे. मन लोण्यासारखे मृदु आहे. मनाची चोरीच तर लोण्याची चोरी आहे. कृष्ण इतरांचे चित्त चोरून घेतात. तरी पण ते धरले जात नाहीत. धरला जाणारा चोर तर सामान्य चोर झाला. परंतु कान्हा तर विलक्षण चोर आहे. गोपींच्या मनाचा निरोध करायचा होता. इतर कोणत्याही विषयाकडे जाण्यापासून वाचवायचे होते.

गोपी म्हणजे इंद्रिये. सगळीच इंद्रिये नेहमी ईश्वराचेच चिंतन करीत राहतील अशाच हेतूने या लीलांची रचना केली गेली आहे.

यशोदेने गोपींना म्हटले– तुम्ही जर लोणी लपवून ठेवाल तर फार चांगले होईल.

एक गोपी– माते, तू आम्हांला काय शिकवतेस? मी तशी तर मोठी आहे. पण कसे सांगू काय झाले होते ते? एकदा कान्हा रस्त्यांत भेटला. म्हणाला की, उद्या तुझ्या येथे येईन. मी सगळे लोणी आपल्या माहेरी नेऊन ठेवले. कान्हा दुसऱ्या दिवशी आला तर लोण्याचे नावनिशाण नव्हते. तो रागाने लाल होऊन गेला. पाळण्यांत निजलेल्या माझ्या मुलाला चिमटा घेऊन म्हणू लागला– तुझी आई फार कंजूष आहे. घरात काहीच ठेवत नाही.

माते, घरांत काही सापडले नाही तर हा असाही लालपिवळा होतो, रागावतो. आमच्या निजलेल्या

मुलांना चिमटे घेऊन रडवतो.

भगवंताचे आगमन झाल्यावर जर तुम्ही निजलेले दिसलात तर ते तुम्हाला रडवतील. ते कोणत्या तरी रूपांत येऊन पोचतात आणि त्यांचे स्वागत केले नाही तर रडवतात.

ईश्वर आपल्या यायच्या वेळेला झोपलेल्यांना जागे करतो.

ईश्वर कोणाच्या रूपांत येईल हे कोणी सांगू शकत नाही. तो तर बाळ, वृद्ध, ब्राह्मण, चांभार कोणाच्याही रूपांत येऊ शकतो. म्हणून घरी येणाऱ्या प्रत्येकाचा सन्मान करावा.

वेदान्तानुसार ईश्वर अरूप आहे आणि वैष्णवानुसार अनंतरूपी.

ईश्वराचे काही एकच रूप नाही. तो अनेक रूपे घेत असतो. "अनेक रूप रूपाय विष्णवे प्रभविष्णवे" तो तर आकाररहितही आहे आणि अनेक आकारांतही आहे. तो अरूपही आहे आणि अनेक रूपधारी पण आहे. तो तर कोणत्याही रूपांत येत असतो. जीव प्रमादवश निजलेला असतो, त्यामुळे त्याला समजू शकत नाही.

यशोदा– तुम्ही आपल्या मुलांना आजोळी का नाही पाठवून देत ?

दुसरी गोपी– मी लोणी आणि मुले आजोळी ठेवून आले होते. कान्ह्याला माझ्या घरांत काही सापडले नाही, तर म्हणाला, 'ज्या घरांत माझ्यासाठी काही नसते ते स्मशानासारखेच होय.'

ज्या घरांत देवासाठी काहीच नसते ते उजाड होऊन स्मशानासारखेच होत असते.

हौसमौजेत संपत्तीचा दुर्व्यय करणारा राक्षसच आहे.

जेव्हा कान्ह्याला घरात काही सापडले नाही तेव्हा तो मित्रांना म्हणाला, 'हे घर स्मशानासारखेच आहे म्हणून चूल, खोल्या, अंगण सगळे बिघडवून टाका.' असे म्हणून त्यांनी माझे सगळे घर घाणेरडे करून टाकले होते.

माते! कान्हा असा खोडसाळ आहे.

यशोदा म्हणते– तुम्ही सांगत आहात की बाळकृष्ण खोडसाळ आहे. पण तो मला सांगत असतो की तो तर काहीच करत नाही. आता तुम्ही त्याला पुराव्यासह धरून आणाल तेव्हाच मी मानीन की तो चोरी करीत असतो आणि तेव्हाच मी त्याला शिक्षा करीन.

प्रभावती नावाची एक गोपी म्हणाली– यात काय मोठी गोष्ट आहे? मीच त्याला पुराव्यासह धरून आणीन. ती गोपी काहीशी अभिमानी होती.

कान्ह्याने ठरविले की आज प्रभावतीच्या घरी जायचे. प्रभावती लपून बसली होती. हळूहळू सगळीच मुले घरात शिरली आणि "कफल्लकम्, कफल्लकम्" बोलू लागली. कान्ह्याने स्वतः शिंक्यावरून लोणी काढले, स्वतः खाल्ले, मित्रांना खाऊ घातले आणि वानरांनाही मेजवानी दिली.

उपकार केवढा का असेना, भगवंत कधीही विसरत नाहीत. रामावतारांत वानरांनी झाडाचा पाला खाऊन माझी सेवा केली होती. त्या अवतारात तर मी तपस्वी होतो. म्हणून मी त्यांना काही देऊ शकलो नाही. म्हणून या अवतारांत मी त्यांना दही-लोणी खाऊ घालीन.

पुष्कळ वेळा मनुष्य वानरांच्या इतका देखील संयम ठेवू शकत नाही. वानर राम आणि सीतेचे सेवक आहेत म्हणून ते रामफळ आणि सीताफळ कधीच खात नाहीत. मनुष्य जर वानरांइतकी सुद्धा मर्यादापालन करणार नाही तर तो त्यांच्यापेक्षाही निकृष्ट ठरेल.

सगळ्यांनीच पोटभर लोणी खाल्ले. इतक्यात हळूच प्रभावती बाहेर आली. मित्रांनी पाहिले, आणि म्हणाले, "अरे कन्हैया, पळ पळ. ती आली." पण कन्हैया म्हणाला– येऊ दे. काय करणार

आहे ती? तिने मला पुरतें ओळखलेलें नाही.

प्रभावतीने कान्ह्याला पकडले. तो तिला म्हणू लागला, "अग, सोडून दे मला; नाही तर माझी आई मला मारील. मला सोडणार नाहीस तर तुला तुझ्या सासऱ्याची शप्पथ."

प्रभावती– आज मी तुला का सोडू? पुराव्यासह धरले आहे तुला. मी तुला यशोदेकडे घेऊन जाईन.

कन्हैय्या– सोड मला.

प्रभावतीचा मुलगासुद्धा या लोणीचोर मंडळांतला सदस्य होता. त्याला वाटले, यशोदा बाळकृष्णाला मारेल. तो आपल्या आईला सांगू लागला, "आई, कन्हैयाने चोरी केलीच नाही. मीच सगळ्यांना बोलाविले होते. मला काय वाटेल ती शिक्षा कर. पण कान्ह्याला सोडून दे तू. आता मी चार महिनेपर्यंत लोणी खाणार नाही."

प्रभावतीने विचार केला की यशोदा आमचे सांगणे कधीच खरे मानत नाही. म्हणून आज मी तिला पुरावा देऊ इच्छिते. यशोदा बाळकृष्णाला रागे भरेल तर काहीच हरकत नाही. परंतु मी त्याला मारू देणार नाही. तसा तो माझा पण आहे.

अभिमानाबरोबर दुर्गुणही येत असतात.

प्रभावती समजत होती की तिच्याशिवाय बाळकृष्णाला कोणीच पकडू शकले नव्हते. म्हणून तिने बाळकृष्णाला सोडले नाही. सगळीच मुले रडू लागली. कान्हा म्हणाला, "अरे, घाबरता काय? मी मोठीच गंमत करणार आहे."

साधना केल्याने प्रभु हातात येतात पण साधनेतून श्रद्धा निघून गेली की प्रभूही निघून जातात.

प्रभावती कृष्णाला धरून चालली होती. वाटेने एक म्हातारा येत होता. त्याला पाहून प्रभावतीने डोक्यावरून, मुखावरून पदर घेतला. कान्हा म्हणाला माझा उजवा हात दुखतो आहे तेव्हा तो सोडून डावा धरशील तर चांगले होईल. आपण डाव्या बाजूस यावे. प्रभावती हात बदलू लागली तर कान्ह्याने खूण करून आपल्या मित्राला जवळ बोलाविले आणि त्याचा हात तिच्या हाती दिला.

या प्रकारे कान्हा मुक्त झाला. तो पळतच आईजवळ गेला आणि तिला सांगू लागला की एक गोपी मला मारण्यासाठी येत आहे. मी तिचे काहीच केले नाही. आईने त्याला खोलीत बसायला सांगितले.

प्रभावती तर मोठ्या उत्साहाने चोराला धरून येत होती. तिने बाहेरूनच ओरडून सांगितले, "अग यशोदा, ऐकतेस का? पहा तुझ्या कान्ह्याला आज मी माखलेल्या हाताने धरून आणले आहे. या चोराला चांगलीच शिक्षा दिली पाहिजे.

यशोदा बाहेर येऊन म्हणाली– का ग! तुला वेड लागले आहे का? माझा लाल तर घरांतच आहे. तू ह्या कोणाला धरून आणले आहेस?

ईश्वराला शोधायचे असेल तर त्याला आपल्या आंतच शोधा. त्याला जो बाहेर शोधतो तो दुःखी होतो.

इंद्रियरूपी गोपी म्हणतात की ईश्वर बाहेर आहे, परमानंद बाहेरच आहे. तर यशोदा-निष्कामबुद्धी ईश्वरानंदाला घराच्याच हृदयांत पाहत असते. इंद्रिये ईश्वरानंदाला बाहेर शोधतात, म्हणून तो मिळू शकत नाही. निष्कामबुद्धी ईश्वराला हृदयाच्या आत शोधते म्हणून तिला लवकरच प्राप्ति होते.

जो जीव आनंदाला सांसारिक विषयामध्ये शोधत राहतो त्याची दशा त्या प्रभावतीसारखी होते. सर्वजण तिची फजिती उडवितात.

यशोदा– अग, तू पहा तर तुझ्या हातात कोण आहे तो!

प्रभावतीने पाहिले तर तिच्या हातात तिचाच मुलगा होता. ती घोटाळ्यांत पडली. मी तर कन्हैयालाच धरले होते. रस्त्यांतच काही तरी गडबड झाली असणार.

प्रभावती अभिमानी आहे. घमेंड, अहंकाररूपी बुद्धीच प्रभावती आहे. अशा बुद्धीला ईश्वर केव्हाही मिळू शकत नाही. निष्कामबुद्धीच ईश्वराला मिळवू शकते. ईश्वराला सकाम नाही, निष्कामबुद्धीच धुंडू शकते.

ईश्वराची प्राप्ति झाल्यावर प्राप्तीचा अहंकार असेल तर ईश्वर हातांतून पळून जाईल. परमात्मा भेटू शकतात पण अहंकार आल्याबरोबर अदृश्यही होतात.

परमात्म्याची भेट झाल्याबरोबर साधकाच्या मनात घमेंड उत्पन्न होते. अशी घमेंड आल्यावर, अभिमान झाल्याबरोबर साधनेचीच उपेक्षा होऊ लागते. साधनेच्या उपेक्षेमुळे भगवंत असंतुष्ट होऊन परत निघून जातात. साधना करा, पण साधनेचा अभिमान केव्हाही असू नये. निष्काम झालेल्या बुद्धीमध्ये गर्व उत्पन्न होतो तेव्हा देव पळून जातात.

गोपी यशोदेला म्हणाल्या– माते, गणपतीचे व्रत कर आणि नवस कर. ते ऋद्धीसिद्धीचे स्वामी आहेत. कान्ह्याची बुद्धी सुधारतील.

यशोदेने गोपींचे म्हणणे ऐकून घेतले.

कान्हा गणपतीचे माहात्म्य वाढवू इच्छित होता. म्हणून त्याने आपल्या मित्र-मंडळींना सांगितले की आपण काही दिवस अगदी शांत राहू. लोणी चोरण्याचें आता आपण बंद ठेवू.

कान्हा घरांत बसून राहात असे. यशोदेला वाटले की, गणपतीने तिच्या मुलाची बुद्धी चांगली करून दिली आहे.

एकदा काही गोपाळांनी यशोदेला गाऱ्हाणे केले की बाळकृष्णाने माती खाल्ली आहे.

कृष्ण– आई, हे सगळे खोटे बोलत आहेत. मी माती खाल्लीच नाही.

बाळकृष्णाने माती तर नाही व्रज-रज खाल्ली आहे. व्रजरज माती नसते.

तुळस कांही सामान्य वनस्पति नाही, गंगा सामान्य नदी नाही. व्रजरज सामान्य माती नाही.

श्री वल्लभाचार्यांनी म्हटले आहे– ज्ञानमार्गानुसार कृष्ण कांहीच खात नाहीत. वैष्णव मार्गानुसार भगवंतांनी व्रज-रज खाल्ली आहे. भक्त मानतात की देव जेवणसुद्धा करतात.

यशोदा कृष्णाला म्हणाली– तुझे तोंड उघड. मी पाहते तर खरी, तू माती खाल्ली आहेस कीं नाही!

बाळकृष्णाने तोंड उघडले तर यशोदेने बाळाच्या तोंडांत सगळे ब्रह्मांड सामावलेले पाहिले.

मुखदर्शनाच्या मिषाने कान्ह्याने आईला आपले विश्वरूप दाखविले.

शुकदेव वर्णन करीत आहेत.

ईश्वराच्या स्वरूपाचे ज्ञान लीलेत बाधक आहे.

पुत्रस्नेहमयी वैष्णवी मातेच्या हृदयांत कृष्णाने योगमायेचा संचार करविला म्हणून यशोदा कान्ह्याचे खरे स्वरूप विसरून गेली आणि पुन्हा त्याला आपला मुलगा समजू लागली.

पूतनेने पुष्कळ मुलांचा वध केला होता. ती सर्व मुले पूतनेच्या स्तनांतून प्रभूच्या पोटात जाऊन पोचली.

अविद्येच्या संसर्गात आलेल्या जीवांचा उद्धार खऱ्या संतांच्या चरणांशिवाय होऊ शकत नाही.

गोकुळांत अनेक ऋषीमुनि गाईंचा अवतार घेऊन आले आहेत. त्यांच्या चरणांची रज माझ्या पोटांत गेल्यामुळे जे माझ्या पोटांत आहेत ते सर्वच जीव मुक्त होणार आहेत. अर्थात आपल्या पोटांत वसलेल्या त्या जीवांचा उद्धार करण्यासाठीच कृष्णाने माती– व्रजरज खाल्ली होती.

**११. निरोधाने समाधि साधण्याची युक्ति:**

प्रभूच्या हृदयांत राहायचे किंवा परमात्म्याला आपल्या हृदयांत ठेवायचे ही तर कृष्णलीला आहे– निरोधलीला आहे. आत्मा तसा तर निराकार आणि स्वतंत्र बंधनमुक्तच आहे, परंतु मनाकारणे आबद्ध होत असतो.

भगवान तर मृत्युपूर्वीच मुक्ती देतात. प्रभुप्रेमांत द्रवणेच तर मुक्ती आहे. प्रभुप्रेमांत संसाराला विसरणेच मुक्ती आहे. मन गेले की मुक्ती मिळालीच. मनाचा मृत्यु झाल्याने निरोध होतो आणि निरोध झाल्यावर मुक्ती मिळते. मृत्यूनंतर नाही, मृत्यूपूर्वीही मुक्ती मिळू शकते.

ज्याला मृत्यूपूर्वी मुक्ती मिळू शकत नाही त्याला मृत्यूनंतर मुक्ती मिळणे फार कठीण आहे. शरीर आणि इंद्रियांच्या उपस्थितींत ज्याला भजनानंद प्राप्त होतो त्याला शरीरत्यागानंतर परमानंदाचा अनुभव होतो.

भागवत मृत्यूनंतर मुक्ती देणारे शास्त्र नाही. ते तर जिवंतपणीच मुक्ती देत असते. मृत्यूनंतर मुक्ती मिळाली की नाही हे कोण जाणू शकेल? म्हणूनच तर महात्मा लोक जीवन्मुक्तीचे गुण गात असतात.

तसा तर देह आणि इंद्रिये यात संबंध आहेच. तेव्हा तो देह असतानाच आम्हाला मुक्ती मिळाली पाहिजे. मुक्तीचे दोन प्रकार आहेत– विदेहमुक्ती आणि कैवल्यमुक्ती.

पाण्यांत राहूनही कमळ पाण्यापासून अलिप्त राहते. ज्ञानी पुरुष सुद्धा संसारांत असतात खरे पण अलिप्त भावानेच राहतात.

जग दिसू नये या हेतूने ज्ञानी पुरुष डोळे मिटून बसून राहतात. परंतु जग इतके खटचाळ आहे कीं डोळे मिटल्यावर सुद्धा ते दिसत राहते. बाह्यसंसारापेक्षा आंतरिक संसार जास्त बाधक आहे. मनांतून त्याला पुसून टाकल्यावरच भक्ती चांगल्या रीतीने केली जाऊ शकते.

नाव तर पाण्यांतच राहायची आहे. परंतु जर पाणी नावेवर स्वार झालें तर नाव बुडून जाईल.

बाह्यसंसार मनांत न येऊ देण्यासाठी ज्ञानी जन फार सतर्क राहात असतात.

तसा संसार स्वतः बाधक नाही. परंतु त्याचे चिंतन– त्याची आसक्ति फार बाधक आहे. संसार सुखदाता आहे अशी कल्पनासुद्धा भक्तिमार्गांत बाधक आहे.

ज्ञानी पुरुष शरीराला एका आवश्यकतेच्या रूपांत स्वीकारतात. परंतु ते स्पष्टपणे जाणत असतात कीं सांसारिक सुख भ्रामक आहे. केवळ आभासित सुख आहे.

दृश्य पदार्थांतून निघून द्रष्टयांत जेव्हां दृष्टी स्थिर होते तेव्हांच आनंद मिळतो. दृश्य दुःखरूपच आहे. दृश्याच्या द्रष्टयाला साक्षी म्हणतात. दृश्य दुःखरूप आहे तर द्रष्टा मात्र आनंदस्वरूपच असतो. दृष्टीला दृश्यांतून काढून द्रष्टयांत स्थिर कराल तर आनंद मिळेल.

जगांतच राहायचे आहे आणि विषयदेखील राहतील. शरीर, मन आणि जगापासून पळून तर जाता येत नाही. परंतु आसक्ति सोडायची आहे. अज्ञानी जीव जगाला भोगदृष्टीने आणि ज्ञानी भगवत्दृष्टीने पाहतो. मायेचा अर्थ आहे लौकिक नामरूपाची आसक्ति.

भक्तीचा अर्थ आहे अलौकिक नामरूपाची आसक्ति. भक्तिमार्गांत भावना आणि श्रद्धेविना सिद्धि मिळत नाही.

आत्म्याला काय मुक्त कराल? तो तर मुक्तच आहे! प्रभुच्या हृदयांत निवास करणेच निरोध आहे. विरोध आणि वासना निरोधाला प्रतिबंधित करतात. जोपर्यंत हृदयांत विरोध आहे तोपर्यंत निरोध होऊ शकणार नाही. जीवनांतून विरोध आणि वासना निघून गेल्याबरोबर आपोआप निरोध होत असतो.

मुक्ती केव्हां मिळते? शरीराच्या मरणाने मुक्ती मिळत नाही. मनाच्या मरणाने मुक्ती मिळते. मनाचा निरोधच मुक्ती आहे.

दहाव्या स्कंधांत निरोधलीला आहे. सर्वच सांसारिक विषयांतून मन निघून जेव्हां ते ईश्वरांत मिळून जाते तेव्हा मुक्तीच प्राप्त होते.

परमात्मा आनंदस्वरूप आहे. मन अर्धचेतन आहे. मन सांसारिक विषयांशी एकरूप होऊ शकत नाही. कारण संसार जड आहे आणि मन अर्धचेतन आहे. सजातीय वस्तूच एकरूप होऊ शकतात. मन ईश्वराशिवाय इतर कोणत्याही वस्तूशी एकरूप होऊ शकत नाही; अभिन्न होऊ शकत नाही.

मनुष्य कितीही कामी असला तरी काम सुखाच्या उपभोगानंतर त्याचे मन नारीदेहापासून दूर होऊन जाते. कामेषणा दुसऱ्यांदा जागृत होऊ शकते, परंतु तत्काल तर स्त्रीशरीरापासून दूर होऊनच जाईल.

आता अशी ही उदासीनता जर नेहमीकरताच मनांत ठसून जाईल तर बेडा पारच झाला समजा. वैराग्य क्षणिक नाही, स्थायी झाले पाहिजे. विषयभोगानंतर तत्काळ उत्पन्न होणारे वैराग्य, वैराग्य नाही, त्याचा आभास मात्र होय. पुष्कळ वेळा वैराग्य उत्पन्न तर होते परंतु माया त्याला राहू देत नाही. मन संसारांतील जड पदार्थांशी नाही, तर ईश्वराशीच एकाकार होऊ शकते. कृष्णलीला मनाचा निरोध (हृदयांत प्रभूचा वास) करण्यासाठी आहे.

पूर्वजन्मीचे शरीर तर मरून गेले आहे, परंतु मन नवीन शरीर घेऊन आले आहे. जीवात्मा मनाबरोबर जात असतो. म्हणून शरीरापेक्षा मनाची चिंता अधिक केली पाहिजे.

जर एखादी सांसारिक वस्तू वाईट झाली किंवा हरवली तर दुसरी मिळेल, पण मन जर वाईट झाले तर दुसरे मन कोणत्याच बाजारांत मिळणार नाही. जीवात्मा तन सोडून जातो परंतु मन बरोबर घेऊन जातो. म्हणून मनाला नेहमी सांभाळून ठेवा.

जीवांत वास करून राहिलेला ईश्वराचा अंश त्रिगुणमयी मायेंत स्थिर होऊन मनासह पाचही इंद्रियांचे आकर्षण करतो. ईश्वराचा आश्रय घेऊन जीवात्माच या विषयांचा उपभोग घेतो. म्हणून मनुष्य मेल्यानंतर सुद्धा मन बरोबरच राहते.

शरीर तर मरते पण मन मरत नाही. मनमोहनाशी एकरूप झाले तरच मन मरू शकते. अर्थात मुक्ती मिळाली म्हणजेच मन मरते.

विषयांकडे धावणारे मन मरत नाही.

मनाने जर ईश्वराचे चिंतन-मनन-ध्यान केलें तर त्याला ईश्वर मिळू शकतो.

कोणाचा गुरु होण्याची केव्हांही इच्छा ठेवू नका. प्रथम आपल्या मनाचेच गुरु व्हा.

हे मना! ज्या भक्तिमार्गाने सज्जन लोक जातात त्याचेच तू अनुसरण कर. तेव्हांच तुला सहजपणें श्रीहरि भेटतील. संसारातील निंद्य कर्मांचा त्याग करावा. संसारातील वंदनीय कामे एकाग्रपणे करावी.

अरे मना! तू पाप का करतोस? तू सज्जन असून दुर्जनासारखे काम कां करतोस? जर कोणी

सांगितले की या लाडूंत विष आहे तर तो तुम्ही खाल का? तर याप्रमाणेच मनाला समजवा की हे सर्व विषय विषारी आहेत; त्याचा केव्हांही उपभोग करू नका.

संसारांतील विषयांकडे नेहमी साशंक दृष्टीने पहा. श्रीमद्शंकराचार्यांनी म्हटले आहे–

गुरू बनण्यापेक्षा कोणाचे तरी शिष्य होणे फार चांगले. जर तुम्ही कोणा व्यक्तीचे गुरु असाल आणि तो शिष्य कांही पाप करील तर त्यासाठी तुम्हीच जबाबदार समजले जाल.

आत्मा मनाचा गुरु आहे, स्वामी आहे. तो मुक्त आहे. मुक्ती मनाला मिळत असते. आत्मा तर मुक्त आहे, स्वतंत्र आहे.

झोप आणि समाधीत अंतर आहे. तरी पण पुष्कळसे साम्यही आहे. समाधीत मन सगळ्याच विषयांतून निवृत्त होऊन जाते आणि चित्तवृत्तीचा निरोध होतो. निद्रेत सुद्धा मन संसार विसरून जाते. संसाराचा विसर झाल्यावरच निद्रा येते. झोपेच्या वेळी सुद्धा मन सांसारिक विषयांच्या पलीकडे जाते. परंतु निद्रावस्थेत मन पूर्णतः निर्विषय होऊ शकत नाही. निद्रेचें सुख तामसी आहे. त्यांत अहंभाव शेष राहतो. अहम्भावाचा लय होत नाही. समाधीच्या अवस्थेत मन पूर्णतः निर्विषय होते. अहम्भाव सुद्धा लुप्त होतो. श्रीमद्शंकराचार्य शिवमानस पूजास्तोत्रांत म्हणतात–

"हे शंभु! तू माझा आत्मा आहेस. बुद्धी पार्वती आहे. प्राण तुझे गण. शरीर तुझे मंदिर. सगळ्या विषयोपभोगाची रचना ही तुझी पूजा होय. निद्रा–समाधि आणि माझे हिंडणे-फिरणे तुझी प्रदक्षिणा आहे. माझे सगळे शब्दही तुझी स्तोत्रे होत. याप्रकारे माझी सर्व क्रियाकर्मे तुझी आराधना होवोत."

योगीजन आत्मस्वरूपांत मनाचा लय करतात. मनाला जर कांही विषय दिले नाहीत तर ते आत्मस्वरूपांत जाऊन मिळेल. आणि तसा लयच मुक्ती होय.

विषयांच्या चिंतनाने मन जिवंत राहते आणि त्यांच्या त्यागाने ते मरते. सांसारिक विषयांपासून दूर झाल्याने मन शांत होते. दिव्यांत जेव्हां तेल शिल्लक राहात नाही तेव्हा तो विझून जातो. याचप्रमाणे मनांतून सांसारिक विषयांचे निष्कासन झाल्यावर ते शांत होते. मनाला नेहमी कांही तरी आधाराची आवश्यकता असते. तेव्हा त्याला प्रतिकूल विषयांपासून निराळे करून अनुकूल विषयांकडे वळविले पाहिजे.

निद्रेच्या वेळीं देखील समाधीसारखाच आनंद मिळतो. परंतु तो आनंद तामस आहे. निद्रावस्थेत सर्व दृश्यजात नाहीसे झाल्यासारखे होते. परंतु अहंकार यथावत राहतो, तर समाधि अवस्थेत नामरूप आणि अहंभावही निःशेष होतात.

समाधीचे दोन प्रकार आहेत– जड आणि चेतन.

योगी मनाला बळेबळेच वश करून प्राण ब्रह्मरंध्रांत स्थापन करतो. ही झाली जडसमाधी. परंतु बलात्काराऐवजी मनाला समजावून विषयांतून काढून घेणे अधिक श्रेयस्कर आहे आणि हीच तर चेतनसमाधि.

विश्वामित्रांनी ६०,००० वर्षेपर्यंत तप केले तरी पण ते मेनकेचे स्वरूप पाहून लोलुप होऊन गेले. याचे कारण हेच की त्यांची समाधि जड होती.

समाधि तर साहजिक असली पाहिजे.

साहजिक समाधि श्रीकृष्णलीलेतच आहे. कृष्णकथा आणि बासरी ऐकत असताना, डोळे उघडे का असेनात, समाधि लागते. गोपींनी डोळे मिटून, नाक धरून कधीच समाधि लावण्याचा प्रयत्न केला नाही.

गोपींची समाधि स्वाभाविक, साहजिक समाधि होती.

हे भोगी शरीर योगाभ्यास करू शकत नाही. भोगी जर योगी व्हायचा प्रयत्न करील तर तो रोगी होईल, योगी काही व्हायचा नाही.

योगाचे सर्वप्रथम साधन ब्रह्मचर्य आहे. ब्रह्मचर्य पालन करण्यावाचून योगसिद्धी प्राप्त करणारा अधोगतीच्या गर्तेत पडत असतो.

कृष्णकथा अशीच आहे की ती जगाचा अनायासेच विसर पाडते. जगांत वास्तव्य करूनही जगाला विसरायचे आहे.

हा भागवत ग्रंथ इतका दिव्य आहे की सातच दिवसांत मुक्ती देववितो. परीक्षित राजा या ग्रंथाचे सातच दिवसांत श्रवण करून जगाला विसरून कृष्णांत तन्मय झाला होता.

मोठमोठ्या ज्ञानी महात्म्यांना सुद्धा ही शंका होती की परीक्षित राजा फक्त सातच दिवसांत मुक्ती कशी मिळवील?

केवळ सातच दिवसांत राजाचे ज्ञान, भक्ती आणि वैराग्याची अभिवृद्धी करण्याच्या हेतूनेच ह्या कृष्णकथेची योजना केली होती. कारण कृष्णकथेत तन्मयता झाल्यावरच तर त्यांना मुक्ती मिळणार होती.

या जगाला विसरण्यासाठीच तर योगीजन डोळे मिटून प्राणायाम करीत असतात. परंतु या जगाला विसरून जाणे इतके सोपे नाही. योग्याला जग विसरणे सोपे नाही तर गोपींना जगाचे स्मरण करणे सोपे नाही, कृष्णकथेत डोळे मिटण्याची, नाक धरण्याची किंवा प्राणायाम करण्याची आवश्यकता नाही. ही कथा तर जगाचा अनायासेच विसर पाडते.

मनाचा निरोध तेव्हाच होऊ शकतो की जेव्हा कोणाचा विरोध नसतो. मनांत विरोध आणि वासना ठेवू नका. विरोध आणि वासना निरोधांत बाधक आहेत. जगांतील कोणत्याही जीवाशी विरोध ठेवू नका. जगातील भोग्य पदार्थांविषयी वासना ठेवू नका. निरोध झाल्यावर अनायासेच मुक्ती मिळते.

श्रीकृष्णलीलेत अनायासेच मनाचा निरोध होतो. जगाची विस्मृति आणि भगवंताची अखंड स्मृति म्हणजेच तर निरोध होय.

पूतनारूपी वासना डोळ्यांत येऊन बसते. म्हणून डोळ्यांना कृष्णाच्या रूपमाधुरीत स्थिर करा आणि कानांना कृष्णकथेशी जोडून द्या.

जर हा संसार सुंदर आहे तर या सुंदर संसाराचा निर्माता कितीतरी पटीने सुंदर असणार! असा विचार कधीतरी तुमच्या मनांत आला आहे काय?

मनुष्य सौंदर्यदर्शनासाठी काश्मीरसारख्या दूरदूरच्या ठिकाणी फिरत असतो. काहो, तिथे कां जाता? खरे सौंदर्य तर अंतर्यामीच आहे; ईश्वरांतच आहे. ते पाहण्याचा प्रयत्न करा.

परमात्म्याच्या कोणत्याही स्वरूपांत तन्मय झाल्यावर मुक्ती मिळू शकते. भागवताचें म्हणणें असें नाही कीं फक्त श्रीकृष्णस्वरूपांतच लीन व्हा. तुमची इच्छा असेल त्या रूपांत तन्मय व्हा. ईश्वराच्या ज्या रूपावर तुमची श्रद्धा असेल त्यालाच आपलेसे करा. श्री परमात्म्याचे कोणतेही रूप मुक्तिदाते आहे.

श्रीशंकराचार्य सुद्धा म्हणतात – भगवंताच्या कोणत्याही रूपात श्रद्धापूर्वक तन्मय व्हा. त्याची अनन्यरूपाने भक्ती करा. याप्रकारे इतर रूपांवर अंशात्मक प्रेम ठेवल्याने भक्तीत रागद्वेष येणार नाहीत आणि तीच अनन्यभक्ती होईल.

स्त्री आपल्या पतीवर अनन्य प्रेम ठेवते, तरी पण आपल्या इतर सर्व कुटुंबीय जनाची सुद्धा सेवा प्रेमाने करते. अर्थात स्त्रीचे पतिप्रेम अनन्य आहे, आणि आपल्या इतर नातेवाईकांशी अंशात्मक प्रेम ठेवते. अशा अंशात्मक प्रेमाने पतिप्रेमांत कांहीही न्यूनता होत नाही.

आम्हाला आपल्या मनपसंत प्रभुरूपांत त्या स्त्रीप्रमाणेच अनन्यरूपाने भक्ती केली पाहिजे, आणि त्याबरोबरच ईश्वराच्या इतर रूपांचा सुद्धा आदर करायचा आहे.

श्रीकृष्ण अनायासे मुक्तिदाते आहेत. मुक्ती आत्म्याला नाही, मनाला मिळते. आत्मा तर नित्यमुक्त आहे. बंधनमुक्त तर मनाला करायचे आहे. मनाला मुक्ती मिळाल्यानंतर आत्मा मुक्तीचा अनुभव घेत असतो.

आत्म्याला जर बंधनच नाही, तर मुक्तीचा प्रश्नच कसा उपस्थित होतो? विषयांचे पुनःपुन्हा चिंतन केल्याने मन त्यांत अडकून पडते.

आत्मा तर परमात्म्याचाच अंश आहे, म्हणून त्याचे बंधन ही एक कल्पनामात्र आहे.

कोणी आत्म्याला परमात्म्याचा अंश मानतात, तर कोणी या दोघांना एकच मानतात. कोणी आत्मा आणि परमात्मा यात अंश-अंशीचा भाव मानतात.

जीव ईश्वराचा अंश आहे. भगवंताने गीतेंत म्हटले आहे 'ममैवांशो जीवलोके'.

या सूत्राची व्याख्या करताना श्रीमद् शंकराचार्यांनी म्हटले आहे– 'अंश इव जीव।' आत्मा ईश्वराच्या अंशासारखा आहे, अंश नाही. जीव ईश्वराचा अंश होऊ शकत नाही. ईश्वराचे तुकडे होऊ शकत नाहीत. हो! परमात्मा आणि आत्मा एकच आहेत. शंकराचार्यांनी देखील म्हटले आहे– ईश्वरांतून कोणताही अंश वेगळा होऊ शकत नाही.

घटांत सामावलेले आकाश आणि बाहेरचे व्यापक आकाश एकच तर आहेत. परंतु घटाच्या उपाधीमुळे अंश-अंशी भावाचा आभास होतो. याचप्रमाणे परमात्मा आणि जीव एक असूनसुद्धा वेगवेगळे दिसतात.

जर गुलाबाच्या फुलाची एक पाकळी आम्ही कापून घेतली तर ते फूल अखंड राहणार नाही. फुलाचे स्वरूप भंग होईल. परंतु ईश्वर नित्य असल्याकारणाने तो तर अखंडच राहील.

उपासनेसाठी अंशी आणि अंशाचा भेद केला आहे. परंतु तत्त्वतः दोन्ही एकच आहेत. व्यवहारांत अंश-अंशी निरनिराळे असू शकतात, तत्त्वतः नाही.

सागर बिंदूंनी बनला आहे, सागराने बिंदू नाही. बिंदू सागर नाही.

जीव ईश्वररूप आहे.

रामानुजाचार्य इत्यादी संतांच्या मतानुसार परमात्मा अंशी आहे आणि आत्मा अंश.

कांही इतर आचार्यांप्रमाणे जीव मुक्त अवस्थेत अंशी आहे आणि आबद्ध अवस्थेत अंश. अंश-अंशीत भेद मानून देखील दोघांनाही एकच मानतात.

वल्लभाचार्य इत्यादी आचार्यांचे म्हणणे आहे– जीव अंशासारखा नाही, अंशच आहे आणि ईश्वर अंशी. ईश्वर सागर आहे आणि जीव जल-बिंदू. सिंधूच्या विशाल जलराशींतून काही बिंदू काढून घेतल्यावर सुद्धा त्याच्या स्वरूपाचा कांही भंग होत नाही. याचप्रमाणे जीव निराळा होऊन जाण्याने ईश्वराच्या स्वरूपांत कांही विकृति येत नाही.

भक्त प्रथम द्वैताचा नाश करून मग अद्वैताची साधना करतो; आणि नंतर ईश्वराची साधना करण्यासाठी काल्पनिक द्वैतभाव ठेवतो.

हे दोन्ही सिद्धान्त खरे म्हटले जाऊ शकतात. साधकाने या सिद्धान्तांच्या खंडन-मंडनाचे भानगडीत पडू नये.

मनाला वाटेल ते मानून पुढे चालत जा.

जर जीव ईश्वराचा अंश असेल तर माया त्याला कशी बाधू शकते?

जोपर्यंत आपण स्वप्नांतून जागे होत नाही तोपर्यंत ते खरेच असते. जागे झाल्यावर स्वप्न खोटे ठरत असते. याचप्रमाणे जोपर्यंत आम्ही मायेने आवृत्त आहोत तोपर्यंत माया सत्य आहे आणि माया छिन्नभिन्न झाल्यावर ती असत्य सिद्ध होते.

माया जीवाला भ्रमवू शकते, रडवू शकत नाही. जीवात्म्याला कोणतेच बंधन नसते. तो तर मुक्तच आहे. मनालाच बंधन आहे. अज्ञानामुळे आत्मा समजू लागतो की तो पण मनाप्रमाणेच बांधला गेला आहे. अज्ञानामुळे जीव मानून घेतो की त्याला कोणीतरी बांधून ठेवले आहे.

लोक म्हणतात, 'माझे मन वाईट झाले, माझे मन फसले' कोणी असें म्हणत नाही की, 'मी वाईट झालो आहे. माझा आत्मा भ्रष्ट झाला आहे!'

आत्मा तर मनाचा द्रष्टा आहे– साक्षी आहे. मनाला कांही स्वतंत्र सत्ता नाही. आत्म्याच्या आदेशाप्रमाणे काम करावे लागते. मन नपुंसक आहे. ते विषयांत अडकून सुखी-दुःखी होत असते. परंतु आत्मा आरोप आपल्यावरच करीत असतो.

तुलसीदासांनी एक दृष्टान्त दिला आहे. वानरांना धरण्यासाठी शिकाऱ्याने एक युक्ती केली. वनांत ज्या झाडावर वानरे असतील त्या झाडाखाली एक लहान तोंडाच्या मडक्यात चणे भरून ठेवले. वानर आपल्या दोन्ही हातांनी चणे काढायचा प्रयत्न करायचे आणि मुठीत चणे भरलेले असल्याकारणाने हात मडक्यांतून बाहेर येत नसे. ते समजत, एखाद्या भुताने त्यांचे हात मडक्यांत धरून ठेवले आहेत. वस्तुतः कोणी भुताने तर त्यांचे हात धरलेलेच नव्हते! जर मुठी उघडून टाकल्या असत्या तर हात बाहेर येऊ शकले असते.

संसार हा सुद्धा तसलेच एक मडके आहे. सांसारिक विषय चणे आहेत आणि मन आहे वानर. मन अहंकारामुळे विषयांना आपल्या मुठीत धरून ठेवीत असते, पण मानत असते की कोणी तरी बांधून ठेवले आहे. मनाने ममता-अहंतेच्या मुठीत विषय धरून ठेवले आहेत आणि स्वतःहूनच सोडीत नाही!

जीवाचे बंधन वानरांच्याच बंधनासारखे आहे. या दोघांचेही बंधन अज्ञानमूलक आहे. अज्ञानाचा नाश झाल्यावर बंधन राहात नाही. अज्ञानाची उपाधी दूर झाल्याबरोबर परमात्मा आणि आत्मा एक होतात. मायेने सांसारिक मडक्यांत विषयरूपी चणे भरून ठेवले आहेत. समजूनउमजून जर या विषयरूपी चण्यांना टाकून दिले तर मग मुक्तीच आहे.

आपल्या मुलाच्या घरी सुद्धा पुत्र जन्माला आला तरीही म्हातारा घर सोडून वृंदावन किंवा काशीवास करू इच्छित नाही. पहिले तर तो म्हणत होता की माझ्या मुलाचे लग्न झाल्यावर मी गृहत्याग करीन. काशी वृंदावनात जाऊन राहीन. आता म्हणतो की माझा मुलगा मला जाऊ देत नाही. इकडे म्हाताऱ्याची मुले विचार करतात की जर हा म्हातारा वृंदावनाला निघून गेला तर त्याच्या पेन्शनच्या रकमेला मुकावे लागेल, कारण की तो ती तेथेच मागवून घेईल. तिथे ती सगळी साधु-संतांना वाटून टाकील. जर इथे घरांतच तो राहिला तर ती रक्कम घरांतच खर्च होत राहील, बाजारांतून भाजीपाला आणील, आमच्या मुलांची देखभाल करील आणि जर आम्ही रात्री सिनेमाला गेलो तर घरही सांभाळील.

याप्रमाणे म्हातारा आणि त्याची मुले एकमेकांला सोडत नाहीत. दोघांच्याही आपापल्या वासना आहेत, आपापला स्वार्थ आहे.

विषय सोडून जर मन ईश्वराचे चिंतन करू लागेल तर मुक्ती मिळतेच. देहाध्यास सुटला आणि वृत्ति ब्रह्माकार झाली म्हणजे मुक्तीच आहे.

विषयांचे चिंतन करणारे मनच अशुद्ध आहे. विषयांचे चिंतन त्यागणारे मन शुद्ध आहे. अनादि कालापासून विषयांचे चिंतन करीत राहण्याची मनाला सवय झालेली आहे. जर हेच मन कृष्णकथेचे चिंतन, श्रवण, मनन करू लागेल तर विषयांचे चिंतन करण्याची सवय सुटू शकेल.

इंद्रियांचे स्वामी श्रीकृष्ण आहेत. डोळ्यांचा श्रीकृष्णाशी संबंध जोडा. सर्वत्र आणि सगळीकडे ईश्वराला पहा. इंद्रियरूपी गोपीचे आत्म्याशी मिलन घडवून आणायचे आहे. पाच इंद्रियांचे विषय सुद्धा पाच आहेत. जर इंद्रिये आपापल्या विषयांपासून दूर होतील तर आत्म्याशी त्यांचे मिलन होईल. इंद्रियरूपी गोपींचा प्रभूशी विवाह करून द्या.

गोकुळांतील लीलेचा हेतु गोपींना जिवंतपणीच मुक्ती देण्याचा आहे. श्रीकृष्णांनी गोपींना मुक्त करण्यासाठीच गोकुळलीला केली होती. गोपींना ते जिवंतपणीच मुक्त करू इच्छित होते. गोपी भलेही आपापल्या घरी राहात, पण त्यांचे मन मात्र भगवंतांतच रमायचे.

कोणत्याही प्रकारची साधना न करताच गोपींच्या मनाचा श्रीकृष्णांत निरोध झाला होता. गोपींनी भक्तिमार्गाचे आचरण केले होते.

महाप्रभू म्हणतात — मला नवे काहीच सांगायचे नाही. मी तर गोपींचाच मार्ग दाखवीत आहे.

लौकिक रूपांकडे जितकी आसक्ति आहे तितकी आसक्ति जर भगवंताकडे झाली तर संसाराचे बंधन सुटून जाईल.

श्रीकृष्णाचे सौंदर्यच असे आहे कीं त्याला पाहिल्यानंतर जगाचे सौंदर्य चांगले वाटतच नाही. श्रीकृष्ण अतिसुंदर आहे. जग सुंदर आहे असे समजल्याने कामदृष्टी उत्पन्न होते.

श्रीकृष्णकथेत अनायासेच तन्मयता होत असते. परमात्मा आमच्या सर्वच इंद्रियांना विषयांपासून दूर करून आपल्याकडे आकर्षित करून घेतात. ज्याचे मन मधुर आहे त्याच्याच घरचे लोणी कान्हा ग्रहण करीत असतो.

भगवंताला नेहमी अशी प्रार्थना करीत रहा की 'नाथ, माझ्या मनाला जड पदार्थांपासून दूर करून आपल्याकडे आकर्षित करा.'

जेव्हा मन ईश्वरात स्थिर होते तेव्हाच त्याला शांति मिळते.

वेदान्ती मनाला अर्धचेतन आणि अर्धजड मानतात. संकल्प केल्याने मन हजारो मैल दूर जाऊन येईल. मनाचा जेव्हा केव्हा लय होईल तो ईश्वरांतच होईल. जड पदार्थांत नव्हे.

वस्तु सजातीय वस्तूंतच मिळूनमिसळून जाऊ शकते. दुधांत खडीसाखर विरघळते — दगड नाही.

संसारातील सर्वच पदार्थ नाशवंत आहेत. जो क्षणाक्षणांत सरतो आहे (क्षय होतो आहे) तोच संसार होय. मन ईश्वराशीच एकरूप होईल, इतर कोणत्याही पदार्थाशी नाही.

हे नाथ! माझे मन नेहमी तुमच्याकडे लागलेले असो!

मनाचे ईश्वरापासून दूर होणे हेच बंधन. ईश्वरचरणी मनाचे राहणे म्हणजेच मुक्ती. मन ईश्वरापासून दूर गेले तर वाईट होईल. भगवंताच्या लीलेचे हेच तात्पर्य आहे.

आपल्या मनात श्रीकृष्णाला ठसवून गोपी घरची कामे — घरचा कारभार करीत असत.

मनाला मुक्त करायचे आहे. त्याचाच निरोध करायचा आहे. ईश्वराशी त्यालाच एकरूप करायचे आहे. निवृत्तीच्या वेळी जर कोणत्याही वस्तूचा विचार मनांत आला तर समजा की मन त्यातच अडकले आहे. निवृत्तीच्या वेळी तर गोपी श्रीकृष्णलीलेचे श्रवण, कीर्तन, ध्यान करीत असत. संकटाच्या वेळी जीव विश्वासघात करतो. परंतु भगवंत धावतच येतात.

सगळ्याच विषयांना सोडून मन ईश्वरांत रमले तर मुक्ती आहे. मनाने अनायासेच प्रभुस्मरण व्हावे याकरिता ही निरोधलीला आहे.

दशमस्कंधाची कृष्णलीला जगाचे विस्मरण आणि प्रभूचे अखंड स्मरण करविते.

गोपींनी सगळ्या जगाला विसरून केवळ कृष्णाचेच स्मरण करीत राहावे या हेतूकरताच ही कृष्णलीला आहे.

कृष्णलीलेत मनाला लावून द्या म्हणजे जगाला विसराल. शरीर कुठे का असेना, मनाला गोकुळ वृंदावनांत ठेवा.

जो मरून जगतो आणि जिवंत असतानाच मरतो तोच खरा शूर होय. जो मरून जगतो त्याला मुक्ती मिळते. मृत्यूचा मृत्यू म्हणजेच तर मुक्ती!

गोपी घरचे काम करीत असताना सुद्धा कृष्णांत अशा लीन होऊन जात की न करण्यासारखे देखील काम करून ठेवीत. चुलीत लाकडाबरोबर लाटणेही जाळून टाकीत!

काळाने धक्के मारून काढावे आणि आम्ही रडत रडत संसार सोडावा यापेक्षा वेळीच सावध होऊन समजूनउमजून जंजाळांतून मुक्त होणे श्रेष्ठ आहे.

बुद्धी परमात्म्याचे आकलन करू शकत नाही.

परमात्मा वेदाध्ययनानेही मिळत नाही, किंवा शास्त्रश्रवणाने आणि बुद्धिचातुर्यानेही मिळत नाही. आत्मा ज्या पुरुषावर कृपा करतो त्यालाच त्याची प्राप्ति होते. अथवा जो आत्म्यालाच प्राप्त करू इच्छितो त्यालाच मिळतो. परमात्मा ज्याला आपले मानून आपलेसे करतात त्यालाच ते भेटतात (मिळतात).

आता पुढे दामोदरलीलेची गोष्ट येईल.

### १२. दामोदरलीला, प्रस्तावना व रहस्य :

परमात्मा श्रीकृष्ण परमप्रेमाचे स्वरूप आहे. सामान्य प्रेम आणि परमप्रेम यात अंतर आहे. पुत्र, पत्नी, माता, पिता इत्यादींविषयी जे प्रेम असते ते सामान्य प्रेम असते. जगांतील सर्वच पदार्थ आणि जीवांविषयी जे निःस्वार्थ प्रेम असते ते परमप्रेम होय.

जीव फारच वाईट आहे. तो मनाने, डोळ्याने नेहमी पाप करीत राहतो, तरी पण ईश्वर त्याच्यावर प्रेम करतो, त्याच्यावर प्रेमाचा वर्षाव करतो आणि त्याच्यापासून प्रेमाची अपेक्षा करतो. ईश्वर प्रेमानेच वश होऊ शकतो. तो पैशाने वश होऊ शकत नाही. कारण तो स्वतःच लक्ष्मीपति आहे.

जेव्हां शारीरिक बळ, द्रव्यबळ, ज्ञानबळ इत्यादी सर्व हरतात तेव्हा प्रेमबळच जिंकते. प्रेमबळ सर्वश्रेष्ठ आहे. प्रेमबळ परमात्म्याला वश करण्याचे साधन आहे. कांही लोक विचारतात, ' अहो, परमात्म्याशी कसे प्रेम करता येऊ शकते? घरचे लोक आम्हाला सुखसोई देतात म्हणून आम्ही त्यांच्यावर प्रेम करतो. परंतु खात्री बाळगा की परमात्म्याच्या कृपेनेच आपण सुखी आहोत. त्याच्या नावाचे पुनःपुन्हा स्मरण कराल तर त्याच्यावर प्रेम जडेल.

जर भगवंताच्या इच्छेहून तुमची इच्छा निराळी असेल तर प्रभूंशी तुमचे प्रेम होऊ शकणार

नाही. आपल्या इच्छेचा त्याग करा आणि परमेश्वराच्या इच्छेला आपली इच्छा माना. वैष्णव आपल्या इच्छेला भगवंताच्या इच्छेशी एकरूप करून त्यात लीन होत असतात. महात्मा, प्रभूला प्रेमाने जिंकतात. जीव पूर्णपणे प्रेम करू लागेल तर भगवंत वश होतात. अशा प्रेमकथेचेच या दामोदरलीलेत वर्णन आहे.

भागवतांत जेथे जेथे 'एकदा' शब्दाचा प्रयोग केला गेला आहे, त्या त्या वेळी कोणता ना कोणता विशिष्ट प्रसंग आहे. नवव्या अध्यायाच्या आरंभीसुद्धा 'एकदा' शब्द आला होता.

परीक्षित राजा म्हणतो कीं ही कृष्णकथा ऐकून मनाची तृप्ती होत नाही. अधिक विस्ताराने कथा सांगावी अशी तो प्रार्थना करीत आहे.

शुकदेव सांगतात – राजा! आता पुढे ऐक.

गोपींनी कृष्णाचे नाव लोणीचोर ठेवले तर ही गोष्ट यशोदेला टोचू लागली. ती आपल्या बाळकृष्णाला आग्रहाने सांगू लागली कीं बाहेरचे नाही, घरचेंच लोणी खाणे चांगले असते. कन्हैया म्हणू लागला, मी जर घरचेच लोणी खाईन तर घरांत कमी पडेल, म्हणून मी बाहेरचेच लोणी मिळवून खाऊ इच्छितो.

अहो! स्वाद गोपींच्या लोण्यांत नव्हता, प्रेमांत होता. गोडपणा प्रेमांत असतो, वस्तूंत नाही.

यशोदेला वाटले, घरचे काम-काज नोकर पाहतात, यासाठीच कदाचित बाळकृष्णाला घरचे लोणी पसंत नाही, आणि लोण्याची चोरी करीत फिरतो. आज मी स्वतःच दह्याचे मंथन करून लोणी काढीन आणि त्याला खाऊ घालून तृप्त करीन.

रामायणांत सांगितले आहे की दशरथ राजा चक्रवर्ती सम्राट होता, आणि त्याला नोकराचाकरांची कांही कमरतरता नव्हती. तरीही कौसल्याराणी आपल्या हाताने स्वयंपाक करीत असे.

स्वयंपाक देवासाठी असतो. पाणी बिघडले तर वाणी बिघडेल. वाणी बिघडल्यावर वीर्य-जीवन वाईट होईल. अन्न मन तयार करते. तुम्हाला ज्याच्या चारित्र्यावर पूर्ण विश्वास नसेल त्याला आपल्या स्वयंपाकघरांत येऊ देऊ नका यदाकदाचित तो आला तरी अन्नपाणी दूषित होऊ देऊ नका.

एक दिवस सगळीच गडीमाणसे घरच्या इतर कामांत गुंतली होती. यशोदेने विचार केला कीं, आज स्वतः मीच दही मंथून लोणी काढीन आणि माझ्या बाळकृष्णाला खाऊ घालीन. माझा बाळकृष्ण मग कधीच दुसऱ्यांच्या घरचे लोणी खाणार नाही.

सकाळीं स्नानादि उरकून, पिवळे वस्त्र नेसून यशोदा दही घुसळण्याच्या कामाला लागली. यशोदा कान्ह्यासाठी हे करीत होती. म्हणून हे काम भावभक्तीने होत होते.

आपल्या प्रत्येक व्यवहाराला भक्तिमय करायचे आहे. घरांत झाडलोट करणे सुद्धा भक्ती आहे. कारण आमचे घर सुद्धा देवाचेच घर आहे. जर घरांत कोठे केरकचरा असेल तर देव प्रसन्न होणार नाही. जेवण शिजविताना सुद्धा विचार करावा की देव जेवणार आहेत. अन्न शिजविणे सुद्धा भक्ती आहे.

पुष्कळ वेळा माता-भगिनी म्हणतात, 'आमचे कुटुंब फार मोठे आहे म्हणून आमचा सगळा वेळ स्वयंपाकघरांतच जातो. प्रभुसेवेसाठी वेळच राहात नाही.' अहो, मोठे कुटुंब तर चांगल्या भाग्यवंतालाच मिळते. घरच्या सर्वच माणसांना भगवंताचे रूप मानून त्यांची सेवा करीत रहा.

संसार डेरा आहे आणि सांसारिक विषय दही! विषय आरंभी मधुर असतात, शेवटी कडू. सांसारिक विषयांचे विवेकरूपी रवीने मंथन करणाऱ्याला भक्तिरूपी लोणी मिळते. असे प्रेमरूप-भक्तिरूप लोणी परमात्म्याला अर्पण करा. परमात्मा प्रेमाशिवाय आणखी कांहीच मागत नाही.

यशोदामाता पुष्टिभक्तीचे स्वरूप आहे. तिचे दर्शन झाले तर कृष्णाचेही दर्शन होईल. यशोदेचे दर्शन म्हणजे भक्तीची आराधना. यशोदा शुद्ध भक्तीचे स्वरूप आहे. आणि अशी शुद्ध भक्तीच प्रभूला बांधू शकते.

दधिमंथनाच्या वेळची यशोदामातेची शोभा कशी होती? शुकदेव वर्णन न करता, मातेच्या त्या शोभायमान स्वरूपाचे दर्शन घडवीत आहेत–

सुंदर भृकुटी असलेली यशोदा दही घुसळत होती. रेशमी घागरा नेसलेली होती. सुताच्या दोरीने त्याला बांधून ठेवले होते. पुत्रस्नेहामुळे तिच्या स्तनांतून दुधाच्या धारा वाहात होत्या. तिचे सर्वच शरीर डोलत होते. दोरी ओढल्यामुळे हात थकलेले होते... हातांत घातलेल्या बांगड्या आणि कानांतली कुंडले दोलायमान होत होती. तोंडावर घामाचे थेंब चमकत होते आणि केसांत घातलेल्या चमेलीच्या फुलांच्या वेणींतून पाकळ्या झडत होत्या.

आज यशोदामातेच्या ओठावर, डोळ्यांत, मनांत, हृदयांत कान्ह्याशिवाय कांहीच नव्हते.

श्रीकृष्णांच्या सेवेच्या वेळीं मुखांतून त्यांचें नामोच्चारण होत राहावे, मनाने त्यांचें स्मरण होत असावे आणि सेवेच्या श्रमाच्या घामानें सर्व शरीरावरील वस्त्रें भिजून गेलेली असावी.

ही तर भक्तीची गोष्ट आहे. धनसंपत्तीसाठी घाम गाळणारे पुष्कळ मिळतील. परंतु प्रभुसेवेसाठी घाम गाळणारे किती असतील? देवाच्या सेवेंत घाम वाहू द्या. त्याची सेवा स्वतः करा. आजकाल तर लोक रुपयापैशांसाठी आपली कंबर मोडत असतात, परंतु देवाचें गंध उगाळण्यासाठीमात्र पगारी नोकर ठेवीत असतात.

शरीराद्वारें दधिमंथनरूप सेवाकर्म होत आहे. हृदयांत कृष्णस्मरणाची सरिता वाहात आहे, वाणी बालचरित्र लीलागीत गात आहे. भक्ति तन, मन आणि वचनाने आपल्या लाडक्या बाळाच्या सेवेंत मग्न आहे.

रेशमी वस्त्र पवित्रतेचें प्रतीक आहे. त्याची दोरी कसून बांधलेली आहे. अर्थात आळस, प्रमाद इत्यादींचा अंशही नाही.

तसें तर वस्त्र वासनेचे प्रतीक आहे. सुती वस्त्रापेक्षा रेशमी वस्त्र जास्त मऊ आणि बारीक असते. म्हणून हे रेशमी वस्त्र म्हणजे सूक्ष्म वासना. शरीराची उत्पत्ती आणि आधार रजोगुण आहे. सूक्ष्म वासना नसेल तर शरीरही राहणार नाही. वासना निःशेष झाल्यावर जीव ईश्वराशी एकरूप होऊन जातो.

सामान्य व्यक्तीच्या तुलनेंत वैष्णवाची वासना दिव्य असते. मन पूर्णपणे निर्वासनामय झाल्यावर ईश्वराला जाऊन मिळते. स्वतःच सुख भोगण्याची इच्छा बाधक आहे. इतरांना सुखी करण्याची इच्छा बाधक नाही. दुसऱ्याची सेवा करण्याची इच्छा सूक्ष्म वासना आहे.

भक्तिमार्ग अवलंबिल्यावर सुखोपभोगाची इच्छा करू नका. इतरांना सुखी करायची इच्छा करा. सुखाचा स्वतः उपभोग करणारा इंद्रियांचा दासच असेल.

भगवत्सेवेंत शरीर झिजवा. शरीरांतून घाम निघेपर्यंत देवाची सेवा करा. देवाच्या सेवेंत न येणारे शरीर व्यर्थ आहे. तुलसीदलाशिवाय देवाची सेवा होऊ शकत नाही.

हें शरीर श्रीकृष्णाचें आहे; श्रीकृष्णासाठी आहे. हें शरीर धर्मक्षेत्र आहे, अर्थात विष्णुक्षेत्ररूपी हा देह सुखोपभोगासाठी नाही.

यशोदेने शारीरिक सेवा केली. शारीरिक सेवा तर करायचीच आहे, पण जर मनानें सेवा केली

गेली नाही तर आनंद मिळणार नाही. सेवा करता करता डोळे ओले झाले पाहिजेत, आणि हृदय विरघळलें पाहिजे. सेवा मोठ्या आनंदाने केली पाहिजे. अशी सद्भावाने सेवा करणारे आजकाल फार कमी आहेत.

सेवारत यशोदेच्या डोळ्यांत श्रीकृष्ण आहेत आणि हृदयांतही! दही घुसळण्याचे वेळीं तिची दृष्टी तर कान्ह्यांतच स्थिर आहे.

कामकाजाच्या वेळीं आमची दृष्टी यशोदेप्रमाणेच कृष्णाकडेच राहिली पाहिजे. सगळ्याच गोपी खानपानाचे वेळीं, कामकाजाचे वेळीं आपली दृष्टी गोपाल कन्हैयाकडेच लावून ठेवीत.

व्यवहार सुटत नाही आणि त्याला सोडायचेही नाही, परंतु व्यवहाराबरोबर परमार्थाचीही आठवण ठेवा. आपलें लक्ष्य विसरू नका. सगळ्याच संतमहात्म्यांना कांही ना कांही काम करावेच लागते. कामधंदा करणें अपराध नाही. कामाच्या वेळीं भगवंताला विसरणें अपराध आहे.

या जगांत कोणी नुसत्या धनाकरिता जगतात, तर कोणी स्त्रीकरिता. कोणी संपत्तीकरता जगतात, तर कोणी पुत्रपरिवारासाठी. असा व्यवहार इष्ट नाही. पैसा पाहायचा नसून देवाला पाहायचे आहे.

आदर्श-लक्ष्य ध्यानांत ठेवून केलेला व्यवहारच भक्ति होय. व्यवहार शुद्ध होईल तर भक्ति येईल. लक्ष्य विसरून केलेला व्यवहार बाधक होईल. लक्ष्य विसरून जाल तर चौऱ्यांशी लक्ष योनींच्या चक्रात अडकून जाल.

व्यवहार करताना दृष्टी भगवंताकडे स्थिर ठेवाल तर तो व्यवहार भक्ति होईल.

यशोदा पुष्टिभक्ती आहे. पिवळे वस्त्र वैष्णवी भक्तीचें प्रतीक आहे. संसार डेऱ्यासारखा आहे. घुसळून प्रेमरूप नवनीत मिळवायचे आहे. परमेश्वर प्रेम मागत असतो.

घरचा कारभार करतेवेळी, यशोदेप्रमाणें मुखांत प्रभुनाम आणि दृष्टींत प्रभूचें स्वरूप असले पाहिजे.

पुष्टिभक्तींत भक्ती आणि व्यवहार भिन्न नाहीत. भक्ताचा प्रत्येक व्यवहार भक्तियुक्त झाला पाहिजे. जे कांहीं काम कराल ते भगवंताची आज्ञा समजून करा. कामधंदा करता करता दर पांच-दहा मिनिटांनी भगवंताचें स्मरण करीत राहा.

जोपर्यंत व्यवहार पूर्णतः शुद्ध होणार नाही तोपर्यंत भक्ति चांगल्या प्रकारे होणार नाही. व्यवहारांत छलकपट आणि असत्य असूं नये.

यशोदेची दृष्टी नेहमी श्रीकृष्णाकडे लागलेली राहत असे. भगवंताचें स्मरण करताना मातेचें हृदय द्रवले. वक्षःस्थलावरचे वस्त्र भिजून गेले आहे.

बाराव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं भगवंताच्या एका कानातील कुंडल म्हणजे सांख्य आहे दुसऱ्या कानातील कुंडल योग आहे. हा यशोदेचा नाही, तर भक्तीचा शृंगार आहे. सांख्य व योग शास्त्राच्या मदतीशिवाय भक्ति स्थिर होत नाही. दुःखाचे प्रसंग आल्यावर मनुष्य भक्ति करू लागतो, परंतु त्यांत स्थिरता येत नाही. म्हणून सांख्यव योगाविना भक्ति अपूर्ण आहे.

योगशास्त्र मनाला एकाग्र बनविते. योग मनाला एकाग्र करण्यासाठी उपयोगी आहे. सांख्यशास्त्राचा अभ्यास केल्याशिवाय चेतन आत्मा जड शरीरापासून वेगळा होत नाही. सांख्यशास्त्र मनाला शुद्ध करते. या दोघांचीही आवश्यकता आहे.

जर भक्ति करायची असेल तर आत्म्याला शरीरापासून निराळे करा आणि मन एकाग्र करा. शारीरिक आनंद आपला नाही. पुनःपुन्हा विचार करा कीं चेतन आत्मा आणि जड शरीर दोन्ही एक नसून वेगवेगळे आहेत.

दररोज मंगलगीत गायल्यानंतरच बाळकृष्ण जागत असे. आज अशी इच्छा झाली कीं लोणी तयार झाल्यावर त्याला उठवावे.

बुद्धीला ईश्वरापासून दूर होऊ देऊ नका. बुद्धिरूपी यशोदा विषयांकडे धावली तर तिथे अडकून पडेल. म्हणून तर कान्हा आईला दूर जाऊ देत नाही. ईश्वरापासून दूर होऊन जर बुद्धि विषयांकडे जाईल तर विपत्तींत अडकेल. ईश्वराला हे होऊ द्यायचे नाही म्हणून तो यशोदेला आणखी कांही काम करू देत नव्हता.

आज यशोदा दही घुसळण्यांत तन्मय झाली होती. तिच्या वाणींत, मनांत, हृदयांत श्रीकृष्ण आहे. ही यशोदेची नाही, भक्तीची कथा आहे.

यशोदेचें तन, मन, वचन एकरूप झालेले होते. ती मनसा-वाचा-कर्मणा ईश्वराची सेवा करीत होती. म्हणून कृष्ण स्वतः जागे झाले. दररोज श्रीकृष्णाला उठविण्यासाठी मंगलगीत गावे लागत असे. आज त्यांना उठविण्यासाठी कांहीही उपचार करावा लागला नाही.

अनन्यभक्ती कान्ह्याला जागविते. श्रीकृष्ण आज आपोआप जागे झाले.

कान्ह्याला जागे करायचे आहे. यशोदेच्या अंतःकरणांत वसलेला कान्हा जागा झाला, परंतु आमच्या अंतःकरणांतला कान्हा तर अजून झोपलेलाच आहे. ह्याला जागे करायचे आहे.

ईश्वराला जागवायचे आहे. तसें तर श्रीकृष्ण सर्वव्यापी आहेत. सगळ्यांच्याच अंतःकरणांत ते वसलेले आहेत. परंतु सुषुप्तावस्थेंत आहेत. त्यांना जागे करायचे आहे. यशोदेसारखी भक्ति कराल तर सुषुप्त कन्हैया अवश्य जागेल.

श्रीकृष्ण अर्थात आनंद! हृदयांत आनंद तर आहेच. त्याला जागृत करायचे आहे. जीव, संसाराच्या जड पदार्थांमधे आनंदाचा शोध करीत राहतो, म्हणून आनंद मिळत नाही. ईश्वराशीं जीवाला तन्मय करायचे आहे. ईश्वराला कोणत्याच वस्तूची आवश्यकता नाही. आंत निजलेल्या भगवंतांना जागे करायचे आहे. भगवंत जागे झाले कीं आनंदच होईल.

खऱ्या वैष्णवाचे शरीरांतून घाम वाहू लागतो तेव्हां देव जागा होतो. वैष्णव दुःखी झाला तर कृष्ण चैनींत निजू शकत नाही.

शुद्ध प्रेमिकाला परिश्रम त्रास देऊ शकत नाही. जर यशोदेप्रमाणे सेवा कराल तर तुमची भक्ति पाहून तुमच्या हृदयांत झोपी गेलेला कान्हा अवश्य जागा होईल.

यशोदेची निष्काम भक्ती पाहून भगवंत सकाम झाले. भक्ती उसळू लागली म्हणजे भगवंत सकाम-स्तन्यकाम होतात.

उपनिषद, भगवंत निष्काम आहे असे सांगते. शुकदेव भगवंताला सकाम म्हणतात.

ज्या वेळीं भगवान श्रीकृष्ण स्तनपान करण्याच्या इच्छेने आईजवळ आले त्यावेळीं ती दहीमंथन करीत होती.

तसा तर देव निराहारी आहे. पण ही तर भक्तहृदयाची भावना आहे. भक्ताचें हृदय जेव्हां प्रेमार्द्र होते, तेव्हां भगवंतांना भूक लागलेली असते.

कान्हा जागा झाला तसा आईला शोधत शोधत इकडे येऊन पोचला. त्याने पाठीमागून आईचा पदर ओढला. यशोदा आपल्या कामांत इतकी गर्क होती कीं तिला समजले नाही. कान्हा आईला म्हणू लागला, 'आई, मला भूक लागली आहे. पहिले मला दूध पाज.'

यशोदा साधक आहे, दहिमंथन साधन आहे, श्रीकृष्ण साध्य आहे. साधना अशी करा कीं साध्य

आपोआप मिळेल. साधनातन्मय साधकाला साध्य आपोआप जागवीत असते.

मनुष्य साधारणतः मनापासून साधना करीत नाही म्हणून तो भगवंताला पाहू शकत नाही. जर तुम्ही कन्हैयाच्या मागेच लागाल, त्याचेसाठी सत्याग्रह कराल, तर तो अवश्य भेटेल. कान्हा तर जीवाची भेट घेण्यासाठी स्वतःच आतुर आहे. परंतु जीवच त्याची उपेक्षा करीत असतो. साधना अशा तन्मयतेने करा कीं देहभानच विसरून जाल, आणि साध्य स्वतः तुमच्या मागे धावू लागेल.

यशोदेची भक्ति पाहून कृष्णानें मागून येऊन पदर धरला. तुम्ही सुद्धा सेवा-साधनांत असे बुडून जा कीं साध्य स्वतः तुमच्या दाराशी येऊन ठेपेल. हीच तर पुष्टिभक्ती!

शरीरानें भक्ति करताना डोळ्यांत आणि मनांत कृष्णाला बसवून ठेवा. यशोदा सर्वांग भक्ति करीत करीत कृष्णनामाचा जप करीत आहे.

शरीराने सेवा कराल, वाणीनें कीर्तन कराल आणि मनाला श्रीकृष्णांत रममाण कराल तर तुमच्या हृदयांतील कृष्ण जागे होतील.

घरचे सगळे कामकाज कृष्णकीर्तन करीतच करा. त्यांचें कीर्तन केल्याने, डोळे उघडे असून सुद्धा जग विसरता येईल.

योगीजन डोळे मिटून ब्रह्मचिंतन करीत करीत जगाला विसरण्याचा प्रयत्न करतात तरी पण ते विसरू शकत नाहींत.

वाणीने कीर्तन, डोळ्याने दर्शन, शरीराने सेवा केल्याकारणें यशोदेच्या हृदयांतील श्रीकृण जागे झाले.

प्रेमानें स्मरण केल्यावर हृदय विरघळते आणि आनंद मिळतो. आनंद ब्रह्माचें स्वरूप आहे. निद्रावस्थेत ज्याप्रमाणे आनंद मिळतो तसाच जागृत अवस्थेंत मिळाला तर तीच मुक्ति आहे.

कान्हा रांगत रांगत आईजवळ आला आणि पदर धरून म्हणू लागला, 'मला भूक लागली आहे, मला खायला दे.' आता यशोदा काम अर्धे टाकू इच्छित नाही.

हा जीव फार दुष्ट आहे. तरी पण भगवंत त्याला धन-संपत्ति, प्रतिष्ठा देतो. जीव अधम (वाईट) आहे तरीही देवाला आशा असते कीं हा कधीतरी सुधारेल.

उपाशी कान्हा रडू लागला. आईने काम सोडले आणि आपल्या मुलाला मांडीवर घेऊन दूध पाजू लागली. दुधाच्या धारा वाहू लागल्या. भक्तीनें हृदय द्रवलें तर आनंद अवश्य मिळतो आणि हा आनंदच तर ईश्वर आहे.

शुकदेव काय स्तनपानाची गोष्ट सांगत होते? श्रीधरस्वामी म्हणतात, ही कथा बाळाला दूध पाजण्यासारखी सामान्य नाही. ही तर ब्रह्मसंबंधाची कथा आहे. यशोदा जीव आहे आणि कान्हा परमात्मा. मातापुत्राचें मीलन कसें असते हें इतर कोण जाणू शकतो? यशोदा बाळाला दूध पाजीत आहे येवढीच गोष्ट नाही. हा तर ब्रह्मसंबंध स्थापित झालेला आहे. ही तर अद्वैताची कथा आहे. यशोदामाता बाळकृष्णाला मांडीवर घेऊन परमेश्वराशीं एकरूप झाली आहे.

ही तर जीव आणि ब्रह्माची भेट आहे. अशा मीलनाच्या वेळीं बाह्य संसार मनांत शिरू देऊ नका. ब्रह्ममीलनाचे वेळीं, ईश्वरमीलनाचे वेळीं सांसारिक विषयांपासून दूरच असा. यशोदेचा ब्रह्मसंबंध झाला आणि अलौकिक आनंदाची वृष्टी होऊ लागली.

स्तनपान करता करता कान्ह्याने विचार केला कीं आज थोडी आईची परीक्षा तर करू कीं तिला मी जास्त प्रिय आहे की हा संसार! तिचे मन माझ्याकडे जास्त आहे कीं सांसारिक व्यवहाराकडे?

देव परीक्षा घेतल्यावाचून कोणत्याच जीवाला आपलें करून घेत नाही.

क्षुद्र मनुष्य दोनचार पैशासाठी देखील पाप करतो. छोटी छोटी पापें मिळून महापाप होते. पाप न करणेच मोठे पुण्य आहे.

परीक्षेंतून उत्तीर्ण झाल्यावर परमेश्वर कृपादेखील करतो. तो सगळ्याच जीवांची परीक्षा केल्यानंतर आपलेसे करून घेतो. जीवाने आपणावर सर्वात अधिक प्रेम करावे अशी त्याची इच्छा असते.

ईश्वराची माळ घेतल्यानंतर जर जीव दुसऱ्यावर प्रेम करू लागेल तर ईश्वर असंतुष्ट होतो. जीवाने एकमात्र आपल्यावरच प्रेम करावे अशी देवाची इच्छा असते. प्रेम करण्यायोग्य तर ईश्वरच आहे. कारण कीं जगांतील वस्तूंवरचें प्रेम केव्हां ना केव्हां रडवीत असते.

कान्ह्याने आईची परीक्षा घेण्याचा विचार केला. मी अग्नीला आज्ञा करीन तर तो प्रज्वलित होऊन चुलीवर ठेवलेले दूध वर येऊन चुलींत वाहू लागेल. आता जर मला सोडून आई दूध वाचवायला जाईल तर मी समजेन कीं आईला मी नाही, सांसारिक संपत्तीच अधिक प्रिय आहे.

पुष्कळ लोक असा विचार करतात कीं संसारांतील सर्वच व्यवहार चांगल्या रीतीने पूर्ण झाल्यावर मग भक्ती करू. अहो, सांसारिक व्यवहार कधीच चांगल्या रीतीनें पूर्ण झालेला नाही आणि कधी होणारही नाही.

महापुरुषांनी म्हटलें आहे कीं या जगांत सर्व प्रकारे सुखी कोणी झालेला नाही आणि कोणी होणारही नाही. आणि सुखी झाला तरी तो आपला गौरव गमावून बसेल.

संसारांत अडचणी तर येतच राहतील. परंतु एक क्षणभर सुद्धा परमेश्वराला न विसरण्याची प्रतिज्ञा घ्यावी लागेल. असें केल्यानेच पापापेक्षा पुण्य वाढीस लागेल. जेव्हां मनुष्य-जन्म मिळतो तेव्हां पाप आणि पुण्य दोन्ही भोगावे लागतात. दुःखद प्रसंग आल्यावर मनाची समजूत घाला कीं पाप कमी होत आहे.

कान्ह्याच्या आज्ञेने विस्तव प्रज्वलित झाला आणि दूध उतू जाऊ लागले. बाहेर सांडू लागले.

साधू लोकांना आणखी तर कांहीच काम नसते. दिवसांतून एकदा स्वादरहित अन्न खाऊन सगळा दिवसभर राधाकृष्णाचें चिंतन करीत राहतात. तर हे साधू दूध उतू जाण्याच्या या प्रसंगाची कांही कारणें याप्रमाणें सांगतातः—

१) ते दूध ऋषिरूपी गाईचें होते. ऋषि तप आणि साधना करता करता थकून गेले. तरीही त्यांच्या मनांत वसलेला काम नाहीसा झाला नाही. त्या बुद्धिवासी कामाचा नाश करण्यासाठी ऋषि गाईचें रूप घेऊन गोकुळांत येऊन बसले होते. दूध कान्ह्याच्या उदरांत जाऊ इच्छित होते. जर श्रीकृष्ण माझे सेवन करतील तर माझें कल्याण होईल. जड पदार्थांना सुद्धा भगवंताच्या प्राप्तीची इच्छा असते. काम्याच्या उपयोगांत आल्यावर भोगविलासामुळे त्या पदार्थाचा विनाश होतो.

तुम्ही स्वतः कृष्णाच्या उदरांत-हृदयांत वसति कराल किंवा तुमच्या हृदयांत कृष्णाला स्थान द्याल तेव्हांच तुम्हाला शांति मिळेल. योगीजन परमात्म्याच्या स्वरूपांत मिळून जातात. वैष्णव श्रीकृष्णाला आपल्या स्वरूपांत उतरवितात. दोन्ही मार्ग एकच आहेत.

जर यशोदा कृष्णाला खूप स्तनपान करवील तर त्याला भूक राहणार नाही. आणि मग तो माझे सेवन करणार नाही. जर भगवंताची सेवा मी केली नाही तर माझें अस्तित्व वृथाच राहील. म्हणून दूधानें जणू काय अग्नींत उडी घेऊन आपल्याला समाप्त करायचे ठरविलें.

आपल्यासाठी जिवंत राहणें म्हणजे कांही जीवन नाही. तसा तर कावळा सुद्धा चांगला कीं

जो आपल्या कुटुंबासाठी जगतो आणि आपल्या जातभाईंनाही बोलावतो. परंतु परोपकारासाठी जगणें हेच खरे जीवन होय.

स्वतःसाठी सुखोपभोगाची वासना भक्तीसाठी बाधक आहे. इतरांना सुखी करण्याची भावना भक्तिसाधक आहे.

वेळेचा नाश सर्वस्वाचा नाश आहे.

दुधाचा समज झाला की कान्हा माझे सेवन करणार नाही म्हणून तें अग्नींत उडी घेऊ लागले.

२) दुधाला वाटत होते कीं यशोदा थोडेसे आपले दूध पाजील. आणि भूक शिल्लक राहिली म्हणजे त्याला या पातेल्यांतील पाजील परंतु बाळकृष्ण तर आईचेंच दूध पीत राहिला आहे. तेव्हा दुधाला वाटले, बाळकृष्ण मला पिणार नाहीत ते "मला देखील पी, मला देखील पी" अशी विनंति करीत बाहेर धावले.

३) तर एक महात्मा म्हणतात– दूध यशोदेच्या घरचे होते म्हणून त्याला कृष्णकीर्तन, कृष्ण-कथाश्रवण आणि सत्संगाचा लाभ मिळाला होता. एक कोटी जप-माळेने दिव्यतेचा संचार होत असतो. तर दूध स्वतः कान्ह्याच्या घरचें होते आणि ते दूध तर ऋषिरूपी गाईंचे होते. दुधाला बाळकृष्णाचें दर्शन झालें होताच त्याला भेटायला आतुर झाले आणि अधीर होऊन धावले.

अशी लीला तर सर्वांच्याच घरांत दररोज होत असते. विषयसुखाचे उतू जाणेच दुधाचे उतू जाणें आहे. दुधाचे वर येणे विषयसुखाची आठवण आहे. सांसारिक सुखाचा उपयोग अशा प्रकारे करा कीं ते मनाला चिकटणार नाही. आठवण शिल्लक राहणार नाही. देवाची पूजा करीत असता विषयाची आठवण येणें दुधाच्या उतू ज़ाण्यासारखेच होय; आणि असे झाले म्हणजे भक्ति संपून जाते.

हल्ली लोकांना घरचें कामकाज करताना कशाचीच आठवण होत नाही. पण माळ हातांत घेतल्याबरोबर घरा-कुटुंबाची सर्वच भानगड मनांत उसळून येते. काही प्राप्ति जवळ आल्याबरोबर साधकाच्या मनांत संसार येऊन उभा ठाकतो. परीक्षा घेण्यासाठीच कान्हा अशी माया रचत असतो. ब्रह्मसंबंध बाणला जाण्याच्या वेळीं वासनेची आठवण येणें हे तर त्या दुधाच्या उतू जाण्यासारखेच आहे. वासनेची आठवण दुधाच्या उतू जाण्यासारखी यायला नको. प्रभु-स्मरण करता करता विषयांचें स्मरण झाले तर भगवंत विस्मृतीच्या अंधारांत लपून जातात.

सेवा (पूजा) करताना जगाची आठवण होणे इष्ट नाही. लोक डाकोरच्या रणछोडरायांची आठवण करीत नाहीत पण तिथल्या गोट्याची (एक खाद्यविशेष) आठवण मात्र करतात. डाकोरजीच्या सौंदर्याची नाही, गोट्याच्या सुस्वादाची आठवण सतावत देत असते.

ईश्वराची पूजा-भजन करताना जर विषयसुखाचें स्मरण झालें तर समजा कीं दूध उतू जाऊ लागले आहे. पूजेच्या वेळीं डोळे, कान आणि मन आणखी कुठे जाऊ देऊ नका, कोणाशी गोष्टी बोलू नका. खाली डोळे लावून 'जय श्रीकृष्ण' म्हणत म्हणत आपली पूजा चालू ठेवा. जर यावेळी कोणाशी डोळे मिळविले तर मन चंचल होऊन जाईल, आणि सेवा अर्धवटच राहील.

४) दुसरे एक महात्मा अशा प्रकारे सांगतातः यशोदेला तसा तर कान्हाच जास्त प्रिय होता. परंतु चुलीवर जे दूध होते ते गंगी नावाच्या गाईचें होते. कान्ह्याला याच गाईचें दूध फार आवडायचे आणि तेच तो प्यायचा. तर यशोदेने विचार केला कीं जर हें दूध उतू गेले आणि कान्ह्याने गंगीचेच दूध मागितले तर मी त्याला काय देऊ? या प्रकारे यशोदा दूध वाचवायला नाही, पण कान्ह्याचें आवडते दूध वाचविण्यासाठी धावली.

प्रियजनांपेक्षा प्रियजनांची वस्तू अधिक प्रिय वाटते.

५) आणखी एक महात्मा म्हणतातः– दुधाने परमात्म्याला यशोदेच्या मांडीवर पाहिलें. ईश्वरदर्शनानंतर सुद्धा मला अग्नीची आंच सहन करावी लागते! माझें दुःख, ताप अजून देखील कमी झालेले नाही. माझी पापें अनेक आहेत. मी जिवंत राहण्यायोग्य नाही. मला अग्नींत उडी टाकून मेलेच पाहिजे, असा विचार करून दूध उतू जाऊ लागले.

यशोदा कृष्णाला एका बाजूला ठेवून चुलीवरून दुधाचें भांडे उतरविण्यासाठी गेली.

जीव सुद्धा अतिविचित्र आहे. आपलें व्यावहारिक काम करताना ईश्वराला आठवत असतो, परंतु ईश्वर जेव्हां मांडीवर येऊन बसतो, जेव्हां ईश्वराशी साक्षात् संबंध जुळतो, तेव्हां तो ईश्वराला एका बाजूला ठेवून (सोडून) त्या सांसारिक कार्यांच्या मागे धावू लागतो. ब्रह्मसंबंध झाल्यावरही संसाराचें स्मरण होणें हें तर दूध उतू जाण्यासारखेच आहे. पुष्कळ लोक माळ तर फिरवीत असतात, परंतु त्यांचे मन भाजीपाल्याची खरेदी आणि घरसंसाराच्या चिंतेंत लागलेले असते. अशा जपांत त्या प्रभूचा जप नाही, संसाराचा जप होत राहतो.

वियोगांत अपेक्षा जागृत होणें गुणदर्शन आहे. संयोगांत उपेक्षेचा भाव जागृत होणें दोषदर्शन आहे. कान्हा दूर होता तेव्हां यशोदा त्याला मांडीवर घ्यायला आतुर होती, अपेक्षित होती, आणि आता मांडीवर आला तर त्याची उपेक्षा करून दुधाच्या मागे धावू लागली.

सुलभ वस्तूंची उपेक्षा करणें तर जीवाचा स्वभाव आहे. भगवंताला वाटले कीं यशोदेने पुष्कळ जप-तप-व्रते केली तेव्हां माझी तिला प्राप्ती झाली. परंतु आता शेर-दोन शेर दुधासाठी मला सोडून चालली आहे.

बालकृष्णाला सोडून यशोदा सांसारिक काम करायला गेली. बाळकृष्णाला वाटले, आईला तर माझ्यापेक्षा संसारच जास्त प्रिय आहे. तेव्हा आईला शिकवण देण्याकरता बाळकृष्णाने एक दगड मारून एक मण दह्याचा हंडा फोडून टाकला.

श्री महाप्रभूंची आज्ञा आहे कीं श्रीकृष्णाची सेवा लौकिक भावाने कधीही करू नका. अलौकिक सेवा सोडून जर लौकिक कार्य करायला जाल तर भगवंत ते आणखी बिघडवून टाकतील.

प्रभूला लौकिक आणि अलौकिक दोन्हींची काळजी आहे. त्याला आमची खूप चिंता असते. जर मनुष्य चिंता करीत आपलें हृदय जाळीत राहील तर माझें काय होईल?

मी समर्थ आहे आणि माझा स्वामी तर सर्वसमर्थ, सर्वशक्तिमान आहे असें मानून निश्चिंत होऊन भगवंताचें स्मरण, मनन, चिंतन करीत रहा.

भगवत्स्मरण, पूजा करतेवेळी जर घरांत कांही नुकसान होत असेल तर होऊ द्या. तन देवापाशी आणि मन स्वयंपाकघरात असेल तर ती पूजा, पूजा कशी म्हटली जाईल?

भगवत्सेवा अर्धवट टाकून लौकिक काम करायला जाल तर ते आणखीच बिघडेल. म्हणूनच श्रीकृष्णानें दह्याचा हंडा फोडून टाकला. श्रीकृष्णाने विषयासक्तीरूपी हंडा फोडून टाकला. यशोदेची विषयासक्ती नष्ट करण्यासाठी दह्याचें भांडे फोडून टाकले. संसारासक्तीचा नाश झाल्याशिवाय भगवत्प्रेम उत्पन्न होत नाही.

हरीवर विश्वास ठेवून ईश्वरसेवा- श्रीकृष्णाची भक्ति केली पाहिजे. श्रीकृष्ण भक्ति- प्रभुसेवा करणाऱ्याची लाज प्रभु नेहमी राखतात. जोपर्यंत संसारासक्ती जात नाही तोपर्यंत भगवद्भक्ती सिद्ध होत नाही.

संसारांतील विषयभोगांनी कधीच तृप्ति होणार नाही. लोक भाजी-पाला, चटणी, लोणचे यांत तेलाची धार सोडतात. तेलाने रसरसलेली असेल तीच मोठ्या आवडीने खातात. आता विचार करा कीं आजपर्यंत आमच्या पोटांत न जाणो किती तेलाचे डबे पचून गेले असतील आणि धान्याचीही अगणित पोती आमच्या उदरांत स्वाहा झाली असतील. तरी पण आम्ही तृप्त झालों आहोत का?

ईश्वराला कोनाड्यांत ठेवून लौकिक कार्यांत लागून राहणें बिलकूल चांगले नाही. सांसारिक कार्यांच्या मागे असे लागून राहाल तर ते आणखी बिघडत जाईल.

इतक्यांत कांही बालमित्र येऊन कान्ह्याला विचारू लागले, 'कृष्णा! आज कोणाच्या घराला लक्ष्य करायचे आहे?' कृष्ण म्हणाला, आजतर आमच्याच घरचे लोणी आपल्याला लांबवायचे आहे. आज भगवंत आपल्याच घरचे लोणी खाऊ घालीत आहेत.

केलेले उपकार भगवंत कधीच विसरत नाहीत. रामावतारांत वानरांनी त्यांची खूप सेवा केली होती म्हणून श्रीकृष्ण आज त्यांनाही लोणी-दही खाऊ घालीत आहेत.

यशोदेने परतून पाहिलें तर दह्याचे मडके फुटलेले होते, दही इकडे तिकडे सांडलेले होते आणि कृष्ण गायब झाला होता. कान्ह्यानें रुसून, रागवून हा पराक्रम केला होता. कृष्ण शिंक्यावरून लोणी काढून बालमित्रांना आणि वानरांना खाऊ घालत होता.

वानर म्हणजे मन. मन वानरासारखे चंचल आहे. परंतु श्रीकृष्ण आणि श्रीरामासमोर तर ते हात जोडून उभे राहते. त्यांच्यावाचून चंचल मन-वानर शांत होत नाही. वानर फलाहार करतात आणि निर्वस्त्र राहतात. ते साधूंसारखे आहेत. कान्हा त्यांना लोणी खाऊ घालत आहे.

यशोदेने कृष्णाला चोरी करताना पाहिले तेंव्हा पटलें कीं गोपींची गाऱ्हाणी खरी आहेत. कृष्णाला चोरी करण्याची सवयच आहे. कृष्णाला धरून बांधून ठेवले पाहिजे. ज्या उखळीवर तो उभा आहे त्याच उखळीशी मी त्याला बांधून टाकीन. यशोदा काठी घेऊन कृष्णाच्या मागे धावली.

मित्रांनी कृष्णाला सांगितले, 'आई आली, पळ पुढे. कृष्ण पुढे धावत आहे आणि त्याच्या मागे यशोदा.' ज्या ईश्वराला योगी देखील धरू शकले नाहीत त्याला धरण्यासाठी आज यशोदा धावत आहे. यशोदा धावता धावता थकून दमून चूर होऊन गेली तरी कान्हा हाती आला नाही. असें कां झालें?

श्रीधरस्वामी म्हणतात:— आपल्या एका चुकीमुळे यशोदा त्या कान्ह्याला धरू शकत नव्हती. कृष्णाच्या मागे धावताना यशोदेच्या दृष्टींत कृष्णाचें मुखारविंद आणि चरणकमल नाही, तर पाठ होती. तृतीय स्कंधांत सांगितलें आहे कीं कृष्णाच्या पाठींत अधर्म आहे. अधर्म तिथूनच उत्पन्न झाला आहे. अधर्माकडे दृष्टी ठेवून धावणारा ईश्वराला कसा धरू शकेल?

धर्माच्या मर्यादेंत राहून भक्ति करा. भक्ति धर्मानुकूल असली पाहिजे. भक्तींत अधर्म आला रे आला कीं ती भ्रष्ट होते. कर्त्याने ज्याला जें कर्तव्य सांगितलें आहे ते बरोबर पार पाडायला पाहिजे. जो आपले कर्तव्य-आपला धर्म सोडून देतो त्याची भक्ति सफल होत नाही. संध्याकर्म (वंदन) केल्याशिवाय पूजा (सेवा) करणाऱ्या ब्राह्मणाची सेवा ईश्वर कधीच स्वीकारीत नाही. जर घरांत पतिदेव आहे आणि त्याची उपेक्षा करून एखादी स्त्री कथाकीर्तनाला किंवा मंदिरांत गेली तर तिची सेवा कधीच सफल होणार नाही.

प्रभु म्हणतात, मला कर्तव्याची-धर्माची मर्यादा फार प्रिय आहे. त्यांची भक्ति करताना कर्तव्य आणि धर्मविषयक सर्वच मर्यादेचे पालन झालेंच पाहिजे.

यशोदा कृष्णाला धरू शकत नव्हती. कारण ती (भक्ति) अधर्माच्या मागे धावत होती.

तर एक महात्मा निराळेच कारण सांगतात. यशोदेच्या हातांत काठी होती. काठी घेऊन धरायला जाणें कृष्णाला आवडलें नाही. त्याला भीती वाटत होती. काठी अभिमानाचें प्रतीक आहे. पुष्टिसंप्रदाय तर बाळकृष्णाची सेवा करायला सांगतो. काठी घेऊन धावणें याचा अर्थ आहे अभिमान बरोबर घेऊन धावणें. अभिमानी सेवा करू शकत नाही. कृष्ण म्हणतात, आपला अभिमान सोडूनच माझ्यापाशी या.

तर वल्लभाचार्य म्हणतात, भक्ति जर अभिमान आपल्या बरोबर घेऊनच भगवंताला मिळवायला जाईल तर सफल होणार नाही. यशोदारूपी बुद्धी-भक्ती, काठीरूपी अभिमान घेऊन कान्ह्याला धरायला जात आहे म्हणून धरू शकत नाही.

सत्कर्म केल्यानंतर सुद्धा जर आंतरिक अभिमान वाढत असेल तर असें सत्कर्म काय कामाचें? भगवंत सगळ्याच दोषांची क्षमा करतात, पण अहंकाराची नाही. अभिमान ठेवल्याने भगवंताची उपेक्षा होते. अभिमान करण्यासारखे जर कांहीच नाही तर मग अभिमान करावाच कां? राजाचा रंक व्हायला, रंकाचा राजा व्हायला किंवा लाख खाक व्हायला कांही वेळ लागत नाही. आत्ता तर खूप वैभव आहे आणि कांही क्षणांतच "अच्युतम् केशवम्" देखील होऊन जाते. तरी पण आम्ही अभिमान कां करावा?

यशोदा धावता धावता थकली, तरीही कान्हा हाती आला नाही. आता काठीचें सुद्धा वजन वाटू लागले. तिनें काठी फेकून दिली. कान्ह्याला सुद्धा तेच हवे होते. आईने काठी (अभिमान) टाकून द्यावी. आईने काठी फेकल्याबरोबर कान्हा नुसता थांबलाच नाही तर तिच्या दिशेने परत येऊ लागला. यशोदेने कृष्णाचें मुख पाहिलें. मुखदर्शन झालें आणि कान्हा धरला गेला. कृष्णाच्या मुखांत धर्म निहित आहे.

यशोदामातेने काठी – अभिमानाचा त्याग केला. साधनरहित झाली तर कृष्ण धरला गेला. व्यवहारांत भक्तींत दैन्यभावाची आवश्यकता आहे. जोपर्यंत जीव अहम्-ममतेला सोडीत नाही तोपर्यंत भगवान भेटत नाहीत. जोपर्यंत "मी" असेल तोपर्यंत भगवत्दर्शन होऊ शकत नाही. जिथे मी आहे तिथे हरि नाही.

कान्हा रडू लागला तर आई म्हणाली, मला माहीत आहे कीं तू खोटे खोटे रडत आहेस, नाटक करीत आहेस.

बालमंडळींना दुःख झाले – वाईट वाटले. कारण त्यांचा अध्यक्ष धरला गेला होता. सगळी बालमंडळी यशोदेजवळ आली आणि म्हणू लागली, 'माते, कृष्णाला बांधू नको. त्याने कांहीच खाल्ले नाही. सगळे लोणी आम्हालाच खायला दिले आहे. त्याचें हृदय तर फारच कोमल आहे. यशोदेला वाटले सगळ्यांना प्रिय आणि हव्या असणाऱ्या कृष्णाला बांधणें चांगले नाही, पण मग मी करू तरी काय? कान्ह्याची चोरण्याची सवय तर सुटलीच पाहिजे. कांही वेळ त्याला बांधून ठेवते, मग सोडून देईन. यशोदा सगळ्याच मुलांना रागे भरली. बालगोपालांना वाटले कीं यशोदा कृष्णाला मारील. तिने त्याला बांधू नये आणि मारू नये म्हणून ते विनवू लागले.

यशोदा कान्ह्याला मुसळाशी बांधून ठेवू लागली.

तिकडे सगळीच मुलें आपापल्या घरी पळाली आणि आपापल्या आयांना सांगू लागली, 'आई, यशोदा कान्ह्याला बांधून त्याला मारणार आहे.'

सगळ्याच गोपी धावत धावत यशोदेच्या घरीं आल्या आणि म्हणू लागल्या, 'माते, तुला मुलगा

नव्हता तेव्हां तू मुलाकरता तडफडत होतीस आणि आज त्याला बांधून मारणार आहेस? आम्ही गरीब आहोत, आमच्या इथे बाळकृष्ण रोज येऊन माठ फोडून जातो, दही-लोणी चोरतो तरी पण आम्हाला त्याला बांधायचा विचार सुचत नाही. आम्ही तुला पांच माठ भरून दही देतो. तू त्याला सोडून दे. त्यानें एक माठ फोडला तर काय झाले? त्याला सोड.'

परंतु आज यशोदा समजून घेण्याच्या पलिकडे गेलेली होती. ती म्हणाली, 'मुलगा माझा आहे. मी वाटेल ते करीन. तुम्ही कोण आहांत मध्ये बोलणाऱ्या?'

शुकदेव वर्णन करीत आहेत :– राजा! काळाचे देखील काळ असे श्रीकृष्ण आज आईचा राग पाहून थरथरत आहेत.

यशोदा बाळकृष्णाला मुसळाशी बांधू लागली. आता आश्चर्याची गोष्ट अशी कीं तिने सगळ्या दोऱ्या घेऊन पाहिल्या, परंतु सगळ्या दोन बोटे तोकड्या निघाल्या. मग सगळ्या दोऱ्या एकमेकांना बांधून प्रयत्न केला तरीही शेवटी दोन बोटे तोकडीच राहिली.

एकाला दुसरी, दुसरीला तिसरी या प्रकारे पुष्कळशा दोऱ्या बांधल्या. परंतु दोन बोटे लहानच राही.

श्रीकृष्णाचा स्पर्श झाल्याबरोबर जणूकांही त्यांचा स्वभाव पालटून जात असे.

यज्ञ करून तीर्थयात्रा करून, ब्राह्मणभोजन घालून स्वभाव सुधारत नाही. परंतु जो हृदयपूर्वक भगवंताचें ध्यान करतो, जो मनाने परमात्म्याला भेटतो त्याचाच स्वभाव पालटतो. भगवत्स्पर्शाशिवाय स्वभाव बदलत नाही. ब्रह्मसंबंध झाल्यावर आणखी कांही बंधन होऊ शकते काय?

त्या दोरांनी बांधण्याचा स्वभाव सोडून दिला. दोऱ्यांना श्रीकृष्णाची दया आली. वैष्णव म्हणतात, दोरींत ऐश्वर्यशक्तीचा प्रवेश झाला होता. जिथे ईश्वर आहे तिथे ऐश्वर्य देखील आहे. ऐश्वर्यशक्तीला दुःख होत होते कीं एक साधारण गौळण प्रभूला बांधीत आहे!

गोपी यशोदेला म्हणू लागल्या, 'माते, तू कांहीही म्हण, पण या बाळाच्या भाग्यांत बंधन लिहिलेलें नाही. तो तर आम्हाला सांसारिक बंधनांतून सोडवायला आला आहे.'

ऐश्वर्यशक्ति परमात्म्याला स्वामी मानते. वात्सल्यभक्ति परमात्म्याला बांधायला चालली आहे. ऐश्वर्यशक्ति आपल्या पतीला बंधनांत पाहू शकत नाही. ऐश्वर्य आणि वात्सल्यशक्तींचें हें गोड भांडण आहे. प्रभूंनी ऐश्वर्यशक्तीला सांगितले, मी इथे गोकुळांत ईश्वर नाही, यशोदेचा बाळ आहे. मी द्वारकेला तुझा पति होऊन येईन. तू आत्ता निघून जा. व्रजांत तुझी आवश्यकता नाही. आईला बांधायची इच्छा आहे तर बांधू दे. गोकुळांत प्रेमाचें प्राधान्य आहे आणि द्वारकेंत ऐश्वर्याचे.

गोकुळच्या लीलेंत वात्सल्यभाव आणि पौगंडलीलेंत सख्यभाव प्रधान आहे. गोपीलीलेंत माधुर्य भाव मुख्य आहे.

मग ऐश्वर्यशक्तीने निरोप घेतला. घरांत जेवढ्या दोऱ्या होत्या त्या सगळ्या संपल्या. तरी कान्हा बांधला गेला नाही. यशोदा आश्चर्यांत बुडून गेली, आणि गोपी हास्यांत! जणू काय गोपी म्हणत आहेत, 'भगवान याप्रमाणें कधी बांधले जातात का?

भगवान सगळ्यांनाच म्हणत आहेत: आमच्या मध्ये फक्त दोन बोटांचे अंतर आहे. ही दोन बोटे आहेत अहम् आणि ममता. ज्याच्या मनांत अहम् आणि ममता शिल्लक आहेत तो मला कधीही बांधू शकत नाही.

परमात्म्याला त्रिगुणात्मक मायादोरा बांधू शकत नाही. भगवंत तर फक्त प्रेमाच्या दोरीने बांधले

जाऊ शकतात आणि ते सुद्धा त्यांची इच्छा झाली तरच!

श्रीकृष्णाने पाहिले कीं आई थकून-भागून घामाघूम झाली आहे, त्याला आईची दया आली आणि त्यानें स्वतःला बांधून घेतले. भगवंत म्हणतात जेव्हां मी कृपा करतो तेव्हांच बांधला जातो.

भगवान लौकिक दोरीने नव्हे, तर प्रेमाच्या दोरीने बांधले जाऊ शकतात. भक्तांच्या प्रेमाशिवाय आणखी कांहीच मला बांधू शकत नाही. जोपर्यंत ईश्वर कृपा करीत नाही तोपर्यंत त्याला कोणताही जीव बांधू शकत नाही. कृष्ण स्वेच्छेने बांधले गेले.

जीव आपल्या स्वार्थासाठी विविध बंधनांत अडकतो.

निःस्पृह असून सुद्धा परमात्म्याने आज बंधनाचा स्वीकार केला आहे.

जेव्हा भगवान बांधले जातात तेव्हा जीव बंधनमुक्त होतो, त्याचा उद्धार होतो. ईश्वराला ज्ञान आणि योग नाहीत तर शुद्ध प्रेमलक्षणा भक्तीच बांधू शकते. ईश्वर जोपर्यंत प्रेमदोरीने बांधला जात नाही तोपर्यंत जीवाचे बंधन सुटत नाही. कृष्णाला त्याच्या पोटावरून बांधले गेले म्हणून त्याचे नाव दामोदर पडले.

जोपर्यंत परमात्मा प्रेमाने बांधला जात नाही तोपर्यंत संसाराचे बंधन राहतेच.

जर ईश्वराला बांधू शकाल तर जन्ममृत्यूच्या बंधनांतून सुटका होईल. जो ईश्वराला बांधू शकतो तो स्वतः बंधनातून मुक्त होतो.

ईश्वर सर्वश्रेष्ठ का आहे? कारण असे कीं तो आपला आग्रह किंवा ममत्व ठेवीत नाही. जीव आग्रही असतो, ईश्वर अनाग्रही. जीव दुराग्रही आहे, आपला हट्ट सोडीतच नाही. जीव जर अनाग्रही झाला तर तो ईश्वराचा होऊ शकतो.

भगवान भक्तांच्या आग्रहापुढे झुकतात. भक्तांच्या आग्रहाचा ते आदर करतात. पण जीव आपला आग्रह उराशी धरून ठेवतो, सोडत नाही.

आईचे परिश्रम पाहून कान्हा बांधला गेला. याप्रमाणे त्यांनी दाखविले की ते भक्ताधीन आहेत. ईश्वराने आपला आग्रह सोडला.

भीष्मपितामहांची प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी, श्रीकृष्णाने आपल्या प्रतिज्ञेचा भंग करून शस्त्र धारण केले होते. ते हातात चक्र घेऊन भीष्मपितामहांना मारण्यासाठी धावले. हे दृश्य पाहून भीष्म भावविभोर झाले. त्यांनी धनुष्यबाण फेकून दिले आणि म्हणाले, 'वाहवा! वाहवा! हे प्रभू, धन्य आहे तुमची! माझी प्रतिज्ञा खरी करण्यासाठी तुम्ही आपल्या प्रतिज्ञेचा भंग केलात!'

पूर्ण प्रेमाशिवाय भगवंत बांधले जात नाहीत. मनुष्याचे प्रेम अनेक हिश्शांत वाटले गेले आहे. तो पत्नी, संतती, धन, संपत्ति, पोशाख इत्यादींवर प्रेम करतो. जर तो आपले सगळे प्रेम भगवंताला देईल तर भगवंत बांधले जातील.

बाळकृष्णाला दया येऊन त्याने विचार केला की मला बांधूनच जर आई प्रसन्न होत असेल तर भलेही तिने मला बांधावे. बाळकृष्ण बांधले गेले आणि यशोदेची इच्छा पूर्ण झाली.

परमात्म्याला ज्ञानी पुरुष बांधू शकतो. भक्त प्रेमाने बांधू शकतो. बिल्वमंगलासारखे भक्त भगवंताला हृदयांत बंद करून ठेवतात.

आंधळे बिल्वमंगल चालता चालता घसरून एका खड्ड्यांत पडले. श्रीकृष्णाने गोपबालकाचें रूप घेऊन त्यांना धरून बाहेर काढले. श्रीकृष्णाच्या कोमल हस्तस्पर्शाने बिल्वमंगलांना वाटलें की हा साक्षात् परमेश्वर आहे. त्यांनी ओळख विचारली, तर आपण एक गोपबालक आहोत, असे सांगून

कृष्ण धावू लागले.

बिल्वमंगल म्हणाले, 'माझा हात सोडून तर तू पळून जात आहेस, पण माझ्या हृदयातून कसा पळून जाशील. मी तुला आपल्या हृदयांत बंद करून ठेवले आहे.'

दामोदरलीलेच्या वर्णनात महाप्रभु वेडे झाले आहेत. ते म्हणतात ही भक्तीच्या विजयाची कथा आहे. ज्ञान व तपावर भक्तीनें जय मिळविला आहे.

श्रीकृष्ण मथुरेला जायच्या वेळी यशोदेने त्यांना विनंती केली की त्या दोरीने बांधल्याच्या प्रसंगाला विसरून जा; मनात ठेवू नको. श्रीकृष्ण म्हणाला की, मी तर सर्व काही विसरलो आहे, पण मी हेच लक्षात ठेवीन की, तू मला कधी तरी प्रेमाच्या दोरीने बांधले होतेस. मी द्वारकाधीश होऊन छपन्न कोटी यादवांचा सम्राट होईन, सोळा हजार राण्यांचा पति होईन, तरी पण मी तुझ्या प्रेमाच्या बंधनांत बांधलेलाच राहीन. तुझ्याशिवाय मला आणखी कोण बांधू शकतो? मला आणखी कोणीच बांधू शकणार नाही. मी आणखी कोणाचा नाही, सोळा हजार राण्यांचा नाही, फक्त तुझाच आहे. तुझ्या प्रेमाच्या बंधनाची मी नेहमीच आठवण ठेवीन. तुझे प्रेम मी कधीच विसरू शकत नाही.

या प्रसंगांत यशोदेचा विजय आहे. ज्ञान, तपश्चर्येचा नाही, तर भक्तीचा विजय आहे. आपल्या तपाच्या सामर्थ्याने ज्ञानीजन परमात्म्याचे दर्शन घेऊ शकतात, परंतु त्याला बांधू शकत नाहीत. केवळ विशुद्ध भक्तीच त्याला बांधू शकते. म्हणूनच तर भगवंत म्हणतात—

मी मुक्ति तर देतो पण भक्ति देत नाही. जर भक्ति दान करीन तर मलाच बांधले जावे लागेल.

एकदा भक्त दामाजी कर भरू शकले नाहीत तर यवन सैनिक त्यांना बांधून राजदरबारांत घेऊन जाऊ लागले. दामाजीने सैनिकांना प्रार्थना केली की वाटेत मला पंढरपूरच्या विठ्ठलनाथांचे दर्शन घेऊ द्या. सैनिक त्यांना मंदिरात घेऊन गेले. आपल्या भक्ताची अशी दयनीय अवस्था पाहून विठ्ठलनाथ द्रवले. अरे, माझा दाम्या बंधनात अडकला आहे?

तेव्हां विठ्ठलनाथ एका हरिजनाचें रूप घेऊन राजदरबारात पोचले. तेथे त्यांनी आपले नाव विठूमहार सांगितले आणि दामाजीची सर्वच शिल्लक रक्कम भरण्याची इच्छा व्यक्त केली.

या प्रकारे विठ्ठलनाथांनी आपल्या भक्त दामाजीला बंधनमुक्त केले.

भगवंतांनी दामाजीला भक्ति दिली होती, म्हणून त्यांना महाराचे रूप घ्यावे लागले. भक्ति भगवंताला बांधते.

कृष्णाला बांधून यशोदा घरात गेली पण तिचे मन तर कृष्णांतच लागून राहिले होते. कान्ह्याला बांधून मी चांगले केले नाही! पण मग मी करू तरी काय? त्याची चोरीची सवय तर सोडवायचीच आहे.

कृष्ण बंधनांत आहेत म्हणून सगळे सवंगडी तिथेच बसलेले आहेत. कृष्णा, आमच्यामुळे तुला बांधले जावे लागले. तुला काही त्रास होत नाही ना? कृष्णाला वाटले, हो म्हणीन तर सगळ्यांना वाईट वाटेल. म्हणून तो म्हणाला, 'नाही रे! मी तर थोडी गंमत करीत आहे.'

ज्याप्रमाणे वैष्णव प्रभूंना दुःख होऊ नये म्हणून काळजी घेतात त्याचप्रमाणे प्रभू सुद्धा वैष्णव दुःखी होऊ नये याविषयी सावध असतात.

श्रीकृष्णाने विचार केला की आज बैलगाडीची लीला करायची आहे. मी बैल बनेन आणि मुसळ गाडी. या मुसळाला मी बैलगाडीसारखे ओढत नेईन. आणि कृष्ण तसे करू लागला.

भगवान दामोदरांची इच्छा आहे की भले ही मी बंधनात पडेन, पण इतर कित्येक जीवांना बंधनमुक्त

करीन.

यशोदा पुष्टिभक्ति आहे. पुष्टिभक्ति भगवंतांना बांधत असते. जेव्हा ते बांधले जातात तेव्हा जीव मुक्त होतो. जोपर्यंत प्रभू प्रेमाच्या दोरीने बांधले जात नाहीत तोपर्यंत मायेचे बंधन तुटत नाही. ईश्वराला प्रेमाने बांधा.

नवव्या अध्यायात बंधनलीला आहे, दहाव्या अध्यायांत मोक्षलीला. यमलार्जुन मोक्षकथा आहे.

**१३. वृक्षरूप नलकुबेर आणि मणिग्रीवांचा उद्धार:**

मुसळाला ओढीत ओढीत कृष्ण त्या दोन यमलार्जुन वृक्षांच्या पुढे गेला. मुसळ दोन झाडांमध्ये अडकले. कृष्णाने दोरी इतक्या जोराने ओढली की मुसळाने त्या दोन झाडांना उखडून टाकले.

यमलार्जुन पडल्याबरोबर दोन तेजस्वी पुरुष प्रगट झाले. हे पुरुष आपल्या पूर्वजन्मी कुबेर राजाचे पुत्र होते. नलकुबेर आणि मणिग्रीव. या दोन लक्ष्मीपुत्र यक्षांना नारदाच्या शापामुळे वृक्षांची योनी प्राप्त झाली होती.

परीक्षिताने विचारले– नारदांनी त्यांना शाप का दिला होता?

शुकदेव वर्णन करू लागले– राजा! ऐक. नारदाने क्रोधवश होऊन नाही, तर कृपापूर्वक शाप दिला होता.

नलकुबेर आणि मणिग्रीव कुबेराची मुले होती, पित्याची अपार संपत्ति त्यांना मिळाली. संपत्तीचा अतिरेक चांगला नाही.

संपत्तीचा अतिरेक द्यूत (जुगार), व्यभिचार, मांस-मदिरा इत्यादी दुर्गुणांचा जन्मदाता आहे. संपत्तीची विपुलता आणि सद्‌बुद्धि बहुधा एके ठिकाणी राहू शकत नाहीत. संपत्तीचा अतिरेक झाल्यावर लोक तामस आहार, मदिरापान, व्यभिचार इत्यादी दुर्गुणात अडकून जातात. आणि एक प्रकारे सद्वर्तनाचा उच्छेद होतो.

पति-पत्नींचा संबंध नुसत्या कामसुखासाठी नाही, धर्माचरणासाठी आहे. सुशील पत्नी आपल्या पतीला पापाचार करण्यापासून रोखत असते.

हे दोन्ही कुबेरपुत्र धनाच्या मदांत आपली शुद्धबुद्ध हरवून बसले होते. मदिरापान करून गंगेच्याकिनारी आले आणि गंगेच्या पवित्र जलांत तरुणींसमवेत नग्नावस्थेत जलक्रीडा करू लागले.

विलासी तर तीर्थाच्या मर्यादेचेसुद्धा पालन करीत नाही. महाप्रभूंनी मोठ्या दुःखाने म्हटले आहे जेव्हापासून विलासी लोक तीर्थस्थानी वसति करू लागले आहेत तेव्हापासून तीर्थस्थानातून देवगण निघून गेले आहेत.

त्याचवेळी देवर्षि नारद तिथून जात होते. तर त्यांना कुबेर पुत्रांचा जलविहार पाहून दुःख झाले. नारदांना पाहून देखील त्यांनी आपले अंग झाकले नाही. नारदांनी विचार केला की इतके सुंदर शरीर मिळाले आहे तरी पण हे त्याचा दुरुपयोग करीत आहेत.

हे शरीर भगवंताचे आहे. भगवंताची सेवा करण्यासाठीच जीवाला दिलेले आहे.

नारद म्हणतात– या शरीराची शेवटी काय दशा होईल? एक तर याला पशु-पक्षी खाऊन टाकतील, नाही तर राखेचा ढीग तरी होईल.

संपत्तीच्या मदांत लोक आपल्या शरीराला अजरामर समजू लागतात आणि इतर लोक आणि प्राण्यांना त्रास देऊ लागतात.

हे शरीर कोणाचे आहे? यावर कोणाचा अधिकार आहे? हे मातेचे आहे की पित्याचे? की हे आपले आहे?

पिता– माझ्या वीर्याने उत्पन्न झाल्याकारणे हे माझे आहे.

माता– माझ्या उदरी याचा जन्म झाला म्हणून माझे आहे.

पत्नी– या शरीराला आपले करण्यासाठीच तर मी आई-वडिलांना सोडून येथे आले आहे. याच्याशी माझे लग्न झाले आहे. ते माझे अर्धांग झाले आहे, म्हणून हे शरीर माझे आहे.

अग्नि– जर या शरीरावर माता, पिता, पत्नीचा अधिकार असता तर प्राण निघून गेल्यावर ते याला आपल्याजवळ ठेवायच्या ऐवजी बाहेर का काढून ठेवतात? या शरीरावर माझाच अधिकार असल्यामुळेच तर स्मशानांत आणून ते मला सोपविले जाते.

श्याल-कुत्रे– अग्निसंस्कार न झाला तर हे शरीर आम्हालाच खायला मिळते तेव्हा त्यावर आमचा पण अधिकार आहे.

याप्रमाणे या शरीरावर प्रत्येक जण आपला अधिकार सांगतो. काही कळत नाही की खरोखर या शरीरावर कोणाचा अधिकार आहे?

प्रभु म्हणतात– हे शरीर कोणाचेच नाही. मी जीवाला दिलेले आहे. हे शरीर माझे आहे, कारण मी कृपा करून दिले आहे.

हे शरीर अत्यंत कृपा करून जगांतील मानवांना दिले आहे. जो मनुष्य हे प्राप्त करून आपल्या इंद्रियांना नियंत्रणांत ठेवीत नाही आणि आपल्या चरणीं शरण येत नाही त्याचे जीवन अत्यंत शोचनीय आहे. तो स्वतः आपल्याला फसवीत आहे. हे शरीर सांसारिक सुखोपभोगासाठी दिलेले नाही.

शंभर रुपयांची नोट जरी फाटली असेल आणि तिला तेलाचे डागही पडले असतील पण नंबर जर धड असेल तर तिला कोणी फेकून देत नाहीत. याचप्रमाणे हे शरीर मळलेले असले तरी त्याचा नंबर तर ठीक असतो. याच शरीराने तर भगवंताचा जप केला जातो. भगवंताच्या जपाचा आनंद फक्त मनुष्यालाच मिळू शकतो. कुत्री, मांजरे भजन करू शकत नाहीत. पशूंना आपल्याच शरीराचे, आपल्याच स्वरूपाचे भान नाही तर भगवंताच्या स्वरूपाची जाणीव कशी असू शकेल? केवळ मनुष्यच भगवंताचे स्वरूप जाणू शकतो.

या अनित्य शरीराने सुद्धा नित्य असा परमेश्वर प्राप्त केला जाऊ शकतो.

हे शरीर परमेश्वराच्या कार्यासाठी आहे. प्रभूच्या कृपेनेच मिळालेले आहे. मदांध लोक एक तर हे जाणतच नाहीत किंवा विसरून तरी जातात.

त्या कुबेरपुत्रांची अवनिति पाहून नारदांना दया आली. यांना सन्मार्गी लावण्यासाठी शाप दिला.

या शरीराचा उपयोग केवळ भोगविलासासाठीच करणारी व्यक्ति पुढच्या जन्मी वृक्ष होते. भोग इतके आणि असे करू नयेत की जेणेकरून शरीर रोगी होऊन जाईल. भोग इंद्रियांना रोगी बनविण्यासाठी नसून त्यांना प्रसन्न करण्यासाठी आहेत.

वेळ आणि संपत्तीचा उपयोग केवळ भोगविलासासाठी करणारी व्यक्ती पुढल्या जन्मी वृक्ष होत असते. पाप्याला वृक्षाचा जन्म मिळतो. वृक्ष जड वस्तू नाही ही तर पापयोनी आहे. वृक्षांना सहा ऋतूंत निरनिराळ्या प्रकारचे प्रहार सहन करावे लागतात.

नारद म्हणाले– हे दोन्ही यक्ष संपत्तीमुळे मदांध, स्त्रीभोगी, विलासी झालेले आहेत म्हणून स्थावरपण प्राप्त करण्यालायक झालेले आहेत. तर अशा भोग्यांना वृक्षाचा जन्म मिळो.

शाप ऐकल्याबरोबर नलकुबेर आणि मणिग्रीवांना पश्चात्ताप झाला. ते नारदांना शरण गेले. 'क्षमा करा मुनिमहाराज, क्षमा करा!'

नारदांनी कृपा करून त्या दोघांना गोकुळांत वृक्षावतार दिला. नंदबाबांच्या अंगणांत तुमचा दोघांचा जन्म होईल आणि कान्ह्याच्या चरणस्पर्शाने तुमचा उद्धार होईल.

तो शाप होता की आशीर्वाद? उद्धवांसारखे साधुजन तर वृंदावनात वृक्षाच्या रूपाने जन्म घेऊ इच्छितात.

विषयभोगात रममाण राहणाऱ्याला पुढच्या जन्मी वृक्षाचा अवतार घ्यावा लागतो.

नारदांनी शाप तर दिला, परंतु संतांचा क्रोध, त्यांचा शापसुद्धा नेहमी आशीर्वादच ठरतो. गोकुळांत वृक्षांचा अवतार घेण्याची इच्छा तर महान ऋषींचीसुद्धा असते. उद्धव म्हणतात– "अहो, त्याग करणे कठीण असे स्वजन आणि आर्यमार्गाचा त्याग करून, वेदांनी सुद्धा शोधण्यायोग्य अशी श्रीकृष्णसंगत या गोपींनी मिळविली आहे. अशा गोपींच्या चरणरजाने लाभान्वित अशा वृक्षराशि, लता, औषधि इत्यादी कोणत्याही रूपांत वृंदावनांत माझा जन्म होवो अशी माझी प्रार्थना आहे."

कृष्णाच्या चरणाचा स्पर्श झाल्याबरोबर नलकुबेर आणि मणिग्रीवांना आपले मूळ स्वरूप प्राप्त झाले. दोन्ही वृक्षांचा उद्धार झाला. आता नलकुबेर आणि मणिग्रीव प्रभूची स्तुती करू लागले.

हे प्रभु! आपल्याकडून आम्ही आणखी काही मागत नाही. आमची वाणी आपल्या गुणगानांत रत राहो! आमचे कान आपल्या कथा-श्रवणांत दंग राहोत. आमचे हात आपल्या सेवेत, आमचे मन आपल्या चरणस्मरणांत, आमचे मस्तक आपल्या निवासरूप जगताला प्रणाम करण्यात आणि आमची दृष्टी आपल्या मूर्तिरूप संतपुरुषाचें दर्शनासाठी तत्पर राहोत. हे नाथ! बस्स, एवढीच कृपा आपण आमच्यावर करा.

ही प्रार्थना आम्ही सर्वांनी सुद्धा केली पाहिजे.

आमची वाणी श्रीकृष्णाचे कीर्तन करीत राहो, डोळे श्रीकृष्णाचे दर्शन घेत राहोत आणि मन श्रीकृष्णाचे ध्यान करीत राहो. आम्ही आपल्या प्रत्येक इंद्रियाला भक्तिरसाचे दान केले पाहिजे.

नलकुबेर आणि मणिग्रीवांनी आपल्या प्रत्येक इंद्रियासाठी भक्तिरसाचे दान मागितले आणि स्तुति करीत करीत गोलोकवासी झाले.

गोलोकधामांत श्रीकृष्णलीला नित्य होत असते. ते दोघेही स्निग्ध आणि मधुकंठ झाले. ते दोघेही तेथे रोज कीर्तन करतात. स्निग्ध-मधुकंठ म्हणाले, अक्रूर श्रीकृष्णाला मथुरेला घेऊन जात आहे. यशोदा हे ऐकून व्यग्र होऊन गेली. तर स्निग्ध-मधुकंठ म्हणाले, 'माते! ही पृथ्वीवर रचलेली लीला आहे. कृष्ण तर तुझ्या मांडीवरच आहे.'

योगमायेने दोन्ही वृक्षांना पडू दिले नव्हते. नलकुबेर आणि मणिग्रीव गोलोकधामी पोचल्याबरोबर दोन्ही वृक्ष धाडकन् पडले. भयानक आवाज ऐकून गोपी धावतच आल्या. भगवंताच्या दयेने कान्हा वाचला आहे.

नंदबाबासुद्धा धावत आले. त्यांनी पाहिले तर कान्हा मुसळाला बांधलेला होता. कोणी बांधले याला? कोणी त्याला सोडीत का नाही? त्यांनी कृष्णाला बंधनमुक्त केले.

नंदबाबा म्हणाले– बाळ, तुला आपल्या आईने बांधले होते ना? पहा तर मी तुला सोडवले. तू कोणाचा मुलगा आहेस?

कृष्ण– आजपर्यंत मी आपल्या आईचा मुलगा होतो. आता आजपासून मी तुमचा मुलगा आहे.

नंदबाबांची फार दिवसांची इच्छा होती की कृष्णाने एकदा म्हणावे कीं मी तुमचा मुलगा आहे. आज त्यांची इच्छा पूर्ण झाली.

नंदबाबा यशोदेला रागे भरू लागले. कृष्णाला तू बांधलेसच कां? तुला जरासुद्धा दया आली नाही? यशोदेला वाटले, आज सगळेच तिच्यावर रागावत राहणार आहेत. माझी तशी तर कांही त्याला बांधायची इच्छा नव्हती. पण याला चोरी करायची सवय लागली आहे. अशी वाईट सवय सोडविण्यासाठीच मी त्याला बांधले होते. मी त्याला प्रेमामुळेच तर बांधले होते.

यशोदा मुलाला आपल्याजवळ बोलावू लागली, तर त्याने यायचे नाकारले. मी तुझा नाही, नंदबाबांचा मुलगा आहे.

यशोदा विचार करू लागली की गोपी आणि बालगोपाळांनी रडून रडून मला 'नको बांधू' सांगितले होते, तरी पण मी निष्ठुर होऊन मुलाला बांधले. कान्हा रुसला आहे. ती स्वतःच रडू लागली – केव्हां माझा बाळ माझ्या मांडीवर येईल?

कृष्णाने पाहिले की आई रडत आहे.

वैष्णवाचे रडणे भगवंताला पाहवत नाही. श्रीकृष्णासारखे प्रेम आणखी कोणी करू शकत नाही. श्रीकृष्णासाठी जे एकांती रुदन करतात त्यांना तो येऊन भेटतो.

आईचे रडणे बाळकृष्णाला पाहवले नाही. तो धावतच आईच्या मांडीवर आला आणि पीतांबराने आईची आसवे पुसू लागला. माझा बाळ किती किती शहाणा आहे! मी तुला बांधले हे चांगले केले नाही. बेटा, तू हे मनांत ठेवूच नकोस. हा सगळा प्रसंग तू विसरून जा.

कान्हा – आई! मी सगळं कांही विसरून जाईन, पण तुझे प्रेम विसरणार नाही. मी थोड्याच दिवसांनी द्वारकेचा राजा होईन. तिथे सुद्धा मी तुझ्या प्रेमाचे हे बंधन आठवणीत ठेवीन. रुक्मिणी इत्यादी कोणाच्याच बंधनांत मी राहणार नाही. परंतु तुझ्या प्रेमाचे बंधन मला विसरता येणार नाही.

ही तर गोकुळांतली एक मुख्य लीला आहे. ज्ञानी ईश्वराचा साक्षात्कार करून घेऊ शकतो. पण त्याला बांधण्याची शक्ती ज्ञानांत नाही. भगवंताला तर केवळ भक्तीच बांधू शकते. ज्ञानी ब्रह्माचे चिंतन करता करता ब्रह्ममय होऊ शकतो, पण भगवंताला वश भक्तीच करू शकते. तप आणि ज्ञानापेक्षा भक्तीच श्रेष्ठ आहे.

परमात्मा जीवमात्रावर आपल्या प्रेमाचा वर्षाव करतात. परंतु जीव असा दुष्ट आहे कीं प्रभूवर तो प्रेमच करीत नाही. प्रभूविषयी प्रेम जागृत करण्यासाठी प्रभूच्या उपकारांचे पुनःपुन्हा स्मरण करा. मी भगवंताचा ऋणी आहे. त्यांच्या कृपेमुळे हे थोडेफार सुख मिळवू शकलो आहे. असा विचार पुनःपुन्हा कराल तर प्रभूवर प्रेम जडेल.

प्रास स्थितींत संतोष मानाल तर प्रभुप्रेम जन्माला येईल. परमात्म्यापाशी काही मागू नका. परमात्मासुद्धा कोणाहीकडून प्रेमाशिवाय आणखी काही मागत नाही. जीव मला प्रेम देईल तेवढेच पुरे.

प्रभूजवळ काही मागू नका. त्याच्या उपकारांचे नेहमी स्मरण ठेवा. मनुष्याचे प्रेम घरदार, कुटुंब इत्यादींत विभागलेले असते म्हणून परमात्मा प्रसन्न होत नाही. लोक देवाला नमस्कार करताना भगवंताची नाही पण आपल्या कपड्यांचीच विशेष काळजी घेत असतात. अरे, कपडे बिघडले तर बाजारातून दुसरे आणता येतात पण हृदय बिघडले तर बाजारात दुसरे मिळत नाही.

ज्ञानी भक्त प्रेमाच्या दोरीने प्रभूला बांधतात. भगवंत प्रेमानेच वश होतात. इतर कोणत्याही बळाने नाही. भागवतांत हास्य, करुण, शृंगार, वीर इत्यादी सर्वच रस तर आहेत. इतकेच नव्हे तर

दहावा रस— भक्तीरस देखील काठोकाठ (पुरून उरेल इतका) भरलेला आहे.

भक्तिरस इतर रसांपेक्षा अत्युत्तम आहे. रामचरितांत रामचंद्र म्हणतात— केवळ भक्तीच मला आर्द्र करू शकते. भक्तीला इतर कोणत्याही आधाराची आवश्यकता नाही. ती तर स्वतंत्र आहे. ज्ञान-विज्ञान इत्यादी सर्वच ह्या भक्तीच्या आधीन आहेत.

असा आहे भक्तीचा महिमा. ज्ञानी मायेने युक्त ब्रह्माचे दर्शन करतात. ज्ञान्याला कीर्ति इत्यादीची इच्छा असते.

निरावृत्त-आवरणरहित ब्रह्मसाक्षात्कार तर फक्त गोपींनाच झाला. जोपर्यंत जीव निर्दोष होत नाही तोपर्यंत ईश्वराचे दर्शन होऊ शकत नाही.

साधु होण्याची नाही, तर सरळ होण्याची आवश्यकता आहे. आंतील विकारांना दूर करावेच लागेल.

दोन्ही वृक्षांचा तर उद्धार झाला, पण त्या मुसळाचा उद्धार का झाला नाही?

श्रीकृष्ण दोन्ही वृक्षांच्या मधून पार निघून गेले होते, तर मुसळ वाकडे होऊन अडकून राहिले होते. प्रभूंनी वृक्षांच्या आत प्रवेश केला म्हणून त्यांचा उद्धार झाला. ज्याच्या अंतर्देशांत प्रभूचा प्रवेश होतो त्याचा उद्धार होत असतो. ते जर आमच्या अंतर्यामी येतील तर आमचाही उद्धार होईल.

दामोदरलीलेद्वारे भगवंत जगाला सांगतात की जेव्हा जीव मला बांधतो तेव्हां मी त्याला बंधनांतून सोडवतो.

शुकदेव वर्णन करीत आहेत—

कित्येक वेळा गोपी यशोदेच्या घरी येऊन कान्ह्याला आपल्या घरी घेऊन जाण्याविषयी म्हणत असत—

कान्ह्या! तू आमच्या येथे येशील? तर कन्हैया म्हणे— 'तुमच्या घरी येईन, पण तुम्ही मला काय द्याल?' गोपी विचारीत, 'काय पाहिजे तुला?' तर कान्हा आपले हात पसरून सांगे, 'इतके? तर गोपी विचारीत, एवढे मोठे लोणी तू कसा खाऊ शकशील?'

कान्हा— मी तर काहीच खाणार नाही. मला आपल्या मित्रांना वाटायचे आहे, त्यांना खाऊ घालायचे आहे.

ईश्वर इतरांना देऊन प्रसन्न होतात, खाणाऱ्यापेक्षा इतरांना प्रेमाने खाऊ घालणाऱ्याला जास्त आनंद मिळतो. मन लोण्यासारखे मऊ आणि जीवन खडीसाखरेसारखे गोड झाले तर कान्हा अवश्य घरी येईल.

गोपीने विचार केला की याला लोणी देईन तर हा ते घेऊन लगेच निघून जाईल. याला काही वेळ अडकवून ठेवला पाहिजे. म्हणाली— 'कृष्णा! लोणी फुकट नाही मिळायचे. तुला माझ्या घरचे काम करावे लागेल.' कान्ह्याने विचारले— 'कोणते काम? गोपी म्हणाली, जा, तो पाट घेऊन ये. तसा तो होता वजनदार, पण कान्ह्याला वाटले तो उचलून आणीन तर सगळ्या बालगोपालांना लोणी खाऊ घालू शकेन. पाट वजनदार होता, तो हातातून पडला आणि कान्ह्याचा पीतांबरही सुटला.

ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यानंतर देखील अविद्येचा अंश शिल्लक राहतो. कारण प्रारब्ध कर्म भोगावेच लागते. अज्ञानाचा संपूर्ण नाश झाला तर प्रारब्ध कर्म कोण भोगेल? ब्रह्मज्ञानाने प्रारब्ध कर्माचा नाश होत नाही. ब्रह्मज्ञानाने क्रियमाण आणि संचित कर्मांचा नाश होतो. जोपर्यंत या देहाचे प्रारब्ध आहे तोपर्यंत अविद्या शिल्लक राहते. प्रारब्धकर्म भोगल्यानंतरच त्याचा नाश होतो. ज्ञान्याला ब्रह्मसाक्षात्कार

झाल्यानंतर अविद्येचा अंश शिल्लक राहतो आणि काही आवरणासह साक्षात्कार होतो. परंतु व्रजभक्तांना तर निरावृत्त श्रीकृष्णाचे दर्शन होते.

तसे तर दुर्योधनाला सुद्धा श्रीकृष्ण भगवंताचे दर्शन झाले होते. परंतु मध्ये मायेचे आवरण होते म्हणून त्याचा उद्धार होऊ शकला नाही.

पाट आणला आणि लोणी मागितले तर गोपी म्हणाली– कृष्णा, तू थोडासा नाच तर खरा. लोण्याच्या लालचीने कृष्ण आता नाचू लागला. जगाला नाचविणारा नटवर कान्हा गोपीच्या प्रेमानें वश होऊन स्वतःच नाचत आहे.

गोपींच्या प्रेमाने बांधले गेलेले श्रीकृष्ण त्यांच्या घरचे काम करीत आहेत. गोपींच्या डोक्यावर पाण्याच्या घागरी चढवीत आहेत; सामान इकडून तिकडे करण्यात मदत करीत आहेत, आणि त्यांच्या मनोरंजनासाठी नाचत पण आहेत.

व्रजातील या लीलांमधे ज्ञान-वैराग्य नाही, प्रेमभावच मुख्य आहे.

या लीलांमध्ये एक माळीणीचा प्रसंग आहे. व्रजांत एक सुखिया नावाची माळीण होती. ती दररोज कृष्णकथा ऐकायची. भक्ति तिच्यासाठी एक व्यसनच झाले होते.

तुकारामांना देखील व्यसनरूपी भक्ति सिद्ध झाली होती. त्यांनी म्हटले आहे–

सगळ्या इंद्रियांना अशी एक सवय होऊन गेली आहे की ईश्वराचे भजन केल्याशिवाय ती राहू शकत नाहीत.

माळीणीचे प्रेम हळूहळू वाढू लागले. श्रवणभक्ती एका व्यसनासारखी होऊन गेली.

एका भक्तीचेच व्यसन सिद्ध करा. इतर सगळी व्यसने भक्तिमार्गात बाधक आहेत. म्हणून भक्तीलाच व्यसन करा. "विद्या व्यसनम्" अथवा "हरिपादसेवनम् व्यसनम्" ज्याला सेवा आणि स्मरणाचे व्यसन आहे तोच खरा वैष्णव आहे. कान्हा कानातून, डोळ्यांतून ह्रदयात उतरत असतो. कृष्णकथा पुनःपुन्हा श्रवण केल्यावरच कृष्णाच्या दर्शनाची उत्कंठा होते.

कृष्णाच्या दर्शनासाठी सुखिया येते.

## १४. आर्त सुखिया माळीणीला बाळकृष्णदर्शनः

अधिकाराशिवाय भगवंताचें दर्शन होत नाही. जर सुखोपभोग, चैन करण्याची इच्छा राहील तर भगवंताचे दर्शन होणार नाही. जीव जेव्हा पूर्णपणे निष्काम आणि निर्वासनामय होतो तेव्हाच तो दर्शन देतो. ईश्वरदर्शनाशिवाय इतर कोणतीही वासना सूक्ष्मरूपाने शिल्लक असेल तर ईश्वर दर्शन देणार नाही.

सुखिया माळीण दररोज नंदबाबांच्या अंगणात येऊन उभी राहात असे. परंतु कान्हा बाहेरच येत नसे. तेव्हा तिने एका ब्राह्मणाला कृष्णदर्शनाचा उपाय विचारला. भूदेव प्रसन्न झाले. विचार केला की हा एक जिज्ञासु आणि सुपात्र जीव आहे. त्यांनी सुखियाला सांगितले की आपल्या घरात बाळकृष्णाची सेवा, साधना, स्मरण करीत राहशील तर तो प्रसन्न होईल.

ईश्वराला वश करण्याचे एक चांगले साधन सेवा-स्मरण आहे. सेवा-स्मरणाचा आग्रह ठेवा, ईश्वरदर्शनाचा नाही. जीवाला पात्रता आल्याबरोबर ईश्वर त्याला दर्शन देतो. मोठमोठ्या दाढीमिशावाले साधू देखील दर्शनासाठी येत. कान्ह्याला वाटे की या साधूंची दाढी जितकी बाहेर तितकीच आंतही असू शकते. आतील कामविकार कदाचित अजूनही शिल्लक असतील. यशोदा केव्हा केव्हा बळेच

त्याला बाहेर ओढून आणी. तेव्हा तो आपले तोंड फिरवून आईच्या पदरात लपवून घेत असे. ते साधू तोपर्यंत मुखदर्शन घेण्याच्या पात्रतेचे झालेले नसत.

भगवंत तर तनूचेही जाणतात आणि मनातलेही. पात्रता आल्याशिवाय जीवाला ईश्वराचें दर्शन होऊ शकत नाही.

माळीण म्हणाली, मी सेवा कशी करू? मी तर गरीब आहे.

भूदेव– तू दररोज २१००० वेळा माळ जप. काही साधन तर करावेच लागेल. साधन करता करता जीव जेव्हा नम्र होऊन आसवे गाळू लागतो तेव्हा ईश्वर कृपा करतो.

कथा श्रवण केल्यावर काही व्रत, नियम पाळा. कथा मार्गदर्शिका आहे. कथा श्रवण केल्यावर काहीतरी व्रत कर. माळीणीला नानाप्रकारची साधने सांगितली, परंतु ती सर्व तिला अनुकूल नव्हती. मग भूदेवांनी सांगितले– तुला आणखी काही करता येत नसेल तर नंदबाबाच्या घराला दररोज १०८ प्रदक्षिणा घालत जा.

नमस्कार साष्टांग करायचा असतो आणि प्रदक्षिणा चतुरंग. प्रदक्षिणा करताना हात जोडून नमस्कार करीत प्रभूचे नाम जपत रहा. भजन करता करता हळू हळू प्रदक्षिणा घालावी. काही लोक अशी धावत धावत प्रदक्षिणा करतात की जणू काही त्यांच्या मागे एखादे भूतच लागलेले आहे. प्रदक्षिणा करताना अशी धावपळ कामाची नाही.

तीन वर्षेपर्यंत हा प्रदक्षिणेचा नियम चालू ठेव. कान्हा अवश्य दया करील. तेव्हा ती माळीण अशा प्रकारे प्रदक्षिणा करू लागली.

मनुष्य आपली दैनिक कार्ये तर अगदी नियमाने करतो. झोप आणि जेवण यात तर तो अगदी नियम बाळगतो. परंतु भजनात मात्र त्याची नियमितता कोठल्या कोठे जाते.

भजन केल्याशिवाय खाणारा पाप खातो. मनुष्य जेवढी देखरेख आपल्या कपड्यांची करतो तेवढी देखरेख जर आपल्या मनाचीसुद्धा करील तर ते मलीन होणार नाही.

सत्कर्मांत नियमितता असली पाहिजे. नियमित सत्कर्म करणाराच संत असतो. नियम पालन करणाऱ्याची देव परीक्षा पण घेत असतो.

माळीण परमात्म्याला रोज आळवीत असे, "नाथ दर्शन द्या."

तीन वर्षे पूर्ण झाली! आता तर कृष्णविरह असह्य झाला आहे. तिचे मनही शुद्ध झाले. आज तिने निश्चय केला आहे की जोपर्यंत कान्ह्याचे दर्शन होणार नाही तोपर्यंत नंदबाबांच्या अंगणातून जाणारच नाही.

जेव्हा जीव प्रभूच्या वियोगरूपी अग्नीमध्ये होरपळू लागतो तेव्हा परमेश्वर येऊन भेट देतो.

आपल्या डोक्यावर फुला-फळांची टोपली ठेवून सुखिया माळीण प्रदक्षिणा करू लागली. परमात्म्याला शबरीची बोरे आठवली. दर्शनातुर माळीणीला मला दर्शन दिले पाहिजे. कटीवर सोन्याचा करगोटा, हातात बाजुबंद, गळ्यात कंठी, पायात पैंजण, मस्तकावरच्या मोरपिसाच्या मुकुटाने विभूषित बालमुकुंद छुमक छुमक करीत अंगणात आला.

दर्शनातुर माळीणीच्या समोर येऊन हात पसरून बाळकृष्ण फळे मागू लागला. बाळकृष्णाशी बोलण्यासाठी माळीण देखील आतुर होती.

आपल्या सुखदुःखांच्या गोष्टी कान्ह्याला एकांतात सांगा. आपल्या दुःखाची कथा कृष्णाशिवाय आणखी कोणाला सांगू नका. तो तुम्हाला सुख देईल.

माळीणीने विचार केला की जर कृष्णाच्या हातात फळे ठेवून देईन तर तो लागलीच घरात निघून जाईल. म्हणून ती त्याला गोष्टी सांगून थांबवू लागली. मी फळे द्यायला नाही विकायला आलेली आहे. फळ घे आणि मला धान्य दे. मग तिला वाईट वाटले की धान्य मागितलेच का? तिला काही मूलबाळ नव्हते. जर माझ्या घरी पुत्र झाला तर! मी फारच पापिणी आहे. कान्हा फार दयाळू आहे. तो जर माझ्या मांडीवर आला तर मी त्याच्यावर प्रेम करीन.

बाळकृष्ण धावतच जाऊन दोन मुठी तांदूळ घेऊन आला आणि माळीणीच्या टोपलीत ठेवून दिले. आता तर फळे दे. माळीण म्हणाली, माझ्या मांडीवर तर बस बाळा. तर कान्हा टुणकण उडी मारून तिच्या मांडीवर जाऊन बसला. आता माळीणीची इच्छा पूर्ण झाली. ब्रह्मसंबंध संपन्न झाला. हजारो वर्षांचा विरही जीव आज ईश्वराला जाऊन मिळाला.

प्रेमात कधी तरी तृप्ति होते का?

कान्हा म्हणाला— मी तर सगळ्यांचाच बालक आहे, पिता आणि मातासुद्धा आहे. माझ्याशीं जो जसे प्रेम करील तसेच त्याला मिळेल.

माळीणीने बाळकृष्णाला खूपच चांगली गोड फळे दिली. दोघांनाही आनंद झाला. फळे मिळाल्याबरोबर बाळकृष्ण पळत पळत घरात निघून गेला.

माळीणीने प्रभूला प्रार्थना केली की कोठे आपल्या कान्ह्याला आपलीच दृष्ट न लागो.

आपली टोपली घेऊन सुखिया घरी परत आली. टोपली डोक्यावरून काढली तर तिला दिसले की टोपली रत्नांनी भरलेली आहे. तिला फारच सुखद आश्चर्य वाटले. माझ्या जन्मजन्मांचे दारिद्रय दूर होऊन गेले.

ईश्वराला फळे द्याल तर तो तुम्हाला रत्ने देईल. परमेश्वर जेव्हा देतो तेव्हा तो छप्पर फाडून देतो. मनुष्य देताना काही संकोच करतो. परंतु प्रभु तर अनेकपट जास्त देतात.

जो मनुष्य आपली सत्कर्मरूपी फळे भगवंताला अर्पण करतो त्याची जीवनरूपी टोपली तो सुखसोईंच्या रत्नांनी भरून देतो. भगवंत त्याला ब्रह्मविद्यारूपी रत्न सुद्धा देतात. सुखिया माळीण जीवाचे प्रतीक आहे. जीवापासून परमात्मा सत्कर्म, पुण्याची फळे मागतो. जर तुम्ही सत्कर्मरूपी फळे भगवंताला द्याल तर तो त्यांचे अनेकपट करून तुम्हाला देईल.

भगवंत कोणत्याच कर्जाचा भार आपल्यावर ठेवीत नाहीत. ते सव्याज परत करतात.

हे अर्जुन! तू जे काही कर्म, भोजन, हवन, दान, तप इत्यादी करशील ते सर्व मला अर्पण कर, तेव्हा तुला मी प्राप्त होईन— **"मामुपैष्यसि."**

सगळीच कर्मे भगवंताला अर्पण करा. केलेल्या कर्माचे पुण्यफळ कृष्णार्पण करा. फळ स्वतः भोगायची इच्छा करू नका. जो आपले कर्मफळ भगवंताला अर्पण करतो त्याची बुद्धिरूपी टोपली ब्रह्मज्ञानाच्या रत्नांनी भरून जाते. कन्हैया सगळ्यांनाच फळ देतो.

भगवंताची गोकुळातील लीला येथे समाप्त होत आहे.

आता वृंदावनातील लीलेचा आरंभ होत आहे.

भारतभूमि कर्मभूमि आहे. इतर देश भोगभूमि आहेत. आमच्या येथे कर्माप्रमाणें फळ मिळत असते.

प्रत्येक कर्म परमात्म्याची आज्ञा समजून पूर्ण करा.

भक्ती आणि कर्मात तसं काहीच अंतर नाही. प्रभूला प्रसन्न करण्यासाठी केले गेलेले कर्मच

भक्ती होय. कर्मात फलेच्छा असणे कपट आहे. फलेच्छेविना केलेले कर्मच भक्ती असते. जो प्रत्येक कर्म ईश्वराच्या हेतूने करतो त्याची सगळी कर्मे भक्ती बनून जातात. कर्म करताना भगवंतासाठीच करण्याची निष्ठा ठेवली पाहिजे. कर्म करताना मन ईश्वराशी संलग्न राहील तर प्रत्येक क्रिया भक्ती होत राहील. व्यवहार अतिशय शुद्ध ठेवाल तर तो सर्व व्यवहार भक्तीच होईल.

पाप करताना मनुष्य ईश्वराला विसरतो. ईश्वर सर्वव्यापी आणि सर्वत्र आहे असे मानाल तर पाप करू शकणार नाही. व्यवहार आणि भक्तींत अंतर नाही. ईश्वराचा भाव ठेवून केला गेलेला व्यवहार भक्तीमय असतो. जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत व्यवहार अनिवार्य आहे. प्रत्येक कर्माला भक्तीमय करा. भोजन करताना सुद्धा असे समजा कीं नारायणच आहार घेत आहेत. असें अनुसंधान झाल्यावर जेवणसुद्धा भक्ती होते.

व्यवहार, भक्ती आणि ज्ञानमय करा. ईश्वरापासून कधीही दूर जाऊ नका. केव्हांही रिकामटेकडे राहू नका. रिकामटेकड्या हातानें पाप होते. कामकाज करण्याच्या सवयीचा एकाएकी त्याग कराल तर शरीर पापाचार करू लागेल. म्हणून प्रवृत्तीमय राहून सर्वच प्रवृत्तींना ईश्वरमय करा.

कर्महीन-सुस्त व्यक्तींच्या मनांत पाप आणि विकार जागृत होतात म्हणून सतत सत्कार्य करा. घरसंसार चालविण्यासाठी तर कामधंदा-नोकरी करावीच लागते. परंतु त्याही प्रवृत्तींच्या वेळीं ईश्वराला विसरू नका. दर तासाच्या आरंभी कांही क्षण ईश्वराचें ध्यान करीत राहाल तर पापापासून दूर राहू शकाल. ईश्वराने दिलेल्या स्थितींत आनंद आणि संतोष माना. आपल्या सर्वच प्रवृत्तींचें ईश्वराशी संधान बांधून ठेवा. सर्वच कार्यें ईश्वराची आज्ञा समजून करीत रहा. कर्माच्या फळाची इच्छा ठेवू नका. कर्माचें कसें केव्हां किती फळ द्यावे याचा परमेश्वर विचार करील.

कर्म सद्भावनेने करा. जसा ध्वनि तसाच प्रतिध्वनि! जे वर्तन तुम्हाला अप्रिय वाटेल तसें वर्तन दुसऱ्याशी करू नका. जर तुम्ही कोणाही जीवाबद्दल कुभाव, द्वेष, असूया ठेवाल तर तुम्हाला सुद्धा बदल्यांत तो तेच सर्व कांही देईल. शरीर थकूनभागून अगदी चूर होईपर्यंत काम करा. जर शरीर चांगले थकले नाही तर झोप येणार नाही, आणि मनांत वाईट विचार येत राहतील. सत्कर्म करीत थकून जाण्याने झोपही चांगली येईल. अशी झोपसुद्धा भक्ती होईल.

जर कर्मफळ ईश्वराला अर्पण करीत राहाल तर तो ते अनंत पट करून परत करील. असा अनुभव जर आला नाही तर समजा कीं तुमच्या कर्मांतच कांही न्यूनता आहे. पूर्वजन्मांतील संस्कार आणि वासना जळून गेल्यावर, केलेल्या कर्मानि आनंदाची प्राप्ति होईल. कर्माचें फळ केव्हां मिळेल हें सांगता येत नाही. त्या सुखिया माळीणीसारखी आपली सर्वच कर्में ईश्वराला अर्पण करीत रहा. तो तुमच्या टोपलींत (बुद्धींत) सद्भाव आणि ज्ञानाची रत्नें भरून देईल.

देव मंदिरांत नाही तर आपल्या ह्रदयांत बसला पाहिजे. त्याला मंदिरांत स्थापन करून आमचें मन शांत होणार नाही. बुद्धींतून विषयांचा केरकचरा काढून टाकून आम्हाला तेथे देव स्थापन करायचा आहे. आम्ही ज्याप्रकारे सांसारिक विषय मनांत जपून ठेवतो त्याऐवजी प्रभूला तिथे स्थान द्याल तर शांति मिळेल. आणि जीवन कृतार्थ होईल.

**१५. वृंदावनलीला, वत्स-बक-अघ असुरांचा वध :**

बाळकृष्ण पांच वर्षांचे झाले आणि त्यांना वृंदावनांत जाण्याची इच्छा झाली.

गोकुळांत जे उत्पात सुरू झाले होते त्यांनी व्यथित होऊन उपनंद काकांनी सुचविले कीं बालकांबरोबर

दुसऱ्या गावीं निघून गेले पाहिजे. इथून थोड्याच अंतरावर असलेले वृंदावन गांव राहण्यायोग्य आहे. 'वनं वृंदावनं नाम।' सगळ्यांनीच ह्या प्रस्तावाला अनुमोदन दिले. बलराम आणि कन्हैया देखील तयार झाले. तिथे खेळांत मौज येईल. राम-कृष्णासह सर्वच तेथे राहायला आले. पांच वर्षे झाल्यावर लाड कांही प्रमाणात कमी केले पाहिजेत. बालकांना धर्मभीरू, संस्कारी करण्यासाठी लहानपणापासूनच धार्मिक शिक्षण दिले पाहिजे. एकादशीच्या दिवशीं त्याला अन्नाहार देऊ नये. आपल्या मुलांवर चांगले संस्कार न करणारे मातापिता त्यांचे वैरी आहेत. भक्ती आणि वैराग्याचे शिक्षण न देणारे मातापिता त्या मुलांचे शत्रू होत.

बालकांचें बालपणीं ह्रदय फारच कोमल असते, म्हणून त्यांच्यावर केलेले संस्कार त्यांच्या मनांत चांगले ठसून जातात. त्यांच्यावर बालपणीं चांगले संस्कार केले तर यौवनांत त्यांचे मन भ्रष्ट होणार नाही आणि आयुष्यभर सन्मार्गी राहील.

उपनंद काका कृष्णाला वृंदावनांत घेऊन गेले.

ज्याला ज्ञानवृद्ध संतांचा आधार असतो तो पतनाच्या गर्तेंत पडू शकत नाही. कोणा एकाचा हात धरून चालले असता पडण्याची भीती राहात नाही. ईश्वराचाच हात धरून चाला.

वृंदावनांत एकटे नाही तर वृंद घेऊन जा. इतरांना सुद्धा सत्कार्याची प्रेरणा देत रहा.

गोप-ग़ोपी सगळेच वृंदावनांत गेले. वृंदावनांत यमुनेच्या काठीं गोवर्धन पर्वत पाहून रामकृष्ण आणि सर्वच बालगोपालांना मोठा आनंद झाला. तेथे येऊन भगवंत वत्सपाल झाले. बालमित्रांच्या बरोबर वासरे चारायला घेऊन जाऊ लागले. यमुनेच्या काठीं ते नाना प्रकारचे खेळ खेळत असत.

कृष्ण अकराव्या अध्यायांत वत्सगोपाळ आहेत, आणि पुढे गोपाळ.

केव्हां केव्हां बासरी वाजवून आणि निरनिराळ्या प्रकारचे खेळ खेळून कृष्ण गोपबालांना आनंद देत असत.

जीवमात्राला कृष्णाच्या बासरीची मधुर तान बोलावीत असते. परंतु मोहक विषयांमधे अडकलेला जीव बासरीची धून ऐकूच शकत नाही.

यमुनेच्या (भक्तीच्या) काठावर दोन बाधा येत असतात. एक आहे वत्सासुर (अज्ञान, अंधश्रद्धा) आणि दुसरी आहे बकासुर (दंभ). भक्तीच्या किनारी दंभ येऊन बसतो. त्याच्या लोभांत अडकू नका. दंभासारखे कोणते पाप नाही. इतर पापांसाठी प्रायश्चित्त घेता येते, दंभासाठी कांहीच नाही. ज्याचें बाह्य स्वरूप तर चांगले दिसते परंतु अंतर्याम आणि करणी मलीन असते तो बकासुरच नाही का ?

बगळ्याची चोच म्हणजे लोभ. कीर्ति आणि धनाचा लोभ आपल्या बरोबर दंभही घेऊन येतो. यमुनेच्या काठी बगळारूपी दंभ आल्याबरोबर सगळा खेळ बिघडून जातो. भगवंतांनी बकासुराचा आणि वत्सासुराचा वध केला.

एकदा श्रीकृण आपल्या बालमित्रांबरोबर वासरे चारीत खेळ खेळत होते. ज्यांना श्रीकृष्णाबरोबर खेळण्याची संधी मिळाली त्या बालकांच्या सद्भाग्याचें वर्णन कोणत्या शब्दांत करावे ? ज्याच्या दर्शनासाठी योगी आणि ऋषिमुनि आर्त असतात त्याच परब्रह्माबरोबर गोपबाळें खेळत आहेत.

सर्वच बालगोपाळ खेळांत दंग होते. इतक्यांत तेथे अघासुर आला. त्याला कंसानें पाठविलें होते. तो बकासुर आणि पूतनेचा छोटा भाऊ होता.

जिथे अज्ञान आणि दंभ असतो तेथे पाप येऊन थडकते.



अघासुर अजगराचें रूप घेऊन आला आणि सर्वच गोपबाळांना गिळण्याच्या हेतूनें वाटेंत पडून

राहिला. त्याच्या उघडलेल्या विशाल तोंडाला पर्वताची गुहा समजून ती मुले त्यांत शिरायचा विचार करू लागली. ती मुलें कान्ह्याला म्हणाली, तू सुद्धा आमच्याबरोबर आंत येशील तर आम्हाला भीती वाटणार नाही.

आजकालचे लोक धनसंपत्तीला आपल्या छातीशी चिकटवून ठेवतात, परंतु प्रभूला दूरच ठेवतात. एकटे कोठेच जाऊ नका. देवाला नेहमी आपल्याबरोबर ठेवा. देवाला बरोबर ठेवणें म्हणजे कांही त्याची मूर्ति किंवा फोटो खिशांत ठेवून राहणें नाही. परंतु त्याला आपल्या ह्रदयांत अंतःकरणांत ठेवून असा. त्याचें सतत स्मरण करा. त्याच्याच सान्निध्याचा अनुभव घेत रहा.

मुले जाणत होती कीं कान्हा बरोबर असेल तर भिण्याचें कांही कारण नाही. कृष्णाला घेऊन ती सर्वच गवळ्यांची मुले नाचत कुदत आंत शिरली. त्यांच्या रक्षणासाठी कृष्ण देखील अघासुराच्या मुखांतून त्याच्या उदरांत गेले.

भागवतांत समाधिभाषेचा फार प्रयोग केला आहे. लौकिक आणि परमत भाषा गौण आहे. समाधिभाषेचा अभ्यासू भागवताचा अर्थ समजू शकतो. विलासी माणसाला भागवताचा अर्थ समजणें कठीण आहे. जेव्हां नादब्रह्म आणि नामब्रह्म एक होते तेव्हां परब्रह्माचें दर्शन होत असते.

पोटांत जाऊन भगवंतांनी विशालरूप धारण केले त्यामुळे अजगराचें अंग फाटून गेले. अघासुराचें प्राण ब्रह्मरंध्रांतून बाहेर निघून गेले. सर्वच मुले बाळकृष्णाबरोबर सुखरूप बाहेर निघून आली.

अघ शब्दाचा अर्थ पाप असा आहे. अघासुर पापाचेंच स्वरूप आहे. जो पापांत रममाण होतो. तोच अघासुर होय. पाप करण्यांत सुख मानणारी व्यक्ति अघासुरच असते. पुष्कळ वेळा पापी मनुष्य सुखांत जगत असलेला दिसतो. पण हे पापामुळे नव्हे, तर त्याच्या पूर्वजन्माच्या कांही पुण्यामुळेच असे होत असते. नाहीतर पापाचा परिणाम तर दुःखच आहे.

पापी कधी सुखी झालेला नाही आणि कधी सुखी होणारही नाही. कोणी पुण्यवान दुःखी असलेला दिसला तर समजा कीं त्याच्या एखाद्या पूर्वजन्मीच्या पापाचें फळ त्याला मिळत आहे. पुण्याचें फळ दुःख नाही. पापाच्या जाळ्यांतून सुटणें सोपे नाही. पापाची जाणीव झाल्यावर सुद्धा मनुष्य पापकर्म सोडू शकत नाही. जोपर्यंत पुण्याचें बळ वाढत नाही तोपर्यंत पाप करण्याची सवय सुटत नाही. पापाची सवय मोठी वाईट असते. पापाला मनांत केव्हांच राहू देऊ नका. मनुष्य शरीरापेक्षा जिभेने, जिभेपेक्षा डोळ्यांनी, आणि डोळ्यांपेक्षा मनाने जास्त पाप करीत असतो. जोपर्यंत इंद्रियांना पाप करण्याची सवय आहे तोपर्यंत भक्तिरस मिळत नाही. इंद्रियरूपी घागरींमधे जर भक्तिरस भरायचा असेल तर प्रथम त्यांना निष्पाप करा. जर पाण्याने भरलेल्या घागरींत दूध भरायचे असेल तर प्रथम त्यांतील पाणी ओतून टाकले पाहिजे.

आत्मा आणि इंद्रियें इतकी एकरूप होऊन जातात कीं इंद्रियांचें पाप आत्मा पाहूच शकत नाही. मनांत पापाचा विचार येताक्षणीच त्याला बाहेर काढून टाका. जर पाप घडले तर मोठ्या नम्रतेने परमेश्वराची माफी मागा.

अघासुर अजगराचें रूप घेऊन येतो आणि बेसावध व्यक्तीला गिळून टाकतो.

इतरांची निंदा, कुजबूज इत्यादींसारखे कोणते पाप नाही. मनुष्य आपलेच भले करण्यांत मग्न झालेला असतो. तो आपलें हित साधताना इतरांची किती ह्यानी होत असेल याचा विचारही करायला तयार नसतो हे पाप आणि हिंसाच आहे.

एकदा का पाप तुमच्या मनांत आणि इंद्रियांत शिरले तर ते तुम्हाला सोडणार नाही. ज्याच्या

घरांत, मनांत पाप येऊन बसते त्याच्या घरीं किंवा मनांत परमेश्वर केव्हांही येऊ शकणार नाही.

अजगराच्या तोंडांत शिरलेली गवळ्यांची मुले आपोआप बाहेर येऊ शकली नसती. श्रीकृष्णच त्यांना बाहेर काढू शकतात. पापरूपी अघासुराच्या पोटांत पोचलेला मनुष्य आपोआप बाहेर येऊ शकत नाही. कोणी बाहेरील पुण्यशील संत किंवा प्रभूच त्याला बाहेर ओढून काढू शकतो.

पाप आणि साप एकसारखेच. साप चावल्याबरोबर शरीराच्या त्या भागाला जर आम्ही ताबडतोब कापून टाकलें तर त्याचें विष सगळ्या शरीरांत पसरत नाही. त्याचप्रमाणें पापाचा विचार आल्याबरोबर त्याच क्षणीं नष्ट करून टाकाल तर वाचाल. सापाच्या विषाप्रमाणें पाप थोड्याच वेळाकरिता जर आंत राहिले तर मग वाचणें कठीण होते.

पापाचें चिंतन केल्यानें ते मनांत घर करून बसते. पाप पृथ्वीपासून आकाशापर्यंत व्याप्त आहे. अघासुराचा एक ओठ पृथ्वीवर होता आणि दुसरा आकाशापर्यंत पोचला होता.

मन बरोबर बरोबर चालत असते म्हणून पाप सुद्धा तुमच्याबरोबरच वन-पर्वत किंवा जेथे कोठे जाल तिथे येईल.

वासनेच्या प्रवाहांत वाहत जाणारा जीव अंतरात्म्यानें नाही म्हटलें तरी पाप करीत राहतो. वासनेच्या वेगांत ज्ञान वाहून जाते आणि पाप होते. जो पापरूपी अजगराच्या उदरांत जातो तो बाहेर येऊ शकत नाही. पाप फारच आकर्षक असते. पाप करण्याचा प्रसंग आला आणि पापाचार केल्याशिवाय दुसरे गत्यंतरच नसेल तर भगवंताला साक्षीभूत ठेवूनच पाप करावे. याचा अर्थ हा मुळीच समजू नका कीं पापाचार करीतच रहा. परंतु नाईलाज म्हणून पाप करण्याची वेळ येईल अशा वेळीं भगवंताचें स्मरण अवश्य करीत रहा.

जोपर्यंत पाप हृदयांत राहील तोपर्यंत त्याचा नाश होणार नाही. त्याचें तर मूळच कापून काढले पाहिजे.

सगळ्याच क्रिया (प्रगट-अप्रगट) शब्दोच्चार करूनच होत असतात. पापाचाराच्या पूर्वीं त्याचा मनांत उच्चार (विचार) होताक्षणीच नाश करा. प्रथम विचार भ्रष्ट होतो. मग वाणी भ्रष्ट होते. आणि नंतर आचारात भ्रष्टता येते. मनांत पाप आल्याबरोबर मनाला दाटा, त्याला शिक्षा करा. पाप मनांत आल्याबरोबर गार पाण्यानें स्नान करून कीर्तन करा, प्रार्थना करा– हे प्रभु! हा काम, ही वासना, हा लोभ मला त्रास देत आहे; मला सोडत नाही. कृपा करा. मला साहाय्य करा. या वासनेपासून माझी सुटका करा. खऱ्या अंतःकरणापासूनची प्रार्थना प्रभु अवश्य ऐकतील.

संत प्रभूनामाचा उच्चार सतत करीत राहतात. म्हणून त्यांच्याकडून पाप होत नाही.

अघासुराच्या उदरांत जातेवेळीं टाळी वाजवीत अर्थात मनाला जागृत करीत जा.

सगळ्यांनाच ठाऊक असते कीं खोटे बोलणें, कोणाला त्रास देणें, हिंसा करणें इत्यादी पापें आहेत; तरी पण पाप करीतच असतात. पापाला मुळापासूनच उखडून फेका. जेव्हां जेव्हां असे वाटेल कीं आपलें शरीर किंवा मन पाप करणार आहे त्यावेळीं तत्काळ भगवंताच्या नामाचें कीर्तन करू लागा. देवाचें स्मरण करीत करीत पापाची वासना सुटून जाईल. पापाची सवय सोडविण्याचा उपाय आहे प्रभुप्रार्थना.

प्रभु! माझ्या पापवासनेचा नाश करा. मी पाप केलें होते तेव्हां तुम्ही तेथे हजर होताच. मला शिक्षाही करा आणि क्षमाही करा.

मनुष्य स्वतः जाणत असतो कीं तो क्रोधी आहे, कामी आहे. समजूनसमजून पाप करणारा,

पापांत सुख मानणारा, पापांतच रममाण राहणारा अघासुरच होय.

पाप केल्याशिवाय राहवतच नसेल तर भगवंताला साक्षी ठेवा. तो तुम्हाला वाचवील. पण हा नियम कनिष्ठ आहे. उत्तम पक्ष तर हाच कीं पापाचा विचारसुद्धा करू नये.

भोगल्यावाचून ज्याचा नाश होऊ शकत नाही ते पाप असते. पुण्य तर भोगल्यावाचून देखील नष्ट होऊ शकते. पुण्य भोगण्यासाठी जन्म घ्यावा लागतो. आणि जन्म नको म्हणून साधुसंतांना सुद्धा अंतीं पुण्य कृष्णार्पणच करावें लागते.

पुण्य कृष्णार्पण केले जाऊ शकते. पाप नाही. पापाची शिक्षा तर स्वतःलाच भोगावी लागते.

एखाद्या महापुरुषाची, सुपात्र साधु-संताची कृपा झाल्यावरच पापाची वासना नष्ट होऊ शकते.

पुष्कळ वेळा तर अंतरात्म्याची इच्छा नसताना सुद्धा पाप घडते.

गीतेंत अर्जुनानें भगवान श्रीकृष्णाला एक सनातन प्रश्न विचारला आहे–

'अनिच्छेने तरी जीव पापास कां प्रवृत्त होतो? तो पाप कां करतो? इच्छा नसताना सुद्धा त्याला पाप कां करावे लागते?'

भगवान म्हणतात–

'रजोगुणापासून उत्पन्न झालेलें काम आणि क्रोध मनुष्याचे प्रमुख शत्रु आहेत. तेच त्याला पापाकडे ओढत राहतात. रजोगुण कमी करा आणि सत्त्वगुण वाढवीत रहा.'

टाळी वाजवून मुले प्रथम नादब्रह्मांत लीन झाली आणि नंतर त्यांचें मन परब्रह्मांत जाऊन मिळाले.

**१६. ब्रह्ममोह–निवारणलीला:**

तसे तर सगळीच मुलें सबंध दिवसाची लीला आपल्या आईला त्याच दिवशीं सांगत असत. परंतु या अघासुर-वधाचा प्रसंग मात्र एक वर्षानंतर सांगितला. अर्थात कृष्णाने आपल्या पाचव्या वर्षीं अघासुराचा वध केला होता, पण हकीगत सहाव्या वर्षीं सांगितली.

परीक्षित राजानें विचारले– त्या मुलांनी असें कां केलें? एक वर्षपर्यंत ही हकीगत लपवून ठेवण्याचें कारण काय?

परीक्षिताच्या या प्रश्नामुळे शुकदेवांना त्या प्रसंगाचें, त्या रहस्यमयी लीलेचें स्मरण झालें. ते समाधीत लीन झाले. थोड्या वेळानंतर हळू हळू जेव्हां बाह्य दृष्टी प्राप्त झाली तेव्हां सांगू लागले– ऐक राजा! ब्रह्मदेवाने त्या गोपबालकांचें अपहरण केलें होते. तेथून ते एक वर्षानंतर परत आले. म्हणून एक वर्षानंतरच ते सर्व हकीगत सांगू शकले.

शुकदेवांनी तेराव्या आणि चौदाव्या अध्यायांत विस्ताराने समजावून सांगितलें आहे.

भगवान चार प्रकारांनी रास खेळतात. त्यांचें नावच रस आहे. 'रसो वै सः'. परमात्मा दिव्य रसस्वरूप आहे. त्यांच्याशीं एक होणें रास आहे. रासचा अर्थ आहे ब्रह्माशीं मीलन. 'रास' चा अर्थ कृष्ण संबंध-ब्रह्मसंबंध. जीव जेव्हां ईश्वराशी एकरूप होऊन जातो तेव्हांच तो कृतार्थ होतो.

गोकुळांतील गाईंची इच्छा होती कीं त्यांनी प्रभूशीं एकरूप व्हावें. आता हे कसें व्हावें? तर त्यांनी इच्छा केली कीं वासरे ज्याप्रमाणें त्यांचे दूध पितात त्याचप्रमाणें कृष्णानेही त्यांचें दूध प्यावे. प्रभूंनी त्यांची इच्छा पूर्ण केली. या अध्यायांत गायरासलीला वर्णन केली आहे.

गोकुळांतील वृद्ध स्त्रियांची इच्छा होती कीं कृष्णाला त्यांनी लाडानें-प्रेमानें गोंजारावे. त्या सर्व बाळकृष्णाच्या मनाशीं एकरूप होत. मानसिक मीलन आनंददायी आहे, तरी पण प्रत्यक्ष मीलनाची

उत्कंठा लागलेलीच असते. या अध्यायांत वृद्धा गोपींच्या रासलीलेचें वर्णन आहे.

अघासुराच्या पोटांतून सर्वच गोपबाळें आणि वासरें बाहेर आली. बालकांनी कान्ह्याला आपली जेवण करण्याची इच्छा प्रगट केली. तर कृष्ण म्हणाला, चला, यमुनेच्या या सुंदर तीरावर आपण पंक्ति मांडून जेवण करू. ही वासरें देखील हिरवे हिरवे गवत खात राहतील.

कान्हा आणि सर्वच मुलें पद्मव्यूह-चक्रव्यूह रचून बरोबरच जेवायला बसली. ही समाधिभाषा आहे. कमळाच्या पाकळ्या अगदी जवळ जवळ एकमेकाला लागूनच असतात. सगळ्याच मुलांची इच्छा कृष्णाच्या अगदी जवळ बसण्याची आहे. सगळेच आपापल्या घरची शिदोरी कृष्णाला देऊ इच्छितात. सगळेच कृष्णाच्या तोंडांत घास देऊ इच्छितात. दूर बसून तर तसें करता येणार नाही. कृष्णाने मधोमध बसून सगळ्याच बालगोपालांची इच्छा पूर्ण केली.

रासलीलेंत सुद्धा प्रत्येक गोपीला असा अनुभव दिला कीं कृष्ण तिच्याच बरोबर आहे. प्रत्येक गोपबाळ आणि प्रत्येक गोपीला कृष्णाने सान्निध्य आणि स्पर्शाचा अनुभव दिला.

ईश्वराच्या सामीप्याशिवाय चैन पडत नाही. ब्रह्मस्पर्शावाचून आनंद मिळत नाही.

प्रेम इतके शक्तिशाली आहे कीं निराकाराला सुद्धा साकार करते. निष्काम ईश्वरसुद्धा सकाम होतो.

कन्हैया आपल्या मित्रांना समजवीत आहे– केव्हांही एकटे जेवू नका. एकटा जेवणारा मांजर होत असतो. चोरूनलपून एकट्याने खाणें पशुधर्म आहे. एकट्याने केव्हांच खाऊ नये.

ईश्वर सगळ्यांना एकसारखाच आनंद देतो. मनुष्य विषमतेने देतो; विषमता ठेवून देतो. इच्छितो. ईश्वर सुपात्र जीवाला इतके देतो कीं घेणारा घेता घेता थकून जाईल.

यज्ञभुग-ईश्वर यज्ञाचा भोक्ता आहे. यज्ञांत आवाहन केल्यावरही पुष्कळ वेळा जो ईश्वर भोजन करीत नाही तोच आज बाळगोपाळांच्या हातानें भोजन करीत आहे.

परमात्म्याला वश करण्याचें सर्वोत्तम साधन आहे प्रेम. भगवंताला उत्तमोत्तम वस्तू द्यावी आणि तशी एकमेव वस्तु आहे भक्ती. भक्तीच शुद्ध प्रेमभाव आहे.

कोणी जिलबी आणली होती तर कोणी बर्फी, तर कोणी दहीवडे. सर्वच मुले मिळून खात होती. भोजनाच्या वेळीं विनोद केला पाहिजे. वातावरण आनंदी केले पाहिजे.

कान्हा म्हणाला, अरे, याची आई दहीवड्यासारखी गोलगरगरीत आणि बाप हडकुळा आहे. सर्वच हंसू लागले. याप्रमाणें कन्हैया आणि सर्वच मुले गंमत-जंमत करीत करीत खाण्यांत व इतरांना खाऊ घालण्यात मग्न झाले.

जीव जेव्हां आपलेपणा, जीवत्व, अभिमान सोडून परमात्म्यावर प्रेम करू लागतो तेव्हां ईश्वर देखील आपलें ईश्वरत्व सोडून जीवाबरोबर खेळायला येतात. अभिमानी जीव आपल्याला शास्त्री, पंडित, ज्ञानी मानतो. तो भगवंताला सुद्धा झिडकारू लागतो. भगवंत म्हणतात– जर या जीवाला माझ्याशी कांहीच देणे-घेणे नाही तर मी तरी यांच्याकडे कां लक्ष द्यावे ?

जर परमात्म्याला प्रसन्न करायचे असेल तर बालक होऊन त्यांच्याकडे जा.

गोपबाळांबरोबर फराळ करताना भगवंताची शोभा तर पहा–

त्या वेळी श्रीकृष्णाचं रूपडं सर्वांपेक्षा निराळंच होतं. त्यांच्या कमरेला बासरी बांधलेली होती, काखेंत शिंग आणि काठी होती. डाव्या हातांत तुपाने युक्त दही घातलेल्या भाताचा घास होता. बोटांत फळांचें लोणचे होते. चारी बाजूला गोपबालकें बसली होती. ते सगळ्यांच्या मधोमध बसून, सगळ्याच

बालगोपाळांबरोबर विनोद करीत करीत जेवत होते. स्वर्गांतील देवसुद्धा या अद्‌भुत लीलेला आश्चर्यानें पाहत होते.

या लीलेला मनोमनीं पाहून आनंद करा. वृंदावन, यमुनेचा काठ, फळांनी झुकलेल्या वृक्षांच्या फांद्या, खाली बसलेले श्रीकृष्ण आणि गोपबालकें इत्यादींची मनांत कल्पना कराल तर आनंद मिळेल.

खरा वैष्णव तर मनानें नेहमीच वृंदावनांत राहत असतो. शरीर कोठेही कां असेना मन तर वृंदावनांतच असले पाहिजे. भाव भक्तीला सफल करीत असतो.

खाणें कांही पाप नाही. खाण्यासाठीच तर भगवंताने इतके सारे खाद्यपदार्थ उत्पन्न केले आहेत. परंतु परमेश्वराला विसरून जाऊन, त्याला अर्पण केल्यावाचून खाणें पाप आहे. कित्येक लोक म्हणत असतात कीं आज त्यांना एकादशीचा उपवास आहे. परंतु एकटेच भरपूर खातात, खाणें पाप नसून कोणापासून लपवून चोरून खाणें पाप आहे.

अघासुराला जेव्हां कन्हैयाने मोक्ष दिला तेव्हां ब्रह्मदेवाना आश्चर्य वाटलें. ते वृंदावनांत हें पाहायला आले कीं हा कन्हैया आहे तरी कोण? इथे आले तर कन्हैयाला गोपबाळांबरोबर भोजन करताना पाहिलें!

या व्रजबालकांमधे शांडिल्य ऋषींचा मुलगा मधुमंगल होता. त्याला कान्हा म्हणाला कीं तू आमच्या घरचें तर खात असतोस, पण आपल्या घरचे तर आम्हाला कधीच देत नाहीस! पवित्र ब्राह्मणांच्या इथले जेवण जेवल्याने बुद्धी पवित्र होत असते. म्हणूनच कान्ह्यानें मधुमंगलाच्या इथलें अन्न खाण्याची इच्छा व्यक्त केली.

यशोदेने शांडिल्यांना सांगितलें होते कीं मधुमंगलाला रोज जेवायला पाठवीत जा. यशोदा त्याचा फार आदर ठेवीत असे.

म्हणून कान्हा आज त्या ऋषिपुत्रास म्हणत आहे कीं, रोज तू माझ्या घरी खातोस, आज तू मला तुझ्या घरचे खाऊ घाल.

मधुमंगलाने धावतच जाऊन आपली आई पूर्णमासी हिला हें सांगितलें. आईला फार आनंद झाला. पण अजूनपर्यंत तिनें जेवण तयारच केलेले नव्हते.

शांडिल्यऋषि ब्राह्ममुहूर्तीच शय्यात्याग करायचे, पण त्यांचें नित्य कर्म रात्रीं आठ वाजता संपायचे. सकाळी ते गायत्रीमंत्राच्या चोवीस माला फिरवीत, पंचायतनाची पूजा, पांच देवांचा अभिषेक, वैश्वदेव, यज्ञ-होम, मध्यान्ह संध्या, विष्णुसहस्रनाम पाठ, भागवतपाठ, आणि सरतेशेवटी भगवन्नामाचा एकवीस हजार जप. इतके सर्व करता करता संध्याकाळ निघून जाई. या तपस्वी ब्राह्मणाला जेवायलासुद्धा वेळ मिळत नसे. म्हणून ते रात्रीं फलाहार करीत.

एकदा का भजनानंद मिळाला कीं मग भोजनानंद, सांसारिक सुख नीरस वाटू लागते. आमच्या जीवाला भजनानंद मिळत नाही म्हणून आपण इतर विषयांत आनंद शोधीत राहतो.

ब्राह्मणाचा जन्म तप करण्यासाठी आहे, विलासासाठी नाही. ब्राह्मणाने विलासी जीवन जगावे हे परमेश्वराला आवडत नाही. वैश्य आणि क्षत्रियांना कांही अंशी विलासात राहिल्यास क्षम्य आहे, परंतु ब्राह्मणाला विलास-भोग क्षम्य नाही. जर शेवटपर्यंत ब्राह्मण पवित्र राहील, विलासाची इच्छा ठेवणार नाही तर भगवंत त्याला दिव्य आनंद देतात.

जोपर्यंत पतीने जेवण केले नसेल तोपर्यंत पतिव्रता स्त्रीने जेवण करू नये, असा पतिव्रतेसाठी धर्म सांगितला आहे.

शांडिल्य आणि पूर्णमासी अत्यंत पवित्र होते. पूर्णमासी सुद्धा पतीबरोबर फलाहारच करीत असे. त्यांचा एकुलता एक मुलगा मधुमंगल तर यशोदेच्या येथेच जेवत असे; म्हणून पूर्णमासी घरीं कधी जेवणच तयार करीत नसे. जर स्त्री आपल्या पतीविषयीं ईश्वराचा भाव ठेवीत नसेल, तर तिला दगडाच्या मूर्तींत देव कधीच दिसणार नाही.

जीवनाच्या आवश्यकता ज्या प्रमाणात कमीजास्त होत असतात त्या प्रमाणात पाप-पुण्यसुद्धा कमीजास्त होत असते. "पाहिजे" किंवा "आणा" याचा तर कधीच शेवट होत नाही. म्हणून आपल्या सवयी आणि गरजा कमी करीत रहा. निश्चय करा कीं मला भगवंताशिवाय आणखी कांहीच नको.

पवित्र ब्राह्मण आपल्या घरीं कशाचाच संग्रह करीत नाही. आता पूर्णमासीच्या घरीं तर कांहीच नव्हते. घरांत पाहिले तर थोडेसे ताक होते. आंबट असले तर कान्ह्याला आवडणार नाही; म्हणून त्याची कढी केली. मधुमंगलाला म्हणाली, माझ्यासारख्या गरीब ब्राह्मणीच्या घरीं कांहीच नाही. बस्स, हेच घे!

परमात्मा हे कधीच पाहात नाही कीं जीवाने त्याच्यासाठी काय आणलें आहे. ते एवढेच पाहात असतात कीं कशा भावानें आणलें आहे. ईश्वर फक्त भावच पाहतो. वस्तूला पाहणारा जीव आहे आणि केवळ पाहणारा देव.

तर मधुमंगल ती कढी घेऊन आला. इतर सर्व मुलें तर तऱ्हेतऱ्हेची मिठाई घेऊन आली होती. म्हणून मधुमंगल ती ताकाची कढी देताना लाजू लागला. मी जर असें ताक कान्ह्याला देईन तर जन्मभर मला असें आंबट ताकच प्यावें लागेल. कान्हा थट्टा करीत म्हणेल, त्याची आई आंबट आहे म्हणून ताकही आंबट आहे. असा विचार करून मधुमंगल ते स्वतःच पिऊ लागला.

भगवंताची नजर त्याच्यावर गेली. अरे मधुमंगल, तुझ्या आईनें हे ताक माझ्यासाठी पाठविलें आहे! मला द्यायच्या ऐवजी तूच पितो आहेस! माझी मावशी पूर्णमासी हिनें मोठ्या प्रेमाने माझ्याकरता पाठविलें आहे. तेव्हां मला सुद्धा पिऊ दे. मधुमंगल लवकर लवकर पिऊ लागला. कान्हा उडी मारून त्याच्या जवळ गेला आणि कढीचें भांडे आपल्या हातांत घेतलें, पण तें तर रिकामे झालें होतें. कान्ह्यानें पाहिलें कीं मधुमंगलच्या तोंडाला थोडे ताक लागले आहे. तो त्याचे तोंडच चाटू लागला. हे सर्व चालू होते तेवढ्यांत तेथे ब्रह्मदेव आले.

कान्हा म्हणत होता कीं, 'मधुमंगल! तुझे वडील तपस्वी ब्राह्मण आहेत, म्हणून तुझें उष्टे ताक माझी बुद्धी सुधारेल.'

श्रीकृष्ण बालकांशी बालकांसारखे, भोग्यांशी भोग्यांसारखे, योग्यांशी योगी आणि ज्ञान्यांशी ज्ञानी आहेत. मुले ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी समजू शकत नाहीत, म्हणून ते त्यांचें मन खाण्यापिण्याच्या आणि लोणी चोरण्याच्या लीलांनी हरण करतात. ते बालकांचें मित्र होऊन अनायासेच त्यांना ब्रह्मानुभव देतात.

कान्ह्याला मधुमंगलाचें तोंड चाटताना पाहिलें आणि ब्रह्मदेवाना आश्चर्य वाटलें. हा कोण आहे? देव असेल तर असा कसा? लोक तर कृष्णाला देव मानतात आणि हा तर इथे गोपबालांचें तोंड चाटत फिरतो आहे. ईश्वर कधीं असा असू शकतो का? ब्रह्मदेवांची मति गुंग होऊन ते आश्चर्यांत बुडून गेले. ब्रह्मदेव तेच आहेत की, ज्यांनी शेषशायी भगवंतांना अवतार घेण्यासाठी प्रार्थना केली होती, व भगवंतांनी देवकीच्या गर्भांत प्रवेश केल्यावर गर्भस्तुती केली होती. आज तेच ब्रह्मदेव श्रीकृष्णाची सगुणलीला पाहून चक्रावून गेले आहेत.

सगुण ब्रह्माची चित्रविचित्र लीला पाहून ब्रह्मदेवासारखेसुद्धा भ्रमांत पडतात, चक्रावून जातात

सामान्य जीवांची काय कथा ?

निर्गुण ब्रह्म समजणें कांहीसे सोपे पण सगुण ब्रह्माच्या लीलांचा पार गाठणें फार कठीण आहे.

ब्रह्मदेवांनी परीक्षा घ्यायचें ठरविले. हा कृष्ण ईश्वर आहे कीं साधारण देव. जर माझ्याचसारखी सृष्टी करू शकला तर समजेन कीं हा कृष्ण ईश्वर आहे. हा जर माझ्या कसोटीला उतरला तर मी याला ईश्वर मानीन.

मायेच्या बळाने ब्रह्मदेव सर्वच वासरांना ब्रह्मलोकांत उचलून घेऊन गेले.

जेवण करता करता गोपबाळांना आपल्या वासरांची आठवण झाली. पाहिलें तर वासरे तेथे नाहीत! त्यांनी कन्हैयाला सांगितलें.

कान्हा म्हणाला, तुम्ही जेवा, मी वासरे घेऊन येतो.

कृष्ण वासरांना शोधायला निघाले.

या प्रसंगांत एक आणखी रहस्य आहे.

जोपर्यंत मुले भगवंताकडे लक्ष ठेवून जेवत होती तोपर्यंत त्यांना आनंद मिळाला. परंतु वासरांची काळजी वाटू लागली, विषयांमधे मन गेले तर ब्रह्मदेवांनी वासरांना उचलून नेले आणि ईश्वर सुद्धा दूर गेला. कान्ह्याला शोधायला दूर जावें लागले. गोपबाळें ब्रह्मदेवाच्या आधीन झाली, त्याच्या मायेच्या आधीन झाली.

ब्रह्मदेवसुद्धा काळाचेंच एक रूप आहे. सांसारिक विषयांकडे मन गेले कीं जीवाला कालरूपी ब्रह्मदेव धरून ठेवतात.

भोजन करतेवेळीं जर दृष्टी भगवंताकडे राहील तर भोजनसुद्धा भजन होईल.

भोजन फार स्वादिष्ट नसावें. फार स्वादिष्ट असेल तर पोटभर खाल्ले जाईल. फार खाल्ल्यानें मन आळशी होईल. स्वादरहित भोजन असेल तर भुकेइतकेच खाल्ले जाईल. ज्याला परमात्म्याचें भजन करायचे आहे त्याने आळशी होऊ नये. जेवण एक अनिवार्य शरीरधर्म आहे. जेवणें पाप नाही, पण जेवणांतच तन्मय होणें पाप आहे.

श्रीकृष्ण वासरांना शोधू शकले नाहीत तेव्हा ते परत आले. इकडे येऊन पाहिलें तर गोपबाळेही गायब झालेली! श्रीकृष्णांनी ओळखलं कीं ही सर्व ब्रह्मदेवाची करणी आहे. ब्रह्मदेव बहुधा विसरलेले दिसतात कीं मीसुद्धा त्यांचा आजा आहे.

कोठे कोठे विष्णूला ब्रह्मदेवाचे पिता म्हटले आहे, तर कोठे आजा.

देवी भागवतांत सृष्टीच्या उत्पत्तीची कथा आहे. सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं सर्वच शास्त्रांत एकमत नाही. जगाच्या उत्पत्तीविषयीं विचार भिन्न भिन्न आहेत. महात्मा लोकांनी तर ईश्वराच्या स्वरूपाविषयींच अधिक विचार केला आहे. ईश्वराच्या स्वरूपासंबंधांत फारसा मतभेद नाही.

वैकुंठधामांत विराजमान लक्ष्मीनारायणांच्या नाभीपासून कमळ उत्पन्न झाले आणि त्या कमळांतून ब्रह्मदेव उत्पन्न झाले.

भगवंत तर 'कर्तुमकर्तुम्' आणि 'अन्यथाकर्तुम्' समर्थ आहेत. ही सर्व कृष्णाचीच इच्छासृष्टी आहे. कान्ह्यानेच त्या सर्व बालकांचे आणि वासरांचे रूप धारण केले आहे. ते आपल्याच स्वरूपाशी खेळत असतात.

ज्ञानी आपल्या शरीराशी नाही, आत्म्याशी खेळत असतात. एक आहे भोगार्थसृष्टी जिला जीवसृष्टी म्हणतात. पंचभूतरहित अशी ईशसृष्टी आहे. भगवंताची लीलासृष्टी आहे. केवळ इतरांना आनंद देण्यासाठी

केलेली सृष्टी लीलासृष्टी आहे. ब्रह्मदेव पंचमहाभूतांच्या साहाय्याने जगाची उत्पत्ति करतो.

भगवंत म्हणतात – मी पंचमहाभूतांच्या मदतीवाचूनच सृष्टी उत्पन्न करतात.

परमात्मा ज्यावेळी संकल्प करतात, त्याचवेळी सृष्टी उत्पन्न होते. जेव्हा ईश्वर पंचमहाभूते निर्माण करतो तेव्हांच त्यांच्या आधारे ब्रह्मदेव जग निर्माण करतो.

द्रौपदीच्या लुगडी-साड्या कोणत्या मिलच्या होत्या ? स्वतः कृष्णांनीच लुगड्यांचे रूप घेतले होते. भगवंताच्या संकल्पानें लुगडी उत्पन्न केली होती. जिला ईश्वर स्वतः झाकतो तिला कोण विवस्त्र करू शकतो ? हा तर श्रीकृष्णांचा संकल्प होता – लीला होती.

श्रीकृष्णाने गोपबाळांची कांबळी, काठ्या इत्यादी अनेक रूपे धारण केली.

वैष्णव ब्रह्माचा परिणामवाद मानतात आणि वेदान्ती विवर्तवाद. जगद्गुरु शंकराचार्यांचा विवर्तवाद आहे. हे जग मिथ्या आहे – असत्य आहे. ह्याचा अधिष्ठाता सत्य असल्याकारणाने हे जग सत्यरूप भासते. वास्तविक ईश्वर तर एकच आहे. एकच परमात्मा अनेक रूपे धारण करतो. परंतु ती रूपे सत्य नाहीत. अविद्येमुळे असत्य जग सत्य भासत असते.

सिनेमांत आम्ही पाहतो की, हनुमान लंका जाळीत आहेत ! पण पडद्याचा तर दोरा देखील जळत नसतो. कारण ही आभास देणारी सृष्टी आहे. चित्र नव्हे तर पडदा सत्य आहे.

अधिष्ठान सत्य आहे. ब्रह्मस्वरूप एका फळ्यासारखे आहे, आणि जग एका चित्रासारखे आहे. मायेमुळेच हे जग दिसत आहे.

श्री महाप्रभु म्हणतात – ब्रह्म निर्विकार राहून सुद्धा ब्रह्माचा परिणाम होत असतो. दोन्हीही सिद्धान्त खरे आहेत. श्रीकृष्णच लाठी आहेत. श्रीकृष्ण सत्य आहेत आणि त्यांच्यामुळेच लाठीचा भास होत आहे. ब्रह्म निर्विकार राहूनही विकारी होते.

परमात्म्याला भेटण्याची गाईंची इच्छा होती. म्हणून कृष्णाने वासरांचे रूप धारण केले. खरी वासरे तर ब्रह्मलोकी होती. ज्या वासरांनी स्तन सोडून दिले होते ती वासरे सुद्धा आज स्तनपान करीत होती. गाईसुद्धा मोठमोठ्या वासरांना स्तनपान करवू लागल्या. हे दृश्य पाहून बलरामाला आश्चर्य वाटले. पण त्याने अंतर्मुख होऊन पाहिले तेंव्हा समजले कीं सर्व वासरेही कृष्णाचीच रूपे आहेत.

ज्या वृद्धा गोपींना श्रीकृष्णाला भेटण्याची इच्छा होती त्यांच्याबरोबर देखील कृष्णाने आज गोपबाललीला केली. गोपी आपल्या बालकरूपी कन्हैयाला उचलून छातीशी लावू लागल्या.

गोपींना परकीय मानलेले नाही. परकीय भाव मानला गेला आहे. श्रीकृष्ण सगळ्यांचेच पति आहेत. म्हणून गोपींचे देखील पति आहेत. या दृष्टीने रासलीलेत कोणतीही गोपी परकी नव्हती.

एका संताने म्हटले आहे कीं व्रजांत आणि गोकुळांत कोणी परकी गोपी नव्हतीच. कारण असे कीं प्रभु जेव्हां वत्सलीला करीत होते तेव्हां शांडिल्य ऋषींनी आज्ञा केली होती कीं या वर्षी भगवान श्रीकृष्णांनी गोपबालकांचे रूप धारण केले आहे. म्हणून ही वेळ फार उत्तम आहे. सर्वांनीच आपापल्या कन्येचा विवाह करून घ्यावा. तर सगळ्यांनीच आपापल्या कन्येचा विवाह त्या त्या गोपबाळाशी लावून दिला. अर्थात सर्वच गोपींचा विवाह श्रीकृष्णाशी झाला. म्हणून रासलीलेत परस्त्रीचा प्रश्नच येत नाही.

श्रीकृष्णाला कोणतीच स्त्री परस्त्री नव्हती. ते तर सर्वांचेच स्वामी आहेत – सर्वेश्वर आहेत.

भगवान श्रीकृष्णांनी वासरांची आणि गोपबालांची रूपे घेऊन गाई आणि वृद्धा गोपींना ब्रह्मसंबंधाचा लाभ दिला. सगळ्यांनाच ब्रह्मानंद दिला.



त्यावेळी 'हे संपूर्ण जग विष्णुमय आहे' हे वेदवाक्य मूर्तिमंत साकार झाले.

निजइच्छानिर्मित तनु ईश्वर आहे आणि कर्मनिर्मित तनु जीव.

भगवंतांनी याप्रकारे संपूर्ण वर्षपर्यंत लीला केली. भागवतात व्रजवासींच्या लीलेचे चार प्रकार सांगितले आहेत. चार रासलीला आहेत–

१) वेणुगीत प्रसंग – कुमारी गोपींबरोबर रास.

२) यज्ञपत्नी प्रसंग – विवाहित गोपींबरोबर रास.

३) गोवर्धन लीला – वृद्धा गोपींबरोबर रास.

४) संन्यासीप्रसंग – संन्यासिता गोपींबरोबर रास.

मुख्य रासलीला याप्रकारे आहेत –

१) गोपबाळांच्या बरोबर.

२) गाईंच्याबरोबर.

३) गोपयुवतींच्या बरोबर.

आता 'रास' चा अर्थही पाहू. परमात्मा रसस्वरूप आहेत. या रसरूपी ईश्वराशीं तादात्म्य होणे म्हणजेच रास. परमात्म्याचे जीवाशी मीलन रास होय. रसात्मक जीवाशी अभिन्न भाव होणे – संबंध होणे म्हणजेच रास.

असा कोणता जीव असू शकतो की जो ईश्वराला भेटण्याची इच्छा करीत नसेल?

या लीलांच्या द्वारे प्रभूंनी सगळ्यांना मुग्ध करून रस वाटला-आनंदाचा आविर्भाव केला.

भागवताचे टीकाकार विश्वनाथ चक्रवर्ती तेराव्या-चौदाव्या अध्यायांतील लीलांमधे तन्मय होऊन गेले आहेत. त्यांचे म्हणणे असे आहे की, ही तर सर्वोदय लीला आहे. प्रभूंनी सगळ्यांना समान रूपाने आनंद दिला आहे.

श्रीकृष्णांनी आज जेव्हा मुलें आणि वासरांचे रूप धारण केले तेव्हा त्या गोपी आणि गाई पहिल्यापेक्षासुध्दा जास्त प्रेम करू लागल्या. आपापल्या मुलांना (संतानांना) प्रेमाने न्हाऊ घालू लागल्या. गाई आपल्या वासरांना दूध पाजीत आहेत, चाटत आहेत, परंतु तृप्त होत नाहीत. ब्रह्मानंदांत तृप्ती मिळतेच कधी?

ब्रह्मदेव पृथ्वीवर येऊन दुसऱ्यांदा पाहू लागले की गोपबाळे आणि वासरांविना इकडे काय चालले आहे. त्यांनी पाहिले तर सर्वकाही पूर्वीसारखेच चालू आहे. तीच मुलें आणि तीच वासरे! आणि शिवाय श्रीकृष्ण त्या सर्वांशी खेळण्यांत-कुदण्यात मग्न! ब्रह्मदेव विचारात पडले, ही गोपबाळे आणि वासरे खरी आहेत, की ज्यांना ब्रह्मलोकी घेऊन गेलो ती खरी आहेत?

इतरांशी खेळणारा दुःखी होतो. ज्ञानी पुरुष आपल्या आत्मरूपांतच रममाण राहतात. भगवंत आपल्याच स्वरूपाशी खेळत आहेत. श्रीकृष्ण तर योगेश्वर आहेत!

कृष्णांनी एक आणखी लीला करायचे ठरविले. त्यांनी ब्रह्मदेवाचे रूप धारण केले आणि सेवकांना म्हणाला, 'एक नकली ब्रह्मदेव आजकाल इकडेतिकडे फिरत असतो. तो जर इकडे आला तर त्याची चांगलीच खोड मोडून टाका.'

विचारांत पडलेले ब्रह्मदेव जेव्हां ब्रह्मलोकांत पोचले तेव्हा सेवकांनी त्यांची खोड मोडायला सुरुवात केली. तू तर नकली ब्रह्मदेव आहेस. खरे ब्रह्मदेव तर राजप्रासादात बसले आहेत.

ब्रह्मदेवाने डोळे बंद करून ध्यानावस्थेत पाहिले तर आपल्या सिंहासनावर श्रीकृष्ण बसलेले आहेत. सर्वच मुलें आणि वासरांमध्येसुध्दा श्रीकृष्णच पाहिले. परब्रह्माचे दर्शन झाले!

ब्रह्मदेव बाळकृष्णाची परीक्षा घ्यायला गेले होते, पण त्यांची स्वतःचीच परीक्षा होऊन गेली. कृष्णांत नारायणस्वरूपाचे दर्शन झाले. माझे नारायणच श्रीकृष्णाचे रूप घेऊन आले आहेत. ब्रह्मदेव स्तुति करू लागले.

ब्रह्मदेवाची ती स्तुति फारच अद्भुत आहे. व्यासांनी यात चारही वेद एकत्र करून टाकले आहेत जणू!

'हे प्रभो! आपले स्वरूप वर्षाकालीन मेघाप्रमाणे श्याम आहे. त्यावर पीतांबर विजेसारखा चमकत आहे. कानांत मकरकुंडले आणि डोक्यावर मोरपिसाचा मुकुट आहे. म्हणून आपल्या मुखमंडलाची शोभा काही औरच आहे. वक्षःस्थलावर वनमाला झुलत आहे. हातात दहिभाताचा घास, बगलेत काठी आणि शिंग आणि कमरेवर बासरी बांधलेली आहे. कमलापेक्षा सुध्दा कोमल चरण असणारे आणि गोपबालवेशी आपल्याला – परमात्म्यांना मी वंदन करीत आहे.'

श्रीकृष्ण मेघासारखे श्याम आहेत. परमात्म्याने मेघासारखा वर्ण धारण केला आहे. कारण मेघ संत आहेत. मेघ खारट पाणी पिऊन मधुर जल देत असतात. खारट पाणी दुःखाचे आणि मधुर पाणी सुखाचे प्रतीक आहे. अतिशय दुःख सहन करूनही जो दुसऱ्याला सुख देतो तो संत. स्वतः सुख भोगून दुसऱ्यालाही सुख देणारा सज्जन असतो पण संत नसतो.

कृष्णाच्या गळ्यात गुंजमाळ आहे. यशोदामातेने घातलेली मोत्याची माळ कन्हैयाने दुसऱ्या गोपबाळाला देऊन टाकली होती. घरी येऊन सांगितले की, आई, मी ही कंठी आणली आहे. मोत्याची माळ तर मी आपल्या एका मित्राला दिली आहे. कृष्णाला गुंजेची माळ फारच आवडत असे. म्हणूनच तर शृंगाराची समाप्ति गुंजमाळेने करतात.

थोडे दिले असतासुध्दा ते खूप मानील तो ईश्वर, पुष्कळसे मिळूनही कमी समजेल, असंतुष्ट राहील तो जीव. प्रभूला काही द्याल ते प्रेमाने द्या.

कन्हैयाच्या डोक्यावर मोरपिसे आहेत. प्रभूला कामसुखत्यागी फार प्रिय असतो. त्याला परमात्मा आपल्या डोक्यावर ठेवतो. लौकिक सुखांचा त्याग कराल तर प्रभु तुम्हाला आपल्या डोक्यावर बसवतील. मोर शारीरिक संबंधाने प्रजोत्पत्ति करीत नाही म्हणून भगवंतांनी त्याला हा सन्मान दिला आहे.

ब्रह्मदेव परमात्म्याची स्तुति करीत आहे. 'आपले स्वरूप पंचमहाभूताचे नाही परंतु स्वयंसर्जित आहे.' परमात्म्याचे स्वरूप अप्राकृत-अलौकिक आहे. जीवाला तर त्याच्या पूर्वजन्मीच्या प्रारब्धानुसार शरीर मिळते. परमात्मा स्वेच्छेने शरीर धारण करतात. मनुष्याला त्याच्या कर्मानुसार शरीर मिळते.

परमात्मा स्वेच्छेने शरीर धारण करतात किंवा भक्तांच्या इच्छेकारणे धारण करतात. निराकार निजानंदाने आज श्रीकृष्णाच्या रूपात अवतार धारण केला आहे. परमात्म्याचे अंग अंग आनंदस्वरूप आहे. त्याचे स्वरूप अलौकिक-अप्राकृत आहे.

परीक्षा घेण्यासाठी केलेल्या प्रयत्नामुळे ब्रह्मदेवांनी प्रभूची क्षमायाचना केली.

'गर्भात असलेल्या संततीचा प्रहार आईला राग आणीत नाही. आईला तर क्रोधाऐवजी आनंदच होत असतो. याचप्रमाणे माझा अपराध क्षमा करा.'

ब्रह्मदेव म्हणतात, माझे शरीर पंचतत्त्वाचे बनलेले आहे, परंतु तुमचे शरीर तर केवळ आनंदमय आहे.

खडीसाखरेची खेळणी तर खडीसाखरच होत; हत्ती-घोडे नाहीत. त्याचा पाय तोडून दुधात घालाल तर दूध गोड होईल. याचप्रमाणे निर्गुणांतून सगुण झालेले परमात्मासुध्दा आनंदरूपच आहेत.

भगवान श्रीकृष्णांचे शरीर पूर्ण आनंदमय आहे. त्यांच्यापासून आनंद अभिन्न आहे.

निराकाराने आकार धारण केला तरी तत्त्व तर तेच राहते.

'व्रजातील गाई आणि स्त्रिया (खरोखर) धन्य आहेत. कारण की त्यांचे दूधरूपी अमृत पिण्यासाठी आपण वासरे आणि गोपबालकाचे रूप घेतले. ज्यांना संतुष्ट करायला अनेक यज्ञयागादि कार्ये देखील असमर्थ आहेत, तेच आपण आहात.

गोकुळ वृंदावनात जन्म घेणारे सगळेच महाभाग्यशाली आहेत.'

जोपर्यंत मनुष्य प्रभूचा भक्त होत नाही तोपर्यंत त्याच्यासाठी राग-द्वेष इत्यादी चोरासारखे आहेत, घर कारागृह आणि मोह पायात पडलेल्या साखळीसारखा आहे. भक्त बनल्यानंतर हे सगळे मोक्षदाते होतात.

सगळ्याच प्राण्यांचा आत्मा श्रीकृष्ण आहे. सगळे जग श्रीकृष्णानेच व्याप्त आहे.

जो मनुष्य मुरारी भगवंताच्या चरणपल्लवरूपी नावेचा आश्रय घेतो त्याच्यासाठी हा संसारसमुद्र केवळ वासरांच्या खुरांनी केलेल्या खळग्याइतकाच खोल आहे; अर्थात खोल नाही. तो याला अनायासेच पार करू शकतो.

भक्तीवाचून केवळ ज्ञान प्राप्त करण्याचा प्रयत्न तर सालपटे उखळीत घालून कुटण्यासारखे आहे. ते निष्फळच राहते. केवळ भक्तीच मोक्षदायिनी आहे.

ब्रह्मदेवांनी वंदन आणि स्तुति करून क्षमायाचना केली. ब्रह्मदेवाने जेवणांत विक्षेप आणला होता म्हणून स्तुति समाप्त झाल्यावर सुध्दा श्रीकृष्ण मौनच राहिले.

कोणाच्याही जेवणात आणि झोपेत बाधा आणणे पाप आहे.

ब्रह्मलोकी झोपी गेलेली बालके एक वर्षानंतर जागी झाली. त्यांना वाटले आजच लीला झाली आहे.

ही लीला एक वर्षपर्यंत चालली म्हणून अघासुरवधाची कथा आपल्या मातांना ते लवकर सांगू शकले नाहीत.

काही महात्मे हिला ब्रह्ममोह-निवारणलीला म्हणतात, श्रीधरस्वामींनी तिला सर्वोदयलीला म्हटले आहे.

साधन केल्याने चित्त शुध्द होते आणि नंतर ईश्वरप्राप्ति.

श्रीकृष्ण परमात्म्याचे पूर्ण स्वरूप आहे, म्हणून सगळ्याच शक्ती प्रगट झाल्या आहेत.

इतर सर्व अवतार अंशावतार आहेत. परंतु राम आणि कृष्ण हे दोन्ही अवतार पूर्णावतार आहेत.

नरसिंह अवतारांत क्रियाशक्ति प्रगट झाली आणि ज्ञानशक्ति गुप्त राहिली होती. इतर अवतारांमध्ये एकेकच शक्ती प्रगट झाली होती आणि इतर शक्ती गुप्त राहिल्या होत्या.

श्रीकृष्णाने प्रत्येक लीलेत एक एक देवाचा पराभव केला. बाललीलेत ब्रह्मदेवाचा अभिमान नाहीसा केला. गोवर्धनलीलेत इंद्राचा आणि रासलीलेत कामदेवाचा पराभव केला.

एक दिवस कान्हा म्हणू लागला — आई, आता मी मोठा झालो आहे. आता गाईंना चारायला नेऊ?

**१७. कृष्ण गोपाळ होऊन कालियामर्दन आदि लीला करतात:**

यशोदा — अजून तर तू लहानच आहेस रे! थोडा आणखी मोठा हो. मग चांगलासा मुहूर्त पाहून

मी तुला गोपाळ बनवीन.

इतक्यात तेथे शांडिल्य ऋषींचे आगमन झाले. तर यशोदेने जन्माक्षर सांगून गोपाळ बनण्यासाठी मुहूर्त विचारला. ऋषींनी कार्तिक मासांतील शुक्ल पक्षाच्या अष्टमीचा मुहूर्त सांगितला. कान्हा त्या दिवशी गोपाळ व्हायचा होता. तो इतका अधीर झाला की त्याची झोप उडून गेली.

आई, मला गाई फार प्रिय आहेत. मी यांची पूजा करीन.

सकाळी कान्हा स्नानादी उरकून सिद्ध झाला होता. एवढ्यात शांडिल्य ऋषि आले. कान्ह्याने गाईंची पूजा केली. तर त्यांना फार आनंद झाला. कारण त्यांचा स्वामी पूजा करीत होता. गाईंना फुलांच्या माळा घालून त्यांना मिठाई खाऊ घातली. गाईंनी आशीर्वाद दिला. आमच्या बाळकृष्णाचा जयजयकार होवो.

जर प्रभूंनी संपत्ति दिली असेल तर गाईंचे पालन करा. आजचे श्रीमान तर घरात कुत्री बाळगतात. आणि आपल्याबरोबर मोटारीत फिरायला सुध्दा घेऊन जातात. अशा लोकांना असेच म्हणावे लागेल की ते पुढच्या जन्माची तयारी करीत आहेत. कुत्र्यांशी जास्त स्नेह केला गेला तर मृत्यूच्या वेळी त्याच्यात वासना राहील. आणि पुढल्या जन्मी कुत्र्याचा जन्म घ्यावा लागेल. कुत्र्याचा तिरस्कार करू नये. त्यांना पोळी देखील घालावी पण त्यांच्यामागे वेडे होऊ नये.

गाईमध्ये सर्वच देवांचा वास आहे. गाईची सेवा केल्याने अपमृत्यु टळतो. तिची पूजा करणे म्हणजे तिला पोटभर खाऊ घालणे, पाणी पाजणे. नुसता कुंकवाचा टिळा लावूनच तिचे पोट कसे भरेल? गाय तर व्रजभक्त आहे!

एकनाथ महाराजांनी एकनाथ भागवतांत एक विनोद केला आहे. रामाने काय काय नाही केले? कित्येक राक्षसांचा वध केला, अनेक यज्ञयाग केले, प्रजेचे उत्तम प्रकारे लालनपालन केले, परंतु ते राजाधिराज होते म्हणून गाईची सेवा करू शकले नाहीत. म्हणून त्यांच्या मनात गाईची सेवा करण्याची वासना राहून गेली. म्हणून ते कृष्णाचा अवतार घेऊन गाईची सेवा करायला आले. अर्थात राम आणि कृष्ण एकच आहेत.

प्रातःकाली येऊन ब्राह्मणांनी गणपतीची पूजा करविली. कृष्ण पूर्ण पुरुषोत्तम आहेत. म्हणून धर्माच्या सर्वच मर्यादांचे ते पालन करतात. गाईची पूजा करून प्रदक्षिणा केली. ही तर श्रीकृष्णाची पौगंडावस्था आहे. शांडिल्य ऋषींची आज्ञा झाल्यावर श्रीकृष्णांनी आईला नमस्कार केला. यशोदेच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले. कान्ह्याने आईला रडायचे कारण विचारले, तर यशोदा म्हणाली, 'तू तर सकाळपासून साऱ्या गाईंना घेऊन वनात जाशील आणि संध्याकाळी परतशील! तुझ्या मनोहर मुखकमलाला पाहिल्यावाचून माझा सगळा दिवस कसा जाईल?'

जेव्हा जीव परमेश्वराशिवाय एक क्षण सुध्दा जिवंत राहू शकणार नाही अशा स्थितिप्रत पोहोचेल तेव्हा ईश्वर स्वतःच लवकर त्याच्या मांडीवर येऊन बसतो.

यशोदेने कृष्णाला पायात जोडे घालायला सांगितले, तर कृष्णांनी नकार देऊन म्हटले, 'मी गोपाळ आहे, गाईचा सेवक आहे, आणि सेवक कधी जोडे घालतात का?'

यशोदा – बेटा! गाय तर पशू आहे!

कन्हैया – आई, असं कधी म्हणू नकोस. गाय पशू नाही, ती आमच्या सगळ्यांची माता आहे. तिच्यात सगळ्याच देवांचा वास आहे. मी तर गाईंचा सेवक आहे.

जोपर्यंत कृष्ण गोकुळात राहिले तोपर्यंत त्यांनी चार प्रकारच्या संयमांचे पालन केले होते.

(१) गोकुळांत त्यांनी शिवलेले कपडे कधीच घातले नाहीत, कारण त्यांचे साथी गोपबालक फारच गरीब होते.

(२) जोपर्यंत गोकुळांत राहिले तोपर्यंत कोणतेच शस्त्र किंवा अस्त्र धारण केले नाही. एका हातात लोणीखडीसाखर आणि दुसऱ्या हातात बासरी. बासरीच्या मधुर तानेनेच ते सर्व गोकुळ आकर्षून घेत असत.

(३) आपले केस कधी काढले नाहीत.

(४) कधी जोडे घातले नाहीत.

श्रीकृष्णांनी गाईची जशी सेवा केली तशी कोणी करू शकलेला नाही अन् कोणी करू शकणार पण नाही. गाईंना खाऊ-पिऊ घालेपर्यंत त्यांनी स्वतः काहीच खाल्ले-प्याले नाही. असा कन्हैया जेव्हा गोकुळ सोडून जाईल तेव्हा गाई अश्रू ढाळू लागतील यात आश्चर्य ते काय?... पशु असून देखील सर्व गाई कृष्णाजवळच राहू इच्छीत.

कन्हैया आपल्या पीतांबरानेच गाईंना पुसत असे आणि आपली मिठाई पण गाईंनाच खाऊ घालायचा. आई कधी विचारी तर सांगत असे की, मला गाय फार प्रिय आहे. तिने खाल्ले म्हणजे मला फार आनंद होतो.

आता आपण धेनुकासुरवधाची लीला पाहू. तालवनात एक राक्षस गाढवाच्या रूपाने राहात होता.

एकदा श्रीदामा आणि इतर गोपाळांनी गाऱ्हाणे केले की तालवनात फळे तर पुष्कळ आहेत, पण धेनुकासुर कोणाला ती घेऊ देत नाही.

भगवतांनी प्रल्हादाला वचन दिले होते की त्याच्या कोणत्याही वंशजाला ते मारणार नाहीत. म्हणून बलभद्राने धेनुकासुराचा वध केला होता.

वनात फळे, झाडे सडून गेली तरी कोणाला जो देणार नाही तोच धेनुकासुर होय. आपल्यापाशी पुष्कळ असूनही जो कोणाला काही देणार नाही तर तोही धेनुकासुरच होय, गाढव होय. देहालाच सर्वस्व समजणारा, अतिशय संग्रह करणारा धेनुकासुरच!

धेनुकासुर तालवनाचा मालक नव्हता, पण अनेक वर्षांपासून तेथे राहात होता. आणि बळेबळेच कब्जा करून बसला होता. पुष्कळसे लोक सार्वजनिक संस्थांची वहिवाट करता करता त्यांच्यावर आपला कब्जा करून घेतात. काही जण अशा संस्थांमधे गोलमाल करून पैसे हडप करून घेतात. याप्रमाणे समाजाचे धन उडविणारे पुढल्या जन्मी गाढव होतात.

धेनुकासुर हा देहाध्यास आहे, तो अविद्येमुळे होत असतो. अविद्या जीवाला संसाराच्या बंधनात अडकविते. असे झाले म्हणजे सांसारिक पदार्थांसाठी जीवाच्या मनात, राग, द्वेष इत्यादी उत्पन्न होतात. जोपर्यंत अविद्या नष्ट होत नाही तोपर्यंत संसार सुटू शकत नाही.

अविद्या जीवाला पांच प्रकारे बांधते—

(१) स्वरूपविस्मृति, (२) देहाध्यास, (३) इन्द्रियाध्यास, (४) प्राणाध्यास आणि (५) अतंःकरण अध्यास.

देहाध्यासांत जीव आपल्याला मोठा, स्वरूपवान, विद्यावान, संपत्तिवान मानू लागतो — देहाभिमानी होऊन जातो. असे लोक दुसऱ्याचा अपमान करू लागतात. दुसऱ्यांना त्रास देतात. अशा देहाध्यासाला बलभद्राने मारले. भगवंताच्या आधिदैविक शक्तीनेच देहाध्यासाचा नाश होऊ शकतो.

आता कालियानागाच्या दमनाची गोष्ट येत आहे.

प्रभूनी कालिया नागाचा उध्दार करण्याचा विचार केला. म्हणून ते सर्व बालगोपाळांबरोबर ज्या जलाशयात कालिया होता त्या जलाशयाच्या किनाऱ्यावर चेंडू खेळू लागले. खेळता खेळता त्यांचा चेंडू त्या जलाशयात जाऊन पडला. बालमित्रांनी सांगितले की यात नाग राहतो म्हणून याचे पाणी कोणीच पीत नाहीत.

भगवंतांनी डोहात उडी टाकली. कालिया नाग त्यांना डसू लागला. जसजसा तो डसू लागला तसतसे त्याचे विष अमृत होऊ लागले. कन्हैयाने एका हातात फणा धरली आणि दुसऱ्या हातात शेपूट आणि मग फणेवर (मस्तकावर) आरूढ झाला.

सगळीच मुलें भयक्रांत झाली, पण कन्हैयाने त्यांना धीर दिला आणि फणेवर नाचू लागला. कान्हा आपले वजन वाढवीत होता म्हणून कालिया व्याकुळ झाला. नागपत्न्या शरण येऊन म्हणाल्या, 'आपण आमच्या पतीला जो दंड दिला आहे तो उचितच आहे. कारण यामुळे दुर्जनांच्या पापाचा नाश होईल. आपण तर कर्माप्रमाणे सगळ्यांनाच दंड करीत असता.

रावणवधाच्या वेळी मंदोदरीने सुध्दा असेच म्हटले होते. तिने रामचंद्रांना प्रार्थना करून सांगितले होते की माझ्या पतीची कुकर्मेच त्याच्या या अवदशेला कारणीभूत आहेत. यांना मारण्यात तुमचा काहीच दोष नाही.

नागपत्न्या म्हणाल्या— तसा आमचा पति दुष्ट नाही, कारण तुम्ही त्याच्या मस्तकावर पाय ठेवले आहेत.

श्रीकृष्ण कालिया नागाला म्हणाले, 'तुझ्यामुळे हा डोह विषारी झाला आहे म्हणून तू येथून कुठे तरी दूर निघून जा.

नाग— प्रभु, मी जायला नाही म्हणत नाही, पण मला गरुडाचे भय वाटते.

भगवान— माझ्या मंगलमय चरणांच्या स्पर्शामुळे गरुड तुला कधीच त्रास देणार नाही.

कालिया नाग गरुडभयामुळेच पाण्यात लपलेला होता.

कालियाचा फणा तर मर्यादित होता, आमच्या हजारो आहेत. आमचे संकल्प-विकल्प म्हणजे फणाच. भगवंताला प्रार्थना करा की, 'माझ्या कालिया नागाचे दमन करा. त्यावर आपले चरणकमल ठेवा.'

कालिया नागाच्या तर तोंडातच विष होते. आमच्या एकेका इंद्रियात आणि मनातही विष भरलेले आहे. एक व्यक्ति आम्हाला डोक्यांतला काटा वाटतो, तर दुसरा रत्न. अशा प्रकारचे राग-द्वेष, विषयविकार इत्यादी विषच आहेत. जोपर्यंत इन्द्रिये वासनारूपी विषाने भरलेली आहेत तोपर्यंत भक्ती होऊ शकणार नाही. इन्द्रियांना नाही, पण इन्द्रियांमधे समाहित विष नष्ट करायचे आहे. या विषाला सत्संगाने कमी करीत रहा.

कालिया नाग इन्द्रियाध्यास आहे.

यमुनारूपी भक्तींत इन्द्रियाध्यास आला तर शुध्द भक्ती होणार नाही.

भोग आणि भक्ती पारस्परिक शत्रू आहेत.

भक्तीच्या मिषाने इन्द्रियांना भुलवणारा कालिया नाग आहे.

केवळ इन्द्रियांनीच नव्हे, तर मनानेही विषयांचा त्याग कराल तर भक्ती सिध्द होईल.

भक्तींत विलासभोगरूपी विषधर शिरल्याने भक्ती नष्ट होते. भक्तिमार्गाचे आचार्य वल्लभाचार्य, रामानुजाचार्य, चैतन्यमहाप्रभु इत्यादी सर्व परिपूर्ण विरागी होते. पूर्ण वैराग्याविना भक्ती होऊ शकत

नाही. भक्ती, ज्ञान-वैराग्यांची जननी आहे.

भक्तिमार्गाचे ते आचार्य तर केवळ एकच वस्त्र धारण करून सगळ्या जगांत भ्रमण करीत असत. परंतु पुढे जाऊन या मार्गात पुष्कळसे विलासी कालिया नाग शिरले आणि त्यांनी भक्तिमार्गाला विषमय करून टाकले– अपमानित केले.

सेवा करणे सोपे नाही. संसारसुखाचा मनानेही त्याग करणाराच देवसेवा आणि देशसेवा करू शकतो. महाप्रभूंनी म्हटले आहे– ईश्वरावर आणि ईश्वर सेवेवर अनुराग आणि शारीरिक सुखविलासांप्रति वैराग्य ठेवाल तरच भक्तिमार्गात पुढे जाऊ शकाल, देवसेवा आणि देशसेवा यांत इन्द्रियांच्या लालन-पालनाला काहींच स्थान नाही. इन्द्रियांचा सेवक देवसेवा कधीच करू शकणार नाही.

सगळीच इन्द्रिये वासनेच्या विषाने भरलेली आहेत. भगवंतांनी सर्वच दैत्यांचा नाश केला होता. परंतु कालिया नागाचे मात्र नुसते दमन केले होते. त्याला नियंत्रित केले होते.

इन्द्रियांचा नाश नाही, दमन करायचे आहे. त्यांना विवेकाने वश करायचे आहे. इन्द्रियांना सत्संग झाला पाहिजे. तेथे त्यांना भक्तिरसाची प्राप्ति होईल आणि ती शुध्द होतील.

इन्द्रियांतील विष पिळून टाका आणि सत्संग मंडळीत त्यांना पाठवून द्या. कालिया नागाला भगवंतांनी विषरहित करून रमणक द्वीपावर पाठवून दिले होते. इन्द्रियांना शुध्द कराल तर ती भक्तिरसांत लीन होऊ शकतील.

भोगांनी इन्द्रियांचा क्षय होतो आणि भक्तीने पोषण.

जो आनंद योग्यांना समाधींत होतो तोच आनंद वैष्णवांना कृष्णकीर्तनांत मिळतो. कीर्तन करतेवेळी दृष्टी नेहमी कान्ह्याकडे लावून ठेवा.

वाणी कीर्तन करील, मन स्मरण करील आणि डोळे दर्शन करतील तेव्हाच जप सफल होऊ शकेल.

जोपर्यंत इन्द्रियांमध्ये वासनारूपी विष भरलेले असेल तोपर्यंत भक्तीची प्राप्ति होणार नाही.

इन्द्रियाध्यास आल्यावर भक्ती अशुध्द होत असते.

विषरहित करून इन्द्रियांना रमणक द्वीपांतील सत्संगांत पाठवून द्या. तेथे त्यांना भक्तिरस मिळेल. इन्द्रियांना भोगाने नाही, भक्तिरसाचे पाणी घालून पोसा. भक्तीद्वारे इन्द्रियांना रमणक व्दीप-सत्संगांत रमण होऊं द्या. भक्तिमार्ग अत्युत्तम आहे. यांत इन्द्रियपुष्पांना भगवंताच्या चरणांवर ठेवायचे आहे. ज्ञानमार्गात इन्द्रियांशी संघर्ष करावा लागतो, त्यांना मारावे लागते. असे करू नका. त्यांची समजूत घालून त्यांना प्रभूच्या मार्गाकडे वळवा.

श्रीकृष्णांनी दोनदा दावाग्नि सुध्दा पिऊन टाकला होता. यमुनेच्या पाण्यांतून कृष्ण सकुशल बाहेर आला सर्वांना हर्ष झाला. त्यांनी यमुनेच्या काठीच रात्रभर वास केला. त्या वेळी दावाग्नि पसरला आणि व्रजवासी घेरले गेले, तेंव्हा भगवंतानी दावाग्नि पिऊन टाकला आणि सगळ्यांना वाचविले.

एकदा सगळीच गोपबाळे खेळांत रगूंन गेली होती आणि गाई चरत चरत दूर निघून गेल्या होत्या. सगळेच त्यांना शोधू लागले. इतक्यांत दावाग्नीने सर्वांना घेरले. सगळीच बालके वाचविण्यासाठी कान्ह्याला हाक मारू लागली. कृष्णांनी सर्वांना सांगितले, ‘आपापले डोळे मिटून घ्या. मी मंत्र जपतो.’ कान्ह्याने विराट रूप धारण करून दावाग्नि पिऊन टाकला.

जेव्हा जेव्हा तुम्ही प्रतिकूल अवस्थेच्या दावाग्नीने घेरले जाल तेव्हा डोळे मिटून प्रभूचे ध्यान करा. प्रतिकूल परिस्थितीत जीव हाय खातो. ही परिस्थिती म्हणजेच दावाग्नि. ईश्वर अशा व्यक्तीला

आश्वासन देतो की मी तुझ्याबरोबरच आहे.

संसाररूपी दावाग्नि चारी बाजूंनी पेट घेऊन जीवाला घेरतो. कचेरींत वरिष्ठ अधिकाऱ्यांशी भांडण होते आणि घरी येऊन पाहतो तर आपली आई आणि पत्नी यांची खडाजंगी जुंपलेली आहे! पक्ष कोणाचा घ्यावा? आईचा की बायकोचा? हा सांसारिक दावाग्नि सर्वांनाच ग्रासून आहे. अशा वेळीं तर त्या गोपबाळाप्रमाणे डोळे मिटून देवालाच शरण जा. तो सर्व दुःख पिऊन टाकील. तुमचें दुःख दूर करील. प्रभूचा नाम-जप सांसारिक दावाग्नि विझवून टाकील.

भगवंतांनी प्रलंबासुराचासुद्धा वध केला होता. प्रलंबासुर अर्थात मोठ्या वासना. या वासनांमुळे जीव ईश्वराला भेटू शकत नाही. शब्दब्रह्माचें चिंतन कराल तर अंतःकरणांतील वासनांचा हळू हळू क्षय होईल.

रासलीलेंत जायचे आहे म्हणून सर्वच दुर्गुणांचा नाश करा. दुर्गुणरहित होऊन शुद्ध झाल्यावरच जीवाला रासलीलेंत स्थान मिळेल.

**१८. वेणुगीत प्रभाव :**

कन्हैयाची बासरी ऐकून, त्याच्या मधुर तानेचें जे गोपींनी वर्णन केलें तेच वेणुगीत आहे.

सुंदर-सुखद शरदऋतु आला. वृंदावनाची शोभा अवर्णनीय झाली. मंद मंद सुगंधित पवन वाहत होता. भगवंतांनी गाई आणि गोपालांसह वृंदावनांत प्रवेश केला. गाईंना चारत चारत कृष्ण बासरी वाजवू लागले. गोपी बासरीच्या संगीतांत लीन झाल्या.

बासरीवादन तर नादब्रह्माची उपासना आहे. जोपर्यंत बासरी वाजत नाही तोपर्यंत कृष्णांचें दर्शनही होत नाही.

वेणुश्रवणाचा आनंद असा आनंद आहे कीं ज्याच्यापुढे विषयानंद आणि ब्रह्मानंददेखील तुच्छ आहेत. या नादब्रह्माच्या तुलनेंत इतर सर्वच आनंद निकृष्ट आहेत.

गोपी घरांत राहूनच बासरी ऐकू शकत होत्या आणि भगवंताची लीलासुद्धा पाहू शकत होत्या. गोपींना दूर-श्रवण आणि दूरदर्शनाच्या सिद्धि प्राप्त झालेल्या होत्या.

वेणुगीतांतील श्लोक निरनिराळ्या गोपींचे आहेत. श्रीधरस्वामी म्हणातत, श्लोकांच्या वक्त्या निरनिराळ्या असल्याकारणानें सगळ्याच श्लोकांत एकाचा दुसऱ्याशी कांही संबंध नाही.

गोपी म्हणतात – जेव्हां जेव्हां श्यामसुंदर श्रीकृष्ण आणि गौरसुंदर बलराम गोपबाळांच्या बरोबर वनांत गाई चारण्यासाठी येतात-जातात, आणि आपल्या ओष्ठद्वयावर मुरली ठेवून आमच्याकडे प्रेमपूर्ण वाकड्या नजरेने पाहत असतात तेव्हां तेव्हां आम्ही त्यांच्या मुखमाधुर्याचें पान करतो. हीच आमच्या नयनांची आणि संनयन जीवनाची सफलता आहे.

बलराम-श्रीकृष्ण उत्तम नटांसारखे शोभिवंत आहेत.

अशा श्रीकृष्णाचें दर्शन करणारे डोळेच धन्य झाले आहेत. अशा दर्शनाशिवाय डोळ्यांची इतर कोणतीच सार्थकता नाही. ज्याप्रमाणें डोळ्यांची सफलता श्रीकृष्णाचें दर्शन मिळण्यांत आहे त्याचप्रमाणे देहाची सफलता सर्वच इंद्रियांना कृष्णाच्या सेवेंत लावण्यांत आहे.

अग सखे! कृष्ण बासरी वाजवीत आहे. जरा ऐक तर! ही बासरी नाही, कृष्णाची पट्टराणी आहे. मी ऐकलें आहे कीं तो जेव्हा जेवायला बसतो तेव्हां बासरी आपल्या कमरेलाच लावून ठेवतो; आणि जेव्हा निजतो तेव्हां तिला आपल्या शेजेवर ठेवतो- बासरी त्याची पट्टराणी आहे म्हणून.

प्रभूचा ओठ बासरीची उशी आहे, हात गादी आहे, डोळे दासी आहेत, पापण्या पंखे आहेत आणि नाकांतील बाळी छत्र. या बासरीचे परमात्म्याशी लग्न लागले आहे आणि म्हणून तिला नित्य संयोग मिळाला आहे.

या वेणूने न जाणो पूर्वजन्मी कोणती तपश्चर्या केली होती कीं जिच्या योगे तिला नित्य अधरामृताचें पान करण्याचें सौभाग्य मिळालें आहे!

एका गोपीने बासरीला विचारले – अग सखे! तू असे कोणते पुण्य कमविले होतेस कीं जेणेकरून प्रभूंनी तुला आपली करून घेतले आहे.

बासरी – मी मोठीच तपश्चर्या केली होती. माझे पोट पोकळ आहे. मी माझ्या पोटांत कांहीच ठेवीत नाही.

बासरी आपल्या पोटांत कांहीच ठेवीत नाही म्हणून ती भगवंताला प्रिय आहे. दंड सगळे वैर, द्वेष, कटुता आपल्या पोटांतच ठेवतो. या सगळ्या पोटांत साठवून ठेवण्याच्या वस्तू नव्हेत. जो बासरीसारखा पोकळ होऊ शकतो तो भगवंताला आवडतो.

'माझ्यामध्यें कित्येक गुण आहेत. मी पुष्कळ कष्ट केले आहेत. सहा ऋतूंचा मार सहन केला आहे. कोणी माझें पोट पोकळ केले तरी मी चुप राहिले.' तिने कित्येक कष्ट झेलले म्हणून परमेश्वराने तिला पसंत केले.

किती का दुःखद प्रसंग येत राहो, धीर गमवू नका. कमी खाणाऱ्याचें शरीर निरोगी राहते आणि धीर खाणाऱ्याचे मन.

बासरी आपल्या स्वामीच्या इच्छेनुसारच बोलत असते. याचप्रमाणें भगवंताची जी इच्छा असेल तेच बोला. गप्पा मारणारा अविवेकी होतो. त्याचा तो स्वतःच नाश करून घेतो आणि दुसऱ्याची सुद्धा हानी करतो. आपल्या सर्वांचा स्वामी ईश्वर आहे. त्याच्या इच्छेशिवाय मी बोलत नाही.

मी आपल्या स्वामींच्या इच्छेलाच सुरांमधून आळवीत असते म्हणून सज्जन, दुर्जन, छोटा, मोठा, नाग, कस्तूरी मृग, गायी सर्वच डोलू लागतात. सगळ्यांनाच आनंद होईल अशी मधुर तान काढते.

बासरीने पुष्कळच सहन केलें तेव्हां प्रभूच्या सन्मुख होऊ शकली. जो विचार पूर्वक दुःख सहन करीत असतो त्याची पापें जळून जातात. मधुर बोलण्याचा निश्चय करा. कोणाचे हृदय दुखावेल असें कधीच बोलू नका. काठीचा मार तर विसरू शकतो, पण शब्दांचा मार सदाचाच लक्षांत राहतो. कांही कठोर बोलायचे असेल तर तेही प्रेमानें बोला.

बासरीचा एक आणखी गुण असा कीं एकटी असली म्हणजे ती मौन धरते. तुम्ही सुद्धा ईश्वराच्या ध्यानाच्या वेळीं मौन धारण करा. कित्येक लोक शरीरानें तर सावध असतात, तोंड बंद ठेवतात परंतु मनाने चालत-फिरत आणि बोलत असतात. मौन म्हणजे मनाने सुद्धा कांही बोलू नये. मनाचें मौनच सर्वोत्तम मौन आहे.

महाराणी बासरी बोलून टाकल्यानंतर आपल्या पोटांत कांहीच ठेवीत नाही.

अग सखी, पहा तर खरी. बासरीचें सूर ऐकून हें वृक्ष देखील मदस्राव करीत आहेत.

कन्हैयाच्या बासरीवादनाने वृक्षांना देखील आनंद होत आहे. त्यांच्या मुलीचें परमात्म्याशी लग्न लागले आहे.

एक महात्मा म्हणतात कीं हे तर तरूंचे आनंदाश्रु आहेत. त्यांची मुलगी श्रीकृष्णाची पट्टराणी झाली आहे ना!

एक संत म्हणतात कीं, हे दुःखाने रडत आहेत. तें समजतात, बासाचें (बांबूचें) मुख्य काम छत बनून परोपकार करण्याचें आहे. पण ही तर बासरी बनून घरें उजाड करीत आहे. कृष्णाच्या बासरीची धुन जो कोणी ऐकतो त्याचें घरांत राहायला मनच लागत नाही. तो 'राधेश्याम राधेश्याम' म्हणत म्हणत कृष्णमीलनाच्या ध्यासाने घराच्या बाहेर निघून जातो. आमच्या ह्या कान्ह्याने घरांचें रक्षण करण्याऐवजी त्यांना उजाड करण्याचें काम सुरू केलें आहे. या विचाराने सगळेच वृक्ष शोकाकुल होऊन अश्रू ढाळत आहेत.

दुसरे एक संत म्हणतात कीं, हे वृक्ष असा विचार करीत आहेत कीं पाण्यांत बुडणाऱ्या लोकांना वाचवावयाचें आपलें जातिगत काम सोडून ही बासरी सगळ्यांना आनंदरसांत बुडवण्यांत मग्न झाली आहे.

अग सखे, पहा तर खरं! कन्हैयाचें बासरीवादन ऐकून हरिणी वेड्या होऊन धावत आल्या आहेत आणि पापणी न हलविता टक लावून कृष्णाकडे पाहत आहेत. गोपींची दृष्टी इतकी तीक्ष्ण आहे कीं आपल्या घरांतूनच त्यांना हरिणींच्या स्थिरावलेल्या पापण्या दिसू शकतात.

हरिणी आपल्या पतीलासुद्धा प्रभूच्या समोर घेऊन जाते. तिचा पति तिला साथ देतो. हिचा पति अनुकूल आहे तर माझा पति देवसेवेला प्रतिकूल आहे, आणखी अधिक मी काय सांगू? माझ्यापेक्षा या हरिणी धन्य आहेत. आपले नयनकमल वाहून कृष्णाची पूजा करीत आहेत म्हणून भाग्यशाली पण आहेत. आणखी कांही पूजा सामुग्री त्यांच्यापाशी नाहीच. पति-पत्नी एक होऊन जर पूजा करतील तर भगवंत लवकर प्रसन्न होतील.

"सहकृष्णसाराः!" अर्थात पतीला सत्संगांत, परमात्म्याच्या निकट घेऊन जाणारी हरिणी खऱ्या अर्थाने पत्नी आहे.

पतीला परमात्म्याच्या सान्निध्यांत घेऊन जाणारी, पतीकडून सत्कर्म करविणारी पत्नी पतीची मित्र आहे. पतीला केवळ भोगविलासांत बुडवून ठेवणारी पत्नी पतीची शत्रु आहे.

कृष्णसेवेंत हरिणींना त्यांचे पति सहयोग देतात. आणि इकडे आमचे पति सहयोग तर देतच नाहीत, परंतु बाधाच उपस्थित करतात. म्हणून या हरिणी फार भाग्यवान आहेत.

आमच्यापेक्षा तर वृंदावनांतील हरिणी देखील श्रेष्ठ आहेत; कारण त्यांना कृष्णसेवेंत आपल्या पतीचा सहयोग मिळतो.

सखे, मी तुला काय सांगू? बंसी-नाद ऐकल्याबरोबर गोमाता चारा खाण्याचे सोडून आपल्या कानरूपी द्रोणातून बासरीच्या नादामृताचें अत्यंत आनंदाने पान करू लागतात. भगवंताची प्रेमरसांत ओथंबलेली बासरीची तान ऐकून गाई चारा खाणे विसरून जाऊन आनंदाश्रू ढाळू लागतात. वासरें देखील दूध पिणें विसरून जातात. कन्हैयाचें बासरीवादन मनुष्य, पशू, पक्षी, वृक्ष सगळेच शांतपणें ऐकतात. वृंदावनांतील वन्य सृष्टी दिव्य आहे.

जेव्हां कान्हा बासरी वाजवू लागतो तेव्हां पक्षी देखील शांत होतात. कित्येक ऋषिसुद्धा पक्ष्यांचें रूप घेऊन वृंदावनाच्या लीलानिकुंजांत 'राधेश्याम... राधेश्याम' करीत करीत इकडे तिकडे उडत फिरतात. हे पक्षी तहान लागल्यावर सुद्धा राधेश्यामाचा जप करीत करीत पाणी प्यायला जातात. त्यांना गंगेच्या काठीं मौन पाळण्याची सवय आहे म्हणून येथेही मौन पाळून कृष्णाची बासरी ऐकतात. कांही पक्षी असेही आहेत जे यमुनेचे पाणी पिण्यासाठी सुद्धा खाली उतरत नाहीत. पाणी पितांना कृष्णाचा विरह होईल ना! वृंदावनांतील पक्षी सामान्य पक्षी नाहीत; पूर्वीचे मुनि आहेत म्हणून ते वृक्षावर मौन धरून

भगवंताची बासरी ऐकून आत्मानंदांत निमग्न आहेत. धन्य आहेत हे सर्व पक्षी!

यशोदा येऊन म्हणू लागली– रोज रोज सांगते तरी कृष्ण पायांत जोडे घालीतच नाही.

सखी– काळजी करू नको. त्याचा एक मित्र त्याच्या डोक्यावर छत्री धरून चालतो.

माता– कोण आहे तो?

गोपी– तो मेघराजा कान्ह्याचा मित्र आहे. म्हणून जिथे जिथे कान्हा जातो तिथे तिथे त्याच्यावर छाया करीत असतो. कन्हैयाची लीला कांही न्यारीच आहे. ऊन लागू लागले कीं लागलीच झरझर पाऊस येऊन पोहोचतो.

जमिनीवर उघड्या पायानें चालण्याने त्याला कष्ट होत असतील. नाही! नाही! कान्ह्यासाठी गिरिराज लोण्यापेक्षासुद्धा मऊ होत असतो. कन्हैयाच्या चरणस्पर्शानें गिरिराजाचें काठिण्य पळून जाते. गिरिराज सर्वश्रेष्ठ हरिदास आहे. गाईंना चारा देतो. गिरिराज कान्ह्याबरोबर त्याच्या प्रिय गाईंची पण सेवा करतो. म्हणून तो कान्ह्याला प्रिय आहे.

विष्णूची सेवा करणारा वैष्णव आहे, परंतु गाईंची, गरिबांची सेवा करणारा तर महावैष्णव आहे.

परमात्म्याच्या चरणस्पर्शानें गिरिराज रोमांचित होत असतो. म्हणून कोठे कोठे खड्डे पडतात. परंतु त्यांना भरून काढण्याचा उपाय कन्हैयाजवळ आहे. तो बासरी वाजवू लागतो तर गिरिराज आनंदानें फूलू लागतो. म्हणजे मग खड्डे भरून निघतात.

अग सखे! कान्हा तर कदंबाच्या झाडावर चढून तिथून गाईंना हाका मारीत आहे. बासरींतून नावे घेऊन हाका मारीत आहे– गंगी, गोदावरी, यमुना! गाई आनंदाने धावत आहेत. पहा तर, गाई त्या वृक्षाभोंवती फेर धरून आनंदध्वनि करीत आहेत. माझ्या कृष्णाकडे निरखून पहात आहेत. किती मनोहर दृश्य आहे हे! मी माझी एक गोष्ट सांगू का? इथून कृष्णाकडे पहात असता मला असें वाटत आहे कीं मी वेडी होऊन कृष्णाला भेटायला धावत आहे. लोकलाजेने जेव्हा मी भानावर येते तेव्हां वाटेत थांबून विचार येतो, 'अग बाई! मी कुठून कुठे धावत आले?'

या गोपी जेव्हां स्त्री-पुरुष भेद विसरून जातील. तेव्हां त्यांना रासलीलेंत प्रवेश मिळेल. अजून लोकलज्जेचे देहाध्यासाचे क्षीण भान शिल्लक आहे. देहाध्यास मिटून गेल्यावर रासलीलेंत प्रविष्ट होतील. देहाध्यास नष्ट झाल्यावर गोपीभाव प्राप्त होतो.

जेव्हां श्रीकृष्ण गाईंना बोलावतात त्यावेळी नद्यांना भ्रांति होत असते कीं कृष्ण त्यांनाच बोलावीत आहे. त्या स्वतः तर बिचाऱ्या जाऊ शकत नाहीत म्हणून मग तरंगरूपी हातांनी कमळाची फुले वेणुनादाच्या दिशेने फेकून भगवंताचे पूजन करतात.

जड-चेतन सर्वच बासरीच्या नादाने मोहित झालेले आहे. श्यामच्या त्या मधुर बासरीचा गोडवा शब्दांत वर्णन करणें अशक्य आहे.

नादब्रह्म आणि नामब्रह्माचे ऐक्य झाले म्हणजे रासलीला होत असते.

वेणुगीत नादब्रह्माची उपासना आहे. नामांत नामीचा लय झाल्याशिवाय नादब्रह्म घडू शकत नाही.

गोपी किती तन्मय झाल्या होत्या? वनांत होणारा वेणुनाद त्या घरांत राहूनही ऐकू शकत होत्या.

जेव्हा दृश्य, दर्शन आणि द्रष्टा एकरूप होतात तेव्हां दर्शनांत एकाग्रता-तन्मयता येत असते.

ईश्वर तर दररोजच बासरी वाजवून जीवाला आपल्याकडे बोलावीत असतो. परंतु हा बहिरा जीव ऐकतच नाही.

वृंदावनाच्या गोष्टी आणि कृष्णकथा करता करता गोपी अनायासेच समाधिस्थ होऊन गेल्या.

कृष्णक्रीडांचे वर्णन करीत करीत गोपी कृष्णमय झाल्या. त्यांच्या हृदयांत लीलांविषयी स्फुरण होत राही. त्यांना ध्यान-धारणा इत्यादींची आवश्यकता नव्हती.

योगी लोक नाक धरून प्राणायाम करून ब्रह्मदर्शन करण्याचा प्रयत्न करतात तरी पण ते सफल होत नाहीत; परंतु तेच ब्रह्मदर्शन गोपींना अनायासेच होऊन जाते. गोपी योग्यांपेक्षा सुद्धा श्रेष्ठ आहेत.

जो आनंद योग्याला प्राणायाम, प्रत्याहार, ध्यानधारणेने मिळतो तोच आनंद गोपींना अनायासेच मिळतो. योग्यांसारखे कष्टसुद्धा त्यांना सहन करावे लागत नाहीत. सर्वच इंद्रियांना भक्तिरसाचे दान करणाऱ्या गोपी श्रीकृष्णांत तन्मय होऊन गेल्या. या लीलेत अनायासेच त्यांचा निरोध होत असतो. योग्यांना कष्टसाध्य असा ब्रह्मानंद गोपींना अनायासेच मिळतो.

गोपींची समाधि दिव्य आहे. त्या तर प्रेमसंन्यासिनी आहेत. त्यांनी श्रीकृष्णासाठी सांसारिक सुखांचा त्याग केला आहे. शुकदेवांसारखे योगीसुद्धा त्यांची कथा सांगत असतात. त्यांना असे वाटते की ते संसार आणि वस्त्रांचा त्याग करून संन्यासी झाले आहेत. परंतु गोपी तर संसारांत राहून आणि वस्त्रें नेसूनदेखील संन्यासिनी झाल्या आहेत. शुकदेव त्यांच्या लीलेचे वर्णन करता करता वेडे झाले आहेत. ही गोपींची नव्हे, ज्ञान्यांची-योग्यांची कथा आहे.

ज्ञान आणि भक्ती वाढवाल तर रासलीलेत प्रवेश मिळेल. ज्ञान आणि भक्ती कशी वाढेल? व्रजवासी गोवर्धन पर्वतावर गेले होते. तुम्ही सुद्धा वर्षांतून एखाद्या महिन्याची सुटी घेऊन पवित्र तीर्थाच्या ठिकाणी वास करा. प्रवृत्तीला कमी करून निवृत्ति घ्या. अकरा महिने नोकरी-धंदा केला, आता एक महिना तापी-नर्मदा, गोदावरी-कृष्णासारख्या एखाद्या पवित्र नदीच्या काठी वास करून जप-ध्यान, कीर्तन करा. प्रत्येक वर्षी एक महिना, निवृत्त होऊन देवाकरता तीर्थवास करा. सबंध वर्ष घरीच राहणे चांगले नाही. गृहस्थाचे घर भोग-भूमि आहे. तेथे लहानमोठी पापे होणारच. ममता विषमता आणते आणि विषमता पाप आणते.

पंधराशे विष्णुसहस्रनामाचे पाठ केल्याने एका विष्णुयागाचे फळ मिळते. पवित्र तीर्थांत वास करून तोच पाठ करा. सांसारिक प्रवृत्तींमध्ये व्यस्त राहून चांगल्या रीतीने भक्ती करता येणे सोपे नाही. घरांत तर देवाबरोबर बायको, मुले, धन-संपत्ति यांची सुद्धा पूजा होत असते. म्हणून भक्ती पूर्णपणे सफल होत नाही.

रासलीला भागवताचे फळ आहे. रासलीलेत पुरुष आणि स्त्रीचे नव्हे, तर पूर्ण पुरुषोत्तम आणि शुद्ध जीवाचे मिलन आहे.

सर्वच इंद्रियांनी भक्तिरसाचे पान करीत करीत आपले स्त्रीत्त्व किंवा पुरुषत्व विसरतो तोच पुरुष अथवा तीच स्त्री गोपी होय. आपले पुरुषत्व किंवा स्त्रीत्व स्मरत असेल तर गोपीभाव जागृत होणार नाही. या सर्वोच्च गोपीभावांत आपले देहभान – आपल्या नारीत्वाचे किंवा पुरुषत्वाचे विस्मरण करावयाचे आहे. जर देहभान शिल्लक राहील तर काम नष्ट होणार नाही. काम विसरल्यानंतरच गोपीभाव जागृत होत असतो. परमात्म्याचे अशा रीतीने स्मरण करा कीं आपले देहभानच राहणार नाही.

ज्ञानमार्गान्वये अज्ञानामुळेच भेदाभास होतो आणि त्याचाच नाश करायचा आहे. भक्तीमार्ग भेदाचा नाश करून अभेद सिद्ध करायला सांगतो. भक्त भक्तीच्या साहाय्याने भेदाचा नाश करून श्रीकृष्णाबरोबर एकरूप होऊन जातो.



वासनेचा क्षय झाल्यावरच जीवन सुधारत असते. पूतनारूपी वासना आणि तृणावर्तरूपी रजोगुणाचा

नाश झाल्यावरच जीवन सात्त्विक होईल.

भक्तिरस सर्वच इंद्रियांना पुष्ट करतो. दावाग्नि शांत झाल्यावर वेणुगीत ऐकता येऊ शकेल. ही सर्व तयारी रासलीलेत प्रवेश करण्यासाठी आहे.

ईश्वराचे प्रत्यक्ष स्वरूप नादब्रह्म आहे. यांत तन्मयता झाली म्हणजे परब्रह्माची प्राप्ति होईल.

वेणुगीतांत ब्रह्मचारिणी गोपींचा रास आहे. यज्ञ-पत्नींच्या प्रसंगांत विवाहिता आणि गोवर्धनलीलेत वानप्रस्थ गोपींबरोबर रास आहे.

वेणुनादांत नादब्रह्माची उपासना करीत करीत गोपी तन्मय होऊन गेल्या. गोपींनी कात्यायनी व्रत घेतले म्हणून श्रीकृष्णांनी त्यांना दिव्य वस्त्राचे दान केले.

एकदा गोपबाळांना भूक लागली तर त्यांनी कान्ह्याला सांगितले. कान्ह्याने त्यांना यज्ञ करीत असलेल्या ब्राह्मणांपाशी पाठविले. ब्राह्मणांनी कांहीच दिले नाही. परंतु ब्राह्मणांच्या बायकांनी त्यांना जेवू घातले. हीच यज्ञपत्नींच्या उद्धाराची संक्षिप्त कथा.

अन्नदान सर्वोत्तम दान आहे. भगवंत गरीब आणि परमपवित्र ब्राह्मणांच्या मुखाने भोजन करीत असतात. सगळ्यांनाच यथाशक्ति भोजन घाला.

## १९. गोवर्धनलीला :

आता येत आहे गोवर्धनलीला. गोवर्धनलीलेनंतर मग येईल रासलीला.

गोचा अर्थ आहे ज्ञान आणि भक्ती. ज्ञान आणि भक्तीला वृद्धिंगत करणारी लीलाच गोवर्धन-लीला आहे. ज्ञान आणि भक्ती वाढल्याने देहाध्यास नष्ट होतो आणि जीवाला रासलीलेत प्रवेश मिळू शकतो.

ज्ञान आणि भक्तीला वाढवायला काय करावे? घर सोडावे लागेल. गोपगोपींनी घर सोडून गिरिराजावर वास केला होता. आमचे घर भोगभूमि असल्याकारणाने राग-द्वेष, अहंभाव-तिरस्कार, वासना इत्यादी आम्हाला घेरून राहतात. घरांत विषमता असते आणि पापसुद्धा असते. भोगभूमींत भक्ती कशी वाढीस लागेल? सात्त्विक भूमींतच भक्ती वाढू शकते.

साधारण गृहस्थाचे घर विविध वासनांच्या सूक्ष्म परमाणूंनी भरलेले असते. असे वातावरण भक्तीला बाधक आहे. अशा वातावरणांत सगळे वर्षभर राहून भक्ती वाढू शकणार नाही कीं ज्ञानही नाही. म्हणून एखादा महिना एखाद्या नीरव पवित्र स्थळी जाऊन एखाद्या नदीच्या काठी वास करून भक्ती आणि ज्ञानाची आराधना करणे श्रेयस्कर आहे.

तसें होऊ शकले नाही तर घरालाच तीर्थ बनवा. प्रवृत्ति सोडणे तर अशक्य आहे. परंतु ती थोडी कमी करून निवृत्ति वाढवा. प्रभुंनी जे काय दिले असेल त्यात संतुष्ट रहा. प्रवृत्तीमध्ये अतिशयता नसावी. प्रवृत्तींत निवृत्तीचा आनंद तर झालाच पाहिजे. निवृत्तीचा आनंद प्रवृत्तीच्या चिंतनाकडे ओढत असतो म्हणून निश्चय करा कीं निवृत्तीचा आनंद मिळाला नाही तरी प्रवृत्तीचा विषयानंद भोगायचा नाही. निवृत्तीच्या वेळी भजनानंद मिळवायचा असेल तर लौकिक सुखांचा विषयानंद सोडावाच लागेल.

कचऱ्यांतून अत्तराचा सुगंध कसा येईल? प्रवृत्तींमध्यें नीरव आणि सात्त्विक आनंद कुठला? प्रवृत्ति सोडल्यावाचून भक्तीचा उदय कसा होईल?

'गो' चा अर्थ इंद्रिय असाही आहे. इंद्रियांचे संवर्धन त्यागाने होते, — भोगाने नाही. भोगाने इंद्रिये क्षीण होतात. भोगमार्गांतून दूर करून त्यांना भक्तीमार्गाकडे न्यायचे आहे खरे, पण त्यावेळी इंद्रादि देव वासनेचा पाऊस पाडतात. मनुष्याची भक्ती त्यांच्याने पाहवत नाही. प्रवृत्तिमार्ग सोडून

निवृत्तीच्या वाटेवर जाऊ लागताना विषयवासनांचा पाऊस बाधा करायला येत असतो. म्हणून निवृत्ति अंगीकृत केल्यावर सुद्धा निवृत्तीचा सात्त्विक आनंद दुर्लभ होतो. इंद्रियांचा देव इंद्र प्रभुभजन करायला जाणाऱ्या जीवास सतावीत असतो. उपनिषदांत सुद्धा म्हटले आहे की निवृत्ति घेऊन प्रभुभक्ती करणाऱ्या जीवाला इंद्र सतावीत राहतो. त्याला वाटते की आपल्या डोक्यावर पाय ठेवून आपल्याला तुडवून हा जीव पुढे निघून जाईल. म्हणून ध्यान, सत्कर्म, भक्ती इत्यादींमध्ये जीवांपेक्षा देव अधिक 'बाधक' आहेत. जीव सतत ध्यान करील तर स्वर्गातील देवांपेक्षा सुद्धा तो श्रेष्ठ होऊ शकतो. म्हणून जेव्हां इंद्रियांचा अधिपति इंद्र भक्तीमार्गांत विघ्न करायला येईल तेव्हा गोवर्धनाचा आश्रय घ्या.

गोवर्धनलीलेत खूप आनंद आहे. गोवर्धनलीला रासलीलेचा उपोद्घात आहे. यांत पूज्य आणि पूजक एक होतात. पूज्य आणि पूजक जोपर्यंत एक होत नाहीत तोपर्यंत आनंद येत नाही. पूजा करणाऱ्या श्रीकृष्णाने गिरिराजावर आरोहण केले. तो अद्वैताचा प्रथम सोपान आहे– रासलीलेचे फळ आहे.

गोवर्धनलीला ज्ञान आणि भक्ती वाढविते. ही दोन वाढली म्हणजे रासलीलेत प्रवेश मिळतो. परंतु त्या स्थितींत इंद्रियांच्या वासनांच्या पावसापासून सुरक्षित राहाणे फार आवश्यक आहे.

पूज्य आणि पूजक, सेव्य आणि सेवक एक होतात तेव्हां सेवा फारच चांगल्या रीतीने होते. परमात्म्यासारखे पवित्र झाल्याशिवाय प्रभुपूजेचा अधिकार मिळत नाही. शास्त्रांत अंगन्यास, करन्यास इत्यादी विधि सांगितले आहेत. दिवाळीच्या दिवसांत गोवर्धनपूजा केली जाते. कारण मागील सगळेच दुःख विसरून जाऊन वैर मिटवायचे आहे. विरोध जोपर्यंत जात नाही, तोपर्यंत पूजा होऊ शकत नाही.

गोवर्धनपूजेच्या वेळी कान्हा सात वर्षांचा होता.

पूज्य आणि पूजक एक झाले म्हणजे रासफळ मिळते. याचकारणे रासलीला गोवर्धनलीलेनंतरच येते.

दर वर्षी नंदबाबा इंद्रयाग करीत असतात. यज्ञाची तयारी सुरू झाली कृष्णानें विचारलें, 'बाबा, हे सर्व कशाकरता होत आहे? कोणत्या देवासाठी आणि कोणत्या उद्देशाने हा यज्ञ केला जात आहे?'

नंदबाबा समजवू लागले कीं पावसाचा देव इंद्र आहे. इंद्राने पाऊस पाडावा, धान्य आणि चारा उगावा आणि सगळ्या जीवांनी सुखाने जगावे या हेतूने हा यज्ञ केला जात आहे. इंद्र आमचा देव आहे. त्याला प्रसन्न करण्यासाठी आम्ही यज्ञ करीत आहोत.

कन्हैया कोणत्याच देवाचा अपमान करीत नाही की उपेक्षा करीत नाही.

कान्हा म्हणाला– इंद्राचा यज्ञ करणे तर ठीक आहे, पण त्याला देव का मानावे? कोणीही व्यक्ति शंभर यज्ञ करून इंद्रपद मिळवू शकते. इंद्राचाही इंद्र ठाऊक आहे?

नंदबाबा– बेटा, कोण आहे तो?

कान्हा– हा माझा गोवर्धननाथ इंद्राचाही इंद्र आहे. तो चारी दिशांचा देव आहे. पूर्वेकडे जगन्नाथ, दक्षिणेत रामेश्वर, पश्चिमेकडे द्वारकानाथ आणि उत्तरेकडे बद्रीनाथ आहेत. आणि या चारींच्या मधोमध आहे गोवर्धननाथ. हा सगळ्यांचा स्वामी आहे. म्हणून मधोमध बसला आहे. बाबा, त्याचीच पूजा करा. कित्येक वर्षांपासून तुम्ही इंद्राची पूजा करीत आला आहात, परंतु त्याचे कधी दर्शन तरी झाले आहे का?

नंदबाबा– नाही तर!

कान्हा– इतक्या वर्षांच्या पूजेनंतर सुद्धा तो दर्शन देत नाही. याचा अर्थ हाच कीं तो अभिमानी आहे. ज्या देवाला कधी पाहिलेच नाही त्याची पूजा का करता? हा गोवर्धन तर आमचा प्रत्यक्ष देव

आहे. जो हा पर्वत दिसतो आहे ते तर त्याचे आधिभौतिक स्वरूप आहे. त्याचे आधिदैविक स्वरूप तर वेगळेच आहे. सूक्ष्म आहे. गोवर्धननाथ या पर्वतात सूक्ष्म रूपाने वसलेले आहेत. ते आम्हा सर्वांचे रक्षक आहेत. मला अनेक वेळा दर्शन झाले आहे. गोवर्धननाथ दिव्याची जिवंत ज्योती आहेत. तुम्ही सर्व त्याचीच पूजा करा. तुम्हाला सर्वांना त्याचे दर्शन होईल.

इंद्राचा अभिमान नष्ट करण्याचा श्रीकृष्णांनी निश्चय केला आहे. म्हणून सगळ्यांना समजवीत आहेत की इंद्रदेवाच्या ऐवजी गोवर्धननाथांची पूजा करा.

नंदबाबा– गोवर्धननाथाचा पूजाविधि आम्हाला माहीतच नाही तर आम्ही पूजा कशी करू शकू ?

कन्हैया– बाबा, मला माहित आहे. तुम्ही कांही काळजी करू नका. गोवर्धननाथाच्या पूजेची तयारी करा. गरिबांसाठी अन्नकूट करायचे आहे. गरीबांची, गाईची आणि सदाचारी ब्राह्मणांची पूजा ईश्वराची पूजा आहे.

सगळ्यांच्याच घरून खाण्यापिण्याच्या वस्तू मागविल्या गेल्या. गाईंची मिरवणूक काढली गेली. ज्याच्या घरून अन्नसामुग्री यायची नाही त्याच्या घरी अन्नपूर्णा येणार नाही.

नंदबाबा– अरे, तुझा देव जेवण करताना मला दिसेल का ?

कन्हैया– आपण सर्वच पाहू शकू.

व्रजवासींना अत्यंत आनंद झाला. कन्हैयाने गोवर्धनपूजेसाठी दिवाळीचा दिवस ठरविला. ते सर्व गाड्या भरभरून खाद्यसामुग्री घेऊन गोवर्धनाच्या जवळ आले. सर्वच ब्राह्मणांना आमंत्रणे दिली होती. ब्राह्मण वेदोच्चार करू लागले आणि कन्हैया अभिषेक. आज भगवान श्रीकृष्ण पूजा करीत आहेत. गोपबाळांकडून यमुनाजळ मागविले गेले.

पाणी आणता आणता बालके थकून गेली आणि म्हणू लागली– कन्हैया, यमुना फार दूर आहे आणि तुझा देव आहे मोठा लांबरुंद. अभिषेकासाठी इतके पाणी आम्ही कसे आणू शकू ?

कन्हैया– अरे मित्रांनो ! माझा हा गोवर्धननाथ फारच दयाळू आहे. तुम्ही कांही काळजी करू नका.

आता कन्हैया म्हणू लागला– हे गोवर्धननाथ ! माझे मित्र थकून गेले आहेत. गंगा-यमुना तर तुझ्या चरणांतच आहेत. कृपाकरून कोणाला तरी प्रगट करा.

त्याचवेळी गोवर्धनांतून गंगा प्रगट झाली. हिला मानसी गंगा म्हणतात.

सगळीच मुलें आनंदाने उड्या मारू लागली– 'नदी आली ! नदी आली !' कन्हैयाने समजविले– ही कांही सामान्य नदी नाही, ही गंगा आहे. गोवर्धनाचा अभिषेक पूर्ण झाल्यावर शृंगार केला गेला. व्रजवासी म्हणतात, अभिषेक दर्शनांत आम्हांला फारच मौज येते. हा ठाकुर (देव) तर आम्हाला पाहून हसत आहे.

व्रजवासी चंदन घेऊन आले तर कन्हैया म्हणाला– थंडीचा ऋतु आहे म्हणून चंदनाने माझ्या देवाला त्रास होईल. बालकांनी कुंकवाचा तिलक करण्याचे ठरविले.

कान्हा– कुंकवाचा टिळा लावू शकता, पण ते कुठे नाकांत न जावो, नाही तर शिंक येईल.

सेवा-पूजा करताना मूर्तीला चेतन समजा, जड नाही. मूर्तीत साक्षात् परमात्मा आहेत असे समजा. आपल्या देहाविषयी जी काळजी घेता तीच काळजी देवाविषयी घ्या.

प्रभू देखील मोठे गमती करणारे आहेत. कान्ह्याने आपले एक नंदबाबांच्या जवळ ठेवले आणि दुसऱ्याने गिरिराजांत प्रवेश केला.

सगळे म्हणू लागले– कन्हैया, हा पर्वत तर श्वास घेत आहे.

भगवंताची तीन रूपे आहेत. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक.

देवाने दह्याचा टिळा लावला. दही नाक किंवा कानांत गेले तर कांही हरकत नसते.

कान्ह्या! आता आपण देवाचे भाताने अभिवादन करू.

कान्हा– नाही, नाही! भात देवाला लागला तर?

तर आम्ही काय करावे?

कान्हा– मोत्यांनी पूजा करा. जर प्रेमाने मोत्यांनी अभिवादन केले तर तुमचे घर मोत्यांनी भरून जाईल.

भगवंताचे एक स्वरूप चतुर्भुज पण आहे. ते आधिभौतिक स्वरूप आहे.

कन्हैया आज आपल्या स्वतःलाच नमस्कार करीत आहे.

बाबा, हा आहे साक्षात् परमात्मा.

सगळे विचारू लागले– कान्ह्या! आता आम्ही काय करायचे राहिले आहे? तर कन्हैया म्हणाला– माझ्या प्रभूला भूक लागली आहे. म्हणून नैवेद्य अर्पण करा.

भगवंताला नैवेद्य अर्पण केल्याशिवाय कधीच खाऊ नका. नैवेद्य अर्पण न करण्याने ते उपाशी तर राहणार नाहीत, पण कधीतरी तुम्हाला उपाशी राहावे लागेल. या जन्मी नाही तर कोणत्या तरी जन्मात उपाशी राहाल.

व्रजवासी– गोवर्धननाथसुद्धा उपाशी असतात का? खरोखरच ते खातील का?

कन्हैया– हो, माझा नाथ तर दिव्याच्या ज्योतीसारखा जिवंत आहे– प्रत्यक्ष आहेत ते आपल्यासमोरच खातील.

सर्वच खाद्यसामुग्री ढिगाच्या आकारांत ठेवली गेली आणि वर तुळशीपत्र देखील अर्पण केले गेले.

हे गोवर्धननाथ! तुम्हाला तर कोणं खाऊ घालू शकेल? तुम्ही तर सर्व जगाचे अन्नदाते आहांत. आमची भावना आहे, प्रार्थना आहे की आपण भोजन करीत असता आम्ही सर्वांनी पाहावे.

गोवर्धाननाथ ताट उचलून जेवू लागले.

गोपबाळे आनंदाने नाचू लागली. कृष्णा! अरे, हे देव तर खरोखरच खात आहेत.

सगळेच एकदम म्हणाले– कन्हैयाचा देव तर खरोखरीच दिव्याच्या ज्योतीसारखा जिवंत आणि प्रत्यक्ष आहे.

गोवर्धननाथांनी खाणे चालूच ठेवले तशी गोपबाळांना चिंता पडली– कृष्णा! असे वाटते की हे तर सगळेच खाऊन टाकतील. फार दिवसांचे उपाशी दिसतात. आमच्यासाठी कांही शिल्लक ठेवतील की नाही? तू तर एकटा कधी खात नाहीस आणि हे तर एकटेच सर्व खात आहेत. प्रसाद सुद्धा मिळणार नाही का?

कन्हैया– माझे देव जितके खातील तितकेच आपल्यालाही देतील. पहा, गोवर्धननाथांच्याजवळ लक्ष्मी आली आहे. ते ज्याच्या घरी भोजन करतात त्याच्या घरी महालक्ष्मीची कृपा होते.

गोवर्धननाथाच्या पूजा आणि आरतीनंतर सर्वच व्रजवासी जेवायला बसले. छोटा कान्हा वाढीत आहे आणि सगळ्यांनाच आग्रह करकरून खाऊ घालीत आहे.



गोपबाळे म्हणत आहेत की आजचे जेवण तर इतके छान आहे की एकेकाची तीन-तीन, चार-चार

पोटे होतील तर मजा येईल.

कन्हैया– इच्छा येईल तितके खा, पण टाकू नका. अन्न ब्रह्म आहे. जो उष्टे खाईल तो तुमचे पुण्य देखील खाऊन जाईल. प्रसादाचा अपमान केला तर गोवर्धननाथांना राग येईल.

अन्नाचा कधीही अनादर करू नका. भिकाऱ्यांना सुद्धा उष्टे अन्न देऊ नये. भिकारी झाला म्हणून काय झाले? तोही तर ईश्वराचाच अंश आहे ना?

सर्वांनाच प्रसाद दिला गेला. सर्वांनीच रात्री पायथ्याशीं मुक्काम केला.

इकडे नारद इंद्रापाशी आले– 'नारायण! नारायण!' त्या गोपाळांच्या मुलानें तुझा अपमान केला आहे. तुझी पूजा करण्याऐवजी गोवर्धनाची पूजा केली.

इंद्राने रागावून बाराही मेघांना आज्ञा दिली– 'त्या गोपाळाच्या पोराने माझा अपमान केला आहे. व्रजावर तुटून पडा आणि सगळ्यांचा नाश करून टाका?'

मेघांनी व्रजामध्ये हाहाकार करून सोडला. कार्तिक महिन्यांत इतका मोठा पाऊस कधीच पडत नाही. सगळेच भयभीत झाले. नंद देखील व्याकुळ झाले.

कन्हैया म्हणू लागला– माझे प्रभू गोवर्धनाथ सगळ्यांचे रक्षण करतील. त्यांच्यावर विश्वास ठेवा. त्यांनी मला स्वप्नांत सांगितले आहे कीं ते माझ्या पूजेने प्रसन्न झाले आहेत. सात दिवसपर्यंत पाऊस पडत राहील. पण त्यांना शरण गेल्यावर ते आपले रक्षण करतील. त्यांनी सांगितले आहे कीं, मी भाररहित होऊन तुझ्या बोटावर उभा राहून सगळ्यांचे रक्षण करीन.

कृष्णा, अशीच गोष्ट आहे, तर मग लवकर उचल गोवर्धन.

कन्हैया– मी एकटा कसा उचलीन? तुम्ही सर्वच मला मदत करा.

गोवर्धननाथ अगदी हलके फुलासारखे झाले आणि कृष्णाच्या करंगळीवर उभे राहिले.

श्रीगिरिराजाचा जय असो!

सर्वांना परम आश्चर्य वाटले आहे. व्रजवासी तृप्तच होत नाही या दर्शनाने!

सात दिवसपर्यंत मुसळधार पाऊस पडत राहिला. गोपाळांनी विचार केला की एकटा कृष्ण थकून जाईल. त्यांनी आपापल्या काठीचा आधार दिला.

कान्ह्या, आम्ही आपल्या काठ्यांवर गोवर्धनाचा भार उचलला आहे. तू थकला असशील, काढून घे आपले बोट.

कान्हा– तुमच्या काठ्यांवर उभा आहे काय? बरे, मी काढून घेतो आपले बोट.

कान्ह्याने आपले बोट काढून घेतल्याबरोबर पर्वताचा भार असह्य झाला.

गोपाळ ओरडू लागले– हा तर खाली पडू लागला आहे. लवकर आधार दे.

आधार घ्यावाच लागला तर फक्त एका ईश्वराचाच घ्या; इतर कोणाचा नाही.

ज्याला जे पाहिजे असेल तेच गोवर्धननाथ देतात.

कन्हैया अलौकिक शक्तीचे दर्शन करवीत आहे. तो बासरी वाजवू लागला तर गोवर्धननाथ डोलू लागले. सगळ्यांना अतिशय आनंद झाला.

गिरिराजांचे स्वरूप असे दिव्य होते की व्रजवासी सात दिवसपर्यंत देहधर्म विसरून गेले. भूक-तहान पण विसरून गेले.

याप्रमाणे सात दिवसपर्यंत भगवान श्रीकृष्णांनी गोवर्धनपर्वताखाली सगळ्या व्रजवासींचे आणि गाई वासरांचे रक्षण केले.

आता इंद्राला कन्हैयाच्या खऱ्या स्वरूपाचे भान झाले. हा तर साक्षात् परमात्मा आहे! त्याचा अभिमान उडून गेला. तो प्रार्थना करू लागला— माझी चूक झाली. नाथ! मला क्षमा करा. त्याने मेघांना सुद्धा थांबण्याची आज्ञा दिली.

सगळेच व्रजवासी बाहेर आले आणि व्रजांत गेले. इंद्राने श्रीकृष्णाचा दुधाने अभिषेक केला. ते दूध जेथे एकत्रित केले गेले त्याला सुरभि-कुंड म्हणतात.

कांही लोकांना वाटू लागले कीं हा कान्हा बहुधा ईश्वर आहे. एक सभा झाली आणि चर्चा चालू झाली. कोठे हा सात वर्षांचा मुलगा आणि कोठे तो भारी भक्कम गोवर्धन पर्वत! हा नंदाचाच मुलगा आहे कीं कोणाचा उचलून आणला आहे? आम्ही नंदांना बोलावून त्यांनाच विचारतो.

नंद बाबा, आले. त्यांना व्रजवासींनी विचारले, हा मुलगा कोणाचा आहे?

नंदबाबा— हा माझाच मुलगा आहे. गर्गाचार्यांनी सांगितले होते कीं कान्ह्यांत नारायणासारखे गुण आहेत.

यशोदेने ही चर्चा ऐकली. तिने विचारले, तू कोणाचा मुलगा आहेस रे?

कान्हा— तुझाच तर आहे मी.

यशोदा— लोक म्हणतात कीं मी आणि तुझे वडील गोरे आहेत. मग तू काळा कां आहेस?

कन्हैया— जन्माच्या वेळी मी गोराच होतो, पण तुझ्या चुकीमुळे मी काळा झालो आहे. माझा जन्म तर मध्यरात्री काळोखांत झाला व तुम्ही सर्व तर गाढ झोपला होता. तेव्हां मी एकदा त्या काळोखांत या कुशीवरून त्या कुशीवर, त्या कुशीवरून या कुशीवर असा सारखा वळत होतो तेव्हा तो काळोख माझ्या अंगाला चिकटला.

भोळ्या यशोदेने कन्हैयाचे म्हणणे खरेंच मानले. बारा वाजेपर्यंत तर मी जागत होते. त्यानंतर कोण जाणे काय झाले होते. माझ्याच चुकीमुळे कान्हा काळा झाला.

एकनाथमहाराज निराळेच कारण सांगतात. मनुष्याचे काळीज काळे आहे, कारण त्यात काळी कामे असतात. जो मनुष्य पुनःपुन्हा श्रीकृष्णकीर्तन, ध्यानधारणा, स्मरण, चिंतन करतो त्याचा काळीमा कृष्ण ओढून घेतो. वैष्णवांच्या हृदयाला उज्ज्वल करता करता कान्हा काळा होऊन गेला आहे.

विषयांचेच जो चिंतन करीत राहतो तो अंतर्यामी काळा होतो. कन्हैया त्याला उज्ज्वल करण्यांत गुंतलेला आहे.

गोपी म्हणतात— आम्ही डोळ्यांत काजळ घालतो. कान्हा आमच्या डोळ्यांत वसत असतो म्हणून काजळाने तो काळा झाला आहे.

महाभारताच्या उद्योगपर्वांत एक प्रसंग आहे. शिष्टीच्या हेतूने आलेल्या श्रीकृष्णाला दुर्योधन म्हणाला— 'तुझे आई-वडील कोण आहेत हे अजून निश्चित झालेले नाही. नंद-यशोदा, तुझे आई-वडील गोरे आहेत तर तू काळा का आहेस?'

श्रीकृष्ण— मी कौरवांचा काळ बनून आलो आहे म्हणून काळा आहे.

परंतु दुर्योधनाशी अशा गोष्टी करणारे कृष्ण राधेला आणखीच कांही सांगतात. लीला-निकुंजांत दोघेही रममाण झाले होते. राधेने मोठ्या प्रेमाने विचारले— नाथ, तसे तर तुम्ही सुंदर आहात, पण श्याम का आहात?

श्रीकृष्ण— तसा तर मी गोराच होतो पण तुझी शोभा वाढविण्यासाठी मी काळा झालो आहे. तुझे सौंदर्य वाढले तर लोक तुझी प्रशंसा करतील. आपण दोघेही गोरे असतो तर तुझी प्रशंसा कोणी

केली असती ?

इंद्रादि देव श्रीकृष्णाची पूजा करण्यासाठी आले. तुमचे खरे स्वरूप आम्ही जाणू शकलो नाही. आम्हाला क्षमा करा. सुरभीने कन्हैयाला अभिषेक केला.

गोवर्धनलीला रहस्यमयी आहे. या लीलेनंतर रासलीला येते. गोवर्धनलीला ज्ञान आणि भक्ती वाढविते. जेव्हा ईश्वराच्या व्यापक स्वरूपाचा अनुभव येतो तेव्हांच ज्ञान आणि भक्ती वाढीस लागतात.

गोवर्धनलीलेत पशुपक्षांसहित सर्वांनाच प्रसाद दिला गेला आहे.

ईश्वर सर्व जगांत व्याप्त आहे आणि सगळे जग ईश्वरांत सामावलेले आहे.

"शिवः केवलोहम्" ही तर वेदान्ताची चरमसीमा आहे. परंतु आरंभी तर सगळ्यांमध्ये ईश्वरालाच पहा. सर्वांमध्ये ईश्वराचाच अनुभव घ्या.

उपासनेचे दोन भेद आहेत – व्यक्त आणि अव्यक्त.

प्रत्येकांत ईश्वर पाहाल तर वासना जागृत होणार नाही. सुंदरीला मातृदृष्टीने पाहिल्यावर कामना कशी जागृत होईल ? याप्रमाणे सर्वांनाच ईश्वरभावाने पहा !

जड-चेतन सगळ्यांतच कृष्णाचा अंश आहे, असा अनुभव करण्यासाठी सुद्धा ही गोवर्धनलीला रचली गेली आहे.

इंद्रिये जेव्हा ज्ञान आणि भक्तीकडे जाऊ लागतात तेव्हां वासना बाधक होऊन उभी राहते. दूध वर येऊ लागले म्हणजे त्यावर पाणी शिंपडावे की ते शांत होते. वासनेचा वेग घालविण्यासाठी श्रीकृष्णाचा आश्रय घ्या. भगवदाश्रय कामवासनेचा मार सहन करण्याची शक्ति देतो.

भगवंतांनीच हाताच्या सर्वांत लहान बोटावर गोवर्धन पर्वत धारण केला होता. हे बोट (करंगळी) सत्त्वगुणाचे प्रतीक आहे. इंद्रियांवरील वासनेच्या पावसाच्या वेळी सत्त्वगुणाचा आश्रय घ्या. सद्ग्रंथांचे वाचन-मनन करा. सद्ग्रंथ आणि संतांचा संग वासनेशी लढण्याची शक्ती देईल.

जीव काठीचा आधार घेतो पण प्रभूचा आधारच जीवन सफल करील. संसार-गोवर्धन प्रभूच्या साहाय्यानेच उभा आहे. भगवंताचा आधार असल्याकारणाने आनंदीआनंदच आहे. त्यांचा सहारा नसेल तर क्षणमात्रांत 'लाख' खाक होऊन जातात.

दुःखांत आणि विपत्तींत केवळ प्रभूचाच आश्रय घ्या-मदत घ्या. गोपाळांनी सुद्धा गोवर्धननाथाचाच आश्रय घेतला होता.

शरण गेल्यावर प्रभु दुःखमुक्त करून रक्षण करतात. सर्वच व्रजभक्त इतर देवांचा आसरा सोडून श्रीकृष्णाला शरण गेले तेव्हा त्यांची सगळी सुख-दुःखे भगवंतांनी घेतली. गिरिराज उचलण्याच्या लीलेत हाच भाव आहे.

गीतेत सुद्धा भगवंतांनी म्हटले आहे – हे अर्जुना ! जो अनन्यभावाने माझे भजन करतो, सर्वस्व समर्पित करून माझी भक्ती करतो, अशा सर्वच जीवांना सांसारिक आणि भौतिक दुःखांतून मुक्त करायचे दायित्व मी स्वीकारतो. त्यांचा योगक्षेम मी चालवितो.

ज्ञान आणि भक्ती वाढल्यावर रासलीलेत प्रवेश मिळतो. त्यावेळी इंद्रिये वासनेचा पाऊस पाडण्यासाठी येऊन थडकतील.

सगळ्याच प्रयत्नांच्या शेवटी तर ईश्वराची कृपा मागावीच लागते. गोवर्धनलीलेत अद्भुत तत्त्व आहे. त्यांत पूज्य आणि पूजक एक होत असतात; सेव्य आणि सेवक एक होऊन जातात.



म्हटलेच आहे – "शिवो भूत्वा शिवं यजेत्" शिव होऊन शिवाची पूजा करा.

ईश्वरासारखे होण्याचा, ईश्वराशी एक होण्याचा अर्थ हा कीं त्यांच्या इच्छेत आपली इच्छा मिळवून देणे. जीव जेव्हा आपली इच्छा भगवंताच्या इच्छेत विलीन करतो तेव्हा तो भक्तीमार्गांत पुढे सरकतो. सतत ब्रह्मसंबंध साधून राहाल तर तुम्ही ब्रह्मरूप होऊ शकाल.

गोवर्धनलीलेत पूजा करणारे श्रीकृष्ण आहेत आणि ज्यांची पूजा होत आहे त्या गोवर्धनांत देखील तेच आहेत.

गोवर्धनलीलेंत सेवक-सेव्य, भक्त-भगवंताची तद्रूपता दाखविली आहे. कान्हा गोवर्धनाची अर्थात स्वतःचीच पूजा करीत आहे. जीव आणि ईश्वर येथे एक झाले आहेत. हाच तो "सः अहम्-सोऽहम्" भाव आहे.

भक्त इच्छानुसारी, बाललीलेत दुग्धादि चोरून यशविस्तार करणारे, व्रजवनितारंजक असे गिरिराजधारी श्रीकृष्ण माझे प्रभु आहेत.

गोवर्धनलीलेत गोपींचा विश्वास बसला कीं कान्हा ईश्वर आहे. म्हणून त्यांच्याशी एकाकार होण्याची इच्छा जागृत झाली आणि रासलीला घडून आली.

भक्तिरसांत सर्व इंद्रियांना न्हावून काढाल तर रासलीलेत प्रवेश मिळेल.

श्रीकृष्णाचे देवाधिदेवत्व सिद्ध करण्यासाठी ब्रह्मदेव व इंद्र-वरुण इत्यादींचा पराभव केला गेला. ब्रह्मदेवाला सृष्टी निर्माण करण्याचा अभिमान होता. भगवंतांनी अनेक रूपे धारण करून त्या स्वरूपाद्वारे स्वतः क्रीडा-लीला करून ब्रह्मदेवाचा अभिमान दूर केला. इंद्राचा स्वर्गाचा राजा असण्याचा अभिमान गोवर्धनलीलेने दूर केला. इंद्र हे समजून चुकला की त्याला स्वर्गाच्या सिंहासनावर कृष्णानेच बसविले आहे.

श्रीकृष्ण अवतारच नाहीत तर अवतारी पूर्णपुरुषोत्तम आहेत.

२८ व्या अध्यायांत वरुणदेवाच्या पराभवाची कथा रासपंचाध्यायीने सुरू होते. रासलीलेच्या आधी आलेल्या या कथेचे विशेष वैशिष्ट्य आहे.

हे व्रजवासी गोसेवा, एकादशीव्रत, कृष्णकीर्तन इत्यादी करीत होते. म्हणून श्रीकृष्ण मथुरेहून गोकुळाला आले. व्रजवासी तर भोळे-भाबडे होते आणि जास्त शिकलेसवरलेलेही नव्हते. त्यांना योगविद्या ठाऊक नव्हती. तरी पण त्यांच्या साध्या भोळेपणामुळे त्यांना भगवान भेटले (मिळाले).

व्रजवासी विधिपूर्वक एकादशीव्रत करीत असत. अर्थात त्यांनीच कृष्णाची खरी आराधना केली आणि आनंद दिला.

शास्त्राने एकादशीव्रत विधिपूर्वक करायला सांगितले आहे. तो दिवस पूर्णपणे प्रभुसेवेत घालवावा, आणि सबंध रात्रभर जागरण करून कृष्णकीर्तन करीत राहावे. कमीत कमी रात्रीं बारा वाजेपर्यंत कृष्णकीर्तन अवश्य करावे. परमात्म्याच्या चरणापाशी राहणे म्हणजेच तर एकादशी आहे.

परमात्म्याच्या चरणापाशी शरीराने नाही तर मनाने राहायचे आहे. एकादशीच्या दिवशी मन श्रीकृष्णाशिवाय इतर कोणत्याही विषयाकडे जाता नये.

व्रजवासी एकादशीच्या दिवशी रात्रीं जागरण करीत असत. नंद मध्यरात्रीच्या वेळी यमुनेचे स्नान करायला गेले.

रात्री साडेअकरापासून पहाटे साडेतीन वाजेपर्यंतचा वेळ जेवण, स्नान इत्यादींसाठी निषिद्ध मानला आहे. आजकाल तर लोक स्वयंपाक करून सिनेमा पाहायला जातात आणि रात्री बारा वाजता जेवायला बसतात. ही तर पुढल्या जन्मात राक्षसयोनीत जाण्याची तयारी आहे. रात्री अकरा वाजता तीर्थांत

राक्षस प्रवेश करतात म्हणून स्नानादींचा निषेध केला आहे.

नंदाला वाटले की मध्यरात्र उलटून गेली आहे आणि प्रातःकाळची वेळ झाली आहे, म्हणून त्यांनी स्नानासाठी बुडी मारली. आसुरी वेळी स्नान करताना पाहून वरुणदेवांचे सेवक नंदांना धरून वरुणलोकी घेऊन गेले. तिथून त्यांना श्रीकृष्णांनी सोडवून आणले.

आता ह्या कथेचे रहस्य पाहू. रासलीलेच्या आधी आली आहे ही वरुणदेवाच्या पराभवाची कथा.

वरुणदेव जिभेचे स्वामी आहेत आणि त्यांचे सेवक दूत आहेत षड्रस. जोपर्यंत रसनेवर ताबा येणार नाही तोपर्यंत रासलीलेत प्रवेश मिळत नाही. षड्रस विजेत्याला रासरस मिळतो.

नंद जीव आहे. जीव जेव्हां चित्तनदींत स्नानाकरिता बुड्या मारतो तेव्हा वरुणसेवक षड्रस त्याला त्रास द्यायला उपस्थित होत असतात.

जोपर्यंत जीव लौकिक रसांच्या आधीन आहे, तोपर्यंत त्याला अलौकिक रस मिळत नाही. तशा जीवाला भक्तिरस-प्रेमरस मिळू शकत नाही.

आनंद कोणत्याही वस्तूंत नसून मनाच्या एकाग्रतेत आहे. आनंद ईश्वराशी तदाकार होण्यांत आहे. षड्रसांवर विजय मिळविण्यासाठी भक्तिरसाची साधना करा. भक्ती करणे सोपे नाही. ज्याला भक्ती करायची आहे त्यांना मन आणि जीभ वश करावी लागेल. लुळीचा (जीभ) दास भक्ती कशी करू शकेल? महाप्रभूंनी सुबोधिनींत म्हटले आहे– 'देवाच्या सेवे-पूजेविषयीं अनुराग ठेवा आणि शरीरभोगाविषयी वीतरागी रहा. जिभेचे नाही तर जीवाचे समाधान करायचे आहे. मनुष्याचा पुष्कळसा वेळ या जिभेच्या लालनपालनांतच निघून जातो. काळ जवळ येत आहे त्याचा सुद्धा विचार करा.

## २०. रासलीला प्रस्तावना :

आता वस्त्रहरण आणि रासलीला येत आहे.

गोपींचे दोन भेद आहेत– नित्यसिद्धा आणि साधनसिद्धा. साधनसिद्धा गोपींचे पुनः अनेक भेद आहेत. श्रुतिरूपा, ऋषिरूपा, संकीर्णरूपा, अन्यपूर्वा, अनन्यपूर्वा इत्यादी.

श्रुति, ईश्वराचे वर्णन करता करता थकून गेल्या तरीही त्यांना ईश्वराचा अनुभव झाला नाही. ईश्वर नुसत्या वाणीचा विषय नाही. जे वेदाभिमानी देव ब्रह्मसंबंध सिद्ध करून ब्रह्मसाक्षात्काराच्या हेतूने गोकुळांत प्रगट झाले त्याच श्रुतिरूपा गोपी होत.

तपस्वी राहूनसुद्धा ऋषींचा काम शिल्लकच राहिला अन् ईश्वराचा अनुभव झाला नाही.

दर्शन आणि अनुभवांत अंतर आहे. दर्शनांत दृष्य आणि द्रष्ट्याचा भेद आहे. अनुभवांत दोन्ही एक होत असतात. त्यात पूर्णपणे अद्वैत आहे. म्हणून बुद्धिगत कामाचा नाश करून ब्रह्मसंबंध सिद्ध करून ब्रह्मात्मक रूपमुक्तीचा अनुभव करण्यासाठी जे ऋषि गोपी बनून आले होते त्यांना ऋषिरूपा म्हणतात.

संकीर्ण मंडळांत प्रभूचें मनोहर रूप पाहून मनात कामभाव जागृत झाल्यामुळे ज्या स्त्रियांनी गोपींचे रूप घेतले त्या कामरूपा आहेत. उदाहरणार्थ शूर्पणखा.

विवाह झाल्यावर संसारसुखाचा उपभोग घेत घेत अरुचि झाल्यानंतर प्रभुविषयीं प्रेमभाव ज्या स्त्रिया किंवा पुरुषांना होऊन ज्यांनी गोपींचे रूप घेतले त्यांना अन्यपूर्वा म्हणतात. तुलसीदासांच्या वैराग्याची गोष्ट पुष्कळ प्रसिद्ध आहे.

वस्तुगत आसक्तींना प्रभुगत आसक्तीचे रूप दिले गेले तर वस्तूंची आसक्ति सुटून जाते. अनेक वस्तूंविषयी आसक्ति असणे व्यावहारिकदृष्ट्या अशक्य आहे.

तुलसीदास फक्त पत्नीविषयीच आसक्त होते. जगातील इतर सर्व स्त्रिया त्यांना मातेसमान होत्या. रत्नावलीच्या एकाच टरकावण्याने (रागावण्याने) त्यांच्या आसक्तीचे प्रभुभक्तींत रूपांतर करून दिले. कामासक्तीचे ईश्वरासक्तींत परिवर्तन झाले. पुष्कळांना तर रोजच थप्पड बसत असते तरीही सुधारणा होत नाही.

अनन्यपूर्णा – जन्मसिद्ध पूर्ण वैरागी. शुकदेव, मीरा, इ.

एकदा व्रजांतील कुमारी यमुनाकिनारी नग्नावस्थेत स्नान करीत होत्या. तर त्यांची वस्त्रे घेऊन श्रीकृष्ण कदंबाच्या झाडावर चढून बसले आणि म्हणू लागले, ज्यांना वस्त्रें पाहिजे असतील त्या येथे येऊन घेऊन जाऊ शकतात.

कृष्ण म्हणाले – नग्न अवस्थेंत स्नान करून तुम्ही जलदेवतेचा अपराध केला आहे. म्हणून दोन्ही हात जोडून वंदन करून मग आपली वस्त्रे घेऊन जा.

त्या कुमारींनी तसे केल्यावर कृष्णांनी त्यांची वस्त्रे त्यांना परत केली.

या वस्त्रहरणलीलेतही एक रहस्य आहे. कुमारींच्या मनांत अशी भावना होती की त्या स्त्रिया आहेत. हा भाव अहंकाराचा द्योतक आहे. त्यांचा तो अहंभाव दूर करण्यासाठी श्रीकृष्णांनी तसा व्यवहार केला. या लीलेत अहंकाराचा पडदा दूर करून प्रभूला सर्वस्व अर्पण करण्याचा उद्देश आहे.

भगवान म्हणतात – तुम्ही 'मी' पणा – स्वत्व विसरून माझ्याकडे या. संसारशून्य आणि सांसारिक संस्कारशून्य होऊन निरावृत्त होऊन माझ्याकडे या.

द्वैताचे आवरण दूर कराल तर भगवान भेटतील.

शरीराला वस्त्र झाकते आणि आत्म्याला वासना. भगवंत तुमच्याच जवळ आहेत पण तुम्ही पाहू शकत नाही. वासनेचा पडदा फाटल्याबरोबर भगवान दिसू लागतील.

आत्मा आणि परमात्मा यांच्यामधे वासनेचा पडदा आहे, म्हणून भगवंताचा अनुभव होत नाही. आत्मा आत आहे आणि वर आहे अज्ञान आणि वासनेचा पडदा. अज्ञान आणि वासनेच्या त्या आवरणाला चिरून भगवंताला भेटायला जायचे आहे. सिद्ध सद्गुरू किंवा परमात्म्याच्या कृपेने बुद्धिगत वासना दूर होत असते. बुद्धींत राहिलेला काम कृष्णमीलनांत बाधक आहे.

अज्ञान-वासनावृत्तीचा नाश करणे हीच वस्त्रहरणलीला आहे. आणि आवरणनाशानंतर जीवाचे आत्म्याशी मीलन ही रासलीला आहे. म्हणूनच रासलीला वस्त्रहरणानंतर येत असते.

कामवासना नष्ट झाल्यावर ईश्वराशी अद्वैत होते.

भगवंत कधीही लौकिक वस्त्रांची चोरी करीत नाहीत. ते तर बुद्धिगत अज्ञान-कामवासनांची चोरी करीत असतात.

कान्हा काय गोपींना नग्नावस्थेत पाहू इच्छित होता? विचार करा, कृष्ण तर सर्वव्यापी आहेत म्हणून जळांतही आहेत. जळांत ते गोपींना मिळालेलेच होते. परंतु अज्ञान आणि वासनेने आवृत्त असल्यामुळे त्या श्रीकृष्णाचा अनुभव घेऊ शकत नव्हत्या. म्हणून त्या बुद्धिगत अज्ञान आणि वासनारूपी वस्त्रांना ते उचलून घेऊन गेले. जेव्हा जीव त्यांचाच होतो तेव्हाच प्रभू असे करतात.

ज्यांनी आपली बुद्धी माझ्यांत स्थापित केली असेल त्यांचे भोगसंकल्प सांसारिक विषयभोगांसाठी असत नाहीत. ते संकल्प मोक्षदायी असतात. भाजलेल्या धान्याचे बीजतत्त्व नष्ट होऊन जाते आणि

ते कधी अंकुरित होत नाही. याप्रमाणेच त्यांच्या बुद्धीतील कामवासनेचा अंकुर नाहीसा झाला आहे तो पुनः अंकुरित होऊ शकत नाही.

प्रभूंनी व्रजगोपींना सांगितले— अहो व्रजकुमारिकांनो! मी जाणतो की तुमच्या कामवासना नष्ट झालेल्या असल्यामुळे तुमची हृदये शुद्ध झाली आहेत. तरीही तुम्हाला माझे अजूनही ध्यान करीत राहायला हवे. असे केल्याने तुमच्या मनात सामावलेला सूक्ष्म मळ नष्ट होईल आणि माझ्याशी मीलन होईल. शरदऋतूच्या रात्रीमध्ये माझ्याबरोबर रमण करू शकाल.

शरदऋतूच्या रात्री निर्मल असतात. तुम्हीसुद्धा सर्व प्रकारे शुद्ध, निर्मल, शुभ्र व्हाल तरच ईश्वराशी क्रीडा करू शकाल. जीव ईश्वराला भेटू शकेल आणि तेव्हाच रासलीला होईल.

जीव-ईश्वराच्या मीलनासाठी प्रथम तर पूतनारूपी वासनेचा नाश केला पाहिजे.

अविद्या नष्ट झाल्याने जीवनाची गाडी मार्गावर येऊ लागते आणि शकटासुराचा नाश होतो.

जीवन चांगल्या मार्गावर चालू लागले की तृणावर्तरूपी रजोगुणाचा नाश होतो आणि सत्त्वगुण वाढीस लागतो.

रजोगुण गेला तर कन्हैयाने मनरूपी लोण्याची चोरी केली आणि जीवन सात्त्विक झाले.

जीवन सात्त्विक झाले म्हणजे आसक्तीचे मडके फुटून जाते. दह्याचे मडके-संसारासक्तीचे मडके कन्हैयाने फोडून टाकले.

संसारासक्ति नष्ट झाली तर प्रभु जीवाच्या पाशाने बांधले गेले. हीच झाली दामोदरलीला.

प्रभु बांधले गेले तर दंभ-बकासुर आणि पाप-ताप अघासुरांचा वध झाला.

सांसारिक ताप नष्ट झाला म्हणजे दावाग्नि नष्ट झाला, शांत झाला. म्हणून इन्द्रिये शुद्ध झाली. अंतःकरणांतील वासनांचा क्षय झाला. हीच आहे नाग-दमनलीला आणि प्रलंबासुरवधाची कथा.

जीव ईश्वराशी भेटण्यायोग्य झाला तेव्हा कृष्णाच्या मधुर मुरलीची मधुरित तान ऐकू शकला.

वेणुगीत गाइले गेले अर्थात नादब्रह्माची उपासना झाली.

नंतर आली गोवर्धनलीला. गो-इंद्रियांचे संवर्धन झाले— पुष्टी झाली. पुष्टी झाली तर भक्तिरस उत्पन्न झाला. इन्द्रियांची पुष्टी झाल्यावर षड्‌रसांचा आणि वरुणदेवाचा पराभव झाला.

षड्‌रसांचा पराभव झाल्यामुळे जीव शुद्ध व्हायला आला. म्हणून वस्त्रहरणलीला झाली. अज्ञान आणि वासनेची आच्छादने भगवंतांनी काढून टाकली.

वस्त्रहरणलीला— बाह्यावरण उपाधि नष्ट झाली की रासलीला होते. जीव आणि ब्रह्माचे तादात्म्य होते.

ज्याप्रमाणे वस्त्र देहाला झाकते त्याचप्रमाणे वासना आणि अज्ञान आत्म्याला झाकून टाकतात आणि परमात्म्याला दूर ठेवतात. जोपर्यंत हे अज्ञान आणि वासनेचे आच्छादन दूर होत नाही तोपर्यंत जीव शिवाला भेटू शकत नाही.

वस्त्रहरणलीला बुद्धिगत वासना आणि बुद्धिगत अज्ञानाला उडवून नेण्याची लीला आहे. वासना आणि अज्ञानरूपी वस्त्रे प्रभुमीलनांत बाधक आहेत. इन्द्रियांचा काम काढून टाकणे सोपे आहे, पण बुद्धिगत कामाला हद्दपार करणे फार कठीण आहे.

प्राण आणि प्रकृति बरोबर जातात. या प्रकृतीवर विजय मिळविणे हे कर्म फार दुष्कर आहे.

योग्यांचा शारीरिक काम तर पळून जातो पण बौद्धिक काम पुष्कळ वेळा तसाच राहिलेला दिसतो.

वृद्धावस्थेत इन्द्रिये शिथिल झाली म्हणजे शारीरिक काम तर गेलेला असतो परंतु बौद्धिक काम

राहतो.

ऋषींनी सुद्धा कामापुढे हार मानली होती. म्हणून कामभाव श्रीकृष्णार्पण करून निष्काम व्हायचा विचार केला आणि गोपी बनून गोकुळांत येऊन पोचले.

आता येत आहे रासलीला.

महाप्रभूंनी दशमस्कंधाला गोवर्धननाथाचे हृदय म्हटले आहे आणि रासलीलेला प्राण. हृदयांत पंचप्राण असतात. रासपंचाध्यायी श्रीमद्भागवताचे पंचप्राण आहेत. याला फळ-प्रकरण सुद्धा म्हणतात. श्रीधरस्वामी म्हणतात की रासपंचाध्यायी निवृत्तिधर्माचें परमफळ आहे.

शुकदेव विचार करू लागले की समाजात रासलीलाश्रवणाचे किती अधिकारी असतील? जो अधिकारी नसेल त्याला ह्या लीलेत कामच दिसेल.

राधामाई शुकदेवांची गुरू आहे. तिने शुकदेवांना ब्रह्मसंबंध घडविला होता. राधेच्या कृपेशिवाय रासलीलेचे गूढतत्त्व-रहस्य समजणें सोपे नाही.

शुकदेव आपल्या पूर्वजन्मांत पोपट होते आणि लीलानिकुंजांत राधेचे नाव घोकत उडत फिरत. त्यांच्या राधा नावाचे अखंड कीर्तन ऐकून दयेची मूर्ति राधा तेथे आली. तिने पाहिले, तर एक पोपट तिच्या नावाचा जप करीत आहे. तिने त्याला आपल्याजवळ बोलाविले आणि हातावर ठेवून चुचकारीत म्हटले– "वत्स! कृष्णं वद, कृष्णं वद, राधेति मा वद." कृष्ण तुझे खरे जनक आहेत. त्यांच्याच नावाचे संकीर्तन कर.

राधा याप्रमाणे पोपटाला मंत्रदीक्षा देत होती, एवढ्यांत तेथे कृष्ण आले.

राधा आद्य संयोजिका आणि आल्हादिका शक्ति आहे. एकाकी जीवाची ती श्रीकृष्णाशी भेट करवून देते. व्रजाची अधिकारी देवी राधाच आहे. म्हणूनच महात्मा लोक वृक्षवृंदावनांत 'राधे राधे' म्हणत असतात. राधेची कृपा झाल्यावर जीवाला भगवंताचे दर्शन मिळू शकते. तिची कृपाच जीवाची प्रभूशी भेट करविते.

शुकदेव पूर्वजन्मी पोपट होते म्हणून भागवतांत "शुकदेव उवाच" लिहायच्या ऐवजी "श्री शुक उवाच" लिहिले आहे. 'श्री' चा अर्थ राधा आहे. 'श्री शुक' मध्ये गुरुशिष्य दोघांचेही नाव सामावलेले आहे.

भागवतांत इतर कोणाही व्यक्तीच्या नावापूर्वी 'श्री' शब्दाचा प्रयोग केला नाही. ब्रह्मा उवाच, व्यास उवाच, सनत्कुमार उवाच, असेच लिहिले गेले आहे. व्यासांच्या नावाच्या पूर्वीही श्री विशेषण नाही.

फक्त कृष्ण आणि शुक नावांच्या पूर्वीच "श्री" विशेषण प्रयुक्त झाले आहे. भगवान कृष्ण राधेचे हृदयेश्वर आहेत आणि शुकदेव कृपापात्र शिष्य. म्हणूनच या दोघांच्या नावापूर्वी "श्री" विशेषण प्रयुक्त झाले आहे.

राधेने तो पोपट श्रीकृष्णाला देत म्हटले– हा पोपट मला फार प्रिय वाटतो.

अंतरंगात राधा शुकदेवांची गुरू आहे. जो परमेश्वराशी संबंध जोडून देतो तो महाप्रभू असतो. त्याचे नाव प्रगटरूपाने कसे घ्यावे? भागवतांत शुकदेवांनी राधेचे प्रगट रूपाने नाव घेतले नाही. राधेप्रमाणेच कोणत्याही गोपीचे नाव सांगितले नाही. शुकदेवांनी सर्वच रासलीला मोठ्या विवेकाने सांगितली आहे. गोपीप्रेमाच्या गोष्टी बहुधा अप्रगटच ठेवल्या आहेत.



परीक्षित राजाला सातच दिवसात मोक्ष द्यायचा आहे. राधे स्मरण करू लागतील तर शुकदेव

समाधिस्त होऊन जातील. मग राजाचे काय होईल?

गोष्टी, कथा, विवरण, वियोगावस्थेतच अधिक चांगल्या होऊ शकतात, पूर्ण संयोगावस्थेत नाही.

ही तर कामरहित अंतरंगलीला आहे. अकरा वर्षांच्या बालकाविषयी कामभाव कसा जागृत होऊ शकेल? सपत्नी-मत्सर गोपींमधे नव्हता. हे साधारण स्त्री-पुरुषांचे मीलन नव्हते. जर तसे असते तर शुकदेवांसारखे महायोगी त्याचे वर्णन करू शकले नसते.

अशी कल्पनाच करू नका की गोपी नावाची कोणी स्त्री आहे. गोपी तर शुद्ध जीवाचेच नाव आहे. शुद्ध हृदयाचा भाव-प्रेमभाव म्हणजे गोपी. देहभान विसरून प्रत्येक इंद्रियाद्वारा भक्तिरसाचे पान करणारा विशुद्ध जीवच गोपी आहे.

साधारण जीव गोपींची कथा करायला किंवा ऐकायला अधिकारी नाही. वर नित्यसिद्धा आणि साधनसिद्धा गोपींचीच चर्चा केली आहे.

काही ज्ञानी ब्रह्मरूप होऊ इच्छितात. काही गोपी ईश्वराशी एक होऊ इच्छित नाहीत. एक झाल्या तर ईश्वराच्या रसास्वादाचा अनुभव करू शकणार नाहीत. जीव ईश्वराशी एकरूप झाला तर त्याच्या रसात्मक स्वरूपाचा अनुभव करू शकत नाही.

ईश्वर रस-स्वरूप असल्याकारणाने ज्ञानी पुरुष त्यांत बुडून जातात. तरी ते रसात्मकतेचा अनुभव करू शकत नाहीत. कारण की ते ईश्वरापासून भिन्न राहत नाहीत. ईश्वरापासून पृथक् राहिल्यानेच त्याचा रसानुभव केला जाऊ शकतो.

नित्यसिद्धा गोपी त्या आहेत की ज्या कन्हैयाबरोबरच आलेल्या आहेत.

साधनसिद्धा गोपींचे अनेक भेद आहेत–

**(१) श्रुतिरूपा–** वेदांचे मंत्र गोपी होऊन आले आहेत. वेदांनी ईश्वराचे वर्णन तर खूपच केले आहे, तरी पण अनुभव होऊ शकलेला नाही. ईश्वर नुसत्या वाणीचाच नाही, तर ध्यानाचा विषय आहे. संसाराचे विस्मरण झाल्याशिवाय ईश्वराचा साक्षात्कार होऊ शकत नाही. ते वेदाभिमानी देव गोकुळांत गोपी बनून आले आहेत.

**(२) ऋषिरूपा–** जीवाचा सर्वात मोठा शत्रु काम आहे. ऋषींनी पुष्कळ प्रयत्न केला तरी पण तो मरू शकला नाही. तप केल्याने शरीर आणि इंद्रियांतील काम तर निघून जातो, परंतु मनात वसलेला बुद्धिगत काम जात नाही. ब्रह्मसंबंध स्थापित झाला नाही तर बुद्धिगत काम शिल्लक राहतो. त्या कामाला कृष्णार्पण करायचे आहे.

विश्वामित्र आणि पराशरांसारखे शक्तिशाली ऋषिदेखील कामापुढे झुकले. सूर्याला झाकू शकणारे मुनिसुद्धा कामाला दूर करू शकले नाहीत. काम मरू शकला नाही तर ऋषि हार मानून, थकून, भागून गोपी बनून गोकुळात आले. आम्ही श्रीकृष्णाला काम अर्पण करून निष्काम होऊ.

जो कामाला मारू शकतो त्याला कृष्ण दूर नाही. काम तर अनंग आहे. तो जीवाला-आत्मशक्तीला हळूहळू मारीत असतो. सात्त्विक भोजनाशिवाय तो मरू शकणार नाही.

काम श्रीकृष्णाला दूषित करू शकत नाही. श्रीकृष्णाचे चिंतन करणाऱ्याला काम काही करू शकत नाही, तर स्वतः कृष्णाचे तो काय करू शकेल?

गर्गसंहितेत एक कथा आहे. एकदा श्रावण महिन्यात रासलीलेच्या वेळी कृष्ण फार विलंबाने आले, तर गोपींनी त्यांना कारण विचारले. कृष्णांनी सांगितले की माझे गुरू दुर्वासऋषि आले आहेत. त्यांच्या दर्शनासाठी मी गेलो होतो. गोपींना आश्चर्य वाटले! तुमचे गुरू? तर कृष्ण म्हणाले– हो,

दुर्वास ऋषि माझे ब्रह्मविद्येचे गुरू आहेत.

गोपी कल्पना करू लागल्या की, भगवंताचे गुरू किती महान असतील! आम्ही त्यांना भोजन घालू. श्रीकृष्णांनी सांगितले की, माझे गुरू भूक लागल्यावर दिवसांतून एकदाच दूर्वांचा रस पितात. जेवत नाहीत. तुमचे प्रेम शुद्ध असेल तर ते आहार घेतील.

गोपींनी तऱ्हेतऱ्हेची पक्वान्ने तयार केली आणि ती घेऊन दुर्वासांकडे जाण्यास निघाल्या. मुनींचा आश्रम तर यमुनेच्या पलीकडील किनाऱ्यावर होता. पूर आलेला होता. आता काय करावे? त्यांनी श्रीकृष्णाला विचारले. कृष्णांनी सांगितले की यमुनेला असे म्हणा की 'जर श्रीकृष्ण बालब्रह्मचारी आणि बालउपवासी असेल तर आम्हाला मार्ग दे.'

गोपींना तर ठाऊकच होते की कृष्ण दुसऱ्यांना परमानंद देण्यासाठीच क्रीडा करतात. गोपी अधिकारी होत्या.

यमुनेने मार्ग करून दिला. गोपी आश्रमांत आल्या आणि त्यांनी दुर्वासांना जेवण करण्याचा आग्रह केला. दुर्वास म्हणाले, 'तशी खाण्याची तर काही इच्छा नाही, पण तुमची इच्छाच आहे तर माझ्या तोंडात घास ठेवीत चला.' गोपींनी जे काही खाऊ घातले ते सर्व त्यांच्या पोटांत गेले. गोपींना वाटले, ऋषींना संतति नसेलच म्हणून जेवताना आठवण आली नाही. त्यांनी दुर्वासांना विचारले, तुम्ही जेवण तर चांगल्या प्रकारे केले ना?

दुर्वास– नाही तर! मी नित्य उपवासी आहे. जर माझे म्हणणे पटत नसेल तर यमुनेला म्हणा की, दुर्वास नित्य उपवासी असतील तर आम्हाला मार्ग दे. गोपींनी दुथडी वाहणाऱ्या यमुनेला तसे सांगितले. यमुनेने मार्ग दिला. गोपींनी श्रीकृष्णाला सर्व काही सांगितले.

गुरुशिष्य दोघेही तोडीसतोड आहेत. इतक्या साऱ्या राण्या असूनही श्रीकृष्ण बालब्रह्मचारी आहेत, आणि मिष्टान्नाचा ढीग खाऊन ढेकर देणारे दुर्वास नित्य उपवासी आहेत. हा कसा ब्रह्मचारी झाला आणि तो कसा उपवासी?

दुर्वासांना कोणत्याच प्रकारची वासना नाही. त्यांनी खाल्ले तर सर्व काही पण अगदी स्वाद न घेता. खाणारा आणि खाऊ घालणारा नारायणच आहे. दुर्वासांची ही ब्रह्मोपासना आहे. खाणारा आणि खाऊ घालणारा ब्रह्मच आहे. म्हणून दुर्वासांची ही गोष्ट बरोबर आहे की ते नित्य उपवासी आहेत.

कृष्ण आणि दुर्वासांना कोणत्याच वस्तूविषयी काही आसक्ति किंवा वासना नव्हतीच. सर्व काही भोग करूनही ते निष्कामी होते. श्रीकृष्णांनी गृहस्थाश्रम आणि संन्यासाश्रमाचा समन्वय करून दाखविला आहे. ते निष्कामच आहेत.

निष्काम श्रीकृष्णाचे ध्यान करणारी व्यक्ति स्वतःच निष्काम होत असते. वस्त्रहरणलीलेतील ऋषिरूप गोपी पांच-सहा वर्षांच्या कुमारी होत्या. त्या कुमारींची इच्छा आहे की श्रीकृष्ण त्यांना पतिरूपांत मिळावे. यात भाषा तर लौकिक आहे परंतु रहस्य अलौकिक आहे. जोपर्यंत जीव आवरणांत असतो तोपर्यंत तो ईश्वराला भेटू शकत नाही.

श्रीकृष्णांनी सखींना योग्य वेळी भेटण्याचे वचन दिले होते. ध्यानांत ठेवावे की रासेत गोपींच्या देहाशी भेट नाही. गोपींनी पंचभौतिक देहाचा त्याग करून टाकला आहे. या गोपींचे स्वरूप अप्राकृत चिंतनमय आनंदरूप आहे. पंचभूतांच्या शरीराला परमात्मा स्पर्श करीत नाहीत. भागवतांत स्पष्टपणे सांगितले आहे की रासलीला पंचभौतिक शरीराच्या त्यागानंतर झाली होती.

कोणाला शंका असेल की गोपींचे पंचभौतिक शरीर कसे सुटले? श्रीकृष्णाचा वियोग तर अग्नि आहे. पतीच्या विरहांत ज्याप्रमाणे पतिव्रता पत्नी जळत असते, त्याचप्रमाणे परमात्म्याचा विरह जीवाला जाळतो. प्रभूच्या विरहाच्या वेळी जीवाचे संसारात रमून राहणे पाप आहे. श्रीकृष्णाच्या विरहाग्नींत गोपींचे पंचभौतिक शरीर जळून गेले आणि त्यांना श्रीकृष्णाप्रमाणे अप्राकृत रसात्मक शरीर प्राप्त झाले. पंचभौतिक शरीर बरोबर असेल तर परमात्म्याशी मीलन होणार नाही.

गोपी कृष्णविरहांत जळतात. आमचे हे कारुण्यच आहे की हा जीव भगवंताच्या वियोगाच्या वेळीही सांसारिक वासनांच्या योगे खेळ करीत राहतो. संसारातील भोग आणि रोग समानच आहेत. गोपी तर परमानंदरूप परमात्म्याला भेटू इच्छितात. श्रीकृष्णाच्या नुसत्या दर्शनाने आता त्यांना तृप्ति होऊ शकत नाही. दर्शनात द्वैत आहे. गोपी परमात्म्याशी एकरूप होऊ इच्छितात.

जेव्हापासून गोपींना गोवर्धनलीलेंत श्रीकृष्णाच्या परमात्मास्वरूपाचे दर्शन झाले होते तेव्हापासून त्यांच्यात प्रेमभावाचे बीजारोपण झाले होते. त्यांनी कन्हैयाची बासरीसुद्धा ऐकली.

प्रेमाच्या आरंभी द्वैत असते. प्रेयसी आणि प्रियतम वेगवेगळी असतात. जसजसा काळ जातो तसतसे प्रेम वाढत जाते आणि दोघांनाही एक होण्याची इच्छा होते. "मी" आतां "तू" होण्याची इच्छा करू लागतो. अद्वैताची इच्छा जागृत होते. "मी" नाहीसे करून "तू" होणे, स्वतःला प्रिय पात्राशी मिळवून टाकणे, प्रियपात्राशी सायुज्य सिद्ध करणेच प्रेम आहे.

कित्येक वेळी गोपींना त्यांच्या सासवा बाहेर निघू देत नसत. त्यांची व्याकुळता पाहून कन्हैया त्यांच्या स्वयंपाकघरात प्रगट होत असे. जीव जेव्हा जेव्हा खूप आतुर होतो तेव्हा ईश्वर त्याला भेटायला येतात. गोपींचे प्रेम हळू हळू वाढत चालले होते. श्रीकृष्णाला भेटायचे आहे– एक व्हायचे आहे. आता पळभराचा सुद्धा विरह सहन होत नाही. कृष्णविरहाने त्या मूर्च्छित होत असत. आता त्यांना इतर काही वासना नाहीत. जीव शुद्ध होऊन ईश्वराला भेटायला आतुर झालेला आहे. आता रासलीला होईल.

कृष्णाने आपल्या बालमित्रांना सांगून ठेवले होते. जेव्हाही कोणाला मूर्च्छा येईल तेव्हा त्याला बोलवावे. गोपींची मूर्च्छा उतरविण्याचा उपाय त्यांना ठाऊक होता. गोपींची मने आणि प्राण कृष्णांतच होते. गोपी मूर्च्छित झाली तर कन्हैयाला बोलाबण्यांत आले. तो समजला की गोपींचा प्रेमभाव वाढत चालला आहे. कन्हैयाने गोपीला गोंजारून कानांत सांगितले की शरदपौर्णिमेच्या रात्री तुला भेटीन, तोपर्यंत धीर ठेवून माझें सतत ध्यान करीत रहा.

वैष्णव तर प्रेम्याशी मिलन व्हावे या आशेवरच जगत असतात. कान्हा अवश्य भेटेल.

गोकुळांतील सर्वच गोपी रासलीलेत गेल्या नव्हत्या. ज्या गोपींना अधिकार प्राप्त झाला होता त्याच जाऊ शकल्या होत्या.

युवावस्थेपासूनच भक्तीचा छंद लागला पाहिजे. वृद्धावस्थेंत भक्तीला रंग चढला तर ते ठीकच आहे पण उत्तम नाही. जो केवळ वृद्धावस्थेतच भक्तीचा आरंभ करतो त्याला युवावस्थेतील कामसुखाचे स्मरण सतत त्रास देत असते. वृद्धावस्थेत अंतःकरणापासून भक्ति उत्पन्न न झाली तर दुसऱ्यांची टीकाटिप्पणी करण्याचा मोह होतो.

परांची-दुसऱ्यांची राहणी, घर-संसार व्यवहार याविषयींची टीका-टिप्पणी करीत राहणे सगळ्यांत मोठे पाप आहे. जेव्हा जेव्हा बायका एकमेकांना भेटतात, तेव्हा तेव्हा पति, मुले, सुना, कपडेलत्ते इत्यादीविषयक गोष्टींमध्ये रमलेल्या असतात. जो भक्तीच्या रंगात रंगून जातो तो अशा फालतू गोष्टींमध्ये भाग घेत नाही. केस पिकल्यानंतर माळ फिरव लागला नाही तर त्याचे अंतःकरण आणखी काळे

होते. केसांबरोबर अंतःकरण पांढरेस्वच्छ होत नसेल तर वाईट गोष्ट आहे.

कान्हा त्या गोपींच्या कानात काही तरी सांगत होता आणि गोपींची मूर्च्छा दूर होत होती. एका म्हातारीने हे पाहिले तेव्हा तिला काही शंका आली. मला हा मंत्र जाणूनच घेतला पाहिजे. त्या म्हातारीने ढोंग केले. घरचे काम करता करता जाणूनबुजूनच जमिनीवर पडून गेली. सुनेला दुःख झाले. तिने श्रीकृष्णाला जाऊन सांगितले – नाथ, या, माझ्या सासूबाई बेशुद्ध झाल्या आहेत. बिचाऱ्या भोळ्या सुनेला काय ठाऊक की सासू कपट करीत आहे.

कन्हैया म्हणाला – ज्याचे केस पांढरे झाले असतील त्याला माझ्या मंत्राने काहीच फायदा होत नाही म्हणून मी येणार नाही. परंतु गोपीने मोठ्या प्रेमाने आग्रह केला तर त्यांना नाही म्हणता येईना. कान्ह्याने वृद्धेचे निदान केले की या म्हातारीच्या डोक्यात भूत शिरले आहे. पण चिंता करू नका. मी भूत उतरविण्याची विद्या जाणतो. एक काठी तर आणून द्या कोणी. म्हातारी मनांत चरकली. अरे बापरे! इतक्यांत काठी आणली गेली आणि कन्हैयाने त्या म्हातारीला दोन फटके लगावले. म्हातारी एकदम बोलली, मला मूर्च्छा नव्हती आली, मी ढोंग करीत होते. कन्हैया म्हणाला, हे भूत बोलत आहे अन् त्याने आणखी दोन फटके मारले.

जरा विचार तर करा. मनुष्याचा बाह्य वेश तर वैष्णवाचा असतो आणि मनांत काम, क्रोध, कांचन, कामिनी यात रमत असतो. बाहेरून भक्त असण्याचे ढोंग करतो. हे ढोंग – हा अभिमानच तर ते भूत आहे की ज्यामुळे जीवाची मारझोड होते.

असेही पुष्कळ लोक असतात की ज्यांची आकृति फारच आकर्षक, सुंदर, लोभस असते, परंतु कृति भयंकर किळसवाणी.

त्या म्हातारीसारखे कधीच ढोंग करू नका. दंभ, ढोंगच भूत आहे. भक्ति इतरांना दाखविण्यासाठी नाही, प्रभूला-प्रसन्न करण्यासाठी करायची आहे. काही लोक ज्ञान आणि भक्तीचे जितके प्रदर्शन करतात तितकेच ते आतून पोकळ असतात. श्रीकृष्ण तर अंतर्यामी आहेत. त्यांच्यापासून कोणतीच गोष्ट लपलेली नाही.

रासलीलेचे तीन सिद्धान्त आहेत –

(१) यात गोपींच्या शरीराशी काही देणेघेणे नाही.

(२) यात लौकिक काम नाही.

(३) हे साधारण स्त्री-पुरुषांचे मीलन नसून जीव आणि शिवाचे मीलन आहे.

शुद्ध जीवाचा ब्रह्माबरोबर विलास म्हणजेच रास. शुद्ध जीव म्हणजे मायेच्या आवरणविरहित जीव. अशाच जीवाचे ब्रह्माशी मीलन होते.

शुकदेव म्हणतात, या लीलेचे चिंतन करायचे आहे, अनुकरण नाही. शृंगार आणि करूणरस ऐक्यता सिद्ध करण्यासाठी प्रामुख्याने आवश्यक आहेत. पतीच्या वियोगांत व्याकुल (कासावीस) होणाऱ्या पत्नीप्रमाणे ईश्वराच्या वियोगात जीव व्याकुळ होत असतो हे दाखविणेच रासलीलेचा हेतु आहे. देवाच्या विरहाने ज्याचे शरीर पोळून निघत नाही त्याला तो मिळत नाही. त्या आतुरतेचे यथार्थ वर्णन करण्यासाठीच शृंगाररसाचा आश्रय घेतला गेला आहे.

रसामध्ये आत्मा आणि परमात्म्याचे निर्लेप निर्विकार मीलन आहे. श्रीकृष्णाची ही कामविजयलीला आहे. ही ऐकून तुमचेही अंतःकरण व्याकुळ झाले पाहिजे.



शरदऋतूच्या पौर्णिमेची रात्र आली.

रासलीला ही कामलीला नाही तर कामविजयलीला आहे. श्रीकृष्णाजवळ काम जाऊ शकत नाही. लौकिकाचा आभास असूनही ही क्रिया कामविकाररहित आहे. श्रीधरस्वामी हिला कामविजयलीला म्हणतात.

श्रीकृष्ण कोणी सामान्य देव नाही. साक्षात् परमात्मा आहे. त्यांनी आपल्या लीलांनी सर्वच देवांचा पराभव केला. वत्सलीलेत ब्रह्मदेवाचा गर्व नाहीसा केला. ब्रह्मदेवाला ते म्हणाले, तुम्ही पंचमहाभूतांच्या आधारे जगाची निर्मिती करता. मी केवळ संकल्पाने जगाचे सर्जन करतो. भगवंताला सृष्टीची रचना करण्यासाठी कोणत्याच वस्तूची आवश्यकता नाही. केवळ संकल्पाने त्यांनी गोपबालके आणि वासरांना निर्माण केले. ती रूपे त्यांनी स्वतःच घेतली होती. अग्नीचा सुद्धा गर्व नष्ट केला. इन्द्राचा अभिमानसुद्धा गोवर्धनलीलेत चूर केला. वरुणदेवाचा पराभव केला.

ब्रह्मादि देवांचा पराजय झाला तर कंदर्प-कामदेवाचा अभिमान जागृत झाला. म्हणू लागला– आता तर मीच सर्वांपेक्षा मोठा देव आहे. त्याने कृष्णाजवळ येऊन मल्लयुद्धाचा प्रस्ताव मांडला. कामाचे एक नाव मार असें आहे. त्याला सगळेच मारीत असतात. कृष्णाने कामदेवाला विचारले, शिवांनी तुला भस्मीभूत करून टाकले होते हे तू विसरून गेलास काय ?

कामदेव – हो, ते तर ठीक आहे. माझ्याकडून त्या वेळी थोडी गडबड झाली होती. शंकर समाधींत होते आणि तेजोमय ब्रह्माचें चिंतन करीत होते. त्यावेळी मी त्यांच्याशी लढायला गेलो म्हणून मी जळून गेलो. ती काही विशेष गोष्ट नाही.

श्रीकृष्ण – रामावतारात सुद्धा तू हरला होतास !

कामदेव – तुम्ही त्या अवतारात मर्यादेचे अतिशय पालन करून मला हरविले होते. त्या अवतारांत आपण एकपत्नीव्रताचे पालन करीत होता म्हणून मी हरलो.

जीव जर मर्यादेचे पालन करील तर साधारण जीवसुद्धा कामाला मारू शकतो.

मर्यादापुरुषोत्तम राम कोणत्याही परक्या स्त्रीकडे दृष्टी वळवीत नसत. ते नेहमीच धनुष्यबाणाने सज्ज राहत. मग ते वाटल्यास दंडकारण्यांत असोत की सीतेजवळ असोत, की सोन्याच्या सिंहासनावरही असोत. धनुष्य ज्ञानाचे स्वरूप आहे आणि बाण विवेकाचे. ज्ञान आणि विवेकाने नेहमी सुसज्ज राहावे, नाहीतर काम-रावण डोक्यावर चढून बसेल.

श्रीकृष्ण – मग आता तुझी इच्छा काय आहे ?

कामदेव – आपण या कृष्णावतारांत तर कोणत्याच मर्यादेचे पालन करीत नाही आणि वृंदावनातील युवतींबरोबर विहार करीत असता. माझी इच्छा आहे की आपल्यावर बाण चालवावा. जर आपण निर्विकार राहाल तर आपल्याला ईश्वर समजेन आणि कामाधीन झालात तर मी ईश्वर होईन.

कृष्णावतारांत श्रीकृष्ण पुष्टिपुरुषोत्तम आहेत. भगवंतांनी रामावतारांत शरीरानेच तर·काय मनानेही कोणाला स्पर्श केला नव्हता. मानसिक स्पर्शसुद्धा ते करीत नसत.

कामदेव श्रीकृष्णाला म्हणाला – मर्यादेचे पालन तर साधारण जीवाकरता आहे, ईश्वराकरिता नाही. शरदपौर्णिमेच्या रात्री आपण युवतींबरोबर विहार करा. त्यावेळी मी बाण सोडीन. जो जिंकेल तो ईश्वर म्हटला जाईल.

कामाला वाटले की कृष्णाला हरवणे फार सोपे काम आहे. कारण की ते सर्व दिवसभर गोपींबरोबर मुक्त व्यवहार करीत राहतात.

श्रीकृष्ण – तुझी अशीच इच्छा असेल तर तसेच होईल.

रासलीलेच्या मंगलाचरणांत श्रीधरस्वामींनी म्हटले आहे, 'ब्रह्मादि देवांचा पराभव झाल्याने

कामदेवाला गर्व झाला आणि तो भगवंताशी युद्ध करायला आला. भगवंतांनी त्याला हरविले. रासलीला कामाच्या पराभवासाठीच आहे. श्रीकृष्ण विहार गोपींबरोबरच करीत होते हें खरें, परंतु त्यांचे मन मला निर्विकारीच होते.'

वनांत एखाद्या झाडाखाली एकांतात समाधिस्त होणे, संयमाचे पालन करणे, कामाला हरविणे ह्यात काही विशेष नाही. परंतु श्रीकृष्णाने तर अगणित सुंदरींच्या बरोबर राहून कामाचा पराभव केला होता. कामाने धनुष्यबाण फेकून दिले आणि श्रीकृष्णाला शरण गेला. याचकरिता श्रीकृष्णाचे एक नाव मदनमोहन आहे. श्रीकृष्ण तर योगेश्वर आहेत.

कामाने बहुधा सगळ्यांनाच हरविले होते. म्हणून त्याचे गर्विष्ट होणे साहजिकच होते. रासलीलेंत भगवंताने त्याच्या गर्वाचा देखील नाश करून टाकला.

देवीभागवतांत व्यास म्हणतात की एकदा ते सुद्धा कामाधीन झाले होते.

पराशरांनी ६०,००० वर्षेपर्यंत तपश्चर्या केली. ते एकदा यमुना पार करीत होते. तेव्हा नाव वल्हवणारी कोळ्याची कन्या मत्स्यगंधा हिचे सौंदर्य पाहून मोहित झाले. त्यांनी तिचा हात धरला. ती कन्या म्हणाली— कोठे आपल्यासारखे पवित्र ब्राह्मण आणि कोठे मी एका शूद्र कोळ्याची मुलगी! परंतु काम कधी जात पाहतो का? ऋषींनी कामेच्छा व्यक्त केली. मत्स्यगंधा म्हणाली, ही दिवसाची वेळ आहे तेव्हा आपल्याला सर्व लोक पाहतील. दिवसा असे कर्म निषिद्ध आहे. तेव्हा पराशराने तपोबलाने अंधाराचे वादळ रचून सूर्याला आवृत्त करून चोहोबाजूस अंधार पसरविला.

पराशर ऋषि सूर्याला झाकू शकत होते, परंतु ते आपला काम रोखू शकले नाहीत.

कामाला जिंकणे फारच दुष्कर कार्य आहे. जो कामाच्या आधीन होऊन त्याचा मार खातो तो साधारण जीव आहे. जो कामाला मारून त्याला स्व-आधीन करतो तो ईश्वर होय.

ह्या रासलीलेचे चिंतन करण्याने कामवासना नष्ट होते. या लीलेत जीव आणि ईश्वराच्या मीलनाचे निरूपण आहे. हे मीलन उच्च कक्षेचे आहे.

प्रेमाचा आरंभ द्वैताने होतो आणि अंत अद्वैताने.

श्रीमहाप्रभु म्हणतात— रासलीला तर भागवताचे फळ आहे. जीव आणि ईश्वराचे मीलनच ते फळ आहे.

भागवताचा उद्देश ईश्वराचे जीवन दाखविणे आणि त्याची प्राप्ति करून देणे आहे.

रासलीलेत शुकदेवांनी कोणत्याही गोपीचे नाव न सांगता, अन्या, अपरा इत्यादी शब्दांचा प्रयोग केला आहे. याच कारणाने श्रीधरस्वामी म्हणतात— जीवमात्राला प्रभूचे आव्हान आहे. ते सर्वांनाच बासरी वाजवून बोलावीत आहेत. तेच सर्वांचे खरे स्वामी आहेत.

श्रीधरस्वामी म्हणतात— रासलीलेचे पांच अध्याय पंचप्राणांचे सूचक आहेत, प्रतीक आहेत. पंचप्राणांचे ईश्वराशी रमण म्हणजेच रास आहे.

रासपंचाध्यायी कामविजयासाठी आहे. जो शस्त्राने घायाळ होऊ शकत नाही असा योद्धासुद्धा कामाच्या पुष्पबाणांनी घायाळ होतो. जो कामाला मारतो तो काळाला देखील मारू शकतो.

कामविजयाच्या उद्देशाने पुष्कळसे महात्मे नुसत्या दूधभाताचा आहार करून रात्रीच्या दुसऱ्या प्रहरी रासलीलेचा पाठ आणि चिंतन करतात. ते मनोमन कल्पना करतात की ते वृंदावनांत आहेत. कृष्णाने एका हातांत बासरी धरली आहे आणि दुसरा हात राधेच्या खांद्यावर ठेवला आहे. एकेका राधेबरोबर एक एक कृष्ण आहे. या रासलीलेच्या चिंतनाने कामवासना नष्ट होईल.

काम विशेषतः रात्रीच्या दुसऱ्या प्रहरी जास्त त्रास देतो. तेव्हा त्या वेळी स्नानादि करून पवित्र होऊन रासलीलेचे चिंतन कराल तर काम सतावणार नाही.

रासलीला अनुकरणीय नाही. चिंतनीय आहे. तिचे चिंतन काम नाशी आहे.

वेणुगीताची बासरी तर पशु, पक्षी, नदी सर्वांनाच ऐकू जाते. परंतु रासलीलेची बासरी तर ईश्वरमीलनातुर अधिकारी जीवाला-गोपीलाच ऐकू जात असते.

ज्यांचे चित्त श्रीकृष्णाने हरून घेतले होते त्या व्रजनारी बासरी ऐकून आतुरतापूर्वक कृष्णाला भेटायला धावत चालल्या. आपली सांसारिक कार्ये एका बाजूला सारून भगवंताला भेटायला धावत आहेत. त्या तर आपल्या सख्यांना बोलवायला देखील थांबत नाहीत.

ज्या गोपीचे नाव घेऊन बासरी वाजते ती गोपी ऐकते.

ज्या गोपी गाईचे दोहन करीत होत्या त्यासुद्धा बासरीची तान ऐकल्याबरोबर काम सोडून उत्सुकतेने धावत चालल्या.

काही गोपी बेढंगी वस्त्रालंकार घालूनच कृष्णाला भेटायला निघाल्या. जेव्हा देहाध्यास सुटून जातो तेव्हा अशीच दशा होत असते.

शृंगार करीत असलेल्या एका गोपीने कृष्णाची बासरी ऐकली तर व्याकुळतेमुळे चंद्रहार गळ्यात घालण्याऐवजी हातातच घालून घेतला.

घराच्या सारवण-पोतेऱ्यात गुंतलेली एक गोपी शेणाने भरलेल्या हातासहच धावत गेली.

रासलीलेत जर लौकिक काम असता तर त्यातील गोपी निराळ्याच प्रकारच्या असत्या. याप्रमाणे तत्काळ धावत जाण्याऐवजी दोन-दोन तास शृंगार करून, आरशांत आपले रूप पाहून नटून-थटून निघाल्या असत्या. परंतु असे नव्हते.

काही गोपी घर सारवीत होत्या, त्या शेणाचे घाणेरडे हात न धुताच कृष्णाला भेटायला धावल्या. हे हेच दर्शविते की ह्यात लौकिक काम नाही.

ईश्वराला भेटण्यासाठी अशीच आंतुरता असली पाहिजे.

रामकृष्ण परमहंस नेहमी दृष्टांतासह गोष्टी सांगत.

एका शिष्याने विचारले— ईश्वरप्राप्तीसाठी जिज्ञासा आणि व्याकुळता कशी असायला पाहिजे?

गुरुजी— हा विषय वर्णनाचा नसून शब्दातीत अनुभवाचा आहे. रामबाण ज्याला लागला असेल तोच त्याची वेदना जाणू शकतो. एखाद्या प्रसंगीं मी सगळे कांही सांगेन.

एकदा ते दोघे स्नानाकरता गेले. शिष्याने पाण्यांत बुडी मारल्याबरोबर गुरूंनी त्याचे डोके बळेच पाण्यांत दाबून धरले. श्वास घ्यायला त्रास होऊ लागला तर शिष्य तडफडू लागला- बाहेर येण्यासाठी व्याकुळ झाला. गुरूंनी हात उचलून घेतला तेव्हां शिष्य पाण्याच्या वर येऊन सुखाने श्वासोच्छ्‌वास करू शकला. गुरूंनी विचारले, कसा आला अनुभव? शिष्य म्हणाला, अहो, माझे तर प्राणच निघून चालले होते. वाटत होते कीं प्राणवायूशिवाय मी आता मरत आहे.

गुरुजी— हं तर. ईश्वरप्राप्तीसाठी सुद्धा तशीच तडफड, व्याकुळता, आतुरतेची आवश्यकता आहे. असे होईल तेव्हांच ईश्वर भेटेल.

रासलीला कांही साधारण स्त्रीची नाही, तर देहभान विसरलेल्या— देहाध्यासापासून मुक्त स्त्रीची कथा आहे. देहाध्यास नष्ट झाल्यावर प्रभूच्या चिन्मयी लीलेंत प्रवेश मिळतो.

गोपींना नातेवाईकांनी रोखले पण त्या काय रोखल्या जाणार होत्या? त्यांचें मन मनमोहनाने

मोहून घेतले आहे.

गोपी हा हृदयाचा शुद्ध भाव आहे.

इंद्रियाद्वारे जो भक्तिरसाचें पान करील तोच गोपी.

घरांत राहून भक्ति करणें सोपे नाही. आपल्या पत्नीविषयी सुद्धा मातृभाव ठेवता आला तरच घरांत राहून भक्ति करता येऊ शकते. भक्तीच्या तन्मयतेंत स्त्री-पुरुषाचें देहभान मिटलेच पाहिजे.

दर्शनाच्या वेळीं आपले स्त्रीत्वाचे आणि पुरुषत्वाचें भान विसरेल तोच गोपी. जोपर्यंत देहाचें भान आहे तोपर्यंत मनांतून काम जातच नाही.

या गोपी कोण होत्या ? जेव्हां ऋषिमुनि हजारो वर्षेपर्यंत तपश्चर्या आणि ब्रह्मचिंतन करीत राहून सुद्धा मनांत वसत असलेला काम मारू शकले नाहीत तेव्हां त्या कामाला कृष्णार्पण करण्याच्या इच्छेने गोपींचा जन्म घेऊन गोकुळांत येऊन राहिले. यांच्यांत साधनसिद्धा, ऋषिरूपा, श्रुतिरूपा, स्वयंसिद्धा, अन्यपूर्वा, अनन्यपूर्वा इत्यादी कित्येक प्रकारच्या गोपी होत्या. सांसारिक भोगांचा उपभोग करण्याच्या आधीच ज्यांना वैराग्य येते त्या अनन्यपूर्वा गोपी आहेत.

केवळ वृक्षांची पानें खाऊन राहणाऱ्या तपस्वी ऋषींना सुद्धा काम सतावतो तर लुळीचे (जिभेचे) लाड करण्यांतच दंग असलेल्या आमच्यासारख्या साधारण मानवांची चर्चाच काय करावी ?

तपश्चर्या आणि योगसाधना करणारे ऋषि थकून-हरून आपला काम कृष्णार्पण करण्यासाठी गोपी होऊन आले. ईश्वराला काम अर्पण करून निष्कामी व्हा. पराशर ऋषि सूर्याला झाकू शकले, पण कामाला नाही.

मनुष्याचा सर्वात मोठा शत्रू कामच आहे. यांतूनच इतर पुष्कळसे दुर्गुण उत्पन्न होतात.

आणि सरतेशेवटी बुद्धिनाश होतो. जर काम ईश्वराला अर्पण केला गेला तर तो कधी अंकुरित होणार नाही.

संसारांतील सर्वच सांसारिक सुखांचा त्याग करून ईश्वराला भेटण्यासाठी गोपींप्रमाणे बाहेर पडणारे धन्य आहेत. म्हणूनच तर भगवंत गोपींचे स्वागत करतात, म्हणतात महाभाग्यवान स्त्रियांनो, या.

भागवतकार गोपींना महाभाग्यशाली म्हणतात. नारद देखील आपल्या भक्तिसूक्तांत गोपींचा दृष्टान्त देतात. ते हेच दर्शविते कीं गोपी कांही सामान्य स्त्रिया नव्हत्या. त्या भगवंताच्या मोठ्या भक्त होत्या.

भगवंताने प्रत्येक गोपीला महाभाग्यशाली म्हटले आहे – "महाभागाः" मोटर-विमानांत फिरणारा, बंगल्यांत राहणारा भाग्यशाली नाही. ज्याच्या डोक्यावर काळाची सावली असेल तो कसा भाग्यशाली म्हटला जाईल ? भाग्यशाली तर तोच जो सांसारिक सुखांना आणि काळाच्या भयाला सोडून देऊन भगवंताकडे धाव घेतो. ईश्वराला भेटायला अतिशय व्याकुळ झाला असेल तोच जीव महाभाग्यशाली आहे. याच कारणाने बंसीनाद अधिकारी गोपी-जीवांना ऐकू आला होता. बासरीचा मधुर नाद तर सर्वांनीच ऐकला होता.

सांसारिक विषयांच्या उपभोगाने कधीच तृप्ति होत नाही. ईश्वराला भेटण्याचा दृढ निश्चय करा. संसारसुख तर सर्वात मोठे दुःख आहे- महादुःख आहे. आणि हे सत्य समजून ज्यांनी संसारसुखाचा त्याग केला असेल त्याला ईश्वर आपले करून घेतात.

प्रभुप्रेमांत जो वेडा झाला असेल तो भाग्यशाली ! परमात्मा अशाच जीवाचें स्वागत करतात.

## २१. गोपी आणि कृष्णाचा रासपूर्व वार्तालाप :

श्रीकृष्णांनी गोपींना विचारले– अशा धावतपळत कां आल्या आहात तुम्ही सर्व ? व्रजावर कांही संकट आले आहे का ? तिथे सर्वच कुशल आहेत ना ? तुम्हाला प्रसन्न करायला मी काय करावे ? रात्रीच्या वेळीं अशा घोर वनांत स्त्रियांचे राहणे चांगले नाही. वृंदावनाची शोभा निरखायला आल्या आहांत का ? या सुंदररात्रीचें सौंदर्य पाहण्यासठी आल्या आहांत का ? शोभा पाहून लवकरच घरीं परता. तिथे तुमचे पति, मुले इत्यादी वाट पाहत असतील. आपल्या पतीची सेवा आणि मुलांचें लालनपालन करा.

अंतर्मुख दृष्टी करून जीव जेव्हां भगवंताजवळ पोचतो तेव्हां तो त्याला विचारतो– माझ्याजवळ कशाला आला आहेस ? संसारांत रत रहा. तेथे तुला सुख मिळेल. मी सुख नाही, केवळ आनंदच देऊ शकतो. तुम्ही सर्व परत जा. तिथे तुमची सर्व प्रतीक्षा करीत असतील.

एक अर्थ आहे घरी जा. दुसरा अर्थ हा होऊ शकतो कीं जीव भगवंताच्या स्वरूपाला येऊन मिळतो तो घरीं परतून जाऊ शकत नाही. जीवाला परमात्मा सहसा भेटत नाहीत. जीवाला भ्रांति होते कीं भगवान त्याला संसारांत परतायला सांगत आहेत.

तसे तर गोपी– शुद्ध जीव, त्याने संसारांत परत जावे असें भगवंत इच्छित नाहीत. परंतु ते त्याच्या प्रेमाची परीक्षा घेऊ इच्छितात. म्हणून ते म्हणत आहेत कीं सुख संसारांत आहे.

भगवंत तर आदर्श दाखवीत आहेत कीं पतीची सेवा करणें पत्नीचा धर्म आहे. पतींत ईश्वरभाव न ठेवणाऱ्या स्त्रीला इहलोकही साधत नाही आणि परलोकही नाही.

कलियुगांत स्त्रियांना आणि शूद्रांना मुक्ति लवकर मिळते. शूद्राने आचारविचारांचे पालन केले नाही आणि नुसते राम राम जपत राहिला तरी चालेल. परंतु ब्राह्मणाला तर आचारविचारांचें पालन करावेच लागेल, अन्यथा त्याचें पतन होईल. जर स्त्री घरांतील काम आणि कुटुंबांतील सर्वच लोकांची सेवा करता करता रामनाम घेत राहील तर तिला मंदिरांत जायची आवश्यकता नाही. जी मुक्ति योग्यांना मिळते तीच मुक्ति अशा स्त्रीला अनायासेच मिळते. पतिव्रता स्त्री तर अनसूयेप्रमाणें भगवंताला सुद्धा बालक करू शकते.

प्रभूंनी आपल्या समोर आलेल्या स्त्रियांना धर्मोपदेश दिला. स्त्रीला बाहेर जाण्याची आवश्यकता नाही. बाहेर भटकणारी स्त्री स्वेच्छाचारिणी होऊन पतित होईल.

जी स्त्री घरांतच राहून उत्तम प्रकारे गृहिणीधर्माचें पालन करते तिला पवित्र राहण्याची अनुकूलता असते. आपले पति, पतीचे नातेवाईक आणि आपली मुलें-मुली यांच्यामध्यें ईश्वरभावना ठेवून त्यांच्या सेवेंत आपलें तन, मन, धन ओवाळून टाकील आणि परमात्म्याचें स्मरण करीत राहील तर मंदिरांत न जाता अनायासेच तिला तीच सद्गति प्राप्त होईल जी योगी आणि संन्याशांना मिळत असते.

पतीच्या ठिकाणी आणि मुलामुलींमध्यें ईश्वराला पहा आणि त्यांची जिवेभावे सेवा करा. त्यांच्याबरोबर राहूनच ईश्वराचें चिंतन करा. पतींमध्येच ईश्वराचा भाव ठेवून वियोगावस्थेचा अनुभव करून स्मरण आणि ध्यानाने चित्त एकाग्र करा.

तुम्ही सर्व आपापल्या घरीं जा. अनसूया मातेने पतिसेवेच्या बळावरच तर ब्रह्मा-विष्णु-महेशांना बाळे करून टाकले होते. पतिव्रताधर्म सर्वांत मोठा आहे.

एक पतिव्रता स्त्री आपल्या पतीची जीवेभावे सेवा करीत असे. एक दिवस पति कामधंद्यातून निवृत्त होऊन बऱ्याच रात्रीं घरीं आले. फार थकून गेले होते तर पत्नीने आपल्या मांडीवर डोके ठेवून

त्यांना निजविले. पति थोड्याच वेळांत गाढ झोपी गेले. एका खाटेवर तिचा दोन वर्षांचा मुलगा झोपला होता. खाटेच्या खाली सर्दी होऊ नये म्हणून विस्तव होता. मुलगा झोपेंत कुशी बदलू लागला. इकडे आई विचार करू लागली कुठे मुलगा विस्तवांत पडला तर काय होईल? मी त्याला उचलून घेते. पण असे केले तर इकडे यांची झोपमोड होईल. मी पतीला कसा त्रास देऊ? मी नाही उचलत मुलाला. पतिसेवा करीत असता ती ईश्वरस्मरण करू लागली. इकडे मुलगा विस्तवांत पडला पण तो खऱ्या पतिव्रतेचा मुलगा होता. अग्नी त्याला कांही करू शकला नाही. अग्नी तर चंदनासारखा शीतल झाला होता! अग्नीची ज्वाळा सगळ्या विश्वाला जाळू शकते, पण पतिव्रता स्त्री अग्नीला सुद्धा जाळू शकते. महापतिव्रता नारीला तर अग्नीसुद्धा भितो.

श्रीकृष्ण गोपींना म्हणतात— आपापल्या घरीं जा. तो महान् पतिव्रताधर्म सोडून इथे कां आल्या आहांत? आपले पति आणि मुले यांना भगवंताचा अंश मानून त्यांची जिवेभावे सेवा कराल तर घरांत राहून देखील तुमचें कल्याण होईल.

कृष्ण म्हणतात— माझ्या संयोगापेक्षा माझ्या वियोगांतच तुम्हाला अनेक पट अधिक सुख मिळेल. वियोगावस्थेंत माझें उत्तम प्रकारे ध्यान-स्मरण होत राहील. आणि प्रेम देखील अधिक पुष्ट होईल. संयोगावस्थेंत दोषदर्शन सुरू होते. वियोगावस्थेंत गुणांचेच स्मरण-चिंतन होत असते. तुमचें प्रेम शुद्ध असेल तर तुम्ही माझें स्वरूप प्राप्त करू शकाल. आपले पति आणि मुलें यांना सोडून येथे धावणें बरोबर नाही, योग्य नाही.

ध्यानाच्या आरंभावस्थेंत साधकाचें चित्त चंचल असल्याकारणाने त्याला चोहोबाजूला अंधाराचें दर्शन होते, ईश्वररूपी प्रकाशाचें नाही. जर हा निराश न होता प्रयत्न करीत राहील तर अंधार फाडून प्रकाश अवश्य अवतरेल.

भगवंतांनी गोपींना घरी परत जाण्याची आज्ञा केली तेंव्हा त्यांना फार वाईट वाटले. आज भगवंत इतके निष्ठुर कां झाले आहेत? त्यांनी भगवंतांना विचारले, आज तुम्ही असे कां करीत आहांत? भगवंत त्यांना म्हणाले— देहाचा स्वामी पति आहे. या शरीराचा कोणी पिता असेल, पति असेल पण आत्म्याला पिता-पति कोणी असत नाही. आत्म्याचा धर्म प्रभु-मीलन आहे. याप्रमाणें भगवंतांनी त्यांना देहधर्माचा उपदेश दिला.

तर गोपी प्रभूला आत्मधर्माचा उपदेश देऊ लागल्या. आज तुम्ही इतके निष्ठुर कां झाले आहात? तुम्हीच तर सांगितले आहे कीं जो कोणी मोठ्या भावानें तुमची सेवा-पूजा करतो त्याला आपण भेटता. तर मग आता आम्हाला घरीं परत कां पाठविता? आपण तर पतितपावन-दयासागर आहांत, अशा श्रद्धेने आम्ही आपल्या चरणापाशी आलो होतो. आपण असे कठोर कां झाला आहांत? आम्ही संसारांतील सर्वच विषयांचा मनाने त्याग करून आपल्या चरणापाशी शरणागती पत्करण्याचा अटल निश्चय केला आहे.

सर्वच विषयांचा मनाने सुद्धा त्याग करून भगवंताच्या चरणीं शरण जाणारा जीवच गोपी होय.

"त्यक्त्वा" शब्द विषयांचा शारीरिक त्याग दर्शवितो आणि "सन्त्यज्य" शब्द विषयांचा मानसिक त्याग— असाधारण त्याग दर्शवितो.

आम्ही सर्वच विषयांचा शारीरिक आणि मानसिक त्याग करून आपल्या चरणापाशी आलेल्या आहोत. आपल्यासाठी आम्ही सर्वस्वाचा त्याग केला आहे. सांसारिक विषयांचा विवेकपूर्वक त्याग करून केवळ आपल्या भेटीच्या इच्छेने आम्ही आल्या आहोत. आमची उपेक्षा करू नका. आमच्या

मनांत आपल्याशिवाय आणखी कांहीच शेष नाही.

शारीरिक त्याग तर जीव त्वरित करू शकतो, पण मानसिक त्याग करणें फार कठीण आहे. मानसिक त्याग न करता केवळ शारीरिक त्याग करणे दांभिकता ठरेल. मानसिक त्यागच मुख्य आहे. शरीर कुठेही असेना, परंतु मनांतून ईश्वराला दूर होऊ देऊ नका.

वृत्त-अवृत्त नावाच्या दोन साधूंचा दृष्टान्त पाहू. ते दोघे यात्रा करीत होते. प्रयागराजच्या दिशेने चालले होते. जन्माष्टमीच्या दिवशीं वेणीमाधवाचें दर्शन करू इच्छित होते. चालता चालता रात्र झाली. थकूनही गेले होते. एक वेश्यागृह पाहिले तर अवृत्त म्हणाला जोराचा पाऊस पडत आहे, अंधारही आहे, रस्ता दिसत नाही आणि मी थकलो आहे तर मी आज इथेच राहीन. तुला पुढे जायचे असेल तर जा.

वृत्ताला वाटले कीं कदाचित याचें मनांत कामाने प्रवेश केला आहे. मी इथे राहू शकत नाही, असा विचार करून तो पुढे गेला आणि प्रयागराजच्या मंदिरांत जाऊन थांबला.

अवृत्त वेश्यागृहांत थांबला होता, पण आता त्याला पश्चात्ताप होऊ लागला. तो आपल्या स्वतःलाच टोचू लागला. धिक्कार असो माझा. मी किती क्षुद्र, हीन भाग्याचा आहे कीं जन्माष्टमीच्या दिवशीं कृष्णाच्या मंदिरांत थांबायच्या ऐवजी इथे पडून राहिलो आहे! माझा मित्र वृत्त किती भाग्यवान आहे कीं या वेळी तो प्रभूच्या मुखारविंदाचें दर्शन करीत असेल. मंदिरांत उत्सव होत असेल, वैष्णव लोक प्रभूचें दर्शन करीत असतील. तेथे भजन-कीर्तन-आरती-वंदन होत असेल. किती भव्य आणि पवित्र असेल तें दृश्य. याप्रमाणे अवृत्त वेश्यागृही होता परंतु त्याचें मन वेणीमाधवाजवळ होते. मोठ्या तन्मयतेने तो मनांतल्या मनांत जन्माष्टमीचा प्रसंग पाहात होता.

तिकडे मंदिरांत बसलेला वृत्त देखील पश्चात्ताप करीत होता. तो विचार करू लागला कीं इतके मोठे कष्ट करून मी इथे व्यर्थ आलो! तिथे माझा मित्र सुंदर वेश्यांबरोबर क्रीडा करीत असेल आणि मी इथे ह्या गर्दीत घुसमटला जात आहे. किती भाग्यवान आहे माझा मित्र! त्याचें मन उत्सवांत लागतच नव्हते. त्याला त्या वेश्येच्या सौंदर्याचेच दृश्य दिसत होते. त्याचे शरीर तर माधवाच्या मंदिरांत होते, परंतु मन वेश्येपाशी.

अवृत्ताला मोक्ष मिळाला आणि वृत्ताला नरक. अवृत्ताला घ्यायला देवाने विमान पाठविले. कारण तनाने भलेही तो वेश्यागृहीं असो, पण मनाने तर वेणीमाधवापाशी होता. वृत्त होता मंदिरांत, परंतु वासनासुखाचें चिंतन करीत होता म्हणून त्याला नरकांत जावे लागले.

केवळ देहशुद्धी नाही, मनशुद्धि देखील आवश्यक आहे. केवळ देहशुद्धि तर दंभ आहे.

गोपी भगवंताला म्हणतात— पतीच्या जवळ तर ती स्त्री जाईल की जिच्या मनांत विकारवासना अजून शिल्लक आहेत. विकारवासनांचा त्याग केल्यावर प्रभूपाशीच येणार. आम्ही निर्विकारी आहोत म्हणून आपणापाशी आलो आहोत.

भगवान— तुमच्या निर्विकारतेचे प्रमाण काय?

गोपी— आपणच तर आहात प्रमाण! कारण आमच्या हृदयांत तर आपणच विराजत आहात.

जो मनाला साक्षीरूपाने पाहतो तोच ईश्वर. तो मनांतल्या भाव-कुभावांची परीक्षा करतो. आमच्यांत कांही विकार असला तरी तो आपणापासून लपलेला नसणारच. आपण अखिल बंधुरात्मा आहांत. आम्ही निर्विकारी आहोत. आता तर एकच इच्छा आहे— एकच वासना आणि ती आपल्याशी मीलनाची.

ईश्वर परिपूर्ण वैराग्य, प्रेम भक्ति आणि ज्ञान मागतात. त्यांना तुटपुंजे, अर्धवट स्वीकार्य नाही.

पतिसेवेची जी आज्ञा आपण आम्हाला दिली आहे ती शिरोधार्य आहे. आमच्या शरीराचे पति घरीं आहेत परंतु आत्म्याचे पति तर आपणच आहांत. आपण पतिमधे ईश्वराची भावना ठेवून त्यांची सेवा करायला सांगता. परंतु पतीमध्यें ईश्वराची भावना करणें त्याच स्त्रियांना आवश्यक आहे कीं ज्या आपल्याला पाहू शकत नाहीत. आम्ही आपलें प्रत्यक्ष दर्शन केलेलें आहे. तेव्हां इतर कोणत्याही व्यक्तीवर ईश्वराचा आरोप करण्याचा प्रश्नच उठत नाही.

भावना, कल्पना, आरोपण तर वियोगावस्थेंत करावे लागते, संयोगावस्थेंत नाही. परमात्म्याच्या किंवा कोणा व्यक्तीच्या प्रत्यक्ष दर्शनाची संधि मिळत नसेल तेव्हांच त्याच्या संबंधित मूर्ति, छबी किंवा अन्य कोणत्याही वस्तूंत त्याचें दर्शन आम्ही घेतो.

आम्ही तर आपले प्रत्यक्ष दर्शन घेतलें आहे तर मग आपल्याला सोडून इतरांमधे भावना कां करावी ? आणि पति तरी कोण आहे ? **पाति इति पतिः।** मृत्यूच्या भयापासून जो रक्षण करील तो पति होय. मृत्यूच्या जाळ्यांतून सोडवील तोच पति. असे तर एकमात्र आपणच आहांत. जीवामात्राचा खरा पति तर ईश्वरच आहे. आपण सगळ्यांचे अनन्यस्वामी आहात. म्हणून पूर्ण विचार करून समजूनच आम्ही आपल्या चरणांचा आश्रय घेतला आहे. नाथ, एक प्रश्न विचारू ? प्रभूंनी अनुमति दिली.

गोपी – पतिव्रता स्त्रीचा जो धर्म आपण सांगितला त्याचें फळ काय ?

कृष्ण – मन शुद्ध होते.

गोपी – मन शुद्ध झाल्यावर काय मिळते ?

कृष्ण – त्या शुद्ध मनाच्या जीवाला परमात्मा प्राप्त होतो.

धर्माचे पालन चित्तशुद्धीसाठी आहे आणि चित्तशुद्धीचे फळ प्रभु-मीलन आहे.

गोपी – आपण तर आम्हाला मिळालाच आहात. तर मग त्या चक्रांत पुनः कां पडावे ? आपणच आमचे खरे पति आहांत. आमचा त्याग करू नका.

कृष्ण – मी पतिव्रता स्त्रियांचे उदाहरण सांगितले. तुम्ही सुद्धा घरांत राहूनच कुटुंबी जनांची सेवा करीत करीत तिथेच सिद्धि मिळवू शकता.

पुरुषापेक्षा स्त्रीला सिद्धि-प्राप्ति जास्त सुलभ असते. घरांतच राहून, घरांतील प्रत्येक जीवाला ईश्वररूप मानून आपले तन-मन-धन ओवाळून टाकले पाहिजे. शास्त्र तर इथपर्यंत सांगते कीं पतीने धनार्जनासाठी केलेल्या पापांत स्त्रीचा कांहीच वाटा नाही, परंतु पतीच्या पुण्यांत मात्र तिला अर्धा वाटा मिळतो. परंतु स्त्रीला पतीच्या पुण्यांत हिस्सा केव्हां मिळतो ? जर स्त्री आपला पति आणि मुले यांना परमात्मस्वरूप मानून त्यांची सेवा करील तरच तिला पतीच्या पुण्याचा अर्धा हिस्सा मिळेल, अन्यथा नाही.

स्त्री-धर्म सर्वश्रेष्ठ आहे. तिने आपल्या पति आणि मुलांची सेवा करावी, मुलांना धर्माचे शिक्षण द्यावे हीच त्यांची मोठी सेवा आहे, कथा-आख्यानांत बसून राहणे नव्हे. पतिसेवेने चित्तशुद्धि होते आणि चित्तशुद्धीने परमात्मा प्राप्त होतो.

गोपी – नाथ, असे नका समजू कीं आपणच कथा करू शकता, आम्ही सुद्धा करू शकतो. आमच्या मागच्या जन्मांत आम्ही हे सर्व केले आहे. ऋषीजीवनात कथा-आख्यान कीर्तन-भजन ऐकता ऐकता आणि सांगता सांगता आम्ही थकलो, हरलो तरी सुद्धा आपले दर्शन झालें नाही, म्हणून आम्ही ऋषींची शरीरे टाकून गोपींची रूपे धारण केली आहेत. आपण तर आम्हाला पुष्कळच ऐकविले. आता आमचेही कांही ऐका.

एका पतिव्रता स्त्रीला आपल्या पतीचा वियोग असह्य होता. ती नेहमी पतीबरोबरच राहण्याचा आग्रह धरीत असे. योगायोगाने पतीला परदेशी जाण्याचा प्रसंग आला. ती सुध्दा पतीबरोबर जायला तयार झाली. मला सोडून जाऊ नका. नाथ, मला आपल्याबरोबर घेऊन चला.

पती तिला समजावू लागला– देवी, मी कामासाठी बाहेर जात आहे, तिथे तुला कसा घेऊन जाऊ? माझ्या वियोगाने तुला जळावे लागू नये अशासाठी एक उपाय आहे. घरात तो माझा फोटो आहे ना, त्याची दृढभावनेने सेवा-पूजा करीत रहा आणि समज की मी घरातच आहे. जेव्हा जेव्हा माझी आठवण येऊन त्रास होईल त्यावेळी त्या फोटोचे दर्शन, पूजन कर. ती पतिव्रता स्त्री मोठ्या तन्मयतेने पतीच्या फोटोची पूजा करू लागली. दोन महिने निघून गेले. एक दिवस पति परत आले, त्यावेळी ती स्त्री चित्राच्या सेवेंत लीन होती.

आता प्रभु आमचा प्रश्न असा आहे कीं, पतीचा आवाज ऐकल्यावर सुद्धा ती स्त्री चित्राची सेवा करीत राहील की पतीच्या स्वागतासाठी धावतच द्वारी येऊन उभी राहील?

श्रीकृष्ण– अहो, ही कांही विचारायची गोष्ट आहे? ती धावतच येऊन दाराजवळच पोचेल.

गोपी– कां?

श्रीकृष्ण– चित्र तर एक कागदाचा तुकडा आहे आणि दारांत तर साक्षात पतिदेव आलेले आहेत.

गोपी– नाथ! आम्ही जिंकलो. आपण अगदी बरोबर न्याय दिला. आमचे सुद्धा हेच म्हणणे आहे. जर आम्हाला साक्षात् परमात्माच भेटलेले आहेत, तर मग त्या लौकिक पतींशी आमचे आता काय देणे-घेणे उरले? लौकिक पति तर त्या चित्रांत रेखाटलेल्या पतीसारखाच आहे. प्रत्येक जीवाशी निःस्वार्थतेने एकसारखे प्रेम करणारा खरा पति जर आम्हाला भेटला आहे तर मग त्या लौकिक पतीला आम्ही कां आपले म्हणून चिकटून राहावे? लौकिक व्यक्तीच्या प्रेमांत तर नेहमी कपट आणि स्वार्थ मिळालेला असतो.

परंतु ही गोष्ट आजकालच्या साधारण स्त्रीसाठी अनुकरणीय नाही. जोपर्यंत परमेश्वराचा साक्षात्कार होत नाही तोपर्यंत तर पतींमध्येच परमेश्वराची भावना करावी लागेल. परमात्म्याचे प्रत्यक्ष दर्शन झाल्यानंतर पतींत प्रभूची भावना न केली तर विशेष बाधा नाही. भावना वियोगांतच करावी लागते. संयोगांत नाही.

गोपी– नाथ! आम्ही स्त्रीत्वासहित सर्वस्वाचा त्याग केला आहे. आपल्याला शरण आलो आहोत. जो स्त्रीही नाही आणि पुरुषही नाही अशा शुद्ध चेतन आत्म्याचा विशेष धर्म कोणता असू शकतो? त्याचा कोणता पुरुषार्थही नसतो आणि नारीधर्मही नसतो.

नाथ, जो जीव स्त्री असेल त्याच्यासाठी नारीधर्माचे पालन आवश्यक आहे. आम्ही तर शुद्ध चेतन आत्मा आहोत. आत्म्याचा धर्म प्रभूशी मीलन हा आहे. जोपर्यंत प्रभू भेटत नाहीत तोपर्यंत आपल्या धर्माचे पालन केले पाहिजे. धर्माच्या पालनाने मन शुद्ध होते. धर्मपालनाने पाप जळते. पाप जळल्यावर मन शुद्ध होते आणि मन शुद्ध झाल्यावर परमात्म्याचा साक्षात्कार होतो.

आपण तर प्रत्यक्ष परमात्मा आहांत. आपण तर आम्हाला प्राप्त झालेलेच आहांत. आम्हाला आमचा खरा पति प्राप्त झालेला आहे. आता आम्हाला स्त्रीधर्मपालनाची कांहीच आवश्यकता नाही. आता आम्हाला अंतरी तुमचा भाव जतन करायचा नाही. जोपर्यंत तुमचे दर्शन झाले नव्हते तोपर्यंत आम्ही इतरांमध्ये तुमचें रूप पाहात होतो. आता आम्ही आपल्याला सोडून कोठे जावे? कां जावे? आता आपल्याला सोडून जडधर्माचा आश्रय कां शोधावा?

धर्म तर साधन आहे. साध्य तर तुम्ही स्वतःच आहांत. आम्ही आजपर्यंत स्वधर्मांचे पालन केले म्हणूनच तर आपला साक्षात्कार होऊ शकला. आम्ही तर आपल्या चरणांच्या दासी आहोत. नाथ! आता निष्ठुर होऊन आमचा त्याग करू नका. आम्हाला आपलेसे करा.

भगवंत म्हणतात – जर मलाच तुम्ही आपला खरा पति मानीत आहांत तर माझे सांगणे तुम्ही ऐकले पाहिजे. जा, घरी जाऊन पति-मुलाबाळांची सेवा करा. जरी लौकिक पति स्वार्थी असेल तरी पण माझी आज्ञा आहे कीं त्यांचीच सेवा करा.

गोपी – हजारो जन्मांत हे सगळे सहन करून आम्ही आता पार थकून आहोत. इतक्या परिश्रमानंतर आता आपण साक्षात् ईश्वर भेटला आहांत. मग परत कां जावे? तरी पण आपली आज्ञा आहे तेव्हा जावे तर लागेलच. परंतु आपल्या लौकिक पतीची सुद्धा सेवा करायला मन तर पाहिजे ना? आता मन तर आपण चोरून घेतले आहे. आपण आमचे मन परत कराल तेव्हां घरी जाऊन लौकिक पतीची सेवा करू. आमचे चित्त परत करा.

जो आपले मन ईश्वराला देऊन टाकतो तो ईश्वराशी तदाकार होत असतो. ईश्वर स्वतः देखील ते मन परत करू शकत नाही.

श्रीकृष्ण – ज्याच्या चित्ताची मी चोरी करतो त्यांचें ते चित्त तर माझ्यांत एकरूप होऊन जाते. ते मी परत करू शकत नाही. तुमच्या मनाची सुद्धा हीच दशा आहे.

दुधांत मिळून गेलेली खडीसाखर कधी वेगळी होऊ शकते कां? कोणत्याही प्रकारे वेगळी केली जाऊ शकत नाही.

श्रीकृष्ण – तुमचे मन माझ्यांत केव्हां आणि कसे मिळून गेले हे मी जाणत नाही. तेव्हा ते कसे परत करू?

गोपी – तर मग आम्ही मनाशिवाय घरी परत कशा जाऊ शकतो? आपण मन देऊ शकत नाही तर आम्हीही घरी जाऊ शकत नाही.

आमचे पाय आपले चरणकमल सोडून एक पाऊल देखील दूर जायला तयार नाहीत, तर मग आम्ही व्रजांत परत तरी कशा जाऊ? आणि परत गेलो तरी मनाविना आम्ही तेथे काय करावे?

प्रभु – मी योगशक्तीनें तुम्हा सर्वांना तेथे उचलून पोचवून दिले तर?

गोपी – आमच्या शरीरांना घरी पोचवाल, पण मन तर बरोबर जाणारच नाही. आम्ही तेथे जाऊन काय करावे?

आमची मने तुमच्यांतच मिळून गेली आहेत. आम्ही आपल्या स्वरूपांत तदाकार होऊ इच्छितो.

जिथे मन असेल तिथेच जीवात्माही असतो. मन तर ईश्वराशीच जाऊन मिळेल. जगांतील जड पदार्थांमध्ये मनाचा लय होऊ शकणार नाही. मन आणि जग विजातीय आहेत; मन आणि ईश्वर सजातीय. सजातीयामध्ये तर सजातीयच मिळू शकतो. मन जड नाही, चेतन आहे म्हणून ते चेतन परमात्म्याशीच जाऊन मिळेल. मन ईश्वरांत स्थिर होऊ शकते. याच कारणास्तव ज्ञानी लोक आपले मन ईश्वराला देत असतात. मन कोणा स्त्री किंवा पुरुषाला नाही, केवळ श्रीकृष्णालाच दिले जावे. मन ज्यांत मिळून जाईल त्यांत आत्मा देखील मिळून जाईल.

नाथ! आमचें मन आपणांत मिळाले आहे. आम्ही आपल्यासाठीच जगून राहिलो आहोत. आपल्याला सोडून आम्हाला जायची इच्छाच होत नाही.



प्रभु – मी तुमचे प्रेम जाणतो. तरी पण आज तुम्ही आपापल्या घरी परत जा.

गोपी– आता तर आम्ही कधीच जाऊ शकत नाही. वाटल्यास प्राण का निघून जावोत!

आता प्रभु निरुत्तर झाले. त्यांनी विचारले– काय इच्छा आहे तुमची? कसे स्वागत करू तुमचे?

गोपी– नाथ! केवळ तुमच्या अधरामृताचे दान द्या की जेणेकरून आपला कधीच वियोग होऊ नये. आम्हाला नित्य संयोगाचे दान द्या.

गोपींनी अधरामृताची मागणी केली.

आरंभीच सांगितले गेले आहे की भागवतांत समाधिभाषा प्रधान आहे, लौकिक नाही.

अधरामृताचा सुद्धा विशिष्ट अर्थ आहे.

पृथ्वीला धरा म्हणतात. कारण कीं ती सगळ्यांचेच धारण आणि पोषण करते. पृथ्वीचे अमृत धरामृत आहे. जे या पृथ्वीचे नाही असे अमृत अधरामृत आहे. अधरामृताचा अर्थ झाला प्रेमामृत-ज्ञानामृत. ज्या अमृताचा कधीच नाश होत नाही ते प्रेमामृत आणि ज्ञानामृतच होय.

हे नाथ! हे प्रभु! आम्हाला त्या ज्ञानामृताचे दान करा कीं जे मिळाल्यावर ईश्वरापासून– आपणापासून पृथकतेचा-द्वैताचा भावच शिल्लक राहत नाही. असे ज्ञान द्या की आपणापासून आमचा कधीच वियोग होऊ नये.

जोपर्यंत अधरामृत-प्रेमामृत-ज्ञानामृत मिळाले नसेल तोपर्यंत हृदयांत अग्नि जळत राहतो. म्हणून असे ज्ञान द्या कीं सर्वांमध्ये आम्ही आपलेच दर्शन घेत राहू.

प्रत्येकांत ईश्वराचे अस्तित्व आहे असे मानून व्यवहार कराल तेव्हांच सगळे जग गोकुळ होईल– वैकुंठ होईल.

गोपींना सांसारिक सुखाची कोणतीच अपेक्षा नव्हती. त्या तर सर्व लौकिक सुखांचा त्याग करून आलेल्या होत्या. त्यांची मागणी लौकिक अमृत-अधरामृताची नाही, अ-धरामृत-अलौकिक अमृताची आहे.

नाथ! आम्ही असे ज्ञानामृत इच्छितो की ज्यायोगे आपल्यात आणि आमच्यांत कधी वियोगच होऊ शकणार नाही– नित्य संयोगच राहील. आपणापासून दूर झालो तर माया पुनः डोक्यावर स्वार होईल.

आपण असे ज्ञानामृत द्या कीं आपल्या स्वरूपाशी नित्य संयोगाचाच अनुभव होत राहील. आपला वियोगच करुणतम असे दुःख आहे आणि आपला संयोग परमसुख.

प्रभु म्हणाले– नित्य संयोगरूप अधरामृत देणे किंवा न देणे माझ्या इच्छेवर अवलंबून आहे. असे दान मी तुम्हाला देऊ शकत नाही. तुम्हाला अधरामृत नाही दिले तर!

सख्या– जास्त नखरा नका करू. शेवटचा उपाय आमच्याच हातांत आहे. आमच्या स्वतःसाठी नाही, परंतु आपली कीर्ति कलंकित न व्हावी म्हणूनच आम्ही आपला अनुनय करीत आहोत. आपल्या कीर्तीच्या वृद्धीस्तव आम्ही आपली प्रार्थना करीत आहोत. जर आपण आम्हाला नित्यसंयोगरूप अधरामृत द्याल तर आपलीच प्रतिष्ठा वाढेल. नाहीतर आम्ही विरहाग्नीने आपली शरीरे भस्मीभूत करून टाकू.

आम्ही ऐकले आहे कीं मृत्यूच्या शेवटच्या क्षणी ज्याचे चिंतन करावे तो त्याला मिळतो. शास्त्रानुसार अंतकाळी ज्याचे स्मरण करीत करीत देहत्याग केला जाईल त्यांतच जीव लीन होतो. आमच्या मनांत इतर कोणीच नाही. आम्ही आपल्या शेवटच्या श्वासापर्यंत आपलेच स्मरण, चिंतन, ध्यान करीत राहू आणि आपले नाम जपत जपत प्राणत्याग करू. मग आपण आम्हाला मिळालच. आम्ही जीवांत जीव असता भलेही आपली प्राप्ती करूं शकणार नाही. मेल्यानंतर तर मिळवू शकू. परंतु लोक काय म्हणतील?

ते म्हणतील की हे कृष्ण किती निष्ठुर आहेत! गोपींनी विरहाग्नींत जाळून घेऊन प्राण सोडले तरी पण कृपा केली नाही! त्या गोपींचे प्रेम तर अगदी अंतःकरणापासून होते. परंतु कृष्णाचे हृदय दगडासारखे कठोर होते!

नाथ! प्राणत्याग करायला आमची कांहीच हरकत नाही. परंतु आम्ही इच्छितो कीं आपली अपकीर्ती होऊं नये. याचसाठी आम्ही आपली मनधरणी करीत आहोत.

प्रभु, आपण सर्वत्र सर्वव्यापी आहांत म्हणून तर आपल्याशी मिलन व्हायचेच आहे. ज्ञानमार्गांत प्राप्ताची प्राप्ति आहे आणि भक्तीमार्गांत भक्तीची, पण जगांत आपले हसे व्हावे अशी आमची इच्छा नाही.

## २२. प्रत्यक्ष रासक्रीडेचा आरंभ:

गोपींचे हे संभाषण ऐकून श्रीकृष्णाने आपला पराजय मान्य केला. म्हणूनच गोपींच्या या भाषणाची महाप्रभूंनी स्तुति केली आहे, जयजयकार केला आहे.

तसे पाहिले तर भगवंताचा कधीच पराजय झाला नाही आणि कधी होणार नाही. परंतु गोपींबरोबरच्या संभाषणांत गोपींचा विजय झालेला आहे.

हा तर जीव आणि ईश्वराचा वार्तालाप आहे. जीवाची परीक्षा केल्यानंतरच ईश्वर जीवाला आपलेसे करून घेतो. गोपींची सर्वप्रकारे परीक्षा केल्यानंतरच श्रीकृष्णांनी त्यांना अधरामृत-दिव्यरस-अद्वैतरसाचे दान दिले.

प्रभूंनी पाहिलें कीं या गोपींचे प्रेम खरे आहे. जर आज मी यांना दूर करीन तर त्या प्राणत्याग करतील. जीव शुद्ध भावाने मला भेटायला (माझ्यात विलीन व्हायला) आला आहे, असा प्रभूला विश्वास वाटला म्हणून त्याने जीवाला आपले करून घेतले.

प्रभूंनी एकाच वेळी अनेक रूपे धारण केली. जितक्या गोपी होत्या तितकी स्वरूपे झाली आणि प्रत्येक गोपीबरोबर एक एक स्वरूप ठेवून रास आरंभ केला. अष्टसख्या बरोबर सेवेसाठी हजर होत्या. हजारो जन्मांचा विरही जीव आज प्रभूच्या समोर आला आहे. प्रभूंनी प्रत्येक गोपीला आपल्या छातीशी लावून प्रगाढ आलिंगन दिले. गोपींना– शुद्ध जीवांना परमानंद प्राप्त झाला.

जीव आज ईश्वरमय झाला. ते दोघेही एक झाले. या मीलनाने जीव आणि ईश्वर दोघांनाही आनंद झाला.

गोपी कृष्णमय– भगवन्मय झाल्या. सगळेच हाताला हात मिळवून नाचू लागले.

हे तर ब्रह्माशी जीवाचे मीलन झाले आहे. याप्रकारे अद्वैत सिद्धान्ताचे आचार्य शुकदेवांनी रासलीलेंत अद्वैताचे वर्णन केले आहे.

रासलीलेंत साहित्य, संगीत आणि नृत्याचा समन्वय होतो. या रासलीलेंत कामाचा अंशसुद्धा नाही. देव, गंधर्व नारद इत्यादींनी आकाशातून ही लीला अवलोकिली. न्याहाळता न्याहाळता ब्रह्मदेव विचार करू लागले– कृष्ण आणि गोपी निष्काम तर आहेत, तरी पण देहभान विसरून याप्रकारे परकी स्त्रियांबरोबर लीला करणे म्हणजे शास्त्रमर्यादेचा भंगच आहे. कृष्णावतार धर्ममर्यादेचे पालन करण्याकरता आहे. स्वेच्छाचार करण्यासाठी नाही. ब्रह्मदेव रजोगुणाचे अधिष्ठाता देव आहेत. ज्याच्या डोळ्यांत रजोगुण आहे तो तिथे तसेच पाहत राहतो. ब्रह्मदेव साशंकित झाले.

श्रीकृष्ण इकडे विचार करीत आहेत की या म्हाताऱ्याला [illegible] शिकविला होता. आणि

आता हा मला शिकवू पाहत आहे. ब्रह्मदेव हे जाणत नाहीत कीं ही रासलीला धर्म नव्हे, धर्माचे फळ आहे.

प्रभूंनी एक आणखी खेळ रचला. सगळ्याच गोपींना आपले रूप दिले. आता कृष्णच कृष्ण दिसू लागले! गोपी नव्हत्याच! सगळेच पीतांबरधारी कृष्ण आहेत आणि एक दुसऱ्याशी रास खेळत आहेत.

ब्रह्मदेवांनी आता समजून घेतले कीं हे स्त्रीपुरुषांचे मीलन नाही. श्रीकृष्ण गोपीरूप झाले आहेत. ब्रह्मदेवाने कृष्णाला नमस्कार केला.

ते विजातीय तत्त्वांचे स्त्रीत्व आणि पुरुषत्वाचे मीलन नाही, तर अंश आणि अंशीचे मीलन आहे. आज गोपी श्रीकृष्णमय-प्रभुरूप झाल्या आहेत. ब्रह्मरूप होऊन गेल्यावर जीवाचे स्वत्व कोठे राहिले? ब्रह्मदेवांनी क्षमा मागितली.

मग जितक्या गोपी होत्या तितकी रूपे प्रभूंनी धारण केली आणि सर्वच गोपींना दिव्यानंदाचे दान दिले.

जर या लीलेंत कामाचा हेतु असता तर ती बंद प्रासादांत केली गेली असती. परंतु ही लीला तर उघड्या मैदानांत केली गेली होती.

जर यांत लौकिक कामाचार असता तर देवगणही पाहायला आले नसते.

व्रजांत रासलीलेत अकरा वर्षांचे आंतील मुले आणि मुली भाग घेतात. कारण ह्याच्यापेक्षा वरच्या वयाच्या मुलामुलींमध्ये कामविकाराचा आरंभ होऊ लागतो.

शक्तिबरोबरच कामवृत्तिदेखील वाढत जाते. मनांत काम जागृत झाल्याबरोबर रासविहारी श्रीकृष्णाचे ध्यान कराल तर काम नष्ट होईल. कामाला मारण्याचा आणखी इतर उपाय नाही.

गोपींची इच्छा आहे की श्रीकृष्णांनी डोक्यावर हात ठेवून आशीर्वाद द्यावा की ज्यामुळे कामाचा नाश होईल.

ईश्वराची कृपा झाल्यावर लौकिक काम-रति पतीचा नाश होतो.

पुरुषत्व तर अभिमान आणि अहंकाराचे सूचक आहे. ईश्वराच्या घरात पुरुष अर्थात अभिमानाला कोणतीच जागा नाही. जो जीव गोपीभावाने-नम्रतेने जातो त्याला प्रवेश मिळतो.

नारदांना पश्चात्ताप होऊ लागला की ते पुरुषरूपात येण्याऐवजी स्त्रीरूपात आले असते तर त्यांना रसाची प्राप्ति झाली असती. नारदांना काय ठाऊक की पुरुष तर एक पुरुषोत्तम, बाकी सर्व व्रजनारी आहेत.

इतक्यात राधेने नारदाचे म्लान तोंड पाहिले. वृंदावनाच्या अधीश्वरी राधिकेची इच्छा नव्हती की वृंदावनच्या कोणत्याही अतिथीला कोणत्याही प्रकारचे दुःख किंवा कष्ट व्हावे. तिने नारदांना कारण विचारले.

नारद– मला श्रीकृष्णाशी रास खेळून गोपीसारखा आनंद मिळवायचा आहे.

राधा– तुम्ही जर राधाकुंडात स्नान कराल तर रासलीलेत प्रवेश मिळेल.

राधाकुंडात स्नान केल्याने नारद नारदी होऊन गेले. त्यांनी विचार केला की जर परमेश्वर मिळत असेल तर स्त्री होण्यात कोणती अडचण आहे? आजपर्यंत पुरुषत्वाच्या अभिमानानेच तर मला प्रभूपासून इतके दूर ठेवले आहे. आजपर्यंत मी या अभिमानात बुडून राहिलो होतो की मी पुरुष आहे. मोठा कीर्तनकार आहे, शिकलेला आहे, विद्वान आहे. त्यांनी या [illegible]

गोपींनी आपले स्त्रीत्व सोडले आणि नारदांनी आपले पुरुषत्व.

सांसारिक धर्मांचा त्याग करून प्रभूकडे जाणे हाच तर जीवाचा धर्म आहे. देहभाव, पुरुषत्व, स्त्रीत्वाचा भाव हेच तर प्रभुमीलनात बाधक आहेत. असे देहभाव सोडल्याशिवाय जीव ईश्वराजवळ जाऊ शकत नाही. अभिमानी जीव रासलीलेत प्रवेश मिळवू शकत नाही. गाईसारखे नम्र गोपी बनून जा. तसे तर पुरुषत्व अहंभावाचे प्रतीक आहे आणि स्त्रीत्व नम्रतेचे. तरी पण प्रभूला भेटण्यासाठी तर या दोन्ही आवरणांचा त्याग करून शुध्द जीव होणे आवश्यक आहे.

आपली विद्या, ज्ञान कीर्तनकार म्हणून अभिमान नष्ट झाला तेव्हां नारदांना रासलीलेत प्रवेश मिळाला. ते गोपी होऊन रासलीलेत गेले.

गोपीला (नम्र जीवाला) प्रभु रासलीलेत प्रवेश देऊन आनंद देतात. गोपीरूपी नम्र जीवांनाच प्रभु आपले करून घेतात.

गोपींना श्रीकृष्णाविषयी प्रेम होते, मोह नाही.

आत्म्याचे चिंतन प्रेम उत्पन्न करते आणि शरीराचे चिंतन मोह. आपल्या प्रिय पात्राच्या आत्म्याचे स्मरण ध्यान करा, शरीराचे नाही.

प्रेमात अतिशय धीर आवश्यक आहे. धीर सुध्दा कसा? रुक्मिणीने आपल्या एका पत्रात लिहिले होते— किती का जन्म घ्यावे लागोत पण वरीन तर तुम्हालाच.

भागवत तर गोवर्धननाथांचे वाङ्मयस्वरूप आहे.

जोपर्यंत नामाशी संबंध होत नाही तोपर्यंत प्रभूशी संबंध कसा होऊ शकेल?

भागवत परमात्म्याचे प्रत्यक्ष नामस्वरूप आहे. ते भगवंताशी संबंध जोडून देते.

दशमस्कंध तर भागवताचे हृदय आहे. मानवजीवनाचे अंतिम लक्ष्य आहे रासलीला. ईश्वराला प्राप्त केल्याशिवाय जीवाला शांति मिळू शकत नाही. जीव ईश्वराशी एक झाला की मुक्त झाला.

जर तुम्ही भगवंताशी मैत्री जोडाल तर ते तुम्हाला सुध्दा सुदामाप्रमाणे भगवान करतील.

हा जीव काही साधन करीत नाही, मग त्याला अनुभव कसा होईल?

केवळ चित्तशुध्दीसाठी सत्कर्म करायचे आहे. सत्कर्म करण्यासाठी काही विशेष मुहूर्ताची आवश्यकता नाही. याच क्षणी सत्कर्मांचा आरंभ करा.

गोष्टीत चर्चा-विनिमयांत वेळ घालवू नका. विचारांत वेळ घालवाल तर आचारासाठी वेळ कुठून आणाल?

आजपर्यंत पैशाअडक्याकडे धावत राहिलात. आता थोडे भगवंताच्या मागे तर धावा.

जीवनातून ईश्वराला विसरून जाणे हेच आजकालच्या अशांतीचे कारण आहे. मनुष्य राजा होवो की स्वर्गातला देव, राव होवो की रंक, विद्वान असो की मूर्ख, त्याला शांति नाही. जीव ईश्वराला जाऊन मिळेल तेव्हाच त्याला शांति प्राप्त होईल.

भगवंत स्वतःच आनंदरूप आहेत. त्यांनी आपल्या आनंदासाठी नाही, तर गोपींना आनंद-दान करण्यासाठी रासलीलेचे आयोजन केले होते. गोपींना परमानंद मिळाला. जीव आणि ईश्वराचे मीलन झाले.

परमात्म्याशी मीलन झाल्यानंतर सुध्दा साधना करीतच राहिले पाहिजे. साधना केल्याने अनेक सिध्दि मिळतील आणि परमात्मा सुध्दा. परंतु साधना सोडू नये.



मनावर तर शेवटच्या श्वासापर्यंत देखील विश्वास ठेवू नका. जर भगवान सेवा आणि जप

बंद करू इच्छितील तर त्यांनासुध्दा सांगा, "नाथ! मी आपल्या सगळ्याच आज्ञेचे पालन करीन, परंतु जप-सेवा सोडणार नाही. जीवांत जीव असेपर्यंत सेवेची समाप्ति नाही. सेवा तर अंतिम श्वासापर्यंत करावीच लागेल. शेवटपर्यंत नियमित रूपाने जप-सेवा-कीर्तन करीत राहा.

थोडीशी साधना केल्यावर मनुष्याला सिध्दि मिळते. त्याचे बोलणे खरे होऊ लागते. सिध्दीबरोबरच लोकांची गर्दी आणि प्रसिध्दी येते. असे झाले म्हणजे गर्व-अभिमान येतो आणि अभिमान आणतो पतन. साधूंना पुष्कळ वेळा त्यांचे शिष्य स्तुतिकौतुक करून बिघडवतात. मीपणा आल्याबरोबर साधनेची उपेक्षा होऊ लागते. साधूला वाटते, सेवा तर होत राहील फुरसतीच्या वेळी. आता तर मी सेवकांकडून सेवेचा लाभ घेतो. मी सिध्द आहे तेव्हा मनाने सेवा करीन. असा विचार करणे, असें वागणें चांगले नाही.

माझ्या प्रभूंनी मला आपले करून घेतले आहे. प्रेम वाढत चालले आहे. आम्ही दोघे एकच तर आहोत. परंतु भजन करण्याची सवय सुटत नाही.

ईश्वराचे दर्शन झाल्यानंतर सुध्दा जप-सेवा-ध्यान इत्यादी साधनांचा त्याग करू नका. नाही तर माया येऊन घेरील. काही लोक साध्य प्राप्त झाले म्हणजे साधनाची उपेक्षा करू लागतात. हे चांगले नाही. साधनांत शिथिलता आली तर मन गडबड करू लागेल. बलवान हत्तीसाठी सुध्दा अंकुशाची आवश्यकता असते. मनाचे सुध्दा तसेच आहे. त्याला अंकुशात ठेवायचे साधन भजन आहे.

भक्तींत दीनभाव आवश्यक आहे.

चमत्कार झाल्यावर नमस्कार करणारे तर पुष्कळ आहेत. तुम्हाला तर बिनचमत्काराचाच नमस्कार करायचा आहे. तीच तर भक्ती आहे. भक्तींत श्रध्दा असेल तर अनुभवही मिळेल आणि ज्ञानही मिळेल. आणि तसे झाले म्हणजे भक्ती दृढ होईल.

गोपींना अभिमान झाला. त्या म्हणाल्या, सर्वच विषयांचा त्याग करून आम्ही आपणापाशी आलो आहोत. गोपींमधे अभिमान कुठून आला? अहो, तो तर सूक्ष्म रूपाने त्यांच्या मनांत लपलेलाच होता.

मनुष्याला वाटत असते की तो शुध्द झाला आहे, परंतु सर्वप्रकारे शुद्ध होणे मोठे दुष्कर कार्य आहे. साधकाला तर फारच सावध राहावे लागते. ज्याचा बहुमान केला जातो तो अभिमानी होण्याची शक्यता असते.

श्रीकृष्णांनी गोपींना मान दिला तर त्यांना अभिमानाने घेरून टाकले. गोपी समजू लागल्या की कृष्ण आमच्याकडे आसक्त होतेच, पण आसक्त नसल्याचें नाटक करीत होते. अभिमानामुळे गोपींच्या मनात असा लौकिक भाव जागृत झाला आणि तत्काळ कृष्ण अदृश्य झाले.

भगवंताच्या अंतर्धान होण्याचा काय अर्थ आहे? तसे तर भगवान सर्वत्र सर्वव्यापी आहेत. ते अदृश्य होऊच शकत नाहीत. तर अंतर्धान होण्याचा अर्थ हा की जीवाच्या डोक्यावर अभिमानाचा पडदा आल्याने प्रभू दिसेनासे झाले.

गोपी-जीव अभिमानाने फुलून गेला तर श्रीकृष्ण अदृश्य होऊन गेले.

व्रजवासी असे समजतात की त्यावेळी कृष्णाने पीतांबराचे पांघरूण (घुंघट) ओढून घेतले होते. म्हणून सख्यांना भ्रम झाला की ती (कृष्ण) पण एक सखीच आहे.

परमात्मा सर्वव्यापक आहे. गोपी त्यांना बाहेर शोधीत आहेत पण रासमंडळीत नाही. भगवंतांना तर आपल्या हृदयांतच शोधायचे आहे. जीवाला अज्ञानामुळे काही सुचतच नाही.

एकदा विद्याभ्यासासाठी निघालेल्या दहा पंडितांना एक नदी पार करायची होती. समोरच्या किनाऱ्यावर पोचल्यावर एका पंडिताला वाटले की त्यांच्यापैकी एक त्या किनारीं तरी राहिला किंवा बुडून तरी गेला आहे. त्याने मोजणी केली तर नऊच निघाले. सगळ्यांनीच पाळीपाळीने मोजले. पण नऊच पंडित मोजले गेले. [आता असे होण्याचे कारण असे होते की मोजणारा आपल्या स्वतःलाच मोजायचे विसरत होता.]

आता हे निश्चित झाले की एक वाहून गेला आहे. सगळे रडू लागले.

तिकडून एक महात्मा चालले होते. त्यांनी पंडितांना रडण्याचे कारण विचारले. पंडितांनी कारण सांगितल्यावर महात्म्याने मोजून दाखविले की ते तर दहाचे दहा आहेत.

अज्ञानामुळे जीव स्वतःला विसरून जात होता. ज्ञान्यांनी खरी स्थिति सांगितली. अज्ञानामुळे जो नाही तो दिसतो आणि जो आहे तो दिसत नाही.

परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यावर सुध्दा सावध राहा. कित्येक वेळा ज्ञानी देखील साक्षात्कार झाल्यावर आपल्या स्वतःवर नियंत्रण ठेवू शकत नाही. कारण सिद्धी प्रसिद्धी देते. आणि प्रसिद्धी अभिमान. असे झाल्यावर साधना खंडित होते. आणि परिणामी जीव ईश्वरापासून विन्मुख होतो.

परमात्म्याची अनुभूति झाल्यावर सुध्दा जर जीव साधना सोडील तर त्याचे पतनच होते.

आता पुंडलीकचरित्र पाहू.

पुंडलिकाची आई-बापांविषयींची अविराम अतिशय भक्ती पाहून द्वारकाधीश त्याला भेटण्यासाठी पंढरपूरला आले.

आईवडील कुष्ठ रोगाने त्रस्त होते आणि चिडचिड्या स्वभावाचे झाले होते. मुलगा मनोभावे सेवा करीत असे. तरी पण ते त्याचा अपमान करीत. तरीही पुंडलीक मोठ्या नम्रभावाने सेवा करीत असे.

भगवंतानी अंगणांत येऊन पुंडलिकाला हाक मारली. पुंडलिका! तुझ्या मातापित्यांच्या तू केलेल्या सेवेने मी प्रसन्न होऊन तुला दर्शन द्यायला आलो आहे.

पुंडलीक – भगवंता! या वेळी तर मी त्यांच्या सेवेत व्यग्र आहे. म्हणून काही वेळ आपण बाहेरच प्रतीक्षा करा. मी सेवेतून निवृत्त होतांच आपल्या भेटीला येईन.

पुंडलीक समजत आहे की आईबाप तर भगवंतापेक्षा सुध्दा जास्त महत्त्वाचे आहेत. त्यांची सेवा केली म्हणूनच तर भगवंत आपल्याला भेटायला आले. जेव्हा साधन हातात आहे तेव्हा साध्य कुठे पळून जाईल?

सुखसंपत्ति मिळाल्यावर सुध्दा भगवंताचे भजन सोडू नका.

खरा भक्तच तोच असतो की जो भगवंताला सुध्दा प्रतीक्षा करायला लावतो.

भगवंताला विसावा मिळावा म्हणून पुंडलिकाने एक वीट फेकली आणि तिच्यावर उभे राहायला सांगितले. पुंडलिकाला बाहेर यायला वेळ लागला. भगवंत वाट पाहता पाहता थकले व कमरेवर हात ठेवून उभे राहिले.

भगवंताच्या त्या मुद्रेचा अर्थ असा की त्यांच्या चरणांचा आश्रय घेणाऱ्यासाठी संसारसागर कमरेइतकाच खोल आहे. नाही तर आजपर्यंत न जाणो किती जीव यांत बुडून गेले आहेत.

मातापित्यांची सेवा पूर्ण केल्यानंतर पुंडलीक बाहेर येऊन भगवंताला भेटला. त्याला प्रत्यक्ष परमात्मा भेटले तरी त्याने साधन सोडले नाही. जर साधन सुटले तर प्रभु अंतर्धान होऊन जातील.

रासाच्या वेळी गोपींच्या मनांत अभिमान आला म्हणून श्रीकृष्ण अदृश्य झाले.

अभिमान जागृत झाल्याबरोबर साधन उपेक्षित होते.

गोपींना वाटू लागले की तसे तर श्रीकृष्ण आमच्या सौंदर्यावर लुब्ध होतेच, पण अनासक्त असल्याचे दाखवीत होते. भगवान अंतर्धान झाले. ते तिथेच होते परंतु गोपी त्यांना पाहू शकत नव्हत्या. भगवंत तर त्यांच्या हृदयांत सामावलेले होते, परंतु गोपी त्यांना बाहेर शोधीत होत्या म्हणून दिसत नव्हते.

ईश्वराला जाण्या-येण्याच्या क्रियेचे बंधन नाही. कारण ते तर सर्वव्यापी आहेत.

तसा ईश्वर तुमच्या निकट येतो तर खरा, परंतु वासनेच्या आच्छादनामुळे दिसत नाही. ईश्वर सगळ्यांच्याच हृदयांत आहे. मग सर्व त्याला का पाहू शकत नाहीत ?

जीव जोपर्यंत भगवंताकडे पाहात नाही तोपर्यंत त्याचेही ते ऐकत नाहीत. भगवान सगळ्याच जीवांना म्हणतात– मी तर तुम्हाला आपले करायला तयार आहे पण तुम्ही स्वतःहून माझ्याकडे या.

जीव सुध्दा गोपींसारखाच आनंद बाहेर शोधत असतो, आंत नाही. म्हणूनच तर भगवंत त्याला दिसत नाहीत.

जर स्त्री, वस्त्र, धन इत्यादी तुम्हाला आनंद देत असतील तर त्यांच्या वियोगाच्या वेळी दुःख पण होईल. तुमचा आनंद स्वाधीन आसायला पाहिजे, पराधीन नाही. पराधीन आनंद दुःखदायक असतो.

दृष्टी अंतर्मुख करा आणि परमात्म्याला आपल्या हृदयांत पहा.

एकमात्र भगवंत आनंदरूप आहे. हे सगळे विश्व दुःखरूप आहे. गीतेत देखील या संसाराला अनित्यम्, असुखम् म्हटले आहे.

वियोगाचा अर्थ विशिष्ट योग असा आहे. बहिरंगात वियोग आणि अंतरंगांत संयोग.

गोपीचे मन श्रीकृष्णांत आहे. वृत्ति कृष्णाकार असल्याने अंतरंगांत संयोग आणि बहिरंगांत वियोग आहे. सख्या वनांतील प्रत्येक पानापानाला आणि फुलाफुलाला श्रीकृष्णाचा पत्ता विचारीत आहेत. कुठे माझ्या श्यामसुंदराला पाहिले नाही का ? कोणी तरी सांगा हो !

वियोगामुळे गोपी इतक्या बावळ्या झालेल्या आहेत की त्यांच्या हेही लक्षांत राहिले नाही की फुलें-पाने-झाडे तर जड आहेत.-बोलू शकत नाहीत. व्याकुळ गोपी श्रीकृष्णाच्या लीलांचे अनुसरण करीत राहिल्या आहेत.

जीवांचे प्रभुमय होऊन जाणेच तर ध्यान आणि भक्तीची पराकाष्ठा आहे आणि फळ देखील. ध्यान करता करता संसाराचे विस्मरण होते. ध्यानांत तन्मयता झाल्यावर माझेपण मिटून जाते आणि ध्याता, ध्यान आणि ध्येय एक होत असतात. हीच तर आहे मुक्ती !

प्रथम गोपी स्वतःला कृष्णाच्या दासी म्हणत होत्या. प्रथम दासोऽहम् होते, आता कृष्णोऽहम् झाले आहे.

ध्यानात तन्मयता झाल्यावर गोपी सगळ्या वस्तूंत आता कृष्णदर्शन करू लागल्या.

सगळ्याच देवांनी वाहनाकरता पशूंना कां निवडले आहे ? पशुपक्ष्यात सुध्दा मनुष्याने ईश्वरत्वाचा अनुभव करावा याचसाठी.

गोपी कृष्णाचे चिंतन करता करता म्हणत आहेत, 'अग, मीच तर आहे कृष्ण !'

प्रथम तर सर्वातच ईश्वराचा भाव जागृत केला जावा. मी सेवक, सचराचररूप स्वामी भगवान ! सगळ्यांमधे ईश्वराचा अनुभव करणारा स्वतः सुध्दा ईश्वरमय होतो.

त्या गोपीचे मुखसुध्दा श्रीकृष्णाच्या मुखासारखे तेजस्वी झाले. जीव ज्या व्यक्तींचे सतत ध्यान करतो त्याची छायाकृति त्या व्यक्तीच्या मुखावर झळकू लागते.

एका गोपीने बालकृष्णाचे रूप घेऊन कालिया नागाचे दमन करू इच्छिले. दुसरी गोपी नाग झाली. तर पहिली गोपी त्या नाग झालेल्या गोपीच्या डोक्यावर चढली आणि म्हणू लागली, 'दुष्ट कालिया, चालता हो इथून. मी दुष्टांचे दमन करण्यासाठीच जन्म घेतला आहे.'

ही तर रासाची कथा आहे. साधारण वक्ता किंवा श्रोता ह्या कथेचा अधिकारी नाही.

शुकदेवांच्या केवळ दर्शनानेच स्वर्गीच्या अप्सरांचा काम नष्ट झाला होता. शुकदेवांनी अप्सरांमधे स्त्रीत्वाचे नाही, तर ब्रह्माचेच दर्शन केले होते. ब्रह्मज्ञानी तर सुलभ असू शकतो, पण ब्रह्मदृष्टी ठेवणारा महात्मा मिळणे तर अशक्यप्रायच आहे. ज्यांच्या दृष्टीतून काम नष्ट झाला आहे आणि ज्याचे देहभान हरपले आहे, लंगोटी देखील सुटून गेली आहे असे महायोगी शुकदेव या कथेचे वक्ते आहेत.

गोपी भगवद्रूप होऊन गेल्या. राधा आणि कृष्ण एकच होत. ती दोघे अभिन्न आहेत. सूर्य आणि त्याची प्रभा याप्रमाणे कृष्ण आणि राधा एकच होत. ती दोघे कधी विभक्त होऊच शकत नाहीत. हा विरह तर लीलामात्र होता.

अंतर्धान होताना श्रीकृष्णाने राधेला सुध्दा आपल्याबरोबर घेतले. चालता चालता राधा थकली. ती कृष्णाला म्हणाली, माझ्याच्याने आता चालवत नाही. जर तुम्हाला गरज असली तर मला आपल्या खांद्यावर उचलून घ्या. कृष्णाने तिला आपल्या खांद्यावर बसविले आणि स्वतः अंतर्धान झाले. राधा एका झाडाची फांदी धरून लटकून राहिली. प्रभूंनी राधेचा अभिमान घालवण्यासाठी असे केले.

तशी राधा अभिमानी होऊ शकत नाही. ही तर लीला आहे. अभिमानी तर जीवच झालेला आहे.

अभिमान आल्याबरोबर जीव त्या राधेप्रमाणे मधेच लटकून राहतो. मनुष्याचा शत्रु अभिमान आपल्याबरोबर कैक दुर्गुण घेऊन येत असतो. अभिमानामुळे जीव दुःखी होतो. लीनता येणे सोपें नाही. जेव्हा मनुष्य अहंपणांत असतो तेव्हा कर्कश शब्द त्याला भडकवितात. ईश्वराच्याच चरणी रहा. त्यामुळे मनांत कोणताही विकार उत्पन्न होणार नाही.

राधेचा श्रीकृष्णाने फार आदर केला. आपल्याबरोबर घेऊन गेले पण राधेला अभिमान झाला.

बहुमान झाल्यावर जीव फार अभिमानी होतो. मान, धन मिळाल्यावर तर आणखीच नम्र झाले पाहिजे.

कृष्ण अंतर्धान पावले तेव्हा राधेला पश्चात्ताप होऊन ती रडू लागली. ती प्रार्थना करू लागली, हे नाथ! अहो प्रियकर! मला दर्शन द्या.

राधा, कृष्णाला हाका मारता मारता, पश्चात्ताप करता करता, रडता रडता, अचेतनासारखी होऊन गेली. कृष्णाला शोधीत काही गोपी इकडे आल्या तर त्यांना राधा अचेतन झालेली दिसली.

ज्ञानमार्गात ध्यान प्रधान आहे. भक्तीमार्गात भगवंताचे गुणगान, भजन-कीर्तन प्रधान आहे. आपल्या दोषांचे निवेदन करीत प्रभूचे गुणगान कराल तर त्यांना तुमची दया येईल.

माधव तर गानप्रिय आहे.

एकदा वैष्णवांनी पाहिले की जगन्नाथाची नवी वस्त्रे रोज फाटून जातात. भक्तांनी भगवंतांना कारण विचारले. जगन्नाथांनी सांगितले की, गीतगोविंदाचे गान करीत एक कन्या वनांत फिरत आहे. तिचे गीत ऐकण्याकरता मी वनातून तिच्या मागे धावत रखडत फिरत असतो. म्हणून वनातील झाडीत

माझे कपडे फाटून जातात.

भगवंतानी भागवतांत सांगितले आहे – मी आपल्या निष्काम भक्तांच्या मागे मागे चालत राहतो जेणेकरून त्यांचे चरणरज उडत उडत माझ्यावर येत राहावे.

**२३. गोपीगीत, भावानुवाद:**

विरहाने व्याकुळ झालेल्या गोपी कृष्णाचे गुणगान करू लागल्या. हेच आहे गोपीगीत.

गोपींना वाटले की जर यमुनेच्या काठी जाऊन स्तुति केली तर श्रीकृष्ण अवश्य प्रगट होतील.

गोपी-गीताचा पाठ तर पुष्कळ लोक करतात, परंतु हा पाठ गोपीभावाने केला पाहिजे.

ईश्वराच्या भेटीसाठी व्याकुळ झालेल्या जीवाला या जगांत कोठेच चैन पडू शकत नाही. जर अत्यंत आर्त स्वराने भगवंताला हाक माराल तरच ते येऊन भेटतील. अत्यंत आर्ततेने गोपीगीत गाइले पाहिजे.

दिवसातून नेहमी तीन वेळा स्तुति करा. गोविंद दामोदर स्तोत्रांत म्हटले आहे. सुखावसाने, दुःखावसाने आणि देहावसाने अशी तीन वेळा स्तुति करा.

दुःखाच्या वेळी असा विचार करा की दुःखाचे किती का पहाड असेनात तरीपण भगवंतांनी तुमच्या पापाच्या मानाने कमीच दंड दिला आहे.

गोपीगीताचा छंद 'इंदिरा' आहे. इन्दिरा अर्थात लक्ष्मी. गोपी लक्ष्मी आहेत म्हणून गोपीगीत इन्दिरा छंदांत निबध्द आहे.

सख्या परमात्म्याची स्तुति करीत आहेत, 'कन्हैया, तुझ्यामुळेच तर आपल्या वृंदावनाची शोभा वाढली आहे. पहिले इथे सौंदर्य नव्हते. नाथ! तुझ्याच आगमनामुळे व्रजभूमी शोभायमान झालेली आहे!'

मानवशरीरच तर व्रज आहे. जर या शरीरव्रजांत प्रभु प्रगट होतील तर त्याची शोभा आणखी वाढेल, त्याचे मूल्य वाढेल, त्याचा जयजयकार होईल.

भगवंताच्या जवळ घेऊन जाण्यांत आम्हाला जे साहाय्य करते तेच हे शरीर व्रज आहे.

या शरीराची शोभा वस्त्राभूषणाने नाही, भगवत्‌भक्तीनेच वाढते.

नाथ! तुमच्याच मुळे माझ्या व्रजशरीराची शोभा आहे. आपण प्रगट झाल्यामुळेच आमची शोभा वाढू शकली आहे.

शरीराचे सिंहासन जेव्हा काम, क्रोध, मद, मोह, लोभ, मत्सरापासून मुक्त होईल तेव्हाच परमात्मा धावत येतील. तुकाराम आणि मीराबाईचा आजही जयजयकार होतो. कारण त्यांच्या शरीरव्रजामध्ये काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर यांनी पाऊलही ठेवले नव्हते. त्यांनी आपल्या शरीर आणि हृदयाला व्रज बनवून टाकले होते.

मोठमोठ्या सम्राटांना जग विसरून जाईल, परंतु शंकराचार्य, वल्लभाचार्य, मीराबाई, तुकाराम, नरसिंह मेहता यांना कोण विसरू शकेल? ह्या महापुरुषांनी आपल्या हृदयगोकुळांत श्रीकृष्णाला अढळ स्थान दिले होते. जगद्गुरू शंकराचार्यांसारखे ज्ञानी आजपर्यंत कोणी झाले नाही. तरीही ते आपल्या हृदयांत श्रीकृष्णाला नेहमी ठेवीत असत. कान्हा! आम्ही तर केवळ तुझ्यासाठीच जगत आहोत. तुझ्याविना काळ आम्हाला त्रास देतो (सतावतो).

नाथ! तशी तर आम्हाला कशाचीच गरज नाही, पण शरणागताचे रक्षण करणे तुझे कर्तव्य नाही का? तुला तशी गरज भासत नाही का?

शरणागत जीवाची उपेक्षा करू नकोस. प्रत्येक ठिकाणी प्रत्येकात आम्ही तुलाच शोधीत असतो. भक्त सर्वांमध्ये एका ईश्वरालाच शोधत असतो. सगळ्यातच जो ईश्वराला शोधील तोच गोपी.

हे नाथ! आम्ही आपल्या दासी आहोत, आपल्याच आहोत. आम्हाला दर्शन देऊन कृपा करा.

हे नाथ! आपण अजामीळासारख्या पाप्यावरसुध्दा कृपा केली होती, तर मग काय आमच्यावर करणार नाही? आम्हाला दर्शन देणार नाही काय?

हे नाथ! आपले चिंतन करीत या अंधाऱ्या रात्री आम्ही वनात धडपडत भटकत राहिलो आहोत. आमची उपेक्षा करणे आपल्याला शोभा देत नाही.

हे नाथ! आम्ही आणखी तर काहीच मागत नाही. आम्ही तर आपल्या निरपेक्ष दासी आहोत. आमची भक्ती निष्कामभक्ती आहे.

या गोपींच्या भाषणांत आत्मतिरस्कार नाही. दीनता आहे. आपल्या नेत्रांनी आम्ही विध्द झालो आहोत. नेत्रबाणांनी केलेला हा वधच तर आहे!

आम्हाला आतां कळले की आपण दयाळू नाही. निष्ठुर आहात. यशोदा भोळी आहे. तिचा एकही सद्गुण आपणांत आलेला नाही. म्हणून आपण आम्हाला तळमळत ठेवत आहात यांत काहीच आश्चर्य नाही.

कृष्णा, तू लोणीचोर आहेस. आमची मने सुध्दा तू चोरली आहेस आणि आता आम्हाला दूर करू इच्छित आहेस!

कन्हैया– मी तर चोर आहे. मग मला का हाका मारता आहात? चोराशी कोणी मैत्री करतात का?

गोपी– चोरी करण्यासाठीच तर आम्ही तुला हाक मारीत आहोत. तू चोरी तर करतोसच. तुझे डोळेही चोर आहेत.

विषमय यमुनाजलापासून, अजगररूपी अघासुरापासून, इन्द्राच्या मुसळधार पावसापासून, विजेपासून, वावटळीपासून, दावानलापासून, वृषभासुरापासून, व्योमासुरापासून इत्यादी अनेकांच्या आघातापासून, भयापासून आपण आमचे वारंवार रक्षण केले आहे.

तर मग कन्हैया! आज तू का रे निष्ठुर झाला आहेस? जर आम्हाला मारायचेच होते तर त्या आपत्तींपासून आमचे रक्षण तरी कशाला केलेस?

कृष्णा, आमचे रक्षण करण्याचे उपकार पुनः एकवार नाही का करणार?

तू कालियानाग, अघासुर, बकासुर इत्यादी राक्षसांपासून आमचे रक्षण केले आहेस आणि आज या विरहासुराने आम्हाला मारायला निघाला आहेस! त्या कालिया नागाच्या विषापेक्षा सुध्दा हे विरह-विष अधिक दाहक आहे. आता तर सहन होत नाही. दर्शन दे, दर्शन दे रे कन्हैया!

जर आम्हाला मारायचेच होते तर आधी प्रेमदान तरी का केलेस?

जर मला दर्शन दिले नाहीस तर मी लोकांना सांगेन की तू नंद-यशोदेचा पुत्र नाहीस. मला ठाऊक आहे तू कोण आहेस ते!

कन्हैया– जरा मला तरी सांग, मी कोण आहे ते.

सख्या ज्ञानभक्त आहेत, ज्ञानी आहेत म्हणून परमात्म्याचे स्वरूप चांगल्या प्रकारे जाणतात. म्हणून त्या म्हणू लागल्या– आम्ही तूं कोण आहेस तें जाणतो आणि जाणूनच प्रेम करीत आहोत.

आपल्या सर्वांच्याच हृदयात अंतर्यामीच्या रूपाने नारायण विराजमान आहेत. सगळ्या

शरीरधारींच्या ह्रदयांत साक्षीभूत बसलेले आहेत.

कन्हैया – काय इच्छा आहे तुम्हा सर्वांची ?

गोपी – हे कांत! अहो प्रियकरा! आपला वरदहस्त इतका शक्तिवान आहे की तो आमचा अभिमान दूर करू शकतो. आपण आपला मंगलमय हात आमच्या सर्वांच्या डोक्यावर ठेवावा.

श्रीकृष्ण – इतक्या सगळ्या गोपींमधे कोणाकोणाच्या डोक्यावर हात ठेवू? वेळही खूप लागेल, म्हणून मी प्रथम माझ्या दुसऱ्या भक्तांची कामे आटोपून घेतो, मग तुम्हा सर्वांना स्पर्शलाभ देईन.

गोपी – नाही कान्ह्या, त्यांचे काम नंतर कर. प्रथम आमच्यावरच कृपा कर. आम्ही तुझ्या आहोत, तू आमचा आहेस. तुझ्यावर सर्वांच्या आधी आमचाच अधिकार आहे. तू व्रजजनांचा आहेस. व्रजवासींच्या दुःखाचा नाशकर्ता आहेस. इतर भक्त तर व्रजवासी नाहीत. कान्ह्या, आपण सर्व एकाच गावाचे निवासी आहोत. म्हणून तुझ्यावर पहिला हक्क आमचा आहे. तुझा अवतारच तर आम्हा व्रजवासींच्या उद्धारासाठी झालेला आहे.

व्रजभक्त कोणाला म्हणावे? फक्त गोकुळ, वृंदावन, मथुरा यांतच राहणाऱ्यांना कां? नाही, असे नाही म्हणता येत. जो निःसाधन भक्त आहे तोच व्रजभक्त आहे. साधन करीत राहून, साधनाने कधीच तृप्त न होणें हीच निःसाधनता होय. अशी भक्ती करणारा प्रत्येकजण व्रजवासी आहे. आपले पाप पर्वताएवढे आहे आणि साधन तर अल्प. सगळीच पापें कशी जळू शकतील? भगवत्कृपेनेच पापे जळतील, अशी नम्रता आली पाहिजे. सर्वच प्रकारची साधने करीत राहून सुद्धा आपल्याला निःसाधन समजणारा जीवच व्रजभक्त आहे. दीन ह्रदयीच व्रजभक्त आहे.

कन्हैया, तुझे इतर भक्त कांही ना कांही साधन करीतच असतील. ते तर योगी, ज्ञानी कर्मनिष्ठ असतील. त्यांना तर कोणत्या ना कोणत्या साधनाचा आधार असेलच आणि आम्ही तर निराधार आहोत. आम्ही तर तुझ्या एकट्याच्याच आश्रयावर आहोत. आम्ही तर गांवांतील न शिकलेल्या गोपी आहोत. तूच आमचा एकमेव आधार आहेस.

जीव निराधार होणे पसंत करतो म्हणून भगवंत त्याला मिळत नाहीत. गोपी तर ध्यानादि सर्व कांही करीत राहूनही समजतात कीं त्या कांहीच करू शकत नाहीत. असा भाव ठेवणाराच व्रजभक्त आहे. साधनाचा अभिमान ठेवणारा व्रजवासी होऊच शकत नाही.

कन्हैया, आम्हाला तर हें देखील माहीत नाही कीं तुझें ध्यान कसें करावे?

आम्ही गावंढळ, न शिकलेल्या अबला तुला शरण आलो आहोत. तुझ्यावर पहिला अधिकार आमचा आहे.

सर्व प्रकारची साधना केल्यानंतर सुद्धा ज्याला साधनेचा अभिमान नाही तोच निःसाधन भक्त.

सत्कर्म आणि साधनेने अभिमान वाढतो. म्हणून सत्कर्म आणि साधनेच्या पूर्णाहुतीच्या वेळीं "मंत्रहीनं क्रियाहीनं" हा मंत्र म्हटला जातो.

साधना करा, पण ह्रदयाने नम्र व्हा. उद्धट जीव कृष्णाला पसंत नाही.

मी तर निरभिमानी आहे असे समजणे आणि म्हणणें सुद्धा अभिमानच आहे. जेव्हां ह्रदय नम्र होते तेव्हां प्रत्येक ठिकाणी देवाचें दर्शन होत असते.

तुझा अवतार व्रजभक्तांसाठीच आहे. म्हणून तुझें परमसुंदर सावळे मुखकमळ आम्हाला दाखव.

माझ्या दर्शनानंतर तुमची कोणती इच्छा शिल्लक राहील?

अंतरंगांतील संयोग आणि बहिरंगांतील वियोगाचे हे वर्णन आहे. म्हणून श्रीकृष्ण प्रत्यक्ष संभाषण

करीत आहेत असा भास होत आहे.

गोपी – हे कामविनाशका! आमच्या सर्वच कामना तू नष्ट करू शकतोस.

आमच्या कामाचा नाश कर. गोपी कामसुखाची नाही, तर कामनाशाची इच्छा करीत आहेत.

संत आणि गुरूंच्या हातांत कामनाशाची शक्ति असते.

आपला हात आमच्या मस्तकावर ठेवताक्षणीच आमच्या बुद्धींतील कामवासना नष्ट होऊन जाईल. आपले चरण आमच्या हृदय आणि मस्तकावर ठेवा.

कृष्ण – माझें चरण काय इतके सुलभ आहेत कीं वाटेल त्याच्या हृदयावर ठेवू ?

गोपी – तुझे चरण गाईंसाठी सुलभ आहेत तर मग आम्हाला का लाभ मिळू शकणार नाही ? आम्ही तर गाईंपेक्षा सुद्धा दीन होऊन आलेल्या आहोत. तुझे चरण तर तृणचरानुग आहेत. गाईंच्यासाठी तुझे चरण सुलभ आहेत. कारण कीं तुम्ही दोघे एक दुसऱ्याच्या आगेमागे चालत असता. काय गाईंच्या साठी तुझे चरण सुलभ आणि आमच्यासाठीच तुझे चरण दुर्लभ आहेत ?

भगवान – मला तुम्ही गोपाळ समजता काय ?

गोपी – नाही! नाही! तुम्ही तर श्रीनिकेतन आहात. तुमचे चरण तर लक्ष्मीचें निवासस्थानरूप आहेत. तुमचे चरण तर लक्ष्मी नेहमी आपल्या मांडीवर ठेवून सेवा करीत असते.

श्रीकृष्ण – मी माझे चरण तुमच्या हृदयावर ठेवायला तयार आहे, पण एक भयही वाटते मला. अभिमानामुळे विषाक्त झालेल्या तुमच्या हृदयावर मी आपले चरण ठेवले आणि त्याचा परिणाम माझ्या चरणावरही झाला तर ?

गोपी – आपण तर आमच्या भावनेचे हसे करीत आहांत. आपण तर विषारी कालिया नागाच्या मस्तकावर आरूढ होऊन नर्तन करणारे आहांत. कालिया नागाच्या विषाचा तुमच्यावर कांही परिणाम झाला नाही तर आमच्या हृदयाचें विष आपणाला काय करू शकेल? आणि आमची हृदयें विषारी असतील तर तुमचे चरण त्यावर अमृतसिंचन करतील. तुमचे चरण तर सर्वच नमस्कार करणाऱ्यांचे पाप नाहीसे करणारे आहेत.

गोपी विनंति करतात – हे नाथ! तुमच्या अधरामृताचें पान करवून आम्हाला जीवनदान द्या.

श्रीकृष्ण – तुम्ही जिवंत तर आहांत तरीही कसले जीवनदान मागत आहांत? तुमच्या प्रेमांत कांही तरी कपटभाव आहे. मी ऐकलें आहे कीं दशरथांनी रामाच्या वियोगामुळे प्राणत्याग केला होता.

दशरथाचे प्रेम अंतःकरणापासूनचे होते, म्हणून रामाचा विरह झाल्याबरोबर त्यांनी प्राणत्याग केला होता. हे आहे खरे प्रेम!

माझ्या वियोगात तुम्ही जिवंत आहांत, माझ्याशी बोलत आहांत, तुमचे प्राण गेले नाहीत म्हणून मला वाटत आहे की तुमचे प्रेम खरे नाही. जर तुमचे प्रेम खरे असते तर तुम्ही दशरथाप्रमाणे प्राणत्याग केला असता.

गोपी – काय म्हणत आहांत तुम्ही ? आमचे सर्वांचे प्राण जातच होते; परंतु तुझ्या कथामृतपानाच्या लाभाने आंतापर्यंत थांबले आहोत. तुमचे कथामृत आणि नामामृत यांनी प्राण रोखून ठेवले आहेत. तुम्ही आम्हाला भेटण्याचे वचन दिले होते. ते वचन पूर्ण होण्याच्या आशेने आम्ही जिवंत आहोत. वैष्णव तर जीवनाच्या शेवटच्या श्वासापर्यंत परमात्म्याला भेटण्याच्या आशेवर जगत असतो.

प्रभो! तुमची लीलाकथा तर अमृतस्वरूप आहे. ती केवळ श्रवणमात्रानेच पापाचा नाश करते. तिचे श्रवण मंगल – आनंददायी आहे. यज्ञकथा ऐकून आनंद होत नाही. विरहाकुल जीवासाठी रासलीला

जीवनरूप आहे, जीवनसर्वस्व आहे. मोठमोठ्या ज्ञानी महात्म्यांनी, भक्त कवींनी हिचे गान आणि श्रवण केले आहे. ही कथा सर्वच पाप आणि ताप तर नाहीसे करतेच; आणि केवळ ऐकण्यानेच परमकल्याण देखील करते. ही अतिसुंदर, मधुर आणि शांतिदायक आहे. स्वर्गाचे अमृत तर पुण्य जाळते. पण ही कथा पाप जाळते. जो मनुष्य या लीलाकथेचे गायन करतो तोच या जगात सर्वात मोठा दानी होय.

रामांनी हनुमंताला विचारले होते की जानकी त्यांच्या विरहामधे आपल्या प्राणांचे रक्षण कशी करीत राहिली आहे ?

हनुमंतांनी उत्तर दिले— आपले नाम रात्रंदिवस तिचे रक्षण करीत आहे. आपले ध्यान द्वार आहे, नेत्र तर आपल्या चरणांवरच लक्ष ठेवून आहेत तर मग प्राण जाईल तरी कुठून ? तसे तर विरहामुळे प्राण निघूनच गेले असते, पण बाहेर जायला कोणताच मार्ग तर नाही. जर तुमचे ध्यान आणि नाम सुटले तर प्राण निघूनही जातील. परंतु सीतामाईंचे आपल्यावर इतके प्रेम आहे की आपले ध्यान आणि नाम सुटू शकत नाही; आणि नाम आणि ध्यान बाजूला झाल्याशिवाय प्राण जाऊ शकत नाही. जानकीचे मन, वचन आणि कर्म तिन्ही आपल्याशी संबद्ध आहेत म्हणून त्यांचा प्राण जाऊ शकला नाही.

कृष्णाचे कथामृत विरहावस्थेत देखील प्राण रोखून ठेवते. भगवंताची कथासुद्धा त्यांच्या सहा गुणांनी युक्त आहे. ती मोक्षदा आहे, परमानंदरूप आहे, अमृत आहे, तप्तांचे जीवन आहे. संसारतापापासून पीडितांच्या पीडेचे निवारण करते. ज्ञानीदेखील कथामृताची स्तुति करतात. कथा पाप दूर करणारी आहे. ती वीर्यधर्म-सूचक आहे. श्रवणासाठी कल्याणकारी आहे. कथामृतांत यज्ञधर्म आहे. लक्ष्मीयुक्त आहे. सर्वत्र व्याप्त आहे. भगवंताचे सहा गुण — ऐश्वर्य, वीर्य, यश, ज्ञान, वैराग्य आणि श्री या कथामृतांत आहेत.

वस्त्रदानापेक्षा अन्नदान श्रेष्ठ आहे, परंतु कथादान सर्वश्रेष्ठ आहे. निरपेक्षतेने कथा करणाराच खरा भक्त आहे. ज्ञानदानाने जीवन सुधारते. जीवाला नेहमीकरता शांति मिळते.

कन्हैया ! तुझ्यासाठी तर आम्ही सर्वस्वाचा त्याग केला आहे. नाथा, तुझ्यासाठीच आम्ही लोकलाजसुद्धा सोडून दिली आहे आणि आज तू निष्ठुर झाला आहेस ! आपले चित्त आता क्षणभरसुद्धा इतर वस्तूंमध्ये लागत नाही. म्हणून आम्हांला लवकरच दर्शन देण्याची कृपा कर.

गोपींची कृष्णदर्शनाची लालसा कशी आहे पहा.

डोळ्याला पापण्या देणाऱ्या ब्रह्मदेवावरसुद्धा गोपी रागावत आहेत, कारण ह्या पापण्या हालत राहिल्यामुळे दर्शनांत बाधा येते. पापण्या मिटल्याने एक क्षणपर्यंत आम्ही आपल्या दर्शनापासून वंचित होतो. एका क्षणाचा विरहसुद्धा आम्हाला असह्य आहे. डोळ्यांना पापण्या बनविणारा ब्रह्मदेव जड आहे. जर त्याने पापण्या केल्याच नसत्या तर आम्ही आपले दर्शन निरंतर घेऊ शकलो असतो.

नाथ ! तुमच्या दर्शनासाठी वाट पाहतच ठेवणार ना आम्हाला ?

तुला शोधता शोधता माझे डोळेसुद्धा थकून गेले, हरले. जेव्हापासून तू गेला आहेस तेव्हापासून आम्हाला शांती नाही. दुःखहर्ता, सुखकर्ता असा तू आम्हाला केव्हा भेटशील ? केव्हा दर्शन देशील ?

**२४. आर्त गोपींसमोर प्रभू प्रगट होतात :**

असह्य विरहवेदनांमुळे गोपी रडू लागल्या. नुसत्या गीताने तर काहीच झाले नाही. नुसते गुणगान

नाही, रडणेसुद्धा आवश्यक आहे, गोपी रडू लागल्या आणि परमात्मा प्रगट झाले.

कृष्णदर्शनाच्या इच्छुक गोपी थकून भागून मोठ-मोठ्याने रडू लागल्या. प्रभूसाठी साधन करून थकलेला जीव रडू लागतो तेव्हा दयेने प्रभु प्रगट होतात.

गोपींप्रमाणे तुम्हीसुद्धा रडून रडून प्रभूला प्राप्त करू शकता.

रामकृष्ण परमहंसांनी म्हटले आहे की पत्नी, पुत्र इत्यादींच्या मृत्यूच्या वेळी किंवा पैसा मिळविण्यासाठी लोक अश्रूंच्या नद्या वाहवतात. परंतु ईश्वराचे दर्शन झाले नाही म्हणून दुःखाने भगवंतासाठी अश्रूंचा एक तरी बिंदू गाळणारे किती आहेत ?

आपल्या अनुभवांचे वर्णन करून त्यांनी म्हटले आहे– संध्याकाळच्या वेळीसुद्धा मला आईचे दर्शन झाले नाही तर मला रडू येत असे. मी रडता रडता जमिनीवर पडून जात असे. तर शेवटी आईचे दर्शन झाले.

दर्शनप्राप्तीसाठी अत्यंत व्याकुळतेने डोळ्यांतून अश्रुधारा वाहाव्यात तेव्हा ते अवश्य दर्शन देतील.

गोपींचे आक्रंदन कृष्णाकडून पाहवले नाही. गोपी अभिमानरहित दीन होऊन रडत होत्या, म्हणून कृष्ण प्रगट झाले. भक्त जेव्हा भगवंतासाठी आक्रंदन करतो तेव्हा ते प्रगट होतात.

तुम्ही दीनतेने रडून रडून हाका माराल तर भगवान प्रगट होतील आणि अभयदान देतील.

भगवंतांनी गोपींना वचन दिले की मी तुम्हाला सोडून कुठेच जाणार नाही.

दशमस्कंधाच्या एकविसाव्या अध्यायाला गोपीगीत म्हणतात. यात निरनिराळ्या एकोणीस गोपींनी गीत गाईले आहे. या गोपींचे प्रकार वल्लभाचार्य महाप्रभूंनी सांगितले आहेत. पहिला श्लोक म्हणणारी गोपी सात्त्विक राजसी होती म्हणून तिने प्रभूंची प्रशंसा केली आहे. दुसरा श्लोक गाणारी गोपी सात्त्विक तामसी होती म्हणून ती श्रीकृष्णाला रागावून बोलली आहे. एक श्लोक तामस गोपीने म्हटला आहे तिने कृष्णाला निष्ठुर म्हटले, सात्त्विक गोपीने भगवंताचे उपकार स्मरण केले.

चौथी गोपी श्रुतिरूपा निर्गुण होती म्हणून ती म्हणाली– आपण तर समस्त देहधाऱ्यांच्या हृदयांत वसणारे साक्षी आहात, अंतर्यामी आहांत.

पाचव्या श्लोकात अनन्यपूर्वा सात्त्विक गोपीने भगवंताची कृपा मागितली. आपला हात आमच्या मस्तकावर ठेवा अशी प्रार्थना केली.

सहाव्या श्लोकात अनन्यपूर्वा सात्त्विक तामसी गोपीने कृष्णावर आपला अधिकार सांगून धृष्टतापूर्वक प्रार्थना केली.

भगवंत साधन-संपत्तीने संतुष्ट आणि प्रसन्न होत नाहीत. भक्तांची दीनता हेच एकमात्र साधन आहे की जे त्यांना प्रसन्न करू शकते.

गान आणि प्रलाप निष्फळ झाले तेव्हा गोपींमध्ये दीनभाव जागृत झाला आणि त्या रडू लागल्या.

गोपीगीत ऐकून श्रीकृष्ण प्रत्यक्ष उपस्थित झाले होते. म्हणून वैष्णव लोक या गोपीगीताचा पाठ करीत असतात. परंतु काही संप्रदायानुसार भगवंताचे प्रत्यक्ष दर्शन झाल्यावर गोपीगीताचे गान निषिद्ध आहे. गोपीगीत विरहगीत आहे, मीलनगीत नाही.

गोपींनी कृष्णाला कपटी म्हटले होते. आम्ही असे म्हणता कामा नये.

भगवंताला दया आली नाही आणि प्रगट झाले नाहीत त्यामुळे भगवत्विरहामध्ये प्राण कासावीस होऊ लागला. लोकलज्जेचा त्याग करून गोपी रडत रडत हाका मारू लागल्या. "हे गोविंद ! हे दामोदर ! हे माधव ! "

परमात्मा संपूर्ण प्रेम इच्छितो. वेडे झाल्याशिवाय परमात्मा भेटत नाही. कामांध कामामागे, लोभी धनाच्या मागे आणि भक्त भगवंताच्या मागे वेडे होत असतात. जोपर्यंत जीव संसारातील जड पदार्थावर प्रेम करीत राहतो तोपर्यंत ईश्वराला दया येत नाही. परमात्म्याला प्रसन्न करण्याचे साधन हेच आहे की जीवाने विरह-व्याकुळतेने भगवंतासाठी एकांतात अश्रू ढाळीत राहावे.

कृष्ण प्रगट झाले आणि सगळ्यांना आनंद झाला.

काही लोक प्रेम करणाऱ्यांवर प्रेम करतात तर काही प्रेम न करणाऱ्यांवरही प्रेम करतात आणि काही असेही आहेत की जे कोणावरच प्रेम करीत नाहीत.

प्रेमदात्यावर प्रेम करणारा स्वार्थी आहे. बालकाने प्रेम केले नाही तरी आईबाप त्याच्यावर प्रेम करतातच.

अवधूत कोटीचे महात्मा सतत ब्रह्माकार वृत्ति ठेवतात म्हणून ते ईश्वराशिवाय आणखी कोणावरच प्रेम करीत नाहीत.

गोपींनी कृष्णाला विचारले– आपण या तीनपैकी कोणत्या प्रकारचे प्रेमी आहांत?

कृष्ण– मी तर या तिन्ही प्रकारांच्या पुढे आहे. तुमचे प्रेम मी जाणतो. माझ्या वियोगामुळे तुम्हाला दुःख तर झाले, पण विशिष्ट योगाचे दान करण्यासाठीच वियोग दिला होता.

संयोगावस्थेपेक्षा विरहावस्थेत प्रेमपात्राशी अधिक तादात्म्य होते. म्हणून वियोगाला एक विशिष्ट प्रकारचा योग म्हटले गेले आहे. या योगाचे दान करण्यासाठीच कृष्ण अदृश्य झाले होते आणि या प्रकारे गोपींना आणखीच निकट आणले गेले. गोपी अशा तल्लीन झाल्या की विरह असतानासुद्धा अंतरंगात संयोग होता.

या वियोगात तुमच्यापेक्षा मलाच अधिक व्यथित व्हावे लागले. तुम्ही सर्व तर एकमेकींचे सांत्वन करीत होत्या. व्याकुळ ललिताचे विशाखा सांत्वन करीत होती, तर विशाखाचे चंद्रावती सांत्वन करीत होती, परंतु इकडे तर मी एकटाच रडत होतो. माझे सांत्वन करणारे तर कोणीच नव्हते.

सख्यांनो, तुम्ही सगळ्या माझ्याच आहात. परंतु तुम्हाला अभिमान झाला होता. हा अभिमान नाहीसा करून तुमचे मन माझ्यांत केंद्रित करण्याच्या हेतूनेच तुम्हाला विरहाग्नींत जाळावे लागले. माझ्याविषयी कुभाव ठेवू नका. देवांचे आयुष्य घेऊनही तुमची सेवा केली तरी तुमच्या प्रेमाचे ऋण फिटणार नाही. आता मी तुम्हाला सोडून कोठेच जाणार नाही.

जीवमात्र गोपी आहे. तो विशुद्ध होऊन नम्रतेने प्रभूच्या जवळ जाईल तर प्रभू अवश्य दर्शन देतील.

मी तर तुमचा जन्मजन्मांतरीचा ऋणी आहे. मी तुमच्या सर्वांच्या ऋणातून कधीच ऋणमुक्त होऊ शकणार नाही.

माझ्या सख्यांनो! तुम्ही माझ्यासाठी घरादाराच्या त्या साखळ्या तोडून टाकल्या आहेत की ज्या योगीजन सुद्धा सहज तोडू शकत नाहीत. आमचे हे मीलन सर्वथा निर्मल आणि निर्दोष आहे. जरी मी अमर जीवन जगून आणि अक्षरदेहाने अनंत कालपर्यंत प्रयत्न केला तरी तुमची सेवा, प्रेम, त्याग यांचे ऋण फेडू म्हणतां फिटणार नाही. तुम्ही आपल्या सौम्य स्वभावानेच मला ऋणमुक्त करू शकता.

भगवंत रामावतारात मारुतीचे ऋणी राहिले आणि कृष्णावतारात गोपींचे.

भगवंताला आपले ऋणी करा. त्यांच्याजवळ काहीच मागितले नाही तर ते ऋणी होतील.

श्रीकृष्ण गोपींचे ऋणी आहेत म्हणूनच तर ते वृंदावन सोडून जाऊ शकत नाहीत.

श्रीकृष्ण रसरूप आहेत. हे मीलन पंचभौतिक शरीराचे नव्हते. कारण तो देह तर वियोगाग्नींत जळून गेला होता. हे तर आत्म्याचे रसात्म्याशी मीलन होते. गोपी ईश्वराला भेटण्यासाठी कासावीस झाल्या होत्या. वियोगात प्राण कासावीस होतात तेव्हा जीव ईश्वराला भेटू शकतो. परमात्म्याशी वियोग हाच मोठा रोग आहे. श्रीकृष्णाचा विरहच कठिणतम दुःख आहे. प्रभूच्या विरहामधे संसारात रममाण होऊन राहण्यासारखे महापाप आणखी कोणते असू शकते? विष्ठेतला किडा विष्ठेंतच आनंदाचा अनुभव करीत असतो. जीवाची देखील हीच दशा आहे. त्याला विषयांतच सुख दिसत असते. जीव भोगी आहे म्हणून दुःखी होतो. जीव जोपर्यंत प्रभुमीलनासाठी व्याकुळ होत नाही तोपर्यंत ईश्वर भेटत नाही.

रासलीलेत अद्वैत आहे.

'योग' चा अर्थ आहे, जीव आणि ईश्वराचा संयोग. रासलीला महायोग आहे.

वियोगाग्नीत गोपींची पंचभौतिक शरीरे जळून गेली. त्या रसरूप प्रभूचे चिंतन करीत होत्या. असे झाल्यावरच प्रभूशी मीलन होऊ शकते. शरीर मलीन. ते जळल्याशिवाय मीलन होत नाही. सतत भजन करीत राहिल्याने भक्तांचे शरीर दिव्य होते आणि त्यांना ईश्वर प्राप्त होऊ शकतो.

या लीलेत प्रेम आहे, मोह नाही. प्रेम अंतरंगात असते, मोह बहिरंगांत. प्रेमाला त्यागाची अपेक्षा आहे. मोहाला उपभोगाची. प्रेम विरहाने पुष्ट होते, मोह संयोगाने. वियोगात प्रियपात्राचे सतत स्मरण होत राहते. वियोग तर विशिष्ट प्रकारचा योग आहे. श्रीकृष्णाने याच विशिष्ट योगाचे दान गोपींना केले होते.

रासलीलेंत लौकिक कामाचार नव्हता. सगळ्यांचीच वये अकरा वर्षांच्या आतील होती, अशा छोट्या मुलांच्या मनांत कामवासना कशी येऊ शकते?

भागवताचे कथाकार श्रीशुकदेव ब्रह्मनिष्ठ महापरमहंस मुनि आहेत; ते लौकिक कामाविषयीं बोलूच शकत नाहीत. भागवताचा श्रोता परीक्षित होता आणि तो मृत्यूच्या द्वारी बसून कथा श्रवण करीत होता. त्याला सुद्धा कामाचाराच्या गोष्टी ऐकण्याचे काही प्रयोजन असू शकत नव्हते. आसन्नमृत्यु व्यक्ति कामाचाराच्या गोष्टी का ऐकील?

रासलीलेत श्रीकृष्णाचे आणि गोपींचे दैहिक मीलन नव्हते. गोपींची पंचभौतिक शरीरे तर आपापल्या घरीच होती. येथे त्यांच्या सूक्ष्म देहाशी मीलन होते, आत्ममीलन होते.

हे राजन्! भगवंताच्या मायेने मोहित असे व्रजवासी गोपाळ, आपल्या पत्नींना आपल्याजवळच आहेत असे समजून, श्रीकृष्णाकडे दोषदृष्टीने पाहात नव्हते, त्यांच्या मनात श्रीकृष्णाविषयी द्वेष उत्पन्न झाला नाही.

या लीलेत गोपींच्या सूक्ष्म, आध्यात्मिक शरीरांचे ईश्वराशी मीलन होते.

सूक्ष्म शरीर सतरा तत्त्वांचे झालेले आहे. प्राण, ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये पांच पाच आहेत आणि मन व बुद्धी मिळून सतरा तत्त्वे झाली. जेव्हा मन मरते तेव्हा सूक्ष्म शरीर देखील मरते आणि भक्तिरस मिळतो. शुकदेवांनी स्पष्टपणे सांगितले आहे की भौतिक देहविलयानंतरच गोपींना रासलीलेचा लाभ मिळाला होता. हे तर जीवाचे परमात्म्याशी मीलन होते.

येथे मन शब्दाचा प्रयोग आहे. शरीर शब्दाचा नाही. श्रीकृष्णांनी ज्यांचे मन हरून घेतले आहे अशा गोपींनाच ह्या रासक्रीडेचा लाभ झाला.

या लीलेचे चिंतन केल्याने कामविकार नष्ट होतो.

व्रजवासी नारींनी भगवंताबरोबर केलेल्या क्रीडेचे जो धीर मनुष्य श्रद्धापूर्वक श्रवण आणि वर्णन करतो त्याला भगवंताची परमभक्ती मिळून हृदयाच्या रोगरूपी कामदेवापासून मुक्ति मिळते.

आरंभीच गोपींनी म्हटले आहे, आम्ही सर्व विषयांचा त्याग करून आलेल्या आहोत. इथपर्यंत की आम्ही आपल्या स्त्रीत्वाचासुद्धा त्याग केला आहे. त्यांनी शेवटी म्हटलेले आहे की आमच्या हृदयांत जर काही मलीन काम शिल्लक असेल तर तो नाहीसा करून टाका. गोपींची कामाविषयीची वचने काही लोकांना खटकतात, पण त्यांची आरंभीची आणि शेवटची वचनेसुद्धा ध्यानात ठेवली पाहिजेत.

रासलीलेचे श्रद्धापूर्वक श्रवण आणि वर्णन केल्याने भगवंताच्या चरणी पराभक्ती प्राप्त होते, आणि लवकरच ती हृदयरोग – कामविकारापासून मुक्ति देते. त्यांचा कामभाव कायमचा नष्ट होतो.

रासलीलेच्या पहिल्या अध्यायात परमात्म्याचे आत्म्याबरोबर रमण आहे. दुसऱ्यात हृदयाबरोबर, तिसऱ्यात वाणी बरोबर मिलन आहे. हे गोपीगीत. चौथ्या अध्यायात प्राणांबरोबर व पांचव्यात बुद्धि बरोबर मिलन आहे. याप्रमाणें सर्वांगाबरोबर प्रभूंचें मिलन आहे.

भागवतकारांना ठाऊक होते की लोकांना अनेक शंका येतील. म्हणून त्यांनी स्पष्टीकरण करून ठेवले आहे. परीक्षित राजाने देखील काही प्रश्न विचारले होते.

परीक्षिताने शुकदेवांना विचारले– गोपी तर श्रीकृष्णाला आपला परमप्रियतम मानीत होत्या. त्यांच्यात ब्रह्मभाव नव्हता. अर्थात् त्या प्राकृत गुणांमध्ये आसक्त होत्या. तर गुणांच्या प्रभावरूप या संसारांतून त्यांची निवृत्ति कशी होऊ शकली ?

शुकदेव – ईश्वराचे चिंतन करता करता जीव स्वतःच ईश्वर होत असतो.

जेथे शिशुपाल द्वेषभावाने प्रभूंचें चिंतन करीत करीत प्राकृत शरीराचा त्याग करून प्रभूंचा पार्षद बनला तेथे गोपींचे कृष्णमय बनून जाणे काही आश्चर्याची गोष्ट नाही.

राजा! रासलीलेत श्रीकृष्णाचे रमण गोपींच्या शरीरांशी नव्हते. त्यांची पंचभौतिक शरीरे तर आपापल्या घरी होती. इथे तर परमात्म्याशी गोपींच्या आधिदैविक आध्यात्मिक स्वरूपाचे मीलन आहे.

शरीर कोठे का असेना, मीलन तर मनाशीच व्हायचे आहे.

शरीर कोठेही असो, आवश्यकता मनाच्या भावनेची आहे. आपण या संबंधात वृत्त आणि अवृत्त नावाच्या दोन ब्राह्मणांचा दृष्टान्त पाहिला (ऐकला) आहे.

तेहेतिसाव्या अध्यायात परीक्षित राजाने एक आणखी प्रश्न विचारला आहे : पूर्ण काम असूनसुद्धा कृष्णाने असे निंदनीय कृत्य का केले ?

शुकदेव – तुझ्या मनांत अशी अमंगळ कल्पना कशी आली ? हे काही स्त्री-पुरुषांचे मीलन नव्हते, जीव आणि ईश्वराचे मीलन होते.

ही रासलीला सहा महिनेपर्यंत चालली होती. सहा-सहा महिने व्रजनारी आपापल्या घरातून बाहेर राहू शकत होत्या का ? यावरूनच सिद्ध होते की हे तर जीवाचे प्रभूशी मीलन होते. परमात्म्याची लीला अगम्य आहे.

ब्रह्माचा ब्रह्माशी विलासच रास होय.

कृष्ण गोपीतच नाही, तर गोपींच्या पतीमध्ये आणि सर्वच देहधाऱ्यांमध्ये आत्मरूपाने विराजमान आहेत. ते तर ईश्वर आहेत, सगळ्यांचेच साक्षी आणि परम पति आहेत.

भगवान श्रीकृष्ण आत्मा आहे, राधा आत्माकार वृत्ति आणि गोपी आत्माभिमुख वृत्ति.

छोटा मुलगा आरशात दिसणाऱ्या आपल्या प्रतिबिंबाशी निर्विकार भावाने खेळत असतो. याच

प्रकारे या लीलेत आत्म्याची आत्म्याशी क्रीडा आहे.

या रासलीलेचे चिंतन मनन केल्याने बुद्धी स्थिर होते. बुद्धी तर चंचल आहे. पाच विषय तिच्यावर अधिकार गाजवू इच्छितात. परंतु बुद्धी एका ईश्वरालाच अर्पण केली पाहिजे. जीवाचा खरा पति ईश्वरच आहे.

गीतेत श्रीकृष्णाने अर्जुनाला म्हटले आहे, तुझी बुद्धी तू मला देऊन टाक.

काम अदृष्य आहे. या अदृष्य कामाला मारायचे आहे. तो सगळ्यांनाच मारीत राहतो.

क्रोध, लोभ जातो पण अनेक अनर्थाचे मूळ अशा कामाचे जाणे फार कठीण आहे. ज्याचा काम मेला त्याचा संसारही मेला, तो मुक्त झाला.

जर कामाला जिंकायचे असेल तर केवळ दूध-भाताचे जेवण घ्या, रात्रीच्या वेळी गोपाळाची पूजा करा आणि रासलीलेचा पाठ करा.

काम रात्रीच्या दुसऱ्या प्रहरी अधिक सतावतो म्हणून त्या वेळी बारा वाजता श्रीकृष्णाचे स्मरण आणि पूजा कराल तर काम नष्ट होईल.

एका भक्ताने विचारले– श्रीकृष्णांनी रात्री बारा वाजताच का जन्म घेतला ?

भगवंतांनी स्वतःच उत्तर दिले– जर माझा कोणी भक्त त्यावेळी माझी सेवा-पूजा करील तर त्याला काम त्रस्त करू शकणार नाही. जीवाला कामापासून वाचविण्यासाठीच मी रात्री बारा वाजता जन्म घेतला.

भागवत तर भवरोगाचे औषध आहे. परंतु सर्वच व्रतनियमांचे विधिपूर्वक पालन केले पाहिजे. महापुरुष वेदशास्त्रांच्या मर्यादेचे उल्लंघन कधीच करीत नाहीत. स्वतः श्रीकृष्ण सुद्धा ब्राह्म मुहूर्ती (पहाटे ४ वाजता) शय्येचा त्याग करीत असत.

महाप्रभू वल्लभाचार्य नेहमी त्रिकाळ संध्या करीत असत. एकदा ते जगन्नाथाच्या मंदिरात गेले. एकादशीचे व्रत होते. प्रसाद मिळाला सुखडीचा (विशिष्ट) लाडू. आता काय करावे ?

आचार्यांना पेच पडला– प्रसाद ग्रहण केला तर एकादशीचे व्रत तुटते, न घेतला तर प्रभूच्या प्रसादाचा अपमान होतो !

त्यांनी रात्रभर प्रसाद हातातच ठेवला आणि त्याचा गुणानुवाद करीत राहिले. द्वादशीची प्रभात उगवली आणि प्रसाद ग्रहण केला.

महाप्रभू वल्लभाचार्य म्हणतात– विषयसुखात फसलेल्या विलासी जीवाला हा पुष्टिमार्ग निषिद्ध आहे.

श्रीकृष्ण कसे संयमी होते याचे वर्णन आपण पूर्वी विस्ताराने वाचले आहे. गोकुळांत जोडे, शिवलेले कपडे आणि अस्त्र-शस्त्रांचा उपयोग करीत नसत, आणि मुंडणही करून घेत नव्हते.

प्रभूची गोकुळ वृंदावनलीला या प्रकारे शुद्ध प्रेम-लीला आहे. वृंदावनात नुसती बासरी वाजवितात. ती बासरी शुद्ध प्रेमाची होय.

काही महात्मे फक्त रासलीलेपर्यंतचीच भागवत कथा ऐकू इच्छितात. कारण याच्यापुढे तर मथुरेची राजसलीला आहे. ज्यात युद्ध, वध, विवाह इत्यादींविषयी गोष्टी आहेत. मथुरेत आणि द्वारकेत श्रीकृष्ण मधुर बासरी वाजवीत नाहीत. शंख फुकतात.

प्रभूशी तादात्म्य पावल्यामुळे वेदांतील मंत्र भोगपर असूनही त्यांचे तात्पर्य त्यागपर दिसते.

वेदान्त अनुभवाचा विषय आहे, केवळ वाणी-विलासाचा नाही.

जर पांच रुपयांची नोट खिशांतून हरविली तर लागलीच परीक्षा होऊ शकेल की वेदान्ताचे मंत्र पोपटासारखे बोलणारा तो खरोखरच वेदान्ती आहे की नाही. पाच रुपयांच्या नोटेची काही किंमतच नाही असे नाही. परंतु त्या नोटेसाठी अतिशय आसक्ति असणे वाईट आहे.

वेदान्ताच्या सिद्धान्ताचा अनुभव सोपा नाही. दुसऱ्या पक्षी गोपींनी भक्तीचा सोपा मार्ग दाखविला आहे. लोकांना प्रेमलक्षणा भक्तीचा मार्ग दाखविण्यासाठीच कृष्णावतार आहे.

दररोज रात्री या रासलीलेचे चिंतन करा.

मोठमोठे महात्मेसुद्धा कामनाशासाठी रात्री स्नान करून या रासपंचाध्यायीचा पाठ करीत असतात. ही लीला चिंतनीय आहे; अनुकरणीय नाही. या लीलेद्वारेच श्रीकृष्णांनी कामाचा पराभव केला होता. काम सर्वात मोठा हृद्रोग आहे. काम क्रोधाला जन्म देतो. कामाचा विनाश झाल्यावर कृष्ण निकट येतील.

रात्री निजण्यापूर्वी स्नान करा. गृहस्थाचा बिछाना शुद्ध नसतो. पवित्र कांबळ्यावर बसून रासलीलेचा पाठ केला गेला तर कामविकार मरतो.

जो वक्ता-श्रोता या लीलेचे मनन करील त्याचा कामविकार नष्ट होईल.

रासलीलेनंतर विद्याधर सुदर्शनाची कथा येते. असे कां ?

आपल्या सौंदर्याचा गर्व केव्हाही करू नका. सत्कर्म दीनता आणण्यासाठी आहे. प्रभूला दीनता प्रिय आहे. उद्धट व्यक्ति प्रभूला पसंत नाही. कोणत्याही व्यक्तीला क्षुद्र मानणाऱ्या व्यक्तीची भक्ती केव्हाही फलद्रूप होत नाही. जेथे जेथे दृष्टी जाईल तेथे तेथे ईश्वराचे दर्शन करणे हीच दीनता आहे. दीनता तर प्रभूला प्रसन्न करण्याचे साधन आहे.

रावणाची तपश्चर्यासुद्धा काही कमी नव्हती, परंतु त्यात भोगलालसा होती. दीनता नाही.

आपल्याला निरभिमानी म्हणणारा सुद्धा सूक्ष्म रीतीने अभिमानीच असतो.

३४ व्या अध्यायात सुदर्शन विद्याधराची कथा आहे.

शिवरात्रीचे पर्व होते. नंदबाबा अंबिकावनाच्या यात्रेला गेले होते. ब्राह्मणांना पुष्कळ दान दिले गेले. रात्रीच्या वेळी सर्वांनी सरस्वतीच्या काठावर मुक्काम केला. तेथे राहणारा एक अजगर नंदबाबांना गिळू लागला. श्रीकृष्णाच्या चरणस्पर्शाने तो मेला आणि त्यांच्यातून एक देवपुरुष प्रगट झाला.

भगवंतांनी आपण अजाण आहोत असे भासवून त्याला विचारले– "कोण आहेस तू ?"

तो देवपुरुष म्हणाला– मागच्या जन्मी मी सुदर्शन नावाचा विद्याधर होतो. मला आपल्या सौंदर्याविषयी गर्व होता. कुरूपांना पाहून मला हसू येत असे. मी एकदा कुबड असलेल्या काळ्या अंगिराऋषींना पाहिले तर मला हसू आवरता आले नाही.

ऋषि क्रोधाने भडकून म्हणाले– अरे उद्धटा! माझे शरीर भलेही काळे आणि कुबडे असो; पण मन आणि हृदय तर उज्ज्वल आहे. परंतु तुझी स्थिति अगदी उलट आहे. मी तर सत्संगाने आपली कृति सुधारून घेतली आहे. तुझे शरीर उजळ आहे पण मन काळेकुट्ट आहे. मी तुला शाप देतो की तू अजगर होशील.

शरीरात काय सौंदर्य आहे ? हे रक्त, हाडे, मांस आणि कातड्याने बनलेले आहे. जर रस्त्यावर हाडूक पडलेले असेल तर लोक त्याला डावलून निघून जातात. म्हणून शरीराला सुंदर समजू नका.

कोणताही आकार आणि त्वचेचा रंग पाहू नका. त्वचेचे चिंतन करणे पाप आहे. महात्मा रंग, रूप, आकृती पाहात नसून कृती पाहात असतात. आकार तर मनात विकार उत्पन्न करतो.

संसाराचे, शरीराच्या सौंदर्याचे चिंतन केल्याने मन चंचल होते. ईश्वराच्या सौंदर्याचा विचार केल्याने मन शांत होते. शरीर आणि संसाराला सुंदर मानू लागल्याबरोबर पाप सुरू होते. ईश्वराच्या सौंदर्याच्या कल्पनेने भक्ती सुरू होते. ज्ञान्याच्या दृष्टीने सौंदर्य कोणाच्या देहात किंवा संसारात नाही. सौंदर्य तर आपल्या आत आहे.

सौंदर्य तर मनांत असते, ह्रदयांत असते, रूप-रंग आकृतीत नाही. व्यक्तीच्या ह्रदयाचे सौंदर्य पहा, शरीराचे नाही.

सत्कर्म केल्यानंतर नंदबाबा झोपी गेले. तेव्हां अजगर त्यांना गिळू लागला. याचा अर्थ हा की सत्कर्म केल्यानंतर जागृत राहिले पाहिजे. सत्कर्म केल्यानंतर लोक आत्मप्रशंसा, प्रमाद, निष्क्रियता यात बुडून जातात म्हणून अभिमानरूपी अजगर त्यांना गिळू लागतो. रात्रीच्या वेळी जागणे म्हणजे स्वतः काही केले नाही असे समजून अनुभव घेणे. सत्कर्म घडले तर समजा की प्रभुकृपेनेच ते झाले आहे. प्रभूंनी मला निमित्त करून ते सत्कर्म करविले आहे.

पुढे शंखचूडाची कथा येते.

गोपी रात्रीच्या वेळी श्रीकृष्णाबरोबर रासलीला करीत होत्या आणि दिवसासुद्धा श्रीकृष्णलीलेत लीन राहत असत. युगुल-गीत आणि वेणुगीतांतील भाव एकसारखे आहेत.

मनुष्य जेव्हा निष्क्रीय रिकामटेकडा बसलेला असतो तेव्हा त्याच्या मनात पाप येते. रात्री जप करा. निवृत्तीच्या वेळी मनाला कामसुख, द्रव्य इत्यादींकडे जाऊ देऊ नका.

हे मन तर चंचल वानरासारखे आहे. एकटे आणि निर्लज्ज झाले की उड्या मारू लागते. त्याला नेहमी सत्कर्मात, शुभचिंतनांत गुंतवून ठेवा. काही काम नसेल तर ते वाईट विचारात भ्रमून जाईल. म्हणून नेहमी भगवंताचे स्मरण आणि सत्कार्य करीत राहा. डोळे, नाक, कान, जीभ, मन सर्वांनाच भक्तीत लावून द्या.

एका ब्राह्मणाची पत्नी मेली तर त्याला दुःख झाले. घरात लहानलहान मुले होती आणि त्यांना पाहणारे कोणी नव्हते. त्याने थकूनभागून आपल्या मित्राला आपली कहाणी सांगितली. तर मित्राने भुताला प्रसन्न करण्याचा मंत्र सांगितला. ब्राह्मणाने मंत्रजप करून भुताला प्रसन्न करून घेतले.

भुताने प्रसन्न होऊन म्हटले, मी तुझी सगळीच कामे करीन पण निरुद्योगी बसून राहणार नाही. जर मला काही काम दिले नाहीस तर मी तुला खाऊन टाकीन. भूत तर सगळेच काम काही मिनिटांतच संपवून टाकी. ब्राह्मणाला चिंता पडली की हा रिकामा राहिला की मला खाऊन टाकील. त्याने मित्राला आपली अडचण सांगितली. मित्राने सुचविले की आपल्या अंगणात एक मोठा वासा उभा कर आणि भुताला सांग की कामातून मोकळा झालास की या वाश्यावर चढ-उतर करीत रहा. ब्राह्मणाने तसेच केले. भूत समजले की हा तर माझाही गुरू आहे. ते शांत झाले.

मन सुद्धा त्या भुतासारखेच आहे. त्याला जर काम दिले नाही तर ते तुम्हाला खाऊन टाकील. जोपर्यंत झोप येणार नाही तोपर्यंत बिछान्याजवळ देखील जाऊ नका. काही तरी काम करीत राहिले पाहिजे.

ज्याला मनाच्या चंचलतेची जाणीव झालेली आहे त्याला आत्मदर्शन झाले आहे असे मानले तर काही हरकत नाही.

गोपी सर्व दिवसभर घरातील कामे करीत असत आणि रात्री एकत्रित होऊन कृष्णलीलेचे चिंतन करीत असत, कीर्तन करीत असत.

ध्यान एकट्याने करावे पण कीर्तन तर सगळ्या घरच्या लोकांनी मिळून करावे. लोक घर स्वच्छ ठेवतात परंतु मनाच्या स्वच्छतेकडे लक्षच देत नाहीत. रात्री झोपण्यापूर्वी घरातील सर्वच लहान-मोठे एकत्र बसून भजन-कीर्तन करतील तर फार चांगले. घर पवित्र होईल. मन स्वच्छ होईल.

कथा-कीर्तन भक्ती आहे. कीर्तनाचे तीन प्रकार आहेत– नामसंकीर्तन, गुणसंकीर्तन आणि लीलासंकीर्तन. घरात प्रत्येक दिवशी संकीर्तन झाले पाहिजे.

अग सखे, माझा कन्हैया सुद्धा अनेक प्रकारे बासरी वाजवतो. जेव्हा तो डाव्या गालाकडे ठेवून बासरी वाजवतो तेव्हा गोपी तन्मय होऊन जातात; आकाशाकडे दृष्टी ठेवून बासरी वाजवतो तेव्हा पाताळातील नागकन्या डोलू लागतात.

दिवसा कृष्णलीलेचे वर्णन आणि कीर्तन करून गोपी ब्रह्मसंबंध करून ठेवतात.

ब्रह्मसंबंध सतत राहण्यासाठी सतत प्रयत्न केला पाहिजे. क्षणभरसुद्धा जड वस्तूकडे लक्ष जाता कामा नये.

**२५. कृष्ण-बलरामाला मथुरेला नेण्यासाठी अक्रूर येतो :**

आता अक्रूर आगमनाचा प्रसंग येत आहे.

एकदा नारदांनी कंसाकडे जाऊन सांगितले की, तू तर फार भोळा आहेस. या वसुदेवाने तुला दगा दिला आहे. तो आपल्या आठव्या मुलाला नंदाकडे सोडून आला आहे आणि नंदाच्या मुलीला येथे घेऊन आला. श्रीकृष्ण देवकीचा मुलगा आहे आणि बलराम रोहिणीचा. त्या दोघांनी मिळून तुझ्या कित्येक सेवकांना मारून टाकले आहे. कंसाने हे सर्व ऐकले आणि तो रागाने लाल झाला आणि वसुदेवाला मारायला तयार झाला.

जो वैरभाव वाढवतो तो वैष्णव नाही.

नारद, आग कशी लावावी हेही जाणत होते आणि ती विझवावी कशी तेही जाणत होते. आपल्यासारखे तर फक्त आगच लावीत असतात. नारद कंसाला समजावू लागले– वसुदेवाला मारून काय फायदा होईल? तुझा काळ तर श्रीकृष्ण आहे. जर तू वसुदेवाला मारायला जाशील तर कृष्णाला बातमी लागेल आणि ती लागल्याबरोबर तो पळून जाईल. म्हणून तू त्या कृष्णालाच मारायचा विचार कर.

कंस विचार करू लागला की, आता कृष्णाला कोणत्या उपायाने मारावे? ब्राह्मणांनी सांगितले की, तुम्ही धनुष्य-यज्ञ करा. या यज्ञाने यजमानाचे आयुष्य वाढते आणि शत्रू मरून जातात. परंतु यज्ञाच्या आरंभीच्या पाच दिवसांत विघ्न आले तर यजमान मरतो. त्या वेळी कंसाचे कांही मल्ल आले. ते म्हणाले, अरे, तो पोरटा काय करील? तुझ्या काळाचेही काळ आहोत आम्ही. जरूर यज्ञ कर. हें ऐकून कंसाने त्याप्रमाणे यज्ञ करण्याचें निश्चित केलें.

कंसाने यज्ञाच्या निमित्ताने पुत्रासह नंदाला आमंत्रण पाठविण्याचा विचार केला आणि मल्लांना सांगितले की ते इकडे आल्याबरोबर त्यांना यमसदनी पाठवा. ते माझे शत्रु आहेत.

विनाशकाले विपरीत बुद्धी! काळ समीप आल्यावर पुण्यशाली पुण्यकार्यात गुंतून जातो आणि पापी क्रोधी होतो. त्यामुळे त्याने आपल्या काळालाच जवळ बोलविले.

रामकृष्णांना बोलावण्यासाठी कोणाला पाठवावे? हो, अक्रूरालाच पाठवावे. अक्रूर विश्वासघात करणार नाही.

जो क्रूर असेल तो कृष्णाला कसा आणू शकेल? कामसुखाचे चिंतन करणारे मन क्रूर असते.

अ-क्रूर होऊन जाईल तोच श्रीकृष्णाला आपल्याबरोबर घेऊन येऊ शकतो. जो क्रूर नाही तो अक्रूर.

कंसाने अक्रूराला बोलाविले आणि म्हटले– काका, एक काम करायचे आहे तुम्हाला. नारद म्हणत आहेत की श्रीकृष्णच देवकीचा आठवा पुत्र आहे जो मला मारणार आहे. मी या माझ्या काळाला मारू इच्छितो. तुम्ही नंदबाबांना धनुष्ययज्ञांत येण्याचे आमंत्रण द्या आणि कृष्ण-बलरामांना आपल्याबरोबर घेऊन या. हो, पण कोणालाही हे समजता कामा नये; कीं मी त्यांना मारणार आहे. बस, माझे हे छोटेसे काम करा.

कंस साक्षात् मृत्यूलाच आमंत्रण पाठवीत आहे. मनुष्याने बोलावल्यावर मृत्यु अवश्य येतो. कंस मरण्यासाठी अधीर झाला आहे म्हणून काळाला बोलावीत आहे. जास्त जगायची किंवा लवकर मरण्याची इच्छा करू नका. केव्हां मरेन असा कधीच विचार येऊ देऊ नका. जीवन कसे असावे याचाच विचार करा.

व्यासांचा शिष्य दासाची कथा ऐका.

व्यासांचा शिष्य दास गुरुजींची खूप सेवा करीत असे. त्याने एकदा गुरुजींना विचारले– 'मी केव्हां मरेन हे मी जाणू इच्छितो.' व्यास म्हणाले, काय करशील हे जाणून? जाऊ दे. परंतु दास सांगून ऐकणारा नव्हता. ते दोघेही यमराजाकडे गेले. यमराजाने देखील 'आपण जाणत नाही असे सांगितले. माझा मंत्री मृत्युदेवच सांगू शकेल. चला, त्याच्यापाशी जाऊ.' तिघेही मृत्युदेवापाशी आले. मृत्यू म्हणाला– हे तर प्रारब्धच सांगू शकेल. आता ते चारी ब्रह्मदेवापाशी आले.

ब्रह्मदेव म्हणाला– दासाच्या प्रारब्धांत असे लिहिले आहे कीं जेव्हा तो व्यास, यमराज आणि मृत्युदेव यांना घेऊन माझ्यापाशी येईल तेव्हां त्याचा मृत्यू होईल. व्यासजी! हा तुमचा शिष्य मरू नये म्हणूनच मी असे लिहिले होते. आता तर कांही उपाय नाही. आता तो तुम्हा सर्वांसह येथे आलाच आहे. आता थोडेच क्षण राहिले आहेत त्याच्या मृत्यूला.

मृत्यु केव्हां येईल याचा विचार करणें व्यर्थ आहे. हे शरीर तर प्रतिक्षण मरत आहे. मरण्याजगण्याचा विचार फार करू नका. हे दोन्ही विचार बाधक आहेत. म्हणून एवढाच विचार करा कीं आपल्या हातून कांही पाप न होवो. परोपकार आणि पुण्यकार्यांतच आपले जीवन व्यतीत व्हावे.

कंस– अक्रूरा तुम्ही उद्या गोकुळाला जा आणि कृष्ण-बलरामांना घेऊन या. मात्र ही बातमी गुप्तच ठेवली पाहिजे.

अक्रूर– तुझी आज्ञाच आहे तर उद्याच गोकुळाला जातो.

कंसाचे मरण जवळ येत होते. म्हणून त्याने कृष्णाला आमंत्रण पाठविले.

अक्रूर राजसभेतून निवृत्त होऊन घरी परतले. सगळ्या रात्रभर झोप आली नाही. ते कृष्णाच्या दर्शनासाठी अधीर झाले होते.

सकाळी अक्रूरांनी संध्यादि कर्मे लवकर आटोपली. कंसाचा सोन्याचा रथ आला आणि अक्रूर त्यावर आरूढ होऊन गोकुळाच्या दिशेकडे निघाले. वाटेत ते श्रीकृष्णाविषयीच विचार करीत चालले होते. माझे भाग्य उदित झाले आहे म्हणून आज मला भगवंताचे दर्शन होणार आहे. मी अधम, पापी, अपात्र आपल्याला शरण येत आहे. मला आपलेसे करून माझ्या जन्माचें सार्थक करा.

अक्रूराप्रमाणे वाटेंत प्रभूंचेच चिंतन करीत राहिले पाहिजे. पावलो-पावली कृष्णाचे स्मरण करा. आजकाल तर लोक चालता चालता दुसऱ्या लोकांचे चेहरे, कपडे, मोटार, दुकान इत्यादी पाहात पाहात चालतात आणि त्यांच्याचविषयीं विचार करतात. असे केल्याने कोणता लाभ होतो? मन आणखी

बिघडत जाईल. मन फार लवकर बिघडते, पण सुधारायला फार वेळ लागतो. म्हणून भगवंताचे स्मरण करीत राहिल्याने पावलोपावली प्रदक्षिणेचे पुण्य मिळेल.

अक्रूर वाटेत प्रभूची मनधरणी करीत चालले आहेत. तुम्ही सुद्धा तसेंच करा. जी व्यक्ति मार्गानि भजन करीत नाही ती डोळ्याने आणि मनाने पाप करीत राहते.

पापी चालता चालता सुद्धा पाप करतो आणि पुण्यशील पुण्य. येणारे जाणारे लोक, त्यांचे गुळगुळीत चोपडलेले ते चेहरे, रंगीबेरंगी कपडयांचा भडकपणा, मोटरगाडी, दुकान इत्यादी तर रोजचेच आहे. त्यांच्याकडे कधीच दृष्टी देऊ नये.

जो भागवताची कथा ऐकतो त्याचा भगवंताशी संबंध जुळतो.

मार्गांत अक्रूर परमात्म्याचे स्मरण करता करता आपल्या भाग्योदयाविषयीं विचार करीत चालले होते. माझ्यासारख्या कामी माणसाला भगवंताचे दर्शन कसे होऊ शकेल ? परंतु कृष्णांनी मला आपलेसे केले आहे म्हणूनच कंसाने मला पाठविले आहे. वाटते की संध्याकाळच्या वेळी गोशाळेत कृष्णाचे दर्शन होईल. ते तिथे गोपाळांबरोबर असतील. मी प्रथम बलरामांना नमस्कार करीन आणि श्रीकृष्णाला सांगेन कीं हजारो वर्षांपासून वेगळा झालेला जीव आज आपल्याला भेटत आहे.

हे नाथ ! या जीवाला आपलेसे करून घ्या. एकदा या अधम जीवावर कृपा करा. एकदाच म्हणा कीं तू माझा आहेस. माझ्या भगवंताची दृष्टी तर प्रेमाने आर्द्र आहे. त्यांचे स्नेहाने स्निग्ध झालेले नेत्र मला पवित्र करतील. मी जेव्हां त्यांना वंदन करीन तेव्हा ते मला कृपादृष्टीने पाहतील. माझ्याकडे पाहून माझ्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवतील.

अक्रूर इतके कल्पनेत रंगले आहेत कीं मनांतल्या मनांत ते गोकुळांत पोचले आहेत आणि श्रीकृष्ण त्यांच्या डोक्यावरून हात फिरवीत आहेत, असा विचार करीत करीत आपला स्वतःचाच हात आपल्या डोक्यावर ठेवून घेतला. प्रभुस्मरणांत अशी एकाग्रता होईल तेव्हांच प्रभु प्रसन्न होतील.

पवित्र विचार करीत राहण्यानेच जीवन सफल होत असते. माझ्याजवळ इतके पैसे आहेत, आता इतके आणखी एकत्रित झाले म्हणजे मोटर ठेवीन. दोन वर्षे चांगला धंदा चालला तर मोटर येईल. याप्रमाणे सुखोपभोगाचे विचार करणाऱ्यांची आत्मशक्ति नष्ट होऊन जाते. पवित्र विचारच जीवन सुधारू शकतात. सर्वांचेच आपल्या मनासारखे नाही, तर ईश्वराच्या इच्छेसारखे होत असते. पवित्र विचार केल्याने — प्रभूवर प्रेम केल्याने हृदय पवित्र होत असते.

आत्म्यांत जी शक्ति आहे ती परमात्म्याची आहे. आत्मा आणि परमात्मा एकच आहेत. पवित्र विचाराने हृदय पवित्र आणि शुद्ध होते.

आपल्या मनाने नेहमी शुभसंकल्प करावे. कोणाचेही वाईट चिंतू नका. सगळ्यांचेच भले चिंता.

भगवंतांनी अक्रूराचे सगळेच शुभसंकल्प पूर्ण केले होते. भगवंत शुभसंकल्प आणि शुभविचार पूर्ण करीत असतात.

वेदान्त संकल्पांचा निषेध करतो. संकल्परहित होणे फार कठीण आहे. म्हणूनच वैष्णवाचार्य भगवंतासाठी संकल्प करायला सांगत असतात.

अक्रूरांना वाटत आहे कीं कृष्ण आपल्याला नाव घेऊन हाक मारतील कीं नाही ? तसा तर मी पापी आहे, अधम आहे, पण वयोवृद्ध आहे. वसुदेवाचा चुलतभाऊ पण आहे आणि मित्रही आहे. तेव्हा कदाचित कृष्ण मला काका म्हणून हाक मारील. जर तो मला काका म्हणून उठा-बसायला सांगेल तरच मी उठेन-बसेन. त्याने जर मला काका म्हटले तर माझा जन्म सफल होऊन जाईल.

भगवंत ज्याचा आदर करणार नाहीत त्याचा जन्म व्यर्थ आहे. जीवमात्र मनाचा उपाशी आहे. जगाच्या गोष्टींकडे ध्यान देऊ नका. कोणी प्रशंसा केली तर सद्भाव जागृत होईल, कोणी कटु बोलेल तर कुभाव. म्हणून लोकांच्या म्हणण्याची चिंता सोडून भगवान काय म्हणतील असा विचार करीत राहा. भगवंत आमच्याकडून सद्भावाची अपेक्षा करतात. ते विचार करतात – ह्या जीवाने पंधरा दिवसपर्यंत कथा ऐकली आहे तर त्याचें मन थोडेफार सुधारले असेलच.

ईश्वराशी कांही ना कांही संबंध जोडावाच लागेल.

वृंदावनवासी एका निःसंतान महात्म्याने विचार केला कीं जोपर्यंत योगाभ्यास करावा तोपर्यंत मन स्थिर राहते. प्राणायाम संपल्याबरोबर मन चंचल होऊन उड्या मारू लागते. त्याने संसार विसरण्याची एक युक्ति केली. त्याने कृष्णाला आपला मुलगा मानले. मी नंद आहे आणि तो माझा पुत्र आहे. तो माझ्या मांडीवर बसला आहे. माझी दाढी ओढत आहे. याप्रकारे त्या महात्म्याने वात्सल्यभावाने भक्ती करावयास आरंभ केला.

संसारांतील विषयावेश कमी झाल्यावर भगवंतासाठी भाव जागृत होत असतो. पुत्र दुःखही देतो आणि सुखही.

हा साधु परमात्म्याशीं पितापुत्राचे नाते जोडून संसाराला विसरून जाऊन प्रभुमय होऊन गेला. आईप्रमाणे कन्हैयाचे-पुत्राचे लाड पुरवू लागला. तो मनातल्या मनांत कल्पना करी कीं कृष्ण आता आंबा मागत आहे. याप्रकारे तो मनांतल्या मनांतच कृष्णाची सेवा करू लागला. कान्हा तर इतका भोळा आहे कीं मनांतल्या मनांत देणाऱ्यावर सुद्धा प्रसन्न होतो.

साधु गंगास्नानाला जाऊ लागतो तर त्याला वाटू लागते कीं कान्हा त्याला म्हणत आहे कीं बाबा, मला सोडून कुठे जाऊ नका. मानससेवेत लीन झालेला साधु यात्रा करायला सुद्धा जाऊ शकत नाही. कारण कीं त्याचा मुलगा कन्हैया अजून छोटा आहे! त्याला कोण पाहील?

याप्रमाणे मानससेवा-पूजा करीत करीत तो साधू मृत्यू पावला. शिष्यांनी त्याचे शव स्मशानांत नेले. अग्निसंस्काराची तयारी चालू होती. इतक्यांत एक सात वर्षांचा मुलगा गंगाजळ घेऊन आला. लोकांना सांगू लागला, मी यांचा मुलगा आहे म्हणून यांच्या अग्निसंस्काराचा हक्क माझा आहे. माझे पिता गंगास्नान करू इच्छित होते म्हणून मी गंगाजळ घेऊन आलो आहे. त्याने साधूला स्नान घालून नमस्कार केला आणि अग्निसंस्कार केला. सगळे शिष्य आणि साधू उभेच राहिले, काहीच बोलू शकले नाही.

अग्निसंस्कार संपल्याबरोबर तो मुलगा अंतर्धान पावला. आता सगळ्यांना आठवले कीं साधू तर निःसंतान होता. म्हणजेच स्वतः भगवंतच बालकाचे रूप घेऊन आले होते आणि महात्म्याची अंत्येष्टि करून गेले. महात्म्याची इच्छा पूर्ण झाली.

पुष्कळ वेळा असे होत असते कीं लाखाच्या संपत्तीचा वारसपुत्र धन गोळा करून निघून जातो. पण प्रभू असें करीत नाहीत. ते कधीच विश्वासघात करीत नाहीत. ते तर मनुष्याच्या अंतकाळी धावत येतात. जीव जीवाचा विश्वासघात करतो. प्रभु असे कधीच करीत नाहीत.

जीव ज्या भावाने त्याचे स्मरण करतो त्याच भावाने ते येऊन भेटतात.

भगवान म्हणतात – तुला इच्छा असेल त्या भावाने मला भज, परंतु मलाच भजत रहा. स्त्रीपुत्रादींचे कोणाचेच भजन कामाला येणार नाही.

हा क्षुद्र जीव परमात्म्यावर काय प्रेम करील? परमात्मा जसे प्रेम जीवावर करतात तसे प्रेम

जीवसुद्धा प्रभुवर कधी करू शकतो का? भगवान म्हणतात, अरे जीवा! तू माझ्यावर कधी प्रेम करतोस का? मी दिवसभर तुला पाहात असतो आणि तू तर दिवसांतून दोनदा सुद्धा माझे दर्शन घेत नाहीस!

आपापल्या कुटुंबासाठी तर कावळा आणि कुत्रा सुद्धा जगतो. जो ईश्वराकरता जगतो त्याचेच जीवन सार्थक मानले जाईल.

अक्रूर मनांत तऱ्हेतऱ्हेच्या कल्पना करीत करीत चालले आहेत. हो, कृष्ण मला काकाच म्हणेल. परंतु मी तर कामी आणि विलासी आहे; मला जर त्याने दर्शनच नाही दिले तर!

ज्याचे जीवन भोगविलासांतच निघून जात असते त्याला प्रभू लवकर दर्शन देत नाहीत.

मी यौवनाच्या कैफांत चूर होतो. त्यावेळी मी खूप पाप केले आहे. या कारणानें जर कान्ह्याने मला आपलेसे केले नाही तर! माझ्या पोहोचण्याची बातमी ऐकताच तो कुठे तरी लपून जाईल.

आपल्या तारुण्यांतील पापाचाराचें स्मरण होताच अक्रूरांचा धीर सुटू लागला, तरीही त्यांना वाटत आहे की श्रीकृष्ण तर पतितपावन आहेत. ते मला, अवश्य आपलेसे करतील. जर माझ्यासारख्या पाप्याला जवळ करणार नाहीत तर त्यांना पतितपावन कोण म्हणेल?

हे नाथ! मी पतित आहे आणि आपण पतितपावन! मला आपलेसे करून घ्या.

विचार करायचेच असतील तर पवित्र विचार करा. वाईट विचार मनाला विकृत करतात.

वाटेत शुभशकुन झाले तेव्हां अक्रूरांना वाटले की भगवंत मला अवश्य जवळ करतील.

अक्रूरांनी वाटेत श्रीकृष्णांच्या पावलांच्या खुणा पाहिल्या— कमळ, ध्वजा आणि अंकुशयुक्त पावले तर माझ्या श्रीकृष्णाचीच असू शकतात. याच मार्गाने कान्हा गेला असेल. तो उघड्या पायांनीच गायी चारत फिरत असतो.

आदिनारायणांचे चिंतन चालू आहे. जर ते उघड्या पायांनी पायी फिरत आहेत तर मी तर त्यांचा सेवक आहे! मी रथांत कसा बसू? मी सेवा करण्यायोग्यच नाही— अधम आहे, पापी आहे. मी तर वैष्णवांचा दास आहे. मी तर श्रीकृष्णांना शरण जात आहे. मला रथावर बसायचा काय अधिकार? असा विचार येऊन ते पायीच चालू लागले.

गोकुळांत पोचल्यावर तेथील रज सगळ्या शरीराला लावून घेतली. व्रजरजेचा महिमा फार आहे. कारण ती प्रभूंच्या चरणांनी पवित्र झालेली आहे.

अक्रूर परमात्म्यासाठी वेडे झालेले आहेत. जसे पैशासाठी वेडे झाल्याशिवाय पैसा मिळत नाही तसेच प्रभूच्या भेटीसाठी वेडे व्हावे लागत असते. वेडे एखाद्या भौतिक वस्तूसाठी नव्हे, तर परमेश्वरासाठी व्हा. कामांध व्यक्ती शरीरासाठी वेडी होत असते आणि लोभी धनासाठी. कामांध व्यक्तीला स्थलकाळाचे सुद्धा भान राहात नाही.

भगवंताच्या प्राप्तीसाठी देहभान आणि स्थळकाळ विसरून वेडे होणे आवश्यक आहे.

अक्रूर विचार करू लागले— भगवंत जर पायी चालत असतील तर मला त्यांना दंडवत करीत करीत चालले पाहिजे. तरच माझी पापें जळतील. आणि अक्रूर दंडवत घालीत घालीत पुढे चालू लागले.

अक्रूर वंदनाभक्तीचे आचार्य आहेत.

बद्रीनाथाला जाताना वाटेत हनुमानचट्टी स्थान येते. तेथे पोचल्यावर यात्रेकरूचे हृदय भरून येते. मी परमात्म्याला भेटायला जात आहे. उद्या त्यांचे दर्शन होईल. माझ्यासारख्या पाप्याला ते जवळ करतील का? माझ्याकडून कळत नकळत पुष्कळ पापे झाली असतील. मला दंडवत घालीत घालीत गेले पाहिजे. तेव्हांच माझी पापे नष्ट होतील. मी साष्टांग नमस्कार घालीत घालीत पुढे जाईन असा

विचार करून पुष्कळसे यात्रेकरू दंडवत घालीत घालीत पुढे जात असतात आणि हनुमानचट्टीपासून बद्रीनाथपर्यंतची मार्गक्रमणा अशी करतात.

शुकदेव वर्णन करीत आहेत.

राजा! अक्रूर आदिनारायणाच्या दर्शनासाठी साष्टांग नमस्कार घालीत घालीत पुढे जात आहेत. परमात्म्याला प्रसन्न करण्याचे एक उत्तम साधन आहे, साष्टांग दंडवत!

मथुरेहून निघालेल्या अक्रूरांना गोकुळांत पोचता पोचता संध्याकाळ होऊन गेली. कारण की मार्गांतून ते मोठ्या भक्तिभावाने साष्टांग दंडवत करीत करीत पुढे जात होते.

भगवंतांनी अक्रूराचे मनोरथ पूर्ण केले.

भगवंतांसाठी केलेले शुभसंकल्प ते अवश्य पूर्ण करीत असतात. रोज कल्पना करा कीं मृत्यूच्या वेळी भगवंत तुम्हाला घ्यायला यावा. जर वाईट संकल्प सिद्ध होतात तर चांगले संकल्प कां सिद्ध होणार नाहीत?

दंडवत प्रणाम करीत करीत अक्रूर गोशाळेत आले. त्यांनी कल्पना केलीच होती की श्रीकृष्णांचे दर्शन तेथेच होईल. ते म्हणू इच्छित होते कीं, 'मी पापी आहे आणि श्रीकृष्णाला शरण आलो आहे.' परंतु त्यांचा गळा दाटून आला. ते एक शब्दही बोलू शकले नाहीत आणि भावावेशांत भान हरपून श्रीकृष्णाच्या चरणांवर जाऊन पडले. श्रीकृष्णाला नमस्कार केला.

परमात्म्याचे डोळे तर नेहमीच प्रेमार्द्र असतात. त्यांनी पाहिले की अक्रूर आपल्याला शरण आला आहे.

अक्रूरांची इच्छा होती कीं ज्यावेळी ते नमस्कार करतील त्याच वेळी भगवंताची दृष्टी त्यांच्यावर पडावी जेणेकरून त्यांचे हृदय शुद्ध होऊन पाप करण्याची इच्छाच न व्हावी. त्यांची ही पण इच्छा होती की प्रभूंनी आपल्या डोक्यावर हात ठेवावा.

प्रभूंनी आपला वरदहस्त अक्रूरांच्या डोक्यावर ठेवून त्यांना उभे केले. अक्रूरांनी तर विचार केलेला होता कीं कान्हा जेव्हां त्यांना काका म्हणून हाक मारील तेव्हाच ते उभे राहतील. पण माझ्यासारख्या पाप्याला ते काका का म्हणून म्हणतील? ते जर मला आपलेसे करणार नाहीत तर ब्रह्मसंबंध पक्का होणार नाही.

भगवंत कोणालाही घाईने आपलेसे करीत नाहीत. जीव मंदिरांत जाऊन म्हणतो कीं तो त्यांचा आहे. परंतु घरी आल्यावर तो बायकोला म्हणतो कीं तो तिचाच आहे. असा हा जीव अतिमूर्ख आहे.

भगवंतांनी अक्रूराचे मनोगत जाणून घेतले. त्यांनी विचार केला, जर काका म्हटल्याने अक्रूरांना सुख होत असेल तर असे म्हणायला काय अडचण आहे? जीव ज्या कोणत्या भावाने आणि संबंधाने मला भजतो त्याच भावाने आणि संबंधाने मी पण त्याला भजतो. मी जीवाचा पिताही आहे आणि पुत्र पण.

ईश्वराला महान कां समजले जाते? याचे कारण असे कीं तो दुराग्रही नाही, अनाग्रही आहे. जीवच दुराग्रही आहे. जीवाला थोडा सन्मान किंवा संपत्ति मिळाली कीं तो दुराग्रही होऊन जातो.

ईश्वराशी कशाही प्रकारचा संबंध जोडा, तो कधी विश्वासघात करणार नाही. त्यांच्याशी पिता, पुत्र, पति, सखा, बंधू, सेवक किंवा जी इच्छा असेल तो संबंध जोडा. कोणत्या तरी प्रकारचा संबंध जोडल्याशिवाय जीवन सफल व्हायचे नाही.



अक्रूरांची इच्छा होती की श्रीकृष्णांनी काका म्हणून हाक मारावी. श्रीकृष्णांनी त्यांच्या डोक्यावर

हात ठेवून म्हटले, 'काका, आता उठा.'' त्यांना उठवून आलिंगन दिले. जीव जेव्हा शरण येतो तेव्हां भगवान त्याला आपल्या बाहूंनी कवटाळतात.

आज जीव भगवंताला शरण आला आहे. भगवंतांनी अक्रूराच्या सर्वच मनोकामना पुरविल्या.

प्रभू शुभसंकल्पांना नेहमीच साकार करीत असतात. त्या लाकूडतोड्याने सत्यनारायणाची कथा करण्याचा संकल्प केला होता तर प्रभूंनी त्यालाही साहाय्य केलें. शुभविचार नेहमी साकार होत असतात. अक्रूरांची इच्छा पूर्ण झाली. ज्या जीवाला अक्रूरांप्रमाणे आदर मिळेल तो जीव धन्य होय. नाहीतर जगातील सर्व मानपत्रे व्यर्थच होत.

जगांतील मान-अपमानांनी प्रसन्न-अप्रसन्न होणे निरर्थक आहे. मृत्यूच्या वेळी जगांतील मानापमान कांहीच कामाला येणार नाहीत. भगवंत ज्याचा आदर करतात त्याचाच मान चिरस्थायी राहतो.

गोशाळेंतून सर्व नंदांच्या घरी आले. नंदांनी अक्रूरांचे स्वागत केले. भोजनादि आटोपल्यावर नंदांनी अक्रूराला येण्याचे कारण विचारले.

अक्रूर – नंदबाबा, मी आपणा सर्वांना कंसराजाकडून आमंत्रण द्यायला आलो आहे. मथुरेत धनुष्ययज्ञ केला जात आहे. आपणा सर्वांना दर्शनासाठी बोलाविले आहे. आपल्याला वाटल्यास आपण गाडीने यावे, पण बलराम-श्रीकृष्णांसाठी तर सुवर्णरथ पाठविला आहे.

नंद फारच भोळे होते. त्यांना आमंत्रण मिळाल्यामुळे ते प्रसन्न झाले. मी कंसाला कर देत असतो म्हणून माझ्या मुलांसाठी सुर्वणरथ पाठविला असेल. माझ्या मुलांवर कंसाचे किती प्रेम आहे!

नंदबाबांना काय ठाऊक की विश्वास निर्माण करण्यासाठी कंसाने सोन्याचा रथ पाठविला आहे.

नंदबाबा म्हणाले, मलाही वाटत होते कीं माझ्या मुलांना मी कधीतरी मथुरा दाखवावी.

गावांतील मुलांना हे समजले तर ती सुद्धा बरोबर जायला तयार झाली. आम्ही गेलो नाही तर कन्हैयाला कोण सांभाळील? बिचारे ते समजत होते की, कन्हैयाचा सांभाळ तेच करू शकतात. जगाचा सांभाळ करणाऱ्याचा सांभाळ करायला आज गवळ्यांची मुले चालली आहेत. नंदबाबांनी सर्वच मुलांना बरोबर चलण्याची अनुमति दिली.

हे सर्व वर्तमान जेव्हां यशोदेला समजले तेव्हां तिचे तर हृदयच खचून गेले. हा अक्रूर, अक्रूर नसून क्रूरच आहे. माझ्या बाळकृष्णाला जाऊ देऊ नका. तो जाईल तर सगळे गोकुळ उजाड होऊन जाईल. तो नसेल तर गाईदेखील खाणेपिणे सोडून देतील. जर घेऊनच जायचे असेल तर बलरामाला घेऊन जा, कन्हैयाला नाही. ऐकले आहे कीं मथुरेतील बाया जादू करणाऱ्या असतात. कांही असा तोडगा करतील की माझा कान्हा परत येऊ शकणार नाही.

यशोदा नंदांनासुद्धा विनवणी करू लागली – जर तुम्हाला मथुरेला जायचे असेल तर जा, परंतु बाळकृष्णाला घेऊन जाऊ नका. त्याचा तेथे सांभाळ कोण करील? तो फारच लाजाळू आहे. तो उपाशी असला तरी कांही मागत नाही. त्याची मनधरणी करून कोण खायला घालील?

नंदबाबा यशोदेला धीर देऊन समजावू लागले – कन्हैया आता अकरा वर्षांचा तर झाला. आता तू किती दिवस त्याला घरांत ठेवशील? त्याने बाहेरचे जग सुद्धा पाहायला हवे. मी आता त्याला गोकुळाचा राजा बनण्यालायक करू इच्छितो. आम्ही दोनचार दिवस मथुरेंत राहून हिंडून फिरून परत येऊ. तू काळजी करू नकोस.

तरी पण यशोदेचे मन मानीत नाही. माझ्या बाळाला मी माझ्या डोळ्यापासून दूर कशी करू? मी या वृद्ध अवस्थेत कान्ह्यासाठीच तर जगत आहे. हाच तर आधार आहे माझा.

रात्र झाली. सगळे झोपी गेले, परंतु यशोदेची झोप आज पार उडून गेली होती. न जाणो उद्या काय होईल. कान्हा निघून गेला तर मी एकटी कशी जिवंत राहीन? ती बाहेर अंगणांत येऊन हुंदके देऊन रडू लागली.

कान्ह्याने डोळे अचानक उघडले तर शेजेवर आई नव्हती. तो तिला इकडे तिकडे शोधू लागला. त्याला आई अंगणांत रडत असलेली दिसली. तो आईच्या जवळ बसला आणि गळ्यांत हात घालून तिचे डोळे पुसत पुसत रडण्याचे कारण विचारू लागला. तू कां रडते आहेस? तू रडू लागलीस म्हणजे मला फार वाईट वाटते.

कान्ह्याचे बोलणे ऐकून आईला जरा बरे वाटले. ती म्हणू लागली – तसं तर कांही विशेष नाही. तू उद्या जाणार आहेस म्हणून माझ्या डोळ्यांतून अश्रुपूर वाहत आहे. मला सोडून तू कुठे जाऊ नको रे! तुझ्याच आधाराने तर मी जिवंत राहत आहे.

कन्हैया मातेला आश्वासन देऊ लागला. कां काळजी करते आहेस तू? मी जरूर परत येईन. पण हे नाही सांगितलें की केव्हां परत येईन. आईने पण विचारले नाही. कृष्णाचे परत येण्याचे ऐकून ती प्रसन्न झाली. माझ्या बाळाची प्रत्येक गोष्ट खरी होते. तो अवश्य परत येईल. परत येण्याचे ऐकून ती आनंदात इतकी मग्न झाली कीं तो परत केव्हां येणार हे विचारायचेच विसरून गेली.

यशोदा कृष्णाला म्हणाली – आता आपण निजू या हं! दोघेही एकाच शेजेवर झोपी गेले. आज श्रीकृष्णाने यशोदेच्या ह्रदयांत प्रवेश केला. आता कन्हैया बाहेर नाही, आतच दिसत राहील.

वसुदेव-देवकी कारागृहांत अकरा वर्षांपासून तप करीत आहेत. आता जर श्रीकृष्ण तेथे गेले नाहीत तर त्यांचे प्राण निघून जातील.

सकाळ झाली. मंगलस्नान झाल्यावर माता कन्हैयाचा शृंगार करू लागली. तुझे मनोहर रूप आता मी केव्हा पाहीन? कान्ह्याने परत येण्याचे वचन दिले.

यशोदेचे मन आज अधीर झाले आहे. तिने स्वतः जेवण तयार करून कन्हैयाला जेवू घातले.

अक्रूर रथ घेऊन अंगणांत आले.

जेव्हा गोपींना समाचार समजला तेव्हां त्याही धावत तेथे येऊन पोचल्या. त्यांत राधिका देखील होती. तिच्या मुखमंडलावर दिव्य तेज फाकले होते. तिने साधासुधा शृंगार केलेला होता. आजपर्यंत कधीच वियोग झालेला नव्हता अन् आज वियोगाचा प्रसंग येऊन ठेपला होता. म्हणून राधिका सुन्न-अचेतन होऊन गेली. ती अर्धचेतन अवस्थेंतच म्हणू लागली – प्रिय कृष्णा! माझा त्याग करू नकोस. आम्हाला सोडून जाऊ नकोस.

गोपी अक्रूराशी भांडू लागल्या. आमच्या कृष्णाला कां घेऊन जात आहांत? श्यामसुंदराच्या दर्शनाविना आम्ही कशा जिवंत राहू? कन्हैयाला घेऊन जाऊ नका. तुमचे नाव अक्रूर कोणी ठेवले? तुम्ही तर क्रूर आहात. आम्हाला रडविण्यासाठी आले आहात. आम्ही तुमच्या घरचे वाटेल ते काम करायला तयार आहोत, परंतु कृष्णविरहाने आम्हाला मारू नका. कृष्णविरहापेक्षा आणखी मोठे दुःख कोणते असू शकेल?

अहो अक्रूर! कान्ह्याशिवाय गोकुळ अगदी स्मशानासारखे होऊन जाईल. वाटल्यास बलरामाला तुम्ही घेऊन जा. परंतु कान्ह्याला आमच्यापासून हिसकवून नेऊ नका. मथुरेंतील शिकल्यासवरलेल्या स्त्रिया कृष्णाची अशी सेवा करतील कीं तो आम्हाला विसरून जाईल. त्या तर चतुर असतील आणि आम्ही तर न शिकलेल्या. न जाणो, त्या कृष्णाला काय काय उलटसुलट शिकवून तिथेच रोखून धरतील.

आमचे भाग्यच फुटके आहे.

गोपी विलाप करीत आहेत– अरे विधात्या! तू तरी कसा निर्दय आहेस? जीवांचा परस्पर स्नेह करवितोस आणि लागलीच विरहाग्नींत जाळतोस? आमच्या कन्हैयावाचून आम्ही जिवंत कशा राहू?

अक्रूराला, त्या गोपींना कसे समजवावे ते सुचतच नाही.

कृष्ण गोपींना म्हणाला– तुम्हाला प्रसन्न ठेवायला बासरी वाजवीत होतो आणि खेळ रचत होतो. आता मला गेलेच पाहिजे.

कृष्णाने मूर्च्छित झालेल्या राधेला पाहिलें तर तिच्याजवळ जाऊन कानांत सांगू लागला– राधे, पृथ्वीवर असुर फार वाढले आहेत. त्या पापी राक्षसांचा नाश करून पृथ्वीचा भार हलका करायचा आहे. आजपर्यंत तुझ्याबरोबर प्रेमाने नाचत खेळत राहिलो. आता जगाला नाचवायला जातो आहे. मी तुमच्या सगळ्यांच्या बरोबरच नाचू शकतो. इतरांच्या बरोबर नाही.

सख्यांनो, मी जातो आहे पण माझे प्राण येथे तुमच्याजवळ राहतील. मी माझे प्राण तुमच्या हृदयांत ठेवून जात आहे. माझ्या प्राणांचे रक्षण करण्यासाठी तुम्ही आपल्या प्राणांचे रक्षण करा.

राधे! मी आजपर्यंत तर तुझ्याजवळच होतो. आता थोडा दूर जात आहे. परंतु आपण तर अभिन्नच आहोत. लीलेच्या हेतूनेच आपण वेगवेगळी शरीरे धारण केली आहेत. मला माझ्या प्राणांपेक्षा सुद्धा ही बासरी जास्त प्रिय आहे. तू जेव्हां जेव्हां ही बासरी वाजवशील तेव्हां तेव्हां मी धावतच येत जाईन.

गोपी– कन्हैया, विरहाग्नित आम्हाला जाळू नकोस. आम्हाला विसरून जाऊ नकोस.

बाहेरच्या पाण्याने नव्हे, तर डोळ्यांतून येणाऱ्या प्रेमाश्रूंच्या पुरानेच मन धुतले जाऊ शकते.

गोपी रडत आहेत. कृष्ण त्यांना धीर देत आहेत. माझ्या मंगलमय प्रयाणाच्या वेळी रडल्याने अपशकुन होईल. मी अवश्य परत येईन.

गोपींचे रुदन कांहीसे कमी झाले तेव्हां कृष्ण आणि बलराम रथारूढ झाले. रथ चालू लागला आणि मागे मागे गोपीही चालू लागल्या. कान्ह्याच्या सांगण्यामुळे अश्रू थांबले होते. परंतु पुनः वाहू लागले. न जाणो आता कन्हैया केव्हा परत येतो? न जाणो आता पुनः केव्हा दर्शन होईल त्याचे? त्या मोठमोठ्याने रडू लागल्या.

कशा होत्या त्या गोपी? श्रीकृष्णाकडेच त्यांचे मन लागलेले होते.

हे गोविंदा! हे माधवा! या गोकुळाला उजाड नको करू रे! नाथा, या गोकुळाला अनाथ करू नको! आम्हाला विसरून जाऊ नकोस.

एक गोपी म्हणत आहे– तुझे दर्शन घेतल्याशिवाय पाणीसुद्धा न पिण्याचा माझा नियम होता. माझ्या घरी काही क्षणांकरिता तरी येत जा.

सगळा गाव रडत होता. अक्रूरांचे मनसुद्धा द्रवले. ग्रामजनांचे कृष्णप्रेम आणि कृष्णविरहाचे दुःख पाहून अक्रूरांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. गाईसुद्धा रडत होत्या. एक गोपी रथाचे मागे धावत आहे, तर दुसरी बेशुद्ध होऊन पडत आहे.

श्रीकृष्ण अक्रूरांना म्हणाले– ज्यांच्या हृदयांतून प्रेम ओसंडत आहे असे हे ग्रामजन मला पुढे जाऊच देणार नाहीत म्हणून रथ जरा जलद चालवा.

अधीरतेने यशोदा रथाच्या मागे धावू लागली. प्रभूने धावणाऱ्या आईला पाहिले म्हणून रथ थांबविला.

आईने मुलाची दृष्ट काढली व त्याला ओवाळले. बाबा! तुझ्या जाण्यामुळे मला दुःख होत आहे. माझी तर हीच इच्छा होती कीं तू माझ्या डोळ्यासमोरून कधीच दूर न व्हावास. पण मी कांही केवळ माझ्यासाठीच तुझ्यावर प्रेम केले नाही. मी प्रार्थना करते की जिथे कुठे तू राहशील तिथे तू सुखी रहा.

कान्हा, आज मी तुला एक रहस्य प्रगट करीत आहे. तू मला आई म्हणतोस, मी तुला बेटा म्हणते. परंतु तू माझा मुलगा नाहीस. तू देवकीचा मुलगा आहेस. मी तर तुझी पालकमाता आहे, तुझे लालनपालन करणारी दासी आहे.

कृष्ण– अग आई! तू हे काय म्हणत आहेस? लोक कांही का म्हणेनात, मी तर सगळ्या जगाला हेच सांगेन कीं मी यशोदेचा मुलगा आहे.

यशोदा– बेटा! मथुरेंत तू हे विसरून जा की मी तुला कधी मुसळाला बांधून ठेवले होते.

कन्हैया– मी सगळे काही विसरू शकतो, पण तुझी बंधने कशी विसरू शकेन? मी फक्त तुझ्याशीच बांधला जाऊ शकलो आहे.

यशोदा– तू मला विसरणार नाहीस ना? मला भेटायला येशील ना?

कन्हैया– अवश्य येईन. तू आपल्या प्रकृतीला सांभाळ आणि आमच्या गाईंचा चांगला सांभाळ कर.

माता– तू जिथे कुठे राहशील तिथे सुखी राहा हाच माझा आशीर्वाद !

रथ पुढे जाऊ लागला. गोपी मागे धावू लागल्या. त्यांनी कन्हैयाला ओवाळायची इच्छा प्रदर्शित केली तसा रथ पुनः थांबविण्यांत आला.

श्रीकृष्ण गोपींना म्हणू लागले– दुष्टांचा वध, दैत्यांचा संहार हे तर माझ्या जन्माचे गौण प्रयोजन आहे. माझ्या अवताराचे मुख्य प्रयोजन तर गोकुळांत प्रेमलीला करणे हेच आहे. माझे एक स्वरूप इथे तुमच्यापाशी राहील आणि दुसरे मथुरेत.

प्रथम फक्त यशोदेच्या घरीच काय तो एक कन्हैया होता. आता प्रत्येक गोपीच्या घरी एक एक कृष्ण आहे. कृष्णाने सगळ्याच गोपींच्या हृदयांत प्रवेश केला आहे.

महाप्रभू म्हणतात, हा अंतरंगाचा संयोग आहे आणि बहिरंगाचा वियोग. प्रत्येक गोपीला अनुभव येत आहे की श्रीकृष्ण तिच्याच जवळ बसले आहेत, मथुरेला गेले नाहीत.

श्रीकृष्णाला घेऊन रथ निघून गेला आणि गोपी चित्रांतल्याप्रमाणे निःस्तब्ध उभ्याच्या उभ्याच राहिल्या. कन्हैयाने गोकुळाचा त्याग केला नाही. तो तर प्रत्येक गोपीच्या हृदयांत बसलेला आहे.

वियोगाशिवाय तन्मयता येऊ शकत नाही. वियोगाविना ध्यानांत एकाग्रता येत नाही आणि साक्षात्कार होत नाही. व्रजवनितांना आपल्या विरहाच्यायोगे तन्मय करण्याच्या हेतूनेच भगवान मथुरेला गेले.

वियोगाने-विरहाने प्रेम पुष्ट होत असते. याचसाठी श्रीकृष्णाने गोपींना ह्या वियोगरूपी विशिष्ट योगाचे दान केले.

रथ पुढे पुढे जात यमुनाकिनारी आला. अक्रूर स्नानासाठी पाण्यांत उतरले तेव्हा त्यांना पाण्यांत श्रीकृष्ण आणि बलरामांचे दर्शन झाले. बाहेर येऊन पाहिले तर दोघेही रथांत बसलेले आहेत. पुनःपुन्हा असाच अनुभव आला. अक्रूराला भगवान नारायणाचे दर्शन झाले.

कांही वैष्णव असे मानतात कीं मथुरेकडे जातेवेळी श्रीकृष्णाने यमुनेत स्नान केले आणि नारायणाचे रूप घेऊन प्रगट झाले. अर्थात श्रीकृष्ण स्वतः वृंदावनात परत आले आणि त्यांचे नारायणरूप लीला करण्यासाठी मथुरेला गेले. तसे तर श्रीकृष्ण आणि नारायण [illegible] आहेत. जो भेद आहे तो

उपासनेच्या हेतूनेच आहे.

अक्रूरांनी यमुनेत स्नान करून परमात्म्याची स्तुति केली.

रथ मथुरेच्या सीमेवर आला तेव्हां श्रीकृष्ण अक्रूरांना म्हणाले— काका, तुम्ही पुढे व्हा, आम्ही येथेच उद्यानांत विश्रांती घेतो.

ज्या नगरींत कंस राहतो त्यांत श्रीकृष्ण कसे राहतील? ते आंत जातील तर कंसाचा नाश होईल. प्रकाश आणि अंधार एके ठिकाणी कसे राहू शकतील?

विषयानंद आणि ब्रह्मानंद एकत्र राहू शकत नाही.

एकाच मथुरारूपी मानवकायेत श्रीकृष्ण-ब्रह्म आणि कंसरुपी काम बरोबर कसे राहू शकतील?

यशोदेने दही-दूध आणि इतर अन्नसामुग्री त्यांना दिली होती. जेव्हा ते जेवायला बसले तेव्हा व्रजवासी गोपी, गाई आणि यशोदेची आठवण झाली. हात थांबले. नंदांनी हे पाहिले आणि कारण विचारले. कन्हैया म्हणाला— माझ्या सख्या आणि आई माझ्या वियोगामुळे उपाशी असतील! मी कसे खावे?

प्रभूवर असे प्रेम करा कीं ते तुम्हाला आठवतील. जोपर्यंत प्रभूच्या आठवणीत तुम्ही बसणार नाही, तोपर्यंत तुमची भक्ती अर्धवटच राहील. जोपर्यंत प्रभु तुम्हाला आठवीत नाहीत तोपर्यंत जीवाचें बंधन बांधलेलेच राहते. भक्ती अशी करा कीं भगवंताला तुमच्याविना चैन पडणार नाही.

**२६. कृष्णाचा मथुराप्रवेश, कंसवधः**

यशोदा आणि गायींचें प्रेम इतके दृढ होते कीं कृष्णवियोगांत त्या खाऊ-पिऊ शकल्या नाहीत.

संध्याकाळ झाली तसे दोघे भाऊ मथुरा पाहायला निघाले. महाद्वारांत प्रवेश केला. सवयीमुळे गोकुळांतील गोपबाळे कन्हैयाबरोबर चालता चालता त्याचा जयजयकार करूं लागले. मथुरेतील स्त्रियांनी पण ऐकलें.

शुकदेव वर्णन न करता जणू कांही प्रत्यक्ष पाहात आहेत.

ज्या लीलेंतील जो कथाप्रसंग चालू असेल त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेण्याची कल्पना केली तर वक्ता आणि श्रोत्यांना पुष्कळ आनंद वाटेल.

स्तनपान करवीत असलेली एक बाई बाळाला तेथेच सोडून कृष्णाच्या दर्शनासाठी धावत आली. आपला बाळ तर घरांतच राहणार आहे. न जाणो कृष्णाचें दर्शन पुनः होईल कीं नाही! याचप्रमाणें शहरांतील सगळेच आबालवृद्ध आपापलें काम टाकून श्रीकृष्णाच्या दर्शनासाठी धावत आले.

भगवंताच्या दर्शनासाठी अशीच उत्कंठा असली पाहिजे. आतुरतेविना दर्शन होऊ शकत नाही. दर्शनांत लीन होऊन गेल्याने मोठा आनंद येतो. अशी आतुरता, व्याकुळता, उत्कंठा असेल तर ईश्वर दर्शन देण्याची कृपा करील.

मथुरेंतील स्त्रिया श्रीकृष्णाचें दर्शन घेता घेता आपापसांत गोष्टी करू लागल्या.

रस्त्यांत कंसराजाचा धोबी दिसला. तो राजाचे कपडे घेऊन चालला होता. हा तोच धोबी होता ज्याने रामावतारांत जानकीची निंदा केली होती.

निंदा आणि नरक एकसारखेच होत. कोणाची कधीच निंदा करू नका.

श्रीकृष्णाने त्या धोब्याजवळून कांही कपडे मागितले. तो मूर्ख धोबी मोठ्या मिजाशीत म्हणू लागला, 'हे तुझे खेडेगाव नाही, शहर आहे शहर! हे कपडे तर राजाचे आहेत. तू तर काय, तुझ्या

बापजाद्यांनी तरी असे कपडे कधी पाहिले आहेत? जास्त गडबड करशील तर राजाच्या शिपायांच्या हवाली करून देईन. वाचायचे असेल तर पळून जा इथून.'

धोब्याची मिजाशी बलरामाच्याने सहन झाली नाही. कान्ह्या, असे वाटते कीं या धोब्याचा मृत्यू घिरट्या घालीत आहे. मार एक थप्पड त्याला. कान्ह्याने पळभरांत त्याला भूमिवर लोळवलें. धोब्याची ही दशा पाहून धोब्याचे साथी कपड्यांची गाठोडी तिथेच टाकून पळून गेले.

ईश्वर पापी इंद्रियांना दंड देत असतो. अंतकाळीं ती पापी इंद्रियें फार दुःखी होतात. वाणीने पाप केल्यामुळे अंतकाळीं वाग्देवी रुसून जाते. अशा पाप्याचे बोलणें बंद होऊन जाते.

धोब्याने तोंडाने निंदा केली म्हणून भगवंतांनी त्याच्या श्रीमुखांत एक थप्पड भडकवून दिली.

ईश्वर सरळ जीवाशीं सरळ आणि कुटिल जीवाशीं कुटिल. ज्याचें मन पवित्र नसते त्याला अंतकाळीं फार मनोव्यथा होते.

कन्हैयाला तर चोरीची सवयच होती. त्याने आपल्या गोपमित्रांना त्या गाठोड्यांतले कपडे घ्यायला सांगितले. मुले थोडी भीत होती म्हणून कन्हैयानें स्वतःच कपडे वाटून दिले. ज्याला जो कपडा दिला तो त्याच्याच मापाचा निघाला. मुलें तर आनंदानें नाचू लागली. ती मुले म्हणू लागली कीं हे कपडे शिवणारा किती कुशल कारागीर असला पाहिजे? तसं तर असा शिंपी कधी झालाच नाही. आपल्या मित्रांना सुंदर कपडे घालायला देण्याची कृष्णाची जी प्रतिज्ञा होती ती आज इथे पूर्ण झाली.

गरीब मुलें तर चांगले चांगले कपडे मिळाल्यामुळें खूष झाले. ते कन्हैयाला म्हणू लागले. अशा सुंदर कपड्यांमुळे तर आमचें झटपट लग्न होऊन जाईल. आमच्या लग्नाला तू येशील कां? कन्हैया म्हणाला, हो, जरूर येईन.

अशी कल्पना करा कीं तुम्ही कृष्णाचे आहांत आणि कृष्ण तुमचे.

श्रीकृष्णांनी आपल्या गरीब मित्रांना कपडे घातले आणि मग आपण स्वतःनेही चढविले. त्यांची प्रतिज्ञा आज पूर्ण झाली. पूर्वी ते न शिवलेले कपडे-पीतांबर आणि कांबळे वापरीत असत.

राम आणि कृष्णांनी आर्दश मित्र-प्रेमाची उदाहरणें जगासमोर ठेवली आहेत.

वाटेंत सुदामा भेटला. त्याने त्यांना हार घातला. कृष्णाच्या सवंगड्यांनाही हार घातले.

पुढे जाऊ लागले तर कंसाची दासी कुब्जा भेटली. तिला तीन ठिकाणी व्यंग होते. ती चंदन-पात्र घेऊन चालली होती. तिनें प्रभूंना चंदन दिले तर ते प्रसन्न झाले. प्रभू म्हणाले, या कुब्जेने मला चंदन देऊन माझी शोभा वाढविली आहे तर मी पण तिची शोभा वाढवतो. तिचे सर्वच शरीर चांगले होऊन ती सुंदर झाली.

चंदन आणि वंदन मनुष्याला नम्र करीत असतात.

या कुब्जा प्रसंगांत एक रहस्य आहे. आमची बुद्धीच कुब्जा आहे. कारण ती काम, क्रोध आणि लोभांनी वक्र झाली आहे. प्रभूची पूजा, या तिन्ही दोषांना नष्ट करून बुद्धीला शुद्ध करते. बुद्धी जर कंसरूपी कामाची सेवा करील तर विकृत होईल. बुद्धी ईश्वरासमोर येऊन सरळ होऊ शकते. जर असें न झाले तर पांचही विषय जीवाला त्रास देत राहतात.

कंसाची सेवा करणारी बुद्धी भ्रष्ट-वक्र होईल आणि कृष्णाची सेवा करणारी सरळ. विषयांचें चिंतन केल्याने बुद्धी वक्र होईल. ज्याची बुद्धी वक्र होईल त्याचे मनही तसेच होईल. विकृत मन असणाऱ्याचे डोळेसुद्धा दूषित होतील. ज्याचे डोळे दूषित असतील त्याचें जीवनही दूषित होईल.

मथुरेच्या वाण्यांनी ऐकले कीं या दोन मुलांनी धोब्याला मारले आणि कुब्जेचा कायापालट केला.

त्यांना वाटले हे दोघेही पराक्रमी आहेत. हे मथुरेचे राजे होण्याची शक्यता आहे. म्हणून त्यांचा आजपासून आदर-सत्कार केला पाहिजे. वेळ आलीच तर त्यांच्याकडून आपल्याला काही काम साधून घेता येईल. अगम बुद्धी बाणिया. थोडेसे देऊन जास्त घेण्याची आशा अणि प्रयत्न करील तोच वाणी! कमी घेऊन जास्त देईल तो संत. संत आणि ब्राह्मण थोडीशी दक्षणा मिळाली तरी आशीर्वाद देतात.

तर त्या वाण्यांनी आज सेवा करून उद्या लाभ घेण्याचा विचार केला. त्यांनी कृष्णाला पानसुपारी इत्यादी देत म्हटले, हे सगळे आपलेच आहे. दुकान आपलेच आहे. वाणी बोलताना फार गोड बोलतो पण बिल करताना, पैसे एकत्र करताना कांही वेगळाच असतो. तो आपल्याला बुद्धिमान समजतो. धन कमविण्यासाठीच बुद्धीचा उपयोग करणारा बुद्धिवान कसा म्हटला जाईल?

आपल्या बुद्धीचा उपयोग जो प्रभु-प्राप्तीसाठी करील तोच खरा बुद्धीमान म्हटला पाहिजे.

त्या वाण्यांनी भगवंताला आणखी कांही दिले नाही. त्यांनी फक्त पान आणि फुलांचा हारच प्रभूंना दिला. तरी पण कृष्ण तर भगवानच होते. ते अशा स्वागतानेही प्रसन्न झाले. 'त्यांनी माझे असे तरी स्वागत केलेच आहे ना?' तेव्हा त्यांनी वाण्यांना वर मागायला सांगितले.

वाणी– प्रभु, आमची अशी इच्छा आहे कीं लक्ष्मीने नेहमी आमच्याच येथे वास करावा. इतर कोणाच्या घरीं जाऊच नये.

श्रीकृष्ण– काय तुम्हा लोकांना ज्ञान, भक्ती, सदाचार, वैराग्य यांची कांहीच आवश्यकता नाही?

वाणी– अहो, त्या गोष्टींशी आम्हाला काय कर्तव्य? आम्हाला तर फक्त पैसा पाहिजे; मग तो कुठूनही मिळो, कसाही मिळो.

भगवान मथुरेला गेले तर वाण्याने पानसुपारीने स्वागत केले, परंतु ब्राह्मण आखडून स्वागत करायला गेले नाहीत. तर लक्ष्मीला वाटले, कसें का होईना, वाण्यांनी माझ्या पतीची सेवा केली आहे आणि ब्राह्मणांनी तर कांहीच केलें नाही. म्हणून लक्ष्मी वाण्याच्या घरीं गेली पण ब्राह्मणाच्या घरीं गेली नाही.

लोक समजतात कीं संपत्ती आली कीं सगळी सुखे आली. परंतु असा विचार योग्य नाही. सुसंस्कृत व्हायचा प्रयत्न करा.

भगवंत वाण्याच्या दुकानांतच होते. इतक्यांत कांही गिऱ्हाइके आली. म्हणून वाणी त्यांच्याशी भाव-तोल करू लागले. भगवंतांनी त्यांना धनुष्ययज्ञाचा मार्ग विचारला. तर म्हणू लागले, अहो, आम्ही या गिऱ्हाइकांशी कारभार करू कीं तुमच्याशीच गोष्टी बोलत राहू? जा पुढे, कोणाला तरी रस्ता विचारा. किती स्वार्थी आहेत हे वाणी! लक्ष्मी मिळाली आणि लक्ष्मीपतीलाच विसरून गेले.

भागवत मृत्यू सुधारते. असें नका समजू कीं तक्षक नाग फक्त परीक्षितालाच चावायला आला होता. तक्षक नाग-काळ-सर्वांनाच एक ना एक दिवस चावेल.

तक्षक नाग (काळ) नोटीस देऊन येत असतो. डोक्याचे केस पांढरे होऊ लागले, दात पडू लागले की समजा तक्षकाची नोटीस आली आहे. काळाची सूचना ध्यानांत घेतली पाहिजे आणि सगळे कांही सोडून भगवंताच्या भक्तिमार्गात रुजू झालें पाहिजे.

यज्ञाचा आरंभ होऊन चार दिवस समाप्त झाले आणि आजचा पांचवा दिवस आहे. जर आजचा दिवस निर्विघ्नपणें पार पडला तर कंसाचे कोणी कांहीच बिघडवू शकणार नाही.

इकडे धनुष्ययागाचें स्थान शोधीत शोधीत कृष्ण-बलराम येऊन पोचले. कृष्णाने धनुष्य उचलून त्याचे तुकडे तुकडे करून टाकले. त्यांनी कंसाच्या सेवकांचीही चांगल्या प्रकारे समाचार घेतला.

तर कांही सेवक पळून जाऊन त्यांनी राजाला यज्ञभंगाची बातमी पुरविली. ते राजाला म्हणाले, आता तर तुझा यज्ञ अपूर्णच राहणार! त्या प्रतापी बालकांना राज्य देऊन टाक आणि ईश्वराचें भजन सुरू कर. तू कृष्णाच्या आईबापांना बंदी करून पाप केले आहेस. तू दुष्ट आहेस.

कंस रागानें लाल झाला. "अरे मूर्खांनो, तुम्हाला कांही शुद्ध आहे का, तुम्ही काय बडबडत आहांत ? मी राजा आहे, मी आपलें राज्य कोणाला देणार नाही, समजलात ? '

सूर्यास्त झाल्यानंतर दोघेही भाऊ आपल्या मित्रांसह नंदबाबाच्या जवळ परत आले.

नंदांनी बालकांना सकाळीच सांगितले होते— 'हे पहा, हें आपले गोकुळ नाही. मथुरा आहे. शहाणे होऊन शांतीनें हिंडा-फिरा. कोठे दंगा-मस्ती करू नका.

आता ते परत आले तर नंदांनी त्यांना विचारले— काय, शहर पाहून आलात ? कुठे कांही दंगा-मस्ती तर केली नाही ना ? '

कृष्ण— नाही हो. आम्ही तर कांहीच केलेले नाही. लोक मला परिचय विचारीत होते, तर मी सांगत होतो की मीं नंद-यशोदेचा मुलगा आहे. बाबा ! माझा परिचय समजल्याबरोबर लोकांनी आम्हाला हे चांगले चांगले कपडे दिले आणि फुलांच्या माळा गळ्यांत घातल्या.

बिचारे भोळे नंदबाबा ! त्यांनी मुलांच्या गोष्टी खऱ्या मानल्या. मी या शहरातील यादवांशी शुभ-अशुभ प्रसंगीं योग्य व्यवहार करीत आलो आहे. ते माझ्या मित्रांसारखेच आहेत. तेव्हां माझ्या मुलांना कांही ना कांही देतील हें स्वाभाविकच आहे.

कन्हैयानें पुनःपुन्हा म्हटले— बाबा, मी तुमचा मुलगा आहे याचसाठी हे सर्व कांही आम्हाला मिळाले आहे. श्रीकृष्णांनी नंदाची पुत्रभावना कायम ठेवली आहे.

रात्रीच्या वेळीं ते सर्व जेवण करायला बसले. व्रजवासींनी आपल्याबरोबर खाण्यापिण्याची पुष्कळ सामुग्री आणली होती. कृष्णाला यशोदा आणि आपली गंगी गाय यांची आठवण होत आहे. माझ्याविना माझी आई आणि गंगीची काय दशा झाली असेल बरे ? कृष्णाचें जेवण्यात मन लागत नाही.

दुसऱ्या दिवशीं सकाळी राजसभेचा आरंभ झाला. कंसाचा मृत्यू निकट येत चालला होता. त्याने आपले मल्ल चाणूर-मुष्टिकांना कृष्ण-बलरामांना मारून टाकण्याची आज्ञा केली.

'कशाही प्रकारे त्यांच्याशी कुस्ती खेळा आणि काटा काढा.'

नंदबाबा देखील कृष्ण-बलराम आणि इतर गोप बालकांच्या बरोबर राजसभेंत हजर झाले. कुवलयापीड हत्तीच्या उद्धारानेच कृष्णाचा तेथे प्रवेश झाला.

रंगभूमीवर कृष्ण आले. मल्लांना ते वज्रासारखे, सामान्य पुरुषांना नवरत्नासारखे, स्त्रियांना मूर्तिमंत कामदेवांसारखे, गोपाळांना स्वजनांसारखे, राजांना शासकासारखे, वृद्धांना बालकासारखे, कंसाला काळासारखे, अज्ञान्याला विराटासारखे, योग्यांना परमतत्त्वासारखे आणि यादवांना परमदेवासारखे वाटले.

कृष्णाचें दर्शन घेतल्यावर सर्वच लोकांनी आपापल्या भावानुसार रौद्र, अद्भुत, शृंगार, हास्य, वीर, वात्सल्य, भयानक, बीभत्स, शांत आणि प्रेमभक्तिरसाचा अनुभव घेतला. ज्याचा जसा भाव होता त्याला त्याच रूपांत भगवंत दिसले.

जेव्हां रामचंद्र राजा जनकाच्या सभेंत आले होते तेव्हांही असेच झाले होते.

चाणूर आणि मुष्टिक तर मदिरापान करून लढायला सिद्धच होते. श्रीकृष्ण आणि बलराम राजसभेंत आल्याबरोबर त्यांना हाक मारून ते मल्ल म्हणाले— रे बाळांनो ! या, आपण कुस्ती खेळू या. महाराज कुस्तीचे खूप शोकीन आहेत. जो जिंकेल त्याला महाराज इनाम देतील.

कृष्ण – ठीक ! राजाला प्रसन्न करणें आमचें कर्तव्य आहे. परंतु आम्ही तर पडलो लहान ! आमची तुमची जोडी कशी जमेल ?

मदिरापानानें उन्मत्त झालेला चाणूर म्हणाला – 'अरे, तू तर लहान नाहीसच ! तू मोठा झालेला आहेस. तू मोठमोठ्या राक्षसांना मारून टाकले आहेस, आणि त्याने कृष्णाचा हात धरून त्याला ओढायचा प्रयत्न केला.

कृष्ण – हें तर अधर्मयुद्ध होईल.

चाणूर – लढण्यांत धर्म काय अन् अधर्म काय ?

कृष्ण – जर तुला लढायचेच असेल तर मी कांही भिणार नाही. माझ्या आईने मला दूध-लोणी खाऊ घालून धष्टपुष्ट केले आहे.

चाणूरांबरोबर कृष्णाची आणि मुष्टिकाबरोबर बलरामाची कुस्ती जुंपली. कंसाचे सेवक मल्लांना प्रोत्साहित करण्यासाठी नगारे वाजवू लागले.

संसार आखाडा आहे. काम चाणूर आहे आणि क्रोध मुष्टिक. संसाररूपी आखाड्यांत कामक्रोधरूपीं मल्लाशी आम्हाला लढायचे आहे. ते अनादि कालापासून जीवांना भंडावून सोडत आहेत. जर सावध राहून व्यवहार कराल तर काम-क्रोधांना मारू शकाल, नाही तर तेच तुम्हाला खाली पाडतील. मनुष्याचा जन्मच काम-क्रोधांवर विजय मिळविण्यासाठी आहे.

कुस्ती सुरू झाली आणि नंदबाबा घाबरून गेले. हे मल्ल माझ्या छोट्याशा बाळांना मारून टाकतील. श्रीकृष्ण परमात्मा आहे, पण नंदाच्या दृष्टींत तर ते बालकच होते ! नंदांनी डोळे मिटून नंदेश्वर महादेवाला नवस केला, 'जर आपण माझ्या कान्हा–बलरामांचें रक्षण कराल तर अकरा मण लाडवांचा नैवेद्य दाखवीन. मग त्यांच्या लक्षांत आले कीं कुस्तीचे स्वामी तर हनुमान आहेत. मग त्यांनी हनुमंतांनाही तसाच नवस केला. माझ्या मुलांचे रक्षण करा.

कान्ह्यानें पाहिलें कीं बाबा भयभीत होऊन देवांना नवस करीत आहेत तर त्याने लवकरच काम आटपायचा विचार केला. इकडे चाणूरालाही समजून चुकले कीं कृष्ण कोणी सामान्य मुलगा नसून तो त्याचा काळच आहे. जर तो आपल्या हातून सुटला तर कंस आपल्याला मारूनच टाकील. उत्तम तर हेच आहे कीं कृष्णाच्याच हाताने आपलें प्राण जाऊ द्यावे. असावधाला काम मारू शकतो, सावधाला नाही. श्रीकृष्णाने चाणूराला मारून टाकले आणि बलरामाने मुष्टिकाला.

तिकडे कंसाचे सेवक तर डोळे मिटून नगारे वाजवीत होते. म्हणून कंस रागावून म्हणाला – अरे मूर्खांनो, माझे मल्ल मरून गेले तरी पण तुम्ही नगारे वाजवीत आहांत ! बंद करा हा तमाशा. नगाऱ्यांचा धूमधडाका बंद करा.

कंसाचा मृत्यू जवळ येत चालला होता. त्याला सन्निपात झाला. तो उलटेपालटे बडबडू लागला. या मुलांना मारून टाका, नंदाला कैदेंत टाका, वसुदेवाचा वध करा.

भगवंतांनी अनुग्रह शक्तीने कुब्जेचा आणि निग्रह शक्तीने चाणूराचा उद्धार केला.

श्रीकृष्णानें कंसाचे केस धरून म्हटले, 'कंसा ! मीच आहे देवकीचा आठवा पुत्र-तुझा काळ. कृष्णाने त्याला अशा रीतीनें ओढून जमिनीवर आपटले कीं त्याचे प्राणच निघून गेले.

कंसवधाने सगळेच प्रसन्न झाले. परंतु त्याच्या राण्यांना दुःख झालें. म्हणून कृष्ण मामींच्या जवळ येऊन रडण्याचें नाटक करू लागला. मी अकरा वर्षांनी पहिल्यांदाच मामांना भेटायला आलो, तर मामा परलोकीच निघून गेले. मामाऽऽऽ.

मामी– कन्हैया, तू रडू नकोस. जे व्हायचे होते ते होऊन गेले. ते बालहत्यांच्या पापामुळे गेले. तुझा कांहीच दोष नाही.

श्रीकृष्ण तर परमात्मा आहेत. परमात्मा निर्दोष असतात. ते कोणाला मारीत नाहीत, तारतात (मुक्त करतात). ते सगळ्यांनाच आनंद देत असतात.

रामायणांत मंदोदरीने देखील श्रीरामाला निर्दोष ठरवून रावणालाच दोषी ठरविले होते. रावण आपल्या पापामुळे मेला.

वरील कथेचे रहस्य देखील समजून घ्या.

कुवलयापीड हत्ती अर्थात दर्प, मद, मोह यांना कृष्णाने मारले.

चाणूर– अर्थात काम. कामाला परब्रह्म कृष्णाने मारले.

मुष्टिक– अर्थात क्रोध. त्याला बलराम-शब्दब्रह्म-नादब्रह्माने मारले.

कंसाच्या या तिन्ही मित्रांपासून नेहमी जपून रहा.

कंस अभिमानाचेच रूप आहे. त्याच्या राण्यांची नावे सुद्धा सूचक आहेत- अस्ति आणि प्राप्ति. सारा दिवसभर अस्ति आणि प्राप्तीच्या विचारांत बुडून राहिलेला जीवच कंस असतो. नीति-अनीतीनें धनोपार्जन करून मौज उडविण्याची इच्छा करणारा, संसारसुखांचा उपभोग करणारा कंसच तर असतो. कंस, उग्रसेनाला कैदेंत टाकून राजा बनला होता. त्यावेळी एकच कंस होता. आज तर जिकडे तिकडे कंसच कंस दिसतील.

जीव नेहमी काम-क्रोधाने पीडला जात आहे. त्यांना मारायचे आहे. शब्दब्रह्माच्या उपासनेने क्रोध मरतो आणि परब्रह्माच्या उपासनेने काम जातो.

कंसाचा उद्धार झाला. कारण भगवंताचें नाव घेत मरणारा, मग तो दुष्टात्मा का असे ना, त्याचा उद्धारच होतो.

संबंधाशिवाय स्नेह उत्पन्न होत नाही. म्हणून परमात्म्याशी संबंध जोडून घ्या. त्यांच्याशी तुमची जशी इच्छा असेल तसा संबंध स्थापित करा. परमात्म्याच्या कोणत्याही स्वरूपाला इष्टदेवाच्या रूपांत आपलेसे करून त्यांच्याशीं संबंध जोडून घ्या. लौकिक स्नेहांतही संबंधाची आवश्यकता असते. कोणी आजारी असेल तर त्याच्या ओळखीचाच (परिचयाचा) कोणी त्याला पाहायला-विचारपूस करायला येईल. संबंधच स्नेहाला जन्म देत असतो.

लोक श्रीमंतांशी-ऑफिसरांशी, मंत्र्यांशी लवकर संबंध जोडतात. परंतु परमात्म्याशी संबंध जोडण्यांत आळस करतात. खरा संबंधी तर ईश्वरच आहे. ईश्वराशी संबंध कायम करणाऱ्याला सर्व कांही मिळत असते. श्रुतींत सांगितल्याप्रमाणे एकाच परमात्म्याची अनेक रूपें आहेत.

वंदन आणि पूजन तर सगळ्याच देवांचे करायचे आहे. एकाच स्वरूपांत मन लावल्याने ध्यानशक्ति वाढते आणि मन त्यांत स्थिर होते. कंस वैरभावाने कृष्णाचा विचार करीत होता. तरी पण त्याच्या मनांत शत्रुरूपानें वास तर कृष्णाचाच होता, म्हणून त्याचा उद्धार झाला.

ईश्वराच्या मारांत सुद्धा प्रेम असते. ईश्वर ज्याला मारतो त्याला तारतो सुद्धा. भगवंतांनी कंसाचा वध केला नाही, तर त्याचा उद्धार केला.

भगवंत जर आपल्या शत्रूला सुद्धा मुक्ति देतात तर प्रेमाने सेवापूजा-स्मरण करणाऱ्याला मुक्ति कां नाही देणार ?



श्रीकृष्ण वसुदेव-देवकीला नमस्कार करायला कारागृहांत आले. दोघांनाही बंधमुक्त केलें. सेवकांना

साखळदंड लवकर तोडता आला नाही तर कृष्णाने आपल्या दाताने तोडून टाकला. वसुदेव-देवकीची संपत्ति लुटली गेली, परंतु ते भगवंताचे ध्यान करीत राहिले म्हणून त्यांना मुक्ति मिळाली.

तन्मयता-तल्लीनतेशिवाय सिद्धी मिळत नसते. ध्यानाशिवाय साक्षात्कार होत नाही. वसुदेव-देवकीने अकरा वर्षें कठोर तपश्चर्या केली तेव्हां कान्हा मिळाला.

आज इतक्या वर्षांनंतर मुलाला पाहिले आणि वसुदेव-देवकीचें हृदय भरून आले. त्यांना बोलायचे तर पुष्कळच होते, परंतु प्रेम आणि भावावेशामुळे नुसते पाहात राहिले. सगळेच परस्परांना प्रेमपूर्ण दृष्टीच्या संतोषानें पाहात आहेत.

तेव्हां कृष्ण म्हणाला – आई! बाबा! चारी पुरुषार्थ सिद्ध करणारे हें मानवशरीर तुम्हीच मला दिलेले आहे. माझा अपराध क्षमा करा. आता मी कधीच तुमच्यापासून दूर जाणार नाही. माझा नमस्कार स्वीकारावा.

मथुरेतील यादवांनी कृष्णाला हत्तीवर बसवून सगळ्या नगरांतून फिरविले. नंदबाबांना वाटत आहे कीं कृष्णाचा इतक्या धूमधडाक्यानें सन्मान तर करीत आहेत पण कोणी हें विचारले नाही कीं त्याला भूक लागली आहे का ? ते लोणी-खडीसाखर घेऊन आले आणि कन्हैयाला हत्तीवरून उतरवून जबरदस्तीने खायला घातले. रस्त्यांत जिथे कुठे विश्रांति घेतली तिथे विश्रामघाट झाला.

कंसाचा वध झाल्यावर मथुरेचें राज्य कृष्णाच्या आधीन झाले. परंतु त्यांना तर कांही आसक्ति नव्हतीच. म्हणून त्यांनी राज्य उग्रसेनाकडे सोपवून दिले.

वाणी आणि वर्तन एक झाल्याशिवाय वाणी शक्तिशाली होत नाही. ज्ञानाला क्रियात्मक रूप द्यायचे आहे. बंगल्यांत राहून विलासी जीवन जगणारी व्यक्ति वेदान्ताची चर्चा कोणत्या अधिकारानें करू शकेल ? जास्त वाचण्या-शिकण्यापेक्षा जे ज्ञान आहे ते व्यवहारांत आणण्याची अधिक आवश्यकता आहे. श्रीकृष्णाने आपला उपदेश कार्यान्वितही केला. त्यांनी गीतेंत निष्काम कर्माचा उपदेश दिला आहे. त्याप्रमाणें मथुरेचे राज्य उग्रसेनाला देऊन आदर्श व्यवहारांत आणून दाखविला.

युद्धभूमीवर कृष्णाने अर्जुनाला अनासक्ति वृत्तीचा उपदेश दिला होता. ती अनासक्ति जीवाच्या परिपूर्णतेसाठी संसारांत आवश्यक आहे. संसार नव्हे, तर त्याची आसक्ति बाधक आहे.

लोकांनी श्रीकृष्णाला मथुरेचें राज्य स्वीकारण्याचा आग्रह केला तर तो म्हणाला, ' मी राज्याच्या लोभानें नाही तर लोकांची पीडा दूर करण्यासाठी कंसाचा वध केला आहे. कंसाचे वडील उग्रसेन यांनाच राजा केले पाहिजे. मी तर तुमचा सगळ्यांचा सेवक आहे. गर्गाचार्य नंदाला म्हणाले, श्रीकृष्ण वसुदेवाचा मुलगा आहे. आपला नाही. यशोदेने मुलीला जन्म दिला होता. आता कन्हैया गोकुळांत राहणार नाही, मथुरेंत राहील. हे ऐकून नंदबाबा व्याकुळ झाले.

बलराम आणि श्रीकृष्ण नंदांना भेटायला आले आणि म्हणू लागले, बाबा, आम्ही जेव्हां त्या मल्लांशी लढत होतो तेव्हां आम्हाला हनुमंताचें दर्शन झाले होते.

नंदबाबा समजले कीं त्यांनी हनुमंतांना नवस केला होता म्हणून त्यांनी मुलांचे रक्षण केले. जर असे नसते तर माझी ही मुले त्या मल्लांना कशी हरवू शकली असती ? नंदबाबा फार भोळे आहेत.

श्रीकृष्ण नंदांना म्हणाले, लोक कांही का म्हणेनात, आम्ही तर तुमचेच आहोत. तुम्हीच माझे वडील आहांत. मी कंसाचा वध केला आहे म्हणून जरासंध, दंतवक्त्र इत्यादी राजे माझे शत्रु झाले आहेत. जर मी गोकुळांत गेलो तर ते सर्व तिथे माझ्याशी लढायला येतील आणि सगळ्या गोकुळवासीयांना सुद्धा त्रास देतील. म्हणून कांही काळ मी येथेच राहून त्यांचा पराभव करून गोकुळांत येईन. आपल्या

आशीर्वादानें सर्व कांही चांगले होईल. मी इथले काम पूर्ण करून आपल्याकडे परत येईन. आपण गोकुळांत चला आणि माझी आई, सख्या आणि गाई यांचा सांभाळ करा. माझ्या आईला सांगा कीं तिचा कान्हा अवश्य परत येईल.

प्रेमांत आग्रह होऊ शकतो, दुराग्रह नाही.

नंदबाबा म्हणू लागले— मी दुराग्रह कसा करू ? मी तर तुझ्या सुखाचीच इच्छा केली आहे. आम्ही आपल्या सुखासाठी नाही, तुझ्या सुखासाठीच प्रेम केलें आहे. मी नारायणाची नेहमी प्रार्थना करीत राहीन कीं त्याने तुला सुखी ठेवावे. कधी तरी व्रजांत अवश्य ये.

कन्हैया— हो ! हो ! माझें काम पूर्ण करून मी अवश्य परतेन. माझ्या आईला सुद्धा हेच सांगा. माझ्या गाईंचीसुद्धा देखभाल करा. हा प्रसंग भागवतात नाही परंतु इतर ग्रंथांत आहे.

गोकुळांतील कृष्ण अनुपम आहेत. त्यांचें स्वरूप दिव्य आहे आणि आनंद अलौकिक ! परंतु तत्त्वतः गोकुळ आणि मथुरेंतील कृष्ण एकच आहेत.

सद्गुरूंची सेवा तर ईश्वराला सुद्धा करावी लागते. गुरुसेवेचा आदर्श स्थापित करण्यासाठी श्रीकृष्ण क्षिप्रा नदीच्या किनारी उज्जैन क्षेत्रांत सांदीपनी ऋषींच्या आश्रमांत विद्या ग्रहण करायला गेले.

**२७. सांदीपनी आश्रमांत श्रीकृष्ण :**

सुपात्र संतांची सेवा केल्याशिवाय ईश्वराची प्राप्ति होऊ शकत नाही. एखाद्या तपस्वी, पवित्र संताची तन, मन आणि धनाने सेवा कराल तर त्यांच्या अंतरंगाचे आशीर्वाद मिळतील. मनुष्याला अशी संतसेवा आवश्यक आहे. सेवेद्वारा प्राप्त विद्या सफल होते. पुस्तकें वाचून मिळविलेले ज्ञान धन आणि प्रतिष्ठा देऊ शकते परंतु मनाला शांति देऊ शकत नाही. संत नुसते बोलूनच नव्हे, तर मौन राहून देखील उपदेश देतात. संतांचा प्रत्येक व्यवहार ज्ञान आणि भक्तीने भरलेला असतो. फक्त सेवाविहीन मिळविलेली विद्या, अभिमानसुद्धा आणीत असते. पवित्र संतांची सेवा करून मिळविलेली विद्या विनय आणि विवेक आणीत असते.

श्रीकृष्ण गुरूंसाठी वनांतून लाकडे आणीत असत आणि पाणी सुद्धा भरीत असत.

प्राचीन काळचे गुरू विरक्त असत म्हणून त्यांचे शिष्य सुद्धा तसेच होत असत. वैराग्याशिवाय विद्येला शोभा नसते. जर विद्याभ्यासाच्या काळांत विद्यार्थी विलासी जीवन घालवील तर विद्या नष्ट होऊन जाईल. भगवंतांचें विद्यार्थीजीवन फार संयमी होते.

गुरूचे चांगले-वाईट विचार, संस्कार इत्यादी सर्व कांही विद्यार्थ्यांच्या आचरणांत-अनुकरणांत येत असते. आजकालचे तर प्रोफेसरच विलासी असतात. म्हणून विद्यार्थ्यांचे विलासी होणें स्वाभाविकच आहे. विलासी शिक्षकाने शांकरभाष्य शिकविणें निरर्थक आहे. प्राचीन गुरू तर स्वतः संयमी असत म्हणून त्यांचे शिष्यही संयमी होत असत. संयमच सुखदायी आहे. विद्यार्थी अवस्थेंत संयम फार आवश्यक आहे.

आजकाल पैसे मिळविण्याची विद्या शिकविली जाते, सांसारिक बंधनापासून मुक्त करणारी विद्या नाही. गावात शिकण्याची योग्य व्यवस्था नाही आणि शहरांत तर केवळ पैसे मिळविणेंच शिकविले जाते. आजकाल आत्मविद्या, अध्यात्मविद्या यांची तर नावनिशाणीही शिल्लक राहिलेली नाही. आत्मापरमात्मा, त्या दोघांचा संबंध जाणणें जीवनाचें खरें लक्ष्य असूनही हें कांहीच शिकविले-समजविले जात नाही. ज्ञान तर वाढतच चालले आहे. पण विद्या कमी कमी होत आहे. ज्ञानाचा उपयोग छलकपटासाठीच

केला जातो.

विद्या तर तीच कीं जी प्रभुचरणापाशी घेऊन जाईल– मुक्ति देईल.

गुरुकुलांत शिकायला आलेल्या एका ब्राह्मणपुत्राशीं श्रीकृष्णाची मैत्री जमली. तो सौराष्ट्रांतील होता आणि त्याचें नाव होते सुदामा. श्रीकृष्णाच्या आणखी कोणत्या मित्राचा भागवतांत उल्लेख नाही.

सुदामाचा अर्थ आहे इंद्रियांचें दमन-निग्रह करणारा. इंद्रियांच्या निग्रहावाचून विद्याही मिळत नाही, आणि ती फळतही नाही. विद्यार्थ्यासाठी इंद्रिय-दमन फार आवश्यक आहे. अशी सूचना देण्यासाठीच कदाचित सुदामाशिवाय इतर कोणाही सहाध्यायींचा निर्देश भागवतांत नाहीं.

सुदाम्याशीं मैत्री करणाराच सरस्वतीची उपासना करू शकतो. सुदामा अशा संयमी व्यक्तीचें प्रतीक आहे कीं जो परमात्मा प्राप्त करू इच्छितो.

परमात्म्याचें दर्शन होण्यासाठी संयमाशिवाय विद्या प्राप्त होऊ शकत नाही. संयमाशिवाय जीवन दिव्य होत नाही. संयम आणि वैराग्य वाढवीत चला. ज्या सुखाचा त्याग केला असेल तेच सुख पुनः उपभोगण्याची इच्छा झाली तर हे थुंकी चाटण्यासारखेच आहे. त्याग केलेल्या विषयाची इच्छा केव्हांच करू नये.

शास्त्र आणि ईश्वर, जीव आणि पशूंसाठी नाही, तर मनुष्यासाठी आहेत.

सुदामाशीं मैत्री कराल तर द्वारकानाथ मिळतील. सुदामा सर्वोत्तम संयमाचें साक्षात रूप आहे. मनाला अंकुशांत ठेवा.

जो आत्मतत्त्वाचें संदीपन करील तोच सांदीपनी. तोच गुरू होय. सद्गुरू बाहेरून कांही आणून देत नाहीत. ते तर जे आंत आहे त्यालाच जागृत करतात. ज्ञानमार्ग तर प्राप्ताचीच प्राप्ती करून देतो.

पृथ्वीवर श्रीकृष्णालासुद्धा गुरुजींची आवश्यकता असते. भगवंत सुदामारूपी संयमाशी मैत्री करून सदाचारपूर्ण जीवन जगले. आजचा विद्यार्थी देखील जर सुदामाशीं मैत्री करून विद्याभ्यास करील तर त्याची विद्या सफल होईल. पण तसे हल्ली कोठे आहे ?

संसारांत राहून ब्रह्मचर्याचें पालन करणें फार दुष्कर आहे. सात्त्विक वातावरण हृदयाला सुधरविते आणि दूषित वातावरण बिघडविते.

स्वतः ईश्वर असूनही कन्हैयानें गुरुसेवा करून जगासमोर एक आदर्श स्थापित केला.

पितापुत्राच्या वंशाला बिंदुवंश आणि गुरु-शिष्याच्या वंशाला नादवंश म्हणतात. नादवंश बिंदुवंशापेक्षा श्रेष्ठ आहे.

विद्याभ्यास समाप्त झाला तेव्हां कन्हैयाने गुरुदक्षिणा द्यायची इच्छा प्रदर्शित केली. सांदीपनी म्हणाले, क्षिप्रा नदीच्या किनारी वसलेल्या या आश्रमांत फळे आणि पाणी यांची कांही कमतरता नाही. आणि दुसऱ्या कोणत्या वस्तूची मला आवश्यकताच काय आहे ?

कन्हैया– ते तर ठीक आहे, पण गुरुदक्षिणा दिल्यावाचून माझी विद्या असफल होईल; म्हणून आपण कांहीतरी मागावेच.

सांदीपनी– जर एखादा सुपात्र विद्यार्थी मिळाला तर कांहीही मिळण्याची आशा न ठेवता विद्यादान करून विद्यावंश वाढवीत रहा. ज्ञानदानांत कृपणता न करतां, शिष्यपरंपरा वाढवीत राहून विद्यादान करीत रहा. बस, एवढीच माझी इच्छा आहे.

कृष्णांनी गुरूंनी सांगितलेल्या उपदेशाचें पूर्णतः पालन केले. त्यांनी अर्जुनाला युद्धक्षेत्रांत गीतेचें दिव्य ज्ञान तर दिले, परंतु त्याच्या जवळून कांहीच घेतले नाही. त्यांनी अर्जुनाला केवळ ज्ञानच दिलें

नाही तर त्याची आणि त्याच्या अश्वांची सेवा पण केली. महाभारतांत लिहिलें आहे कीं रात्रीच्या वेळीं थकलेला अर्जुन झोपी जाई तेव्हां श्रीकृष्ण त्याची सेवा करीत आणि घोड्यांची पण देखभाल करीत. घोड्यांच्या जखमांना मलमपट्ट्या सुद्धा करीत.

अर्जुन श्रीकृष्णाला आपला गुरू मानीत असे, परंतु श्रीकृष्णांनी त्याला शिष्य न मानतां सखाच मानले. ज्ञानोपदेश केला, पण गुरुदक्षिणा किंवा इतर कांही मोबदला घेतला नाही.

गुरु निरपेक्ष असायला हवेत आणि शिष्य निष्काम; परंतु आजकाल लहानमोठे सर्वच लोक दोन्ही हातांनी सर्व कांही गोळा करू इच्छितात. लोकांची इच्छा असते कीं एखाद्या संत महात्म्याच्या आशीर्वादाने संपत्ति, संतति मिळेल तर किती चांगले होईल. परंतु जो खरा संत असतो तो सांसारिक गोष्टींचा आशीर्वाद देत नाही. खरा संत तर विकार-वासना नष्ट करणाऱ्या अलौकिक भजनानंदाचेच दान करतो.

कन्हैया गुरुपत्नीस म्हणाला– गुरुजी तर कांहीच मागू इच्छित नाहीत. पण तुमची कांही इच्छा असेल तर मागू शकता.

गुरुपत्नी म्हणाल्या– माझा एक मुलगा होता, तो प्रभास यात्रेच्या वेळीं समुद्रांत वाहून गेला. जर तुला गुरुदक्षिणा द्यायचीच आहे तर तो माझा हरवलेला मुलगा आणून दे.

श्रीकृष्णांनी समुद्रांत बुडी मारली. तेथे त्यांना पांचजन्य शंखही मिळाला आणि गुरुपुत्र पण. ते मुरलीधर होते ते आता शंखधारीही झाले.

पुत्र मिळाल्याने गुरुदंपति प्रसन्न झाली. त्यांनी आशीर्वाद दिला– बेटा, तुझ्या मुखांत सरस्वती आणि चरणाशी लक्ष्मीचा वास राहील. तुझी कीर्ति विश्वव्यापी होईल. माझ्या विद्येचा वंश वाढवीत रहा.

गोपींनी सुद्धा भगवंतापासून कांहीच मागितलें नाही, म्हणून ते स्वतः त्यांचे ऋणी झाले. भगवंतापासून कांहीच मागू नका.

भगवंताची गोकुळलीला अकरा वर्षांची, मथुरालीला चौदा वर्षांची आणि द्वारकालीला शंभर वर्षांची होती. ते पृथ्वीवर एकशेपंचवीस वर्षे सशरीर राहिले होते.

विद्याभ्यास संपवून श्रीकृष्ण मथुरेला आले. यादवांना परम आनंद झाला. मथुरेच्या राजप्रासादांत भगवंतांनी निवास केला.

## २८. उद्धव–गोपी भेट, ज्ञान–प्रेमलक्षणा समन्वय:

आता उद्धवागमनाचा प्रसंग येत आहे.

उद्धवागमनाची कथा वक्त्यासाठी एक आवाहन आहे असें दक्षिणेकडील महात्म्यांचें मत आहे. या प्रसंगांत ज्ञान आणि भक्तीचा मधुर कलह आहे. यांत ज्ञान आणि भक्तीचा समन्वय पण आहे. उद्धव निर्गुण ज्ञानाचे पक्षधर आहेत, तर गोपी शुद्ध प्रेमलक्षणा-सगुण भक्तीच्या. तसा तर भक्ती आणि ज्ञानांत कांहीच फरक नाही. भक्तीचीच परिणति म्हणजे ज्ञान होय.

ज्ञानाच्या अभावी भक्ती आंधळी आहे आणि भक्तीच्या अभावी ज्ञान पंगु. भक्तीसाठी ज्ञान आणि वैराग्य दोन्हींचीही आवश्यकता आहे. ज्ञान आणि वैराग्याविना भक्ती वंध्या राहते.

आरंभी जर स्वतःला ईश्वराचा दास मानून दासोहम्च्या भावनेने ईश्वराची आराधना केली गेली तर भगवंताची ओढ लागू शकते. समजून चला कीं तुम्ही भगवंताचे आहात आणि भगवंत तुमचे.

असा अनुभव आला म्हणजेच देहभान विसरले जाते, तेव्हां 'मी' चे अस्तित्व मिटून जाते आणि फक्त भगवंताच्याच अस्तिवाचा अनुभव होऊ लागतो. पुढे जाऊन भगवंताशी तादात्म्य वाढत जाते, दासोऽहम् अवस्थेपासून सोऽहम् च्या अवस्थेकडे प्रगति होते.

भक्तीच ज्ञान आहे आणि ज्ञानच भक्ती. हे दोन्ही जेव्हां एक होतात तेव्हांच जीवनाचे सार्थक होते.

कांही ज्ञानी असें समजतात कीं त्यांना भक्तीची आवश्यकता नाही. ते भक्तीचा तिरस्कार करतात. याचप्रमाणे काही भक्तजन ज्ञान आणि वैराग्याची उपेक्षा करतात. या दोघांचेही दृष्टीकोन चूकीचे आहेत. भक्ती आणि ज्ञान परस्परांचे पूरक आहेत. एकाच्या अभावी दुसरा पंगू होतो. भक्ती आणि ज्ञान दोघांचीही आवश्यकता आहे. ज्ञान-वैराग्यासहित भक्ती असली पाहिजे. वैराग्याविना भक्ती कच्ची राहते. दोघांनाही एकमेकाची आवश्यकता आहे.

उद्धव ज्ञानी तर होते पण त्यांच्या ज्ञानाला भक्तीची जोड नव्हती. भक्तीरहित ज्ञान अभिमानी होते. भक्ती ज्ञानाला नम्र करीत असते. भक्तीची जोड नसेल तर ज्ञान अभिमानामुळे जीवाला उद्धट करील. ब्रह्मज्ञान झाल्यानंतरही जर स्वरूपावर प्रीति नसेल तर ब्रह्मानुभव व्हायचा नाही. खरा ज्ञानी तोच की जो परमेश्वरावर प्रेम करतो. ज्ञानी झाल्यावर धन, प्रतिष्ठा, आश्रम इत्यादी आले तर पतनच होईल. ज्ञान्याला देखील भक्तीची आवश्यकता आहे. जीव ईश्वरावर जेव्हा प्रगाढपणे प्रेम करू लागेल तेव्हाच तो आपल्या मूळ रूपाचे दर्शन देईल.

मनुष्य आपली सर्व धनसंपत्ती केवळ आपल्या खास व्यक्तींनाच दाखवत असतो, सांगत असतो. भगवंतही तसेच आहेत. ते सुद्धा आपल्या खऱ्या भक्तालाच आपले खरे रूप दाखवितात. जर एक साधारण मनुष्य देखील आपल्या प्रेमाच्या व्यक्तिशिवाय कोणालाही आपले अंतर दाखवीत नाही तर भगवंतांनी सुद्धा आपल्या भक्ताशिवाय दुसऱ्या कोणाला आपले रूप का दाखवावे ?

भक्तीशिवाय ज्ञान आणि ज्ञानाशिवाय भक्ती अपूर्ण आहे. भक्तीला जर ज्ञानाची जोड नसेल तर ईश्वराच्या सर्व व्यापकतेचा अनुभव येऊ शकणार नाही. एकाच जागी आणि एकाच वस्तूमधे ईश्वराचे अस्तित्व मानणारा वैष्णव अधम आहे. प्रत्येक ठिकाणी ईश्वराला पाहणारा महान वैष्णव आहे.

वैराग्य नसले तरी भक्ती घराच्या एखाद्या कोनाड्यांतच देवाला पाहात राहील. जर भक्तीबरोबर ज्ञान असेल तर कणाकणांत भगवंताचे दर्शन होईल.

उद्धवांचे तत्त्वज्ञान आणि गोपींची प्रेमलक्षणा भक्ती दोन्हीही आपापल्या जागी महत्त्वपूर्ण आहेत. परंतु दोघांचाही समन्वय आवश्यक आहे. उद्धवांची निष्ठा ज्ञानांत आहे आणि गोपींची प्रेमात. ज्ञान प्रेमाविना शुष्क आहे, निरर्थक आहे. परमात्म्याचे ज्ञान झाल्यावरसुद्धा जर त्यांच्यावर प्रेम जडू शकले नाही तर परमात्म्याचा अनुभव होऊ शकणार नाही. ज्ञान प्राप्त झाल्यावरसुद्धा प्रेमाची प्राप्ति तर करावीच लागेल.

गोपी प्रेमाच्या ध्वजा आहेत, तर उद्धव ज्ञानाची मूर्ती! ज्ञान, भक्ती आणि वैराग्य तिन्हींचा समन्वय झाल्यावरच परमेश्वराचा साक्षात्कार होईल.

उद्धव ज्ञानी तर होते, पण त्यांचे हृदय प्रेमशून्य होते, शुष्क होते. म्हणून त्यांना अलौकिक आनंद मिळत नव्हता.

ज्ञान चर्चेचा नव्हे, तर अनुभवाचा विषय आहे. ज्ञानी केव्हा केव्हा अहंकारी होतो.

भक्त नेहमी नम्र असतो. भक्तीचे आसनच नम्रता आहे. भक्त स्वतःला जगाचा सेवक मानतो.

हे जगत् वासुदेवमय आहे, भगवंताचेच एक स्वरूप आहे.

गोपींची भक्ती ज्ञानोत्तर होती, तर उद्धवांना ज्ञानोत्तरही भक्ती होऊ शकते हे ठाऊकच नव्हते.

उद्धव ज्ञानालाच सर्व काही समजत होते. म्हणून त्यांना प्रेमलक्षणाभक्तीचा पाठ शिकविण्यासाठी भगवंतांनी व्रजात पाठविले.

श्रीकृष्णांनी विचार केला की जर गोपींना ज्ञानाचा अनुभव येईल तर त्यांना दुःख इत्यादी त्रास देणार नाही आणि उद्धवाला जर भक्तीचा अनुभव होईल तर त्याचे ज्ञान सफल होईल. उद्धवाच्या ज्ञानात अभिमानाचा अंश होता. गोपींच्या प्रेमलक्षणाभक्तीच्या पुटामुळे ज्ञान परिपक्व होईल आणि उद्धवाचे कल्याणही होईल. त्यांचा ज्ञानाभिमान नष्ट करून त्यांचे कल्याण व्हावे ही श्रीकृष्णांची इच्छा आहे.

गोपींना उद्धवांपासून ज्ञानार्जन झाले तर माझा विरह त्यांना त्रास देणार नाही. त्यांना अनुभव होत राहील की मी त्यांच्या समीपच आहे. मला गोपींचेही कल्याण करायचे आहे आणि उद्धवांचे सुद्धा.

उद्धवागमनाचा पाठ करता करता एकनाथ महाराज तीन दिवसपर्यंत समाधीसुखांत मग्न होते.

गुरुकुलात विद्याभ्यास पूर्ण करूनच श्रीकृष्ण मथुरेला आले. उग्रसेन राजा मोठा विवेकी होता. तो भगवंतांना म्हणाला, हे सगळे राज्य आपलेच आहे. मी आपला सेवक आहे. आपली आज्ञा मला शिरसावंद्य होईल.

श्रीकृष्णाची गोकुळलीला संपून मथुरालीलेस आरंभ झाला. आता ते मथुरानाथ आहेत. येथे ऐश्वर्याचे प्राधान्य आहे. गोकुळातले गोपाळ आता मथुरेचे अधिपति आहेत. गाई चारणाऱ्या कन्हैयाची आता अनेक दास-दासी सेवा करीत आहेत. उद्धव देखील श्री अंगाची सेवा करीत आहेत. सगळ्याच प्रकारचे सुख आणि ऐश्वर्य सेवेशी उपस्थित आहे.

जीवन ऐश्वर्यमय झाले परंतु भगवंत व्रजवासियांचे प्रेम विसरत नाहीत. राजप्रासादाच्या दालनांत बसून ते गोकुळचे दृश्य पाहात राहतात. ते वारंवार यशोदेची आठवण करतात. ती माझी वाट पाहात रडत असेल. भोळी माता! माझे शब्द आठवून माझी वाट पाहात बसली असेल.

माझ्या प्रिय गायी आणि त्यांची वासरे काय करीत असतील? मथुरेकडे तोंड करून मला हाका मारीत असतील.

माझे बाबासुद्धा माझी आठवण करीत असतील.

याप्रमाणे ते पाळीपाळीने सर्वांची आठवण करीत असत, आणि डोळ्यांतून अश्रू पण गाळीत असत.

मथुरेत ऐश्वर्य तर होते पण प्रेम नव्हते. प्रभूला तर त्यांच्यावर प्रेम करणाऱ्या जीवांची आवश्यकता असते. त्यांच्या ऐश्वर्यावर प्रेम करणाऱ्यांची नाही.

श्रीकृष्ण पुनःपुन्हा व्रजवासियांची आठवण काढून रडत राहात. माता, पिता, गोपी, गायी, सर्वांची आठवण येऊन त्यांना रडू येत असे.

प्रेमळांच्या विरहात वाहणारे अश्रू सुखदायी वाटतात. विरहात अश्रूच तर साथ देतात.

जीवाने ईश्वरस्मरण करणे ही तर साधारण भक्ती आहे. परंतु ज्या जीवाचे स्वतः ईश्वर स्मरण करील तर तो असाधारण भक्त झाला. असाच भक्त श्रेष्ठ होय. भक्ती कराल तर अशी करा की स्वतः भगवानसुद्धा तुमचे स्मरण करतील.

संध्याकाळ झाल्यावर गच्चीवर बसून व्रजवासियांच्या आठवणीने अश्रू ढाळण्याचा नियमच होऊन गेला होता. ते गोपींची आठवण करीत, गाईंची आठवण करीत आणि मातापित्यांची पण आठवण करीत. रडत असणाऱ्या मातेचे कोण सांत्वन करून धीर देत असेल? व्याकुळ गाईंना कोण खाऊ घालत असेल? सगळ्यांचीच आठवण येऊन त्यांचे हृदय भरून येत असे.

प्रेम करणाऱ्यांच्या विरहात-आठवणीत तल्लीन होऊन अश्रू ढाळल्याने दुःख थोडे कमी होते. जीव हलका होतो.

उद्धवांना हे समजले आणि ते विचारात पडले. सुवर्णाचा राजप्रासाद, छप्पन्न भोगांची भोजन सामुग्री, सेवेसाठी अनेक दासदासी उपस्थित, तरीसुद्धा त्यांना कोणत्या दुःखामुळे रडू येत असेल? आमच्या सेवेत तर काही कमी होत असेल का?

सेवक जर स्वतः सुख भोगण्याची इच्छा करील तर तो चांगल्या तऱ्हेने सेवा करू शकणार नाही. सेवा तोच करू शकतो की जो स्वतःच्या सुखाचे बलिदान करतो.

माझ्या सुखासाठी मी प्रभूला कधी कष्ट देणार नाही. जर काही दुःखद प्रसंग येतील तर मी मानीन की हे तर माझ्याच कर्माचे फळ आहे. आपले दुःख दूर करण्यासाठी मी प्रार्थना करणार नाही.

उद्धवाला वाटले, प्रभूंना त्यांच्या दुःखाचे कारण विचारलेच पाहिजे. ते गच्चीवर आले. त्यावेळी भगवान गोकुळची आठवण करून रडत होते. उद्धवाला येताना पाहिले तर त्यांनी आपल्या दुःखाचा वेग आवरून स्वस्थ व्हायचा प्रयत्न केला, आणि पुढे होऊन उद्धवांचे स्वागत केले. उद्धव नमस्कार करून बसले.

प्रेम प्रदर्शनाची अपेक्षा ठेवीत नाही. ते तर हृदयांतच सामावून राहू इच्छिते. प्रेम फक्त आपल्या प्रियपात्रासमोरच प्रगट होऊ पाहते, इतर कोणासमोर नाही.

म्हणून प्रभूंनी शांत होऊन उद्धवांचे स्वागत केले.

उद्धव — प्रभू! एक विशेष गोष्ट विचारायच्या इच्छेने आलो आहे.

कृष्ण — तू तर माझा अंतरंग मित्र आहेस. जी इच्छा असेल ते विचारू शकतोस.

उद्धव — मी आणि इतर सर्वच सेवक-सेविका यथामति आणि यथाशक्ति आपली सेवा करीत आहोत. तरी पण आपण प्रसन्न दिसत नाही. भोजनाच्या वेळी सुद्धा आपले हृदय भरून येते. काल आपण निजले असता मी चरणसेवा करीत होतो. तेव्हा आपण 'राधे राधे' हाका मारीत होता. अशी कोण आहे ती राधा जी आपल्या हृदयसिंहासनावर अधिष्ठित होऊन आपल्याला त्रास देत असते? आपले दुःख माझ्याच्याने पाहवत नाही.

श्रीकृष्ण — सगळ्या मथुरेत माझ्या दुःखाची चौकशी करणारा तूच एक निघालास. काय काय सांगू मी तुला?... माझे खरे आईबाप तर देवकी-वसुदेव आहेत, परंतु गोकुळांत राहणारे यशोदा-नंदसुद्धा माझे माता-पिता आहेत. माझी आई मला किती प्रेमाने खाऊ-पिऊ घालीत असे. मला माझ्या सख्या, माझे मित्र आणि माझ्या गायींची देखील आठवण येत असते. सर्वच बाळ-गोपाळ मला आपापल्या घरून आणलेली शिदोरी खाऊ घालीत. कोवळ्या कोवळ्या पानांची शेज करून मला निजवीत आणि माझ्या गाईंची राखण करीत. मी आपले आई-बाप, मित्र, सख्या यांना कसे विसरू?

मी जेव्हा कालिया नागाचे दमन करण्यासाठी यमुनेत उडी टाकली तेव्हा सगळ्याच गाई रडू लागल्या होत्या आणि जेव्हा मी कुशलपूर्वक बाहेर निघून आलो तेव्हा आनंदाने बेहोष झाल्या होत्या. उद्धवा, त्या गाईंची मला पुनःपुन्हा आठवण होते रे!

उद्धवा! वृंदावनाची प्रेमभूमी सोडताना मला फार दुःख झाले आहे. इथे मला मथुराधिपति केले गेले आहे. सगळे मला नमस्कार करतात, सेवेसाठी मागे मागे फिरत असतात. परंतु येथे माझ्यावर प्रेम करणारा कोणीच नाही. मी व्रजाला विसरू शकत नाही. माझी आई, सख्या इत्यादींसारखे प्रेम करणारे येथे आहेच कोण? मला मान किंवा ऐश्वर्याची नाही, परंतु प्रेमाची-स्नेहाची अपेक्षा आहे.

जीव अपात्र आहे तरी पण प्रभु त्याला धन, प्रतिष्ठा आणि प्रेम देतात. जीव दुष्ट आहे परंतु प्रभु दयाळु आहेत. आमच्या पापाच्या मानाने तर प्रभु आम्हाला फारच कमी शिक्षा देतात. मनुष्य डोळे आणि मनाने इतके पाप करीत राहतो की जर त्या सगळ्या पापांची शिक्षा भगवंत आम्हाला देतील तर आम्हाला पिण्याचे पाणी देखील मिळणार नाही. तरी पण दुःखाची आणि आश्चर्याची गोष्ट अशी की लोक दिवसेंदिवस नास्तिक होत चालले आहेत.

उद्धवा! यशोदेसारखे प्रेम मला इथे दुर्लभ आहे. जोपर्यंत मी खात नसे तोपर्यंत ती उपाशीच राहात असे. इथे भोजनसामग्रीचा तर ढीग आहे, परंतु प्रेमाने खाऊ घालणारा नाही. इथे तर माझी भूकच मरून गेली आहे. जेव्हा कोणी हजार वेळा मनधरणी करील तेव्हा मी खात असे. इथे तर अशी मनधरणी करणारे कोणीच नाही. जेवायला बसलो की माझ्या आईची आठवण होते. मी भोगाचा नाही, प्रेमाचा भुकेला आहे. जो आनंद गोकुळात होता तो येथे नाही. तिथे सखे, सख्या, गाई सर्वच माझी आठवण काढून रडत असतील. मी व्रज विसरू शकत नाही.

उद्धव ज्ञानी आहेत पण प्रेमलक्षणाभक्तीचा महिमा त्यांना ज्ञात नाही. गुरुकृपेविना प्राप्त ज्ञान विवेकयुक्त असत नाही. ज्यांनी गुरुकृपेविना प्रत्यक्ष ज्ञान मिळविले आहे त्यांना अभिमान घेरत असतो. उद्धवाची हीच दशा होती. म्हणून भगवंत त्यांना उपदेश देऊ इच्छितात.

उद्धव म्हणतात— लहानपणी गोपबाळांबरोबर खेळत राहणे ठीक आहे, पण आता तर आपण मथुरेचे राजे आहात. आणि एका राजाने गोपबाळांबरोबर खेळण्याचा विचार करणे योग्य नाही. तुम्ही जर व्रज आणि सर्व व्रजवासियांना विसरून जाल तर मथुरेचे ऐश्वर्य आनंददायी होईल.

ज्ञानाभिमानी उद्धव जाणत नाहीत की ते कोणाला उपदेश देत आहेत.

श्रीकृष्ण— उद्धवा, तू मला व्रज विसरून जायला सांगत आहेस! मी सर्व काही विसरू शकेन पण व्रज विसरू शकत नाही. व्रजवासीसुद्धा माझी खूप आठवण करीत असतील. प्रेम अन्योन्य असते. हो, व्रज विसरण्याचा एक उपाय आहे. जर ते मला विसरतील तर मी पण त्यांना विसरू शकेन.

उद्धवा! तू व्रजाला जा. तिथे त्यांना वेदान्ताचा उपदेश दे आणि त्यांना सांग की त्यांनी मला विसरून जावे. जर ते मला विसरू शकले नाहीत तर मीही त्यांना विसरू शकणार नाही. संसारातील सगळ्या सुखांचा त्याग करून ते सर्वच्या सर्व माझ्याचकरता जगत आहेत. मी परत जाण्याचे वचन दिले होते म्हणून ते माझ्या प्रतीक्षेत प्राण टिकवून आहेत. तू त्यांना उपदेश देऊन निराकार ब्रह्माचे उपासक कर. तसे झाले म्हणजे ते मला विसरतील आणि मीही त्यांना.

मोह एकपक्षी असतो तर प्रेम पारस्परिक असते, अन्योन्य असते.

भक्तिहीन ज्ञानी वाचाळ असतो. भक्तीयुक्त ज्ञानी मौन राखून अध्ययन करतो.

उद्धवाजवळ ज्ञान होते, परंतु भक्ती नव्हती. ते म्हणू लागले— मला तिथे पाठविण्याऐवजी दर आठवड्याला एक पत्र लिहा. तेही आपल्याला पत्र पाठवीत राहतील. याप्रमाणे पत्रव्यवहाराने प्रत्यक्ष भेटीचा आनंद होईल.



प्रेमाचा संदेश पूर्णपणे पत्राने कसा पाठविला जाऊ शकतो? प्रेम तर प्रत्यक्ष भेट झाल्यावरच

पूर्णपणे व्यक्त केले जाऊ शकते!

पत्रात इच्छेप्रमाणे सर्वच कसे काय लिहिता येऊ शकते? पत्र लिहिताना पुष्कळशा मर्यादा बाधक होत असतात.

प्रेमतत्त्वाशी उद्धवाचा परिचय नव्हता. पत्रांत लिहितात, "नेहमी आठवण करीत असलेली." असे कधी होऊ शकते काय? विचार आणि व्यवहारात अंतर असते म्हणूनच पत्रांत सर्व काही मोकळेपणाने आणि खरे खरे लिहिले जात नाही.

उद्धवांना काय माहीत की श्रीकृष्ण आणि गोपी तर एकच आहेत. ते पत्र लिहिण्याचा आग्रह करतात. ज्ञानी पुरुष भक्तहृदयांतील गोष्टी समजत नाहीत. उद्धव प्रेमाचे रहस्य जाणतच नव्हते.

श्रीकृष्ण– उद्धवा! पत्र लिहायचा मी पुष्कळ वेळा प्रयत्न केला, परंतु लिहिताच आले नाही. लिहू तर काय लिहू? मी आपल्या आईला एका पत्राच्या तुकड्याने कसा धीर देऊ? ती तर मला पाहून, छातीला लाऊन, खाऊपिऊ घालूनच शांत आणि संतुष्ट होऊ शकेल.

श्रीकृष्णाने कित्येक वेळा यशोदेला पत्र लिहिण्याची इच्छा केली. परंतु पत्र वाचून आई आणखी आठवण काढून दुःखी होईल असा विचार करून ते थांबून जात. एक तर हा इकडे येत नाही आणि पत्र पाठवून आणखी दुःखी करीत आहे. कृष्ण पत्रात यशोदा शब्द लिहून थांबून जात. पुढे काही लिहू लागत तर डोळ्यांतून अश्रू वाहू लागत.

प्रेमाची भाषाच निराळी आहे. प्रेमभाषा शब्दांच्या सीमेपलीकडे आहे. खरे प्रेम तर हृदयाचे हृदयच ऐकू शकते. पत्रद्वारे पाठविले जाऊ शकत नाही.

उद्धवा, मला हे समजत नाही की मी काय आणि कसे लिहू? म्हणून तू वृंदावनांत जाऊन गोपींना ब्रह्मज्ञान देऊन त्यांना समजून उमजून माझा विसर पडेल असे कर. माझ्या आई-बापांचेपण सांत्वन कर. व्रजात जाऊन सगळ्यांनाच सांग–

उद्धवा! येथे संसारातील सगळे वैभव आहे, परंतु हृदयाचे शुद्ध प्रेम येथे कोठे आहे? मला येथे काही आनंद नाही.

उद्धव समजले की ते ज्ञानी आहेत म्हणून त्यांना व्रजांत पाठविले जात आहे. ते ज्ञानी तर होतेच, पण त्याबरोबर अभिमानी पण होते. ते म्हणतात– महाराज, मला तेथे जायला अडचण तर काही नाही. परंतु गावातील न शिकलेले अडाणी लोक माझ्या वेदान्ताचे ज्ञान कसे समजू शकतील? माझ्या तत्त्वज्ञानाचा उपदेश फार गहन आहे म्हणून माझे तेथे जाणे निरर्थक आहे.

हे भाषण उद्धवांचे नसून उद्धवांच्या ज्ञानाच्या अभिमानाचे आहे. त्यांना अभिमान होता की ते बृहस्पतीचे पुत्र आहेत आणि वेदान्ताचे आचार्य आहेत.

गोपींना वाईट–न शिकलेल्या, अडाणी– म्हटलेले श्रीकृष्णांना ऐकवले नाही. त्यांनी उद्धवांना म्हटले, "माझ्या गोपी शिकलेल्या नाहीत, त्या तर ज्ञानाच्याही पार आहेत. त्या जास्त शिकलेल्या नसल्या तरी शुद्ध प्रेमाच्या ज्ञात्या आहेत. याच कारणाने तर त्या माझी प्राप्ती करू शकल्या आहेत. आणखी काय सांगू?

गोपींचे मन निरंतर माझ्याचकडे लागलेले आहे. त्यांचे प्राण आणि जीवन मीच आहे. माझ्याचसाठी तर त्यांनी आपले पति-संतान, नातेवाईकांचा त्याग केला आहे. त्या मला आपला आत्मा समजतात.

उद्धवा! माझ्या गोपी शिकलेल्या नसूनही प्रेमाच्या मूर्ति आहेत. स्नेहाच्या ज्योति आहेत. प्रेमाची रीत त्यांना चांगली अवगत आहे.

उद्धवा ! माझ्या गोपींना ज्ञानाची आवश्यकता आहे आणि तुला प्रेमाची, भक्तीची. म्हणून तुला तेथे जावेच लागेल.

निव्वळ ज्ञानानेच किंवा निव्वळ भक्तीनेच मनुष्य पूर्ण होत नाही. आयुष्यात ज्ञान आणि भक्ती दोहोंचा समन्वय करून प्रेममय जीवन जगून प्रभूची प्राप्ति करायची आहे.

शब्दज्ञान्याला नम्र व्हायला काही काळ लागतो. त्याच्या मनांत ज्ञानाची ऐट असते. अभिमान त्याला नम्र होण्यापासून रोखतो. विनय आपल्याबरोबर सद्गुण आणीत असतो आणि अभिमान दुर्गुण.

भगवंतांना माहीत होते की अभिमानी उद्धव गोपींना नमस्कारसुद्धा करणार नाही. वंदन केल्याशिवाय कल्याण कसे होईल ? म्हणून त्यांनी आदेश दिला की गोपींना नमस्कार करावा.

उद्धवांची तर काही इच्छा नव्हती, तरी पण भगवंतांच्या आग्रहामुळें ते व्रजाला जायला तयार झाले. आपला आदेशच आहे तर मी तेथे नंद, यशोदा, गोपी आणि गोपाळांना उपदेश देऊन येतो.

प्रभु– त्या सर्वांना सांग की त्यांचा कन्हैया त्या सर्वांची आठवण करीत असतो. आईला सांग की माझ्या विरहांत तू रडू नको.

प्रभूंनी याप्रमाणे सर्व रात्रभर उद्धवांना समजविले. सकाळी उद्धव जाऊ लागले तेव्हा प्रभूंनी आपला पीतांबर आणि वैजयंतीमाला प्रसाद म्हणून देऊन म्हटले– उद्धवा, तू माझा हा प्रसाद धारण करूनच गोपींना भेटायला जा. माझ्या गोपी कोणाही परपुरुषाकडे पाहात नाहीत अन् कोणाही पुरुषाशी बोलतही नाहीत. माझा पीतांबर पाहून त्या तुला माझा दूत समजतील. त्यांचा विश्वास बसेल की तू माझा आहेस. त्या हे समजतील की हा तर आपल्या श्यामसुंदराचा अंतरंग सखा आहे. असा विश्वास बसल्यावरच त्या तुझ्याशी संवाद करतील. म्हणून या दोन्ही गोष्टी धारण करूनच त्यांच्याजवळ जा.

उद्धवा ! तू भाग्यवान आहेस म्हणूनच व्रजभूमीला जात आहेस. व्रज प्रेमभूमि आहे. ती सगळ्यांचेच कल्याण करते. तुझ्या कल्याणासाठीच मी तुला तेथे पाठवीत आहे.

उद्धवांचा रथ चालू लागला तर श्रीकृष्ण त्यांना म्हणाले– माझ्या माता-पित्यांना नमस्कार सांग आणि त्यांना आश्वासन दे की त्यांचा कन्हैया अवश्य येईल. इकडे सांगता सांगता तर कृष्णांना रडू येऊ लागले.

उद्धवाला समजतच नाही की व्रजाची आठवण होताच प्रभूंच्या डोळ्यांतून अश्रू का वाहू लागतात.

जीव जेव्हा आपले जीवन सोडून ईश्वराशी प्रेमाने तन्मय होतो तेव्हा ईश्वरसुद्धा आपले ईश्वरत्व-ऐश्वर्य विसरून जातो.

श्रीकृष्ण-मथुरेचे अधिपति, आपले ऐश्वर्य विसरून जाऊन प्रेमाने वेडे होऊन त्या रथामागे धावत आहेत आणि उद्धवाला संदेश सांगत आहेत. उद्धव म्हणाले– मी रथांत बसलो आहे, आपण राजे आहांत आणि मी सेवक. आपले असे रथामागे धावणे योग्य नाही. आपण काळजी करू नका. मी सगळ्यांना चांगल्या रीतीने उपदेश देऊन येईन.

आता प्रभु थांबले. ते स्वतःशीच म्हणाले, माझा उद्धव भाग्यवान आहे म्हणूनच प्रेमभूमीला पोचत आहे. ते रथाकडे पाहातच राहिले.

इकडे कन्हैया जेव्हापासून गोकुळ सोडून गेला आहे तेव्हापासून वनांतील घनदाट कुंज वैराण होऊन गेल्यासारखे झाले आहेत. यमुनेचे पाणी गोपींच्या अश्रुधारेसारखे वाटत आहे. गाईंनी चारा खाणे सोडून दिले आहे आणि मथुरेच्या दिशेला डोळे लावून त्या बसल्या आहेत. श्यामविरहाने प्रत्येक

व्यक्ति व्यथित आहे, व्याकुळ आहे.

जेव्हापासून कन्हैया मथुरेला गेला आहे तेव्हापासून नंद-यशोदेने एक घासदेखील तोंडात घेतला नाही. जोपर्यंत तो परत येणार नाही तोपर्यंत आम्ही खाणार नाही. रात्री झोपही येत नाही आणि दिवसा चैन पडत नाही.

कृष्णविरहांत जीव व्याकुळ होईल, कासावीस होईल आणि डोळे अश्रुपूरित होतील तरच मनाची मलीनता धुवून जाईल. बाहेरचे पाणी शरीर धुते, विरहाश्रु ह्रदयाची मलीनता धुतात. विरहाश्रु ह्रदयाला शुद्ध पवित्र करतात.

यशोदा कल्पना करीत असे की आपला कन्हैया जेव्हा परतेल तेव्हा मी त्याला आपल्या छातीशी धरीन आणि मांडीवर कुशीत बसवून जेवू घालीन. त्याला खाऊ घातल्यानंतरच मी खाईन. घरातील प्रत्येक वस्तू कन्हैयाची आठवण करायला लावीत असे. या वाटीतून कृष्ण लोणी-साखर खात असे. या पाळण्यात निजत असे. त्या शेजेवर विश्रांति घेत असे. नंद, यशोदा याप्रमाणे बाळकृष्णाच्या आठवणींत चूर असायचे, अश्रू ढाळायचे आणि परस्परांना आश्वासन देत-घेत असायचे.

यशोदा अंगणांत बसून नंदावर रागावत आहे, ' तुमच्यामुळे बाळकृष्ण व्रज सोडून गेला. तुम्ही त्याला गाई चरायला पाठवीत होता. तो म्हणत असे की त्याला इतर गोपबाळे नाचवतात, पळवीत असतात. व्रजवासी त्याला कोरडीच पोळी खाऊ घालीत. म्हणून तो त्रासला आणि गोकुळ सोडून निघून गेला. तो गाईंच्या मागे मागे धांवून थकला-भागला म्हणून येथून निघून गेला.

व्रजांतून जातेवेळी त्याने परत येण्याचे वचन दिले होते. माझे अश्रु त्याला पाहवत नव्हते. जेव्हा केव्हा मी रडू लागे तेव्हा लागलीच तो मला विनवू लागे. आज तो असा इतका निष्ठुर का झाला आहे ? मथुरेच्या लोकांनी त्याच्यावर काही जादूटोणा तर केला नसेल ना ? मी ऐकले आहे की माझा बाळकृष्ण मथुरेचा राजा झाला आहे. या बातमीने मला फार आनंद झाला. परंतु तुम्ही त्याला गाईंच्या मागे धावायला लावीत होता. याच कारणाने तो मला भेटायलासुद्धा येत नाही आणि असे बोलून यशोदा रडू लागली.

नंद– मी कधी पाठविले त्याला गाई चारायला ? तोच म्हणत असे की तो गाईच्या सेवेसाठीच जन्माला आला आहे. त्याला गाईवाचून चैनच पडत नसे. तो जेव्हा येथे होता तेव्हा गाई कशा खाऊनपिऊन धष्टपुष्ट राहात असत. आता तर बाळकृष्णाच्या विरहाने त्यांनी खाणे-पिणेसुद्धा सोडून दिले आहे. हत्तींच्या बच्चासारख्या धष्ट-पुष्ट असणाऱ्या माझ्या गाई आज कशा दुबळ्या होऊन गेल्या आहेत ? माझ्याच्याने तर त्यांची ही दशा पाहवतही नाही. दुःखामुळे मी गोशाळेत पाऊलही ठेवू शकत नाही.

वाटते की बाळकृष्ण मथुरेचा राजा झाल्याबरोबर आपल्या गायींनाही विसरून गेला आहे. तो जर एकदा तरी व्रजाला आला तर व्रज सनाथ होऊन जाईल. मला काय ठाऊक होते की तो मथुरेला गेल्याबरोबर असा निष्ठुर होईल. कृष्णाची गंगी गाय तर भुकेली तहानेली वृंदावनांतच तडफडत भटकत फिरत असते. घरी येतच नाही.

कान्ह्या ! तुझ्या आई-वडिलांसाठी नाही पण निदान आपल्या गायींसाठी तरी एकदा इकडे ये. तुझ्याविना या गायी पहा कशा अशक्त झाल्या आहेत !

तुला गायी प्रिय होत्या म्हणून तू त्यांना चारायला घेऊन जात होतास. मला असे वाटते की मी एकदा तुला मुसळाला बांधले होते म्हणूनच तू रुसला आहेस आणि इकडे येत नाहीस.

याप्रमाणे नंद-यशोदा सारा वेळ कृष्णाच्या आठवणीने व्याकुळ होऊन सर्व वेळ अश्रू ढाळीत

असत. कोणी आग्रह केला तर कधीतरी कंदमुळे खात असत.

एक दिवस ते दोघेही अंगणांत बसून कृष्णाच्या बाललीलांच्या आठवणींत हरवल्यासारखे झाले होते. इतक्यांत तेथे एक कावळा येऊन काव काव करू लागला. कावळ्याचे ओरडणे शुभशकुन समजतात. कावळ्याचे काव काव ऐकले तर यशोदेने म्हटले की आज कदाचित मथुरेहून कोणी येईल. कृष्णाचें वचन आठवून ती कावळ्याला म्हणू लागली, 'माझा कान्हा जर आला तर तुझी चोच सोन्याने मढवून देईन. तुला मिष्टान्न खाऊ घालीन. कन्हैयाच्या आगमनाची बातमी देणाऱ्याची मी जन्मोजन्मी सेवा करीन. माझा बाळकृष्ण केव्हा येणार आहे रे ?'

इकडे उद्धवांच्या रथाने मथुरेची सीमा पार करून व्रजभूमींत प्रवेश केला. व्रजभूमि दिव्य आहे, सात्त्विक आहे, प्रेमभूमि आहे. येथील पशु, पक्षी, वृक्ष सगळे काही दिव्य आहेत. ते सर्वच राधा-कृष्णाचे कीर्तन करतात. वृंदावनाचा महिमा कोण वर्णन करू शकेल ?

कृष्ण गेल्यानंतर गोकुळच्या गवळ्यांची मुलेसुद्धा रोज कृष्णाची वाट पहात. श्रीकृष्णाने संध्याकाळी परतायचे वचन दिले होते, तो येत नाही असे पाहून सर्व मुले रडत रडत घरी परत जात. हा रोजचा क्रम असे.

एक दिवस, श्रीदाम, मधुमंगल इत्यादी सर्व गोपमुले रस्त्यावर बसून कृष्णाची वाट पाहात होती. तेव्हा दुरून एक रथ येताना दिसला. गोपाळांना वाटले बाळकृष्णच आला असेल. ते धावतच रथाजवळ जाऊन पोचले. परंतु रथांत जो बसला होता तो खाली उतरला नाही. जर का कृष्ण असता तर खाली उडी मारून गळ्यात गळा घालून भेटला असता.

उद्धव गोपबाळांना पाहूनही रथांतच बसून राहिले आणि त्यांना म्हणू लागले— मी श्रीकृष्णाचा संदेश घेऊन आलो आहे. ते येणार आहेत. मी उद्धव आहे.

गोपबाळे म्हणू लागली— उद्धवजी ! आम्ही कन्हैयाला सुखी करण्यासाठी त्याची सेवा करीत असू. आम्हाला असे तर कधीच वाटले नाही की तो इतका निष्ठुर होईल. कन्हैयावाचून इथे सर्व काही सुनं सुनं वाटत आहे. बंसी-वट, यमुनेचा काठ, वृंदावन सगळं काही सुनं सुनं आणि उदास झाले आहे. इथे होता तेव्हा तर तो आमच्यावर फार प्रेम करीत असे. परंतु आतां असे वाटते की तो तिथे गेल्यावर आम्हाला विसरला आहे. उद्धवा ! त्याला सांगा की हे गोवर्धननाथ ! व्रजांत सर्वच तुझी आठवण करीत आहेत. त्याच्यावाचून संपूर्ण व्रज उजाड होऊन गेले आहे. तो केव्हा येणार आहे इकडे ?

गोपबाळे उद्धवांना नंदबाबाच्या घराची वाट दाखवीत म्हणू लागले, तुम्ही आलात हे चांगले झाले ! आम्हाला सुद्धा कन्हैयाला निरोप पाठवायचा आहे, पण तुम्ही पहिले नंद-यशोदेकडे जाऊन त्यांचे सांत्वन करा. ते रात्रंदिवस कृष्णाची वाट पाहून रडत आहेत. आम्ही मग भेटायला येऊ.

इकडे यशोदा कावळ्याशी गोष्टी करीत होती. येवढ्यांत रथ अंगणात येऊन पोचला. नंद-यशोदेला वाटले की कन्हैयाच येत आहे. दोघांच्या जीवात जीव आला. दोघेही रथाकडे धावत आले. कन्हैया आला ! बाळकृष्ण आला असे म्हणत ते दोघेही धावत रथापाशी आले. पण त्यात कन्हैया नसून आणखीच कोणी तरी होते. कृष्ण दिसला नाही. कृष्णाला हाका मारीत नंद मूर्च्छित झाले. हे कृष्णाचे नाव घेऊन का रडत आहेत ते उद्धवाला समजलेच नाही.

यशोदा धीर ठेवून एका दासीला म्हणाली— 'ही कोणी मोठी व्यक्ति दिसत आहे, यांचे स्वागत करा. घरात न्या.' उद्धव रथातून उतरून नंदसदनात आले.



उद्धव स्नान-भोजन इत्यादी उरकून विश्रांति घेत पहुडले होते. [illegible] [illegible] कृष्णाच्या मित्राच्या

येण्याचा समाचार सांगितल्यावर त्यांची मूर्च्छा दूर झाली. नंदांनी डोळे उघडले.

नंदांना नमस्कार करीत उद्धव म्हणाले, मी आपल्या कन्हैयाचा मित्र उद्धव आहे, आणि त्याचा संदेश घेऊन आलो आहे.

नंदांनीसुद्धा कुशल विचारले. त्यांना वाटले, कन्हैयाला स्वतःला यायला झाले नाही म्हणून आपल्या मित्राला पाठविले असेल. उद्धवा! चांगले झाले की आपण आलात. कंसाच्या मृत्यूमुळे सगळे यादव सुखी झाले असतील, नाही?

उद्धवा! खरें खरें सांगा. कन्हैया आमची कधी तरी आठवण काढतो का?

उद्धवा, येथील गोप-गोपी, तरुवर, गिरी, गायी, वन सर्वच कन्हैयालाच आपले सर्वस्व समजतात. काय कृष्ण कधीतरी आमचे स्मरण करतो का?

उद्धवा, कन्हैयाला सांगा की, हा गिरिराज, ही यमुना, त्याचीच प्रतीक्षा करीत आहेत. त्याची गंगी गाय तर वनांत भटकत फिरत राहते.

हीच ती यमुना आहे जिच्यांत कृष्ण क्रीडा करीत होता. हाच तो गिरिराज आहे ज्याला कृष्णाने आपल्या बोटावर उचलून घेतले होते. हा तोच वनप्रदेश आहे जिथे श्रीकृष्ण गाईंना चारत चारत बासरी वाजवीत होता. ते मैदान पहा, तिथे कृष्ण आपल्या मित्रांबरोबर खेळत असे. उद्धवा, या सगळ्यांना पाहून माझे मन कृष्णमय होऊन जाते आणि मी वेड्यासारखा होतो.

मला तर असे वाटत आहे की कन्हैया मथुरेत नसून येथेच आहे. मी पहात आहे की तो पाळण्यांत निजला आहे. काल सगळी रात्र मी त्याला पाळण्यात झुलवत होतो अन् त्याच्याशी गोष्टी बोलत होतो. सकाळ झाली तर मला वाटले त्याला जागवावे. नाहीतर गायींना चरायला न्यायला उशीर होईल. जसे मी पाळण्यांत डोकावून पाहिले तसे दिसले की तेथे कोणीच नाही! मी त्याला कसा विसरू?

मला रोज रोज त्याच्या बासरीची तान ऐकू येत असते. कधी कधी असा भास होतो, की कान्हा कदंबाच्या फांदीवर बसून बासरी वाजवीत आहे. मला असे वाटले की तो कितीतरी तासांपासून बासरी वाजवतो आहे तर त्याला भूक लागली असेल. मी लोणी-खडीसाखर घेऊन त्या कदंबावर चढून पहावे तर तेथे कोणीच नाही.

उद्धवा! कित्येक वेळा मला असे वाटते कीं तो माझ्या मांडीवर बसून खेळत आहे, माझी दाढी ओढत आहे. यमुनेत स्नान करायला जातो तर मला वाटते की तो माझ्या मागे मागे आहे.

उद्धवा, मी त्याला आपल्या खांद्यावर घेऊन फिरवीत असे. तर मला कित्येक वेळा असा भास होतो की तो माझ्या खांद्यावर बसलेला आहे. तो काळ आता पुन्हा केव्हा येईल?

उद्धवा! माझा कन्हैया केव्हा परतेल?

त्याने कंसासारख्या राक्षसांचा वध केला म्हणून लोक त्याला ईश्वर समजतात. त्यांना जे ठीक वाटेल ते मानोत. परंतु माझा तर तो मुलगाच आहे. कन्हैया माझा आहे, माझाच आहे! नंदाच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले.

मला तर पाळण्यांत, घराच्या कोपऱ्या कोपऱ्यांत, अंगणात, यमुनेच्या काठी, प्रत्येक ठिकाणी कन्हैयाच दिसतो. उद्धवा, तो परत केव्हा येईल? मी त्याचा असा कोणता अपराध केला आहे की ज्यामुळे तो रुसून बसला आहे.

उद्धवा! वसुदेवांना सांगा की कन्हैया त्यांचाच मुलगा आहे. मी तर त्यांचा दास आहे. कृष्णाला सांगा की त्याची आई साऱ्या दिवसभर रडत असते. तो जेव्हा येथे होता तेव्हा आईची समजूत घालून

देत असे. आता तिची समजूत कोण घालील? नंद इतके बोलता बोलता व्याकुळ होऊन गेले.

उद्धव घोटाळ्यात पडले! मी यांना काय उपदेश द्यावा? यांना तर जिकडे तिकडे कृष्णच दिसत आहे. पाळण्यांत, घरांत, वनांत, अंगणांत, यमुनाकिनारी, कदंबाच्या डहाळीवर, जिकडे-तिकडे कृष्णाचेच दर्शन करीत असतात हे नंदबाबा! ब्रह्माच्या सर्वव्यापकतेचा उपदेश होऊनही मला आजपर्यंत असा अनुभव आला नाही. अशी ब्रह्मनिष्ठा असलेल्या नंदांना मी काय उपदेश देऊ? ते नंदांना म्हणाले– बाबा, धन्य आहांत तुम्ही! आपले जीवन सफल होऊन गेले आहे. आपण कृष्णमय झालेले आहांत.

इतक्यांत तेथे यशोदा येऊन पोचली. उद्धवा! खरं खरं सांगा, माझा बाळकृष्ण खुशाल आहे ना? तो जेवायच्या वेळी खूप हट्ट करीत असे. तो दुबळा तर नाही झाला ना? तो आनंदात आहे ना? माझी कधीतरी तो आठवण काढतो का? त्याची तेथे कोण मनधरणी करीत असेल? गोकुळात होता तेव्हा तर तो माझे अश्रु पाहू शकत नव्हता. तो माझे सांत्वन करीत असे. माझी समजूत घालीत असे.

जेव्हा मी यमुनेला जाते तेव्हा तिचा श्यामरंग मला कन्हैयाची आठवण करून देतो. मला असे वाटते, की आताच तो यमुनेच्या पाण्यांतून बाहेर येऊन माझ्या कुशीत येऊन बसत आहे. त्याला विचारा कीं त्याच्या आईने असा कोणता अपराध केला आहे की तो येथे येण्याचे नावही काढीत नाही. मी एकदा त्याला मुसळाला बांधून ठेवले होते; त्याकरता तो रुसला नाही ना?

त्याला कधी माझी आठवण तरी येते का? मी त्याची आई तर नाहीच. त्याची आई देवकी आहे. देवकीला सांगा की सेविकेची आवश्यकता असली तर मला बोलावून घे. कृष्णविरहात आम्ही मरत आहोत. तो जिथे असेल तिथे आम्हाला न्याल तर भगवान तुमचे कल्याण करील.

मी नारायणाची प्रार्थना करते की वाटल्यास तो येथे न येवो पण जिथे कुठे तो असेल तिथे तो सुखी राहो!

उद्धव — माते! श्रीकृष्ण तुम्हा सर्वांची वारंवार आठवण करीत असतात. ते स्वतःच येथे येणार होते, परंतु मथुरेचे शासन त्यांनी सांभाळले आहे म्हणून त्यांना सवडच होत नाही. मला म्हणाले- मी मथुरेंत येऊन या कारभारांत गढून गेलो आहे, तू आईला माझी खुशाली कळवून ये.

नंद-यशोदेचें प्रेम पाहून उद्धवांचा अर्धा अभिमान तर उडून गेला. जी व्यक्ति पाळण्यांत, घरांत, अंगणांत, वृक्षांत, वनांत जिथे तिथे कृष्णालाच पाहात असेल तिला ब्रह्माच्या व्यापकतेचा कोरडा उपदेश कसा देऊ? ही दोघे तर प्रत्येक ठिकाणीं बुद्धि आणि मनानें ब्रह्माच्या सर्वव्यापी रूपाचा अनुभव घेत आहेत!

गोष्टी गोष्टींतच प्रभात झाली.

ब्राह्ममुहूर्तीं गोपी स्नानादि कर्में आटोपून कृष्णकीर्तन करीत दधिमंथन करू लागत. त्यांचे डोळे ओले होऊन जात.

यशोदेची अनुमति घेऊन उद्धव यमुनेच्या स्नानाला निघाले. सख्यांना सुद्धा कन्हैयाचा संदेश सांगायचा होता. गोपींचें कृष्णकीर्तन ऐकलें आणि त्यांनी अनुमान केलें कीं ज्यांचा आवाज इतका मधुर आहे त्यांचें रूप किती अद्भुतरम्य असेल? त्यांना अजून कोणाही गोपीचें दर्शन झाले नव्हते. ब्राह्ममुहूर्ती कृष्णकीर्तन करणारे हे व्रजवासी धन्य आहेत! कृष्णाच्या केवळ स्मरणानें यांची हृदयें द्रवतात!

उद्धवांचा ज्ञानगर्व हळू हळू नाहीसा होत चालला होता. उद्धवांचें ज्ञान भक्तिरहित होते म्हणून त्यांना कृष्णानें व्रजाला पाठविले होते. उद्धव, नंद-यशोदेसारख्या प्रेममूर्ति पाहून आनंदित झाले.

दधिमंथनानंतर नंदांच्या वाड्याकडे जाऊन नमस्कार करण्याचा गोपींचा नियम होता. आज नंदांच्या अंगणांत त्या सर्व नमस्कारासाठी आल्या तर तेथे रथ पाहिला. रथ पाहून त्यांना अक्रूराचा प्रसंग आठवला. आमच्या कन्हैयाला घेऊन जाणारा अक्रूर पुनः आलेला दिसतोय! कां आला असेल तो?

विरहव्याकुळ ललिता कृष्णाच्या नावाचा घोष करीत चालली होती, तर विशाखा म्हणाली- अग! कृष्ण तर स्वार्थी आणि कपटी होता. राजा झाल्याबरोबर आम्हा सगळ्यांना विसरून गेला. आता मन लावून घरांतली कामें करायची आहेत.

ललिता – मी कृष्णाला विसरायला जितका जितका प्रयत्न करते तितकी तितकी त्याची जास्तच आठवण येते. काल विहिरीवर पाणी भरायला गेले तर बासरीचा सूर ऐकला. मी इकडे तिकडे पाहिलें तर दिसलें कीं कृष्ण झाडाच्या फांदीवर बसून बासरी वाजवीत आहे. कृष्णाच्या दर्शनाने मी इतकी बावळी होऊन गेले कीं घागरीला दोरी बांधायच्या ऐवजी मी आपल्या मुलाच्या गळ्याला दोरी बांधून त्यालाच विहिरींत सोडले. कृष्णानें हें पाहिले तर तो उडी मारून आला, मुलाला बाहेर काढले आणि मला रागें भरू लागला. त्याने मला घरी पोहोचवले व तो निघून गेला. मी त्याला कशी विसरू शकेन?

दुसरी एक गोपी म्हणू लागली – लोक कांहीही म्हणोत, मला तर कृष्ण येथेच दिसत असतो. तो मथुरेला गेलाच नाही. काल संध्याकाळीं पाणी भरण्यासाठी यमुनेला जावे लागले, अंधार व्हायला आला होता आणि मला भय वाटू लागले होते. एवढ्यांत माझ्या डोक्यावर घडा ठेवून आणि गोष्टी बोलत बोलत तो मला घरीं पोचवून गेला. तो म्हणत होता कीं तो येथे व्रजांतच राहतो. मला त्याच्या गोष्टी वारंवार आठवतात. मी त्याचें स्वरूप विसरू शकत नाही. त्याच्याशी गोष्टी बोलल्याशिवाय मला चैनच पडत नाही.

मोठमोठे साधू आणि योगीजन समाधि लावून संसार विसरायचा भगीरथ प्रयत्न करीत असतात; तरी पण त्यांना सफलता मिळत नाही. त्यांची वृत्ति प्रभुमय होत नाही. तर इकडे या गोपी प्रयत्न करूनही संसाराचें स्मरण ठेवू शकत नाहीत. एक पळ देखील कृष्णाला विसरत नाहीत. प्रभूला विसरायचे त्यांचे प्रयत्न निष्फळ होतात.

प्रत्येक वस्तूला विसरणें शक्य आहे. पण आत्म्याला विसरतां येत नाही. श्रीकृष्ण गोपींचा आत्मा आहे म्हणून त्या कृष्णाला कशा विसरू शकतील?

गोपी याप्रमाणें श्रीकृष्णाविषयीं गोष्टी करीत होत्या. एवढ्यांत उद्धव स्नानादि आटोपून भगवंतांनी दिलेला पीतांबर आणि वैजयंतीमाला धारण करून आले. गोपींनी त्यांना नमस्कार केला, तर उद्धवांनी आपला परिचय सांगून म्हटले – मी तुमच्या मथुरावासी श्रीकृष्णाचा अंतरंग सखा उद्धव आहे आणि तुमच्यासाठी त्यांचा संदेश घेऊन आलो आहे.

गोपी – तुम्ही तर नुसते नकलीच पंडित आहांत. श्रीकृष्ण काय नुसता मथुरेंतच राहतो का? तो तर सर्वत्र आहे. तुम्हाला फक्त मथुरेंतच कृष्ण दिसतात, आणि आम्हाला तर येथील कणाकणांत त्यांचे दर्शन होत असते.

तो पहा तिथे कदंबाच्या झाडावर बसलेला कृष्ण बासरी वाजवीत आहे. काय तुम्हाला दिसत नाही तो? ऐकू येत नाही?

उद्धवा, तुम्हाला जर श्रीकृष्णाचा साक्षात्कार झाला असता तर तुम्ही त्यांना तिथे सोडून येथे आलाच नसतां? किंवा तुम्हाला येथेही कृष्णाचें दर्शन झाले असते.

दान, व्रत, तप, होम, जप, वेदाध्ययन, ध्यान, धारणा, समाधी आणि कल्याणाच्या इतर सर्व

साधनांद्वारे ईश्वराचा साक्षात्कार करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ही सर्व साधने भगवत्प्राप्तीसाठीच आहेत.

या गोपींनी तर जप, तप इत्यादी न करताच केवळ प्रेमभक्तीने भगवंताला प्राप्त करून घेतले आहे. त्यांना अनायासेच सर्व कांही मिळालें आहे.

दान, जप, तप, व्रत इत्यादी तर मनाला ईश्वरांत एकाग्र करण्यासाठीच आहे. जर या साधनांच्या प्रयोगानंतर सुद्धा मन ईश्वराकडे लागले नाही तर सर्व कांही व्यर्थच होईल.

उद्धवांनी गोपींना व्यापक निर्गुण ब्रह्माचा उपदेश देण्याचा विचार केला. ते सांगू लागले- निर्गुण ब्रह्माची उपासना करा.

गोपी– उद्धवा! जो आनंद आम्हाला प्रभूने दिला आहे तो आनंद आम्हाला तुमचें कोरडे ज्ञान देऊ शकणार नाही. आम्ही कृष्णजपाशिवाय आणखी कांहीच करणें जाणत नाही. आम्ही तर गावठी न शिकलेल्या गोपी आहोत. तुमचा सगुण निर्गुण ब्रह्माचा विवेक तुम्हालाच लखलाभ होवो. आम्ही तर कृष्णप्रेमांत तन्मय राहतो म्हणून तो आम्हाला प्रत्यक्ष दर्शन देत असतो. तुमच्या त्या निर्गुण ब्रह्माच्या आराधनेसाठी आम्ही मन, चित्त कोठून आणावे? आमचें जे चित्त होते ते तर कान्ह्यानेच चोरून घेतले आहे.

उद्धवा! भगवंतानें प्रत्येकाला कांही दहा-वीस मनें तर दिलेलीं नाहीत; आणि जे एक होते ते तर श्यामसुंदर चोरून घेऊन गेला आहे. आता तुमच्या निर्गुण ब्रह्माची उपासना कोणत्या मनाने करावी?

उद्धवा! त्या नंदनंदनाशिवाय आमचा कोणी ईश्वर नाही. तोच आमचा सर्वस्व आहे.

उद्धवा, त्या कृष्णाच्या गोष्टीच सोडा. त्या काळ्या कपटी कन्हैयाची मैत्रीसुद्धां आम्हाला नको. त्याने आमचें काळीजच कोरून काढलें आहे.

श्यामनी आमच्या ह्रदयांवर घाव घातला आहे, तरी पण त्याला विसरणें, त्याची उपेक्षा करणें आम्हाला अशक्य आहे.

उद्धवा! आम्ही आणखी काय सांगू? सर्वप्रथम आम्ही श्रीकृष्णाचें दर्शन नंदमहोत्सवाचें दिवशीं घेतले होते. आणि तेव्हांपासून त्याने अशी जादू केली आहे कीं आम्ही त्याच्याच झालेल्या आहोत.

उद्धवा, आता या ह्रदयांत आणखी कोणासाठी स्थानच नाही. चालता-फिरता, जागता-झोपता, विचारात– स्वप्नांत त्या श्यामसुंदराचीच मूर्ति सामावलेली असते.

उद्धवा! कृष्णानें आम्हाला रासलीलेचा अवर्णनीय आनंद दिला आणि आता आम्हाला विसरून गेला! असा निष्ठुर कां झाला आहे तो?

उद्धव– नाही! नाही! माझे स्वामी असे नाहीत. ते तर तुम्हा सर्वांची सारखी आठवण करीत असतात.

गोपी– उद्धवा! तुम्हाला जर श्रीकृष्णाच्या मूळ स्वरूपाचें ज्ञान असते तर तुम्ही येथे आलाच नसता. तुम्हाला ब्रह्मज्ञानाच्या गोष्टींनी भ्रमांत टाकले आहे. ज्याला त्याच्या खऱ्या स्वरूपाचें दर्शन झाले आहे तो त्याला केव्हांच सोडू शकत नाही. तुम्ही त्यांना सोडून आला आहांत म्हणून असे वाटते कीं तुम्ही त्याला चांगले ओळखलेच नाही.

अहो उद्धवा! तुम्ही कोणाचा संदेश घेऊन आला आहांत? या अनाथ व्रजाला ते केव्हां सनाथ करणार आहेत?

गोपी वेड्यासारख्या होऊन प्रलाप करू लागल्या. झाडांमध्ये श्रीकृष्णाचें दर्शन घेऊन झाडांनाच आलिंगन देऊ लागल्या. हे आहेत माझे श्रीकृष्ण, असे म्हणू लागल्या.

आता उद्धव अधिक विचारमग्न होत चालले आहेत. ह्या गोपी, हे नंद-यशोदा पाळण्यांत, घरांत, अंगणांत, झाडांत, पाण्यांत, जमिनीच्या कणाकणांत श्रीकृष्ण-ब्रह्माच्या अस्तित्वाचा अनुभव घेत आहेत. हे न शिकलेले— अडाणी असूनही ब्रह्माच्या सर्व व्यापकतेचा अनुभव घेत आहेत. इकडे मी जो वर्षानुवर्षे व्यापक ब्रह्माचा वेदान्त घोकत, चिंतन करीत आलो आहे त्या मला पण त्याचें दर्शन आणि अनुभव होऊ शकलेला नाही. माझें शुष्क ज्ञान निष्फळच राहिले! माझें ज्ञानपांडित्य निरर्थकच राहिलें!

मी बुद्धि चालवीत राहिलो. वेदान्ताच्या सिद्धान्तांत घोटाळत राहिलो, परंतु ब्रह्माचा अनुभव घेऊ शकलो नाही.

ज्ञानार्जन निराळे आणि ज्ञानाचा अनुभव निराळा; आणि ज्ञानार्जनाला महत्त्व असूनही ज्ञानानुभवाचें महत्त्व अधिक आहे.

सख्या उद्धवांना राधिकेच्या दर्शनासाठी घेऊन गेल्या. सख्यांच्या घोळक्यात विराजमान असलेल्या राधिकेची शोभा अवर्णनीय आहे. नऊ वर्षांची-निर्दोष वयाची, साधा शृंगार, मुखावर दिव्य तेजाची प्रभा, सात्त्विकता आणि प्रेमाची मूर्ति, जगताचे आनंददाते श्रीकृष्णांची आनंददायिनी अशा राधिकेला उद्धवांनी साष्टांग नमस्कार केला.

परंतु राधिकेचें शरीर श्रीकृष्णविरहामुळे वाळलेल्या फुलासारखे होऊन गेले होते. मन व्याकुळ आणि व्यथित होते. केस कोरडे, करडे आणि विस्कटलेले होते. चंद्रमुख शुष्क झालेले होते. तोंडांतून वेदनाभरित निःश्वास चालले होते आणि डोळ्यांतून अश्रुधारा वाहात होत्या. ती एक प्रकारच्या दुखावलेल्या वेलीसारखी दिसत होती.

राधा उद्धवांना विचारू लागली— तुम्ही कोणत्या श्रीकृष्णाचा निरोप आणला आहे ? माझे श्रीकृष्ण तर येथेच आहेत. मी वियोगिनी नाही. आंतील संयोगिता राधा श्रीकृष्णाच्या चिंतनांत लीन होऊन गेली.

उद्धवांनी पुनः नमस्कार केला आणि म्हटलें— मी मथुरेहून आलो आहे. श्रीकृष्ण येथे येणार आहेत.

राधा— तुम्ही माझ्या स्वामींचा संदेश आणला आहे काय ? परंतु त्या संदेशाने मला कांही शांति मिळणार नाही. विरहिणीचें दुःख कोण समजू शकेल ? मला शांति देऊ शकेल असें कोणतेच शास्त्र, मंत्र किंवा ज्ञान या जगांत नाही. मी तर प्रतिक्षण श्रीकृष्णाचें भजन, ध्यान आणि दर्शनात दंग आहे.

राधेची क्षीण दशा पाहून सर्वच गोपी, वृक्षवेली, फुलें, कळ्या, पशु-पक्षी रडू लागले. राधेचे दिव्य प्रेम पाहून उद्धवांनाही रडू आले. मी अशा राधेला काय उपदेश देईन ?

राधेच्या मुखकमलाच्या सुवासाने एक भ्रमर आकर्षित होऊन भोवती फिरू लागला. राधिका त्याला दूर सारू लागली. तू तर कपटी आहेस, माझ्या जवळ येऊ नकोस. उद्धवांनी पुन्हा राधेला नमस्कार केला.

सत्तेचाळीसाव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकापासून ते एकविसाव्या श्लोकापर्यंतचे श्लोक "भ्रमरगीत" या नावानें ओळखले जातात. भ्रमरगीतांत तसे तर राधिका भ्रमराला रागे भरत आहे, परंतु त्यांचे लक्ष्य उद्धव आहे. आणि त्याबरोबरच कांही गोष्टी उद्धवाला सुनावल्या आहेत. भ्रमरगीत एकवचनांत आहे आणि वेणुगीत युगुलगीत इत्यादी बहुवचनांत.

उद्धव म्हणतात— कृष्णाला कपटी नको म्हणू. ते तर दयेचे सागर आहेत. तुमच्यापैकी कोणालाच ते विसरलेले नाहीत. तुम्हा सर्वांचीच ते वारंवार आठवण काढीत असतात.

राधा – उद्धवा! तुम्ही त्यांना चांगल्या प्रकारे ओळखलेच नाही. जर तुम्हाला त्यांच्या मूळ स्वरूपाचें ज्ञान झाले असते तर तुम्ही त्यांना सोडलेच नसते. तुम्हाला ज्ञान आणि शास्त्राच्या मोठमोठ्या गोष्टी सांगून तुम्हाला त्यांनी छळलें आहे. तुमच्या शुद्ध ज्ञानाचे या शुद्ध प्रेमाच्या भूमीशीं काय कर्तव्य? ज्ञान आणि योगाची चर्चा येथे अ-प्रस्तुत आहे. प्रेमराज्यांत एकटया प्रियतमाचें तेवढेंच शासन असते. आमचें तर ज्ञान, शास्त्र, कर्म, धर्म सर्व कांही कृष्णच आहे. आमचा श्वास देखील कृष्णमय आहे. तर मग तुझ्या ज्ञानाला आम्ही कोठे स्थान देऊ शकू?

प्रेमभूमींत तुम्ही प्रेमाच्याच गोष्टी बोलू शकता, शुष्क ज्ञानाच्या नाही.

उद्धव – मी तर मथुरावासी श्रीकृष्णांचा निरोप घेऊन आलो आहे; तो असा कीं, ते तुम्हाला विसरले नाहीत आणि तुमच्या प्रेमाची वारंवार आठवण करीत असतात.

राधा – उद्धव, तुम्ही हे काय म्हणत आहांत? भगवान सर्वव्यापी असूनही तुम्ही त्यांना केवळ मथुरावासी म्हणत आहांत! षट्शास्त्रांचा तुम्ही अभ्यास केला आहे पण कोरेचे कोरेच राहिला आहांत! शास्त्रांत बुडी मारून राहिला आहांत पण मोती हाती लागलेला नाही अजून!

उद्धवा, माझे कृष्ण केवळ मथुरेंत नाही, प्रत्येकच ठिकाणीं वसत असतात. मला तर चहूंकडे तेच दिसत असतात. श्रीकृष्ण येथील कणाकणांत आहेत; आमच्या मनांत आहेत, आमच्या ह्रदयांत आहेत. आमच्या रोमरोमांत ते वसलेले आहेत. तो कपटी केव्हां केव्हां समोर दिसतो तर केव्हां केव्हां लपून बसतो. तुम्ही तर त्याची दोनचार महिन्यांपासूनच सेवा करीत आहात. मी तर त्यांची जन्म-जन्मांतरीची दासी आहे. तुम्ही त्याच्याविषयीं काय जाणत असाल? कृष्ण स्वार्थी होता म्हणूनच तर त्याने रामावतारामधे सुग्रीवाचा पक्ष घेतला होता. तो कपटी आहे म्हणूनच तर आम्हाला सोडून गेला आहे.

तुम्ही मला पुनःपुन्हा नमस्कार कां करीत आहांत? येथे कां आले आहांत? तुम्हाला आपल्या कन्हैयाने पाठविलें आहे म्हणून तुमचें स्वागत करतो आम्ही; परंतु आम्हा न शिकलेल्यांचा तुमच्या शास्त्र-ज्ञानाशीं काय संबंध?

उद्धव समजून गेले कीं त्यांचे स्वतःचेच शब्द गोपी परत करीत आहेत. त्यांनी कृष्णाजवळ गोपींना 'न शिकलेल्या' म्हटलें होते.

उद्धव – मला क्षमा करा राधामाई! मी तुमचा अपमान करून अपराध केला होता. तेव्हां मीच अज्ञानी होतो. राधा-कृष्ण अभिन्न आहेत हें आज मी प्रत्यक्ष पाहिलें.

राधा – मी आणि कृष्ण अभिन्न आहोत. तुमची काय इच्छा आहे? आमचे अतिथि आहांत म्हणून तुमची इच्छा पूर्ण करणें आमचें कर्तव्य आहे.

उद्धव – माझी बुद्धि ज्ञानाच्या अभिमानानें कुंठित आणि कठोर झालेली आहे. ज्ञानानें मला जड, शुष्क बनवून टाकले आहे. मला तुम्ही प्रेमलक्षणाभक्तीचें दान करा.

राधेने उद्धवांची इच्छा पूर्ण केली. त्यांना प्रेमलक्षणाभक्तीचें दान मिळालें.

गोपी बाहेर आणि आंत कृष्णाच्या अस्तित्वाचा अनुभव करीत आहेत. राधेने बासरी वाजविली तर 'राधे गोविंद, राधे गोविंद' अशी सुरेख तान घुमू लागली. गोपी देखील कृष्णकीर्तनांत लीन झाल्या.

गोपींची भावभक्ति पाहून श्रीकृष्ण देखील मथुरेंतून धावत येऊन पोचले. सख्यांच्या मंडळांत राधेच्या बरोबर विराजमान झाले. गोपी आणि उद्धवांनी राधाकृष्णाच्या मनोहर रूपाचें दर्शन घेतले. आता त्यांना ते कोण आहेत, कोठून आले आहेत, कां आले आहेत, आणि कोठे आहेत याविषयीं

कांहीच भान राहिलेले नाही.

उद्धवांचा ज्ञानाभिमान समूळ नष्ट झाला. ते दोनचार दिवसांसाठीच गोकुळांत आले होते परंतु तेथे सहा महिने निघून गेले. त्यांची खात्री झाली कीं श्रीकृष्ण गोपींपासून दूरही नाही आणि भिन्नही नाही. जेव्हां जेव्हां गोपी कृष्ण-कीर्तन करतात तेव्हां तेव्हां ते मथुरेहून येतात.

उद्धवा! एक प्रसंग सांगू? एकदा कन्हैया आपल्या मित्रांबरोबर लपंडाव खेळत होता. श्रीदामा शोध करीत होता. प्रथम कन्हैया या कुंडांत लपला, आणि मग धावत धावत माझ्या घरीं येऊन म्हणू लागला, 'मला कुठे तरी लपव, नाही तर श्रीदामा माझा घोडा करील! मी त्याला कुशींत लपवून आपल्या पदराखाली झाकून टाकले. आता मी जेव्हां जेव्हां झोपायला जाते तेव्हां तेव्हां मला वाटते कीं कन्हैया माझ्या कुशींत झोपला आहे आणि मी वेड्यासारखी होऊन जाते.

भगवंतांची लीलाकथा ऐकता ऐकता उद्धवांच्या डोळ्यांत अश्रू येतात. या गोपी खरोखर धन्य आहेत! ज्यांना प्रतिक्षण ब्रह्माचा अनुभव होत आहे.

कृष्ण गोपींना म्हणतात — गोलोकधामांत आपला नित्य संबंध आहे. आपण वियोगी होऊ शकत नाही. ज्ञानदृष्टीनें पाहिलें तर मी इथे आहे, सर्वत्र आहे, तुमच्या बरोबर आहे. मी विरहाचें दान याचकरता तुम्हाला दिलें आहे कीं जेणेंकरून तुम्ही नेहमी माझ्या स्वरूपाचें ध्यान आणि स्मरण करीत राहावे. माझें दूरत्वच तुम्हाला माझें ध्यान करायला लावीत आहे.

विरहावस्थेंत चित्त प्रियपात्राशीं एकाग्र होऊन जाते आणि त्याचेच ध्यान स्मरण करीत राहते. विरहावस्थेंत प्रियपात्राचें सतत सान्निध्य अनुभवास येत असते.

माझें तुम्ही अविरत ध्यान करीत राहावे यासाठीच मी तुम्हाला विरह दिला आहे.

संयोगावस्थेंत चाक्षुषदर्शन होते, वियोगावस्थेंत मनोदर्शन. वियोग हासुद्धा एक विशिष्ट प्रकारचा योगच आहे. पति कोठे बाहेर गेला असेल तर पत्नी मोठ्या मनोभावाने त्याचें ध्यान करीत राहते.

गोपींना विशिष्ट योगाचें दान करण्यासाठीच वियोग दिला.

आम्ही विभक्त होऊच शकत नाही. मी तुमच्या जवळच आहे. तुम्ही माझ्या स्वरूपाचें स्मरण करीत रहा. तुम्ही तर गोलोकींच्या नित्यसिद्धा गोपी आहांत.

उद्धवांबरोबर राहण्यांत गोपींनाही ज्ञानलाभ झाला. त्यांची भक्ति ज्ञानामुळे दिव्य झाली. विरहावस्थेंत त्या समजू लागल्या कीं कृष्ण त्यांच्या निकटच आहेत.

प्रेमलक्षणाभक्ति पांचवा पुरुषार्थ आहे. भक्ति अभेद साधत असते. ज्ञानसुद्धा अभेद साधते. पण ज्ञानापेक्षा भक्तिमार्ग जास्त सोपा आहे.

प्रभूंना म्हणा — तुम्ही माझे नाही, मी तुमचा आहे. समुद्राचा तरंग होऊ शकतो, तरंगाचा समुद्र नाही.

नंदबाबा, यशोदा, राधा आणि इतर गोपींचें तीव्र प्रेम पाहून उद्धवांचा ज्ञानाभिमान जळून राख झाला. त्यांना स्पष्टपणें कळून आलें कीं प्रेमभक्तिविना ज्ञान निरर्थक आहे. प्रेम ज्ञानापेक्षा श्रेष्ठ आहे.

उद्धवांची गोकुळ सोडून जाण्याची इच्छाच होत नव्हती. ते तर गोपींचे गुरु होण्यासाठी आले होते पण त्यांचेच शिष्य होऊन बसले. आता तर ते भगवंताजवळ फक्त प्रेमलक्षणाभक्तीच मागण्याचा विचार करू लागले.

ज्यांना महान मुनीसुद्धा प्राप्त करू शकले नाहीत अशा भगवंतांना गोपींनी सहजच मिळविले होते. मी त्यांच्या चरणरजांत स्नान करून घेतो, जेणेंकरून पुढल्या जन्मीं भलेही मनुष्यपण न मिळो,

पण वृंदावनांतील वृक्ष, लता, पशु, पक्षी यांपैकी कांही तरी होण्याचा लाभ होईल. एवढे झाले तरी मी आपल्याला कृतार्थ मानीन.

गोपींच्या सत्संगतीनें उद्धवांना ज्ञानोत्तर प्रेमलक्षणाभक्तीचें प्रत्यक्ष दर्शन झालें. त्यांनी सर्वच गोपींचे चरणरज आपल्या मस्तकीं धारण केले. सगळ्यांनाच नमस्कार केला.

कृष्णविरही जीवनांतील वागणूक आणि व्यवहार कसा असला पाहिजे याचा आदर्श या गोपींनी जगासमोर ठेवला आहे. धन्य आहेत ते व्रजवासी स्त्री-पुरुष!

उद्धवांनी आता मथुरेला परतण्याची अनुज्ञा मागितली. राधेने निरोप दिला कीं कृष्णाला सांगा कीं त्यांनी येथे लवकरच येऊन गोकुळाला सनाथ करावे. कृष्णासाठी कांही भेटही दिली.

यावेळीं यशोदा आणि नंद पण आले त्यांनी संदेश पाठविला—

**मनसो वृत्तयो नः स्युः कृष्णपादाम्बुजाश्रयः।**
**वाचोऽभिधायिनीर्नाम्नां कायस्तत्प्रह्वणादिषु॥**
**कर्मभिर्भ्राम्यमाणानां यत्र क्वापीश्वरेच्छया।**
**मङ्गलाचरितैर्दानै रतिर्नः कृष्ण ईश्वरे॥"** भा. १०–४७- ६६- ६७

संदर्भः श्रीमद्भागवत पुराणम्- गीता प्रेस, गोरखपूर

**अर्थ**— "उद्धवा! आमच्या सगळ्या वृत्ति आणि संकल्प यांना श्रीकृष्णचरणकमलांचाच आश्रय असून त्यांच्याच सेवेंत नेहमी लागलेल्या असाव्यात, हीच आमची इच्छा आहे. आमची वाणी त्यांचाच नामोच्चार करीत राहो. आम्हाला मोक्षाची इच्छा नाही. आपलें कर्म आणि प्रभूच्या इच्छेनुसार आम्हाला ज्या कोणत्या योनींत जन्म मिळेल त्यांत आम्ही शुभाचरण व दानधर्म करीत राहावे व ईश्वरावरची आमची प्रीति दिवसेंदिवस वृद्धिंगत व्हावी!"

निरोप सांगता सांगता नंद-यशोदेची आणि गोपींची हृदयें भरून आली.

या दोन श्लोकांत समग्र भागवताचें हृद्गत सामावलें आहे. विषयांविषयी वैराग्य आणि कृष्णाविषयीं प्रेम उत्पन्न करणारे हे दोन श्लोक भागवताचा आत्मा आहे.

उद्धवा! कृष्णाला सांगा कीं माझें मन सदासर्वदा त्यांच्यांतच रमलेले असो. माझें मन संसारांतील कोणत्याही पदार्थाकडे न जावो. माझी वाणी कृष्णाचा जप करीत राहो; आणि दृष्टी त्याचें दर्शन करीत राहो.

जर प्रारब्ध कर्मानुसार जन्मच द्यायचा असेल तर एखाद्या पवित्र वैष्णवाच्या घरींच द्या कीं जेणेंकरून कृष्णकीर्तन ऐकायचा लाभ सदा मिळत राहील. कृष्णकीर्तन ऐकून मी कृतार्थ होत राहावे आणि सेवेंत तन्मय होण्याची संधि मिळत राहावी.

यशोदा म्हणू लागली— उद्धवा, कृष्णाला सांगा कीं त्याची इच्छा असेल तर त्याने येथे यावे, केवळ आमच्यासाठी येण्याचे कष्ट त्याने घेऊ नये. जर त्याला तिथेच सुख आणि आनंद मिळत असेल तर त्याने तेथेच राहावे. आमच्या वियोगांतच त्याला तिथे सुख होत असेल तर त्यानें मथुरेहून येथे येण्याचा त्रास करून घेऊ नये. आम्ही तर येथे त्याच्या विरहांत जळण्यांत आणि अश्रु ढाळण्यांत सुद्धा सुखच मानू. आमच्या सुखासाठी त्याला श्रम करण्याची कांहीच आवश्यकता नाही. तो जेथे राहील तेथे सुखाने राहो. असें सांगता सांगता यशोदेला रडू आले.

यशोदेची भक्ति पुष्टिभक्ति आहे. पुष्टिभक्ति आपल्या सुखाचा नाही आराध्याच्या सुखाचा विचार करीत असते.

राधा म्हणाली– उद्धवा, कृष्णाची ही बासरी आणि कांबळे पण घेऊन जा. हे मी इथे ठेवून काय करू? तुम्ही हे कृष्णालाच देऊन टाका.

उद्धवा! कृष्ण तर आता मोठा राजा झाला आहे. त्याला मी काय पाठवू? मी लोणी-खडीसाखर तयार केली आहे ती तुम्ही माझ्या वतीने खाऊ घाला, परंतु माझें नाव घेऊ नका.

उद्धवांनी सगळ्यांना धीर देत म्हटले, 'तुम्ही कोणीही कसलीच चिंता करू नका. मी कृष्णाला लवकरच येथे घेऊन येईन.

उद्धवांचा रथ मथुरेकडे चालू लागला. त्यांचें मन सुद्धा विचारांच्या खोलींत गटांगळ्या खाऊ लागले. मी आजपर्यंत समजत होतो कीं कृष्ण करुणानिधि, कृपासागर आहेत. परंतु आता वाटते कीं ते फार कठोर आहेत. या भोळ्या व्रजवासियांना विरहाग्नींत जाळत आहेत. मी त्यांना याबद्दल बोलीन.

उद्धव मथुरेला येऊन पोचले. कृष्णाजवळ आले. उद्धव काय सांगणार आहेत हे कृष्ण अंतर्यामी जाणत आहेत. म्हणून ते म्हणू लागले– उद्धवा, तू जेव्हां इकडे होतास तेव्हां माझी प्रशंसा करीत होतास! आता गोकुळांत जाऊन आला आहेस तर गोपींची प्रशंसा करू लागला आहेस! मी निष्ठुर नाही.

भगवंतांनी उद्धवाच्या डोक्यावर आपला वरदहस्त ठेवला. उद्धव समाधिस्त होऊन पाहू लागले कीं ती तर सर्व कृष्णाचीच लीला आहे. ते तर मथुरेंतही आहेत आणि गोकुळांतही आहेत. भगवंतांनी आपल्या सर्वच गोकुळातील लीलांचें दर्शन घडविलें. एक स्वरूप मथुरेंत दिसले तर दुसरें गोकुळांत. एक स्वरूप यशोदेच्या कुशींत होते, तर दुसरे राधेबरोबर रास खेळत होते. उद्धवा, माझ्या यशोदा आईनें मला प्रेमबंधनानें असें बांधून टाकलें आहे कीं मी वृंदावन सोडूच शकत नाही. भलेही मी मथुरेंत दिसो, पण मी असतो तर गोपींपाशीच. मी गोपींपासून अभिन्न आहे. राधा-कृष्ण एकच आहेत.

उद्धवांचे गोकुळागमन हें ज्ञान आणि भक्तीच्या मधुर कलहाचें चित्रण आहे. उद्धवांचें ज्ञान आणि गोपींची भक्ति-निर्गुण आणि सगुण– दोहोंचा येथे संघर्ष आणि समन्वय आहे.

भगवंताच्या गोपी प्रेमलीलेची कहाणी दशमस्कंधांतील अडतिसाव्या अध्यायांत समास होते. आता भगवंताच्या राजसलीलेला आरंभ होत आहे.

राजस भक्तांच्या मनाच्या निरोधासाठी राजसलीलाकथा आहे.

कृष्णकथा सर्वच प्रकारच्या जीवांना आनंद देते. कृष्ण सर्वच जीवांना आपणाकडे आकर्षित करून परमानंदाचें दान करतात. कुब्जेला सुद्धा कृतार्थ केले होते.

भगवंतांनी अक्रूराच्या घरीं येऊन त्यांना आज्ञा केली– धृतराष्ट्र पांडवांना लाक्षागृहांत भस्मीभूत करू इच्छितो म्हणून तू धृतराष्ट्राच्या घरीं दोनचार दिवस थांबून हें पाहून ये कीं त्याचे मनांत पांडवांविषयीं कोणत्या भावना आहेत. तू प्रत्यक्ष तेथे जाऊन परीक्षा करून ये.

अक्रूर हस्तिनापुरी येऊन दोन महिने धृतराष्ट्राजवळ राहिले आणि त्याला उपदेशही केला– हे धृतराष्ट्रा! जीव एकटाच जन्माला येत असतो आणि मरतो पण एकटाच. म्हणून कुटुंबासाठी पाप करणें अनुचित आहे.

डोळ्यांनी आंधळा असणारा आंधळा नाही, तर डोळे असूनही काम, क्रोध, लोभ, मोह, मद यांच्या पट्टीमुळे जो पाहू शकत नाही तोच आंधळा असतो. धृतराष्ट्राचे डोळे मोह आणि लोभाने आंधळे

झाले होते. ज्याच्या डोळ्यांना रुपयापैशानें घेरले आहे तोच धृतराष्ट्र होय. धृतराष्ट्रासारखा लोभी अक्रूरासारख्यांच्या सत्संगतीनें सुद्धा सुधारू शकत नाही.

मृत्यूच्या वेळीं धन नाही तर धर्म आणि सत्कर्मच जीवाबरोबर जात असतात. तरी पण विचित्रपणा पहा कीं मनुष्य विषयसुखाच्या मागेच धावत असतो. तो संसाराशिवाय अन्यत्र कोठेच आनंद शोधण्याचा प्रयत्न करीत नाही.

अक्रूरानें धृतराष्ट्राला विचारलें— तू जाणूनबुजून हें पाप, हें कपट कां करीत आहेस ?

धृतराष्ट्र— तुम्ही जाणता ते बरोबर आहे, पण दुर्योधन माझ्याजवळ येताच माझें सगळे ज्ञान, विचार, विवेक उडून जातात.

जो खऱ्या आणि योग्य गोष्टी जाणत असूनही पाप करतो जाणूनबुजून पाप करतो — तोच धृतराष्ट्र ! भगवंताची सुद्धा आता इच्छा आहे कीं कौरवांचा विनाश व्हावा.

बीज शुद्ध असूनही कुसंगतीमुळे जो बिघडतो तो शठ आहे, ज्याचे बीजच दुष्ट आहे तो खल. शठ सत्संगाने सुधारू शकतो परंतु खल सुधारू शकत नाही.

ज्याचे मुखारविंद अतिशय मनोहर आहे, जो बिंबासारख्या लाल अधरांवर बासरी ठेवून मधुर तान काढीत आहे, जो कंदब वृक्षाच्या खाली गायी, गोप आणि गोपी यांच्यामध्यें विराजमान आहे अशा भगवंताचें "हे गोविंद, हे दामोदर, हे माधव" अशा संबोधनांनी सदासर्वदा स्मरण केले पाहिजे.

**हरे राम, हरे राम, राम राम हरे हरे।**
**हरे कृष्ण, हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे ॥**

**॥ दशम स्कंध (पूर्वार्ध) समाप्त ॥**

•••

॥ श्रीहरिः ॥

# ॥ दशम स्कंध ॥

## (उत्तरार्ध)

**कृष्णाय वासुदेवाय हरये परमात्मने।**
**प्रणतः क्लेशनाशाय गोविन्दाय नमो नमः॥**

**श्रीकृष्णाय नमः॥**

सगळ्याच साधनांचें फळ मनशुद्धि आहे. यासाठी मनुष्य नाना प्रकारची साधनें करतो. जग विकृत झालेलें नाही. मनाच्या अशुद्धीमुळेच जग विकृत भासते. या जगांत ज्ञानी आहेत आणि अज्ञानीही. ज्ञान्यासाठी हें जग आनंदायी आहे आणि अज्ञान्यासाठी दुःखदायी. ज्ञान्याचे मन अतिशुद्ध असते आणि अज्ञान्याचे पशुसारखे जड. काम-क्रोधादि विकार मनाला अशुद्ध करतात. मन निर्विकारी, निर्वासनामय होईल तेव्हांच शुद्ध होईल. शुद्ध झालेलें मन निष्काम होईल तेव्हाच ज्ञानाचा उदय होईल. मनःशुद्धीसाठी योगीजन ध्यान, धारणा, प्रत्याहार, प्राणायाम इत्यादी करतात. परंतु पुष्कळ वेळा असें करूनही मन पूर्णपणे शुद्ध होत नाही.

जेव्हां श्रीकृष्णविरहानें प्राण व्याकुळ होऊन कृष्णदर्शनासाठी कासावीस होतात तेव्हांच मन शुद्ध होते. विरहाग्नींत मनाची मलीनता जळून जाते. साधारण माणसे तर प्रभुविरह सहन करतात, पण संतांना प्रभुविरह असह्य होतो. त्यांची दर्शनातुरता शरीराला जाळून मनाला तन्मय करते; तेव्हां त्यांना ईश्वराचा अनुभव होतो. तसा तर ईश्वर सर्वत्र आहे. कृष्णविरहांत जळणारे व्रजवासी अश्रू ढाळू लागतात. त्यांना वृंदावन स्मशानासारखे वाटू लागते. विरहांत जेव्हां जीवाला चैन पडत नाही तेव्हां आपल्या प्रियपात्राची मधुर छबि त्याच्या दृष्टींत तरळू लागते. संयोगावस्थेंत तर तो प्रिय एकच भासतो, तर विरहावस्थेंत तो जागोजागीं अनेक रूपांत दिसू लागतो. वियोगावस्थेंत तर जेथे जेथे दृष्टी जाते तेथे तेथे आपलें प्रियपात्र दृष्टिगोचर होत असते.

गोपी-प्रेमाची कथा उद्धवांच्या प्रसंगाबरोबर समाप्त झाली. गोपी प्रेमलक्षणाभक्तीच्या आचार्या आहेत. संसारांतील व्यवहार सांभाळून सुद्धा प्रभुभक्ती कशी केली जाऊ शकते हें त्यांनी दाखविले आहे.

### १. कंस, जरासंध, कालयवन यांचे सूचक अर्थः

भागवतांत प्रत्येक चरित्राच्या शेवटीं त्यांतील रहस्य सुद्धा निर्देशित केले आहे. कंस आणि कंसाच्या राण्या अस्ति आणि प्राप्ति यांच्या गोष्टी आम्ही पाहिल्या. नीति-अनीति कशाचीही कदर न करतां चलाखी करवून धन कमविणारी व्यक्ति कंस आहे. जेव्हांपासून लोकांनी धनालाच सुखाचा आधार मानून बँकशिलकीच्या चिंतेतच आपले चित्त गुंतवून ठेवले आहे तेव्हांपासूनच पाप वाढत चालले आहे. कंसही

वाढत चालले आहेत. पैसा भलेही काही सुख देऊ शकत असेल पण तो शांति देऊ शकत नाही.

दहाव्या स्कंधाच्या उत्तरार्धांत पन्नासाव्या अध्यायांत जरासंधाच्या आक्रमणाची कथा आहे.

जेव्हां तुम्ही पन्नास वर्षांचें व्हाल तेव्हां जरासंधकाळ तुमच्या मथुरानगरी शरीरावर आक्रमण करील. जरासंध वृद्धावस्था आहे. आमची उत्तरावस्थाच जरासंध आहे आणि ती शरीराच्या अनेक अंगांवर हल्ला करीत असते. पन्नास वर्षे पूर्ण झाली म्हणजे जरासंध येतो. आयुष्याचा पूर्वार्ध संपला आहे आणि आता उत्तरार्ध आला आहे. वृद्धावस्था सुरू होत आहे. जरासंध आल्यावर मथुरेचा किल्ला डळमळू लागतो. डोळ्यांची, कानांची, हातापायांची शक्ति क्षीण होते. चाळीसावें वर्ष सुरू झाल्याबरोबर प्रापंचिक प्रवृत्ति कमी केल्या पाहिजेत. प्रभूच्या सेवेचा वेळ वाढवीत गेले पाहिजे.

श्रीकृष्णांनी जरासंधाला सतरा वेळा पराजित केले तर तो अठराव्या वेळीं कालयवनाला बरोबर घेऊन आला. त्याने काळाला पहिले पाठविले. जेव्हां जरासंधरूपी वृद्धावस्था कालयवनरूपी काळाला सुद्धा घेऊन येते तेव्हां वाचणे सोपे नाही. जरासंध आणि कालयवन बरोबर येऊन ठेपले तेव्हां कृष्णाला मथुरा सोडून द्वारकेला जावे लागले.

द्वारका अर्थात ब्रह्मविद्या. **द्वारिका ब्रह्म यस्या सा ब्रह्मविद्या.** अर्थात श्रीकृष्णांनी ब्रह्मविद्येचा आश्रय घेतला. मथुरा-मानवकाया सोडून ब्रह्मविद्येचा आश्रय भगवंताला सुद्धा घ्यावा लागला.

जेव्हां वृद्धावस्था आपल्याबरोबर काळाला देखील घेऊन येईल तेव्हां द्वारिका-ब्रह्मविद्येचा आश्रय घ्या. ब्रह्मविद्या-द्वारकेचे द्वार काळ आणि जरासंधसुद्धा उघडू शकत नाही.

ब्रह्मनिष्ठाला कामभोग, काळ किंवा वृद्धावस्था सतावू शकत नाहीत. वृद्धावस्थेंत म्हातारा सतरा वेळा आजारी होऊन वाचतो पण अठराव्या वेळीं काळ त्याला सोडत नाही.

जरासंधाचा त्रास अर्थात जन्ममृत्यूचा त्रास. जन्म आला आहे तर जरा आणि मृत्यूची व्यथा सहन करावीच लागेल.

नरक म्हणजे काय ?

शंकराचार्य म्हणतात — हे शरीरच नरकवास आहे. जन्म धारण करणे म्हणजेच नरकवास आहे. कोणत्याही काळीं गर्भवास धारण करावा लागू नये असा प्रयत्न करा. भगवंताच्या प्रेरणेमुळे कांही महापुरुष भगवंताच्या कार्यासाठी जन्म घेतात ते उत्तम असते. परंतु वासनेच्या बंधनामुळे जन्म घेणे नरकवास आहे. जरासंध आणि कालयवनाचे धक्के खात खात मथुरा शरीर सोडण्यापेक्षा समजूनउमजून सोडणे अधिक चांगले. प्रवृत्तीने आम्हाला सोडण्यापूर्वीच आम्ही तिला कां न सोडावे ?

आपला पति कंस याचा मृत्यु झाल्यावर अस्ति आणि प्राप्ति आपला बाप जरासंध यांच्या घरी आल्या. कंसाच्या वधाची हकीगत समजल्यावर जरासंधाने मथुरेवर आक्रमण केले. त्याची सतरा आक्रमणे कृष्ण आणि बलरामांनी रोखून परतवून लावली. जेव्हा तो अठराव्यांदा लढायला आला आणि आपल्याबरोबर कालयवनालाही घेऊन आला तेव्हां श्रीकृष्णांनी मथुरा-त्यागाचा निश्चय केला. आता मी आनर्त देशांत (हल्लीचा ओखा प्रदेश) समुद्रकिनारी शांतीने राहीन.

भगवंतानी विश्वकर्म्याला द्वारकानगरी निर्माण करण्याचा आदेश दिला. मोठमोठे राजप्रासाद निर्माण केले गेले. म्हणतात कीं हे प्रासाद इतके विशाल होते कीं लोकांना दार शोधावे लागत असे. द्वार कोठे आहे असे पुनःपुन्हा विचारल्याकारणानेच ह्या नगरीचें नांव द्वारका पडले. 'का' अर्थात ब्रह्म. उपनिषदाप्रमाणे 'क' हे अक्षर ब्रह्मसूचक आहे. जेथील प्रत्येक द्वारावर परमात्म्याचा वास आहे ती नगरी द्वारका होय.

शरीररूपी नगरीच्या इंद्रियरूपी द्वारांवर परमात्म्याला स्थान द्याल तर जरासंध आणि कालयवन तुम्हाला सतावू शकणार नाहीत. द्वारकेंत हे शिरूच शकत नाहीत. प्रत्येक इंद्रियाने भक्ती करणारा जीव कालयवनावर विजय मिळवू शकतो. जर जरासंध तुमचा पाठलाग करीत असेल तर प्रवर्षण पर्वतावर वास करा. प्रवर्षण पर्वत अर्थात जेथे ज्ञान आणि भक्ती यांचा मुसळधार पाऊस पडत असेल ते स्थान. जेथे कथाश्रवणाचा लाभ मिळत असेल, भक्तिरसाची धार वाहात असेल तेथे जा. एकावन्नाव्या वर्षी प्रवर्षण पर्वतावर जाऊन रहा. तेथे जरासंध त्रास देऊ शकणार नाही. श्रीकृष्ण सुद्धा जरासंधाच्या त्रासापासून वाचण्यासाठी प्रवर्षण पर्वतावर गेले होते.

एकावन-बावन्न वर्षांचे वय झाले कीं तुम्ही गृहस्थाश्रमासाठी पात्र राहात नाही. तुम्ही वनांत प्रवेश मिळविला आहे. अर्थात घरची आसक्ति आता सोडायची आहे. विलासी लोकांमध्ये राहून विरक्त जीवन जगणे सोपे नाही. जेथे भक्ती आणि ज्ञानाचा सतत वर्षाव होत असेल अशा पवित्र भूमीवर राहूनच तुम्ही जरासंधापासून सोडवणूक करून घेऊ शकाल. भोगभूमींत भक्ती चांगल्या प्रकारे होत नाही. म्हणून शहर सोडून गंगेसारख्या पवित्र नदीच्या काठी राहून भक्ती करा. आज शहरांत खूप गर्दी झाली आहे. पगडी, ब्राह्मणांच्या डोक्यावरून जाऊन घरांवर जाऊन बसली आहे. जर हे म्हातारे लोक शहर सोडून नद्यांच्या किनारी जाऊन राहतील तर शहरांतील गर्दी काही कमी होईल आणि ते लोक तेथे भक्ती पण चांगल्या रीतीनें करू शकतील.

जन्ममृत्यूची व्यथा म्हणजेच जरासंध. संकल्प करा कीं आता मला पुरुषही व्हायचे नाही आणि स्त्री पण व्हायचे नाही. मला पुनर्जन्मच घ्यायचा नाही. जरासंध-जन्म, जरा, मृत्यूच्या त्रासांतून वाचण्यासाठी दररोज एकवीस हजार जप नियमितपणे करीत रहा. जपाविना पाप आणि वासना सुटू शकणार नाहीत.

कथाश्रवण पाप जाळून मार्गदर्शन करीत असते. कथा ऐकून जपाचा, भगवद्भक्ती करण्याचा, सत्कर्म करण्याचा संकल्प करा. कथाश्रवण केल्याने भगवंतांशी संबंध जडून जाईल. म्हणून ब्रह्मचर्यपालनाचे, ध्यानजपाचे, सेवास्मरणाचे व्रत घ्या.

एक वाणी कथाश्रवणासाठी जात असे. कथाकार महाराजांनी त्याला सांगितले, तू कथा तर ऐकत असतोस मग एखादा चांगला संकल्प कर. सत्य बोलण्याचा संकल्प कर. तर तो वाणी म्हणाला कीं, मी तर व्यापारी आहे; सत्यच बोलू लागलो तर माझा सगळा कारभारच चौपट होईल. तर महाराज म्हणाले— मग कोणाची निंदा न करण्यांचे व्रत घे. तर वाणी म्हणाला, जोपर्यंत रात्रीं दोनतीन तास मी गोष्टी बोलत राहणार नाही तोपर्यंत मला झोपच येत नाही, तेव्हा मी हेही व्रत घेऊ शकत नाही. महाराज, मी संकल्प करतो कीं रोज सकाळी माझ्या समोर राहणाऱ्या कुंभाराचे तोंड मी पाहीन.

पाहिलात वाण्याचा संकल्प! तो दररोज सकाळी कुंभाराचे तोंड पाहात असे. एके दिवशी तो कुंभार सकाळी थोडे लवकर उठून गावाच्या बाहेर माती आणायला गेला, तर तो वाणी त्याचे तोंड पाहू शकला नाही. तो वाणी आपल्या नियमपालनासाठी त्या कुंभाराला शोधायला निघाला.

आता भाग्याची गोष्ट अशी कीं त्या दिवशी तो कुंभार माती खोदत असता सोन्याने भरलेला एक हंडा त्याला लागला. तो हंडा बाहेर काढीत होता, इतक्यांत वाणी तेथे येऊन पोचला. वाणी कुंभाराचे तोंड पाहून म्हणाला कीं ठीक आहे, मी पाहून तर घेतले.

तिकडे तो कुंभार समजला कीं वाण्याने सोन्याने भरलेला हंडा पाहून घेतला आहे. जर तो राजाला सांगेल तर राजा सर्वच जप्त करील. म्हणून तो वाण्याला म्हणाला— तू तर पाहिले आहेस पण कोणाला सांगू नको, मी तुला अर्धा भाग देतो. वाण्याला सोनं मिळाले.

आता वाणी विचार करू लागला कीं मी या कुंभाराचे तोंड पाहण्याचे व्रत घेतले तर लक्ष्मीचे आगमन झाले. जर मी स्वतः प्रभूचे दर्शन घेण्याचे व्रत घेतले असते तर किती चांगले झाले असते? अशा क्षुल्लक आणि गमतीदार संकल्पापासून असा लाभ झाला तर शुभ संकल्प केला असता तर किती चांगले झाले असते!

दोन संकल्प तर सगळ्यांनीच केले पाहिजेत. एक पापकर्मापासून वाचण्याचा आणि दुसरा सत्कर्मातच दंग राहण्याचा. एकवीस हजार जप ह्याकरता करायला सांगितले आहे कीं मनुष्य सामान्यतः दिवसांतून २१,६०० वेळा श्वासोच्छ्वास करतो. अर्थात प्रत्येक श्वासाबरोबर भगवंताचे नाम जपत राहायचे आहे. असे केल्यानेच जरासंधाच्या त्रासापासून वाचाल.

कालयवनाचा नाश तर करायचा होता, परंतु श्रीकृष्ण स्वतः त्याला मारू शकत नव्हते. कालयवनाला ब्रह्मदेवांनी वर दिला होता कीं यदुवंशाची कोणीही व्यक्ति त्याला मारू शकणार नाही. म्हणून कालयवनाने जेव्हा श्रीकृष्णाचा पाठलाग केला तेव्हा ते पळत-लपत-छपत प्रवर्षण पर्वताच्या एका गुहेत, जिथे राजा मुचकुंद तपश्चर्या करीत होते, तिथे जाऊन पोचले. कालयवनाने रागांत येऊन मुचकुंदाला ठोकर मारली. मुचकुंदाने डोळे उघडले. त्याची दृष्टी कालयवनावर पडल्याबरोबर तो जळून भस्म होऊन गेला.

परमात्म्याच्या ध्यानांत असलेल्या व्यक्तीला काळ मारू शकत नाही. उलट काळ स्वतःच मरून पडतो.

जेव्हां मुचकुंदाला समजले कीं कृष्ण आले आहेत. तेव्हां ते प्रार्थना करू लागले.

जीवाला मनुष्यदेह मिळाला आहे परंतु विषयासक्त असल्याकारणें तो भगवंताच्या चरणारविंदाची सेवा करीतच नाही. मनुष्य किती प्रमादी आहे? जीवाची स्थिती तर सापाच्या तोंडात पडलेल्या बेडकासारखी आहे. सापाच्या तोंडात अडकलेला बेडूक आपल्या मरणाचा विचार करीत नाही. उलट एखादा जंतू जर जवळ आला तर त्याला गिळण्यासाठी जीभ लांब करतो. मनुष्य सुद्धा काळाच्या तोंडात फसलेला आहे. तरी पण त्याची विषयासक्ति जात नाही. पन्नास वर्षांचे वय झाल्याबरोबर समजू लागा कीं तुम्ही काळाच्या मुखांत अर्धे गेलेले आहांत. काळ तर नेहमीच सावध राहतो, जीवच बेसावध असतो. सत्संगाशिवाय ज्ञान प्राप्त होत नाही.

मुचकुंद प्रार्थना करीत आहेत– नाथ! कृपा करा. माझें मन सांसारिक जड पदार्थांकडे जाऊ देऊ नका. मला अनन्यभक्ती द्या.

भगवंत म्हणतात– मुचकुंदा! ह्या जन्मांत तर तुला अनन्यभक्ती मिळू शकणार नाही. तू तारुण्यांत फार कामी आणि विलासी होतास. जो कामाच्या हाताने मारला जातो त्याला काळाच्या हाताचा सुद्धा मार खावा लागतो. तुला एक जन्म आणखी घ्यावा लागेल. तो तुझा जन्म ब्राह्मणयोनींत होईल आणि त्या जन्मांत तुला अनन्यभक्ती प्राप्त होईल.

मुचकुंदाने कठोर तपश्चर्या केली आणि त्याचे क्षत्रिय शरीर सुटले. पुढल्या जन्मीं ते ब्राह्मण झाले. द्वापरयुगांतील क्षत्रिय राजा कलियुगांत नरसिंह मेहताचे रूप घेऊन आले. ते द्वारकाधीशांचे अतिप्रिय होते. भगवंताने त्यांची बावन्न कार्ये परिपूर्ण केली होती.

मुचकुंद राजाची कथा, आपली युवावस्था विलासांत घालविणाऱ्याला मुक्ति मिळणे फार कठीण आहे, हे दर्शविते. अशांना अनन्यभक्ती पण मिळत नाही. म्हणून हळू हळू संयम वाढवीत गेले पाहिजे आणि भगवद्‌मय जीवन जगले पाहिजे. प्रभूजवळ अनन्यभक्ती मागा. युवावस्थेंत सुद्धा सतत ईश्वर-स्मरण करा. युवावस्थासुद्धा प्रभुभजनामध्ये घालवा. असें केल्यानेच ह्या जन्मांत अनन्यभक्ती प्राप्त होईल.

केवळ वृद्धावस्थेतच ईश्वराची सेवा-स्मरण-भजन केल्याने पुढचा जन्म दिव्य मिळेल.

**२. रुक्मिणी हरण :**

आता पुढे रुक्मिणीहरणाचा प्रसंग येत आहे.

परमात्मा लक्ष्मीचे स्वामी आहेत. लक्ष्मी जीवमात्राची माता आहे. म्हणून जीवाला तर लक्ष्मीचा विवेकपूर्ण उपयोग करण्याचा तेवढाच अधिकार आहे, उपभोगाचा नाही. लक्ष्मीच्या उपभोगाचा अधिकार केवळ नारायणालाच आहे. उपयोग आणि उपभोगांत अंतर आहे. इंद्रियांना अनिवार्य वस्तु-विषय देणे उपयोग आहे. इंद्रियांना आवश्यकता नसताना सुद्धा विषय देत राहणें, त्यांना लाडावून ठेवणें स्वेच्छाचार आहे. इंद्रियांच्या आधीन होऊन विषय देत राहणें उपभोग आहे. धनाच्या दुरुपयोगानें इहलोक आणि परलोक दोन्हीही ठिकाणी अकल्याण होते.

संपत्ति आणि शक्तीचा सदुपयोग करणारा देव आणि दुरुपयोग करणारा दैत्य होय !

भागवताची कथा मानवाला देव करण्यासाठी आहे.

वेळ, शक्ति आणि संपत्ति यांचा सदुपयोग करा. मनुष्य आपला पुष्कळसा वेळ, संपत्ति आणि संततीच्या मागे दवडीत असतो. जीव पुष्कळसा वेळ फॅशन आणि व्यसनांत नष्ट करतो. शरीर आणि संतती यांना अतिशय व्यथा देणें किंवा अतिशय लाडावणें दोन्हीही चांगले नाही. जर परमात्म्याने तुम्हाला पुष्कळ दिलें आहे तर त्याचा सदुपयोग करण्याचे अधिकतर उत्तरदायित्व तुमच्यावर आहे. जर भगवंत असंतुष्ट झाले तर जीवाची दुर्गती होईल.

शास्त्राने लक्ष्मीचे तीन प्रकार सांगितले आहेत – लक्ष्मी, महालक्ष्मी आणि अलक्ष्मी.

१) **लक्ष्मी** – नीति आणि अनीति दोन्ही प्रकारे प्राप्त धन साधारण लक्ष्मी आहे. तिचा कांही सदुपयोग होईल आणि दुरुपयोग सुद्धा.

२) **महालक्ष्मी** – धर्मानुसार प्राप्त धन महालक्ष्मी आहे. श्रमाच्या मानापेक्षा जास्त लाभ घेणे, नफा घेणें पाप आणि चोरी आहे. आयुष्यांत धन नाही, धर्म मुख्य आहे. धर्मच मृत्यूनंतर बरोबर येत असतो. याची जाणीव ठेवून, धर्मानुसार, श्रमपूर्वक नीतीने प्राप्त धन महालक्ष्मी होय. असें धन नेहमी शुभकार्यांत खर्च होईल.

३) **अलक्ष्मी** – पापाचरण, अनीतीने प्राप्त धन अलक्ष्मी आहे. असें धन विलासितेंतच वाहून जाईल. आणि जीवाला शांति देण्याऐवजी रडवीत राहील.

मृतात्म्याबरोबर धर्माशिवाय आणखी कांहीच जात नाही. नीति, धर्म, सदाचाराने प्राप्त धनच महालक्ष्मी असते. ती शांतिदायी सुद्धा असते. महालक्ष्मी नारायणालाच प्राप्त होऊ शकते. शिशुपालाला नाही. रुक्मिणीहरणाच्या कथेचें हेच रहस्य आहे. शिशुच्याच लालन-पालनांत ज्याचें धन आणि वेळ जातो असा कामी पुरुषच शिशुपाल होय. जो नेहमी सांसारिक आणि भौतिक सुखांच्या मागेच पळत राहतो तोच शिशुपाल !

भगवंतांनी मथुरेंत एकही लग्न केलें नव्हते. त्यांचे सर्वच विवाह द्वारकेंत झाले.

प्रत्येक इंद्रिय वश करून, ब्रह्मविद्येची प्राप्ति केल्यानंतरच विवाह करा. योगाविना भोग आपल्याबरोबर रोग घेऊन येईल. तप झालें नाही तर भोग शरीराला रोगी बनवून टाकील. सगळीच इंद्रियें शरीराची द्वारें आहेत, आणि कृष्ण सगळ्याच इंद्रियांचें स्वामी आहेत. जितेंद्रिय होऊन विवाह करा, इंद्रियांचे सेवक बनून नाही. याचसाठी तर गृहस्थाश्रमाच्या आधी ब्रह्मचर्याश्रमाची योजना केली गेली आहे.

राजा परीक्षित – महाराज! मी रुक्मिणीविवाहाचा प्रसंग विस्ताराने ऐकू इच्छितो.

शुकदेव – राजा! ऐक.

विदर्भ देशाचा राजा भीष्मक याला पांच पुत्र आणि पांच कन्या होत्या. ज्येठ पुत्राचें नाव रुक्मी आणि कन्येचे नाव रुक्मिणी होते. भागवतात त्यांच्या आईचें नाव सांगितलेले नाही; परंतु इतर ग्रंथांत तिचें नाव शुद्धमति असें दिलेले आहे. जिथे मति शुद्ध असते तिथेच महालक्ष्मीचें आगमन होते. रुक्मिणी लक्ष्मीचा अवतार होती. भीष्मक राजाची इच्छा होती कीं रुक्मिणीचा विवाह श्रीकृष्णाशी करावा, परंतु राजाचा मुलगा रुक्मी आपल्या बहिणीचा विवाह गोपाळाशी न होऊं देतां शिशुपाल राजाशी करू इच्छित होता. रुक्मिणीला भावाची इच्छा समजली आणि तिला फार वाईट वाटले. रुक्मीने शिशुपालाला वरात घेऊन येण्याचे आमंत्रण पाठविलें. कामी शिशुपाल वरातीसह येऊन पोचला. गणपतिपूजनाचे वेळीं सुद्धा या लंपटाचे ध्यान तर रुक्मिणीकडेच होते. त्याचें ध्यान कन्येच्या शारीरिक सौंदर्याकडे होते.

साधारण जीव जेव्हां लग्नासाठी जातो तेव्हां तो कामाधीन होऊन जात असतो. प्रभु तर गोपाळ अर्थात गो (इंद्रियांना) नियंत्रणांत ठेवणारे आहेत. भगवंत जितेंद्रिय होऊन विवाह करायला जातात.

शुद्धमतीच्या अंतःपुरांत एक सुदेव नावाचा ब्राह्मण येत-जात असे. रुक्मिणीने त्या ब्राह्मणाला सांगितले कीं, 'मी कृष्णाशी विवाह करू इच्छिते. सात श्लोकांत लिहिलेलें हें माझें पत्र तू श्रीकृष्णाकडे घेऊन जा.'

एकनाथ महाराजांनी रुक्मिणी स्वयंवरावर भाष्य लिहिलें आहे. ते म्हणतात कीं रुक्मिणी श्रीकृष्णाचा विवाह शुद्ध जीव आणि ईश्वराचा विवाह आहे. भागवत-कथेच्या शेवटच्या दिवशी या विवाहाची कथा येते. ज्याला तक्षक नागाच्या दंशाने मरायचे आहे तो काय लौकिक विवाहाची गोष्ट ऐकेल? योगीश्रेष्ठ परमहंस शुकदेव ही कथा सांगत आहेत. भाषा विवाहाची आहे, पण तात्पर्य जीवाचें ईश्वराशीं मीलन आहे.

श्रीकृष्ण म्हणतात, मला सांसारिक सुखोपभोगाची इच्छा नाही. मला कोणत्याही वस्तूची अपेक्षा नाही. मी निरपेक्ष आहे, निष्काम आहे. रुक्मिणी सुद्धा म्हणत आहे कीं तिला विषयसुखाची इच्छा आणि अपेक्षा नाही. रुक्मिणीनें आपल्या पत्रांत लिहिलें होते कीं ती निष्काम आहे आणि तिच्या मनांत कांही विकार-वासना नाही. साधारण कन्या अशी गोष्ट कशी करील? श्रीकृष्ण आणि रुक्मिणी दोघेही निष्काम निर्विकार आहेत.

अर्थात हा प्रसंग लौकिक विवाहाचा नाही; आध्यात्मिक मीलनाचा आहे. अलौकिक सिद्धान्त समजविण्यासाठी लौकिक शब्दावलीचा उपयोग केला गेला आहे. भागवताचे श्लोक हाच अर्थ सांगतात. लग्नापूर्वी सुद्धा रुक्मिणीनें निर्विकारपणाचे विचार मांडले होते. लग्नानंतर भगवंत तिला म्हणतात, मला स्त्री आणि वंशवृद्धीची इच्छा नाही. एखादा साधारण मनुष्य विवाहानंतर अशा गोष्टी करील का?

जी व्यक्ति ईश्वराशीं विवाह करू इच्छिते तिला तिचे नातेवाईक फार त्रास देत असतात. रुक्मीसुद्धा आपल्या बहिणीचें लग्न भगवंताशी होऊ देण्याच्या विरुद्ध होता. पण जर जीव सद्गुरूला शरण जाईल तर पैलतीर गाठता येतो. रुक्मिणीनें सुद्धा सुदेवाचें साहाय्य घेतले होते.

ज्याला ईश्वराची भेट घ्यायची आहे त्यानें आपलें जीवन साधे ठेवले पाहिजे. राजकन्या असून देखील रुक्मिणी पार्वतीच्या दर्शनाला पायीच गेली. शुकदेव ही कथा सांगत आहेत. परीक्षिताची या अलौकिक विवाहकथेंतील तन्मयताच सांगते कीं हा विवाह साधारण मनुष्याचा नव्हता. जर रुक्मिणीला

लौकिक सुख हवे असते तर तिथे उपस्थित कोणत्याही राजाबरोबर ती लग्न करू शकत होती. परंतु तिने मोठ्या विवेकानें श्रीकृष्णालाच वरले. जीव जेव्हां ईश्वराबरोबर विवाहित होतो तेव्हां तो कृतार्थ होत असतो. रुक्मिणी-श्रीकृष्णाचें लग्न जीव आणि ईश्वराचें मीलन आहे; आणि ते सुदेवासारख्या सद्गुरुकृपेनें घडून आले आहे. रुक्मिणी भगवंताची आद्य शक्ति आहे. संतच ब्रह्मसंबंध करवू शकतात. एखाद्या सुयोग्य सद्गुरूच्या मध्यस्थीशिवाय जीव ईश्वराला भेटू शकत नाही.

रुक्मिणीचें पत्र घेऊन सुदेव द्वारकेंत आला. भोजनादि आटोपल्यावर द्वारकानाथांनी सुदेवाला कुशल विचारलें. 'आपल्या दर्शनाने मी कृतार्थ झालो. मी आपली काय सेवा करावी ?'

सुदेवानें भगवंताला रुक्मिणीचें पत्र दिलें आणि म्हटलें, 'प्रभु, ही रुक्मिणी एक सुपात्र कन्या आहे. ती सुंदरी तर आहेच, पण त्याबरोबर सद्गुणी, चतुर आणि सुशील पण आहे. हिच्याबरोबर आपला विवाह झाला तर आपलें आयुष्य सुखसंतोषानें जाईल.

श्रीकृष्णानें रुक्मिणीचें पत्र वाचले. अक्षर आणि भाषेनेच मनुष्याची परीक्षा होत असते. पत्र सविस्तर नसो, पण भावार्थ पूर्णपणें त्यांत उतरलेला असला पाहिजे. रुक्मिणीनें सुद्धा त्या केवळ सात श्लोकांत जणू काय घागरीमध्यें सागर भरून दिला होता. दोघांचा सप्तपदीसंबंध लवकरच जुळून आला पाहिजे असें सूचित करण्यासाठीच जणू सात श्लोक लिहिले होते. सहा श्लोकांत रुक्मिणीनें श्रीकृष्णाच्या सहा सद्गुणांचें वर्णन केले होते. त्या श्लोकांत ऐश्वर्य, यश, श्री (औदार्य), ज्ञान आणि वैराग्य अगदी ठासून भरलेले आहे. जीव जर दीन होऊन भगवंतापाशी जाईल तर भगवंत त्याची उपेक्षा करीत नाहीत. त्याला आपलेसे करून घेतात. जीवाचा धर्म शरण जाणें हाच आहे.

पत्रांत कृष्णाला सुंदर संबोधन केले होते. हे जग सुंदर नव्हे तर जगनिर्माता सुंदर आहे. जगांत जे कांही सौंदर्य आहे ते श्रीकृष्णाच्या सौंदर्याचा अंशमात्र आहे. संसार-जगत् कार्य आहे आणि कृष्ण कारण. सौंदर्यांच्या कल्पनेंतून विकाराचा देखील जन्म होऊ शकतो.

नेहमी असा विचार करा कीं मनुष्याचें सौंदर्य परमेश्वराच्या सौंदर्याकारणेंच आहे. भागवत सुंदर दृष्टी देते. 'अहम्' ची दृष्टी बदलायची आहे. जग जसें आहे तसेच राहील. प्रश्न दृष्टीचा आहे. जशी दृष्टी तशी सृष्टी.

नाथ! आपण अतिशय सुंदर आहांत. आपल्या सौंदर्याबरोबरच आपल्या सद्गुणांविषयींही मी महात्म्यांकडून ऐकले आहे. आणि याच कारणांनी मी आपल्याशी विवाह करण्याचें निश्चित केलें आहे. आपल्या सद्गुणांनी माझें मन मोहून गेलें आहे, माझें चित्त चोरले गेले आहे. आपलें सौंदर्य आणि सद्गुण यांचे वर्णन ऐकून माझें मन निर्लज्ज झालें आहे.

वारंवार श्रीकृष्णाची कथा ऐकणाऱ्याचें मन श्रीकृष्ण हरून घेत असतात. शुकदेवांसारखा निरपेक्ष वक्ता सुद्धा कृष्णकथा सांगण्याची इच्छा ठेवतात. जर कोणी श्रोता मिळाला नाही तर ते वृक्षांनाच रासपंचाध्यायी ऐकवीत असत.

नाथ! मी कोणाही कामी पुरुषाशीं लग्न करू इच्छित नाही. मी आपला आत्मा आपल्याच चरणीं समर्पित केला आहे.

परमात्म्यांना विचारच पडेल कीं अशा निर्लज्ज कन्येशी कसे लग्न लावावे. म्हणून रुक्मिणीने पुढच्या श्लोकांत लिहिलें, 'नाथ, मी निर्लज्ज झालें आहे यांत माझा कांहीच दोष नाही. तशी तर मी लज्जायुक्तच होते, परंतु आपल्या सद्गुणांनीच मला निर्लज्ज केलें आहे. माझ्या निर्लज्जतेचे दोषी आपले सद्गुण होत. आपण तर सर्वांच्याच अंतर्यामी आहांत. मी आणखी काय लिहू ? माझ्या मनोभावनेशी

आपण चांगले परिचित आहांत. '

रुक्मिणीला शिशुपालाचा नामोल्लेख करण्याची इच्छा नसावी. परंतु तिनें विचार केला कीं कदाचित कृष्णाला वाटेल कीं हरण करून तिच्याशी विवाह केला तर त्यांना आणखी कांही तर मिळणारच नाही. जी कन्या आपल्याबरोबर कांही संपत्ति आणीत नाही तिच्याशी लग्न करण्यांत काय लाभ? म्हणून तिने पुढच्या श्लोकांत लिहिलें कीं ती आपली स्वतःची संपत्ति श्रीकृष्णाला देईल. कोणती आहे ती संपत्ति? ' मी नेहमी सत्कर्म केलें आहे. तुळशीची पूजा केल्याशिवाय मी पाणीसुद्धा पीत नाही. '

आजतर कोणतीच स्त्री तुळशीची पूजा करीत नाही. करीत असेल तर तीही चहा प्यायल्यानंतर. संयम आणि सदाचाराशिवाय आयुष्य कसें सुधारेल? सदाचाराचा अर्थ आहे शास्त्रसंमत धर्मद्वार निर्देशित आचार, स्वेच्छाचार नाही.

मी अनेक व्रतवैकल्ये केली आहेत. मी गरिबांना वस्त्र आणि अन्नदान पण केलें आहे. मी आपली पुण्यसंपत्ती बरोबर घेऊन येईन. मी आपली अलौकिक संपत्ति बरोबर घेऊन येईन. आपण माझा स्वीकार करावा.

पतिव्रता, पुण्यशील स्त्रीचा पति कधी दुःखी होत नसतो, सुखीच होत असतो.

आपल्या संपत्तीविषयीं चर्चा केल्यानंतर रुक्मिणीनें स्वतःला प्राप्त करण्याचा उपायही सांगितला. मी दररोज पार्वतीच्या पूजेसाठी मंदिरांत जात असते. तुम्ही माझें तिथून हरण करून न्यावे. माझा असा निश्चय आहे कीं आपण जर या दासीचा स्वीकार केला नाही तर आपल्याला प्राप्त करून घेण्यासाठी मी हजारो जन्म घेत राहीन. मी आपणासारख्या निष्काम पुरुषाशीच लग्न करीन, इतर कोणाही पुरुषाबरोबर नाही. शंभर जन्म का घ्यावे लागोत, मी वरीन तर आपणालाच. जर आपण माझा स्वीकार न केला तर मी ह्या शरीराचा त्याग करीन. आपणाशिवाय अन्य कोणीही माझा पति होऊ शकत नाही.

रुक्मिणीसारख्या अढळ निश्चयी व्यक्तीलाच परमात्म्याचा लाभ होऊ शकतो.

रुक्मिणीचें पत्र वाचून श्रीकृष्ण प्रसन्न झाले. ऐकलें आहे कीं तिने माझ्यासाठी अन्न आणि झोपेचाही त्याग केला आहे. म्हणून मी तिच्याशी अवश्य विवाह करीन.

मन आणि कर्म, मन आणि वचन एक करा. अशीच व्यक्ति भगवंताला प्रिय असते.

रुक्मिणी श्रीकृष्णाची आद्य शक्ति आहे. ती श्रीकृष्णाशिवाय इतर कोणाशीही विवाह करू शकत नाही.

भगवंतांनी आपला सारथी दारुकाकडून रथ तयार करविला आणि सुदेव ब्राह्मणाला वंदन करून गणपतीचें स्मरण केलें आणि रथारूढ झाले.

घरांतून बाहेर निघताना या श्लोकांनी गणपतीची स्तुति कराल तर कांही बाधा उपस्थित होणार नाही.

सुमुखश्चैकदंतश्चकपिलो गजकर्णकः। लंबोदरश्चविकटोविघ्ननाशोगणाधिपः॥
धूम्रकेतुर्गणाध्यक्षोभालचंद्रोगजाननः। द्वादशैतानिनामानि यः पठेच्छृणुयादपि॥
विद्यारंभेविवाहेचप्रवेशेनिर्गमेतथा। संग्रामेसंकटेचैवविघ्नस्तस्यनजायते॥

भगवंत जगाला हें दाखवितात कीं ते स्वतः भगवान असूनसुद्धा मर्यादेचें पालन करतात. मर्यादेचा अनुचित भंग करणारा दुःखी होतो. जर तुम्हाला अधिक सुखसोयी मिळाल्या असतील तर मर्यादेचें पालनसुद्धा अधिक केलें पाहिजे.

भगवंतांनी प्रथम सुदेवाला रथांत बसविलें. सुपात्र ब्राह्मणाचा सन्मान करा. साधुसंतांचा सन्मान केल्याने लक्ष्मी तुमच्या घरीं येईल.

एका रात्रींत श्रीकृष्णाचा रथ विदर्भांत येऊन पोहोचला. लोकांना प्रभूच्या दर्शनाने मोठा आनंद झाला. सर्वच म्हणू लागले कीं रुक्मिणीच्या लायक तर हाच वर आहे. दोघेही लक्ष्मी-नारायणासारखे शोभून दिसतील. तिकडे सुदेव ब्राह्मण हसतमुख रुक्मिणीकडे गेला. मी भगवंतांना घेऊन आलो आहे, त्यांनी तुझा स्वीकार केला आहे. रुक्मिणीने नमस्कार करून विचारले– 'मी तुमची काय सेवा करावी?' सुदेव म्हणाला, 'मला कोणत्याही वस्तूची अपेक्षा नाही. तुझा जय होवो!' रुक्मिणी, भगवंताची भेट घडवून आणणाऱ्या त्या सुदेवाची जन्मजन्मांतरीची ऋणी झाली.

इकडे शिशुपाल पण जरासंध इत्यादी राजांच्या बरोबर येऊन पोचला. त्याने श्रीकृष्णाच्या येण्याचे वर्तमान ऐकले तर कांहीसा भ्याला. तो जरासंधाला म्हणाला, 'तो चोर माझ्या होणाऱ्या बायकोची चोरी करून गेला तर?' जरासंधाने धीर देत म्हटले, 'आम्ही इथे नुसते खाण्यापिण्यासाठी नाही आलो. वेळ आली तर तुझ्यासाठी लढू पण.' रुक्मी म्हणाला मी असा बंदोबस्त केला आहे कीं माझ्या बहिणीजवळ कोणी मनुष्यच काय पण पक्षी देखील जाऊ शकणार नाही. जेव्हा ती पार्वतीच्या मंदिरांत जाईल तेव्हा तिच्या मागेपुढे सोळा कन्या आणि माझे कैक पहेलवान असतील. हे सगळे ऐकून शिशुपाल कांहीसा शांत झाला.

तिकडे रुक्मिणीने स्नान-शृंगार ओटोपून तुळशीची आणि आईबापाची पूजा केली. आईने सांगितले कीं तुझे लग्न व्हावयाचे आहे तेव्हां तू पायीच पार्वतीच्या मंदिराला जावेस हेच उचित होईल. रुक्मिणीने पुनः नमस्कार केला तर आईने तसे करण्याचे कारण विचारले. कन्येने आशीर्वाद मागितला. कन्येला माहीत होते की ती पार्वतीच्या मंदिरांतून सरळ द्वारकेला जाणार आहे, घरी परत येणार नाही.

कित्येक राजांना रुक्मिणीच्या दर्शनाची– मातेचे सौंदर्य पाहण्याची इच्छा होती, परंतु त्यांना कांहीच दिसू शकले नाही. रुक्मिणी मंदिरांत पूजा तर पार्वतीच्या मूर्तीची करीत होती पण त्या मूर्तीमध्ये तिला द्वारकानाथांचेच दर्शन होत होते, कारण तिची भक्ती अनन्य होती. रुक्मिणीने गणपति आणि पार्वतीची पूजा केली आणि प्रार्थना केली, 'मी नेहमी तुझी पूजा करीत राहीन. माझा श्रीकृष्णाशी विवाह होईल असे कर.' पार्वतीने तिला आशीर्वाद दिला. रुक्मिणी पूजा संपवून मंदिरांतून हळूहळू खाली येत होती, तेव्हां कामांध राजे तिची प्रशंसा करू लागले.

मातेला तर वंदन करायचे असते, रुक्मिणीनें विचार केला कीं ती तर जीवमात्राची आई आहे. हे आपलेच बालक कामभावाने पाहात आहेत. रुक्मिणीने आपल्या दृष्टींतून असे तेज प्रगट केले कीं सर्वच कामांध राजे मूर्च्छित होऊन गेले. मातेकडे जो कामभावनेने पाहील त्याचें पतनच होईल.

प्रभूंनी दारुकाला रथ पुढे नेण्याची आज्ञा केली. दुरून गरुडध्वज पाहून रुक्मिणी प्रसन्न झाली. प्रभूंनी तिचा हात धरून तिला आपल्या रथांत बसवून घेतले आणि रथ द्वारकेच्या दिशेकडे धावला. मूर्च्छित झालेले राजे जेव्हां शुद्धीवर आले तेव्हां आपले कपडे झाडीत ते उभे राहिले. एक म्हणत होता त्याला चक्कर आली होती, दुसरा म्हणत होता की तेजामुळे तो पडला होता. त्यांना जेव्हां कळलें की श्रीकृष्ण रुक्मिणीचें हरण करून घेऊन गेले तेव्हा त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. काय एवढ्या क्षणांत तो सुंदरीला पळवून घेऊन गेला? आम्ही त्याच्याशी युद्ध करू.

लक्ष्मीमातेला भोगेच्छेच्या दृष्टीने पाहणाऱ्याचे पतनच होत असते.

शिशुपालाला तर रडू येऊ लागले. माझें नाक कापले गेले. जरासंध इत्यादी म्हणाले– बायकांसारखा

विलाप करीत बसण्याची ही वेळ नाही, आमची सर्वांचीच नाके कापली गेली आहेत. त्या गोपाळाशी युद्ध केले पाहिजे. शिशुपाल, जरासंध, दंतवक्र इत्यादी राजे आपली सेना घेऊन कृष्णाचा पाठलाग करीत धावू लागले.

तिकडे संध्याकाळपर्यंत कान्हा घरी परतला नाही म्हणून बलरामाला काळजी लागली. चौकशी केल्यावर त्याला सगळी हकीगत कळली. कान्हा तरी कसा लाजाळू आहे कीं त्याच्याशी कांही बोललाही नाही ? तो तत्काळ सेना घेऊन विदर्भाला येऊन पोचला आणि शिशुपाल, जरासंध इत्यादींच्या सेना अस्ताव्यस्त करून टाकल्या. साहाय्य करण्याचे वचन देणारे राजेसुद्धा पळून गेले. शिशुपाल एकटा आपल्या भाग्याला दोष देत रडत राहिला. शिशुपाल रडत राहिला पण युद्ध करायला गेला नाही. कामी पुरुष भीरूच असतो. त्याच्याजवळ जरासंध आला आणि म्हणाला, श्रीकृष्ण एकटा असता तर मी त्याला हरविले असते. परंतु बलरामाला हरविणे सोपे नाही. काळच आमच्या उलट आहे. जर तू जिवंत राहिलास तर हजारो कन्या मिळतील. या वेळी आपण पळून जाऊ. रुक्मी श्रीकृष्णाशीं लढायला आला तर त्यांनी त्याला रथाच्या खांबाला बांधून टाकले. रुक्मिणीने प्रार्थना केली कीं माझ्या भावाला मारू नका. बलरामही म्हणाला, कांही असो, आता तर हा तुझा मेव्हणा आहे. त्याला मारता येत नाही. त्यांनी रुक्मीला सोडून दिले. रुक्मी तसा तर उद्धट होता, पण बहिणीला प्रसन्न करण्यासाठी त्याने बलरामाला नमस्कार केला. रुक्मिणीला आनंद होऊन वाटू लागले कीं तिचे दीर किती दयाळू आहेत. तिच्या पापी भावाला त्यांनी क्षमा केली.

आजकाल तर लग्न झाल्यानंतर भाऊ-भाऊ एकत्र राहू शकत नाहीत. जर मन विशाल ठेवाल तर भांडणे होणार नाहीत. आमच्या देशाचा आदर्श तर एकत्र कुटुंबाचाच आहे. राम-लक्ष्मणादि तसेच पांडवही एकाच घरांत राहात होते.

कृष्णाने उद्धवाच्या हाती गोकुळांत पत्र पाठविले कीं जेव्हां नंदबाबा येतील तेव्हांच तो लग्न करील. नंदबाबांना आनंद झाला, पण त्यांनी विचार केला की तो येथे येतच नाही आणि उलट मलाच तिथे बोलावीत आहे. मी द्वारकेला जाणार नाही. त्याच्या लग्नाच्या दिवशी येथेच ब्राह्मणभोजन घालीन.

श्रीकृष्णाला हे समजले. तो स्वतः गोकुळांत आला. आई, मी आलो. माझ्याबरोबर द्वारकेला चल; नाही तर तुझा कन्हैया अविवाहितच राहील. नंद-यशोदा, गोपी आणि इतर सर्वच व्रजवासी द्वारकेला आले.

श्रीकृष्ण आणि रुक्मिणीचे दर्शन घेऊन भगवंताचे स्मरण करीत गोपींनी तेथेच देहोत्सर्ग केला. गोपींच्या श्रीअंगांचेच गोपीचंदन झाले. तेथे गोपी-सरोवर पण आहे. गोपीचंदनाचा महिमा औरच आहे. तेथे महाप्रभूंची बैठक आहे. तिथे त्यांनी भागवतपाठ केला होता.

मग तिथे भीष्मक राजासुद्धा आले. दुर्वासांच्या शापामुळे कृष्ण रुक्मिणीबरोबर द्वारकेंत राहू शकत नव्हते, म्हणून माधवपुरांत विवाहविधि संपन्न झाला. ब्रह्मदेवाने विवाहविधीसाठी मार्गशीर्ष पंचमीचा मुहूर्त सांगितला. रुक्मिणीला मंडपांत आणले गेले. ब्राह्मणसमुदाय स्वस्तिवचनाचा उच्चार करीत होते.

माझ्या प्रभूंच्या भालावर कस्तुरीतिलक आहे, वक्षःस्थलावर कौस्तुभमणी आहे, नाकाच्या अग्रभागावर सुंदर मोत्याची बाळी आहे, हातांत बासरी आहे, मनगटांत कंकणे आहेत, समग्र शरीरावर हरिचंदनाचा लेप आहे, गळ्यांत मोत्याची माळ आहे आणि गोपींनी घेरले गेलेले आहेत, असे प्रभू सगळ्यांचे कल्याण करोत. लक्ष्मीनारायणाच्या दर्शनाने यादवांना परमानंद झाला. रुक्मिणी महालक्ष्मी आहे आणि कृष्ण नारायण.

जीव जर लक्ष्मीचा बाळ होऊन तिला नमस्कार करील तर ती त्याला भगवंताच्या मांडीवर बसवील. जर लक्ष्मीला आईचे स्थान द्याल तर सुखी व्हाल. परंतु स्वामी होण्याचा प्रयत्न कराल तर पतनाच्या गर्तेत पडावे लागेल. लक्ष्मीचा स्वामी जीव नाही, ईश्वर आहे. लक्ष्मीला मातृस्वरूप मानण्यांत कल्याण आहे. रुक्मिणीच्या येथे प्रद्युम्न जन्माला आला. त्याने शंबरासुराचा वध केला आणि रतिबरोबर द्वारकेला आला. शम्बरासुर कल्याण झाकून टाकणारा लौकिक काम आहे. प्रद्युम्न अलौकिक काम आहे. लौकिक कामाला अलौकिक कामानेच नष्ट केले जाऊ शकते. जगातील कोणत्याही जीवाची नव्हे, तर केवळ परमात्म्याचीच भेट घेण्याची इच्छा आणि आशा करा. नारायणधामीं जायची इच्छा करा. प्रभूची भेट झाल्यावर जीवाला अलौकिक आनंद मिळत असतो. भगवंताला भेटण्याची आतुरता जागृत झाली तर लौकिक कामाचा नाश होईल.

ती रति कोण आहे ? भगवंताच्या कथेविषयी रुचि हीच रति होय. ह्या रतीबरोबर विवाह झाल्याने जीव प्रभुमीलनासाठी आतुर होतो. भगवंतांनी नंतर सत्यभामा, जांबवती, यमुनेच्या अंशापासून उत्पन्न झालेली कालिंदी इत्यादींबरोबर देखील लग्ने केली. भगवंताच्या आठ पट्टराण्या होत्या. अष्टधा प्रकृति म्हणजेच आठ पट्टराण्या. ईश्वर ह्या सर्वच प्रकृतींचा स्वामी आहे. या प्रकृति परमात्म्याची सेवा करतात. जीव प्रकृतीच्या आधीन आहे. ईश्वर प्रकृतीच्या आधीन नाही. जीव अष्टधा प्रकृतीच्या वश होतो तर ईश्वर त्यांना आपल्या आधीन ठेवतो. प्रकृति अर्थात् स्वभाव. तुम्ही स्वभावाच्या आधीन होण्याऐवजी स्वभावालाच आपल्या आधीन करून घ्या. मनुष्य आपल्या स्वभावापुढे हार खातो. आपला स्वभाव (प्रकृति) वश करून ठेवणारा सुखी होतो, मुक्त होतो. तसे तर प्रकृति आणि प्राण बरोबरच जातात. तरी पण जपध्यान, सेवास्मरण, सत्संग, सत्कर्म केले गेले, सद्ग्रंथांचे अध्ययन केले, तर स्वभाव चांगला होऊ शकतो. सत्संग म्हणजे कृष्णभक्तांचा, साधुसंतांचा, सद्ग्रंथांचा संग.

अक्रूर वंदनभक्तीचे आचार्य होते. तरी पण कुसंगतीने त्यांची बुद्धी विकृत करून टाकली होती. म्हणून त्यांनी सत्राजिताला मारून टाकण्यासाठी शतधन्व्याला प्रवृत्त केले.

सत्संग आणि भक्ती दोघांनाही एकमेकांची आवश्यकता आहे. सत्संग करणारा जर परमात्म्याचे भजन न करील तर त्याचा सत्संग निरर्थक राहील. दगड नेहमी नर्मदेंत स्नान करीत असतात पण ते दगडचे दगड राहतात. याचप्रकारे कित्येक माणसे कथाश्रवण करीत असतात पण भक्तीमय होऊ न शकल्यामुळे त्यांचे आयुष्य चांगले होत नाही.

पहिले आपले मन सुधारा मग जगाला सुधारायला निघा. आपल्या चारित्र्याने जर आपल्या आत्म्याला संतोष झाला तर समजा कीं तुमचा स्वभाव सुधारला आहे. कथा श्रवण केल्याने श्रीकृष्णाविषयीं प्रेमभक्ती जागृत झाली नाही, पापाविषयी किळस उत्पन्न झाली नाही, धर्माकडे मन वळले नाही तर समजावे कीं तुम्ही कथा (नीट) ऐकलीच नाही. कथा सांगते कीं पापकर्माचा त्याग करा आणि प्रभूविषयी प्रीती वाढवा. कथा ऐकून भगवंताशी (एकप्रकारे) विवाह करून घ्या. आपल्या वृद्धावस्थेत एकमात्र भगवंताशीच संबंध ठेवा. तुळशीच्या लग्नाचे हेच रहस्य आहे.

एका अध्यायांत म्हटले आहे कीं प्रभूंनी सोळा हजार युवतींशी विवाह केला. भौमासुराने सोळा हजार कन्यांना कैदेत ठेवले होते. या सोळा हजार कन्या तर वेदांच्या ऋचा आहेत. वेदांची तीन कांडे आणि लाख मंत्र आहेत–

**१) कर्मकांड** – याचे ऐंशी हजार मंत्र आहेत, ते ब्रह्मचाऱ्यांसाठी आहेत.

**२) उपासना कांड** – याचे सोळा हजार मंत्र आहेत. ते गृहस्थांसाठी आहेत.

**३) ज्ञानकांड** – याचे चार हजार मंत्र आहेत, ते वानप्रस्थांसाठी आहेत.

वेदान्ताचे ज्ञान विरक्तासाठी आहे, विलासी माणसासाठी नाही. विलासी उपनिषदांचे तत्त्वज्ञान समजू शकत नाही.

भागवत तर सगळ्यांसाठीच आहे.

वेदांनी ईश्वराच्या स्वरूपाचे वर्णन तर पुष्कळच केले आहे, पण ते त्याला प्राप्त करू शकले नाहीत. म्हणून वेदांच्या ऋचा कन्या बनून श्रीकृष्णांशी विवाह करण्यासाठी आल्या. वेदांचे मंत्र केवळ शब्दरूप नाहीत. प्रत्येक मंत्र ऋषि आहे-देव आहे. वेदमंत्रांचे देव तपश्चर्या करून थकूनभागून हरले तरी ब्रह्मसंबंध होऊ शकला नाही. म्हणून ते कन्यांचे रूप घेऊन आले. वेदांच्या ऋचा कन्या बनून प्रभूसेवा करायला आल्या. गृहस्थाश्रमधर्माचे वर्णन वेदाच्या सोळा हजार मंत्रांत केले गेलेले आहे. म्हणून त्यांना श्रीकृष्णाच्या सोळा हजार राण्या म्हटले आहे.

सोळा हजार कन्यांना मुक्त तर केले पण त्या सर्व भौमासुराच्या कारागृहात असल्यामुळे त्यांच्याशी जगांतील कोणीही पुरुष लग्न करायला तयार झाला नाही. त्या सर्व कन्या श्रीकृष्णाला शरण आल्या. भगवंतांनी विचार केला की रामावतारांत मर्यादेचे पालन अत्यधिक केले होते. आता या कृष्णावतारांत असे करायचे नाही. म्हणून त्यांनी त्या सर्वच कन्यांशी विवाह केला.

वेदमंत्रांना भौमासुराने कारागृहात ठेवले होते. भौमाचा अर्थ आहे शरीर. शारीरिक सुखांतच रमून राहील तो आहे भौमासुर. विलासी जीवच भौमासुर असतो.

विलासी भौमासुराने त्या कन्यांना कैदेत ठेवले होते अर्थात अनधिकारी कामी व्यक्तीने मंत्रांचा अनर्थ केला होता. कामी व्यक्ति आपल्या विलासी मताच्या पुष्टीसाठी मंत्रांचा विकृत अर्थ करतो. अशा व्यक्ति मंत्रांचा दुरुपयोग करतात. विलासी म्हणतो की भगवंताने गीतेत मौज करायला सांगितली आहे, मग आम्ही मौज का न करावी? तसे लोक "सिध्दिर्भवति कर्मजा" या श्लोकाचा आधार सांगतात. या श्लोकाचा यथार्थ असा आहे की कर्माने सिद्धी मिळते, पण विलासी लोक निराळाच अर्थ लावतात. वस्तुतः हा श्लोक अनासक्तीचा उपदेश देतो. "सर्वस्य चाहम्" चा काही लोक "मी सगळ्यामधे चहारूप आहे" असा करतात. चहा मिळाला तर स्मृति, नाही मिळाला तर अपोहम् अर्थात विस्मृती. गीतेच्या श्लोकांचा असा विपरीत अर्थ करणारे पण आहेत. वेदांचा आशय भोग नसून त्याग आहे. वेदांना भोग नाही तर त्यागच इष्ट आहे. वेदांचे तात्पर्य भोगपर नसून निवृत्तिपर आहे. प्रवृत्तींना एकदम आणि नेहमी करता तर सोडता येत नाही. परंतु जे काही कराल ते धर्माच्या मर्यादेत राहूनच करा. धर्माच्या मर्यादेतच राहून अर्थोपार्जन आणि कामोपभोग करा. वेदांचे म्हणणे आहे की भोग हळू हळू कमी करीत जा, संयम वाढवीत चला.

वेदांनी प्रवृत्ति आणि निवृत्ति दोघांचाही विचार केला आहे पण त्यांचा निर्देश निवृत्तीसाठीच आहे.

सुखोपभोगाची सवय जीवाला अनेक जन्मांच्या संस्कारांमुळे आहे. असे संस्कार लवकर सुटू शकत नाहीत. याचसाठी वेदांनी हळू हळू निवृत्ति वाढविण्याचा आदेश दिला आहे. हा तर मनुष्यच आहे की जो मनाला वाटेल तसा अर्थ काढीत असतो. गीतेत मुख्यतः अनासक्तीचाच उपदेश आहे. तरी पण लोक आपला आपला अर्थ सांगत असतात. कोणी गीतेला कर्मप्रधान म्हणतो, कोणी भक्तिप्रधान म्हणतो, तर कोणी ज्ञानप्रधान. तसे तर गीतेत तिघांचेही प्राधान्य आहे.

श्रीशंकराचार्यांनी सांगितले आहे की चित्तशुध्दीसाठी कर्म आवश्यक आहे. चित्ताच्या एकाग्रतेसाठी उपासना आवश्यक आहे. भक्तिपूर्वक कर्म करण्याने चित्त एकाग्र होईल. भक्ती, उपासना मनाला एकाग्र

करीत असते. ईश्वरांत मन एकाग्र होईल, तर ज्ञान अवश्य मिळेल. ज्ञान परमात्म्याचा अनुभव करविते.

गीतेत कर्म, भक्ती आणि ज्ञान तिघांचा समन्वय आहे. गीतेचे पहिले सहा अध्याय कर्मयोगाचे आहेत. सात ते बारा भक्तियोगाचे आहेत आणि तेरापासून अठरापर्यंत ज्ञानयोग आहे. भक्ती, कर्म आणि वैराग्यांत कोण मुख्य आहे आणि कोण गौण? सर्वच तर प्रधान आहेत. जीवनात तिघांची सारखीच आवश्यकता आहे. गीता नुसती कर्मपर नाही.

विलासी तर वेद आणि गीता सर्वातूनच कर्मपर अर्थ काढील.

भगवंतांच्या विवाहाच्या वर्णनानंतर भगवंताची अनासक्ति सुध्दा सांगितली गेली आहे.

स्नेह सगळ्यांशी ठेवा पण कोणातच आसक्त होऊ नका. वासनेच्या आधीन होऊ नका.

एकदा ग्रीष्मऋतूंत रुक्मिणी श्रीकृष्णाची सेवा करीत होती. तिला वाटत होते की ती सर्वात अधिक सुंदर आहे म्हणून श्रीकृष्ण तिच्यात आसक्त आहेत, तिच्याच आधीन आहेत. सेवेच्या वेळी मन सेव्यांतच (श्रीकृष्णांतच) लागलेले असले पाहिजे. रुक्मिणी सेवा तर कृष्णाचीच करीत होती, पण तिचे मन आपल्या सौंदर्याच्या विचारांतच अडकलेले होते. आपल्या सौंदर्याविषयी तिच्या मनांत गर्व (अभिमान) उत्पन्न झाला म्हणून तिच्या सेवेत न्यून निर्माण झाले.

भगवंतांना कळून आले की रुक्मिणीच्या मनांत आपले सौंदर्य आणि शृंगार याविषयी गर्व आणि आसक्ति झालेली आहे. तर त्यांना तिचा अभिमान नाहीसा करण्याची इच्छा झाली. ते रक्मिणीला म्हणाले– "देवी, तुझ्यासारख्या सुंदरीची योग्य प्रशंसा आणि कदर तर एखादा सम्राटच करू शकतो, माझ्यासारखा गोपाळ नाही. एखाद्या साधुसंताने माझ्याविषयी तुला चुकीची माहिती दिली आहे. तू राजकन्या आहेस आणि मी गोपाळ! तू गोरी आहेस आणि मी श्याम! आपली जोडी अनुरूप नाही. राजे लोकांना सोडून तू माझ्याशी का लग्न केलेस? मी तुला कोणते सुख देईन? मी तर निरपेक्ष आणि उदासीन आहे. मला स्त्रीसौंदर्य किंवा सोन्याची द्वारका याविषयी काही आसक्ती नाही. मला एकान्तच फार प्रिय आहे. अजून काही वाईट झाले नाही. मला सोडून एखाद्या सम्राटाशी लग्न करून सुख मिळवून घे.

रुक्मिणी भगवंताचे असे बोल ऐकून घाबरून गेली. 'माझा त्याग करू नका, नाथ!' तिला मूर्च्छा आली. श्रीकृष्णाने तिला पलंगावर निजवीत म्हटले, 'देवी, मी तर गंमत करीत होतो. तू तर मला प्राणाहून प्रिय आहेस!'

रुक्मिणी समजून गेली की तिचा अभिमान घालविण्यासाठीच प्रभूंनी तसे म्हटले होते. मी समजत होते की हे तर माझ्यात आसक्त आहेत, पण हे तर उदासीन आहेत. भगवंता, हे खरे आहे की आपली जोडी समसमान नाही. कुठे आपण आणि कुठे मी? ज्ञानी जन आपले भजन करतात आणि मूर्ख लोक माझे! ज्ञानी आपल्या शोधात असतात, तर मूर्ख माझ्या शोधात!

माझे स्वामी! आजपासून मी आपल्या घरात महाराणी नाही, दासी होऊन राहीन. आपली ही मोठीच कृपा आहे की आपण मला आपली दासी बनविले आहे. संसारांतील जीव तर काळाच्या आधीन आहेत. त्यांच्याशी कसा विवाह करावा? मी तर आपल्या चरणांची सेवा करण्याची संधी मिळून धन्य झाले आहे. मी लौकिक आणि भौतिक सुखाच्या इच्छेने विवाह केलेला नाही. आजपासून मी आपली महाराणी नाही, दासी आहे. रुक्मिणीत नम्रता आली. ती जेव्हा मानिनी होती तेव्हा भगवंत म्हणाले होते– 'मी तुझ्या योग्य नाही' आता अभिमान नष्ट झाला तर रुक्मिणी भगवंतांना म्हणू लागली, मी आपल्या योग्य नाही. मी राणी नाही, दासी आहे. जेव्हा ती नम्र झाली तेव्हा प्रभू तिचा

सन्मान करू लागले. जीव जेव्हा सर्वप्रकारे नम्र होऊन भगवंताला शरण जातो तेव्हा भगवंत त्याला आदराने आपलेसे करून घेतात.

ह्या अध्यायाचा भाव दिव्य आहे. स्त्री नाही, स्त्रीची आसक्ती बाधक आहे. पति-पत्नींनी बरोबर राहून परस्परांवर प्रेम तर केलेच पाहिजे, परंतु आसक्ती नसली पाहिजे. शुध्द प्रेमात विकार-वासनेचा अभाव असतो. सेवा करताना डोळे आणि मनाला सेव्यांतच गुंतवून ठेवा. जो आत्म्याशिवाय इतर कोणत्याही स्थानी किंवा वस्तूंत आनंद शोधतो तो सुखी होऊ शकत नाही.

भगवंतांनी ज्या अनासक्तीचा उपदेश आपल्या गीतेत केला आहे, ती अनासक्ती आपल्या वागणुकीत पूर्णतः उतरविली आहे. श्रीकृष्ण भोगी असून सुध्दा त्यागी आहेत. अनासक्तीपूर्वक केलेला उपभोग बाधक नाही. भगवंताला कशांतच आसक्ती नाही. त्यांना १६१०८ राण्या होत्या आणि त्यांच्याजवळ सुवर्णाची द्वारका होती तेव्हा त्यांची जी मनःस्थिती होती तीच मनःस्थिती द्वारका नष्ट झाल्यावरही तशीच कायम राहिली. त्यावेळी सुध्दा ते उध्दवाला म्हणतात, 'उध्दवा! हे जग असत्य आहे. सत्य तर केवळ एक ब्रह्मच आहे. हाच अनासक्तीयोग!

केवळ कृष्णच सत्य आहे.

परीक्षित राजाने उषा आणि अनिरुध्दाच्या लग्नाची गोष्ट ऐकण्याची इच्छा दर्शविली.

शुकदेव वर्णन करू लागले.

### ३. उषा–अनिरुद्ध विवाह:

महान शिवभक्त बाणासुराची उषा नावाची एक सुंदर कन्या होती. उषाला स्वप्नात अनिरुद्धाचे दर्शन झाले आणि तिने स्वप्नांत त्याच्याशी लग्नही केले. जेव्हा ती जागी झाली तेव्हा ती आपल्या नाथाला हाका मारू लागली. तिच्या सखीने सगळी हकीगत समजून घेऊन तिला म्हटले, तू काही चिंता करू नकोस. आम्ही त्या पुरुषाला कोठूनही घेऊन येऊ. चित्रलेखेने अनेक पुरुषांची चित्रे काढून तिला दाखविली, पण तिच्या प्रेमीचे चित्र निघाले नाही. परंतु चित्रलेखेने जेव्हा अनिरुध्दाचे चित्र काढले तेव्हा उषा लज्जित झाली. आता चित्रलेखेला समजून आले की अनिरुध्दच आपल्या सखीचा प्रियतम आहे.

चित्रलेखा अनिरुद्धाचे हरण करण्यासाठी द्वारकेला आली. पण तिथे तर सुदर्शनचक्र पहारा करीत होते. ती विचार करू लागली की काय करावे? इतक्यात तिथे नारद येऊन पोचले. चित्रलेखा त्यांना म्हणाली, 'महाराज, आपण तर साधू आहात, दुसऱ्यांची साधना पूर्ण करील तो साधू! मी चोरी करायला जात आहे. आपणही माझ्याबरोबर चला.

नारदांनी विचारल्यावर तिने सांगितले की, ती अनिरुद्धाची चोरी करायला आली आहे. अनिरुद्ध आहे मनाचा स्वामी. चित्रलेखा आहे चित्रविचित्र संकल्प करणारी बुद्धी. अनिरुद्ध मनाचे स्वरूप आहे. बुद्धी-चित्रलेखा अनिरुद्ध-मनाचे हरण करायला चालली आहे. परंतु तिला सफलता तेव्हाच मिळते की जेव्हा नारद-ब्रह्मचर्याचे साहाय्य मिळते. बुद्धी मनाच्या पलीकडे आहे. जर ब्रह्मचर्याचे साहाय्य असेल तर ती मनाला नियंत्रित करू शकेल. जर ब्रह्मचर्य-संयमाचे पालन केले जाईल तर मन वश होईल.

नारद सुदर्शनाशी गप्पागोष्टी करू इच्छित होते. तेव्हां सुदर्शन म्हणाले, त्याला वेळ नाही. सगळ्या नगरावर पहारा द्यायचा आहे. नारद म्हणाले, हे तर ठीक आहे, पण तुला सत्संगसुध्दा करणे जरूर

आहे. तू कोणाचे रक्षण करणार? रक्षक तर श्रीकृष्ण आहेत. तू अज्ञानी आहेस, सत्संगानेच तुझे अज्ञान मिटू शकेल. याप्रमाणे नारदांनी सुदर्शनाला गोष्टींत गुंतवले अन् तिकडे चित्रलेखेने संधी साधून अनिरुद्धाच्या निवासांत प्रवेश केला. आपल्या योगविद्येच्या बळाने ती अनिरुद्धाला पलंगासहित उडवून घेऊन जाऊ लागली. परंतु त्यातील एक फुलांचा हार खाली पडला तो सरळ सुदर्शनावरच पडला. सुदर्शनाने वर पाहिले तर विमान चालले होते. त्याने नारदांना विचारले, 'अरे, हे काय? काही चोरी तर नाही झाली?'

नारद– तुला तर असे निरर्थक विचार येतच असतात. मला कथा सांगायला काहीच अडचण नाही. पण आपल्या स्वामीच्या आज्ञेशिवाय सत्संग करणे चांगले नाही. शक्य आहे, एखादी चोरी पण झाली असेल. तू जाऊन पहा पण माझं नाव नको घेऊ. नारायण! नारायण! आणि अशा रीतीने नारद निघून गेले. त्यांचें इच्छित काम पार पडलें होतें.

सकाळी अनिरुद्धाचे डोळे उघडले, तर त्याला अपरिचित निवास दिसला.

इकडे द्वारकेमधे सुध्दा गडबड माजली. श्रीकृष्णांनी सुदर्शनाला बोलावून कानउघाडणी केली. सुदर्शन म्हणाले, मी नारदांबरोबर सत्संग करीत होतो तेवढ्यात कोणी तरी अनिरुद्धाला उडवून नेले असेल. भगवंत म्हणाले, तुझे काम पहारा द्यायचे होते की सत्संग करण्याचे?

जोपर्यंत नारदरूपी ब्रह्मचर्य बरोबर नसेल तोपर्यंत बुध्दि-चित्रलेखा अनिरुद्ध-मनाचे हरण करू शकत नाही. चित्रलेखाने अनिरुद्धाला उषेच्या महालात नेले. बाणासुराला सगळी हकीगत समजली तर त्याने अनिरुद्धाला कारागृहात बंद करून ठेवले. कृष्णांना सर्व वर्तमान कळल्यावर ते सेना घेऊन शोणितपुराला येऊन पोचले. बाणासुर शंकराचा भक्त होता म्हणून श्रीकृष्णांनी त्याचा वध केला नाही पण तो जो सहस्त्रबाहु होता त्याला चतुर्भुज करून टाकले.

उषा-अनिरुद्धाचा विवाह झाला.

सकाम कर्म पापांचा नाश करीत नाही. केवळ प्रभूच्या हेतूने केले गेलेले सत्कर्मच पापांचा नाश करू शकते. नृगराजाने सत्कर्मे तर केली होती, परंतु ती सकाम केली होती. म्हणून त्याच्या पापांचा नाश झाला नाही. ब्राह्मणाला दान केलेल्या गाईचे त्याने पुन्हा दान केले होते म्हणून त्याला गोचिडीचा जन्म घ्यावा लागला. प्रभूंनी त्याचा उध्दार केला.

दान केलेली वस्तू परत घेत नाहीत. देवधनाचा उपयोग विलासासाठी करू नये.

आनंद-रामायणांत एक प्रसंग आहे. रामचंद्रांनी ऐकले की एक कुत्रे रडत आहे. तर त्यांनी लक्ष्मणाला कारण जाणून घेण्याची आज्ञा केली. लक्ष्मणाने कुत्र्याला बोलावून कारण विचारले. तो म्हणाला, त्याला एका संन्याशाने दगड मारला आहे. त्या संन्याशाला बोलावून त्याला कुत्र्याला दगड मारण्याचे कारण विचारले.

संन्याशी– मी भिक्षा घेऊन जात असता याने माझा पाठलाग केला. मला वाटले हा मला शिवला तर मी दूषित होईन. म्हणून मी त्याला दूर पळविण्यासाठी दगड मारला.

रामचंद्र– तू संन्यास घेण्यात थोडी घाई केलीस. कुत्रा तर पशू आहे. तू मनाने संन्याशी झाला नाहीस. हे कुत्रे जो दंड देईल तो तू सोसला पाहिजेस.

कुत्र्याला दंड द्यायला सांगितले, तर ते म्हणाले– प्रभु! या संन्याशाला लाखोचे उत्पन्न असलेल्या मंदिरात महंत केले जावे.



सगळेच विचार करू लागले, कुत्रे दंड देत आहे की बक्षीस?

कुत्रे म्हणाले, मागल्या जन्मी मी एका मोठ्या मंदिराचा महंत होतो. मी देवधनाचा विलासासाठी उपयोग केला म्हणून मला या जन्मात कुत्रे व्हावे लागले आणि दगडाचा मार पण खावा लागला.

देवधन, ब्राह्मणाचे धन, किंवा संतांचे धन हडपण्याचा प्रयत्न कधी करू नये. आजतर यदुवंशीच संतांचा अपमान करीत असतो.

बलरामाने वनात द्विविध वानर, पौंड्रक आणि काशीराजाचा वध केला.

शुकदेवांनी दुर्योधनाची कन्या लक्ष्मणा हिचा सांबाशी झालेल्या विवाहाचा प्रसंग देखील सांगितला. नारदांच्या परिहासाचा प्रसंग देखील ऐकवला.

ब्रह्मचाऱ्याने गृहस्थांचा संसार पाहण्याची इच्छा करू नये. परंतु नारदांना श्रीकृष्णांचा संसार पाहण्याची इच्छा झाली. श्रीकृष्ण १६,१०८ राण्यांबरोबर कसा काय व्यवहार करीत असतील? ते कोणाबरोबर केव्हा जेवत असतील? गोष्टी करीत असतील? विहार करीत असतील? ते द्वारकेला येऊन श्रीकृष्णांच्या महालांत प्रविष्ट झाले. त्यावेळी श्रीकृष्ण रुक्मिणीपाशी होते. त्यांनी नारदांचे स्वागत केले.

### ४. नारदांचा 'अहं'-निरासः

श्रीकृष्णाला नारद कशाकरता आले आहेत हे कळून चुकले होते. तरी पण त्यांनी विचारले, महाराज! आपले आगमन का झाले आहे?

स्वतः प्रभु असून संन्यासी नारदांचे पाय त्यांनी स्वतः धुतले. श्रीकृष्णासारखे गृहस्थ आणि संन्यासी आजपर्यंत कोणीच झाले नाही. आपला गृहस्थधर्म सार्थ करण्यासाठी त्यांनी नारदांची पूजा केली.

तिथून नारद भगवंताच्या दुसऱ्या महालात गेले. तिथे त्यांनी पाहिले की श्रीकृष्ण उध्दवांबरोबर बुध्दिबळ खेळत आहे. तेथेही श्रीकृष्णांनी त्यांचे चांगल्या प्रकारे स्वागत केले.

याप्रमाणे नारद एकानंतर एक अशा त्यांच्या सर्व महालात गेले. तर त्यांना दिसले की कोठे कृष्ण मुलाशी खेळत आहेत, तर कुठे भोजन करीत आहेत, कुठे निजलेले आहेत, तर कुठे जप करीत आहेत. एका ठिकाणी तर ते कथा ऐकताना दिसले. ज्याप्रमाणे दररोज झाडलोट करून घर स्वच्छ ठेवण्याची आवश्यकता आहे, त्याचप्रमाणे दररोज सत्संगाने मन शुध्द करण्याची पण आवश्यकता आहे.

नारद जिथे जात तिथे तिथे श्रीकृष्ण गृहकार्यात गुंतलेले दिसत. आता तर ते चालता चालता थकले. विचार करू लागले, आता तर एखाद्या महालात जलपान करायला मिळाले तर चांगले. ज्या कोणत्या महालात ते जात तिथे कृष्ण त्यांना विचारीत, केव्हा आलात? कित्येक तासापासून फिरत होते तरी त्यांना सांगावे लागे— बस, आत्ताच आलो आहे.

ही तर महायोगेश्वराची माया होती. भगवंत म्हणाले, नारदमहाराज, मी तुमची पूजा करतो याचा अर्थ हा नाही की तुम्ही माझ्यापेक्षा श्रेष्ठ आहांत. गृहस्थाश्रमाच्या पालनासाठीच मी तुमची पूजा करीत आहे. तसा तर तू माझा नातू आहेस. कारण की तुझा पिता ब्रह्मदेव माझा पुत्र आहे. माझे वैभव पाहून तुला तर आनंद व्हायला पाहिजे होता. नारदांनी भगवंताची क्षमा मागितली.

भगवंत गृहस्थांसमोर आदर्श ठेवीत आहेत की खऱ्या संताचा, पवित्र ब्राह्मणांचा आदर करा.

या प्रसंगापासून एक उपदेश असाही मिळतो की ब्रह्मचाऱ्याने गृहस्थांच्या जीवनात डोकावू नये. शरीराने ब्रह्मचर्याचे पालन सोपे आहे. परंतु दृष्टी आणि मनाने ब्रह्मचर्याचे पालन करणे फार कठीण

आहे. गृहस्थाच्या जीवनव्यापाराचा विचार करण्याने ब्रह्मचर्य भंग होण्याची शक्यता असते.

सत्तराव्या अध्यायांत भगवंताच्या दिनचर्येचे वर्णन आहे. ते ब्रह्ममुहूर्तीच शय्यात्याग करीत. स्नानादि आटोपून संध्या, गायत्री जप, दान इत्यादी करीत असत, आणि मग व्यावहारिक काम करीत.

द्वारकेत आजसुध्दा देव दोन वेळा संध्या करतात. ते, संध्योपासना, माता-पित्यांची पूजा, गरिबांना आणि पवित्र ब्राह्मणांना दान इत्यादी देत. गाईची पण सेवा करीत. गृहस्थाने दररोज संध्या-पूजा, गाय आणि गरिबांची सेवा करावीच.

एकदा नारदांनी भगवंताला विनंति केली की जरासंधाने कैद करून ठेवलेल्या राजांना सोडवा. त्याच वेळी युधिष्ठिराकडून आमंत्रण आले की राजसूय यज्ञांत यावे. भगवंत विचार करू लागले, पहिले कोणते काम करावे? नारदांनी सांगितले की प्रथम त्यांनी यज्ञालाच जावे.

राजसूय यज्ञाचे वेळी भीमाने "अंधाची मुले अंधच असतात" असे म्हणून दुर्योधनाचा अपमान केला. कर्कशवाणीने कलहास प्रारंभ झाला आणि त्याची अंतिम परिणती महाभारताच्या दारुण युध्दांत झाली. त्यावेळीं भीमानें थोडा संयम पाळला असता तर? पण तसें होणें नियतीला मंजूर नव्हतें.

पांडवांनी वनवासाचा काळ गुजराथमधे घालवला होता. सखेडाजवळ पंचेश्वर महादेवापाशी ते राहिले होते. वर्तमान धोलका शहरच प्राचीन विराट नगरी होते.

### ५. जरासंध–शिशुपाल वध:

राजसूय यज्ञाच्या निमित्ताने पुष्कळशा योध्यांचा नाश झाला पण एक जरासंध शिल्लक राहिला. तो महान शिवभक्त होता, म्हणून त्याला जिंकणे सोपे नव्हते. म्हणून भगवंतांनी युक्ति केली. ते स्वतः अर्जुन आणि भीम यांच्याबरोबर ब्राह्मणाच्या वेशांत जरासंधाकडे गेले.

जरासंध ब्राह्मणाला जेवू घातल्याशिवाय स्वतः जेवत नसे. म्हणून त्याने या ब्राह्मणांना दान मागायला सांगितले. श्रीकृष्णाने भीमाकडे निर्देश करून म्हटले की माझ्या या शिष्याशी द्वंद्व-युध्द करावे.

लढता लढता सत्तावीस दिवस होऊन गेले पण जरासंध मरेना. भीम श्रीकृष्णाला म्हणू लागला, तुम्ही दोघे तर खाऊनपिऊन मौज करीत आहात आणि इकडे तर लढून लढून माझे शरीर चूर होऊन चालले आहे.

श्रीकृष्ण– जरासंध मरत नाही. कारण लढताना तू माझ्याकडे दृष्टीच देत नाहीस! लढताना माझ्याकडे पहा, मी जी युक्ती सांगेन ते कर म्हणजे तो मरून जाईल.

अर्जुन जीवात्मा आहे. भीम प्राण आहे. श्रीकृष्ण परमात्मा आहेत. वृध्दावस्थेत प्राण व्याकुळ होतात. जरावस्थेत जर प्राणांनी श्रीकृष्णाकडे ध्यान दिले तर भीमाप्रमाणे तो जरेला मारू शकेल. प्राण जर परमेश्वराभिमुख होतील, प्रतिश्वास त्यांचे स्मरण करील तर जरासंध मरू शकेल. जन्ममृत्यूची पीडाच जरासंध आहे.

जरासंधाचा वध करवून प्रभूंनी सगळ्याच राजांना मुक्त केले.

राजसूय यज्ञाचे आरंभी श्रीकृष्णांची पूजा सर्वप्रथम केली तर शिशुपाल ईर्ष्येने जळू लागला. तो श्रीकृष्णाविषयी अपशब्द बोलू लागला. तर भगवंतांनी सुदर्शनचक्राने त्याचे मस्तक छेदून टाकून त्याचा उध्दार केला. सगळ्यांनाच आनंद झाला पण दुर्योधन अरबडून बसला. अशा व्यक्तीचा सुध्दा नाश लवकर होतो. शिशुपाल अर्थात क्रोध. भगवंतांनी शिशुपालक्रोधाचा सुदर्शनचक्र-ज्ञानाने नाश केला.

क्रोध नाश करण्याचा उपाय ज्ञानच. दुर्योधनाने कपटाने पांडवांना द्युतांत हरविले. पांडवांनी विराट नगरांत अज्ञातवास केला. वनवास संपल्यानंतर पांडव-कौरवांच्या युध्दाचा प्रसंग आला. बलरामांनी विचार केला की त्यांनाही कोणत्या तरी एका पक्षाकडून लढावे लागेल. म्हणून ते तीर्थयात्रेला निघून गेले. घरांत जेव्हा केव्हा मतभेद, मनदुःखाचा प्रसंग उपस्थित होईल तेव्हा तीर्थयात्रा करायला निघून जा.

शुकदेवांनी बलरामाच्या तीर्थयात्रेचे सुध्दा फार छान वर्णन केले आहे.

शुकदेवांनी सुदामाचरित्र देखील ऐकविले. हे चरित्र भागवताचा एक महत्त्वपूर्ण अंश आहे.

भागवताची कथा सांगता सांगता शुकदेव दोनदा समाधिस्थ झाले होते. त्या वेळी इतर ऋषींनी वेदमंत्रोच्चारांनी त्यांना सचेतन केले होते.

शुकदेवांच्या समाधीचे ते दोन प्रसंग हे होत—

(१) श्रीकृष्णांनी गोपबाळे, गाई, वासरे इत्यादींची रूपे घेऊन ब्रह्मदेवाला आपल्या मायेचे दर्शन करविले त्या प्रसंगाच्या वर्णनाचे वेळी.

(२) सुदामा–चरित्राच्या कथनाच्या वेळी.

परीक्षित राजा सुदामा–चरित्राच्या आरंभी शुक देवांना म्हणतात, ही कृष्णकथा ऐकून तृप्तीच होत नाही. आणि या अतृप्तींतही एक आगळाच आनंद गवसतो.

## ६. सुदामा–श्रीकृष्ण भेटः

जी भगवंताचे गुणवर्णन करील तीच वाणी धन्य होय. जे भगवंताची सेवा करतील तेच हात धन्य होत. जे स्थावरजंगमादि सगळ्यांत व्याप्त असलेल्या प्रभूचे स्मरण करील तेच मन खरे मन होय, आणि भगवंताची पवित्र कथा श्रवण करतात तेच कान खरे कान होत.

शुकदेव वर्णन करीत आहेत.

पोरबंदरनिवासी, महाज्ञानी, जितेंद्रिय, निष्कांचन आणि पवित्र ब्राह्मण सुदामा श्रीकृष्णाचे परममित्र आहेत. ते सर्व दिवस प्रभुसेवेत घालवीत आणि अयाचक व्रताचे पालन करीत असत.

ज्ञानाचे फळ धन किंवा प्रतिष्ठा नाही, परमात्म्याशी मीलन आहे. विद्येचा उपयोग केवळ अर्थोपार्जनासाठी करणे चांगले नाही. सुदामा आपल्या विद्येचा उपयोग भोगासाठी नाही, भगवंतासाठी करीत असत. सुदामांच्या घरांत दारिद्र्याचे राज्य होते. त्यांच्या पत्नीचे नाव सुशीला होते. ती नावाप्रमाणेच सुशील होती.

आजकाल तर नावाच्या विपरीतच गुण पाहण्यात येतात. शांताताई कर्कशा असते आणि गंगाताई प्यायला पाणी सुध्दा देत नाही.

सुशीलेपाशी एकच वस्त्र होते. ती महापतिव्रता होती.

धनसंपत्तियुक्त पतीवर प्रेम करणाऱ्या पत्नीचे काही महत्त्व नाही. नेसायला वस्त्र आणि खायला अन्न नसून सुध्दा पतीवर प्रेम करीत राहील तीच पत्नी खरी पतिव्रता होय.

सुशीलेला कित्येक दिवस उपाशी राहावे लागे. तरी पण ती कधी कुरकूर करीत नसे. गाऱ्हाणें गात नसे. तिने सुदामांना असे कधीच म्हटले नाही की विद्वान असून देखील तुम्ही कमवीत का नाही ? एखादी साधारण स्त्री असती तर म्हणाली असती— जर काही कामकाज करायचे नव्हते तर माझ्याशी लग्न करून माझे आयुष्य बरबाद का केले ?



पति जर धन-संपत्ति, सुखसोयी देईल आणि पत्नी अशा पतीची सेवा करील तर त्यात काही

आश्चर्य नाही. अशी पत्नीच धन्य आहे की जी दरिद्री पतीलासुध्दा परमेश्वर समजून सेवा करीत राहील. पति-पत्नी बरोबर राहून कृष्णकीर्तन आणि प्रभुसेवा करीत राहतील तर असा गृहस्थाश्रम संन्यासाश्रमापेक्षा सुध्दा श्रेष्ठ आहे.

सुशीला पतीकडून प्रभुकथा ऐकत असे. पुष्कळ वेळा मुलांना सुद्धा खायला मिळत नव्हते. सुशीलेच्याने आपल्या मुलांची दुर्दशा पाहवली नाही. एक दिवस व्याकुळ होऊन ती आपल्या पतीला म्हणू लागली, 'एक प्रार्थना करायची आहे आपल्यापाशी. आपण कथेंत सांगत असता की कन्हैयाचें आपल्या मित्रांवर फार प्रेम आहे. तो मित्रांसाठी चोरी पण करीत होता.

सुदामा – हो, ही गोष्ट खरी आहे कीं तो आपल्या मित्रांना खाऊ घातल्यानंतरच खात असे.

सुशीला – तर मग त्याला भेटून आपले हें दुःख कां दूर करून घेऊ नये ?

सुदामा – मी दरिद्री आहे. म्हणून मी जर तिथे जाईन तर लोक म्हणतील, हा ब्राह्मण भीक मागायला आला आहे. मी नियम केला आहे कीं परमात्म्याजवळ कांही मागायला जायचे नाही.

सुशीला – मी तुम्हाला कांही मागण्यासाठी पाठवीत नाही. ते तर हजार डोळे असलेले आहेत. आपोआपच सर्व कांही समजून घेतील. केवळ त्यांचें दर्शन तर घेऊन या.

सुदामा – मी इथे बसून सुद्धा मनानें त्यांचे नेहमी दर्शन करीत असतो. शारीरिक भेटीपेक्षा मानसिक भेट फार सुखदायी असते.

सुशीला – एखादे वेळीं प्रत्यक्ष दर्शन सुद्धा घेतले पाहिजे. तुमची प्रतिज्ञा तर कोणाही जीवाच्या दाराशी न जाण्याची आहे. श्रीकृष्ण तर परमात्मा आहेत. त्यांचे द्वार तर सगळ्यांसाठीच उघडे आहे. तिथे जाण्यात संकोच कसला ? मित्राची भेट घेतलीच पाहिजे.

ज्ञानी आणि तपस्वी सुदामा तर घरबसल्याच कृष्णाचें दर्शन घेत. परंतु पत्नीच्या आग्रहास्तव द्वारकेला जायला तयार झाले. त्यांनी विचार केला कीं पत्नी माझी प्रत्येक गोष्ट ऐकते, तर मला तिची ही गोष्ट ऐकलीच पाहिजे. ते पत्नीला म्हणाले, कल्याणी, मित्राला भेटायला तर चाललो आहे पण रिकाम्या हाताने जाण्यांत काही शोभा नाही. घरांत तर कांहीच नव्हते. म्हणून सुशीलेने शेजारणीकडून दोन मुठी पोहे मागून आणले. धन्य आहे सुशीलेची. तिने पोह्यांतला एक दाणासुद्धा घरीं ठेवला नाही, आणि सगळेच्या सगळे पोहे एका फडक्यांत बांधून भगवंतासाठी नेण्यास दिले. अशी भेट देण्यात तुम्हाला संकोच होईल, पण सांगा कीं वहिनींनी हीच भेट पाठविली आहे. पत्नीचा आग्रह आणि प्रभुदर्शनाच्या इच्छेने सुदामा द्वारकेकडे निघाले. फाटलेले धोतर, एका हातांत काठी आणि बगलेत पोह्याची पुरचुंडी असे ते निघाले.

सुशीला विचार करीत आहे कीं कित्येक दिवसांचे उपाशी माझे पति तिथपर्यंत कसे पोचतील ? मीच त्यांना जायला भाग पाडले. पण इतर कांही उपायही नव्हता. आपल्या मुलांची दुर्दशा तर पाहवत नाही. ती भगवान सूर्यनारायणाची प्रार्थना करू लागली कीं, "माझ्या पतीचें रक्षण करा".

सुदामा पौष शुक्ल सप्तमीच्या दिवशीं द्वारकेला गेले. अत्यंत थंडीमुळे शरीर कापत होते. सात दिवसांचे उपाशी सुदामा दोन मैल चालूनच थकून गेले. त्यांना विचार येत होते कीं द्वारकानाथांचें दर्शन तरी होईल कीं नाही. वाटेंत दुर्बलता आणि चिंता यामुळे मूर्च्छाही येत होती.

तिकडे द्वारकाधीशांना बातमी मिळाली कीं सुदामा येत आहे. त्यांनी विचार केला, अशा निष्ठावान, सदाचारी, अयाचक तपस्व्याला पायी चालवणें मला शोभत नाहीं. त्यांनी गरुडाला पाठवून आकाशमार्गे सुदामांना द्वारकेपर्यंत आणून पोचविलें. ते म्हणाले, द्वारका तशी फार दूर नाही. सकाळी निघालो आणि

संध्याकाळीं मी येथे येऊन पोचलोही. त्यांना हे समजलेच नाही कीं गरुडाने त्यांना येथे उचलून आणले.

भगवंतासाठी तुम्ही दहा पावले पुढे चालाल तर ते वीस कोस चालून तुम्हाला भेटण्यासाठी येतील.

सुदामांनी लोकांना द्वारकाधीशाच्या प्रासादाचा मार्ग विचारला. ते माझे मित्र आहेत. लोक हसले आणि म्हणाले, ' असा भिकाऱ्यासारखा कोणी द्वारकाधीशांचा मित्र असू शकतो का ? सुदामा प्रभुस्मरण करीत करीत भगवंताच्या द्वारीं येऊन पोचले. द्वारपाल त्यांना भिकारी समजून अडवून म्हणू लागले, ' जे कांही पाहिजे असेल ते आमच्याकडून मागून घे. तू आंत जाऊ शकणार नाहीस. '

सुदामा – मी द्वारकाधीशांपाशी कांही मागायला नाही, तर त्यांना भेटायला आलो आहे. ते माझे मित्र आहेत.

विशुद्ध प्रेम फक्त देतच असते, कांही मागण्याची इच्छा करीत नाही.

द्वारपाल हसू लागले. काय, हा असा भिकमाग्या कांही मिळवण्याच्या इच्छेशिवायच इथें आला असेल ?

सुदामा – तुम्ही श्रीकृष्णाला जाऊन सांगा कीं, तुमचा मित्र सुदामा तुम्हाला भेटायला आला आहे.

सेवक आंत गेला आणि नमस्कार करून प्रभूंना सांगू लागला – ' प्रभो ! द्वारीं एक भिकाऱ्यासारखा दुर्बल ब्राह्मण आला आहे. डोळे खोल गेलेले आहेत, हाडे निघालेली आहेत. फाटक्या कपड्यांत फाटक्या प्रकृतीचा आहे. तोंडावर मात्र दिव्य तेज आहे. तो आमच्याकडून कांही घेत नाही. म्हणतो आहे कीं तो आपला मित्र सुदामा आहे, आणि आपल्याला भेटू इच्छितो. '

सुदामा शब्द ऐकल्याबरोबर प्रभूंनी द्वाराकडे धाव घेतली.

दारावर उभे असलेले सुदामा विचार करीत आहेत कीं आजपर्यंत त्यांच्या मनांत आपलें ज्ञान आणि तप आणि कोणाच्या दाराशी न जाण्याचा अभिमान होता. सुशीलेने तो अभिमान घालवून दिला.

सुदामा तसे तर फाटक्या शरीराचें होते, कपडे धुळीने मळलेले होते, पण त्यांचे हृदय अत्यंत स्वच्छ आणि पवित्र होते. भगवंत मनुष्याचे कपडे नाही, त्याचें हृदय पाहतात. जीव जर आपलें जीवत्व-अहम् विसरून जाईल तर ईश्वर आपलें ईश्वरत्व एका बाजूला ठेवून देतात.

भगवंत सुदामाला हाक मारीत धावतच दारावर आले. त्यांच्या राण्यांना आश्चर्य वाटलें कीं आजपर्यंत किती तरी लोक यांना भेटायला येऊन गेले पण ते कधी आजच्यासारखे विव्हल झाले नाहीत.

श्रीकृष्णांनी सुदामाला आपल्या छातीशी लावले. आपल्या मित्राची अशी दुर्दशा पाहून त्यांना फार दुःख झाले. मलाच त्याला भेटायला; त्याची परिस्थिती जाणून घ्यायला जायला पाहिजे होते. मित्रा ! ' चांगले झाले कीं तू इकडे आलास. ' श्रीकृष्ण म्हणाले.

सुदामानें पाहिले कीं वैभव मिळाल्यावर सुद्धा कन्हैया त्याला विसरला नाही. संपत्तीच्या नशेमध्यें भान हरपणाऱ्याला कधी ईश्वर म्हणता येईल का ?

रुक्मिणी पाय धुण्यासाठी पाणी आणीत होती त्याच्या आधीच श्रीकृष्णांनी आपल्या अश्रुजलानें सुदामाचे पाय धुवून काढले. तपस्वी सुदामाच्या पायांत जोडे नव्हते. पायात पुष्कळ काटे रुतले होते. श्रीकृष्ण काटे काढीत होते. एक काटा निघत नव्हता तर प्रभूंनी रुक्मिणीला सुई आणायला सांगितले. रुक्मिणीला उशीर होऊ लागला. प्रभु आपल्या दातांनी तो काटा काढू लागले. सुदामा म्हणू लागले, ' अरे प्रभु, हें काय करीत आहांत तुम्ही ? राण्यांनी पाहिले तर ? आपण राजाधिराज आहात. अशा

तऱ्हेने काटा काढणें तुम्हाला शोभत नाही.'

कृष्ण – तू तरी कशा गोष्टी बोलत आहेस रे? मी तर तुझा सेवक आहे. तुझा कन्हैया संपत्तिवान झाला असला तरी विवेकभ्रष्ट नाही झाला.

श्रीकृष्णांना आज विसर पडला आहे कीं ते परमात्मा, राजाधिराज आहेत. त्यांनी काटा काढून टाकला. सुदामा गरीब होते पण निष्पाप होते. पवित्र होते म्हणून भगवंतांनी त्याची तशी सेवा केली.

दरिद्री असणें अपराध नाही: दारिद्र्यांत भगवंतांना विसरणें अपराध आहे.

सुदामांचें स्नान इत्यादी आटोपल्यावर त्यांना नेसायला पीतांबर दिला. भोजनही झालें. सुदामांना पलंगावर बसवून श्रीकृष्ण त्यांची चरणसेवा करू लागले.

श्रीकृष्ण – मित्रा, वाटेंत तुला फार कष्ट झाले असतील. खरें सांगतो, मी या सांसारिक जाळाला विटलो आहे. आपल्या गुरुकुलांतल्या दिवसांसारखा आनंद आता कुठे आहे?

प्रवृत्तिधर्म आपल्याबरोबर वासना-विकार सुद्धा घेऊन येतो म्हणून भगवंत निवृत्त व्हायची इच्छा करीत आहेत.

मित्रा सुदामा, लहानपणी तुला खेळण्याची तर सवयच नव्हती. मी तुला बळेबळेच खेळायला घेऊन जात असे. तो दिवसही तुला आठवत असेल कीं त्या दिवशीं आपण समिधा आणायला गेलो होतो आणि मुसळधार पाऊस आला तर आपल्याला एका वृक्षाखालीं आसरा घ्यावा लागला होता.

त्या दिवशी सुदामाजवळ फुटाणे होते. तो स्वतः एकटे खाऊ लागला. आवाज ऐकून कृष्णाने विचारले, तू काय खात आहेस? सुदामाने विचार केला कीं खरं खरं सांगितलं तर कृष्णालाही कांही चणे द्यावे लागतील. म्हणून तो म्हणाला, खात नाही, हे तर थंडीने दात वाजत आहेत. एकटा खाणारा दरिद्री होतो. म्हणूनच सुदामाला दरिद्री व्हावे लागले.

श्रीकृष्णाला सुदामाची चरणसेवा करताना पाहून राण्यांना फार आश्चर्य वाटलें. आजपर्यंत पतीचे असें प्रेम कोणासाठीच पाहण्यात आलें नाही. हा ब्राह्मण फार भाग्यवान आहे.

कृष्ण – लग्न केलं आहेस कीं नाही? कशी आहे माझी वहिनी?

सुदामा – पत्नी तर सुशील आहे. मुलें पण आहेत.

सुदामांनी सगळे कांही सांगितले. पण आपल्या दारिद्र्याविषयीं कांहीच बोलले नाहीत.

तुझ्या वहिनीची इच्छा आणि आग्रहामुळेच मी तुला भेटायला आलो आहे.

श्रीकृष्ण – वहिनी अशी चांगली आहे तर तिने माझ्यासाठी कांही पाठविलं असेल.

लक्ष्मी मध्येच म्हणाली – जर तुमची आज्ञा असेल तर मी तुमच्या मित्राकडे कांही पाठवून देते.

कृष्ण – मी देऊ इच्छित नाही, ह्याच्याकडून कांही घेऊ इच्छित आहे.

लक्ष्मी – हा दरिद्री ब्राह्मण तुम्हाला काय देऊ शकेल?

श्रीकृष्णाला वाईट वाटलें. माझ्या मित्राला दरिद्री म्हणणारी तू स्वतःला कोण समजतेस? लक्ष्मीने पाहिले की कृष्णाचा आवेश आज कांही औरच आहे. तिने प्रभूची क्षमा मागितली.

सुदामा पोह्याची गाठोडी संकोचामुळे लपवीत होता. भगवंत मनांत हसले आणि म्हणाले, मागें फुटाणे लपविले होतेस, आज पोहे लपवीत आहेस! जो मला कांही देत नाही त्याला मी पण कांही देत नाही. म्हणून मला हिसकूनच घ्यावे लागतील. भगवंतांनी पोह्याची पुरचुंडी हिसकून घेतली.

लौकिक दृष्टीने तर ते दोन मुठी पोहेच होते. पण सुदामाला तर ते सर्वस्वच होते. ब्रह्मदेवाने

सुदाम्याच्या कपाळावर लिहिले होते 'श्री क्षयः'. जेव्हां श्रीकृष्ण त्याच्या कपाळावर टिळा लावू लागले तेव्हां त्यांनी विधात्याचा लेख वाचला आणि त्याला उलट केला – 'यक्ष श्रीः'. जी संपत्ति कुबेराजवळ सुद्धा नसेल अशी संपत्ति मी सुदामाला देईन. भगवंतांनी सुदामांचे प्रारब्ध कर्म क्षीण करण्यासाठी त्याचे पोहे भक्षण केले. त्यांनी पोहे खाल्ले तर त्यांच्याद्वारे सगळ्या विश्वाने आहार केला. कारण कीं ते तर सर्वात्मा आहेत ना! श्रीकृष्णांनी सगळ्या विश्वाला अन्नदान केल्याचे पुण्य सुदामाच्या पदरांत घातले.

श्रीकृष्ण सुदामांना सांगतात कीं गोकुळांत माझी आई याचप्रकारे पोहे मला खाऊ घालीत असे. यशोदेच्या आठवणीने कृष्णाचे डोळे आर्द्र झाले. सुदाम्याचे पोहे प्रेमरसांत भिजलेले होते. मूठभर तांदळाच्या बदल्यात प्रभूंनी सगळ्या द्वारकेचे ऐश्वर्य सुदामाच्या घरी पाठवून दिले. सुदामाने आपल्या दारिद्र्याविषयी भगवंतांना सांगितले नाही, तसेंच भगवंतांनी सुद्धा ऐश्वर्यदानाविषयी सुदामाला सांगितले नाही.

सुदामा दुसऱ्या दिवशी आपल्यां गांवी परतायची तयारी करू लागले. त्यांना वाटले होते कीं श्रीकृष्ण आणखी दोनचार दिवस राहण्याचा आग्रह करील. परंतु भगवंतांनी तसा आग्रह केला नाही. कारण तिकडे सुशीलेला सगळे वैभव मिळूनही तिने व्रत घेतले होते कीं पतीचे मुखदर्शन केल्याशिवाय अन्न ग्रहण करणार नाही. भगवंतांनी विचार केला कीं जर सुदामाला जाऊ दिले नाही तर वहिनींना तितके दिवस उपाशी राहावे लागेल. म्हणून त्यांनी सुदामाला आग्रह केला नाही.

निरपेक्ष पवित्र सुदामा आपले पहिलेच धोतर नेसून जाण्यासाठी तयार झाले. जाताना सुद्धा त्यांनी कांही मागितले नाही. श्रीकृष्ण दारापर्यंत त्यांना पोचवायला गेले आणि म्हणाले, पुढच्या खेपेला वहिनींना पण घेऊन ये. त्यांना माझी आठवण आणि नमस्कार सांग. सगळे विश्व श्रीकृष्णांना नमस्कार करते आणि ते एका दरिद्री ब्राह्मणाच्या पत्नीला नमस्कार करीत आहेत. जी वस्तू माझी आई कधी मला देत असे तीच वस्तू माझ्या वहिनीने मला पाठविली आहे. याचा प्रभूंना आनंद झाला. सुदामाला छातीशी लावून निरोप दिला. दोघांच्या डोळ्यांत अश्रुबिंदू उभे राहिले.

सुदामा सुदामापुरीत जाऊन आपली पडकी मोडकी झोपडी शोधू लागला. तिथे झोपडीचे कांहीच नाव-निशाण शिल्लक नव्हते. तिच्याऐवजी एक मोठा प्रासाद उभा होता. सुदामा विचारांत पडले कीं माझी झोपडी कोणी उचलून नेली?

तिकडे सुदामाच्या येण्याचा समाचार सुशीलेला समजला तर ती धावतच बाहेर आली आणि म्हणाली, आपल्या मित्राच्या कृपेने हे सगळे झाले आहे. सुदामाचे मन कृतज्ञतेने भरून आले. ते प्रार्थना करू लागले, मला धनाची अपेक्षा नाही. जन्मजन्मांतरी मला कृष्णाची भक्ती करायला मिळो, हीच माझी इच्छा आहे. त्यांच्या चरणीं मला स्थान मिळावे.

सुदामाच्या चरित्रांत सुद्धा एक सार आहे. परमात्मा जीवात्म्याचे मित्र आहेत. जगांत एका ईश्वरावाचून असा कोणीच नाही कीं जो आपले सर्वस्व कोणाला देईल. जर सेवा आणि स्तुति करायचीच असेल तर भगवंताचीच करा. जीव जेव्हां ईश्वरावर प्रेम करतो. तेव्हा ईश्वर जीवाला सुद्धा ईश्वर करतो. जीवाचा खरा मित्र परमपिता ईश्वरच आहे. सुदामाने ईश्वरावर निरपेक्ष प्रेम केले तर त्याने सुदामाला आपलेसे करून घेतले आणि आपल्यासारखे वैभवशाली पण केले. सुदामपुरीला सुद्धा द्वारकेसारखे समृद्ध केले.

भगवान तर त्यांच्या चरणकमलाचे स्मरण करणाऱ्याला आपले स्वरूप देतात तर यःकश्चित धनाच्या दानाचे काय? शारीरिक मिलन तुच्छ आहे. मनाचे मिलन दिव्य आहे. जर श्रीमंत दरिद्र्यांना हृदयाशीं लावतील तर आज सगळीच नगरे द्वारकेसारखी समृद्ध होऊ शकतील.

सूर्यग्रहणाचा प्रसंग आला. वसुदेव-देवकी आणि इतर सर्व यादव कुरुक्षेत्रीं गेले.

**७. कुरुक्षेत्रीं कृष्ण आणि इतर यादवांचे मिलन:**

सकाम भावाने केलेले कर्म स्वर्ग देऊ शकते परंतु मुक्ति देऊ शकत नाही. निष्काम कर्म पाप जाळून टाकते. मनुष्याचे शरीरच ते कुरुक्षेत्र आहे जेथे निवृत्ति आणि प्रवृत्तीचे युद्ध होत राहते. हा शरीररथ जो श्रीकृष्णाच्या हाती देतो त्याचाच जय होत असतो.

कृष्णकथा आम्हाला आमचे दोष चांगल्या रीतीने दाखविते. कृष्णकथेच्या श्रवणाने आम्हाला भजन करण्याची प्रेरणा मिळते; आणि तसे झाले म्हणजे आमची इंद्रिये शुद्ध होतात. गंगास्नान फक्त शरीर शुद्ध करते म्हणून गंगास्नानापेक्षा कृष्णकथास्नान अधिक श्रेष्ठ आहे.

वासनाच पुनर्जन्माचे कारण आहे. म्हणून वासनेचा त्याग करा. वैर आणि सुखाची ईषणा वासनेला जन्म देते. त्यांचा त्याग केलाच पाहिजे.

कुरुक्षेत्रांत आलेल्या आपल्या मातापित्यांना श्रीकृष्णांनी एक दिवस विचारले– तुमच्या मनांत कांही इच्छा आहे का? असली तर ती मी पूर्ण करीन.

वसुदेव– तशी माझी आणखी कांही इच्छा किंवा वासना नाही. माझी हीच इच्छा आहे कीं अंतकाळी मी तुझेच स्मरण करीत राहावे आणि तुझे नाव घेत घेतच देहत्याग करावा.

शरीरत्यागाच्या वेळी फार वेदना होत असतात. म्हणून मनाला असे शिक्षण द्या कीं मृत्यूच्या वेळी, वेदना होत असताही, भगवंताचे स्मरण होत राहावे. अशाच व्यक्तीच्या जीवनाचे सार्थक होते. मृत्यूची चिंता केल्याने पाप होणार नाही.

एकदा एकनाथ महाराजांना कोणी विचारले, आपण तर नेहमी ईश्वरमग्न आणि आनंदित असता. माझे मन तर ईश्वराकडे लागतच नाही. असे कां?

एकनाथ महाराजांनी स्वगतच म्हटले, मन संसारांतून निघेल तर प्रभूकडे लागेल. परंतु, प्रगट म्हणाले, आज तर मी कांही सांगू शकत नाही. आजपासून सातव्या दिवशी तुला मरण येणार आहे. त्याच दिवशी तू माझ्याकडे ये. मी तुला सर्व कांही सांगेन.

मृत्यू जवळ आलेला समजला तेव्हा तो घाबरला. आपल्या मुलांना आपली सगळी संपत्ति आणि कारभार सोपवला आणि प्रभुभजनांत मग्न झाला. मृत्यूची तयारी करू लागला.

सातव्या दिवशी तो एकनाथ महाराजांपाशी आला. त्यांनी विचारले, काय, कसं काय? या सात दिवसांत काय मजा केली?

तो गृहस्थ म्हणाला कीं, मृत्यू डोक्याभोवती घिरट्या घालताना पाहिले आणि भोगविलास विसरून ईश्वराचे भजन करीत राहिलो.

एकनाथ– आता तरी तू माझ्या ईश्वरमग्नतेचे रहस्य जाणलेस ना? मी नेहमी मृत्यू डोळ्यासमोर ठेवतो म्हणून माझे मन ईश्वराकडे लागलेले राहते.

भगवंतांनी देवकीची इच्छा जाणण्याची इच्छा व्यक्त केली. देवकी म्हणाली, मला सांगताना संकोच होत आहे, पण कंसाच्याद्वारे मृत झालेली माझी सर्वच संतति मी डोळ्याने पाहू इच्छिते.

भगवंतांनी एकदा यशोदेला सुद्धा तिची इच्छा विचारली होती. तर यशोदेने सांगितले होते कीं, माझी तर हीच इच्छा आहे कीं मी तुझे निरंतर दर्शन करीत राहावे. एकक्षण देखील तू माझ्या दृष्टीपासून दूर होऊ नयेस. सदा सर्वदा आणि सर्वत्र तूच मला दिसावा.

कुठे यशोदेची इच्छा आणि कुठे देवकीची ? भक्तींत इच्छा विघ्नकर्ती असते. इच्छाच पुनर्जन्माला कारण आहे.

कृष्णांनी सुतलपाताळांतून आपल्या सगळ्याच भावांना काढून आणले. देवकीने त्यांना पाहून घेतले आणि म्हटले, बस, आता माझी हीच इच्छा आहे कीं माझा मृत्यू चांगला व्हावा.

ज्ञानी महात्म्यांनाच नाही तर ईश्वराच्या मातापित्यांना सुद्धा शंका असते कीं कोठे त्यांचा मृत्यू बिघडणार तर नाही ना ? त्याच व्यक्तीचा मृत्यू उज्ज्वल होतो कीं जी प्रतिक्षण आपल्याला सुधारत असते.

दहाव्या स्कंधाच्या शेवटी सुभद्राहरणाचे वर्णन आहे.

भद्र अर्थात कल्याण. कल्याण करणारी ब्रह्मविद्याच सुभद्रा आहे. अद्वैतदर्शी ब्रह्मविद्याच सुभद्रा आहे. ज्याच्या घरांत सुभद्रा असेल त्याचे आयुष्य कल्याणमय अर्थात सुखी होते.

अर्जुनाप्रमाणे संन्यास घेऊन तप करणाऱ्यालाच सुभद्रेची प्राप्ती होते. अर्जुनाने त्रिदंडी संन्यास घेऊन चार महिने कठीण तपश्चर्या केली आणि दररोज अठरा तास ॐ काराचा जप केला तेव्हांच प्रभूंनी त्याला सुभद्रा-ब्रह्मविद्या दिली.

चंचल डोळ्याच्या माणसाचे मनही चंचल असेल आणि स्वादिष्ट जेवण करणारा चांगल्या रीतीने भजन करू शकणार नाही. ब्रह्मविद्येची प्राप्ती करून घेण्यासाठी त्रिदंडी संन्यासी व्हावे लागते. प्रभूसाठी सर्वस्वाचा त्याग करणेच संन्यास होय. सांसारिक सुखोपभोगांत लोळत भक्ती करणाऱ्यावर भगवंत लवकर कृपा करीत नाहीत. संसारसुख टाकून भक्ति करणाऱ्यावर भगवंत लवकर प्रसन्न होतात.

**८. वेदस्तुतीचा आशय :**

परीक्षिताने विचारले— शब्दरूप वेद निराकार वेदाचे प्रतिपादन कशाप्रकारे करतात ?

शुकदेवांनी वेदस्तुतीची कथा ऐकविली.

सृष्टीच्या आरंभी शेषशायी नारायणांची वेदांनी स्तुति केली. परमात्म्याला वेदांनी मंगल गान करून जागविले. नाथा ! तुझा जय असो ! वेद प्रभूंचा जयजयकार करतात तेव्हां असे वाटते कीं जीवाची हार झाली आहे. परमात्म्याचा जयजयकार करून वेद मायाबंधनापासून मुक्ति मिळवण्याकरतां प्रार्थना करतात. अनादि कालापासून जीव आणि मायेचा संग्राम चालू आहे. माया त्याला जगांतील विषयांमध्ये अडकवून ठेवीत असते. म्हणून वेद परमात्म्याची स्तुती करतात आणि म्हणतात— मायेचे बंधन तोडून टाका. माया जीवाला स्त्री, धन इत्यादींमध्ये फसवून परमात्म्याकडे जाऊच देत नाही. नाथ आम्ही आपल्याला शरण आलो आहोत. ह्या मायेची बंधने तोडून टाका. वेद सगुण आणि निर्गुण ब्रह्माचे वर्णन करतात. ईश्वर साकार आणि निराकार दोन्ही रूपांनी लीला करीत असतो. ईश्वराच्या निराकारितेचा हाच अर्थ आहे कीं त्याला आमच्यासारखा कोणताच आकार नाही. निर्गुण आणि सगुण दोन्हीही ब्रह्म वस्तुतः एकच आहेत. 'निर्गुण' भक्तांना वश होऊन 'सगुण' होते. नाथ ! या जगांत जे कांही दिसते आणि अनुभवाला येते ते सर्व वस्तुतः आपलेच स्वरूप आहे. लौकिक नामरूप सत्य नाही.

मातीचे भांडे मातीच असते आणि बर्फही पाणीच असते. याप्रमाणे प्रभु सर्वांतच व्यास आहेत.

ज्ञानापेक्षा ध्यान श्रेष्ठ आहे, म्हणून ईश्वराच्या कोणत्याही रूपाचे वारंवार चिंतन, ध्यान, स्मरण आणि दर्शन करा. तसे केल्याने मनाची शक्ती वाढेल. मनाला परमात्म्याच्या कोणत्याही स्वरूपांत विवेकपूर्वक स्थिर करा.

पुढे शिवतत्त्व आणि विष्णुतत्त्वांचे रहस्य पण समजावले आहे.

वेदस्तुतीचे, अनेक विद्वान आपले आपले अर्थ सांगतात. आरंभवाद; परिणामवाद इत्यादी अनेक मते विद्वानांनी सांगितली आहेत आणि ती आपापल्या दृष्टीनुसार आहेत. वेद ईश्वराचे निषेधात्मक वर्णन करतात. ज्ञानमार्ग 'नेति नेति' म्हणून ईश्वराचे वर्णन करतो. भक्तीमार्ग 'इति, इति' म्हणून भगवंताचे वर्णन करतो. तसे दोघांचे लक्ष्य एकच आहे.

अर्जुनाला आपल्या वीरत्वाचा अभिमान होता. म्हणून प्रभूने तो नष्ट केला.

प्रभूच्या अनंत गुणांचे वर्णन कोण करू शकेल? प्रभूंनी अकरा वर्षे गोकुळांत लीला केली. नंतर मथुरेला गेले. तिथून द्वारकेला जाऊन विवाह केले. उद्धवाला ज्ञानोपदेश देऊन स्वधामी गेले.

भगवंताच्या लीला अनंत आहेत आणि गुणही अनंत आहेत. त्यांच्या लीलांचे चिंतन केल्याने मन त्यांच्यांत लीन होते— तद्रूप होऊन जाते.

हरे राम, हरे राम, राम राम हरे हरे।
हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥

॥ दशम स्कंध (उत्तरार्ध) समाप्त ॥

●●●

॥ श्रीहरिः ॥

# ॥ एकादश स्कंध ॥

**श्रीकृष्णाय नमः॥**

ह्या अकराव्या स्कंधांत पहिल्या दहा स्कंधांचा उपसंहार आहे. यांत कपिल गीता, पुरंजन आख्यान, भवाटवी इत्यादी वर्णन आहे. एकादशस्कंध भगवंताचें मुख आहे.

नवव्या स्कंधांत ईशानुकथा लीला होती आणि दहाव्या स्कंधांत निरोधलीला होती. श्रीकृष्णाच्या कथा आणि लीला अनंत आहेत. ही कथा प्रगट झाल्यापासून गंगास्नानाचें माहात्म्य कमी झालें आहे. भागीरथीचें स्नान करायला जाण्यासाठी रुपयापैशांची गरज असते. तिथपर्यंत जावेही लागते. तर कृष्णकथेंत स्नान करण्यासाठी कुठे दूरही जावे लागत नाही आणि रुपयापैशांचीही गरज नाही. गंगास्नानानें केवळ शरीराची शुद्धी होते तर कृष्णकथा-स्नानाने मनाची-हृदयाची शुद्धी होते. एकादशस्कंधांत मुक्तिलीला आहे. कारण मन भगवंताशी जाऊन मिळालें आहे.

ज्याचा मनाचा निरोध होतो त्याला लवकरच मुक्ती मिळते. दहाव्या स्कंधांत निरोध झाल्यामुळे एकादशस्कंधांत मुक्ती झाली.

मुक्त तर मनाला करायचे आहे. कारण आत्मा तर मुक्तच आहे. विषयांचें चिंतन सोडून ईश्वराचें चिंतन सुरू करील तर जीव मुक्त होईल. जीव अज्ञानामुळे बंधनाचा अनुभव करतो. खरें पाहिलें तर त्याला कोणीच बांधून ठेवलेलें नाही. विवेक, तत्त्वज्ञान आणि वैराग्याने मोह नष्ट केला गेला तर मुक्तीच आहे. मनाला वैर आणि वासनेपासून मुक्त ठेवाल तर निरोध लवकर होईल. ज्याचें वैराग्य दृढ झालें असेल त्यालाच मुक्ती मिळते.

**१. वैराग्याची महति:**

अकराव्या स्कंधाचा पहिला अध्याय वैराग्याशी संबंधित आहे. वैराग्याशिवाय भक्ती होत नाही. मनाला समजवा कीं सुखाचें, धनसंपत्तीचें, भोगाचें चिंतन विषमय आहे. त्याने तृप्तीचा आणि शांतीचा कधीच अनुभव होऊ शकत नाही. ईश्वराच्या चिंतनावाचून, पवित्र आचारावाचून वैराग्य येऊ शकत नाही. जोपर्यंत संसारातील प्रत्येक विषयाविषयी वैराग्य होणार नाही तोपर्यंत शुद्ध भक्तीचा आरंभ होणार नाही.

सत्-असत् यांचा विचार केल्याने विवेक उत्पन्न होईल आणि वैराग्यपण. संसारांतील सर्वच जड पदार्थ दुःखरूप आणि असत् आहेत. फक्त चेतन परमात्माच आनंद आणि सत् आहे. खात्रीने समजा कीं जगांतले पदार्थ भ्रममात्र आहेत. क्षणिक आहेत. विषयांचा संयोग तसें तर सुख देतो, परंतु त्यांचा वियोग फार दुःखकारक आहे.

भगवंतांना आता वैराग्य येऊ लागले आहे. जीवाला जेव्हां वैराग्य येते तेव्हांच वस्तुस्थितीच्या कटुतेचें भान होत असते. आयुष्यांत जेव्हां एखादा फटका बसतो तेव्हां वैराग्य येते.

तुलसीदास आपल्या यौवनांत आपल्या बायकोविषयीं फार आसक्त होते. एकदा बायको माहेरी गेली होती. तुलसीदासांना विरह सहन झाला नाही तेव्हा ते सासुरवाडीकडे जायला निघाले. रात्रीची वेळ होती. मुसळधार पाऊस पडत होता. नदीला मोठा पूर आला होता. एका प्रेताला लाकडाचा तराफा समजून त्यावरच स्वार होऊन नदी पार केली. सासुरवाडीची दारें बंद होती, तर त्यांनी खिडकीमधून आंत जायचा विचार केला. एक साप लटकत होता. त्याला दोर समजून वर चढून गेले आणि बायकोच्या खोलींत पोचले. बायकोने पतीच्या पराक्रमाची घटना ऐकली तर ती म्हणाली-' शरम वाटते मला तुमच्या या मर्दुमकीची. जितके प्रेम तुम्ही माझ्या या हाडामांसाच्या देहावर करता आहांत तितके जर तुम्ही प्रभूवर केलेत, त्यांच्या प्राप्तीसाठी असे कष्ट केलेत तर तुमचा उद्धार होईल.''

बायकोचे हे शब्द ऐकून तुलसीदासांना जणूकाय एक धक्काच बसला. त्यांचे ज्ञानचक्षू उघडले गेले, आणि त्याच क्षणीं त्यांनी संसाराचा त्याग केला. सगळे आयुष्य रामचंद्रांच्या सेवेंतच घालविलें.

भगवंतांना वाटू लागले कीं आता ह्या सगळ्या सांसारिक प्रवृत्ती बाधारूप होत चालल्या आहेत.

एकदा पिंडारक तीर्थांत आराम करीत असलेल्या साधूंची चेष्टा करण्याचे यादवकुमारांच्या मनांत आले. त्यांनी सांबाला स्त्रीवेश देऊन ऋषींच्या जवळ नेऊन त्यांना विचारले– 'महाराज! या गर्भिणी स्त्रीला मुलगा होईल कीं मुलगी ? '

खरी गोष्ट काय आहे हे ऋषि समजून गेले. भगवंताच्या प्रेरणेने ते म्हणाले कीं, सांबाच्या गर्भांतून मुसळ उत्पन्न होईल आणि ते तुमच्या समग्र यदुकळाचा नाश करील.

आता यादवकुमार घाबरले, भयभीत झाले. त्यांनी त्या मुसळाचे रजःकणाएवढे तुकडे करून समुद्रांत फेकून दिले. त्या रजःकणांपासून उत्पन्न झालेल्या काठ्यांनी यादव आपापसांत भांडून मेले आणि एका तुकड्याचा एका पारध्याने बाण बनविला तो कृष्णाचा प्राणघातक ठरला.

भगवंतांनी पाहिलें की हे यादवकुमार भविष्यांत जनतेला छळतील म्हणून या प्रकारे त्यांचा नाश करविला. तें मुसळ काळच तर होते!

ऋषींचा, पवित्र संतांचा अपमान करणाऱ्याचें अहितच होत असते.

बुद्धी विकृत झाल्याबरोबर काळ येऊन थडकतो.

जीवाला उत्पत्ती आणि स्थितींत आनंद होतो, लयांत नाही. भगवंताला लयांत सुद्धा आनंद होतो. कारण ते स्वतः आनंदरूप आहेत.

एकदा नारद वसुदेवाकडे आले तेव्हां त्यांनी नारदांची विधिवत् पूजा करून म्हटले, ' कृपया मला असा उपदेश द्या कीं जेणेंकरून मी ह्या जन्ममृत्यूरूप भयानक संसाराला अनायासेच पार करून जाऊ शकेन.

**२. नवयोगेश्वरांचा उपदेश:**

नारदांनी वसुदेवाला नवयोगेश्वर आणि निमिराजा यांचा संवाद सांगितला.

एकदा विदेहराज निमीच्या राजसभेंत नवयोगेश्वर आले, तर राजांनी त्यांना विचारले– परमकल्याणाचें स्वरूप कसे आहे? त्याचें साधन काय? तुम्ही मला भागवतधर्माचा उपदेश कराल का?

अर्ध्या क्षणाचा सत्संगसुद्धा मनुष्यासाठी परमनिधि ठरू शकतो.

भगवंतांत आसक्त असणाऱ्या संतांचा क्षणभराचा संगसुद्धा स्वर्ग आणि मोक्षाच्या तुलनेंत अधिक महत्त्वपूर्ण आहे. तर मग इतर पदार्थांची ती गोष्टच काय?

योगेश्वर म्हणू लागले— राजा! ध्यानपूर्वक ऐक.

श्रीकृष्ण अंशी आहे आणि जीव अंश. कोणी म्हणेल हे दोन केव्हां आणि कसे विभक्त झाले? अज्ञानाचा आरंभ केव्हां झाला हें कसे सांगता येऊ शकेल? अज्ञानाचा तर नाशच करायचा आहे.

जीव अंश ईश्वर अंशीमध्यें मिळाल्यानंतरच सुख आणि शांति मिळू शकते. एकटा जीव रोगी आहे. कारण तो वियोगी आहे. हें वियोगदुःख दूर करण्याचा उपाय कोणता? निश्चय करा कीं तुम्हाला ईश्वरांत मिळून जायचे आहे. हें शरीर तर मलीन आहे. या शरीराद्वारें ब्रह्मसंबंध होऊ शकणार नाही. शरीर दुर्गंधयुक्त आहे, म्हणून देव दूर पळतात. मनाला ईश्वराशी जोडून घ्या.

काळ सगळ्यांच्याच डोक्यावर घिरट्या घालतो. त्याच्यापासून वाचायचे असेल तर श्रीकृष्णाला शरण जा. सगळेच कर्म प्रभूची आज्ञा मानून प्रभूला प्रसन्न करण्यासाठी आणि प्रभूकडे सन्मुख राहूनच करा. सगळेच व्यवहार प्रभूशी आंतरिक संधान ठेवूनच करा. असें केल्याने सगळीच कर्मे भक्तीमय होतील. कर्कशवाणीचा प्रयोग कधीच करू नका.

सगळ्यांमधेच प्रभूचा अंश आहे असें मानून व्यवहार केल्याने तो व्यवहार भक्तीरूप होऊन जाईल. जड चेतन एकच आहेत, सर्वच जड-चेतन ईश्वरमय आहे असें मानल्याने पापापासून वाचता येईल; आणि मनाला शांति पण मिळेल.

सगळेच संत चरितार्थासाठी कांही ना कांही काम तर करतातच. सेना न्हाव्याच्या मनांत विचार आला कीं लोकांच्या डोक्याचा मळ (केस) आपण तर काढीतच असतो पण आपल्याच मनाचा मळ काढीत नाही. या विचाराने त्याच्यात परिवर्तन झाले. हळू हळू त्याचें जीवनच बदलून गेले आणि तो संत झाला.

कारभार-व्यवसाय करताना नेहमी प्रभूचें स्मरण करीत रहा. सांसारिक व्यवहार व भक्ती एकच माना. ज्ञानप्राप्तीसाठीं सत्संग आवश्यक आहे. म्हणून दररोज सत्संगही केला पाहिजे. सत्संगानें मनाची अशुद्धी दूर होते. जीव जन्माच्या वेळीं तर शुद्ध असतो परंतु संगाचा रंग त्याच्यावर चढत जातो. म्हणून नेहमी श्रेष्ठ संतांच्या संगतींत रहा.

जो सर्वत्र सौंदर्य पाहतो पण त्यांत आपलें मन रमू देत नाही तो संत. संत नेहमी प्रभूचेंच स्मरण आणि चिंतन करीत असतो. त्रैलोक्याचें राज्य मिळाल्यावर सुद्धा जो भगवंताला विसरणार नाही तोच खरा संत होय. जो प्रेमाच्या दोरीनें परमात्म्याला आपल्या हृदयाशीं बांधून ठेवतो तो संत. अशा संताचा संग करावा.

जोपर्यंत सांसारिक विषय प्रिय वाटत राहतील तोपर्यंत तुम्ही वैष्णव होऊ शकत नाही, आणि मुक्तीसाठी पात्रही होत नाही. सुंदर विषयांचा उपभोग करण्याची शक्ती आणि सोय असून सुद्धा जो मन तिकडे जाऊ देत नाही तोच खरा वैष्णव.

दोन मार्ग आहेत— त्यागाचा आणि समर्पणाचा. जो त्याग करू शकत नाही त्याने समर्पण करावे. सगळ्यांवरच प्रेम करा. सर्व कांही कृष्णार्पण करण्याचा भाव ठेवा. किंवा मी कोणाचा नाही आणि कोणी माझा नाही असें मानून सर्वस्वाचा त्याग करून प्रभूवर प्रेम करा.



शरीर, वाणी, मन, इंद्रियें, बुद्धी आणि स्वभावाने केली जाणारी सर्वच कर्मे नारायणाला समर्पण

करणें हाच साधासुधा सरळ भागवतधर्म आहे.

यााप्रमाणें प्रत्येक क्षणीं प्रत्येक वृत्तिद्वारा भगवंताच्या चरणकमलांचे स्मरण (भजन) करणारी व्यक्ती प्रभूचें प्रेम, प्रेममयी भक्ती आणि संसाराविषयीं वैराग्य आणि भगवत्स्वरूपाचा अनुभव हें सर्व एका वेळीच (एकदमच) प्राप्त करीत असते.

आत्मस्वरूप भगवान, समस्त प्राण्यांमध्यें आत्मरूपानें, नियतरूपाने स्थित आहे. जी व्यक्ती कोठेही अधिकपण किंवा न्यूनपण न पाहता सर्वत्र भगवत् सत्तेलाच पाहते, समस्त प्राणी आणि पदार्थ आत्मस्वरूप भगवंतामुळे स्थिर आहेत; भगवत्स्वरूप आहेत असा अनुभव करते तिला भगवंताचा परमप्रेमी भक्त मानावे. जो मनाने एकमात्र भगवंतांत रममाण होत असतो तो उत्तम भगवतभक्त आहे.

तिसरा योगेश्वर आंतरिक्ष याने मायेची लक्षणें सांगितली, तर योगेश्वर प्रबुद्धाने मायेला पार करण्याचे उपाय सांगितले. जो मायेला पार करू इच्छितो त्याने स्वतंत्र राहण्याऐवजी एखाद्या खऱ्या संताला गुरु केले पाहिजे, आणि त्याने सद्गुरूच्या आज्ञेंत राहिले पाहिजे. विलासी आणि पाखंडी गुरु शिष्याचें कल्याण करण्याऐवजी अहितच करील. म्हणून प्रथम ब्रह्मनिष्ठ गुरुचा शोध केला पाहिजे.

ज्याचा फक्त ब्रह्म या शब्दाकडे ओढा आहे, परंतु तो स्वतः ब्रह्मनिष्ठ नाही तो गुरुपदासाठी अयोग्य आहे. संत असा ब्रह्मनिष्ठ असला पाहिजे कीं ज्याची केवळ स्मृतीसुद्धा शिष्याला पापकर्माकडे जाण्यापासून रोखेल.

यौवन आंधळे आणि उच्छृंखल असते. म्हणून या अवस्थेत संतांच्या आणि सद्गुरूंच्या आज्ञेंत राहिले पाहिजे.

जो मायेपासून सुटू इच्छितो त्याने ब्रह्मचर्याचें पालन करावे. डोळ्याने आणि मनाने सुद्धा! रोज एकांतांत एकाच बैठकींत तीन तास प्रभुनामाचा जप करावा. वाणीचा संयम देखील आवश्यक आहे. दररोज निदान तीन तास तरी मौन पाळा. मौन मनाला एकाग्र करून चित्ताच्या शक्तीला वाढविते.

वाणी आणि पाणी यांचा दुरुपयोग करणारा ईश्वराचा अपराधी आहे.

मन-वाचा-कर्मनिं कोणालाच त्रास देऊ नका.

स्वधर्मावर, भागवत्धर्मावर निष्ठा ठेवा. परंतु इतर धर्मांविषयीं कुभाव न ठेवता त्यांचा आदर करा.

रोज प्रार्थना करा. जीव आणि ईश्वराचा पहिला संबंध वाग्दानाने होतो. रोज प्रार्थना करा. 'नाथ, मी आपलाच आहे. माझ्या अपराधांची क्षमा करा.'

विवेकपूर्वक विचार केल्याने मायेचा मोह कमी होतो. नाही तर माणूस आपला पुष्कळसा वेळ धन, व्यसन आणि फॅशनमधे व्यतीत करीत राहील.

मायेला पार करण्याची तशी तर अनेक साधने आहेत. परंतु भक्ती अनायासे आणि सहजप्राप्त साधन आहे.

जो मला शरण येतो तो मायासागर तरून जातो.

कलियुगांत श्रीकृष्णाच्या नामाचा जप केल्याने सद्गती मिळते. सेवा-पूजा केवळ क्रियात्मक नाही तर भावात्मक सुद्धा असली पाहिजे.

कलियुगांतील माणूस विलासी आहे. शरीरच कामांतून उत्पन्न होत असते. म्हणून या युगांत योग आणि ज्ञानमार्गाने ईश्वर प्राप्त होणे कठीण आहे. हरिकीर्तनाने तो सहज प्राप्त होतो.



तसे तर सिद्धान्त आणि यम-नियम सगळ्यांनाच ठाऊक असतात, परंतु पुण्यवान मनुष्यच

ते आपल्या आचरणांत आणू शकतो. नामजप सोपा आहे, कारण जीभ तुमच्या स्वाधीन आहे. भगवंताचें नाम सर्वसुलभ असूनसुद्धा अधिकांश जीव नरकगामी होतात, ही फार आश्चर्याची गोष्ट आहे.

महाभारताच्या वनपर्वांत यक्ष-युद्धिष्ठिर संवाद येतो. यक्ष युधिष्ठिराला विचारतो, या जगांत सर्वात मोठे आश्चर्य कोणते ?

युधिष्ठिर उत्तर देतो–

मनुष्य दररोज हजारो जीवांना यमसदनी जाताना पाहत असतो तरी पण तो स्वतः अशा प्रकारे व्यवहार करतो कीं तो अमरच आहे. सगळी माणसे नेहमीकरताच इथे राहू इच्छितात. याहून मोठे आश्चर्य कोणते असेल ? दुसऱ्यांना मरताना पाहून सुद्धा स्वतःला अमर समजून भोगविलासांत बुडून राहणें हें सर्वात मोठे आश्चर्य आहे.

पाचव्या योगेश्वरानें भगवान नारायणाचें स्वरूप दाखविलें.

निमिराज म्हणाला– आता कांही कर्मयोगाविषयींही सांगा. ह्या कर्म, अकर्म विकर्मांत माझें मन गोंधळून गेलेलें आहे.

सहावा योगेश्वर अरिहोत्र म्हणाला– खरें आहे तुझे म्हणणे. पुष्कळसे विद्वानसुद्धा यांत गोंधळतात. वेद कर्म करण्याची आज्ञा देतात. स्वर्गाविषयीं लालूच देखील दाखवितात. परंतु त्यांचा उद्देश तर कर्म सोडविण्याचाच आहे.

कर्मांत अकर्म आणि अकर्मांत कर्माचें दर्शन करावे म्हणजेच अनासक्तिभावाने कर्म करावें. तेच श्रेष्ठ होते. कर्म करा पण अनासक्तिभावानें– **'मा फलेषु कदाचन!'** सर्वच कर्म ईश्वरार्पण करा.

सातवा योगेश्वर द्रुमिल याने प्रभूंच्या लीलांचें वर्णन केलें. सगळ्याच अवतारांच्या कथा ऐकविल्या.

आठवा योगेश्वर चमसाने भक्तीहीन पुरुषाच्या अधोगतीचें वर्णन केलें. आणि करभाजन नावाच्या नवव्या योगेश्वराने परमेश्वराच्या पूजेचा विधि सांगितला.

शेवटी नारदाने वसुदेवाला सांगितले– आता जास्त वेळ नाही. श्रीकृष्णाला आपला मुलगा समजू नकोस. तो तर साक्षात परमात्मा आहे.

तिकडे देवही प्रभूंच्या स्वधामी परतण्यासाठी प्रार्थना करू लागले. प्रभूंनी सुद्धा पृथ्वीलोकाचा त्याग करण्याचा निश्चय केला.

द्वारकेत अपशकुन होऊ लागले. वृद्ध यादव भगवंताजवळ येऊन म्हणू लागले– प्रभु, इथे राहणें इष्ट नाही. कारण ऋषींनी शाप दिला आहे. प्रभासक्षेत्रीं जाऊन राहणें ठीक होईल आणि सर्वजण तेथे जाण्याची तयारी करू लागले.

**३. उद्धरेदात्मनात्मानम्ः**

उद्धवांनी ऐकलें आणि ते समजून चुकले कीं यादवांचा संहार करून भगवंत इहलोकाचा त्याग करण्याची तयारी करीत आहेत. ते प्रभूजवळ येऊन म्हणाले– "मी आपल्याला शरण आलो आहे. आपल्या विरहांत मी कसा जिवंत राहू शकेन ? जिथे तुम्ही जाल तिथे मी पण येईन.

भगवान– अरे उद्धवा ! तू माझ्याबरोबर आलाच नव्हतास तर मग माझ्याबरोबर जाण्याचा प्रश्नच कोठें येतो ? हा संसार तर स्वप्नांचा खेळ आहे. माया आहे, भ्रम आहे, असत्य आहे. सत्य तर फक्त आत्माच आहे.

भगवंतांनी उद्धवाला त्याग आणि संन्यासाचा उपदेश दिला.

उद्धव– त्याग आणि संन्यासाचा मार्ग फार कठीण आहे. सरळ सोपा मार्ग सांगा. मला कृपा करून ज्ञान द्या.

भगवान– मी तुला मनुष्यजन्म देऊन काय कमी कृपा केली आहे? आता तर तुला स्वतःलाच स्वतःवर कृपा करावी लागेल. स्वतःच आपला गुरु होऊन स्वतःचा उद्धार कर.

आत्माच आत्म्याचा गुरु आहे.

ईश्वराने तर कृपा केलीच आहे. आता तर जीवालाच आपल्यावर कृपा करायची आहे. आयुष्याचें लक्ष्य निश्चित करून ते नेटाने प्राप्त करण्याचा प्रयत्न कराल तर सफलता अवश्य मिळेल. पुष्कळशा जीवांना तर आपल्या लक्ष्याचें ज्ञानही नाही. जीवनाचें लक्ष्य आहे प्रभु-प्राप्ती.

कृष्णकथेच्या श्रवणाने पाप जळून जाते आणि चित्त शुद्ध होते. नियमित भजन कराल तर ईश्वर अवश्य कृपा करील.

उद्धवा, मी तुझ्या कृपा केली आहे. आता तू स्वतः आपल्यावर कृपा कर.

अजामीळासारख्या वेश्यागामी पाप्यावर सुद्धा प्रभूंनी कृपा केली होती मग तुमच्यावर कां कृपा करणार नाहीत?

संकल्प करा कीं याच जन्मांत भगवंताचें दर्शन घ्यायचें आहे.

आता भयंकर कलिकाळ येईल. विधिपूर्वक कर्मैं होणार नाहीत. मनुष्याचा जन्म तर मिळेल; पण संगतीचा दोष लागेल.

उद्धवा! तूच तुझा गुरू आहेस. आपल्यासाठी भावपूर्वक प्रयत्न कर. जोपर्यंत आंतून प्रेरणा होणार नाही तोपर्यंत उद्धार देखील होणार नाही. स्वतः आपले गुरु होऊन आपल्या उद्धाराचा प्रयत्न करावा. माझ्याशिवाय जे कांही दिसत आहे ते सर्व मिथ्या आहे.

उद्धवा! मी तुझे धन नाही, मन मागतो आहे. सगळ्यांमधेच एका ईश्वराला पहा. तुझे मन मला देऊन टाक.

उद्धव भगवंतांना म्हणतात– मला तुमच्याशिवाय कोण आत्मतत्त्वाचें ज्ञान देईल?

भगवान– मी अनेक प्रकारची शरीरें निर्माण केली आहेत, पण मानवशरीर मला अधिक प्रिय आहे. फक्त या मानवशरीरांतच मनुष्य तीक्ष्ण आणि एकाग्र बुद्धियुक्त होऊन ईश्वराचा साक्षात् अनुभव करू शकतो. या संबंधांत अवधूत दत्तात्रेय आणि यदु राजाचा संवाद ऐकण्यालायक आहे.

**४. अवधूतांचे निरूपण (२४ गुरू):**

उद्धवा! यदुराजांनी श्री दत्तात्रेयांना असेच प्रश्न विचारले होते. यदुराजांनी पाहिलें कीं त्रिकाळदर्शी अवधूत ब्राह्मण निर्भयतेने विचरत आहेत. म्हणून त्यांनी विचारले– दत्तात्रेया! आपल्याप्रमाणें माझें शरीर पुष्ट नाही. ज्या काम आणि लोभाच्या अग्नींत संसारांतील अधिकांश लोक जळत आहेत त्याने आपल्यावर कांहीच प्रभाव पाडलेला नाही. आपण आपल्याच स्वरूपांत स्थित असता. आपण आपल्या आत्म्यांत अनिर्वचनीय आनंदाचा अनुभव कसा करू शकता?

दत्तात्रेय– राजा! मी हें जाणून घेतले आहे कीं संसारांतील जड वस्तूंमध्यें आनंद नाही. जड वस्तूंमधून मन काढून घेऊन सर्वांचा द्रष्टा जे आत्मस्वरूप त्यांत दृष्टी स्थिर करून द्रष्ट्याचें दर्शन करीत असतो. दृश्यांतून दृष्टी काढून जो द्रष्ट्यांत स्थिर करतो त्यालाच आनंद मिळतो.



राजा! आनंद बाह्यविषयांमधे नाही, आंतच आहे. मी आपलेपणा विसरून दृष्टी अंतर्मुख करून

घेतली आहे. मी आपल्याच स्वरूपांत स्थित आहे. प्रारब्ध जे कांही देते तेच आनंदानें स्वीकारतो. आपल्या मनाला स्वतःच सुधारा.

दीक्षागुरू एकच असतो, परंतु शिक्षागुरू अनेक असू शकतात. मी एकाकडून नाही, चोवीस गुरूंकडून ज्ञान मिळविलें आहे. माझ्या गुरूंची नावे अशी आहेत—

**१) पृथ्वी** माझा पहिला गुरू आहे. मी प्रभात समयीं तिला वंदन करतो. हात क्रियात्मक शक्तीचे प्रतीक आहेत. परमात्म्याला आवडतील अशीच कर्मे करीत राहीन असा निश्चय करा. आईप्रमाणें माझें रक्षण कर अशी प्रार्थना करा.

पृथ्वी पुष्कळ कांहीं सहन करूनही सगळ्यांना सुख देत असते. मी पृथ्वीपासून सगळ्यांबद्दल सद्भाव आणि सहनशक्ती हें दोन गुण शिकलो.

**२) वायूपासून** मी संतोष आणि निःसंगता शिकलो.

**३) आकाशाने** मला शिकविलें कीं आत्मा आकाशाप्रमाणें अनादि आणि अविनाशी आहे. ईश्वर त्याच्याचप्रमाणें सर्वव्यापी आहे.

**४) पाण्यापासून** मी शीतलता आणि माधुर्य यांचा उपदेश घेतला. पाण्याप्रमाणें साधकाला सुद्धा शुद्ध राहिले पाहिजे. मधुरभाषी आणि शांत स्वभाव असला पाहिजे.

**५) अग्नीपासून** मी पवित्रता शिकलो. हृदयांत जर विवेकरूपी अग्नी असेल तर पाप होणार नाही. विवेकच अग्नी आहे. कोणाही व्यक्तीचा दुर्व्यवहार मनांत ठेवू नका. दुसऱ्यांच्या पापाविषयींच्या गोष्टी मनांतून काढून टाका, विवेकाग्नीनें जाळून टाका.

**६) चंद्राने** मला क्षमता शिकविली आहे. वृद्धि आणि ऱ्हास तर शरीराचे होत असतात, आत्म्याचे नाही. संपन्न अवस्थेत ज्ञान-भान हरवूं नका आणि विपन्नावस्थेंत दुःखी होऊ नका.

**७) सूर्याप्रमाणें** परोपकारी व्हायचें आहे पण अभिमानी नाही. एकाच सूर्याची अनेक जलपात्रांत अनेक प्रतिबिंबें दिसतात. आत्मासुद्धा एकच आहे पण विविध देहादि उपाधींमुळे अनेक स्वरूपांचा दिसतो. वस्तुतः आत्मा उपाधीरहित आहे.

**८) कबूतराच्या प्रसंगांने** मी शिकलो कीं कोणत्याही वस्तू किंवा व्यक्तीविषयीं अतिशय आसक्ती असू नये. ते पत्नी आणि पुत्राच्या आसक्तीमुळे मेले. कोणाच्याही मरणानंतर विलाप करू नका. रडणारा सुद्धा एक दिवस जाणारच आहे. तर दुसऱ्यांसाठी कां रडता ? आपल्याचसाठी रडा.

**९) अजगराप्रमाणें** प्रारब्ध कर्मानुसार जे कांही मिळेल त्यांत संतुष्ट रहा.

**१०) समुद्र** वर्षारूपांत खूप पाणी मिळाल्यामुळे उतू जात नाही; आणि ग्रीष्म ऋतूंत पाणी न मिळाल्यामुळे आटतही नाही. सुखदुःखांचे प्रसंगीं नेहमी समुद्रासारखे राहिले पाहिजे.

**११) पतंग** सुद्धा गुरू आहे. तो अग्नीकडे मोहित होऊन त्याच्याजवळ जातो आणि जळून मरून पडतो. मनुष्य सुद्धा मायेने मोहित होऊन त्यांत अडकून आपला सर्वनाश ओढवून घेतो.

पतंगाप्रमाणे सौंदर्यापाठी वेडे होण्याने आपलें अहितच होते. जगांतील विषय बाहेरून सुंदर आहेत, आंतून नाही. सौंदर्य तर कल्पनामात्र आहे. एक श्रीकृष्ण तेवढाच अंतर्बाह्य सुंदर आहे. त्याच्यावर प्रेम करा.

**१२) भ्रमराप्रमाणें** सार ग्रहण करा, पण आसक्त होऊ नका. भ्रमराने कमळाकडे आसक्त होऊन आपले प्राण गमविले. तो लाकूड पोखरतो पण कमळाची कोमल पाकळी कोरू शकत नाही. कारण त्याला कमळाविषयीं आसक्ती आहे.

हा संसार देखील कमळासारखा आहे. तो आपल्या विषयगंधांत जीवभ्रमराला अडकवून ठेवतो. आंत अडकलेला भ्रमर कमळाच्या पाकळ्या उमलायची वाट पाहतो पण हत्ती त्याची सर्व स्वप्नें उजाड करून टाकतो. मनुष्यसुद्धा सांसारिक विषयांत अडकून आपला नाश ओढवून घेतो म्हणून विषयसुखांत फसू नका.

हत्तीरूपी काळ तुडवून नष्ट करील त्यापूर्वीच सर्वस्वाचा मोह सोडून प्रभूशीं एकरूप होणारा जीव काळाला हरवू शकतो.

ज्याप्रमाणें भ्रमरांत लाकूड कोरण्याची शक्ती आहे त्याचप्रमाणें मनुष्य देखील मोठा शक्तिशाली आहे. मनुष्य इच्छा करील तर नारायण होऊ शकतो. परंतु प्रथम आसक्तीचा त्याग केला पाहिजे.

मधुकरचे दोन अर्थ आहेत. भ्रमर आणि मधमाशी. भ्रमरापासून जे शिकलो ते वर सांगितलें. मधमाशीपासून मी हें शिकलो कीं कोणत्याही वस्तूचा अतिशय साठा करू नये. मधमाशी मधाचा साठा करते म्हणूनच तर लोक तिला मारून मध पळवतात.

**१३) हत्ती** सुद्धा माझा गुरू आहे. स्पर्शसुखाच्या लालसेने हत्ती आपला प्राण गमावतो. लोक एक मोठासा खड्डा करून चारा-पाने वगैरे भरून एक नकली हत्तीण त्यांत ठेवून देतात. हत्ती तिला खरी हत्तीण समजून स्पर्शसुखाच्या इच्छेने तेथे जातो पण लागलीच त्या खड्ड्यांत अडकून पडतो.

साधक पुरुषाने स्त्रीसंग करू नये; आणि स्त्रीसाधिकेने पुरुष-संग करू नये. मूर्तीला देखील स्पर्श करू नये.

**१४) मधमाशीने** एकत्र केलेला मध शिकारी पळवून नेतो. योगी देखील काही उद्योग न करता भोग मिळवू शकतो. धनाचा संग्रह करण्याऐवजी दान करा.

**१५) हरीण :** ज्याप्रमाणें स्पर्शसुखाच्या लालसेने हत्तीचा नाश होतो त्याचप्रमाणे संगीत श्रवणाच्या लालसेने हरणाचा नाश होतो. म्हणून योग्याने गीत, नृत्य, संगीत इत्यादी विषयांचा त्याग केला पाहिजे.

**१६) जीभ :** रससुखाची जिभेच्या स्वादाची लालसा मासोळीला मारते. काट्याला लावलेले आमिष मासोळी खायला जाते आणि मरते. मनुष्याला सुद्धा ही जीभ फार त्रास देते. इतर सर्व इंद्रियांना जिंकून जिभेला जिंकले नसेल तर नाशच होईल. जो रसनेला जिंकतो तो सर्वस्व जिंकतो.

दत्तात्रेयांनी याप्रमाणें शब्द, स्पर्श, रूप, रसगंध, या पाचही विषयांची चर्चा केली. केवळ एकाच विषयाच्या सेवनाने हत्ती, भुंगा इत्यादींचा नाश होतो, तर सगळेच विषय सेवन करणाऱ्या मनुष्याची तर कशी दुर्गती होत असेल ?

मृत्यूनंतर ऐकविलें जाणारे गरुडपुराण मनुष्याने मृत्यूच्या आधीच ऐकले पाहिजे.

हरीण, हत्ती, पतंग, भुंगा आणि मासा एकाच विषयाच्या आसक्तीने मरून जातात तर पाचही विषयांचा उपभोग करणारा प्रमादी मनुष्य कां मरणार नाही ?

**१७) वेश्या :** राजा ! मी एका वेश्येला सुद्धा गुरू मानले आहे. पिंगला नावाची एक वेश्या श्रीमंत गिऱ्हाइकासाठी वाट पाहात सर्व रात्रभर जागत असे. एकदा तिला विचार आला कीं कामी पुरुषासाठी जागत राहण्यापेक्षा प्रभूसाठी जागून त्यांनाच कां न मिळवावे आणि तिने विषयांचा त्याग केला. "आता मी फक्त प्रभूंनाच प्रसन्न करीन" असा निर्धार करून तीने कामी पुरुषासाठी जागणे सोडून दिले.

काळसर्पाचा ग्रासच अशा जीवाचें प्रभूशिवाय इतर कोण रक्षण करू शकेल ?

या जगांत आशा परमदुःख आहे आणि निराशा परमसुख. कोणत्याही सुखाची आशा न राखणे म्हणजे निराशा. म्हणून सुखाची आशा करू नका.

आशेची बेडी मनुष्याला कशी जखडून ठेवीत असते याचे वर्णन आद्य श्रीशंकराचार्यांनी केले आहे. ते म्हणतात कीं शरीर झिजू लागले आहे, केस पांढरे झालेले आहेत, दात पडून गेले आहेत, वृद्धत्वामुळे काठीच्या साहाय्यानें चालावे लागत आहे तरी पण म्हातारा आशेचा पिंड सोडतच नाही!

अशा म्हाताऱ्यासारखे आचरण करीत बसण्यापेक्षा भगवंताचें भजन करा.

**१८) टिटवी:** टिटवीप्रमाणें संग्रह न करतां त्याग करीत रहा.

**१९) बालकांपासून** भोळेपणा, निर्दोषता ग्रहण करा.

**२०) एकान्तवास:** एका गरीब मुलीची मागणी करण्याकरता कांही पाहुणे आले. घरांत तांदूळ नव्हते म्हणून ती घराबाहेर जाऊन भात सडण्यासाठी एकान्तांत मुसळ घेऊन बसली. पण तिने फक्त एकेक बांगडी हातांत ठेऊन आपल्या बाकी बांगड्या काढून ठेवल्या. कारण बांगड्या हातात असल्या तर मुसळाचा घाव घालताना त्या वाजल्या असत्या आणि पाहुण्यांना समजले असते कीं या घरांत तर तांदूळही तयार नाहीत. एक बांगडी आवाज करीत नाही.

याचप्रमाणें वस्तींत राहिल्याने कलह-क्लेश यांचा अप्रिय नाद होण्याची शक्यता आहे म्हणून साधूंनी एकांतवास करावा. तेव्हांपासून मी कुमारीकेला गुरु मानली.

**२१) लोहार:** बाण तयार करणारा लोहार पण माझा गुरू आहे. तो आपल्या कामांत इतका मग्न असे कीं सडकेवरून वाजत गाजत जाणाऱ्या राजाच्या स्वारीकडे सुद्धा त्याचें ध्यान जात नसे.

लौकिक कार्यांत तन्मयतेशिवाय सिद्धी मिळत नाही, तर मग पारलौकिक कार्यांत ईश्वराच्या आराधनेंत तन्मयतेशिवाय सिद्धी कशी मिळू शकेल? ध्याता ध्यान आणि ध्येय जेव्हां एकरूप होऊन जातात तेव्हांच जीव कृतार्थ होत असतो.

**२२) सर्पाप्रमाणे** मुनीला सुद्धा एकट्यालाच भ्रमण केले पाहिजे. मी सर्पालाही गुरु केले.

**२३) कोळी:** कोळी आपल्या तोंडांतून लाळ काढीत असतो. तिच्याशी खेळतो आणि गिळूनही टाकतो. ईश्वर सुद्धा आपल्या मायेने सृष्टी निर्माण करतो आणि शेवटी संहारही करतो.

**२४) किडा** देखील माझा गुरू आहे. भ्रमरी त्याला धरून आपल्या बिळांत कैद करते. किडा भ्रमरीच्या भयानें तिचेच चिंतन करीत राहतो आणि शेवटी स्वतःच भ्रमरी बनून जातो.

मनुष्य सुद्धा ईश्वराचें चिंतन करता करता ईश्वर होऊ शकतो. विषयांचे चिंतन करता करता त्याचें मन देखील विषयी होते आणि प्रभूचें चिंतन करीत राहिल्याने प्रभुमय होते.

यदुराजाने दत्तात्रेय गुरूंना साष्टांग नमस्कार केला.

त्यानंतर श्रीकृष्णांनी उद्धवाला बंधन आणि मोक्षाचे स्वरूप समजावले.

बंधन आणि मोक्ष शरीराचें नाही तर मनाचे धर्म आहेत.

उद्धवा! हा जीव माझाच अंश आहे. तरी पण अविद्याकारणें बंधनांत अडकत असतो. नामच त्याला मुक्त करू शकते. ईश्वर बंधन आणि मोक्षाच्या पलीकडे आहे. जीव कर्मानें बांधलेला आहे. ईश्वर नित्यमुक्त आहे. या संसारांत आत्मज्ञान झालेला मुक्त आहे आणि इतर सर्व बांधलेले आहेत. ज्या व्यक्तीचे प्राण, इंद्रियें, मन, वृत्ती आणि बुद्धी, संकल्परहित आहेत ती व्यक्ती देहधारी असून सुद्धा देहगुणांपासून मुक्त आहे.

साधुपुरुष आणि भक्ती यांच्या लक्षणांचें सुद्धा भगवंतांनी वर्णन केलें.

त्यांनी सत्संगाचें महत्त्व वर्णन करून सांगितले. वृत्रासुर, प्रल्हाद, बलिराजा, बिभीषण, सुग्रीव, हनुमान, कुब्जा, व्रजातील गोपी इत्यादी सत्संगाद्वारेच, वेदही न जाणतां व तपही न करतां, मला

प्राप्त करून घेऊ शकले होते. केवळ सत्संगाने प्रेरित होऊन भक्तीच्या कारणें ते मला मिळवू शकले. सत्संगाने पशुपक्ष्यांचाही उद्धार होतो. विषयलंपटाच्या बरोबर राहून जपध्यानादी होऊ शकत नाही.

**५. उद्धवाला केलेला उपदेश :**

उद्धवा ! माणसांच्या संगतींत राहून माणूस होणे सोपे आहे, पण ब्रह्मनिष्ठ होणे फार कठीण आहे. म्हणून नेहमी सत्संगांतच राहण्याचा प्रयत्न करावा.

नंतर भगवंतांनी संसारवृक्षाचें वर्णन केलें. संसारवृक्षाचें बीज आहे पाप आणि पुण्य. वासना मूळ आहे, सत्त्व-रज-तम हें त्रिगुण त्याचे खोड आहे, इंद्रियें आणि मन फांद्या आहेत, विषय रस आहे आणि सुख आणि दुःख फळें होत.

विषयांत अडकून राहणारा भोगी दुःखी होतो विवेकी परमहंसाला योगी म्हणतात. तो खरे सुख भोगतो.

उद्धवांनी विचारले – मनुष्याला माहीत असते कीं विषय दुःखकारक आहेत तरी पण तो ते भोगण्याची इच्छा कां करतो. विषय मनाकडे जातात कीं मन विषयांकडे जाते ?

भगवान– हें रजोगुणी मन मनुष्याला विषयांत गुंतवते. प्रथम मन विषयांकडे जाते आणि मग मन त्या विषयांचा आकार धारण करते. विषय मनांत घर करतात. मन विषयाकार होऊन जाते. मन स्वतः विषयाकार होऊन जीवाला सतावीत असते.

विषयांचें चिंतन प्रभुभक्तींत बाधक आहे. ईश्वरस्मरण झालें नाही तर एकवेळ चालेल पण सांसारिक विषयांचें चिंतन मात्र कधीच होऊ देऊ नका.

मनाला विषयांकडे जाऊ देऊ नका, त्याला वश करून माझ्यांतच एकाग्र करा.

ईश्वरांत मनाला लय करणें हाच महायोग आहे.

उद्धवा ! तशी तर कर्म, यश, सत्य, दम, शम, ऐश्वर्य, यज्ञ, तप, दान, व्रत, नियम, यम इत्यादी कल्याणाची अनेक साधनें आहेत. परंतु सर्वश्रेष्ठ साधन तर माझी भक्तीच आहे. भक्ती सर्वच पापांना जाळून भस्म करून टाकीत असते.

मला प्राप्त करण्यांत अनन्यभक्तीचें जितके सामर्थ्य आहे तितकें सामर्थ्य योग, सांख्य, धर्म, वेदाध्ययन, तप, त्याग इत्यादींमधे नाही.

भक्तीयोगाचा महिमा वर्णन करून प्रभूंनी ध्यानयोगाचा विधि सांगितला.

ध्यानाचे दोन प्रकार आहेत. एकाच अंगाच्या चिंतनाला ध्यान म्हणतात आणि सर्वांगांच्या चिंतनाला धारणा. ध्यान करता करता तो ध्येयाशीं एकरूप होतो. रोज ईश्वराचे ध्यान कराल तर घर, शरीर व संसाराचें विस्मरण होऊ शकेल. जो प्रभूशीं तन्मय होऊन गेला आहे त्याला देहभान राहात नाही.

उद्धवा ! बाष्कळ बडबड सुद्धा पापच आहे. म्हणून विचार करूनच बोलले पाहिजे.

भक्तीनें सिद्धी मिळते पण ती माझ्या प्राप्तींत बाधक आहे. म्हणून तिच्यापासून दूरच राहिले पाहिजे. सिद्धी प्रसिद्धी आणते आणि प्रसिद्धी प्रमाद. परिणामी माझ्या भजनांत विक्षेप होऊ लागतो. म्हणून सिद्धीपासून दूर राहिले पाहिजे.

पुढे भगवंतांनी आपल्या विभूतींचे वर्णन केले. जगांत कोणत्याच जीवाला हीन समजू नका. नंतर उद्धवांनी कांही शब्दांचे अर्थ आणि व्याख्या विचारल्या. त्या भगवंतांनी सांगितल्या. ते म्हणाले– माझ्यामध्येच बुद्धी स्थापन करणे शम आहे. इंद्रियांना वश करणे म्हणजे दम. कोणत्याच प्राण्याचा

द्रोह न करणे दान आहे. जगांत कोणाही जीवाविषयी कुभाव न ठेवता सद्भाव ठेवणे सर्वांत मोठे दान आहे. भूतद्रोहाचा त्याग दान आहे. चेतन किंवा जड या कोणाचाही द्रोह करू नका. सगळ्यांना समभावाने पहा.

सर्व कामनांचा त्याग तप आहे. कामसुखाचा विचार सुद्धा न करणारा सगळ्यांत मोठा तपस्वी आहे. वासना आणि स्वभावाला जिंकणे शौर्य आहे. ब्रह्माचाच विचार करणें श्रेष्ठ सत्य आहे आणि धर्मच सर्वोत्तम धन आहे. माझी भक्ती करणे हाच सर्वोत्तम लाभ आहे.

बंधन आणि मोक्ष यांच्या तत्त्वाचा ज्ञाताच पंडित होय आणि ग्रंथांत लिहिलेल्या सिद्धान्तांना आचरणांत आणून भक्तीमय आयुष्य जगणारा उत्तम ज्ञानी आहे.

देहालाच आत्मा समजून देहाबद्दल अहंबुद्धि ठेवणारा महामूर्ख आहे. सद्गुणांनी संपन्न मनुष्य धनवान होतो तर असंतुष्ट मनुष्य दरिद्री! मायेच्या आधीन होऊन, सांसारिक विषयांमध्ये फसून इंद्रियाधीन होणारा तो जीव होय.

जो आपल्या इंद्रियांना वश करून सांसारिक विषयाविषयी अनासक्त राहतो तो ईश्वर होय. केवळ बाहेरच्याच नाही तर आतल्या शत्रूंचा नाश करणारा जितेंद्रिय, खरा वीर होय.

जो निंदेने लेषमात्र विचलित होत नाही तोच खरा भक्त आहे.

उद्धवा, मनुष्याच्या कल्याणासाठी मी तीन उपाय सांगितले आहेत–

१) ज्ञानयोग, २) निष्काम कर्मयोग, ३) भक्तियोग.

मनुष्यशरीर ज्ञान आणि भक्ती मिळविण्याचे साधन आहे. म्हणून ते श्रेष्ठ आहे. हे मनुष्यशरीर उत्तम नावेप्रमाणे आहे.– सगळ्याच फळांचे मूळ आहे. आणि करोडो उपायांनी सुद्धा अलभ्य आहे. तरी पण दैवयोगाने मिळाले आहे. गुरुरूपी नावाड्याद्वारे आणि अनुकूल वाऱ्या सारख्या माझ्यामुळें पुढे पुढे जात आहे. तरीही या अमूल्य अशा देहनौकेचा सदुपयोग न करता, भवसागर पार करण्याचा प्रयत्न केला नाही तर तो मनुष्य स्वतःच आपला नाश करून घेत असतो, अधिक काय सांगू? असा मनुष्य आत्मघातकी आहे.

उद्धवा, सत्संग होऊ शकला नाही तरी चालेल, पण विषयलंपटाचा संग तर कधीच करू नका. सत्संगाची प्राप्ती ईश्वरकृपेवर आधारित आहे; कामीचा संग टाळणेही मनुष्याच्या स्वतःच्या हातातली गोष्ट आहे.

मन फक्त प्रभूंनाच द्या, कोणाही स्त्री-पुरुष किंवा नातेवाईकांना नको.

हे उद्धवा! तू आपले मन मलाच दे. मी तुझे धन नाही परंतु मनच मागत आहे.

हे उद्धवा! ह्या अखिल विश्वांत मीच एक व्याप्त आहे असा भाव माझ्यातच ठेव.

भक्तीच्या द्वारे सर्वांचा आत्मारूप अशा माझे दर्शन केल्याने मनुष्याच्या हृदयातील अहंकाराची गाठ सुटून जाते. सगळेच संशय नष्ट होतात आणि त्याची सर्व कर्मे सुद्धा नष्ट होतात.

उद्धवा! कोणाच्याही प्रशंसेने प्रसन्न होऊ नको; आणि कोणाच्याही निंदेने नाराजही होऊ नकोस. स्तुति आणि निंदा एकसारखीच समज.

उद्धव म्हणू लागले, निराधार निंदेला कसे सहन करावे?

भगवान– जो निंदा सहन करू शकत नाही तो कच्चा आहे. निंदक तर मित्र असतो, तो आम्हाला दोषदर्शन करवितो. म्हणूनच साधूलोक निंदकाला आपल्याबरोबरच बाळगतात. निंदेचे शद्ब तर आकाशांत विलीन होऊन जातात. आपल्याला चिकटत नाही.

नंतर भगवंतांनी उद्धवाला भिक्षुगीतेचा उपदेश दिला.

सुखदुःख तर मनाची कल्पना आहे. मनाची निद्रेसारखी स्थिती जर जागृतींत सुध्दा झाली तर तो मुक्तच आहे. लोक भिक्षुची निंदा करतात पण तो मनावर परिणाम होऊ देत नाही. भिक्षु म्हणतो—

धनार्जनांत, धनाच्या उपभोगांत, ते वाढविण्यांत, रक्षण करण्यांत आणि त्याचा नाश झाल्यावर परिश्रम, चिंता, त्रास होतो; तरी पण मनुष्य अशा धनापाठी धावत फिरत असतो. धन हरप्रकारे, प्रत्येक स्थितींत मनुष्याला त्रास देत असते; तरीही त्याचा विवेक जागृत होत नाही.

पुरूरवा-ऊर्वशीच्या दृष्टांताने, स्त्रीच्या सतत संगाने पुरुषाची दशा कशी होते हे दाखविले आहे.

दुष्टाची संगति मनुष्याची अधोगती करते आणि सज्जनांची संगती ऊर्ध्वगती.

सत्संग तर ईश्वरकृपेनेच मिळतो. परंतु कुसंग न करणे तर तुमच्या आधीन आहे.

ऐलगीतेत देहाची चर्चा केली गेली आहे, ती आपण मागे पाहिलीच आहे. हे शरीर मांस, हाडे, कातडी अणि दुर्गंधयुक्त आहे. ह्या देहांतच रत असणारी व्यक्ति पशू आणि किड्यांपेक्षा सुद्धा हीन आहे.

सरतेशेवटी उद्धव कृष्णाला विचारतात— प्रभु, तुम्ही योग, ज्ञान आणि भक्तिमार्गाचा उपदेश तर केला, जो मनुष्य आपल्या मनाला वश करू शकतो त्याचाच योगमार्ग सिद्ध होतो. परंतु या मनाला वश करणे कठीण कर्म आहे. तेव्हा प्रभु! जो मनाला लवकर वश करू शकत नाही तो सुद्धा सिद्धी कशी प्राप्त करू शकेल, हे सांगा.

श्रीकृष्ण— अर्जुनाने सुद्धा मला हेच विचारले होते. मनाला अभ्यास आणि वैराग्याने वश केले जाऊ शकते. परंतु सोपा मार्ग तर माझी अव्यभिचारी भक्ती करणे हा होय. भक्तगण अनायासेच ज्ञानी, बुद्धिवान, विवेकी आणि चतुर होत असतात आणि मलाही प्राप्त करून घेतात. या सरलतम भक्तिमार्गाची जितकी प्रशंसा करावी तितकी थोडीच आहे.

भक्ती स्वतंत्र आहे. तिला कोणत्याही क्रियाकांड इत्यादींचा आधार घ्यावा लागत नाही. ती सगळ्यांना आपल्या आधीन करून घेते. ज्ञानयोग व कर्मयोग यांना भक्तियोगाची जोड मिळाली तरच ते मुक्तिदायी होऊ शकतात.

म्हणून मनुष्य जेव्हा सर्व कर्मांचा त्याग करून आपला आत्मा मला समर्पित करतो तेव्हां त्याला सर्वोत्कृष्ट करण्याची मला इच्छा होते. तो माझ्याशी तद्रूप होण्यायोग्य होऊन मोक्ष मिळवितो.

दुसऱ्यांची निंदा करू नका. जगाला सुधारायचा व्यर्थ प्रयत्नही करू नका. आपल्या स्वतःलाच सुधारा.

समाजाला तर स्वतः प्रभू सुद्धा सुधरवू शकले नव्हते, तर साधारण मनुष्य काय करू शकेल? कृष्णाच्या काळी सुद्धा दुर्योधन, शिशुपाल इत्यादी पुष्कळ दुष्ट मनुष्यांचे अस्तित्व होतेच.

सगळ्या जगाला प्रसन्न करणे फार कठीण आहे. पण परमात्म्याला प्रसन्न करणे तितके कठीण नाही.

हे उद्धवा! मी तुझे धन नाही, मन मागतो आहे. मन केवळ मला-परमात्म्यालाच द्यावे. मी तुझ्या मनाचे फार मनोभावे रक्षण करीन. मी सर्वव्यापी आहे. तू मलाच शरण ये.

उद्धवा! मी तुला समग्र ब्रह्मज्ञानाचे दान दिले आहे. ज्याला मी ब्रह्मज्ञान देतो त्यालाच मी आपले सर्वस्व देत असतो. आता तर तुझा मोह, शोक इत्यादी दूर झाला ना?

उद्धवांनी भगवंताला नमस्कार केला आणि म्हटले— माझ्या सर्व शंका पूर्णपणें दूर झाल्या.

माझें परमभाग्य म्हणूनच प्रत्यक्ष आपल्या मुखांतून मला हें सर्व ज्ञान प्राप्त झालें. जितके ऐकले आहे त्यावर मनन करू इच्छितो.

श्रीकृष्ण— उद्धवा, आता अलकनंदेच्या किनारी बद्रिकाश्रमामध्ये राहून इंद्रियांना संयमित करून ब्रह्मज्ञानाचे चिंतन कर. आपले मन माझ्यांतच स्थिर कर. असे केल्याने तू मला प्राप्त करून घेऊ शकशील.

बद्रिकाश्रम योगभूमी आहे. तेथे प्रभूची प्राप्ती लवकर होते.

उद्धव— प्रभू, आपणही माझ्याबरोबर चला.

भगवान— उद्धवा! मी या शरीराने तर आता तिथे येऊ शंकत नाही. मी चैतन्य स्वरूपाने तुझ्या हृदयातच आहे, तुझा साक्षी आहे. म्हणून चिंता करू नकोस. तू जेव्हां आतुरतेने आणि एकाग्रतेने माझे स्मरण करशील तेव्हां मी उपस्थित होईन. अन्यथा तसे तर एकट्यालाच यायचे-जायचे असते.

जगांत सगळेच जाणतात कीं एकट्यालाच जायचे आहे. तरी पण स्त्रीपुरुष एकमेकांवर आसक्ती ठेवतात. या संसारातील सगळे संबंध मिथ्या आहेत, असत्य आहेत.

एका श्रीमंत नगरशेठजीचा मुलगा रोज एका महात्म्याकडे कथा ऐकायला जात असे. परंतु वेळ संपायच्या आतच उठून येत असे. एक दिवस त्या महात्म्याने याचे कारण विचारले.

युवक— महाराज! मी आपल्या आई-बापांचा एकुलता एक मुलगा आहे. जर घरी परत जायला उशीर झाला तर ते मला शोधायला निघतात आणि माझी बायकोही माझ्याकरता आपले प्राण अंथरून ठेवते. आपण प्रापंचिकांचे संबंध मिथ्या म्हणता पण आपल्याला कांहीच अनुभव नाही.

महात्मा— जर असेच आहे तर आपण त्यांच्या प्रेमाची परीक्षा कां न करून पाहावी? ही जडीबूटी तू घरी जाऊन खा. तुझे शरीर गरम होऊन जाईल. मी उपचार करायला येईन. मग तिथे जे कांही होत राहील ते तू कसलीच हालचाल न करतां पाहत राहा.

त्या युवकाने महात्म्याने सांगितल्याप्रमाणे केले. शरीर एकदम गरम झाले. आईबापांनी घाबरून जाऊन अनेक डॉक्टर आणि वैद्यांना बोलाविले. परंतु कोणाचा उपाय चालला नाही. त्या युवकाची बायकोसुद्धा आकांत करीत होती.

इतक्यांत ते महात्मा तेथे येऊन पोचले. सगळ्यांनीच त्यांच्या मुलावर उपचार करण्याची प्रार्थना केली. महाराज म्हणाले, कोणी तरी जादू-टोणा केला आहे. मी उपाय करू शकतो. त्यांनी एका भांड्यांत पाणी मागविले आणि त्या मुलाच्या डोक्यावरून उतरवून म्हटले— मी मंत्रशक्तीने त्या जादू-टोण्याला या पाण्यांत उतरवून घेतले आहे. आता जर याला वाचवायचे असेल तर हे पाणी कोणाला तरी प्यावे लागेल.

सगळ्यांनीच एकदम विचारले— पण महाराज, हे पाणी पिणाऱ्याची काय दशा होईल?

महात्मा— तो कदाचित मरेलही पण हा मुलगा वाचेल. म्हणून तुमच्यापैकी कोणी तरी यांतले पाणी प्या.

मुलाच्या आईने म्हटले— तशी मी आपल्या लाडक्याचे प्राण वाचवावण्यासाठीं हे पाणी प्यायला तयार आहे पण मी पतिव्रता आहे. मी मेल्यावर माझ्या वृद्ध पतीची सेवा कोण करील?

मुलाचा बाप म्हणाला— मी सुद्धा हे पाणी पिईन, पण मी मेल्यावर ह्या माझ्या बिचाऱ्या बायकोची दशा काय होईल? ती माझ्याविना जिवंत कशी राहील?

महात्म्याने विनोद केला— तुम्ही दोघेही अर्धे अर्धे प्या. दोघांचीही क्रियाकर्मे बरोबरच होतील!

मुलाच्या बायकोला म्हटले. तर ती म्हणाली, माझ्या वृद्ध सासूने तर संसारांतील सर्वच सुख भोगले आहे. मी तर अजून तरूण आहे. मी अजूनपर्यंत संसारांतील सुख अनुभवले नाही, तर मी काही पाणी पिणार नाही. मला मरायचे नाही.

याप्रमाणे त्या मुलाच्या सर्वच नातेवाईकांनी पाणी पिणे नाकारले. उलट सगळे त्या महात्म्यालाच म्हणाले– 'आपणच प्यावे, महाराज! आपल्या मागे रडणारा कोणी नाही. आपण नेहमीच सांगत असता कीं परोपकार सगळ्यांत मोठा धर्म आहे; म्हणून आपण स्वतःच हा परोपकार करा. आपल्यामागे आम्ही प्रतिवर्षी श्राद्ध आणि ब्राह्मणभोजन करीत जाऊ.

महात्म्याने पाणी पिऊन टाकलें. मुलाला आपल्या नातेवाईकांच्या व्यवहाराचा आणि प्रेमाचा चांगला अनुभव आला तो उठून घर सोडून महात्म्याबरोबरच निघून गेला. महाराज, मी संसाराची असारता पाहिली. कोणी कोणाचे नाही. सगळेच संबंध स्वार्थी आहेत. खरा संबंध तर एका ईश्वराचाच आहे.

हे उद्धवा! मी सतत तुझ्याच जवळ आहे. नेहमी माझे स्मरण करीत राहणे देखील सिद्धीच आहे.

परंतु उद्धवाचा उद्वेग जात नाही म्हणून भगवंतांनी त्याला आपल्या चरणपादुका दिल्या. आता उद्धवाला वाटले भगवान आपल्याबरोबर आहेत.

श्रीकृष्णाला नेहमी आपल्याजवळ ठेवा. परमात्म्याच्या सान्निध्याचा नेहमी अनुभव घ्या.

तुकारामांनी म्हटले होते– भलेही माझा वंश न राहो, मला उपाशी मरावे लागो, परंतु प्रभु सदा माझ्याबरोबर राहावे (असावे).

मग उद्धव बद्रिकाश्रमांत आले. तेथे त्यांना सद्गती मिळाली आणि कृतार्थ झाले.

नंतर यादवांच्या नाशाची कथा पण सांगितली.

द्वारकालीला समाप्तीच्या वेळी पंढरपुरांत पुंडलीक भक्त झाला. त्याला कृतार्थ करण्यासाठी द्वारकानाथ विठ्ठलनाथ झाले. पुंडलीक घरांतून लवकर बाहेर आला नाही. भगवंताची कंबर दुरवू लागली म्हणून ते कमरेवर हात ठेवून उभे राहिले.

भगवान म्हणू लागले– कधीच निराश होऊ नका. मला शरण या. मी तुमच्यासाठी उभाच राहीन. ते कटीवर हात ठेवून हेच सुचवीत आहेत कीं त्यांना शरण जाणाऱ्यासाठी संसारसागर फक्त कमरेइतकाच खोल आहे. तेवढ्या पाण्यांत कोणी बुडू शकत नाही.

आपल्या पापांचे प्रायश्चित्त घेऊन मला शरण याल तर संसारसागर तरून जाल.

श्रीकृष्ण साक्षात् परमात्मा आहेत. ते पुंडलिकासाठी द्वारकेहून पंढरपूरला गेले. ते पंढरपुरांत अजूनही विद्यमान आहेत. विठ्ठलनाथांच्या गुणांचे वर्णन कोण करू शकेल?

**हरे राम, हरे राम, राम राम हरे हरे**

**हरे कृष्ण, हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे**

**॥ एकादश स्कंध समाप्त ॥**

●●●

॥ श्रीहरिः ॥

# ॥ द्वादश स्कंध ॥

**श्रीकृष्णाय नमः॥**

बाराव्या स्कंधांत आश्रयलीला आहे. भागवताचे प्रतिपाद्य तत्त्व आश्रयच आहे.

परीक्षित राजाने विचारले– आता या पृथ्वीवर कोणाचे राज्य होईल?

शुकदेव– जरासंधाचा पिता बृहद्रथ याच्या वंशाचा अंतिम राजा पुरंजय होईल आणि त्याच्या मंत्र्याचे नाव शुजक असेल. तो आपल्या स्वामीला मारून आपला मुलगा प्रद्योत याला राजसिंहासनावर बसवील. नंतर या भरतखंडांत नंद, चंद्रगुप्त, अशोक इत्यादी राजे होतील. त्यानंतर आठ यवन, चौदा तुर्की आणि दहा (गुरुण्ड वंशीय राजे) गोरे राज्य करतील.

**१. कलियुग वर्णनः**

कलियुगांतील दुष्ट राजनीतिज्ञ भारताचे तुकडे तुकडे करून देशाला छिन्नभिन्न करून टाकतील. कलियुगांतील दुष्ट शासक गाईंची हत्या करतील, प्रजेचे धन हडप करून स्वतः विलास-वैभवांत राहतील.

कलियुगांतील ब्राह्मण वेद आणि संध्याविहीन होतील. आपल्या कुटुंबाचे पालनपोषण करणे हेच चातुर्य समजले जाईल आणि धर्माचे सेवन काय ते कीर्तीच्याच उद्देशाने केले जाईल.

भागवतात सांगितलेली कलियुगाची लक्षणे आज प्रत्यक्ष दिसत आहेत.

हे राजा! कलियुगाचे अंती धर्मरक्षणासाठी भगवान कल्कि अवतार धारण करतील.

पृथ्वीवर आजपर्यंत न जाणो किती सम्राट आले आणि गेले.

कलियुगांतील पुरुष स्त्रीच्या आधीन राहतील.

मनुष्याने आपला स्वार्थ सिद्ध करण्यासाठी कोणाचाही द्रोह करू नये.

या स्कंधांत कलियुगाची लक्षणे, दोष आणि त्यापासून वाचण्याचे उपाय सांगितले गेले आहेत. सर्वात श्रेष्ठ उपाय भगवंताचे नामसंकीर्तन आहे. कलियुगाचे अनेक दोष असूनही एक लाभही आहे. कलियुगांत जो कोणी कृष्णकीर्तन करील त्याच्या घरी कलि कधीच येणार नाही. कलिपासून वाचण्याचा एकमात्र उपाय कृष्णकीर्तन आहे.

शुकदेव म्हणतात–

हे राजा! कलियुगाची अवलक्षणे अनेक आहेत. परंतु श्रीकृष्णाचे कीर्तन केल्याने सर्वच दोषांतून, पापांपासून सुटून प्रभु मिळू शकतात. सत्ययुगांत विष्णूच्या ध्यानाने, त्रेतायुगांत यज्ञाने, द्वापरांत विधिपूर्वक विष्णुपूजेने जे फळ मिळत होते तेच फळ कलियुगांत भगवंताच्या नामकीर्तनाने मिळते. मृत्यूच्या वेळीं परमेश्वराचे ध्यान केल्याने तो जीवाला आपल्या स्वरूपांत समाहित करून घेतो.

हे राजा! तू आसन्नमृत्यू आहेस, म्हणून आपल्या हृदयांत भगवान केशवाची स्थापना कर. ते तुला परमगति देतील. जन्म, जरा आणि मृत्यु शरीराचे धर्म आहेत, आत्म्याचे नाहीत. आत्मा तर अजर-अमर आहे. म्हणून मी मरून जाईन अशा पशुबुद्धीचा त्याग कर. घट फुटल्यानंतर त्यांत सामावलेले आकाश महाकाशांत मिळून जाते; त्याचप्रमाणे देहोत्सर्ग झाल्यावर जीव ब्रह्ममय होऊन जातो. आज तक्षक तुला डसेल. तो तुझ्या शरीराला मारू शकेल, आत्म्याला नाही. तुझा आत्मा तर परमात्म्याला जाऊन मिळेल. तू शरीराहून निराळा आहेस. आत्मा परमात्म्याचा अंश आहे.

राजा! "मीच परमात्मस्वरूप ब्रह्म आहे आणि परमपदरूपी ब्रह्महो मीच आहे" असा विचार करून आपल्या आत्म्याला ब्रह्माशी जोडून घे. तक्षक-काळ सुद्धा कृष्णाचाच अंश आहे. शरीर नाशवंत आहे, आत्मा तर अमर आहे. जोपर्यंत मी इथे आहे तोपर्यंत तक्षक येणार नाही. म्हणून आणखी काही ऐकायची इच्छा असेल तर सांग.

परीक्षित— महाराज, आपण मला व्यापक ब्रह्माचे दर्शन करविले आहे म्हणून मी आता निर्भय झालो आहे.

**२. भागवत श्रवणाची फळे:**

श्रीमद्भागवतश्रवणाची पाच फळे आहेत—

१) निर्भयता, २) निःसंदेहता, ३) हृदयांत साक्षात् प्रभूचा प्रवेश, ४) सगळ्यांमध्येच भगवद्दर्शन आणि ५) परमप्रेम.

गुरुजी, मला ही पाचही फळे मिळाली आहेत.

गुरुदेव! भागवताचा प्रथम स्कंध ऐकल्यावर परमात्म्याच्या उजव्या चरणाचे, द्वितीय स्कंध ऐकून डाव्या चरणाचे, तिसरा आणि चौथा स्कंध ऐकल्याने दोन्ही हस्तकमलांचे, पाचवा आणि सहावा स्कंध ऐकल्याने दोन्ही जांघांचे, सातव्या स्कंधाच्या श्रवणाने कटिभागाचे, आठवा आणि नववा स्कंध ऐकून प्रभूच्या विशाल वक्षःस्थलाचे दर्शन झाले. दहावा स्कंध ऐकून प्रभूच्या मुखारविंदाचे आणि नयनाचे दर्शन झाले. एकादश स्कंध ऐकून श्रीनाथजींचा वर उचललेला हात दिसला. बाराव्या स्कंधाच्या श्रवणाने असे वाटत आहे की प्रभु मला दोन्ही हातांनी बोलावीत आहेत.

आता तर मी प्रभूचेच ध्यान धरलेले आहे. मी त्यांनाच शरण गेलेलो आहे. मला सर्वत्र तेच दिसत आहेत. मी त्यांच्याजवळ जात आहे. ते मला बोलावीत आहेत. मी कृतार्थ झालो आहे.

महाराज, आपण मला केवळ कथा श्रवणाचा लाभ दिला नाही, तर प्रभूच्या दर्शनाचा लाभही मला दिलात. आपण सांगितले की सगळे जग ब्रह्मरूप आहे. तक्षक जगापासून वेगळा नाही, तो सुद्धा ब्रह्मरूप आहे. मी आपल्याला पुनःपुन्हा नमस्कार करतो. आपण माझ्यावर फार उपकार केले आहेत.

शुकदेव— राजा, तुझ्याबरोबर मी सुद्धा कृतार्थ झालो आहे. कारण मला सुद्धा कथाश्रवणाचा लाभ मिळाला. तुझ्यामुळे मी सुद्धा प्रभूंमध्ये लीन होऊ शकलो. ते माझ्या हृदयांत विराजमान झाले. राजा, आता मी पुढचा कोणताच प्रसंग पाहू इच्छित नाही. जर कांही शंका असेल तर विचारू शकतोस. मी ब्रह्मनिष्ठ असल्याकारणाने माझी दृष्टी तक्षकाच्या विषाचे अमृत बनवून देईल.

परीक्षिताने गुरुदेवांना वंदन केले आणि म्हटले— आता माझ्या मनांत कोणतीच शंका शिल्लक राहिलेली नाही. आपल्या कृपेने मी निर्लेप आणि निर्भय झालो आहे.

शुकदेवांनी जाण्याची अनुमति मागितली तर राजाने त्यांची पूजा करण्याची इच्छा व्यक्त केली.

राजाने शुकदेवांची पूजा केली तेव्हा त्यांनी राजाच्या डोक्यावर आपला वरदहस्त ठेवला. त्याचक्षणी राजाला परमात्म्याचे दर्शन झाले. जीव आणि ब्रह्म एक झाले.

सत्रांत भाग घेणाऱ्या सर्वच महर्षींना परम आश्चर्य वाटले.

व्यासांना वाटत आहे कीं मी आपल्या पुत्राला भागवताचा अभ्यास करविला परंतु जे तत्त्व शुकदेव जाणू शकले ते तर मी पण जाणू शकलो नाही. व्यासांनी शुकदेवांना नमस्कार केला.

गुरुदेव शुकदेव अंतर्धान झाले.

परीक्षित राजाच्या शरीरांतून एक ज्योती प्रगट झाली आणि महाज्योतीत मिळून गेली.

**३. परीक्षिताला मोक्षप्राप्ति :**

तक्षकाने येऊन राजाला दंश केला, परंतु तो तर कधीच भगवद्धामी निघून गेला होता.

परीक्षिताप्रमाणे काळाच्या आगमनापूर्वीच परमधामाला जाणारा धन्य होय!

सूत म्हणतात– परीक्षिताचा मोक्ष मी स्वतः पाहिला होता.

याप्रमाणे सर्वच पापांचा नाश करणारे आणि इंद्रियांना नियंत्रित करणारे भगवान श्रीहरींचे भागवतांत वर्णन आहे. कथा ऐकून आचरणांत आणाल तर कथाश्रवणाचे सार्थक होईल.

सत्संगाचा कांही अंत होत नसतो. आयुष्याच्या शेवटापर्यंत सत्कर्म करीत रहा.

कथाश्रवणाचे वेळी वक्ता आणि श्रोत्याकडून जाणतां-अजाणतां कांही दोष होण्याची शक्यता असते. म्हणून तीन वेळा– 'श्री हरये नमः, श्री हरये नमः, श्री हरये नमः' असे म्हणा. असा जप केल्याने सर्वच दोष जळून जातील. मनुष्यं, ठेच लागताना, शिंक आली असता, दुःखाचे वेळी, विपत्तीत जर 'श्री हरये नमः' चा सुस्वर पाठ करील तर त्याचे दोष आणि दुःख दूर होतील आणि त्याचे पाप नष्ट होईल.

सरतेशेवटी, ज्यांचे नामसंकीर्तन सर्व पापांचा नाश करते आणि ज्यांना केलेले नमस्कार सर्वच दुःखांना शांत करतात त्या परमात्मा श्रीहरीला आपण नमस्कार करू, त्यांची आरती गाऊं.

## आरती

जयदेव जयदेव वंदे गोपालं वंदे भूपालं।
मृगमदशोभितभालं भुवनत्रयपालं॥
निर्गुणसगुणाकारं संभृतभूभारं।
मुरहर नंदकुमारं स्मरहरं सुखकारं॥
वृंदावनसंचारं कौस्तुभमणिहारं
कृपया पारावारं गोवर्धनधारं॥
जय देव, जय देव०

मुरलीवाहनलोलं सप्तस्वरगीतं।
स्थलचर वनचर गोचर जलचर सहगीतं।
स्तंभित यमुनातोयं अगणित तव चरितं।
गोपीजन मनमोहन दातुं श्रीकान्तं॥
जय देव, जय देव०

रासक्रीडामंडित विष्टित व्रज ललनं।
मध्ये तांडवमंडितं कुवलय दलनयनं।
कुसुमितकाननरंजित मंदस्मित वदनं।
फणिवरकालियदमनं यक्षेश्वर गमनं।
जय देव, जय देव०

अभिनवनीतं चोरं करधृतदधिगोलं।
लीला नटवरखेलं धृतकांचनचैलं।
निर्जर लक्ष स्वरूपं विहलितरिपुकूलं।
भगवत परिपालय जय जय जय गोपालम्॥
जय देव जय देव०

जय देव,जय देव वंदे गोपालं वंदे भूपालं।
मृगमदशोभित भालं भुवनत्रयपालं॥

हरे राम, हरे राम, राम राम हरे हरे।
हरे कृष्ण, हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥

॥ द्वादश स्कंध समाप्त ॥

●●●

## ॥ श्रीमद्भागवतरहस्य समाप्त ॥

## परिशिष्ट क्र. १ शुकाचार्यकृत श्रीकृष्णस्तुति

**परीक्षित राजाने शुकाचार्यांना श्रीकृष्णाचे गुणानुवाद वर्णन करण्याची विनंती केली असता मंगलाचरण-रूप श्रीकृष्णाची जी स्तुति शुकाचार्यांनी केली ती अशी –**

(संदर्भ: भागवत २-४-१२ ते २४)

**श्रीशुक उवाच:**

**नमः परस्मै पुरुषाय भूयसे सदुद्भवस्थाननिरोधलीलया।**
**गृहीतशक्तित्रितयाय देहिनामन्तर्भवायानुपलक्ष्यवर्त्मने॥१२॥**

**शुकाचार्य म्हणतात –**

● या आभासमय विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय या लीला करण्यासाठी ज्याने रज, सत्त्व आणि तम या गुणांच्या योगाने, ब्रह्मा, विष्णु आणि महेश अशी तीन रूपे धारण केली, जो सर्व प्राण्यांच्या अंतर्यामी वास करतो आणि ज्याची गती कोणालाहि आकलन होत नाही, त्या माहात्म्यशाली श्रेष्ठ पुरुषोत्तमाला माझा नमस्कार असो. ॥१२॥

**भूयो नमः सद्वृजिनच्छिदेऽसतामसंभवायाखिलसत्त्वमूर्तये।**
**पुंसां पुनः पारमहंस्य आश्रमे व्यवस्थितानामनुमृग्यदाशुषे॥१३॥**

● तो साधूंच्या पापाचा नाश करतो व दुष्टांची उत्पत्ति होऊ देत नाही; त्याची मूर्ति म्हणजे संपूर्ण सत्वगुणाची मूसच आहे; आणि जे पुरुष, परमहंस आश्रमांत स्थिर होतात, त्यांना आत्मज्ञान देणाराहि पुनः तोच आहे. त्याला पुनः माझा नमस्कार असो. ॥१३॥

**नमो नमस्तेऽस्त्वृषभाय सात्वतां विदूरकाष्ठाय मुहुः कुयोगिनाम्।**
**निरस्तसाम्यातिशयेन राधसा स्वधामनि ब्रह्मणि रंस्यते नमः॥१४॥**

● परमेश्वरा, तू भक्तांचा पालक आणि अभक्तांपासून अत्यंत दूर राहणारा आहेस. तुला माझा वारंवार नमस्कार असो. तुझ्या ऐश्वर्याचे साम्यहि कोणाला यावयाचे नाही, मग त्याहून वरचढपणा कोण करणार! तुझे वास्तव्यस्थान ब्रह्म असून त्यामध्ये तू रममाण होतोस, तुला माझा नमस्कार असो. ॥१४॥

**यत्कीर्तनं यत्स्मरणं यदीक्षणं यद्वन्दनं यच्छ्रवणं यदर्हणम्।**
**लोकस्य सद्यो विधुनोति कल्मषं तस्मै सुभद्रश्रवसे नमो नमः॥१५॥**

● ज्याच्या गुणांचे कीर्तन, ज्याच्या लीलांचे स्मरण, ज्याच्या मूर्तीचे दर्शन, तसेच ज्याच्या चरणाचे वंदन, ज्याच्या कीर्तीचे श्रवण आणि ज्याचे पूजन केल्याने प्राणिमात्राचे पातक तत्क्षणी नष्ट होते, त्या अत्यंत शुभकीर्तीच्या श्रीकृष्णाला माझा वारंवार नमस्कार असो. ॥१५॥

**विचक्षणा यच्चरणोपसादनात् सङ्गं व्युदस्योभयतोऽन्तरात्मनः।**
**विदन्ति हि ब्रह्मगतिं गतक्लमास्तस्मै सुभद्रश्रवसे नमो नमः॥१६॥**

● ज्ञानीपुरुष ज्याच्या चरणाचा आश्रय केल्याने इह आणि पर अशा दोन्ही लोकांवरील आपल्या मनाची आसक्ति टाकून देतात आणि जन्ममरणाच्या श्रमांतून मुक्त होऊन खरोखर मोक्षमार्गाला लागतात, त्या शुभकीर्तीच्या भगवंताला माझा नित्य नमस्कार असो. ॥१६॥

तपस्विनो दानपरा यशस्विनो मनस्विनो मन्त्रविदः सुमङ्गलाः।
क्षेमं न विन्दन्ति विना यदर्पणं तस्मै सुभद्रश्रवसे नमो नमः॥१७॥

● ज्याला आपापली कर्मे अर्पण केल्यावाचून मोठे कीर्तिमान तपस्वी, दानशील पुरुष, योगीजन, मंत्रवेत्ते, सदाचरणी आदि लोक कोणीहि आपले हित साधू शकत नाहीत, त्या पुण्यकीर्ति परमेश्वराला माझा नित्य नमस्कार असो.॥१७॥

किरातहूणान्ध्रपुलिन्दपुल्कसा आभीरकङ्का यवनाः खसादयः।
येऽन्ये च पापा यदुपाश्रयाश्रयाः शुध्यन्ति तस्मै प्रभविष्णवे नमः॥१८॥

● भिल्ल, हूण, तेलंगी, पुलिंद, चांडाळ, आभीर, कंक, यवन, खस आणि इतरही दुराचारी लोक ज्या परमेश्वराच्या भक्तांचा आश्रय केल्याने शुद्ध होतात, त्या पराक्रमशाली भगवंताला माझा नमस्कार असो.॥१८॥

स एष आत्माऽऽत्मवतामधीश्वरस्त्रयीमयो धर्ममयस्तपोमयः।
गतव्यलीकैरजशङ्करादिभिर्वितर्क्यलिङ्गो भगवान् प्रसीदताम्॥१९॥

● आत्मज्ञानी पुरुषांच्या अंतर्यामी वास करणारा असा तो हा सर्वैश्वर्यसंपन्न परमेश्वर आहे. तिन्ही वेद, धर्म आणि तप त्याचींच रूपें होत. ब्रह्मदेव, शंकर आदिकरून देव निष्पाप होऊनहि ज्याच्या स्वरूपाविषयीं विविध तर्कच करीत बसतात, असा तो भगवान माझ्यावर प्रसन्न होवो.॥१९॥

श्रियः पतिर्यज्ञपतिः प्रजापतिर्धियां पतिर्लोकपतिर्धरापतिः।
पतिर्गतिश्चान्धकवृष्णिसात्वतां प्रसीदतां मे भगवान् सतां पतिः॥२०॥

● लक्ष्मीचा पति, यज्ञांचा भोक्ता, लोकांचे रक्षण करणारा, बुद्धीचा चालक, त्रैलोक्याचा स्वामी, पृथ्वीचा अधिपति, तसाच अन्धक, वृष्णि व सात्वत् इत्यादि यदुकुलांचा नायक आणि मुख्य आधार, असा तो साधूंचा कैवारी भगवान माझ्यावर प्रसन्न होवो.॥२०॥

यदङ्घ्र्यनुध्यानसमाधिधौतया धियानुपश्यन्ति हि तत्त्वमात्मनः।
वदन्ति चैतत्कवयो यथारुचं स मे मुकुन्दो भगवान्प्रसीदताम्॥२१॥

● ज्याच्या चरणांचे नित्य ध्यान करून समाधीच्या योगे शुद्ध केलेल्या बुद्धीने ज्ञानी लोक आत्मतत्त्वाचा अनुभव घेतात आणि ऋषि आपापल्या रुचीप्रमाणे नावे देऊन ज्याचे वर्णन करितात, तो मुक्तिदाता भगवान श्रीकृष्ण मजवर प्रसन्न होवो.॥२१॥

प्रचोदिता येन पुरा सरस्वती वितन्वताऽजस्य सतीं स्मृतिं हृदि।
स्वलक्षणा प्रादुरभूत्किलास्यतः स मे ऋषीणामृषभः प्रसीदताम्॥२२॥

● पूर्वी ब्रह्मदेवाच्या हृदयात सृष्टिरचनेची उत्तम कल्पना ज्याने उत्पन्न केली आणि त्यावेळी ज्याच्या प्रेमामुळे उत्तमलक्षणांनी युक्त अशी वेदरूपी वाणी ब्रह्मदेवाच्या मुखांतून प्रकट झाली, तो ऋषींचा पुरस्कर्ता परमेश्वर मजवर प्रसन्न होवो.॥२२॥

भूतैर्महद्भिर्य इमाः पुरो विभुर्निर्माय शेते यदमूषु पुरुषः।
भुङ्क्ते गुणान्षोडश षोडशात्मकः सोऽलंकृषीष्ट भगवान्वचांसि मे॥२३॥



● पंचमहाभूतांच्या योगाने ही शरीरे निर्माण करून सोळा गुणांचा उपभोग सोळा कलांनी युक्त

होऊन जो घेतो आणि त्या शरीरांत वास करतो, तो सर्वव्यापी भगवान माझ्या वचनांना अलंकृत करो. ॥२३॥

**नमस्तस्मै भगवते व्यासायामिततेजसे। पपुर्ज्ञानमयं सौम्या यन्मुखाम्बुरुहासवम्॥२४॥**

● ज्याच्या मुखकमलांतून स्रवणाऱ्या भागवतरूपी ज्ञानरसाचे भगवद्भक्त शांत चित्त होऊन पान करतात, त्या अत्यंत तेजस्वी अशा भगवान व्यासाला मी नमस्कार करतो. ॥२४॥ **॥ शुकाचार्यकृत श्रीकृष्णस्तुति समाप्त॥** (दामोदर सावळाराम आणि मंडळी यांच्या '**सार्थ श्रीमद्भागवत**' या ग्रंथाच्या आधारे.)

## परिशिष्ट क्र. २ वेणुगीत

**शरदऋतु सुरू झाला आणि वृंदावनांत बलराम व सवंगड्यांसह गाई चारता चारता श्रीकृष्णाने आपली मधुर मुरली वाजविण्यास आरंभ केला. तें मधुर वेणुगीत श्रवण करून गोकुळांतील गोपी आपआपसांत श्रीकृष्णाच्या रूपगुणांची त्याच्या परोक्ष प्रशंसा करूं लागल्या व साहजिकच श्रीकृष्णाची श्यामसुंदर मूर्ति त्यांच्या मनांत साकार झाली. त्यावेळीं त्याच्या मीलनासाठीं व्याकुळ झालेल्या गोपींनी भावविवश होऊन परस्परांत केलेल्या गोष्टी म्हणजेच हें गोपींनी गाईलेलें वेणुगीत.**

(संदर्भ: १०-२१ – ७ ते २०)

गोप्य उचुः

**अक्षण्वतां फलमिदं न परं विदामः सख्यः पशूननु विवेशयतोर्वयस्यैः।**
**वक्त्रं व्रजेशसुतयोरनुवेणु जुष्टं यैर्वा निपीतमनुरक्तकटाक्षमोक्षम्॥७॥**

● त्यातील काही गोपी आपल्या मैत्रिणींना म्हणाल्या, सख्यांनो, या श्रीकृष्णाच्या मुखकमलाचे दर्शन घेणे हेंच डोळे असण्याचें खरें सार्थक होय, दुसरे सार्थक नाही असे आम्हाला वाटते. आपल्या सवंगड्यांसह रानात गाई चारावयास नेऊन मुरली वाजवीत प्रेमळ कटाक्ष फेकणाऱ्या त्या नंदपुत्र श्रीकृष्णाचें सुंदर मुख ज्यांनी यथेच्छ अवलोकन केले त्यांच्या डोळ्यांचे खरोखर सार्थक झाले. ॥७॥

**चूतप्रवालबर्हस्तबकोत्पलाब्जमालानुपृक्तपरिधानविचित्रवेषौ।**
**मध्ये विरेजतुरलं पशुपालगोष्ठ्यां रङ्गे यथा नटवरौ क्व च गायमानौ॥८॥**

● दुसऱ्या कित्येक गोपी म्हणाल्या, –मैत्रिणींनो, कोवळी आंब्याची पाने, मोराची पिसे, फुलांचे तुरे व पांढऱ्या निळ्या कमळांच्या माळा, ज्यांच्या वस्त्रांवरून रुळत असल्यामुळे, ज्यांची रूपे मोठी विचित्र दिसत आहेत असे ते भगवान रामकृष्ण आपल्या सोबत्यांमध्ये मुरली वाजवू लागले म्हणजे कधी कधी रंगभूमीवर सुरेल गायन करणाऱ्या उत्तम नटांप्रमाणेच सुंदर दिसतात. ॥८॥

**गोप्यः किमाचरदयं कुशलं स्म वेणुर्दामोदराधरसुधामपि गोपिकानाम्।**
**भुङ्क्ते स्वयं यदवशिष्टरसं ह्रदिन्यो हृष्यत्त्वचोऽश्रु मुमुचुस्तरवो यथाऽऽर्याः॥९॥**

● आणखी काही गोपी म्हणाल्या, सख्यांनो, त्या मुरलीनें काही तरी मोठे पुण्य केले असले पाहिजे! कारण, या दामोदराच्या अधरामृताचे सेवन करण्याचा वास्तविक अधिकार आम्हा गोपींचा असता, ही मुरलीच त्या अधरामृताचे यथेच्छ सेवन करते व त्यामुळे आमच्या वाट्यास थोडासाच रस राहतो! हे पहा, त्या मुरलीचा ध्वनि ऐकून या नद्यांच्या अंगावर प्रफुल्लित कमलांच्या रूपानें जणु रोमांचच उभे राहिले आहेत असे दिसते! तसेच त्या वेणुवनांतील वेळूचे वृक्षहि, आपल्यापासून निर्माण झालेल्या या मुरलीचा श्रीकृष्णानें केलेला स्वीकार पाहून, कुळांतील वृद्ध माणसांप्रमाणे जणू

काय धन्यता मानून दवांच्या रूपानें आनंदाश्रु गाळीत आहेत. ॥९॥

वृन्दावनं सखि भुवो वितनोति कीर्तिं यद्देवकीसुतपदाम्बुजलब्धलक्ष्मि।
गोविन्दवेणुमनु मत्तमयूरनृत्यं प्रेक्ष्याद्रिसान्वपरतान्यसमस्तसत्त्वम्॥१०॥

● दुसऱ्या कित्येक म्हणाल्या, सख्यांनो, हे वृंदावन तर या भूमीचे यश विशेषच वाढवीत आहे. कारण जिकडे तिकडे श्रीकृष्णाच्या पावलांची चिन्हें उमटल्यामुळे याला अप्रतिम शोभा आली आहे. श्रीकृष्णाचा वेणुनाद ऐकून, हा मंद गर्जना करणारा मेघच आहे असे वाटून, ज्यांचे हृदय मत्त झाले आहे असे मयूर आनंदाने नाचत आहेत आणि ते नृत्य पाहून डोंगराच्या दऱ्याखोऱ्यांतून फिरणारे सर्व प्राणी जणु जागच्या जागी चित्रासारखे स्तब्ध उभे आहेत. ॥१०॥

धन्याः स्म मूढमतयोऽपि हरिण्य एता या नन्दनन्दनमुपात्तविचित्रवेषम्।
आकर्ण्य वेणुरणितं सहकृष्णसाराः पूजां दधुर्विरचितां प्रणयावलोकैः॥११॥

● मूढयोनींत उत्पन्न झालेल्या ह्या हरिणी तरी किती धन्य आहेत! कारण मनोहर वेष धारण करून मधुरस्वरानें मुरली वाजविणाऱ्या विचित्रवेषधारी नंदकुमाराकडे आपल्या पतींसह प्रेमभरित नेत्रांनी पाहून ह्या त्याचा सत्कारच करीत आहेत. ॥११॥

कृष्णं निरीक्ष्य वनितोत्सवरूपशीलं श्रुत्वा च तत्क्वणितवेणुविचित्रगीतम्।
देव्यो विमानगतयः स्मरनुन्नसारा भ्रश्यत्प्रसूनकबरा मुमुहुर्विनीव्यः॥१२॥

● कांहीं गोपी म्हणाल्या, सख्यांनो, स्त्रियांना आनंद देणारें असें हें स्वरूप व वेष पाहून व त्याच्या मुरलीचा गोड ध्वनि ऐकून ह्या पहा विमानांतून जाणाऱ्या देवस्त्रियाहि कामपीडेने कशा व्यथित झाल्या आहेत! त्यांचे केश विसकटल्यामुळे त्यातील फुले गळत आहेत, आणि त्यांतील काही तर निश्चेष्ट झाल्यामुळे त्यांच्या कमरेची वस्त्रे गलितप्राय झाली आहेत. ॥१२॥

गावश्च कृष्णमुखनिर्गतवेणुगीतपियूषमुत्तभितकर्णपुटैः पिबन्त्यः।
शावाः स्नुतस्तनपयःकवलाः स्म तस्थुर्गोविन्दमात्मनि दृशाश्रुकलाः स्पृशन्त्यः॥१३॥

● तशाच इकडे ह्या गाईसुद्धां मुरलीच्या मधुर नादाने मोहित होऊन पाहा कशा कान उभारून श्रीकृष्णाचे वेणुवादन ऐकत उभ्या राहिल्या आहेत! जणु त्या मनोमय कृष्णमूर्तीला आलिंगनच देत असून त्यांच्या नेत्रांतून आनंदाश्रु गळत आहेत. तशीच ही वासरें देखील दूध पीत असता मधुर वेणुनाद ऐकून तोंडात घेतलेला दुधाचा घोट तसाच दोहोबाजूंनी गळत टाकून श्रीकृष्णाकडे पाहात स्तब्ध उभीं आहेत. ॥१३॥

प्रायो बताम्ब विहगा मुनयो वनेऽस्मिन् कृष्णेक्षितं तदुदितं कलवेणुगीतम्॥
आरुह्य ये द्रुमभुजान् रुचिरप्रवालान् श्रृण्वन्त्यमीलितदृशो विगतान्यवाचः॥१४॥

● एक गोपी आपल्या आईला म्हणाली, 'हे आई, ह्या वनांतील पक्षी बहुधा ध्यानस्थ ऋषीच असावेत; कारण, ते नूतन पालवी फुटलेल्या झाडांच्या फांद्यांवर सारखे डोळे उघडे ठेवून किलबिलाट न करता, श्रीकृष्णदर्शनाचे सुख अनुभवीत व त्याच्या मुरलीचा मंजुळ ध्वनि ऐकत स्वस्थ बसले आहेत.' ॥१४॥

नद्यस्तदा तदुपधार्य मुकुन्दगीतमावर्तलक्षितमनोभवभग्नवेगाः।

आलिङ्गनस्थगितमूर्मिभुजैर्मुरारेर्गृह्णन्ति पादयुगलं कमलोपहाराः॥१५॥

● दुसऱ्या गोपी म्हणाल्या, ' ह्या पाहा, नद्या देखील मुरलीचा गोड आवाज ऐकून जणु कामपीडेने चंचल होऊन आपल्यामध्ये उत्पन्न होणाऱ्या भोवऱ्यांच्या रूपानें आपल्या मनाचीच साक्ष देत आहेत व आपल्या तरंगरूपी हातांनी श्रीकृष्णाच्या चरणांवर कमलपुष्पे अर्पण करीत जणु काय त्या आलिंगन देऊन त्यांस झाकत आहेत. '

दृष्ट्वाऽऽतपे व्रजपशून् सहरामगोपैः संचारयन्तमनु वेणुमुदीरयन्तम्।
प्रेमप्रवृद्ध उदितः कुसुमावलीभिः सख्युर्व्यधात्स्ववपुषाम्बुद आतपत्रम्॥१६॥

● आणखी कांहीं जणी म्हणाल्या, –' या मेघाची व कृष्णाची अत्यंत मैत्री आहेसे दिसते; कारण ज्या वेळी श्रीकृष्ण, बलराम व इतर संवगडी यांसह गाई चारतांना त्यांच्या मागे मुरली वाजवीत फिरतो, त्या वेळी त्याला उन्हाचा त्रास न व्हावा म्हणून हा मेघ स्वतः तेथे येऊन त्याजवर छत्रीप्रमाणे सांवली करतो व त्याच्या शरीराला गारवा वाटण्यासाठी पुष्पवृष्टीप्रमाणे मधूनमधून जलतुषारांची त्याजवर वृष्टिहि करतो. ॥१६॥

पूर्णाः पुलिन्द्य ऊरुगायपदाब्जरागश्रीकुङ्कुमेन दयितास्तनमण्डितेन।
तद्दर्शनस्मररुजस्तृणरूषितेन लिम्पन्त्य आननकुचेषु जहुस्तदाधिम्॥१७॥

● या वनांतील भिल्लिणीसुद्धां खरोखर मोठ्या भाग्यशाली आहेत! कारण कृष्णाचीं केशराप्रमाणे आरक्तवर्ण अशी पदकमलें ज्या गवतावर उमटली आहेत अशा गवताची उटी त्या आपल्या स्तनांना आणि मुखांना लावतात व त्यायोगे श्रीकृष्णदर्शनापासून उत्पन्न झालेली आपली कामपीडा त्या शांत करून घेतात. ॥१७॥

हन्तायमद्रिरबला हरिदासवर्यो यद्रामकृष्णचरणस्पर्शप्रमोदः।
मानं तनोति सहगोगणयोस्तयोर्यत्पानीयसूयवसकन्दरकन्दमूलैः॥१८॥

● हे मैत्रिणींनो, हा गोवर्धन पर्वत खरोखर सर्व भगवद्भक्तांत श्रेष्ठ आहे; कारण याला निरंतर रामकृष्णांच्या पदस्पर्शाचा लाभ होत असून, हा आपल्यावरील पाणी, उत्तम प्रकारचे गवत, विश्रांतीला दऱ्याखोऱ्यांतील सांवलीची जागा व खाण्यास कंदमुळें इत्यादी अर्पण करून रामकृष्णाचें व गोपगोपांचे आनंदाने आदरातिथ्य करीत असतो. ॥१८॥

गा गोपकैरनुवनं नयतोरुदारवेणुस्वनैः कलपदैस्तनुभृत्सु सख्यः।
अस्पन्दनं गतिमतां पुलकस्तरूणां निर्योगपाशकृतलक्षणयोर्विचित्रम्॥१९॥

● इतर काही गोपी म्हणाल्या – सख्यांनो, हे राम-कृष्ण गाईंची दावीं व दोऱ्या डोक्यांवर घेऊन मधुर मुरली वाजवीत डौलानें चालले म्हणजे त्यांच्या मुरलीचा मधुर नाद ऐकून सारे पशुपक्षी अगदी तटस्थ होतात. वृक्षलतांच्या अंगांवर आनंदानें रोमांच उभे राहतात हे मोठेच आश्चर्य होय. ॥१९॥

**॥ वेणुगीत समाप्त ॥**

## परिशिष्ट क्र. ३ इन्द्रकृत श्रीकृष्णस्तुति

**प्रतिवर्षी इन्द्राला प्रसन्न करण्याकरिता केला जाणारा यज्ञ श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून जेव्हा गोकुळवासियांनी केला नाही, तेव्हां इन्द्र कोपाविष्ट होऊन त्याने सांवर्तक मेघांद्वारे गोकुळावर अष्टौप्रहर मुसळधार पाऊस पाडला. त्याला वाटले की, गोकुळांतील सर्व लोक त्यांच्या मुलां-बाळांसह, गुरां-ढोरांसह वाहून जातील. पण श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वत उचलून धरून गोकुळाचे संरक्षण केले. श्रीकृष्णाचा**

हा आश्चर्यजनक पराक्रम पाहून इन्द्राला झालेला गर्व पार नाहीसा झाला. गर्वरहित झालेल्या इन्द्राने श्रीकृष्णचरणांस प्रणाम करून त्यांची जी स्तुति केली ती अशी–

(संदर्भ : भागवत– १०-२७-४ ते १३)

इन्द्र उवाचः

विशुद्धसत्त्वं तव धाम शान्तं तपोमयं ध्वस्तरजस्तमस्कम्।
मायामयोऽयं गुणसंप्रवाहो न विद्यते तेऽग्रहणानुबन्धः॥४॥

● हे भगवन्, तूं केवळ शुद्ध, सत्त्व तपोमय व शांत आहेस. तुझ्या ठिकाणीं रजोगुण व तमोगुण यांचा लवलेशही नाही. मायेमुळे उत्पन्न होणारा व अज्ञानाला धरून राहाणारा संसार तुझ्या ठिकाणी मुळीच नाही.॥४॥

कुतो नु तद्धेतव ईश तत्कृता लोभादयो येऽबुधलिङ्गभावाः।
तथापि दण्डं भगवान् बिभर्ति धर्मस्य गुप्त्यै खलनिग्रहाय॥५॥

● हे प्रभो, मायेने उत्पन्न केलेले व मायेलाच कारण असे जे अज्ञानाचे द्योतक कामक्रोधादिक विकार ते तुझे ठायीं कोठून असणार? (मुळीच नाहीत) तथापि देवा, सद्धर्माच्या रक्षणाकरितां व दुष्टांच्या शासनाकरितां तू निरंतर दंड धारण करतोस.॥५॥

पिता गुरुस्त्वं जगतामधीशो दुरत्ययः काल उपात्तदण्डः।
हिताय स्वेच्छातनुभिः समीहसे मानं विधुन्वञ्जगदीशमानिनाम्॥६॥

● हे जगदीश्वरा, तूंच सर्व जगाचा पिता, गुरु व अधिराज आहेस. दुष्टांच्या शासनासाठी हातात तीव्र दंड धारण करणारा तू साक्षात् काळच आहेस. 'आम्ही जगताचे राजे किंवा अधिपति' असा अभिमान जे कोणी बाळगतात, त्यांचा तो अभिमान नष्ट करून जगाचें हित करण्याकरितां तू स्वेच्छेने अनेक अवतार धारण करतोस.॥६॥

ये मद्विधाज्ञा जगदीशमानिनस्त्वां वीक्ष्य कालेऽभयमाशु तन्मदम्।
हित्वाऽऽर्यमार्गं प्रभजन्त्यपस्मया ईहा खलानामपि तेऽनुशासनम्॥७॥

● माझ्यासारखे स्वतःला जगाचे स्वामी मानणारे, अहंकारी जे असतात, त्यांना सुद्धा भयंकर संकटकालीहि तू निर्भय असतोस असे पाहून, स्वतःची तुच्छता प्रत्ययास येते व ते तात्काळ आपला गर्वभार टाकून सन्मार्गाचा अवलंब करितात आणि तुझ्या भक्तींत रममाण होतात. तेव्हा दुष्टांनाही तुझे शासन अखण्ड सुखप्रद होते, हेंच खरे.॥७॥

स त्वं ममैश्वर्यमदप्लुतस्य कृतागसस्तेऽविदुषः प्रभावम्।
क्षन्तुं प्रभोऽथार्हसि मूढचेतसो मैवं पुनर्भून्मतिरीश मेऽसती॥८॥

● हे श्रीकृष्णा ऐश्वर्याच्या धुंदीने अंध झाल्यामुळे, मला तुझ्या अद्भुत सामर्थ्याची कल्पनाहि झाली नाही. केवळ मूढपणाने घडलेल्या ह्या माझ्या अपराधाची मला क्षमा कर. आणि हे भगवंता, पुन्हा मला अशी दुष्ट बुद्धी होऊ देऊ नकोस.॥८॥

तवावतारोऽयमधोक्षजेह स्वयम्भराणामुरुभारजन्मनाम्।
चमूपतीनामभवाय देव भवाय युष्मच्चरणानुवर्तिनाम्॥९॥

● हे अधोक्षजा, सैन्याच्या जोरावर बलवान झालेल्या व स्वैर वागणाऱ्या आणि त्यामुळें भूमीला भारभूत झालेल्या मानवाच्या नाशाकरितां व भक्तिभावाने तुझ्या चरणकमलांची सेवा करणाऱ्या साधूंच्या उत्कर्षाकरितांच तुझा हा अवतार आहे. ॥९॥

**नमस्तुभ्यं भगवते पुरुषाय महात्मने। वासुदेवाय कृष्णाय सात्वतां पतये नमः ॥१०॥**
**स्वच्छन्दोपात्तदेहाय विशुद्धज्ञानमूर्तये। सर्वस्मै सर्वबीजाय सर्वभूतात्मने नमः ॥११॥**

● हे यदुपते, वासुदेवा, तू स्वेच्छेने अनेक अवतार धारण करतोस; तुझें स्वरूप ज्ञानमय आहे. तूं अनादि व अनंत असून सर्व प्राणिमात्रांचा आत्मा तूच आहेस. तुला माझा नमस्कार असो. ॥१०॥,॥ ११॥

**मयेदं भगवन् गोष्ठनाशायासारवायुभिः। चेष्टितं विहते यज्ञे मानिना तीव्रमन्युना ॥१२॥**
**त्वयेशानुगृहीतोऽस्मि ध्वस्तस्तम्भो वृथोद्यमः। ईश्वरं गुरुमात्मानं त्वामहं शरणं गतः ॥१३॥**

● हे देवाधिदेवा, नंदादिकांनी मजप्रीत्यर्थ याग करण्याचे सोडल्यामुळे मी अत्यंत क्रोधाविष्ट होऊन वृथाभिमानाने गोकुळाच्या नाशासाठी भयंकर वृष्टीचा व सोसाट्याच्या वावटळीचा खटाटोप केला; परंतु हे प्रभो, तू तो माझा भलताच प्रयत्न व्यर्थ करून माझा अभिमान नाहीसा केलास हा तुझा माझ्यावर मोठाच अनुग्रह झाला आहे. तू मला गुरुस्थानी असून मी अनन्य भावाने तुला शरण आलो आहे. ॥१२॥ ॥ १३॥ **॥ इन्द्रकृत श्रीकृष्णस्तुति समाप्त ॥**

● इंन्द्राने केलेली ही स्तुति ऐकून भगवान श्रीकृष्णाने इन्द्रास जो उपदेश केला तो सर्व मानवांनी लक्षात घ्यावा. भगवान श्रीकृष्ण इंद्रास उद्देशून म्हणाले– "हे इंद्रा, स्वर्गलोकींच्या राज्यवैभवाने उन्मत्त होऊन तू मला अगदी विसरला होतास; तेव्हा तुझ्या गर्वाचा परिहार करून माझ्या सामर्थ्याची जाणीव करून द्यावी आणि तुझ्यावर अनुग्रह करावा अशा इच्छेनेच मी तुझ्या यज्ञाचा निषेध केला. देवेन्द्रा जो संपत्ति व अधिकार यांच्या धुंदीने आंधळा झालेला असतो त्यास माझ्या हातांतील कालदंड दिसत नाही. तसेच ज्याच्यावर अनुग्रह करावा अशी मला इच्छा होते त्याला प्रथम मी संपत्तिहीन करीत असतो. हे स्वर्गपते, आता तू आपल्या लोकीं परत जा. तू स्वतः किंवा वरुणादिक तुझे सहाय्यक कोणीही उन्मत्त होऊ नका. न्यायाने, सावधान चित्ताने आपापले अधिकार चालवा म्हणजे तुमचे कल्याण होईल. (जे कोणी विशेषाधिकारावर आरूढ असतील त्यांनी हा उपदेश लक्षांत ठेवावा.) (श्लोकांच्या मराठी अनुवादानाठी दामोदर सावळाराम आणि मंडळी यांनी प्रकाशित केलेल्या "सार्थ श्रीमद्भागवत" याचा उपयोग केला आहे.)

## परिशिष्ट क्र. ४ गोपीगीत

**रासक्रीडा समाप्त झाल्यावर गोपींना स्वसौंदर्याचा गर्व झाला असे पाहून श्रीकृष्ण अदृश्य झाले. त्यासमयी विरहव्याकुळ होऊन गोपी मधुवनांत श्रीकृष्णाचे गुण गात त्यास शोधू लागल्या. या काव्यांत गोपीकृत कृष्णाच्या गुणांचे वर्णन आहे, म्हणून याला 'गोपीगीत' असे नाव दिले आहे. वामनपंडितांनी त्यावर कामदावृत्तांत केलेली 'समश्लोकी गोपिकास्तुति' फारच गोड आहे. ती संस्कृत काव्यानंतर याखाली जशीच्या तशी दिली आहे.** (संदर्भ: भागवत– १०-३१-१ ते १९)

**गोप्य ऊचुः**

**जयति तेऽधिकं जन्मना व्रजः श्रयत इन्दिरा शश्वदत्र हि।**
**दयित दृश्यतां दिक्षु तावकास्त्वयि धृतासवस्त्वां विचिन्वते ॥१॥**

शरदुदाशये साधुजातसत्सरसिजोदरश्रीमुषा दृशा।
सुरतनाथ तेऽशुल्कदासिका वरद निघ्नतो नेह किं वधः॥२॥

विषजलाप्ययाद् व्यालराक्षसाद् वर्षमारुताद् वैद्युतानलात्।
वृषमयात्मजाद् विश्वतोभयादृषभ ते वयं रक्षिता मुहुः॥३॥

न खलु गोपिकानन्दनो भवानखिलदेहिनामन्तरात्मदृक्।
विखनसार्थितो विश्वगुप्तये सख उदेयिवान् सात्वतां कुले॥४॥

विरचिताभयं वृष्णिधुर्य ते चरणमीयुषां संसृतेर्भयात्।
करसरोरुहं कान्त कामदं शिरसि धेहि नः श्रीकरग्रहम्॥५॥

व्रजजनार्तिहन् वीर योषितां निजजनस्मयध्वंसनस्मित।
भज सखे भवत्किङ्करीः स्म नो जलरुहाननं चारु दर्शय॥६॥

प्रणतदेहिनां पापकर्शनं तृणचरानुगं श्रीनिकेतनम्।
फणिफणार्पितं ते पदाम्बुजं कृणु कुचेषु नः कृन्धि हृच्छयम्॥७॥

मधुरया गिरा वल्गुवाक्यया बुधमनोज्ञया पुष्करेक्षण।
विधिकरीरिमा वीर मुह्यतीरधरसीधुनाऽऽप्याययस्व नः॥८॥

तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहम्।
श्रवणमङ्गलं श्रीमदाततं भुवि गृणन्ति ते भूरिदा जनाः॥९॥

प्रहसितं प्रिय प्रेमवीक्षणं विहरणं च ते ध्यानमङ्गलम्।
रहसि संविदो या हृदिस्पृशः कुहक नो मनः क्षोभयन्ति हि॥१०॥

चलसि यद् व्रजाच्चारयन् पशून् नलिनसुन्दरं नाथ ते पदम्।
शिलतृणाङ्कुरैः सीदतीति नः कलिलतां मनः कान्त गच्छति॥११॥

दिनपरिक्षये नीलकुन्तलैर्वनरुहाननं बिभ्रदावृतम्।
घनरजस्वलं दर्शयन् मुहुर्मनसि नः स्मरं वीर यच्छसि॥१२॥

प्रणतकामदं पद्मजार्चितं धरणिमण्डनं ध्येयमापदि।
चरणपङ्कजं शन्तमं च ते रमण नः स्तनेष्वर्पयाधिहन्॥१३॥

सुरतवर्धनं शोकनाशनं स्वरितवेणुना सुष्ठु चुम्बितम्।
इतररागविस्मारणं नृणां वितर वीर नस्तेऽधरामृतम्॥१४॥

अटति यद् भवानह्नि काननं त्रुटिर्युगायते त्वामपश्यताम्।
कुटिलकुन्तलं श्रीमुखं च ते जड उदीक्षतां पक्ष्मकृद् दृशाम्॥१५॥

पतिसुतान्वयभ्रातृबान्धवानतिविलङ्घ्य तेऽन्त्यच्युतागताः।
गतिविदस्तवोद्गीतमोहिताः कितव योषितः कस्त्यजेन्निशि॥१६॥

रहसि संविदं हृच्छयोदयं प्रहसिताननं प्रेमवीक्षणम्।
बृहदुरः श्रियो वीक्ष्य धाम ते मुहुरतिस्पृहा मुह्यते मनः॥१७॥

व्रजवनौकसां व्यक्तिरंग ते वृजिनहन्त्र्यलं विश्वमङ्गलम्।
त्यज मनाक् च नस्त्वत्स्पृहात्मनां स्वजनहृद्रुजां यन्निषूदनम्॥१८॥

यत्ते सुजातचरणाम्बुरुहंस्तनेषु भीताः शनैः प्रिय दधीमहि कर्कशेषु।
तेनाटवीमटसितद् व्यथते न किंस्वित् कूर्पादिभिर्भ्रमति धीर्भवदायुषां नः॥१९॥

● वामन पंडित कृत समश्लोकी गोपिकास्तुतिः (कामदावृत्त)

प्रकटलासि तूं नंदगोकुळीं, म्हणुनि इंदिरावास ये स्थळीं॥
सकळही सुखी या व्रजीं हरी! विरहदुःखिता गोप सुंदरी॥१॥

प्रकट होइं तूं विश्वभूषणा! प्रियतमा त्वरें दावि आपणा॥
हुडकितों तुतें गोपकामिनी, तुजवरी हरी! प्राण ठेवुनी॥२॥

कमलगर्भिंचें श्रीस जे हरी, करिं कृपा तये दृष्टिने हरी॥
सुरतनाथ! तूं अशुल्कदासिका, बटकि गोपिका त्या तुझ्या फुका॥३॥

वरहि देउनि आस लावुनी, विरहकूपिं या माजि घालुनी॥
तदुपरी हरी! दोर कापणें, तरि मृतासही काय मारणें?॥४॥

विगतदर्प तो सर्प कालिया, करुनि रक्षिलें गोकुळास या॥
विषजलाचिया नाशुनी भया, विरहसागरीं, घातलें प्रिया॥५॥

व्रज गिळू म्हणे त्या अघासुरा, अजगरासि, कारुण्यसागरा!॥
वधुनि रक्षिलें, त्या तुला हरी! व्रजवधूंवरी कोप कां तरी?॥६॥

प्रळयमेघही वर्षतां वरी, गिरि धरूनियां रक्षिल्या, हरी!॥
प्रळय तो स्वयें त्यांवरी करी, कठीण चित्त हें आजि कां परी?॥७॥

पिउनि अग्नि तूं त्यांस रक्षिसी, विरहअग्निने आजि जाळिसी॥
हरुनि सर्वही आमुचीं भयें, विरहसंकटीं घालिशी स्वयें॥८॥

नव्हसि गोपिकापुत्र निश्चयें, सकळअंतरीं साक्षि तूं स्वयें॥
यदुकुळीं विधिप्रार्थनामिषें, भूवन तारिशी या कथारसें॥९॥

म्हणुनियां तुतें प्रार्थितों हरी! सफळ आमुची प्रार्थना करी॥
प्रकट शीघ्र तूं होऊनि प्रिया, अभय देऊनी छेदिजे भया॥१०॥

भवभयासही दूरी जो करी, निवति लागतां गोपसुंदरी॥
अभयहस्त तो आमुच्या शिरीं, करुनियां कृपा ठेविं गा! हरी॥११॥

प्रकटतां रमा क्षीरसागरीं, धरिशि तूं तिचा हात ज्या करीं॥
अभयहस्त तो मस्तकावरी, निववि ठेवुनी गोप सुंदरी॥१२॥

व्रजजनाचिया दुःखनाशका! मदनदाविं कां गोपनायिका!॥
बटकी आपुल्या ज्या तयांवरी, हृदयीं एवढा कोप कां, हरी?॥१३॥

सहज दावुनि भाव हांससी, तरि तुं आमुचे गर्व नाशिसी ॥
नख न लावितां छेदणें जया, हरि! कुऱ्हाडि कां हाणणें तया ? ॥१४॥

अशुभ शीघ्र जो वंदनें हरी, कमलजा वसे ज्यांत सुंदरी ॥
तृणचरांसवें हिंडतो वनीं, चरण ठेवि तो आमुचे स्तनीं ॥१५॥

निजसुखामृता लुब्ध होऊनी, भ्रमरि ज्यामध्यें सिंधुनंदिनी ॥
पदसरोज तें या कुचांवरी, करुनियां दया ठेविं गा! हरी! ॥१६॥

रगडुनी फणां कालिया फणी, दवडिला खळांचा शिरोमणी।
मदन दुष्ट हा आमुचे उरीं, पदतळें तसा मर्दि गा! हरी! ॥१७॥

हरुनि दर्प कंदर्प हा हरी, दवडिं काळियाचे परी अरी।
रवि सुता-ह्रदीं कालिया जसा, ह्रदयिं आमुच्या कामही तसा ॥१८॥

मधुर वैखरी बोल आमुशीं, निगमरूप जें संतमानसीं।
विरहमूर्छिता या स्वकिंकरी, स्वाधरामृतें जीववीं, हरी ॥१९॥

तुझि कथासुधा तापल्या जना, निववि अंतरीं, विश्वजीवना।
अमृत निंदिती स्वर्गिंचे मुनी, तव कथामृता वंदिती जनीं ॥२०॥

अमृत मातवी स्वर्गिंचें हरी! तुझि कथासुधा बंध संहरी।
अमृत जे पिती त्यांचिया शिरीं, चरण देऊनी ने कथा वरी ॥२१॥

अमृत गोड हें जों जिभेवरी, तुझि कथासुधा गोड हे हरी।
श्रवणीं आननी बाह्य अंतरीं, मधुर सर्वथा जे परोपरी ॥२२॥

कनक आणि ते गुंज जोखणें, तुझि कथासुधा तुल्य लेखणें।
सुलभ जे सदा सर्वही स्थळीं, अमृत तुच्छ तें देवताकुळीं ॥२४॥

त्रिभुवनेश! तूं त्या तुला जशी, करिती तुल्यता ऊर्णनाभिशीं।
अमृत साम्यही श्रीकथामृता, वदति तेथ हा भाव तत्वतां ॥२४॥

सवत लक्ष्मुमी ती तुझ्या उरीं, तसिच मुक्ति ते श्रीकथेवरी।
बहु उदार जे जे अशी कथा, श्रवण याचकां देति सर्वथा ॥२५॥

सुजन याचकां अर्पिती धनें, परि मदासि तीं होति साधनें।
हरि! कथा तुझी विश्वपावनी, बहु उदार जे वर्णिती जनीं ॥२६॥

विरहहें जरी प्राण टाकिती, तरि कथामृतें गोपिका जिती।
परि हरी! तुझे संगतीविणें, मरण तें बरें, काय हें जिणें ? ॥२७॥

सरस हास्य सप्रेम पाहणें, विहरणें चिदानंदलक्षणें।
करिति अंतरीं ध्यान जे मुनी, विसरती कशा गोपकामिनी ? ॥२८॥

स्मरविलास एकांतिंचे वनीं, बहु रुतोनि जे राहिले मनीं।
करिति आमुच्या क्षोभ मानसीं, कपटिया! कसा गुप्त आमुशीं! ॥२९॥

फिरसि गोधनें चारितां वनीं, पद तुझें व्रजीं आठवूं मनीं।
दुखवतील कीं ते तृणांकुरीं, म्हणुनि बूडतों दुःखसागरीं॥३०॥

दिवस मावळे, येसि तूं व्रजा, नयनिं दाविशी श्रीमुखांबुजा।
कुरळ केश जे भृंग ते जसे, वरि पराग ते धूलिही दिसे॥३१॥

परतसी वनीं दैत्य मारूनी, दिससी थोर तूं वीर लोचनीं।
वदनचंद्र सांजेस दावुनी, मदन सोडिसी आमुचे मनीं॥३२॥

पुरवि वंदनें सर्व कामना, चरण तो तुझा नंदनंदना।
त्वरित ठेवुनी आमुचे कुचीं, पुरविं ईतुकी आस आमुची॥३३॥

सतत पूजिला जो चतुर्मुखें, वसति ज्यामध्ये सर्वही सुखें।
धरणिला अलंकार या वनीं, चरण ठेविं तो आमुचे स्तनीं॥३४॥

सकळ संकटीं ध्येय अंतरीं, स्मरति त्यांचिया आपदा हरी।
त्वरित गोपिकांच्या पयोधरीं, चरण आपुला ठेविं तू, हरी॥३५॥

सुरत वाढवी, शोक जो हरी, स्वरित वेणुनें चुंबिलाधरीं।
विसरवी जनां सर्व रक्तता, त्वरित पाजिं त्या स्वाधरामृता॥३६॥

सुरततृप्ती ही झालियावरी, अधर जो तुझा चुंबितां, हरी?।
सुरतवासना होय मागुतीं, अमृत तेथिंचें दे रमापती॥३७॥

ढकलुनी युगासारिख्या त्रुटी, दिवस कंठुनी थोर संकटीं।
नयनि पाहतां श्रीमुखाप्रती, लवती पापण्या त्या न सोसती॥३८॥

नयनीं पाहतां तूज माधवा करिति पापण्या विघ्न जेधवां।
करूनि अंगुलीभंग तेधवां, बहुत निंदिती पद्मसंभवा॥३९॥

न पुरती मुखा पाहतां धणी, करिति पापण्या विघ्न पापिणी।
कपटि या अशा ज्या विलासिनी, त्यजिल कोण त्यां तुजवांचुनी?॥४०॥

कुलपतीसुतभ्रातृबंधुतें, त्यजुनियां शठा! पावलों तुतें।
स्वरित मोहिल्या गोपसुंदरी, त्यजिल कोण रात्रीं वनांतरी?॥४१॥

पूर्व सूचना कळति आमुतें, तरि न धांवतों काननीं तुतें।
कशि निराश विश्वासघातका! करुनि मारिल्या दासि गोपिका?॥४२॥

वदन लोचनीं पाहतां, हरी! अजि विशाळता देखतां उरीं।
उपजती मनीं कामकामना, घडि घडि स्पृहा वाढते मना॥४३॥

विविध शब्द एकांतिचे तुझे, श्रवणिं ऐकतां काम उपजे।
तुजविणें हरी! प्राण जातसे, करिं कृपालु! बा! वांचती असें॥४४॥

भुवनमंगळें मूर्ति जे करी, वज्रजनास ते पावली, हरी।
त्यजुनि कोप, या गोपसुंदरी, निववीं दावुनी काम कूसरी॥४५॥

चरण ठेवितां कर्कश स्तनीं, बहु भितों मनीं गोपकामिनी।
फिरसि त्या पदीं तूं चहूंकडे, झणि तयासिही रूतती खडे॥४६॥

सकळही अशा गोपसुंदरी, करिती गायनें त्या परोपरी।
रडति सुस्वरें अश्रु लोचनीं, धरूनी लालसा कृष्णदर्शनीं॥४७॥

रडति तों तयांमाजि ये हरी, प्रकट आपुलें रूप तो करी।
मदनमोहन श्रीपति स्वयें, पुसतसे तयांलागीं विस्मयें॥४८॥

वसन पीवळें, हार कंधरीं, नयनीं देखुनी गोपसुंदरी।
उठलिया जशा प्राण आलिया, सकल शक्ति त्या येति इंद्रियां॥४९॥

धरिति धांवुनी एकि त्या करीं, धरिति एकि त्या पीत अंबरीं।
भुज धरीति त्या एकि अंगदीं, कितिकिंनी मिठ्या घातल्या पदीं॥५०॥

हरिपदीं तया नित्य वामनें, त्रिभुवनी मिठी घातली मनें।
अमन या मनें वृत्ति गोपिका, सकळ झालिया चित्सुखात्मिका॥५१॥

॥ गोपीगीत समाप्त॥

## परिशिष्ट क्र. ५ वेदस्तुति

वेदस्तुति म्हणजे वेदांनी केलेली परमेश्वराची स्तुति. येथें मराठी अनुवादासह दिली आहे. या वेदस्तुतींत वेदान्ताचें सार चांगल्या प्रकारें दिलेलें आहे. श्लोकांचा मराठी अनुवाद देण्यासाठी आम्ही दामोदर सावळाराम आणि मंडळी यांनी प्रकाशित केलेल्या 'सार्थ श्रीमद्भागवत' या ग्रंथाचा आधार घेतला आहे.

(संदर्भः भागवतः १०-८७-१४ ते ४१)

श्रुतय ऊचुः

जय जय जह्यजामजित दोषगृभीतगुणां त्वमसि यदात्मना समवरुद्धसमस्तभगः॥
अगजगदोकसामखिलशक्त्यवबोधक ते क्वचिदजयाऽऽत्मना च चरतोऽनुचरेन्निगमः॥१४॥

● श्रुति म्हणाल्या, 'हे अजिंक्य परमेश्वरा, तूं आपला नित्य विजय प्रकट कर. तू आपल्या सामर्थ्यानें सर्व वैभवें स्वाधीन करून ठेविली आहेस. यास्तव स्थावर व जंगम अशा सर्व शरीरधारी भूतांचीं माया तू नष्ट कर. त्या मायेने आपल्या दोषांवर पांघरूण घालण्यासाठी गुणांचा स्वीकार केलेला आहे. प्राणिमात्रांचे सर्व सामर्थ्य जागृत करणारा तूच आहेस. तूं स्वतः निरुपाधिक असलास तरी कधी कधी मायेसह संचार करितोस आणि म्हणूनच वेदांना तुझे वर्णन करता येते.॥१४॥

बृहदुपलब्धमेतदवयन्त्यवशेषतया यत उदयास्तमयौ विकृतेर्मृदि वाऽविकृतात्॥
अत ऋषयो दधुस्त्वयि मनोवचनाचरितं कथमयथा भवन्ति भुवि दत्तपदानि नृणाम्॥१५॥

● हे जे दृष्टिगोचर होणारे विश्व आहे, ते प्रलयकाळींहि कोणत्या तरी रूपाने अवशिष्ट रहात असल्यामुळे ज्ञानी पुरुष तत्त्वतः त्याला ब्रह्मरूप समजतात. कारण या विश्वाची उत्पत्ति व लय ही त्या ब्रह्मापासून होतात. तथापि त्यामुळे त्या ब्रह्मस्वरूपांत काही विकार होत नाही. मातीपासून घट-शरावादि पदार्थ होतात, पण त्यामुळें जसा मातीत काही विकार होत नाही, तसाच हा प्रकार होय. म्हणून वेदमंत्रांचे

द्रष्टे ऋषि व त्यांनी पाहिलेले वेदमंत्र हे आपल्या मनांत समजलेलें व वाचेने उच्चारलेलें जें काही असेल ते सर्व तुझ्या संबंधानेंच आहे असे ठरवितात. मनुष्य पृथ्वीवर राहात असल्यामुळे त्याने कशावर पाय ठेवला तरी तो पृथ्वीवर ठेवला असेच होते, दुसऱ्या कशावर ठेवला असे होत नाही. कारण प्रत्यक्ष लाकडावर किंवा वस्त्रावर पाय दिला तरी ते लाकूड किंवा वस्त्र पृथ्वीमय व पृथ्वीवर असल्यामुळे ते पाऊल शेवटी पृथ्वीवर पडले असेच होते. ॥१५॥

इति तव सूरयस्त्र्यधिपतेऽखिललोकमल– क्षपणकथामृताब्धिमवगाह्य तपांसि जहुः ॥
किमुत पुनः स्वधामविधुताशयकालगुणाः परम भजन्ति ये पदमजस्रसुखानुभवम् ॥१६॥

● म्हणूनच हे त्रिगुणात्मक प्रकृतीच्या नियन्त्या परमेश्वरा, सर्व जगाचे पातक नष्ट करणाऱ्या अशा तुझ्या मधुर कथारूपी समुद्रांत बुड्या मारून ज्ञानी पुरुष आपली दुःखें नाहीशी करतात. असे असल्यामुळे, हे परमेशा, जे आत्मस्वरूप संपादन करून त्या योगें अंतःकरणाच्या वृत्तीचा लय करतात, व काळाचे भेदहि नाहीसे करून अखंड सुखाचा अनुभव देणाऱ्या तुझ्या पायांची सेवा करतात, त्यांची सर्व दुःखे नाहीशी होतात हे सांगावयासच नको. ॥१६॥

दृतय इव श्वसन्त्यसुभृतो यदि तेऽनुविधा महदहमादयोऽण्डमसृजन् यदनुग्रहतः ।
पुरुषविधोऽन्वयोऽत्र चरमोऽन्नमयादिषु यः सदसतः परं त्वमथ यदेष्ववशेषमृतम् ॥१७॥

● प्राणी जर तुझी भक्ती करतील तरच त्यांना जीविताचे साफल्य करून घेता येईल. नाहीतर त्यांचा श्वासोच्छ्वास म्हणजे भात्यांप्रमाणे आंत बाहेर वारा ओढण्यासारखाच होय. असल्या नुसत्या श्वासोच्छ्वासाने त्यांना परम सुखाचा लाभ कसा होणार? कारण महत्, अहंकार इत्यादी आदिभूते जी ब्रह्मांडाची उत्पत्ति करतात, ती काय त्यांच्या स्वतःच्या सामर्थ्यानें? तुझी कृपा होऊन तूं त्यात स्फुरण घालतोस तेव्हाच त्यांना ब्रह्मांडाची उत्पत्ति करतां येते. म्हणजे स्वतंत्र सुख प्राप्त करून घेण्याचे सामर्थ्य तुझ्या साह्याशिवाय कोणालाच नाही. या शरीरामध्ये जे अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय असे पाच कोश असतात, त्यात तू सर्वत्र सूत्ररूपाने ओवल्यासारखा असून त्या त्या कोशाच्या आकारासारखा भासतोस. पण त्या कोशांमध्ये तूं गुरफटून न जातां किंवा त्यांच्या नाशाबरोबर नष्ट न होतां सर्वांच्या शेवटीहि अवशिष्ट राहतोस. कारण तू कार्य व कारण या उभयतांच्याहि पलीकडचा आहेस. ॥१७॥

उदरमुपासते य ऋषिवर्त्मसु कूर्पदृशः परिसरपद्धतिं हृदयमारुणयो दहरम् ॥
तत उदगादनन्त तव धाम शिरः परमं पुनरिह यत्समेत्य न पतन्ति कृतान्तमुखे ॥१८॥

● हे अंतरहित परमेश्वरा, मंत्रदृष्ट्या ज्ञानी ऋषींच्या मार्गामध्ये ज्यांची दृष्टी आत खडे गेल्याप्रमाणे अंधुक झाली आहे असे पुरुष, उदरांतील ब्रह्माची उपासना करतात; तसेच अरुणाचे अनुयायी, ज्यापासून अनेक नाड्या पसरल्या आहेत अशा हृदयांतील सूक्ष्म आकाशांत असलेल्या ब्रह्मस्वरूपाचे ध्यान करतात; पण तुझे स्थान जे त्या दोहोंच्याहि वर मस्तकामध्ये उंच ठिकाणी गेलेले आहे, ते जर प्राप्त झाले तरच मात्र पुरुष संसाररूप काळाच्या तडाख्यात पुनः सांपडत नाही. ॥१८॥

स्वकृतविचित्रयोनिषु विशन्निव हेतुतया तरतमतश्चकास्स्यनलवत्स्वकृतानुकृतिः ॥
अथ वितथास्वमूष्ववितथं तव धाम समं विरजधियोऽन्वयन्त्यभिविपण्यव एकरसम् ॥१९॥

● हे परमेश्वरा, तू ज्या नानाप्रकारच्या योनि उत्पन्न केल्या आहेस, त्यामध्ये तू उपादान-कारणरूपानें शिरल्यासारखा असून, अग्नि ज्याप्रमाणे लहानमोठ्या काष्ठांमध्ये लहान मोठा दिसतो, पण वस्तुतः अविकृत रहातो, त्याप्रमाणे तूंहि त्या लहानमोठ्या योनींमध्ये त्या त्या रूपाचे अनुकरण करून त्यांत राहिल्यासारखा असतोस. पण या सर्व योनि मिथ्या असून त्यांत समभावाने अनुस्यूत असलेले तुझे तेज मात्र सत्य होय. हे जे तुझे एकरशी स्वरूप तेच सत्य होय, असे सर्व व्यवहार सोडलेले निर्मळ बुद्धीचे पुरुष जाणतात. ॥१९॥

**स्वकृतपुरेष्वमीष्वबहिरन्तरसंवरणं तव पुरुषं वदन्त्यखिलशक्तिधृतोंऽशकृतम् ॥**
**इति नृगतिं विविच्य कवयो निगमावपनं भवत उपासतेऽङ्घ्रिमभवं भुवि विश्वसिताः ॥२०॥**

● आपल्या कर्मानि संपादन केलेल्या शरीरांत भोक्ता म्हणून रहाणारा जीव कार्यकारणांच्या आवरणापासून वस्तुतः अलिप्त आहे. म्हणून, हे परमेश्वरा, सर्वशक्तिमान् असा जो तूं या तुझ्या जणू काय अंशापासून तो केलेला आहे असे म्हणतात. जीवाची ही जी वास्तविक स्थिति, तिचे ज्ञान करून घेऊन ज्ञानी पुरुष श्रद्धावान् होतात, आणि या लोकी वैदिक कर्मे अर्पण करण्याचे क्षेत्र असे जे तुझे चरण, त्यांची उपासना करतात. ॥२०॥

**दुरवगमात्मतत्त्वनिगमाय तवात्ततनो– श्चरितमहामृताब्धिपरिवर्तपरिश्रमणाः ॥**
**न परिलषन्ति केचिदपवर्गमपीश्वर ते चरणसरोजहंसकुलसङ्गविसृष्टगृहाः ॥२१॥**

● हे ईश्वरा, ज्ञान होण्यास अत्यंत कठीण असे जे आत्मस्वरूप त्याचे लोकांना ज्ञान करून द्यावे म्हणून तू अवतार घेत असतोस. ते तुझे अवतारचरित्र मोठ्या सागरासारखे असून त्यात अवगाहन करणाऱ्या पुरुषांचे संसाराचे श्रम दूर होतात. आणि असे पुरुष तुझ्या चरणकमलांवर हंसाप्रमाणे आसक्त होऊन राहणाऱ्या भक्तसमुदायांच्या संगतीने गृहादि सौख्यांचा त्याग करतात आणि मग त्यांना प्रत्यक्ष मोक्षाचीहि इच्छा नाहीशी होते. ॥२१॥

**त्वदनुपथं कुलायमिदमात्मसुहृत्प्रियवत्– चरति तथोन्मुखे त्वयि हिते प्रिय आत्मनि च ॥**
**न बत रमन्त्यहो असदुपासनयाऽऽत्महनो यदनुशया भ्रमन्त्युरुभये कुशरीरभृतः ॥२२॥**

● तुझ्या सेवेला लावण्यास योग्य असे शरीर, आत्मा, मित्र किंवा एखादा प्रेमाचा माणूस याप्रमाणे आपल्या स्वाधीन असतांहि, आत्मघातकी लोक त्याचा उपयोग तुझ्या सेवेकडे करीत नाहीत; आणि हितकर्ता, प्रिय व अंतर्यामी असा तूं अनुकूल असतांहि मिथ्याभूत अशा देहाच्या मागे लागून, तुझ्यावर ते प्रेम करीत नाहीत व या देहाच्या सेवेवरच सर्व लक्ष लावतात! असे मिथ्याभूत शरीर धारण करणारे जीव भयाने सर्वतोपरिग्रस्त असलेल्या संसारचक्रांतच फिरत राहतात. ॥२२॥

**निभृतमरुन्मनोऽक्षदृढयोगयुजो हृदि यत् मुनय उपासते तदरयोऽपि ययुः स्मरणात् ॥**
**स्त्रिय उरगेन्द्रभोगभुजदण्डविषक्तधियो वयमपि ते समाः समदृशोऽङ्घ्रिसरोजसुधाः ॥२३॥**

● मोठमोठे योगी, प्राण-मन-इंद्रिये यांचा निरोध करून आपल्या हृदयामध्ये ज्या परमेश्वराच्या पदाची उपासना करतात, ते पद तुझा द्वेष करणाऱ्यांनीहि तुझ्या स्मरणाच्या योगे मिळविले आहे. कारण तुझी दृष्टि सर्वांना सारख्याच भावनेने पाहात असते. तुझ्या सर्पाकार बाहूवर विषयबुद्धीने ज्यांचे

मन आसक्त झाले आहे, अशा त्या गोपी, आणि आम्ही श्रुति, तुझ्या चरणकमलाच्या मकरंदाचा आस्वाद व्यापक बुद्धीने घेणाऱ्या आहोत. तरी पण दोघींवरहि तुझी कृपा सारखीच असलेली दिसते. ॥२३॥

**क इह नु वेद बतावरजन्मलयोऽग्रसरं यत उदगादृषिर्यमनु देवगणा उभये॥**
**तर्हि न सन्न चासुदभयं न च कालजवः किमपि न तत्र शास्त्रमवकृष्य शयीत यदा॥२४॥**

● हे परमेश्वरा, तू सर्वांचा आदि आहेस. यास्तव ज्यांचा जन्म अगदी अलीकडे होऊन लयहि झाला आहे, अशा कोणा पुरुषाला तुझ्या स्वरूपाचे ज्ञान होणे शक्य आहे ? ब्रह्मदेवाची उत्पत्ति तुझ्यापासून झाली व आध्यात्मिक व आधिदैविक असे दोन्ही प्रकारचे देव त्या ब्रह्मदेवापासून झाले. पण जेव्हा तू सर्व सृष्टीचा आवर करून निद्रा घेतोस, त्यावेळी स्थूल असे आकाशादि तत्त्व, सूक्ष्म असे महदादि तत्त्व, किंवा त्या स्थूलसूक्ष्मांच्या योगानें झालेले शरीर, तसेच कालाचा वेग, यापैकी काहीच राहात नाही. जीवांच्या व्यवहारासाठी केलेले विधिनिषेधात्मक शास्त्र सुद्धा यावेळी अर्थात् नसतेच. ॥२४॥

**जनिमसतः सतो मृतिमुतात्मनि ये च भिदां विपणमृतं स्मरन्त्युपदिशन्ति त आरुपितैः॥**
**त्रिगुणमयः पुमानिति भिदा यदबोधकृता त्वयि न ततः परत्र स भवेदवबोधरसे॥२५॥**

● हे परमेश्वरा, जग मिथ्याभूत असतां त्याची उत्पत्ति झाली आहे असे म्हणणारे वैशेषिक, एकवीस प्रकारची दुःखें सत्य असून त्यांचा शेवटी नाश होतो असे म्हणणारे नैयायिक, तसेच सर्व आत्मे एकमेकांपासून पृथक् आहेत असे म्हणणारे सांख्य आणि कर्माच्या योगाने मिळणारे– विकत घ्यावयाच्या वस्तूंसारखे – स्वर्गादि भोग सत्य होत असे म्हणणारे मीमांसक, या सर्वांचे सिद्धांत वास्तविक आधारावर उभारलेले नसून त्यांची उभारणी केवळ भ्रमावर झालेली आहे. पुरुष हा त्रिगुणात्मक आहे असे म्हणून तुझ्या ठिकाणी सर्व भेदांची उपपत्ति लावण्याचा प्रयत्न करणे हेहि अज्ञानजन्यच आहे. तू भेदाभेदाच्या पलीकडे असून ज्ञानाचा केवळ गाभा असल्यामुळे तुझ्या ठिकाणी अज्ञानाचा वासहि संभवत नाही. ॥२५॥

**सदिव मनस्त्रिवृत्त्वयि विभात्यसदामनुजात् सदभिमृशन्त्यशेषमिदमात्मतयाऽऽत्मविदः॥**
**न हि विकृतिं त्यजन्ति कनकस्य तदात्मतया स्वकृतमनुप्रविष्टमिदमात्मतयावसितम्॥२६॥**

● तुझ्या पुरुषरूप शक्तीसह हा सारा त्रिगुणात्मक प्रपंच म्हणजे केवळ मनोराज्याचा डोलारा, अर्थात् मिथ्याभूत आहे. सत्य अशा तुझे त्याला अधिष्ठान असल्यामुळेच तो सत्य आहेसा भासतो. आत्मज्ञानी पुरुष हे सर्व विश्व सत्य आहे असे जे म्हणतात, ते त्याच्या विश्वरूपामुळे नसून तत्वतः आत्मस्वरूपामुळेच होय. उदाहरण असे की, ज्यांना केवळ सोनेच घ्यावयाचे आहे ते सोन्याचे दागिने काही टाकत नाहीत. कारण सोन्याचे दागिने म्हणजे सोनेच होय असे ज्ञान त्यांना असते. तात्पर्य, परमेश्वराने स्वतःपासून विश्व उत्पन्न केले व नंतर तो त्यात शिरल्यासारखा झाला, यास्तव तत्त्वतः ते परमेश्वरस्वरूपीच होय असे ठरते. ॥२६॥

**तव परि ये चरन्त्यखिलसत्त्वनिकेततया त उत पदाऽऽक्रमन्त्यविगणय्य शिरो निर्ऋतेः॥**
**परिवयसे पशूनिव गिरा विबुधानपि तान् त्वयि कृतसौहृदाः खलु पुनन्ति न ये विमुखाः॥२७॥**

● सर्व प्राणिमात्रांचे अस्तित्व तुझ्यावरच आहे असे समजून जे कोणी तुझी उपासना करितात,

ते प्रत्यक्ष मृत्यूच्याहि मस्तकावर तिरस्काराने पाय देऊन संसारातून मुक्त होतात. पण जे केवळ शब्दज्ञानी असून तुझ्या भक्तीपासून पराङ्मुख असतात, त्यांना तू पशूंना बांधावे त्याप्रमाणे मोहक अशा वेद-वचनांनी बांधून टाकतोस. तुझ्याशीं ज्यांनी प्रेमाने मैत्री केली, ते स्वतः पवित्र होऊन जगालाहि पवित्र करितात. इतरांना ती गोष्ट शक्य नाही. ॥२७॥

**त्वमकरणः स्वराडखिलकारकशक्तिधरः तव बलिमुद्वहन्ति समदन्त्यजयाऽनिमिषाः ॥**
**वर्षभुजोऽखिलक्षितिपतेरिव विश्वसृजो विदधति यत्र ये त्वधिकृता भवतश्चकिताः ॥२८॥**

● हे परमात्म्या, तू इंद्रियरहित असलास, तरी स्वयंप्रकाश असून इतर सर्वांच्या इंद्रियशक्तीची सूत्रें तुझ्याच हातात आहेत. यास्तव, देव व त्यांचे अधिपति असे सृष्टिकर्ते प्रजापति, मायेसह तुलाच पूजा अर्पण करतात व तुझ्याच सामर्थ्याने इतरांनी अर्पण केलेल्या पूजेचा उपभोग घेतात. मांडलिक राजे सार्वभौमाला करभार देऊन त्याच्याच आधारावर इतर लोकांपासून घेतलेल्या कारभाराचा जसा उपभोग घेतात, तसेच हे आहे. देव आपापल्या नेमलेल्या स्थानी राहून आपली जी कर्तव्ये करतात, ती तुझ्या भीतीमुळेच होय. ॥२८॥

**स्थिरचरजातयः स्युरजयोत्थनिमित्तयुजो विहर उदीक्षया यदि परस्य विमुक्त ततः ॥**
**न हि परमस्य कश्चिदपरो न परश्च भवेद् वियत इवापदस्य तव शून्यतुलां दधतः ॥२९॥**

● हे परमेश्वरा, तू सर्वथैव मुक्त असून मायेच्या अगदी पलीकडचा आहेस. तथापि लांबून पहाण्याच्या मिषानेच का होईना, जेव्हा तुझा त्या मायेशी खेळ होतो, तेव्हा स्थावर, जंगम अशा प्रकारचे देहधारी जीव निर्माण होतात; व त्या तुझ्या अवलोकनाने उत्पन्न होणारी जी निमित्तरूप कर्मे त्यांशी त्यांचा व्यवहार होऊ लागतो. वस्तुतः तू सर्वांच्या पलीकडचा असून तुला आपले व इतरांचे असा भेदाभेद नाही. तू आकाशाप्रमाणे सर्वांपासून अलिप्त असून शून्याशी तुझे सादृश्य आहे, व त्यामुळे वाणी व मन यांच्या आटोक्यात तू येत नाहीस. ॥२९॥

**अपरिमिता ध्रुवास्तनुभृतो यदि सर्वगतास्तर्हि न शास्यतेति नियमो ध्रुव नेतरथा ॥**
**अजनि च यन्मयं तदविमुच्य नियन्तृ भवेत्। सममनुजानतां यदमतं मतदुष्टतया ॥३०॥**

● हे सत्यस्वरूपी परमेश्वरा, जीव जर असंख्य, नित्य व सर्वव्यापी असतील, तर त्यांचे नियमन होणे शक्य नाही, व म्हणून तू ते करणारहि नाहीस. पण जर ते तसे नसतील, तर मात्र तू त्यांचा नियन्ता होशील. हा जीवनामक पदार्थ ज्या उपादानरूप सर्वव्यापी वस्तूपासून उत्पन्न झाला, ती वस्तु त्या जीवाचे नियमन करील, पण त्याचें कारण म्हणून राहूनच करील, एरवी नाही. ही जी सर्वव्यापी वस्तु, ती आपल्याला समजली असे जे म्हणतात, त्यांना ती मुळीच समजलेली नसते. कारण जे समजले असे वाटते, ते दोषयुक्त म्हणजे संकुचित स्वरूपाचे असते, असा नियम सर्वत्र दृष्टीस पडतो. ॥३०॥

**न घटत उद्भवः प्रकृतिपुरुषयोरजयोरुभययुजा भवन्त्यसुभृतो जलबुद्बुदवत् ॥**
**त्वयि त इमे ततो विविधनामगुणैः परमे सरित इवार्णवे मधुनि लिल्युरशेषरसाः ॥३१॥**

● प्रकृति व पुरुष ही दोन्ही जन्मरहित आहेत, म्हणून जीवाची उत्पत्ति त्या दोहोंतून कोणाहि एकापासून झाली असे म्हणणे जुळत नाही. मग जीवाची उत्पत्ति होते तरी कशी? तर पाणी व वायु

यांच्यापासून जसा बुडबुडा होतो, तशी प्रकृति हे उपादान कारण व पुरुष हे निमित्त कारण यांच्या संयोगाने ती होते. यास्तव नद्या जशा समुद्रांत किंवा सर्व प्रकारचे रस जसे मधात लीन होतात, त्याप्रमाणे अनेक प्रकारची नावे व गुण धारण करणारे हे जीव आपल्या नामगुणांसह निर्गुण अशा तुझ्या स्वरूपात लीन होतात. ।।३१।।

**नृषु तव मायया भ्रमममीष्ववगत्य भृशं त्वयि सुधियोऽभवे दधति भावमनुप्रभवम्।।**
**कथमनुवर्ततां भवभयं तव यद्भ्रुकुटिः सृजति मुहुस्त्रिणेमिरभवच्छरणेषु भयम्।।३२।।**

● हे परमात्म्या, या जीवांच्या मागे पुनःपुनः जन्मास येण्याचा ससेमिरा जो लागला आहे तो तुझ्या मायेमुळे आहे, असे ज्ञान झाल्यामुळे ज्ञानी पुरुष त्या मायेला सोडून तुझ्याच ठिकाणी दृढ श्रद्धा ठेवतात. कारण तू जन्ममरणाच्या फेऱ्यात त्यांना घालणारा नसून त्यातून मुक्त करणारा आहेस. तुझी उपासना करणारांना जन्ममरणरूप संसाराचे भय कसले वाटणार? हिवाळा, उन्हाळा, पावसाळा या तीन भागांनी युक्त अशा काळाच्या रूपाने प्रतीतीस येणारी तुझी भुंवई, जर कोणाला भय उत्पन्न करीत असेल तर ते ज्यांनी तुझा आश्रय केलेला नाही अशा जीवांनाच होय. ।।३२।।

**विजितहृषीकवायुभिरदान्तमनस्तुरगं य इह यतन्ति यन्तुमतिलोलमुपायखिदः।।**
**व्यसनशतान्विताः समवहाय गुरोश्चरणं वणिज इवाज सन्त्यकृतकर्णधरा जलधौ।।३३।।**

● अतिशय चंचल अशा मनरूपी घोड्याचे दमन करणे अत्यंत कठीण आहे. अशा स्थितींत सद्गुरूंच्या पायांचा आश्रय सोडून देऊन जे कोणी या मनरूप घोड्याला आवरण्यासाठी म्हणून इंद्रिये व प्राण यांचेच नियमन करतात, त्यांना तसल्या उपायांनी इष्टप्राप्ति न होता दुःखच होते व शेकडो संकटांनी ते ग्रस्त होतात. हे जन्मरहित अशा परमेश्वरा, अशा प्रकारचे जीव म्हणजे नावाड्याचे साह्य न घेता समुद्रांत नाव घेऊन जाणाऱ्या व्यापाऱ्यांप्रमाणे अडाणी होत. ।।३३।।

**स्वजनसुतात्मदारधनधामधरासुरथैस्त्वयि सति किं नृणां श्रयत आत्मनि सर्वरसे।।**
**इति सदजानतां मिथुनतो रतये चरतां सुखयति को न्विह स्वविहते स्वनिरस्तभगे।।३४।।**

● हे परमात्म्या, सर्व सुखांचा गाभा असा जो आत्मस्वरूपी तू – त्या तुझी प्राप्ति – उपासना करून होण्यासारखी असता – आप्त, इष्ट, पुत्र, देह, स्त्री, धन, घर, भूमी, प्राण, रथ इत्यादी क्षुद्र वस्तूंवर मनुष्यांची आसक्ति का बरे असावी? पण त्वत्प्राप्तीला या क्षुद्र वस्तूंचा काही उपयोग नाही, या सत्य सिद्धान्ताचें ज्ञान नसल्यामुळे मनुष्ये पतिपत्नींच्या जोड्या करून, भ्रामक सुखासाठी प्रयत्न करीतच असतात. पण हा संसार आपण होऊनच नष्ट होणारा व तत्त्वतः अगदी निःसार असा असल्यामुळे त्यातील कोणत्या गोष्टीपासून त्या मनुष्यांना खरे सुख मिळणे शक्य आहे बरे? ।।३४।।

**भुवि पुरुपुण्यतीर्थसदनान्यृषयो विमदाः त उत भवत्पदाम्बुजहृदोऽघभिदंघ्रिजलाः।।**
**दधति सकृन्मनस्त्वयि य आत्मनि नित्यसुखे न पुनरुपासते पुरुषसारहरावसथान्।।३५।।**

● हे परमेश्वरा, तुझे चरणकमल आपल्या हृदयांत नित्य धारण केल्यामुळेच ज्यांच्या पायांचे तीर्थ पापनाशक झाले आहे असे ते निरहंकार ऋषिसुद्धा, पृथ्वीवरील अत्यंत पवित्र अशा तीर्थस्थानांचेच सेवन करतात, घरदारादि विषयांचे सेवन करीत नाहीत. तुझ्या ठिकाणी शाश्वत सुख असल्यामुळे,

ज्यांचे मन तुझ्याकडे एकदा लागले, ते पुनः घरादाराच्यामागे केव्हाही लागत नाहीत. कारण घरादारांसारखे भोग हे पुरुषार्थाचे सार हरण करणारेच आहेत. ॥३५॥

**सत इदमुत्थितं सदिति चेन्नतु तर्कहतं व्यभिचरति क्व च क्व च मृषा न तथोभययुक् ॥**
**व्यवहृतये विकल्प इषितोऽन्धपरंपरया भ्रमयति भारती त उरुवृत्तिभिरुक्थजडान् ॥३६॥**

● हे जग जरी सत्य अशा ब्रह्मापासून उत्पन्न झाले आहे, तरी ते सत्यच आहे असे म्हणणे युक्त नाही. ते म्हणणे तर्कानेच खोडून काढता येते. कारण ज्यापासून जे उत्पन्न होते त्यासारखेच ते असते, हा सिद्धांत सर्वथा खरा नाही. त्याला कित्येक अपवाद आहेत, व कित्येक ठिकाणी तर उत्पन्न झालेली वस्तु अज्ञानजन्य असल्यामुळे खोटी असते. तसेच हे जगहि सत्य नव्हे. कारण तेहि सत्य ब्रह्माचे अधिष्ठान व त्यावर झालेला भ्रम, या दोहोंमुळे भासते आहे. सत्य ब्रह्मावर हा जो जगाचा आभास झालेला आहे, तो व्यवहारासाठी इष्ट असला, तरी त्याला अंधपरंपरेशिवाय मूळ आधार काही नाही. हे परमेश्वरा, तुझी वेदरूपी वाणी कर्माच्या योगे ज्यांची बुद्धि जड होऊन गेली आहे अशा मीमांसकांना शब्दांच्या नानावृत्तींच्या योगे मोह पाडते. ॥३६॥

**न यदिदमग्र आस न भविष्यदतो निधनात् अनुमितमन्तरा त्वयि विभाति मृषैकरसे ॥**
**अत उपमीयते द्रविणजातिविकल्पपथैः वितथमनोविलासमृतमित्यवयन्त्यबुधाः ॥३७॥**

● हे जग सृष्टीपूर्वी नव्हते, तसेच प्रलयानंतरहि ते नसते. अर्थात् या दोन स्थितींमधील काळात ते जे भासते, ते तुझ्या निर्गुण स्वरूपावर आभासरूपानेच भासत असले पाहिजे हे उघड आहे. म्हणूनच केवळ मृत्तिकादि द्रव्यांपासून होणाऱ्या घटादिक भिन्न पदार्थांची त्याला उपमा देतात. वस्तुतः ते सर्वथैव असत्य अशा मनोराज्यासारखे आहे. त्याला सत्य म्हणणारे अज्ञानी होत. ॥३७॥

**स यदजया त्वजामनुशयीत गुणांश्च जुषन् भजति सरूपतां तदनु मृत्युमपेतभगः ॥**
**त्वमुत जहासि तामहिरिव त्वचमात्तभगो महसि महीयसेऽष्टगुणितेऽपरिमेयभगः ॥३८॥**

● ज्यावेळी जीव मायेने मोहित होऊन तिला कवटाळतो, तेव्हा तो तिच्या गुणांचा वाटेकरी होऊन मायारूपच होतो, व तेणेकरून त्याचे मूळ ऐश्वर्य नष्ट होऊन तो जन्ममृत्युरूप संसारचक्रात सापडतो. पण हे परमात्म्या, तू मात्र, सर्प आपली कात टाकतो त्याप्रमाणे त्या मायेला टाकून देतोस, व त्यामुळे तुझे ऐश्वर्य नित्य तुजजवळ राहते. अणिमाद्यष्ट विभूतिरूप तुझे ऐश्वर्य अमर्याद असल्यामुळे तू सर्वांना पूज्य झाला आहेस. ॥३८॥

**यदि न समुद्धरन्ति यतयो हृदि कामजटा दुरधिगमोऽसतां हृदि गतोऽस्मृतकंठमणिः ॥**
**असुतृपयोगिनामुभयतोऽप्यसुखं भगवन् अनपगतान्तकादनधिरूढपदाद्भवतः ॥३९॥**

● इंद्रियदमन करणारे जे योगी स्वहृदयस्थ वासनांच्या मूळाचे उच्चाटन करीत नाहीत, त्यांच्या हृदयांत असूनहि तू त्यांना दुष्प्राप्यच रहातोस. मणि गळ्यात घातलेला असून त्याची आठवण नसलेल्या मनुष्याची जी स्थिती तीच त्याचीही होते. अशा इंद्रिये तृप्त करण्यासाठी योगसाधन करणाऱ्या पुरुषांना, हे भगवंता, इहपर अशा दोन्ही ठिकाणी दुःखच होते. एक तर त्यांचा जन्ममृत्युरूप संसार सुटत नाही म्हणून दुःख, आणि दुसरे तुझे पद त्यांना न मिळाल्यामुळे तुझ्याकडून होणाऱ्या दंडाचीहि भीती त्यांना

असते. ॥३९॥

त्वदवगमी न वेत्ति भवदुत्थशुभाशुभयोः गुणविगुणान्वयांस्तर्हि देहभृतां च गिरः॥
अनयुगमन्वहं सगुण गीतपरंपरया श्रवणभृतो यतस्त्वमपवर्गगतिर्मनुजैः॥४०॥

● हे षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंता, तुझ्या स्वरूपाचे यथायोग्य ज्ञान ज्याला झाले, तो पुरुष तुझ्यामुळे उत्पन्न होणारी जी पुण्यपापांची सुखदुःखरूप फळे त्यांच्या संबंधापासून मुक्त होतो, आणि मग देहाभिमानी जीवांसाठी केलेले जे शास्त्रांतील विधिनिषेध तेहि तो जाणत नाही. त्यापासून स्वतंत्र होतो. कारण प्रत्येक युगामध्ये तू जो उपदेश जीवांना उद्देशून दिलेला आहेस, त्याच्या श्रवणाने तुला मनुष्यांनी प्रतिदिवशी ह्रदयांत साठविले म्हणजे त्यांना तू मोक्षरूपी आपले स्थान देतोस. ॥४०॥

द्युपतय एव ते न ययुरन्तमनन्ततया त्वमपि यदन्तराण्डनिचया ननु सावरणाः॥
ख इव रजांसि वान्ति वयसा सह यच्छ्रुतयस्त्वयि हि फलन्त्यतन्निरसनेन भवन्निधनाः॥४१॥

● हे भगवंता, स्वर्गादि लोकांचे स्वामी जे इंद्र, ब्रह्मदेव आदिकरून देव, तेच काय ते तुझा अंत जाणत नाहीत असे नाही, तर तुझ्या स्वरूपाला अंतच नसल्यामुळे तुझा अंत स्वतः तूहि जाणत नाहीस! कारण तुझ्या स्वरूपामध्ये उत्तरोत्तर दहापट मोठे होत जाणारे असे ब्रह्मांडांचे थवेच्याथवे भ्रमण करीत असून, त्या प्रत्येक ब्रह्मांडाच्या भोवती सात-सात वेष्टने आहेत. आकाशात जसे धुळीचे कण फिरतात, तसे हे ब्रह्मांडांचे थवे कालचक्राबरोबर एकमेकांसह फिरत असतात. असे असल्यामुळे तुझ्यातच लय पावणाऱ्या श्रुति तुझ्यावाचून इतर काही नाही असे ठरवून अप्रत्यक्षपणे तुझाच बोध करून देतात. ॥४१॥ ॥ वेदस्तुति समाप्त ॥

## परिशिष्ट क्र. ६ श्रीकृष्णोपनिषत्

अथर्व वेदान्तर्गत श्रीकृष्णोपनिषत् आध्यात्मिक अर्थाचे ज्ञान करून देते. त्याचा आधिभौतिक अर्थ श्रीमद्भागवतात सविस्तर वर्णिला आहे. या भागवत ग्रंथाच्या दशम स्कंधात वर्णिलेल्या श्रीकृष्ण परमात्म्याच्या लीलांचे रहस्य उलगडून देणारी जणु किल्लीच असे हे कृष्णोपनिषत् भागवताच्या अभ्यासकास उपकारक होईल म्हणून ते येथे सार्थ देत आहोत.

ते होचुस्तं सुराः सर्वे भगवन्तं सनातनम्। नोऽवद्यमवतारान्वै गृह्णन्ते नैव भूतले॥१॥

● ते सर्व देव सनातन भगवान श्रीकृष्णाजवळ जाऊन प्रार्थना करू लागले की, हे श्रीकृष्णा, पृथ्वीतलावर आमचा जन्म होणे हे फारच वाईट आहे. करिता आम्ही अवतारच घेणार नाही.

आज्ञयावतारास्ते हि गोपान्नः स्त्रीश्च नो कुरु। अन्यो नः विग्रहं धत्ते तवाङ्गस्पर्शनाद्विना॥२॥

● तरी पण आपल्या आज्ञेने अवतार तर नक्की घेणार; पण आम्हाला गोप किंवा गोपी करा. आपल्या देहाचा स्पर्श होणार नाही असा देह आम्ही धारण करणार नाही.

शश्वत्स्पर्शार्पितेऽस्माकं गृह्णन्तेऽवतरान्वयम्। रुद्रादीनां वचः श्रुत्वा प्रोवाच भगवान् स्वयम्॥३॥

● जर नेहमी आम्हांला तुमच्या देहाचा स्पर्श मिळेल तरच आम्ही अवतार धारण करू असे रुद्रादिकांचे बोलणे ऐकून भगवान् स्वतः म्हणाले.

**अङ्गसङ्गं करिष्यामि भवद्वाक्यं करोम्यहम्। मोदितास्ते सुराः सर्वे कृतकृत्याधुना वयम्॥४॥**

● तुमच्या सांगण्याप्रमाणे मी अंगसंग करीन. ह्याप्रमाणे भक्ताधीन भगवंताचे भाषण ऐकून ते सर्व देव आनंदित झाले आणि म्हणाले की, आता आम्ही कृतकृत्य झालो.

**यो नन्दः परमानन्दो यशोदा मुक्तिगेहिनी। माया सा त्रिविधा प्रोक्ता सात्त्वी राजसतामसी॥५॥**
**प्रोक्ता सात्त्वी च रुद्रे सा भक्ते ब्रह्मणि राजसी। तामसी दैत्यपक्षे तु माया त्रेधा ह्युदाहृता॥६॥**

● जो परमानंद तो नंद झाला आणि त्या परमानंदाची स्त्री जी मुक्ती ती यशोदा झाली.माया म्हणजे भगवंताची शक्ति ती तीन प्रकारची सांगितली आहे. सात्त्विक, राजस व तामस असे ते तीन प्रकार होत. भक्त जो शंकर त्याचे ठिकाणी सात्त्विक माया, ब्रह्मदेवाचे ठिकाणी राजसी माया आणि दैत्यपक्षामध्ये तामसी माया अशा प्रकारे ती माया तीन ठिकाणी विभागली आहे. ॥५॥, ॥ ६ ॥

**अजय्या वैष्णवी मायाप्यजेन सा जिता पुरा। देवकी ब्रह्मविद्या सा या देवैरुपगीतये॥७॥**

● विष्णूची माया कोणीहि जिंकली नाही. पूर्वी ब्रह्मदेवानेसुद्धा तिला जिंकले नव्हते. ज्या ब्रह्मविद्येचे देवतांनी गायन केले होते ती जी ब्रह्मसंबंधी विद्या तीच देवकी होय.

**निगमो वसुदेवो यो वेदार्थः कृष्णरामयोः। स्तुवन्ति सततं यन्मे सोवतीर्णो महीतले॥८॥**

● वसुदेव हाच वेद होय. श्रीकृष्ण व बलराम हे वेदार्थ होत. जे माझे स्वरूप (वेद) निरंतर स्तवतात, तेच वेदार्थरूप कृष्ण व बलराम पृथ्वीवर अवतीर्ण झाले आहेत. ॥८॥

**वने वृंदावन क्रीडन् गोपगोपीसुरैः सह। गोप्यो गाव ऋचस्तस्य यष्टिका कमलासनः॥९॥**

● मोठ्या वनामध्ये तसेच वृंदावनामध्ये गोप-गोपीरूप देवांसह श्रीकृष्ण क्रीडा करीत होता. गाई व गोपी ह्या वेदमंत्र होत व ब्रह्मदेव हा श्रीकृष्णाच्या हातातील काठी बनला. ॥९॥

**वंशस्तु भगवान्रुद्रः शृङ्गमिन्द्रः सखा सुराः। गोकुलवनं वैकुंठं तापसास्तत्र ते द्रुमाः॥१०॥**

● भगवान शंकर मुरली बनला व इंद्र हा वाजवावयाचे शिंग बनला. देव हे गोपरूपाने त्याचे मित्र बनले व विष्णूचे जे वैकुंठस्थान तेच श्रीकृष्णाचे गोकुल बनले आणि वैकुंठातील ते तपस्वी मुनि ते सर्व वृक्ष बनले. ॥१०॥

**लोभक्रोधादयो दैत्याः कलिकालोऽतिरस्कृतः। गोपरूपो हरिः साक्षान्मायाविग्रहधारणः॥११॥**

● लोभ व क्रोध वगैरेचा कलियुगात तिरस्कार केला जात नाही असे जे कामक्रोधादि षड्रिपु ते दैत्य बनले आणि माया म्हणजे स्वतःची इच्छा शक्ती तिच्या साहाय्याने देह धारण करणारा श्रीहरि प्रत्यक्ष गोपरूपाने अवतीर्ण झाला. ॥११॥

**दुर्बोधं कुहकं तस्य मायया मोहितं जगत्। दुर्जया सा सुरैः सर्वैर्यष्टिरूपेऽभवद्विधिः॥१२॥**

● त्या परमेश्वराची जादू जाणण्यास कठीण असल्यामुळे कोणालाच समजणे शक्य नाही. त्याच्या मायेने जग मोहित झाले आहे. सर्व देवांच्या हातूनहि ती माया जिंकिली जात नाही. पाहा की, त्या

मायेच्या आश्रयाने सृष्टी उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवालासुद्धा त्या श्रीकृष्णाची काठी बनावे लागले. ॥१२॥

**रुद्रो येन कृतो वंशस्तस्य माया जगत्कथम्। बलं ज्ञानं सुराणां वै तेषां ज्ञानं हृतं क्षणात्॥१३॥**

● ज्याने शंकराला मुरली बनवले, त्याच्या मायेला जगातील सामान्य प्राणी कसे जिंकू शकतील? देवांजवळ असणारे जे सामर्थ्यपूर्ण ज्ञान ते सुद्धा भगवंताने जर एका क्षणात हरण केले, तर इतरांची कथा काय? ॥१३॥

**शेषनागोऽभवद्रामः कृष्णो ब्रह्मैव शाश्वतम्। अष्टावष्टसहस्रे द्वे शताधिकास्त्रियस्तथा॥१४॥**
**ऋचोपनिषदस्ता वै ब्रह्मरूपा ऋचः स्त्रियाः। द्वेषश्चाणूरमल्लोऽयं मत्सरोमुष्टिकोऽजयः॥१५॥**

● शेषनाग हा बलराम झाला. सनातन परब्रह्म श्रीकृष्ण झाला. वेदांतील मंत्र व उपनिषदे ही श्रीकृष्णाच्या सोळा हजार एकशे आठ स्त्रिया झाल्या. ऋचा (मंत्र) ह्या ब्रह्मरूपी स्त्रियाच होत. द्वेष हा चाणूर नावाचा मल्ल झाला आणि मत्सर हा अजिंक्य असा मुष्टिक नावाचा दैत्य झाला. ॥१४॥, ॥१५॥

**दर्पः कुवलयापीडो गर्वो रक्षः खगो बकः। दया सा रोहिणी माता सत्यभामाहिंसेति वै॥१६॥**

● दर्प हाच कुवलयापीड हत्ती आणि गर्व हाच आकाशांतून फिरणारा बकासुर, दया ती माता रोहिणी व अहिंसा ही सत्यभामा होय. ॥१६॥

**अघासुरो महाव्याधिः कलिः कंसभूपतिः। शमो मित्रं सुदामा यः सत्याक्रूरो दमोद्धवः॥१७॥**

● महाव्याधि (कुष्ठक्षयादि महारोग) हाच अघासुर होय. कलियुग हाच तो कंस राजा. सुदामानामक जो कृष्णाचा बालमित्र तो शम होय. सत्य हाच अक्रूर व दम हाच उद्धव, असे समजावे. ॥१७॥

**यः शंखः स स्वयं विष्णुर्लक्ष्मी रूपो व्यवस्थितः। दुग्धसिन्धौः समुत्पन्नो मेघघोषस्तु स स्मृतः॥१८॥**

● विष्णु व लक्ष्मी ही दोघे शंखरूपाने अवतीर्ण झाली. कारण की, तो शंख व ती लक्ष्मी ही दोन्ही क्षीरसमुद्रांतूनच उत्पन्न झाली आहेत आणि म्हणून तो शंख विष्णुप्रमाणे मेघगर्जना करणारा आहे असे समजावे. ॥१८॥

**दुग्धोदधिः कृतस्तेन भग्नभाण्डोदधिगृहि। क्रीडते बालको भूत्वा पूर्ववच्च महोदधौ॥१९॥**

● श्रीकृष्णाने नंदाच्या घरी दुधादह्याची मडकी फोडून दुधाचा व दह्याचा समुद्र तयार केला आणि ज्याप्रमाणे भगवान् विष्णू क्षीरसमुद्रांत क्रीडा करतात त्याप्रमाणे श्रीकृष्णरूपाने लहान होऊन क्रीडा करू लागला. ॥१९॥

**यस्यासौ ज्वलनाभासः खड्गरूपो महेश्वरः। कश्यपोलूखलः ख्यातो रज्जुर्माताऽदितीस्तथा॥२०॥**

● महेश्वर हा श्रीकृष्णाची अग्नीप्रमाणे प्रखर असणारी तलवार झाला. कश्यप उखळ झाला, त्याप्रमाणे अदिति माता दावें झाली. ॥२०॥

**संहारार्थं च शत्रूणां रक्षणाय च संस्थितः। कृपार्थेसर्वभूतानां गोप्तारं धर्ममात्मजम्॥२१॥**

● शत्रूंचा संहार करण्याकरितां, मित्रांचे रक्षण करण्याकरिता व सर्व प्राण्यांवर कृपा करण्याकरिता तसेच स्वतःचा जो पुत्ररूप धर्म त्याचे रक्षण करण्याकरिता भगवान स्वतः अवतार धारण करीत असतात. ॥२१॥

**यत्सृष्टमीश्वरेणासात्तच्चक्रं ब्रह्मरूपधृक्। वैजयन्ती च वायुश्च स परं धर्मसंज्ञकः ॥२२॥**

● जे ईश्वराने उत्पन्न केलेले चक्र तेच प्रत्यक्ष वेद होत. ज्याला धर्म म्हणतात तीच वैजयन्ती माळा, तसेच त्यातून निघालेला वायु हाहि धर्मच होय. ॥२२॥

**छत्रं च खं च संविद्धि बिंदुवत्सर्वमूर्धनि। यावन्ति देवरूपाणि वदन्ति विबुधा जनाः ॥२३॥**

● सर्वांच्या मस्तकावर शून्यासारखे असणारे आकाश तेच छत्र होय. जे काही दिसण्यात येते ते सर्व देवरूपीच आहे, असे विद्वान लोक सांगत असतात. ॥२३॥

**नमन्ति देवरूपेभ्या एवमादि न संशयः। गदा च कालिका साक्षात् सर्वशत्रुनिबर्हिणी ॥२४॥**

● विद्वान पुरुष ह्याप्रमाणे देवतारूपी पदार्थांना नमन करतात आणि सर्व शत्रूंचा नाश करणारी गदा ही कालिकादेवीचा अवतार होय ह्यांत संशय नाही. ॥२४॥

**धनुः शार्ङ्गं स्वमाया तच्छरः कालोऽसुभोजनः। अब्जकाण्डं जगद्बीजं घृतं पाणौ स्वलीलया ॥२५॥**

● भगवंताची माया तेच शार्ङ्ग धनुष्य. लोकांना मारणारा जो काळ तोच बाण. जगाच्या उत्पत्तीचे बीज तेच श्रीकृष्णाने हातात धरलेले उत्तम कमळ होय. ॥२५॥

**गरुडो वटभाण्डीरः सुदामा नारदो मुनिः। वृन्दाभक्तिः प्रियाबुद्धिः सर्वजन्तुप्रकाशिनी ॥२६॥**

● गरुड हा वटभांडीर झाला. नारद हाच सुदामा झाला. भक्ती ही वृंदा झाली. सर्व प्राण्यांना ज्ञानप्रकाश देणारी जी बुद्धी तीच राधा झाली. ॥२६॥

**तस्मान्न भिन्ना एतास्ता आभिर्भिन्नो न वै विभुः। भूमावुत्तारितं सर्वं वैकुण्ठं स्वर्गवासिनम् ॥२७॥**

● ह्याकरिता वर सांगितलेल्या सर्व गोष्टी परमेश्वराहून निराळ्या नाहीत व परमेश्वर सर्व वस्तूंहून भिन्न नाही. वैकुंठात राहणाऱ्या व स्वर्गात राहणाऱ्या सर्वजणांना पृथ्वीवर अवतार घेण्यास लाविले. ॥२७॥

**॥ श्रीकृष्णोपनिषत् समाप्त ॥**

## परिशिष्ट क्र. ७ श्रीमद्भागवतान्तर्गत निवडक सुभाषिते

- **यस्मिन्नहिंसोपशमः स्वधर्मः॥१-१८-२२**
(जेथे अहिंसा आणि शांति हाच स्वधर्म मानला जातो, ते योग्यांचे स्थान.)

- **नभ पतन्त्यात्मसमं पतत्रिणः॥ १-१८-२३**
(पक्षी आपल्या शक्तीप्रमाणेच अनंत असलेल्या आकाशांत उडत असतात.)

- **वरं मुहूर्तं विदितं घटेत श्रेयसे यतः॥ २-१-१२**
(लक्ष्य लावून केलेले काम थोडा वेळ जरी केले तरी ते फायदेशीर होते.)

- **पदं तत्परमं विष्णोर्मनो यत्र प्रसीदति॥ २-१-१९**
(ज्या ठिकाणी मन प्रसन्न होते ते भगवंताचे स्थान.)

- **न ह्यतोऽन्यः शिवः पंथा विशतः संसृताविह॥ २-२-३३**
(संसारात पडणाराला भक्तीवाचून दुसरा कल्याणकारक मार्गच नाही.)

- **विमोहिता विकत्थन्ते ममाहमिति दुर्धियः॥ २-५-१३**
(मायेने मोहित झालेले पुरुष 'हे माझे' अशी वल्गना करीत असतात.)

- **मा वेदगर्भ गास्तन्द्रीं सर्ग उद्यममावह॥ ३-९-२९**
(आळस करू नको, कार्यास सुरुवात कर.)

- **क्व यामो बलिनोत्पाद्य वैरम्॥ ३-१८-११**
(समर्थाशी वैर करून जाणार तरी कोठे?)

- **न वै जातु मृषैव स्यात् प्रजाध्यक्ष मदर्हणम्॥ ३-२१-२४**
(भगवंताची सेवा कधीहि व्यर्थ जात नाही.)

- **अर्थे ह्यविद्यमानेऽपि संसृतिर्न निवर्तते॥ ३-२७-४**
(खोट्या असलेल्या पदार्थांपासूनहि भीति उत्पन्न होतेच.)

- **दैवादुपेतमथ दैववशापदपेतं॥ ३-२८-३७**
(सिद्ध पुरुष दैवाने प्राप्त झालेल्या किंवा नाहीशा झालेल्या वस्तूंची पर्वा करीत नाहीत.)

- **संभावितस्य स्वजनात्पराभवो य दास सद्यो मरणाय कल्पते॥ ४-३-२५**
(आप्तजनांकडून झालेला अपमान संभावित मनुष्याला मरणापेक्षाहि दुःखदायी होतो.)

- **न कुर्यात्कर्हिचित्सङ्गं तमस्तीव्रं तितीरिषुः॥ ४-२२-३४**
(संसारातून तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाने कोणाचाहि संग करू नये.)

- **यदि न स्याद् गृहे माता पत्नी या पतिदेवता।**
**व्यंगे रथ इव प्राज्ञः कोनामासीत दीनवत्॥ ४-२६-१५**

(घरात जर प्रेमळ माता, पत्नी किंवा पति नसेल, तर मोडलेल्या रथाप्रमाणे असलेल्या त्या घरात कोण बरे दीनासारखा राहील?)

- **तत्पादमूलं शरणं यतः क्षेमो नृणामिह॥ ४-२९-५०**
  (भगवंताच्या चरणाचा आश्रय हाच मनुष्यांचे कल्याण करणारा आहे.)

- **कर्म यत्क्रियते प्रोक्तं परोक्षं न प्रकाशते॥ ४-२९-५९**
  (यो लोकी केलेले यज्ञादिक कर्म उत्तरक्षणी नाश पावत असल्यामुळे परलोकी उपयोगी पडत नाही.)

- **मन एव मनुष्येंद्र भूतानां भवभावनम्॥ ४-२९-७७**
  (मन हेच मनुष्यांच्या जन्ममरणाला कारण आहे.)

- **दयया सर्वभूतेषु संतुष्ट्या येन केन वा॥**
  **सर्वेंद्रियोपशान्त्या च तुष्यत्याशु जनार्दनः॥ ४-३१-१९**
  (प्राणिमात्रांवर दया करणे, यदृच्छालाभांत संतुष्ट असणे, व इंद्रियनिग्रह करणे यांच्या योगाने भगवान लवकर प्रसन्न होतो.)

- **जितेंद्रियस्यात्मरतेर्बुधस्य ग्रहाश्रमः किं नु करोत्यवद्यम्॥ ५-१-१७**
  (ज्याची इंद्रिये स्वाधीन आहेत व जो आत्मस्वरूपात रममाण असतो, असा ज्ञानी पुरुष गृहस्थाश्रमांत असला तरी त्याला काय अपाय होणार?)

- **न कुर्यात्कर्हिचित्सख्यं मनसि ह्यनवस्थिते॥ ५-६-३**
  (मनावर विश्वास ठेवून कोठेहि मैत्री करू नये.)

- **मुक्तिं ददाति कर्हिचित्स्म न भक्तियोगम्॥ ५-६-१८**
  (भगवान एखाद्यावर प्रसन्न झाले तर त्याला मुक्ति देतील, पण भक्तियोग मात्र कधी देणार नाहीत.)

- **नाश्यतः पथ्यमेवान्नं व्याधयोऽभिभवन्ति हि॥ ६-१-१२**
  (पथ्य सांभाळणाऱ्या मनुष्यास रोग होतच नाहीत.)

- **वेदप्रणिहितो धर्मो ह्यधर्मस्तद्विपर्ययः॥ ६-१-४०**
  (वेदविहित असेल तो धर्म, व वेदाने निषिद्ध असेल तो अधर्म.)

- **पुत्राणां हि परो धर्मः पितृशुश्रूषणं सताम्॥ ६-७-२८**
  (मातापित्याची सेवा करणे हा पुत्रांचा खरा धर्म.)

- **जातस्य मृत्युर्ध्रुव एष सर्वतः प्रतिक्रिया यस्य न चेह क्लृप्ता॥ ६-१०-३२**
  (जो जन्माला आला त्याला मृत्यू येणारच, कारण मृत्यु चुकविण्याचा उपाय जगात उत्पन्नच झाला नाही.)

- नन्वग्निः प्रमदा नाम घृतकुम्भसमः पुमान्॥ ७-१२-९
(स्त्री ही खरोखर अग्नीप्रमाणे असून पुरुष घृतकुंभाप्रमाणे आहे.)

- यथा प्रयान्ति संयान्ति स्रोतोवेगेन वालुकाः
संयुज्यन्ते वियुज्यन्ते तथा कालेन देहिनः॥ ६-१५-३
(नदीच्या प्रवाहाने वाळूचे कण जसे एकत्र होतात, किंवा वेगळे होतात, त्याचप्रमाणे जीवहि कालवेगाने संयुक्त व वियुक्त होतात.)

- सदा संतुष्टमनसः सर्वाः सुखमया दिशः॥ ७-१५-१७
(संतुष्ट चित्त असलेल्या पुरुषाला सर्व आनंदमयच असते.)

- आरयोऽपिहि संधेयाः सति कार्यार्थगौरवे॥ ८-६-२०
(आपले कार्य साधण्याकरिता शत्रूशीहि मैत्री करावी.)

- तप्यन्ते लोकतापेन साधवाः प्रायशो जनाः। ८-७-४४
(दुसऱ्यांचे दुःख पाहून साधुजन दुःखी होतात.)

- यदृच्छालाभतुष्टस्य तेजो विप्रस्य वर्धते॥ ८-१९-२६
(दैवाने प्राप्त होणाऱ्या वस्तूने संतुष्ट होणाऱ्या ब्राह्मणाचे तेज वाढते.)

- न ह्यसत्यात् परोऽधर्मः॥ ८-२०-४
(असल्याहून मोठा अधर्म नाही.)

- साधुषु प्रहितं तेजः प्रहर्तुः कुरुतेऽशिवम्॥ ९-४-६९
(साधुपुरुषावर केलेला प्रहार, तो करणाऱ्याचेच अकल्याण करतो.)

- एव एव पुरा वेदः प्रणवः सर्ववाङ्मयः।
देवो नारायणो नान्य एकोग्निर्वर्ण एव च॥ ९-१४-४८
(जसा वाणीचे बीज असा जो ॐकार तोच काय तो एक वेद तसाच नारायण हा एकच देव असून अग्निही एक व वर्णसुद्धा एकच.)

- सर्वेषामपि भूतानां नृप स्वात्मैव वल्लभः॥ १०-१४-५०
(प्रत्येक प्राणिमात्राला आपला आत्माच अतिशय प्रिय असतो.)

- भगवद्रूपमखिलं नान्यद्वस्त्विह किंचन॥ १०-१४-५६
(हे सर्व जग भगवत्स्वरूपच आहे, त्यावाचून दुसरे काही नाही.)

- भर्जिता क्वथिता धाना प्रायो बीजाय नेष्यते॥ १०-२२-२६
(एकदा भाजलेले किंवा शिजवलेले धान्य पुन्हा उगवत नाही.)

- कर्मणा जायते जंतुः कर्मणैव विलीयते॥ १०-२४-१३
(कोणताही प्राणी आपल्या कर्मानें जन्मास येतो, व आपल्या कर्मानेंच नाश पावतो.)

- अंजसा येन वर्तेत तदेवास्य हि दैवतम्॥ १०-२४-१८
  (ज्यापासून आपला योगक्षेम सुखाने चालतो तेच आपले दैवत.)

- सिद्ध्यसिद्ध्योः समं कुर्याद्दैवं हि फलसाधनम्॥ १०-३६-३८
  (प्रयत्नांत यश मिळणे न मिळणे हे दैवाचे स्वाधीन आहे, पण मनुष्याने प्रयत्न करण्यास चुकू नये.)

- यत्राधर्मः समुत्तिष्ठेन्न स्थेयं तत्र कर्हिचित्॥ १०-४४-९
  (जेथे अधर्म होत असेल तेथे क्षणभरहि राहू नये.)

- परं सौख्यं हि नैराश्यं॥ १०-४७-४७
  (कोणत्याही वस्तूविषयी आशा न ठेवणे हे खरे सुख.)

- एकः प्रसूयते जन्तुरेक एव प्रलीयते॥ १०-४९-२१
  (प्राणि एकटाच जन्मास येतो व एकटाच मृत्युवश होतो.)

- ईशो दुरत्ययः कालः॥ १०-७४-३१
  (कालाचे उल्लंघन करणे कठीण आहे.)

- भावोहि भवकारणम्॥ १०-७४-४६
  (श्रद्धा हीच सर्वाला कारण आहे.)

- सद्यः पुनाति सद्धर्मो देव विश्वद्रुहोपि हि॥ ११-२-१२
  (धर्म हा पतितांना सुद्धा पवित्र करतो.)

- नातिस्नेहः प्रसंगो वा कर्तव्यः क्वापि केनचित्॥ ११-७-५२
  (केव्हाही कोणाशीही अतिस्नेह करू नये.)

- आशा हि परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम्॥ ११-८-४४
  (आशा हे परम दुःख आहे व आशारहित संतोष हे मोठे सुख आहे.)

- परिग्रहो हि दुःखाय॥ ११-९-१
  (वस्तूंचा स्वीकार दुःखकरच होतो.)

- गृहारंभोऽतिदुःखाय॥ ११-९-१५
  (घर ही घरघर आहे.)

- क्वचिद्गुणोऽपि दोषःस्याद्दोषोऽपि विधिना गुणाः॥ ११-२१-१६
  (दैवयोगाने केव्हा केव्हा गुणहि दोष होतात किंवा दोष गुण होतात.)

- प्रायेणार्थाः कदर्याणां न सुखाय कदाचन॥ ११-२३-१५
  (कृपण पुरुषांना द्रव्य केव्हाही सुखकारक होत नाही.)

- **अन्नं हि प्राणिनां प्राणः॥** ११-२६-३३
  (अन्न हे प्राण्यांचा प्राण होय.)
- **अयं हि परमो लाभो नृणां साधुसमागमः॥** १२-१०-७
  (संताची संगति हाच सर्वश्रेष्ठ लाभ.)
- **सर्ववेदांतसारं हि श्रीभागवतमिष्यते।** १२-१३-१५
  (हे भागवत म्हणजे सर्व वेदान्ताचे सार आहे.)



